श्री

श्रीमन्महाराजमल्हारराव

गायकवाड

सेनाखासखेलसमशेरबाहादुर

बडोदेसरकार

यांची

धार्मिकबुद्धि, विद्यावृद्धीविषयीं नत्सरता,

देवब्राह्मणांची भक्ति व सत्कीर्तीची इच्छा पाहून

त्यांस

श्रीमन्महाभारतसार यानांवाचा ग्रंथ

रावजी श्रीधर गोंधळेकर.

यांनी

आपले जगद्धितेच्छु छापखान्यांत छापून

विनयपूर्वक परमादरानें नजर केला असे.

# विनंतिपत्र.



सर्वांस विनयपूर्वक कळवितों कीं, या एकंदर ग्रंथाची किंमत रुपये २५ पंचवीस आह्मी ठेवणार होतों; परंतु श्रीमन्महाराज गायकवाड सरकार यांनीं सहाय्य केल्यामुळें रुपये दाहा कमी करून पंधरा ठेविली आहे. यास्तव सर्व लोकांनीं महाराजांचा मोठा आभार मानिला पाहिजे. आणि उत्तरोउत्तर सद्विद्येकडे महाराजांचा प्रेमा अधिक होऊन त्यांची सत्कीर्ति अधिक वाढत जावी, व त्यांस अक्षय्य सुख प्राप्त व्हावें अशी सर्वांनीं ईश्वराची प्रार्थना करावी असें आह्मीं इच्छितों.

रावजी श्रीधर गोंधळेकर.

# श्रीमन्महाभारतसार

## भाग २रा

## अनुक्रमणिका

## उद्योगपर्व.

उद्योग पर्वस्यानुक्रमणिका समाप्ता.

---

# भीष्मपर्व ६

## अनुक्रमणिका.

भीष्मपर्वानुक्रमणिका समाप्त.

# द्रोणपर्व ७

## अनुक्रमणिका.

द्रोणपर्वस्यानुक्रमणिका समाप्ता.

# कर्णपर्व ८

## अनुक्रमणिका.

कर्णपर्वानुक्रमणिका समाप्त.

# शल्यपर्व ९

## अनुक्रमणिका.

| भिषेक. ||

शल्यपर्वस्यानुक्रमणिका समाप्ता.

# सौप्तिकपर्व १०

## अनुक्रमणिका.

| अध्याय | विषय. | अध्याय. | विषय. |
|---|---|---|---|
| १ | अश्वत्थाम्याचा विचार. | ११ | भीमसेन गमन. |
| २ | अश्वत्थामा व कृप यांचा-संवाद. | १२ | धर्मराज व कृष्ण यांचा सं-वाद. |
| ३-४ | अश्वत्थाम्याचा विचार. | १३ | ब्रह्मशिरास्त्र प्रयोग. |
| ५ | अश्वत्थाम्याचें गमन. | १४ | अर्जुन अस्त्र प्रयोग. |
| ६ | अश्वत्थाम्यास चिंता. | १५ | ब्रह्मशिर अस्त्राचा गर्भांत प्रवेश. |
| ७ | अश्वत्थाम्याचें शिवपूजन |  |  |
| ८ | पांचालादिकांचा वध. | १६ | द्रौपदी सांत्वन. |
| ९ | दुर्योधन प्राणत्याग. | १७-१८ | धर्मराज व कृष्ण यांचा संवाद. |
| १० | युधिष्ठिरादि शिबिर प्रवे-श. |  |  |

सौप्तिकपर्वस्यानुक्रमणिका समाप्ता.

# स्त्रीपर्व ११

## अनुक्रमणिका.

| अध्याय. | विषय. | अध्याय | विषय. |
|---|---|---|---|
| १ | सर्वांचा शोक | २-८ | धृतराष्ट्राचा शोक. |

स्त्रीपर्वस्यानुक्रमणिकासमाप्ता.

# उद्योगपर्व

१ अध्याय - वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडव हे अभिमन्यूचा विवाह करून, यादवांसहीत आनंदानें द्वितीय दिवशीं प्रातःकाळीं विराटसभेंत गेले. तीसभा उत्तमोत्तम प्रकारच्या मण्यांनीं व रत्नांनीं विचित्रीत असून तीमध्यें उत्तम आसनें. सुगंधीक पदार्थ, नशींच माल्यें ठेविलीं होतीं. त्यासभेंत विराट, द्रुपद हे प्रथम जाऊन उत्तमासनांवर बसले. नंतर बलराम व जनार्दन आसनावर बसले. तेव्हां पित्यासहीत सात्यकी, बलरामा बरोबर जाऊन पांचालराजाच्या समीप बसला तसेच जनार्दन भगवान व युधिष्ठिर मत्स्यराजाच्या सन्निधबसले. द्रुपदाचे सर्वपुत्र, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, प्रद्युम्न, सांब, विराटपुत्र यांसह वर्तमान अभिमन्यू सभेमध्यें बसला, तसेच द्रौपदीचे पांचपुत्र सर्वगुणांनीं पित्यासमान, असे सुवर्णचित्रीत उत्तमासनांवर बसले. हे संपूर्ण महारथी वस्त्राभरणांनीं सुशोभीत होऊन सभेंतबसले असतां तीसभा ग्रहयुक्त आकाशासारखी दिसूं लागली. ते सभासद सभेंत बसून भगवान् श्रीकृष्ण यांजकडे पाहून अनेककथा सांगत असतां आपल्या कार्यहेतुस्तव पुढें भगवान् श्रीकृष्ण उत्तमप्रकारचें माहार्थ वाक्य बोलतील अशी इच्छा करीतअसतां श्रीकृष्ण बोलतात अहो, झालेलें वर्तमान तुम्हांस सर्व विदितच आहे, शकुनीनें युधिष्ठिरास कपटद्यूतानें राज्यभ्रष्ट करून वनवासकरण्याचा पण केला; परंतु हे पांडव. अन्यलोकीं रणामध्यें जिंकण्यास अशक्य असून सत्यमार्गामध्येंरत व अकुंठितगती ज्यांच्यारथाची असेअसतांही आपलीप्रतिज्ञा सत्यकरण्याकरितां त्रयोदशवर्षात्मक उग्रव्रत यांणीं केलें तसेच शरिरास असह्य असेनानाप्रकारचे महान् महान् क्लेशसहन करून अरण्यांत फिरले. हे पांडव आजपर्यंत वनामध्यें परदासा सारखे फिरत असतां स्वकुलोपार्जीत राज्याची इच्छाकरतात. तेव्हां आतांमला असें वाटतें कीं, धर्मसुत जो युधिष्ठिर व दुर्योधन यांउभयतांचें जेणेंकरून हित होईल त्याचा सर्वांनींविचारकरावा; अधर्मानें देवांचेंराज्य जरीमिळत असलें तरी धर्मराज त्याचीइच्छाकरीत नाहीं. पितृसंपादित राज्य पांडवांचें असतां धृतराष्ट्रपुत्रांनीं मिथ्याउपचारांनीं हरणकेलें; हीगोष्ट फारवाईट

आहे. धृतराष्ट्रपुत्रांनीं पार्थासरणामध्यें स्वतेजानें कधींहीजिंकिलेंनाहीं;त थापी सुहृदांसहवर्तमान धर्मराजधृतराष्ट्रपुत्राचें अभिष्टचिंतन करीत आ हे. हे पांडुसुत आपल्या स्वपराक्रमानें इतरराजांस पीडितकरून संपादि त केलेलेंराज्य,तसेंच आपलें पितृप्राप्त राज्य. इतकेंच मिळण्याची इच्छाकर्ता त. हे पांडव बाल असतां या दुष्ट कौरवांनीं राज्यहेतुस्तव त्यांस मारण्या करितां लाक्षागृह. भीमसेनास विषप्रयोग इत्यादी उपायकेले;हें सर्व तु- म्हांस विदितच आहे. युधिष्ठिराची धर्मज्ञता किती व धृतराष्ट्रपुत्राचा लो- भकिती हींसर्व तुम्हीं जाणतच आहां; यास्तवसर्व तुम्हीं पृथक पृथक या विषयीं विचारकरा. हे पांडव सत्यनिरत असून आपला समयकधींही तेउ ल्लंघन करीतनाहींत. धृतराष्ट्रपुत्रांनीं त्यांचें भाषण परिपालन केलेंनाहीं तर त्यांचें हे हननकरतील. तस्मात् युद्धेंकरून पांडुपुत्र धृतराष्ट्रपुत्रांस बाधा नकरोत व युद्धामध्यें त्यांचावध नहोवो, याविषयींचें माझेंपूर्ण मन आहे; परंतु हें माझेंभाषण सर्वव्यर्थ आहे. धृतराष्ट्रपुत्रास हेंकधींही रुचणार ना हीं हें संपूर्णकृत्य दुर्योधनास सांगून त्याचें मन काय आहे हें कळलें पाहिजे यास्तव प्रथम धृतराष्ट्रपुत्राचें शमनकरून युधिष्ठिरास अर्धराज्य देवावेंणा ग असा कुशल दूत पाठवावा. असें भाषण ऐकून बलरामानीं त्याच्या वाक्या चा सत्कार केला. असाविषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसरा - बलराम बोलतो हे वीरहो, गदाग्रजानें बोलला हें तुम्हीं ऐकिलें हें वाक्य धर्मार्थयुक्त असून अजातशत्रू जोयुधिष्ठिर आणि दु र्योधन नरपती यांसहितकारक आहे. पांडवांनीं पूर्वी पणामध्यें अर्धराज्य कौरवांस दिल्हेंहोतें तेंराज्य पुनःसंपादन करण्याची ते इच्छाकरितात; तस्म त् दुर्योधनानें पांडवांस अर्धराज्य देऊन आम्हांसह वर्तमान करवी असा वें. उभयपक्षीं प्रशम झाला असतां सर्वजनांसही सुख कारक आहे; याकरि- तां प्रथम दुर्योधनाचें मत जाणावयास आणि युधिष्ठिराचें यथार्थ वाक्य बोलावयास कोणी चतुर पुरुष पाठवावा. कुरुपांडवांचा शमझाल्यानें म जला फारप्रीयआहे. दूतजाईल त्यानें आधीं भीष्मास आमंत्रणकरावें; नं र विचित्रवीर्य जो धृतराष्ट्रयास भेटून द्रोणाचार्य, अश्वत्थामा, विदूर

कृपाचार्य, शकुनी, कर्ण तसेच धृतराष्ट्राचे सर्वपुत्र, शस्त्रास्त्रवेत्ते सेनापतीवदु सरे कोणी वीर असतील त्यांसर्वांस आमंत्रणें करावीं. तेसर्व वृद्ध पराक्रमी वीर, एकत्र सभेमध्यें बसले असतां दूतांनी कुंतीसूताचें प्रणिपातयुक्त वाक्य बो- लावें. कारण धृतराष्ट्रपुत्र पांडवांचा अंशग्रासून बलाचा आश्रय करून राहि- ले आहेत, त्यांजपासून अर्धराज्यघेणें आहे म्हणोन त्यांस तीव्रभाषण बोल णें योग्यनाहीं; याकरितां नम्रतेकरून बोलावें. युधिष्ठिरपूर्वीच चुकला, कुरु प्रवीर, तसेंच सुहृदजन यांनी बहुत प्रकारें त्यास सांगितलें, तसेंच संज य व विदूर यांणींही सूचनाकेली होती कीं, तुम्हीं कोणत्याप्रकारें द्यूतखे ळूनये; परंतु तेंवाक्य नऐकून युधिष्ठिरानें आपणास द्युतखेळण्यास नये तां द्यूतक्रीडाचतूर जोशकुनी यासहवर्तमान द्यूत खेळला. दुर्योधन, कर्ण व अन्य सहस्रावधी आपल्या बरोबरीचे द्यूतखेळणारे बहुत असतां त्यास र्वांस सोडून शकुनीशींच परम आवेशानें कांखेळावयास प्रवर्तला! द्यूतक्रीडे मध्यें धर्मराजानें राज्यहरविलें यांत शकुनीकडे अपराधकाय? यास्तव त्या स नमस्कार करूनच प्रेमपूर्वक जें बोलावयाचें असेल तें बोलावें, युद्धाची गोष्ट बोलूंनये, सामोपचारानेंच दुर्योधन कदाचित् ऐकेल, अन्यथा ऐकणार नाहीं याजकरितां दूतपाठवाल त्यानें यारीतीनें संभाषण करावें. याप्रकारें बलरामानें भाषण केलें असतां शिनिप्रवीर जो सात्यकी तो आपले आस- नावरून एकाएकीं उठला. आणि बलरामाच्या भाषणाची निंदाकरून बो लूंलागला. असाँव. याअध्यायांत आहे.

३ अध्यायांतिसर्ग- सात्यकी भाषणकर्ता हे बलरामा, तुम्हीं आप ल्या बुद्धिवैभवानुसार बोललां हें खरेंच आहे. यालोकांमध्यें पुरुषश्रेष्ठ व कुपुरुष हे दोनपक्ष आहेत; एकासच दोनपुत्र होतात. त्यांत एक नपुंसक व एक महापराक्रमी होतो तसेंच वनस्पतीमध्येंही वृक्षाची शाखा एक फल पुष्पांनीयुक्त व एक निष्फळ असते. हे हलधरा, तुझेवाक्यास मी निंदित नाहीं; परंतु तुझेंवाक्य जेंऐकतात त्यास मी निंदितों. हेमाधवा, युधिष्ठिराकडे अणु मात्र दोषनसतां त्यास दोषठेवितोस हें काय? बलेसभेमध्यें असतां निर्भयपणें असंभाषण करतोस. युधिष्ठिरास शकुनीनें कपटद्यूतामध्यें जिंकिलें. तोकपटद्यूतनंतर

जाणत नाहीं; तेव्हां हा धर्मजय झाला किंवा काय? यास्तव जे दुष्ट आहेत त्यां
चा वध कपटानेंच करावा. जर कुंतीनंदन आपले मंदिरांत बंधूंसहीत द्यूत
खेळत असतां तर कौरव तेथें येऊन द्यूत खेळोन राज्य घेते तर ही गोष्ट आ
म्हीं मान्य करतों. कौरवानीं कपट द्यूत करून पांडवांस आपले घरीं बोलावून
नेवून विश्वासघातानें राज्य हरण केलें, यांत त्यांचा धर्म काय राहिला? युद्धा-
स अथवा द्यूतास बोलाविलें असतां क्षत्रियानीं परतोंनये; हा क्षात्रधर्म स्म
रोन कौंतेय त्याचे घरास गेला असतां त्यांनीं कपटें करून त्यास जिंकिलें, आ
तां त्याचें कल्याण कसें होईल? पुढें पांडवांनीं प्रणिपात पूर्वक कौरवांशीं भा
षण करणें हें उचीत नाहींच म्हणोन प्रतिज्ञेप्रमाणें अरण्यवास करून आ
तां ते मुक्त होऊन पितृपैतामहपद राज्य मागतात, त्यांस अन्यथा काय-
म्हणावें? जर युधिष्ठिर पारविताची इच्छा धरिता तर त्याजकडे शद्ब लाव-
णें योग्य आहे, तें कांहीं नसतां आतां दुर्योधनानें अर्धराज्याची इच्छा कर-
णें अश्लाघ्य आहे. पांडव धर्मानें सत्य संरक्षण करून राहिले असतां आप
लें अर्धराज्य कां टाकतील? याजकरितां भीष्म, द्रोणाचार्य, विदुर यांनीं दु
र्योधनादिकांस सांगावें कीं, अर्धराज्य पांडवांचें तुम्हीं सोडावें, ते न ऐक
तील तर मी त्यास तीक्ष्णशरानें रणभूमीचाठाईं नम्र करून माहात्मा यु
धिष्ठीर याचे पायां पडवीन जर ते तसें न करतील तर अमात्यां सहवर्तमान
मरतील. मी कोपलों असतां माझा वेग त्यांच्यानें सहन करवणार नाहीं. व
ज्राचा वेग जसा पर्वताच्यानें साहवत नाहीं तसा गांडीवधन्वा अर्जुन, युधि
ष्ठीर व मी क्रुद्ध झालों असतां आमचा वेग कोण सहन करील? तसाच अ
त्यंत दुरासद भीम याचा वेग कोण सहन करील? नकुल, सहदेव यांची का
ळ यमोपम कांती आहे, तसेच वीरार द्रुपद, धृष्टद्युम्न, परम दुरासद द्रौप
दीचे पांच पुत्र पांच पांडवां पासून झालेले वीर्यानें व पराक्रमानें आप आ-
पल्या पित्यांसमान, त्यांचा वेग कोण सहन करील? हा सौभद्र देवांसही अ-
जिंक्य; तसेंच गद, प्रद्युम्न, सांब हे तिघे काळ सूर्यासारिखे त्यांच्या उपमेचे
इतके आम्हीं संग्रामीं, शकुनी कर्णासहवर्तमान धृतराष्ट्रपुत्रांस मारून पां
डवांस राज्याभिषेक करूं. अपराधी शत्रूस मारिल्यानें कांहीं अधर्म होत

नाहीं; शत्रुजवळ यांच्याकरणें हाच अधर्म आहे. दुर्योधनाचा हृद्गत भाव कायआहे याचाशोधकरून त्यानीं पांडवांस अर्धेराज्य दिलेंअसतां युधिष्ठिरानें तें घ्यावें, नदिल्यास सर्वकौरव युद्धामध्यें नष्टहोतील, असेंमाझें-मत आहे. असाविषय या अध्यायांत आहे.

४ अध्यायचवथा- वैशंपायन म्हणतात हे जनमेजया असें सात्यकीचें भाषण ऐकून द्रुपद बोलतो हेसात्यकी, तूंबोललास तसेंच होईल. मधुर भाषणेंकरून दुर्योधनराज्य देणारनाहीं. धृतराष्ट्रास कृतप्रीय आहेत तोही त्यांस अनुसरेलवभीष्म, द्रोण हे कृपण आहेत राधेय व शकुनी हे मूर्ख आहेत तर हे तोच पक्षस्विकारतील. बलरामाचें वाक्य माझ्या हृदयास केवळ अयोग्य वाटतें. नीतीमान पुरुष असेलत्यानें दुर्योधनाशीं मृदु भाषण करूंनये; कारण तो पापबुद्धी असून मृदुभाषणानें साध्य नाहीं. जोगर्दभाविषयीं मृदू व धेनूविषयीं तीक्ष्ण वर्तन असेल त्यानें पापी दुर्योधनाशीं मृदुभाषण करावें कौरवांशीं मृदुभाषण केलें असतां पांडव अशक्त आहेत असें ते मानतील; याकरितां त्यांशीं उपाय करणें तो तीक्ष्णकरावा. माझ्यामतें अगोदर सर्वदेशांतील नरपतींस बोलावणीं पाठवावीं दुर्योधनही सर्वांसबोलावणीं पाठवील. प्रथम आमंत्रण असेल तिकडेच जावें असाशिष्ट संप्रदाय आहे, याजकरितां नरेंद्रांस पत्रेंआधीं पाठवावीं असेंमला वाटतें. शैल्यराजा व त्याच्या अन्वयें अन्यनृपती, पूर्वसागरवासी भगदत्त, हार्दीक्य आदीकरून सर्व राजांकडे त्वरित दूतपाठवावे. दुसरें कृत्य, हाब्राम्हण विद्वान माझापुरोहीत, यासकोणते रीतीनें कोणासकसें बालावें तें सांगून धृतराष्ट्राकडे पाठवावें. धृतराष्ट्रास जो निरोप सांगावयाचा तोच त्यानें दुर्योधन, भीष्म व द्रोण यांजकडे जाऊन सांगावा. असाविषय या अध्यायांत आहे.

५ अध्यायपांचवा- श्रीकृष्ण विराटाकडे पाहून बोलतात, सोमवंशातील धुरंधर आपण आहांत यास्तव आपणास हें वाक्य उचीत आहे. तुमच्या आज्ञेविरुद्ध जोवर्तेल तो बालिश जाणावा. कुरुपांडवां विषयीं आमचें नातेंसमान आहे, विवाहाकृतां तुम्हींआम्हांस बोलाविलें तो-

विवाह समास झाला, आतां आम्हांस निरोप द्यावा आपण सर्व भुपालांमध्यें वयानें व अध्ययनें करून वरिष्ठ आहांत; आम्हीं सर्वही आपले शिष्यवत् आहोंत. धृतराष्ट्रपुत्रास ही तुम्ही मान्य आहांत. द्रोणाचार्य व शारद्वत हे तरी आपले सरवेच आहेत पांडवाचे कार्यार्थ ब्राम्हण पाठवावा यांत सर्वांचे कल्याण आहे. कुरुपुंगवांनी सौभ्रातृत्वेंकरून जर शम केला तर महान क्षय होणार नाहीं, जर दर्पेकरून मोहानें धृतराष्ट्रपुत्र नऐकतील तर वीरांस तुम्हीं बोलावितच आहां; मागाहून आम्हांस बोलावणें पाठवावें गांडीवधन्वा यास क्रोध आला असतां ते मूढ अमात्य सबांधव नाश पावतील. असें श्रीकृष्ण बोलले असतां सर्वांस उत्साहशक्ती आली नंतर विराटानें बंधुसहवर्तमान श्रीकृष्णाचा सन्मान करून द्वारकेस पाठविलें विराटप्रमुख सर्व संग्रामाची सिद्धता करूं लागले विराट, द्रुपद पांडव यांनीं एकमत करून सर्व भूपालांस आमंत्रणें केलीं असतां त्या सर्व भूपालांनीं चतुरंग सेनासमवेत अजातशत्रूस प्रणाम केला पांडवांनीं बहुत सेना एकत्र केली हे धृतराष्ट्र पुत्रानीं ऐकून त्यांनीही बहुत सेना मिळविली. तेव्हां गज अश्व रथ पदाती यांच्या समर्दानें सपर्वत पृथ्वी कंपायमान झाली इकडे द्रुपदानें ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध असा आपला उपाध्याय युधिष्ठिराच्या अनुमतानें दुर्योधनाकडे पाठविण्याची सिद्धता केली अतेव या प्र आ

६ अध्यायसहावा— द्रुपद राजा आपले पुरोहितास म्हणाला जे करण्याकरितां स्तुती करतो हे पुरोहिता संपूर्ण भूतामध्यें प्राणी श्रेष्ठ. त्यामध्यें बुद्धिमान, त्यांत नर श्रेष्ठ. नरामध्यें ब्राम्हण श्रेष्ठ व त्यामध्येंही विद्वान ब्राम्हण, विद्वानामध्यें कृतबुद्धी व त्यामध्येंही ब्रम्हवादी श्रेष्ठ आहेत तुम्ही जाणते व ब्रम्हवेत्ता असून कुल, वय व शास्त्र यांणेंकरून विशिष्ट आहां म. तसाच मंत्रकरून तरकेवळ शुक्र, बृहस्पती समान दिसतोस आतां तुला आम्हीं बहुत काय सांगावे दुर्योधनाचें मन तूं जाणतच आहेस पांडवाचे ही तुला विदितच आहे. तथापि स्थूलमान सांगतो धृतराष्ट्रानें पांडवांशीं, विंचना बहुत केली. विदुरानें बहुत प्रकारें त्यास सांगितलें तथापी तो पुत्राचेच मतास अनुसरला धर्मराज अक्षज्ञ नसतां शकुनीनें

कपट द्युतामध्यें त्याची वंचनाकरून सर्वराज्य हरणकेलें युधिष्ठिर साधू-म्हणवितो आणि शकुनीनर असाधू आहे, दुर्योधन कोणत्याही प्रकारें अर्धराज्य देणार नाहीं तथापी तूं धर्मप्रधान वाक्य बोलावेंस. विदूर तुझे वाक्यास अनुमोदन देईल. भीष्म, द्रोण कृपादिकामध्यें भेद उत्पन्न होई-ल असें भाषण करावें; कृपाळू असतील त्यांजवळ पांडवांचें क्लेश वर्णनक-रावें. व वृद्ध असतील त्यांचेठाई पूर्वानुष्ठीत कुलधर्म सांगावे. ज्या भाषणा-नें सर्व वीरांचीं हृदयें स्फोट होतील असें बोलावें. तुजला त्यांपासून कि-मपीही भय नाहीं; याचें कारण तूं ब्राम्हण, वेदवेत्ता असून दूतकर्मीं प्रवर्त-ला आहेस उदईक दिवस उत्तम आहे यास्तव आपण प्रस्थान करावें. असें द्रुपदाचें वाक्य ऐकून पुरोहित शिष्यगणां सहवर्तमान हस्तनापुरास गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

७ अध्याय सातवा- वैशंपायन म्हणतात हे जनमेजया, पुरोहि-त हस्तनापुरास गेला असतां दूतद्वारा सर्व नरेंद्रांस पत्रें पाठवून स्वतां कुं-तीपुत्र धनंजय द्वारकेस जाण्यास निघाला. पूर्वी श्रीकृष्णानें बलरामा स-हवर्तमान द्वारकेस गेल्यानंतर वृष्णी, अंधक भोज इत्यादी तेथील जनास पा-डवांचें वृत कथन केलेंच होतें. दुर्योधनानें, श्रीकृष्ण बलराम, उभयतां द्वारके-स गेल्याचें वृत, गुप्त हेरापासून ऐकून स्वल्प सैन्यासह वर्तमान त्वरा करून द्वारकेस गेला असतां तेच दिवशीं धनंजयही द्वारकेमध्यें आला; नंतर श्रीकृ-ष्ण भगवान् ज्या मंदिरामध्यें निद्रिस्थ होते तेथें उभयतां एकदांच जाऊन प्रथम दुर्योधन कृष्णाच्या शीर्षभागीं बसला, अर्जुन कृतांजलीनम्र होऊन पादप्रदेशभागीं उभा राहिला. इतक्यामध्यें श्रीकृष्णानें जागे होऊन अग्र-भागी किरीटीस पाहिलें नंतर दुर्योधनास पाहतांच उभयतांस ही स्वागत करून प्रश्न केला, तुम्ही कां आलां! तेव्हां दुर्योधन किंचित् हास्य पूर्वक भाष-ण करतो पांडवांशीं आमचा कलह उत्पन्न झाला आहे तर आपण कृपा करू-न आमचें सहाय्य करावें; माझेठाई व अर्जुनाचेठाई तुमचें सख्य समान व त्याच संबंध हीं तुझाठाई दोघांचा समान आहे; परंतु प्रथम मी आलों पूर्वीं जो येतो त्याचाच पक्ष साधू स्वीकार करतात, तूं तर या लोकांमध्यें परमश्रेष्ठ आहेस

नसाच सर्वांस मान्यही आहेस याजकरितां आपण साधुमर्यादा पालन करा-
वी. असें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे दुर्योधना, तुम्ही पूर्वी आलां यांत-
संशय नाहीं; परंतु मी प्रथम जिष्णूस पाहिला; तुमचें प्रथम आगमन व अर्जु-
नाचें प्रथम दर्शन यास्तव दोघांचेंही साहित्य करणें अवश्यक खरें, परंतू बा
लाचें मनोधारण प्रथम करावें अशी श्रुती आहे, याहेतुस्तव अर्जुनाचें मनो-
धारण आधी संपादन करणेंयोग्य आहे. आतां दोन पक्ष उभयतांस सांगतों. मत्
सदृश पराक्रमें करून एक अर्बुद संख्याक सर्व नारायण संज्ञक योद्धे संग्रा-
मकर्मी अतिनिपुण आहेत हा एक पक्ष, दुसरें संग्रामामध्यें न्यस्तशस्त्र व-
शत्रूशीं युद्ध न करणारा असा मी एक यादोहींतून एक पक्ष अर्जुना प्रथम तूं
स्वीकार कर. असें वाक्य ऐकून पार्थ भाषण कर्ता हे केशवा, तूं संग्रामामध्यें यु-
द्ध जरी न केलेंस व शस्त्रही धारण न केलेंस तरी तूं आमचेकडे ये म्हणजे झा
लें. असें अर्जुनानें भाषण करतांच दुर्योधन मंदात्मा सहस्रावधी जे नारायण
गण यांचा स्वीकार करून न्यस्तशस्त्र जो कृष्ण हा अर्जुनानें वरिला म्हणो-
न हर्षित होऊन बलरामाकडे गेला आणि झालेलें वर्तमान त्यास सांगितलें. दु
र्योधनाचें भाषण ऐकून रौहिणेय त्यास बोलतो हे दुर्योधना, विराटनगरीं वि
वाहाकर्ता आम्ही गेलों होतों ते समयीं तुजकरितां श्रीकृष्णास बहुत रागें भ
रून बोललो; परंतू त्यानें न ऐकिलें मजला म्हणशील तर श्रीकृष्णा व्यतिरि
क्त मी क्षणभर राहाणार नाहीं अशी माझी निश्चित बुद्धी आहे. युधिष्ठिरा-
कडे अथवा दुर्योधना, तुजकडे कोठेंच जात नाहीं तूं पूज्य भारत वंशामध्यें
उत्पन्न झालास म्हणोन तुजला इतकेंच सांगणें कीं, स्वधर्म रक्षण करून युद्ध
कर. असें हलायुधाचें भाषण ऐकतांच दुर्योधन त्यास आलिंगन देऊन कृष्ण
निरायुध अर्जुनाकडे गेला असें जाणोन आतां अर्जुनाशीं युध्यच करावें अ-
शा निश्चयानें कृतवर्म्याकडे गेला असतां कृतवर्म्यानेंही एक अक्षौहिणी सेना
धृतराष्ट्रपुत्रास दिली. नंतर दुर्योधन तें सैन्य व कृष्णानें दिलेलें सैन्य घेऊन
हस्तनापुरास गेला नंतर त्यानें सुहृदांस हर्षाचें वर्तमान सांगितलें. दुर्योधन गेल्या
वर श्रीकृष्ण किरीटीस बोलतात हे पार्था, अयुध्यमान जो मी त्या मजला कि-
मर्थ वरिलेंस. असें ऐकून पार्थ बोलतो हे भगवंता, निरायुध असतां त्रैलो-

ण्यास मारावयास तूं समर्थ आहेस. आतां तुझा मी आश्रय केला तेणेंकरून मी सर्वांस मारीन तूं या लोकीं कीर्तीमान आहेस, यास्तव सर्व यश तुजकडेस च आहे, तें मला मिळावें म्हणोन मी तुला वरिलें. माझा चिरकाल इप्सीत मनोरथ असा आहे कीं, संग्रामीं माझें सारथ्य आपण करावें. असें ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, तुझें वाक्य मजला फार चांगलें रुचलें तुझें सारथ्य मी करून तुझा मनोरथ पूर्ण करीतो. असें कृष्णाचें वाक्य ऐकतांच पार्थ आनंद निमग्न होऊन यादववीरां सहवर्तमान श्रीकृष्णास घेऊन युधिष्ठिराकडे आला. असा विषय या अध्यायांत आहे.

**८ अध्याय आठवा**— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, शल्यराजा दूताचें वाक्य ऐकून चतुरविध सैन्यासहवर्तमान, पांडवांकडे येण्यास निघाला असतां त्याची सेना रहाण्याची जागा दीड योजन होती, ती सेना समूह क्षणभर मार्गांत विश्रांत झाला. तेव्हां शल्य पांडवांकडे येतो हें दुर्योधनानें ऐकून त्याचा सत्कार करण्याकरितां मार्गामध्यें रमणीय स्थानें, सरोवरें, नानाप्रकारचे मांसादि भक्ष्य पदार्थ आदिकरून सिद्ध केले आणि सेवकास आज्ञा केली कीं, याच मार्गानें शल्यास आणून त्याचे सेवेंत तत्पर असावें. त्याप्रमाणें दुर्योधनाच्या सेवकांनीं सिद्धता केली असतां मद्राधिपती त्याच मार्गानें येतांना त्याचा परम सत्कार केला. कोणे एके दिवशीं शल्यास उत्तमप्रकारचें ग्रह व भक्षणास पदार्थ दुर्योधन सेवकांनीं दिल्हे असतां तो आपणास इंद्रापेक्षां अधीक मानून त्यांचा अनादर करून बोलतो कीं, तुम्ही युधिष्ठिराचे सेवक आहां किंवा, अन्य कोणाचे आहां. अशा सभा ठिकठिकाणीं पाहून मी, प्रसन्न होऊन, त्या सभाकारांस यथायोग्य देण्यास इच्छीत आहे, यास्तव त्यास माझा सन्निध आणा. असें शल्यानें भाषण करितांच सेवकांनीं दुर्योधनास जाऊन सांगितलें कीं, मद्रराज तुम्हांवर प्रसन्न होऊन आपलें जीवित्व ही देण्यास सिद्ध झाला आहे. याजकरितां भेटीस चलावें. असें दूतांचें वाक्य ऐकतांच पूर्वीं दुर्योधन ज्या शालेंत गुप्तरूपानें राहिला होता तेथून शल्याकडे जाऊन त्यास भेटला असतां मद्राधिपती त्यास आलिंगन देऊन बोलतो, हे राजा, तुझ्या ह्या उपचारानें मी फार सं

तुष्ट झालों, तुला इच्छा असेल तें सांग. असें शल्याचें भाषण श्रवण करून दुर्योधन बोलतो हे महाराज, माझे सर्व सैन्याचे नियंते आपण व्हावें असें ऐकून शल्य बोलतो, फार चांगलें आहे, आणखी कांहीं तूं माग नंतर पुन्हां दुर्योधन प्रार्थना कर्तो आपलें वचन आपण सत्य करावें. असें दुर्योधनानें भाषण केलें असतां शल्य त्या वाक्याचा अंगिकार करून दुर्योधनास हस्तनापुरीं जाण्यास आज्ञा देते समयीं बोलतो दुर्योधना, युधिष्ठिर प्रमुख सर्वांस भेटून मी येतों. तूं आपले नगरास जावें, या प्रमाणें शल्य भाषण करून पांडवांकडे चालला असतां दुर्योधन पुन्हां प्रार्थना कर्तो महाराज पांडवांस भेटून लोकर यावें. आम्हीं तुझ्या आधीन आहों. वर दिल्याचें स्मरण ठेवावें असें ऐकून शल्य बोलतो मी पांडवांस भेटून लोकर येतों तूं आपल्या नगरास जा असें बोलून दुर्योधन आपले स्वपुरीं गेला शल्य पांडवांकडे जात असतां मनांत म्हणतो कीं, आपलें वृत्त पांडवांस विदीत करावें, इतक्यांत तो सेनानिवेशस्थानीं आला हें पांडवांस कळतांच त्यांनीं त्याची भेट घेतली. नंतर पांडवांनी पाद्य, अर्घ्य, धेनू समर्पण केली असतां शल्यें तिचा स्वीकार करून युधिष्ठिर, भीमार्जुन, नकुल, सहदेव तसेंच विराट द्रुपदादिकांस भेटोन स्वस्थ आसनीं बसला आणि धर्मराजास कुशलप्रश्न कर्तो हे राजशार्दुला, तूं अरण्यवासापासून मुक्त होऊन स्वस्थ आहेस नां? भ्रात्यांनें व द्रौपदी यांसहवर्तमान अरण्यवासरूप दुःख तुम्हीं बहुत अनुभविलें तसेंच अज्ञातवास तर अत्यंत घोर तोही अनुभविला, भ्रष्ट राज्य झालेले राजास सुख कोठून होणार? तुमचे सर्व दुःखास कारण एक दुर्योधन आहे. असो तूं सर्व शत्रूंचें हनन करून लोकरच सुखास पावशील. हे तात, केवळ तुला विदितच आहे, लोभानें तुला आपले स्वाधीन केलें पूर्वीं पुण्यश्लोक राजे होऊन गेले त्यांचेंच मार्गास तूं अनुसरलास. दान, तप, सत्य, क्षमा, दम, अहिंसा हे सहा धर्म तुझ्या ठाईं प्रतिष्ठित आहेत; त्याहेतुस्तव तूं अनेक संकटें तरलास. आज तुम्हांस मी पाहिलें हा सुदीन आहे. दुसरें एक कृत्य तुजला सांगतों ऐक. मी आपले देशांतून, निघोन तुजकडे येते समयीं मार्गांत सेनानिवासार्थ रमणीय

ग्रहें दुर्योधनानें रचिलीं होतीं माझा अभिप्राय कीं, युधिष्ठिरानें केलींअ सतील. यास्तव येकेदिवशीं मी प्रसन्न होऊन सेवकांस परितोषक बक्षीस देणार. इतक्यासमयांत धार्तराष्ट्र मत्अग्रभागीं येऊन बोलला कीं, आपल्याकर्तां सर्वसिद्धता मीकेली आहे त्याजवरून मीप्रसन्न झालों. हें पाहून त्यानें वरमागितला. असतां तोमी मान्यकेला. असें शल्याचें वाक्य ऐकून कोंतीपुत्र बोलतो आपण उत्तम केलेंत; परंतु माझी विज्ञप्ती आहे, ती आपण मान्यकरणें अवश्य आहे. तुम्हीं युद्धाच्याठाईं वासुदेवा समान कर्णार्जुनाचा संग्राम होईल तेसमयीं कर्णाचें सारथ्य कराल यांत संशय नाहीं तेसमयीं माझा अर्जुनाचें रक्षण करावें. व सूतपुत्राचा तेजोभंग करावा, हें कर्णेयोग्यनाहीं तथापी मजकर्तां येवढें कार्य केलें पाहिजे असें धर्मराजाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे राजन्, तुझे प्रीतीस्तव कर्णाचा उत्साह भंग करीन; कर्णमला वासुदेवासमान सारथ्य कर्मामध्यें मानीत आहे. कर्णार्जुनाच्या संग्रामीं कर्णाचें सारथ्य करण्याचा मला प्रसंग पडेल हें खरें. हे कौंतेया, तुझ्याकर्तां कर्णाचा तेजोभंग करून तुझें कार्य साधीन याशिवाय तुझें कांहीं इच्छित असेल तें सांग मी करीन. सूतपुत्र द्यूतसमयीं द्रौपदीसहीत तुजला कठोर वाक्यें बहुत बोलला म्हणोन त्याचें प्रायश्चित्त त्यासदेणें हें विहितच आहे. दमयंती शेवटीं जशी सुख पावली तशी जटासुर व कीचक यांपासून क्लिष्ट झालेली द्रौपदी आतां सुख पावेल. हेराजा, क्रोध करूंनकोस दैव बलवत्तर आहे महात्म्यास म्हणजे दुःखें प्राप्त होत नाहींत असें नाहीं देवांस मोठमोठीं दुःखें झालीं आहेत. हे राजा, भार्येसहवर्तमान् इंद्रानें केवढें दुःख सोसलें हें तूं ऐकलेंच असशील. असा विषय या अध्यायांत आहे.

**९ अध्याय नववा** – युधिष्ठिर प्रश्न कर्त्तो हे शल्या देवेंद्रानें भार्येसहवर्तमान महत्दुःख कसें अनुभविलें तें मला विस्तारें सांग. असें ऐकून शल्य बोलतो हेराजा, त्वष्टा प्रजापती यानामें कोणी देवांमध्यें श्रेष्ठ होता त्यानें इंद्रद्रोहार्थ विश्वरूप नामक त्रिशिरा पुत्र उत्पन्न केला त्यास सूर्य, इंदू, अग्नी यासारखीं तीन मुखें होतीं तो एक मुखानें वेदाध्ययन, एक मुखानें स

रापान करीत असे व एके मुखानें संपूर्ण दिशा प्राशन करी, तोच काळ असा दिसत असे. त्यानें इंद्रपद येण्याकर्तां घोर तपास आरंभ केला असतां, इंद्रानें विश्वरूपाचें तप, वीर्य व सत्यता अमित पाहून त्यास विषाद उत्पन्न होतांच त्यास इंद्रपद न मिळावें म्हणून विचार केला कीं, जेणेकरून हा तपाचा त्याग करून भोगामध्यें रत होईल असें करावें. याप्रकारें बहुत चिंता करून नंतर त्यानें त्वष्टृपुत्रास मोहित करण्या विषयीं, अप्सरांस आज्ञा केली. कीं, हे अप्सराहो, जेणेंकरून हा त्रिशिरा कामभोगामध्यें रत होईल असें करावें. असें इंद्र वाक्य ऐकून, अप्सरा बोलतात हे इंद्रा, जितका आमचाय त्न चालेल तितका करून तुझ्या भयाचा नाश करूं आतां आम्ही त्यास मोहित करण्या करितां जातों. शल्य म्हणतो हे युधिष्ठिरा, देवेंद्रानें त्या स्त्रियांस आज्ञा केली असतां नानाप्रकारचे हाव भाव इहींकरून त्या त्रिशिराच्या संन्निध जाऊन नित्यशः आपलें सौंदर्य, अंगमार्दव इत्यादी उपाय करीत असतां तो वश झाला नाहीं तेणेंकरून त्या स्त्रिया खिन्न झाल्या, त्रिशिरानें पूर्वसागरा सारखीं आपलीं इंद्रियें वश करून घेतलीं यामुळे वारांगनांचा उपाय व्यर्थ गेला. नंतर त्या शक्रा सन्निध येउन अंजलीपुट जोडून देवराजास बोलतात हे प्रभो, तो दुर्धर्ष आहे, धैर्यापासून चळत नाहीं यास्तव तो आम्हांस जिंकण्यास अशक्य. तुला दुसरा उपाय करणें असेल तो कर. असें अप्सरांचें भाषण ऐकून देवेंद्र सत्कार पूर्वक त्यांस जाण्याची आज्ञा देऊन विश्वरूपाच्या वधा विषयीं, चिंतन करीत असतां मनांत म्हणतो शत्रु दुर्बल असो अथवा बलाढ्य असो, त्याचा वध करावा. असा शास्त्र निश्चय आहे याप्रकारें त्याच्या वधाविषयीं इंद्रानें दृढ बुद्धी करून अग्नीसारखें घोररूप भयावह असें वज्र क्रोधानें त्याजवर टाकतांच जसें भिन्न झालेलें पर्वतशिखर मेदिनीतलावर पडतें तसा तो वज्रहत पृथ्वीवर पडला. हें पाहून त्याच्या तेजानें दीप्त होऊन म्हणतो हा मेलेला असतां जिवंतासारखा दिसतो. याचीं शिरें संपूर्ण चांगलीं आहेत असा इंद्र विचार करीत असतां अकस्मात तेथें स्कंधीं कुऱ्हाड घेऊन सुतार फिरत होता त्यास पाहून शक्र भयानें बोलतो, सत्वर याचें मस्तक छेदावें. असें इंद्रवाक्य ऐकून सुतार बोलतो याचा स्कंद महान आहे

यास्तव माझा कुठार मोडेल, निंद्यकर्म कसें करावें. असें वाक्य ऐकून इंद्र बोलतो भिऊं नकोस माझ्या प्रसादें करून तुझा कुठार वज्रतुल्य होईल. असें ऐकून सुतार बोलतो. अशा घोरकर्मी तूं प्रवृत्त झालास तस्मात् तूं कोण आहेस, तें मला सांग? असें ऐकून इंद्र बोलतो. हे सुतारा देवांचा राजा इंद्र म्हणतात तो मी तुला विदितच आहें. माझी आज्ञा ऐक. विचार करूं नकोस. असें ऐकून तक्षा बोलतो. या ऋषिपुत्रास मारल्यानें तुला ब्रह्महत्या कशी लागणार नाहीं? असें ऐकून इंद्र बोलतो पश्चात् कांय प्रायश्चित असेल तें करीन, हा महान् शत्रू वज्रानें मारिला तरीं माझे मनास भय उत्पन्न करतो यास्तव तूं याचें सत्वर शिर छेदून टाक. पश्चात संपूर्ण लोक पशूचें शिर, हा तुला भाग कल्पितील. हा तुजवर मी अनुग्रह केला. आतां विलंब करूं नको. शिरच्छेद करून माझें प्रीय लौकर कर. असें इंद्राचें भाषण ऐकून तक्षानें त्रिशिराचीं तिन्हीं शिरें कुठारानें छिन्न केलीं असतां त्यापासून कपिंजल, तित्तीर व कलवींक असे तीन प्रकारचे पक्षी झाले. ज्या मुखापासून वेद उच्चारीत होता, त्यापासून कपींजल व दिशा प्राशन करीत होता त्यापासून तित्तीर, सुराप्राशन करीत होता त्यापासून कलवींक आणि श्येन झाले. नंतर इंद्र आपले स्थानीं गेल्यावर तक्षाही आपले स्थानीं गेला. पुढें इंद्र आपल्यास कृतार्थ मानीत असतां, कांहीं दिवसानीं शक्रकृत्य, त्वष्ट्यास विदित होतांच तो क्रोधानें आरक्त नयन करून बोलतो, माझा पुत्र साक्षात दांत नपस्वी जितेंद्रिय असतां विनापराध इंद्रानें मारिला तस्मात् याच्या नाशार्थ वृत्रासुरास उत्पन्न कर्तों, हें माझें वीर्य संपूर्ण लोक व पापात्मा इंद्र पाहो. असें भाषण करून त्वष्ट्यानें अग्निमध्यें आहुती देतांच घोररूपी वृत्रासूरनामा असुर उत्पन्न झाला असतां त्यास त्वष्टा बोलतो हे इंद्रशत्रो, माझ्या तपानें तूं वृद्धी पाव. असें भाषण कर्तांच तो असुर सूर्य वैश्वानरासारिखा देदीप्यमान वृद्धी पावून दिशा स्तब्ध करीत त्वष्ट्यास बोलतो. काय आज्ञा असेल ती सांगावी, मी सिद्ध आहे. असें वृत्रासुरानें वाक्य ऐकून त्वष्टा बोलतो हे असुरा तूं इंद्राचा वध करावास. अशी आज्ञा होतांच वृत्रासुरानें इंद्रास ग्रस्त केलें नंतर संपूर्ण देवांनीं वृत्रासुरावर ज्रंभिका अस्त्र सोडिलें त्यामुळें तो जांभया देऊं लागला. नंतर मुख प्रसन्न होतांच आपलें अंग संकोचि

त् करून शक्र बाहेर निघाला. त्यादिवसापासून जंभिकारूप (जांभई) सर्वांचे मुखांत येऊन राहिलें. पुन्हा वृत्र वासवाचें युद्ध प्रवर्तलें असतां इंद्रानें त्याच्या नाशार्थ बहुत उपाय केले; परंतु वृत्रासुरापुढें कांहीं चाललें नाहीं शक्र पराङ्मुख झाला असतां संपूर्ण मुनिगणांसहवर्तमान देव भयानें मोहित होऊन पुढें काय करावें? याचा वध कसा होईल? याची चिंता करीत करीत मंदराचलीं माहात्मा श्रीविष्णू याचें दर्शन घेण्यास निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

**१० अध्याय दहावा**:- त्याकाळीं संपूर्ण देवांस इंद्र बोलतो हे देवहो, या वृत्रासुरानें सर्व जगत् व्यापिलें तुमच्यामध्यें याचा प्रतिघात करण्यास कोणी समर्थ नाहीं, पूर्वीं मी सामर्थ्यवान होतो, या समयीं माझें पौरुष त्याजवर चालत नाहीं, तो परम बलाढ्य व युद्धामध्यें अमितविक्रम आहे. यास्तव देवासुर मानवांसुद्धां सर्व त्रिभुवन ग्रासील असें वाटतें तस्मात् हे देवहो, मी आतां निश्चयात्मक वाक्य बोलतो श्रवण करा. सर्वांनीं मिळोन श्रीविष्णूकडे जाऊन त्याजला सांगावें. तो या दुरात्म्याच्या वधाचा उपाय सांगेल. शल्य म्हणतो हे धर्मराजा, असें इंद्रानें भाषण केले त्यावर ऋषीगणांसहवर्तमान संपूर्ण देव विष्णूस शरण जाऊन बोलतात हे भगवंता, वृत्रासुरापासून आम्ही फार भय पावलों पूर्वीं आपण तीन पादांत त्रैलोक्य व्यापिलें. दैत्यांचें हनन करून अमृत संपादन केलें. बलीचें बंधन करून शक्रास देवाधिपती केलात. तूं संपूर्ण देवांचा प्रभु सर्वत्र व्यापिलें आहेस. संपूर्ण देवांमध्यें तूं महादेव यास्तव सर्व तुला नमस्कार करतात हे देवा, इंद्रासहवर्तमान संपूर्ण देवांस आतां गती तूं आहेस. हे असुरसूदना, संपूर्ण जगत् वृत्रासुरानें व्यापिलें यापासून आम्हांस तूं मुक्त कर. असें इंद्र पुरोगम देवांचें वाक्य श्रवण करून श्रीविष्णु बोलतात तुमचें कार्य करणें मजला अवश्य आहे जेणेंकरून त्याचा नाश होईल असा उपाय सांगतों. देव, ऋषी, गंधर्व इत्यादिकांनीं जाऊन इंद्राचें व वृत्रासुराचें सख्य करावें मी गुप्तरूपानें इंद्राच्या वज्रांत प्रवेश करून त्याचा नाश करीन. असें विष्णूनीं भाषण करतांच त्यांची आ-

ज्ञाघेऊन संपूर्णदेव इंद्रासपुढें करून वृत्रासुरासमीप गेले असतां आप त्या तेजानें दाहीदिशाप्रज्वलित करून तीनलोकांचा ग्रासकर्तोकाय? असेंउग्रस्वरूप पाहून ऋषीवृत्रासुरास प्रीयभाषण करतात हे दुर्जया, तुझ्यातेजानें सर्वजगत् व्याप्तझालें; परंतु इंद्रास जिंकावयास तुजला सामर्थ्यनाहीं उभयतांचें युद्ध होतां होतां बहुनकाळ गेला सर्वप्रजा बहुन पीडा पावल्या यास्तव उभयपक्षीं तुमचें सख्यझाल्यानें तूंबहुतसुख पावशील. इंद्रलोकांचेभाग तुलाही प्राप्त होतील. असेंऋषींचें वाक्य- ऐकून, वृत्रासूर त्यांसनमस्कार करून बोलतो तुमचें सर्वभाषण मीऐ- किलें; परंतु माझें वचनऐका. दोघेआम्हीं बलवतर असतां सख्यकसें होईल? असेंऐकून, ऋषीबोलतात हे वृत्रासुरा, साधूंचेंवचनएकवेळ- ऐकावें, अनादर करूंनये. साधूंसमीप साधूंच्याकथा काढाव्या. इंद्र साधूसमान्य आहे; सत्पुरुषानें साधूंचा अतिक्रम करूंनये आपल्यास कांहीं दुःख प्राप्त झाले असतां साधूंस सांगावें, म्हणजे ते आपलें दुःखदूर करतात साधूंची हिंसाकरूंनये सत्यधर्मवत व सूक्ष्मदर्शी इंद्राशी तुझें सख्य असावें. शल्य म्हणतो हेधर्मराजा, ऋषींचें वाक्य ऐकून वृत्रासुर बोलतो हे ऋषीहो, संपूर्ण तपस्वी मलामान्य आहेत. तुमच्या भाषणाप्रमाणें मीकर्तों, परंतु मला शुष्कआर्द्र, पाषाण, काष्ठ, शस्त्र, अस्त्र इत्यादिकेंकरून मृत्युनाहीं, तसाच दिवसास व रात्रीस ही मृत्युनाहीं; यास्तव देवांसहवर्तमान इंद्र माझ्याशीं सख्य करील तरकरो. असें ऐकून ऋषीनें दोघांचा संधीकेला. नंतर इंद्र हर्ष पावोन वृत्रासुराच्यावधाचा उपायचिंतन करूंलागला. बहुत दिवस छिद्रपहात असतां कोणेएके दिवशीं समुद्रतिरीं वृत्रासुरास पाहून संध्याकाळसमयीं त्याच्या वरदानाचें स्मरण होऊन विचारकर्तो हारौद्रकाल बराआहे आतां दिवस नाहीं व रात्रीनाहीं. यासमयीं यास मारलानाहीं, तर माझें कल्याण नहोऊन असा समय ही पुन्हा येणार नाहीं, असाविचार करून नंतर श्रीविष्णूचें- स्मरणकर्तोंचं अग्रभागीं पर्वतोपम फेनराशीपाहून म्हणतो, हा शुष्क आर्द्र, शस्त्र, अस्त्रनाहीं याचे वरप्रदानाव्यतिरिक्त आहे हाफेन याजवर

टाकिला म्हणजे हा मृत्यु पावेल. असा निश्चय करून इंद्रानें वज्रास फेन लाविला असतां विष्णूनें प्रवेश करून नंतर तें वज्र वृत्रासुरावर टाकतांच तो मृत्यु पावला. तेव्हां दिशा स्वच्छ झाल्या, वायू सुखकारक वाहूं लागले, प्रजा हर्षायमान झाल्या, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, महानऋषी इत्यादिकांनीं नानाप्रकारें इंद्राचें स्तवन केलें. नंतर देवांसहवर्तमान इंद्रानें त्रिभुवनश्रेष्ठ जो विष्णू याची पूजा केली. महावीर्य, परमभयंकर वृत्रासुराचा वध केल्यामुळें इंद्र फार खिन्न झाला. त्रिशिराची मी पूर्वी ब्रम्हहत्या केली. त्यापापाच्या योगें हें दुःख झालें असें जाणोन इंद्र ब्रम्हहत्या भयानें जलामध्यें राहिला. देवेंद्र नष्ट झाला असतां पृथ्वी निवृक्ष झाली, नद्यांचीं व सरोवरांचीं उदकें आटलीं. प्राणीमात्रांस क्षोभ झाला, अनावृष्टी झाली; देवांस व ऋषींस भय झालें, संपूर्ण जगत् अराजक झाल्यामुळें नानाप्रकारचे उपद्रव होऊं लागले. संपूर्ण देव भयाभीत होऊन आमचा कोण राजा होईल अशी चिंता करूं लागले. स्वर्गामध्यें देव ऋषी असें मानुं लागले कीं, आपल्यामध्यें देवांचें राज्य करण्यास कोणी योग्य नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

**११ अध्याय अकरावा**— शल्य म्हणतो हे धर्मराजा, अशी अवस्था झाल्यानंतर सर्व ऋषी व दिग्पाल यांनीं हा नहुषराजा देवांचें राज्य करण्यास समर्थ आहे, यास राज्याभिषेक करावा, हा तेजस्वी व धार्मिक आहे; असा विचार करून, सर्वही नहुषाकडे जाऊन त्यास म्हणतात, हे नहुषा तूं आमचा राजा होऊन रक्षण करावेंस. असें भाषण ऐकून नहुष बोलतो, देवलोकींचें राज्य करण्यास मी अशक्त आहें. तुमचें परिपालन करण्यास मला शक्ती नाहीं. जो बलाढ्य तो राजा होतो. इंद्राचें बल अलौकीक होतें. असें नहुषवाक्य ऐकून पुन्हां सर्व ऋषी बोलतात हे नहुषा, आमच्या तपोबलानें तूं स्वर्गाचें राज्य कर. देव, दानव, यक्ष, राक्षस, ऋषी, पितर, गंधर्व, भूतें व दुसरें इतर जे यास तूं चक्षूनें पाहिलें असतां त्याचें तेज तूं हरण करशील. धर्माचा पुरस्कार करून देवांचा राजा हो. ब्रम्हऋषी व देव यांचें आकाशांत रक्षण कर. असें त्यांनीं बोलून नहुषास राज्याभिषेक केला

असतां नहुष वरानें बलवान झाला. धर्मेंकरून सर्वांचें पालन करूं लागला. देवांच्या क्रीडास्थानीं, नंदनवनीं, कैलासपर्वतीं. हिमालयावर, मलयपर्वताचे ठायीं, समुद्र, नद्यांचेतिरीं, अप्सरा व देवकन्या यांसहवर्तमान् क्रीडाकरूं लागला. नानाप्रकारच्या वाद्यांचे स्वर व चित्रविचित्र कथा विश्वावसु, नारद, गंधर्व व अप्सरा, गण यांपासून श्रवण करूं लागला. सहाऋतू मूर्तिमंत पुढें येऊन उभेराहिले. सुखदस्पर्शी वायू अनुकूल झाले. कोणेएके दिवशीं तो दुष्टात्मा नहुष शक्राचे स्त्रीस पाहून सभासदांस बोलतो मी देवेंद्र झालों. आतां इंद्रपत्नी माझें सेवन करीत नाहीं? संपूर्ण देव व लोक यांचा मी ईश्वर आहें यास्तव इणें मला वरावें. असें ऐकतांच, इंद्राणी बृहस्पतीसंन्निध जाऊन बोलते हे गुरू मी इंद्रपत्नी, पतिव्रता, अवैधव्य युक्त, एकपत्नी, अत्यंत सुख भागिनी आपणास शरण आल्येंमला दुष्टाचे हातीं देऊं नको तुजला कोणापासुनही भयनाहीं; म्हणोन आपण बोललां तें सत्य करावें. असें तिचें भाषण ऐकून देवगुरू बोलतात हे देवि, मी बोललों तें सत्यच आहे. इंद्र तुला लौकरच दर्शन देईल. तूं नहुषाला भिऊं नकोस. इंद्राणी, देवगुरूस शरण गेली हें ऐकून नहुषास बहुत क्रोध आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारावा— शल्य म्हणतो हे धर्मराजा, नहुष क्रुद्ध झाला असतां ऋषी, देव बोलतात हे देवा. क्रोध आवर, तुझ्या क्रोधानें सर्वत्रास पावले. तुजसारख्या साधूंनीं क्रोध न करावा. परपत्नी देवी तिच्या व्रताचा भंग करूं नकोस. पापापासून मनाची परावृत्ती कर. तूं देवेंद्र आहेस, धर्मेंकरून प्रजापालन कर. यारीतीनें देवांनीं बोध केला, तथापी त्यांचें भाषण न ऐकून नहुष काममोहानें देवांस बोलतो गौतम जिवंत असतां इंद्रानें अहल्येचें धर्षण (मैथुन) केलें व दुसरीं हीं घातुक पापकर्में अधर्मयुक्त इंद्रानें बहुत केलीं होतीं त्यांपासून तुम्हीं त्याचें कां निवारण केलें नाहीं? तस्मात् आतां इंद्राणीनें येऊन माझें सेवन करावें. हे देवहो, तुम्हीं माझ्या आज्ञा परिपालन करा, तुमचें कल्याण होईल. असें नहुषवाक्य ऐकून देव प्रार्थना करतात इंद्राणीस आणूं; परंतु क्रोध, लोभ सोडून स्थीर हो. शल्य म्हणतो हे धर्मराजा. असें देवांनीं नहुषास सांगून नंतर बृहस्पतीच्या घरीं जाऊन त्यास म्हणतात

हेगुरू, इंद्राणी आपल्यास शरण आली असतां तिजला अभय देऊन निर्भय केली. परंतु आम्ही तुझी प्रार्थना करून इंद्राणीस मागतों, इंद्राहून नहुष श्रेष्ठ आहे. यास्तव भर्तृत्वें करून तिणें नहुषास भजावें. असें देवऋषींचें वाक्य ऐकून इंद्राणी रोदनपूर्वक बृहस्पतीस बोलत्ये, मी नहुषास भ्रतार करीत नाहीं. मी तुजला शरण आलें माझें रक्षण करावें. अशी तिची वाणी ऐकून गुरू बोलतात मी तुझा त्याग करीत नाहीं, भय पावूं नकोस. जो शरणांगताचा त्याग कर्तो त्यास दोष आहे असें मी जाणत असतां तुझा त्याग कसा करावा? त्यांतून मी ब्राम्हण, सत्यशील, संपूर्ण धर्म व कर्म जाणतों, तेव्हां माझे हातून अकार्य होणार नाहीं, हे सुरहो, तुम्ही आपल्याघरीं जावें. पूर्वी ब्रम्हदेवानें याविषयीं प्रमाणभूत गीत केलें आहे; जो शरणांगतास शत्रूचे स्वाधीन कर्तो त्याचें कल्याण कधींही होत नाहीं. त्यानें बीजारोप केला असतां अंकुरयेत नाहींत यथाकालीं मेघ त्याचे क्षेत्रांत वृष्टी करीत नाहीं, त्यास अन्न मिळत नाहीं, तो स्वर्गापासून भ्रष्ट होतो, त्याची संतती अकालीं मृत्यु पावते, मातापितर त्याचा त्याग करतात, देव त्याचें हव्य ग्रहण न करितां त्याजवर वज्रप्रहार करतात हे दोष मी जाणत असतां इंद्राणीला नहुषाचे स्वाधीन कशी करावी? हे देवहो, इंद्राणीचें व माझें हीत होईल तें तुम्ही करा. असें बृहस्पतीचें भाषण ऐकून देव बोलतात याविषयीं युक्ती काय करावी ती आम्हांस आपण सांगा. असें ऐकून गुरू म्हणतात इणें नहुषाकडे जाऊन कांहींयेक कालाचा नियम करावा म्हणजे हिचें कार्य होईल. काल हा बहूविघ्नरूप आहे. यास्तव तोच आपलें कार्य पार पाडील. असें बृहस्पतीचें वाक्य ऐकून देव त्या वाक्याचा सत्कार करून पुन्हा गुरूंस म्हणतात. आपण इंद्राणीस सांगावें; ती आपलें वचन मान्य करील. असें सांगून आपणही इंद्राणी कडे जाऊन तिजला बोलतात, हें संपूर्ण स्थावर जंगम तूं धारण केलें आहेस, तशीच तूं पतिव्रता आहेस. आतां लौकरच तुझा मनोरथ पूर्ण होईल. तूं नहुषाकडे जाऊन कांहींएक कालाचा नियम करावा, तो पापी लौकरच नाश पावेल. असें देवांचें वाक्य ऐकून शची नहुषासमीप गेली तेव्हां तिचें वय व रूप पाहून तो दुरात्मा काममोहीत झाला. असा विषय या

अध्यायांत आहे.

**१३ अध्यायतेरावा-** शल्य म्हणतो हे धर्मराजा, नहुष इंद्राणी स पाहून बोलतो हे शचिस्मिते, मी त्रैलोक्याचा स्वामी आहें. पतित्वें करून तूं माझें सेवन कर. इतकें नहुषाचें वाक्य ऐकतांच इंद्राणी, वायुवेगानें कदलीज शी कंपित होते तशी कंपित होऊन नहुषास नमस्कार करून बोलते हे सुरेश्वरा, तुजपाशीं कांहींएक कालाचा नियम इच्छितें याचे कारण शक्र कोठें आहे, त्याची अवस्था काय झाली हें कांहीं कळत नाहीं; तें जाणण्याविषयीं माझी इच्छा आहे, शक्र कोठें नाहीं असा निश्चय झाल्यावर तुलाच भ्रतार करीन. असें इंद्राणीचें भाषण ऐकून नहुष मोठ्या हर्षानें म्हणतो. तूं इंद्राचा शोध कर. तो कोठें नाहीं असा निश्चय झाल्यावर माझें सेवन करावें. असें नहुषानें भाषण करून इंद्राणीस निरोप दिल्हा असतां पुन्हां तिणें बृहस्पतीकडे जाऊन गुरूस सविस्तर वृत्त सांगितलें. तिचें भाषण ऐकून अग्निप्रमुख देव शक्रकल्याणार्थ श्रीनारायणास शरण जाऊन म्हणतात हे देवदेवेशा, शक्रास ब्रम्हहत्या लागली त्यायोगानें त्याची काय अवस्था झाली नी कळत नाहीं. श्रीदेवाधिदेवा, सर्वांचा रक्षक तूं आहेस, तूं संपूर्ण भूतांचें रक्षण करावें म्हणोन विष्णूचा अवतार धरिलास, तुझ्या तेजानें वृत्रासूर नाश पावला; तर आतां कृपा करून इंद्राची मुक्तता होईल तें करावें. अशी सर्वांची प्रार्थना ऐकून श्रीदेवाधिदेवानीं आज्ञा केली कीं, शक्रानें माझें यजन व अश्वमेध याग करावा म्हणजे मी त्याजला पवित्र करीन. आणि तो पुन्हा आपले पदास पाऊन दुर्मती नहुष नाश पावेल. कांहींएक कालाची प्रतिक्षा करावी. अशी सत्य, शुभकारक, अशरीर विष्णूची वाणी ऐकून बृहस्पतीसहवर्तमान संपूर्ण देवांनीं ज्या देशांत इंद्र होता त्या देशामध्यें जाऊन ब्रम्हहत्या पावनार्थ अश्वमेध याग करून ब्रम्हहत्येचे पांच विभाग केले. एक भाग वृक्षाचे ठाईं, एक भाग नदीतिरीं, एक भाग पर्वताग्रीं, एक भाग पृथ्वीच्या ठाईं, एक भाग स्त्रियांच्या ठाईं, असे स्थापन करतांच शक्र अधीक तेज पावला; तो नहुषाकडे येतांच नहुषानें त्यास पाहून इंद्र पुन्हा वरदाच्या योगानें अदृश्य झाला आणि सूक्ष्मरूपानें संचार करूं लागला. इंद्र नष्ट झाला हें पाहून इंद्राणी दुःखानें

हे शक्रा! हे शक्रा! असा विलाप करून म्हणते, जर मी दान, अग्नीमध्यें हवन, गुरुजनांचा संतोष अथवा पातिव्रत्य व सत्य, हें जर माझे ठाईं असेल तर भ्रताराचा माझा समागम होवो. असें भाषण करून नंतर त्या रात्रीस उपश्रुती नामक देवीचें स्तवन करतांच तत्काळ ती इंद्राणीच्या अग्रभागीं उभी राहिली. असा विषय या अध्यायांत आहे.

**१४ अध्याय चवदावा-** शल्य म्हणतो हे धर्मराजा, रूप, वय संपन्न अशी उपश्रुती नामक देवी अग्रभागीं आलेली पाहून इंद्राणी हर्षानें तिची पूजा करून भाषण करते हे वरानने, तूं कोण आहेस हें मी जाणण्याची इच्छा करतें. असें वाक्य ऐकून देवी बोलते मला उपश्रुती देवी असें म्हणतात. तूं माझें स्मरण केलेंस म्हणोन तुझा दर्शनाकरतां आलें. सत्यत्व, पातिव्रत तसेंच नियम ईहीं करून तूं युक्त आहेस म्हणोन तुझा पती शक्र तुला दाखवितें. असें उपश्रुतीनें भाषण करतांच तिज सह वर्तमान इंद्राणी शक्र दर्शनास निघाली. जातां जातां अनेक अरण्यें व अनेक प्रकारचे पर्वत अतिक्रमीत हिमाचलाच्या पलिकडे उत्तर पार्श्व भागीं जाऊन समुद्रतिरीं गेली. तेथें एक बहु योजन विस्तृत, नाना द्रुमलतांनीं व्याप्त असें एक महत् द्वीप पाहून नाना पक्षांनीं व्याप्त, शतयोजन विस्तीर्ण असें एक सरोवर पाहिलें. त्यांत पंच वर्णांनीं युक्त व भ्रमरांनीं शब्दीत, प्रफुल्लित झालेलीं हजारों दिव्य कमळें पाहिलीं. त्या सरोवराच्या मध्य प्रदेशीं एक कमळ पाहून त्याचे देठांत उपश्रुती देवी इंद्राणी सह वर्तमान आंत गेली. आणि त्यांत इंद्रास पाहून इंद्राणी इंद्राचीं पूर्व कर्मे स्मरण करून स्तवन करूं लागली. तेसमईं देवेंद्र म्हणतो, तूं येथें कशी आलीस मी येथें आहें हें तुला कोणी सांगितलें? असें इंद्र वाक्य ऐकून शची नहुषाचें सर्व वृत्त सांगून बोलत्ये, हा नहुष राजा त्रैलोक्यामध्यें बलाढ्य होऊन गर्वानें मला म्हणतो कीं, तूं माझी भार्या हो. तेव्हां मी त्यास उत्तर केलें कीं, कांहीं एक कालाचा नियम करून पश्चात् तुझी भार्या होईन. यास्तव हे महाबाहो, हें तुला सांगण्याकरतां मी आल्यें आहें, तर आतां पापी जो नहुष त्यास मारून आपलें तेज प्रगट कर आणि देवांच्या राज्यासनीं प्राप्त होऊन सर्वांचें तूं रक्षण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१५ अध्याय पंधरावा.- शल्य म्हणतो हे धर्मराजा. इंद्राणीचें भाषण ऐकून इंद्र बोलतो माझ्या पराक्रमाचा समय अस्तु न नाहीं; नहुष ऋषीचा वरानें बलाढ्य झाला आहे, यास्तव तुला एक उपाय सांगतों तो गुह्य ठेव. हे सुमध्यमे, तूं एकांतीं नहुषास भेटून सांग कीं, शिबिकेस ऋषी लावून तूं मजकडे ये म्हणजे मी तुला वश होईन असें इंद्राचें भाषण ऐकून तीकमललोचना इंद्रपत्नी तथास्तु असें म्हणोन नहुषासमीप गेली असतां तीस पाहून नहुष बोलतो हे शुचिस्मिते, तुझें स्वागत असो, काय आज्ञा असेल ती करावी. तूं संकोच धरूं नकोस, शपथपूर्वक मी तुझें वचन मान्य करितों. असें नहुषाचें वाक्य ऐकून शची बोलली हे देवा, तुजपाशीं मी नेम केला त्याप्रमाणें आल्यें अतःपर तूं भर्ता; परंतु एक माझें मनोगत आहे तेवढें आपण पुरें करावें, म्हणजे मी आपणास वश होईन. इंद्राचे घरीं अश्व, रथ, गज इत्यादी बहुत वाहनें आहेत, परंतु महाभाग्यवान् तपोनिधी हे ज्यास युक्त केलेले असें वहान विष्णू, रुद्र, सुर, राक्षस, यांचे ही घरीं नाहीं, यास्तव ऋषींनीं युक्त केलेली शिबिका यांत आरोहण करून मजकडे यावें; म्हणजे मी भार्या होतें. देवासुर, यांमध्यें तुझ्यासारखा पराक्रमी कोणी नाहीं, आपल्या दर्शनें करून संपूर्णांचें तेज हरण होतें यास्तव तुझ्या अग्रभागीं कोणीही उभा रहाण्यास समर्थ नाहीं असें ऐकून नहुष बोलतो हे वरवर्णिनी, हें अपूर्व वहान तूं मला सांगितलेंस येणें करून मी हर्ष पावलों, यायोगें तुला आतां मी वश होईन. कोणी अल्पवीर्य असतां हे मुनींचें वहान करण्यास समर्थ होणार नाहींत. मी तर महान तेजस्वी, पराक्रमी आहे. मी क्रुद्ध झालों असतां हें जगत् नष्ट होईल व देव, गंधर्व, उरग, राक्षस यांस मी पहातांच त्यांचें तेज हरण करीन. तस्मात् हे देवी, तुझ्या भाषणाप्रमाणें मी करितों. हे सर्व ब्रह्मऋषी माझें वहान होतील. माझें महात्म्य व पराक्रम आज पहा. असें भाषण करून इंद्राणीस निरोप दिला नंतर नहुषानें मदोन्मत्त होऊन नियमस्थित असे ऋषी विमानास जोडले. इकडे इंद्राणी बृहस्पतीस जाऊन सांगते हे गुरु; नहुषासमीप कांहीं एक मी समय केला होता त्याचे दिवस थोडे राहिले तर आतां शक्र कोठें आहे तो पहावा, मी आपणास शरण आल्यें आपण अभय दिलें. तें सत्य करावें, असें शचीचें वाक्य ऐकून सुराचार्य बोलतो हे शची, मी इंद्रा-

स आणितों, तूं नहुषास भिऊंन कोंस्याचा पापचेंतस अधमानें ऋषी वह नास लाविले तस्मात् आतां हा लौकर नाशपावेल. त्याचे नाशार्थ मी इच्छा करून शक्रास आणितों तूं चिंता करूं नये. असें बोलोन तत्काळ अग्नी प्रज्वलित करून यथाविधी होम करीत असतां अग्नीची प्रार्थना करितो हे अग्ने, आम्हांस सत्वर इंद्र प्राप्त व्हावा; असें भाषण करून बृहस्पतीनें अग्नीस आहुती देतांच अग्नी स्त्रीचा वेश धरून अंतर्धान पावला. दिशा, प्रदीशा, पर्वत, वनें, पृथ्वी, अंतरिक्ष हीं सर्व निमिषमात्रांत शोधून बृहस्पतीसमीप येऊन बोलतो हे गुरो, इंद्राचा शोध सर्वत्र केला, परंतू कोठें ठिकाण लागत नाहीं. उदकाचा मात्र शोध करावयाचा तेथें माझा उपाय नाहीं. असें ऐकून देवगुरु बोलतात हे अग्नी, तूं उदकांत प्रवेश कर. असें ऐकून अग्नी बोलतो हे गुरु, उदकांत प्रवेश केल्यानेंच माझा क्षय होईल. याकरितां मी तुला शरण आहें, मजला दुसरें कार्य सांगावें. उदकापासून अग्नी, ब्राम्हणापासून क्षत्रिय. व पाषाणापासून लोह हे उत्पन्न होऊन पुन्हा त्याचें तेज त्याच योनीच्याठाईं लीन होतें, म्हणोन माझा उदकांत प्रवेश होणार नाहीं. असें अग्निवाक्य ऐकून बृहस्पती अग्नीचा स्तव करितो. असा विषय या अध्यायांत आहे.

**१६ अध्याय सोळावा-** बृहस्पती म्हणतात हे अग्ने, संपूर्ण देवांचें मुख तूं आहेस म्हणोन तुला हव्यवाहन असें म्हणतात, संपूर्ण भूतांच्या अंतरयामी साक्षीसारिखा तूं गुप्त संचार करितोस, सर्व ब्रम्हांडांत तूं एक असून भिन्न आहेस असें कोणी म्हणतात, जर या जगताचा तूं त्याग केलास तर तत्काळ जगत नष्ट होईल. संपूर्ण ब्राम्हण तुला नमस्कार करून आपल्या पुत्र पत्नी सहवर्तमान शाश्वत गतीस जातात. यास्तव उदकांत निर्भयपणें प्रवेश कर. आम्ही सनातन वेदमंत्रें करून तुझें वर्धन करूं. याप्रकारें ब्रहस्पतीनें अग्नीचा स्तव केला असतां अग्नी संतुष्ट होऊन भाषण करितो हे गुरो, शक्र तुम्हांस दाखवितो. तुम्हीं मज बरोबर चलावें. शल्य म्हणतो हे धर्मराजा, याप्रमाणें अभिभाषण करून नंतर उदकांत प्रवेश करून समुद्र, सरोवरें शोधित शोधित. शक्र होता त्या सरोवरीं गेला. त्यामध्यें एक कमळणीचे देठांतले तंतूंत इंद्राचें सूक्ष्म रूप पाहून देवगुरूस सांगितलें. ते समयीं देव, ऋषी, गंधर्व यांसह

वर्तमान बृहस्पती तेथेंजाऊन पुराणस्तोत्रेंकरून स्तवकरूं लागले. हेदेवेंद्रा पूर्वी तूं बहुत दैत्यमारिलेस, तसेंच नमुची, शंबर, बल इत्यादी घोर पराक्रमी दैत्यांचा तूं नाशकेलास, आतांतूं आपलें पूर्वीचें सामर्थ्य प्रगटकरावें. संपूर्ण देव, ऋषी दर्शनास आले आहेत यांस पहा. दानवांचें हननकरून लोक त्राताहो, विष्णुतेजेंकरून युक्तजो उदकाचा फेन त्यायोगें तूं वृत्रासुराचा वध केलास; संपूर्णभूतांस तूं रक्षण करणारा आहेस, आतां हेमहेंद्रा, तूं बल धारणकरून सर्वांचेंपालन कर. असासर्वांचा स्तव श्रवणकरून इंद्रास थोडेंथोडें सामर्थ्य येतयेत पूर्ववत् बलवान होऊन गुरूस बोलतो हेगुरू, वृत्रासूर मारिला आतां अवसिष्ठ कायकाय आहे? अशोशक्रवाणी श्रवणकरून देवगुरू बोलतात, नहुषास देव ऋषींचा तेजानें देवांचेंराज्यप्राप्तहोऊन तोसर्वांस पीडाकर्तो. असेंऐकून शक्रप्रश्नकर्तो, नहुषास कोणत्या तपेंकरून व पराक्रमेंकरून देवांचें दुर्लभराज्य मिळालें. असें शक्रवाक्य श्रवण करून देवगुरू बोलतात तूं आपलें पद टाकून गेलास तेसमयीं देव, ऋषी पितर, गंधर्व, इत्यादी सर्व नहुषाजवळ जाऊन बोललेकीं, तूं त्रैलोक्याचा स्वामीहो आणिआमचें पालनकर. देवऋषींचेंवाक्य श्रवणकरून नहुषत्यांस म्हणालाकीं, मजला सामर्थ्यनाहीं, यास्तव आपल्या तेजाचा अंश मजला देऊन बलवान करा म्हणजे देवांचें राज्य करीन. नंतर देवांनीं आपल्या तेजाच्या योगानें वर्धितकेला असतां तो घोरवीर्य नहुष त्रैलोक्याचाराजा होवून आम्हांसपीडाकर्तो, त्यादुरात्म्यानें महर्षी आपले वहानास लाविले आहेत. जोत्याच्या दृष्टीसपडतो त्याचें तेज हरण कर्तो तूं त्यास पाहूंनको, देवही त्यापासून भयपावल्यां मुळें दृष्टीसनपडतां गुप्तरूपानें संचार करतात. याप्रकारें बृहस्पती व इंद्र यांचा संवाद होत आहे तों लोकपाल, कुबेर, वैवस्वत, यम, सोम, वरुण हे प्राप्तहोऊन शक्राचा स्तवकरून म्हणतात हे महेंद्रा, दैवेंकरून तूं वृत्रासुराचा वधकेलास, आजकुशलआहेस असें तुला पाहिलें. असेंत्यांचेंवाक्यश्रवण कर्तोंच देवेंद्र त्यांचा संमान करून भाषण कर्तो. देवांचाराजा नहुष याचें शासन करणें आहे; तुम्हीं सर्वांनीं मजला साह्य असावें. असेंऐकून तेबोलतात हे शक्रा, तो घोर दृष्टी आहे. आ-

म्हीं त्यास पाहण्यास भयपावतों. तूं जर त्यास शासन करशील तर आमचे भाग आम्हांस मिळतील. असें त्यांचें वाक्य ऐकून शक्र बोलतो मी तुम्हांस अभिषेक करतों तुम्ही घोररूपी नहुषाचा देवांसहवर्तमान नाश करावा. त्याकाळीं अग्नि पुढें होऊन म्हणतो मजला भागदे. मी तुझें साह्य करीन. तेव्हां शक्र म्हणतो हे अग्ने, माहाक्रतुमध्यें तुला व मला इंद्राग्नी या नावानें एक भाग देतील. शल्य म्हणतो हे धर्मराजा, याप्रमाणें इंद्रानें अग्नीस सांगून नंतर कुबेरास सर्व यक्षांचें व धनाचें आधिपत्य, यमास पितरांचें आधिपत्य व वरुणास जलाचें अधिपत्य देऊन तो अरिवधाचा उपाय चिंतन करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

**१७ अध्याय सभावा.**– शल्य म्हणतो हे धर्मराजा, लोकपालांसह वर्तमान देवराज, नहुषवधाची चिंता करीत असतां अकस्मात अगस्त्य ऋषी प्राप्त होऊन भाषण करतात हे शक्रा, तुझें दर्शन करून बहूत आनंद झाला. विश्वरूप व वृत्रासूर यांचा विनाश करून संतुष्ट झालो. देवराज्यापासून नहुष भ्रष्ट झाला, येणें करून फारच हर्ष झाला. आतां तुला रिपू कोणी नाहीं, असें अगस्त्य ऋषीचें भाषण ऐकून इंद्र अर्घ्यपाद्य इत्यादिकें त्याची पूजा करून प्रश्न करतो हे मुनी. पापरूपी नहुष स्वर्गापासून कसा भ्रष्ट झाला तें विस्तारें मला सांग. असें ऐकून ऋषी भाषण करतात हे शक्रा, आम्ही त्या पापकर्म्यास वहातां वहतां बहुत श्रमपावलों. कोणेएके दिवशीं देवऋषींनीं व ब्रम्हऋषींनीं त्यास प्रश्न केला कीं, ब्रम्हदेवांनीं गोप्रोक्षण इत्यादी वैदीक मंत्र सांगितले आहेत हे तुला मान्य आहेत किंवा नाहींत. तेव्हां तमोरूपी नहुषानें ते मला मान्य नाहींत असें उत्तर दिलें. पुन्हा ऋषींनीं भाषण केलें कीं, अधर्माच्या ठायीं प्रवृत्त होतोस तुला धर्माची प्राप्ती कधीं होणार नाहीं, असें पूर्वी महर्षींनीं कथन केलें आहे. याप्रकारें ऋषींचा व नहुषाचा संवाद होत असतां त्यानें माझ्या मस्तकावर पाद प्रहार केला. त्यायोगें तो तत्काल निस्तेज व गतश्री झाला. हें मी पाहून त्यास भाषण केलें कीं, हे दुष्टा, तुझ्यासारखें कर्म पूर्वी कोणीही महान राजांनीं केलें नाहीं, तपोयुक्त मी असतां माझ्या मस्तकावर पाद स्पर्श केलास तसेच हे महान महान् ऋषी वाहनास लाविलेस. त्यापापाचायो

गें तूं निस्तेज होऊन पृथ्वीवर दहा सहस्र वर्षें पर्यंत सर्परूपानें संचार करशी ल नंतर तुला स्वर्ग प्राप्ती होईल. या प्रकारें तो नहुष भ्रष्ट झाला. आतां तूं स्वर्गा चें राज्य परिपालन कर. असें अगस्तीचें भाषण ऐकून महर्षी गण, पितर, यक्ष, भुजंग, राक्षस, गंधर्व, देवकन्या, अप्सरा, मूर्तिमंत सरोवरें, नद्या, पर्वत व साग र हे आप आपलीं रूपें धरून इंद्रास ह्मणतात, पापी नहुष अगस्तिशापानें पृ थ्वीवर सर्परूपानें संचार करितो आतां तूं स्वर्गाचें राज्य कर. अ. वि. या अ. आहे.

१८ अध्याय अठरा.— शल्य ह्मणतो हे धर्मराजा, गंधर्व व अप्सरा ग ण इत्यादिकांनीं इंद्राचा स्तव केला असतां इंद्र ऐरावतारूढ होऊन पावक, बृह स्पती, ऋषिगण, यम, वरुण, कुबेर व सर्वदेवगण यां सह वर्तमान इंद्राणीस- घेऊन स्वराज्य पावला. शची सह वर्तमान इंद्र परम प्रीतीनें राज्य पालन क- रीत असतां कोणे एके दिवशीं अंगिरा ऋषि येऊन अथर्वण वेदोक्त मंत्रें करू न त्याचा स्तव करूं लागला तेव्हां इंद्रानें त्यास वर दिला कीं, आजपासून अ- थर्वांगिरस नामक तुझी वेदामध्यें प्रसिद्धी होऊन यज्ञभाग तुला मिळेल. अ- सें बोलून त्याचें व संपूर्ण देव, ऋषी, तपोधनांचें पूजन व विसरजन करून- इंद्र पृथ्वीचें राज्य करूं लागला. या प्रकारें इंद्रानें भार्येसहित दुःख अनुभवू न, शत्रुवधा निमित्त अज्ञातवास हा भोगिला तर हे राजन्, द्रौपदी व बंधु यां सह वर्तमान तुह्मीं वनवास करून बहुत दुःखें अनुभविलीं त्याचें दुःख कां हीं मानूं नको. वृत्रासूर व नहुष यांचें शासन करून शक्र स्वकीय पदास ज- सा गेला तसा तूंही आपल्या पूर्वपदास पावशील, दुराचारी नहुष अग- स्तिशापानें जसा नष्ट झाला तसे तुझे शत्रु कर्ण, दुर्योधनादिक नाश पावून बंधु व द्रौपदी यां सहवर्तमान समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य तूं करशील. ज्यास जय इच्छा आहे त्याणें हें इंद्रविजय आख्यान अगत्य ऐकावें याज करितां हे युधिष्ठिरा, तुझें तेज वर्धन व्हावें ह्मणोन हें आख्यान तुला सां गितलें. दुर्योधनाच्या अपराधानें व भीमार्जुनाच्या बलें करून सर्व क्षत्रि- य कुल लयास जाईल. हें आख्यान नियमानें जो पठण करतो तो निष्पाप होऊन इहलोकीं व परलोकीं सुख पावतो, शत्रू पासून पराजय पावत नाहीं पठण करतो त्यास विपत्ती कधींही येत नाहीं दीर्घायुषी होतो, सर्वत्र जय, शत्रू

न पुत्रवान ही होतो. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, या रीतीनें शल्यानें युधिष्ठिराचें अश्वासन केलें असतां कौंतेय, शल्याचें उत्तम प्रकारें पूजन करून भाषण करतो, आपण कर्णाचें सारथ्य कराल यांत संशय नाहीं त्या समयीं कर्णाचा तेजोभंग करून अर्जुनाचा स्तव करावा एवढें माझें मागणें आहे. असें ऐकून शल्य बोलतो हे युधिष्ठिरा, तूं बोललास तसें मी अवश्य करीन आणखी तुझें कांहीं कार्य असल्यास मला सांग मी करण्यास सिद्ध आहें. याप्रमाणें धर्मराज व शल्य यांचा संवाद झाल्यावर शल्य धर्मराजाची आज्ञा घेऊन सैन्यासहवर्तमान दुर्योधनाकडे गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९ अध्याय एकूणीस.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, महारथी सात्यकी चतुरंग एक अक्षौहिणी सेना घेऊन जशी एखादी क्षुद्र नदी सागरास जाऊन मिळते तसा युधिष्ठिरास येऊन मिळाला. त्याचे नाना देशीय योद्धे महान पराक्रमी भिंदिपाळ ( गोफणगुंडे ), परशु ( कुन्हाड ) तोमर, मुद्गर, परिघ आदिकरून आयुधें घेऊन सुवर्ण अलंकारानें विद्युल्लतायुक्त मेघासारखे सुशोभित होते. चैद्य देशाचा राजा धृष्टकेतु एक अक्षौहिणी सैन्यासह पांडवांकडे गेला. व जरासंधाचा पुत्र जयत्सेन हाही एक अक्षौहिणी सैन्यासहवर्तमान पांडवाकडे गेला. पांड्य राजा अनेक विद्ध सागरतीरवासी वीरांसहीत युधिष्ठिराकडे येऊन मिळाला. द्रुपदराजा नाना देशांतील वीर व पुत्र यांसहवर्तमान पांडवांकडे आला. मत्स्य देशाधिपती विराट, पार्वतीय राजासहवर्तमान धर्मराजाकडे आला. तसेच अन्य देशींचे राजे सेनेसहवर्तमान पांडवांकडे येऊन मिळाले. नंतर पांडवांची सर्व सेना सात अक्षौहिणी झाली. संपूर्ण योद्धे पांडवांचा तसेंच कौरवांचे योद्धे धृतराष्ट्रपुत्राचा जैजैकार करूं लागले. चीन देशीय व किरात देशीय वीरांसहवर्तमान भगदत्त राजा; भूरिश्रवा, शल्य, भोज, अंधक, कुकुर यांसहवर्तमान कृतवर्मा; सिंधु, सौवीर, राजांसहवर्तमान जयद्रथ; यवन व शक या वीरांसहवर्तमान सुदक्षिण कांबोज व अवंती देशचे विंदानुविंद, केकय देशचा राजा इत्यादिक राजे एकेक अक्षौहिणी सैन्यासहवर्तमान कौरवांस येऊन मिळाले तसेच अन्य बहुत राजे तीन अक्षौहिणी सैन्यासहवर्तमान कौरवांकडे आले असतां दुर्योधनाचें सैन्य अकरा अक्षौहिणी सं-

ख्या झाले. इतक्या सैन्यासहस्तनापुरामध्यें राहण्यास जागा नसल्यामुळें पंचनद, कुरुजांगल तसेच रोहित कारण्य आदि करून हे कौरवांचे देश धनधान्यानीं समृद्ध व सुविस्तीर्ण होते म्हणोन तें संपूर्ण सैन्य या देशांमध्यें राहिलें. हें कौरवांचें सैन्य एकत्र झालेलें पांचालराजानें कौरवांकडे पुरोहित पाठविला होता त्याणें पाहिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

२० अध्याय वीस- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, द्रुपद पुरोहित कौरवांस भेटला असतां धृतराष्ट्र, भीष्म व विदुर यांणी त्याचा परम सत्कार केला. नंतर परस्परांचे कुशल प्रश्न झाल्यावर सर्वही सेनानायक सभेमध्यें बसले असतां पुरोहित सर्वांस बोलतो, धृतराष्ट्र आणि पांडू हे एकाचे पुत्र हें तुम्हांस श्रुत आहेच त्याचें पैतृक धन तें दोघांचें समान असून तें धृतराष्ट्र पुत्रांस प्राप्त झालें तसें पांडु पुत्रांस कां नसावें? धृतराष्ट्र पुत्रानीं पूर्वीं पांडु पुत्रांस यमगृहीं नेण्याचा विचार नाना प्रकारें केला होता तो सिद्धीस न जातां पांडवांस राज्य मिळालें पुढें तें त्यांच्या बलानें वृद्धी पावत असतां सौबला सह वर्तमान क्षुद्र धृतराष्ट्र पुत्रानीं छद्मानें त्यांचें राज्य हरण करून त्रयोदश वर्षें महान् अरण्यामध्यें वास करविला, सभेमध्यें भार्येसह वर्तमान पांडवांस बहुत गांजिलें व अरण्यामध्यें रहात असतां नाना प्रकारचे क्लेशभोगविले शेवटीं विराटगृहीं रूपांतरें करून परम दुःखानें राहिले. हे कुरुपुंगव हो, आतां हीं संपूर्ण पूर्वींचीं दुःखें पांडवानीं टाकून तुमच्याशीं साम करून ते अर्धराज्याची इच्छा करितात याजकरितां दुर्योधनानें त्यांस अर्धराज्य कां न द्यावें हें पांडवांचें वृत्त तुम्हांस निवेदन केलें, दुर्योधनाचें मत काय आहे याचें मनन करून यथा योग्य सांगावें. पांडवांचें हें मत आहे कीं, कौरवांशीं विरोध न करतां व क्षत्रिय कुलाचा नाश न होतां पैतृक धन मिळावें. दुर्योधनाचें मत विग्रह करावा असें असेल तथापि तें योग्य मानू नये. पांडवांस सात अक्षौहिणी सैन्य येऊन मिळालें आहे ते सर्वे कडे युधिष्ठिराजवळ युद्ध करण्याची आज्ञा मागतात. सात्यकी, भीमसेन व नकुल सहदेव एकीकडे व कौरवांचें अक्रा अक्षौहिणी सैन्य एकीकडे असतां अधिक आहेत तसाच बहुरूपी धनंजय संपूर्ण सेने पेक्षां श्रेष्ठ आहे. श्रीकृष्ण भगवान् महाबाहू संपूर्ण सेनेपेक्षां व किरीटी पेक्षां श्रेष्ठ आहे त्याच्या बुद्धीनीं

समना युद्धामध्यें कोण पावणार आहे? यास्तव यथा धर्मानें तुमच्या पाशीं- ते राज्य मागतात तस्मात् तुह्मीं त्यांस द्यावें विलंब करूंनये. असा विषय या अध्यायांत आहे.

२१ अध्याय एकवीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पुरोहिताचें वाक्य ऐकून महा मनापी भीष्म त्याचा सत्कार करून बोलतो हे पुरोहिता, तूं उत्तम बोललास, तुझ्या भाषणा वरून दामोदरा सहित पांडव कुशल आहेत असें समजलें, तसेंच ते सात्यवंत व धर्माच्या ठायीं रत आहेत हें कळून आलें. ते सामर्थ्यवान असतां संधी करावी विग्रह करूंनये असें ह्मणतात असें जें त्यांचें मत तूं सांगितलेंस हें सर्व खरें आहे हे ब्राह्मणा, तूं हें तीक्ष्ण बोलून बरें आह्मांस जागृत केलेंस पांडवांनीं खरेंच वनामध्यें बहुत क्लेश भोगिले आतां ते धर्मे करून आपलें पितृक धन मागतात त्यास तें द्यावें हें ठीक आहे, किरीटी, महाबल, पराक्रमी, कृतास्त्र त्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे! साक्षात् इंद्रही याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं मग दुसऱ्या योध्याची कथा काय! धनंजय त्रैलोक्याचा पराजय करावयास समर्थ आहे असें भीष्माचें वाक्य ऐकतांच कर्ण दुर्योधना कडे पाहून ह्या भीष्म मोठ्याधिटाईनें बोलतो हें त्यास दर्शवून बोलतो हे ब्राह्मणा, तुला पुरतें वृत्त विदीत नाहीं. वारंवार त्यात त्याच भाषणाचें प्रयोजन काय? दुर्योधना निमित्तें शकुनीनें पांडव जिंकिले असतां आपले भाषणा प्रमाणें युधिष्ठीर अरण्यांत गेला तो समय त्याणीं आपला पाळावा पैतृक धन मध्येंच प्राप्त होणार नाहीं, विराट व द्रुपद- यांच्या बलावर त्या मूर्खानें हें भययुक्त दुर्योधनास भाषण आहे; परंतु दुर्योधन भय पावून कधींही पदमात्र भूमी मस्कत त्यांस देणार नाहीं. धर्मेकरून दुर्योधन सर्व पृथ्वी शत्रूस देईल, परंतु अधर्मानें किंचितही देणें अयोग्य आहे जर पांडव पितृक धनाची इच्छा करितात तर त्याणीं आपले भाषणा प्रमाणें पुनः वनवास करून दुर्योधनास शरण यावें ह्मणजे तो कृपा करून अन्न आच्छादन देईल. त्याणीं धर्माचा त्याग करून अधर्मानें जर ते युद्ध करतील तर करोत; परंतु पश्चात त्यांस माझ्या वाक्याचें स्मरण होईल. असें कर्णवाक्य ऐकून भीष्म बोलतात अरे कर्णा, या वाकजल्पना-

कशास करतोस? पार्थाच्या कर्मानें तुला स्मरण नाहीं काय? अरे तो एकटा असतां त्यानें युद्धामध्यें साहाय्यी जिंकिले हें तूं पाहिलें असतां असें कसें कठोर बोलतोस? नस्मात् हा ब्राह्मण बोलला हें उत्तम आहे असें जर न कराल तर तुह्मीं नाश पावून धूळ खाल. असें भीष्मानीं भाषण केलें त्याचा धृतराष्ट्र सत्कार करीत राधेयाची निर्भर्त्सना करून बोलतो भीष्म आमच्या, पांडवांच्या व सर्वजगताच्या हितानें बोलतात आतां याचा विचार करून संजयास पांडवांकडे पाठवितों. हे ब्राह्मणा, आपण पांडवांकडे जावें नंतर तो पांडवांकडे गेला असतां धृतराष्ट्र संजयास बोलावून बोलतो. असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बेवीस:— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, उपप्लव्य ग्रामीं पांडव आहेत तेथें जाऊन अजातशत्रूस सन्मान पूर्वक माझा आशिर्वाद सांगून बोलावें कीं, तुमच्या निरोपानें आह्मांस आनंद झाला आह्मीं कुशल रूपि आहों तुमचें कुशल आहे ना? हे संजया, पांडवांचा किमपीही अपराध नाहीं असें मी जाणतों सर्व लक्ष्मी पांडवांनीं मिळवून आह्मांस दिली. पांडव निरंतर धर्माचरणच करतात; शीत, उष्ण, क्षुधा व तृषा इत्यादि सहन करून धर्मार्थाचें संरक्षण करतात यथाकाळीं आत्मजनाचें पालन करणें व चिरकाल मैत्री संरक्षण करणें हे गुण पांडवांचे आहेत त्यांस शत्रू कोणी नाहीं. एक पापी दुर्योधन व क्षुद्र कर्ण यावांचून सर्व योद्धे पांडवांच्या तेजाची अभिवृद्धी करतात पांडव जिवंत असतां हे बळेंच त्यांचा भाग हरण करण्याची इच्छा करितात, पांडवांचा भाग हरण करण्याची जे इच्छा करितात ते केवळ बालबुद्धी जाणावे हे संजया, केशव मतानुसारी जो अर्जुन तसाच वृकोदर, सात्यकी, अजातशत्रु माद्रिपुत्र व सृंजयाचे वीर हे युद्धास प्रवृत्त झाले नाहींत तों पूर्वीं त्यांचा भाग त्यांस देणें उचीत आहे. रणसंग्रामीं एकट्या अर्जुनाचा वेग कोणास सहन होणार नाहीं मग केशवाशीं तो संयुक्त झाल्यावर त्रैलोक्यामध्यें त्याचा वेग सहन करण्यास कोण समर्थ होईल. असें नाना प्रकारें संजयास सांगून व पांडव कृष्ण आदीकरून योध्यांची नाना प्रकारें स्तुती करून ह्मणतो हे संजया, तूं सत्वर रथारूढ होऊन त्यांचा

ल राज जो द्रुपद याच्या सेनानिवेशास जावें आणि अजात शत्रु जो युधिष्ठीर यास वारंवार प्रीती युक्त आमचें कुशल सांगावें; याच प्रकारें उदार वीर्य जो जनार्दन श्री कृष्ण याजकडे जाऊन कुशलतेचा प्रश्न करून त्यास सांगावें कीं, पांडवां सहवर्तमान धृतराष्ट्र सख्यत्व करण्याचें इच्छितो. श्रीकृष्णाचें वचन पांडव मान्य करितील नंतर सात्यकी, विराट, द्रौपदीचे पांच पुत्र तसेंच अन्यवीर जे तुला भेटतील त्या सर्वांस माझ्या वचनानें कुशल पुसून जेणें करून ते कोप न पावतां भारत वंशाचें हित करतील या विषयीं जे तुला उपाय सुचतील ते तूं कर. असा विषय या अध्यायांत आहे.

२३ अध्याय तेवीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, याप्रकारें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून संजय उपप्लव्य ग्रामास पांडवांचें दर्शन घेण्या करितां जाऊन युधिष्ठिरास नमस्कार पूर्वक भाषण करतो हे राजा, तुला इंद्रासारखा साह्यवान व कुशली पाहून मी संतुष्ट झालों. बुद्धिमान अंबिका पुत्र धृतराष्ट्रानें तुजला कुशल प्रश्न केला आहे हे पांडव श्रेष्ठा, भीमसेन, अर्जुन, नकुल, सहदेव कुशल आहेतना? तशीच सत्य पतिव्रता द्रौपदी कुशल आहेना? असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे संजया, तुझें स्वागत असो तुझ्या दर्शनें करून आह्मांस बहुत संतोष झाला तूं कुशल आहेसना, हे सूज्ञा, बंधु सहवर्तमान मी कुशल आहें, कुरुवृद्ध राजाचें कुशल फार दिवसानीं ऐकिलें हे संजया, प्रीती पूर्वक तुझें दर्शन झालें तेणें करून प्रत्यक्ष धृतराष्ट्राचें दर्शन झाल्या प्रमाणें संतोष झाला, आमचा पितामह भीष्म; धृतराष्ट्र राजा पुत्रां सहवर्तमान, बाल्हीक, सोमदत्त, भूरिश्रवा, सत्यसंध, शल्य, सपुत्र द्रोणाचार्य व कृपाचार्य हे आणखी ही पृथ्वीवर धनुर्धर, महा प्राज्ञ, शस्त्र वेत्ते, कुरूशीं सख्य करणारे, अति दर्शनीय, शील संपन्न जो द्रोण पुत्र तसाच युयुत्सु, दुर्योधन, गांधारी, पाक कर्मी युक्त स्त्रिया, दासा त्या भार्या, कन्यापुत्र, भगिनी दौहित्र, आदी करून सकल कुशल रूपी आहेतना? आमचे राष्ट्रांतील वृत्ती ब्राह्मणास दिल्या आहेत त्या यथा पूर्व चालतात ना? ब्राह्मणाची मर्यादा पालन केली असतां शाश्वत स्वर्गवास होतो, दोषारोप व अमर्यादा केली असतां सर्व कुलक्षय होईल. सपुत्र धृतराष्ट्र-

अमात्यां सहवर्तमान तसेच राजाने अमात्य त्याशीं एकमतानें कपटरहित वर्ततात किंवा नाहीं हे संजया, तेथें आह्मांस कोणी बरें ह्मणतात किंवा नाहीं, कौरवांमध्यें आमचे इष्ट आहेत ते आह्मांस दूषण ठेवितात किंकाय? द्रोण पुत्र व कृपाचार्य हे आमची निंदा करितात कींकाय? धृतराष्ट्र पुत्रांसह वर्तमान सभेंत बसला असतां धनुर्धरांत अग्रणी जो धनंजय याचें-स्मरण करतात काय? तसेंच गांडीवा पासून सुटलेले अतिसरळ, मेघासारखे शब्द करणारे, शीघ्रगामी अशा अर्जुन बाणाचें स्मरण करतात किंवा नाहीं. असें नानाप्रकारें आपल्या बंधूच्या प्रतापाचें वर्णन करून ह्मणतो हे संजया, आह्मीं आपली प्रतिज्ञा पूर्ण केली आतां धृतराष्ट्र पुत्रानीं आमचें पैतृक धन सामोपचारानें सुखें करून द्यावें हें विहित आहे, सामें करून धृतराष्ट्र पुत्र आमचा विभाग न देतील तर त्यांस दंड-करून आमचा विभाग घेणें हें आह्मांस विहितच आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चोवीस-- संजय बोलतो हे धर्मराजा, मजला तूं-प्रश्न केलेस ते सर्व यथास्थित आहेत, धृतराष्ट्र पुत्रां विषयीं कुरुवृद्धां मध्यें कांहीं साधु व काहीं असाधु असे आहेत, दुर्योधन शत्रूस धन देतो मग ब्राह्मणाचें पोषण कसें करणार नाहीं. तुह्मीं त्याच्याशीं द्रोह करीत नसतां तुमच्याशीं तो द्रोह करितो हें तर अयोग्यच आहे; तुह्माशीं मैत्री करावी या विषयीं धृतराष्ट्राचें अनुमत नाहीं; परंतु तुह्मी बलवंत तुह्माशीं वैर केल्यानें परिणामीं बरें नाहीं. असें जाणोन मध्यें मध्यें संतप्त होतो. ब्राह्मणा पासून तो निरंतर असें ऐकत आहे कीं, मित्रद्रोहा पेक्षां दुसरें पातक वरिष्ट नाहीं. तुझें व अर्जुनाचें संग्रामीं निरंतर स्मरण करतो. दुंदुभी व शंख यांचे शब्द श्रवण करतांच भीमसेनाचें त्यास स्मरण होतें तसेंच दोघे माद्री पुत्र महारथी समरीं दुष्कर कर्म करणारे, संग्रामामध्यें आले असतां आमची सेना शरानीं ते निःशेष करितील हें ही तो स्मरतो. युधिष्ठिरास वनवासादि दुःखें भोगविलीं आतां ते अर्धराज्य घेण्या करितां यत्न करतील हें-ही तो बोलतो. हे राजा, तूं बहुत दुःखें अनुभविलींस यास्तव आतां शम करावा.

तुह्मीं सर्व इंद्रा सारखेच आहां धर्मोल्लंघन करून तुह्मीं अधर्माची इच्छा करणा रे नव्हेत याज करितां हे अजात शत्रो,शम करण्या विषयीं तूंच प्रयत्न कर ह्मणजे सर्व धृतराष्ट्र पुत्र कल्याण पावतील. धृतराष्ट्र, पांडव वशृंजय हे सर्व एकच आहे त, तुह्मा पिता धृतराष्ट्र यानें काल रात्रीं मला सांगितलें कीं, माझा हा निरोप धर्म राजास सांग त्या प्रमाणें मी आज तुह्मांस सांगतों सभेंत अमात्य व पुत्रां सहवर्त मान माझें भाषण तुह्मीं श्रवण करावें. असा विषय या अध्या- आहे.

२५ अध्याय पंचवीस:- युधिष्ठिर बोलतो हे संजया, सभास्थानीं सर्व- पांडव, शृंजय, जनार्दन, सात्यकी, विराटादि सर्व योद्धे बसले आहेत धृतराष्ट्रानें तुला जें बोलावयास सांगितलें असेल तें बोल. असें ऐकून संजय बोलतो अजा त शत्रु वृकोदर, धनंजय, माद्री नंदन, वासुदेव, युयुधान, चेकितान, विराट, द्रुप द, धृष्टद्युम्न इत्यादि कुरुकुलाचें कल्याण इच्छिणारे याणीही माझी कल्याण कारक वाणी श्रवण करावी धृतराष्ट्रानें प्रणय पूर्वक असें सर्वांस सांगितलें आ हे कीं, माझे पुत्र व स्वजन यांसहवर्तमान पांडवांचा शम असो असें मी इच्छि तों.हे पांडव सर्व धर्मे करून युक्त,मर्यादाशील, विख्यात कुलीं उत्पन्न झालेले व दान्य कर्मावर निष्ठा ठेवणारे व पापाचरणी त्यांची मती कधीं प्रवृत्त होणार नाहीं असें असतां ज्ञाती वध रूप कर्मास ते प्रवृत्त झाले तर शुभ्र वस्त्रास जसा काज ळाच्या बिंदूचा कलंक लागतो तसा यांस पापाचा कलंक लागेल. युद्धा मध्यें- सर्व क्षय होऊन पापाचा उद्भव झाल्या नें नरक प्राप्ती होणार हें खचित. तस्मा त् हें घोर कर्म करण्यास कोण प्रवृत्त होईल. तशांतून जय व पराजय कोणा चा होईल याचा निश्चय नाहीं जे ज्ञातीवर उपकार करतात तेच धन्य, सत्पु त्र सुहृद त्यांसच बांधव ह्मणतात, निंदित कर्म करणारे वांचोन फलकाय?त्या- नें जीवन व्यर्थ आहे तस्मात् हे राजा, आतां तूं कुरूच्या नियत वैभवास का रण हो. तुह्मीं व कौरवानीं मिळोन आपले दुष्ट असतील त्यांचा नाश करावा; प- रंतु आपले ज्ञातीवधास कारण होऊंनये केशवा सहवर्तमान तुह्मीं चेकितान पार्षत्, सात्यकी हे संपूर्ण इंद्रासारखे संग्रामास प्रवर्तले असतां तुमचें हनन करण्यास सर्व ही देव आले तथापि समर्थ होणार नाहींत. तसेंच द्रोणाचार्य, भी ष्म, अश्वत्थामा, शल्य, कृप, कर्ण व अन्य भूपालानीं ज्या कौरवांचें रक्षण केलें

त्याचा पराजय कोण करण्यास समर्थ आहे, दुर्योधनास महत् बल मिळालें आहे तस्मात् जय किंवा पराजय कोणाचा होईल याचा निश्चय होत नाहीं ह्मणोन अधार्मिक ज्ञाती वध कर्म पांडवांनीं करूं नये याजकरितां मी पांचालाधिपती वृद्ध जो द्रुपद व वासुदेव यांस व सर्वांस शरण आहें, कुरुश्रृंजयांचें कल्याण असो हें माझें वाक्य वासुदेव धनंजय श्रवण न करतील तर अतःपर प्राण देणें योग्य आहे. धृतराष्ट्रानें व भीष्माचें हेंच मन आहे कीं शांती असावी युद्ध उद्योग करूं नये. असा वि॰ या अ॰ आहे.

२८ अध्याय सत्तावीस:- युधिष्ठिर बोलतो हे सूता, ज्या युद्धापासून तूं भय पावतोस तेंच युद्ध मी करणार असें तूं श्रवण केलेंस काय? युद्धच करून कार्य व्हावें हा माझा अभिप्राय नाहीं. युद्धापेक्षां अयुद्ध श्रेष्ठ होय कार्य सिद्धी झाल्यास कलह करतो तो मूर्ख जाणावा. पांडव धर्मानें उल्लंघन करून अधर्म करणार नाहींत हें तुला विदितच आहे, आमची निष्ठा धृतराष्ट्राविषयीं कशी आहे ती तूं जाणतच आहेस, पार्थ सुखाचे इच्छु आहेत खरे; परंतु लोक मार्गानें उल्लंघन करून अधर्मानें सुखाची इच्छा करीत नाहींत. ज्यामध्यें अधर्म होतो अशा दुःखकारक कर्मांची इच्छा करणारे सुखेच्छु इंद्रियांस दुःख देणारे बहुत आहेत. आपल्यास कांहीं एक कार्याची इच्छा उत्पन्न झाली तर शरिरास दुःख देऊन तें कार्य संपादन करावें खरें; परंतु शरीरास दुःख न देतां कार्य साधावें हेंच चांगलें. अग्नीवर जसजसें घृत पडतें तसतसा तो वृद्धी पावतो तसे हे काम व अर्थ यांची शांती झाली नाहीं तर ते दिवसें दिवस अधिक वृद्धी पावतात. हे धृतराष्ट्र पुत्र आजपर्यंत राज्यभोग भोगून तृप्त व्हावेत ते न होतां दिवसें दिवस दायादांस राज्य देऊं नये असें त्यांस इच्छा उत्पन्न झाली ही त्यांस कल्याण दायक नाहीं, दुर्योधनादि शत व आह्मी पांच या सर्वांवर धृतराष्ट्रानें सम दृष्टीनें पाहावें व राज्यभोगादि उभयतांस सम असावे तें न करतां सर्वही भोग आपणासच असावे अशा तात्पर्यानें कौरवांनीं आमचें राज्य कपटानें घेऊन वनवासादि दुःखें आह्मां कडून भोगविलीं हें त्यांस अश्लाघ्य असून आह्मांसच शब्द लावितो हें काय? असें कर्म करणें तुह्मांस योग्य नाहीं. धृतराष्ट्रास ऐश्वर्य प्रा-

म झालें असतां पुत्राचेंच कां कल्याण करतोस.तशांतून पुत्र,मंत्री हे अत्यं त मूर्ख असतां त्यांच्या प्रियाची हा कशा करितां इच्छा करितोस.हा केवल या चाच अधर्म आहे.विदुर हा आपला आप्त असतां अनाप्ता सारखा त्यास मानून पुत्राच्या लोभा करितां ज्या कालीं धृतराष्ट्रानें त्याचा अनादर केला त्या कालीं तो गतश्री होऊन धर्म,काम हे त्याचे नष्ट झाले.तशांतून विदुर कौरवां चा हितसंपादक व बहुश्रुत असतां त्याच्या वाणीचा अनादर करावा कीं काय? जेसमयीं द्यूत खेळावयास त्याणीं मजला बोलाविलें तेच समयीं कौरवांचा क्षय झाला असें मी जाणलें.तशांतून विदुर सांगत असतां त्याचें वाक्य कौरवानीं ऐकिलें नाहीं हें ही त्यांच्या अभावास दुसरें कारण झालें.ज्या दिवसा पासून त्याणीं विदुराची अमर्यादा केली त्या दिवसा पासून त्यांस दुःख झालें.पूर्वीं त्याचे आज्ञे प्रमाणें वर्तत होते, ते समयीं राष्ट्राची वृद्धी होत होती. प्रस्तुत कालीं काय अवस्था आहे ही तूं पहातच आहेस. दुःशासन, शकुनी व कर्ण यांस दुर्योधनानें मंत्री केलें हा त्याचा किती बरें मूर्खपणा? हे संजया, तूंच आपले मनांत विचार कर कीं, विदुराची अवज्ञा झाल्यावर कुरुपांडवांचें कल्याण कोठून होईल,धृतराष्ट्र पुत्रांसहित असें मानितो कीं, त्यांरा ज्याचा मीच उपभोग करीन तेव्हां अशा शीं शम करणें घडत नाहीं. कर्ण अशी श्लाघा करतो कीं, मी अर्जुनाचा पराभव करीन;परंतु हे संजया, पूर्वीं बहुत युद्धें झालीं ते समयीं कर्णानें कां सर्वांचें संरक्षण केलें नाहीं? घोषयात्रा प्रसंगीं दुर्योधनादिकांस गंधर्वांनीं बांधून नेलें असतां आपण मंत्री असून गंधर्वां पासून कां संरक्षण केलें नाहीं? कर्ण, दुर्योधन, द्रोण, पितामह व अन्यही कौरव असें जाणतात कीं, अर्जुना सारखा धनुर्धर पृथ्वीवर कोणी नाहीं. सर्वही कौरव तसेच अन्य भूपाल एकत्र होऊन दुर्योधनास राज्यस्थित करूं. असें ह्मणतात,परंतु अरिंदम फाल्गुन विद्यमान असतां त्याचा संकल्प कसा सिद्धीस जाईल. पांडवांचा अंश हरण करावयास ते दुष्ट इच्छितात; परंतु गांडीवाचा शब्द श्रवण केला नाहीं तों पर्यंत हे वांचले आहेत व भीमसेन क्रुद्ध झाला नाहीं तों पर्यंत दुर्योधन आपली अर्थ सिद्धी होईल असें मानितो;परंतु तो जिवंत असतां आमचा भाग हरण करणें इंद्रादिकांस ही अशक्य

आहे. मग धनंजय, नकुल, सहदेव हे क्रोधयुक्त झाले असतां आमचा भाग घेणें कठिण आहे १ जरही राज्य अपदान बुद्धी पुत्रांसह वर्तमान धृतराष्ट्र धरील तर अमात्यांसह धृतराष्ट्र पुत्र, पांडव कोपाग्नीनें भस्म झाले असें जाण हे संजया, त्याणीं आह्मांस किती क्लेश दिले हें तुला ठाऊक आहे व आमचीनिष्ठा धार्तराष्ट्रा विषयीं कशी होती तेंही तूं जाणतोस अद्यापि त्याणें तसें वर्तुन शांती पावावें आणि इंद्रप्रस्थीं राज्य मला देऊन हस्तना पुरीं दुर्योधनानें राज्य करावें. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्तावीस.— संजय भाषण करतो हे धर्मराजा, तुझें धर्माचरण निरंतर सर्वजनांत प्रसिद्ध आहे यास्तव अनित्य जीवित्वा करितां क्रोधें करून तूं धृतराष्ट्र पुत्रांचा नाश करूं नको, युद्धाशिवाय कौरव जर तुला भाग देत नसतील तर हे महाबाहो, अंधक, वृष्णी यांचे राज्यांत राहून भिक्षा चर्यानें उपजीविका कर; परंतु अधर्म मूलक युद्ध करून राज्य संपादन करणें हें श्रेयस्कर नाहीं. पाहा हें मनुष्याचें जीवित्व अल्पकाल असून ही त्यामध्यें एकरूपें करून चालणें इंद्रादिकांस घडत नाहीं हें जीवित्व नित्यशः दुःख देणारें आहे, तुझ्या यशेंकरून त्रैलोक्य पूरित झालें आहे असें असतां पापा विषयीं तुझी बुद्धी नसावी. धर्माचे नाश करणारे असे विषय मनुष्यास अंधत्व उत्पन्न करतात त्यांचा विवेकानें नाश करावा ह्मणजे त्याची प्रशंसा होत्ये. अर्थ संबंधी तृष्णा धर्माची नाशक असें जाणोन तिचा जो अवलंब करतो तो आपल्या धर्मापासून नष्ट होतो. जो तिचा अवलंब करीत नाहीं तो प्रज्ञावान जाणावा. अर्थाकरितां धर्म नाश होतो. यास्तव धर्म, अर्थ, काम, मोक्ष, यांमध्यें धर्म करणारा महा भाग्य प्रतापी सूर्या सारखा तेजस्वी होतो. जो कोणी अधर्में करून पृथ्वी लब्ध झाला असतां तत्काल तो नाश पावतो. तूं तर वेदाध्ययन, ब्रह्मचर्य, यज्ञयागादि क्रतु करून ब्राह्मण संतुष्ट केलेस, सत्वें बहुत अनुभविलींस परलोक प्राप्त होण्या विषयीं बहुत कर्में केलींस लोकांत तुझी प्रशंसा फार झाली, न्यायानें द्रव्य ग्रहण करून ब्राह्मणांस परम श्रद्धेनें गंध रसोत्पन्न अन्नशान्न दक्षिणा देऊन या लोकीं तूं कर्म विख्यात झालास त्या तुला आतां हें हिंसारूप कर्म योग्य नाहीं; याज करितां क्रोधें करून उभय लोक अंतरतील.

असें कर्म करूंनको. ज्या लोकांस जरा, मृत्यु, भय, क्षुधा, तृषा इत्यादि बाधा करीत नाहींत त्या लोकीं सुखें करून तुझा वास असावा, हेंच करून पुण्याचा क्षय करणें त्यापेक्षां वनवास करणें प्रशस्त आहे तेणें करून धर्महीन होणार नाहीं. आत्म्यास आधीन होऊन जर तूं राज्य लोभाची अधर्मानें इच्छा धरशील तर आज पर्यंत केलेले धर्म व्यर्थ जातील. धर्मा करितां तूं वनवास केलास येणें करून तुझ्या धर्माची ख्याती बहुत झाली. आतां अधर्मानें हें संपादन करणें अयोग्य असें वाटतें. जनार्दन, सात्यकी, पुत्रासहित मत्स्यदेशाचा राजा रुक्मरथ, विराट व अन्य ही राजे तुझ्या साह्यास आले आहेत. वासुदेव व अर्जुन हे तुला अग्रभागीं करतील ते समयीं संग्रामीं श्रेष्ठ वीरांचा घात करून दुर्योधनाचा दर्प दूर करशील खरा; परंतु दुसऱ्याच्या बलाची वृद्धी करून स्वकीयाचा नाश कशा करितां करितोस? हा जर तुला अधर्म कर्तव्य होता तर तेरा वर्षें अरण्य वास कशा करितां केलास त्याच कालीं कौरवांच्या नाशार्थ कां प्रवृत्त झाला नाहींस? अपंडितास ही कदाचित् युद्धामध्यें राज्य मिळतें व धर्मज्ञ असतां ही युद्धामध्यें त्याचा पराजय होतो. यास्तव प्रज्ञावानानीं एका एकीं अधर्म जो संग्राम याचा समय आणूनये. हे राजा, या कालीं जें तूं युद्ध रूप कर्म मनांत आणिलें आहेस ही तुझी अधार्मिक विरुद्ध मती धर्मानें आकर्षण करील; यास्तव यशाची हानी करणारा व पापाचा उदय करणारा ज्याचा अंगिकार संत करीत नाहींत अशा क्रोधास औषधासारखें प्राशन करून निरोगी हो, पापकर्म तुला योग्य नाहीं क्षमाच तुझें भूषण आहे. युद्ध करून भीष्म, सपुत्र द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य, सौमदत्ती, विकर्ण, विविंशती, कर्ण, दुर्योधनादिक मृत्यु पावल्या नंतर तुला काय सुख होणार? सागरांत पृथ्वीचें राज्य जरी तुला मिळालें तथापि जरा, मृत्यु व सुख दुःखें तुजला सोडित नाहींत तर पृथ्वीचें राज्य मिळोन उपयोग काय? त्याज करितां तूं युद्ध करूंनको. यामध्यें परलोकाची हानी आहे. अमात्यांच्या प्रिया करितां हें राज्य संपादन करतों असें ह्मणशील तर स्वर्गापासून जसें खालीं येणें तसें हें तुझें कर्म निंदित होय. असा विषय या अध्यायांत आहे.

२८ अध्याय अठ्ठावीस.— युधिष्ठिर बोलतो हे संजया, कर्मापेक्षां ध

र्मश्रेष्ठ ह्मणोन याचा तूं त्याग करूंनको इत्यादि तूं भाषण केलेंस हें मला ही मान्य आहे, माझा व्यवसाय धर्मरूप आहे अथवा अधर्मरूप आहे हें जाणोन मग माझी निंदा कर, धर्म अधर्माचें संपूर्णरूप कोणास कळत नाहीं. धर्म असून तो अधर्मा सारखा दिसतो व अधर्म असून तो धर्मासारखा-दिसतो तेव्हां तूं विद्वान आहेस याचें स्वरूप आपल्या बुद्धिबळें पहा. अधर्म असतां धर्म कसा व धर्म असतां अधर्म कसा दिसतो याजविषयीं-तुला दृष्टांत सांगतों. कोणी एखादा दांभिक पुरुष अभिचार प्रयोगा करितां मंत्र जपादि एकांत स्थलीं जाऊन करतो ह्याचा अधर्म असतां लोक त्यास धार्मिक आहे असें ह्मणतात. येथें अधर्म असून लोकांस धर्माचा भास झाला आहे तसेंच प्रच्छिन्न योगी दत्तात्रया सारखे अवधूत वेषानें संचार करणारे यांचे ठायीं राग, द्वेष, कर्माकर्म इत्यादिकांचा अगदींच ऱ्हास आहे, बलोन्मत्त पिशाच्चा सारखी त्यांची निरंतर वृत्ती असते ह्यांचा परिपूर्ण धर्म असतां ही लोकांत अशा पुरुषाची निंदा करून ह्मणतात कीं, हा स्नान-संध्या हीन, कर्माकर्म शून्य कोणी एक अमंगल पुरुष आहे, येथें धर्म असून लोकांत अधर्माचा अभास झाला आहे. वसिष्ठ ऋषि महान ब्रह्मज्ञकर्मशील असतां त्याणीं चांडाळ गृहीं अयाज्य याजन केलें, हा अशास्त्र-विधि असतां वसिष्ठास कोणी नाव ठेवीत नाहीं, थोरांनीं जें केलें तें मान्यच-आहे असें धर्माधर्माचें त्रैविध्य हे संजया, तुला विदितच आहे, आपत-कालवशें करून धर्माधर्माचे व्यत्यास (फेरफार) होतात हें ही प्रसिद्ध आहे. वेदाध्ययन हा ब्राह्मणांचा मूळधर्म, शौर्य, तेज, धृती, साक्ष्य, युद्धामध्यें न पळणें, हा क्षत्रियांचा धर्म, कृषी, गोरक्ष्य, वाणिज्य, हा वैश्यांचा धर्म आहे तथापि ब्राह्मणांनीं व वैश्यांनीं आपत कालीं क्षत्रिय धर्मानें उपजीविका करावी आपत कालीं ह्यांचा अधर्म होत नाहीं, असें वर्ण परत्वें धर्माधर्म अवलंब केला असतां पातक नाहीं, हें ही तुला विदितच आहे-ह्मणूनच आह्मीं एकचक्रा नगरी मध्यें भिक्षाटण केलें हा आमचा अधर्म-असें कदाचित तूं ह्मणशील तर तें ही तुझें ह्मणणें यथार्थ आहे. भिक्षाचरण हा धर्म ब्राह्मणांसच मुख्य आहे क्षत्रियांस नाहीं खरा, परंतु क्षत्रियां

चें जीविकाधन मुळचें पृथ्वी व शस्त्रादि आहे, वैश्यांचें जीविकाधन पश्वादि आहेत, हीं त्यांचीं जीविकाधनें नष्ट झालीं असतां स्नान संध्यादिकर्में त्यांचीं नाश पावून अधर्माची वृद्धी होऊन कुटुंब घातही होईल. यास्तव शास्त्र वेत्यांनीं असा निर्णय केला आहे कीं, आपत कालीं भिक्षारूप धर्मक्षत्रियांदिकांस निंद्य नाहींत. हे संजया, दुसरा असा एक विचार आहे कीं, ब्रह्मदेवानें सर्व कर्मांत न्यूनाधिक्य, तारतम्य भावानें प्रायश्चित्तें योजिलीं आहेत, याचें कारण यथाकालीं यथा योग्य सांग कर्में कोणापासून घडत नाहींत यास्तव आपत कालीं केलेल्या कर्माचें प्रायश्चित्त अनकूलकालीं केलें असतां वर्णाश्रय धर्मापासून तो भ्रष्ट होत नाहीं. आपल्यास आपत काल नसून अनुकूल कालीं जो आपले धर्म विरुद्ध कर्म करतो तो शास्त्राधारें निंद्य आहे. तपस्वी मनो निग्रह करून ब्रह्यानें ध्यान करतां करतां सर्व कर्मांचा संन्यास करून बसले असतां त्यांचा योगक्षेम चालण्याकरितां भिक्षाटण धर्म त्यांस सांगितला आहे तेणें करून ते दोषी होत नाहींत. याज वरून असें स्पष्ट दिसतें कीं, ब्रह्मवृत्ती (भिक्षा) बहुधा कोणास-निंद्य नाहीं. अब्राह्मण असून ब्रह्मविद्या निष्टित नसेल तरत्याणें भिक्षा मागूं नये मागितली असतां त्याचा अधर्म होय. यास्तव हे संजया, माझे पितर व पितामह यांणीं यज्ञ यागादि क्रिया यांजवर निष्ठा ठेवून देवपूज्य श्रेष्ठ मार्गानें उत्तम लोकीं गेले. तोच मार्ग आह्मीं सेवन करून राहाणार, कारण आह्मीं आस्तिक आहों. यज्ञादि कर्मांवर आमची श्रद्धा आहे हा माझा निश्चय जाणोन तुला काय बोलणें असेलतें बोल. प्रसंगवशें करून आपत धर्म व योगी धर्म यांचा विचार तुला सांगितला आतां प्रकृतोपयुक्त मी पुनः भाषण करतों. हे संजया, पृथ्वी संबंधीं सर्वधन-अथवा त्रैलोक्याचें स्वामीत्व किंबहुना सर्व ब्रह्य लोकाची वस्ती अधर्मानें मिळेल तर, मी त्याचीइच्छा करीत नाहीं, तूं श्रीकृष्णा सहवर्तमान-भाषण कर ह्मणजे मी धर्म करतों किंवा अधर्म करतों याचें तत्व तो जाणतो या केशवास कौरव व पांडव समान आहेत. चेदी देशाचे नृपती अंधक, वृष्णी, भोज, कुकुर, संजय, हे सर्वही वासुदेवाच्या आश्रयानें श

त्रूंस जिंकून आपले सुहृदांस आनंदीत करतात. इतरही इंद्रासारखे पर
मश्रेष्ठ, सत्यपरायण, मनस्वी व महाबली यादव हे ज्याश्रीकृष्णास निरंतरअ
यात असतात ज्या ईश्वराची सेवा केली असतां ग्रीष्मांतीं मेघ, वृष्टीनें प्रजांस
जसें सुख देतोतसा हा वासुदेव सर्वांचे मनोरथ पूर्ण करितो. यास्तव हे संज
या, असा हा परमेश्वर संपूर्ण कर्मांचा निश्चय जाणणारा ज्यास प्रियाप्रिय को
णी नाहीं, त्याचे वचनाचें मी अतिक्रमण करणार नाहीं. असा विषय या
अध्यायांत आहे.

२९ अध्याय एकुणतीस:— वासुदेव भाषण करतात हे संजया, को
णाचा नाश न होतां पांडवांचें प्रिय व्हावें व त्यांच्या ऐश्वर्याची वृद्धी असावी.
अशी मी इच्छा बहुत करितों तसेंच धृतराष्ट्र पुत्रांचें ही कल्याण होण्याची मा
झी इच्छा आहे; परंतु हे संजया या पांडवांचे समक्ष मी तुला सांगतों या कौ
रव पांडवांचा राज्या करितां कलह आहे या कलहाची शांती शमें करून होणा
र नाहीं, कारण धृतराष्ट्र, पुत्रानुमतें चालणारा आहे व ते पुत्र तर अति दुरात्मे
आहेत यास्तव ही शमाची गोष्ट कशी घडून येते. या धर्मराजास तूं असें भाष
ण केलेंस कीं, तूं धर्म लोप करतोस हें तुला योग्य नाहीं. कर्मा पेक्षां धर्म श्रेष्ठ
आहे हें तुझें भाषण अगदीं मिथ्या आहे धर्मराज तर निरंतर वेदाध्ययन,
कुटुंब पोषण, साधूचा सत्कार इत्यादि कर्मांमध्यें केवल परिपूर्ण आहे. ब्राह्म
णाची मान्यता व त्याचा मोठेपणा तो जाणतो, निरंतर ज्यास दान करण्या विष
यीं अति संतोष असतो अशा धर्मास तूं ह्मणतोस कीं, धर्मलोप केलास हें का
य? कर्मन्यून कशानें झालें, कर्मानेंच सर्व सिद्धी प्राप्त होतात. गृहस्थाश्र
माचा अवलंब करून त्या आश्रमांत सर्व भोग भोगून शेवटीं सन्यास धर्मा
नें प्राणी मुक्त होतो. भोग भोगल्या वांचून चित्त शांती होत नाहीं, चित्ताची शां
ती नाहीं तर फल प्राप्ती नाहीं यास्तव ब्राह्मणास ही कर्मानें मोक्ष आहे, ज्या
विद्या ज्या फलप्राप्ती करितां संपादिल्या त्याविद्यांपासून ती फल प्राप्ती अव
श्य होतच आहे. कोणी तृषेनें आर्त झालेला उदक प्राशनानें जसा तृप्त होतो
तसा कर्मी कर्मानेंच अर्थ तृष्णें पासून मुक्त होतो. यास्तव गृहस्थाश्रम धारण
करून आपण तरावें व पितरां दिकांस तारावें हें कर्माचें फल आहे. हे संजया,

सर्वास तारणारा ज्ञानविधी हा कर्मापासून उत्पन्न झाला आहे कर्मे करून दे
वास दवत्व मिळालें, वायूस संचार गती जाहली रात्रं दिवस सूर्यास उदयास्त,
अग्नीस दहन शक्ती, अमित भार सहन करण्याची शक्ती पृथ्वीस, सर्व भूतां
स तृप्त करणारीं उदकें यांस वाहण्याची शक्ती, मेघास वर्षण व दिशानादानें
पूर्ण करणें, देवाचें स्वामित्व इंद्रास, नक्षत्रांस तेज हीं सर्व कर्मानें प्राप्त होतात.
तसेंच रुद्र, आदित्य, वसू, विश्वेदेव, यम, कुबेर, गंधर्व, यक्ष, अप्सरा, ऋषी,
हे ब्रह्म विद्येच्या आश्रयें करून महान पदवी पावले. हे संजया, क्षत्रिय, वैश्य,
विप्रेंद्र या सर्वांस कर्मानें योग्यता मिळाल्या हें तूं ज्ञानी असतां कसें जाणत ना
हींस. अरे आम्नाय विद्या, धर्म शौर्य इत्यादिकांचे ठायीं परम रत जो धर्मरा
ज यास दुसरा शिक्षा करण्यास कोण समर्थ होईल. जे गुण धर्मराजामध्यें
आहेत ते गुण जर कौरवां मध्यें असते तर युद्धा वांचून शम करणें ही पांड-
वां पासून गोष्ट घडती; परंतु ते कांहीं दिसत नाहीं. पांडव आपल्या धर्मा चें त्रा
ण करण्यास परम उद्युक्त आहेत. कदाचित् धर्मराजा भीमसेनाचा निग्रह क
रून तूं ह्मणतोस हें मान्य करील. पांडव आपला पित्र्य धर्म पालन करण्यास
मोठे इच्छित आहेत. पितृ उपार्जित धन जर यांस न मिळालें तर मरणच श्रे
ष्ठ आहे असें ते मानितात. हे संजया, राजानें युद्धें करून धन मिळवावें असें
मानितोस अथवा अयुद्धानें मिळेल तेंच घ्यावें असें मानितोस; या दोन पक्षां
त राजाचा धर्माधर्म विचार कोण ता आहे. जर अयुद्धानेंच द्रव्य व राज्य मिळ
वावें असा धर्म आहे असें ह्मणशील तर ही गोष्ट शास्त्र विरुद्ध आहे ती ऐ
क. पूर्वी चार वर्णांचे विभाग करते वेळेस त्यांच्या धर्मांचे कसे विभाग केले त्या
चें ज्ञान तुला झालें ह्मणजे मग पांडवांची निंदा कर अथवा प्रशंसा कर आह्मां
स त्याचा राग नाहीं. प्रथम वेदाध्ययन, यजन, दान, प्रतिग्रह, वेदाध्ययन क
रविणें व याजन करवणें हें ब्राह्मणाचें मुख्य कर्म, धर्मे करून प्रजेचें रक्षण
करणें, अप्रमादि होऊन दान करणें, यज्ञ यागादि क्रिया करणें, वेदाध्ययन त
साच दारापरिग्रह करून गृहीं वास करणें या धर्मे करून क्षत्रिय राहात अ
सतां तो ब्रह्म लोकीं वास करतो. कृषी कर्म, वेदाध्ययन, पदार्थ विक्रय करू
न जें द्रव्य मिळेल त्याणें प्रजेचें पाळण करणें, ब्राह्मण व क्षत्रिय यांचें निरंत

र प्रियकरणें आणि दारा परिग्रह करून गृहीं वास करणें, हे वैश्याचे धर्म होय. त्रैवर्णिकांची परिचर्या, ब्राह्मणास वंदन करणें, आपल्या कल्याणार्थ निरालस्य असणें हा शूद्राचा मुख्य धर्म होय. वेदाध्ययन व यज्ञयागादि क्रिया यांस निषिद्ध आहेत. हे संपूर्णांचे धर्म राजानें चालवून त्या त्या कर्मास योजावें. राजाची प्रजेवर समवृत्ती असावी अधार्मिकास राजानें आश्रय देऊं नये, निर्लोभी असावें, अभिज्ञता असावी, सर्व धर्मी वर समदृष्टी असावी. असा राजा असल्यास त्या राजांवर प्रजा अत्यंत प्रीती करतात. राजाचें ही उत्तरोत्तर कल्याण होतें, राजानें घातुकपणानें लोकांचे राज्यांचा अभिलाष करूं नये, पर ऐश्वर्या विषयीं राजा घातुकपणा स्वीकारिल तर तो चोरासारखा जाणावा तो राजा कधीं तरीं दैववशात् नाश पावेल. असे राजे पृथ्वीवर दुष्ट झाले असतां परस्पर युद्धाचा प्रसंग प्राप्त होतो त्या जकरितां वर्म, शस्त्रें व धनुष्यें इंद्रानें उत्पन्न केलीं आहेत. यानीं चोर राजांचा वध केला असतां पुण्यच लागेल. हे संजया, तो चोरपणा कौरव कुलांत शिरला आहे त्यांचे घरीं हा अधर्म प्रादुर्भाव झाला आहे असें मला वाटतें; पुत्रांसह वर्तमान धृतराष्ट्रानें पांडवांचें धन हरण केलें या मूर्खास राजधर्म कांहीं समजत नाहीं, सर्व कौरव ही त्याच मार्गास मिळाले आहेत, दुसऱ्याचें धन चोरानें बलें करून प्रत्यक्ष अथवा परोक्ष हरण केलें तथापि दोन्ही कर्में समानच, दोघांस ही दंड आहे, धृतराष्ट्र पुत्रांस आणि चोरांस अंतर काय आहे? प्रत्यक्ष पहातां पहातां पांडवांचें धन ज्याणीं हरण केलें ते धृतराष्ट्र पुत्र ह्मणत असतील कीं, आह्मीं हें कर्म न्यायानेंच केलें; परंतु हा न्याय नाहीं, पांडवानीं आपली राज्यरूप ठेव कौरवांपाशीं ठेविली होती ती आतां ते मागतात; परंतु ती देणें त्यांस कठिण कां वाटतें? या पितृप्राप्त राज्या करितां जर युद्ध उपयतांच झालें तर चांगलेंच आहे यांत कांहीं वध होत नाहीं दुसऱ्याचें राज्य घ्यावें त्यापेक्षां आपले पित्यानें संपादित राज्य तें पूर्वीं मिळवावें. हे संजया, ह्या काल पर्यंत जे धर्म मी सांगितले हे सर्व तूं जाऊन कौरव सभेंत बोल. हे मंद धृतराष्ट्र पुत्र संपूर्ण मृत्यूच्या मुखांत पडले आहेत असें समज. या दुष्टांचें तुला दुसरें एक अत्यंत पापगर्हित कर्म सांगतों; यानीं सभेमध्यें पांडवांची अत्यंत प्राणप्रिया द्रौपदी आणिली तेव्हां भीष्मादि मोठे धर्मज्ञ सभेंत बसले असतां, त्या

मूर्खानें कोणी निवारण केलें नाहीं. सर्व कौरव कामोपजीवी झाले होते वारंवा र ती भीष्मादिकांचीं नावें घेऊन आक्रोश करीत असतां निजकडे कोणी पहात ना, काय हो हा त्यांचा धर्म. जर त्या कालीं कुरुमुख्य वृद्ध बाळ व धृतराष्ट्र हे जर दुःशासनाचें निवारण करते तर कौरवांनीं माझें प्रिय केलें असें समजतों. त्या कालीं विदुर मात्र त्यांची निंदा करित होता. दुसरे राजे त्या सभेंत कौरवांस वश झाल्यानें कांहीं न बोलतां स्तब्ध बसले. एकटा विदुर त्या अल्पबुद्धीस बोलत होता. अरे हा धर्म नव्हे, यांचीं फलें पावाल. हें दुष्ट कर्म दुर्योधन प्रभृतिनीं केलें असतां धर्मराजास मात्र धर्मोपदेश करण्याची इच्छा करतोस, तुह्मीं युद्ध करूं नका युद्ध केलें असतां धर्मव्यतिक्रम होईल हें तुझें भाषण योग्य आहे ना याचा तूंच विचार कर. सागरापासून नौका जशी तारते तसें मी पांडवांस संकटापासून तारलें. त्या कौरव सभेंत कर्ण बोलला कीं, हे याज्ञसेनी तूं आतां धृतराष्ट्रपुत्राची दासी झालीस तुझे ते पांच पती क्लीब पराजित झाले आतां तूं दुसरा पती कर. हा कर्णाचा वाग्बाण फाल्गुनाचा हृदयभेद करून राहिला आहे तो कसा निघेल? सभेंत दुःशासनानें भाषण केलें कीं, हे द्रौपदी तुझ्या पतीनीं आतां कृष्णाजिनें परिधान करून जावें. हे नपुंसक आहेत, हे नरकीं बहुत काल पर्यंत राहोत. धर्मराजा द्यूत खेळत असतां गांधारराजानें भाषण केलें कीं, हे पार्था, तुझा कनिष्ठ भ्राता पणामध्यें हरण केला आतां द्रौपदी भार्या राहिली आहे ही पणास लाव इत्यादि निंद्य भाषणें द्यूतकालीं कौरवसभेमध्यें झालेलीं संजया तुला ठाऊक आहेत आतां या कार्याकरितांच मी स्वतः कौरवसभेमध्यें जातों आणि शमोपायें करून पांडवांचा अर्थ पांडवांस मिळावा असा यत्न करतों ह्मणजे पांडवांचें महत्कार्य होऊन मृत्यूपासून कौरव ही मुक्त होतील व मला ही पुण्य लागेल. ही माझी वाणी सर्व कौरव ऐकोत आणि सभेंत मला पाहून माझा सत्कार करोत. हे संजया, मी ह्मणतों या प्रमाणें गोष्ट घडली नाहीं तर समरामध्यें रथी जो फाल्गुन तसाच समरश्लाघी भीमसेन यांणीं हे धृतराष्ट्रपुत्र दत्त्यमान केले असें तूं जाण. द्यूतकालीं हाच दुर्योधन कठोर वाणीनें बोलत होता कीं, पांडव पराजित झाले; परंतु या मूर्खास हें कोठें ज्ञान आहे, ज्याकालीं गदाहस्त भीमसेन त्याच्या अग्रभागीं येऊन

उभारा होईल त्या कालीं मागील संभाषणाचें तो स्मरण करवील. हा सुयोधनाचा क्रोधरूप एक वृक्ष आहे त्याचा स्कंध कर्ण, शकुनी त्या शाखा, दुःशासन हा ज्याचीं पुष्पफलें आहेत, या वृक्षाचें मूळ धृतराष्ट्र राजा होय. इकडे युधिष्ठिर राजा महा धार्मिक कोणी एक वृक्ष आहे अर्जुन हा ज्याचा स्कंध, भीमसेन ज्याची शाखा, माद्रीपुत्र ज्या वृक्षांची पुष्पें फळें आहेत मी, ब्रह्म व ब्राह्मण हे त्रिवर्ग या वृक्षाचीं मूळें आहेत पुत्रांसह वर्तमान धृतराष्ट्र हेंच कोणी वन आहे, त्या वनांत पांडुपुत्र हे कोणी व्याघ्र आहेत ते व्याघ्र वनांत असले ह्मणजे कोणी वनाचा नाश करीत नाहीं याजकरितां व्याघ्रानें वनास व वनानें व्याघ्रास रक्षिलें पाहिजे तेव्हां उभयतांनीं परस्परांचें रक्षण केलें पाहिजें लतास्थानीं धृतराष्ट्रपुत्र, शालवृक्ष पांडव आहेत, लता वृक्षाच्या आश्रया वांचून वृद्धी पावत नाहींत. हे संजया, तुला शेवट कृत्य सांगतों ऐक. पांडव धृतराष्ट्राची सेवा करण्यास सिद्ध आहेत नाहीं तर युद्ध करण्यास सिद्ध आहेत अथवा शम करण्यास ही सिद्ध आहेत यांत धृतराष्ट्रास जसें कर्तव्य असेल तसें करो ये थें यथातथ्य जाहलेलें भाषण मात्र त्यास सांग. अ. वि. या अ. आहे.

३० अध्याय तीस:— संजय बोलतो हे धर्मराजा, तुझें कल्याण असो, तुझी आज्ञा घेऊन मी जातों, मजकडोन दुर्भाषण कांहीं झालें असल्यास त्याची क्षमा कर. जनार्दन भीमसेन वगैरे यांस माझा प्रणाम असो. असें त्याचें भाषण ऐकून धर्मराज बोलतो हे संजया, आतां तुला जाण्या विषयीं आज्ञा आहे तुझें कल्याण असो. आह्मीं तुला अप्रिय संभाषण केलें असेल तर क्षमा कर तूं मध्यस्ती करण्यास योग्य आहेस, तुझें अंतःकरण शुद्ध आहे, तूं दूत आप्त आहेस, तुझी कल्याण वाणी फार प्रियकारक आहे, तुझें भाषण ऐकून आह्मीं तृप्त झालों, आतां बुद्धीनें मोहमात्र पावूं नको व माझ्या दुरुक्तानीं कोपही मानूं नको, तुझें भाषणांत निरर्थक शब्द नाहीं. अश्वत्थामा, कृपाचार्य, भीष्म, धृतराष्ट्र, विदूर आदीकरून सर्वांस असें सांग कीं, तुह्मीं भय पावूं नका ज्या दुष्टानीं परलोकमार्ग बंद होण्याचें पातक केलें आहे त्या सर्वांचा नाश करून तुह्मा सर्वांची उपजीविका यथार्थ चालवूं हे संजया, मी ज्यां ब्राह्मणांस वृत्ती दिल्या होत्या त्या सर्व तूं चालवून त्यांची दिवसें दिवस वृद्धी केलीस हें

मला विदित आहे ह्मणोन तूं दुर्योधनास सांग. जे अनाथ, दुर्बल सर्व ज्याणी माझ्यावर विश्वास ठेविला त्यांचें पोषण जसें मी करीत होतों तसेंच त्यांचें तूं करतोस हें मला श्रुत आहे. असें धृतराष्ट्र पुत्रास तूं सूचीव. याच प्रकारें सर्व देशांतून आलेले यांस कुशल सांग. धृतराष्ट्रानें जे जे योद्धे एकत्र केले आहेत तसे दुसरे योद्धे पृथ्वीवर राहिले नाहींत. अस्तु आमचा क्षात्रधर्म नित्य आहे त्या धर्मानें आह्मीं शत्रूचा जय करूं. केवल साध्य असून त्याच्या योगानें क्षत्रियांचा नाश करूं अशी आमची इच्छा आहे तस्मात् शत्रुनाशा विषयीं धर्म हा श्रेष्ट आहे त्याच्या योगानें सर्व घडतें. हे संजया, शेवटीं दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, तूं आपले शरीराचा व ह्रदयाचा संताप कां करतोस सपत्न रहित तुला होण्यास कांहीं युक्ती नाहीं व मीही तुला अप्रिय सांगतों असें नाहीं, परंतु तुझा ह्रद्रोग जाण्यास एकच युक्ती आहे इंद्रप्रस्थानें राज्य मला समर्पण करून स्वस्थ हो अथवा युद्धा शिवाय दुसरा उपाय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकतीस.— युधिष्ठिर बोलतो हे संजया, संताचे असंत व बालाचे वृद्ध अथवा दुर्बलाचे बलवंत प्रारब्धानें होतात. तसेच बालाचे पंडित व पंडित असतां मूर्ख हे ही जन्मार्जित कर्माच्या योगें ईश्वर करतो. याजकरितां आपलें बल व शौर्य याचा विचार करावा ह्मणजे यथार्थ ज्ञान होऊन कोणचें कार्य सिद्ध होण्यास न्यूनता होत नाहीं. यास्तव हे संजया, तूं धृतराष्ट्राकडे गेलास ह्मणजे असें सांग कीं, धर्मानें तुह्मांस कुशल विचारिलें आहे आणि आमचे बला विषयीं त्याणें विचारलें असतां असें सांग कीं, पांडव विचारें करून परिपूर्ण आहेत कांहीं एक त्यांजपाशीं न्यून नाहीं जसें तुझ्या विचारास येईल तसें कर. या प्रकारें परम हर्षानें तूं धृतराष्ट्राशीं बोलून पुनः असें सांग कीं, तुह्मींच पांडवांचें रक्षण केलें, तुमच्याच वीर्यें करून ते सुखानें जीवन पावतात. तुझ्या प्रसादानें ते बाल असतां राज्यारूढ झाले होते यस्तव तें राज्य त्यांस देऊन स्वस्थ हो उपेक्षा करूं नको. हें संपूर्ण पृथ्वींतील धन एकास जरीं मिळालें तरीं त्याची तृप्ती होत नाहीं यास्तव हे तात, तुह्मीं आह्मीं एकत्र राहूं द्वेषास पात्र होऊं नको अशी धर्मराजाची इच्छा आहे ह्मणोन त्यास सांग.

नंतर शंतनु पुत्र आमचा पितामह भीष्माचार्य यास शिरसाभिवंदन करून मा- झें नाम कीर्तन कर आणि पश्चात् सांग कीं, शंतनुचा वंश निमग्न झालेला पुनः तुह्मीं आपले वीर्यानीं उद्धर केला तसाच्या भारत कुळाचा उद्धार होईल असें करा याच प्रकारें कुरुवंशास विचार देणारा जो विदुर यास सांग कीं, जेणें करून युद्ध न होईल असें राजासह वर्तमान सौम्य भाषण करून माझें हित होईल असें क र.नंतर दुर्योधनास सभेंत माझा निरोप जाऊन सांग कीं, आमची भार्या द्रौपदी पापरहित असतां तुह्मीं दुष्टानीं सभेंत आणली हे महत् दुःखकारक कर्म तुह्मीं केलें असतां तें दुःख झालेलें त्याची आतां क्षमा करून ह्मणतो कीं, कुरुवंशाचा वध करूंनका.असेंच पूर्वी तुह्मीं आमचे बहुत अपराध केलेत त्याची क्षमा केली. आह्मीं बलवान जरी आहोंत तथापि कुरुवंशाचा नाश करूंनये अशी इच्छा ध- रून आहोंत.कृष्णाजिन प्रावर्णे आह्मांस देऊन वनवास करविला तथापि तें दुः ख आह्मीं सहन केलें.कुंतीची अमर्यादा करून पापरूपी दुःशासनानें द्रौप- दीचे केंशग्रहण केले त्या सर्व तुमच्या अपराधाची क्षमा करून इतकेंच मागतों कीं, तुह्मीं कुरुवंशाचा उच्छेद करण्यास कारण होऊंनका,आह्मांस उचितभाग देणें आहे तो देऊन शांती करा. परद्रव्य हरणा विषयीं तुमची लुब्धक बुद्धी झा- ली आहे तिज पासून निवृत्त व्हा,राज्याचा एक देश जरी आह्मांस दिला तथापि तो घेऊन परस्पर दया करून शांती पावूं.अपिस्थल, वृकस्थल, माकंदि किंवा वारणावत यांतून कोणच्याही ग्रामांत वास करूं, अथवा पांच भ्रात्यांस पांच- ग्राम दिले असतां त्यांत राहूं,परंतु ज्ञातीशीं कलह नसावा. भ्राता भ्रात्यांसह व पिता पुत्रांसह एकत्र होऊन सुखानें राहोत.कुरु पांचाल यांची अत्यंत मि- त्रता असावी यास्तव सर्वांनीं अक्लिष्ट अंतःकरण धारण करून एकत्र वास- करावा. तात्पर्य तुमचा आमचा शम असावा असो. हे संजया, तूं महा मात्रा- चतुर आहेस जेणें करून युद्ध न होईल असा दुर्योधनास बोध कर. इतकेंन हो ईल तर आह्मीं धर्म, अर्थ, मृदु अथवा दारुण या चार उपायानीं राज्य घेण्या स सिद्ध आहों. असा विषय या अध्यायांत आहे.

३२ अध्याय बत्तीस- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांडवां चे आज्ञेनें संजय हस्तनापुरीं धृतराष्ट्रास पांडवांचा निरोप सांगण्या करितां

अंतःपुरीं जाऊन द्वारपालांस भाषण करतो हे द्वारपाल हो, धृतराष्ट्र राजास सांगा कीं, पांडवां कडून संजय आला आहे. असें संजयाचें भाषण ऐकून द्वारपाल अंतःपुरीं जाऊन बोलतात हे भूपते, तुमच्या दर्शनास पांडवां कडून संजय नामक दूत आला आहे. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे द्वारपाल हो, तुह्मीं लोकर जाऊन त्यास मजकडे घेऊन या. नंतर संजय धृतराष्ट्राचे आज्ञेनें त्याचे मंदिरीं गेला आणि बोलूं लागला हे राजा, आपले आज्ञेनें मी पांडवां कडे गेलों होतों तेथें धर्मराजानें आपल्यास परम प्रीतीनें असें सांगितलें आहे कीं, पुत्र, सुह्रद व सचीव यां सह वर्तमान तुह्मीं सुखरूप आहांनां व इतर उपजीविका करणारे ते सर्व सुखरूप आहेत ना? असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, अजातशत्रु धर्मराज सपुत्र, सामात्य, सानुज सुखी आहे ना? असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, युधिष्ठीर राजा सहामात्य सबांधव कुशल आहे, धर्मराज धर्मापेक्षां दुसऱ्यास श्रेष्ठ मानीत नाहीं धर्मानेंच वित्त मिळा त्यास ग्रहण करण्याचें इच्छितो परवित्ता विषयीं त्याची इच्छा अगदीं नाहीं, त्यास सुख प्रिय आहे खरें, परंतु धर्महीन जर सुख आहे तर त्याची तो इच्छा करीत नाहीं. त्याचें करणें निरर्थक नाहीं संपूर्णावर उपकार होईल असेंच कर्म करतो. आपलें प्रिय होण्या करितां परघात करण्यास इच्छित नाहीं अशी त्याची प्रौढ व उदार बुद्धी मी पाहिली. त्याचा असा निश्चय आहे कीं, जशी लांकडाची बाहुली सूत्र धरणाऱ्याच्या स्वाधीन असते तसा हा जीव ईश्वराचे स्वाधीन असून संचार करतो यास स्वतंत्र कार्य करण्याची शक्ती नाहीं तेव्हां पौरुषा पेक्षां दैवच श्रेष्ठ आहे हें तुझें घोर कर्म पापास उत्पन्न करणारें पाहून धर्मराज असें ह्मणतो कीं, जों काल पर्यंत आह्मीं उदासीन आहोंत तों काल पर्यंत तूं प्रशस्त आहेस. जीर्ण त्वचा टाकून सर्प जसा नवीन होतो तसा धर्मराज वनवासादि दुःखें भोगून तुझ्या नाशा विषयीं तेजःपुंज होऊन सिद्ध आहे. तूं पुत्र वश होऊन पांडवांचें धन हरण करण्याची इच्छा करितोस यामुळें तुझी अपकीर्ती होईल. कारण दुःष्कुलांत उत्पन्न झालेला अशीं कर्में करितो तूं तर मोठ्या कुलांत उत्पन्न झालास, बहुश्रुत, सुखें करून जीवन करणारा असा तूं आहेस, यास्तव तुझें हें कर्म नव्हे मी विचार करून पाहतों कीं, जे धर्मा

विषयीं चतुर, धर्मोल्लंघन करणारे नव्हेत,असे असतां त्यांचे हातून असें क-
र्म घडलें कसें?मग निश्चय केला कीं, लोभानें पाहिजे तें कर्म घडतें तुझे हे मंत्री,
ज्या कार्यावर तूं त्यांचा नियोग केलास त्यांचा असा निश्चय दिसतो कीं, कुरु
चा क्षय करावा तस्मात् हे कौरव अकालींच मरणार यांचें मरणप्रयुक्त पात-
क युधिष्ठिरास स्पर्शकरणार नाहीं. या लोकीं तुझी निंदामात्र होईल. सर्वा-
च्या पापाचा अधिकारी तूं होशील. हे राजा, विचार करा ज्या गोष्टी घडण्यास
योग्य नव्हेत त्या कशा घडतात, पार्थ इंद्रलोकीं जाऊन अस्त्रविद्या ग्रहण क
रून व इंद्राचे सान्निध्य राहून शेवटीं मृत्यलोकीं आला. हीं अघटित कृत्यें
पराक्रमानें घडलीं नाहींत यांत दैवच प्रधान आहे, यास्तव सर्वांस काल हा-
कारण आहे. शौर्यादिक गुण नसेंच ऐश्वर्य व दारिद्र्य तरीं जन्मांतर कर्मानें
च प्राप्त होतें; परंतु हे सर्व उत्पत्ति व नाश यानीं युक्त आहेत ह्मणूनच बलि-
राजाचा असा निश्चय आहे कीं, पूर्वजन्मार्जित कारणा खेरीज दुसरें कारण
न्हास व वृद्धी यास नाहीं कालहाच ईश्वर आहे दुसरा कोणी ईश्वर नाहीं. हे
राजा, प्रियाप्रिय, सुख दुःख यांचे ठायीं सम होऊन साधुव्रत धर. हा भरत-
कुलांतील प्रजेचा नाश होण्याचा समय धृतराष्ट्राच्या अपराधामुळें आला
आहे अशी लोक निंदा करतात. यास्तव तूं पुत्र वश होऊन आपल्यास कृतकृ
त्यता मानूनकोस. अनाप्त जे कर्णादिक यांचा संग्रह आणि आप्त जे विदुरा-
दिक यांचा द्वेष करतोस या कारणानें तूं दुर्बल होऊन पृथ्वीचें राज्यकरण्या
स समर्थ होणार नाहींस, पांडवांकडून मी येथें आलों यामुळें मार्गांत श्र
म झाला आहे आज्ञा होईलतर शयनास जातों आणि उद्यां प्रातःकालीं
सर्व कुरु वीरांची सभा जमल्यावर पांडवांचा निरोप सर्वांसमक्ष सांगेन. अ
सें सूताचें वाक्य ऐकून धृतराष्ट्र बोलतात हे संजया, तुला आज्ञा आहे, गृ
हीं जाऊन शयन कर आणि प्रातःकालीं सर्व कुरु सभेंत जमले ह्मणजे धर्म
राजा कडील निरोप ऐकतील. असा विषय या अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेतीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, संज
य गृहीं गेल्यावर धृतराष्ट्र राजा द्वारपाळास भाषण करतो कीं, विदुरांस
भेटण्याची मला इच्छा उत्पन्न झाली आहे तर लौकर त्यास घेऊन ये. अशी

धृतराष्ट्राची आज्ञा ऐकतांच द्वारपाळ विदुराकडे जाऊन ह्मणतो हे महामा ज्ञ, धृतराष्ट्र तुमच्या दर्शनाची इच्छा करीत आहे. असें ऐकतांच विदुर राज गृहीं येऊन द्वारपालास ह्मणतो मी विदूर आलों आहें हें धृतराष्ट्रास सांग. असें ऐकतांच द्वारपाळ राजास बोलतो हे राजेंद्र, विदूर आपले चरणाचे द र्शनास आला आहे, आज्ञा होईल त्याप्रमाणें करतों. असें ऐकून धृतराष्ट्र भा षण करतो हे द्वारपाळ, विदुरास लौकर आंत घेऊन ये मी त्याच्या दर्शनाची मार्गप्रतीक्षा करीत बसलों आहें. इतकें ऐकतांच द्वारपालानें अंतरगृहीं वि दुरास नेला नंतर विदुर धृतराष्ट्रास हात जोडून बोलला कीं, हे प्राज्ञ, तुझ्या आ ज्ञेनें मी आलों, काय असेल तें सांग. असें ऐकून धृतराष्ट्र भाषण करतो हे विदु रा, संजय माझी निंदा करून गेला. आणि तो उदईक सभेमध्यें धर्मराजाचा नि रोप सर्वांसमक्ष सांगणार आहे तो निरोप मला न समजल्या मुळें माझ्या शरीरा चा दाहा होऊन निद्राभंग ही झाला, एवढ्या करितां तूं माझ्या कल्याणाचा मार्ग मला सांग. असें ऐकून विदुर भाषण करतो हे राजा, दुर्बल व साधनहीन- असून बळाढ्यानें दोष स्थापन ज्यावर केला आहे तो, कामी, ज्याचें धन चोरीस गेलें त्यास व तस्कर यांस निद्रा येत नाहीं. इतक्यांतून एखादा दोष तुला प्राप्त झाला आहे कीं काय अथवा परद्रव्य हरण करण्याची तुला इच्छा झाली आ हे काय? असें विदुराचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, या राजऋषी वंशाच्या ठायीं तूं एकच माझांस मान्य आहेस यास्तव कल्याण करणारें धर्म युक्त असें तुझें भाषण ऐकण्यास मी इच्छितो. असें ऐकून विदुर बोलतो हे धृ तराष्ट्रा, सर्वलक्षणानीं संपन्न जो राजा असतो तोच त्रैलोक्याचें ही राज्य कर तो असा योग्य युधिष्ठिर असल्या मुळें तोच राजा असावा ह्मणून सर्वलोक इच्छितात. तूं तर त्यास वनांत पाठविलास आणि तूं स्वतः राजलक्षणानें ही न असल्या मुळें सर्वांचा द्वेष्य आहेस व नेत्र नसल्या मुळें राज्यांशास योग्य ना हींस व तूं धर्मज्ञाता असून राज्य इच्छितोस? धर्मराज तुझे ठायीं गुरुत्व पाहू न दया, धर्म, सत्य, पराक्रम व क्रूरत्व नसल्या मुळें बहुत दुःखें सहन करीत अ सतां त्याचें ऐश्वर्य तूं दुर्योधन, शकुनी, कर्ण, दुःशासन यांच्या स्वाधीन करून क ल्याण होण्याची इच्छा करतोस हें कसें? तूं ज्यांच्या स्वाधीन झालास ते महा मूर्ख

आहेत. कारण पंडिताचीं जीं लक्षणें तीं यांचे ठायीं नाहींत, यास्तव तीं तुला सांगतों. ज्या पुरुषास आत्मज्ञान, शक्तीप्रमाणें उद्योग, वैराग्यास अनुसरून सहन शक्ति, आस्तिक्य बुद्धीस अनुसरून धर्मावर निष्ठा हीं पुरुषार्थापासून भ्रष्ट करीत नाहींत त्यास पंडित ह्मणावें. जो प्रशस्त कर्में करितो. निंदितांचें सेवन करीत नाहीं, ज्यास नास्तिकपणा नाहीं, जो वेदशास्त्रावर विश्वास ठेवितो तो, क्रोध, हर्ष, दर्प, दुसऱ्याचा अवमान, लज्या, आढ्यता, मानी, यांच्या योगानें जो पुरुषार्थापासून भ्रष्ट होत नाहीं त्यास पंडित ह्मणावें. ज्याचें कृत्य दुसऱ्यास कळत नाहीं, जें कृत्य आरंभिलें त्याची समाप्ति करितो, आणि आरंभिलेलें कृत्य समाप्त जाहल्यावर इतरांस विदित होतें त्यास पंडित ह्मणावें. शीत, उष्ण, भय, रति, संमृद्धि असंमृद्धि इतक्यांचा अवलंब (आश्रय) करून आपल्या कार्यास जो विघ्न होऊं देत नाहीं तो पंडित जाणावा. ज्याची संहारिणी बुद्धि असतां धर्मार्थाकडे तो लावितो आणि येथील विषयोपभोग मंद मंद मार्गानें सोडितो त्यास पंडित ह्मणावें. आपली जेवढी शक्ति तितकीच जो इच्छा करितो आणि शक्तीप्रमाणेंच कांहीं एक कार्य करण्यास जो उद्युक्त होतो, ज्याचे कर्मामध्यें कोणाचा अवमान होत नाहीं त्यास पंडित असें ह्मणावें. एकादी गोष्ट सांगितली असतां जो लौकर समजतो, जेथें आपल्यास संशय प्राप्त होईल तेथें आपल्या चित्ताचें समाधान करून घेतो, जाणोन एकादें कर्म करण्यास प्रसक्त होतो, श्रेष्ठ वस्तूची इच्छा करितो हीं सर्व पंडिताचीं लक्षणें होत. दुसऱ्यानें आपल्यास प्रार्थिल्या वांचून त्याचे कार्यांत जो मन घालीत नाहीं, आपल्यास दुर्लभ जी वस्तु त्याची जो इच्छा करीत नाहीं; गेलेल्या वस्तूचा शोक करीत नाहीं आणि, आपत्कालीं जो मोह पावत नाहीं त्यास पंडित ह्मणतात. जो कार्याचा पूर्वी निश्चय करून आरंभ करितो व आरंभिलेलें कार्य समाप्तीस नेतो, ज्याचा काळ कधींही अवंध्य होत नाहीं; जो मनास स्वाधीन करितो त्यास पंडित म्हणावें. श्रेष्ठ कर्मी आसक्त होतो आणि ज्या पासून ऐश्वर्य प्राप्त होईल अशीं कर्में करितो व आपल्या हिता करितां जो दुसऱ्याशीं स्पर्धा करीत नाहीं त्यास पंडित ह्मणावें. आपला सन्मान केला असतां ज्यास आनंद होत नाहीं, अवमान केला असतां ज्यास खेद होत नाहीं, गंगेचा ऱ्हद जसा अक्षोभ्य निरंतर राहतो त्या सारखी जो मनाची स्थिति

ठेवितो त्यास पंडित ह्मणावें. संपूर्ण भूतांचें जो तत्व जाणतो. सर्व कर्मांचा योग जाणतो. मनुष्याचा उपाय ज्यास माहीत आहे त्या नरास पंडित असें ह्मणावें. अकुंठित ज्याचें भाषण, चमत्कारिक चमत्कारिक उत्तम कथा जाणणारा, अभिज्ञ, मोठा तर्क जाणणारा, कामाविषयीं ज्यास स्फूर्ति होत्ये. ग्रंथोक्त भाषणाचें ज्यास शीघ्र ज्ञान होतें तो पंडित जाणावा. ज्याचें भाषण शास्त्राच्या अनुरोधी, ज्याची प्रज्ञा शास्त्रास अनुसरून असत्ये, मोठ्याची मर्यादा उल्लंघन करीत नाहीं त्यास पंडित असें ह्मणावें. हीं पंडिताचीं लक्षणें सांगितलीं. आतां मूर्खाचीं लक्षणें सांगतों. जाणें शास्त्राभ्यास केला नाहीं, निरंतर उद्धत वृत्ति ज्याची असते, दरिद्री असून ज्यास अभिमान आणि निंद्यकर्मानें अर्थाची इच्छा करणारा-त्यास मूर्ख असें ह्मणावें. आपल्या स्वार्थाचा विचार न करितां परार्थाविषयीं जो इच्छा करितो, जो आपल्या द्रव्याचा व्यय करून दुसऱ्याचें घेण्यास इच्छितो आणि आपले मित्राशीं जो कृत्रिमानें वागतो त्यास मूढ ह्मणावें. ज्याची इच्छा करण्यास योग्य नाहीं त्याची जो इच्छा करितो, व अवश्य जें इच्छित आहे त्या विषयीं इच्छा करीत नाहीं. आणि बलवंताशीं जो द्वेष करितो त्यास मूढ ह्मणावें. शत्रूशीं-जो मैत्री करितो. वास्तविक जो मित्र असून त्याच्याशीं जो द्वेष करितो. एकादे दुष्ट कर्मास जो आरंभ करितो, करावयाचीं कृत्यें तीं दुसऱ्याकडून जो करवितो, दुसऱ्याच्या कृत्याची उगीच जो चिकित्सा करितो आणि शीघ्र कर्तव्य जें कार्य त्यास बहुत काल जो लाविते, पितरांचें श्राद्ध व देवतांचें अर्चन जो करीत नाहीं. आपल्यास योग्य मित्र पाहिजे परंतु जगतांत तसा कोणी नाहीं असें जो ह्मणतो, बोलाविलें असतां दुसऱ्याच्या घरीं जातो, प्रश्न केल्या वांचून जो बहुत भाषण करितो, विश्वास ठेवण्यास जो अयोग्य त्याजवर विश्वास ठेवितो; ज्या दोषांचे योगें दुसऱ्यांची निंदा करितो व त्याचे दोषांचा आपणाशीं सीकार करितो व जो विनाकारण कोप करितो तो मूर्ख जाणावा. जो आपलें सामर्थ्य न जाणून धर्मार्थ रहित अलभ्य वस्तूची यत्ना वांचून जो इच्छा करितो त्यास मूढबुद्धि असें ह्मटलें आहे. जो शिक्षा करण्यास अयोग्य त्यास शिक्षा करतो. व एकांतीं राजस्त्रियां जवळ बसतो व दात्याचा आश्रय करितो त्यास मूढ चेतस ह्मणावें. जो बहुत अर्थ, विद्या, ऐश्वर्य संपादन करूनही उद्ध

तपणानें वागत नाहीं त्यास सर्व लोक पंडित असें ह्मणतात. जो आपण संपत्ति मिळवून आपणच उपभोग करितो तशीच वस्त्रें भूषणें आपणाच धारण करितो आणि आपले भृत्यजनाविषयीं जो कार्पण्य धारण करितो त्या सारखा नृशंस ह्मणजे घातुक दुसरा कोणी नाहीं. जो स्वतः आपण पापकर्म करून द्रव्य मिळवितो त्याचा भोग दुसरे इतर लोक घेतात त्यांत कर्ता मात्र दोषी होऊन उपभोग करणारे मुक्त होतात. या मूर्खा सारखा मूर्ख दुसरा कोणी नाहीं. धनुष्य धारण करणाऱ्याच्या धनुष्या पासून जर एक बाण सुटला तर एकाचा प्राण घेईल, किंवा नाहीं घेणार; परंतु बुद्धिमंताची बुद्धि भ्रष्ट झाली तर सकल राजासह वर्तमान राष्ट्राचा नाश करील. एका बुद्धीनें करणें किंवा न करणें या दोहोंचा निश्चय करावा. साम, दान, भेद, दंड या चार उपायानीं शत्रु, मित्र, उदासीन हे तीन वश करून घ्यावे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हीं पांच विषय देणारीं इंद्रियें जिंकोन काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, यांस शत्रु असें ओळखावें. स्त्री, द्यूत, हिंसा, मद्यपान, कठोर भाषण, लघु अपराधास मोठें शासन करणें, दुसऱ्याच्या गोष्टीचें खंडण करणें हीं सात व्यसनें टाकून सुखी व्हावें. विष एकाचा प्राण घेतें शस्त्र एकाचाच जीव घेतें परंतु राजाची मसलत फुटली असतां राष्ट्रासह वर्तमान राजाचा नाश करितें. यास्तव राजाची गुह्य गोष्ट बोलूं नये. एकट्यानेंच स्वादु भोजन करूं नये, एकट्यानेंच अर्थ घेण्याची इच्छा करूं नये. एकट्यानें मार्गामध्यें जाऊं नये, संपूर्ण निद्रिस्त असतां एकानें जागृत राहूं नये. हे राजा ज्यास दुसरी उपमा नाहीं असें एक सत्य आहे हाच स्वर्गाचा मार्ग होय. समुद्रांत तारण्यास जशी नौका तसा हा सत्य पदार्थ जाण. क्षमावान पुरुषास लोक दुर्बल ह्मणतात हा एकच त्यास दोष आहे. परंतु क्षमा हा दोष कोणी समजूं नये. क्षमाही मोठें बळच आहे. अशक्तास क्षमा हा मोठा गुण होय. सशक्त आहेत त्यांस क्षमा हें भूषण आहे क्षमेनेंच सर्व वश होऊन क्षमेनें सर्व कार्यसिद्धि होते. क्षमारूप ज्याचे हातीं शस्त्र आहे त्यास दुर्जन काय करील? अरे अतृणस्थलीं वह्निपात झाला तर त्या पासून कांहींहोत नाहीं. ज्यास क्षमा नाहीं तो पुरुष आपल्यास व दुसऱ्यास दोषयुक्त करतो. धर्मासारखें दुसरें श्रेयस्कर नाहीं. क्षमा ही एक उत्तम शांति आहे. विद्ये सारखी तृप्ति

नाहीं. अहिंसे सारखें सुखनाहीं. बिळामध्यें राहणाऱ्या जीवांस सर्प जसाग्र स्त करितो तशी ही भूमि शत्रूशीं विरोध न करणारा राजा व अप्रवासी संन्या सी या उभयतांस ग्रस्त करित्ये. जो पुरुष कठोर भाषण न कर्ता मृदु बोल तो आणि साधूंचें पूजन करितो हे दोघे पुरुष या लोकीं शोभतात. एकास्त्री नें ज्या पुरुषाची इच्छा केली तें पाहून दुसऱ्या स्त्रिया त्याच पुरुषाची इच्छा- करितात; तशीच एकानें एकाची पूजा केली म्हणजे दुसरे त्याचीच पूजा क रतात हे दोघे दुसऱ्यास विश्वास उत्पन्न करणारे आहेत. जो थोडें ही मिळ त नसतां मोठ्या लाभाची इच्छा करितो, द्रव्य संपादन करण्याची शक्ति नस त्यामुळें मिळत नाहीं म्हणून कोप करितो. हे दोघे तीक्ष्ण कंटका सारखे शरीराचें शोषण करणारे आहेत. गृहस्थ असून संसार संबंधि कांहीं उद्योग क रीत नाहीं, आणि संन्यासी गृहस्था सारखा उद्योग करितो. हे दोघे विपरीतक र्म करणारे या पृथ्वीवर शोभत नाहींत. राजा असून क्षमावान् आणि दरि द्री असून दाता हे दोघे पुरुष स्वर्गी निरंतर वास करितात. न्यायानें उपार्जित द्रव्याच्या दोन अमर्यादा आहेत. एक द्रव्याचें कुपात्रीं दान करणें अथवा सुपा त्रीं न देणें, धनवान असून कृपण असतो आणि दरिद्री असून तप करीत ना हीं या उभयतांच्या गळ्यांत पाषाण बांधून जळांत बुडवावे. योगाभ्यास क रणारा संन्याशी व रणांत शत्रु सन्मुख मरणारा क्षत्रिय हे उभयतां सूर्यमंडलभे द करणारे आहेत. युद्ध करणें हा शेवटचा उपाय, भेद करणें अथवा लांच दे णें हा मध्यम उपाय व साम करणें हा उत्तम उपाय वेदवेत्ते याणीं सांगितलेला आहे. हे राजा, या लोकीं उत्तम, अधम, मध्यम, असे तीन प्रकारचे पुरुष आ हेत त्यांत उत्तम मनुष्यांची योजना चांगले कामाकडे करावी. मध्यमाची यो जना मध्यम कामाकडे करावी. आणि अधम पुरुषाची योजना नीच कामाक डे करावी. हे राजा, भार्या, दास आणि सुत हे तीन निर्धन असें समजावें; कार ण हे तिघे ज्याणें पोषित आहेत तो हा त्याच्या द्रव्याचा अधिकारी होय. दुसऱ्या च्या द्रव्याचें हरण करणें, परदारेची इच्छा करणें आणि आपले इष्टमित्रांचा परित्याग करणें हे तीन दोष क्षय करणारे होत. काम, क्रोध, लोभ हे तीन न रकाचे द्वारभूत असून आत्म्याचे नाश करणारे होत यास्तव या तीन पदार्थी

चा त्याग करावा. देवांपासून वरप्रदान, राज्यप्राप्ति, पुत्रप्राप्ती या तीन लाभांसमान शत्रूला दुःखापासून मुक्त करणें हा एकच लाभ समजावा. जो आपली कोणी भक्ति करतो, आपला सेवक व जो आपल्यास शरण आला या तिघांचा आपल्यास विषम काल जरी आला तथापि परित्याग करूं नये. अल्पबुद्धि, आळशी, तसाच घूतासक्त व पानासक्त या चौघांसह वर्तमान राजानें कोणची मसलत करूं नये. हे राजा, तूं राज्यलक्ष्मीनें सुशोभित व गृहस्थ धर्मामध्यें रत आहेस यास्तव आपल्या ज्ञातीचा एक वृद्ध पुरुष, एक कुलीन, एक दरिद्रि सखा व अनपत्य भगिनी या चौघांचा आपले गृहीं संग्रह कर. हे राजा, सद्यःफल देणारे पदार्थ किती आहेत ह्मणोन पूर्वी इंद्रानें बृहस्पतीस प्रश्न केला असतां बृहस्पतीनें उत्तर दिलें कीं, देवतानीं इच्छिली गोष्ट, तपस्वीयाचें भाषण, विद्वानास नम्रता आणि पापकर्म करणाऱ्याचा नाश हीं चार कर्मे तात्काल फल देणारीं आहेत. हे राजा, अग्निहोत्र, मौन, अध्ययन, यज्ञ हीं चार कर्मे अभयदेणारीं आहेत; परंतु हींच जर लौकिकार्थ केलीं तर भय देतात. पिता, माता, अग्नि, आत्मा आणि गुरु हे पांच अग्नीच आहेत असें समजून त्यांची सेवा करावी. देव, पितर, मनुष्य भिक्षुक आणि अतिथि या पांचांचें पूजन केलें असतां केवल यशप्राप्ति होते. मित्र, शत्रु, मध्यस्थ, आपले पक्षाकडील तसेच आश्रित हे पांच राजा, तूं जेथें जेथें जाशील तेथें तेथें तुझ्या सन्निध येतील. जसे चर्माच्या भांड्यास छिद्र पडलें ह्मणजे जलाचा श्राव होऊन हळु हळू तें कमी होतें तशीं कर्णादिक पांच इंद्रियें मनुष्यास आहेत यांतून एक इंद्रिय जरी कमी जाहलें तथापि तितकीच बुद्धि न्यून होत जाते. यास्तव पंचेंद्रियांचें आवश्य रक्षण केलें पाहिजे. निद्रा, सुस्ति, क्रोध, भय, आलस्य, उशिरानें काम करणें हे सहा दोष द्रव्येच्छु पुरुषानें सोडले पाहिजेत. उपदेश न करणारा आचार्य, अध्ययन न करणारा ऋत्विज, प्रजेचें रक्षण न करणारा राजा, अप्रिय भाषण करणारी अशी भार्या यांचा त्याग करावा. आपल्यास प्रिय बोलणारी भार्या, आपले स्वाधीन राहणारा पुत्र, व द्रव्य मिळवून देणारी अशी विद्या. हीं सहा या जीवलोकीं सुख देणारीं आहेत. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, त्या सहा शरीरांत राहणारे शत्रूंस जो जिंकितो त्यास पाप किंवा अनर्थ हे कांहीं बाधा करीत नाहींत. असावधपणा असल्यास चोरांचें;

रोगी असल्यास चिकित्सकाचें, विषयी पुरुषा पासून व्यभिचारिणी स्त्रीचें, यजमाना पासून याजकाचें, लोक विवाद करूं लागले असतां राजाचें, मूर्खांच्या योगें पंडिताचें जीवन होतें. गाय, सेवा, कृषिकर्म, भार्या, विद्या, शूद्रसंगति यांची उपेक्षा एक मुहूर्त केली असतांहीं नष्ट होतात. कृतविद्य शिष्य, आचार्यांचा, विवाहित पुत्र मातेचा, निष्काम पुरुष स्त्रीचा, कार्य झालें ह्मणजे काम करून देणाराचा, नदी उतरून गेलेले पुरुष नावाड्याचा, निरोगी अतुर वैद्याचा अवमान करतात. हे राजा, निरोगी शरीर, अनृणि, अप्रवासि, साधूंची संगति, स्वानुकूल आपली जीविका, निर्भय ठिकाणीं स्थिति हीं सहा या जीवलोकीं सुखकारका आहेत. दुसऱ्याची ईर्षा करणारा, दयाळु, असंतुष्ट, क्रोधि, ज्याचे चित्तास निसशंका, दुसऱ्याचे भाग्यावर उपजीवन करणारा हे साहा नित्य दुःखी जाणावे. स्त्रिया, अक्ष, क्रीडा, मृगया, मद्यपान, कठोर भाषण, लघु अन्यायास मोठी शिक्षा, न्यायावांचून द्रव्य संपादन करणें हे सात दुर्गुण राजानें टाकावे. ब्राह्मणाशीं द्वेष व विरोध, ज्याचें द्रव्य ग्रहण करणें त्यांची हिंसा करणें, ज्यांचीनिंदा ऐकून संतोष पावणें त्यांची प्रशंसा केली असतां संतुष्ट न होणें, आपले ग्रहींकांहीं एक कार्य जाहलें असतां त्यास विसरणें व याचकासीं असूया करणें हे आठ दोष नाशाचे कारण आहेत एवढ्या करितां प्राज्ञ लोकानीं या दोषांचा त्याग करावा. मित्राची संगति, विपुल द्रव्यप्राप्ति, पुत्राचें आलिंगन, आपल्या गुणास योग्य अशी स्त्री, समयीं प्रियभाषण करणें, आपल्या कुलामध्यें श्रेष्ठपणा मिळविणें, इच्छित पदार्थाचा लाभ, सभे मध्यें सन्मान हे आठ पदार्थ हर्षास कारण आहेत. सुबुद्धि, उत्तम कुलांत जन्म, मनाचें दमन, शास्त्राध्ययन, पराक्रम, बहुत भाषण न करणें, यथा शक्ति दान, दुसऱ्यानें उपकार केलेले जाणणें हे आठ गुणं पुरुषास शोभवितात. शरीर हें एक कोणी गृह आहे त्या गृहास नेत्रांचीं दोन, नाकाचीं दोन, कानाचीं, दोन तोंडाचें एक, मलद्वाराचें एक, मूत्रद्वाराचें एक अशीं नऊ द्वारें आहेत. सत्व, रज, तम हे तीन ज्यास खांब आहेत, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हे पांच या गृहाचे साक्षी आहेत. या शरीराचा धनि जीवात्मा आंत वास करितो असें जें हें शरीर यास जो जाणतो तो मोठा पंडित होय. विषयांच्या आसक्तीनें गैर सावध, धातुदोषानें उन्मत्त, श्रांत, क्रोधी, बुभुक्षित, उ-

तावळा, लोभी, भित्रा, व कामातुर हे नऊ आपले धर्माचा व्यतिक्रम करून यांस वाईट किंवा चांगलें कांहीं कळत नाहीं. या विषयीं पूर्वींचा सुधन्वा आणि विरोचन यांचा संवाद झालेला तुला सांगतों. जो राजा काम, क्रोध यांचा त्याग करून सत्पात्रीं धनाचें दान करितो, जो उत्तम, मध्यम, कनिष्ठ हें तारतम्य जाणतो, जो शास्त्र जाणतो व जो लौकर कार्य करण्याची युक्ति जाणतो अशा पुरुषास लोक वंदितात. मनुष्याचें विश्वास धरण्या जोगें जो आचरण करितो, अपराधांचा निश्चय झाल्या वांचून दंड करीत नाहीं, दंड करणें तो अपराधाचें तारतम्य पाहूनच करितो, क्षमेस योग्य अशा ब्राह्मणादिकांच्या अपराधाची क्षमा करितो अशा पुरुषास लक्ष्मी निश्चयें करून प्राप्त होत्ये. दुर्बलाची अवज्ञा जो करित नाहीं, पूर्वीं युद्धाची सामोग्री सिद्ध करून नंतर युद्धास उद्यक्त होतो, जो बलवंताशीं वैर करीत नाहीं, आपला अनुकूल काल पाहून युद्धास उभा राहतो तो धैर्यवान् जाणावा. आपल्यास आपत्ति जरी प्राप्त जाहली तथापि व्यथा न पावतां सावधपणानें उद्योग करितो, समयीं दुःखही सोसतो त्यास मोठा धुरंधर ह्मणावा; त्याणें आपले शत्रु जिंकिले असें समजलें पाहिजे. जो व्यर्थ प्रवास, पातकी जनाचा सहवास, परदारेची इच्छा, दंभ, चौर्य, मर्मोद्घाटन, मद्यपान इतक्यांचा स्वीकार जो करीत नाहीं तो सदा सुखी जाणावा. जो क्रोधानें धर्म, काम, अर्थ यांचा आरंभ करीत नाहीं, कोणी प्रश्न केला असतां खरें सांगतो, थोडक्या करितां विवाद करीत नाहीं, दुसऱ्यानें आपला सत्कार जरी केला नाहीं तथापि कोप पावत नाहीं तो सुखी जाणावा. जो दुसऱ्याची असूया करीत नाहीं, दुसऱ्यावर दया करितो, दुर्बल असतां थोराशीं विरोध करण्यास इच्छित नाहीं आणि कोणी कांहीं जरी बोलला तथापि वादाचे भयानें क्षमाच करितो, तो पुरुष सर्व प्रशंसेस पात्र होतो. जो दुसऱ्यास उद्धट दिसण्या जोगे वेष, आपला पौरुषपणा पुढें करून दुसऱ्याचा तिरस्कार, जो दुसऱ्याशीं कधींही कटु भाषण करीत नाहीं अशा पुरुषाचें लोक निरंतर प्रियच करीत असतात. पूर्वीं शांत जाहलेलें वैर पुनः जो काढीत नाहीं, दर्प जो बाळगीत नाहीं, दुर्बल असतां कुकर्म करीत नाहीं अशा पुरुषास श्रेष्ठ ह्मणतात. आपल्यास सुख अथवा दुसऱ्यास दुःख जाहलें असतांही जो हर्षित होत नाहीं, एकदां दान केल्यावर त्याचा पश्चात्ताप मा-

नीत नाहीं त्या पुरुषास सत्पुरुष असें ह्मणतात. जो देशाचे आचार, समय व जातिधर्म जाणतो असा पुरुष जेथें जेथें जाईल तेथें तेथें त्यास मोठ्याचेंच आधिपत्य प्राप्त होईल. दंभ, मोह, मत्सर, पापकृत्य, राजद्वेष, पैशून्य, बहुतांशीं द्वेष, मत्त उन्मत्त, दुर्जयाशीं विवाद इतक्यांचा त्याग जो करतो तो प्रधानाचे पदवीस योग्य होतो. दान, होम, कुलदेवत, पूजन, मंगल कर्मे आणि लोकवाद प्रायश्चित्तें हीं ज्याचे हातून निरंतर घडतात त्याचा देवता मान ठेवतात. आपल्या समान जो असेल त्याशीं विवाहसंबंध सख्य व्यवहार व संभाषण करितो आणि गुणवान् पुरुषाचा सत्कार करितो, अशा पुरुषाचें स्तवन श्रेष्ठ लोकही करितात. आपल्या आश्रितांस वांटून आपण परिमित भोजन करितो, परिमित निद्रा करितो, अपरिमित काम करितो, शत्रूनीं याञ्चा केली असतां त्यांस दान करितो, अशा आत्मवान् पुरुषास अनर्थ कधींही प्राप्त होत नाहींत. कोणाची गोष्ट केली किंवा करणारहे दुसरे लोकांस ज्याचें कळत नाहीं, आपली मसलत फार गुप्त राहावी, बाहेर जाऊं नये, असा बंदोबस्त ठेवितो त्या पुरुषाचा अर्थ कधींही नष्ट होत नाहीं. जो पुरुष संपूर्णभूत मात्राचें कल्याण करावयाचा यत्न करितो, ज्याचे भाषणांत सत्यता आणि मार्दव आहे, अंतःकरणानें शुद्ध तो आपले जातींत अमोलिकमण्यासारखा शोभतो. आपले हातून एकादें वाईट कर्म घडलें तें दुसऱ्यास जरी समजलें नाहीं तथापि आपण लज्जित होतो तो सर्व लोकांमध्यें गौरव पावतो. जो प्रतापी असून ज्याचें अंतःकर्ण निर्मळ तो पुरुष तेजोमय सूर्यासारखा शोभतो. हे राजा, सुज्ञाचे धर्म असे आहेत यास्तव सांगतों ऐक. वनामध्यें शाप दग्ध झालेला जो पांडुराजा त्यापासून हे पांच पुत्र इंद्रासारखे पराक्रमी झाहले आहेत तूंच यांचें बाल्यावस्थेंत पालन करून विद्येंत शिक्षित केलेंस, यास्तव हे अंबिकेय, ते तुझीच आज्ञा परिपालन करूं इच्छितात. ह्मणोनि यांचें उचित राज्य त्यांस देऊन पुत्रांसह वर्तमान आनंद पाव. ह्मणजे देवापासून व मनुष्यांपासून तुला कोणतीही शंका प्राप्त होणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३८. अध्याय चवतीस — धृतराष्ट्र भाषण करितो हे विदुरा, जाग्रणानें माझे अंगाचा दाह झाला आहे, आतां मी पुढें काय करूं तें सांग! तूं धर्मार्थी

मध्यें कुशल आहेस. हे विदुरा, तूं धर्मराजाचें हितावह व कौरवांसश्रेयस्कर असेल तें सांगून आमचें संकटापासून रक्षणकर. पापाचा व्यवसाय जो करणारा त्याचें लक्ष्य पापाकडेसच असतें यास्तव धर्मराज्याचें मत काय आहे तें सांग. असा प्रश्न ऐकून विदुर बोलतो हे राजा, शुभ अथवा अशुभ, द्वेष्य अथवा प्रिय हीं ज्याचा पराभव न व्हावा असें आपण इच्छितो त्यास न विचारतां सांगावें. यास्तव कौरवांस श्रेयस्कर असें तुला सांगतो. मिथ्या उपायांनीं एकवेळ साध्य जरी कर्मे झालीं तथापी पुनः वाईट उपायांनीं साध्य करण्याविषयीं तिकडे मन घालूं नये. मार्गानें एकादी गोष्ट करीत असतां ती सिध्दीस न गेली तर खेद करूं नये. कोणत्याही कार्यास साहित्य किती लागतें याची सिध्दता केल्यावांचून त्या कार्यास एकाएकीं प्रवृत्त होऊं नये. आपली सिध्दता किती आहे, कामाचा अदमास किती आहे आणि आपल्यास करण्याची किती शक्ति आहे याचा निश्चय करून कार्यास आरंभ करावा. जो राजा आपली वृध्दि किंवा क्षय जाणत नाहीं, तसेंच आपलें भांडार गृह किती आहे हें त्यास ठाऊक नाहीं व आपला देश कसा आहे हें त्यास माहीत नाहीं तो राजा राज्यापासून भ्रष्ट होतो. जो राजा हें सर्व उचित किंवा अनुचित जाणतो आणि धर्मार्थाविषयीं युक्त असतो त्याचें राज्य चिरकाल चालतें. जरा उत्तम रूपाचा जसा नाश करते तसा हा अविनय, राजाधिकार प्राप्त झाला ह्मणोन जो नम्रता धारण करीत नाहीं त्याच्या श्रीचा नाश करतो. उत्तम भक्ष्यानें युक्त केलेला गळ यास पाहून लोभानें पुढें काय होईल यांचा विचार न करतां तें आमिष भक्षण करण्याकरितां मच्छ जसा ग्रास होऊन नाश पावतो तसा अविचारानें कर्म करणारा पुरुष लोभानें ग्रस्त झाल्यामुळें नष्ट होतो. यास्तव जें ग्रासण्यास योग्य असून परिणामीं हितावह असेल तेंच सुखइच्छिणारानें ग्रहण करावें. वृक्षाचीं अपक्क फळें जो तोडतो त्यास त्यापासून रसही न मिळतां बीजही नष्ट होतें. काळेंकरून परिपक्क आलेलें फूल जो ग्रहण करतो त्यास त्या फळाचा रस मिळून पुनः वृक्षउत्पन्न करण्यास बीज मिळतें.

जसा भ्रमर पुष्पाचें रक्षण करून त्यांतील मध मात्र भक्षण करतो तसा रा जानें प्रजेस पीडा न करितां तिच्यापासून अर्थ मात्र ग्रहण करावा. माळी झाडाचीं फळें.फुलें मात्र घेऊन वृक्षाचे मुळांस जसा तो दुःख देत नाहीं त- सें राजानें प्रजेस दुःख न देतां युक्तीनें द्रव्य साध्य करावें. हें कर्म केल्यानें काय होईल अथवा न केल्यानें काय होईल असा विचार करून पुरुषा नें त्या कर्मास प्रवृत्त व्हावें. उद्योग आरंभिल्यावांचून एकादे वेळेस आ- पली कार्य सिध्दी होते. एकादे वेळेस उद्योग आरंभिला असतां होत नाहीं, तेथें उद्योग व दैव या कोणासच प्राधान्य ह्मणतां येत नाहीं. ज्या- चा प्रसाद अथवा कोप झाला असतां निष्फल होतो, अशा राजाची प्र- जा जशा स्त्रिया षंढ पतीचें सेवन करीत नाहींत तशी याचें सेवन करीत नाहींत. कितीएक गोष्टी अशा आहेत कीं, स्वल्प उपायांनीं साध्य होऊन मो- ठीं फळें देतात तर अशा गोष्टींस लौकर उद्युक्त व्हावें, दीर्घ काल घालवूं न- ये. दीर्घ काल घालविला असतां विघ्नें येतात. जो राजा आपले प्रजेवर स- रळ दृष्टीनें पाहातो त्या राजाची प्रजा त्यास अनुरक्त असते. एकादा वृक्ष सुपुष्पित असतां त्यास फळें नसतात. एकादा वृक्ष फळांनीं युक्त असतां त्याचीं फळें भक्षणास प्राप्त होत नाहींत. एकादा वृक्ष अपक्क असतां पक्का सारखा दिसतो तशा मनुष्याच्या वृत्ति आहेत. चक्षु, मन, वाणी, कर्म या चा- र प्रकारांनीं लोकांवर जो उपकार करतो त्याजवर लोक प्रसन्न राहा- तात. व्याधास पाहून मृग जसे त्रस्त होतात तसे ज्या पुरुषास पाहिलें अस- तां त्रास येतो त्या पुरुषास समुद्रवलयांकित पृथ्वी जरी प्राप्त झाली त- थापि ती त्याची नष्ट होते. वायूच्या योगें अभ्र जसें नष्ट होतें तसें अनी- तीनें चालणारा जो राजा त्यास पितामहसंपादित जें राज्य तें त्याचें न- ष्ट होतें. जो राजा साधूनें आचरित धर्माप्रमाणें आचरण करतो तो द्रव्या नें युक्त होऊन त्याचें ऐश्वर्य वृध्दि पावतें. जो राजा आपला धर्म टाकून अधर्मास प्रवृत्त होतो त्यास पृथ्वी बहुत फल देत नाहीं. जो राजा परराष्ट्र नाशाविषयीं यत्न करतो तोच यत्न त्यानें स्वराष्ट्ररक्षणाविषयीं करावा. धर्मानें राज्य मिळवावें व धर्मकर्मानें त्याचें परिपालन करावें ह्मणजे

धर्ममूलश्री राजास प्राप्त होऊन कधींही हीन होत नाहीं. मृत्तिकेपासून कांचन जसें घ्यावें तसें उन्मत्त, बाल यांनीं जल्पना केली असतां त्यांतील सारमात्र घ्यावें. जसा शीलवृत्ति ब्राह्मण कणसें वेंचतो तसें पुरुषांनीं जे उत्तम भाषण करणारे त्यांच्या भाषणाचा सार घ्यावा. गाईस घ्राणानें पदार्थाचें ज्ञान होतें, वेदाध्ययनानें ब्राह्मणास, दूतांपासून राजास व इतरांस चक्षूनें ज्ञान होतें. जी गाय फारबानें दूध देत नाहीं ती बहुत क्लेश पावते. जी सुखानें दूध देते ती सुखच पावते. तप्त केल्यावांचून जे स्वयेंच नम्र आहेत त्यांस कोणीं तप्त करीत नाहीं. दारु ह्मणजे काष्ठ स्वयेंच नम्र आहे ह्मणून त्यास तापविण्यास कोणीं उद्युक्त होत नाहीं. यास्तव तुह्मीं पांडवांशीं नम्र असावें, कारण ते बलवान आहेत. पशूंस पर्जन्याचें, राजास मंत्र्याचें, स्त्रियांस पतीचें व ब्राह्मणास वेदाचें बल आहे. सत्यानें धर्म राहातो, अभ्यासानें विद्या राहाते, आंगास उटणें लाविल्यानें रूप, उत्तम स्वभावानें कुल, निरंतर मोजल्यानें धान्य, तसेंच वारंवार फिरविल्यानें अश्व, निरंतर पाहिल्यानें गाई, स्वल्प मोल्याचें वस्त्र नेसल्यानें स्त्रिया इत्यादिकांचें रक्षण होतें. उत्तमाचे कुलांत उत्पन्न होऊन त्याचें कर्म चांगलें नाहीं तर त्यास मोठा ह्मणूंनये. चांडालाचे कुलांत जन्म धरून त्याचा स्वभाव व कर्म चांगलें आहे तर तोच मोठा समजावा. दुसऱ्याचें वित्त, रूप, वीर्य, सुख, सौभाग्य, सत्कार, कुलाची थोरवी यांविषयीं जो ईर्षा राखतो त्यास अनंत व्याधी होतात. जें न करावयाचें कर्म त्यास भितो, जें करावयाचें तें न केलें ह्मणून भितो व कांहींएक कार्य करण्याचा विचार करीत असतां तो पूर्ण होण्याचे पूर्वीच लोकांस कळेल ह्मणून भितो. असा सर्वत्र भय पावणारा पुरुष त्याणें जें कर्तव्य तें सावधगिरीनें केलें पाहिजे. ज्याच्यायोगानें मद प्राप्त होईल त्याचा त्याग करावा. विद्या, धन, आप्तजन यांची सात्यता गर्विष्ट मनुष्यास होतांच तो उध्दत होतो, आणि हेच पदार्थ सज्जनास मिळाले असतां तो अधिक नम्र होतो. कांहींएक कार्यामुळें सज्जनानें दुर्जनाचा सत्कार केला असतां तो दुर्जन आपल्यास उत्तम ह्मणवीत असतो; परंतु आ-

पला दुर्जनपणासर्व लोकांस विदीत आहे हें त्याचे ध्यानांत राहात नाहीं. आत्मस्वरूप जाणणारा, साधु, असाधू यांस साधूच गति; परंतु साधूस असाधू गति नव्हे. चांगलें निर्मल वस्त्र नेसणाऱ्यानें सभा जिंकिली ह्मणून समजावें, गोरस ज्याचे घरीं विपुल आहे त्याणें सर्व स्वादु पदार्थ भक्षणाची आशा जिंकिली, यानावर बसून जाणाऱ्यानें मार्ग जिंकिला, उत्तम शीलवान पुरुषानें सर्व जिंकिलें. यास्तव पुरुषाचा स्वभाव चांगला असावा ह्मणजे या लोकीं त्यास कांहीं कमी नाहीं. नीच स्वभाव ज्याचा वाईट असेल तर त्यास धन अथवा बंधु असून काय उपयोग आहे. त्याचें वांचणेंही केवळ निरर्थक होय. त्याचें जें असेल तें सर्व नाशाप्रत जाणार. राजादिकांचे भोजनास मांस हें मुख्य आहे, मध्यमाचे भोजनांत गोरस मुख्य आहे. दरिद्याचे भोजनांत तैल हें मुख्य आहे. गरीब हे मिष्टान्नच भक्षण करतात, आणि क्षुधा स्वाद उत्पन्न करते; पण श्रीमंतास क्षुधा स्वाद उत्पन्न करीत नाहीं. हे राजा, फार करून असें आहे कीं, श्रीमंतास भोजनाची शक्ति नाहीं. दरिद्यानें काष्ठें जरी भक्षण केलीं तरी तीं त्यास पचतात. निकृष्ट लोकांस आपलें उदर भरण कसें होईल ह्मणून भय आहे. ज्यास उदर भरण्याची काळजी नाहीं ते मध्यम त्यांस मरण्याची मात्र भीति. उत्तम लोक आहेत ते आपले अवमानास भितात. सुरापानादिकेंकरून जो उन्मत्त झाला तो कांहीं काळानें सावध होतो; परंतु ऐश्वर्यमदानें जो उन्मत्त झाला तो दरिद्री झाल्यावांचून सावध होत नाहीं. ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकिलीं नाहींत त्याच्या आचरणानेंच लोकांस पीडा होते व त्यासही पीडा होते. सहज आत्म्याचें कर्षण करणारीं पांच इंद्रियें याणीं जो जिंकिला त्याच्या आपत्ति शुक्लपक्षींच्या चंद्रासारख्या वृध्दीस पावतात. मन जिंकिल्यावांचून जो इतर इंद्रियें जिंकण्यास इच्छितो त्यास इंद्रियेंच कामक्रोध वैऱ्यांच्या हातीं देतात. यास्तव प्रथम मन जिंकावें, नंतर इतर इंद्रियें जिंकिलीं असतां त्याचें करणें कांहीं व्यर्थ होत नाहीं. यास्तव जो इंद्रियांस वश करणारा. —

आत्म्यास जिंकणारा, विचार पूर्वक करणारा आणि सर्व कार्याविषयीं जो धीर त्याचें सेवन लक्ष्मी करत्ये. हे राजा पुरुषाचें शरीर हा कोणी एक रथ आहे. मन हा सारथी व इंद्रियें हे ज्या रथाचे अश्व आहेत, ते अश्व चांगले सुशिक्षित असून सारथ्याचे स्वाधीन जर असतील तर रथारूढ आत्मा अत्यंत सुख पावेल. यास्तव इंद्रियरूप अश्व जर दुसऱ्याचे स्वाधीन झाले तर जसे अशिक्षित अश्व मार्गांत सारथ्यास दुःख देतात तसे हे अश्व मनास दुःख देणारे होत. जो कोणी मनुष्य अनर्थ असतां अर्थच आहे असें समजतो आणि अर्थ असतां अनर्थास पाहातो आणि दुःख असतां सुखच आहे असें समजतो तो इंद्रियांस न जिंकणारा असा मूर्ख समजावा. धर्मार्थाचा परित्याग करून जो कोणी केवळ इंद्रियांस वश झाला त्याची श्री, प्राण, धन, स्त्रिया इत्यादि ऐश्वर्य लवकरच नष्ट झालें ह्मणून समजावें. जो विषयाचा धनी होतो तो इंद्रियांचा धनी होत नाहीं. इंद्रियें स्वाधीन नाहींत ह्मणून ऐश्वर्यापासून भ्रष्ट होतो. मन स्वाधीन असेल तर तें मित्ररूप होतें आणि स्वाधीन नसेल तर तेंच शत्रुरूप होतें. आपल्या बुध्दीनें जीव स्वरूपाचा विचार करावा. त्याविषयींचा उपाय बुध्दि आणि इंद्रियें यांचा निग्रह करणें हाच होय. ज्याणें आपल्या बुध्दीचा जय केला तोच त्याचा पुरुषार्थ, बुध्दि जय न केला तर तोच त्याचा रिपु जाणावा. जसे दोन मत्स्य जाळ्यांत सांपडले असतां ते परस्पर जातिस्वभावानें शत्रु असूनही जाळें तोडण्याकरितां मित्रत्व पावून परस्पर हितकारी होतात तशी बुध्दि चिदात्म्यास संसारांत घालित्ये. यामुळें शत्रु असताही मोह नाशार्थ ती त्याचें मित्रत्व पावत्ये. कामक्रोधाचें आवरण करणारे जे ज्ञानी त्यांचा ते कामक्रोध नाश करितात. जो राजा आपले धर्मार्थ संरक्षण करून युध्दसामग्री तयार ठेविलो तो राजा सुखवृध्दीतें पावतो. जो आपले मनोमय पांच इंद्रियरूप शत्रु न जिंकून बाहेरील शत्रु जिंकावयास इच्छितो त्याचे आंतील शत्रु वृध्दि पावून त्याचा नाश करितात. इंद्रियांचा पराजय केल्यावांचून जे राजे राज्य करूं इच्छितात ते स्वकर्मानें बध्द झालेले महा संकटांत पडतात. रावणादिकांनी आ-

पल्या इंद्रियांचा पराजय केला नाहीं ह्मणून विव्हल होऊन सीताहरणादिक कर्मे केल्यामुळें ते ऐश्वर्यासहवर्तमान प्राणास मुकले. पापकर्म करणाराची संगति धरिली असतां आपणही त्या पाप्यास मान होऊन नष्ट होतों. जशी शुष्कलांकडाबरोबर ओलीं लांकडेंही जळतात तसा पापकर्म करणाऱ्या पुरुषाच्या संगतीनें सुजन नष्ट होतो. यास्तव पाप्याशीं स्नेह करूं नये. जो मोहानें पंचेंद्रियांचा विषयापासून निग्रह करीत नाहीं त्यास आपत्ति प्राप्त होते. अनुमान करणें, आर्जव, शुध्दता, संतोष, प्रियभाषण, इंद्रियनिग्रह, सत्य, स्थिरता हे आठ गुण दुरात्म्यापाशीं राहात नाहींत. आत्मज्ञान, स्थीरत्व, सुखदुःखसहन करणें, धर्माच्याठायीं निरंतर स्थीति, असंबध्दरहित भाषणापासून वाणीचें संरक्षण हे गुण वाईट कर्म करणाऱ्यापाशीं राहात नाहींत. रुक्षभाषण व निंदायुक्त भाषणाच्यायोगें दुष्ट मोठ्याची निंदा करितात हें पाप निंदा करणाऱ्यास लागतें आणि क्षमा करणारा तर पापमुक्त होतो. हिंसा हें असाधूचें, दंड करणें राजाचें, पतिसुश्रुषा हें स्त्रियांचें व क्षमा करणें हें गुणवानाचें बल होय. हे राजा, वाणीचा निश्चय करून बोलणें हें तर कर्म कठीण आहे. कदाचित् बहुत भाषण केलें तर त्यामध्यें चित्रविचित्र अर्थांनीं युक्त असें भाषण करणें कठीण आहे. भाषणांत सुभाषित वाणी कल्याणकारक आणि दुर्भाषित वाणी अनर्थकारक होते. सायकांनीं विध्द केलेलें, अथवा परशूनीं तोडलेलें वन पुनः पूर्ववत् चांगलें होतें, परंतु वाक्बाणांनीं क्षत केलेलें कधींही चांगलें होत नाहीं. कर्णिकनाराच बाण शरिरास लागले तर ते शरिरांतून उपटून काढावयास सांपडतात, परंतु वाक्बाण शरिरास झोंबला असतां कधींही काढावयास येत नाहीं. वदनापासून उत्पन्न झालेले जे वाक्बाण ते रात्रंदिवस मर्माचा भेद करणारे पुरुषास चैन पडूं देत नाहींत. यास्तव दुसऱ्यास वाक्बाणेंकरून प्राज्ञ आहेत ते पीडा करीत नाहींत. ज्याचा नाश कर्तव्य असेल त्याची बुध्दि ईश्वर हरण करतो ती बुध्दि नष्ट झाली ह्मणजे नीच कर्में त्याचे हातून घडतात. पुढें स्वार्थापासून नष्ट होतो. आपला विनाशकाल आला ह्मणजे बुध्दि

विपरीत होते आणि अनीतीनीती सारखी दिसून कर्म करण्यास प्रसक्त झाला असतां त्या योगें नष्ट होतो. हे धृतराष्ट्रा, तुझ्या पुत्रांचा व पांडवांचा विरोध असल्यामुळें पुत्रांच्या संसर्गामुळें तुझी बुध्दि भ्रष्ट होऊन तूं पांडवांस कांहींच जाणत नाहींस. हे राजा सर्व लक्षणसंपन्न त्रैलोक्याचेंही राज्य करण्यास समर्थ जो युधिष्ठिर तुझा शिष्य तेजआणि प्रज्ञा.इहींकरून युक्त,धर्मार्थतत्व जाणणारा तो पृथ्वीचें शासन करो अशी तुझी बुध्दि व्हावी ह्मणून मी इच्छितों. पाहा बरें युधिष्ठिर किती महान आहे! तो धर्मपालन करणारांत श्रेष्ठ आहे व दयाळू असून क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त होत नाहीं. तुझे गौरवास्तव आजपर्यंत त्यांनीं बहुत दुःखें सोसलीं. आतां या राज्याचा अधिकारी युधिष्ठिर होवो हें युक्त आहे.

३५. अध्याय पसतीस – धृतराष्ट्र भाषण करतो. हे विदुरा, तुझें धर्मार्थसहित विचित्रभाषण ऐकून माझी तृप्ति होत नाहीं; यास्तव आणखी कांहीं नीति मला सांग. असा प्रश्न ऐकून विदुर बोलतो हे राजा, सर्व तीर्थांचेठायीं स्नान करणें, अथवा सर्व प्राणी मात्राचेठायीं समदृष्टि ठेवणें हीं दोन्हीं समान पुण्यें आहेत खरीं परंतु या उभयतांमध्यें प्राणी मात्रावर समदृष्टि ठेवणें हें अधिक आहे. यास्तव आपले पुत्र व पांडव यांवर समान दृष्टि ठेव ह्मणजे इहलोकीं तुझी कीर्ति वाढून मृत झाल्यावर तूं स्वर्गीं वास करशील. जों कालपर्यंत पुरुषाची कीर्ति या लोकीं आहे तोपर्यंत त्यापुरुषास स्वर्गवास आहे. याविषयीं केशनी नामक कन्येकरितां सुधन्व्यांचा व विरोचनाचा संवाद रूप इतिहास सांगतो. सौंदर्यानें अप्रतिम अशी केशनीनामक कोणीएक राजाची कन्या उत्तम पति मिळण्याची इच्छा करीत बसली होती. यास्तव तिच्या पित्यानें स्वयंवर आरंभिला असतां प्रल्हादपुत्र विरोचन नामक आपणास केशनी भार्या मिळावी या उद्देशानें तेथें आला तों केशनी बोलते हे विरोचना, ब्राह्मण श्रेष्ठ अथवा दैत्य श्रेष्ठ? मला वाटतें कीं, ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. यास्तव सुधन्वानामक ब्राह्मण. राजासनीं बसे-

ण्यास कां योग्य नाहीं? तुह्मींच कां बसतां? विरोचन ह्मणतो, विश्वस्रष्टा जो प्रजापती यापासून आह्मीं झालों, यास्तव आह्मी सर्वांहून श्रेष्ठ. आ- ह्मांपुढें देव ब्राह्मण हे काय पदार्थ. केशिनी बोलत्ये याची परीक्षा येथें [illegible] प्रातःकाळीं अंगिराचा पुत्र सुधन्वा येणार आहे, तो- [illegible] बोलतो. तूं [illegible]

ह्मणतेस त्याप्रमाणें मी येथें राहातों. उदईक प्रातःकाळीं सुधन्व्या- ची व माझी गांठ पडेल. असें विरोचन बोलल्यावर दुसरे दिवशीं सूर्योदय होतांच सुधन्वा केशनीचे घरीं आला. विरोचनही तेथेंच होता. सुधन्व्याचें केशनीनें स्वागत करून सत्कारपूर्वक पूजा करून बसावयास आसन दिलें. त्याकालीं विरोचन आपलें महत्व दाखवि- ण्याकरितां बोलतो. हे ब्राह्मणा, माझें सुवर्ण आसन आहे यावर मा- झे बरोबर बैस. सुधन्वा बोलतो हे प्रन्हादपुत्रा तें आसन तुझें तुला- च असूं दे. एकासनीं तूं व मी बसण्यास योग्य नाहीं. विरोचन बोल- तो हे ब्राह्मणा, तुह्मांस दर्भ इत्यादि आसनावर बसण्याची योग्यता. सुवर्ण आसनाची योग्यताच तुह्मांस नाहीं. ह्मणून माझे आसनीं ब- सत नाहींस हें मीं जाणलें. सुधन्वा बालतो अरे तुझा पिता प्रन्हाद मला सुवर्ण आसनीं बसवून आपण खालीं उभा राहात होता हें तूं बाल असतां पाहिलें नाहींस काय? इतकें सुधन्व्याचें भाषण ऐकून विरोचन बोलतो. बरेंतर तुमच्या आमच्या महत्वाविषयीं कोणास प्र- श्न करूं. आणि प्रश्नांत जर मी हरलों तर माझे घरीं सुवर्ण, गाई, अश्व इत्यादि सर्व द्रव्य मी तुला देईन. तूं हरलास तर तुझें सर्व द्रव्य मला द्यावें. सुधन्वा बोलतो हे विरोचना, हा पण तूंच कर आमची यो ग्यता नाहीं. पाहिजे तर प्राणघात करण्याचा पण करून कोणीं मध्य- स्थास प्रश्न करूं. विरोचन बोलतो हे सुधन्व्या आह्मी श्रेष्ठ आहोंत तेव्हां प्राणाचा पण करून कोणास मध्यस्थ रितीनें प्रश्न करावा? सु- धन्वा बोलतो हे प्रन्हादपुत्रा, प्राणाचा पण करून तुझ्या पित्यासच ह्मा प्रश्न करूं. तो जें सांगेल तें उभयतांनीं ऐकावें. प्रन्हाद केवळ पुत्रा

रितां अनृत बोलणार नाहीं. याप्रमाणें उभयतांचें भाषण झाल्यावर ते क्रोधयुक्त होऊन प्राणत्यागाचा पण करून प्रल्हादाच्या घरीं आले. ते सर्पासारखे क्रुध्द झालेले पाहून प्रल्हाद बोलतो हे विरोचना, तुह्मी उभय तां संचार करतानां मी कधीं पाहिले नाहीं. आतां बरोबर येण्याचें काय कारण आहे? इतकें तुमचें सख्य कां झालें तें सांगा. विरोचन बोलतो. सुधन्व्याचें माझें सख्य नाहीं. आह्मी प्राणाचा पण केला आहे, तस्मात् आह्मी प्रश्न करतों त्याचें उत्तर खरें सांग. इतकें विरोचनाचें भाषण ऐकून प्रल्हाद बोलतो, हे ब्राह्मणा तूं अर्चन करण्यास योग्य आहेस यास्तव तुला मधुपर्काकरितां चांगली धेनु देतों. सुधन्वा बोलतो हे प्रल्हादा, मधुपर्क उदक मी मार्गांतच सोडलें आहे. माझा प्रश्न आहे त्याचें खरें उत्तर दे ह्मणजे मी सर्व सत्कार पावलों. हा माझा प्रश्न ऐक. ब्राह्मण श्रेष्ठ अथवा विरोचन श्रेष्ठ आहे याचें उत्तर खरें सांग. असा प्रश्न ऐकून प्रल्हाद बोलतो. हा माझा पुत्र तूं साक्षात् ब्राह्मण, तुह्मी चार स्थळ होऊन मला प्रश्न करतां तेव्हां याचें उत्तर माझ्यानें कसें देववेल. एक पुत्र व एक ब्राह्मण आहे यास्तव कोणासारखें बोलावें, हा संशय आहे. सुधन्वा बोलतो जर विरोचन तुझा पुत्र आहे तर ममतें करतां एकादी गाय दे, अथवा देणें असेल तें दे; परंतु उभयतां विद्यमान असतां खरें असेल तें सांग. कारण तूं बुध्दिमान आहेस. असें सुधन्व्याचें भाषण ऐकून प्रल्हाद बोलतो. हे ब्राह्मणा, कोणीं प्रश्न केला असतां सत्य अथवा असत्याचें कांहींच उत्तर दिलें नाहीं तर त्यास कांहीं दोष लागून तो कांहीं दुःख पावेल काय? असें ऐकून सुधन्वा बोलतो. एके पुरुषास दोन स्त्रिया असतां तो आवडते स्त्रीसह वर्तमान रात्रीं सुख पावतो त्याकालीं दुसरे स्त्रीस जें दुःख होतें तें दुःख अनृत बोलणारास प्राप्त होतें. अथवा, अक्षद्यूतांत जो पराजित झाला व त्यास जें दुःख होतें तें अनृत वाद्यास प्राप्त होतें. मार्गांत फिरतानां क्षुधा लागली आहे इतक्यांत शत्रूंनीं गांठलें असतां त्यास जें दुःख होतें तें अनृत साक्षी देणारास होतें. पशूंकरतां अनृत भाषण केलें असतां पूर्वींचे पांच, गाईकरतां अनृत भाषण

केलें असतां दाहा, अश्वाकरितां अनृत भाषण केलें असतां शंभर, मनुष्याकरितां अनृतभाषण केलें असतां सहस्त्र पुरुष नरकांत पडतात. सुवर्णाकरितां अनृत भाषण केलें असतां पूर्वीं झालेले व पुढें होणारे पुरुष नरकीं जातात. भूमीकर्तां अनृत भाषण केलें असतां सर्वस्व नष्ट होतें. तस्मात् हे प्रल्हादा, भूमितुल्य जी केशिनी तिच्याकरितां तूं अनृत बोलूं नको. असें ऐकून प्रल्हाद बोलतो. हे विरोचना, माझ्यापेक्षां व तुझे मातेपेक्षां सुधन्व्याचा पिता अंगिरा व माता हीं श्रेष्ठ आहेत आणि तुझ्या-
२८ पेक्षां सुधन्वा श्रेष्ठ आहे. तस्मात् सुधन्व्यानें तुला जिंकिलें यांत संशय नाहीं. असें विरोचनाप्रत सांगून सुधन्व्यास बोलतो, तूं मला हा पुत्र दान कर. नृतन तूंच दिल्हास असें मी मानीन. असें प्रल्हादाचें भाषण ऐकून सुधन्वा बोलतो. हे प्रल्हादा, तूं पुत्रलोभास्तव अनृत भाषण केलें नाहीं स तेणेंकरून मी फार संतोषी झालों. आतां तुला हा पुत्र अर्पण करितों. ग्रहण कर. हे प्रल्हादा, आतां केशिनी नामक कन्या याची भार्या होण्यास माझ्यासन्निध विरोचन वधूनें पादप्रक्षालन करो ह्मणजे केशिनीनामक याची भार्या होईल. असा सुधन्व्याचा व विरोचनाचा प्राचीन संवाद तुला मीं निवेदन केला. तस्मात् हे राजा, पुत्रास भूमिप्राप्तीकरितां अनृत भाषण करून सुत अमात्य यांसहवर्तमान नाश पावूं नको ही माझी प्रार्थना ऐक. अरे गोपाल जसे हस्तांत दंड धारण करून गाईंचें रक्षण करतात तसें मनुष्याचें रक्षण देव करीत नाहींत. ज्याचें संरक्षण करा- अशी ईश्वरास इच्छा उत्पन्न झाली ह्मणजे तो त्यास उत्तम बुद्धि देऊ- रक्षितो. जसंजसें आपलें मन आपले कल्याणाकडे न्यावें तसतसे त्याचे अर्थ सिध्द होतात. दुष्टकर्म करणाऱ्या मनुष्याचें रक्षण वेद ही करीत नाहींत. जसे पक्ष्यांस पंख उत्पन्न झाले ह्मणजे ते कोठ्याचा त्याग करून उडून जातात. तसे वेद दुष्टपुरुषाचा त्याग करून निघून जातात. राजा. मद्यपान, कलह, बहुतांशीं वैर, भार्यापतीमध्यें कलह, राजाशीं द्वेष, स्त्रीपुरुषांत वैर आणणें आणि कुमार्गानें वागणें हीं सर्वथा वर्ज्य करावीं. सामुद्रिक जाणणारी, मापांत लबाडी करणारा वणिज,

फांसे टाकून लोकांस शकुनादि सांगून फसविणारा, अथवा जुगारी, पोटभरू वैद्य हे चार व शत्रु, मित्र, तसेंच वेश्या, सेवक, व्यभिचारी, किंवा कैफी यांची साक्षि उपयोगी नाहीं. दुसऱ्याचें गृह दग्ध करितो तो, विष घालणारा, आपल्या स्त्रीनें जार कर्म करून पुत्र झाला असतां त्या पुत्रापासून उपजीविकेची इच्छा करणारा, सोमविक्रय करणारा, बाणादि शस्त्रें करणारा, दुसऱ्याचे दोष लोकांस कथन करणारा, मित्रद्रोही, परस्त्रीशीं गमन करणारा, भ्रूणहत्याकरणारा, गुरुपत्नीकडे जाणारा, मदिरापान करणारा, ओषधी उपचारानें गर्भाचें पतन करविणारा, दुःखितास दुःख देणारा, नास्तिक, वेदनिंदक, राजकीयवृत्ति बळेंकरून वणिज्यापासून धान्य ग्रहण करणारा स्वान, जो संस्कारहीन, जमीन नांगरणारा, समर्थ असून शरणागताचें रक्षण न करणारा, हे सर्व ब्रह्महत्या करणारासमान समजावे. अंधःकारांत दीपानें वस्तुज्ञान होतें, सदाचरणानें धर्माचें ज्ञान होतें, आपले सदाचारानें साधूचें ज्ञान होतें, भयकाळीं शूराचें ज्ञान होतें, दुर्भिक्ष्यावस्थेंत धैर्य किती आहे याचें ज्ञान होतें, संकटकाळीं मित्र किंवा शत्रु यांचें ज्ञान होतें. वृध्दपण रूपाचा, आशा धैर्याचा, मृत्यु प्राणाचा, असूया धर्माचरणाचा, क्रोध लक्ष्मीचा, नीचसेवा उत्तम स्वभावाचा, काम लज्जेचा, अभिमान सर्वांचा याप्रमाणें हे सर्व नाश करितात. लक्ष्मी सत्कर्मानें लब्ध होते आणि प्रौढपणानें वृध्दि पावते. त्वरित कार्य करण्यानें ती विस्तार पावते व नियमानें स्थीर होते. हे तात, ज्या पुरुषाचा राजा सत्कार करतो त्या पुरुषास प्रज्ञादिक आठ गुण बलात्कारानें मोठी शोभा देववितात. यज्ञ, दान, वेदाध्ययन आणि तप हीं चार हे राजा, संतास अनुसरून असतात. दम, सत्य, आर्जव, अनृशंस्य हीं चार सत्पुरुषांसही सिध्द होण्यास यत्न लागतो. अध्ययन, दान, तप, सत्य, क्षमा, दया, अलोभपणा हे धर्माचे आठ मार्ग आहेत. यांत पूर्वींचे चोहोंचें लोक दंभाकरितांही सेवन करितात; उत्तर चार आहेत ते सत्पुरुषांचेठायीं असतात. ज्या सभेंत वृध्द नाहींत ती सभाच नव्हे. व जे धर्म सांगत नाहींत ते वृध्द

नव्हेत. ज्यांत सत्यबा नाहीं तो धर्मच नव्हे. ज्यांत कपट आहे तें सत्य च नव्हे. सत्यरूप विनय, अध्ययन, देवतांची उपासना, कुलिनता, उत्तमस्वभाव, बल, धन, शौर्ययुक्त भाषण, हे गुण स्वर्ग देणारे आहेत. पापकर्म करणारा पापी असा प्रसिध्द होऊन पापाचें फल भोगतो. पुण्य करणारा पुण्य कीर्ति पावून पुण्य फल भोगतो. यास्तव पाप कर्म करण्यास कधींही उद्युक्त होऊं नये. पाप प्रज्ञेचा नाश करणारें आहे. प्रज्ञा नष्ट झाली ह्मणजे पापच निरंतर करावें असें वाटतें. यास्तव वारंवार पुण्यच करीत असलें पाहिजे, ह्मणजे प्रज्ञेची वृध्दि होते. जो वृध्द, प्राज्ञ, तसाच उत्तम बुध्दिमान नित्य पुण्य च करीत असतो ह्मणून तो पुण्य कीर्ति होऊन पुण्यकारक स्थानास जातो. तस्मात् पुरुषानें पुण्याचेंच सेवन करावें. असूया करणारा, मर्मभेद करणारें भाषण करणारा, निष्ठुर, दुसऱ्याशीं वैर संपादन करणारा, अदाता, हे मोठे पापी यांस बहुत दुःखें होऊन शेवटीं नरकीं यांचें गमन होतें. दुसऱ्याची असूया न करणारा, व कृतप्रज्ञ हे दोघे चांगले मार्गाचें अवलंबन करतात ह्मणून त्यांस कधींही दुःख प्राप्त न होऊन सर्वत्र त्यांची कीर्ति होते. ज्ञान्या पुरुषाशीं संगति करून आपलें ज्ञान जो वाढवितो तो उचीत कार्याचे योगें आपलें सुखच वाढवितो. दिवसास असें कर्म करावें कीं, जेणेंकरून रात्रीं अत्यंत निद्रारूप सुख होईल. आठ महिन्यांत असें कर्म करावें कीं, चातुर्मास्य सुखानें जाईल पूर्ववयांत असें कर्म करावें कीं, वृध्दपणीं सुख होईल. आपण जिवंत आहोंत तोंपर्यंत असें कर्म करावें कीं, मरणोत्तर आपणास उत्तम सुख होईल. सुजन जीर्ण अन्न , गतयौवना भार्या, संग्राम जिंकिलेला शूर, तत्वप्राप्ति झालेला तपस्वी यांची प्रशंसा करतात. अधमानें प्राप्त झालेल्या धनानें आपलें पापरूप छिद्र झांकूं इछितो, परंतु तें न झांकतां तें अधिक वृध्दिंगत पावतें. शिष्याचा शास्ता गुरु होय, रात्म्याचा शास्ता राजा होय, गुप्त पातक करणाऱ्याचा शास्ता यम होय. ऋषि, नदी, माहात्म्याचें कूल व स्त्री यांचें दुष्ट चरित्र यांचा शोध लाव-

ण्यास कोणीं धजूं नये. ब्राह्मणाची पूजा करणारा, दाता, ज्ञातीचें आर्जव करणारा, असा सुशील राजा चिरकाल पृथ्वीचें राज्य करतो. ही पृथ्वी सुवर्णपुष्पानें युक्त आहे. तिचा शोध शूर, सुज्ञविद्य व सेवा करणारा हे करितात. बुध्दिबलानें केलेलीं कर्मे श्रेष्ठ होत, बाहुबलानें केलेलीं मध्यम आणि कपटानें केलेलें कर्म अति निंदित शिरावर भार धारण केल्याप्रमाणें दुःख देणारें होय. यास्तव हे धृतराष्ट्रा, दुर्योधन, शकुनी, दुःशासन तसाच कर्ण हे अत्यंत मूर्ख यांचेठायीं राज्यभार ठेऊन तूं ऐश्वर्याची इच्छा करतोस तें तुला कसें प्राप्त होईल. आतां सर्व गुणांनीं युक्त आणि तुला पित्यासमान मानणारे असे जे पांडव यांवर तूं पुत्रासारखी ममता ठेव म्हणजे तुझें कल्याण आहे. असा विषय या अ० आहे.

३६. अध्याय छत्तीसावा:– विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा, याविषयीं तुला एक पुरातन इतिहास सांगतों. त्यांत आत्रेय ऋषि आणि साध्यदेव यांचा संवाद आहे तोऐक. एके दिवशीं आत्रेय ऋषीस साध्यदेव प्रश्न करितात. हे ऋषे तुह्मीं महाबुध्दिमान, शास्त्राचें तत्व जाणतां तर कृपा करून आह्मांस ज्ञानी पुरुषाचीं लक्षणें सांगा. ऋषि बोलतात हे देव हो, ऐका. ज्याणें सर्व इंद्रियें जिंकिलीं, योग मार्गाचा अभ्यास करून जो समाधिसुख घेतो, ज्यानें आपलें अंतःकरण शुध्द केलें, जो दुःख आणि सुख समान मानतो तो ज्ञानी जाणावा. दुसऱ्यानें आपणास कोपयुक्त वाईट भाषण केलें तर त्याचें सहन करतो व त्यास प्रत्युत्तर देत नाहीं. त्यास शिवी देणाराचें पुण्य प्राप्त होऊन त्याचा क्रोधच त्याचा नाश करतो. यास्तव जो दुसऱ्याचा अवमान, मित्रद्रोह, नीच सेवा, अभिमान, दुष्टस्वभाव, रुक्षवाणी, हीं सर्व मनुष्यानें वर्ज्य करावीं. कारण त्यांपासून दुसऱ्याचे हृदयास, प्राणास अथवा अस्थींस संताप होतो. जो कधीं कठीण भाषण करीत नाहीं, अग्नीसारखे संताप करणारे दुसऱ्याचे वाक्शर, यांनीं ताडिलें असतां जो असा विचार करतो कीं, हा मला वाईट न बोलला तर मी क्षमा कोणाची करावी? ती केली नसतां पुण्याचें वर्धन कशानें होईल? असें जाणून निंदा करणाराचा तोउपकारच मानितो. अशा –

पुरुषास ज्ञानाचें तत्व समजलें असें जाणावें. हे राजा, जसा सहवास तसा गुण लागतो. साधूचे संगानें साधुत्व, मूर्खाचे संगानें मूर्खत्व प्राप्त होतें. जसें शुभ्र वस्त्र ज्या रंगांत घालावें त्यास तें ग्रहण करतें, तशीं सहवासाचीं फळें आहेत; यास्तव राजा सज्जनाचा सहवास आदरानें करावा, ह्मणजे जन्माचें हित होतें. स्वतः कोणाची छळणा करीत नाहीं व दुसऱ्याचे हातूनही छळणा करवीत नाहीं. जो आपल्यास दुःख झालें असतां दुसऱ्यास होण्याची इच्छा करीत नाहीं. मग तो आपणास दुःख नसतां दुसऱ्यास होण्याची इच्छा कोठून करणार? अशा पुरुषाच्या संगती ची देव ही इच्छा करीतात. बोलण्यापेक्षां मौन बरें, त्यापेक्षां सत्यभाषण, सत्य असून प्रिय भाषण केलें तर त्याहून चांगलें. सत्य प्रिय असून धर्मयुक्त भाषण करणें हें तर सर्वांहून चांगलें आहे. ज्या पुरुषासह वर्तमान बसावें, ज्या पुरुषाची संगति करावी तसे त्यास गुण प्राप्त होतात. जशी स्थीति आपण धरावी तशी स्थीति प्राप्त होते. जो पुरुष ज्या ज्या दुःखदायक गोष्टींपासून मुक्त होण्याची इच्छा करतो त्या त्यापासून तो सुटेल. जो सर्व प्रपंचाचा त्याग करील त्याला अणुमात्रही दुःख होणार नाहीं. याप्रकारें आत्रेय ऋषि आणि साध्यदेव यांचा संवाद होऊन ते ऋषि तपोवनांत गेले. पुनः विदुर बोलतो हे राजा, सांगतों हें ऐक. जो पुरुष अनीतीनें कोणास जिंकीत नाहीं, आपणही जिंकला जात नाहीं. तसाच कोणाशीं वैर करीत नाहीं तो प्राणी सुखी जाणावा. अकल्याण कोणाचेंही नसावें असें इच्छितो व जो सत्य भाषण करतो व भाषणांत इंद्रियें स्वाधीन करतो, अशा पुरुषास उत्तम पुरुष ह्मणतात. गोड भाषण करून व्यर्थ भरंसा देत नाहीं. मी देईन असें बोलला असतां देतो. दुसऱ्याचें छिद्र जाणतो तो मध्यम पुरुष जाणावा. हे राजा, पाहा हा तुझा पुत्र दुःशासन किती अधम आहे. घोषयात्रेंत गंधर्वांनीं गदेनें ताडन केलें असतां तसाच तो शस्त्रांनीं विदीर्ण झालेला असतां क्रोधाच्या योगें कधींही सरळपणें वागला नाहीं. तो उपकार दुःशासन कधींही स्मरत नसून अनुपकाराची इच्छा उपकार करणारे

जे पांडव यांजवर करीतच आहे. ही वृत्ति अधमाची जाणावी. दुसऱ्यानें कल्याण केलें असतांही जो जाणत नाहीं, मित्राचें निराकरण करतो तो अधम पुरुष जाणावा. ज्याला ऐश्वर्याची इच्छा असेल त्यानें उत्तमाचें सेवन करावें. तसाच काल प्राप्त झाला असतां मध्यमाचें सेवन करावें, परंतु अधमाचें सेवन कधींही करूं नये. जो लोकांशीं वंचना करून धनसंग्रह करतो आणि मी पराक्रमी असें मानितो तो या लोकीं प्रशंसा पावत नाहीं आणि थोरांची योग्यता तर कधींच पावत नाहीं. असें विदुराचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो. हे विदुरा. धर्मार्थ सेवन करणारे देव ही मोठ्या कुलापासून इष्टसिध्दी होण्याची इच्छा करितात, मग इतर करतील तर आश्चर्य काय? तस्मात् थोर कुलाचीं लक्षणें काय आहेत तीं कृपा करून सांगावीं. असा प्रश्न ऐकून विदुर बोलतो. हे राजा, तप, इंद्रियांचा जय, वेदाध्ययन. यज्ञ, पुण्यकर्म. विवाहादि उत्साह, निरंतर अन्नदान हे सात गुण निरंतर जेथें उत्तम रितीनें राहतात तीं थोर कुलें जाणावीं. जेथें माता, पितर, बंधुवर्ग मित्रादिक, ज्याच्या दोषानें व्यथा न पावतां गुणांनींच संतुष्ट होतात व प्रसन्नपणानें जे धर्म करतात व आपल्या कुलाची सत्कीर्ति व्हावी ह्मणून अनृताचा त्याग करतात तीं मोठीं कुलें जाणावीं. जेथें यज्ञादिक कर्म व वेदाभ्यास होत नाहीं व जेथें धर्माचा अतिक्रम आहे, हीनाशीं विवाहसंबंध घडतो तीं कुलें जरी आहेत तथापी त्यांस अकुलें समजावीं. देवद्रव्याचा नाश, ब्रह्मस्वाचें हरण, ब्राह्मणाची अमर्यादा केली व त्यास ताडन व त्याची निंदा, देव हरण करणारा इत्यादि गुणांनीं कुलें हीन होतात. विद्या, सत्पुरुष, द्रव्य. इत्यादि असून ही वर्तणुक जर चांगली नाहीं तर तीं कुलें उत्तम कुलांत गणलीं जात नाहींत. ज्या कुलांत उत्तम आचरण आहे तेथें स्वल्प जरी द्रव्य असलें तथापी तें थोर कुल ह्मणवितें. त्या कुलाची मोठी कीर्ति होते. द्रव्यानें हीन जरी झाला तथापी तो हीन असें समजूं नये. सदाचरणानें जो हीन झाला त्यासच हीन ह्मणावें. सदाचरणहीन त्यास विद्या, गोधनादिकांची वृध्दि जरी आहे तथापी तो उत्तम कुलीन होत नाहीं.

हे राजा, आमचे कुलांत कोणीं वैर करणारा नसो. आमचे कुलांतील रा-
जा, अमात्य व आणखी कोणीं बलानें दुसऱ्याचें द्रव्य हरण करून मित्रद्रो-
ह करणारे, कृत्रिमी, असत्य बोलणारा, पितरादि यांस अर्पण केल्यावां-
चून पूर्वीं भक्षण करणारे हे संपूर्ण कुलघातकी आहेत. जो ब्राह्मणाचा
घात करतो, द्वेष करतो, वडिलांचें रक्षण करीत नाहीं त्याचें जन्म आमचे
कुलांत नसावें, जो आपले घरीं आला त्यास बसावयास आसन, राहाव-
यास भूमि, पानास जल, उत्तम वाणीनें भाषण हे सत्कार मोठ्या कुलांत
जो उत्पन्न झाला त्याचे घरीं होतात. लाहान रथ जरी आहे तरी तो मोठा
भार घेऊन ओढून नेतो, तसा भार मनुष्याच्यानेंही घेववत नाहीं. या
प्रकारें थोर, कुलीन पुरूष आहेत ते दुसऱ्याचा भार सहन करतात, ह्म-
णजे दुसऱ्याचें दुःख आपण डोकीवर घेऊन त्यास सुखी करतात, हेंच
त्यांचें जन्म घेण्याचें फल आहे. हें त्यांचें कर्म इतर मनुष्यांच्यानें व्हावया-
चें नाहीं. मित्रास राग आला असतां भितो, मित्राशीं बोलावयास शंका
धरतो तेथें मित्रत्व आहे असें ह्मणूं नये. जो मित्राशीं पित्याप्रमाणें विश्वास
ठेऊन बोलतो त्याचेंच नाव मित्र. याशिवाय जे इतर लोक ते परिचित असें
ह्मणावें, त्यांस मित्र ह्मणूं नये. जो ममतेनें आपणाशीं बोलतो आणि सर्व-
दां हितच इच्छितो तोच मित्र, तोच बंधु, तोच आपणास गति असें जाणा-
वें. तो परकीय जरी आहे तरी त्यास आपले संबंधीजनापेक्षां वरिष्ठ स-
मजावा. जो चंचल बुध्दीचा पुरुष, जो आपले वडिलांचा मान राखीत नाहीं
त्याच्याशीं स्नेह फार दिवस राहात नाहीं. जो चित्ताचा चंचल, मनाचा क-
पटी, इंद्रियांस वश झाला अशा पुरुषास दैवयोगानें सर्व अर्थ जरी प्रा-
प्त झाले तथापी शुष्क सरोवरांत हंसास सुख जसें होत नाहीं तसे त्या
पुरुषास ते अर्थ सुखदायक होत नाहींत. कारणावांचून अकस्मात जो
कार्य करतो, अथवा अकस्मात् प्रसन्न होतो हा नीच मनुष्यांचा स्वभाव-
च जाणावा; यांची मैत्री अभ्रासारखी नष्ट समजावी. ज्या मित्रानें आप-
णांवर उपकार केला असेल, जो संकट काळीं कामास पडला आहे
त्या मित्रास जो समयीं उपयोगी पडत नाहीं अशा पुरुषास मृत्क जरी

आला तथापी गृध्रादिक त्यांचें मांस कृतघ्न आहे ह्मणून भक्षीत नाहींत. ह्मणून आपले जवळ द्रव्य असो अथवा नसो परंतु आपल्यासामर्थ्याप्रमाणें त्याणें सांगितल्यावांचून त्याचे उपयोगीं जो पडतो तो भोगजाणावा. आपले हस्त प्रार्थिल्यावांचून शरिरास रक्षितात, असा ज्या मित्राचा स्वभाव असेल तोच मित्र समजावा. संतापापासून रूप, बल, ज्ञान हीं नष्ट होऊन व्याधीची वृध्दि होते. जें अप्राप्य तें शोक केल्यानें प्राप्त होत नाहीं; परंतु त्या शोकापासून शरिरास संताप होऊन आपले शत्रूसमात्र आनंद होतो. यास्तव शोकाचेठायीं मन ठेऊंनये. मनुष्य पुनःपुनः उत्पन्न होतो, मृत्यु पावतो, लहान होतो, वृध्दिपावतो, याञ्चा करतो, याञ्चा करवितो, सुख दुःखें येतात जातात. लाभालाभ यथापर्यायेंकरून होतात. यास्तव धीमान् पुरुष यांचा हर्ष किंवा शोक करीत नाहींत. हीं सहा इंद्रियें चंचल आहेत. त्यांत विषय शोधनानें जें इंद्रिय वृध्दि पावतें त्यापासून बुध्दीचा स्राव होतो. जसें– छिद्र पडलेल्या कुंभांतून उदक स्रवतें. यास्तव विषयापासून इंद्रियनिग्रह करून बुध्दीचें रक्षण करावें. इतकें विदुराचें भाषणश्रवण करून धृतराष्ट्र प्रश्न करतो. हे विदुरा मला असें वाटतें कीं, तो उपवासेंकरून कृश झाला असतांही अग्नीसारखा तेजःपुंज धर्मराजास मी कपटानें छळिलें तो आतां युध्दांत मंद जे माझे पुत्र यांचा अंत करील यांत संशय नाहीं. तूं तर मला बहुत उपदेश केलास; परंतु माझें मन बहुत उद्विग्न झालें याची शांति कशी होईल हें मला सांग. असा प्रश्न ऐकून विदुर बोलतो. हे राजा, विद्या, तप, इंद्रिय निग्रह यांचा स्वीकार आणि लोभाचा त्याग यांचा संग्रह केल्यावांचून तुझ्या मनाची शांति होणार नाहीं. आत्मज्ञानानें संसार दूर होतो, तपानें ब्रह्म, गुरुसेवेनें ज्ञान, सर्व चित्तवृत्तीचा निरोध केल्यानें शांति, हीं प्राप्त होतात. ती शांति प्राप्त झाली ह्मणजे देहादिक इहलौकिक पदार्थ सर्व तुच्छ असें वाटूं लागतें. मग राज्यावर तुझी आसक्ति राहाणार नाहीं. मोक्षाविषयीं यत्न करणारे जे ते परोपकाराकरितां दानादिकांचा अंगिकार करितात आणि ज्ञानप्राप्ति व्हावी ह्मणून वेदशास्त्राध्ययन करतात. ते या दोन्हीं कर्मांचे पुण्यापासून

स्वर्गादिक प्राप्तीची इच्छा करणें तुच्छ मानून इच्छीत नाहीत वइह लौकिक पदार्थावर प्रीति किंवा अप्रीति हीं दोन्हीं न करून मोक्षप्राप्तीची योग्यता प्राप्त होईल तोंपावेतों पुनः पुनः जन्म घेऊन मृत्यलोकीं वास करतात. संसारापासून सुखाची इच्छा करणारे जे त्यांस मृदु शय्येवर निद्रा येत नाहीं, ते स्त्रियांपासून सुख पावत नाहींत, त्यांस विश्रांती नाहीं मोठेपणा नाहीं, त्यांस शांति नाहीं व स्वहितही समजत नाहीं. योग ह्मणजे अप्राप्त वस्तूचा लाभ, क्षेम ह्मणजे प्राप्त वस्तूचें संरक्षण. तो योगक्षेम, संसार करणारास मिळत नाहीं. हे राजा, विशेषेंकरून काय सांगावें. ज्या गोष्टीपासून आपलें अहित होणार ती गोष्ट संसारसुख घेणाऱ्यास बरी दिसते. गाईचेठायीं दुग्ध, ब्राह्मणाचेठायीं तप, स्त्रीचेठायीं चपलबुध्दि, हीं जशीं निरंतर राहातात तसेंज्ञातीपासून भय प्राप्त होईल असें जाणावें. यास्तव हे राजा, तुझे कुलाचे तंतु ज्यांचें तूं बहुत वर्षें पालन केलेंस असे जे पांडव ते तुझ्यापुत्रापासून बहुत वनवासादि दुःखें सोसतात ह्मणून लोकांमध्यें हा पांडवांसारखा साधु आहे, दुसरे जे आहेत ते पांडवांसारखे नाहींत अशी उपमा देतात. ज्वलित काष्ठें निराळीं काढलीं असतां तीं धूम्रयुक्त असल्यामुळें जशीं त्रास देतात, एकत्र केलीं असतां संताप करतात, तसे हे धृतराष्ट्र पुत्र ज्वलित काष्ठासारखे ज्ञातीस दग्ध करून टाकतात यांत संशय नाहीं. यास्तव पांडवांशीं प्रीति करून ज्ञानी पुरुषासारखा ज्ञातीवधभयापासून दूर हो. ब्राह्मण, स्त्री, ज्ञानी व गाय यांजवर जे आपलें शौर्य प्रगट करतात ते, पक्क फल झालें ह्मणजे वृक्षापासून जसें पडतें तसें त्यांचें पाप भरलें ह्मणजे ते नाश पावतात. मोठा एकादा वृक्ष मुळानें बळवान झालेलाअसून त्याचा नाश वायु तात्काळ करतो. जे वृक्ष एकमेकाचा आश्रय करून एकत्र आहेत ते मोठ्याही वायूचा वेग सहन करून आपलें संरक्षण करतात. ह्मणून एकटा पुरुष मोठा बलवान, शाहाणा असला तथापी एकटा असेल तर एकट्या वृक्षासारखा शत्रूपासून नाश पावतो. एकमेकाचा आश्रय करून असल्यानें ज्ञातीची वृध्दि होते. ब्राह्मण, गाई, ज्ञाति, बालकें; स्त्रिया ज्यांचीं अन्नें

भक्षण केलीं आहेत व जे शरणागत आले इतक्यांचा वध करणें योग्यना हीं. हे राजा, सधनपणा आणि निरोगीपणा हीं दोन या लोकीं सुखाचीं कारणें आहेत. रोगी जे आहेत ते केवळ जिवंत असतां मृतासारखे जाणावे. सधन असून उपयोग काय? तुला दोन्हीं अनुकूळ असून रोग्यासारखा दिसतोस तर हा क्रोधरूपी रोग पांडवांपासून आला आहे. त्यास दुसरें कांहीं कारण दिसत नाहीं. हा रोग फार कडू, कठोर आणि तीक्ष्ण आहे. या रोगापासून तुझे मस्तकांत भ्रम शिरला आहे. या रोगास साधुमात्र शमन करतात. इतरांस प्राशन करण्याची शक्ति नाहीं. अशा क्रोधास तूं पिऊन जाऊन सुखी हो. रोगानें पीडित झालेल्या मनुष्यास पुत्र, पौत्र, विषय, भोग व धन यांपासून सुख होत नाहीं. रोगी नित्य दुःखी आहे. थोर जे आहेत ते कपटविद्येचा आश्रय करीत नाहींत. तुला पूर्वींच मी द्रौपदी हरणकाळीं सांगितलें होतें कीं, अरे या अक्षविद्येपासून दुर्योधनाचें निवारण करा; परंतु माझें वचन मान्य केलें नाहींस आतां त्याचीं फळें तुला भोगावीं लागतील. जो आपण केलेलें सहन करतो त्याजवर पराक्रम करणें हें योग्य नव्हे. अशांवर क्रूर होऊन जो लक्ष्मी संपादन करतो त्याची लक्ष्मी स्थिर राहात नाहीं. धर्मानें संपत्ति मिळविली तीच चिरकाल राहाते. हे राजा, तुला सारभूत आतां एक गोष्ट सांगतों. तुझे पुत्र पांडवांचें रक्षण करून पांडुपुत्र तुझ्या पुत्रांचें रक्षण करोत. तुमचे शत्रु मित्र असतील ते पांडवांचे आणि पांडवांचे शत्रु मित्र असतील ते तुमचे असें जाणून तुह्मीं उभयतांनीं संमृध्द होऊन सुखी राहावें आणि अनंत दिवस या पृथ्वीवर राहावें. व सुखें भोगावीं. हे राजा, गृहास जसा आधारभूत स्तंभ असतो तसा या कुरुकुलास तूं आधारभूत स्तंभच आहेस यास्तव हे बाल पार्थ बहुत दिवस ज्यांनीं वनवास भोगिला त्यांस आतां रक्षण करून महान् कीर्ति व यश संपादन कर. कौरव पांडवांचें ऐक्य जेणेंकरून होईल असें कर. तुह्मांमध्यें भेद करावयास जे इच्छितात ते तुमचे शत्रु असें जाणून त्यांची आशा भंग कर. पांडव सत्य धर्मानें वागत आहेत; यास्तव ते युध्दामध्यें जय पावतील, तुह्मीं युध्दांत पराजित व्हाल

मूर्ख दुर्योधनास युध्दाची उत्तेजकता देऊं नको. यांत तुझें परम कल्याण आहे. हें माझें भाषण सत्य मान. अशी कथा या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतीस :– विदुर बोलतो हे राजेंद्र, स्वायंभू मनूनें मूर्खाचीं लक्षणें सत्रा सांगितलीं आहेत तीं मी तुला सांगतों. आकाशास मुष्टिप्रहार करण्याची, आकाशांत एक धनुष्यासारख्या आकृतीचें उत्पन्न होत असतें त्यास इंद्रचाप असें ह्मणतात तें धनुष्य नमविण्याची इच्छा करणारा, चंद्रसूर्याचे किरण आपले मुष्टींत घेण्याची इच्छा करतो तो, कुशिष्यास उपदेश करून गुरुत्वाची आस्थता बाळगतो तो, स्वल्प लाभानें संतोष मानतो तो, शत्रूची सेवा करून त्याजपासून कल्याण इच्छितो तो, दुष्टस्त्रीचें रक्षण करून तिजपासून कल्याणाची इच्छा करणारा, जो मागण्याजोगा पदार्थ नाहीं तो मागतो तो व थोडें कर्म करून मोठी प्रतिष्ठा सांगतो तो, अनुचित कर्म करून कुलीनपणा इच्छितो तो, विश्वासास योग्य नसतां त्याजपाशीं विश्वासानें भाषण करतो तो, आपण निर्बल असून बलवंताशीं निरंतर वैर करतो तो, इच्छा करण्यास अयोग्य त्याची इच्छा करणारा, आपले स्नुषेशीं थट्टेचीं भाषणें करतो तो व तिचे पित्रादिकांपासून उपजीविका करीत असतां त्यांपासून मानाची इच्छा करतो तो व जो परदारेचेठायीं बीजनिरवपण करतो तो, आपले स्त्रीशीं अमर्याद भाषण करतो तो, जो आपणास एकादी गोष्ट माहीत असून मला स्मरण नाहीं ह्मणतो. जो पूर्वी तीर्थी वाचादत्त होऊन पुढें तो याचक मागावयास आला ह्मणजे दान न करतां दिलें ह्मणून ह्मणतो, ज्याचा दुष्ट स्वभाव आहे त्यास साधु असें ह्मणतो, खोट्या अर्थाचें सत्यत्व स्थापन करतो त्यास यमाचे दूत नरकास नेतात. ज्याचा जसा स्वभाव असेल त्याप्रमाणें त्याशीं वागावें. कपट्याशीं कपटी व्हावें, साधूशीं साधू व्हावें. हे राजा, हें पूर्वीच सांगितलें आहे; परंतु आतांही आणखी सांगतों कीं, अभिमान हा सर्वांचा नाश करतो. यास्तव सर्वप्रकारें त्याचा त्याग कर. असें विदुराचें भाषण झाल्यावर पुनः धृतराष्ट्र राजा प्रश्न करतो. हे विदुरा, पुरुषास शंभर वर्षे आयुष्याचें प्रमाण वेदांत सांगितलें असून मध्यंतरींच मरण

प्राप्त होतें. याचें कारण काय तें मला सांग. असें ऐकून विदुर भाषण करतो हे राजा, थोरास तुच्छ करून अभिमानानें बोलणें, सर्वांहून आपली आढ्यता लोकांमध्यें दाखविणें, देण्यास योग्य नसतां देणें, कारणावांचून क्रोध करणें, केवळ आपले शरिरास सुख होईल तेंच करणें व मित्राशीं द्वेष करणें, हीं सहा कृत्यें तीक्ष्ण लोहमय शस्त्रें होऊन आयुष्याचा नाश करतात. ज्यानें ज्यावर विश्वास ठेविला असेल त्याचे व गुरूचे स्त्रीपाशीं जो गमन करतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य असून शूद्रस्त्रीशीं गमन करतो, जो मद्यपान करतो, दुसऱ्याच्या उपजीविकेचें छेदन करतो, विद्वान ब्राह्मणास चाकर करतो, शरणागत आला त्याचा वध करतो हे सर्व ब्रह्महत्या करणारा समान जाणावे. इतक्यांचा समागम झाला असतां प्रायश्चित्त करावें ह्मणून श्रुतीमध्यें सांगितलें आहे. विद्वान, न्याय अथवा अन्याय जाणून वागणारा, देव ब्राह्मण यांस अर्पण करून शेषान्न भोजन करणारा, हिंसा, अनर्थकारी कर्में न करणारा, उपकार जाणणारा, सत्य आणि मृदु भाषण करणारा हे स्वर्गी जाण्यास योग्य आहेत. हे राजा, निरंतर गोड बोलणारे पुष्कळ मिळतील; परंतु अप्रिय बोलून त्यांत सर्वांचें हित असावें असें बोलणारा व ऐकणाराही दुर्लभ. राजास गोड अथवा कडू वाटो, परंतु त्याचे कल्याणाची इच्छा करून नीती असेल तेंच भाषण करतो तो साह्य ह्मणावा. असे लोक ज्या राजाजवळ असतील तो राजा साह्यवान् जाणावा. आपले कुलांत एकच पुरुष सर्व कुलाचा नाश करतो, असें आहे तर त्या एकाचा त्याग करून सर्व कुलाचें रक्षण करावें. एका कुलाचे योगें समग्र ग्राम नाश पावत आहे, तर त्या ग्रामाच्या रक्षणाकरतां एका कुलाचा त्याग करावा. एका ग्रामाच्या योगें एक समग्र देश नष्ट होत असेल तर तो ग्राम टाकावा, पृथ्वीचें राज्य टाकून आपले आत्म्याचें रक्षण होत असेल तर राज्य टाकावें आणि आत्मसंरक्षण करावें. अशी नीति आहे. आपत्काळीं आपलें रक्षण झालें पाहिजे म्हणून धनाचें रक्षण करावें. स्त्री पुत्रा च्या रक्षणाकरितां धनाचा व्यय करावा. धन व स्त्रीपुत्रादिकें करूनच आत्म्याचें रक्षण होत आहे. नाहीं

तर होत नाहीं. असें असल्यास धन स्त्री पुत्रांचा त्याग करून आत्म्याचें रक्षण करावें. हे धृतराष्ट्रा, द्यूत हें महान वैर उत्पन्न करणारें आहे. यास्तव बुध्दिमानानें उगीच विनोदा करितांही द्यूत खेळूं नये. ही द्यूतक्रीडा उत्तम नाहीं. असें तुला मीं द्यूतक्रीडेकाळीं सांगितलें होतें, परंतु आतुरास मरण जवळ आलें असतां गुण करणारीं औषधें रुचत नाहींत, तसें तुला माझें भाषण रुचलें नाहीं म्हणून आतां चिंतेस पात्र झालास. काकरूपी जे तुझे पुत्र दुर्योधनादिक यांनीं मयूरस्वरूपी पांडवांचा पराजय केला म्हणून कौरवांचा अत्यादरें अंगिकार करतोस आणि पांडवांचा त्याग करतोस; परंतु सिंहाचा त्याग करून कोल्ह्याचा अंगिकार करणारा जसा शेवटीं शोक पावतो. तसा राजा, तूं या काकाच्या रक्षणेंकरून शोक पावशील. आपलें हित करणारा जो भृत्य याचें सर्वदां जो हितच करीत असतो. कधींही कोप करीत नाहीं. त्या पोषक प्रभूचे भृत्यही निरंतर कल्याणच इच्छीत असतात, त्याजवर विश्वास ठेवितात, त्या प्रभूस आपत्काल जरी आला तरी त्याचा त्याग करीत नाहींत. एकाद्या सेवकास अर्पण केलेली उपजीविका जो न्यून करतो अथवा पुढें बंद करतो त्यास ते हा ठक आहे असें मानून त्याचे अहितांचें साधन जितकें होईल तितकें करतात. यास्तव पूर्वीं आपला आपण आय व्यय पाहून आपले पासून निरंतर चालेल तितकेंच द्यावें. आपल्यास अनुकूल व साह्य जे असतील त्यांचाच संचय करावा. कारण महान दुर्घट कार्य एकादे समयीं प्राप्त जरी झालें तरी साह्य चांगलें असल्यास तें कार्य पार पडून जातें. जो सेवक आपले स्वामीचें मनोगत समजून सर्व कार्यें आळस सोडून करतो, सर्वदां हितच कथन करीत असतो, अनुकूल प्रामाणिक अशी आपल्या स्वामीची शक्ति जाणतो, अशा भृत्याला आपले जिवाप्रमाणें संरक्षित करावा. ज्यास एकादें कार्य सांगितलें असतां ऐकिलें न ऐकिलें असें करतो, अथवा उन्मत्तपणानें तें काम करींत नाहीं असें भाषण करतो. धन्यापेक्षां मी ज्ञानी व शाहाणा आहें असें त्यास दर्शवून त्याच्या बोलण्याचें खंडण करतो अशा सेव-

कास सत्वर टाकावें. ज्यास गर्व नाहीं, जो सामर्थ्यवान, सांगितलेलें कार्य तत्काळ करतो, दयाळू, मृदुभाषणी, आपले धन्याचा त्याग करून दुसऱ्यास वश होत नाहीं, जो रोगी नाहीं, समयीं सयुक्त भाषण करणारा, अशा आठ गुणांनीं युक्त जो सेवक त्यास उत्तम सेवक ह्मणावें. ज्याचा आपणावर विश्वास नाहीं त्याचे घरीं आपण सायंकाळीं जाऊं नये. गृहस्वामीस न कळतां रात्रौ कोणाच्या अंगण्यांत राहूं नये. राजानें इच्छिले स्त्रीचा अभिलाष करूं नये. बहुत लोकांसह वर्तमान आपण एकादा विचार केला, परंतु तो विचार आपल्यास रुचला नाहीं तर हें स्पष्ट आपले मंडळीस दाखवूं नये. आणि कांहीं एकादें दुसरें निमित्त उत्पन्न करून त्या विचारांतून आपण निराळें सुटून राहावें. अपराध्यास यथोक्त दंड न करणारा, तसाच राजाचा चाकर, पुत्र, भ्राता, विधवा स्त्री, जिचा पुत्र बाल आहे ती स्त्री, सैन्याचा अधिकारी, ज्याला अधिकारावरून काढिला आहे तो इतक्यांसह वर्तमान व्यवहार करूं नये. हे राजा, ज्याकाळीं राजा मनुष्याचा सत्कार करतो तेव्हां बलात्कारानें प्रज्ञादिक आठ गुण त्याचा आश्रय करतात. बल, रूप, स्पष्ट वर्णोच्चार, मंजुळ ध्वनि, मार्दव, सुगंधता, निर्मळपणा, शोभा, सुकुमारता, उत्तम स्त्री प्राप्त होणें हे दाहा गुण स्नानशील पुरुषाचें सेवन करतात. आरोग्य, आयुष्य, बळ, सुख, उत्तम आपत्य, बहुत भोजन करतो ह्मणून लोक निंदा करीत नाहींत हे साहा गुण मितभोजन करणाऱ्यास प्राप्त होतात. अकर्मी, बहुभोजी, लोकांशीं द्वेष करणारा, महा कपटी, देश काल न जाणून कर्म करणारा, दुष्टवेष धारण करणारा इतक्या पुरुषांस घरांत ठेवूं नये. अदाता, लोकांस शिव्या देणारा, शास्त्राभ्यास न करणारा, कोळी, धूर्त, हलक्याचा मान ठेवणारा, निष्ठुर, वैर करणारा, कृतघ्न इतक्यांचा संबंध कधीं करूं नये. ज्याला मनुष्याची अत्यंत गरज आहे त्यानें ही यांचा अंगिकार करूं नये. आपणास मारण्यास उद्युक्त, सदा व्यग्रचित्त, नित्य अनृतवादी, यजमानावर ज्याची भक्ति नाहीं, स्नेह टाकणारा, आपणास शाहाणा ह्मणणारा या साहा मनुष्यांस आपले जवळ

बाळगूं नये. सात्ध्यानें अर्थ प्राप्त होतात. अर्थानें सात्ध्य प्राप्त होतें असाउ-भयतां अन्योन्याश्रय आहे. हे एकमेकांस सोडून राहात नाहींत, यास्तव सात्ध्यहीन असूं नये. पुत्र उत्पन्न करून पितरांचें अनृणी व्हावें आणि आपली जिविकावृत्ति असेल ती त्या पुत्रास देऊन आपण अरण्यवासी झालें असतां आपले जन्माचा उत्तम शेवट झाला असें समजावें. जें कर्म केल्यानें प्राणिमात्राचें हित व आपणास सुखावह होतें तें कर्म ईश्वरार्पण बुध्या करावें. तेणेंकरून सर्वार्थसिध्दि होते. मित्रसंग्रह बुध्दि, शत्रुपराजय, शौर्य, बल, उद्योग, निश्चय हीं सात ज्यास आहेत त्याच्या उदराची काळजी कधींही करूं नये. हे राजा, तूं पांडवांशीं कलह उत्पन्न केलास यांतील दोष किती उत्पन्न झाले ते सांगतों. शक्रासह वर्तमान देवांची अवकृपा तूं संपादिलीस, पुत्रांशीं वैर केलेंस, तूं आपल्यास नित्य चिंताउत्पन्न केलीस, चिंताग्रस्त रात्रंदिवस असतोस, लोकांत तुझी कीर्ति झाली. आणि आपले जे दुष्टे आहेत त्यांस हर्ष उत्पन्न केलास. भीष्म, द्रोण, युधिष्ठिर आणि तूं या सर्वांस कोपमात्र उत्पन्न केलास. हे कोप एकत्र झाले असतां जसा आकाशांत श्वेत ग्रह उत्पन्न होऊन सर्वांचा नाश करतो तसे हे कोप त्रैलोक्याचा नाश करतील. यास्तव हे राजा, तुझे शंभर पुत्र, कर्ण आणि पंचपांडव इतके एकत्र होऊन एकचित्तानें सागरांबरा पृथ्वीचें अखिल राज्य करोत. तुझे पुत्र हे वन होत त्यांत, पांडव हे व्याघ्र होत; यास्तव व्याघ्रांसह वर्तमान वनाचा छेद करूं नको. पांडव व्याघ्रांवाचून तुझे पुत्ररूप वनाचा नाश होणार तो न व्हावा. कारण व्याघ्रावांचून वन नाहीं, वनावांचून व्याघ्र नाहीं. वनामध्यें व्याघ्र वास करतात म्हणून तें वन कोणी नष्ट करीत नाहींत, सुरक्षित राहातें. तें वन सुरक्षित राहिलें म्हणजे व्याघ्र सुरक्षित झाले. कुबुध्दीचे पुरुष दुसऱ्याचे सद्गुणा जाणत नाहींत. त्याच्या दोषाकडे दृष्टि ठेवितात आणि गुण असतील त्यांजवरही कांहीं तरी दोषारोप ठेवितात. उत्तम अर्थसिध्दी ज्यास पाहिजे त्यानें चांगलें धर्माचरण ठेवावें. धर्मास सोडून अर्थ राहात नाहींत. जसें स्वर्गाला सोडून अमृत इतर कोठें राहात नाहीं; तसें धर्मानें अनिष्

करून अर्थ राहात नाहींत. ज्याचें चित्त पापापासून पराङ्मुख होऊन ईश्वर भजनीं निविष्ट झालें त्या पुरुषानें सर्व जाणलें. जो पुरुष धर्म,अर्थ, काम यांचें यथा कालीं सेवन करतो त्याचें फल या लोकीं व परलोकीं त्यानें संपादन केलें. क्रोध आणि हर्ष यांच्या वेगाचें ज्यानें सहन केलें, तसाच आपत्तिकाळीं धैर्य धरून जो राहिला तो लक्ष्मीच्या कृपेस पात्र झाला असें समजावें. व पुरुषास पांच प्रकारचीं बलें आहेत. बाहुबल, आपल्यास मसलत देण्याचें बल, धनबल, आप्तांचें बल आणि बुद्धिबल. इतक्या बलांमध्यें बुद्धिबल सर्वांहून श्रेष्ठ आहे आणि बाहुबल हें कनिष्ठ होय. दुसऱ्यास महान अपकार करण्याचें सामर्थ्य ज्यास आहे अशा पुरुषाशीं वैर करून आपण त्यापासून दूर आहों, आपणास त्यापासून उपद्रव होणार नाहीं असा विश्वास त्याचा कधींही धरूंनये. स्त्रिया, राजे, सर्प, अध्ययन, आपला धनी, शत्रु, विषयभोग व आयुष्य यांच्यागचीं कोणता माज्ञ विश्वास धरील. शाहाण्यानें इतक्यांवर कधींही भरंसा धरूंनये. प्रज्ञा शरानें ताडित जो प्राणि रूप रोग त्यास वैद्याचा उपाय नाहीं, औषधीचा उपाय नाहीं. तसेंच होम, मंत्र, मंगलें, अथर्व वेदोक्त मंत्र यांचा या रोगावर उपाय चालत नाहीं. सर्प, अग्नि, सिंह व कुलीन इतक्यांची अवज्ञा करूं नये, हे मोठे तेजस्वी आहेत. काष्ठामध्यें अग्नीचें तेज गुप्तरूपानें आहे खरें, परंतु या काष्ठानें दुसऱ्यास जाळूं ह्मटलें तर उद्दीपन शक्ति नाहीं. तींच काष्ठें एकमेकांवर घांसून अग्नि उत्पन्न केला असतां तो अग्नि सर्वांस जाळतो तसे हे पंडु पुत्र तुझ्या कुळांमध्यें अग्नीसारखे उत्पन्न झाले आहेत. ते क्षमावान् आहेत. ह्मणून काष्ठस्थ अग्नीसारखे लीन होऊन राहिले आहेत. हे राजा, पुत्राशीं सहवर्तमान तूं कोणींएक लता आहेस, पंडु सुत हे कोणींएक शाळ वृक्ष आहेत. लतांनीं महान् वृक्षाचा आश्रय केला असतां त्या वृध्दींप्रत पावतात. यास्तव तुला सांगतों, पुत्रांसहवर्तमान पांडवांचा आश्रय कर, ह्मणजे तूं वृध्दींप्रत पावशील. नाहीं तर नष्ट होशील. हे राजा तुझे पुत्र हे कोणीं एक वन आहेत, पंडु पुत्र हे त्या वनांतील सिंह आहेत, ह्मणून सिंहावां-

चून वन नष्ट होतें. वनावांचून सिंह नष्ट होतात. यास्तव एकमेकांचें रक्षण करून उभयतांनीं सुखी राहावें. अशी कथा या अध्यायांत आहे.

३८. अध्याय अडतीस:- विदुर बोलतो हे राजा, आपले घरीं विद्वान, वृध्द असा अतिथी आला असतां गृहनिवासी याचे प्राण आपआपलीं स्थानें सोडून वर येतात. मग त्या वृध्दास प्रत्युत्थान व अभिवाद रूप सत्कार केला असतां आपआपले ठिकाणीं पूर्ववत्प्रमाणें ते प्राण जाऊन बसतात. आपले घरीं अतिथी आला असतां त्यास आसन व जल द्यावें, त्याचें पादप्रक्षालन करावें, कुशल प्रश्न करावा येणें प्रमाणें त्याचा सत्कार करावा, अन्नदान करावें, मधुपर्कास गाय द्यावी. हा अतिथीचा सत्कार जे लोभानें, भयानें अथवा कार्पण्यानें करीत नाहींत त्यांचें जीविन व्यर्थ आहे. असें मोठे लोक भाषण करतात. अध्ययन न केलेला वैद्य, शस्त्रें करणारा, ज्याचें ब्रह्मचर्य नष्ट झालें आहे तो, चोर, क्रूर, मद्यपी, भ्रूण हत्या करणारा, सेनापति, श्रुतिविक्रय करणारा इतके हे लोक उदकही देण्यास योग्य नाहींत खरे, परंतु आपले घरीं अतिथिसारखे आले असतां जांवयाप्रमाणें त्यांचा सत्कार करावा. लवण, पक्कान्न, दधि, क्षीर, मधु, तैल, घृत, तीळ, मांस, फळें मुळें, शाक, रक्तवस्त्रें, गंधयुक्त पदार्थ, गुळ इतके पदार्थ विकणारा ब्राह्मण यांस जलही पिण्यास देऊं नये. परंतु हे आपले घरीं अतिथी आले असतां त्यांचा सत्कार करावा. अतिथी उत्तम कोणता त्याचीं लक्षणें सांगतों ऐक. संधिविग्रह ज्यास सारखाच, मृत्तिका व सुवर्ण यांजवर समदृष्टि, शोक मोहापासून जो निरंतर मुक्त आहे, निंदा व प्रशंसा यांपासून उपरत, प्रिय अथवा अप्रिय हें ज्यास अगदीच ज्ञान नाहीं, उदासीनासारखा जो राहातो, तो सत्कार करण्यास योग्य आहे. देवभात, मुळें इत्यादिकें करून उदराचा निर्वाह करतो, आत्म्याचा निग्रह करणारा, अग्निकार्यें सायंप्रातः यथाकाळीं करणारा, तसाच वनामध्यें राहाणारा, कोणत्याही कर्माविषयीं निरालस्य, पुण्यवान्, भार सहन करणारा यास तापशी म्हणावा. हा दरिद्री जरी असला तथापी दरिद्री समजूं नये, भाग्यवानच

आहे. त्याच्याभाग्यासारखें दुसरें कोणाचें भाग्य नाहीं. बुद्धिमानाचा अपकार करून मी त्याजपासून दूर आहे असें समजूं नये. कारण बुद्धिमंताचे ज्ञानरूप बाहु मोठे लंबायमान आहेत यास्तव आपले स्वबुध्दीनें तो हिंसकास जवळ करून त्याचा तत्काळ नाश करतो. विश्वास धरण्यास योग्य नाहीं त्याजवर विश्वास धरूं नये. विश्वास धरावयास जो योग्य आहे त्याजवर फार विश्वास ठेवूं नये. कारण ज्यावर विश्वास ठेविला तो कदाचित वैरी झाला तर आपलीं कर्मे त्यास माहीत असतात यास्तव समूळ नाश करील. लोकांशीं ईर्षा न करणारा, आपले स्त्रीचें रक्षण करतो तो, विभाग देण्यास योग्य, प्रियभाषण करणारा, मृदु आणि मधुर भाषण करतो तो, इतके गुणांनीं जरी युक्त आहे तथापी त्याणें स्त्रीस वश होऊं नये. महाभाग्यवती व पुण्यवती स्त्रिया गृहास शोभा आणणाऱ्या त्यांस लक्ष्मीच समजून त्यांचें रक्षण करावें; परंतु त्यांस वश होऊं नये. अंतःपुराचें काम पित्याकडे असावें. स्वयंपाक घरचें काम मातेकडे योजावें. गाई इत्यादिक पशु आहेत त्यांचें काम आपल्या सारखा विश्वासू असेल त्याकडे द्यावें. शेतकी व दुकानदारी यांविषयीं कोणावर विश्वास न ठेवितां आपण काम पाहावें. चाकराकडून कोण काय काम करतात याचा शोध घेवावा. पुत्रांकडे द्विजाची सेवा सांगावी. ज्या कुळामध्यें अग्नीसारखे तेजस्वी, क्षमावान्, संतमान्य उत्पन्न झाले असतील त्यांच्या योगें तें कुळ बहुत शोभतें आणि ते पुरुष काष्ठांतल्या अग्नीसारखे लीन असतात. उदकापासून अग्नि. ब्राह्मणापासून क्षत्रिय, पाषाणापासून लोह हीं उत्पन्न होतात, त्या सर्वांचें तेज आप आपल्या कारणांचे ठायीं शांति पावतें. ज्या राजाची मसलत अभ्यंतरीं राहाणारे लोक अथवा बाह्य राहाणारे लोक यांसही समजत नाहीं. जो सेवकाचे द्वारानें दुसऱ्याची मसलत जाणतो तो राजा चिरकाळ ऐश्वर्य भोगतो. पुढें काय कर्तव्य आहे तें पूर्वी प्रगट न करितां केल्यावर लोकांस कळतें अशी मसलत राजानें निरंतर करावी. राजानें विचार कर्तव्य तो गिरीचें शिखर, प्रासाद, अथवा एकांत स्थळीं जेथें मनुष्यांची वहिवाट नसेल त्या स्थळीं अथवा तृणरहित स्थान इतक्या स्थळीं

मसलत केली असतां मंत्र भेद होत नाहीं. अमित्रास आपला विचार सांगूं नये. सांगितला असतां अनर्थ होईल. आपला मित्र आहे, परंतु तो मूर्ख, बरें जो शाहाणा आहे त्याची जिव्हा त्याचे स्वाधीन नाहीं त्यास आपला विचार सांगूं नये. प्रधान करणें तो चांगली परीक्षा करून ठेवावा. जो प्रधान अर्थ संपादन करण्यास समर्थ व गुह्य गोष्ट गुप्त राखितो तोच प्रधान पदवीस योग्य आहे. राजाचीं जीं कर्तव्य कर्मे तीं पूर्वी कोणास समजत नाहीं तो राजा सर्व राज्यांमध्यें श्रेष्ठ ह्मणावा. द्रव्यादिकांचे लोभानें जो पापकर्मास उद्युक्त होतो. तीं कार्यें त्याजपासून न सिध्द होऊन तो जीवित्वापासून मात्र भ्रष्ट होतो. जीं कर्मे आपण केलीं तीं पुण्यकारक असल्यास सुखावह होतात. पापरूप असल्यास दुःखकारक होतात. यास्तव कर्मे करणें तीं विचारपूर्वक करावीं. ज्याणें वेदाध्ययन केलें नाहीं तो ब्राह्मण श्राध्दास जसा योग्य नाहीं तसा संधिविग्रहादिक साहा गुणांचें ज्ञान ज्यास नाहीं तो विचार करण्यास उपयोगी नाहीं. जो राजा आपली स्थीति, वृध्दि, क्षय, षड्गुण व शील या सर्व गुणांस यथास्थित जाणतो त्या राजाच्या स्वाधीन पृथ्वी झाली ह्मणून समजावें. ज्याच्या क्रोधानें शत्रु भय पावतात, ज्याच्या हर्षानें लोकांस आनंद होतो. आपल्या भांडार गृहाची चौकशी स्वतः जो वारंवार ठेवतो त्यास ही पृथ्वी बहुत द्रव्य देणारी अशी होते. आपल्यास लोक राजा असें ह्मणतात, आपली आज्ञा मान्य करतात, आपले शिरावर छत्र आहे इतक्यानेंच राजानें संतुष्ट असावें. इतर द्रव्याचा उपभोग आपले पदरच्या लोकांकडून करवावा. हाच राजाचा थोरपणा. आपणच एकट्यानें उपभोग करणें राजाचा थोरपणा नव्हे. ब्राह्मणाचें स्वरूप ब्राह्मण जाणतो. स्त्रीचें स्वरूप पति जाणतो. प्रधानाचें स्वरूप राजा जाणतो, आणि राजानें स्वरूप राजाच स्वतः जाणतो. जो शत्रु आपले स्वाधीन झाला असतां तो नीच होऊन सेवा जरी करण्यास उद्युक्त झाला तथापि त्यास सोडूं नये. त्याचा प्राण घ्यावा. जर त्याचा प्राण न घेऊन तसाच मुक्त केला तर कांहीं कालानें तो प्रबल होऊन आपला प्राण घेण्यास चुकणार नाहीं. देव, राजा, ब्राह्मण, वृध्द, बाल, रोगी यांजविषीं क्रोध

जरी कांहीं कारणानें आला तरी त्याचा उपशम करावा. मूर्ख लोकांस प्रिय जो कोप तो निरर्थक असा जाणून प्राज्ञ लोकांनीं त्याचा अंगिकार करूं नये. तेणेंकरून आपली कीर्ति होऊन सुख होतें आणि अनर्थाचें निवारण होतें. बुद्धिमानासच संपत्ति मिळते. मंदबुद्धीस मिळत नाहीं असें नाहीं. त्याचें तत्व काय आहे तें प्राज्ञ लोकच जाणतात. इतरांस समजत नाहीं. विद्वान्, शीलवान, वयोवृध्द, बुद्धिवृध्द यांचा अवमान बुद्धिहीन लोक करतात. नीचकर्मी, मूर्ख, दोषदृष्टि, अधर्मी, दुष्टवचनी, क्रोधी, अशा पुरुषास अनर्थ प्राप्त लौकरच होतात. वंचनाशून्य, दानकरणें, केलेल्या मर्यादेचा अतिक्रमनकरणें आणि यथायोग्य भाषण करणें हीं ज्यापाशीं आहेत त्यास प्राणिमात्र भूतें वश्य होतात. वंचना न करणारा, दक्ष, केलेले उपकार जाणणारा, बुद्धिमान, सर्वांशीं सरळ, असा पुरुष द्रव्यरहित जरी आहे तथापि आपले परिवारादिकांस प्राप्त होतो. धृति, शम, दम, श्रध्दता, करुणा, अनिष्ठुर वाणी, मित्राशीं सरळपणा हे सात गुण ज्यास आहेत ते त्याचे श्रीस उद्दीपन करतात. संपत्ति एकटाच भोगणारा, दुष्टात्मा, कृतघ्न, निर्लज्ज असा नराधम जो आहे त्याचें राजानें वर्जन केलें पाहिजे. आपण सदोष असतां आपलेपाशीं राहाणारा दुसरा निर्दोषी त्यास जो व्यर्थ छळितो त्यास ज्या गृहांत सर्प असतां रात्रीं जशी निद्रा येत नाहीं तशी पुरुषास रात्रौ निद्रा येत नाहीं. ज्या दुष्टाच्या हातीं आपला योगक्षेम आहे त्या दुष्टाचें दैवतेसारखें निरंतर पूजन करीत असावें. नाहीं तर आपली उपजीविका कोणच्या वेळेस विनाकारण नष्ट करील याचा भरंसा नाहीं. जें द्रव्य स्त्रियांचे हस्तगत आलें, तसेंच जें द्रव्य उन्मत्ताच्या, पतिताच्या व मूर्खाच्या स्वाधीन झालें तें निःसंशय नष्टच झालें असें समजावें. जेथें स्त्रियांचें प्राबल्य आहे, कपट्यांशीं जेथें प्रसंग आहे, जेथें बालबुद्धि राजा आहे अशा ठिकाणीं जे लोक राहातात ते पाषाणयुक्त नौकेंत बसून जाणारे नदींत जसे बुडतात तसे ते बुडतात. ज्या पुरुषाचे हातून आपलीं कार्यें होतात त्याच्या गुणदोषांवर आपली दृष्टि देऊं नये. असें जे करतील ते शाहाणे. जे त्यांच्या गुणदोषांवर लक्ष्य ठेवि-

तात त्यांच्या कार्याचा नाश होतो. ज्या पुरुषाची प्रशंसा कपटी, भाट, अथवा व्यभिचारिणी स्त्रिया करतात तो फार दिवस जिवंत राहात नाहीं. हे राजा, ज्याचें तेज अमित, ज्याचीं धनुष्यें बहुत मोठीं, बाण तीक्ष्ण, अशा पांडवांचा त्याग करून दुर्योधनाचेठायीं ऐश्वर्याचा भरंसा ठेविला आहेस खरा; परंतु ऐश्वर्यमदानें उन्मत्त झालेला बलिराजा त्रैलोक्याच्या राज्यापासून जसा भ्रष्ट झाला तसा दुर्योधनास राज्यापासून भ्रष्ट झालेला लौकरच तूं पाहाशील. अशी कथा या अध्यायांत आहे.

३९. अध्याय एकूणचाळीसावा.— धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, हा मनुष्य कांहीं कार्य करण्याविषयीं समर्थ होत नाहीं. ईश्वरी सत्तेचे स्वाधीन आहे. जशी बाहुली दोरी हालविणाराचे स्वाधीन असते तसा हा पुरुष दैवाचे स्वाधीन होऊन दैव जिकडे नेतें तिकडे जातो. दैव जें करवितें तेंहा करतो. असा माझा निश्चय आहे, ह्मणून मनुष्याचे हातीं कांहींच नाहीं. तस्मात् तूं काय बोलणार तें बोल मी श्रवण करितों. विदुर बोलतो राजा, बोलूं नये अशासमयीं बृहस्पतीही बोलला असतां त्याच्या बुध्दीचा अवमान होऊन तो अवमान पावतो असें आहे तर मग आमची कथा कायि? तूं आमच्याकडून बोलवितोस ह्मणून आह्मीं बोलतों ऐक. ज्यापासून द्रव्यप्राप्ति होते तो आपणास प्रिय आहे अथवा बुध्दि सांगतो तो, जो प्रियभाषण बोलतो तो अथवा उत्तम विचार सांगतो तो असे प्रियपदार्थ आहेत खरे, परंतु त्यांचें कर्म त्यांनीं न केलें ह्मणजे ते अप्रिय होतात तसा मी नव्हे. यास्तव या काळीं माझ्या भाषणाच्या अनादर करूं नको. यांत तुझें बहुत हित आहे. जो निरंतर प्रिय तो सर्वांस प्रियच असतो. कधींही अप्रिय होत नाहीं. जो आपणास आवडत नाहीं त्याचेठायीं सगुणत्व जरी असलें तरी तें दुर्गुण असें वाटून त्याजवर प्रीति बसत नाहीं आणि ज्यावर आपली प्रीति त्याचेठायीं जर दुर्गुण आहेत तर ते सगुणासारखे वाटतात. जो आपला द्वेषी आहे तो आपल्यास कधींही साधु अथवा पंडित न वाटून पापीच आहे असें वाटत असतें. जो प्रिय आहे त्यानें कांहीं जरी केलें तथापी तें शुभच आहे असें वाटतें. हे राजा, दुर्योधन ज्या काळीं जन्म-

ला त्याकाळीं तुला मीं सांगितलेंच होतें कीं, या पुत्राचा त्याग केल्यानें तुझ्या शंभर पुत्रांचें कल्याण होईल. न त्याग केलास तर शंभर पुत्र नाशाप्रत पावतील. ही माझी बुध्दि तूं ऐकलीस नाहींस. ज्या ज्या बुध्दीच्या योगें बहुत हानी होत असेल ती कोणाची ऐकूं नये. परंतु ज्या बुध्दीनें अल्प हानि होऊन मोठा लाभ होतो. ती हानि झाली असें समजूं नये. ज्यांत लाभ अल्प आणि नाश फार त्यासच हानि ह्मणावें. कोणी गुणांनीं समृध्द असतात, कोणी द्रव्यानें समृध्द असतात या उभयतांमध्यें गुणांनीं हीन असून, धनानेंमात्र समृध्द आहेत त्यांचा त्याग करावा. धृतराष्ट्र ह्मणतो हे विदुरा, तूं कल्याण उपयुक्त प्राज्ञलोकांस जें संमत असें भाषण केलेंस तें सर्व मला मान्य आहे खरें परंतु मी काय करूं. पुत्राचा त्याग करण्याविषयीं माझी इच्छा होत नाहीं, परंतु इतकें खरें आहे कीं, जिकडे धर्म तिकडे जय आहे. विदुर भाषण करतो हे राजा, जो सर्व गुणांनीं युक्त असून ज्यास कांहीं विनय नाहीं तो प्राणिमात्राचा उपमर्द करण्यास कधींही उपेक्षा करणार नाहीं. यास्तव गुण युक्त असून जो परम नम्र आहे त्याजपासून कोणाचाही नाश व्हावयाचा नाहीं. दुसऱ्यावर आळ घालण्याविषयीं जो उत्सुक व दुसऱ्यास दुःख होण्याची ज्याची निरंतर इच्छा, उभयतांचा कलह व्हावा ह्मणून ज्याचा यत्न, ज्याचें दर्शन झालें असतांही मोठा दोष उत्पन्न होतो, ज्याचा सहवास झाला असतांही मोठें एकादें भय होतें, ज्यापासून अर्थ प्राप्ति झाली असतां महान् दोष आहे, त्यास द्रव्य दिलें असतां महान् भय होतें, विरोध होण्याविषयीं ज्याचा स्वभाव व निरंतर कामी, निर्लज्ज, शठ, ज्याची पापी ह्मणून कीर्ति झालेली इतके सहवास करण्यास मोठे अयोग्य आहेत व दुसरेही आणखी बहुत दोष आहेत त्या दोषांनीं युक्त जे त्यांचा सहवास करूं नये. कारण कीं या पुरुषांची मैत्री फुटली असतां आपण केलेली प्रीति किंवा उपकार अथवा इष्टत्वांतले, त्यांस प्राप्त झालेलें सुख तें सर्व व्यर्थ जाऊन तें आपली निंदा करण्यास प्रसक्त होतात आणि आपला नाश होईल त्या उद्योगांत असतात. यास्तव उत्तमाशीं स्नेह अथवा मैत्री करावी. कारण कीं त्याचा व आपला विघाड झाला असतां आपल्यास त्याजपासून कधींही अपकार

होणार नाहीं. थोडाही अन्याय झाला तरी जो क्षमा करीत नाहीं असा जो नीच, क्रूर कुमनुष्य त्यापासून बुद्धिमानानें फार दूर असावें. आपले ज्ञातींतील कोणीं दरिद्री, दीन, रोगी आहे त्याजवर जो कृपा करतो त्याची संतति संपत्ति वृद्धिंगत पावते आणि बहुत सुख प्राप्त होतें. आपलें कल्याण व्हावें म्हणून ज्याची इच्छा आहे त्यानें आपली ज्ञाति वृद्धि व्हावी याचा यत्न करावा. यास्तव हे राजा, तूं कुळाची वृद्धि कर. ज्ञातीचा वध करूं नको. ज्ञातीचा सत्कार केलास तर मोठें यश पावशील. आपल्या ज्ञातींतील मूर्ख जरी आहेत तथापी त्यांचें रक्षण करावें. मग तुझ्या प्रसादाची इच्छा करणारे, गुणवान् जे पांडव कुरुवीर यांजवर कृपा कां करीत नाहींस? त्यांस कांहीं ग्राम देऊन जीविकेची सोय करावी. असें केलें असतां या लोकीं तुझें यश वृद्धींगत पावेल. हे तात, तूं वृद्ध आहेस. पांडुपुत्रांचें रक्षण तूंच केलें पाहिजे. मीही राजा, तुझा हितेच्छु आहें. तुला हितच सांगेन. शुभार्थी जो आहे त्यानें ज्ञातीशीं विग्रह करूं नये. ज्ञातीशीं सहवर्तमान मिळून असून सुखें भोगावीं. ज्ञातीशीं सहवर्तमान भोजन, त्यांच्याशीं भाषण, परस्पर प्रीति, हीं केली असतां ज्ञातीशीं विरोध होत नाहीं. ज्ञातीशीं विरुद्ध झालें असतां तो बुडेल. ज्ञातीशीं सख्य केलें असतां तीच ज्ञाति तारील, यास्तव हे राजेंद्र, पांडवांशीं सख्यपणा व सुजनपणा धारण कर. तेणेंकरून शत्रु तुझा विनाश करण्यास समर्थ होणार नाहींत. आपण श्रीमान असें जाणून आपले ज्ञातींतील आपले कडे आला असतां त्याचा सन्मान न घेईल तर मृगास मारणारा जो व्याध यास जें पाप लागतें तें पाप ज्ञातीचा असत्कार करणारा त्यास लागतें, तुझ्या पुत्रांनीं पांडवांस मारिलें, अथवा पांडवांनीं तुझ्या पुत्रांस मारिलें, तरी फळ सारखेंच. दोहींकडून तुला पश्चात्ताप होईल, याचा विचार कर. शेवटीं चिंताग्रस्त होऊन कर्माचा पश्चात्ताप करीत शोक पावशील. यास्तव जेणेंकरून ते जिवंत राहातील याचा उपाय पूर्वींच करून ठेव. आजपर्यंत जी गोष्ट झाली ती झालीच. बुद्धिमान लोकच सावध होतात. आजपर्यंत तुझ्या दुर्योधनानें जें पातक केलें तें केलें. कुलवृद्ध जो तूं त्या पापाचें निरसनही केलें नाहींस. आतां तरी पांडवांचें पद आहे तें त्यांस देऊन संतुष्ट कर. तेणेंकरून तूं या लोकीं पूजनीय

होईल. उत्तम उपदेश करणारे यांचीं भाषणें ऐकून त्याचा निश्चय जो करतो आणि त्याप्रमाणें जो आपली वर्तणुक ठेवितो त्याची कीर्ति वाढते. जें केलें असतां निश्चयेंकरून पातक होणार हें समजून जो तें कर्म आरंभित नाहीं तो वृध्दिंगत पावतो. जो मागें केलेलें पापकर्माचा विचार न करून तशींच पुढें पापकर्मे करीत जातो तो घोर नरकांत पडतो. मद्यपान, निद्रा, दुसऱ्यानें पाठविला जो दूत त्याची बातमी न ठेवणें. मुखछाया, दुष्टावर विश्वास, अज्ञाणी सेवक या साहा द्वारांनीं आपला मंत्र म्हणजे मसलत दुसऱ्यास कळते तो मंत्रभेद झाला असतां पंकांत जशी गाय निमग्न होते तसा तो संकटसागरांत निमग्न होतो. जो धर्मार्थ काम यांचेठायीं लक्ष्य ठेवितो तो शत्रूस जिंकला जात नाहीं. सर्वकाल त्याचा शत्रूवर चढच होईल. ज्यानें शास्त्राध्ययन केलें नाहीं, वृध्धांची सेवाही ज्यास घडली नाहीं, त्या मनुष्याच्या ज्ञानाची वृध्दि न होऊन तो अनंत दुःखें भोगतो. आपण बृहस्पतीसमान जरी आहों तथापी धर्मार्थ तत्वें अवश्य जाणलीं पाहिजेत. जो दुसऱ्याचें भाषण ऐकत नाहीं त्यास उपदेश केला असतां समुद्रांत पडलेली वस्तु जशी नष्ट होते तसा तो उपदेश थोर लोकांचा नष्ट झाला म्हणून समजावा. जडमतीस उपदेशिलेलें शास्त्र तें व्यर्थ. अग्निवांचून जें हुत केलेलें होमद्रव्य तें व्यर्थ. कोणाशीं स्नेह मैत्री कर्तव्य झाल्यास त्याची कीर्ति कशी आहे याचा शोध करावा, मग स्वतः त्यास पाहावें, कुलशील कसें आहे याची चोकशी करावी आणि परीक्षेस चांगला आला म्हणजे पश्चात् राजानें त्या मनुष्याशीं मैत्री करावी. नम्रता धारण केल्यानें अपकीर्तीचा नाश होतो, पराक्रम केला असतां अनर्थाचा नाश होतो, क्षमा क्रोधाचा, धर्माचरण दुर्लक्ष्याचा नाश करितें. कोणाच्या कुलाची परीक्षा कर्तव्य असेल तर उपजीविकेचें साधन, जन्मस्थान, घरदार, वस्त्रपात्र, भोजन, आचरण इत्यादिकांनीं परीक्षा करावी. एकादे वेळेस कांहीं एक मनोरथ उत्पन्न झाला असतां त्याचा परित्याग अथवा तिरस्कार संन्याशी जरी आहे तरी तो करण्यास समर्थ होणार नाहीं. मग गृहस्थाश्रम्याची कथा काय आहे, यास्तव जो मनाचा निग्रह करतो तो या लोकीं धन्य धन्य समजावा. जो थोर सज्जन याची संगति,

तसेंच विद्वान, धार्मिक, प्रियदर्शी, मित्रवंत, स्रुभाषण करणारा, हृदया-
चा जो निर्मळ याचें परिपालन जो करतो तो या लोकीं चिरकाल सुखी रा-
हातो तसाच कीर्तिमानही होतो. जो कोणी उत्तम अथवा अधम कुलांत
जन्मला असून थोराची अवमर्यादा उल्लंघीत नाहीं आणि स्वधर्माची अपे-
क्षा धरतो, नम्रतेनं वागतो. एकादे वाईट कर्म करण्यास सलज्ज होतो तो
शंभर कुलीनांपेक्षां श्रेष्ठ होय. ज्या उभयतांचें आचरण, व्यवसाय, ज्ञान
समान आहे त्या पुरुषांची मैत्री बहुत दिवस चालते. जो दुर्बुध्दि, महामू-
र्ख त्याच्याशीं मैत्री केली असतां तृणाछादित कुप जसा घात करतो त-
शी मूर्खांची मैत्री घात करील. यास्तव त्याची मैत्री सुज्ञांनीं वर्जावी. भ्रष्ट,
मूर्ख, कोपी, अविचारी, अधर्मी, यांच्याशीं मैत्री करूंनये. केलेला उपका-
र जाणतो, धार्मिक, सत्यवादी, मनाचा गंभीर, स्नेहास दृढ, जितेंद्रिय, उ-
त्तम स्थीतीत राहाणारा, स्नेहाचा त्याग न करणारा, इतक्यांशीं मैत्री करा-
वी. या मित्रांचा त्याग कधींही करूंनये. इंद्रियांपासून विषय सोडविणें हें
कर्म मृत्यूपेक्षांही श्रेष्ठ आहे. एकवेळ विषय सोडविले असतां पुनः विष-
यांवर इंद्रियांची प्रीति ठेवणें या सारखें लाजिरवाणें कोणचेंच कर्म नाहीं.
सर्व प्राणिमात्राशीं मृदु असणें, दुसऱ्यास दोष न ठेवणें, क्षमा, धैर्य यांचा सं-
ग्रह करणें, मित्राचा अपमान न करणें, इतकीं कृत्यें आयुष्याची वृध्दि क-
रणारीं होत. कुमार्गानें द्रव्य गेलें हें पाहून पुढें जो सावध होतो आणि अव-
शिष्ट राहिलेले द्रव्याचा व्यय चांगला करूं इच्छितो तो मतिमान प्राज्ञ जा-
णावा. जें दुःख पुढें होणार त्याचा प्रतिकार करण्यास आजपासून उद्यो-
ग करतो व सांप्रत जें होत आहे तें भोगल्यावांचून सरणार नाहीं असें
जाणून जो वर्ततो, मागें जें दुःख भोगिलें त्याचा अनुभव विसरत नाहीं
असा जो मनुष्य त्याचीं सर्व कार्यें सिध्दीस जातात, त्याच्या कामांत विघ्न
येत नाहीं. काया वाचा मनें करून जीं कर्में कराचीं तीं तीं साध्य होतात.
यास्तव जें कर्तव्य कर्म तें मनःपूर्वक करावें ह्मणजे इष्टसिध्दि होते. मंग-
ळ पदार्थांस स्पर्श करणें, सात्याची अनुकूलता, शास्त्रज्ञान, उद्योग, स-
र्वांशीं सरळपणा, साधूंचा समागम हीं साहा ऐश्वर्य देणारीं आहेत ह्मणून

इतकीं प्राप्त होण्याचा उपाय करीत असावा. हे राजा, निरंतर जो उद्योगी आहे त्यास धन, कल्याण, सुख यांची प्राप्ति होते, यास्तव उद्योगावांचून कालक्षेप करूं नये. क्षमे सारखें हितकारी या लोकीं नाहीं. यास्तव राजांनीं क्षमायुक्त असणें हें त्यांचें अत्यंत भूषण आहे. क्षमेसारखें पथ्य दुसरें कोणचेंच नाहीं. शक्तिवान् असून क्षमावान् असेल तर तो अत्यंत शोभतो. जो आपली वृध्दि असावी म्हणून इच्छीत असतो त्यानें क्षमा धरावी. ज्यासुखाच्या सेवनें करून धर्मार्थांपासून भ्रष्ट होत नाहीं त्याच सुखाचा अंगिकार करावा. दुःखानें झालेले उन्मत्त, नास्तीक, आळशी, इंद्रियें ज्यांच्या स्वाधीन नाहींत ते व उत्साहरहित आहेत ते इतक्यांपाशीं लक्ष्मी राहात नाहीं. जो सर्वांशीं अर्जवानें वागून संकोच धरतो त्यास अशक्त असें मानून कुबुध्दीनें दुष्टनें बहुत उपद्रव देतात. जो कुटिल नव्हे, उदार, शूर, अत्यंत प्रामाणिक आणि प्रज्ञावान इतक्या लोकांपाशीं लक्ष्मी राहात नाहीं. ही लक्ष्मी उन्मत्त बैलासारखी अंध आहे. ही गुणवानाच्या घरीं राहातें असा निश्चय नाहीं, अथवा निर्गुण्याच्या घरीं राहाते असेंही नाहीं. उभयतां मध्यें कोठें तरी असत्ये. या लक्ष्मीच्या स्थितीचा नेम कांहींच सांगतां येत नाहीं. वेदाध्ययनाचें फल अग्निहोत्र, शास्त्राध्ययनाचें फल उत्तम स्वभाव. स्त्रीचें फल रति व पुत्र. धनाचें फल त्याग व भोग अशीं फलें आहेत. अधर्मानें संपादित द्रव्यानें जो यज्ञयागादिक क्रिया करतो त्यानतपासून पूर्ण फल प्राप्त होत नाहीं; यास्तव धर्मानें अर्थ संपादावे. घोर अरण्य, वन, दुर्ग, दुःखकारक आपत्ति. जो कोणी शस्त्र घेऊन मारण्यास आला इतक्यांपासून जे सात्विक व धैर्यवान् आहेत ते भय पावत नाहींत. उद्योग, इंद्रियनिग्रह, दक्षता, सावधपणा, धैर्य, स्मृति, विचारपूर्वक कर्म करणें इतकीं ऐश्वर्याचीं मूळें आहेत. तापसी याचें बल तप, ब्रह्मवेत्त्याचें ब्रह्म, असाधूचें हिंसा, गुणवान् याचें क्षमा अशीं बलें आहेत. जल, मूळ, फल, दुग्ध, हवि, ब्राह्मण वचन, गुरुवचन, औषधी हीं आठ व्रताचा नाश करीत नाहींत. आपला जीव तसाच दुसऱ्याचा जीव आहे असें मानणें, आपल्यास जें वाईट तें दुसऱ्यांस वाईट असें जाणून जो वर्ततो त्यानें सर्व धर्मांचें सार

जाणलें असें समजावें. शांतीनें क्रोध, साधुत्वानें दुष्ट, दानानें कृपण, सत्यानें अनृत हीं जिंकावीं. स्त्री, धूर्त, आळशी, भीरू, अत्यंत क्रोधी, मानी पुरुष, चोर, कृतघ्न, नास्तिक, इतक्यांवर विश्वास ठेवूं नये. निरंतर जो आपल्या वडिलांचें सेवन करतो त्याची कीर्ति, आयुष्य, बल, यश यांची वृद्धि होते. हे राजा, अत्यंत क्लेशानें, धर्माच्या अतिक्रमानें अथवा शत्रूस शरणांत जाऊन अर्थ संपादन करण्याविषयीं मन करूं नको. अविद्वान पुरुष, प्रजारहित मैथुन, आहाररहित प्रजा, राजानें विरहित राष्ट्र हीं शोकास कारणें आहेत. मार्गातिक्रमण करणें मनुष्यास, पर्वतास जल, स्त्रियांस असंभोग, मनास वाक्बाण त्या जरा आहेत. वेदास अभ्यास नसणें हा मल आहे. ब्राह्मणास व्रत न करणें. बाल्हिक देश पृथ्वीस, पुरुषास अनृत, साध्वी स्त्रियांस गीतादिक, स्त्रियांस प्रवास करणें, सोन्यास रुपें, रुप्यास कथील, कथिलास शिसें, शिशास मृत्तिका हे मल आहेत. शयनानें निद्रा, कामानें स्त्रिया, इंधनानें अग्नि, पानानें सुरा, हीं जिंकलीं जात नाहींत. इतक्यांचा जय कर्तव्य तर यांजकडे अलक्ष्य ठेविलें असतां जय होतो. ज्यानें दानानें मित्र, युध्दांत शत्रु, अन्नपानादिकेंकरून स्त्रिया हीं जिंकलीं असतील. त्याचें जीवित्व या लोकीं सफल आहे. ज्यांपाशीं सहस्त्रावधि द्रव्य आहे ते वांचतात. ज्यांपाशीं शतशः रुपये असतील तेही वांचतात. ज्यांपाशीं द्रव्य नाहीं तेही धृतराष्ट्र राजा वांचतात. यास्तव अधिक इच्छा सोडून जें परमेश्वर देईल त्यांत संतुष्ट असावें. या पृथ्वीवर तांदूळ, सुवर्ण, यव, पशु, स्त्रिया, द्रव्य हीं एका पुरुषास जरी प्राप्त झालीं तथापी मनुष्याची तृप्ति होणार नाहीं. हे राजा, तुला वारंवार सांगतों कीं, पुत्र व पांडव यांच्यागयीं समदृष्टि ठेव. यांत तुझें कल्याण आहे. अशी कथा या अध्यांत आहे.

४०. अध्याय चाळीस:- विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा, ज्याचा साधूनीं सत्कार केला, जो आपलें शक्ति बल पाहून कार्यास आरंभ करतो, ज्यानें आपला अभिमान सोडला आहे अशा पुरुषास यश प्राप्ति तत्काळ आहे. साधु सा. पुरुषाची स्तुति करतात. हा पुरुष संत पदवीस योग्य

आहे. अधर्मानें मोग द्रव्य लाभ होत असून त्याजकडे जो दृष्टि ठेवीत नाहीं तो जीर्ण त्वचा टाकून सर्प जसा सुख पावतो तसा हा पुरुष सर्व दुःखें टाकून बहुत सुखी होतो. अनृत मार्गानें मोठेपणा मिळविणें, राजापाशीं राहून दुसऱ्याचें पैशून्य सांगणें, आपल्या गुरूपाशीं अगर आपले वडिल असतील त्यांशीं वंचना करणें हीं तिन्हीं पातकें ब्रह्महत्येसमान जाणावीं. दुसऱ्याशीं असूया करणें हाच मृत्यु, अतिवाद करणें हाच लक्ष्मीचा नाश, गुरूची सेवा न करणें, स्वल्प दिवसांत बहुत विद्येची इच्छा, स्वल्प विद्या असून बहुत विद्येचा डौल लोकांत घालणें हे तीन विद्येचे शत्रु आहेत. आलस्य, मद, मोह, चंचलपणा, गोष्टी सांगणें, स्तब्ध असणें, अभिमान आणि लोभीपणा, हे सात दोष विद्येच्छूनें अवश्य टाकिले पाहिजेत. सुख इच्छिणारास विद्या नाहीं व विद्या इच्छिणारास सुख नाहीं, यास्तव सुखाची इच्छा असेल त्यानें विद्या टाकावी, अथवा जो विद्यार्थी असेल त्यानें सुख टाकावें. दोन्हीं एकास कधीं घडत नाहींत. काष्ठानें अग्नि, नद्यांच्या प्रवाहानें समुद्र, सर्व प्राणिमात्रांच्या मृत्यूनें यम, पुरुषांच्या संबंधानें स्त्रिया तृप्त होत नाहींत. आशा धैर्याचा, यम समृद्धीचा, क्रोध लक्ष्मीचा, कार्पण्य यशाचा, दृष्टि न ठेविल्यानें पशूंचा, ब्राह्मणास क्रोध आला असतां तो सर्व राष्ट्राचा नाश असे हे नाश करतात. अजा, कांस्य, रौप्य, श्रोत्रिय, विषाकर्षण करणारा पक्षी, ब्राह्मण, आपल्या ज्ञातींतील वृद्ध, कुलीन पुरुष त्यांचें तूं आपले घरीं रक्षण कर. तसेंच अजा, वृषभ, चंदन, वीणा, आदर्श, मधु, घृत, लोह, ताम्रपात्र, दक्षिणावर्त शंख, स्वर्णनाभ शालिग्राम, गोरोचन, हे पदार्थ पुण्यकारक आहेत. देव, ब्राह्मण, अतिथी यांचे पूजेकरितां या पदार्थांचा आपले घरीं संग्रह करावा. हे राजा, तुला शेवटली गोष्ट सत्य सांगतो. अति काम, भय, लोभ, जीवित्व यांसाठीं धर्माचा त्याग करूं नको हा सर्वांहून मोठा मार्ग आहे. धर्म हा पदार्थ अविनाशी आहे. सुख दुःख हे दोन्हीं पदार्थ तर नाशिवंत आहेत. जीव हा पदार्थ अनाशवंत आहे. जिवाचा हेतु जीकायाती नाशवंत आहे. तस्मात् नाशवंत पदार्थांचा त्याग करून अ-

नाशवंत पदार्थांचा अंगिकार कर. निरंतर संतुष्ट असणें यांनच उत्तम अर्थ लाभ आहे. सर्व लाभांत संतोष मोठा लाभ आहे. मोठे पराक्रमी राजे धन धान्यपरिपूर्ण पृथ्वीचें पालन करून व नानाप्रकारचे भोग भोगून संतोषत पावतां शेवटीं राज्याचा त्याग करून अंतकाळीं यमाचे स्वाधीन झाले. या मृत्यलोकाची वस्ति नाशवंत आहे. बहुत क्लेशानें वृद्धिंगत केला असा आपला परमप्रीतीचा पुत्र मरण पावला असतां स्त्रीपुरुष मुक्तकेश होऊन त्या पुत्राकरितां रडतात. नंतर चितेवर आपले हातानेंच ठेवितात आणि दहन करतात. त्यानें संपादलेलें जें द्रव्य त्याचा उपभोग दुसरेच घेतात. पाप अगर पुण्य जें त्यानें केलें असेल तें मात्र प्राण्याबरोबर जातें, बाकी पृथ्वीवर राहातात. यास्तव हे राजा, जें आपल्या बरोबर परलोकीं धन येऊन सुख होईल तें धन संपादन कर. कदाचित्त तूं म्हणशील हे आमचे संबंधीआप्तिकरून परलोकीं उपयोगी पडतील तर तें सर्व मिथ्या आहे. पुष्प व फलरहित वृक्षाचा त्याग करून पक्षी जसे अन्यत्र जातात, तसे हे ज्ञातिसोयरे अंतकाळीं तुझा त्याग करतील आणि वाईट अथवा चांगले फलाचा भोक्ता एकटा तूं राहाशील. जसा वर स्वर्गलोक एक आहे तसाच खालीं एक नरकलोक आहे तो नरकलोक इंद्रियांनीं मोहित जो तूं तो तुला स्पर्श न करो. हें माझें भाषण यथार्थ श्रवण करून त्याप्रमाणें वागशील तर या लोकीं तुझी मोठी कीर्ति होऊन परलोकीं सुख पावशील. हे धृतराष्ट्र राजा, जीवात्मा हा एक नदी आहे. हीत पुण्य हें तीर्थ. सत्य हें उदक, धैर्य हीं दोन तटें आहेत. दया ह्या लहरी या तीर्थांत ज्यानें स्नान केलें त्याचें पाप लयास जाऊन तो पवित्र होतो. अलोभी आहे तोच या नदींत स्नान करून उत्तम गतीस जातो. काम आणि क्रोध हे दोन ज्या नदींत मोठे मगर आहेत, पांच इंद्रियें हीं जल होय. या नदींतून तरून जाण्यास धैर्यरूप नौका करून जन्ममरण प्रवाहांपासून तरून जा. प्रज्ञा, धर्म, विद्या आणि वय येणेंकरून वृध्द असा जो आपला बंधु यास विचारून कार्याचा जो आरंभ करतो तो कधीं मोह पावत नाहीं. यास्तव वृधांचें अनुमोदन घेतल्यावांचून जो कांहींएक कर्म आरंभितो तो शेवटीं आपले प्राणास मुकतो. भोजनाची इच्छा धैर्यानें जिंकून शिश्नोदरांचे

दोषांपासून रक्षण करावें. ते त्यांनीं हस्त पाद, मनानें चक्षुश्रोत्र, कर्मानें मन आणि वाणी यांचें रक्षण करावें. जो नित्य यथाकालीं स्नानसंध्यादि नित्य कर्में कर्तव्य यांचा अतिक्रम करीत नाहीं, नित्य यज्ञोपवीत धारण करतो, निरंतर वेदाध्ययन करतो, पतिताचें अन्न भक्षण करीत नाहीं, सत्य भाषण करतो, सत्कर्म आचरण करतो तो ब्राह्मण कधींही ब्रह्मलोकापासून भ्रष्ट होत नाहीं. निरंतर वेदाध्ययन करतो, नानाप्रकारच्या यज्ञयागादि क्रिया करतो, प्रजेचें पालन उत्तम यथाशास्त्र जो करतो, गोब्राह्मणांचे रक्षणाकरितां जो आपल्या आत्म्याचा त्यागही करतो, अथवा संग्रामांत मरण पावतो असा क्षत्रिय स्वर्गलोकीं राहाण्यास योग्य होतो. जो निरंतर वेदाध्ययन करतो, आपलें धन यथाकालीं ब्राह्मण, क्षत्रिय आश्रित यांस विभागून त्यांचें पोषण करतो. यज्ञादिकांचा धूर ज्यानें अवघ्राण करतो तो वैश्य मरण पावल्यावर दिव्य स्वर्गसुखाचा उपभोग करतो व. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांची निरंतर जो शूद्र सेवा करून त्यांचा संतोष करतो, तो त्यायोगें दग्धपाप होऊन आपला देह टाकून स्वर्गसुखाचा उपभोग करतो. हे राजा, तुला या प्रसंगीं चातुर्वर्ण्य धर्म सांगितला; परंतु याचा हेतु काय म्हणून सांगितला नाहीं, तर या धर्मप्रतिपादनाचा हेतु सांगतो ऐक. हा पांडुपुत्र क्षत्रियधर्मापासून भ्रष्ट झाला आहे. यास्तव याला राज्याचे ठायीं आरूढ कर हें माझें वर्णाश्रमधर्म सांगण्याचें तात्पर्य होय. असें विदुराचें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा बोलतो. हे विदुरा, हा कालपर्यंत जो तूं मला उपदेश केलास तो मी समजलों. माझी ही मति चांगली झाली. पांडवांचे ठायीं उत्तम बुद्धि मी धरितों, परंतु दुर्योधनाची माझी पुनः भेट झाली म्हणजे बुद्धीस विपर्यास होतो. तस्मात् हे विदुरा, दैवाचें अतिक्रमण करून जाणें कठीण आहे. दैवच प्रधान, पौरुष निरर्थक आहे, असा निश्चय आतां झाला. अशी कथा या अध्यायांत आहे.

४१. अध्याय एकेचाळीस.— धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, या गत अध्यायीं ब्रह्मविद्याधिकाराचें साधन सांगितलेंस व कचित् प्रसंगानें संक्षेपानें ब्रह्मविद्या सूचित केलीस ती विस्तारानें मला सांग. असा धृत

राष्ट्राचा प्रश्न ऐकून विदुर बोलतो. हे राजा, सनत्सुजातानें मृत्यूच नाहीं असें सांगितलें. तो तुला गोप्ययोग कर्मादिक व शमादिक सकल तुझ्या मनांतील धर्म सांगेल. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, ते ब्रह्मतत्व तूं मला कां सांगत नाहींस? सनत्सुजात सांगतील असें कां ह्मणतोस असें ऐकून विदुर बोलतो हे राजा, मी शूद्र योनीमध्यें उत्पन्न झालों आहें यास्तव मी तें तत्व सांगण्यास अयोग्य आहें. सनत्सुजात तुला सांगतील. तेही मोठे बुद्धिमान आहेत. त्यांची बुध्दी परम शाश्वती आहे. जो ब्रह्मयोनीच्याठायीं उत्पन्न झाला असेल त्यानें ब्रह्मतत्वमार्गाचा उपदेश केला असतां तो दोषी व देवतांनीं निंदित होत नाहीं. धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, सनत्सुजात हे मला येथें येऊन कसे भेटतील. याचें उत्तर सांग. वैशंपायन ह्मणतात हे जन्मेजया, इतकें धृतराष्ट्रानें भाषण ऐकून निश्चितमति जो सनत्सुजातनामक ऋषि यांच्या दर्शनाची चिंता करीत विदुर बसला असतां त्याचें चिंतित पूर्ण करावें ह्मणून तत्क्षणीं सनत्सुजात विदुरास दर्शन देण्याकरितां आला असतां विदुरानें आसन देऊन सुखें करून बसविलें आणि ऋषीस भाषण केलें. हे भगवान्, धृतराष्ट्राच्या मनांत कांहीं संशय उत्पन्न झाला आहे त्याचें समाधान करावें. त्या संशयाची निवृत्ति करण्यास मी योग्य नाहीं. तुह्मीच योग्य आहांत. जें ब्रह्मतत्व ऐकलें असतां सर्व दुःखांपासून राजा मुक्त होईल आणि लाभालाभ प्रियाप्रिय यांचेठायीं समबुध्दि होऊन जरा आणि मृत्यु, हे उपद्रव करणार नाहींत, भय आणि मत्सर, क्षुधा, तृषा, मद, कामक्रोध यांच्या स्वाधीन होणार नाहीं. क्षय आणि उदय यांपासून मुक्त होईल तें ब्रह्मतत्व धृतराष्ट्र राजास तुह्मी सांगा. अशी कथा या अध्यायांत आहे.

४२. अध्याय बेचाळीस:— वैशंपायन ह्मणतात हे जन्मेजया, इतकें विदुरानें सनत्सुजाताशीं संभाषण केलें असतां राजानें तें ऐकून सनत्सुजाताचा मोठा सत्कार व पूजा केली आणि एकांतीं ब्रह्मविद्येच्या तत्वाचें ज्ञान व्हावें ह्मणून प्रश्न केला कीं, हे सनत्सुजात, तुह्मी मृत्यूच नाहीं ह्मणतां असा तुमचा प्रवाद म्यां ऐकिला आहे हें सत्य आहे काय? सत्य

आहे असें जर ह्मणावें तर देव व असुर यांनीं मृत्यूपासून तरावें ह्मणून ब्रह्मचर्यव्रत धारण केलें तें कसें?असें ऐकून सनत्सुजात ह्मणतात हे राजा ब्रह्मचर्यव्रताचरणें करून मृत्यु येत नाहीं. असें कथन केलें आहे आणि मी तर मृत्यूच नाहीं ह्मणतों तेव्हां यांत मोठा संशय आहे असें कदाचित् तूं ह्मणशील तर कांहीं संशय धरूं नको. या संशयाचें निराकरण होण्यास योग्य उत्तर सांगतों. ऐक, मृत्यु नाहीं, याचा पारमार्थिक अर्थ असा आहे कीं, एकाच पुरुषाला अवस्थाभेदानें मृत्यु आणि अमृत्यु दोन्हीही सत्य आहेत असें जाण. जों कालपर्यंत अविद्यावस्था प्राण्यास आहे. तोंपर्यंत प्रमाद हाच त्याचा मृत्यु होय आणि जे विद्या, ज्ञान, वैराग्य संपन्न झाले त्यांनीं या जगतास ब्रह्माधिष्ठानीं, दोरीस सर्प मानणें हें जसें खोटें त्याप्रमाणें मानलें आहे. त्यास कालत्रयीं कधींही मृत्यु नाहीं, ह्मणजे प्रमाद त्यापासून कधींही होत नाहीं. तेव्हां अप्रमादी असणें यासच मृत्यूचा अभाव असें मी ह्मणतों आणि इतरही प्रमाणें अशींच आहेत कीं, आत्मस्वरूपास न पाहाणें हाच मृत्यु. आत्मतत्वाविषयीं निर्मोह असणें त्यास मोक्ष ह्मणावें. मृत्यु ह्मणजे कांहीं एक व्याघ्रासारखा हिंसक प्राणि असून जंतु भक्षण करतो असें नाहीं व याचें रूप पाहूं इच्छिलें असतां दृष्टीस पडत नाहीं. कोणी ह्मणतात कीं, अज्ञान हाच मृत्यु, मूढ ह्मणतात कीं, यम हाच मृत्यु आहे परंतु हें सर्व मिथ्या. कोणाचें ह्मणणें असें आहे कीं, पितृलोकीं यम कोणी पुरुष आहे तो पाप्याचें शासन करतो आणि पुण्यवंताचें रक्षण करतो. हेंही आत्मकल्पितच होय. बरें मृगजलासारखा यम कल्पित आहे तर तो पाप्यास दंडादिक कसें करील, असें जर ह्मणशील तर सांगतों. जसा यक्ष तसा बली या न्यायेंकरून आत्म्याचे ठायीं कल्पित जो गरुडभाव तेणेंकरून विषयनिवृत्ति होते. तद्वत् या यमापासून दंडादिक हीं कल्पित असें जाण. या यमाच्या आज्ञेनें क्रोधादिरूप मृत्यु मरणास कारण उत्पन्न होतो. तशाच क्रोधाभिमानी देवता यमाच्या दासभूत होतात असें आहे. तात्पर्य जिवास अहंकार जो होतो त्या योगें आत्मज्ञान शून्य होऊन विषयोपभोग

करतां करतां जीव मृत्युवश होतात. कारण अज्ञानाश्रय जो अहंकार या चा नाश होतो. ह्मणून मुक्तीस योग्य न होतां मृत्यु वश होतात. ज्यांनीं आत्मतत्व जाणलें ते अहंकार शून्य होऊन मृत्यूस वश न होतां ब्रह्मानंद स्वरूपीं लीन होतात. आत्मज्ञान जर नसलें तर कामक्रोधादिकांस वश होऊन जीव या लोकापासून भ्रष्ट होऊन नरकीं जातो, तेथें साहाइंद्रियांचा ही नाश होऊन मृत्युवश होतो. त्यासच मृत्यु असें ह्मणतात. विचार पाहतां मृत्यु शब्दार्थ बहुत आहेत, परंतु सकलशास्त्रसिध्दांत पाहिला असतां मुख्य मृत्यु ह्मणजे जिवांस अज्ञान अवस्था प्राप्त होणें आणि यम ह्मणून जो सांगितला हा गौण मृत्यु होय. तूं कदाचित् ह्मणशील कीं, मरणापूर्वी मृत्यूचें भय नाहीं. मेल्यानंतर कृत कृत्यच झाला. तेव्हां मरणानें काय होतें तें ऐक. जे भोगानुरक्त भोगार्थ यज्ञयागादि क्रिया करून स्वर्गी गेले ह्मणून ते मृत्यूपासून सुटले असें नाहीं. पूर्वदेह नाश पावला ह्मणून मृत्यूपासून कोणी सुटला नाहीं. तर जोंपर्यंत शरीर आहे तोंपर्यंत मृत्यु आहेच. मग तो स्वर्गी असो अथवा मृत्युलोकीं असो. तात्पर्य इतकेंच आहे कीं, ब्रह्मप्राप्त्यर्थ अष्टांग योगांचा अभ्यास करून केवळ भोगार्थ ज्यांनीं कर्मे केलीं त्यांस भोगाकरितां ऊर्ध्व अधस्तिर्यक् योनी प्राप्त होऊन ते मृत्यूच्या मुखांत जाण्यास योग्य होतात यास्तव भोगार्थ कर्म करूं नये. कारण पुरुषाची मिथ्याभूत शब्दादि विषयांवर स्वाभाविक प्रीतीनें जी प्रवृत्ति होते तेंच इंद्रियांस महा मोहन होय. आणि विषयसंगानें व्यथित चित्त झाला ह्मणजे विषयांचें स्मरण करीत असतो. यास्तव त्याचें स्मरण करूं नये. केलें असतां विषयाची इच्छा होत्ये तनंतर कांहीं निमित्तानें त्या इच्छेचा नाश झाला ह्मणजे क्रोध उत्पन्न होतो. त्यापासून अजित चित्त प्राण्यास मृत्यु प्राप्त होतो. निष्काम आहेत ते धैर्यानें मृत्यूपासून तरतात. या मृत्यूपासून तरून जाण्यास योग्य तें आत्मस्वरूपाचें चिंतन करीत असावें. तेणेंकरून उत्पन्न झालेले जे कामक्रोधादिक यांचा नाश होतो. पुरुषानें निरंतर स्त्रियादिकांचे ठायीं अत्यंत अनादर युक्त असून त्यांचे ठायीं तृणवत् बुध्दि धरिली असतां कामादिकांचा नाश होऊन तो अज्ञान

रूपमृत्यूपासून मुक्त होतो. तात्पर्य, निष्कामी जे आहेत त्यांस मृत्युभय कधींही नाहीं असें जाण. कामानुसारी पुरुष निरंतर कामाच्या अनुरोधानें नष्ट होतो. मृग, मातंग, पतंग, भृंग, मीन या पांच प्राण्यांनी एकएक विषय जरी ग्रहण केला आहे तथापी ते प्राणापासून मुकतात. मग जो पुरुष पांच इंद्रियांनीं पांच विषय एकदां ग्रहण करतो तो नष्ट होईल यांत काय आश्चिर्य आहे. तस्मात् ज्यानें विषयाचा त्याग केला त्यानें आपलें सर्व पाप नाश करून टाकिलें असें समजावें. सर्व प्राणिमात्रास काम हाच कोणी एक अज्ञान नरकरूप दुःखास कारण आहे. हा भार्यादि प्रपंचांत नेऊन टाकितो. जसा मदिरामत्त झाला असतां इतस्ततः धांवत गर्तेंत पडतो. तसा कामी पुरुष संसाररूप गर्तेंत निमग्न होतो आणि त्यांत सुख नसतां सुख मानितो. हें जें प्राण्याचें अज्ञान यासच नरक म्हणावें. ज्ञानी पुरुषांस तृणमय व्याघ्रासारखा मृत्यु काय करणार आहे. तस्मात कामी पुरुषानें अज्ञानाचा नाश व स्त्रियादिकांचा धिःकार केला असतां कामाचा मूलोच्छेद होतो. तस्मात् हे धृतराष्ट्रा, काम, क्रोध आणि मोह हे तुझ्या शरिरांत राहिले आहेत असें जाण. यास्तव ज्ञानाच्याठायीं निष्ठा धरली असतां तू मृत्युभयापासून मुक्त होशील. हा देह अज्ञानबध्द आहे. याचा नाश ज्ञानानेंच केला पाहिजे. कर्मानें अज्ञानाचा नाश होणार नाहीं. म्हणून जन्ममरणास हेतु जे काम, क्रोध, मोह यांचा त्याग करून ज्ञान संपादन कर म्हणजे मृत्युभयापासून तरशील. या प्रकारें सनत्सुजाताचें भाषण ऐकून धृतराष्ट्र पुनः प्रश्न करतो. हे ब्रह्मन्, सोमपान, अश्वमेध, याग इत्यादि पुण्य कर्में करून इंद्रादिक लोकांपेक्षां जे पुण्यकारक सनातन लोक ते द्विजातीस प्राप्त होतात असें वेदानें सांगितलें आहे, तसेंच कर्मानें मोक्षादिक प्राप्त होतात असें वेदही सांगतात. तेव्हां कर्मानें मोक्ष प्राप्त होत असतां ज्ञान संपादन कशास करावें. हे विद्वन् याचें उत्तर सांगावें. असा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून सनत्सुजात ह्मणतात हे राजा, तुझ्या प्रश्नाचें उत्तर ऐक. अविद्वान आहेत ते उक्त कर्में करून कर्ममार्गानें इच्छीत लोकांस जातात. तेव्हां कर्म करणारास भोग व मोक्ष आहे असें वेदांनीं कथन केलें आहे. जे निष्काम आहेत ते सुषु-

प्रारब्ध नाडीच्या योगें अन्य लोकांचे साधनभूत जे मार्ग त्यांचें निरसनक-रून ब्रह्मरंध्रापर्यंत प्राणाचा निरोध करून मोक्षास जातात. असा पूर्णब्र-ह्मभाव पावून पुनः या सृष्टींत माघारे येत नाहींत. असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे ब्रह्मन्, जीवच ब्रह्मत्व पावतो. असें ह्मणावें तर अन्यास अ-न्य स्वरूपत्व घडत नसल्यामुळें ईश्वरच जीवत्व पावतो असें ह्मणणें अ-वश्य आहे; परंतु तो ईश्वर जन्मादिहीन असल्यामुळें त्यास योजणारा को-ण आहे? कदाचित् ईश्वरच सर्व जग उत्पन्न करून त्यांत आपणच प्रवेश करतो. असें ह्मणाल तर त्या ईश्वरास असें करण्याचें प्रयोजन कोणतें व त्यापासून सुख कोणतें? तें मला यथार्थ सांग. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐ-कून सनत्सुजात बोलतात, हे राजा, जीवात्मा आणि परमात्मा यांचा भेद नाहीं; परंतु अनादि स्थूलसूक्ष्म देहाच्या संबंधानें परमात्म्यापासून नित्य जीव हो-तात. तथापी त्या योगानें परमात्म्याचें आधिक्य नष्ट होत नाहीं. जसा जलां-तला चंद्र कंपित झाला असतां मुख्यचंद्र कंप पावत नाहीं. तसें ईश्वरास जीवाचें सुखदुःख घडत नाहीं. ईश्वर एकच असून जलचंद्रन्यायानें बहु-जीव स्वरूपानें प्रकाशित होतो. कारण अनादिकालच्या अज्ञानाच्या संबं-धानें ते जीव जन्मादिकांचें सेवन करतात. हा परमेश्वर नित्यानंदस्वरूपी विकाररहित असतां मायेच्या योगें समग्र विश्व उत्पन्न करतो आणि त्या-च्या स्वरूपीं स्वप्नवत् जगास भासविणारी त्याची एक शक्ति आहे. तिच्यायो-गें ईश्वर जगांत आसक्त होतो. ती शक्ति त्याच्या स्वरूपा हून निराळी नाहीं, याविषयीं वेदांत प्रमाण आहे. असें सनत्सुजाताचें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा पुनः प्रश्न करतो. हे ब्रह्मन् कोणी अग्निहोत्रादि कर्मे न करितां मोक्षा-करितां सन्यास घेतात. कोणी क्रममुक्तीकरितां उपासना सहित कर्मे करतात, तेव्हां जे सन्यास घेत नाहींत त्यांचें पाप अग्निहोत्रादि धर्माचा नाश करतें किंवा तो धर्मच पापाचा नाश करतो? याचें उत्तर सांगा. असा प्रश्न ऐकून सनत्सु-जात बोलतात. मोक्षाविषयीं सन्यास घ्यावा किंवा उपासनासहित कर्माचाही अंगिकार करावा. त्याच प्रकारें धर्माचें फल स्वर्ग किंवा चित्तशुध्दी आहे आ-णि नित्य कर्माचा त्याग केला असतां त्याचें फल नरक आहे. अशीं धर्माधर्मा-

चीं फलें आहेत. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे ब्रह्मन् तस्मात् काम्यकर्म व पाप हीं बंधक आहेत आणि अकाम्य नित्यकर्म केलें असतां मोक्ष होतो. असें तुमच्या भाषणाचें तात्पर्य दिसतें. सोमपानाच्या योगें स्वर्ग प्राप्त होतो. चातुर्मास्य याग करणारास सुकृत प्राप्त होतें. ज्याला अट्ठेचाळीस संस्कार झाले असतील त्यास ब्रह्मलोक प्राप्त होतो. इत्यादि अर्थप्रतिपादित ज्या श्रुति व स्मृति त्या पुण्य करणारे जे द्विजाती व यांस स्वधर्मफलभूत सनातन नित्य लोक प्राप्त होतात असें म्हणतात. त्या लोकांच्या धर्मांच्या तारतम्यानें उच्च नीच भाव व मोक्षसुख हीं सांगा. आतां मी निषिद्ध काम्यकर्म जाणण्याची इच्छा करीत नाहीं. असें ऐकून सनत्सुजात म्हणतात. हे राजा, ब्राह्मण आपल्यांतच यमनियमादिरूप व्रतांविषयीं स्पर्धा करतात. शेवटीं या देहाचा त्याग करून ब्रह्मलोकीं पूज्य होतात. नंतर ब्रह्मदेवासह वर्तमान त्यांस मुक्ति होते. हे राजा तुला सर्व धर्मश्रेष्ठ जो योग धर्म याचें फल सांगितलें आतां यज्ञादि धर्मांचें फल सांगतों. आम्हींच यज्ञादि धर्मांचें अनुष्ठान चांगलें करतों. असा आग्रहांनीं जे यज्ञादि क्रिया करतात. ते ज्ञान प्राप्त होऊन स्वर्गी जातात. जे जे पुरुष धर्म न केला असतां अन्यवाय आहे म्हणून धर्मार्थन कर्म करतात ते कामानें हत झाल्यामुळें उत्तरोत्तर आनंदाचा उत्कर्ष पावतात. याप्रकारें करून आत्मतत्व जाणण्यास इच्छा करणारे जे योगी नगेच निष्काम वर्णाश्रमाभिमानी यांचे धर्म उत्तम मध्यम अधम क्रमेंकरून सांगितले आतां अहिंसाप्रधान योग्याचे धर्म सांगतों. ज्याच्या घरीं अन्नपान बहुत आहे तेथें भिक्षुकांनीं आपली उपजीविका संपादावी. अन्नपानहीन जो असेल त्यास पीडा देऊं नये; परंतु क्षुधेनें आत्म्यास पीडा देऊं नये. तात्पर्य भिक्षुकानें अभिमान न धरतां दुसऱ्यास पीडा देऊं नये. गृहस्थाश्रम्यानेंही यति, ब्रह्मचारी, सन्याशी यांस दिल्यावांचून आपण भक्षण करूं नये. यती, ब्रह्मचारी हे गृहस्थाश्रमाच्या पक्वान्नाचे स्वामी होत. यास्तव त्यांस दिल्यावांचून भोजन करूं नये. असूयारहित श्रद्धापूर्वक गृहस्थानें अन्न दिल्हें असतां भिक्षुकास घेण्यास योग्य आहे. हें अन्न साधूंस मान्य होय. गृहस्थानें किंवा भिक्षुकानें आपली थोरी कोणास दाखवूं नये. यथोक्त प्रकारें अन्नदान केलें असतां

यजमान व भिक्षुक उभयतांही स्वर्गी उत्तमप्रकारें वास करतात. जो सन्याशी आपलें पांडित्य प्रगट करून भोजनाची इच्छा गृहस्थाच्या घरीं करतो तो संन्याशी श्वानासारखा जाणावा. जो ब्राह्मण आपले ज्ञातींत असून त्यास आपलें रत्न न कळूं देतां आपलें तेज गुप्त ठेवतो त्या ब्राह्मणास पंडित, ब्रह्मनिष्ठ म्हणतात. असें आचरण जो करतो तोच निरुपाधी सर्वव्यापक अशा शुध्द ब्रह्मास जाणतो. तो क्षत्रियजरी आहे तथापी ब्रह्मज्ञानास योग्य होतो. यास्तव सर्वांनीं आत्मज्ञान साध्य करावें. नाहीं केलें तर मोठा दोष आहे तो हा कीं, त्याला वास्तविक आत्मज्ञान नसून या देहालाच आत्मा असें जो म्हणतो त्यासारखा आत्मापहारी तस्कर कोणी नाहीं. आत्मतत्वज्ञान कसें होतें हें सांगतो. जो निरंतर श्रमहीन, शिष्टांस संमत, स्वतः निरुपद्रवी, शिष्टांनीं ज्या मर्यादा केल्या त्यांचें उल्लंघन करीत नाहीं; आपलें शिष्टत्व प्रकाशित करीत नाहीत. दीर्घदर्शी व धनादिकांवर आसक्ति ठेवीत नाहीत. व पारलौकिक कृत्यांविषयीं संपन्न, ईश्वरोपासक आणि वैराग्यपूर्वक कर्मोपासनानुष्ठान परायण, इतके गुण ज्यामध्यें परिपूर्ण आहेत तोच ब्रह्मस्वरूप जाणण्यास समर्थ होतो. हे राजा सर्व क्रतूंपेक्षां ब्रह्मज्ञान हें श्रेष्ठ आहे असें जाण. यज्ञयागादि क्रिया करून स्विष्टकृत भागांनीं जे देवांचा संतोष करतात. त्यांस देव उत्तम लोक देतात, परंतु तो ब्रह्मज्ञान्यासमान होत नाहीं. याचें कारण स्विष्टक्रियासाध्य जें कर्म तेणेंकरून जें लब्ध झालें तें नाशवंत आहे आणि ब्रह्म तर स्वतःसिध्द असून अविनाशी आहे. यास्तव त्याब्रह्मज्ञानाचें फलभूत जो मोक्ष तो अविनाशी आहे म्हणून ब्रह्मज्ञानश्रेष्ठहोय. जोब्रह्मनिष्ठ आत्मातिरिक्त कांहीं मानीत नाहीं आत्म्यासच मानितो. तो ब्रह्मवेत्ते यांनीं मानिला जातो. जो पुरुष यज्ञादिकांच्यायागीं तत्पर असून त्यांविषयीं यत्नवान असतो तो पुरुष देवांचा पशु असें समजावें. यजमानानें यज्ञ करून देवांस तृप्त करावें म्हणजे ते देव पर्जन्यद्वारा औषधी उत्पन्न करून यजमानाचें रक्षण करतात, असें अन्योन्याश्रयत्व कधींही नष्ट व्हावयाचें नाहीं. यजमानानें ज्ञानी व्हावें अशी देव कधींही इच्छा करीतनाहींत. कारण ज्ञानी झाले असतां यज्ञक्रियामुक्तहोऊन देवांचा हविर्भाग नष्ट होईल आणि

त्याचें पोषण होणार नाहीं. यास्तव ज्ञानमार्गास देवविघ्नें बहुत करतात. हे राजा पुरुषानें कोणीं आपला मान केविला असतां असें मानावें कीं, हा आपल्या स्वभावानेंच मला मानतो; परंतु मी मानयोग्य आहें असें मानून हर्ष करूं नये, असें विद्वानलोक मानतात. हे राजा, हीं दोन्हीं एकत्र कोठें राहात नाहींत. मानार्थी यास परलोक, मौनी जे परलोकार्थी यांस इहलोक यास होणें कठीण आहे. हे राजा, पुरुषास धन, आप्तजनवर्ग ऐश्वर्यरूप लक्ष्मी स्वर्गाची अधिष्ठान आहे खरी, परंतु ही लक्ष्मी चोरासारखी परलोकाची बाधा करणारी आहे ही योग्यास अगदी अनिष्ट होय आणि ब्राह्मणास योग्य जी श्री ती बुद्धिहीनास प्राप्त होणें दुर्लभ आहे. ब्राह्मणाचीसंपत्ती प्राप्त होण्याचीं द्वारें संरक्षण करण्यास कठीण तीं अशीं कीं, सत्य, आर्जव, ह्री, दम, शौच, विद्या, यांच्यायोगानें मोह नष्ट होतो. अशी कथा या अध्यायांत आहे.

४३. अध्याय त्रेचाळिसावा :– धृतराष्ट्र बोलतो हे सनत्सुजात, मोहात्मक मृत्यूचा प्रतिरोध करणारी ब्राह्मी श्री मौन आणि मन्त्यादि सहाही सांगितलीत; परंतु त्यांत मौनाचें कारण काय? तें मौन कोणतें? त्याचें लक्षण व त्यानें विद्वान् ब्रह्मलोकीं जातो कीं काय? मौन कोणत्या प्रकारें आचरण करावें हें आतां सांगा. सनत्सुजात सांगतात हे राजा, मौन म्हणजे वाणी आदिकरून ज्ञानेंद्रियें व मन यांचा निग्रह करणें व वाणी, मन यांस अगोचर जें पद त्याची प्राप्ति हेंच प्रयोजन. त्या अधिष्ठानीं वेदशब्द अयंलौकिक शब्द उत्पन्न झाला. तेथें गुरूनीं सांगितलेल्या युक्तीनें वेदसारभूत प्रणवाचा लय केला असतां तेथें सर्व जगाचा लय होतो. त्या योगें प्रणवमयत्वानें प्रणवद्वारीं वाणी व मन यांस जी अगोचर वस्तु ती गोचर होते. असें सनत्सुजाताचें भाषण श्रवणकरून धृतराष्ट्र भाषण करतो हे ब्रह्मन् मौन न धरितां ऋक्, यजुः, साम यांस जाणून जो पाप करतो तो पापानें लिप्त होतो कीं नाहीं? असा प्रश्न ऐकून सनत्सुजात उत्तर देतात हे राजा, मौन धरणारास वेदत्रयही पापकर्मापासून रक्षण करीत नाहींत. कारण मायेनें वागणारास अंतकाळीं वेदही टाकतात. असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो. हे विद्वन्, मौनहीनास स्वाभाविक शमादि धर्मावांचून वेदरक्षण

करण्यास जर समर्थ नाहीं तर ब्राह्मणाचें माहात्म्य प्रसिध्द करणारा अ नादि ऋग्वेदादिकांनीं पवित्र होऊन ब्रह्मलोकीं पूजित होतो. असें वचनकसें प्रवृत्त झालें. असें ऐकून सनत्कुजात उत्तर देतात हे राजा, त्या परमात्म्यापासून वेदशास्त्रादि प्रपंच झाला. त्यानेंच स्वरूपानें हें जग भासतें. यास्तव वेद जगनाहून विलक्षण परमात्मस्वरूप आहे असें सांगतात. परमात्म्यापासून उत्पन्न झालेल्या वेदांनीं कथिनमार्गानें अनुष्ठानावांचून त्याचें अध्ययनही निष्फल होतें. तात्पर्य देहच आत्मा मानून परमात्म्याचा जो त्याग करतो त्यास त्याच्या आज्ञाभंग केल्याचा दोष लागतो. यामुळें वेदाध्ययन निष्फल होतें. त्या ब्रह्मप्राप्तीकरितां तपादिक वेदानें सांगितलें त्यायोगें पुण्य होऊन पापाचा नाश होतो. नंतर ज्ञानानें परमात्मस्वरूप प्रकाशित होतें. यास्तव कर्म परंपरेनें, ज्ञान साक्षात् मोक्षास कारण आहे असें जाणावें. असें असतां कर्मापासून ज्ञान प्राप्ति न करून घेतां ऐहिक व पारलौकिक सुखाची इच्छा करतो, तो त्यापासून स्वर्गीं व नरकीं सुखदुःखें भोगून वारंवार जन्ममरण यातना भोगतो. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो, हे सनत्कुजात. तप एकरूपच असून विद्वानांनीं केलें असतां सफल होतें आणि अविद्वानांनीं केलें असतां निष्फल होतें हें कसें? असें ऐकून सनत्कुजात बोलतात हे राजा. फलेच्छा नसून श्रध्दायुक्त जें तप तें मोक्षसाधन आहे, त्यास निःकल्मष म्हणतात. केवळ दंभार्थ जें तप तें सकल्मष आहे. असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे सनत्कुजात, तपास कल्मष तें काय? ज्या कल्मषरहित तपानें मला ज्ञान होईल, तें मला सांगा. असें ऐकून सनत्कुजात बोलतात. हे राजा, काम, क्रोध, लोभ, मोह, अतृप्ति, निर्दयत्व, असूया, मान, शोक, स्पृहा, ईर्षा, जुगुप्सा हे बारा दोष तपाचीं कल्मषें होत. यांमध्यें एक दोषाचा अवलंब केला तथापि मनुष्याचा नाश होतो. मग बारा दोष जर एकदां प्राप्त होतील तर मग नाश होण्यास कार्य आश्चर्य आहे. परगुणावर आक्षेप करून स्वगुणांचा उत्कर्ष करणें, यत्नपूर्वक परस्त्रियादिभोगेच्छावान्, मनस्वी म्हणजे गर्वानें पराचा अवमान करणारा, निमित्तावांचून कोप करणारा, चपल म्हणजे ज्याचा मित्रपणा, अस्थिर बुध्दि, शक्ति असतांही

स्वीकृत स्त्रियादिकांचें पालन न करणारा, स्त्रीसंगादिक हाच कोणी एक पुरुषार्थ मानणारा, अभिमानी, दत्तानुतापी ह्मणजे दानोत्तर पश्चात्ताप पावणारा, कृपण, बलियान ह्मणजे पूर्वराजापेक्षां अधिक करभार घेणारा, वर्गप्रशंसी ह्मणजे दुसऱ्याचा पराभव इच्छिणारा, आपल्या स्वस्त्रीशीं द्वेष करणारा, हे सात व पूर्वीचे ६ असे १३ घातुक आहेत. यांस नृशंस ह्मणतात हीं तपाचीं कल्मषें होत. आतां तपाचे गुण काय आहेत ते सांगतों. धर्म, सत्य, दम, तप, अमात्सर्य, न्ही, तितिक्षा, अनसूया, यज्ञ, दान, धृति, श्रुत, हीं बारा व्रतें ब्राह्मणांनीं अवश्य स्वीकारावीं. या द्वादशव्रतांनीं जो युक्त असेल तो पृथ्वीचें राज्य करण्यास योग्य होईल. या द्वादश गुणांतील एक जरी गुण प्राप्त झाला तरी त्यास दैवविन्तार्ची प्राप्ती झाली असें समजावें. दम, त्याग आणि अप्रमाद हे तीन गुण सत्याचे साधनभूत आहेत, ह्मणून विद्वान ब्राह्मण ब्रह्मणतात. यास्तव यांची प्राप्ति झाली असतां मोक्षाचेंच साधन झालें असें समजावें. एकदम स्वाधीन झाला ह्मणजे त्यानें अष्टादश दोष जिंकिले असें समजावें. ते अष्टादशदोष आतां सांगतों. कृताकृत ह्मणजे वैदिक कर्म करून त्याजवर अश्रध्दा ठेवणें आणि उपवासादि नकरून क्षुधा व जिव्हा यांस स्वाधीन ठेवणें, अनृत, असूया, काम, अर्थ, स्पृहा, क्रोध, शोक, तृष्णा, लोभ, पैशून्य, मत्सर, हिंसा, परिताप ह्मणजे दुःख मानणें, अरति ह्मणजे उत्तमक्रियेची इच्छा न धरणें, अपस्मार ह्मणजे केलेल्या कर्माचें विस्मरण, अतिवाद ह्मणजे दुसऱ्यावर आक्रोश. आत्मनि संभावना ह्मणजे आपले ठायीं महत्त्व बुध्दि या अष्टादश दोषांपासून जो विमुक्त त्यास साधु, दांत असें ह्मणतात. यास्तव हे राजा, दम स्वाधीन झाला असतां हे दोष नष्ट होतात. दम या शब्दाचा मद असा विपरीत शब्द होऊन त्याचा अंगिकार करणारे ते पूर्वोक्त दोषी होतात आणि जे दमाचाच अंगिकार करून राहातात त्यांस मद दोष स्पर्शीत नाहींत. आतां हे राजा, त्याग न स्वाधीन केला तर त्याचे दोष सांगतों. लक्ष्मीची प्राप्ति झाली तर हर्ष होणें, अप्रिय झालें असतां दुःख होणें, आपले स्वकीयांत यांच्या, मत्याचीं अमदान, अधिकार असतां इष्टा पूर्त नकरणें ह्मणजे तळीं विहीर इत्यादि. न बांधणें, यज्ञ

न करणें हे दोषत्यागाचे विरोधी आहेत. त्याग न केला तर उक्त दोष प्राप्त होतात. त्याग केला असतां श्रीप्राप्तीपासून हर्षित होत नाहीं. याग, होमादि, तडाग आगमादि त्या गोष्टी सहज घडतात. आतां कामत्यागाची शेवटची मर्यादा सांगतो. ज्याच्या ह्रदयांत काम आहे त्यानें केलेलीं सर्व कर्मे व्यर्थ होतात. निष्कामह्रदय होऊन कर्मे केलीं असतां त्यानें या पृथ्वीवर सर्वांस जिंकिलें असें समजावें. यास्तव हे राजा, कामाचा त्याग करावा. ज्यानें आपल्या स्त्री पुत्रादि द्रव्यावर निष्कामत्वेंकरून लक्ष्य ठेविलें ह्मणजे कामपूर्वक भोग केला नाहीं तर त्यास बहुत द्रव्य जरी मिळालें तथापी तें तुच्छ आहे. यास्तव त्यापासून कांहीं कर्म जरी न घडलीं तथापी तज्जन्य दुःख पावूं नये. तो सर्व गुणांनी युक्त असून द्रव्यहीन जरी असला तथापी द्रव्यवान् आहे असें त्यालाच ह्मणावें. आपलें कांहीं अप्रिय झालें असतां त्यास दुःख होत नाहीं, तसेंच इष्ट, पुत्र, दारादिकांचेठायीं लोभ ठेवीत नाहीं, याचक प्राप्त झाले असतां त्यांस देतो. इतक्या गुणांविषयीं जो प्रमाद करीत नाहीं तो त्यागसंबंधी गुणास पात्र झाला. सत्य, ध्यान, समाधान, तर्क, वैराग्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, निष्परिग्रहता, हे दमाचे आठ गुण ते मदाचे दोष समजावे. पांच इंद्रियांचे पांच दोष, मनाचा साहावा दोष, नष्टपुत्रादिकांचा शोक करणें हा सातवा दोष, पुत्रादिकामेच्छु असून त्यांची प्राप्ति न झाली ह्मणजे दुःख करणें हा आठवा दोष, हे प्रमादाचे आठ दोष टाकले असतां तो सुखेंकरून मुक्तीस योग्य होतो. हे राजा तूं आतां सत्य पालन कर. सर्वलोक सत्याचेठायींच प्रतिष्ठित आहेत. सत्यामध्येंच मोक्ष आहे. ब्रह्मदेवानें सत्यरूपच तप सर्वदोषांच्या निवृत्तिकरितां केलें आहे. साधूस हेंच व्रत मान्य आहे. सनत्सुजात ह्मणतात हे धृतराष्ट्रा, पूर्वी जे दोष सांगितले आहेत ते टाकून जे गुण सांगितले आहेत त्या गुणांकरून युक्त होऊन ज्याणें तप केलें तेंच तप मोक्षसाधन आहे असें जाणावें. हे राजा, तुमला जो प्रश्न करशील त्याचें उत्तर संक्षेपानें सांगेन आणि हें जें मीं पूर्वी सांगितलें त्यायोगें पाप हरण होऊन पुण्यप्राप्ति होईल. जन्म, मृत्यु, जरा, यांचाही नाश होईल. हे विद्यासाधनाचे उपाय मीं तुला निवेदन केले.

असें सनत्सुजाताचें भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे सनत्सुजात, इतिहास पुराणादिकांसहित वेदांनीं ब्रह्माचें निरूपण एक प्रकारचें केलें, चार वेदांनीं भिन्न प्रकारचें केलें, तीनवेदांनीं कांहीं निराळे प्रकारचें निरूपण केलें, दोन वेदांनीं पूर्वापेक्षां कांहीं मतभिन्न दर्शविलें व एकवेदानें दुसराच प्रकार सांगितला त्यांत कोणत्या प्रकारानें ब्रह्मज्ञान प्राप्त करावें या प्रश्नाचें उत्तर सांगा. असें ऐकून सनत्सुजात बोलतात हे राजा. इतिहासादिकांनीं ब्रह्माचे अनेक प्रकार सांगितले आहेत असें ह्मणतोस यास्तव तुला ब्रह्माचा मुख्य प्रकार आहे तो सांगतो. प्रथम एकच वेद होता त्याचें ज्ञान होण्यास अशक्य झाल्यामुळें बहुत वेद केले; परंतु सिध्दांत तुला सांगतो. ब्रह्म एकच, सत्य कालत्रयीं अबाध्य आनंदात्मक असें आहे. याशिवाय इतर ऋषींनीं जे सिध्दांत केले असतील ते सर्व मिथ्या आहेत. हें मत जें मीं कथन केलें यापेक्षां इतर मतांस आब्रह्मत्व ह्मणजे वेदाप्रतिपाद्यत्व आहे असें समज. तस्मात् एक सत्यच खरें आहे. सत्यांतर सर्व अवस्थित आहे यास्तव सत्य हेंच ब्रह्म जाण. कदाचित् बाल्यसुखलोभास्तव हें ब्रह्म न जाणतां मी प्राज्ञ असें जो ह्मणतो त्याची मति दानादिक करण्यास लोभानें प्रवृत्त होते मग ते पुरुष परमानंदापासून भ्रष्ट झाल्यामुळें क्षुद्रानंद उत्पन्न करणारा जो विषय लोभ तो यज्ञादिकांचे ठायीं त्यास वारंवार मनीषा उत्पन्न करतो. नंतर या व्यर्थ संकल्पाच्या योगें सत्याचें अवधान होऊन अपरोक्ष ज्ञान विमुख होऊन त्या संकल्पेंकरून जें जें कर्म करील, त्या त्या कर्माप्रमाणें त्यांस ब्रह्मादिलोक प्राप्त होतात; परंतु कर्मलोकयांचा आत्मज्ञानाविषयीं दृढनिश्चय नसतो. यास्तव नश्वर लोकाची त्यांस प्राप्ति होते. साधु तर अविनाशी जें परब्रह्म सत्याख्य याचेठायीं निश्चय ठेवितात, ह्मणून जन्ममरण प्रवाहापासून निर्मुक्त होतात. यास्तव शोक मोह निवर्तक प्रत्यक्ष ज्ञान हेंच श्रेष्ठ होय. कायीक, वाचीक व मानसीक जें तप तें परलौकिक फलदेणारें होय आणि जो बहुत पाठी आहे त्यास परोक्ष, प्रत्यक्ष हीं दोन्हीही ज्ञानें प्राप्त होत नाहींत. हे क्षत्रियां, केवळ वेदाचेंच पठण जो करतो त्यास द्विज ह्मणावें आणि सत्याप्रसून त्यास

अपरोक्ष साक्षात्कार झाला तोच ब्राह्मण जाणावा. ब्रह्मज्ञानावांचून जो अ-सेल त्यास ब्राह्मण ह्मणूं नये. हे धृतराष्ट्रा, ब्राह्मण ज्ञानापासूनच मुक्त होतो. यज्ञादिकेल्यानें मुक्त होत नाहीं. याविषयीं प्रमाण सांगतों ऐक. अथर्वानामक ऋषि समग्र ऋषींस बोलला कीं, उपनिषधनामक जो छंद याच्यायोगें पापा-चा नाश होऊन ब्राह्मण मुक्त होतो. याजवरून यज्ञादिकांस पापापासून रक्ष-ण करण्याचें सामर्थ्य नाहीं. ब्रह्मविद्यार्थ जे छंद त्यांसच मुख्य छंदत्व आहे आणि कर्मार्थ जो छंद त्यास गौण ह्मणतात. आणि जे उपनिषदास हृदयतेमा-न वेदानें पठण करून ब्रह्मतत्व जाणत नाहींत त्यांस वेदवेत्ते ह्मणूं नये. जो पुरुष ब्रह्मस्वरूपानें जाणतो त्यास सर्ववेत्ता असें ह्मणतात. अशी कथा या अ-ध्याय आहे.

४४. अध्याय चवेचाळिसावा. – धृतराष्ट्र प्रश्न करतो. हे सनत्सुजात, आ-त्मज्ञानमार्ग तुझ्यासुखापासून ऐकला. आतां त्याचीं अंतरंग साधनें सांग. सन-त्सुजात ह्मणतात हे राजा. ब्रह्मविद्याप्राप्त होणें फार कठिण आहे; परंतु ती प्रा-प्त व्हावी असें जो इच्छितो त्यानें ब्रह्मचर्य करावें ह्मणजे ती प्राप्त होईल, असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे सनत्सुजात. ब्रह्मचर्यानें जी ब्रह्मविद्या प्राप्त हो-ते तें ब्रह्मचर्य मला सांग. असें ऐकून सनत्सुजात बोलतात हे राजा, ब्रह्मच-र्यव्रताचा प्रकार सांगतों तो ऐक. शिष्यानें शुचि व अप्रमत्त होऊन वेदाध्यय-नाच्या इच्छेनें गुरूस शरण जाऊन त्यास नित्य वंदन करावें आणि मान न धरितां त्याचे गृहीं नीचही कर्म करावें. प्राण, धन, कर्म, मन, वाणी इत्यादि-कांनीं गुरु व त्याची स्त्री पुत्र यांचें निरंतर प्रिय करावें. तसेंच गुरुगृहावांचू-न अन्यत्र स्थिति करूं नये. गुरूस दान करीन असें मानूं नये. या प्रमाणें गु-रुगृहीं वास करावा त्यास ब्रह्मचर्य असें ह्मणतात. अशा ब्रह्मचर्यानें देवांस देवत्व, ऋषींस ब्रह्मलोक हीं प्राप्त झालीं. यास्तव अशा ब्रह्मचर्यानें गुरूस प्रसन्न करून ब्रह्मज्ञान संपादावें ह्मणजे मोक्ष प्राप्त होतो. त्या ब्रह्मविद्येस ब्रह्मचर्यावांचून दुसरें साधन नाहीं. अशी कथा या अध्यायांत आहे.

४५. अध्याय पंचेचाळिसावा. – सनत्सुजात ह्मणतात हे धृतराष्ट्रा, ब्र-ह्मविद्येकरितां काय टाकावें व कोणतें ग्रहण करावें तें सांगतों. शोक क्रोध इ-

त्यादि बारा दोष मनुष्याचे प्राणनाशक आहेत. त्यांच्यायोगें मनुष्य मूढ होऊन पापकर्में करतो. स्पृहा, उग्रपणा, रूक्षवाणी, बहुभाषण, क्रोध, श्लाघा हे सहा दोष ज्यास आहेत तो घातुक जाणावा. संभोग व यासविरुध्दज्ञान, अतिमानी इत्यादि सात पुरुषांस घातुक ह्मणावें. धर्म, सत्य इत्यादिक द्वादश व्रतांपासून जो भ्रष्ट होत नाहीं तो सकल सृष्टीचेंही पालन करील. दम, त्याग, अप्रमाद इत्यादिक मोक्षप्रापक गुण ज्ञानी ब्राह्मणांत असतात. ब्राह्मणास, यथार्थ परदोषाचें कथन व दोषारोप करणें हें योग्य नाहीं. जे करतील ते नरकास जातील. तस्मात् ज्ञानी जनांनीं कामादिक अठरा दोष ज्यापासून उत्पन्न होतात तो मद प्राप्त होण्याचीं निंद्य कर्में करूं नयेत. आतां मित्रत्वामध्यें साहा गुण आहेत ते सांगतों. मित्राचें प्रिय झालें असतां हर्ष होणें, अप्रिय झालें असतां दुःखपावणें, देण्यास अयोग्य अशी वस्तु दुसऱ्यानें मागितली असतां देणें. त्यावर आपण उपकार केले असें मानून त्याचे घरीं न राहाणें, स्वकर्मार्जित धनाचा उपभोग करणें, मित्रहितार्थ आपल्या हिताचा नाश करणें या साहा गुणांनीं युक्त जो गृहस्थ यासच त्यागी, सात्विक, गुणवान् ह्मणावें हाच पुरुष शब्दादिक पंचविषयांपासून पंचेंद्रियांस निवृत्त करतो. जे स्वविषयापासून इंद्रियनिग्रहरूप तप करून तीव्र वैराग्य नसल्यामुळें धैर्यभ्रष्ट होतात ते यालोकीं ज्ञान्याप्रमाणें कृतकृत्य न होतां संकल्पानें ऊर्ध्वगतीस जातात. तस्मात् हे राजा, संकल्पविरहित मन करून कर्मानें ज्ञानप्राप्त होण्याकरितांच यत्न करावा. त्या ज्ञानानें ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष होतो. अशी कथा या अध्यायांत आहे.

४६. अध्याय शेचाळिसावा :— सनत्सुजात बोलतात हे धृतराष्ट्र, पूर्वाध्यायीं निश्चेष्ट मन करावें असें सांगितलें यावरून ब्रह्मच यादि मोक्षायत्नानें शून्यशेषच साधित होतें, अशी आशंका करून शून्याप्रमाणें जे निर्धर्मक असून शून्यपणाचेंही प्रकाशक जें परात्मस्वरूप ब्रह्म तें जीवस्वरूपच जाणावें. अशा अर्थाविषयीं जे मंत्र आहेत त्यांचा अर्थ सांगतों. जें विश्वोत्पादक, द्वैतरूपउपाधिशून्य, तेजस्वी असें आहे त्यापासून सूर्यादिकांचा प्रकाश होतो. त्या परमात्म्यास योगी योगानेंच जाणतात. चित्त-

स्वरूपानें प्रकाश पावणाऱ्या जीवेश्वराहून भिन्न व निरंतर प्रकाशमान सर्वाधिष्ठानभूत असून जो जीवेश्वर व पृथिव्यादि ब्रह्मांडास धारण करतो, तशाच दिशा व नद्या, इत्यादिक ज्यापासून होतात आणि स्वतः विनाशी असून अविनाशी कर्मानें युक्त अशा शरीररूप रथास चक्रासारखें चालक जें कर्म त्याच्या आधीन झालेले इंद्रियरूप अश्व त्या रथास विषयदेशास नेतात आणि तेच अश्व स्वाधीन झाले असतां ज्या परमात्म्य स्वरूपास नेतात तो निर्विकार दिव्यस्वरूप आहे व जो अणुपेक्षां लहान असून ज्याचें ज्ञान भूत, भविष्य, वर्तमान यांचें प्रकाशक आहे, तसाच सर्व भूतीं, अंतर्यामी रूपानें जागृत असून आकाशादि पंचमहाभूतें व जरायुजादिक सर्व प्राणि यांच्या हृदयांत राहातो अशा परमात्म्यास योगी योगाभ्यास बलानें जाणून कृतकृत्य होतात. अशी कथा या अध्यायांत आहे.

४७. अध्यायसत्तेचाळिसावा. – वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, धृतराष्ट्रास ज्ञानोपदेश करून सनत्सुजात अदृश्य झाल्यावर ती रात्र तशीच अतिक्रांत झाली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सर्वही राजे संजयाचें भाषण ऐकण्याकरितां हर्षानें सभेंत आले. ती सभा विस्तीर्ण, चंद्रासारखी स्वच्छ, चंदनाच्या उदकें करून सिक्त केलेली आणि रत्नखचित आसनयुक्त अशा सभेमध्यें भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य, कृतवर्मा, जयद्रथ, अश्वत्थामा इत्यादिक हे सर्व धृतराष्ट्रास पुढें करून आले. तसेंच दुःशासन, चित्रसेन, शकुनी, कर्ण हे सर्व दुर्योधनास पुढें करून सभेंत आले. इतक्यामध्यें द्वारपालांनीं येऊन सांगितलें महाराज, संजय पांडवांकडून रथारूढ होऊन येत आहे. असें द्वारपालाचें धृतराष्ट्राशीं संभाषण होतआहे तों संजय सभेंत येऊन बोलला हे कौरव हो, धृतराष्ट्रानें मला पांडवांकडे पाठविलें होतें तेथून मी आलों. पांडव सर्वांचे योग्यतेनुसार कुशल अभिनंदन करतात. आतां तेथील झालेलें वृत्त सर्वांस मी सांगतों. अशी कथा या अध्यायांत आहे.

४८. अध्यायअठ्ठेचाळिसावा – धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, धनुर्धराग्रणी, दुष्टांस शासन करता असा अर्जुन काय बोलला तें सांग. असें

ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिर आणि श्रीकृष्ण यांचें मत घेऊन धनंजय बोलला कीं, दुर्भाषण कर्ता कर्ण मजसहवर्तमान युध्द करीन म्हणतो. याजवरून त्याचा मरणकाल समीप आला असें वाटतें व त्यानें असें सांगितलें आहे कीं, दुर्योधन युधिष्ठिराचें राज्य सोडीत नसेल तर केलेल्या कर्माचें फळ भोगावयाचा काल आला आहे, तसेच भीमार्जुन, नकुळसहदेव, वासुदेव, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी व युधिष्ठिर हे योध्दे युध्दास प्रवृत्त असतां पृथ्वी आणि आकाश यांतें दग्ध करून टाकतील. त्यांशीं दुर्योधन युध्द करणार तर पांडवांचा मनोरथ आजच सिध्द झाला. युधिष्ठिरानें वनवासांत दुःखरूप तृणशय्येचा अनुभव घेतला. अशा धर्मराजासहवर्तमान दुर्योधन युध्दाची इच्छा करील तर तो युध्दांत मरण पावेल. ज्यासमयीं भीमसेन युध्दांत येऊन गदेनें धृतराष्ट्र कुलाचा क्षय करण्यास प्रवृत्त होईल तेसमयीं भीमवचनांचें दुर्योधनास स्मरण होईल व तो पश्चात्ताप पावेल व भयंकर युध्द पाहून धृतराष्ट्र पुत्र अनुताप पावेल. तसेंच नकुलसहदेव प्रतिविंध्यादिद्रौपदीचे पांच पुत्र, प्रभद्रकराजे, अभिमन्यु, सैन्यासहवर्तमान विराट व द्रुपद व पृथ्वींतील श्रेष्ठ सोमक हे ज्या काळीं युध्दांत येऊन मुख्यमुख्य वीरांसहवर्तमान दुर्योधनाच्या सैन्याचा नाश करतील व धृष्टद्युम्न द्रोणाचा व शिखंडी भीष्माचा प्राण घेईल तेव्हां दुर्योधनास खेद होईल. हे राजा, दुसरेंही दुर्योधनास त्यांनीं असें बोलण्यास सांगितलें कीं, राज्याचा अतिशय लोभ धरूं नको. कारण कीं मी तर तुह्मांस युध्दांमध्यें अधिकच आहें, परंतु मला एक दुसरा सात्त्व माझा शिष्य शिनीचा नातु सात्यकी नामक मोठा योध्दा आहे तो असल्यावर तुमच्या जयाची संभावनाच नाहीं. तो दृढधनुष्यासहवर्तमान शत्रूच्या अग्रभागीं येऊन कौरव सैन्यास बाणजालांनीं ज्याकाळीं आच्छादित करील त्याकाळीं दुर्योधन संताप पावेल. ज्या काळीं हेममणयांनीं प्रकाशित, श्वेताश्वांनीं युक्त, वानर ध्वजानें युक्त व कृष्णासहवर्तमान मी बसलेला अशा माझ्या रथास पाहील त्याकाळीं दुर्योधनाचा आत्मा खचित संतापास पावेल. माझ्या गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं शत्रूचें सैन्य व गजाश्व भग्न होतील. त्याकाळीं

दुर्योधन परम भ्रांत होईल व त्याचे योद्धे भयानें त्रस्त होऊन पळतील कोणएके दिवशी पूर्वान्हकाळीं उदकांत मी जप करीत असतां कोणी एके विमानें मला सांगितलें कीं, हे पार्थ तू शत्रूसहवर्तमान दुष्कर कर्म करशील आणि मग्निवादि, अश्वयुक्तरथामध्यें कृष्णपरमात्मा तुझें रक्षण करील. तो हा वासुदेव दस्युवधाकरितां मला साह्य झाला आहे. त्यावासुदेवाचा वध करण्यास मनेंकरूनही कोणी इच्छिणार नाहीं. जो बाहूनें सागर तरण्यास इच्छील तोच कृष्णाचा जय करण्यास इच्छील. ज्यावासुदेवानें रुक्मिणीचे विवाहकाली भोजाचा पराभव करून भार्या हरण केली, तसाच उग्रसेनाचा पुत्र जो कंस हा वृष्णी अंधकाच्यासभेंत बसला असतां बलदेवासहवर्तमान श्रीकृष्णानें त्यास मारून उग्रसेनास राज्य समर्पण केलें, त्याकाली अदितीचीं मणिकुंडलें भौमासुरापासून श्रीकृष्णानें आणून दिल्हीं. त्याकाली श्रीकृष्णास सर्व देवांनीं वर दान दिल्हें कीं, हे कृष्णा, तू युध्दामध्यें कधीं श्रांत होणार नाहीस. आकाश आणि जलस्थानं तुझा पराक्रम अकुंठितपणें चालेल. दुसऱ्याचीं शस्त्रें तुझे गात्रांस स्पर्श करणार नाहींत. या प्रकारचा अप्रमेय श्रीकृष्ण यास धृतराष्ट्रपुत्र जिंकण्यास इच्छितो काय? शंतनुपुत्र भीष्म, सपुत्र द्रोणाचार्य व कृपाचार्य यांस माझा नमस्कार सांग. असे अर्जुनानें सर्वांस नमस्कार सांगून शेवटीं असें सांगितलें कीं, आमचें पूर्वीचें राज्य तें आह्मी धृतराष्ट्र पुत्रांपासून घेण्याकरितां उद्युक्त आहोंत त्याकाली जे आह्मांसहवर्तमान युध्दास येतील त्यांस धर्मेंकरूनच मृत्यु येईल असें मी समजतों. ज्या दुष्ट घातुकांनीं आह्मांस कपटानें अक्षक्रीडेंत जिंकून द्वादशवर्षें वनवास व एकवर्ष अज्ञातवास करविला ते दुष्ट धृतराष्ट्रपुत्र अह्मी जिवंत असतां कसे आनंद पावतील ते पाहातों. यानीं आह्मांस राज्यापासून भ्रष्ट केलें. हा जर अपराध त्याचा खरा आहे तर सर्वप्रकारें या युध्दप्रसंगीं भगवान आह्मांसच जय देईल. त्याची जर आमच्यावर पूर्णकृपा आहे तर सानुबंध धृतराष्ट्रपुत्र याचा नाश करीन आतां कुरूंनीं युध्दाचा जो निश्चय केला आहे तोच त्यांचा निश्चय खरा असावा. हे कौरवहो, तुह्मांस स्त्रियांसहवर्तमान जे उपभोग कर्तव्य असतील ते

यथेच्छ करून घ्याव्या. इष्टभोगपदार्थ असतील त्यांचा भोग घ्या. आह्मी एकदां संग्रामामध्यें स्थित झालों असतां कर्णासहवर्तमान सकल धृतराष्ट्रपुत्रांचा निःपात करून संग्राम विमुख होऊं. आमचे घरीं पूज्य ज्योतिषादि विद्या जाणणारे व प्रश्न मुहूर्त उत्तमप्रकारें करून सांगणारे, असे वृध्द ब्राह्मण बहुत आहेत. त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, कुरुसृंजयांमध्यें मोठा युध्दप्रलय उत्पन्न होऊन त्यामध्यें पांडवांचा जय होईल. तसाच श्रीकृष्णभगवान्, याचेंही असेंच ह्मणणें आहे. तेव्हां हीं भाषणें सत्य होण्याचा समय जवळच आला असें दिसतें. हें गांडीव धनुष्य पहा, स्पर्श न करितां वांकतें, व धनुष्याची ज्या कंपायमान होते. माझ्या भात्यांतून बाण आपणच काढल्यावांचून वारंवार बाहेर निघतात. कोशांतून खड्ग बाहेर निसरतो. ध्वजाच्याठायीं रौद्रवाणी अशी उत्पन्न होते कीं, हे किरीटी, तुझा रथ संग्रामामध्यें कधीं दृष्टीस पडेल. रात्रीचेठायीं कोल्हे भयंकर शब्द करतात. अंतरिक्षापासून राक्षस येण्याचा भास दिसतो. असे नानाप्रकारचे उत्पात दृष्टीस पडतात. याजवरून खचीत दिसतें कीं, कांहींतरी अनर्थ उत्पन्न होणार यांत संशय नाहीं. श्वेतहयांनीं युक्त रथामध्यें बसून सर्व योध्यांवर शरांचा वर्षाव करून सर्वांस मीं मृत्युमुखीं नेलें असें वारंवार भासतें. हे कौरवहो, स्थूणाकर्ण, पाशुपत, ब्राह्म, इंद्रानें दिलेलें अस्त्र इत्यादिक अस्त्रें घेऊन रणामध्यें ज्याकालीं मी उभा राहीन त्याकालीं शस्त्र अग्नीमध्यें तुह्मांसर्वांचें हवन करीन, हे राजपुत्रा शांति पाव. अरे यांत तुमचें कल्याण आहे. या धृतराष्ट्रास अत्यंत पुत्राचा मोह झाला आहे हा कुलनाशक आहे. वृध्द भीष्म, सपुत्रद्रोण, कृपाचार्य व धीमान् विदुर हे जसे सर्व भाषण करीत आहेत तसेंच कृत्य पुढें होणार तें चुकत नाहीं, असो सर्वत्र कौरव आयुष्मान असोत. हा धनंजयाचा निरोप तुह्मांस मी या राजसभेंत सांगितला. अशी कथा या अध्यायांत आ०

४९. एकूणपन्नासावा अध्याय:- वैशंपायन सांगतात हे जन्मेजया, संजयाचें भाषण ऐकून राजसभेंत भीष्म बोलतात हे दुर्योधना, बृहस्पति, शुक्राचार्य, देवांसहवर्तमान इंद्र, अष्टवसु, द्वादशादित्य, साध्यदेव, सप्त

ऋषी, विश्वावसु, गंधर्व, अप्सरागण, इत्यादिक कोणे एके दिवशीं ब्रह्मसभेम ध्यें जाऊन ब्रह्मदेवास नमस्कार करून बसले असतां इतक्यांत आदिदेव नरनारायण ऋषि त्यास्थानीं येऊन बसले. ते व्हां एकाएकीं संपूर्ण देवांचीं तेजें व मनें आकृष्ट झालीं हें पाहून बृहस्पति ब्रह्मदेवास प्रश्न करतो हे ब्रह्मन्, तुमची उपासना करीत नाहींत असे हे कोण असा प्रश्न ऐकून ब्रह्मदेव बोलतो हे आपल्या तेजानें त्रैलोक्यास भूषित करणारे नरनारायण ऋषि होत. जनांचे कल्याणार्थ आणि असुरांच्या विनाशार्थ आतां एथें हे आले आहेत. आपल्या कर्मेंकरून हे सर्वांग हर्षित करतात, हे उभयतां एकच आहेत, परंतु कांहीं कारणास्तव यांनीं आपला देह द्विधा केला आहे. असा ब्रह्मदेवाचा बृहस्पतीचा संवाद झाल्यावर नरनारायण आपले स्थानीं गेले. कोणे एके काळीं देवासुरांचें युद्ध प्रसन्न झालें असतां संपूर्ण देवांस भय उत्पन्न होऊन शक्रप्रभृति देव बृहस्पतीस पुढें करून जेथें नरनारायण तप करीत होते तेथें गेले आणि प्रणामपूर्वक स्तुति करूं लागले तेव्हां ते प्रसन्न होऊन वर मागा असें बोलले असतां देवेंद्र बोलतो, आह्मांस असुरांनीं पीडित केलें यास्तव आह्मांस साह्य करावें. असें ऐकून उभयतांनीं इंद्रास साह्य करून अनेक दैत्यांचें मर्दन केलें. त्यांत नरानें पौलोम, कालखंज, निवात कवच इत्यादिकांचा नाश केला. ते हे पूर्व नरनारायण देवकार्यार्थ कृष्णअर्जुन या नावानें अवतरले. हे देवांसही अजय्य आहेत. कृष्ण हा नारायण व अर्जुन हा नर होय. वासुदेव व अर्जुन यांचीं शरीरें मात्र दोन दिसतात, परंतु यांचा आत्मा व मन एकच आहे. हे नरनारायण, कर्मांच्या योगें अक्षय्य ध्रुव लोकाचा उपभोग करतात. ज्याज्या काळीं पृथ्वीवर युद्धें होतात, त्याकाळीं हे पुनःपुनः अवतार धरतात. कोणे एके काळीं नारदांनीं नरनारायणास येऊन सांगितलें कीं तुह्मीं युद्धादिकें करून शत्रूंचा नाश करा. भीष्म बोलतात हे दुर्योधना, असें नारदांनीं यांस युद्धाविषयीं उत्तेजन दिलें आहे. यास्तव हे तात, शंखचक्र गदापद्म धारण केलेला केशव व नानाप्रकारचीं भयंकर अस्त्रें धारण केलेला अर्जुन हे उभयतां सनातन माहात्मे एकरथीं बसलेले पाहशील त्यासमयीं माझ्या वचनाचें तुला स्मरण होईल. कौरवांचा क्षयकाल आला आहे. हें माझें

वाक्य न ऐकशील तर अर्थ व कुल यांसह वर्तमान तूं नष्ट होशील. शकुनी, दुःशासन या तिघांच्या मतानें तूं वागतोस. दुसऱ्याचें ऐकत नाहींस. हा कर्ण तर किती निंद्य आहे. एक तर यास भार्गवरामाचा शाप आहे आणि दुष्ट जातींत याची उत्पत्ति अशा पाप्याचें अनुमत घेऊन वागतोस हें तुझ्या नाशास कारण आहे. असें ऐकून कर्ण बोलतो हे गांगेया, मी क्षात्र धर्मानें राहिलों आहें, माझ्याठायीं दुराचरण कांहीं नसतां आपण माझी निंदा किमर्थ करितां? मी दुर्योधनाच्या हितकर्मी तत्पर आहें. माझ्यापासून कांहीं पापकर्म होत नाहीं. मी धृतराष्ट्रपुत्रांपाशीं रणांत पांडवांस मारीन ह्मणून जी प्रतिज्ञा केली तो आतां मी त्या पांडवांशीं शम करण्यास योग्य नाहीं. धृतराष्ट्र आणि दुर्योधन यांचें राज्याविषयीं जेवढें प्रिय होईल तेव्हढें मी करणार, यांत मीं पापकर्म काय केलें. असें ऐकून भीष्म पुनः बोलतात हे धृतराष्ट्रा, हा कर्ण निरंतर पांडवांशीं स्पर्धा करून असें बोलतो कीं, मी संग्रामांत पांडवांस मारीन, परंतु पांडवांचा षोडशांशही पराक्रम यास नाहीं. विराटनगरीं धनंजयानें दुर्योधनास हतप्राय केला. सर्वांचीं वस्त्रें घेऊन गाई सोडवून नेल्या, तेव्हां कर्ण जर शूर होता तर यानें कां पलायन केलें? घोषयात्रेंत पांडवांनीं तुझ्या पुत्रांस गंधर्वांचा पराभव करून सोडून आणिलें तेव्हां हा सूतपुत्र कोठें गेला होता. आतां मात्र या सभेंत बैलासारखी गर्जना करतो. यास कशी लज्जा वाटत नाहीं. असा हा खोटा बोलणारा धर्मार्थलोपी यास पांडवांशीं स्पर्धा करण्यास कशी शंका नाहीं. असें भीष्मानें भाषण ऐकून भारद्वाज बोलतात. हे धृतराष्ट्रा, भीष्म बोलतात तसें करावें. हे तुझे पुत्र बोलतात हें न ऐकतां युध्दाचे पूर्वींच पांडवांशीं मैत्री करावी अर्जुनानें संजया बरोबर जें सांगून पाठविलें त्याप्रमाणें तो करील. कारण अर्जुनासारखा धनुर्धर त्रैलोक्यांत कोणी नाहीं. तेव्हां ही गोष्ट घडण्यास काय अशक्य आहे. असें द्रोण बोलल्यावर धृतराष्ट्र उभयतांचे भाषणाचा अनादर करून पुनः संजयास पांडवांविषयीं प्रश्न करूं लागला. त्या सभेंत भीष्म व द्रोणाचार्य यांचें भाषण ऐकून संपूर्ण कौरव आपल्या जीविताविषयीं निराश झाले. अशी कथा या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नासावा- धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, धर्मपुत्र युधिष्ठिर राजानें आह्मांकडे बहुत सेना मिळाल्या हे ऐकून काय केलें. युध्द करण्यास कोण उत्तेजन देतात व युध्दाचा शम करावा ह्मणून कोण बोलतात ते मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, अजातशत्रु धर्मराज जी आज्ञा करील ती मान्य करण्याकरितां पांचाल, मत्स्य, कैकेय, इत्यादि संपूर्ण राजे त्याचे मुखाकडे दृष्टी लाऊन बसले आहेत. आबालवृध्द सर्व प्राणि युधिष्ठिराचें कल्याण इच्छितात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांच्या स्त्रिया व कन्या युध्दास सिध्द झालेल्या पांडवांस पाहाण्याची इच्छा करतात. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, आमचें सैन्य बहुत आहे असें समजून आह्मांशीं युध्दाविषयीं कोण उत्साह पावतात? असें ऐकून संजय श्वासोश्वास टाकीत मूर्छित होऊन राजसभेंत पडला हें पाहून विदुर बोलतो हे राजा, संजय मूर्छित होऊन पडल्यामुळें कांहीं बोलत नाहीं. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा, महारथी जे पांडव यांस पाहून संजयाचे मनास उद्वेग उत्पन्न झाला, त्यायोगें यास मूर्छा आली असेल. इतक्यांत संजय सावध होऊन बोलतो हे धृतराष्ट्र राजा, मत्स्यगृहीं आज्ञातवासानें कृश झालेले पांडव युध्द करण्यास उच्छाहवंत आहेत व त्यांस धृष्टद्युम्न साह्य आहे. युधिष्ठिरराजा रोषादिकांच्यायोगें धर्माचा कदापी त्याग करीत नाहीं. या कारणानें समग्र पांडव त्याचे आज्ञेंत असतात. ज्यानें काशी, अंग, मगध, कलिंग हे समग्र राजे युध्दामध्यें जिंकून वश केले, चारी पांडव ज्याच्या बाहुवीर्याश्रयानेंच लाक्षागृहापासून मुक्त होऊन, अनेक संकटांपासून तरले. असा वृकोदर व ज्यानें शंकरास युध्दांत संतुष्ट करून सर्वलोकपाल वश केले तो अर्जुन आणि ज्यानें म्लेच्छगणांस जिंकून पश्चिम दिशा वश केली असा नकुल, अश्वत्थामा, धृष्टकेतु, रुक्मी, प्रद्युम्न यां सारखा पराक्रमी सहदेव, भीष्मवधार्थ यक्षानें स्त्रीचा पुरुष केला तो शिखंडी, पांच कैकेय राजे, सात्यकी, विराट, काशीराजा, द्रौपदीचे पुत्र, कृष्णासारखा पराक्रमी अभिमन्यु, जरासंधाचा पुत्र सहदेव, जयत्सेन, आपल्या सैन्यासह वर्तमान द्रुपदराजा हे सर्व या धर्मराजास युध्द करण्याविषयीं उत्ते-

जन देतात. अशी कथा या अध्यायांत आहे.

५१. अध्यायएकावन्नावा - धृतराष्ट्र राजा बोलतो हे संजया, पांडवांचे योध्दे जे तूं सांगितलेस ते एकीकडे आणि एकटा भीमसेन एकीकडे इतकें त्याचें बल आहे. क्रुध्दव्याघ्रापासून जसे मृग भयाभीत असतात तसे भीमापासून वारंवार मला भय मोठें उत्पन्न होतें. शक्रासारखा पराक्रमी जो भीमसेन त्यास युध्दांत पाहून कोण त्याच्या बलाचें सहन करील? तो मोठा कोपी आहे. हा युध्दांत माझे पुत्रांचा अंत करील. ज्यानें राक्षसादि मारिले त्या भीमाचा छळ माझ्या पुत्रांनीं ज्याकाळीं केला तेव्हांच त्यानें माझ्या पुत्रांस मारलें नाहीं, हाच मी मोठा लाभ समजतों. मगध देशाचा राजा जरासंधनामक मोठा बलि आपल्या प्रतापेंकरून ज्यानें सकल पृथ्वी वश केली त्या जरासंधास वासुदेवासमक्ष निरायुध युध्द करीत असतांही भीमसेनानें मारला यापेक्षां भीमसेनाचें बल काय आतां वर्णन करावें. तो भीमसेन गदा घेऊन माझ्या पुत्रांस मारीलच व तो बाहुयुध्द करीत असतांही त्याच्या अग्रभागीं उभें राहाण्यास कोण समर्थ होईल. पूर्वीं विदुरानेंही सांगितलें होतें कीं, तुम्हास भीमापासून भय उत्पन्न झालें. हे संजया मला असें वाटतें कीं, ज्ञानानेंही दुःखाचा नाश होणार नाहीं. दुःख इतकें बलवान् आहे कीं. ज्ञानाचाही नाश करील. हे संजया, आतां मी काय करूं कसें करूं, कोठें जाऊं, हे मंदबुध्दि कुरु कालवश होऊन नाश पावतील व माझे शंभर पुत्र मरण पावले असतां त्यांच्या स्त्रियांचा रोदनध्वनि जेव्हां ऐकेन तेव्हां मला मरण कसें प्राप्त होईल. अग्नि जसा वायूच्या साह्यानें तृणास जाळितो तसा हा भीमसेन धनंजयाच्या साह्यानें माझे पुत्र तृणासमान युध्दामध्यें जाळून टाकील यांत संशय नाहीं. अशी कथा या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्नावा - धृतराष्ट्र बोलतो हे संजया, युधिष्ठिराची वाणी कधींही मीं अनृत ऐकली नाहीं. ज्याचा योध्दा धनंजय त्या युधिष्ठिरास त्रैलोक्याचेंही राज्य मिळण्यास काय अशक्य आहे. युध्दांत अर्जुनाशीं सम असा मला नर कोणीच दिसत नाहीं. दुसऱ्यानें पराजित करण्यास अशक्य महावीर जे द्रोणकर्ण हे अर्जुनाशीं संग्राम करण्यास सिध्द

झाले असतां मला जय मिळेल असें वाटत नाहीं. कारण कर्ण योध्दा खरा परंतु यास अंतीं अस्त्रविद्या स्मरणार नाहीं व तो भीमादिकांवर दया करतो या-स्तव तो प्रमादी होय. द्रोणाचार्य तर गुरु खरे परंतु वृध्द यास्तव त्यांच्यानें पार्था-शीं संग्राम करवणार नाहीं. अर्जुन जसा योध्यांत श्रेष्ठ त्यासारखाच भग-वान् ज्याचा सारथी त्यास निश्चयेंकरून जय मिळेल. श्रीकृष्ण, अर्जुन आ-णि गांडीव धनुष्य हीं तीन तेजें एकत्र झालीं असतां काय होईल याचा नेमम-ला सांगवत नाहीं. गांडीवासारखें धनुष्य, अर्जुनासारखा योध्दा व कृष्णा-सारखा सारथी हे तीन पदार्थ दुर्लभ आहेत; परंतु काय करावें? कर्ण द्रोणादिक दुर्योधनास वश होऊन कांहीं विचार करीत नाहींत. ज्या कालीं अर्जुनाच्या बा-णसंबंधीं तेजेंकरून या मूर्खांचीं शिरें उध्दन होऊन पडतील त्याकालीं यांस कांहीं विचार उत्पन्न होईल. माझ्या पुत्राची सेना गांडीवाच्या तेजानें दग्ध होई-ल. अशी कथा या अध्यायांत आहे.

५३. अध्याय त्रेपन्नावा.— धृतराष्ट्र बोलतो हे संजया, पांडव जयाविष-यीं संकल्प करून सर्वही युध्दाविषयीं उद्युक्त आहेत. त्यांनीं असा संकल्प के-ला आहे कीं, आपला जीव जरी नष्ट झाला तरी चिंता नाहीं, परंतु आपणास ज-य प्राप्त व्हावा. तसेंच श्रीकृष्ण, पांचाल, मत्स्य, मागध, इत्यादिकांचाही पां-डवांविषयीं असाच निश्चय आहे. तस्मात् पांडवांचाच जय होईल. संग्रामीं विद्यार-हस्य फाल्गुनानें ज्यास सांगितलें असा जो सात्यकी तो बाण वृष्टि करील. पां-डवांनीं हें सैन्यरूप जाळें पसरलें आहे. यांतून तरून जाण्यास माझे सैन्यांत कोणी समर्थ नाहीं. यास्तव हे संजया, मी बहुत दुःखित होऊन आक्रोश क-रतो. आतां जेणेंकरून शम होईल तो उपाय सर्वांनीं करावा. तो केला असतां माझ्या मनाची शांति होईल. युधिष्ठिर असें ह्मणतो कीं, हा धृतराष्ट्र अधर्मी आहे. यानें युध्दाचीं कारणें उत्पन्न केलीं. यास्तव त्याशीं स्नेह करावा. अशी कथा या अध्यायांत आहे.

५४. अध्याय चौपन्नावा.— संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, तूं बोलतोस हें उत्तम आहे. युध्दांत अर्जुन सर्व क्षत्रिय कुलाचा नाश करील. हें तुला ठाऊक असतां तूं पु-त्रास कसा वश झालास? मस्तकन कालीं तूं भितोस हा तुझी बुध्दिपूर्वी-

असती तर कार्यास उपयोगी पडती; तू पिता श्रेष्ठ असतां द्यूतकाळीं तुझे पुत्रांनीं पांडवांस जिंकिलें हें तूं ऐकून आह्मी पांडवांस जिंकलें, आह्मास राज्य मिळालें असें बालासारखें बोलून आनंद मानिलास, परंतु याचा परिणाम काय होईल याचा विचार केला नाहींस. तस्मात् त्याचें फल भोगणें आतां प्राप्त आहे. पांडव आपलें पितृसंपादित राज्य मागतात, यांत त्यांचा अपराध काय? त्यांनीं आपल्या स्वपराक्रमानें संपादन केलेली जी पृथ्वी ती त्यांनीं तुह्मांस अर्पित केली, असें असतां आह्मीं केलें, आह्मीं मिळविलें असें तुह्मी मानितां हें योग्य कीं काय? कृष्ण ज्याचा सारथी, वानर ज्याच्या केतुस्थानीं असा अर्जुन ज्याकाळीं युध्दास येईल त्याकाळीं ही संपूर्ण वसुधा त्याचीच होईल असें जाण. भीमार्जुनांपासून भय पावणारे असे जे दुर्योधनादिक पुत्र ते कधींही जय पावणार नाहींत. द्यूतकाळीं मीं व विदुरानें बहुत वेळां तुला सांगितलें, परंतु ऐकलें नाहींस. त्याचें फल भोगणें आतां प्राप्त झालें. आतां जो तू शोक करतोस हा निरर्थक आहे. अशी कथा या अध्यायांत आहे.

५५. अध्याय पंचावन्नावा— दुर्योधन बोलतो हे धृतराष्ट्रा, आमच्याविषयीं भय पावूं नको व शोकही करूं नको. कारण आह्मी शत्रूंस जिंकण्यास समर्थ आहोंत. पांडव वनांत गेले असतां कृष्ण, केकय, धृष्टकेतु, धृष्टद्युम्न प्रभृति तेथें येऊन बोलले हे धर्मा, कौरव तुह्मांस राज्य न देतील तर आह्मी त्यांचा नाश करून तुमचें राज्य तुह्मांस देऊं. ही त्या राजांची प्रतिज्ञा ऐकून मी, भीष्म, द्रोण, कृपाचार्य यांस भाषण केलें कीं, हे आचार्य हो, आमचा समूळ छेद होऊन धर्मास राज्यारूढ करावा अशी वासुदेवाची पूर्ण इच्छा आहे, त्यापेक्षां ही गोष्ट तशी घडणार. धृतराष्ट्र धर्मज्ञ आहे. ह्मणून त्याच्या व विदुराच्या वधाची इच्छा वासुदेव करील नाहीं. आतां एक पांडवांशी संधि करून त्यांची शांति करावी, अन्यांकरून कोठें तरी पळावें अथवा प्राणाची इच्छा न धरितां शत्रूशीं युध्द करावें. पांडव धृतराष्ट्रास असें ह्मणतील कीं, तुझ्या पुत्रांनीं आमचा अवरोध केला तेणेंकरून राजा, तुला बहुत संतोष झाला असेल ना! असें वारंवार ह्मणून त्यास दुःख

देतील यास्तव हे द्रोण भीष्म कृपहो, माझें कुल नष्ट होतें आतां काय मी क- रूं, मी आतां चिंताग्रस्त झालों, अशी मोठी चिंता मला प्राप्त झाली हें जाणून भीष्म द्रोण, कृपाचार्य हे मला अश्वासन देऊन बोलले कीं हे दुर्योधना, श- त्रूशीं द्रोह केलास म्हणून भिऊं नको, कांहीं चिंता नाहीं भयमुक्त हो. सम- स्त राजे जरी युध्दांत आले तथापि आह्मांस जिंकण्यास ते समर्थ नाहींत. आह्मी एकएकटे त्यापार्थिवांचा पराभव करण्यास समर्थ आहोंत. असें ति- यांनीं भाषण केल्यानंतर पुनः भीष्म बोलतो हे दुर्योधना, मांझा पिता ज्याका- ळीं मेला त्याकाळीं म्या एकट्यानें समग्र पृथ्वीतील राजे जिंकून वश केले. तो हा मी भीष्म समरांमध्यें सर्वांचा पराभव करून टाकिला. असें भीष्मानें भाषण ऐकून मी दुःखापासून मुक्त झालों आणि माझा खचित निश्चय झा- ला कीं, अशा योध्यांचें आह्मांस साह्य आहे त्यापेक्षां आह्मी शत्रूचा नाश क- रूं. तर राजा, दुःखित होऊन विलाप कां करतोस? ही माझी सर्व सेना नष्ट कर- ण्यास ब्रह्मदेवही समर्थ होणार नाहीं. मग इतरांची कथा काय? पाहा बरें, यु- धिष्ठिरानें पांच पुरें मागावयाचीं टाकून पांच ग्रामांची याञ्चा केली, तेव्हां त्यां- स तरी माझें भय मोठें आहे. हे राजा, कुंतीपुत्र जो वृकोदर हा मोठा बलाढ्य आहे म्हणून तूं त्याचें वारंवार वर्णन करतोस हें सर्व मिथ्या आहे. तूं माझा संपूर्ण प्रभाव जाणत नाहींस. माझ्यासमान या पृथ्वीवर गदायुध्दांमध्यें कोणं आहे बरें? माझ्या बलापेक्षां अधिक बलवान् दुसरा या भूमंडळीं को- णी नाहीं. एक वेळ जर मी भीमावर गदा प्रहार केला तर निश्चयें करून तो यम लोक पाहील. तस्मात् वृकोदरापासून जें तुला इतकें भय झालें आहे तें टाक. मी भीमसेन मारिला असतां हे माझ्याकडील शतशः राजे अर्जुना- स मारतील. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा, कर्ण, शल्य, जयद्रथ यांनी ल एकएक पांडवांस मारण्यास समर्थ आहे. मग सर्वत्र एकत्र झाले असतां तत्काळ पांडवांस यमगृहीं नेतील. हा पाहा आपला पितामह भीष्म यास याचे पित्यानें असें सांगितलें आहे कीं, तूं इच्छा मरणी आहेस. तेव्हां याचा वध कोण करील? ब्रह्मऋषि जो भारद्वाज, याजपासून द्रोणीचे गर्भी द्रोणाचा र्य उत्पन्न झाला. द्रोणापासून अश्वत्थामा झाला. गौतम ऋषीपासून शरस्तं-

भाचेगयीं कृपाचार्य झाला. हे तिघे मोठे योध्दे आपलें रक्षण करते आहेत. भीष्म, द्रोण, कृपाचार्य यांजपेक्षांही कर्ण योध्दा अधिक आहे. परशुरामानें याजवर अनुग्रह केला आहे. कर्णाचीं कुंडलें इंद्रानें आपले इंद्राणीकरितां याच्याकरून घेऊन कर्णास अमोघ परमभयंकर अशी शक्ति दिल्ही. ती शक्ति कर्णानें टाकिली असतां धनंजय वांचण्याची शंकाच नाहीं. हे राजा, पूर्वीं सांगितलेल्या योध्यांशिवाय आपलेकडे अकरा अक्षोहिणी सैन्यही आहे आणि शत्रूचें तर सात अक्षोहिणी सैन्य आहे. हा सर्व सैन्याचा बलाबल विचार करून पांडव बलवान आहेत, ह्मणून उगीच मोह पावूं नको. असें धृतराष्ट्राशीं भाषण करून दुर्योधन संजयास पुनः पांडवांच्या सैन्याविषयीं प्रश्न करूं लागला. अशी कथा या अध्यायांत आहे.

५६. अध्याय छपन्नावा:— दुर्योधन प्रश्न करतो हे संजया, बहुत राजे व सात अक्षोहिणी सैन्य जमा करून पुढें युधिष्ठिरराजा युध्द करूं इच्छितो कीं काय? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो. हे दुर्योधना, युधिष्ठिरास युध्दाची इच्छा बहुत आहे व युध्दाविषयीं तो निरंतर हर्षित आहे. यमापासूनही ज्यास भय नाहीं, असे भीमार्जुन तेही युध्दाविषयीं मोठे उत्कंठित आहेत. एके दिवशीं अर्जुन आपला रथ तयार करीत होता. त्याकालीं अर्जुनाच्या तेजेंकरून समग्र दिशा प्रकाशित झालेल्या मी पाहिल्या. अर्जुनाचें तेज मेघवर्ण असून विद्युल्लतेसारखें देदीप्यमान होतें. तेव्हां अर्जुन माझ्याकडे पाहून बोलला. हे संजया, हें माझें युध्दाचें पूर्वरूप पाहा आणि माझा निरोप धृतराष्ट्रपुत्रास जाऊन सांग कीं, आतां निश्चयेंकरून तुमचा पराभव करतों. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे संजया; अक्षांत पराजित झालेले जे पांडव त्यांची प्रशंसा करून तुला बहुत आनंद झाला आहे असें मला वाटतें. बरें त्याच्या रथाचे अश्व व ध्वज कसे आहेत ते मला सांग. असें ऐकून संजय बोलतो हे दुर्योधना, विश्वकर्म्यानेंच अर्जुनाचा ध्वज उत्पन्न केला. चित्रविचित्र रूपें देवमायेंकरून त्या ध्वजावर विश्वकर्म्यानें चमत्कारिक केलीं आहेत. त्याजवर भीमसेनाचे अनुरोधाकरितां मारुती राहातो. मार्गांत तरूंच्या योगें ध्वजास कांहीं

अवरोध होत नाहीं. अशीच कांहीं विश्वकर्म्यानें त्या ध्वजांत माया ठेविली आहे. त्यापासून ध्वजास कधींहीभार होत नाहीं. तसेच चित्ररथगंधर्वानें दिलेले वातवेगी, श्वेतवर्ण, पृथ्वी अंतरिक्ष यांत ज्यांची अवकुंठित गति अशा अश्वांनीं युक्त ज्याकालीं अर्जुनाचा रथ सिध्द होतो त्या कालीं त्या रथाचें तेज कोणी पाहाण्यास समर्थ होत नाहीं. रुक्षवर्ण अश्व भीमसेनाच्या रथास वाहातात. हे दुर्योधना इंद्रानें दिलेले सर्व वाजींमध्यें मुख्य, वायूसारखे वेगवान असे वाजी नकुलाच्या रथास वाहातात. यांशिवाय सहदेव, सौभद्र आणि द्रौपदेय पांच यांच्या रथांचे अश्व उत्तम असून वेगवान् आहेत. अशी कथा या अध्यायांत आहे.

५७. अध्याय सत्तावन्नावा— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, पांडवांचें प्रिय करण्याकरितां जे राजे आले असतील त्यांतून माझ्या पुत्राशी युध्द करण्याकरितां कोण उत्सुक आहेत. असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, अंधक वृष्णीमध्यें मुख्य जो श्रीकृष्ण तो पांडवांकडे आला आहे आणि एकेक अक्षौहिणी सैन्यासहित चेकितान व सात्यकी, दाहा पुत्रांसहित एक अक्षौहिणी सैन्य घेऊन द्रुपद, शंख व उत्तर या पुत्रांसहित एक अक्षौहिणी सैन्य घेऊन विराट, प्रत्येक अक्षौहिणी सैन्य घेऊन जरासंधाचा पुत्र सहदेव, व चेदि देशाचा राजा धृष्टकेतु आणि एक अक्षौहिणी सेनेसहित पांच केकयराजे असे हे राजे दुर्योधनाच्या सेनेशीं युध्द करण्याच्या इच्छेनें पांडवांकडे प्राप्त झाले ले मीं पाहिले. मनुष्य, देव, गंधर्व इत्यादिकांचा व्यूह जाणणारा जो महासमर्थ धृष्टद्युम्न तो पांडवांचा सेनापति आहे. शिखंडीनें भीष्म, युधिष्ठिरानें शल्य, भीमानें शंभर भ्रात्यांसहवर्तमान राजा दुर्योधन तसेच प्राच्य दाक्षणात्य राजे, अर्जुनानें अश्वत्थामा, विकर्ण, सैंधव, जयद्रथ, आणखीही युध्दांत इतरांनीं जिंकण्यास अशक्य असे राजे, कैकेय पांच भ्राते यांनी कैकेय मालव, शाल्वक, शंसप्तक; अभिमन्यूनें दुर्योधन व दुःशासन यांचे पुत्र, बृहद्बल; धृष्टद्युम्नासहवर्तमान पांच द्रौपदेय यांनीं द्रोणाचार्य; चेकितानानें सोमदत्त, सात्यकीनें कृतवर्मा; सहदेव यानें शकुनी, उलूक व कैतव्य; —

नकुलानें सारस्वत गण, या सर्व पांडवांकडील वीरांनीं असे आपले दे गळाले भाग कल्पिले आहेत. आणखी युध्दांत मोठमोठे राजे जे जे येतील त्यांच्याशीं युध्द करण्यास पांडुपुत्र सिध्द आहेत. हे राजा, याप्रकारें तुला पांडवांच्या सैनिकांची भागकल्पना निवेदन केली आतां तुलाजें कर्तव्य असेल तें कर. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, माझे पुत्र द्यूत व्यसनीं निमग्न झाल्यामुळें गांडीवाग्नीमध्यें प्रवेश करतील. कारण पांडवांकडील सर्व वीर सूर्याग्निसारखे तेजस्वी असून मोठे प्रतापी आहेत आणि ज्यांचें नियमन करणारा धर्मराज, संरक्षण करणारा श्रीकृष्ण, योध्दे भीमार्जुन, नकुल सहदेव, सात्यकी प्रभृति पूर्वीं सांगितलेले वीर सर्वगुणांनीं संपन्न असून देवांसारखे प्रतापी आहेत व ते पर्वतांचाही बाणांनीं भेद करतील. असें असतां माझा दुष्ट पुत्र दुर्योधन मी सांगत असतां यांशीं युध्द करण्याची इच्छा करतो. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून दुर्योधन बोलतो. हे महाराज, आह्मी आणि पांडव एक जातीचे असून भूमीवर राहणारे असतां पांडवांचाच जय होईल असें तू कशावरून मानतोस. भीष्म, द्रोण, कृप प्रभृति वीरांस इंद्रही जिंकण्यास असमर्थ आहे. मग पांडवांची कथा काय? संपूर्ण राजे मजकरितां पांडवांशीं युध्द करण्यास इच्छितात. यास्तव त्यांनीं बाणजाल सोडिले असतां पांडवांसहित पांचाल पलायन करतील. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, हा दुर्योधन धर्मराजाशीं युध्द करण्यास समर्थ नसतां उन्मत्तासारखा प्रलाप करतो. पांडवांचें बल भीष्म जाणतो. आतां पांडवांस उत्तेजन देणारा कोण आहे तें सांग. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, धृष्टद्युम्न वारंवार पांडवांशीं ह्मणतो कीं, युध्द करा. भिऊं नका. भीष्मादिक वीरांचा मी एकटाच निरोध करीन, असें ऐकून धर्मराज बोलतो हे धृष्टद्युम्ना, तुझें धैर्य व वीर्य पाहून आह्मीं संग्रामाविषयीं प्रवृत्त झालों. यास्तव आमचें जें कल्याण करणें तें तूंच करावें. तूं आपलें पौरुष दाखवीत असतां तुझ्या अग्रभागीं कोणी उभा राहाणार नाहीं. असें धर्मराज बोलत असतां धृष्टद्युम्न मला बोलला कीं,

हे संजया, दुर्योधनाकरितां जे जे बाल्हिकप्रभृतिराजे युध्दास सिध्द झाले आहेत. त्यांस व दुर्योधनभीष्म यांस सांगावें कीं, देवरक्षित अर्जुन तुह्मांस न मारील असें करा व धर्मराज साधु आहे असें या वेळेस मनांत न आणितां त्यास राज्य देऊन प्रार्थना करा. कारण अर्जुनासारखा सांप्रत पृथ्वीवर कोणताच वीर नाहीं. आणि तो मनुष्यांनीं कधींही जिंकिला जाणार नाहीं. यास्तव युध्दाविषयीं मन धारण करूं नका. अशी कृ॰ या॰ आ॰

५८. अध्याय अठ्ठावन्नावा:- धृतराष्ट्र बोलतो हे संजया, पांडवांशीं माझे पुत्र स्पर्धा करतात असें बोलून दुर्योधनास बोलतो हे तात, पांडवांशीं युध्द करूं नको. युध्द कोणीं इच्छीत नाहीं. तुझे जीविकेस अर्धपृथ्वी पुरे. अर्धराज्य पांडवांस दे. तुझ्या सैन्यांतील अश्वादिकांच्या नेत्रांतून मोगश्राव उत्पन्न झाला आहे. वृध्दापकालीं मला पुत्रशोकांत पाडूं नको. मी युध्द इच्छीत नाहीं. तसेच बाल्हिक, भीष्म, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, कर्ण इत्यादिकांच्या बलानें तूं युध्द करणार; परंतु ते युध्द करण्यास इच्छीत नाहींत. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे तात, भीष्म, द्रोण, अश्वत्थामा, कांबोज, आणखीही दुसरे तुझे संबंधी यांच्यावर मीं केवळ युध्दाचा भार ठेविला नाहीं. मी, कर्ण व दुःशासन हे त्रिवर्ग संग्रामीं पांडवांस मारून पृथ्वीचें राज्य करूं अथवा मला मारून पांडव राज्य करोत, परंतु पांडवांस ह्र वर्तमान मी कदापि एकत्र राहाणार नाहीं व सूच्यग्रीं जितकी मृत्तिका राहील तितका पृथ्वीचा अंशही पांडवांस देणार नाहीं. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे कौरवहो, तुह्मांकरितां मी शोक करतों. तुह्मी माझ्या पुत्राच्या संगतीस जितके लागले आहांत तितकेही यम क्षयास जाणार. ज्यासमयीं भीमसेन कुंजरांचीं गंडस्थळें व दंत विदीर्ण करून शोणिताच्या नद्या उत्पन्न करील. त्याकालीं माझ्या वचनाचें तुह्मांस स्मरण होईल. यास्तव तुह्मी लौकर शम करा नाहीं तर भीमसेनाच्या गदाघातेंकरून नष्ट व्हाल. असें धृतराष्ट्र राजानें सर्व पृथ्वीपती यांस पृथक् पृथक् भाषण करून पुनः संजयास पांडवांविषयीं प्रश्न केला. अशी क॰ या॰ अ॰ आहे.

५९. अध्याय एकूणसाठावा:- धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, महात्मे

जे वासुदेव धनंजय यांनीं काय भाषण केलें तें सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, अंतःपुरांत कृष्ण आणि अर्जुन होते. त्यांचे बाहेरचे बाजूस मी उभा राहून उभयतांच्या पादांगुलीस पाहात स्तब्ध उभा राहिलों. कारण त्यास्थळीं अभिमन्यूचीही जाण्याची शक्ति नाहीं. मग दुसरा कोणाचा प्रवेश होणार! त्या अंतःपुरांत द्रौपदी अर्जुन व सत्यभामा आणि श्रीकृष्ण असे होते. तेथें नानाप्रकारच्या रत्नांनीं व कांचनांनीं खचित केलेलीं आणि नानाप्रकारच्या अस्तरणांनीं युक्त अशीं उत्तमोत्तम आसनें होतीं. त्यांवर उभयतां कांहीं शयन केल्यासारखे असून अर्जुनाच्या उत्संगावर कृष्णाचे पाय व अर्जुनाचा एक पाय सत्यभामेवर व एक पाय द्रौपदीवर होता. तेव्हां अर्जुनानें मजकडे पाहून मला बसण्याकरितां कांचनमय आसन दिल्हें. त्यासमी हस्तस्पर्श करून भूमीवर बसलों. उभयतांही शामवर्ण, शरीरें ज्यांचीं वृद्ध तरुण, शाल वृक्षासारखे ज्यांचे स्कंध. जसे इंद्र विष्णूच काय एकासनीं बसले आहेत. असें त्या उभयतांस पाहून मला मोठें भय उत्पन्न झालें. हे राजा, तुझा पुत्र दुर्योधन हें पार्थाचें ऐश्वर्य अगदीं जाणत नाहीं. द्रोणभीष्माच्या आश्रयानें व कर्णाच्या वल्गनेनें तुझा पुत्र मोहित झाला आहे. पार्थ, श्रीकृष्ण या उभयतांस ज्या काळीं मी एकासनस्थ पाहिलें त्याकाळीं असा निश्चय केला कीं, धर्मराजाचा संकल्प आजच सिद्धीस गेला. अरे अर्जुन व श्रीकृष्ण हे ज्याचे आज्ञाधारक त्या धर्मराजाचा संकल्प खचित सिद्धीस जाईल. हे राजा, नंतर अन्नपानादिकेंकरून त्यांनीं माझा परम सत्कार केला असतां मी अंजलिपुट जोडून तुझा निरोप मागूं लागलों त्याकाळीं श्रीकृष्णास नमस्कार करून अर्जुनानें सांगितलें हे महाराज, संजय आला आहे. असें ऐकतांच श्रीकृष्ण मजकडे पाहून बोलूं लागला. तो केशवाची वाणी ऐकण्याविषयीं फार सरस असून धृतराष्ट्रपुत्रास त्रास देणारी अशा वाणीनें वासुदेवानें मला सांगितलें. हे संजया, धृतराष्ट्रास जाऊन सांग कीं, नानाप्रकारचे याग दक्षणापूर्वक जे कर्तव्य असतील ते लौकर करून घ्या. आपले पुत्रदारा यांसह वर्तमान आनंद करा. कारण पुढें एक मोठें भय उत्पन्न होणार आहे. वस्त्रहरणकाळीं मी दूर

असतां द्रौपदीनें दीन होऊन हे गोविंदा! असा आक्रोश केला. तें द्रौपदीचें ऋण माझे ह्रदयांत शिरलेलें दिवसें दिवस वृध्दि पावत आहे. तें ह्रदयांतून अजून निघत नाहीं. त्या ऋणापासून मुक्त होणें आहे. मोक्ष कर्तव्य आहे, आणि अर्जुनास मी साह्य असतां त्याचा नाश करण्यास जो इच्छीत आहे त्याचा नाश करणें आहे. बल, वीर्य, तेज, इत्यादि गुण पार्थाखेरीज अन्यत्र कोठें राहात नाहींत. हें भाषण श्रीकृष्णानें केलेलें मी तुला सांगितलें. अशी कथा या अध्यायांत आहे.

६०. अध्याय साठावा:— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, संजयाचें भाषण ऐकून यांत गुणदोष किती आहेत यांचा विचार धृतराष्ट्र करूं लागला. तेव्हां उभयतां सैन्यांचा विचार पाहातां माझ्या पुत्राचें सैन्य बहुत आहे. तेव्हां त्यापेक्षां माझ्या पुत्रांचा पराजय होणें कठीण आहे. उभयतांचा शारीर बलाबल विचार पाहातां पांडव दैव आणि मानुष्य या उभय बलांनीं युक्त आहेत. माझे पुत्रास मनुष्यशक्तीच मात्र आहे. तेव्हां शक्तीनें पांडव मोठे आहेत. असा निश्चय करून दुर्योधनास बोलतो हे पुत्रा, अरे वा रंवार मला मोठी चिंता भास होते. तिची शांति होत नाहीं. अरे हें मी आतां बोलतों तें प्रत्यक्षच आहे असें तूं सत्य जाण. आपले पुत्रांवर अत्यंत स्नेह ठेऊन त्यांचें प्रिय करणें हा प्राणिमात्राचा मार्ग आहे. याचप्रकारें आपल्यावर उपकार करणाराचें प्रिय व हित करावें हाही मार्गच होय. तात्पर्य असें आहे कीं, खांडववन दाहप्रसंगीं अर्जुनानें अग्नीस तृप्त केला यामुळें तो धनंजयाचा परमसखा झाला. तेव्हां याचें साह्य करणें अग्नीस अवश्य आहे. आणि यमधर्म, इंद्र, इत्यादिक पांडव आपणापासून झाले असें जाणून तेही साह्यास येतील. अर्जुनाचें कृत्य पाहून भीष्मद्रोणादिक असें बोलतात कीं, युध्दार्थ अर्जुन उभा असतां अमानुष कर्में करणाऱ्या राजेलोकांनींही पराजय करण्यास अशक्य आहे. कारण एका वेगानें पांचशें बाण सोडणाऱ्या कार्तवीर्यार्जुनासमान अर्जुन पराक्रमी आहे. यास्तव त्या अर्जुनाचें चिंतन करीत असल्यामुळें अहोरात्र निद्रा येत नाहीं. तस्मात् पांडवांशीं कलह न करितां शम करावा, हेंच मला बरें वाटतें. असा वि-

षय या अध्यायांत आहे.

६१ अध्याय एकसष्टावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पित्याचें भाषण ऐकून दुर्योधन क्रोधानें बोलतो हे राजा, पार्थाचे साह्य करणारे देव आहेत. असें मानून परम भयाभीत झालास, तर हें भय सोडून दे. कारण देवांमध्यें कामक्रोधादिक नसल्यामुळें ते पांडवांचें साह्य करणार नाहींत. साहाय्य करतील तर त्यांचें देवत्व जाईल. जर देव माझ्या शत्रूंस रक्षण करण्याविषयीं समर्थ असते तर तेरा वर्षें पांडव कां दुःख पावते. हे राजा, सांप्रत मी ज्यांचें शुभाशुभ चिंतन करीन त्यांचें शुभाशुभ होतें. आतां हें भाषण केवळ तुझ्या समाधानार्थ श्लाघेनें करतों असें नाहीं. पांडव, मत्स्य, सात्यकी, वासुदेव यांस पांचाल कैकयांसहीत मी जिंकिलें असें ऐकशील. द्रोण, कृपादिक जी अस्त्रविद्या जाणतात ती सर्व माझेठायीं आहे. असें दुर्योधनाचें भाषण ऐकल्यावर धृतराष्ट्र राजा बोलतो हे संजया, माझ्या पुत्रांचें व पांडवांचें बल व वैश्यापुत्र जो युयुत्सु याचीं कार्यें जाणून सांप्रत काय करावें तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

६२. अध्याय बासष्टावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, याप्रमाणें धृतराष्ट्र राजा संजयास बोलत असतां कर्ण त्याचा अनादर करून बोलतो हे दुर्योधना, पूर्वी परशुरामाशीं मिथ्या भाषण करून ब्रह्मास्त्र मी संपादन केलें. पुढें परशुरामानें मी क्षत्रिय आहें असें जाणून मला शाप दिला कीं, तुला अंतकाळीं माझ्या अस्त्रविद्येची स्मृति राहाणार नाहीं, असा मला शाप दिल्हा असतां पुनः मी त्याची शुश्रुषा करून प्रसन्न केल्यावर त्यानें तेंच अस्त्र मला दिलें. त्या अस्त्राच्या योगें संपूर्ण पृथ्वी मी दग्ध करण्यास समर्थ आहें. सागरांत पृथ्वी त्या अस्त्रयोगें मी ग्रहण करीन. निमिषमात्रामध्यें या अस्त्राच्यायोगें पांचालकारुष यांसहवर्तमान पुत्रपौत्र सबांधव पांडवांचा नाश करून जे मोठमोठे योध्दे आले आहेत त्यांचाही नाश करीन. हे दुर्योधना, पितामह, द्रोणाचार्य आणखी इतर नरेंद्र युध्दास आलेले आपले सैन्यासहवर्तमान एकीकडे बसोत, कोणाची मला गरज नाहीं. मी एकटा पांडवांचा नाश करण्यास समर्थ आहें. असें ऐकून भीष्म बोलतात हे कर्णा, काळाच्यायोगें बुध्दि

नष्ट झाल्यामुळें काय बडबड करतोस? अरे तू नष्ट झाल्यावर धृतराष्ट्रपुत्र नष्ट होतील. हें तू जाणत नाहींस यास्तव तू आपलें रक्षण कर. अर्जुनानें खांडववनदाह इत्यादि जीं कर्में केलीं तीं तुह्मी श्रवण केलीं आहेत किंवा नाहींत तें मनांत आणून अर्जुनाशीं द्वेषाचा उपरम करणें हेंच तुह्मांस योग्य आहे. तुला असें वाटत असेल कीं, इंद्रानें मला अमोघ शक्ति दिल्ही आहे, परंतु त्या शक्तीचा नाश श्रीकृष्ण करतील हें तू पाहाशील व जो तुजपाशीं सर्पमुख बाण आहे तो तुजसहवर्तमान नष्ट होईल. बाणासुर, भौमासुर इत्यादिकांचा हनन कर्ता जो वासुदेव तो अर्जुनाचा रक्षणकर्ता आहे. तो अर्जुन तुह्मांसारख्या वीरांचा नाश सहज करील. असें ऐकून कर्ण बोलतो हे भीष्मा, माझें भाषण तुह्मांस फार कटु लागल्यामुळें तुह्मीं माझी निंदा केलीत. तस्मात् त्याचें फल इतकेंच जाणा कीं, तुह्मीं जिवंत आहां तोंपर्यंत मी युध्दांत शस्त्र धरणार नाहीं. तुह्मीं ज्या काळीं वध पावाल त्याकाळीं हे संपूर्ण भूमिपाल माझा प्रभाव पाहोत. असें कर्ण बोलून गृहीं गेला असतां भीष्म बोलतात हे दुर्योधना, हा सूतपुत्र जर सत्य प्रतिज्ञ आहे असें तू मानितोस तर हें सर्व मिथ्या आहे. पूर्वी या कर्णानें अशी प्रतिज्ञा केली कीं, आमरणांत तुमच्याकरितां युध्द करीन, तोच आतां वल्गना करतो कीं, भीष्म आहेत तोंपर्यंत युध्द करणार नाहीं तेव्हां असा हा तुझा मित्र तुझ्या मरणाची उपेक्षा करतो; परंतु तुला एक निश्चय सांगतों. ज्या काळीं भीमसेन युध्दांत व्यूहाशीं प्रतिव्यूह करून तुमचे वीरांचा मस्तक भेद करील. त्याकाळीं या कर्णाची प्रतिज्ञा सत्य किंवा मिथ्या तुमचे ध्यानांत येईल. ज्याकाळीं परशुरामानें यास प्रश्न केला कीं, तूं कोण आहेस? त्या काळीं कर्णानें मी ब्राह्मण आहें असें सांगतांच तेच समयीं या अधम पुरुषाचीं धर्मतप इत्यादि नाश पावलीं. असें भीष्माचें भाषण ऐकून दुर्योधन, कर्ण शस्त्रें ठेवून गेला हें पाहून भीष्मास भाषण करतो. असा विषय या अध्यायांत आहे.

६३. अध्याय त्रेसष्ठावा:— दुर्योधन बोलतो हे पितामह, पांडव हेही मनुष्य आह्मींही मनुष्यच; एक जातींत दोघांची उत्पत्ति; वयवीर्य पराक्रम, अस्त्रविद्या शीघ्रत्व, कौशल्य इत्यादिकें करून आह्मी व पांडव समानच आहोंत असें असतां पार्थाचाच जय होईल असें तुह्मीं मानितां याचें कारण काय?

हे पितामह, तुम्ही असें समजा कीं, द्रोण, कृपाचार्य, बाल्हिक व इतर योध्दे आले आहेत त्यांची आह्मांस गरज नाहीं. मी व कर्ण व दुःशासन इतके आह्मीं त्रिवर्ग पांडवांस शरेंकरून यमालयीं पाठवूं. नंतर नानाप्रकारचे विपुल दक्षणयाग करून गोधन ऐश्वर्य इत्यादिकेंकरून ब्राह्मणांस तृप्त करूं. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून विदुर बोलतो हे धृतराष्ट्र राजा, निश्चीत दर्शी जे वृध्द ते असें ह्मणतात कीं, ब्राह्मणांस विशेषेंकरून दम हाच धर्म सनातन आहे. त्यापासूनं ब्राह्मणांचें कल्याण होतें. जो दम धारण करतो त्यास दान, क्षमा, सिध्दी प्राप्त होतात. दमानें तेजोवृध्दि होते, यास्तव दम स्वाधीन झाला असतां त्या पुरुषास ब्रह्मपद मिळतें. अदांत पुरुषांपासून संपूर्णांस भय होतें यास्तव त्यांच्या शिक्षणार्थ ब्रह्मदेवानें क्षत्रियांस उत्पन्न केलें आहे. आतां दमाचें चिन्ह सांगतों. क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, आर्जव इंद्रियजय, इत्यादि ज्या पुरुषाशीं वास करतात त्या पुरुषास दांत असें ह्मणावें. हे राजा, काम, लोभ, दर्प, मन्यु, निद्रा, श्लाघा, मान, ईर्षा, शोक, इतकीं अदांत पुरुषापाशीं राहातात. अकुटिल, सुशील, मनानेंशुध्द असणें, आशाहीन, स्त्रियांचे चिंतन न करणारा त्यास दांत ह्मणावें. जे दांत असून शमपरायण असतात तेच आनंद पावतात. जो ज्ञानतृप्त असून जितेंद्रिय होऊन सर्वत्र ममतारहित असतो तो ब्रह्मपदास योग्य होतो. यथोक्त जे गृह, दारा इत्यादिकांचा त्याग करून मोक्षाचीच आकांक्षा धरून बसले आहेत ते पुरुष आकाशामध्यें तेजोमय शाश्वत लोकीं अखंडित वास करतात. असाविषय या अध्यायांत आहे.

६४. अध्याय चौसष्टावा:— विदुर भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, उभयतांचा कलह होत असतां दोघांचाही नाश होतो याविषयीं तुला एक कथा सांगतों. कोणीं एक पारध्यानें अरण्यांत मृगबंधन करण्याकरितां जाळें पसरलें होतें. त्या जाळ्यांत दोन पक्षी सांपडले असतां ते बध्द होऊन त्या जाळ्यासहवर्तमान आकाश मार्गें उडाले. हें पाहून मृगहिंसक त्या पक्ष्याचे पाठीमागून जिकडे ते आकाशमार्गें जातील तिकडे जात असतां वनांत एक ऋषीचा आश्रम दृष्टीस पडला. तेथें एक ऋषि आपलीं अग्नि-

क्रियासमाप्त करून आश्रमाचे बाहेर गेला असतां त्यानें आकाशांत दोन पक्षी जाळें असून चालले आहेत आणि भूमीवर त्या पक्ष्यांच्यामागें एक लुब्धक, पक्षी ग्रहण करण्याच्या हेतूनें चालत आहे असें पाहून त्यास ह्मणतो हे लुब्धका, आकाशांतून पक्षी जात आहेत आणि त्यांस धरण्याकरितां तूं भूमीवर त्यांचे मागून चाललास हें काय रे आश्चर्य! असें भाषण ऐकून पारधी बोलतो हे ऋषे, एकापाशांत दोन पक्षि बध्द आहेत ज्याकाळीं या उभयतांचा वाद होईल त्याकाळीं हे माझ्या हस्तगत होतील. यास्तव या उभयताच्या कलहाची ...... इतक्यांत आकाशांत त्या पक्ष्यांचा एक अमिषाकरितां कलह उत्पन्न होऊन जाळ्यासह वर्तमान ते पृथ्वीवर येऊन पडले असतां मृगयु मार्गप्रतीक्षा करीत होताच त्याणें त्या पक्ष्यांचा प्राण घेतला. विदुर ह्मणतो हे राजा, हे पक्षि कलहानें पारध्याच्या स्वाधीन जसे झाले तसे जे ज्ञातीमध्यें अर्थाविषयीं कलह करतील ते शत्रूच्या हस्तगत होऊन नाश पावतील. यास्तव हे धृतराष्ट्रराजा, ज्ञातीशीं विरोध कधीं करूं नये. तुह्मीं पांडवांसहवर्तमान एकत्र राहा ह्मणजे तुमची वृध्दि होईल. पांडवांचा पराभव करण्यास कोणाची शक्ति नाहीं. दुसरीही एक गोष्ट मीं गिरीवर पाहिली ती तुह्मांस सांगतों. कोणेएके दिवशीं गंधमादन पर्वतावर मी विद्वान् ब्राह्मण व किरात यांसहवर्तमान गेलों होतों. त्या पर्वताचा एक प्रदेश अधोभागीं ज्याचा अंत नाहीं असा असून तेथें मधुमक्षिकांचे मोहोळ कुंभाकृति लागले होतें. आसमंतात्भागीं आसी विष सर्पांनीं तें स्थान संरक्षित झालें होतें. या मधूचें असें सामर्थ्य होतें कीं, तें मिळालें असतां अमरत्व प्राप्त होऊन सर्वव्याधी दूर होतात. तेव्हां किरातानीं प्रार्थना केली कीं, आह्मांस आज्ञा होईल तर या कठिण स्थळांतूनही आह्मी तें मधु घेऊन येतों. अशी प्रार्थना करून त्या सर्पसंरक्षित गिरिगव्हरांत जातांच ते नाश पावले, तसे तुझे पुत्र पृथ्वी लोभानें भ्रष्ट होणार. हा तुझा पुत्र दुर्योधन अर्जुनाशीं युध्द करण्याविशीं मोठा उत्सुक आहे, परंतु अर्जुनाचें तेज त्यास माहीत नाहीं. विराटनगरीं एक रथस्थ असतां भीष्मद्रोणादिक सकल वीर ज्यानें भग्न करून

त्रस्त केले त्या अर्जुनास द्रुपद व मत्स्य हे अनुकूळ झाले असतां तुमचें कुळ निःशेष करतील. यास्तव हे राजा, युधिष्ठिरास आपले अंकावर घेऊन त्याचें समाधान कर. यांतच तुमचें हित आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

६५. अध्याय पांसष्टावा.— धृतराष्ट्र भाषण करतो हे दुर्योधना, जसा एकादा मार्ग न जाणणारा अमार्गास जातो तसा तूं अमार्ग असतां मार्ग असें समजून तिकडे जातोस तर त्या मार्गाचा त्याग कर. युधिष्ठिर धर्मानें वागणारा आहे त्यास जिंकावयास तूं समर्थ नाहींस. त्याचे पुढें जातांच मृत्यु पावशील. तसाच जो भीमसेन व अर्जुन यांशीं युध्द करण्यास कोण समर्थ आहे? पांडवांच्या हिताविषयीं परम रत असा सात्यकी तुझी सेना विध्वंस करून टाकील. या कृष्णाची आपल्या दारा, संबांधव ज्ञाति, आत्मा आणि पृथ्वी यांजवर प्रीति एकीकडे आणि अर्जुनावर प्रीति एकीकडे असा कृष्ण आणि पांडव हे उभयतां ज्या सैन्यांत आहेत या सैन्याचें बळ पृथ्वीही धारण करण्यास अशक्य आहे. याजकरितां हे राजा, भीष्मादिकांचें वचन मान्य कर. हे भीष्मादिक उभयतांवर समान प्रीति करणारे आहेत यास्तव पांडवांस राज्य भाग दे. असा विषय या अध्यायांत आहे.

६६. अध्याय सासष्टावा.— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, असें धृतराष्ट्र पुत्रास बोलून संजयास प्रश्न करतो. हे संजया, वासुदेव बोलल्यानंतर धनंजय काय बोलला तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, वासुदेवाचें भाषण ऐकून धनंजय वासुदेव श्रवण करीत असतां बोलला हे संजया, भीष्म व धृतराष्ट्र, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, बाल्हिक, अश्वत्थामा, शकुनी, दुःशासन, शल्य इत्यादिकांस दुर्योधनानें पांडवाग्नींत हवन करण्याकरितांच आणलें आहे असें वाटतें, हे संजया सामात्य दुर्योधन यास माझा निरोप सांग कीं, शराग्नी याचेठायीं जोंकाल पर्यंत क्षत्रियांच्या होमास आरंभ झाला नाहीं त्याचे पूर्वी जें काय तुह्मांस सूचित असेल तें करा. मित्रघाती युधिष्ठिराचें ईप्सित सत्कार पुरःसर द्यावें आणि तो अंश जर त्यास न द्याल तर अश्व पदाती कुंजरांसहित पितरांचे

द्दिशेस तीक्ष्ण शरानें तुह्मांस नेईन. असें त्याचें भाषण ऐकतांच त्यास व चतुर्भुजास नमस्कार करून हे भूपते तुला सांगण्यास एथें आलों, असा विषय या अध्यायांत आहे.

६७. सदुसष्टावा अध्याय.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, संजयानें पांडवांकडील जें वृत्त सांगितलें तें दुर्योधनास रुचलें नाहीं हें पाहून सर्वेश जे कांहीं वेळ स्तब्ध बसून एकाएकीं सभेंतून उठून गेल्यानंतर धृतराष्ट्र आपले बलाचा व पांडवांचे बलाचा निश्चय होण्याकरितां संजयास प्रश्न करतो हे गावल्गणे, आमचे सैन्यांत व पांडवांचे सैन्यांत न्यूनाधिक्य काय आहे? व युध्दास सिध्द झालें असतां कोणाचा जय होईल तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, आतां कोणी मध्यस्थ श्रवण करता असल्यावांचून मी तुला सांगत नाहीं. मजविशीं तुला ईर्षा उत्पन्न होईल यास्तव आपला पूर्वज जो व्यास व महिषी जी गांधारी यांस सभेचेठायीं आण ह्मणजे त्यांसमक्ष मी तुला सांगतों. ते तुझी ईर्षा दूर करतील. असें ऐकतांच विदुर, गांधारी व व्यास या उभयतांस घेऊन सभेमध्यें आला असतां व्यासानीं आपल्या पुत्राचें व संजयाचें मन जाणून भाषण केलें हे संजया, धृतराष्ट्र तुला केशवार्जुनाचें मन काय असेल तें पुसतो. त्यास तूं यथातथ्य सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

६८. अध्याय अडुसष्टावा.– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र, धनुष्य धारण करणारे कृष्णार्जुन यांचे जन्म भूभार हरणार्थ आहे. तेजःपुंज वासुदेवाचें चक्र तें मायेंकरून सर्वत्र भ्रमित असतां कौरवांचें नाशन करून पांडवांचें संरक्षण करणार. सर्व जग एकीकडे आणि श्री जनार्दन एकीकडे इतकें त्याचें महत्व आहे. संपूर्ण जगतास भस्म करण्याची शक्ति जनार्दनास आहे; परंतु त्यास भस्म करण्यास जगताची शक्ति नाहीं. तो भगवान् सत्य, धर्म, ह्री, आर्जव, हीं जेथें आहेत तेथें राहातो, आणि जेथें गोविंद तेथेंच जय आहे. या कृष्णानें पांडवरूप सत्र, लोकांस मोह करण्याकरितां उत्पन्न करून अधर्मनिरत व मूढ असे जे तुझे पुत्र त्यांस दग्ध करण्यास इच्छितो. काल, मृत्यु, स्थावरजंगमात्मक जें जगत् यांचा स्वामी श्री कृष्ण भगवान्

आहे. यास नम्र झालेले जे मानव ते महाभयापासून तरतात. असा विषय या अध्यायांत आहे.

६९. अध्याय एकूणसत्तरावा.– धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, माधव सर्वलोकेश्वर आहे हें तूं कशानें जाणतोस? मी त्यास कां जाणत नाहीं हें मला सांग. असें ऐकून संजय भाषण करतो हे राजा, केशवास मी आत्मविद्येच्या योगें जाणतों. जे आत्मविद्याहीन व तपोध्वस्त ते केशवास जाणण्यास योग्य नाहींत. तूंतर आत्मविद्याहीन आहेस तेव्हां तुला केशवाचें ज्ञान कोठून होईल? असें ऐकून राजा भाषण करतो हे संजया, जनार्दनाची भक्ति कोणती? कोणत्या योगें जनार्दन साध्य होतो? ज्या विद्येनें तूं मधुसूदनास जाणतोस ती विद्या मला सांग? असें ऐकून संजय भाषण करतो हे राजा, मी माया जालांत गुंतत नाहीं, वृथा धर्म सेवन करीत नाहीं, शुध्दभावें भक्ति व विद्या ईहींकरून मी भगवंतास जाणतों. असें ऐकून धृतराष्ट्र भाषण करतो हे दुर्योधना, हृषीकेश जनार्दन आपला आप्त आहे यास्तव अनन्यभावेंकरून त्यास शरण जावें हें मला बरें वाटतें. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे धृतराष्ट्रा, भगवान् देवकीपुत्र त्रैलोक्याचें हनन करील हें खरें आहे; परंतु त्याणें अर्जुनाशीं सख्य केलें याजकरितां मी केशवास शरण जात नाहीं. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे गांधारी, तुझा पुत्र दुर्मति, स्पर्धा करणारा, आत्माभिमानी, दुसऱ्यांनीं त्यास कल्याणाचा मार्ग सांगितला असतां अतिक्रमण करतो यास तूंतरी कांहीं बोध कर. असें ऐकून गांधारी बोलते. अरे दुष्टा दुर्योधना, ऐश्वर्यमदेंकरून तूं उन्मत्त झालास, वृध्दाचें अनुशासन अतिक्रमण करतोस, आपले सुहृदांस आनंद करून आह्मांस शोकाची वृध्दि करतोस, यास्तव तूं बालिश होस. माझें व पित्याचें भाषण ऐकशील तर ज्या काळीं भीमसेनानें ताडित होऊन निहत होशील त्या काळीं आमच्या भाषणाचें तुला स्मरण होईल. असें गांधारीनें भाषण केल्यावर व्यास बोलतात हे धृतराष्ट्रा, तूं कृष्णास फार प्रिय आहेस. संजयास तूं आप्त असें समजून कल्याणकारक जें दूतकर्म याविषयीं योजिलास हें फार चांगलें केलेंस. आतां माझें एवढें एक भाषण ऐक. हा संजय हृषीकेश पुराण पुरुष यास जाणतो

यास्तव केशवाचें ज्ञान एकाग्रचित्तानें तूं संजयापासून करून घे, ह्मणजे यमभयापासून मुक्त होशील. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, ज्या मार्गानें केशव प्राप्त होईल तो मार्ग मला सांग. असें ऐकून संजय भाषण करतो हे राजा, इंद्रियांचें नियमन करून अप्रमाद अहिंसायुक्त हो. आणि मनांतील कल्मष दूर कर. ह्मणजे तुझी बुध्दि स्थीर होऊन केशव प्रसन्न होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

७०. अध्यायसत्तरावा:- धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, मला भगवंताचें नाम व कर्म यांचें अर्थज्ञान होऊन पुरुषोत्तम प्राप्ति होईल असें सांग. असें भाषण ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रराजा, वासुदेवाच्या नामाचा अर्थ जसा मी जाणतों तसा तुला सांगतों. वस्तुत: भगवान् वाणीस अगोचर आहे. तो सर्व भूतांत राहातो, ह्मणून त्यास वासुदेव ह्मणतात व त्यास व्यापकत्व आहे, ह्मणून विष्णु ह्मणतात. मधुदैत्यास मारणारा ह्मणून मधुसूदन असें ह्मणावें. चोरांस त्रास देतो ह्मणून त्यास जनार्दन ह्मणतात. जेथें सत्य आहे तेथें हा राहातो ह्मणून त्यास सत्य ह्मणतात. तो सर्व नरांस आश्रय आहे ह्मणून त्यास नारायण ह्मणतात. शाश्वत असल्यामुळें अनंत हें नाम आहे. असा भगवान् कृष्ण कौरवांचा क्षय न व्हावा ह्मणून तुझ्यावर कृपा करण्याकरितां येथें येणार आहे असा विषय या अध्यायांत आहे.

७१. अध्याय एकाहत्तरावा:- धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, ज्यास नेत्र असतील त्या पुरुषास मी धन्य मानितों. कारण वासुदेव भगवंताचें दर्शन नेत्रवान् पुरुषास निरंतर होतें. ज्या ईश्वरानें आपल्या चिन्मात्र रूपानें जगत् भासमान करून दिशा प्रदिशा प्रकाशित केल्या आहेत, तो भगवान आमच्या सभेंत येऊन पांडवसंबंधी वाणी बोलेल, तीच भगवंताची वाणी जे मरणास योग्य असतील त्यांस कटु अशी होईल. हे संजया, असा तो सनातन भगवान ज्ञानी असतील त्यांच्या वाणीचा केवळ समुद्र आणि यत्नी जे आहेत त्यांस केवळ हातांत आल्यासारखा आहे. जो आपली मर्यादा कधींही उल्लंघन करीत नाहीं, ज्यास हरि असें ह्मणतात

त्या भगवंतास अनन्य भावेंकरून मी शरण आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७२. अध्याय बाहात्तरावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, संजय गेल्यानंतर धर्मराज भाषण करतात हे कृष्णा, मित्रांनीच साह्य करावें असा काल आहे. आतां तुझ्यावांचून या आपत्तींतून तारण्यास दुसरा मला कोणी दिसत नाहीं. हे माधवा, तुझ्या आश्रयानेंच आतां आह्मीं सामान्य धृतराष्ट्रांची प्रार्थना करूं असें ऐकून भगवान भाषण करतात हे महाबाहो, काय तुला विवक्षित आहे तें सांग. त्याप्रमाणें मी करीन. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो हे कृष्णा, सपुत्र धृतराष्ट्राचें काय इच्छित आहे तें संजयानें सांगितलें हें सर्व सत्यच आहे. राज्य आह्मांस न देतां आह्मीं शांत असावें कांहीं कलह करूनये अशी कौरवांची इच्छा आहे. द्वादशवर्षे वनवास करून गुप्तरूपें एकवर्ष अज्ञातवास केला. धृतराष्ट्रानें आह्मांशीं असें कबूल केलें होतें कीं, तुह्मी प्रतिज्ञेनें चालला असतां तुमचें राज्य तुह्मांस माघारें देऊं. तेव्हां आह्मीं वृध्दांच्या वाक्यावर भरंसा ठेऊन तेरा वर्षें दुःखांत काढलीं. धृतराष्ट्राच्या भाषणाची आह्मीं अमर्यादा केली नाहीं. तो धृतराष्ट्रराजा राज्यलुब्धक आतां पुत्रास वश होऊन स्वधर्म पाहात नाहीं. केवळ पुत्राच्याच स्वाधीन होऊन आमचें अप्रिय करण्यास इच्छितो. मिथ्याचार करण्यास आरंभ करून अतिशय लोभी झाला. असो. हे जनार्दना, धृतराष्ट्राची तर अशी अवस्था आहे. आह्मांस तर मातेचें पोषण करण्यास सामर्थ्य नाहीं. मग मित्रांचें पोषण आमचे हातून कोठून होणार? या दुःखापेक्षां आणखी दुःख श्रीकृष्णा आह्मीं आपलें तुला काय सांगावें. कौरवांस आह्मीं असें सांगून पाठविलें कीं, पांच नगरें अथवा पांच ग्राम आह्मांस द्या. आह्मीं तितक्यांत संतुष्ट आहों; परंतु कलह करून कौरव कुलाचा नाश करूं नका. असें आह्मीं ह्मणत असतां तो दुष्ट धृतराष्ट्रपुत्र आमचें भाषण कांहींच मानीत नाहीं. तेव्हां श्रीकृष्णा, यापेक्षां आह्मांस दुःख आणखी कोणतें असावें? निर्धन पुरुषाचा त्याच्या ज्ञातीच त्याग करूं लागतात. ज्ञातींनीं आपला त्याग केला असतां मरणापेक्षां मरण जाणावें. दरिद्ररूप पापी अवस्था

जशी आहे अशी अवस्था दुसरी कोणचीही नाहीं. तस्मात् धन हाच एक परम धर्म होय. ज्यापाशीं धन आहे तेच लोक या पृथ्वीवर जिवंत आहेत असें समजावें. निर्धन अवस्था प्राप्त झाली असतां त्यांनीं मृत्यूचाच अंगिकार करावा अथवा एकादे कुग्रामीं किंवा घोर अरण्यांत वास करावा. हे कृष्णा मला असें वाटतें, मरणापेक्षां अपत्ति फार कठीण आहे. धर्म आणि काम यांस श्रीमूळ आहे. तीश्री नष्ट झाली असतां धर्म कामाची प्राप्ति होणार नाहीं. तस्मात् देहस्वभाव जो मृत्यु तो धर्मानें मिळाल्यास उत्तम, अकर्मानें मृत्यु प्राप्त झाला असतां अति दुःखदायक होय. मोह वश झाला असतां प्राणी क्रूर कर्माचें आचरण करण्यास आरंभ करतो. क्रूरकर्मापासून पापाची वृध्दि होते, त्यापासून संकर होतो, संकर झाला असतां नरकास पात्र होतो. बरें द्रव्य आपल्यापाशीं असून प्रमाद करीत आहे. तर तोही पुरुष नरकास योग्य होतो. तस्मात् नरकापासून तरण्यास ज्ञान प्राप्ति झाली पाहिजे. जोशास्त्रनिष्ठ आहे त्यास न्ही अनुकूल होते, ज्या पुरुषास न्ही व विवेक हीं दोन्हीं नाहींत तो केवळ नपुंसक जाणावा. त्यास धर्माचा अधिकार कोठून? तो शूद्रासारखा समजावा. जो न्हीमान् देवपितर यांची भक्ति करतो तो मोक्षास जातो. हे मधुसूदना, ती अवस्था मला प्राप्त झाली आहे. राज्यापासून परिभ्रष्ट झालों. आमची श्री गेली. त्यापेक्षां आह्मांस मृत्यु येईल तर फार चांगलें आहे. आतां माझे मनांत दोन विचार आहेत त्यांतील प्रथम विचार असा आहे कीं, शमानें संपत्ति मिळवावी हा पहिला व कोरवांस मारून राज्य मिळवावें हा विचार दुसरा; परंतु या दुसऱ्या विचारांत बहुत दोष आहेत. ज्ञातीचा वध करावा लागतो. युध्दांत अजयी, कृश, पंगु, इत्यादिक अवध्य आले असतां वध करावा लागतो. गुरु, श्वशुर, बांधव, ज्ञाति इत्यादिकांवर निष्ठुर पणें शस्त्र त्याग करून त्यांचा प्राण घेणें त्यापेक्षां आपल्यास संपत्ति नसली तरी चालेल; परंतु असें क्रूर कर्म आमचे हातून न घडो. हे कृष्णा, आह्मांस क्षत्रियकुलांत ईश्वरानें उत्पन्न केलें आणि आमच्यापासून राज्यलोभाकरितां गुरुइत्यादिकांचा वध करणें प्राप्त होतें. यास्तव या क्षात्रवृत्तीस धिःकार असो. हे कृष्णा, पाहा आमचा

धर्मयुध्दांमध्यें निरंतर कलि वास करतो. जयपराजयाचा नेम नाहीं. कुपुरुषानें समयविशेषीं मोठ्याचाही प्राण घ्यावा. बहुत समुदाय असतां एकट्याचाच प्राण घेतात. अशी अनीति युध्दांमध्यें बहुत उत्पन्न होते. कायहो हें घोर कर्म! कोणास युध्द प्रिय असेल तें असो. तस्मात् युध्दांत पापाची वृध्दि होणार, तेव्हां आपलेकडे कदाचित् पराजय आला तर त्यापेक्षां मरण बरें असें वाटतें. अग्नीवर घृतधारा पडली असतां अधीक प्रदीप्त होतो. तसा युध्दास आरंभ केला असतां वैराग्नी अधिक प्रज्वलित होतो. आतां सर्वस्व त्याग करावा. निर्वैर व्हावें. यांतच ईश्वर काय कृपा करील ती करो, असा माझा निश्चय आहे. आपल्यापेक्षां शत्रु दुर्बल असो अथवा बलवान् असो त्याचा अनादर व त्याजपाशीं विरोध एकाएकीं करूं नये. प्रणिपातेंकरून आपलें काम करून घ्यावें. तशांतून हे कृष्णा, पिता, राजा आणि वृध्द हे सर्वथा सकलांस पूजनीय आहेत. यास्तव धृतराष्ट्र राजास माझा नमस्कार असो. बरें नमस्कार जरी केला तथापी तो आतां पुत्रस्नेहानें माझा नमस्कार ग्रहण करील किंवा नाहीं याचाही संदेह आहे. हे कृष्णा, आतां मी काय करावें! कालतर सन्निध आला. यास्तव धर्म, अर्थ, काम इत्यादिकेंकरून मी हीन होणार नाहीं. असा मला एकादा उपाय सांग. असें धर्मराजाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे राजा, तुमच्याकरितां मी एकदां कौरवसभेंत जाऊन उभयतांचें हित होईल येविषयीं उद्योग करतों. तेणेंकरून त्या सर्व कौरवांस मृत्युपाशापासून मुक्त केलें अशी माझी ख्याति होईल आणि मोठें पुण्य लागेल. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे कृष्णा, तूं कौरव सभेस आमच्या करितां जावेंस हें मला बरें वाटत नाहीं. स्फयोधन पापमती आहे. तो व त्याच्यासभेंत बसलेले राजे तुझ्या भाषणाचा अनादर करून तुझ्याशीं द्वेष करतील. असें ऐकून भगवान् बोलतात हे राजा, कौरवांचें पापरूप कर्म मी सकल जाणत आहें. माझें गमन तेथें होऊं दे. एकदां मला क्रोध आला असतां माझ्या अग्रभागीं कोण उभा राहाण्यास समर्थ होईल तो पाहातों. जर कौरव माझें कांहीं विपरीत करण्यास इच्छितील तर तत्काल त्यांचें भस्म करून टाकीन. मग पार्थाला इतका श्रमच नको. सहज तुमचें कार्य झालें. असें ऐकून धर्मराज भाषण करतो हे केशवा, तुला जें बरें वाटेल तें कर. तुझें कल्याण

असा. तूं कौरवांकडे जावें आणि कृतार्थ होऊन पुनः इकडे यावें असें आह्मी इच्छितों. तू आमचा भ्राता, सखा, प्रिय आहेस. अर्जुनाचा तर अत्यंत सखा होस. कौरवांचें व आमचें सौहृद होईल असें करावें. जर अधर्मानें आमचें कल्याण होत असेल तर तें आह्मांस नको. शांततेच्या योगें धर्म ग्लानी न होतां जितकें आमचें हित होईल तितकें सुयोधनापाशीं बोलून कर. असा विषय या अध्यायांत आहे.

७३. अध्याय त्र्याहत्तरावा:– श्रीकृष्ण भाषण करितात हे धर्मराजा, तुझें व संजयाचें भाषण ऐकून उभयतांचाही मी निश्चय जाणला. हे राजा, तुझी धर्माश्रित बुद्धि आहे आणि त्या दुष्टाची तर वैराश्रित बुद्धि आहे. तूं तर अयुद्धानें जें आपल्यास लब्ध होईल तेंच बहुत असें मानितोस; परंतु हें क्षत्रियांचें कर्म नव्हे. विक्रम करून शत्रूचें दमन कर. हे धृतराष्ट्र पुत्र, भीष्म, द्रोण, कृपाचार्य यांच्या आश्रयेंकरून आह्मी बहुत बलवान आहोंत असें ते मानितात. यास्तव हे राजा, जितका जितका तूं मृदुभाव धारण करशील तों तों तुझी लक्ष्मी ते हरण करतील. तूं कौपीन धारण करून जरी बसलास तथापी त्या दुष्टास तुझ्याविषयीं अनुताप होणार नाहीं. तुह्मी कपट द्यूतामध्यें पराजित झाल्यावर चीर वल्कलें धारण करून वनवासास निघालां त्याकाळीं भ्रात्यांसहवर्तमान दुर्योधन तुह्मांशीं श्लाघा करून बोलला कीं, पांडवांचा भाग आमच्याकडे नाहीं. पांडवांचीं नाम गोत्रें आतां कोणी उच्चारूनयेत. हे पराक्रमहीन होऊन क्लीबासारखे झाले. द्यूतकाळीं पापरूपी जो दुःशासन यानें द्रौपदीस लज्जा प्रहार करून तिचे केश ओढिले, आणि ती अनाथासारखी रोदन करीत असतां राजसभेंत आणली आणि गौरगौर असें ह्मणून तिची निर्भर्त्सना केली. त्याकाळीं भीमार्जुनादि तुझे भ्राते त्या दुष्टाचा सूड घेण्यास प्रवृत्त झाले असतां तूं त्यांचें निवारण केलेंस. हे धर्मराजा, तुह्मी वनांत गेल्यानंतर तो ज्ञातींमध्यें बहुतच श्लाघा करीत होता. जे राजे सभेमध्यें होते त्यांनीं तुह्मांस निरपराधी पाहून दुर्योधनाचा उपहास केला. तेव्हांच तो मेल्यासारखा झाला असतां ह्या निर्लज्ज कांहींच क्षीति मानीत नाहीं असें या दुष्टाचें आचरण आहे. यस्मात् याचा वधच योग्य आहे. मी आतां तुझ्याकरितां

कौरव गृहीं जाऊन संपूर्ण प्राणिमात्रांस तुझें भाषण सांगतों ह्मणजे संपूर्ण राजे तुझा अभिमान धरतील. आणखीही त्यासभेंत कौरवांची निंदा करून बोलेन कीं, अरे धर्मराज शम करतो. युध्दाविषयीं तो उद्युक्त नाहीं. तुह्मी युध्दरूप अधर्माचा अवलंब करूं नका. शेवटीं असें बोलेन कीं. कौरव हो मी हें भाषण करतों यांत तुमचें बहुत हित आहे. तें न ऐकाल तर आजच कुरुवंश नष्ट होऊन पांडवांचा जय झाला. असें ह्मणून मी माघारा येईन; परंतु मी आपला विचार एकंच सांगतों, शत्रूशीं युध्द करावें हेंच आपणास योग्य. युध्दाचीं निमित्तेंही योग्य झालीं आहेत. पशु आणि पक्षि हे घोर शब्द करतात. हस्ती, अश्व इत्यादिकांचीं रूपें सायंकाळीं भयंकर दिसतात. अग्नीच्या ज्वाला देदीप्यमान झाले त्या नानाप्रकारच्या वर्णयुक्त दिसतात. संपूर्ण योध्दे, शस्त्रें, कवचें, नाग, रथ, हय इत्यादिकांस घेऊन असें ह्मणतात कीं, अरे युध्दाचा निश्चय करा आह्मी सिध्द आहोंत. हे राजा, तुझ्यापासून द्यूतामध्यें ज्यानें राज्य हरण केलें तो दुर्योधन जिवंत आहे तोंपर्यंत तुह्मास कांहीं देणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

७४. अध्याय चौऱ्याहत्तरावा — भीमसेन भाषण करतो हे मधुसूदना, जेणेंकरून कौरवांची शांति होईल असें भाषण करावें. युध्दाचा प्रसंग आणूं नका. दुष्टबुध्दि दुर्योधन श्रीकृष्णा, तुला विदीत आहे. त्याचें शील, स्वभाव, बल, पराक्रम हीं ज्ञातच आहेत. पूर्वीं आह्मी व कौरव एकत्र असून परस्परांचीं अंतःकरणें सुप्रसन्न असतां आह्मीं इंद्रासारखे उत्तम दिवस काढिले ते आतां आह्मीं दुर्योधनाच्या क्रोधानें दग्धप्राय होऊन वागतों व इतर राजेही या पापमतीच्या आचरणानें भस्मीभूत होणार हें खचित् आहे. हे मधुसूदनां, परम विख्यात अष्टादश राजे यांनीं सुहृद्‌ व बंधु यांसह वर्तमान आपली ज्ञाति जशी छिन्न केली तसा हा दुर्योधन सबांधव आपली ज्ञाति छिन्न करण्यास सिध्द झाला आहे. शेवटीं कृष्णाशीं इतकेंही इच्छितों कीं, दुर्योधन श्रेष्ठभागीं असो. आह्मीं सर्व अधोमूत होऊन त्याच्या पश्चाद्भागीं गमन करूं, परंतु भरत कुलाचा नाश न होवो असा माझा मनोदय आहे. असा विषय या अध्यायांत आहे

७५. अध्याय पंचाहत्तरावा:– वैशंपायन सांगतात– हे जनमेजया, केशवानें भीमसेनाचें भाषण ऐकून किंचित् हास्य करीत गिरीस लघुत्व व अग्नीस शीतत्व जसें राहात नाहीं तसें भीमसेनाच्या भाषणांत कधींही मार्दवश्रवण केलें नाहीं. यामुळें तो आश्चिर्य पावून भीमाची निर्भत्छना करून कृपायुक्त वाणीनें भाषण करतो हे भीमसेना, पूर्वी तूं युध्दाचीच प्रशंसा करीत होतास. क्रूर जे धृतराष्ट्राचे पुत्र यांचें मर्दन करण्याविषयीं तुला मोठा आनंद होता. आतां तूं जागृत आहेस किंवा निद्रिस्त आहेस हें कांहीं मी जाणत नाहीं. तुझी घोर, अशांत वाणी मी ऐकत होतों तो तूं आतां श्वासोश्वास टाकून कांहीं मन्यूनें संतप्त झाल्यासारखा, सधूम अग्नीसारखा अशांत दिसतोस. अरे, संपूर्ण लोक तुला असें म्हणत होते कीं, हा भीमसेन मोठा उन्मत्त बलवान् आहे तो आज तूं गजानें भिन्न झालेल्या वृक्षासारखा दिसतोस. तूं पूर्वी असें क्रोधयुक्त भाषण केलें होतेस कीं, ही माझी गदा दुर्योधनाचा उरुभेद करील. या दुर्योधनाचा हंता मी आहें कांहीं चिंता करूं नको. तें तुझें भाषण मिथ्या होऊन आतां तुझी बुध्दि शमाविषयीं कशीरे निश्चिंत झाली! हे भीमा, तुझें भाषण श्रवण करून सर्वांस आश्चिर्य झालें आहे. तुला हें भाषण योग्य नाहीं. आपण कोणाचे कुलांत जन्म घेतला? आपलीं कर्में काय? आपण कसें असावें? याचा विचार करून आतां युध्दाविषयीं सिध्द हो. असा वि० या अ० आ०

७६. अध्याय शाहत्तरावा:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, वासुदेवाचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे अच्युता, माझ्या भाषणाचा अभिप्राय एक असून तूं अन्य जाणतोस. हे दाशार्ह, बहुतकालपर्यंत मी दुःखें सोसलीं. माझा तूं पराक्रम जाणत नाहींस काय? नानाप्रकारच्या वाणीनें माझी तूं बहुत निर्भत्सना केलीस, परंतु मी भीमसेन आहे. माझें पौरुष व बल यांचीसाम्यता करण्यास या भूमंडळीं कोणी नाहीं. हे कृष्णा, आपले मुखें स्वप्रशंसा करणें हें नीच कर्म होय. तथापी तूं माझी फार निंदा केलीस. यास्तव मी आपलें बल तुला सांगतों श्रवण कर. या संपूर्ण प्रजा ज्यांमध्यें वास करतात अशा या द्यावाभूमि सर्वांच्या माता जर क्रुध्द होऊन शिलेसारख्या मिळतील तर त्यांचा निग्रह मी करीन. पाहा हे माझे परिघासारखे बाहु यांत जो कोणी सांपडेल तो

कधींही जिवंत मुक्त होणार नाहीं. मी ज्याचा नाश करण्यास उद्युक्त होईन त्याचें त्राण करण्यास इंद्रही समर्थ होणार नाहीं. पांडवांसहवर्तमान युध्दार्थ जे क्षत्रिय येतील त्यांचें पादतलानें संमर्दन करून भूतळीं पाडीन असा माझा पराक्रम असतां तूं मला कां कठोर बोलतोस? हे कृष्णा, सर्व लोक जरी मजवर क्रुध्द झाला तथापी मला भय नाहीं. परंतु हे मधुसूदना, करूं काय? सुहृद्भाव व दया यांच्या योगें समग्र क्लेशाचें सहन केलें आणि मनाचा हेतु इतकाच आहे कीं, हें भरतकुल नष्ट न होवो याविषयीं यत्न असावा इतकेंच म्हणणें आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

७७. अध्याय सत्याहत्तरावा— भगवान भाषण करतात हे भीमसेना, तुझ्या मनांतील भाव काय आहे तो समजण्याकरितां मी बोललों. केवळ क्रोधेंकरून, अक्षेपेंकरून अथवा तुझ्याशीं पांडित्य करावें या तात्पर्येंकरून मी बोललों नाहीं. तुझें बल मला विदित आहे. तूं बलानें अगदीं हीन आहेस असा माझ्या भाषणाचा आशय नाहीं. तूं जितकें आपलें बल मला निवेदन केलेंस त्यापेक्षां सहस्त्र गुणित तुझेठायीं बल आहे, अशी माझी संभावना तुझेठायीं आहे. पूजितराज कुलाचेठायीं तुझें जन्म, बंधु सुहृद् हे तुला अनुकूल आहेत. तुझे बंधु ही तुझ्यासारखेच पराक्रमी परम विख्यात कीर्ति आहेत. हे वृकोदरा, या लोकांत असा चमत्कार आहे कीं, आपलें दैव व पौरुष किती आहे इतकें जाणत असतांही त्याचा निश्चय करतां येत नाहीं कारण दैवयोगें कदाचित् शूर असतांही समयविशेषीं क्लीबासारखा होतो क्लीब असतांही दैवयोगेंकरून शूरासारखा पराक्रम करतो. तेव्हां या लोकीं कर्म आणि पौरुष हे पदार्थ संदिग्ध आहेत. दोषदर्शी जे कवि यांनीं जें कथित असतें त्यापेक्षां विपरीत ही कदाचित् होतें. मसलतीनें चांगलें व न्यायतः उपपादित असें एकादें कर्म करण्यास आरंभ केला असतां तेथें दैवच प्रतिबंधक होतें. एकादे समयीं दैव अनुकूल असतां पौरुषच प्रतिबंधक होतें; तेव्हां कोठें दैव अनुकूल होऊन कार्य होतें, कोठें पौरुषाच्या योगें कार्य सिध्दी होते. कर्म आणि पौरुष यांच्या संयोगानें कार्याची सिध्दी होते. हे भीमसेना, उदईक मी धृतराष्ट्रसन्निध प्राप्त होऊन तुमच्या अर्थसिध्दीची

हानि न होतां शम होईल तितका यत्न करीन. जर शमाचा अवलंब कौरवांनीं केला तर माझी कीर्ति व यश यांची वृद्धि होऊन तुमचें कार्य झालें आणि कौरवांचेंही कल्याण झालें. जर कौरव माझे शमयुक्त भाषणाचा स्वीकार न करतील तर भयंकर युध्दाचाच प्रसंग आणणें प्राप्त होईल. जर भीमसेना, युध्दाचाच प्रसंग आला तर आमचा सर्व भार तुझेठायीं आहे. तूं हा युध्दांतील कोणीं एक रथ, अर्जुन ही रथाची धुरी, अश्वस्थानापन्न इतर क्षत्रिय आणि अश्वाचा सारथी मी येणें प्रमाणें या युध्द प्रसंगीं झालें पाहिजे. मी धनंजयाचें सारथ्य करीन, परंतु युध्द करणार नाहीं. हे वृकोदरा, तूं पूर्वी क्लीबासारखें भाषण केलें होतेंस म्हणून तुझ्याविषयीं मला संशय उत्पन्न झाला होता. आतां तुझा प्रभाव जाणून मी स्वस्थ आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

७८. अध्याय अठ्याहत्तरावा:- अर्जुन भाषण करतो हे जनार्दना, युधिष्ठिरानें जें पूर्वी भाषण केलें तें ऐकलेंच आहेस. आतां तुझेंही भाषण संपूर्ण श्रवण केलें. कौरव पांडवांचा शम असावा असें तूं मानितोस, परंतु लोभी दीन असा जो धृतराष्ट्र, तो तुझा शमोपाय ऐकणार नाहीं. पुरुषाचा पराक्रम निष्फल असून कर्मच प्रधान, त्यायोगें पुरुषाचा बलोदय होतो असें तूं जें भाषण केलेंस त्या भाषणाच्या तात्पर्यावरून युध्द न करतां शम करावा असा अर्थ दिसतो. तीन उपायेंकरून असाध्य जें कर्म तेथें चतुर्थ दंडोपाय योजिला पाहिजे. हे कृष्णा, माझ्या भाषणाचें तात्पर्य मिळून इतकेंच कीं, जेणें करून आमचें कल्याण होईल तें कर. दुर्योधन तर दुष्ट दुरात्मा आहे खरा, परंतु आमचा संबंधी असल्यामुळें ससूल सबांधव वध करण्यास योग्य नाहीं; परंतु या दुष्टानीं तर आह्मांस अधर्मानें जिंकून वनांत घालविलें; यास्तव हे वार्ष्णेय, सुयोधन वधच करण्यास योग्य आहे. या ठिकाणीं हे कृष्णा, तूं शमाची इच्छा करूं नको. पापबुध्दि जो दुःशासन यानें द्रौपदीस परिक्लिष्ट करून सभेंत आणली. हेंही त्या दुष्टाचें कर्म तूं जाणत आहेस. अस्तु जेणेंकरून पांडवांचें हित होईल असें कार्य कर. आह्मींच तुला निश्चयेंकरून सांगावें असें नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

७९. अध्याय एकूणऐंशीवा:- भगवान् भाषण करतात हे अर्जुना,

तुझें भाषण मीं ऐकिलें. कौरवपांडवांचें जेणेंकरून कल्याण होईल तेंच मी करीन. मृदु आणि तीक्ष्णउपचार अशीं दोन कर्मे आहेत. यांतून वेळेस ज्याचा उपयोग होईल तें करीन. परंतु इतकें आहे कीं, यत्न व दैव याउभयतांची अनुकूलता पाहिजे ह्मणजे कार्यसिध्दी होते. दुर्योधन तर दोन्हीं कर्मांचा त्याग करून स्वतंत्र राहिला आहे. याची पापी दुर्बुध्दि वृध्दिंगत करण्यास शकुनी, सूतपुत्र व दुःशासन हे सहाय झाले आहेत. हा दुष्ट राज्य देऊन तुमच्याशीं शम कधीं करणार नाहीं. यास्तव हे पार्थ, सुयोधनाचा वधच केला पाहिजे. माझ्याही मनांत याचा वध करणें हाच दंड योग्य आहे. ज्या दुष्टांनीं तुह्मांस कौमार अवस्थेंत नानाप्रकारचीं दुःखें दिल्हीं; राज्य भ्रष्ट करून वनांत तर घालवून दिल्हें. असा हा घातुक धर्मराजास श्री प्राप्त झाली असतां याच्यानें पाहावणार नाहीं. याचे अपराध आजपर्यंत मी क्षमाच करीत गेलों. माझे मनांत होतें कीं, याचा प्राण घ्यावा, परंतु तुमचें मत नसल्यामुळें माझा उपायच चलला नाहीं. आतां बरा समय आला आहे. यासमयानुसार सर्वांनीं वर्तावें. धर्मराजाचा अभिप्राय तुला विदितच आहे. ज्या कारणास्तव आमचें येणें भूलोकीं झालें तें कारण तुला श्रुतच आहे. तेंच कारण सिध्दीस नेणें आह्मांस अवश्यक आहे. गोहरणप्रसंगीं भीष्मानीं या दुष्टास बहुत उपदेश केला; परंतु त्याच्या भाषणाचा अंगिकारनकरून तो त्याची थट्टा करतां हे अर्जुना, अरे गोहरणकाळीं तूं त्याचा पराभव केलास. त्याचकाळीं त्यानें आपलें दुःख तुम्हांस दाखवूं नये अशी त्याची योग्यता झाली असतां लवमात्रही त्या दुष्टास लज्जा नाहीं. असा मूर्ख निर्लज्ज पृथ्वींत कोणीं पाहिला नाहीं. यास्तव धर्मराजाच्या अभिप्रायाप्रमाणें जें कर्तव्य तें करीन. असा विषय या अध्यायांत आहे.

८०. अध्याय ऐंशीवा — नकुल बोलतो हे माधवा, धर्मराज, भीम, अर्जुन यांनीं आपलें मत सांगितलेंच आहे व तुझें मनांत काय आहे तेंही तूं आपलें मत स्पष्ट केलेंस. या सर्व मतांचा विचार करून जें कर्तव्य तें कर. पूर्वी आपला विचार एक असतां शेवटीं दुसरेंच निमित्त उत्पन्न होऊन आपला केलेला विचार एकीकडे राहून दुसराच विचार करणें प्राप्त

होतें. आह्मी वनांमध्यें वास करीत होतों तेव्हां आमची मति एकप्रकारची होती. एक वर्ष अज्ञात वासांत होतों, तेव्हां एकप्रकारची मति होती. आतां मति अशी होत आहे कीं, आह्मांस पूर्वीचें राज्य कधीं मिळेल? तेव्हां हे जनार्दना, लोकांत हाच प्रकार आहे कीं, जी अवस्था प्राप्त होते त्या अवस्थेनुरूप बुध्दि होते. आमचा वनवास निवृत्त होतांच तुझ्याप्रसादानें सात अक्षौहिणी सैन्य नसेच मोठेमोठे वीर अचिंत्य ज्यांचें बल आणि निरंतर शस्त्रें हातांत धारण करून बसणारे आह्मांस सहाय झाले आहेत. पूर्वीची आमची अवस्था जाऊन ही अवस्था प्रस्तुत झाली आहे. आतां तूं कुरुसभेंत जाऊन पूर्वी सांत्वपूर्वक भाषण करून शेवटीं भययुक्त भाषणावर पर्यवसान ठेवावें ह्मणजे मंदात्मा सुयोधन कांहींतरी व्यथित होईल, परंतु हे कृष्णा, तुला मी खचित सांगतों. युधिष्ठिर, भीमसेन, बीभत्सु, सहदेव, मी आणि राम, तुह्मीं, सात्यकी, विराट इत्यादि वीरांशीं युध्द करण्यास कोण समर्थ आहे? हे देवा लौकर जा आणि धर्मराजाची इष्टसिध्दि करून सत्वर माघारा ये. तुह्मीं सांगितल्यावर विदुर, भीष्म, द्रोण हे धृतराष्ट्र राजास व दुर्योधनास समजून सांगतील. असा विषय या अध्यायांत आहे.

८१. अध्याय एक्यायशी:— सहदेव भाषण करतो हे कृष्णा, धर्मराजानें जें सांगितलें तोच क्षत्रियांचा सनातन धर्म होय. जर दुर्योधनादि शाम करण्यास इच्छितील तर त्यांसहित युध्द होण्याची योजना कर. बरें भीमार्जुन धर्मराज हे धार्मिक बुध्दीनें आपला धर्म सोडून कौरवांशीं युध्द न करतील तर मीच एकाकी रणांगणीं त्यांशीं युध्द करीन. असें ऐकून सात्यकी भाषण करतो हे कृष्णा; सहदेव ह्मणतो हें योग्य आहे. त्या दुष्टात्म्याचा वध होईल तरच माझ्या व सहदेवाच्या मनाची शांति होईल. ज्याकाळीं चीर वल्कलें परिधान करून पांडव वनांमध्यें गेले, त्याकाळीं पांडवांचें दुःख पाहून तुला कितीरे क्रोध आला होता! तस्मात् सहदेवाचें भाषण समग्र योध्द्यांस मान्य आहे. याप्रकारें सात्यकीनें भाषण केलें असतां एकाएकीं योध्द्यांचा भयंकर नाद झाला. सात्यकीच्या भाषणाचा परम सत्कार करून सकल योध्दे ह्मणूं लागले हे शैनेया, फार चांगलें भाषण केलेंस असा विषय या अ॰ आहे

८२ अध्याय ब्यायशीवा– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धर्माचें भाषण ऐकून शोककर्षित द्रौपदी बोलते हे मधुसूदना, कपटेंकरून पांडवांस धृतराष्ट्र पुत्रानें राज्यसुखापासून भ्रष्ट केलें. नंतर संजयानें दौत्यसमयीं आपला विचार काय तो तुला विदित केला आहे. तसाच युधिष्ठिराचा विचार तुला सर्व विदितच आहे. संजया बरोबर तुह्मी सपुत्र धृतराष्ट्रास असा निरोप पाठविला कीं, आविस्थल, वृकस्थल, माकंदी, वारणावत आणखी एकादा असे पांच ग्राम आह्मांस राहाण्याकरितां द्यावे. तसें न करतां दुर्योधन संधीची इच्छा करील तर करूं नये. सृंजयांसह वर्तमान पांडव क्रुध्द होऊन धृतराष्ट्र पुत्राचें बल क्षयास नेतील असें कर. येणेंकरून पांडवांची मोठी कीर्ति होऊन तुझेंही यश वृध्दींगत पावेल. माझ्यासारखी राजपत्नी या पृथ्वींत दुर्लभ आहे. द्रुपदराजाचे घरीं वेदीपासून माझी उत्पत्ति, धृष्टद्युम्नाची भगिनी हे कृष्णा, तुझी अत्यंत सखी, पांडुराजाची स्नुषा मला दासीसारखी दुष्टांनीं सभेंत नेली, तेव्हां मीं तुझें चिंतन केलें. धृतराष्ट्र यानें मला वर माग ह्मणताच मी वर मागितला कीं, माझे पति पांडव अदास होऊन सायुध सरथ वनांमध्यें जावोत. तेव्हां आह्मी कौरवांच्या दास्यत्वापासून मुक्त होऊन वनांमध्यें गमन केलें. हे जनार्दना या प्रकारें जीं जीं आह्मांस दुःखें झालीं त्यांचा ज्ञाता तूं आहेस. हे पुंडरीकाक्षा, भर्ते, ज्ञाति, बांधव यांसह वर्तमान माझें त्राण तूं कर. जर कृष्णा माझेविषयीं तुझी दया आहे तर धार्तराष्ट्रांवर तूं कोप कर. असें बोलून द्रौपदीनें आपले केश धरून रोदनयुक्त पुनः कृष्णाशीं भाषण केलें कीं, हे देवा– शत्रूशीं संधि इच्छिणारा तूं दुःशासनाच्या हातांत सांपडलेल्या केशपाशांचें स्मरण कर. जर भीमार्जुन संधीची इच्छा करीत असतील तर पुत्रासहीत माझा पिता व पुत्र हे अभिमन्यूस पुढें करून कौरवांशीं युध्द करतील. दुःशासनाचा भुज छिन्न झालेला जर माझ्या दृष्टीस न पडेल तर माझें शांतवन होणार नाहीं. याप्रमाणें बोलून द्रौपदी रोदन करीत असतां कृष्णानीं समाधान करीत तिशीं भाषण केलें कीं, हे कृष्णे, भरतांच्या स्त्रियांचें रोदन लौकरच ऐकशील. मी असें करतों कीं, धृतराष्ट्राचे पुत्र जर माझें वचन न ऐकतील तर ते रणभूमीच्या ठायीं पडून त्याचें

मांस गृध्रपक्षि व कोल्हे इत्यादि भक्षण करतील. हे द्रौपदी, कदाचित् हिमाचल पर्वत चलन पावेल, पृथ्वीचीं शतधा शकलें होतील, नक्षत्रांसहवर्तमान आकाश अधोभागीं पडेल परंतु माझें भाषण कधींही व्यर्थ व्हावयाचें नाहीं. आतां बाष्पोदकाचा उपसंहार कर. सकल अरींचें निर्दलन करून तुझे पति राजश्रीयुक्त झालेले लोकरच पाहाशील. असा विषय या अध्यायांत आहे.

८३. अध्याय त्र्यायशींवा:- अर्जुन भाषण करतो हे कृष्णा, उभयपक्षाभिमान तुला आहे. यास्तव आमचा व धार्तराष्ट्राचा जेणेंकरून शम होईल तें करण्यास तूं योग्य आहेस. कदाचित् धर्मार्थसहित कल्याणयुक्त तुझें भाषण तो मंदमति न ऐकेल तर त्याचें दैव प्रतिकूल झालें असें समजावें. असें ऐकून भगवान भाषण करतात हे पार्था, कौरवांचें जें कुशल तेंच आमचें हित आहे. आतां धृतराष्ट्राकडे जाऊन त्यास उत्तम प्रकारें बोध करतों. याप्रकारें श्रीकृष्णानें भाषण केल्यावर ती रात्र अतिक्रांत झाली. दुसरे दिवशीं कार्तिकमासीं रेवती नक्षत्रीं प्रातःकाळीं स्नान करून पूर्वान्हीक कृत्यास आरंभ केला. नंतर सूर्य व अग्नि यांचें उपस्थान करून ब्राह्मणांस अभिवादन केलें, आणि अर्जुनाच्या भाषणाचें स्मरण करून शकुन पाहात सात्यकीस आज्ञा केली कीं, शंख, चक्र, गदा, भाते, शक्ति, व दुसरींही इतर आयुधें रथांत ठेव. दुर्योधनादिक शत्रु दुर्बल जरी आहेत तथापी बलवंतांनीं आपल्या आयुधांसहवर्तमान शत्रूकडे जावें अशी नीति आहे. नंतर कृष्णाच्या सेवकांनीं रथ सिध्द करून श्रीकृष्णाच्या अग्रभागीं आणिला असतां सात्यकी सहवर्तमान श्रीभगवान् रथारूढ होऊन निघाले. त्याकाळीं रथाच्या नादानें पृथ्वी व आकाशही व्याप्त झालीं. मृग, पक्षी, विधूमाग्नीच्या ज्वाला कृष्णास प्रदक्षिणा करूं लागल्या. वसिष्ठ, वामदेव, भूरिद्युम्न, नारद, वाल्मिक, इत्यादिक ऋषींनीं कृष्णाची पूजा केली असतां कृष्ण कुरुसदनास जाण्यास निघाला. त्याच्या पृष्ठभागीं पांडव, चेकितान, धृष्टकेतु, द्रुपद, विराट इत्यादिक महा रथी निघाले असतां धर्मराज भाषण करतो हे कृष्णा, तूं आमच्या हितास्तव कौरवगृहीं चालला आहेस यास्तव तुला मार्गांत सुख असो, असें म्हणून वासुदेवास आलिंगन

करीत बोलतो हे कृष्णा, जिनें बाल्यावस्थेपासून आह्मांस वाढविलें; सुयोधनाच्या भयापासून जिनें आमचें वारंवार त्राण केलें; आमच्याकरितां जीस बहुत दुःखें झालीं आहेत. अशी आमची माता कुंती इला कुशल प्रश्न करून वारंवार अश्वासन दे. आणि सांग कीं, तुझे पुत्र पांडव सुखरूप आहेत. हे कृष्णा, पुत्रशोकें करून ती फार कृश झाली असेल. लग्न झाल्यापासून जिला कधींही श्वशुरसंबंधी सुख गाऊक नाहीं. त्या आमच्या मातेस आंज दुःखाचा काल आला आहे. ज्याकाळीं आह्मी वनास जाण्यास निघालों त्याकाळीं पुत्रलोभास्तव ती आक्रोश करीत आमचे मागून धावूं लागली. इतकें दुःख आमच्या मातेस झालें असतां हे कृष्णा, आह्मीं आजपर्यंत जिवंत राहिलों हें आमचें प्रारब्ध फारकरून या दुःखाच्या योगें ती म्रियमाण झाली असेल. कदाचित् जिवंत असल्यास माझें अभिवादन सांग. तसेंच धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा, विदुर इत्यादिकांस क्रमेंकरून माझें अभिवादन सांग. याप्रकारें केशवास-हवर्तमान भाषणें केल्यावर युधिष्ठिरानें माघारें जाण्यास आज्ञा घेतली. नंतर अर्जुन भाषण करतो हे कृष्णा, धृतराष्ट्र पुत्रांस माझा निरोप सांग कीं, आह्मी तुह्मांस निरोप पाठविला त्याप्रमाणें अर्धराज्य माघारें न द्याल तर क्षत्रियांसहवर्तमान तुमचा नाश करीन. असें अर्जुनानें भाषण केलें असतां वृकोदर मोठा परमभयंकर शब्द करीत जनार्दनास आलिंगन देऊन माघारा फिरला असतां समग्र राजेही कृष्णाची आज्ञा घेऊन गेले. पुढें भगवंताचा सारथी दारुक यानें रथाचे अश्वांस प्रेरणा केली असतां आकाशाचा ग्रासच करतात काय अशा त्वरेनें अश्व जाऊं लागले. भगवंताचें दर्शन घेण्याकरितां ब्रह्मश्रीनें देदीप्यमान असे बहुत ऋषि मार्गांत प्राप्त झाले हें पाहून भगवान् रथाखालीं उतरले आणि त्यांची पूजा करून बोलले कीं, हे ऋषी हो, तुह्मीं कुशल आहां नां? आपआपले धर्म परिपालन करतां नां? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तिन्हीं वर्ण आपआपल्या धर्माप्रमाणें चालतात ना? असा श्रीकृष्णानीं प्रत्येक ब्राह्मणास प्रश्न केल्यावर सकल ब्राह्मणांनीं ईश्वराची पूजा केली. तेव्हां

भगवान् ह्मणतात तुमचीं वास्तव्यें कोठें आहेत? तुमच्या गृहास जाण्याचे मार्ग कोणते? तुह्मी कोणत्या उद्देशानें येथें आला, तें मला सांगा. असें ऐकून जामदग्न्य राम ह्मणतात हे देवा, पुण्यवान्, बहुश्रुत असे ब्राह्मण, तसेच महान् उदार राजर्षि तपस्वी व मोठे मोठे राजे ज्या सभेंत मिळाले आहेत ती सभा पाहावी व त्या सभेंत भीष्मद्रोण इत्यादिकांशीं तूं दिव्य भाषणें करशील तीं ऐकावीं याकरितां आह्मी जात आहों. आतां तुह्मी निर्विघ्न जा. तुह्मांस कौरव सभेंत आह्मी पाहूं. असा विषय या अध्यायांत आहे.

८४. अध्याय चौऱ्यायशींवा.– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भगवान् हस्तनापुरीं जाण्यास निघाले असतां युधिष्ठिरानें दाहा महारथी एक सहस्र पदाती व एक सहस्र अश्वारोह इतकें सैन्य त्याच्यामागें पाठविलें. तसेच बहुत सेवकजन व भोजनाचें विपुल साहित्यही पाठविलें. असें ऐकून जनमेजय प्रश्न करतात हे ऋषे, महात्मा मधुसूदन ज्याकाली गेला त्याकाळीं शुभाशुभ सूचीत निमित्तें कांहीं मार्गांत झालीं किंवा नाहीं तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन भाषण करतात हे राजा, भगवंताचे प्रयाणकाळीं शुभाशुभसूचक जीं चिन्हें झालीं तीं सांगतों. श्रीकृष्ण पांडवांपासून निघतांच कौरवांच्या देशांत अनभ्र आकाश असून विद्युल्लतेचे महान् निर्घोष होऊं लागले, घनरहित आकाश असतां पर्जन्य पडला, सिंधुप्रमुख नदादि सप्तनद्यांचे प्रवाह उलट वाहूं लागले, अग्नि जाज्वल्यमान झाले. पृथ्वीस कंप सुटला, सर्व जगत् तमानें व्याप्त होऊन कांहीं दिसेनासें झालें. हे राजा, या प्रकारें कौरवांचे देशांत नाना प्रकारचीं दुश्चिन्हें होऊं लागलीं. हस्तिनपुरसंबंधी जे वृक्ष ते वायूच्या योगें उन्मूलित होऊन पृथ्वीवर पडले. भगवानाच्या मस्तकाचेठायीं आकाशांतून कमलपुष्पाची वृष्टी झाली. मार्गामध्यें महान् महान् सहस्रावधि विद्वान् ब्राह्मणांनीं जगदीश्वराची पूजा करून सुगंधिपुष्पांची वृष्टि केली. तशाच स्त्रियांनींही मार्गांत परमेश्वराची पूजा केली. अशा समारंभानें भगवान् हृदयास संतोषदायक ग्राम व नाना प्रकारचीं पुरें राष्ट्रें यांची शोभा पाहात चालले असतां मार्गांत जे जे दुर्योधनानें संरक्षित केलेले ग्राम दृष्टीस पडले. त्या ग्रामांत प्रजा सुखी, परचक्रादि

ज्यास कधींही शाऊक नाहीं. तशीच राजापासून ही निर्भय अशी पाहिली. भगवंताच्या दर्शनाच्या इच्छेनें महान् महान् पुरांपासून आलेल्या लोकांनीं श्रीकृष्णाची उत्तम प्रकारें पूजा करून स्तुति केली तों सायंकाळ झाला तेव्हां वृकस्थल नामक ग्राम पाहून भगवान् ह्मणतात. आतां याच ग्रामीं एकरात्र वास करूं असें बोलून रथाखालीं उतरले, आणि दारुकास रथाचे अश्व मुक्त करण्याची आज्ञा दिली. नंतर दारुकानें रथाचे अश्व सोडून त्यांचे शरीरावर जे जे पदार्थ होते ते सर्व काढून रथांत ठेविले. इतक्यांत ब्राह्मण येऊन बोलले हे प्रभो, हीं पाहा आमचीं रत्नखचित महान् महान् गृहें आहेत, यांत जगदीश्वराचा पादस्पर्श व्हावा. अशी मनापासून इच्छा आहे. असें ऐकून कृष्णानीं त्यांचा सत्कार केला. आणि त्यांचीं गृहें यथानुक्रमें पाहून ते ब्राह्मणांसह वर्तमान आपले स्वस्थानीं आले आणि ती रात्र त्यांनीं सुखानें घालविली. असा विषय या अध्यायांत आहे.

८५. अध्याय पंचायशीवा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भगवान् श्रीकृष्ण पांडवांकडून निघाले हें वर्तमान दूतांनीं धृतराष्ट्रास सांगतांच तो भीष्मद्रोण, संजय, महामति विदुर व सामात्य दुर्योधन यांस बोलला कायहो आश्चर्य अत्यद्भुत यीं ऐकिलें आहे! हे कुरुनंदना, तुझें प्रारब्ध उदयास आलें असें मला वाटतें. उदयीक श्रीकृष्ण पांडवांचे कार्याकरितां आपले नगरीं येणार आहे. श्रीकृष्ण सर्वांस पूज्य व मान्य व सर्वांनीं सत्कार करण्यास योग्य असा आहे. या जगदीश्वरानें पूजन केलें असतां सुख होईल. न केल्यास त्यासारखा दुःखी कोणी नाहीं. याकरितां हे दुर्योधना, तू त्याचा परम सत्कार करून उपचारपूर्वक पूजा कर. तो जगदीश्वर तुष्ट झाला असतां जें जें आपलें इच्छित आहे तें तें तो सिद्धीस नेईल. यास्तव कृष्णाची प्रीति आपले ठिकाणीं उत्पन्न होईल असें करावें. हे गांधारे, याप्रमाणें कर. हे भीष्मा माझे मनांत जें आलें आहे हें सत्य किंवा असत्य तें मला सांग. त्या काळीं भीष्मादिक भाषण करतात हे धृतराष्ट्र राजा, तूं फार चांगलें भाषण केलेंस. श्रीकृष्णाचा सत्कार अवश्य करा असें आमचेंही मत आहे. नंतर दुर्योधनानें कृष्णाचा संतोष होण्याकरितां नाना—

प्रकारच्या वास्तू, रम्य शाला, देशादेशाच्यागायीं रमणीय स्थानें, सर्व र-त्नांनीं खचित अशा सभा, सुंदर स्त्रिया, सूक्ष्मवस्त्रें, सौगंधिक जलें, नानाप्रकारचीं चतुर्विध अन्नें स्थापित करण्यास आज्ञा दिल्ही, आणि धृतराष्ट्रास संभाषण केलें. हे राजा, आपले आज्ञेप्रमाणें सर्वसिध्दता केली आहे, इतक्यांत दुर्योधनाचा दूत वृकस्थलापासून येऊन धृतराष्ट्रास सांगतो कीं, महाराज आपले आज्ञेप्रमाणें श्रीकृष्णास नानाप्रकारचीं रत्नें, भोज्यें, निद्रास्थानें, आह्मी देत असतां त्यांनीं सर्वांचा अनादर करून उदईक प्रातःकाळीं तुमचे सभेंत येण्याची तयारी केली आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

८६. अध्याय शायशीवा— धृतराष्ट्र भाषण करतो हे विदुरा, उपप्लव्य ग्रामापासून जनार्दन वृकस्थलीं आला आहे. उदयीक येथें येणार. प्रपितामह सकल वृष्ण्यंधक ज्याच्या प्रज्ञाबलें करून राहातात. आदित्य, वसू, रुद्र ज्याची निरंतर पूजा करतात असा जो माहात्मा श्रीकृष्णभगवान् तो प्रत्यक्ष आमचे घरीं येणार. यास्तव त्याची मी पूजा उत्तम प्रकारें करीन. आणि बाल्हिक देशोद्भव हे हय चारचाऱ्यासजोडलेले असे सुवर्णमय रथ सोळा, उत्तम वस्त्रें एक हजार, शंभर दासी, आठशें गज, रात्रंदिवस तेजें करून भासमान होणारा असा विमल मणि, एक दिवसांत चौदा योजनें गमन करणारे असे खेचर ज्या वाहनास युक्त केले अशीं वहनें, दुसरे आणखी पदार्थ व भक्ष्यभोज्य अन्नें श्रीकृष्णास देईन. आणि दुर्योधना व्यतिरिक्त जितके माझे पुत्र आहेत तितके रथारूढ होऊन कृष्णास सामोरे जातील. नगरनिवासी नागरिक स्त्रिया, तशाच कन्या, बाल, वृध्द नागरिक लोक भगवंतास पाहाण्यास उद्युक्त होतील. श्रीकृष्णास राहाण्याकरितां दुःशासन व दुर्योधन यांच्या गृहापेक्षां श्रेष्ठ असें उत्तम गृह आहे. हें श्रीकृष्णास राहाण्याकरितां करावें. हे विदुरा, याप्रमाणें मीं योजिलें आहे. असा विषय या अ॰ आहे.

८७. अध्याय सत्यायशीवा— विदुर भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, तूं मोठा उत्तम संभावित आहेस. तुला पश्चिम वयांत चांगली बुध्दि

झाली हें तूं कथन केलेंस येणेंकरून मला बहुत आनंद झाला. हे राजा, तूं प्रजेस केवळ धर्मरूपच आहेस. असा भाव धारण करून राहा. अरे कृष्णास इतकेच पदार्थ देण्यास तूं योग्य आहेस असें नाहीं. पृथ्वीही देण्यास तूं योग्य आणि कृष्ण घेण्यास योग्य आहे खरा परंतु हे धृतराष्ट्रा, तुला मी शपथपुरस्कर विचारतों कीं, तूं धर्मोद्देशानें कृष्णाचें इतकें आतिथ्य करणार अथवा आपलें कांहीं तरी कृष्णापासून हित व्हावें म्हणून आतिथ्य करणार तें सांग. मला असें वाटतें कीं, ही तुझी छद्मरूप माया आहे. तुझ्यामनांतील भाव एक आणि बाहेर एकभाव दाखवितोस. अरे पांचग्राम तुझ्यापासून मिळाले असतां पांडव तृप्त होतात. तेही तूं न देऊन शम करीत नाहींस. आतां श्रीकृष्णास तूं इतकी संपत्ति देण्यास उदार झालास. तेव्हां तुझ्या मनांत असा विचार दिसतो कीं, अर्थलोभ कृष्णास दाखवून अर्जुनापासून त्याचा भेद करावा. श्रीकृष्ण भिन्न झाला असतां पांडवांचा वध करण्यास कांहीं विलंब नाहीं. परंतु हें तूं खचित जाण कीं, कोणत्याही प्रयत्नें करून धनंजयाशीं श्रीकृष्ण विरुध्द होणार नाहीं. हे राजा, अर्जुनाचेठायीं कृष्णाची भक्ति किती आहे? ती तूं विदित करून घे. जसें सकल प्राणिमात्रांस प्राण हा पदार्थ प्रिय आहे तसा अर्जुन श्रीकृष्णास प्राणापेक्षांही पलिकडे आहे. अरे श्रीकृष्ण प्रसन्न होण्यास इतका उपाय नको. परमभक्तिभावें भगवंतास कुशल प्रश्न करून जगदीश्वराचे पाद प्रक्षालन केलें असतां भगवान् संतुष्ट होऊन इच्छित असेल तें देतो. परंतु कपटानें श्री भगवंतास सर्व जरी दिलें तथापी तो संतुष्ट नाहीं. अशी परमेश्वराची ख्याति आहे. असो माहात्मा भगवान् सन्मानास योग्य आहे. त्याचें आतिथ्य करण्याचा तुह्मी विचार केलात हें फार चांगलें केलेंत. जगदीश्वराचा सत्कार केला असतां सकल कौरवांस तो आशिर्वाद देईल हे राजा, जशी तुह्मीं त्याचें आतिथ्य करण्याची योजना केली आहे तशीच त्याच्या भाषणाची अमर्यादा करूं नका. तुझा पुत्र दुर्योधन आणि पांडव या उभयतांचें कल्याण असावें असें श्री कृष्ण वारंवार इच्छीत

आहे. हे राजा, विशेषेंकरून तुला इतकेंच माझें सांगणें आहे कीं, पां
व हे तुझे शिष्य आणि तूं त्यांचा वृध्द पिता असा तूं त्यांजवर भाव ठेऊ
न पुत्रासारखें त्यांचें परिपालन कर. असा विषय या अध्यायांत आ

८८. अध्याय अठ्यायशीवा:— दुर्योधन भाषण करतो हे धृत
राष्ट्र राजा, विदुरानें कृष्णाविषयीं जें भाषण केलें तें यथार्थ आहे. अने
क प्रकारें सत्कार करण्यास श्रीकृष्ण योग्यच आहे खरा. परंतु त्याची
पार्थावर प्रीति फार. यास्तव आह्मीं त्याची पूजा करणार नाहीं. पूजा केल
तर सकल राजे ह्मणतील कीं पांडवांकडून कृष्ण आला त्याची पूजा दुर्योधनानें
भयास्तव केली. यास्तव केशवाची पूजा यासमयीं कर्तव्य नाहीं व त्यास एक
पदार्थही द्यावयाचा नाहीं. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून भीष्म बोलतात हे
धृतराष्ट्र, अरे तुह्मी जनार्दनाचा सत्कार करा, अथवा असत्कार करा त्यास
कधींही क्रोध येणार नाहीं. परंतु तुह्मीं त्याची अवज्ञा मात्र करूनका. अरे
वासुदेव भगवान् हा तुझ्याघरीं एक तीर्थच येणार आहे त्या तीर्थाच्यायोगें तूं
पांडवांनें शमन कर. श्रीकृष्ण तुमच्यासभेंत येऊन धर्मार्थकामयुक्त अशा वा-
णी बोलेल. त्या तुह्मीं सकल बांधव सुह्रदांशीं सहवर्तमान ऐका असें भीष्मानें
भाषण ऐकून दुर्योधन बोलतो हे पितामह, अद्यापपर्यंत सर्व ऐश्वर्याच्या उप-
भोगानें मी तृप्त झालों नाहीं तो मी पांडवांसहवर्तमान पृथ्वीचें राज्य करीन का-
य? आणखी एक महत्कार्य मी करणार तें तुह्मांस सांगतों. श्रीकृष्ण आमचे
सभेंत आला असतां आह्मीं त्याचें बंधन करणार. कृष्ण बध्द झाला असतां
सकल पृथ्वीही बध्द होईल. मग पांडव निराश्रित झाले असतां त्यांस जिंक-
ण्यास अशक्य नाहीं. हे भीष्मा, हा विचार उत्तम योजिला आहे किंवा कसें
तें मला सांगा. असें ऐकून धृतराष्ट्र खिन्न होऊन बोलतो हे पुत्रा, असें भाष-
ण करूनये प्रजापालन करणारा यानें विचारपूर्वक करणें तें करावें. श्रीकृ-
ष्ण दूतत्वभावेंकरून आपलेकडे आला आहे. यास्तव दूतांस असें करणें अ-
शास्त्र, तशांतून तो आपला संबंधी असून कौरवांचेठायीं त्याची दृष्टि नि-
ष्पाप आहे असें असतां तुह्मीं त्यास बंधन करण्याचा विचार केला हा चां-
गला नाहीं. असें ऐकून भीष्म भाषण करतात हे राजा, हा तुझा पुत्र श्रीकृष्णा-

पासून अनर्थाची इच्छा करतो हें याजपासून मोठें पाप होत आहे. अरे कृत्दाच्या प्रियकर वाक्याचा त्याग करून या पुत्राच्या अनुसंधानें तू वर्ततोस. श्रीकृष्णास दुर्मतीनें बंधनाचा विचार केला आहे. तर सामात्य तुझा पुत्र एक क्षणामध्यें नष्ट होईल. असें भाषण करून भीष्म क्रोधानें कौरवसभेपासून आपले गृहीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

८९. अध्याय एकूणनव्वदावा– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, इकडे वृकस्थळीं श्रीकृष्ण प्रातःकाळीं सर्व आन्हिक कर्मे करून हस्तनापुरीं जाण्यास निघाला. तेव्हां सकल वृकस्थल निवासीजन कृष्णास पोंचविण्याकरितां समागमें चालले आहेत. इतक्यांत दुर्योधन विरहित सकल धृतराष्ट्राचे पुत्र रथारूढ होऊन ऋषीकेशास सामोरे आले. तसेच भीष्म, द्रोण, कृपाचार्य व इतर पौरलोक रथारूढ व कांहीं पादचारी श्रीकृष्णास सामोरे आले. भीष्म, द्रोण व धृतराष्ट्राचे पुत्र यांनीं कृष्णास समारंभानें नगरांमध्यें आणिलें असतां नगरांतील स्त्रिया, वृध्द व शिशु गृहीं न राहतां वासुदेवाच्या दर्शनाच्या इच्छेनें ग्रामाबाहेर गेले. नगरांतील राजमार्ग सकल लोकांनीं भरून गेले. सकल लोकांस आपलें दर्शन व्हावें ह्मणून भगवंतानीं रथाचे घोडे मंदगति केले असतां आ बाल वृध्द स्त्रियांस जगदीश्वराचें दर्शन यथास्थित झालें. प्रथम भगवंतानीं धृतराष्ट्रगृहीं जावें असा निश्चय करून द्रोणाचार्य व भीष्म यांसहवर्तमान धृतराष्ट्रराजाचे गृहीं प्रवेश केला. तेव्हां कृपाचार्य, सोमदत्त व बाल्हिक यांनीं आपलें आसनापासून उठून श्रीकृष्णाचा सत्कार केला. श्रीकृष्ण धृतराष्ट्राचे सन्निध प्राप्त होतांच राजानें श्रीकृष्ण व भीष्म, या उभयतांचा कुशल प्रश्नादिपूर्वक सत्कार केला. नंतर सात्यकीसहवर्तमान श्रीकृष्णानें आपल्यापेक्षां वयानें व अधिकारानें जे श्रेष्ठ होते त्यांचा यथानुक्रमें सन्मान करून सपुत्रद्रोणाचार्य, बाल्हिक, कृपाचार्य व सोमदत्त यांस कुशलप्रश्न करून रत्नखचित आसनावर उपवेशन केल्यानंतर धृतराष्ट्राच्या पुरोहितानें श्रीकृष्णाची पूजा करून परम सत्कार केला. श्रीकृष्णाच्या आसमंतात्भागीं सकल राजपुत्रांनीं स्थित होऊन भगवानाचें आतिथ्य

उत्तम प्रकारचें केलें. याप्रकारें श्रीकृष्णाचा धृतराष्ट्र राजानें सत्कार केला असतां समग्र कौरवांसहवर्तमान श्रीकृष्ण विदुरगृहीं आले. तेव्हां विदुर परमेश्वराचें अर्चन करून स्तुती करतो हे पुंडरीकाक्ष, तुझ्यादर्शनानें माझे ऱ्हदयांत जो आनंद झाला तो तुला मी किती सांगूं. तूं सर्व देहाचा अंतरात्मा आहेस. यास्तव सर्व तुला विदितच आहे. हे मधुसूदना, पांडव सुखरूप आहेतना? त्यांचें संरक्षण करणारा, जगदीश्वरा तुझ्याखेरीज दुसरा कोणी नाहीं. आतां पांडवांचें वर्तमान मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

९०. अध्यायनवदावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अपराण्हकालीं जनार्दन विदुर गृहीं येऊन आमची पितृभगिनी कोठें आहे असा प्रश्न करतो इतक्यांत कुंती सद्गदित कंठ होऊन बोलत्ये. हे गोविंदा माझे पांचही पुत्र सुखरूप आहेत ना? ब्राह्मणांविषयीं रत, सत्य भाषण करणारे माझे पुत्र ज्याकाळीं वनांत गेले त्याकाळीं माझें ऱ्हदय समूळ नष्ट झालें. तूं व मी उभयतांनीं त्यांचें पोषण केलें असतां माझा त्याग करून त्यांनीं वनांत कसा वास केला असेल. पांडवांचे घरीं निरंतर ब्राह्मणांचे पुण्याह घोष व्हावे अशी यांची योग्यता असतां ते निर्जन वनीं कसे राहिले. वस्त्रें, रत्नें, अलंकार इत्यादिकें करून माझे पुत्र ब्राह्मणांचें पूजन करीत होते. त्यांस आज अन्नाची भ्रांति आहे काय? अंबरिष, मांधाता, ययाती, नहुष यांचे योग्यतेसारखा जो धर्मराजा तो सुखरूप आहे ना? तसेंच पराक्रमी भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे कुशल आहेत ना? हे जनार्दना, माझी स्नुषा सकल पुत्रांचे प्रिय करणारी कुलीनरूप संपन्न द्रौपदी कुशल आहे ना? जिचे पांच पति इंद्रासारखे पराक्रमी त्या द्रौपदीस मी आज चौदा वर्षें पाहिली नाहीं. तिचेपेक्षां युधिष्ठिर, भीमार्जुन, नकुल, सहदेव हे प्रियनाहींत. हे केशवा मला असें दुःख कधींही पूर्वी झालें नव्हतें. स्त्रीधर्मिणी द्रौपदी दुष्टांनीं सभेंत नेली ती एकवस्त्रा सकळ पापबुद्धि कौरवांनीं पाहून उपहास केला. हें दुःख कृष्णा मला फार झालें. धृतराष्ट्र, बाल्हिक, कृपाचार्य, सोमदत्त प्रभृति सभेंत बसले असतां कौरवांचें प्रत्याख्यान करण्यास

कोणाची बुध्दि झाली नाहीं. आहारे विदुर ! काय त्याची योग्यता! त्या-च्या गुणाचें अतिशय मी पूजन करतें. विदुराचें शील,गुण,अलंकार हीं सकल जनांत प्रख्यात आहेत. वैशंपायनसांगतात हे जनमेजया, याप्रकारें कुंती कृष्णास अनेक दुःखें सांगून बोलत्ये. हे कृष्णा ज्या काळीं माझे पुत्रांस चीरवल्कलें धारण करवून कौरवांनीं चौदावर्षे वनवासास पाठविलें तो क्लेश मला फार असह्य झाला. मी जितकें या जन्मांत पुण्य केलें आहे तितक्या पुण्याचा क्षय या दुःखाच्या शांत्यर्थ जरी केला तथापि या दुःखाची शांति होणार नाहीं. जनार्दना तूं तरी आतां या दुःखनाशाचा उपाय कर. तुझ्या कृपेनें काय साध्य होणार नाहीं? तुझी कृपा मात्र पाहिजे. मी जन्मास आल्यापासून माझे प्रारब्धीं दुःखाचे डोंगरच आहेत. पाहा बरें तुमच्या कुळांमध्यें माझें जन्म असतां कुंती भोजराजास तुम्हीं मला अर्पण केली त. तर मी अधिक झालें होतें कीं काय? मी पित्याची मातेची अथवा दुर्योधनाची कोणाचीच निंदा करीत नाहीं. मी आपले प्रारब्धाची निंदा करतें. बरें कुंती भोजराजा जरी जिवंत असता तरी मी आपलें दुःख त्यास निवेदन केलें असतें. ज्याकाळीं मला हा अर्जुन पुत्र झाला त्याकाळीं वाणी उत्पन्न झाली कीं, हे राजपत्नी हाराजपुत्र तेजोबलेंकरून पृथ्वी जिंकून आपलें यश आकाशांत प्रख्यात करील. सकल कुरुवंशाचा नाश करून सकल राज्य व धन यांचा उपभोक्ता होईल. आणि भ्रात्यांच्या साह्यें-करून तीन अश्वमेध करील. त्या वाणीची मी निंदा करीत नाहीं. धर्मानें प्रजा तरते तो प्रजेस धारण करतो तो धर्म जर खरा आहे तर तूं त्या वाणीप्रमाणें संपादन करशील. मला वैधव्य प्राप्त झालें. मी राज्यसुख, अर्थ यांपासून भ्रष्ट झालें. परंतु त्याविषयीं मी इतका शोक करीत नाहीं. पुत्रांचा माझा जो वियोग झालातें दुःख माझ्यानें सहन होत नाहीं. पांडवांची व माझी आज चौदा वर्षे भेट नाहीं. तस्मात ते मला आज मेले व मीही त्यांस मृत झालें असें वाटतें. तेव्हां हे माधवा, युधिष्ठिरास सांग कीं, आजपर्यंत जन्मापासून तूं धर्माचरणच बहुत करीत आलास तो तुझा धर्म नष्ट झाला. तुम्हीं जिवंत असतां दुसऱ्याचे घरीं उपजीविका करून मी राहावें-

काय? अरे तुह्मीं क्षत्रियपुत्र आणि मी तुमची माता. ज्या क्षत्रियांची माता परोपजीवी असेल तिला धिःकार असो. हे कृष्णा, अर्जुन व भीमसेन यांस माझा निरोप सांग कीं, ज्या कारणास्तव क्षत्रिय स्त्री पुत्रास प्रसवते तो काल आतां सन्निध आला आहे. याचें अतिक्रमण करूं नका. लोकांत जी तुमची कीर्ति झाली ती नष्ट करूं नका. यशकाल आला असतां जीवाचाही त्याग करावा; परंतु यश मिळवावें. हे गोविंदा माद्रिपुत्रांस माझा निरोप सांग कीं, तुह्मीं क्षत्रियांचे पुत्र क्षात्रधर्मांत निपुण असावें. हे महाबाहो अर्जुनास सांग कीं, तूं वीर आहेस. द्रौपदीनें सांगितलेल्या मार्गाचा अवलंब कर. अरे कृष्णा, भीमार्जुन, देवांस यमलोकीं पाठवितील हें तुला विदित आहे. दुष्टांनीं कृष्णेस सभेस नेली. दुःशासन, कर्ण प्रभृतींनीं पांडवांस कठोर भाषणें केलीं. दुर्योधनानें यथेच्छ वल्गना केली हें पांडव वीर्यवान् असतां त्यांनीं श्रवण केलें तर वैर कसें शांत होईल बरें? असो. ज्याकाळीं वृकोदर सकल शत्रूंचा क्षय करील त्याकाळीं या माझ्या दुःखाची शांति होईल. द्रौपदीस पांच नाथ असतां सभेंत ज्याकाळीं ती दीन झाली त्याकाळीं केशवा तूं द्रौपदीस नाथ झालास. अरे तूं, बलराम, प्रद्युम्नप्रभृति हे आमचे प्रिय कर्ते असतां हे पुरुषोत्तमा, आह्मीं इतकीं दुःखें सोसावीं काय? असें ऐकून श्रीकृष्ण बोलतो हे कुंती, तुझ्यासारखी राजपत्नी या मृत्युलोकीं दुर्लभ आहे. शूरसेन राजाची तूं कन्या पुढें आजमीढ कुलांत तूं गेलीस. तूं साक्षात् ईश्वरी. भर्त्यानें तुझा मोठा सत्कार केला होता. तुला वीरपत्नी असें ह्मणतात. सुखदुःखें सहन करणारी व प्राज्ञा तुझ्यासारखी स्त्री अत्यंत दुर्लभ. तुझेठायीं पांच पुत्र इंद्रासारखे पराक्रमी झाले त्यांची तूं माता. तुझी आणखी योग्यता किती असावी? हे तुझे पुत्र ग्राम्य सुखाचा त्याग करून वीरसुख असावें ही इच्छा धरून बसले आहेत. असे तुझे पांच पुत्र जिवंत असतां आपली निंदा कां करून घेतेस? कृष्णेसह वर्तमान पांडव सुखरूप आहेत. त्या सर्वांनीं तुला पृथक् पृथक् साष्टांग नमस्कार सांगितले आहेत. हे कुंती श्रीयुक्त आपले पांच पुत्र लौकरच पाहाशील. अशी कृष्णानें कुंतीस आश्वासित केली असतां ती गोविंदास बोलते कीं, जेणेंकरून पांडवांचें हित होईल

असें करा. धर्माचा लोप करूं नका. हे कृष्णा, तूं सत्याचा पक्षपाती आहेस. हें सकल भुवन तुझ्यावर स्थित आहे. तूं आमचा त्राता, जसें तूं बोलशील तसें होण्यास कांहीं अशक्य नाहीं. असें कुंतीचें भाषण ऐकून श्रीकृष्णानीं कुंतीस प्रदक्षिणा केली, आणि दुर्योधन गृहीं जाण्यास निरोप घेतला. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्याण्णवावा.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, श्रीकृष्णानें कुंतीस प्रदक्षिणा करून जाण्याविषयीं निरोप मागितला, आणि दुर्योधनाच्या गृहीं जाण्यास निघाला असतां सकल लक्ष्मीच्यायोगें जाज्वल्यमान सहस्रावधि राजे तसेच कौरव यांनीं युक्त अशा गृहांत श्रीकृष्णानें प्रवेश केला तेव्हां दुःशासन कर्ण शकुनी हे ज्याच्यासमीपभागीं आसनस्थित आहेत असा दुर्योधन अमात्यांसहवर्तमान उठून सत्कारपूर्वक कृष्णास आसनावर बसवून स्तुति करूं लागला हे केशवा, आपलें आगमन एथें झालें ही फार चांगली गोष्ट घडली. हें राज्य, गृह, संपत्ति सर्व आपली आहे. या प्रकारें दुर्योधनानें स्तुति केली असतां सकल कौरव उभे राहून श्रीकृष्णाची मर्जी संपादन करूं लागले. नंतर दुर्योधनानें प्रार्थना केली कीं हे वार्ष्णेय, आज आमचे घरीं भोजन करावें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून केशव त्या भाषणाचा अनादर करून आनंदरहित झाला. तेव्हां दुर्योधन बोलतो. हे केशवा, तुमच्याकरितां आम्हीं मार्गांत नानाप्रकारचीं अन्नें, पानपदार्थ, नानाप्रकारचीं मृदुवस्त्रें सिध्द करून ठेविलीं असतां त्यांचा अनादर आपण बहुन केलात याचें कारण काय बरें? आम्हीं उभयतां तुम्हांस समान, उभयतांचे हितावर तुमची दृष्टि असावी असें असतां आमच्या सत्काराचा अनादर कोणच्या कारणास्तव केलात हें मला सांगा. असें ऐकून कृष्ण भाषण करतो हे दुर्योधना, लोकांत व शास्त्रांत अशी प्रसिध्दी आहे कीं, ज्या कार्याकरितां दूताचें आगमन झालें तें कार्य घडलें तर दूतानीं भोजन करावें. तस्मात् जेणेंकरून मी कृतार्थ होईन असें केलें असतां भोजन करण्यास कांहीं अशक्य नाहीं. याच कारणास्तव तुझ्या मार्गांतील सत्कार आम्हीं ग्रहण

केला नाहीं. असें ऐकून दुर्योधन बोलतो. हे जनार्दना, तुझें हें भाषण आमचे ठिकाणीं योग्य नाहीं. तूं कृतार्थ हो अथवा अकृतार्थ हो आह्मी सत्कार करण्यास योग्य आहोंत. आमचा सत्कार तूं अवश्य ग्रहण करावा. पूर्वीं तुझ्या गृहीं मी व अर्जुन बरोबर आलों होतों. तेव्हां तूं आम्हां उभयतांचाही सत्कार करून उभयतांस मार्गस्त केलेंस. तेव्हां तुमचा आमचा विरोध नाहीं. जर विरोध असता तर आमच्या साह्यार्थ इतके नारायण संज्ञकगण कशाकरितां दिल्हे असतेस? तस्मात् हे मधुसूदना, तूं जें कारण सांगतोस तें बरोबर नाहीं. वास्तविक कारण मला सांग. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून कृष्ण भगवान् किंचित् हास्य करीत उत्तर देतो. हे दुर्योधना, मी कामादिकांच्या योगें धर्माचा लोप करीत नाहीं. जेणें करून धर्माचें रक्षण होईल तें मी करतो. भोजनाचीं कारणें दोन आहेत. एक परस्पर एकमेकांची एकमेकांवर प्रीति अत्यंत आहे तर तेथें भोजन करावें. अथवा आपल्यास आपत्ति फार आहे तर कोठें तरी भोजन करावें, मग प्रीति अप्रीतीचा विचार नाहीं. या दोन्हीं कारणांपैकीं तुह्मी आमची प्रीति नाहीं, मला आपत्कालही आला नाहीं हेंच तुझे घरीं भोजन न करण्याचें कारण होय. धर्माचे ठायीं ज्यांची बुद्धि असे जे पांडव त्यांच्याशीं तूं द्वेष करतोस याचें कारण काय तें मला सांग. अरे जे पांडवांचे द्वेष्टे ते माझे द्वेष्टे, जे माझे द्वेष्टे ते पांडवांचे द्वेष्टे असा माझा व त्यांचा एकात्म भाव आहे. अरे दुर्योधना, धर्मशास्त्र असें आहे कीं, आपला जो द्वेष्टा त्याचें अन्न भक्षण करूं नये, व आपण त्यास अन्न देऊं नये. हे दुर्योधना, सकल तुह्मी दुष्ट आहांत. यास्तव तुमचें अन्न मी भक्षण करीन नाहीं. एक निर्दोषी विदुर आहे त्याचे घरीं मी भोजन करीन. असें श्रीकृष्ण बोलून विदुरगृहीं गेले. त्यांच्यामागून द्रोणाचार्य, कृपाचार्य, भीष्म, बाल्हिक आणि सकल कौरव विदुरगृहीं जाऊन प्रार्थना करतात हे मधुसूदना, तुला आह्मी उत्तमप्रकारचीं रत्नें, गृहें, वस्त्रें, अलंकार इत्यादि देतों, परंतु आमचे गृहीं एकवेळ चलावें. असें ऐकून कृष्ण बोलतात हे कौरव हो, तुह्मी पूजा केलेली मला पावली आतां स्वगृहीं जा. असें ऐकून सकल कौरव आपले गृहीं गेले. नंतर विदुरानें भगवंताची पूजा

करून अन्नें भक्षणास दिल्हीं असतां जगदीश्वरानें ब्राह्मणांसहवर्तमान तीं भक्षण केलीं. वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया. जसा इंद्र आपले बरोबरीचे देवांसहवर्तमान रममाण असतो तसा भगवान विदुरगृहीं रममाण झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

९२. अध्याय ब्याण्णव.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भगवान् भोजन करून स्वस्थ बसले असतां रात्रीं विदुर भाषण करतो हे केशवा, तुमचें येथें येण्याचें कारण नव्हतें. दूतकर्माविषयीं दुसरा कोणीं योजिला असता तर बरें झालें असतें. दुर्योधन दुसऱ्याचा मान भंग करणारा, अनीतीविषयीं परम दक्ष, मित्रद्रोही, अनृत भाषण करणारा असा, यास तूं बहुतप्रकारें बोध केला असतांही कधींही ग्रहण करणार नाहीं. मग तुझें येथें येऊन काय तेज राहिलें. भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा, जयद्रथ यांसारखे योध्दे पृथ्वींत नाहींत असा निश्चय होऊन तो तुमच्याशीं शम करण्यास इच्छीत नाहीं. कर्णासहवर्तमान धृतराष्ट्रपुत्रांचा निश्चय आहे कीं, भीष्मद्रोणादिक योध्यांस पाहाण्याचीही शक्ति पांडवांस नाहीं मग युध्द करणें तर परम कठीण. अकरा अक्षोहिणी सेना असतां कांहीं न्यून नाहीं. मी एकटा व कर्ण सर्वांचा पराभव करण्यास समर्थ आहोंत. दुर्योधनादि ह्मणतात कीं, पांडवांचा विभाग आह्मीं कांहींही देणें नाहीं. त्या मूर्खाशीं तुझें शमाचें भाषण निरर्थक आहे. जसें बधिरास गायन व्यर्थ आहे तसा मूर्खास प्रतिबोध निरर्थक आहे. दुर्योधन आपल्यास बलवान् असें मानून स्वस्थ बसला आहे. हे कृष्णा, ते पाप चेतस सभेमध्यें बसले असतां तुझें त्या सभेमध्यें गमन होणें मला रुचत नाहीं. व त्यांस तुझें भाषण रुचणार नाहीं. हे माधवा कौरव केवळ बलाची परीक्षा न करतां आपलें सैन्य बहुत आहे असें मानून बहुत हर्षित आहेत. अमरांसहवर्तमान इंद्र जरी युध्दांत आला तथापि आह्मीं त्यांचा पराभव करूं असें ते भाषण करतात. हस्ती व रथसमुदायांमध्यें दुर्योधन ज्याकाळीं येतो त्या काळीं तो भाषण करतो कीं ही सकल पृथ्वी आजमी जिंकिली. असा ज्यास अभिमान तो शम करण्यास इच्छिणार नाहीं. हे कृष्णा,

पूर्वी पांडवांनीं दिग्विजयकाळीं जे राजे पराजित करून करभार घेतले. ते कौरवांस साह्य झाले आहेत. आज ही पृथ्वी कालपक्व होऊन सकल कौरवांच्या संहाराची मार्गप्रतीक्षा करीत बसली आहे. सकल कर्णादिक दुर्योधनाच्या आश्रयानें परम हृष्ट झाले आहेत. ते वारंवार कौरवांस युध्दाविषयीं उत्तेजन देतात. यास्तव प्रेमेंकरून हें मी तुला सांगतों. हे कृष्णा, तुझ्यादर्शनेंकरून जी मला प्रीति झाली ती मी तुला काय सांगूं? सर्व तुला विदित आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

९३. अध्याय ब्याण्णव— श्रीभगवान् भाषण करतात हे विदुरा आपले सुहृदांस जसा बोध करावा तसा तूं मला केलास. तुमच्या सारख्यांस आह्मांस बोध करणें योग्यच आहे. आतां मीच स्वतः कौरवगृहीं कां आलों याचें कारण सांगतों. दुर्योधनाचें दौरात्म्य व त्यास जे अनुकूल राजे आहेत त्यांची दुरात्म्यता जाणूनच मी येथें आलों. या दुष्टाचा स्वभाव मला सर्व विदीत आहे. परंतु ही पृथ्वी, अश्व, गज, रथ इत्यादिकेंकरून अतिशय संकुलित झाली. त्या अश्वादिकांस जो मृत्युपाशापासून मुक्त करील. त्याच्या धर्माची कीर्ति केवढी होईल बरें! धर्म, कार्य, यथाशक्ति मनुष्यांनीं करीत असावें तें धर्मकार्य आज मी केलें. हे विदुरा, कुरुसृंजयाचा मोठा संग्राम होऊन सकल नष्ट होणार. तो नाश न होऊन शमच व्हावा ह्मणून माझा यत्न आहे. व्यसनांत सांपडलेल्या मित्रावर जो उपकार करीत नाहीं तो घातुक जाणावा. तोच पुरुष आपले कुटुंबाचा नाशकर्ता होतो. यास्तव धृतराष्ट्र पुत्रास धर्मार्थयुक्त मी बोध करतों हा माझा बोध अमात्यसह धृतराष्ट्र पुत्र ग्रहण करण्यास योग्य आहेत त्यांत त्यांचें व पांडवांचें हित असून सकल क्षत्रियांचेंही हित आहे. मी कौरवांचें हित करीत असतां जर दुर्योधन माझ्यावर अन्यथा शंका धारण करील तर मी आजच द्रौपदीचे ऋणापासून मुक्त झालों; परंतु मला तसें कर्तव्य नाहीं. मी मध्यस्त रितीनें आलों आहें. हे विदुरा अधर्मी, मूढ, दुष्टबुध्दि, द्वेष्टे असे जे कौरव ते असें भाषण न करोत. कीं श्रीकृष्णा पांडवांचें हित करून आमचा नाश करण्यास आला आहे. मी उभयतांचा

ही अर्थ साधून देण्यास आलों आहें. माझें धर्मार्थयुक्त भाषण तो मंदबुध्दि ग्रहण न करील तर त्याचें दैव विपरीत समजावें. पांडवांचा अर्थनाश जेणें करून होणार नाहीं अशा प्रकारें मीं कुरूचा शम केला असतां माझी ख्याति लोकांत होईल व कौरवही मृत्युपासून मुक्त होतील. माझी वाणी शुक्रनीतीस अनुसरणारी व हिंसाकर्मापासून पराङ्मुख झालेली ऐकून धृतराष्ट्रपुत्र शमास उद्युक्त होतील. मी जर सभेंत क्रुध्द झालों तर एकाकी असतांही सकल पार्थिवांस अजिंक्य आहें. असें श्रीकृष्णानें विदुरासहवर्तमान भाषण करून निद्रा केली. असा विषय या अध्यायांत आहे.

९४. अध्याय चौऱ्याण्णव:— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, धर्मार्थकामयुक्त अशा विदुराच्या वाणी श्रीकृष्णानें ऐकल्या तशाच कथाबध्द निष्काम अशा श्रीकृष्णाच्या वाणी विदुरानें ऐकिल्या. याप्रकारें उभयतां एकमेकांचें भाषण श्रवण करीत असतां ती रात्र अतिक्रांत झाली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्वरसंपन्न असे सूत, मागध, बंदीजन यांनीं नाना प्रकारच्या स्तुति व शंख दुंदुभी प्रभृति वाद्यांचे गजर इहीं करून श्रीकृष्णास जागृत केलें असतां श्रीकृष्णानें प्रातःकाळीं उठून आन्हिक क्रिया करून जप केला नंतर सूर्याचें उपस्थान करून अग्नीस होम दिला. इतक्यांत दुर्योधन व शकुनी हे उभयतां येऊन भाषण करतात हे दाशार्ह, धृतराष्ट्र, भीष्मप्रभृति इतर कुरु तसेच सकल पार्थिवजन सभेंत येऊन आपली येण्याची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. असें ऐकून श्रीकृष्णानें ब्राह्मणांस हिरण्य, वस्त्रें, गाई व अश्व इत्यादिक दानें केलीं. इतक्यांत दारुकानें रथ सिध्द करून श्रीकृष्णाच्या अग्रभागीं आणिला असतां श्रीकृष्ण कौस्तुभमणी कंठदेशीं धारण करून रथारूढ झाले. आणि आसमंताद्भागीं सकल कौरवमंडळी चालली. श्रीकृष्णासन्निध रथामध्यें विदुर जाऊन बसला. दुर्योधन आणि शकुनी रथारूढ होऊन श्रीकृष्णाच्या पृष्ठभागीं चालले सात्यकी, कृतवर्मा व दुसरे बहुत वृष्णी वीर रथारूढ होऊन श्रीकृष्णाच्या अनु-

लक्ष्यें करून चालले. अशा परमसमारंभानें श्रीकृष्ण धृतराष्ट्रगृहीं जात आहे. तो मार्गांत पुष्कर, शंख, दुंदुभीइत्यादि वाद्यांचे गजर होऊं लागले. मोठेमोठे सिंहासारखे विक्रमी योध्दे श्रीकृष्णाच्या आसमंताद्भागीं रथांनें रक्षण करूं लागले. कौरवांकडील पांचशें गज, सहस्रावधि रथ कृष्णाच्या मागून चालले. कृष्णदर्शनाकरितां नगरसंबंधीं गृहें, गवाक्षें, स्त्रियांनीं खचित झालीं. श्रीकृष्ण भगवान् मार्गांत मंदमंद गति रथ चालवीत कौरव सभेच्या सन्निध आले असतां श्रीकृष्णाच्या अनुचरांनीं शंख वेणु प्रभृति वाद्यांचे निर्घोष केले. श्रीकृष्णाच्या रथाचा परम भयंकर शब्द ऐकतांच धृतराष्ट्र राजाच्या त्हदयांत परम आनंद उत्पन्न झाला. नंतर श्रीकृष्णानीं विदुर आणि सात्यकी या उभयतांस दोन हस्तांमध्यें ग्रहण करून सभेंत प्रवेश केला. त्यांच्यामागून कर्ण, दुर्योधन, सकल वृष्णी, व कृतवर्मा हे सभेंत गेले. सभेंत गोविंद आला हें समजतांच धृतराष्ट्र, भीष्म द्रोणांसहवर्तमान आसनापासून उत्थित होऊन कृष्णास सामोरा गेला. तसेच सहस्रावधि सकल भूपतीही आपले आसनापासून उठून कृष्णाचा सत्कार करीत त्यांनीं जांबूनद परिष्कृत त्या आसनावर धृतराष्ट्राच्या आज्ञेनें श्रीकृष्णास नेऊन बसविलें. नंतर श्रीकृष्ण परम विस्मीत होऊन धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, तसेच इतर पार्थिव यांसहवर्तमान सभेमध्यें कांहीं गोष्टी कथन करीत असतां सकल कौरवांनी श्रीकृष्णाचा सत्कार केला. असा श्रीकृष्ण परमपूजित सभेमध्यें स्थित आहे तों अंतरिक्षामध्यें नारदप्रभृति बहुत ऋषीसमुदायास पाहून बोलतो हे भीष्मा, तुमची सुशोभित सभा पाहाण्याकरितां सकल ऋषिगण आले आहेत त्यांस आमंत्रणें करून त्यांचा सत्कार करा. ते ऋषीसभेमध्यें येण्याचे पूर्वी कोणीं आसनावर बसूं नये. अशी आज्ञा ऐकून भीष्मानीं मणि कांचन मंडित चित्रविचित्र उत्तमप्रकारचीं विपुल आसनें सिध्द करून भृत्यद्वारा सभेंत आणून ठेविलीं, आणि त्या ऋषींचा सत्कार केला. नंतर सकल ऋषि आसनीं उपविष्ट झाल्यानंतर श्रीकृष्ण आसनावर बसले. तेव्हां सकल राजे आपआपल्या —

आसनीं जाऊन बसले. दुःशासनानें सात्यकीस आसन देऊन बसविलें. विविंशतीनें कांचनपीठ कृतवर्म्यास दिलें. कृष्णाच्या सन्निध कांहीं दूर असे कर्ण धुर्योधन एकासनीं बसले. गांधारराज शकुनी पुत्रांसहवर्तमान कृष्णाच्या कांहीं सन्निध जाऊन बसला. विदुर मणिरखचित आसनावर कृष्णाच्या आसनास कांहीं स्पर्श करून बसला. सकल विश्वकर्ता जनार्दन सभेंत बसला असतां सकल राजे स्तब्ध बसले. असा विषय या अध्यायांत आहे.

९५. अध्याय पंच्याण्णव — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सकल राजे सभेमध्यें स्तब्ध बसल्यानंतर श्रीकृष्ण भाषण करतात हे धृतराष्ट्र राजा, माझें आगमन तुमचे गृहीं कशाकरितां झालें, याचें तात्पर्य सांगतों. तुमचा आणि पांडवांचा अतःपर शम असावा. या उभयतांच्या कलहामध्यें वीरांचा नाश होऊं नये ही याच्ञा करण्याकरितां मी येथें आलों. हे राजा, सकल राजकुलांमध्यें तुमचें कुल मोठें श्रेष्ठ. पूज्यमान असें असतां तूं त्या कुलास न्यूनता आणलीस. अशी सांप्रत अवस्था आहे. या सकल कुरुकुलाचा या कालीं तूंच स्वामी असतां मिथ्या प्रचार करण्यास तूं आरंभ केला आहेस. तसेंच तुझे पुत्र दुर्योधनप्रभृति धर्मार्थाचा लोप करून आपले बांधवांसहवर्तमान कलह करीत आहेत. हें कर्म तुझ्या पुत्रांचें चांगलें नव्हे. तुमचे कुलांत ही एक घोर आपत्तीच आली असें समजा. हे राजा, आपत्तीची उपेक्षा जर करशील तर सकल पृथ्वीचा घात होण्याचा समय येईल. यास्तव शम करण्याची इच्छा धर. माझीही इच्छा शम करण्याचीच आहे. सकल पुत्र तुझे आज्ञाधारक आहेत. जेणेंकरून तुझें हित होईल याविषयीं तूं त्यांस आज्ञा कर. राजा, यामध्यें तुझें हित फार आहे. तुझी अनुज्ञा मान्य करण्यास आज पांडव सिध्द आहेत यास्तव वैराची शांति करून शमच कर. अमरांसहवर्तमान इंद्र जरी तुम्हांशीं युध्दास आला, तरी पांडव त्यांचा पराभव करतील. इतकी शक्ति पांडवांमध्यें आहे. अरे राजा, तुमचें साह्य करणारे भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, विविंशति, अश्वत्थामा, युधिष्ठिर, भीमसेन, सव्यसाची, नकुल, सहदेव आणि सात्यकी हे रथी एकत्र झाले असतां कोणता क्षत्रिय तुमच्याशीं विपरीत —

आचरण करील. जर पांडवांस सहाय्य करून घेशील तर सकल लोकांचा तू ईश्वर होशील. संधि न करून युध्दच करावें अशी इच्छा करशील तर उभयतांही राजकुलांचा क्षय होईल यांत तुझा काय धर्म राहिला. यास्तव धर्माधर्म पाहून काय तें कर. तुझे पुत्रही शूर आहेत. पांडवही शूर आहेत तुझ्या पुत्रांनीं राजक्षय केला अथवा पांडवांनीं राजक्षय केला तथापी तुला सुख कोणतें होईल? हें सांग. परंतु हे राजा, युध्दांमध्यें पांडवांनीं तुझे पुत्र यमगृहीं नेलेले तू पाहाशील. यास्तव सकल प्रजा नाश न पावेल असा यत्न केला असतां उत्तम आहे. हे राजा, अरे ही प्रजा तुझी आहे. इचें त्राण कर. नको इचा नाश करूं. अरे हे सकल राजे आलेले मोठे कुलीन, आर्य पुण्यजातींतील उत्पन्न एकमेकांचे संबंधी असे आहेत, यांचें तू रक्षण कर, क्षय करूं नको. युध्दार्थ ज्या राजांस तूं निमंत्रित केलें आहेस त्यांनीं तुह्मी व पांडवांनीं एकत्र भोजन करून नंतर सामोपचारें त्या राजांस जाण्याम आज्ञा दे. पांडवांचा पिता बाल्यावस्थेंत मृत्यु पावल्यानंतर तूं त्यांचें रक्षण केलेंस हे धृतराष्ट्र राजा, तुझे आज्ञेनें पांडवांनीं द्वादश वर्षें वनांत व तेरावें वर्ष अज्ञातवासांत अतिक्रमण केलें. तूंच भाषण केलेंस कीं, त्रयोदश वर्षांनीं तुमचें राज्य तुह्मांस मिळेल. तर आतां राज्यांश आह्मांस दिला असतां आह्मी सुखानें पाहूं. पांडवांस स्वमार्गीं लावून स्वकर्माचे ठायीं तू वर्तन कर. हे सकल सभासद धर्मज्ञ आहेत यांनीं सांगावें कीं, माझें भाषण युक्त आहे किंवा अयुक्त आहे. यांच्यानें अधर्ममार्ग करवणार नाहीं. कदाचित् काल आला असतां हे स्तब्ध बसतील. धन्य ते पांडव, आजपर्यंत तुह्मी अनीतीनें चालत असतां स्तब्ध बसले होते. हे राजा, सकल क्षत्रियांस मृत्युपाशापासून मुक्त कर. शम पाव. मन्यूचे स्वाधीन होऊं नको. हे राजा, अजातशत्रू जो धर्मराज यास तू जाणतोस ना? पूर्वीं तुह्मी त्यांस जतुगृहांत जाळिलें व इंद्रप्रस्थीं घालविलें. शकुनीच्या नादास लागून कपटानें राष्ट्र, धन, धान्य सकल त्यांचें हरण केलें. द्रौपदीस सभेंत आणिली. तथापि धर्मराज क्षात्रवृत्तीपासून भ्रष्ट झाला नाहीं. हे राजा, धर्मापासून व सुखापासून प्रजेस तूं नष्ट करूं नको. पार्थ तर तुझी शुश्रुषा करण्यास

सिध्द आहेत नाहींपेक्षां युध्दासही सिध्द आहेत. तुला यथायोग्य वाटेल त-सें कर हें माझें सांगणें आहे. असें सकल पार्थिवांनीं ऐकून आपले त्हृद-यांत त्याचें पूजन केलें; परंतु कोणींही त्याचे पुढें भाषण करण्यास सम-र्थ झाला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

९६. अध्याय शाण्णव.— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, माहा-त्म्या केशव यानें सकल सभेंत भाषण केलें असतां सर्व सभासदांच्या शरिरा-वर रोमांच उभे राहून ते स्तब्ध बसले. त्यांतील एकही उत्तर देण्यास समर्थ झाला नाहीं. कौरव सभेंत जामदग्न्य परशुराम भाषण करतात हे राजा, पू-र्वी कोणी एक सार्वभौम दंभोद्भव नामक राजा सकल पृथ्वीचें राज्य करीत हो-ता. त्यानें नित्यशः प्रातःकालीं उठून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांस असा प्रश्न करावा कीं, माझेसमान योध्दा या पृथ्वीवर तुमच्यामध्यें कोणी आहे? ते-व्हां ब्राह्मणांनीं वारंवार त्या राजाचा निषेध करून म्हणावें कीं, हे राजा, तू अभिमान धारण करूनको. या पृथ्वीवर कोण किती सामर्थ्यवान् आहे हें को-णास विदित आहे? असें ब्राह्मणांनीं राजास निषेध केले असतां पुनः पुनः त्या-नें प्रतिदिवशीं सर्वांस प्रश्न करावाच याप्रकारें कांहीं दिवस झाले असतां एके दिवशीं ब्राह्मणांनीं राजास उत्तर दिलें कीं, हे राजा, अनेकांचा ज्यांनीं युध्दांत पराजय केला त्यांस पुरुषसत्तम असें म्हणतात. त्यांसमान तूं प-राक्रमानें कधींही होणार नाहींस. असें ऐकून पुनः राजा प्रश्न करतो हे ब्राह्म-ण हो ते वीर कोणते? त्यांचें जन्म कोठें? त्यांचें कर्म काय? तें मला सांगा. अ-सा प्रश्न ऐकून ब्राह्मण भाषण करतात हे राजा, नर आणि नारायण असे उभयतां महान् तपस्वी आहेत ते मनुष्यलोकांत वास करतात त्यांच्याशीं तूं युध्द कर. त्यांचें राहाण्याचें स्थळ गंधमादन पर्वत. तेथें ते घोर तप करी-त बसले आहेत असें आम्ही ऐकतों. असें ऐकून राजा क्रोधानें सेना घेऊ-न ज्या स्थळीं नरनारायण तप करीत बसले होते तेथें गेला. ते व्हां नरना-रायणांनीं फलमूल, आसन, उदक इत्यादिकांनीं राजाची पूजा करून भाष-ण केलें. हे राजा, कोणते कार्याचा उद्देश धरून इकडे आलास? असा प्रश्न ऐकून राजा बोलतो कीं हे ऋषे, मी आपल्या बाहुबलानें सकल पृथ्वी

जिंकिली. सर्व शत्रूंचा नाश केला. आतां तुमच्याशीं युध्द करावें म्हणून या गंधमादन पर्वती आलों आहें हें आतिथ्य मला द्यावें, असें ऐकून नरनारायण भाषण करतात हे राजा आमच्या आश्रमांत क्रोध, लोभ, हे वास करीत नाहींत. ते व्हां येथें शस्त्रच नाहीं त्यापेक्षां युध्द कोठून होणार? दुसरे पृथ्वीवर क्षत्रिय बहुत आहेत त्यांसह वर्तमान युध्दाची आकांक्षा कर. या प्रकारें नरनारायणानीं भाषण केलें असतां पुनःपुनः राजा भाषण करतो कीं, हे तापस हो, तुमच्याशीं युध्द करण्याचीच इच्छा आहे. असें ऐकून नरनारायणांनीं राजाचें शांतवन केलें असतां राजा शांत न होऊन युध्दासच आव्हान करतो हें पाहून नर आपले हस्तांत एक दर्भमुष्टि घेऊन राजास भाषण करतो हे दंभोद्भव राजा, आह्मां तपस्व्यांसह वर्तमान तुला युध्द करण्याची इच्छा झाली आहे काय? सकल सेना सिध्द करून युध्दास ये. तुंह्मांपाशीं जीं काय शस्त्रास्त्रें असतील तीं ग्रहण करा मी त्या शस्त्रांचा नाश करतों. मलाही आतां युध्दाची उत्कंठा आली आहे. असें ऐकून राजा भाषण करतो हे तापसा, हें अस्त्र तूं माझ्यावर योजिलेंस. कांहीं चिंता नाहीं हा मी युध्दास आलों. असें ह्मणून राजा एकाएकीं बाणवर्षावानें तापसास मारण्याची इच्छा करीत असतां नरानें ते राजाचे सकल शर तुच्छ करून दर्भमुष्टि समंत्रक करून सैन्यावर टाकिली असतां त्या अस्त्रयोगें राजाच्या सैन्यांतील लोकांचे नेत्र, कर्ण, नासिका हीं मायेनें कृंतन होऊन पृथ्वीवर पडलीं. ते व्हां राजा दुःखानें भाषण करतो कीं माझें कल्याण असो. मी शरण आहें माझें रक्षण करावें. असें ऐकून नर दयेनें बोलतो हे क्षत्रिया, ब्रह्मव्रत धारण कर. धर्मात्मा हो. कोणाशीं युध्दास प्रसक्त होऊं नको. अरे कोणी अल्प असतो कोणी मोठा असतो त्याची अमर्यादा होते. आणि दांत, मृदु, सौम्य असा होऊन प्रजेचें उत्तम प्रकारें पालन कर. कोणाचें बलाबल पाहिल्यावांचून आक्षेप करूं नको. आतां तुझें कल्याण असो. तूं आपले स्वस्थानीं जाऊन ब्राह्मणांस माझा कुशल प्रश्न सांग. असें ऐकून राजा उभयतांचेंही पादाभिवंदन करून स्वपुरांत गेला. परशुराम भाषण करतात हे राजा, असें त्या नराचें मोठें अघटित कर्म आहे तें मी तुला सांगितलें. अरे हा नर–

उभयतांपैकीं नारायणाचा अवतार श्रीकृष्ण तुमचे सभेमध्यें आला आहे. याचे गुण नरापेक्षां बहुत अधिक आहेत यास्तव गांडीव धन्वा जो पार्थ तो ज्याचा अवतार त्यानें आपलें गांडीव धनुष्य जों कालपर्यंत सिध्द केलें नाहीं तावत्कालपर्यंत आपला अभिमान टाकून त्यास शरण गेलास तर तूं या पृथ्वीवर जिवंत राहाशील. नाहीं तर धनंजयापाशीं काकुदीक,शुक इत्यादि आठ प्रकारचीं युध्दास्त्रें आहेत, त्यांनीं तुह्मीं विध्द होऊन मरण पावाल. अरे ज्यास कपिध्वज जिष्णु असें ह्मणतात. ज्याच्या गुणाची संख्या नाहीं. तसाच हा जनार्दन पार्थापेक्षां अधिक आहे. ते ह्मां यांचें भाषण तुह्मीं ऐका. हे राजा, तूं धनंजयास जाणतच असशील. नरनारायणाचे अवतार केशवार्जुन नावानें पृथ्वीवर अवतरले आहेत. पुरुषोत्तम यास ह्मणतात. जर हें तुला सत्य गाऊक आहे तर माझ्या भाषणावर शंका न धरितां तूं पांडवांसह वर्तमान शम करून तुमचें कुल या लोकीं मोठे पूजित आहे तें पूजितच राहील असें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

९७. अध्याय सत्याण्णवः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, जामदग्न्याचें भाषण ऐकून कण्वऋषि बोलला हे दुर्योधनराजा, जसा पितामह ब्रह्मदेव अक्षय्य. अव्यय, नाशरहित आहे तसे हे भगवान् नरनारायणऋषि आहेत. सकल देवांमध्यें विष्णुमात्र नित्य आहे. व इतर सर्व निमित्त मरणी आहेत. पृथ्वीतील राजे बहुत श्रीचा उपभोग करीत असतां नष्टायुष होऊन मृत्युवश झालेलेच पुनः जन्मांतरीय सुकृत दुष्कृताचा उपभोग करण्याकरितां शरीर धारण करून पृथ्वीवर राहातात असें मनुष्याचें जीवित या लोकीं मुहूर्तमात्र आहे. यास्तव धर्मराजाशीं शम कर. आणि तुह्मी व पांडव उभयतां मिळून पृथ्वीचें पालन करा. मी बलवान् आहें असें व्यर्थ मानूं नको. हे सकल पांडव देवासारखे पराक्रमी, शरीरानें मोठे बलि आहेत. त्यांच्याशीं स्पर्धा करूं नको. याविषयीं तुला एक इतिहास सांगतो. इंद्राच्या मातलीनामक सारथ्यास एक कन्या अत्यंत रूपवती गुणकेशी या नांवें प्रसिध्द होती. तिचा विवाह करावा ह्मणून मातली भार्येसहवर्तमान एकांतीं विचार करीत असतां ह्मणतो हे स्त्रिये, लघु शील, मृदु, सत्व, बल. अशा मनुष्यास

धिःकार असो. अशा मनुष्यास कन्या देणें अगदी निंद्य कर्म होय. जर कन्या उत्तम निघाली तर चांगलें. जर दुष्ट निघाली तर मातृपितृ कुलें ज्या कुलां दान केलें असेल तें कुल या तीन कुलांस दूषित करील. असें भार्येसह वर्तमान भाषण करून मनुष्य दृष्टीनें देव आणि मनुष्य या उभयलोकांमध्यें कन्येकरतां वराविषयीं विचार करून पाहिला परंतु मातलीस उभय लोकीं वर एकही ध्यानास येईना. आतां पुढें काय करावें. माझे कन्येस वर कसा मिळेल असा मातली चिंताग्रस्त होऊन ह्मणतो हे भार्ये, आतां नागलोकीं जाऊन कन्येस पति पाहातों. देव मनुष्यलोकीं तर गुणकेशीस योग्य पति कोणी दिसत नाहीं. असें बोलून त्यानें रसातळीं प्रवेश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

९८. अध्याय अठ्याण्णव:— कण्व भाषण करतात हे दुर्योधनराजा, मातली पाताल लोकीं जाण्यास निघाला असतां मार्गामध्यें नारदाची भेट झाली. त्यास मातली प्रश्न करतो हे देवऋषे, आपलें आगमन कोठें होत आहे? नारद बोलतात हे मातले, वरुणाची भेट घेण्याकरितां वरुणलोकीं मी जातों. आह्मी तर स्वच्छंदगामी आहों. परंतु तुह्मी कोठें जातां? तुमचें कांहीं कार्य आहे किंवा इंद्राचें कांहीं कार्य आहे तें मला सांगा. असें ऐकून मातलीनें आपला सर्व वृत्तांत सांगितला असतां नारद भाषण करतो हे मातले, कांहीं चिंता करूं नको. आपण उभयतांही वरुणाच्या दर्शनास जाऊन तेथें तुझे कन्येकरतां वराचाही शोध करूं. असें भाषण करून उभयतांनी वरुण लोकीं जाऊन वरुणाचें दर्शन केलें असतां वरुणानें नारदमुनि व शक्र सारथी मातली यांची योग्यतेनुसार पूजा केली. नंतर मातली आपलें कार्य वरुणास सांगून उभयतांही नागलोकीं जाण्यास निघाले. तेव्हां नारद वरुण लोकाचें वर्तमान सांगतो हे मातले, पुत्रपौत्रांशीं सह वर्तमान वरुणास पाहिलेंस हा वरुणाचा पुत्र महा रूपवान् याचें नाव पुष्कर, सोमाची जी कन्या ती याची भार्या होय. तिला ज्योत्स्ना असें ह्मणतात. इची दुसरी भगिनी अदीताचा पुत्र जो सूर्य यास दिल्ही आहे. हें कांचनमय वरुणाचें भवन या स्थळीं वारुणी ह्मणून सुरा आहे तिचें स्थल हेंच होय. या स्थळीं सकल सुरांस सुर-

त्व प्राप्त झालें. असें हें स्थळ महान् पूज्य होय. पूर्वी दैत्यांचीं राज्यें देवांनीं हरण करून त्यांचीं आयुधें याचस्थळीं ठेविलीं आहेत. पाहा तीं कितीदेदीप्यमान दिसतात. हीं शस्त्रें अक्षय्य होत यांचानाशनाहीं. या आयुधांची स्मृति केली असतां पुनः स्वतः आपणच येऊन हस्तांमध्यें बसतात. पूर्वी येथें सकल राक्षस व दैत्य शस्त्रास्त्रें घेऊन राहात होते. तें त्यांचें हें स्थळ सकळ देवांनीं निर्मित केलें, आणि हीं आयुधेंही देवांनीं निर्मित केलीं. हे मातले हा वरुण कमलाहृद पाहा. यांत विधूम अर्चिमान असा अग्नि निरंतर वास करतो. हें वैष्णव नामक चक्र पाहा, हें सकल व्यापक आहे खरें परंतु यास्थळीं कोणास बाधा करीत नाहीं. हा गांडीवनामक चाप पाहा. यानें सकल लोकांचा संहार होतो. देवतांनीं हा निरंतर संरक्षित आहे. ज्या ज्या काळीं जसजशीं कृत्यें उत्पन्न होतात त्या त्याकाळीं हें धनुष्य त्या दुष्टकृत्याचें निवारण करतें अशी याची योग्यता आहे. हें धनुष्य अभेद्य असून त्या त्या काळीं यास लक्ष गुणित बल उत्पन्न होतें असें हें गांडीव धनुष्य ब्रह्मदेवानें अस्त्रांत प्रथम उत्पन्न केलें. हीं दुसरीं शस्त्रें राजांकरितां उत्पन्न केलीं आहेत. हीं तेजेंकरून अतिउत्तम होत, वरुणाचे पुत्र या शस्त्रांस धारण करितात. हें वरुणाचें छत्र गृहांमध्यें रक्षित आहे. याच्या आसमंताद्भागीं मेघ वर्षणाप्रमाणें जलवर्षाव होत असतो. याच छत्रापासून परिभ्रष्ट झालेलें उदक चंद्र धारण करतो. याच्या आसमंताद्भागीं अतिशय अंधःकार आहे. हे मातले असे चमत्कार या लोकीं बहुत पाहाण्याजोगे आहेत. परंतु तुला कार्याची त्वरा यास्तव लौकर जाऊं असें म्हणून उभयतांही गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

९९. अध्याय नव्याण्णव:— नारद सांगतात हे मातले, नागलोकाच्या नाभिस्थानाचेठायीं पाताल लोक ज्यास म्हणतात तें हें स्थळ होय. येथें दैत्य दानव वास करतात. जलांमध्यें निमग्न झालेले जंगम प्राणी ते मृयमाण होऊन या लोकीं राहातात. त्यांचा हा शब्द ऐक. या लोकीं असुर नामक अग्नि जलाचें भक्षण करणारा आहे. हा अग्नि आपली मर्यादा उल्लंघन करीत नाहीं जर उल्लंघन करील तर सकल लोक आणि समुद्र यांचा दाह करून टाकील. एथें पूर्वी देवांनीं असुरांचा नाश करून अमृत पान केलें. अवशिष्ट अमृत—

ठाकिलें आहेतें पाहा, एथें परमेश्वर भगवान विष्णु, हयग्रीव अवतार धारण करून पर्वकालाचेठायीं सकलांस दर्शन देतो. आणि सुवर्णाख्य जगतास आपले वेदरूप वाणीनें वृध्दिंगत करतो. चंद्रादिकमूर्तीपासून यास्थळीं जल निरंतर स्रवतें, म्हणून याचें नांव पाताल असें झालें. वास्तविक याचें नांव पतज्जल असें आहे. ऐरावत नामक गज या स्थळापासून उदक घेऊन मेघास अर्पण करतो. नंतर इंद्राच्या आज्ञेनें लोकांच्या कल्याणाकरितां मेघ पृथ्वीवर वृषण करतो. या लोकीं नानाप्रकारचे तिमि नामक मच्छ अनेकरूपी जलांमध्यें राहून सोमाचें पान करून सुखानें राहातात. हे मातले, या पाताल स्थळीं सूर्याचे किरणांनें भिन्न झालेले प्राणी मृतासारखे होऊन पुनः रात्रिभागाचेठायीं जिवंत होतात. तसाच चंद्रमा उदय पावून सकल दैत्यांस अमृत वर्षाव करीत संजीवन करतो. पूर्वी इंद्रानें हतश्री केलेले असे दैत्य धर्मनिरत असून कालप्रपीडित झालेले तेही यास्थळींच राहातात. भूतपति जो महेश्वर यानें सकल प्राण्यांच्या कल्याणाकरितां महत्तप केलें तें हें स्थल होय. यास्थळीं गोव्रत धारण केलेले असे ब्राह्मण बहुत वास करून स्वाध्यायाध्ययनेंकरून आपलीं शरीरें कृश करीत प्राण त्याग करून शेवटीं स्वर्गीं जातात. नारद भाषण करतो, हे मातले, तो गोव्रताचा मार्ग असा कीं, मनास येईल तेथें शयन करणें, जो कोणी कांहीं भक्षणास देईल तें भक्षण करणें, कोणच्याही पदार्थानें शरीर आच्छादित करणें असे गोव्रत धारण करणारे ब्राह्मण यास्थळीं बहुत आहेत. सुप्रतिक नामक गजाच्या वंशामध्यें उत्पन्न झालेले ऐरावत वामन, कुमुद आणि अंजन नामक एथेंच राहातात. हे मातले या पाताल लोकीं गुणवान् असा तुझ्या कन्येस योग्य वर असला तर त्याचा शोध कर. सांपडल्यास त्यास आपण येथून घेऊन जाऊं. हें अंड जलांमध्यें ठेविलें आहे. तें श्रीकरून अत्यंत शोभायमान दिसतें. प्रजेचे उत्पत्ति कालापासून हें अंड भिन्न होत नाहीं, व चंचलही होत नाहीं. या अंडाची जातिस्वभाव अथवा उत्पन्न करणारे मातापितर यांचा शोध लागत नाहीं. असा याचा चमत्कार आहे. महाप्रळयकाळीं अग्नि उत्पन्न होऊन चराचर त्रैलोक्यांत जो दग्ध करतो तो अग्नि या स्थळीं वास करतो. असा पातालाचा सकल वृत्तांत ऐकून मातली भाषण करतो हे नारदा, येथें माझ्या मनाजोगा —

कन्येस वर दिसत नाहीं. तस्मात् आतां दुसरे कोणचे स्थळीं चल. असें ऐकून उभयतांही तेथून गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१००. अध्याय शंभर:— नारद भाषण करतात हे मातले, या पुरास हिरण्यपुर असें ह्मणतात. सकल पुरांत हें पुर अतिश्रेष्ठ आहे. मायेनें वर्तन करणारे असे दैत्य दानव येथें राहातात. हें पुर विश्वकर्म्यानें पूर्वी मोठ्या यत्नानें उत्पन्न केलें. कोणी ह्मणतात कीं मयासुरानें आपल्या मनोमयेंकरूनच पाताल तलाच्या अधोभागीं हें पुर उत्पन्न केलें. येथें मोठेमोठे असुर व दानव नानाप्रकारच्या मायेंकरून बलाढ्य झालेले ईश्वर प्रसन्न होऊन ज्यांस वर मिळाले आहेत ते येथें राहातात. यांचा पराजय इंद्र, यम अथवा कुबेर हे करण्यास असमर्थ आहेत मग इतरांची कथा काय? कालखंज नामक असुर विष्णूच्या पाया पासून उत्पन्न झालेले तसेच ब्रह्मदेवाच्या पादापासून उत्पन्न झालेले नैऋत, यातु धान नामक असुर येथेंच वास करतात. या दानवांचा पराक्रम विशाल यांच्या मोठमोठ्या दंष्ट्रा, वायूसारखें ज्यांचें चापल्य त्यांस निवात कवच असें ह्मणतात. हे युध्दाविषयीं मोठे दुर्मद त्यांची येथें स्थीति आहे. हे मातले, हे दानव तूं जाणतोस असें वाटतें. यांचा पराभव करण्यास शक्राचेंही सामर्थ्य नाहीं. हे मातले तुझा पुत्र गोमुखनामा व पुत्रासहवर्तमान इंद्र हे उभयतां या दानवां सहवर्तमान युध्द करतां करतां भग्न झाले. यांचीं गृहें शिल्पशास्त्रोक्तविधीनें युक्त केलेलीं सुवर्णाचीं असून वैडूर्यप्रवाल इत्यादिकांनीं सुंदर केलेलीं आहेत. हें पुर अमुक पुरासारखें याचा तर्क करण्यास फार कठिण आहे. हीं दैत्यांचीं क्रीडास्थानें पाहा, तशींच अमोलिक शयनस्थानें, रत्नमय पात्रें, तशींच आसनें पाहा, हे मातले या ठिकाणीं तुला रुचेल तर तुझी कन्या जी गुणवती इच्या वराचा शोध कर. अथवा दुसरे दिशेस जाण्याची इच्छा असल्यास तिकडे चल. मी तुजबरोबर येण्यास सिध्द आहें असें ऐकून मातली भाषण करतो हे देवऋषे, जेणेंकरून देवांस विप्रीय होईल असें करणार नाहीं. देवदानव हे परस्पर भ्राते असून नित्य वैरानुसक्त असल्यामुळें दानवांतील वर संबंध करणें मला योग्य नाहीं. देवांशीं वैर करणारे असे दानव त्यांचें हें स्थल, येथून मी आपली कन्या जी गुणवती इजला वर नेला तर देवांचें विप्रीय

केलें असें होईल. यास्तव या लोकींचा पति मी आपल्ये कन्येस करण्याची इच्छा करीत नाहीं. यास्तव या दानवपुरीचा त्याग करून अन्यत्र गमन करावें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१. अध्याय एकशें एक.— नारद भाषण करतात हे मातले, हा सुपर्णांचा लोक पाहा,- हे सुपर्णपक्षि सर्पांचें भक्षण करतात. या सुपर्णांचा पराक्रम तसेंच गमन यांची साम्यता करण्यास दुसरें कोणांमध्यें सामर्थ्य नाहीं. भारसहन करण्याविषयींही हे तसेच धुरंधर आहेत. सुमुख, सुनामा, सुनेत्र, सुवर्चस, सुरुचा, व सुबाहु, हे साहा गरुडाचे पुत्र आहेत. यांची पुढें संतती बहुत होऊन हा लोक सकल गरुड कुळांनीं व्याप्त आहे. गरुडमाताजी विनता तिच्या कुळाचा विस्तार या लोकीं होत चालला आहे. आणखी पक्षिजातीय सहस्रावधि येथें राहातात त्यांचीही उत्पत्ति कश्यप ऋषीपासून आहे. हे सकल पक्षि श्रीवत्सलक्षण युक्त आहेत. महान् पराक्रमी अत्यंत शोभायमान यांस दया नाहीं. हे कर्मानें क्षत्रिय आहेत. निरंतर हे सर्पांचें भोजन करतात. हे आपल्या ज्ञातीचा क्षय करतात ह्मणून हे ब्राह्मण्य पावत नाहींत. हे मातले, साहा पुत्रांपासून पुढें जो गरुड कुळाचा विस्तार झाला यांची नांवें मुख्यत्वेंकरून संक्षेपानें सांगतों. हें कुल फार थोर. श्रीविष्णूंनीं या कुळाचा अंगिकार केला आहे. यांचें दैवत विष्णूच. दुसरें दैवत नाहीं. या कुळास विष्णूच परायण. हे विष्णूचें ध्यान निरंतर ऱ्हदयांत करतात. यांची गती श्रीविष्णूच होय. सुवर्णचूड, नागाशा, दारुण, चंड, तुंडक, अनिल, अनल, विशालाक्ष, कुंडली, पंकजीत, वज्र, विष्कंभ, वैनतेय, वामन, वातवेग, दिशाचक्षु, इत्यादिक हे गरुड कुळोद्भवप्राधान्येंकरून जे विख्यात कीर्तिमान आहेत, त्यांचीं नांवें सांगितलीं. हे मातले तुला येथें कन्येकर्ता वर रुचत असला तर शोध कर अथवा ज्या देशांत तुला रुचेल तेथें येण्यास मी समर्थ आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०२. अध्याय एकशें दोन.— नारद भाषण करतात हे मातले, हें पृथ्वीचें सातवें तल यास रसातल असें ह्मणतात. या लोकीं गाईची माता अमृतापासून उत्पन्न झालेली सुरभी येथें राहाते. सकल पृथ्वीचा सड्रसात्मक

सार एकत्र होऊन अमृत रूपानें परिणामपावलेला तो या सुरभीपासून क्षीररूपानें निरंतर उत्पन्न होतो. पूर्वी ब्रह्मदेवांनीं क्षीर पान केलें - तेणेंकरून मुखां-तून उद्गार निघनांच त्याजबरोबर ही सुरभी मुखांतून निघाली. या सुरभी-च्या क्षीर धारा पृथ्वीवर पडल्या तेणेंकरून क्षीरनिधीनामक समुद्र उत्पन्न झाला. क्षीरधारांपासून उत्पन्न झालेला जो फेन तो प्राशन करणारे अ-से महान् या पृथ्वीवर बहुत आहेत. म्हणून या ऋषींचें नांव फेनप असें विख्यात झालें. याचा आहार फेनच आहे. हे ऋषि निरंतर उग्रतप करून असतात. यास्तव सकल देवता या ऋषींपासून भय पावतात. या सुरभी-च्या चार कन्या चार दिशांस राहून दिशांचें धारण करतात. सुरूपानामें सुरभि कन्या पूर्व दिशेचें धारण करते. हंसिकानामें सुरभिकन्या दक्षिणादि-शेचें धारण करते. पश्चिम दिशेचें धारण करणारी सुभद्रानामें सुरभीक-न्या होय ही महाश्रेष्ठ असून विश्वरूपा इला म्हणतात. हे मातले सर्वका-मदुधानामें सुरभी कन्या उत्तर दिशेचें धारण करणारी होय. या धेनूचेंच पय एकत्र करून देवासुरांनीं सागरानें मंथन केलें. त्या कालीं मंथराचल पर्वतास मंथा करून वारुणी नामक मदिरा, लक्ष्मी, अमृत, उच्चैश्रवानामक अश्व, राज कौस्तुभ नामक मणी, रत्न, इत्यादि रत्नें उत्पन्न केलीं. या सुर-भीपासून जें क्षीर उत्पन्न होतें तें सुधा आहार करणाऱ्यास सुधारूपानें प्राप्त होतें. अमृतभोजी जे आहेत त्यांस अमृत रूपानेंच हेंच क्षीर प्राप्त होतें. या रसातल लोकांत वास करणारे जे रसातल निवासी यांनीं पूर्वी ए-क गाथा फार चांगली प्राचीन काळीं केली आहे, ती तुला सांगतों ऐक. नाग-लोकीं, स्वर्गलोकीं अथवा विमान इत्यादिकांत जे राहातात त्यांस इतकें सु-ख नाहीं - तितकें या रसातल लोकीं राहाणाऱ्यांस सुख आहे. असा० वि० आ०

१०३. अध्याय एकशें तीन :— नारद भाषण करतात हे मातले, ही भोगावती नामक पुरी या पुरीचा स्वामी सर्पराज वासुकी आहे. जशी इंद्रा ची पुरी सकलांमध्यें श्रेष्ठ तशी ही वासुकी नागाची पुरी फार श्रेष्ठ आहे ज्यानें आपल्या तपोबलेंकरून शिरावर सकल पृथ्वी धारण केली असा जो शेष संज्ञक नाग तो हा पाहा. जसा कांहीं श्वेत कैलास पर्वतच असें

ज्यानें दिव्यशुभ्र शरीर दिव्याभरणांनीं भूषित केलें आहे. सहस्त्र ज्याच्या फणा, जाज्वल्यमान जिव्हा ज्याचे मुखांत सुशोभित दिसत आहे. हा शेष भोग बलवान आहे. सुरसानामक कश्यपाची भार्या इचे हे पुत्र नानाप्रकारच्या जातीचे या लोकीं राहातात. मणि, स्वस्तिक आणि चक्र यांचीं चिन्हें कांहीं भागांस आहेत. कांहीं कमंडलूसारख्या आकृतींचे स्वभावानें महाभयंकर असे आहेत. याजमुळें त्यांची गणना करणें अशक्य. परंतु त्यांतील कांहीं मुख्य नाग आहेत त्यांचीं नांवें सांगतों. वासुकी, तक्षक, कर्कोटक, धनंजय, कालिय, नहुष, कंबल, अश्वतर इत्यादिक बहुत आहेत. हे मातले या नागांतून तुझ्या कन्येस योग्य वर असेल तो पाहा. कण्व भाषण करतात हे दुर्योधना, असें नारदाचें भाषण ऐकून मातली सर्पसमुदायाकडे पाहून परमप्रीतीनें बोलतो हे नारदा, हा माझ्या अग्रभागीं स्थित आहे. हा फार चांगला कांतिमान दर्शनीय दिसतो. हा कोणाचा पुत्र. याच्या पित्याचें नांव काय? कोणाच्या वंशांत हा उत्पन्न झाला आहे. याची नम्रता, धैर्य, रूप व वय उत्तम आहे. यास्तव हा माझे मनांत गुणकेशीचा पति होण्यास योग्य दिसतो असें ऐकून नारद भाषण करतो. हे मातले, या नागाचें नांव सुमुख याचें माहात्म्य आणि जन्मकर्म तुला सांगतों श्रवण कर. हा सुमुखनामक नाग राज ऐरावत कुलांत उत्पन्न झाला. आर्यकनामक नागाचा पौत्र व वामननामक नागाचा दौहित्र याच्या पित्याचें नांव चिकुर त्यास गरुडानें भक्षण केल्यास फार दिवस झाले नाहींत. असें ऐकून मातली भाषण करतो हे नारदा, हा सुमुखनामक नाग माझे कन्येस वर योग्य आहे. याविषयीं यत्न करावा. मीत्यास आपली कन्या देण्यास फार उत्कंठित आहें. असा विष० या अ० आहे.

१०४. अध्याय एकशें चार:— नारद भाषण करतो हे आर्यका, हा मातली नामक शक्रसारथी हा इंद्राचा अत्यंत सुहृद आहे, ह्मणून इंद्र याजवर फार प्रीति करतो. हा स्वतः शुची, गुणी, तेजस्वी, वीर्यवान व बलि असा आहे. सहस्त्र अश्वयुक्त जो इंद्राचा रथ त्याचें नियमन मातली आपले मनानेंच करतो. यांच्याच सहाय्येंकरून इंद्रानें देवासुर संग्रामीं बहुत दानव पराजित केले. असा परमश्रेष्ठ मातली याची एक कन्या शील व गुणांनीं युक्त, रूप-

अत्यंत सुंदर, सकळ स्त्रियांमध्यें श्रेष्ठ आहे, व गुणकेशी या नामेंकरून वि-
ख्यात आहे. ती कन्या तुझा पौत्र जो सुमुख यास देण्याची मातलीची इच्छा
आहे. यास्तव हे भुजगोत्तमा, जर तुला रुचत असेल तर हा कन्यापरिग्रह शी-
घ्र करावा. असें मला वाटतें. असें नारदाचें भाषण ऐकून आर्यक बोलतो हे
नारदा, मातली इंद्राचा सखा आहे. यास्तव त्याच्याशीं संबंध करावा हें
आह्मांस फार इष्ट आहे. आह्मी दुर्लभ आहों. यास्तव मोठ्याशी संबंध करा-
वा अशी मनांतून इच्छा खरी, परंतु काय करूं. माझा पुत्र गरुडानें भक्षण
केला. तेणेंकरून मी बहुत दुःखित आहें. आणि गरुड असें भाषण करून
गेला कीं, एक मासानंतर तुझा पौत्र सुमुख याचेंमी भक्षण करीन. हा माझा
निश्चय तूं सत्य जाण. हें गरुडवाक्य ऐकून माझा हर्ष अगदींच नष्ट झाला. ते-
व्हां या सुमुखास मातलीची कन्या कशी करूं? असें ऐकून मातली भाषण कर-
तो. हे नागराज, तुझ्या पौत्राचा वर मी नामानें बुद्धि केली ती आतां फिरणार ना-
हीं. आतां तुझ्या पौत्रास घेऊन मी व नारद असे उभयतां इंद्राकडे जातों. आ-
णि याच्या आयुष्याच्या वृद्धीचा उपाय करून यास सुपर्णाच्या भयापासून
मुक्त करतों. या सुमुखास आमचे बरोबर इंद्रलोकीं जाण्यास आज्ञा दे. असें
भाषण करून नारद, मातली व सुमुख हे त्रिवर्ग इंद्रलोकीं गेले. आणि इंद्रा-
चें दर्शन करीत आहेत इतक्यांत चतुर्भुज भगवान श्रीविष्णु इंद्रसदनीं आले
तेव्हां नारदानें मातलीचें सकलवर्तमान श्रीविष्णूस सांगितलें तें ऐकून श्री-
विष्णु बोलतात हे इंद्रा, या नागास अमृत देऊन अमर करा. ह्मणजे मातलीची
कार्यसिद्धि होईल. असें विष्णूचें भाषण ऐकून इंद्र गरुडाच्या पराक्रमाचें चिंत-
न करून बोलतो. हे देवा तुह्मीच यास अमृत देऊन अमर करा. असें ऐकून श्री-
विष्णु भाषण करतात हे इंद्रा, सकल चराचर लोकांचा तूं ईश आहेस. तूं जें
करशील त्याचे विरुद्ध करण्यास कोण समर्थ आहे? असें ऐकून इंद्रानें नाग
राजास अमृत न देतां तूं चिरायुष आहेस असा आशिर्वाद दिल्हा. तेव्हां मात-
ली सुमुखास घेऊन आपले गृहीं गेला व त्यानें आपली कन्या गुणकेशी त्या-
स देऊन उत्तम प्रकारें लग्नाचा समारंभ केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०५. अध्याय एकशेंपांच:— कण्व भाषण करतात हे दुर्योधना, सुमुख

नागास इंद्रानें आयुष्य दिलें. हें ऐकतांच गरुड परम क्रुध्द होऊन इंद्राच्या अ ग्रभागीं आला, आणि प्रार्थना करूं लागला हे भगवान, माझी वृत्ति तुह्मीं कां नष्ट केली? यथेच्छ वरदान तुह्मींच देऊन पुनः नष्ट करणें हें काय? सर्व भूतेश्वर जो ब्रह्मदेव यानें हा आहार मला नियमित करून दिला. असतां तुह्मीं त्याचें नि वारण कां केलेंत. या नागाविषयीं मी एक मासाचा नियम करून ठेविला होता. याशिवाय दुसरा नाग हिंसिन करणार नाहीं. असा मी निश्चय केला असून तु ह्मीं त्या नियमाची हानि केलीत. हे देवराज तुह्मींच मला आज्ञा दिल्हीत त्याज वरून मी यथेच्छ नाग भक्षण करून सुख पावतों. तो हा आज मी नष्टवृत्ति झालों. यास्तव मी तुमच्या अग्रभागीं प्राणाचें मोक्षण करीन. माझा इतर परिवा र आहे तोही तुमच्या सन्निध येऊन प्राण त्याग करील. असें ऐकून सुमुख नाग तत्काळ दुर्मुख झाला आणि त्याचें पहिलें रूप नष्ट होऊन दुसरेंच उत्पन्न झालें असतां तो विष्णुलोकीं गेला. आणि काष्ठासनाचा आश्रय धरून भगवंताच्या अग्र भागीं राहिला. इकडे गरुडाचें भाषण ऐकून इंद्र बोलतो. हे वैनतेय, मजवर इ तका क्रोध करण्यास तूं योग्य नाहींस. सुमुख नागास विष्णूनें अभय दिलें, मीं दिलें नाहीं. असें ऐकून विनता पुत्र भाषण करतो. हे इंद्रा, तुमच्या भाषणा चे अभिप्राय मीं जाणले. अरे मला त्रैलोक्याचें ईश्वरत्व करण्याचें सामर्थ्य आ हे. परंतु काय करूं दुसऱ्याचा भृत्य झालों. हे देवेशा इंद्रा, तूंच हें कृत्य केलेंस. विष्णु या कृत्यास कारण नाहीं. त्रैलोक्याचे राज्याचा भार तुझ्यावर निरंतर स्थापित आहे. परंतु मी कोणी एक क्षुद्र आहें असें समजूं नको. दक्ष प्रजापती चीजी कन्या ती माझी माता. कश्यप ऋषि माझा पिता स्वतः हा मी ही सकल लोकांस ओढून एकटा नेण्यास समर्थ आहें. माझें बल सकल भूतांस असह्य आहे. मीही मोठमोठीं कर्में केलीं आहेत. श्रुतसेन, विवस्वान इत्यादि दैत्यां चा वध मीच केला आहे. आणि विष्णूच्या ध्वजस्तंभीं राहून सकलांस विदित झालों आहें. माझ्यासारखा भार सहन करणारा दुसरा कोण आहे? बरें मीं आपला जर एक पक्ष कंपित केला, तर सकल सागर क्षोभ पावतील. बंधूंसह वर्तमान श्रीकृष्णास मीच आपले स्कंधावर निरंतर वाहातों, तो हा मी गरुड मा झी वृत्ति तुह्मीं नष्ट केली. तेणेंकरून आजपर्यंत माझें लोकांत गौरव होतें तें

आतां नष्ट झाले. कण्वऋषि भाषण करतात हे दुर्योधना, इंद्राच्या अग्रभागीं गरुडानें भाषण केलेलें समजतांच विष्णू स्वतः इंद्रभवनीं येऊन बोलले. हे तार्क्ष्य तूं आपल्यास बलाढ्य ह्मणवितोस काय? हे अंडजा माझ्येसमक्ष तुझें आत्मस्तवन पुरे. अरे माझें धारण करण्यास त्रैलोक्यही समर्थ नाहीं त्यामला तूं धारण करतोस कीं काय? बरें पाहूं, हा माझा सव्यबाहु आहे याचाभार सहन कर बरें. जर हा माझा एकच बाहु धारण करशील तर तुझा विक्रम सफळ आहे. असें मी समजेन. असें भाषण करून भगवंतांनीं आपला सव्य बाहु गरुडाचे खांद्यावर ठेवितांच गरुड भारानें क्रांत होऊन निचेष्ट पडला. त्या काळीं गरुडास असें वाटलें कीं, पर्वतांसहवर्तमान पृथ्वीचा जितका भार आहे तितका भारश्रीकृष्णाच्या एका भुजेमध्यें आहे. अशा बलवत पुरुषाचा कोण भार सहन करण्यास समर्थ आहे? असें भाषण करून गरुडानें श्रीविष्णूस साष्टांग नमस्कार केला. आणि भाषण केलें कीं, हे भगवान सर्वभूतांचेसारभूत अशा तुझ्या शरीरसंबंधीं भुजभारानें मी अगदी चूर्णीभूत झालों. आतां माझ्या भाषणाची क्षमा कर. मी अल्पचेतस आहें. आतां विदग्धपक्ष झालेलामी तुझ्या ध्वजावर वास करूं कीं काय? देवा मला किमपी ज्ञान नाहीं. मी असें मानिलें कीं, माझ्यासमान बलवान कोणी नाहीं. इतकें गरुडाचें भाषण ऐकून भगवानांनीं पूर्ववत्प्रमाणें गरुडाशीं स्नेह केला. आणि आपल्या पादांगुष्ठानें सुमुखनामक नागास गरुडाचे आंगावर टाकिला असतां तो गरुडानें परम प्रीतीनें धारण केला. त्या दिवसापासून गरुड आपले शिरावर सर्प धारण करूं लागला. या प्रकारें गरुडाचा गर्वनाश श्रीकृष्ण कृपेनें झाल्यावर उभयतांही आपले स्वस्थानीं गेले. कण्व भाषण करतात हे गांधारे, जो काळ पर्यंत रणामध्यें पांडुपुत्रांच्या अग्रभागीं तूं गेला नाहींस तावत्कालपर्यंत जिवंत आहेस. सकल प्रहार करणारांमध्यें श्रेष्ठ महाबलि जो वायुपुत्र भीमसेन, तसाच इंद्रसुत जो धनंजय या उभयतांस रणांमध्यें कोण हनन करण्यास समर्थ होईल बरें? वायु, शक्र, धर्म आणि अश्विनीकुमार यांचें स्वरूप विष्णू धारण करतात. ते देवच त्यांचें दर्शन करण्यास कोण समर्थ होईल. यांस्तव हे पुत्रा, पांडवांशीं स्नेह कर. अरे वासुदेवनामक तीर्थामध्यें आपलें कुल रक्षण

कर. अरे हा नारदऋषि तसाच जगदीश्वर गदाधर तोही येथेंच बसला आहे. अ-
सें कण्वऋषीचें भाषण ऐकून दुर्योधन श्वासोश्वास टाकीत राधेयास पाहात क-
ण्वऋषीचें भाषण तुच्छ करून गजाकार ऊरूचें ताडण करीत बोलतो. हे ऋषे म-
ईश्वरानें उत्पन्न केलें आहे. जसें भावी होणार तशी मति प्राप्त होऊन मी तसा वर्त-
णार. तुह्मी व्यर्थ कां प्रलाप करतां असा विषय या अध्यायांत आहे.

१०६. अध्याय एकशें साहा:— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे दुर्योधन कुमार्गस्त झाला असतां स्नेही, बांधव, भगवान, व्यास अथवा भीष्मा-दिक यांनीं त्याचें निवारण कां केलें नाहीं? असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांग-तात हे राजा, श्रीकृष्ण, व्यास व भीष्माचार्य यांनीं बहुत प्रकारें दुर्योधनास बोध केला. परंतु त्यानें तो श्रवण केला नाहीं. तसाच नारदांनीं कथारूपानें त्यास बोध केला तो सांगतों. सकल सभासद कौरव सभेंत बसले असतां नारद बोलले हे दुर्योधना, प्रत्युपकाराची अनपेक्षा करून उपकार कर्ता दु-र्लभ आहे. तसेंच सुहृदाचें भाषण श्रवण करताही दुर्लभ आहे. जसा सु-हृद उपयोगीं पडतो तसा बंधूही उपयोगीं पडत नाहीं. माझ्यासारखा निष्प-क्षपाती तुला सुहृद प्राप्त होणें कठीण आहे. मी सांगतों हें श्रवण कर. तूंही सुहृदांस हर्षदायक आहेस. अरे दुर्योधना, अत्यंत आग्रह करूं न-ये. अत्यंत आग्रहापासून नाश होतो. अत्यंत आग्रह करणें हें परम भयं-कर कर्म होय. या विषयीं तुला एक गालवऋषीचा पुरातन इतिहास सांग-तों. कोणे एके काळीं विश्वामित्र ऋषि तप करीत असतां त्यांची परीक्षा पा-हावी ह्मणून साक्षात् यमधर्म वसिष्ठाचें रूप धारण करून कौशिकास ह्मण-तात. हे राजऋषे, मी क्षुधित आहें असें ऐकून विश्वामित्रांनीं चरु पचन करण्यास आरंभ केला. इतक्यांत यमधर्म अदृश्य होऊन त्यानें दुसरे बहुत तपस्वी होते त्यांचे घरीं भोजन केलें. हें समजतांच विश्वामित्रानें सिध्द केलेलें ऊष्णान्न वसिष्ठाचे सन्निध नेलें. तें पाहून वसिष्ठ भाषण क-रतो हे राजर्षे, मी भोजन केलें परंतु मी येईपर्यंत उभा राहा. असें बोलू-न वसिष्ठ गेले असतां विश्वामित्र त्याची मार्गप्रतीक्षा करीत दोन हस्तां-नीं मस्तकावर अन्न धारण करून निचेष्ट उभा राहिला. हें पाहतांच गालव

नामक ऋषि आपले गुरूचें प्रिय करावें म्हणून सेवा करीत असतां त्यांचींशं-
भर वर्षें पूर्ण झालीं. विश्वामित्र आपले शिरावर ओदन घेऊन शत वर्षें उभा-
च आहे असें जाणून धर्मराज पुनः वसिष्ठाचें रूप घेऊन आला आणि वि-
श्वामित्रास पाहून बोलला. हे महर्षे, वायुभक्षण करून तूं शत वर्षें उभ्यानें
अतिक्रांत केलीस. तूं धीमान आहेस. काय तुझें तप सांगावें! असें भाषण क-
रून धर्मानें अन्न भक्षण केलें. आणि विश्वामित्रास आशीर्वाद दिल्हा कीं,
हे विप्रऋषे, तूं क्षात्रभावापासून नष्ट होऊन ब्राह्मणत्व भाव पावलास. कां-
हीं चिंता करूं नको. असें ऐकून विश्वामित्रास बहुत आनंद झाला. नंतर
विश्वामित्रानें आपला शिष्य जो गालव याची शुश्रूषा व भक्ति पाहून भा-
षण केलें हे गालवा, तुझ्या भक्तीनें मी फार संतुष्ट झालों. तूं आतां स्वरें
नैव आपले गृहीं जा. असें ऐकून मधुर वाणीनें गालव भाषण करतो हे ऋषे,
मी तुझा शिष्य आहें. मी ही जी गुरुभक्ति शतवर्षेंपर्यंत केली तिची गुरुद-
क्षिणा काय मी आपणास देऊं. दक्षणा दिल्ही असतां केलेलें कर्म सांग हो-
ऊन त्यास मोक्षप्राप्त होतो. असें ऐकून विश्वामित्रांनीं त्यास सांगितलें कीं,
हे गालवा, दक्षणेची गोष्ट बोलूं नको. तूं येथून लौकर स्वस्थानीं जा. असें
ऐकून गालव बोलतो. हे गुरो, काय मी गुरुदक्षणा देऊं. या प्रकारें गालवाचा
आग्रह पाहून विश्वामित्र क्रोधानें बोलले. शिष्या, जर तुझी दक्षणा देण्या-
ची मर्जी असेल तर एक कर्ण ज्याचा श्यामवर्ण आणि चंद्रासारखी कांति
ज्यांची असे हय आठशें मला दे. असा विषय या अध्यायांत आहे.

१०७. अध्याय एकशेंसात:— नारद सांगतात हे दुर्योधना, विश्वामि-
त्रानें गालवापाशीं गुरुदक्षिणा मागितल्यावर गालवास मोठें संकट प्राप्त झा-
लें असतां तेणेंकरून त्याचे आहार विहार नष्ट झाले यामुळें अस्थि त्वचामा-
त्र राहिली. तो मनांत म्हणे, माझे मित्र कोठें असतील? हे आठशें अश्व आतां
मला कोठें मिळतील? आतां अशी इच्छा उत्पन्न झाली आहे कीं, समुद्रा-
च्या पर तीरीं जाऊन देहाचें विसर्जन करावें. जिवंत राहून काय फल आहे?
हें मी कार्य करीन म्हणून प्रतिज्ञा केली आणि तें कार्य आपणापासून न घड-
लें तर मिथ्या प्रतिज्ञ होऊन मी दोषी होतों, आणि त्यानें इष्टापूर्तादिक जीं पु-

ण्यें केलीं असतील तीं नष्ट होतात. अनृत भाषण करणाऱ्यास रूप नाहीं त्याची संतति वाढत नाहीं. अधनिक आहे तो फार दिवस वांचत नाहीं. त्यास पापी ह्मणतात मग त्याचें कुटुंब कोठून असेल. जो पापी त्याचा विनाश तत्काळ होतो. तो हा मी कृतघ्न, कृपण, पापी आणि अनृतवादी इतके दोष माझ्याकडे आहेत. कृतकार्य जो गुरु यास मी देतों असें ह्मणून असामर्थ्यास्तव देत नाहीं आतां याविषयीं मी बहुत यत्न करतों नाहींतर प्राण त्याग करतों. यज्ञयागादि क्रिया करून पूर्वीं मीं देवतांचा संतोष केला नाहीं. त्या देवता या संकटकाळीं मला कां मानतील? आतां त्रिभुवनेश्वर जो विष्णु तो माझी गतिच आहे? त्यास मणत होऊन दर्शन करण्याची इच्छा करतों. असें गालव भाषण करीत असतां श्रीकृष्णसखा गरुड अकस्मात् गालवाच्या अग्रभागीं येऊन बोलला हे सख्या, तू माझा अत्यंत सुहृद आहेस. तुझ्यावर जो संकरकाल आला असेल तो मला सांग. हे विप्रा मला तुझें संकट हरण करण्याविषयीं सामर्थ्य आहे. ज्या देशांत तुला जाण्याची इच्छा असेल तेथें सत्वर करून मी तुला नेतों. तू विष्णूची प्रार्थना केलीस ह्मणून भगवान् तुझ्यावर प्रसन्न होऊन त्यांनीं तुझ्या कार्याविषयीं माझी योजना केली आहे. हे गालवा काय तुझी इच्छा आहे? कोणत्या देशांत तू जाण्यास इच्छितोस? असा विषय या अध्यायांत आहे.

१०८. अध्याय एकशें आठ.— सुपर्ण भाषण करतो हे गालवा, श्रीकृष्ण भगवानानें मला आज्ञा दिल्ही आहे कीं, तू गालवास साह्य कर. यास्तव कोणते दिशेस गेलें असतां तुझें कार्य होईल, ती दिशा सांग. ह्मणजे जातों. पूर्वदिशेचा महिमा तुला सांगतों ऐक. सर्वलोकांस प्रकाश करणारा सविता प्रातःसंध्यासमयीं उदयास पावतो, ह्मणून या दिशेचें नांव पूर्व दिशा असें आहे. साध्यदेव या दिशेस तप करून कृतकार्य झाले. सकल लोक प्रातःसंध्यासमयीं सकल बुध्दीची वृध्दि होण्याकरितां सवित्याची गायत्री मंत्रजपद्वारा प्रथमतःउपासना करतात. हे द्विजश्रेष्ठ, ही पूर्वदिशा दिवसाचें द्वार आणि पितृलोकाचा मार्ग होय. या पूर्व दिशेस दक्षप्रजापतीच्या कन्या (कश्यपस्त्रिया) प्रसूत झाल्या. ही पूर्व दिशा सकल सुरांच्या श्रीचें मूळ आहे. याच दिशेस पूर्वीं इंद्रास सुरराज्याचा अभिषेक झाला: या कारणास्तव या दिशेस पूर्वदिशा असें ह्मणतात पूर्वीं कां-

हीं एक कर्मास आरंभ कर्तव्य तो या दिशेस करतात. पूर्वी ब्रह्मदेवानें याच दिशेस वेदाध्ययन केलें. ब्रह्मवाद्यांस सावित्री मंत्राचा उपदेश याच दिशेस झाला. याज्ञवल्क्य ऋषींस यजुर्वेदाचें दान सूर्यांनीं याच दिशेस केलें. चंद्रास वरप्रसाद होऊन सूर्यासींसह वर्तमान यज्ञभाग याच दिशेस मिळाला. या दिशेपासून वरुणानें पातालांत प्रवेश करून श्री लब्ध केली. पूर्वी मित्रावरुणांचा यज्ञ याच दिशेस झाला. हा सकल दिशांचा पूर्वभाग आहे, यास्तव या दिशेस पूर्वी जाण्याचा विचार करतोस कीं काय? जेणेंकरून तुझें प्रिय होईल तें मी करणार. हे गालव ऋषे, या दिशेस प्रथम जाऊं, अथवा दुसरे कोणचे दिशेस जाऊं तें मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१०९. अध्याय एकशेंनऊ :— सुपर्ण भाषण करतो हे द्विजा, या दक्षिण दिशेस पूर्वी सूर्यानें याग करून आपला गुरू जो कश्यप यास ही दिशा गुरुदक्षिणा दिल्ही, ह्मणून या दिशेस दक्षिण दिशा असें नांव प्राप्त झालें. ऊष्णान्न भोजन करणारे जे पितर संज्ञक देव ते या दिशेस राहातात. सकल लोकांना पितृपक्ष याच दिशेस प्रतिष्ठित आहे. विश्वेदेव पितरांसह वर्तमान याच दिशेस राहून यज्ञयागादिकांमध्यें हविर्भाग पावले. हे द्विजा, हें धर्माचें द्वार आहे असें ह्मणतात. धर्म, सत्य आणि कर्म यांचें हें स्थान आहे. कर्मी लोकांस हीच दिशा गतिप्रद आहे. हे द्विजश्रेष्ठा याच दिशेस मरण पावलेले जन येतात. असंख्यात राक्षस लोकांस प्रतिकूळ करणारे याच दिशेस उत्पन्न झाले. याच दिशेस मंदराचलवनाचे ठायीं अथवा विप्रसदनाचे ठायीं चित्तबुध्दीस हरण करणारीं अशीं गायनें गंधर्व करतात. या दिशेस रैवत नामक राजा सामगीत ऐकून वनांत गेला. याच दिशेस रावणानें तप करून देवांपासून अमरत्व प्राप्त केलें. हे गालवा, याच दिशेस पूर्वी मीं स्कंधचे शांत्यर्थ इकडे तिकडे पाहात होतों. इतक्यांत गज आणि कच्छ हे उभयतां युध्द करीत होते. ते दृष्टीस पडतांच मीं भक्षण केले. या दिशेस चक्रधनुनामक ऋषि सूर्यापासून उत्पन्न झाला. त्यालाच कोणी कपिल महामुनी असें ह्मणतात. त्यानें सगराचे भयार्त झालेले पुत्र नष्ट केले. वासुकी नागानें रक्षित भोगावती नामें पुरी याच दिशेस आहे. याच पुरींत तक्षक व इतर नाग समुदायांसह वर्तमान राहातात. हे गालवा,

याप्रकारें दक्षिण दिशेचा महिमा तुला सांगितला, या दिशेस तुला जाणें अ त्यास सांग, ह्मणजे जातों नाहींतर पश्चिम दिशेस जातों. असा विषय या०

११०. अध्याय एकशें दाहा:— सुपर्ण भाषण करतो हे गालवा, वरुणें पालिन ही पश्चिमदिशा होय. सलीलराज वरुण या दिशेस राहातात. थें सूर्य अस्तकालसमयीं प्राप्त होऊन आपले किरणांचें विसर्जन करतो. ही दिशा परम विख्यात आहे. कश्यप ऋषींनीं जलाचें रक्षण होण्याकरितां कुल उदकस्थ जिवजंतूचें आधिपत्य वरुणास दिलें. याचस्थळीं वरुणानें रक्षित षड्रसांचें पान करून चंद्रशुक्लपक्षी तमाचा नाश करीत तरुण होतें दैत्य दुःखीत होऊन श्वासोश्वास टाकीत निद्रा करीत आहेत. अस्ताचल दिशेस आहे, दितीनामक देवी कश्यपस्त्री गर्भिणी असतां निद्रिस्त झाली त्यावळीं तीस इंद्रानें विगर्भा केल्यानंतर तिजपासून मरुद्गण उत्पन्न झाले. अमृतमंथनकाळीं मंदराचल समुद्रामध्यें निमग्न झाला होता तो येथें उद्धार पावला हिमवान पर्वताचें हें मूळ होय. सहस्रावधिवर्षेंपर्यंत या मुळाचा शोध केला असतां अंत लागत नाहीं. एथें समुद्रासारखें एक सरोवर आहे. त्याचा अंत नाहीं. त्यामध्यें कांचनमयवर्णाचीं कमलें आहेत. आणि सन्निधभागींच एक कांचनमय शृंगयुक्त शैल आहे. तेथें सुरभी नामें धेनु राहाते. तिजपासून निरंतर पयाचा श्राव होतो. या पश्चिम दिशेस समुद्रामध्यें राहूचें कबंध सूर्यप्रभेसारखें निरंतर दिसतें. हा राहु सूर्य आणि चंद्र यांचा ग्रास करतो. एथेंच पन्नगराज जो अनंत शेष याचें निवेशस्थान आहे. तसेंच आदिअंतरहित विष्णू, वायु, महर्षि, कश्यप आणि मरीची यांचीं निवासस्थानें आहेत हे द्विजसत्तमा, पश्चिममार्ग संक्षेपानें तुला सांगितला. आतां कोठें जाण्याचा विचार करूं तें सांग. असाविषय या अध्यायांत आहे.

१११. अध्याय एकशें अकरा:— सुपर्ण भाषण करतो हे गालवा, आतां उत्तर दिशेचा वृत्तांत सांगतों. कल्याणेच्छु पुरुषांस पापापासून ही दिशा तारते. ह्मणून या दिशेचें नांव उत्तर असें विख्यात झालें. या दिशेस हिरण्याचीं स्थळें बहुत आहेत. पूर्व आणि पश्चिम यांचेमध्यें हा स्वर्ग मार्ग उत्तरदिशा आहे. सकलदिशांमध्यें ही दिशा वरिष्ठ आहे. यास्तव क्रूरकर्मी ज्यांनीं

आपला आत्मा जिंकिला नाहीं ते अधर्मी लोक या दिशेस राहात नाहींत. या दिशेसच बदरिकाश्रम आहे. तेथें नरनारायण राहातात. याच दिशेस हिमाचल पर्वत आहे. त्याच्या पृष्ठभागीं महेश्वर सांब राहातात. परंतु ही मूर्ति नरनारायणावांचून अन्याचे दृष्टीस पडत नाहीं. सकल विप्रांचा राज्याभिषेक चंद्रास याच दिशेस झाला. याच दिशेस शंकरांनीं आपले मस्तकावर गंगा धारण केली. महेश्वराचा शोध लागण्याकरितां पार्वतीनें याच हिमाचलपर्वतीं तप केलें. याच दिशेस सर्व राक्षस, यक्ष, गंधर्व यांच्या आधिपत्याविषयीं कुबेरास अभिषेक केला. चित्ररथनामें रम्य वन, वैखानस ऋषींचा आश्रम, मंदाकिनी नदी, मंदराचल, पिशाच्यांनीं संरक्षित सौगंधिकवन हीं सकल याच दिशेस आहेत. विद्युत्प्रभानामें दाहा अप्सरा या कैलासपर्वतीं आहेत. हे ब्राह्मणा, त्या स्थळीं विष्णूचें पद आहे. उशीरबीजनामें एक स्थान आहे तेथें मरुतनामक राजानें भोग यज्ञ केला. तेथें जांबुनद ह्मणून परम विख्यात सरोवर आहे. त्यास्थळीं जीमुतनामक ऋषि वास करतात. त्यांच्या सन्निधभागीं कनकाकर ह्मणून एक स्थान आहे त्या स्थानीं जिमूत ऋषीस बहुत द्रव्य प्राप्त झालें. त्या दिवसापासून त्या धनाचें नांव जीमूतधन असें प्रख्यात झालें. यास्थळीं रात्रंदिवस दिक्पाल प्राप्त होऊन असा आक्रोश करतात कीं. कोणाचें कार्य काय असेल तें आह्मांस सांगावें. सर्व कर्म करण्यास ही दिशा प्रशस्त आहे. हे तात चारी दिशांचें स्वरूप सांगितलें. तेव्हां आतां कोणत्या दिशेस तुझी जाण्याची इच्छा आहे तें सांग. सकल पृथ्वी तुला दाखवितों. माझ्यावर आरोहण करून गमनाचा विचार कर. असा विषय या अध्यायांत आहे.

११२. अध्याय एकशें बारा:— गालव ऋषि भाषण करतो. हे सुपर्णा, ज्या दिशेस धर्म चक्षु ह्मणजे अग्निषोम आहेत त्या पूर्वदिशेस प्रथम मी जाण्यास इच्छितो. त्या दिशेस बहुत देवता आहेत. ह्मणून पूर्वीं तूं सांगितलेंस त्यापेक्षां मी तेथें गेलों असतां त्यांचें दर्शन तरी होईल. सत्य धर्म इत्यादिक तेथें राहातात, ह्मणून तूं सांगितलेंस तस्मात् त्याच दिशेस जावें. अशी मनीषा आहे. हे गरुडा, सुरांचें दर्शन व्हावें अशी इच्छा आहे यास्तव पूर्वदिशेसच चलावें. असें ऐकून गरुड भाषण करतो हे ब्राह्मणा; फार

चांगलें आहे. माझे स्कंधावर आरोहण कर. मी तुला पूर्वदिशेस घेऊन जातों असें ऐकून गालव गरुडाचे स्कंधावर बसतां व गरुडानें तत्काळ पूर्वदिशेस उड्डाण केलें. त्या काळीं मार्गांत गालव भाषण करतो. हे गरुडा, पूर्वाण्हकाळीं, सूर्याचें रूप जसें दिसतें तसें तुझें रूप मला दिसतें. आपल्या पक्षवातानें तूं समुद्र वलयांकित पृथ्वीचें आकर्षण करतोस असें वाटतें. हे गरुडा, समुद्राच्या भयंकर शब्दानें माझे कर्ण बधिर झाले. तेणेंकरून मला कांहीं ऐकूं येत नाहीं. व पुढें काय आहे तेंही दिसत नाहीं. याचें कारण मी जाणत नाहीं। आतां आपली गति मंद मंद कर नाहींतर तुलाच ब्रह्महत्या होईल. हे गरुडा, मला आतां सूर्य, दिशा, आकाश हीं दिसत नाहींत. पदोपदीं तुझ्या शरिरांतून अग्नि उत्पन्न झाल्यासारखा दिसतो. यास्तव हे गरुडा, आतां आपला वेग लघु करा ह्मणजे माझे नेत्र थोडेसे शम पावतील. अरे इतक्या वेगानें जाण्याचें माझें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. हे महाभागा, तूं आतां येथूनच माघारा फीर. पुढें जाण्याचें कारण नाहीं. गुरुदक्षणेकरितां एककर्ण शामवर्ण असून चंद्रासारखा शभ्रवर्ण असे आठशें अश्व देण्याचें मी कबूल केलें खरें. परंतु जर मी आतां तुझ्या वेगापुढें जिवंत राहीन तर आठशें अश्व गुरूस दक्षणा देईन. मी आतां जिवंत राहात नाहीं. पुढें मार्ग मला दिसतच नाहीं. बरें आतां कांहीं मजपाशीं धन असावें तेंही नाहीं. मित्रापाशीं धन असावें तोही अर्थ दिसत नाहीं. जेणेंकरून मी आपली विपत्ति दूर करीन असा उपाय मजपाशीं कांहींच नाहीं. याप्रकारें गालवास बहुत खेद झाला असतां गरुड भाषण करतो. हे गालवा, अशीं नाना प्रकारचीं दीन भाषणें कां करतोस? तूं प्रज्ञावान नाहींस असें मला वाटतें. अरे आत्म्याचा त्याग करण्यास तूं उद्युक्त झालास. तुला असें वाटलें आहे कीं, मृत्यु ह्मणजे आपले हातीं आहे तर असें समजूं नको. काल ह्मणजे मृत्यु, तोच काल ह्मणजे परमेश्वर असें विबुध ह्मणतात. जर तुझे मनांत येण्याचें नव्हतें, तर पूर्वींच मला कां सुचविलें नाहीं. बरें आतां त्या ऋषभनामक पर्वतावर विसावा घेऊं. आणि भोजन करून जाऊं. अ॰ १॰ या॰ आ॰

११३. अध्याय एकशें तेरा:— नारद भाषण करतात हे दुर्योधना, ऋषभ नामक पर्वताचे शृंगावर गरुड आणि गालव हे उभयतां उतरले.—

इतक्यांत त्या पर्वतावर राहाणारी शांडिली नामक ब्राह्मणी तप करीत बसली होती. तिची उभयतांनीं पूजा करून नमस्कार केला असतां शांडिलीनें उभयतांस कुशलप्रश्न करून आसनावर बसविलें. आणि मंत्रानें सत्कृत केलेलीं अन्नें त्यांस भक्षणास देऊन तृप्त केल्यावर कांहीं कालपर्यंत गालव आणि गरुड यांनीं शयन केलें. एक मुहूर्त झाल्यावर गरुड जागृत होऊन आपले शरीराकडे पाहातो तों सकल पक्ष विछिन्न होऊन मांसपिंडासारखा गोळा झालेला त्यानें पाहिला. ती गरुडाची अशी अवस्था पाहून गालव प्रश्न करतो हे गरुडा, या स्थळांत तुझी अशी अवस्था झाली तस्मात् या स्थलांतच असा कांहीं गुण आहे किंवा कसें? या स्थळावर तरी आपलें किती दिवस वास्तव्य होणार? आपण निघालों त्या समयाचेंच असें फल आहे कीं काय? हे गरुडा, मला असें वाटतें कीं, तुझे मनांत कांहींतरी धर्मदूषित करण्याची शंका आल्यामुळें अशी तुझी अवस्था झाली. असें ऐकून सुपर्ण भाषण करतो. हे विप्रा, कांहीं एक माझे मनांत वैपरीत्य आलें तें सांगतों. ही शांडिली नामक तपस्विनी या ऋषभपर्वतावर व्यर्थ राहाते. इणें प्रजापति, महादेव, विष्णु अथवा धर्म हे ज्या स्थळीं राहातात त्या स्थळीं वास करावा असा मी मनांमध्यें विचार आणिला होता. परंतु आतां मी इची प्रार्थना करतों. असें गालवास बोलून नंतर तपस्वीनीस भाषण करतो. हे ब्राह्मणी, कांहीं एक वैपरीत्य माझे मनांत आलें होतें त्या अपराधाच्या योगें ही माझी अशी अवस्था झाली. हें मी जाणिलें. आतां हें माझें कर्म सुकृत असो. अथवा दुष्कृत असो तूं क्षमा करण्यास समर्थ आहेस. असें ऐकून ब्राह्मणी भाषण करते. हे गरुडा, भिऊं नको. मजपासून तुझें अहित व्हावयाचें नाहीं. संभ्रमाचा त्याग कर. तूं माझी निंदा केलीस त्याची मी आतां क्षमाच करतें. जे पापी माझी निंदा करतात ते या लोकापासून भ्रष्ट होतात. सर्वलक्षणांनीं मी हीन आहें ह्मणून लोक माझी थट्टा करतात. परंतु कोणी माझे आचरणावर लक्ष्य देत नाहीं. आचारें करून ही उत्तम सिद्धि मला प्राप्त झाली. तस्मात् ज्याचा आचार शुध्द तो उत्तम, आणि आचार हीन असून रूपवान् मात्र आहे त्यास श्रेष्ठ ह्मणूं नये. हे खगपते, माझी निंदा कर-

ण्यास तू योग्य नाहींस. मी निंद्यपात्र स्त्री नव्हे. अस्तु तुझ्या अपराधाची क्षमा केली. जसें तुझें पूर्वरूप व बल होतें त्यापेक्षां ज्यास्त प्राप्त होईल. आतां तू येथून जा असें ऐकून गरुड गालवासह वर्तमान गेला. या स्थळीं गालवास इच्छितार्थ मिळालें नाहींत हें समजतांच विश्वामित्र मार्गामध्यें गालवास बोलतो कीं, तू आपण होऊनच मला अश्व गुरुदक्षणा देण्याची प्रतिज्ञा केलीस त्यास किती दिवसांचा विलंब आहे तो सांग. जर तू अश्व दिले नाहींस तर मोक्षप्राप्तीचा हाच समय आहे. अस्तु तुला अश्वप्राप्ति होईपर्यंत तुझी मार्गप्रतीक्षा करीत येथेंच बसतों. असें ऐकून सुपर्ण बोलतो. हे गालवा, मुनीश्रेष्ठ समक्ष तुला हें विश्वामित्रानीं भाषण केलें त्यायोगें तुला फार दुःख झालें असेल. अस्तु तुला गुरुदक्षिणा दिल्यावांचून कृतार्थता नाहीं. बरें गुरुदक्षिणा संपादन करण्याविषयीं यत्न केला पाहिजे. स्तब्ध बसून कांहीं उपयोग नाहीं. ज्या काळीं तुला अश्व प्राप्त होतील त्याच वेळेस तू आपला गुरु जो विश्वामित्र याचें दर्शन घ्यावें असें मला वाटतें. असा विषय या अध्यायांत आहे.

११४. अध्याय एकशें चौदा:— नारद भाषण करतात हे दुर्योधना, पुनः सुपर्ण गालवास बोलतो कीं, अरे या जगतांत द्रव्यास मोठेपणा आहे त्या द्रव्यास हिरण्य असें म्हटलेलें आहे. हें सकल जीवांस आधारभूत होऊन पोषण करतें. हें धन तीन लोकांत विख्यात आहे. सकल लोक धनाची इच्छा करितात यावांचून कोणाचेंही चालत नाहीं. शुक्रवारीं पूर्वाभाद्रपदा अथवा उत्तराभाद्रपदा नक्षत्र आलें असतां अग्नि व कुबेर यांची प्रार्थना करावी. म्हणजे धन प्राप्त होतें. हे द्विजा धन संपादन केल्यावांचून तुला अश्व मिळणार नाहींत, यास्तव तू धन संपादन करण्याचा यत्न कर. मी तुला यत्नाचा मार्ग सांगतों. सोमवंशी ययाती नामक राजा माझा परम मित्र आहे. याजकडे उभयतां जाऊन तुझा सकल वृत्तांत त्यास निवेदन करीन. माझें वचन तो कधींही अमान्य करणार नाहीं. तो कुबेरासारखा धनवान् आहे. असें गरुडाचें भाषण गालवांनीं ऐकून उभयतांही ययाती राजाचे नगराकडे गेले. आणि राजास भेटून विनतापुत्र भाषण करतो हे नहुषपुत्रा, हा गालवनामा ऋषि महा तपोनिधि, माझा परमसखा व विश्वामित्राचा शिष्य होय

त्यानें अयुत वर्षें गुरूची शुश्रुषा केली. तेणेंकरून गुरु परम संतुष्ट होऊन त्यास आपले गृहीं जाण्याची आज्ञा देत असतां यानें गुरुदक्षणा देण्याचा आग्रह धरिला. तेव्हां विश्वामित्रास परम कोप येऊन त्यानें शिष्याचें सामर्थ्य नजाणतां एकच कर्ण शामवर्ण चंद्रासारखे शुभ्र असे आठशें हय मागितले. तेव्हां गालवास मोठें संकट प्राप्त झाल्यामुळें हा तुला शरणागत येऊन याञ्चा करीत आहे. तर या गालवाची तूं इच्छा पूर्ण करून यास दुःखरहित कर. हा गालव ऋषि गुरुदक्षिणेपासून मुक्त झाल्यानंतर जें तप करील त्याचा अर्ध विभाग राजा तुला देईल. तेणेंकरून तूंही लक्ष्मी चिरकाल भोगशील. आणि अश्वाचे आंगावर जितके रोम आहेत तितके वर्षेंपर्यंत वाजी लोकांमध्यें जाऊन सुखानें वास करशील. हे राजन्, हा गालव नामक ऋषि दान घेण्यास योग्य आहे, आणि तूंही याची इच्छा पूर्ण करण्यास समर्थ आहेस. हे राजा, तुझेठायीं दानकीर्ति अक्षय्य राहील. असा वि० या अध्या० आहे.

११५. अध्याय एकशें पंधा — नारद भाषण करितात हे दुर्योधना, सुपर्णाचें भाषण ऐकून ययाति राजा बोलतो. हे सुपर्णा, तूं माझा अत्यंत सखा ह्मणून माझेकडे आलास. हा गालव ऋषि महातपस्वी, महा कीर्तिमान असून सूर्यवंशोद्भव मोठमोठे कुलीन व आर्य राजे यांचा त्याग करून माझ्याकडे वाजीची भिक्षा मागण्याकरितां आला. ही भिक्षा योग्य आहे. तशांतून आपले तपाचें अर्धें फल मला देण्यास सिध्द आहे. तेव्हां या गालवाचा मनोभंग करूं नये. हे तार्क्ष्या, तुझ्यायोगानें हा ऋषि माझे घरीं आला. तेणेंकरून माझा देश आज तरला. असें मी समजतों. हे सख्या, पूर्वीं मी जसा वित्तवान् होतों तसा आतां नाहीं. परंतु या ऋषीची आशा जेणेंकरून सफल होईल असें मी करण्यास उत्सुक आहें. अरे कोणी याचक आपले घरीं आला असतां तो नष्टाशा होऊन माघारा गेला तर आपलें कुल दग्ध होतें. हे खगा साक्षात् देवकन्येसारखी धर्माचें उल्लंघन न करणारी अशी माझी एक कन्या आहे. देव, मनुष्य, असुर इत्यादिकजींची इच्छा करितात ती कन्या मी गालवास देतों तिला गालवानीं ग्रहण करावी. कोणीतरी एकादा राजा सकल आपलें राज्य देऊन तीस ग्रहण करील, अशी तिची योग्यता आहे. मग

आठशें शामकर्ण वाजी देण्यास काय कठीण आहे. तस्मात् ही माधवी माझी कन्या गालवानें घेऊन त्याचें कार्य झाल्यावर पुनः यानें मला येऊन भेटावें. असें ऐकून गालव ऋषि ती माधवी कन्या घेऊन तेथून निघाला. त्याकाळीं गरुड भाषण करतो हे गालवा, मी जातों असें बोलून गरुड आपले स्वभवनीं गेला. इकडे गालव ऋषि ती कन्या घेऊन अयोध्येचे ठायीं इक्ष्वाकु कुलोद्भव हर्यश्वराजा कोश, धान्य, चतुरंग बल इत्यादिकें करून समृद्ध असून ब्राह्मणांस परमप्रिय व प्रजेस अत्यंत हित कर्ता आहे आणि त्यास प्रजा नाहीं ह्मणून तो प्रजेकरितां अत्यंत तप करीत आहे. तेव्हां त्यास आपली कन्या द्यावी असा निश्चय करून गालव हर्यश्व राजाचे घरीं जाऊन भाषण करतो हे राजेंद्रा, ही माझी माधवी नामक कन्या अत्यंत कुलवर्धिनी आहे. इचें मोल देऊन आपल्यास भार्या कर. इचें मोल काय आहे तें तुला सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

११६. अध्याय एकशेंसोळा:— नारद भाषण करतात हे दुर्योधना, गालव ऋषीचें भाषण ऐकून हर्यश्व राजा बहुत चिंताग्रस्त झाला आणि श्वासोश्वास टाकीत कन्येकडे पाहून भाषण करतो. हे ऋषे, तुझे कन्येचे लक्षणांवरून इचेठायीं जो पुत्र उत्पन्न होईल तो केवळ चक्रवर्ती होईल. असो. फार चांगली गोष्ट आहे. ही तुझी कन्या मी ग्रहण करतों. माझें वैभव पाहून इचें मौल्य सांग. असें ऐकून गालव ऋषि भाषण करतो. हे राजा, चंद्रासारखे तेजस्वी. शुभ्र, एकच शामकर्ण असे अश्व आठशें दिल्हेस तर ही तुझी भार्या होऊन इचेठायीं उत्तम प्रकारचे पुत्र उत्पन्न होतील. नारद भाषण करतात हे दुर्योधना, गालवाचें भाषण ऐकून हर्यश्वराजा काममोहित होऊन भाषण करतो. हे ऋषे, माझेपाशीं दोनशें शामकर्ण वाजि आहेत दुसरेही बहुत अश्व माझ्या अश्वशाळेंत आहेत त्या अश्वांतून पाहिजे तितके अश्व घे, आणि मला ही कन्या दे. मी तुझी ही कन्या भार्यात्वें ग्रहण करून इचेठायीं एक पुत्र उत्पन्न करतों. असें ऐकतांच कन्या बोलत्ये हे गालवा, कोणीएके ब्रह्मवेत्त्या ऋषीनें मला असा वर दिल्हा आहे कीं, ज्या ज्या काळीं तू प्रसूत होशील त्या त्या काळींच पुनः पुनः कन्याच राहाशील. यास्तव

या राजास मला अर्पण करून दोनशें अश्व घे. आणि माझे ठायीं एक पुत्र झाला ह्मणजे पुन: मला यापासून घेऊन दुसरे राजास अर्पण कर, आणि दोनशें अश्व घे याप्रकारें चार राजांस मला अर्पण करून आठशें अश्व संपादन कर. याप्रकारें त्वां केलें असतां गुरुदक्षणेपासून मुक्त होऊन तुझें कार्य होईल अन्यथा होणार नाहीं. असें ऐकून गालवऋषि हर्यश्व राजास बोलतो. हे नरश्रेष्ठा, जर तुजपाशीं आठशें शामकर्ण अश्व नाहींत तर नसोत. ही कन्या घेऊन दोनशें शामकर्ण अश्व मला दे. आणि इचेठायीं एक पुत्र झाला ह्मणजे पुन: ही कन्या माझे हवालीं करावी. असें भाषण करून ती कन्या गालवानें राजास दिल्ही. ती राजानें ग्रहण केल्यावर कांहीं दिवसांनीं त्या कन्येचे ठायीं एक सुंदर उत्तम प्रकारचा पुत्र उत्पन्न झाला. तो मोठा शूर झाला ह्मणून त्याचें नांव वसुमना असें ठेविलें. पुढें वसुमनानें ब्राह्मणांस अतिशय अपार धन देऊन तृप्त केलें. यास कांहीं दिवस गेल्यावर गालवऋषि पुन: येऊन हर्यश्वास ह्मणतात. हे नृपा, भास्करासारखा तेजस्वी असा तुला पुत्र उत्पन्न झाला. आतां दोनशें शामकर्णाश्व माझे देऊन कन्या माझे स्वाधीन कर. असें ऐकून राजानें ती कन्या पुन: गालवाच्या स्वाधीन केली. तेव्हां ती कन्या पुन: कुमारी झाली. नंतर राजानें गालवास सांगितलें कीं, माझे दोनशें अश्व तुजपाशीं असूं दे. पुढें मी घेऊन जाईन असें ह्मणून गालव कन्येस घेऊन दिवोदास राजाचे गृहीं नेता झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

११७. अध्याय एकशेंसतरा :— गालव भाषण करतो हे कन्ये, भीमसेननामक राजाचा पुत्र काशीचा अधिपति मोठा वीर्यवान दिवोदास नामें राजा आहे त्यास तुला अर्पण करतो. नारद सांगतात हे दुर्योधना, असें ह्मणून तो दिवोदासाचे घरीं आला. तेव्हां दिवोदास ऋषीस बोलतो हे गालवा, तुमचा सकल वृत्तांत मला विदित आहे. हा वृत्तांत ज्या काळीं मी श्रवण केला त्या काळींच या कन्येची आकांक्षा केली होती. असो. माझें वैभव पाहून या कन्येचें मोल्य माझेपाशीं माग असें ऐकून ऋषि भाषण करतो. हे राजा, या कन्येचे ठायीं एक पुत्र उत्पन्न करून मला दोनशें अश्व शामकर्ण असे दे, इतकेंच मागणें आहे. अधिक तूं देण्यास समर्थ नाहींस. हे भाषण राजानें अंगीकृत क-

रून तिच्याशीं विवाह केला. नारद सांगतात हे दुर्योधना, माधवीशीं दि- वोदासाचा विवाह झाल्यावर तो रुक्मिणीचेठायीं जसा जनार्दन रममाण हो- तसा माधवीचेठायीं झाला. कांहीं दिवस झाल्यावर माधवीचेठायीं प्रतर्दन नामें एक पुत्र झाला हें गालवास कळतांच तो राजगृहीं आला. तेव्हां राजानें ती कन्या ऋषीचे स्वाधीन केली असतां ऋषि बोलतात. हे राजा, माझे दोन- शामकर्ण अश्व तुझे गृहीं असूं दे. असें ह्मणून ऋषि गेले. असा विषय या ध्यायांत आहे.

११८. अध्याय एकशें अठरा — नारद भाषण करतात हे दुर्योधन माधवी पूर्व गृहीत राजश्रीचा त्याग करून कुमारिका रूपानें जात अस- तां गालवऋषि आतां कोणत्या राजाच्या आश्रमीं जावें. असा विचार क- रीत करीत भोजनगरीं औशीनर राजाकडे जाऊन बोलतो हे नृपते, ही क- न्या तूं ग्रहण कर. इचेठायीं दोन पुत्र उत्पन्न होतील. ते झाले असतां तूं इ- ह लोकीं व परलोकीं सुख पावशील. या कन्येचें मोल्य चंद्रासारखे तेजस्वी शामकर्ण असे अश्व चारशें मला दे. गुरुदक्षणेकरितां अश्व मी घेतों. हे राजा, जर तुला इतके अश्व देण्याची योग्यता असली तर ही कन्या ग्रहण कर. तूं अपुत्रिक आहेस यास्तव या कन्येपासून पुत्र उत्पन्न कर. ह्मणजे पुत्ररूप नौका होऊन तुझे पितर व तूं तरशील. हे राजा, ज्यांस पुत्र नाहीं ते स्वर्गापासून भ्रष्ट होतात. असें ऐकून राजा भाषण करतो हे ऋषे, तुझें स- कल भाषण मी श्रवण केलें. माझाही पुत्राकरितां यत्न आहे. परंतु चारशें अश्व मजपाशीं नाहींत. दोनशें शामकर्ण अश्व आहेत. व दुसरेही सहस्रा वधि अश्व आहेत. मी एक पुत्र या कन्येपासून उत्पन्न करून दोनशें शाम- कर्ण अश्व तुला देतों. मला पुत्र झाला असतां सकल जनपदांचें रक्षण क- रील. इतकीच माझी इच्छा आहे. हे ब्राह्मणा, तुला मोल्य देऊन तुझी क- न्या ग्रहण करून एक पुत्र उत्पन्न केल्यानंतर तुझी कन्या माघारीं देई- न. असें बोलून राजानें ती कन्या ग्रहण केली, आणि गालवऋषीस जा- ण्यास आज्ञा दिली. कांहीं कालानें बालरविसदृश परमविख्यात शिबि या नामेंकरून पुत्र झाला. हें वर्तमान गालवऋषीस समजतांच त्यानें

राजाकडे घेऊन आपली कन्या मागितली आणि दोनशें शामकर्ण अश्व औशीनर राजानें दिल्हे ते पुनः त्याजपाशीं ठेवून मी कन्येस घेऊन जात असतां मार्गांत गरुडाची भेट झाली. असा विषय या अध्यायांत आहे.

११९. अध्याय एकशें एकुणवीस:— नारद सांगतात हे दुर्योधना, मार्गांत गरुडाची व गालवाची भेट झाली असतां गरुड गालवास बोलतो हे द्विजा, तुझा कृत कार्य झालेला दैवेंकरून मी पाहिला फार चांगलें झालें. असें ऐकून गालव भाषण करतो. हे वैनतेया, कार्याचा चतुर्थांश राहिला आहे, असें ऐकून सुपर्ण भाषण करतो हे गालवा, अवशिष्ट कार्याविषयीं तू आतां यत्न करूं नकोस. तुझा यत्न सिध्दीस जाणार नाहीं. याचें कारण तुला सांगतों. पूर्वीं कान्यकुब्ज देशामध्यें गाधी म्हणून एक राजा होता. त्याची कन्या सत्यवती होती तिला ऋचीक नामक ऋषि भार्येकरितां याच्ञा करीत असतां राजानें सांगितलें कीं, चंद्रवर्ण शामकर्ण असे एक सहस्र अश्व मला देशील तर ही कन्या देईन. असें ऐकून ऋषि वरुण गृहीं जाऊन अश्वतीर्थीं स्नान करतांच सहस्र अश्व ऋचिकास मिळाले ते ऋचिकानें गाधिराजास देऊन सत्यवती नामक राजकन्या वरिली. पुढें गाधिराजानें पुंडरीक नामें याग करून ते सहस्र शाम कर्ण अश्व ब्राह्मणास दक्षणा दिल्हे. ते त्या ब्राह्मणापासून हर्यश्व दिवोदास व उशिनर यांनीं प्रत्येकीं दोनशें घेतले. बाकी चारशें वितस्ता नदींत अदृश्य झाले. यास्तव तू आतां त्याविषयीं यत्न करूं नको. तू आतां असें कर कीं, साहाशें शामकर्ण अश्व विश्वामित्रास समर्पण करून ही कन्या दे. आणि सांग कीं, या कन्येपासून तुम्ही एक पुत्र उत्पन्न करा म्हणजे तुम्हांस दोनशें अश्व प्राप्त होतील. याप्रमाणें आपले आठशें अश्व गुरुदक्षणा घेऊन माझी मुक्तता करा. असें तू केलें असतां कृत कार्य होशील. असें ऐकून गालव ऋषि साहाशें अश्व व कन्या यांसह विश्वामित्राकडे येऊन त्यास बोलतो. महाराज, हे शामकर्ण अश्व साहाशें ग्रहण करा आणि दोनशें अश्वांकरितां ही कन्या घ्या. म्हणजे तुझ्ये ऋणापासून मी मुक्त होईन. विश्वामित्र गरुडासह वर्तमान गालव व कन्या यांस पाहून बोलतो. हे गालवा, ही कन्या पूर्वींच मला कां दिल्ही नाहींस देतास, तर माझेपा-

सून चार पुत्र इच्छेगयींच उत्पन्न झाले असते. अस्तु. तुझी कन्या एक पुत्र उत्पन्न होईपर्यंत मी ग्रहण करतों. हे साह्य शें अश्व माझे आश्रमांत असोत. नारद सांगतात हे दुर्योधना, कांहीं दिवसांनी अष्टक या नामें करून पुत्र उत्पन्न होतांच ते सकल अश्व विश्वामित्रानें धर्म केले. नंतर ती कन्या आपला शिष्य जो गालव यास देऊन आपण वनामध्यें गेला. सुपर्ण ही गालवासह वर्तमान कन्याग्रहण करून आपले स्थानीं आला असतां गालव कन्येस भाषण करतो. हे वरारोहे, तुझ्यापासून दानपति, शूर, सत्य, धर्मरत, यजनशील असे चार पुत्र उत्पन्न होऊन त्यांनीं तुझ्या पित्यास तारिलें. आतां तू आपले पितृगृहीं जा. असें भाषण करून गालवानें ती कन्या पुनः ययाती राजास माघारी दिली; आणि गरुडाची आज्ञा घेऊन तो आपले स्थानीं तप करण्याकरितां गेला. इकडे गरुड ही आपले स्थानीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२०. अध्याय एकशेंवीस:— नारद सांगतात हे दुर्योधना, ययाती राजानें माधवी कन्येचा पुनः स्वयंवर करण्याचा निश्चय करून पुरु आणि यदु हे उभयतां आपले पुत्र कन्येच्या बरोबर देऊन गंगा आणि यमुनेच्या संगमीं पाठविले. कन्या हस्तांमध्यें पुष्पांच्या माळा धारण करून अरण्यांत नानादेशोद्भव पुरुष, राजऋषि साक्षात् ब्रह्मवेत्ते तसेच अन्य बहुत जन यांस पाहातां पाहातां कोणचाही वर माधवीच्या मनांत येईना. नंतर ती रथाखालीं उतरून आपले बंधूंस नमस्कार करून भाषण करते मला वर नको. मी आतां वनामध्यें तप करण्याकरितां जातें. असें बोलून ती तत्काळ वनांमध्यें गेली, आणि आपलें शरीर कृश करून शेवटीं तिनें मृगचर्य व्रत धारण केलें. इकडे ययाती राजा स्वर्गीं गेला नंतर पुरु आणि यदु या उभयतां पुत्रांनीं उत्तम प्रकारचें राज्य केलें. ययाती राजानें स्वर्गीं गमन करून बहुतवर्षें स्वर्गसुख भोगिलें. मोठेमोठे पूज्य व श्रेष्ठ जे स्वर्गामध्यें राजवर्य होते त्यांचा धिःकार करून आपणच श्रेष्ठ असें मानून देवऋषि यांची हेलना स्वर्गीं करूं लागला. हें ययातीचें औधत्य इंद्रास कळल्यानंतर इंद्र आपले अधिकाऱ्यांस विचारितो कीं, सर्वांचा यानें धिःकार आरंभिला हा ययाती राजा कीं काय? इतका उध्दत होता तर यास स्वर्गीं कसा आणिला? —

स्वर्गनिवासी कांहीं राजे एकमेकांस भाषण करूं लागले. कीं कायहो यानें इतकें पुण्य केलें आहे? असें ह्मणून कांहीं विमान संरक्षण करणारे व द्वाररक्षक यांस बोलले. कीं कायहो या राजाची चौकशी न करून तुह्मीं त्यास स्वर्गी आणिलान. असें ऐकून विमान संरक्षक व द्वारसंरक्षक भाषण करतात यास कोणीं एथें आणिलें? हें आह्मांस विदित नाहीं. इतक्या कृत्यास एक मुहूर्त गेल्यावर एकाएकीं ययातीची कांति नष्ट झाली. असा विषय या भा

१२१. अध्याय एकशें एकवीस:— नारद सांगतात हे दुर्योधना. ययाती राजा स्वर्गीच्या आसनापासून त्याकाळीं भ्रष्ट झाला. त्याकाळीं राजाचें मन अतिशय कंपित झालें. व तो शून्यमनयुक्त पृथ्वीतळीं पतन पावत आहे तों मनांत विचार करतो कीं, ज्या कर्माच्या योगें मी स्वर्गापासून भ्रष्ट झालों असें धर्मदूषक अशुभ कर्म काय मीं केलें असेल? इतक्यांत कोणी एक क्षीणपुण्य येऊन भाषण करतो हे राजा, इंद्रानें तुला अशी आज्ञा केली आहे कीं, तूं स्वर्गांत अत्यंत मदमत्त होऊन सकलांचा अवमान केलास. यास्तव तुला स्वर्गापासून भ्रष्ट केला. अस्तु आतां मृत्युलोकीं जा. त्याकाळीं राजा भाषण करतो. हे पुरुषा तूं मला मृत्युलोकीं टाकितोस तर जेथें साधुलोक वास करीत असतील तेथें टाक. असें विचार ययाती राजानें त्यापुरुषापाशीं भाषण केलें असतां ज्यानें मिषारण्यस्थळीं प्रतर्दन, वसुमना, शिबि व अष्टक हे चार राजे वाजपेय याग करीत होते. त्यास्थळीं त्याचौघांमध्यें ययाति पडला. तेव्हां ते राजे स्वर्गभ्रष्टास पाहून बोलतात तुझें नाव काय? तुझ्या नगराचें नामाभिधान काय? कोण तूं आहेस? कशाची इच्छा करून तूं येथें आलास? असें ऐकून तो भाषण करतो. मी ययाती राजा क्षीणपुण्य होऊन स्वर्गापासून भ्रष्ट झालों. असें ऐकून सकल राजे भाषण करतात हे पुरुषश्रेष्ठा, आतां आमच्या यज्ञसंबंधी सकल पुण्याचें ग्रहण करून पुनः तूं स्वर्गी जा. असें ऐकून ययाती भाषण करतो मी प्रतिग्रह करणारा ब्राह्मण नाहीं. नारद सांगतात हे राजा, याप्रकारें ययाती राजा भाषण करीत आहे तों राजकन्या माधवी येतांच तिला सकल राजे नमस्कार करून बोलतात हे तपोधने, जी आज्ञा कर्तव्य ती करावी. असें ऐकून माधवी बोलते

अरे हा तुमचा मातामह ययाती राजा यास ह्मणतात. मी त्याची कन्या तुह्मी मा-
झे पुत्र असें तुमचें माझें व ययाती राजाचें नातें आहे असें बोलून त्यांच्या मूर्धी-
चें अवघ्राण करून नंतर ययातीस भाषण करते. हे राजा, हे सकल तुझे दौहि-
त्र आहेत. हे तुला तारतील. मीही तुझी माधवीनामें कन्या आहें मी अर्धे पु-
ण्य तुला देत्यें. हे राजा, तू स्वर्गभ्रष्ट झालास आतां आह्मीं आपल्या पुण्या-
च्यायोगें तुला तारून पुनः स्वर्गलोकीं पाठवितों. इतकें भाषण होत आहेतों
गालव ऋषि त्या स्थळीं येऊन बोलतात. हे पार्थिवा मी आपल्या तपाचाअ-
ष्टमांश तुला देतों. पुनः स्वर्गारोहण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१२२. अध्याय एकशें बावीस:— नारद सांगतात हे दुर्योधना, सक-
ल राजपुत्रांनीं ययातीस पुण्यदान केलें असतां त्या पुण्याच्यायोगें पृथ्वीस
स्पर्श न करतां तसाच पुनः ययाती राजा स्वर्गास गेला. तो ययाती राजाचा
वसुमनानामक दौहित्र भाषण करतो हे राजा, जें पुण्य मला प्राप्त झालें आहे तें मी तु-
ला अर्पण केलें. त्या पुण्याच्यायोगें तू सुखें करून स्वर्गी जा. नंतर प्रतर्दननामा-
मक दौहित्र भाषण करतो. हे ययाती राजा, आजपर्यंत मी धर्माचेठायींच रत
आहें. आणि नित्यशः क्षत्रियांचा जो धर्म युध्द त्यांतच माझी बुध्दि आहे. आ-
णि या लोकीं क्षत्रियवंशामध्यें उत्पन्न होऊन यश संपादन करणें तें मीं केलें,
तेणेंकरून मी क्षत्रिय वीर असा शब्द मला लोकांत प्राप्त झाला आहे. मीं आज
पर्यंत जीं कृत्यें संपादन केलीं त्यांचें जें माझें पुण्य आहे तें मी तुला देतों. नंतर
उशीनर राजाचा पुत्र शिबी भाषण करतो. हे ययाति राजा, आजपर्यंत मी या
लोकीं अनृत भाषण कधींही केलें नाहीं. हें जर माझें सत्य आहे तर त्या योगें तू
स्वर्गास जा. नंतर अष्टक भाषण करतो हे ययाती राजा, शतशः पुंडरीक गोसव
वाजपेय इत्यादि याग मी केले आहेत त्यांचें जें पुण्य त्याचें फल मी तुला देतों.
तेणेंकरून तू आकाशांत जा. या प्रकारें जसेजसे ते दौहित्र भाषण करूं लाग-
ले तसतसा ययाती राजा पृथ्वीचा त्याग करून ऊर्ध्व लोकीं जाऊन स्वर्गीचें
सुख भोगूं लागला. नारद सांगतात हे दुर्योधना, या प्रकारें दौहित्रांनीं आपआ-
पलें पुण्य समर्पण करून ययाती राजास स्वर्गास पाठविलें. अ. वि. या. आ.

१२३. अध्याय एकशें तेवीस:— नारद सांगतात हे दुर्योधना, साधु-

मार्गस्थित दौहित्रांची आज्ञा घेऊन ययाति राजा पुनः स्वर्गी गेला. ते व्हां नानाप्रकारच्या सुगंधिक पुष्पांची राजावर वृष्टि झाली. कोणे एके दिवशीं ब्रह्मदेव भाषण करतो हे ययाति राजा, चतुष्पाद धर्मानें तूं सकल लोक जिंतकेलास या लोकीं तुझी अक्षय्य कीर्ति झाली होती व अक्षय्य लोकाची प्राप्ति तुला झाली. असतां तूं आपल्या स्वकर्मेंकरून त्या स्थानाचा विघात करून घेतलास तुला अहंकार बहुत झाला. मोठमोठ्या राजऋषींची तूं अवगणना केलीस. त्या योगें तुझ्या स्वकर्मांचा नाश होऊन तूं अधःपातास गेलास. तथापी तुझ्या दौहित्रांनीं परमप्रीतीनें तुला तारलें म्हणून पुनः तूं या स्थळीं आलास बरें. आतां तुझ्या कर्मानुसार तुला उत्तम स्थान मिळालें आहे. त्याचा परमस्वरवेंकरून उपभोग कर. असें ऐकून ययाती राजा भाषण करतो हे भगवन् मला एक संशय उत्पन्न झाला आहे तो असा कीं, अनेक क्रतु मी करून अनेक विध बहुत प्रकारचीं ब्राह्मणांस दानें देऊन संतोष केला. सहस्रावधि वर्षें राज्य करून उत्तम प्रकारचें प्रजा पालन केलें. अशा बहुत आयासांनीं जें मीं पुण्य लब्ध केलें तें अल्प कालानें क्षीण होऊन मी अधोलोकींच प्राप्त झालों हें मला मोठें आश्चर्य वाटतें. हे भगवन् शाश्वत लोकाचा मी उपभोक्ता असा माझा अधिकार असून हें माझें सुरव कसें नष्ट झालें? याचें कारण मला सांग. असें ऐकून पितामह भाषण करतात हे राजा, बहुत वर्षें तूं प्रजा पालन केलेंस. अनेक प्रकारचे याग करून ब्राह्मणांस दक्षणा दिल्यास. त्यांपासून तुला अनंत पुण्य मिळालें खरें. परंतु स्वर्गामध्यें तुला अभिमान उत्पन्न होऊन सकलांचा तूं धिःकार केलास. तेणेंकरून तुझें अगणित जरी पुण्य होतें तथापी या दोषानें तें नष्ट होऊन तूं अधःपातास गेलास. हे राजऋषे, उत्तम, मध्यम व कनिष्ठ जरी या लोकीं वास करतात तथापि त्यांचा तूं अवमान करण्यास योग्य नाहींस. जे मानानें दग्ध झाले त्यांस शम कधींही प्राप्त व्हावयाचा नाहीं. ज्यास शम नाहीं त्यास शाश्वत लोकाची प्राप्ति नाहीं. तस्मात् हे राजऋषे, तुला अत्यंत अभिमान झाला होता. त्या अभिमानाचें फल तूं स्वर्गापासून भ्रष्ट झालास. आतां पुनः अभिमान रहित होऊन अक्षय्य लोकीं सुरवानें राहा. या आख्यानास पतनारोहण आख्यान असें म्हणतात.

हें आख्यान जे नर कथन करतील त्यांस विषम काळ जरी आला तथापी त्यासकटापासून ते तरतील. असें या आख्यानाचें पुण्य आहे. नारद सांगतात हे दुर्योधन राजा. असा अभिमानाचा दोष आहे. ययाती राजाही अभिमानदोषानें स्वर्गभ्रष्ट झाला तसाच अति आग्रहामुळें गालव ऋषि मोठ्यासंकटांत पडला. यास्तव आपले जे सुहृद मित्र हित करणारे असतील त्यांचें ऐकावें. त्यांच्या भाषणाची अवहेलना करूं नये. व कोणत्या गोष्टीविषयीं अत्याग्रह करूं नये. अत्याग्रह हें केवळ क्षयाचें कारण आहे. तस्मात् तूंही आग्रहाचा त्याग करून पांडवांशीं स्नेह कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१२४. अध्याय एकशें चोवीस — धृतराष्ट्र भाषण करतो. हे नारदा, तूं जें भाषण केलेंस तें सकल सत्य आहे. माझेंही मन तुझ्या भाषणाप्रमाणेंच आहे. परंतु काय करूं? मी पुत्रांचा निग्रह करण्यास समर्थ नाहीं. असें नारदाशीं भाषण करून नंतर कृष्णाप्रत बोलता. हे केशवा. स्वर्गास उपयुक्त धर्मानुसार जें तूं मजला भाषण केलेंस तें सकल सत्य आहे. पांडवांशीं शम असावा असें माझें मन आहे. परंतु दुर्योधनापुढें माझा उपाय चालत नाहीं. हा माझा पुत्र दुष्ट मंदबुध्दि, शास्त्राचें अतिक्रमण करणारा, याचा निग्रह जेणेंकरून होईल याविषयीं यत्न कर. असें ऐकून जनार्दन मधुर वाणीनें दुर्योधनास भाषण करतो. हे दुर्योधना, तूं महा कुलांत उत्पन्न झालास तेव्हां उचित कर्म करणें हें तुला योग्य आहे. अरे आपल्या बांधवांशीं शम कर. विशेषेंकरून तुजा दुसरा बांधव मला कांहीं कर्तव्य नाहीं. तुझेठायीं ही विपरीत वृत्ति दृष्टीस पडते ही चांगली नव्हे. हा घोर अधर्म प्राणाचा घात करणारा जो तूं स्वीकार केलास तो टाक. हे तात शम केला असतां सर्व जगताचें हित आहे. मातापितर यांची आज्ञा उल्लंघन करूं नको. तुझा पिता जें इच्छीत आहे त्यामध्यें तुझें बहुत कल्याण आहे. अरे जे सुहृद आहेत त्यांचें हित भाषण जो मनुष्य श्रवण करीत नाहीं, त्यास महाकालानें भस्म केलें असें समजावें. आपल्या मोर्ख्याचा त्याग करून जो दुसऱ्याचें श्रेयस्कर वचन ऐकतो तो लोकांमध्यें अत्यंत सुख पावतो. आपल्यास अनिकूळ काय आहे? कोणत्या उद्योगानें आपली अर्थसिध्दी होईल? इत्यादि दुसऱ्याचे विचार जो श्रवण करीत नाहीं

त्याला शत्रूनें ग्रस्त केला म्हणून समजावें. जो दुष्ट मनुष्याचा संग्रह करतो. दु-
राचाराविषयीं ज्याचें निरंतर लक्ष्य, सत्पुरुषाचें अथवा स्नेह्याचें भाष-
णश्रवण करीत नाहीं. त्या पुरुषापाशीं पशूदेखील मैत्री करणार नाहींत.
मग मनुष्य तर कोठून? जन्मापासून कुंतीपुत्रांस तुह्मी छळिलेंत. परंतु ए-
क दिवसही तुमच्यावर त्यांनीं कोप केला नाहीं. तस्मात् धन्य ते पांडव त्या-
च्याशीं मत्सरणा केली परंतु ते यशस्वीच. त्याचें अहित कधीं व्हावयाचें ना-
हीं. धर्माचा त्याग करतो तो लोकरच नष्ट होतो. काम, अर्थ यांची इच्छा ज्यांस
आहे त्यांनीं पूर्वी धर्माचा अवलंब केला पाहिजे. यास्तव हे तात सर्वोपायेंक-
रून धर्माचा अवलंब कर. धर्माची ग्लानी करूं नको. तूं आत्मवान् आहेस म्ह-
णून गुणशील जे पांडव यांचा अवमान करण्यास योग्य नाहींस. हे तात दुर्यो-
धना, दुर्जनांचा संग करण्यापेक्षां पांडवांचा संग कर. त्यांचा संबंध झाला अस-
तां सर्व तुझ्या इच्छा पूर्ण होतील. और पांडवांसमान या पृथ्वीवर कोण आहे बरें!
इतके राजे तूं एकत्र केले आहेस परंतु पांडवांस पर्याप्त असा एकही नाहीं. युध्दा
मध्यें भीमसेन क्रुध्द झाला असतां त्याकडे अवलोकन करण्याचीही या राजां-
ची शक्ति नाहीं. यास्तव हे दुर्योधना, युध्दाविषयीं मन धारण करूं नको. आपले सै-
न्यांत नीट अवलोकन करून पाहा कीं. एकतरी योध्दा अर्जुनाशीं युध्द करून ज-
य मिळवील? और अर्जुनापुढें विजयलब्ध होणें परम दुर्घट आहे. हे सकळ यो-
ध्दे प्राप्त झाले आहेत तें स्वस्थ अंतःकरणानें आपले घरीं जावोत. और मृत्युलोक-
इववन दाहस संगीं एकट्या अर्जुनानें देव गंधर्व, यक्ष, असुर, पन्नगांस जिंकिलें.
त्याशीं कोण मनुष्य युध्द करणार. हे दुर्योधना, हे पुत्र ज्ञाति ज्ञातिसंबंधी यां-
चा आपलेकरितां विनाश करूं नको. कौरवकुल शेषभूत असूं दे. हे नराधिपा
पांडव महाराज्यांतें आधिपत्य धृतराष्ट्र राजास देऊन तुला यौवराज्याचा अभि-
षेक करतील. हे तात, तुझ्या गृहांत सहज लक्ष्मी येत आहे तिचा अवमान करूं
नको. पांडवांस अर्धराज्य देऊन सुखी हो. राजश्रीचा उपभोग कर. मित्रांची
भाषणें श्रवण करून पांडवांशीं शम केला असतां परमप्रीतियुक्त होऊन मि-
त्रांसह वर्तमान चिरकाल कल्याण पावशील. असा विषय या अ॰ आहे.

१२५. अध्याय एकशें पंचवीस — वैशंपायन सांगतात. हे जनमेजय

राजा, श्रीकृष्णानें भाषण केल्यानंतर दुर्योधनास भीष्म भाषण करतात हे
भरतश्रेष्ठ. पांडवांशीं शम असावा, ह्मणून कृष्णानें जें भाषण केलें त्याचा अं-
गिकार कर. क्रोधवश होऊं नको. कृष्णाचें भाषण धर्मार्थयुक्त आहे. त्याचा
परित्याग करूं नको. जर परित्याग करशील तर सकल क्षत्रियकुलाचा नाश
होण्याचा समय आला आहे. सकल क्षत्रियकुलामध्यें तुमच्या कुलांत अत्यं-
त शोभायमान अशी राजश्री प्राप्त झाली आहे ती धृतराष्ट्र जिवंत असतां
तूं आपल्या दुराचरणाच्या योगें नष्ट करशील. यास्तव मी तुला सांगतों. श्रीकेश-
व यांच्या व विदुराच्या भाषणाचा अतिक्रम करूं नको. कुलघ्न, कुपुरुष, दुर्मति,
कुमार्गगामी असा होऊन आपले माता पितरांस शोक सागरामध्यें टाकूं न-
को. इतकें भीष्माचें भाषण झाल्यावर द्रोणाचार्य भाषण करतात. हे दुर्योध-
ना, कृष्ण व भीष्म या उभयतांनीं धर्मार्थयुक्त भाषण केलें. त्याचा अंगिकार
कर. हे सकल कर्णादिक तुला वारंवार उत्तेजन देत आहेत. ही तुझ्या गळ्यांत
मृत्यूची माळ घालतात असें समज. अरे पुत्र, पौत्र, भ्राते तशाच सकल प्रजा
यांचा घात करूं नको. वासुदेव आणि अर्जुन हे जगतांत अजय आहेत. यांचें
बल अपार असें समज. स्कन्द द्रावें करून श्रीकृष्ण व भीष्म तुला सांगतात
तें जर तूं श्रवण न करशील तर पश्चात्ताप पावशील. तुला जामदग्न्य रामांनीं
सांगितलेंच आहे कीं. अर्जुन आणि श्रीकृष्ण हे देवांसही दुःसह. मग मनु-
ष्यांचें सामर्थ्य किती? तुला कल्याण व्हावें अशी सकलांची इच्छा आहे ह्मणून
वारंवार तुला आह्मी बोध करतों. अतःपर तुला जसें कर्तव्य असेल तसें तूं कर.
असें द्रोणाचार्यांनीं भाषण केल्यानंतर विदुर भाषण करतो. हे धृतराष्ट्र पुत्रा.
अरे तुझ्याविषयीं मी शोक करीत नाहीं. हे तुझे वृध्द मातापितर धृतराष्ट्र व गां-
धारी यांविषयीं शोक करतों. अरे तूं मातापितरांचा नाथ असतां ते अनाथा-
सारखे हतमित्र होऊन भिक्षा मागत शोक करीत पृथ्वीवर संचार करतील
हें दुःख मला फार वाटतें. असें विदुरानें भाषण केल्यावर सकल भ्राते व रा-
जसमुदाय यांच्यासमक्ष धृतराष्ट्र भाषण करतो. हे पुत्रा, श्रीकृष्णानें कथ-
न केलें तें अंतःकरण करून तूं ऐक. यांत तुझें बहुत कल्याण आहे. क्षेमाचाच
मार्ग त्यानें तुला सांगितला. हा श्रीकृष्ण जर साहाय्य झाला तर आपले सकल

मनोरथ सिद्धीस जातील. यास्तव केशवासहवर्तमान तूं युधिष्ठिराकडे जाऊन आपल्या अपराधाची क्षमा माग. म्हणजे तुझें अत्यंत कल्याण होईल असा विषय या अध्यायांत आहे.

१२६. अध्याय एकशें सव्वीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्राचें भाषण ऐकून द्रोण व भीष्म बोलतात. हे दुर्योधना, अरे जोंकालपर्यंत कृष्णार्जुन एकत्र होऊन गांडीव धनुष्य अर्जुनानें धारण केलें नाहीं आणि धौम्य ऋषींनीं संग्रामाग्नीमध्यें शत्रूंचें हवन केलेलें धर्मराज पाहात नाहीं. तावत्कालपर्यंत तुम्हीं वैराची शांती करा. जोंकाळपर्यंत सैन्यांत स्थित झालेले भीमार्जुन तुमच्या अग्रभागीं प्राप्त झाले नाहींत तावत्काळपर्यंत तुम्ही वैराची शांति करा. अरे दुर्योधना, तूं युधिष्ठिरास शरण जा. म्हणजे तो तुझें गौरव करील. आणि ध्वजांकुश पताका चिन्हित जो तुझा दक्षिण हस्त याचें धर्मराज ग्रहण करून आपले स्कंदावर ठेवील. म्हणजे महाबाहु भीमसेन हा तुला आलिंगन देईल. अर्जुन आणि नकुलसहदेव तुला अभिवादन करीत असतां तूं त्यांच्या मूर्ध्याचें परमप्रेमेंकरून आघ्राण कर. ते आणि तूं एकत्र स्थित झालेले आह्मी ज्याकाळीं पाहूं त्याकाळीं आमच्या नेत्रांतून आनंदाश्रु उत्पन्न झालेले सकल नराधिप पाहोत. असें झालें असतां सकल राजधानी आनंद शब्दांनीं युक्त होईल. आणि तूं भ्रात्यांशीं सहवर्तमान सकल पृथ्वीचा उत्तमप्रकारें उपभोग करशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१२७. अध्याय एकशें सत्तावीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सभेमध्यें द्रोणाचार्य प्रभृति सकलांचें भाषण ऐकून दुर्योधन श्रीकृष्णास बोलतो. हे केशवा, तुह्मीं जें भाषण केलें तें विचार करूनच केलें असेल. विशेषेंकरून माझी निंदा करितां आणि पांडवांवर भक्ति ठेवितां हें काय? तुह्मीं आमचें बलाबल काय जाणलें आहे? तुम्ही, विदुर, धृतराष्ट्र राजा, आचार्य आणि पितामह दुसऱ्या कोणा राजाची निंदा न करतां माझीच निंदा करतां, परंतु मी विचार करून पाहातों तों माझा अन्याय मला कांहींच दिसत नाहीं. असें असतां सकल राजे माझ्याशींच द्वेष करतात. मी कोणाचा अपराध केला नाहीं. हे केशवा तूं सूक्ष्म विचार करून पाहा. अपराध कोणाचा आहे?

मीनीकरून पांडवांनीं द्यूतक्रीडा केली असतां त्यांत शकुनीनें पांडवांस पराजित करून राज्य व द्रव्य हरण केल्यावर प्रतिज्ञेप्रमाणें पांडव वनवासास गेले असा शकुनी व पांडवांचा परस्पर कलह झाला यांत माझा अपराध कांहीं नाहीं. कोणता दोष माझ्यावर ठेवून शत्रु माझ्याशीं द्वेष करतात. हे कृष्णा, पांडव हे अशक्त आहेत, असें मला खचित ठाऊक आहे, परंतु मी त्यांचा अपराध काय केला आहे? हें कोणीं मला सांगत नाहीं. कदाचित् सृंजयाशीं सहवर्तमान पांडव आमचा क्षय करतील, असें तुमचे भाषणांत दिसून आलें. असे उग्रकर्मे पांडव आहेत ह्मणून मी त्यांस शरण जाणार नाहीं. हे श्रीकृष्णा, युध्दांमध्यें क्षत्रियांनीं क्षत्रियांस जिंकावें हा त्यांचा धर्मच आहे. परंतु तुला एक खचित सांगतो, भीष्म, द्रोण, कृप, कर्ण, यांस युध्दांत देवही पराजित करण्यास अशक्य आहेत मग पांडवांची कथा काय? वास्तवीक स्वधर्म पाहातां क्षत्रिय युध्दांमध्यें मरण पावले असतां स्वर्गास जातात. यास्तव क्षत्रिय धर्मानें मनन करून आह्मीं नसेंच करणार. हे केशवा आतां तुझें ह्मणणें आहे कीं, पांडवांस राज्यांश द्यावा तर वास्तविक पाहातां राज्याचा अधिकार आमचाच आहे. यास्तव जोंकालपर्यंत आमचा पिता धृतराष्ट्र राजा राज्यास आधार आहे, आणि आह्मीं सकल शस्त्रें धारण करून जिवंत आहोंत तोंकालपर्यंत पांडवांस राज्यांश कधींही देणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१२८. अध्याय एकशें अठ्ठावीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुर्योधनाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण भाषण करतो. हे दुर्योधना, जर तुझी मरणाचीच इच्छा आहे तर युध्दांमध्यें शरास्तर्ण भूमीवर सुखेंकरून शयन करशील. अरे मूर्खा पांडवांची श्री पाहावेना ह्मणून शकुनीस तूंच अक्षद्यूत करण्याचा दुष्ट विचार सांगितलास असें असतां माझा अपराध काय? ह्मणून ह्मणतोस. द्यूतामध्यें कपटानें फांसे टाकून पांडवांस हरविलेंस. पांडव तर सरळ मार्गानेंच खेळत होते. मग तुह्मांस कपट करण्याचें कारण काय? सरळ मार्गानें द्यूतक्रीडेमध्यें जर पांडव हरले असते तर चिंता नव्हती, परंतु तुह्मीं कपटानें त्यांस हरविलेंत. वास्तविक पाहातां अक्षद्यूत करणें हें मूर्खांचें काम आहे. मोठ्यांस अक्षक्रीडा अयोग्य आहे. केली असतां राज्यनाश होतो. तुह्मीं:—

असन् मार्गाचा अवलंब करून क्रीडा उपस्थित केलीत. आणि त्यांत धर्मराजास क्रीडेकरितां आव्हान केलेंत. हें तुमचें कपट पहिल्यापासूनच आहे. हें मोठें अनर्थाचें कारण उत्पन्न झालें. यांत तूंच मुख्य आहेस. यांत काय पाप पुढें उत्पन्न होणार याचा विचार पूर्वींच अगदींच केलास नाहींस, त्याचीं आतां फळें भोगशील. तुला आणखी विचारितों कीं, कुलीन, शीलसंपन्न, प्राणापेक्षांही श्रेष्ठ, पांडवांची भार्या द्रौपदी तुह्मीं सभेंत आणलीत हा तुमचा थोरपणा काय? अरे, पांडव तुमचे भ्राते, आणि द्रौपदी तुमची भ्रातृपत्नी ना! तुझ्यासारखा मूर्ख पृथ्वींत कोणी नसेल. हे सभासद हो, तुह्मीं या मूर्खाचें कर्म जाणतच आहां. धर्माचरण करणारे साधुव्रत असे पांडव असतां दुःशासनानें त्यास सभेंतून घालवून दिलें. आणि कर्णादिकांनीं नानाप्रकारचीं अवाच्य कठोर भाषणें केलीं. हें अनार्य नृशंस कर्म कर्ण दुःशासनांचें तुह्मीं जाणतच आहां. पूर्वीं पांडवांस मातेशीं सहवर्तमान लाक्षागृहांत दग्ध करण्याचा यत्न या दुर्योधनानें केला असतां पांडव त्यासंकटापासून मुक्त होऊन एकचक्रा नगरींमध्यें कुंतीशीं सहवर्तमान गुप्तरूपानें राहिले. हें सर्व तुह्मांस विदीत आहे किंवा नाहीं तें सांगा. असे मोठमोठे घोर उपाय पांडवांच्या नाशाविषयीं तूं दुर्योधना केले असतां मी पांडवांचे अपराध काय केले आहेत ह्मणून भाषण करतोस. तुला लज्जा कशी वाटत नाहीं. पांडव राज्याची यांच्या करण्यास जरी प्राप्त झाले तथापी मी त्यांस पित्रांश किमपी देणार नाहीं असें बोललास तर याच पापाच्या योगें तूं ऐश्वर्यापासून लौकर नष्ट होशील. हें खचित जाण. पुनःपुनः तुला समजून सांगतों. शम केला असतां उभयतांस मोठा लाभ होईल. असें असतां आपल्याच बुद्धिबळाच्यायोगें शमाचा त्याग कां करतोस? अरे मित्रांच्या भाषणाचा जर अतिक्रम केलास तर तुझें कल्याण होणार नाहीं. हे पार्थिवा, तूं हें फार अयोग्य अकीर्तिकारक असें कर्म करितोस. असें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून दुःशासन बोलतो हे सुयोधना, पांडवांशीं शम करावा ह्मणून श्रीकृष्णानें सांगितलें तें तूं जर न ऐकशील तर भीष्मद्रोण आणि धृतराष्ट्र यांनीं असा बेत केला आहे कीं, तूं मी आणि कर्ण या तिघांस बंधन करून पांडवांचे स्वाधीन करावें. असें ऐकून दुर्योधन, विदुर, धृतराष्ट्र, बाल्हिक, कृपाचार्य, सोमदत्त

भीष्मद्रोणाचार्य आणि जनार्दन या सर्वांचा अवमान करून अशिष्टासारखा निर्मर्याद सभेंतून आपले गृहाकडे चालला असतां सकल भ्राते अमात्य व राजेही दुर्योधनाच्यामागून चालले. हें सकल कृत्य पाहून भीष्म बोलतो. हे दुर्योधना, धर्मार्थयुक्त श्रीकृष्णाचें भाषण अभिमानानें तूं ऐकत नाहींस. यास्तव सकल तुझे मित्र तुला असें म्हणतात कीं, हा दुरात्मा, राजपुत्र यास कोणताही उपाय सांगितला असतां ऐकत नाहीं. हा आपण कालपक्व होऊन मोहास्तव सकल पार्थिवांसही कालपक्व केलें असतां सकल क्षात्रकुल यानेंच नष्ट केलें. असा याचे शिरावर अभिशाप येईल असें ऐकून श्रीकृष्ण, भीष्मद्रोणप्रमुखांस भाषण करतात कीं, हें दुर्योधनानें जें कृत्य आरंभिलें आहे तेणेंकरून सकल कुरुवृध्द जे आहेत त्यांस मोठें संकट आलें आहे. हा ऐश्वर्यमदानें मत्त झाला यास्तव सकलांनीं याचा निग्रह करावा हें मला बरें वाटतें. याचा निग्रह केल्यावांचून हा ऐकणार नाहीं. अरे हे अरिंदमहो मी म्हणतों हें तुम्हांस रुचत असेल तर या कार्यास अनुकूल व्हावें. एक पुरुषाचा निग्रह करून सकल कुळास सुख होत असेल तर एकाचा निग्रह करावा. पूर्वी भोजकुळांमध्यें उग्रसेन नामक राजा राज्य करीत असतां त्याचा पुत्र कंस यानें पित्यास ऐश्वर्यापासून भ्रष्ट करून ज्ञाति व भ्राते यांच्याशीं विरुध्द होऊन आपण राज्याचें ऐश्वर्य भोगूं लागला. तो कांहीं दिवसांनीं मृत्युवश जाहला त्यावर भोज अंधक वृष्णी आणि सर्व यादव, सकल कंसाचे भ्राते सुख पावून पुनः उग्रसेन राज्यसुखाचा अनुभव घेऊं लागला. तसेंच पूर्वी आयुधांविषयीं देव आणि दैत्य यांचें युध्द होत असतां सकल लोकांचा नाश होऊं लागला. असें पाहून ब्रह्मदेवांनीं यमधर्मास सांगितलें कीं, हे सकल दानव वरुणाकडे न्या म्हणजे तो त्यांचें बंधन करील. असें ऐकून धर्मानें सकल दानव वरुणलोकीं नेले. वरुणानें सकल दानवांस धर्मपाश व आपले पाश बध्द करून त्यांचा सागरांत प्रक्षेप केला. आणि आपण त्यांचें रक्षण करीत पाताललोकीं बसला. यास्तव ज्ञातीमध्यें कांहीं कलह उत्पन्न होऊन सकलांचा नाश होत असेल तर कलहश्रेष्ठ जे असतील त्यांचें बंधन करून ज्ञातीस सुख द्यावें. हे मित्रहो, दुर्योधन, कर्ण, शकुनी आणि दुःशा-

सन या चौघांनीं हा कलह उत्पन्न केला आहे. यास्तव या चौघांस बांधून पांडवांचे स्वाधीन करा ह्मणजे सकल ज्ञातीचा कलह शांत होऊन सर्वांचें कल्याण होईल. हे धृतराष्ट्र राजा, तुझ्या कुलाचें रक्षण व्हावें अशी जर तुझी इच्छा असेल तर दुर्योधनास बंधन करून पांडवांचे स्वाधीन करा. परंतु एका करितां सकल क्षत्रिय कुलाचा नाश होऊं देऊं नको. ही माझी प्रार्थना आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१२९. अध्याय एकशें एकूण तीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, श्रीकृष्णाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र भाषण करतो हे विदुरा, गांधारीस जाऊन दुर्योधनाचा वृत्तांत सांग ह्मणजे ती दुर्योधनास सभेंत आणील. आणि तिनें बोध केला असतां दुर्योधन तिच्या वचनाचा त्याग करणार नाहीं. दुर्योधना निमित्त आपणास मोठें संकट उत्पन्न झालें आहे. तें संकट कृष्णाच्या भाषणाप्रमाणें वर्तन केलें असतां लौकर निवृत्त होईल असें ऐकून विदुरानें गांधारीस राजाच्यासन्निध आणिली. धृतराष्ट्र राजा भाषण करतो हे गांधारी, तुझा दुरात्मा पुत्र कोणाची आज्ञा मानीत नाहीं. हा ऐश्वर्याच्या लोभानें आपलें जीवित्व आणि ऐश्वर्य या उभयतांचा नाश करून घेतो. सुहृदांच्या भाषणाचा तिरस्कार करून सभेंतून उठून गेला. हा तुझ्या पुत्राचा योग्यपणा काय? तूं तरी त्याला कांहीं बोध करून मार्गावर आण. असें ऐकून गांधारी बोलत्ये हे राजा, तूंच प्रथम दुर्योधनास राज्यारूढ करतेसमयीं विचार केला नाहींस. दुर्योधन कुमार्गी असतां तूं राज्यप्रदान केलेंस हा तुझा किती अन्याय आहे. आणि याचें पाप तूं जाणत असतां त्यालाच आजपर्यंत अनुसरून राहिलास. हे राजा, आतां बलात्कारानें याला राज्यावरून काढणें परम दुर्घट आहे. आतां त्याचीं फळें तूंच भोग. हे महाराज, साम भेद यांनीं आपत्तीपासून तरणें परम कठिण दिसतें. वैशंपायन सांगतात. हे राजा, गांधारीनें धृतराष्ट्राशीं भाषण केल्यावर दुर्योधन राजा सभेंत आला. तेव्हां गांधारी बोलत्ये हे पुत्रा दुर्योधना, पिता, द्रोण, कृप, विदुर व इतर तुझे सुहृद जें सांगतात तें तूं कां श्रवण करीत नाहींस. अरे त्यामध्यें तुझें फार हित आहे. त्याचें भाषण ऐकलें असतां भीष्म, धृतराष्ट्र आणि मी यांचा परम सत्कार

केलास असें होईल. हे महाप्राज्ञ, आपले बुध्दीनेंच राज्याचा कारभार करूं नये. सकल आप्त इष्टवर्ग यांची संमति घ्यावी. राज्य रक्षण करणें व राज्याचा उपभोग घेणें तरी महा कर्म कठीण आहे. काम आणि क्रोध हे पुरुषाच्या अर्थांचें आकर्षण करतात. यास्तव या दोन शत्रूंचा पराजय केला असतां सकल महित्यानें जित केली, ह्मणून समजावें. दुरात्मे असतील त्यांस लोकेश्वरत्व योग्य नाहीं. इंद्रियें अशिक्षित ठेविलीं असतां तीं आपणांस अमार्गांत नेऊं शकतात. इंद्रियें वश झाल्यावांचून आत्मा वश होत नाहीं. आत्मा द्वेष्य आहे अशी बुध्दि करून प्रथम अमित्र अमात्य यांस वश करण्याचा उपाय योजून नंतर आत्म्याच्या जयाचा उपाय योजिला असतां व्यर्थ होत नाहीं. ज्यानें इंद्रियांचा जय केला असेल तो अमात्याचे स्वाधीन राहात नाहीं. आपल्या स विकार करणारा त्यास यथाशास्त्र जो दंड करण्याची इच्छा ठेवितो आणि आपणापाशीं मैत्री करावयाची त्याची परीक्षा केल्यावांचून मैत्री करीत नाहीं तो पुरुष चिरकाल श्रीचा उपभोग करण्यास समर्थ होतो. कामक्रोधी मनुष्यास स्वर्गप्राप्ति होत नाहीं. तस्मात् हे दुर्योधना, इंद्रियांचा निग्रह ठेविला असतां ईप्सितार्थप्राप्ति होते. धर्माची हानि होत नाहीं, आणि द्वेष्याचा पराभव होतो. हे राजा, पांडव व तूं एकत्र झाला असतां पृथ्वीचा उपभोग करशील. शांतनव भीष्माचार्य व द्रोण यांनीं तुला सांगितलें आहे कीं, श्रीकृष्ण व पांडव हे अजय्य आहेत यास्तव महा बाहु जो श्रीकृष्ण यास शरण जा ह्मणजे तो उभयतांचेंही कल्याण करील. भीष्म, तुझा पिता धृतराष्ट्र, बाल्हिक यांनीं पंडुपुत्रास अंश द्यावा ह्मणून सांगितलें, त्याप्रमाणें तूं राज्यांश प्रदान केलें असतां निहत कंटक पृथ्वीचा उपभोग करशील. अरे पांडु पुत्रांस यथोचित पृथ्वीचा भाग देणें आहे तो देऊन बाकी अवशिष्ट पृथ्वीचा उपभोग अमात्यांशींसह वर्तमान तूं सुखेंकरून कर. तुला पृथ्वीचें अर्धराज्य पुरे. अधिक इच्छा करून सकल राज्य मात्र घालविशील. यास्तव सुहृदांच्या वाणी ऐकून यश प्राप्ति कर. तेरा वर्षें पांडवांनीं दुःखांत घालविलीं. तें दुःख पांडु पुत्रांस बहुत झालें आहे तितकें पुरे. आतां त्यांस अर्धराज्य प्रदान करून कामक्रोधापासून त्यांचा शम कर. सूतपुत्र, तुझा भ्राता दुःशासन आणि तूं या तिघांवर

भीष्म,द्रोण,कृपाचार्य, धनंजय व धृष्टद्युम्न हे जर क्रुध्द झाले तर सकल प्रजेचा निःपात करतील. माझी प्रीति पांडवांवर व तुम्हांवर समानच आहे खरी, परंतु त्यांतही कांहीं प्रीति धर्मावर अधिक आहे. जर राज्यलोभास्तव हे सकल क्षत्रिय तुझा अवलंब करून मृत्यु पावतील तर तुझ्याकरितां तें दुःख युधिष्ठिरास पाहावें लागेल. असा विषय या अध्यायांत आहे.

१३०. अध्याय एकशें तीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, गांधारीनें दुर्योधनास बोध केला असतां दुर्योधन तिच्या भाषणाचा त्याग करून शकुनीशीं सहवर्तमान पुनः सभेपासून स्वगृहीं गेला. आणि कर्ण शकुनी व दुःशासन यां सहवर्तमान विचार करूं लागला कीं, धृतराष्ट्र व शांतनव भीष्म यांच्या अनुमतानें कृष्ण आपलें बंधन करणार आहेत. तर पूर्वींच आपण कृष्णाचें बंधन करूं. म्हणजे पांडव निरुत्साह होतील असा विचार दुष्ट पापी यांनीं केलेला जाणून सात्यकी बोलतो. हे कृतवर्म्या लौकर आपल्या सैन्याची सिध्दता करून सभाद्वारीं उभा राहा. मी कृष्णाकडे जातों. असें बोलून नंतर सात्यकी श्रीकृष्णाच्या संन्निध आला आणि दुर्योधन प्रभृति दुष्टांचा अभिप्राय सांगून विदुर बोलतो हे राजा, मूढ,पापात्मे, मंदबुध्दि काम-क्रोधाच्या स्वाधीन होऊन कृष्णाचा निग्रह करावा म्हणून विचार करीत आहेत. असें ऐकून विदुर कौरवसभेंत धृतराष्ट्रास भाषण करतो-हे राजा, तुझ्या पुत्रांचा आतां विपरीत काळ आला असें जाण. पुंडरीकाक्ष जो भगवान् यास बलात्कारानें बंधन करावें म्हणून यांची इच्छा झाली आहे. हें कर्म होण्यास फार अशक्य असून मोठ्या अपकीर्तीस कारण होईल. हे सकल योध्दे युध्दास प्रवृत्त झाले आहेत. यांस हा श्रीकृष्ण क्रुध्द झाला असतां यमसदनास पाठवील. यास्तव हें निंदित व पापयुक्त कर्म करणें सर्वथा अयोग्य आहे. श्रीकृष्ण धर्माचें उल्लंघन कीमपी करीत नाहीं. असें असतां या पापमतीनीं अशी इच्छा केली काय? असें ऐकून श्रीकृष्ण बोलतो, हे धृतराष्ट्रराजा, मंदबुध्दि हे माझा निग्रह करोत. मी तीच इच्छा करीत आहें. बरें मी यांचें बंधन करतों अथवा हे माझें बंधन करतात हें सकल पार्थिव पाहातील. हे सकल आले आहेत यांचें मी एकटा नियमन करण्यास समर्थ आहें परंतु

असें निंद्य पापकर्म मी करीत नाहीं. अस्तु हे दुष्ट पांडवांच्या अर्थाकरितां फार लुब्ध झाले आहेत खरे. परंतु हे स्वार्थापासून भ्रष्ट होतील. यांत युधिष्ठिर कृतकार्य होईल. असें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो. हे विदुरा, लुब्धक व पापी असा जो दुर्योधन यास सहमित्र सहअमात्य असा आणून सत्वर मार्गास लाव. असें ऐकून पुनः विदुरानें भ्रात्यांशीं व योध्यांशींसहवर्तमान दुर्योधनास सभेंत आणिला. बरोबर कर्ण दुःशासन हेही होते. तेव्हां धृतराष्ट्र भाषण करतो. हे पाप्या, तूं दुष्टांचें सहाय्य केलें आहेस. त्यांच्या संबंधानें पापकर्म करण्याची इच्छा करतोस हें तुला योग्य नाहीं. तुझ्यासारखा मूर्ख कुलपांसन कधींही मी कोणीं पाहिला नाहीं. पुंडरीकाक्ष जो भगवान् त्याचा निग्रह करावा म्हणून तूं इच्छा केलीस? अरे इंद्राशींसहवर्तमान देव जरी आले तथापी या कृष्णाचें बंधन करणें अशक्य आहे. त्या परमेश्वरास तूं बंधन करण्याची इच्छा करतोस. परंतु हा केशव सर्वांस निग्रह करण्यास अशक्य आहे. असें ऐकून विदुर भाषण करतो हे दुर्योधना, हें माझें भाषण ऐक हें तुला सांप्रत कालास फार युक्त आहे. अरे निर्मोचन नामक नगरींत साहा हजार असुर हस्तांमध्यें पाश घेऊन श्रीकृष्णास बंधन करण्यास आले होते. परंतु तेही बंधन करण्यास अशक्य झाले. त्या श्रीकृष्णास बंधन करण्याची इच्छा करतोस! या कृष्णानें सकल गाईंचें रक्षण व्हावें म्हणून गोवर्धन पर्वत हस्तावर धरिला. जरासंध, व क्रूदंत व बाणासुर इत्यादिकांचें त्यानें मर्दन केलें. असा या श्रीकृष्णाचा पराक्रम आहे. बरें हा सकल जगताचा कर्ता असून कांहीं करीत नाहीं. जें जें या कृष्णाच्या मनांत येतें तें तें अयत्नानें सर्व सिध्दीस जातें. त्या गोविंदास तूं जाणत नाहींस काय? अमात्यांसहवर्तमान तूं नष्ट होशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१३१. अध्याय एकशें एकतीस— वैशंपायन सांगतात हे जनमेजया विदुरानें भाषण केल्यावर शत्रुसमुदायहंता श्रीकृष्ण भाषण करतो हे सुयोधना, मी या सभेंत एकाकी आहें असें तूं जाणून मला बंधन करावें अशी इच्छा करतोस तर मी एकटा आहें असें तूं समजूं नको. एथेंच माझ्यासंनिध सकल पांडव तसेच अंधक, वृष्णी, एकादश रुद्र, द्वादशादित्य इत्यादि-

क आहेत. असें भाषण करून श्रीकृष्ण हास्य करूं लागला तों विद्युल्लतेसारखा तेजस्वी अंगुष्ठपर्वमात्र देवसमुदाय भगवंताच्या मुखापासून उत्पन्न झाले ललाटप्रदेशीं ब्रह्मा, वक्षस्थळीं रुद्र, भुजांचेठायीं सकल लोकपाल दिसूं लागले. अग्नि मुखापासून उत्पन्न झाला. आदित्य, साध्य, वसु, अश्विनीकुमार इत्यादि भगवंताच्या रूपांत दिसूं लागले. दक्षण भागीं अर्जुन, आणि सव्य भागीं बलराम, पृष्ठभागीं भीम, युधिष्ठिर, व माद्रीपुत्र. सन्मुखभागीं अंधक, वृष्णी प्रद्युम्न, अग्रभागीं शंखचक्र गदा शक्ति इत्यादि प्रगट झालीं. तशींच इतर प्रहरणायुधें श्रीकृष्णाच्या असंख्यात बाहूंमध्यें शोभूं लागलीं. नेत्रनासिका आणि कर्ण यांपासून अग्नीच्या ज्वाळा उत्पन्न झाल्या. असें केशवाचें स्वरूप पहात पहात सकल राजे नेत्र मिटून स्तब्ध बसले. परंतु द्रोणाचार्य, भीष्म, विदुर, संजय तसेच महाभाग्यवान् तपोधन ऋषि यांचे नेत्र निमीलन झाले नाहींत. कारण भगवंतांनीं यांस दिव्यचक्षु दिले होते. हें जगदीश्वराचें स्वरूप महत् आश्चिर्यकारक सभा तळीं पाहून आकाशांत देवांनीं पुष्पवृष्टि केली. त्याकाळीं धृतराष्ट्र राजा भाषण करतो. हे श्रीकृष्णा, तूं जगताचा हितकर्ता आहेस. यास्तव आतां माझ्यावर प्रसाद करून दिव्य चक्षु मला दे, ह्मणजे तुझें विश्वरूप यथेच्छ मी पाहिल्यावर पुनः तूं नेत्र हरण कर. असें ऐकून जनार्दन भाषण करतो. हे धृतराष्ट्रा, तुला उत्तम चक्षु दिले. येणेंकरून हेंच रूप तुला दृष्टीस पडून नंतर चक्षु पूर्ववत् प्रमाणें होतील. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, त्याकाळीं जगदीश्वराच्या कृपेनें धृतराष्ट्र राजास विश्वरूप पाहाण्याकरितां दिव्य चक्षु प्राप्त झाले. हें आश्चिर्य पाहातांच सकल ऋषिगण मधुसूदनाचा स्तव करूं लागले. सकल मही कंपायमान झाली. सागर क्षोभातें पावले. असा चमत्कार भगवंतांनीं कौरवसभेंत सकलांस दाखविल्यावर विश्वरूपाचा उपसंहार करून पूर्ववत् प्रमाणें आपलें स्वरूप धारण केलें. आणि सभेंतून उठते समयीं सकल ऋषींची आज्ञा घेऊन सात्यकी आणि कृतवर्मा या उभयतांस दोन हस्तांमध्यें धरून कृष्ण निघाले. तसेच नारदादि सकल ऋषिगण अदृश्य झाले. श्रीकृष्ण सभेंतून निघाला हें पाहून सकल कौरव, क्षत्रिय समुदायासहवर्तमान कृष्णाच्या मागून निघाले. त्याकाळीं

दारुकानें कृष्णाचा रथ सिद्ध करून आणिला असतां प्रथम कृतवर्मा रथाव-र आरूढ झाला. नंतर श्रीकृष्ण रथांत आरूढ होणार तों धृतराष्ट्र भाषण कर-तो. हे जनार्दना, माझे पुत्रांमध्यें शौर्य व बल किती आहे तें तूं प्रत्यक्ष पाहिलेंस नां. आतां तुला यांच्या बलाविषयीं विचार नको. कुरूंचा शम व्हावा ह्मणून तूं येथें आलास. त्या तुला बंधन करण्याची माझे पुत्र इच्छा करतात. ही माझ्या पुत्राची अवस्था आहे. आतां माझ्याविषयीं तूं कांहीं शंका धरूं नको. पांडवां विषयीं माझा किमपीही पापयुक्त अभिप्राय नाहीं. वारंवार मीं सुयोधनास बोध केला, त्याचा अभिप्रायही तूं जाणलास. आणि कौरवांसही त्याचा अभि-प्राय ज्ञात आहे. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें धृतराष्ट्राचें भाषण ऐ-कून श्रीकृष्ण, धृतराष्ट्र, द्रोण, पितामह, भीष्म, विदुर व बाल्हिक यांस बोल-तात. हे मित्र हो, हा दुष्ट, मंद दुर्योधन मोठें अरिष्ट उपस्थित करून बसला आ-हे. धृतराष्ट्र तर ह्मणतो मी परस्वाधीन माझ्याकडे कांहीं नाहीं. अस्तु. आतां तुह्मांस कलांस विचारून मी पांडवाकडे जातों. असें भाषण करून श्रीकृष्ण निघाला असतां मागून सकल कौरव, पितामह भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचा-र्य, विदुर, धृतराष्ट्र इत्यादि गेले. श्रीकृष्ण भगवान् कौरव सभेंतून निघाल्या नंतर पितृस्वसा जी कुंती तिला भेटण्याकरितां विदुरगृहीं गेला. असा वि-षय या अध्यायांत आहे.

१३२. अध्याय एकशें बत्तीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, श्रीकृष्णानें कुंतीचे गृहीं प्रवेश करून चरणांस नमस्कार केला. आणि कौरव सभेंत जें वर्तमान झालें तें संक्षेपानें कुंतीस सांगून भाषण केलें. हे पितृस्व-से, मी नानाप्रकारच्या वाक्यांनीं दुर्योधनास बोध केला. तसाच ऋषींनींही त्या-स बहुतप्रकारें बोध केला, परंतु तो कोणाचें ऐकत नाहीं. याजवरून दुर्योधन व त्यास जे वश झाले आहेत ते सकल काल पक्क झाले असें मी मानितों. आ-तां पांडवांकडे जाण्याविषयीं मला आज्ञा असावी. पांडवांस कांहीं निरोप सांग-बयाचा असल्यास सांगावा, ह्मणजे त्याप्रमाणें मी जाऊन त्यांस सांगेन असें ऐकून कुंती भाषण करते. हे केशवा, युधिष्ठिरास माझा निरोप सांग कीं, हे पुत्रा, पृथ्वीपालन धर्माचा विपर्यास करूं नको. जेणेंकरून क्षत्रिय धर्म—

राहील असें कर. पूर्वी ब्रम्हदेवानीं क्षत्रियास धर्म सांगितला आहे कीं, ईश्वरा च्या बाहूपासून क्षत्रियाची उत्पत्ति यास्तव बाहुवीर्ये करून क्षत्रियानीं उप जीविका करावी. आणखी ही याविषयीं कोणी वृध्दानीं मला एक गोष्ट सांगि तली आहे ती तुला सांगतों. कोणे एके कालीं कुबेर प्रसन्न होऊन मुचकुंद ना मक राजास पृथ्वीचें दान करीत असतां मुचकुंदानें वैश्रवणास सांगीतलें कीं मी क्षत्रिय आहें, बाहुवीर्याच्या आश्रयें करून पृथ्वीचें राज्य संपादन करीन प रंतु तुजपासून दान घेणार नाहीं. असें ऐकून कुबेर संतुष्ट झाला पुढें कांहीं दि वसानीं मुचकुंदानें आपले बाहुबलें करून सकल पृथ्वी वश केली आणि क्ष त्रियधर्मामध्यें तो परम रत झाला. हे श्रीकृष्णा राजानें प्रजेचें रक्षण धर्में करू न केलें असतां प्रजेचें चतुर्थांश पुण्य राजास प्राप्त होतें, राजा जर धर्मा चरण करील तर त्यास देवत्व प्राप्त होईल आणि अधर्म जर संपादन करील तर नरकीं जाईल, राजानें दंड नीति चारी वर्णांवर धर्मप्रमाणें ठेवावी, स कल प्रजा धर्मास लावाव्या, जर राजा आपले धर्में करून दंड नित्यादिद्वारा सकल प्रजांचें रक्षण उत्तम करीत आहे तर त्याच कालीं कृतयुग प्रवृत्त झालें म्ह णून समजावें. अरे, काल राजास कारण किंवा राजा कालास कारण असा जर तुह्मास संशय आला असेल तर राजा कालास कारण आहे. कृतयुगाची प्रवृ त्ति राजाचें आचरणानें होते. तसेंच त्रेतायुग, द्वापार आणि कली राजाचे आचरणानेंच होतात. राजा उत्तम आचरणाच्यायोगें स्वर्गास जातो म्ह णून यास कृतयुग असी संज्ञा प्राप्त झाली, त्रेतायुगीं राजाचा धर्म कांहीं-सा कमी असतो त्यामुळें स्वर्गी जाण्यास कांहीं योग्यता कमी होते, द्वा-पार युगीं राजाची जसी प्रवृत्ति होईल त्या प्रवृत्ति प्रमाणें यथाभाग पु ण्यफळें प्राप्त होतात. कलयुगीं तर राजाचा मार्ग अत्यंत पापयुक्त असतो म्हणून तो दुष्कर्माच्या योगें शाश्वत नरकीं वास करतो. तस्मात् राजदोषें-करून चराचर जगतास दोष लागतो यास्तव माझे पुत्रास सांग कीं, पितर-पितामह उचित जे राजधर्म आहेत ते पहा. प्रस्तुत कालीं जो तूं मार्ग अवलं बित केला आहेस तो राजऋषीस संमत नाहीं. तूं धर्म सोडून वागतोस; या-स्तव तुला उत्तम फल कधींही प्राप्त होणार नाहीं. हे कृष्णा, प्रस्तुत कालीं,

धर्मराजानें परम प्रीति करून ज्याधर्माचा अवलंब केला आहे त्याधर्मानें वागण्या विषयीं पांडुराजानें, मी व पंडूच्या पित्यानें त्यास कधींही आशीर्वाद दिल्हा नव्हता. यज्ञ, दान, तप, शौर्य, प्रज्ञा संतान इत्यादिकांचा मी पूर्वी स्वीकार केला आहे. मनुष्य आणि देवता यांचें आराधन केलें असतां यालोकीं आयुष्याची वृध्दी होऊन परलोकींही सुख होतें. पुत्र होण्या करितां पितर देवता बहुत इच्छा करीत असतात कारण स्वाहास्वधादिकें करून देवता व पितर यांची तृप्ती होते. दान, अध्ययन, यज्ञ, प्रजापरिपालन हे गुण जन्मता क्षत्रियास आहेत मग हा धर्म असो अथवा अधर्म असो असें मला वाटतें. पांडव नर मोठे विद्वान ज्ञानी आहेत ते धर्माचा व्यतिक्रम करणार नाहींत. हे कृष्णा, पांडवांनीं मोठमोठ्या विपत्ती भोगिल्या. कोणे एके दिवशीं माझ्या पुत्रांस क्षुधा लागली होती हे पृथ्वीपति जरी होते तथापि कांहीं उपाय चालेना. तेव्हा कोणी एक दानपती शूर होता त्याकडे त्यांनीं याच्ञा करून क्षुधेची शांति केली. अस्तु. विशेषें करून माझे पुत्रांस इतकेंच सांग कीं दानानें अथवा बलानें अथवा प्रियभाषणानें राज्य प्राप्त झाल्यास करून घ्यावी त्यांत आपला धार्मिकपणा नष्ट होत नाहीं. परंतु क्षत्रियांस भैक्ष्यवृत्ती नाहीं, कृषीकर्म नाहीं, म्हणून धर्मास सांग कीं बाहुवीर्यानीं उपजीविका कर तूं क्षत्रिय आहेस; आपला पित्र्यंश निमग्न झाला आहे त्याचा पुन्हा उध्दार कर. अरे धर्मराजास सांग कीं, बांधव हीन होऊन दुसऱ्याचे घरीं कालक्षेप करीत आहे या दुःखासारखें दुसरें दुःख कोणचें नाहीं. तुमच्या सारखे माझे पुत्र असतां दुसऱ्याचे घरीं मी उपजीवन करावें, अरे कांहीं लज्जा धारण कर. आपलें राज्य लवकर स्वाधीन करून घे, आपले पितामहास नरकामध्यें टाकू नको आणि क्षीण पुण्य प्राण्यासारखा बांधवांसह वर्तमान पापिष्ट योनीस जाऊं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

१३३. अध्याय एकशें तेहतीस :— कुंतीभाषण करते हे श्रीकृष्णा, अरे क्षत्रियानीं निरुद्योगी बसूं नये, शत्रूंचें भय बाळगूं नये, निरंतर व्यवसाय करीत असावा. याविषयीं तुला येक पुरातन इतिहास विदुला नामक राजपत्नी आणि तिचा पुत्र या उभयतांचा संवाद सांगतें. कोणी एक

राजाची भार्या महायशस्विनी उत्तम कुलांत उत्पन्न झालेली. क्षात्रधर्मा मध्यें रत, विदुला नामक राजपत्नी होती तिला एक औरस पुत्र होता, त्यास कोणी एके काळीं सिंधुराजानें युध्दांत पराजित केला असतां बहुत खिन्न होऊन त्यानें स्वगृहीं स्वस्थ शयन केलें. हें वृत्त कळतांच माता पुत्राच्या सन्निध येऊन भाषण करते अरे, तूं माझा पुत्र नव्हेस, माझ्यापासून तुझी उत्पत्ति नाहीं. अरे मूर्खा, दुष्टांस आजन्तूं हर्ष उत्पन्न केलास काय? तुझी उत्पत्ति माझ्यां पासून नाहीं, पित्या पासूनही नाहीं. असा तूं पुत्र कोठून उत्पन्न झालास. अरे ज्या पुरुषास कोपनाहीं तो पुरुष अत्यंत क्लीब त्याची गणना कोठेंच नाहीं. अरे पुत्रा ऊठ निजलास काय! शत्रूनीं तुला जिंकिला असतां तुला निद्रा बरी येते, सकल शत्रूंस हर्ष उत्पन्न करून बंधुवर्गास शोक उत्पन्न केलास. अरे, शत्रूंच्या दंष्ट्रा विदारण करून मरधापाव असा मोठा पराक्रम कर, शत्रूंनीं छिद्रें काय काय आहेत तीं पहावीं तसें न करितां भेलकून कां शयन करतोस? राजाचे घरीं कर्कश आणि मृदु असे पुत्र होऊं नये तर हे पुत्रा, तूं राजाचे घरीं क्षात्र कुळांत उत्पन्न झालास असा तूं मृदु होऊं नको, संग्रामामध्यें जाऊन आपलें मानुष कर्म काय आहे तें अगट कर, तें केलें असतां क्षत्रधर्मापासून अनृणी होऊन तुझी लोकांत अपकीर्ति होणार नाहीं. युध्दांत जय मिळो अथवा न मिळो त्याविषयीं पंडित शोक करीत नाहींत परंतु आपले कार्याचा अविछिन्न उद्योग चालवितात. आपले प्राणाकडे पहात नाहींत. आपले वीर्याचा उद्भव करून राज्य मिळीव अथवा युध्दांत मृत्यु पावून स्वर्गलोकींची शाश्वत गती मिळीव. तूं जर पराक्रम केला नाहींस तर इष्टापूर्तादिकें करून जी कीर्ति मिळविली अससील ती नष्ट होईल व भोगास साधनीभूत जें जें तूं कर्म केलें अससील तें सकल नष्ट झाल्यावर तूं वांचून फल काय? अरे, असा गुण धारण करावा कीं, जेणें करून सकल आपले बंधुवर्ग इत्यादि सुखानें पावतील. कोणी एक पुरुषास स्वल्प लाभ जरी झाला तथापि तो त्याचें वर्णन करून लोकामध्यें असें म्हणतो कीं, अहो हा मला पहा किती लाभ झाला आहे; तो कृपु

रुष समजावा, त्याचें जीवन ही अल्प, तसा लाभ ही अल्पच होय. ज्या पुरुषास निरंतर असी काळजी असते कीं, आपण हें हीनकर्म जर न करूं तर आपलें जीवन कसें होईल अशा पुरुषाच्या बंधुजनास सुख कोठून होईल. अरे पुत्रा तूं अमंगलकारी कुरुवंशाचा नाशक पुत्ररूपानें कलीच काय असा माझ्यापासून कसा उत्पन्न झालास, माझ्यासारखी स्त्री तुझ्यासारख्या पुत्रास कधींही प्रसवली नसेल. अरे, तेजस्वी होऊन पराक्रमें करून शत्रूंचा वध कर. जे आपले इष्ट आहेत त्यांचे शिरांवर निरंतर पादप्रक्षेप करण्याचा यत्न करीत असावा हाच पुरुषाचा पुरुषार्थ. आतां तुझा शत्रूनीं पराभव केला त्या दोषापासून मुक्त होण्याकरितां लोहमय हृदय धारण करून पूर्वीं जें तुझें नष्ट झालें असेल तें आपलें मिळीव. या प्रकारें विदुला नामक राजपत्नीनें पुत्रास भाषण केलें असतां पुत्र उत्तर देतो हे माते, मी युध्दांत मरण पावून पृथ्वीचें राज्य जर तुला मिळालें तर यांत तुला सुख काय आहे. असें ऐकून माता भाषण करिते अरे पुत्रा, धारातीर्थीं शस्त्रानें जे लोक मरण पावले असतील त्यांच्या लोकास तुझासारखे जात नाहींत यास्तव धारातीर्थीं जर गेलास तर उत्तम लोकीं जाशील. हे पुत्रा, भृत्यजनानीं हीन, परपिंडोपजीवीपणा, निर्बल यांचे सारखी तुझी वृत्ती नसो, तुझा योगानें ब्राम्हण आणि सुहृज्जन उपजीवन करोत. ज्या शूर पुरुषाच्या पराक्रमानें बांधव सुख पावतात त्याचेंच जीवन उत्तम. जो मानव आपल्या बाहुबलानें उपजीवन करतो तो यालोकीं उत्तम प्रकारची कीर्ति मिळऊन परलोकीं चांगल्या गतीस जातो. असा विषय या अध्यायांत आहे.

१३४ अध्याय एकशेंचवतीस :— विदुला भाषण करिते हे पुत्रा, या अवस्थेंत जर आपल्या पौरुषाचा त्याग करण्याची इच्छा करसील तर दुष्टसेवित लोकास लवकरच जाशील. अरे, नीतिशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, जो क्षत्रिय आपल्या पराक्रमाची यथाशक्ति ख्याती करीत नाहीं त्यास चोर असें म्हणावें. अरे, तूं अत्यंत व्यसनग्रस्त झालास असें पाहून तुझा शत्रु जो सिंधुराज याजकडील योध्दे परम हर्ष पावतील या

स्तव तूं असें करूंनको, साह्यव संपत्तीनें साधन करून आपलें पौरुष प्रग ट कर म्हणजे तुझ्या शत्रूंस हर्ष होणार नाहीं. तुझे स्वकीय जे असतील त्यां च्या संग्रह करून गिरिदुर्गादिकें यांमध्यें शत्रूंस व्यसन ग्रस्त कर. अरे, हा देह अजरामर नाहीं कधीं तरी या देहास जरामृत्यु आहेच तें कधीं चुकत नाहीं. संजय म्हणून तुझें नाव आहे त्याना वाचें सार्थक कर. कोणे एके दिवशीं तूं बाल असतां कोणी ब्राम्हण आला होता त्याणें असें सांगीतलें कीं, या पुत्रास प्रथम मोठी विपत्ति प्राप्त होऊन नंतर कांहीं कालानीं हा मोठा भाग्यशाली होईल आणि वारंवार वृद्धी पावेल. त्या ब्राम्हण भाषणाचें म ला वारंवार स्मरण होऊन हे तात, तुझ्या विजयाची आकांक्षा करीत बस लें आहें आणि वारंवार तुला युध्दानें उत्तेजन देतें यास कारण ब्राम्हणाचें भाषणच होय. युध्दांत आपला पराजय होई अथवा जय हो याचा विचार न करितां प्रथम युध्दास सिध्द व्हावें, शेवटीं जो लाभ होईल तो होवो. ज्या पुरुषास निरंतर अशी काळजी असते कीं, मला आज अन्न मिळालें, उद्या मिळेल किंवा नाहीं अशी अवस्था ज्यास प्राप्त झाली असेल त्यास धिक्कार असो. अरे, मी मोठ्या कुलांत उत्पन्न झाल्यें तेथून पतीच्या कुलांत आलें तेंही कुल मोठेंच, मर्त्यानें सत्कृत केलेलीं उत्तम वस्त्रें, आभरणें व भूषणें मी धारण करणारी. असें माझें ऐश्वर्य पूर्वीं पासून होतें ती मी आतां दुर्बल झाल्या सारखी पाहून तूं जिवंत राहवें मका य ! हे पुत्रा, यांत तुझ्या पुरुषत्वाची काय शोभा आहे. पूर्वीं ब्रम्हज्ञानी जो ब्राम्हण या नें मला जें सांगितलें आहे तें न घडलें तर माझें हृदय सर्वथा विदीर्ण होईल त्याकालीं मी असा निश्चय करीन कीं, मला पति नाहीं, पुत्र नाहीं, ब्राम्हणाची भाषणें सर्वथा मिथ्या आहेत तस्मात् आपला देह जेणें करून क्षीण होईल तो यत्न करावा. अरे, माझ्या आश्रयानें आजपर्यंत बहुत जन सुख पावले ती मी आज दुसऱ्याच्या आश्रय करून राहण्याचा सम य आला असें जाणून जीवाचा त्याग करीन. यास्तव हे पुत्रा, आम्ही मृत प्राय झालों या कारणास्तव आमचें तूं संजीवन कर. हे सकल शत्रु यां चा पराजय करण्यास तूं योग्य आहेस, अरे पुत्रा, विरक्तचित्त रूप जी तु-

झी वृत्ती झाली आहे ती अत्यंत क्लीब असें जाणून तिचा त्याग कर. एकशत्रूचा वध केल्यास म्हणजे तुझी मोठी ख्याती होईल. पहा बरें ज्याकाळीं वृत्रासुराचा इंद्रानें वध केला त्या काळीं त्याला महेंद्र पदवी प्राप्त होऊन यज्ञामध्यें सोमपात्र प्राप्त झालें यास्तव युध्दांत श्रेष्ठ असतील त्यांचा वध कर. असें केलें असतां तुझ्या कीर्तीची प्रशंसा होईल; त्याच कालीं सकलशत्रु भयाभीत होऊन तुला नम्र होतील. तुला युध्दांत जय मिळाला असतां राज्यप्राप्ती होईल, मृत्यु आला असतां तूं स्वर्गी जाशील. पहा अशीं दोन द्वारें अमृतोपम प्राप्त झालीं आहेत यांची व्यवस्था पाहून येकातरी द्वाराचा अवलंब कर. हेंतात, तुझ्या कुलांत युध्दामध्यें शत्रूस वश होऊन उपजीवन करणारा असा पुरुष आजपर्यंत जन्मास आला नाहीं यास्तव तूं दुसऱ्याचा सेवक होऊन उपजीवन करणें योग्य नाहींस कारण क्षत्रियानें इतर वर्णांचें नियमन करीत जन्मपर्यंत राहवें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३५ अध्याय एकशें पस्तीस:— संजय नामक विदुला पुत्र आपले मातेस भाषण करतो हे करुणे तूं माझी माता असतां लोहमय हृदय करून मला युध्दार्थ योजितेस काय? तशांतून तुला मी एकच पुत्र असतां असें मला भाषण करण्यास योग्य नाहींस; जर मी युध्दांत मरण पावलों तर तुला पृथ्वीचें सकल राज्य जरी मिळालें तरी काय उपयोग आहे. असें ऐकून माता भाषण करिते हे पुत्रा, विद्वानास सर्व अवस्था धर्म व अर्थ संपादनार्थ आहेत असें जाणून तुला मी वारंवार युध्दाची प्रेरणा करितें. क्षत्रियवर्णास युध्दानें उपजीवन करणें अवश्य आहे तशांतून हा युध्दकाल आला आहे यांत युध्द करणें हें योग्य आहे. ज्याकाळीं जें उपस्थित होईल त्याचा अवलंब केलाच पाहिजे ही संभाविताचीरीतच आहे यांत कांहीं दोष नाहीं व अपकीर्तीही नाहीं. या लोकांत असें अज्ञान आहे कीं, हा पंचमहा भौतीक देह अनात्मा असतां त्याजवर आत्मबुध्दी ठेऊन देहास जें प्रिय तेंच करण्याची इच्छा करतात हा त्यांचा मोठा दोष आहे तसा तुला मी युध्दास उत्तेजन देतें हा माझा दोष

नाहीं. जरी मी युध्दाराउत्तेजन न देईन तर मातृलोकीं माझा उपहास होईल. हे पुत्रा, मी म्हणतें याप्रमाणें तूं आचरण केलें असतां मला अत्यंत प्रिय होईल, ज्याचें धर्माकडे लक्ष असून जो इतर निंदित कर्माचा त्याग करतो, देवमानुष कृत्यास जो अनुसरतो, साधूनीं आचरित मार्गाचा जो अवलंब करतो, निरंतर सर्वजनांस नम्रभाव दाखवितो तोच पुत्र, तोचमातुःत्यापासून स्करसाची इच्छा करावी. हे पुत्रा, क्षत्रियवर्ण हा ईश्वरानें युध्दा करितांच उत्पन्न केला आहे तर युध्दांत क्षत्रियाचा जय हो अथवा पराजय हो क्षत्रियास इंद्रसलोकता प्राप्त होईल. जो क्षत्रिय अमित्रास वश करून सुखाची इच्छा करतो त्याक्षत्रियास या भुवनीं अथवा स्वर्गीं ही स्करप्राप्त होणार नाहीं मग या लोकीं कोठून होईल. जो पुरुष निरंतर शत्रूवर क्रुध्द होऊन त्याच्या पराजयाची इच्छा करतो तो पुरुष शत्रूचें निकृंतन कधींतरी निःशेष करीलच. ज्या पुरुषास किती जरी ऐश्वर्य प्राप्त झालें तथापि तो स्वल्पच मानितो कधींही त्या ऐश्वर्यापासून तृप्त होत नाहीं अशा पुरुषास त्याच्या इच्छे प्रमाणेंच अखंडित ऐश्वर्य प्राप्त होतें. क्षत्रिय स्वराष्ट्र परिपालनानें जरी तृप्त झाला तथापि परराज्याची इच्छा त्याणें ठेविलीच पाहिजे. असें भाषण ऐकून पुत्र भाषण करतो हे माते, तूं असें निर्दय भाषण करूनको माझावर कृपाकर. असें ऐकून माता भाषण करते हे पुत्रा, जें तूं मनांत आणिलें आहेस तें तुझें कल्याण नव्हे. जर युध्दामध्यें सैंधवानें प्राण हरण करसील तर तुझें कल्याण आहे. त्याच कालीं मी तुझी पूजा व सत्कार करीन. असें ऐकून पुत्र भाषण करतो हे माते, मजपाशीं द्रव्यसंचय नाहीं, कोणी मला साह्य नाहीं तेव्हां युध्द केलें असतां माझी अर्थसिध्दी कसी होईल. असें जाणून ह्या दारुण अवस्थेंत मला घालण्याचा यत्न करूनको, असें ऐकून माता भाषण करते हे पुत्रा, पुरुषानें असें कधींही मानूं नये आपला काल प्रतिकूल आहे तर जे द्रव्यहीन पूर्वी असतात ते कांहीं कालानी द्रव्यवान् होतात, द्रव्यवान असतात ते कांहीं कालानी द्रव्यहीन होतात म्हणून याचा खेद कशाकरितां करावा, कोणी उद्योगाचा परित्याग केला आहे की काय? जो

आपल्यास उद्योग कर्तव्य आहे तो अत्यादरें करून करावा त्यांत लाभ- हो अथवा हानिहो हें पंडितांचें लक्षण होय, बालिश मूर्ख आहेत ते क्रोधानें धर्मादिकांची प्राप्ती होण्याची इच्छा करितात तें त्यांचें अत्यंत मौर्ख्य होय. यथाशास्त्र यथान्यायानें आपल्यास कर्तव्य त्याचापरित्याग करूं नये. जसा दिवाकर प्राक् दिशेस प्राप्त होतांच तमोनाश सहज होतो तसा पुरुष उद्योगाविष्ट झाला असतां त्याचे शत्रुसहजच तत्काल नाशाचे- मार्गांत प्रविष्ट होतात. हे पुत्रा, तूं युध्दास उद्यक्त हो म्हणजे तुला त्याचे उपाय सहजच सुचूं लागतील, साहाय्य मिळतील. काय कर्तव्य, काय कर्तव्य नाहीं त्याचे विचार तुझ्या ध्यानांत येतील. याप्रकारें तूं वर्तला असतां- शत्रुगणाचा भेद करसील. प्रियभाषणानें अथवा अर्थानें लोकांस साध्य केलें असतां शत्रूंचा त्याग करून ते लोक तुझें हित करतील आणि तुझा शत्रु त्याकाली पळेल. जो क्षीणायु पुरुष आहे त्याचा त्याग बांधवजन ही करतात मग इतर जन करतील यांत काय आश्चर्य आहे. संभावित असतील त्यांस साह्य करून शत्रूंस वश कर म्हणजे राज्याची प्राप्ती होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१३६ अध्याय एकशें छत्तीस:— माता भाषण करते हे पुत्रा, राजास कसी जरी अपत्ती प्राप्त झाली तथापि त्यानें भयाभीत होऊं नये. राजा भित्रा आहे असें जाणून सैन्य व अमात्य वर्ग राजाचा त्याग करून - जातात. सकल राष्ट्र निवासि लोक भीत राजाचा त्याग करतात. परराष्ट्र- निवासि लोकांस फार सुख होतें. यास्तव हे पुत्रा, तूं जर भयधारण करसील तर सकल सुहृदयांस भय उत्पन्न होऊन सर्वांचें हृदय विदीर्ण होईल. हें माझें भाषण तूं जाणून तसें करण्यास प्रवृत्त होसील तर तुझा विजयच होईल. हे पुत्रा, लवकर ऊठ आणि संग्रामामध्यें विजयी हो. कोशसमूह तुझा संपादित केलेला तसाच आहे कोणी अपहृत केला नाहीं, युध्दाची सिध्दता केलीस म्हणजे तुला साह्य मिळतील, पूर्वींचे तुझे बहुत सुहृद आहेत ते तुझें साह्य करतील. धैर्यधारण केलें म्हणजे सकल लोक आपल्यास सहज साह्य होतील, आपण धैर्यहीन झा

लों म्हणजे इतरांस आपलें साह्य करण्याची काय गरज आहे. जसी राजा-
ची इच्छा होते त्या अनुसंधानानें अमात्य ही तसेंच आचरण करितात. इ
तकें मातेचें भाषण ऐकून पुत्र बोलतो हे जननी, ज्यापेक्षां तूं माझी माता
शिक्षाकरणारी आहेस त्यापेक्षां मी आतां शत्रूनीं बुडविलेलें राज्य उध्दृत-
करण्याविषयीं सिध्द होतों. एकप्राण त्याग करीन अथवा पितृराज्य पुन्हा सं
पादन करीन. हे माते, तूं कांहीं चिंता करूंनको. शत्रूचें नियमन होऊन माझा
विजय झालेला लवकरच तूं पाहशील. कुंती भाषण करते हे श्रीकृष्णा,
अश्वांस शिक्षा देऊन ते जसे सन्मार्गानुगामी होतात तसा संजय नाम-
क विदुला पुत्रानें मातेच्या वाक्बाणसाह्यानें आपलें राज्य शत्रूपासून-
शौर्यानें ग्रहण केलें तसें माझ्या पुत्रानीं करावें. असी माझी इच्छा आहे. हे.
उध्दर्षण नामक आख्यान परम भयंकर शौर्यास उत्तेजन देणारें आणि
तेजोवृध्दी करणारें असें आहे हें ऐकिल्ये असतां शत्रुपीडित राजा ज-
री असला तथापि त्यास शौर्यतेज येऊन तो शत्रूंचा नाश करील. या-
स्तव हें आख्यान राजानें व राजाच्या मंत्र्यानें अवश्य श्रवण करावें. या-
आख्यानास जय नामक इतिहास म्हणतात. हा इतिहास शत्रुजयेच्छू
नें श्रवण केला असतां त्यास पृथ्वी साध्य होते. गर्भिणी स्त्रियानीं श्रवण
केलें असतां परम वीर्यवान् पुत्र होतो. असा विषय या अध्यायांत आ०
१३७ अध्याय एकशें सदतीस :— कुंती भाषण करते हे केश
वा, अर्जुनास माझा असा निरोप सांगकीं ज्याकाळीं तूं माझ्यापासून
उत्पन्न झालास त्याकाळीं माझ्याआसमंताद्भागीं बहुत स्त्रिया बस-
ल्या होत्या तेव्हां अशी आकाशवाणी झाली कीं हे कुंती, हा तुझा पुत्र इं
द्रासमान वीर्यवान होईल. संग्रामामध्यें सकल कौरवांस जिंकील,
भीमसेन व वासुदेवाच्या साहाय्यानें नष्ट झालेल्या पित्र्यंशाचा उध्दार
करील, आणि भ्रात्यांशीं सहवर्तमान तीन अश्वमेध याग करील ती-
आकाशवाणी सत्य करण्यास हे कृष्णा, तूं समर्थ आहेस, हे कृष्णा, भी
म व अर्जुन यांस सांगकीं जाकरितां क्षत्रियस्त्री पुत्रास प्रसवत्ये त्याचा-
हा काल आला आहे. हे कृष्णा, द्रौपदीस निरोप सांगकीं, माझे पुत्रांचे हा-

यीं जें तूं वर्तन केलेंस तें युक्त आहे. माद्रीपुत्र नकुल, सहदेव यांस सांगकीं क्षत्रधर्मानें विषय भोग संपादन करा. दुःशासनादिकानीं द्रौपदीस सभेंत नेलें व पांडवांस जें भाषण केलें त्यापासून मला बहुत दुःख होत आहे- यास्तव पांडवांस या गोष्टीचें स्मरण कर, आणि मी कुशल विचारलें म्हणून सांग व त्यांचें रक्षण कर. याप्रकारें कुंतीनें भाषण केलेलें ऐकून कृष्ण- कुंतीस प्रदक्षिणा करून जाण्यास सिध्द झाला आणि भीष्मादिकांसभा घारे जाण्यास आज्ञा देऊन कर्ण व सात्यकी यांसह वर्तमान रथारूढ झाला तेव्हां सकल कौरव एकत्र होऊन बोलले कीं ही गोष्ट मोठी आश्चर्याची झाली, आज सकल पृथ्वी दुर्योधनाच्या मूर्खपणानें मृत्युपाशवश झाली. असें बोलत आहेत तों रथामध्यें कर्णासह वर्तमान श्रीकृष्णानीं कार्यविचार कर्तव्य तो करून कर्णाचें विसर्जन केलें आणि ते उपप्लव्य नगरीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१३८ अध्याय एकशें अडतीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुंतीचें भाषण ऐकून भीष्मद्रोण दुर्योधनास बोलतात हे पुरुषव्याघ्र, कुंतीनें श्रीकृष्णास केलेल्या भाषणावरून स्पष्ट दिसतें कीं राज्यांश पांडवांस दिल्यावांचून त्यांची शांति व्हावयाची नाहीं. अरे, सभेमध्यें द्रौपदीस तुम्हीं आणिलीत तेणेंकरून ते फारच क्रूर झाले आहेत, गांडीवधनुष्य व अक्षय्य भाते यांसहित रथारूढ झालेला अर्जुन, तसेंच भीमसेन, नकुल, सहदेव यांस ज्या कालीं पाहसील त्याकाळीं तुझे चित्तास भ्रम उत्पन्न होईल. तशांतून भगवान् वासुदेव त्यास साह्य झाला आहे आतां- तर पांडव तुझी क्षमा करणारच नाहींत. हे महाबाहो, विराटनगरीं एकट्या पार्थानें तुम्हां सकलांचा पराभव केला हें तूं प्रत्यक्षच पाहिलेंच आहे, यास्तव हे भरतश्रेष्ठ, पांडवांशीं शम करून शांत हो आणि ज्येष्ठ भ्राता जो धर्मराजा यास भ्रात्यांसह वर्तमान शरण जाऊन आपल्या अपराधाची क्षमा माग, धर्मराज आपल्या हस्तें करून परमप्रीतीनें तुझें ग्रहण करील. जर युध्दाचा आरंभ केलास तर तुला निश्चयें करून सांगतों- कीं यास कुलांचा क्षयच होईल, तुझाविषयीं दुश्चिन्हेंही फार होतात. आ

काशांतील ताऱ्यांचा उत्पात होत आहे, मृगपक्षी दारुण शब्द करतात, वाहनें रोदन करतात, सैन्याच्या आसमंताद्भागीं गृध्र, काक, बक इत्यादि अमंगल कारक पक्ष्यांचे समुदाय संचार करतात. यास्तव हे महाबाहो, पित्याचें, मातेचें आणि आमचें वाक्य ऐकून शम पाव. नाहींपेक्षां गांडीव धनुष्याचा शब्द व भीमाचा सिंहनाद ऐकिल्यावर माझ्या भाषणाचें स्मरण करशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१३९ अध्याय एकशें एकुणचाळीस:— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीष्मद्रोणाचें भाषण ऐकून दुर्योधन उत्तर देण्यास उद्युक्त झाला नाहीं हें पाहून प्रथमतः भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, सत्यवादी अर्जुन यासहवर्तमान आम्ही युध्द करणें या दुःखासारखें दुःख आम्हांस दुसरें कोणाचें नाहीं. द्रोण भाषण करतात हे दुर्योधना, माझा पुत्र जो अश्वत्थामा याचे ठाई जी माझी प्रीति आहे त्यापेक्षांही कपिध्वजावर माझी प्रीति अतिशय आहे त्या अर्जुनासहवर्तमान युध्द करणें आमचे कपाळीं आलें अस्तु या क्षात्रधर्मास धिःकार असो. धनुर्विद्या अर्जुनास माझ्यापासून प्राप्त झाली तसेंच त्यापुढें इतर धनुर्धारी योध्दे सत्कार करण्यास योग्य होत नाहींत त्या अर्जुनासहवर्तमान आम्हांस युध्द करणें प्राप्त झालें. पापी पुरुषांचें पापापासून जरी लोकानी निवारण केलें तथापि त्यांची बुध्दी निरंतर पापाकडेच असते आणि जो पुरुष उत्तम कुलीन आहे त्यास पाप करण्यास जरी प्रेरणा केली तथापि तो पापाचा तिरस्कार करून आपलें जेणें करून शुभ होईल तिकडेच लक्ष ठेवितो, तसी दुर्योधना तुझी अवस्था झाली आहे. आज पर्यंत पांडवांशीं तुम्हीं कपटरूपानें वागलांत त्यांच्या अहितविषयीं बहुत यत्न केले त्यांचीच फलें ही आतां तुम्हांस प्राप्त होतील. हें मोठें वैर तुम चें उभयतांचें याच कारणानें उत्पन्न झालें. हे दुर्योधना, धृतराष्ट्र, विदुर यांणी व आम्हीं तुला वारंवार बोधित केला असतां तूं आमचें भाषण ऐकिलें नाहींस आतां अकल्याणरूप आपत्ती न सहजच प्राप्त होतील. मी मोठा बलवान्, माझें सैन्य बहुत आहे त्यापेक्षां सैन्यरूप समुद्र तरून

जाण्यास काय कठीण आहे असें मानून युधिष्ठिराची श्री हरण्याची इच्छा करतोस परंतु युधिष्ठिराची श्री तुझ्यानें कधींही हरण करवणार नाहीं. त्या त्यांसह वर्तमान युधिष्ठीर वनांत जरी आहे तथापि तो राज्यारूढच आहे असें समज. सकल राजे जितके पृथ्वीवर आहेत तितके युधिष्ठीराचे किंकर आहेत, कुबेर साक्षात् धर्मराजाचा सखा आहे त्यास धर्मराजानें निरोप पाठविला असतां तो असंख्याक रत्नरासी पाठवून देईल. पांडव तुझा नाश करण्याविषयीं मनावर घेतनाहींत ज्याकाळीं मनावर घेतील त्याकाळीं हें राज्य त्यांस करतलमय आहे. धर्मराजानें आजपर्यंत ब्राम्हणांस अपरमित द्रव्य दिल्हें, अग्नीनें होम द्रव्यें करून तर्पण केलें, वेदाध्ययन यथासांग केलें. ज्यानीं तुझा त्याग केला. स्वरवत्यन्न केलें, राज्य, मित्र, बांधव यांचा त्याग करून ते वनामध्यें जाऊन राहिले असतांही त्यां त्याशीं तूं विग्रह करण्याची इच्छा करतोस तर अतःपर तुला मोठी आपत्ति प्राप्त होऊन तूं दुःखामध्यें निमग्न होसील. हे दुर्योधनराजा, जरतु ला ऐश्वर्याची इच्छा आहे तर पांडव व्यसनामध्यें निमग्न आहेत असें जाणून तूं त्यांच्याशीं युध्दास प्रसक्त होऊनकोस. असा विषय या अध्यायांत आहे.

१४० अध्याय एकशें चाळीस :— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, माझे पुत्र व इतर राज पुत्र यांसह वर्तमान कर्ण श्री कृष्णास पोहोंचविण्या करितां गेला असतां मार्गांत श्रीकृष्णानें कर्णास आपले रथांत बसवून उभयतांनें काय भाषण झालें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, मार्गांत वासुदेव राधेयास बोलला हे कर्णा, वेदवेदांगपारग ब्राम्हणांची तूं बहुत उपासना केलीस व त्यांपासून वेदाचें तत्वार्थ ही ऐकिलेंस; आणि तुझी उत्पत्ती जरी अविवाहित कन्येपासून झाली आहे तथापि पितृवंशाच तुझा मुख्य वंश आहे असें शास्त्र वेत्ते म्हणतात. यास्तव तूं पंडुराजाचा सुत, पांडवांचा तूं ज्येष्ठ बंधु तुलाच राज्याचा अधिकार आहे त्या अधिकारास प्राप्त हो. पितृपक्षानें सकल पांडव तुझे बंधु, मातृपक्षानें आम्हीं सकल वृष्णी तुझे

संबंधि आहोंन हे पुरुषश्रेष्ठा, असे तुझे दोनी पक्ष मोठे विख्यात सबल आहेत आतां तूं माझ्या समागमें असाच पांडवांकडे चल म्हणजे तुझा हा सकल संबंध धर्मराजास सांगतों म्हणजे पांचपांडव, पंचद्रौपदेय, अभिमन्यु व इतर राजे व राजपुत्र तसेच अंधक व वृष्णी हे तुझा अग्रभागीं येऊन पादाभिवंदन करतील आणि सकलराजे व राजकन्या आपल्या हस्तामध्यें सुवर्णमय कुंभ घेऊन तुला राज्याभिषेक करतील. द्रौपदीस पांचकाल विभाग करून दिल्हे आहेत तसाच तुलाही षष्ठ काल द्रौपदीचा प्राप्त होईल. हे कर्णा, धौम्य नामक ऋषी पांडवांचा उपाध्याय अभिषेक कालीं मोठा होम करील, मोठमोठे विद्वान ब्राम्हण अभिषेक कालीं प्राप्त होतील, तुझे पांच भ्राते व द्रौपदीचे पांच पुत्र, पांचाल चेदी आणि मी तुझा अभिषेक कालीं आसमंतात् भागीं उभे राहूं, युवराज्याचा अभिषेक धर्मराजास करून तो हस्तामध्यें व्यजनें घेऊन तुझ्या पृष्ठभागीं उभा राहील आणि तुझ्या रथाच्या मागें आपला रथ चालवील. महाबली जो भीमसेन तो आपले हस्तामध्यें श्वेत छत्र घेऊन तुझ्या मूर्धप्रदेशीं उभा राहील, अर्जुन तुझें सारथ्य करील. हे कर्णा, फारतर काय सांगूं परंतु सकल अंधक वृष्णींशीं सह वर्तमान मीही तुझा पृष्ठभागीं निरंतर असेन. तूं पांडवां सह वर्तमान राज्याचें शासन करून कुंतीस मोठा आनंद उत्पन्न कर. असें केलें असतां तुझे सकल मित्र परम आनंद पावून तुझी मोठी कीर्ति होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

१४१. अध्याय एकशें एकेचाळीस :— कर्ण भाषण करतो हे केशवा, सुहृद भावें करून माझा कल्याणा करितां जें मला सांगीतलेंस तें सर्व सत्य आहे, तूं माझा परम सखा आहेस, निरंतर माझें कल्याणच असावें अशी तुझी इच्छा फार आहे. मी पांडुराजाचा पुत्र हें मला विदीत आहे. कुंतीनें सूर्याची प्रार्थना केली असतां त्याजपासून गर्भ धारण झालें पुढें त्याच्याच वचनें करून कुंतीनें आपल्या गर्भाचें विसर्जन केलें तोहा मी कर्ण पंडूचा पुत्र कुंतीनें आपली उपहास्यता नव्हावी म्हणून त्या

कालीं माझें विसर्जन केलें त्याकालीं आधिरथी नामा सूतानें आपले गृहीं मला नेऊन राधा नामक आपले भार्येस परम प्रीतीनें अर्पण केलें असतां तीही अपुत्रा होती म्हणून माझे ठायीं अत्यंत प्रेम करूं लागल्यामुळें तिचे स्तनांत दुग्ध उत्पन्न झालें. मूत्र पुरीषोत्सर्ग इत्यादि बाल्यावस्थेंतील दुःखें तिणें बहुत सोसलीं त्या राधेचा त्याग करून तुमच्या कडे येणें आमच्या सारख्यास अयोग्य आहे. सकल लोकही मला आधिरथि-सूताचा पुत्र असें म्हणतात, माझे जातकर्मादि संस्कार यथाशास्त्र त्याणेंच करून सूषेण असें नामाभिधान ठेविलें. पुढें मला ज्याकालीं यौवनावस्था प्राप्त झाली त्याकालीं माझा विवाह केला. नंतर त्या भार्येपासून पुत्रसंतान होऊन पुढें पौत्रादिकही आपत्यें झालीं तीसर्व संतती माझी सूताच्या गृहींच आहे. मला जरी सकल पृथ्वी लब्ध झाली अथवा सुवर्णाच्या राशी बहुत जरी प्राप्त होत आहेत तथापि त्या जरठचें प्रेम माझ्यानें टाकवणार नाहीं. हे गोविंदा, आज तेरावर्षें धृतराष्ट्र कुलीं दुर्योधनाच्या आश्रयानें निष्कंटक राज्याचा उपभोग केला. तसेच नानाप्रकारचे यज्ञयाग केले, माझा आश्रयें करूनच दुर्योधनानें बहुत शस्त्र प्रसंग केले, विद्याभ्यास केला, मी साह्य आहें म्हणूनच दुर्योधनानें पांडवांशीं द्रोहसंपादन केला. आतां मी दुर्योधनाकडे गेलों नाहीं तर-पार्थ व मी या उभयतांनीं एकमेकांचा वध प्रतिज्ञा सकल राजसभेमध्यें केली आहे ती सिध्दीस न जाऊन उभयतांचीही अपकीर्ती या भूमंडळीं होईल. या कृत्यांत कृष्णा तुमचीच हानि होईल जें तूं मनांत योजिलें आहेस तें सिध्दीस जाणार नाहीं. तूं पांडवांचा सहाय्य करतांच आहेस त्यापेक्षां जें जें तुझ्या मनांत आलें आहे तें तें पांडव करतील. आणखीही तुला एक विचार सांगतों त्याप्रमाणें तूं कर. कुंती पासून मी उत्पन्न झालों हें वर्तमान जर धर्मराजास समजलें तर तो आपल्यास राज्याभिषेक करून घेणार नाहीं मी ज्येष्ठ पुत्र आहें असें जाणून तो राज्याचा तिरस्कार करील या स्तव माझा उत्पत्तीचा प्रकार धर्मराजयास तूं किमपि सांगूं नको ही माझी प्रार्थना आहे मला राज्य करण्याची इच्छा नाहीं कदाचित युध्दाम-

ध्यें मलाजरी जयप्राप्तझाला तथापि सकलराज्याचा अभिषेकमी दुर्यो धनास करीन. परंतु ही गोष्ट घडनच नाहीं पांडवांचा हित करता तूं आहेस त्या जपेक्षां धर्मास राज्यप्राप्ती सहजच आहे तशांतून सर्वथा तुझी अनुकूलता त्यापेक्षां धर्मास कांहीं न्यून नाहीं. ज्या पांडवांचा तूं साह्यकारी त्या पांडवां- नीं दुसऱ्याची इच्छा कशा करितां करावी. हे कृष्णा. हास कल क्षत्रियसमु- दाय जमला आहे याचा नाशहो णार. सकल क्षत्रियांच्या गर्दी जीश्री आ हे तिच्या न्हासाचा समय सन्निध आला आहे. दुर्योधनाच्या गृहीं आतां लव करच शस्त्रयज्ञ होणार आहे त्या यज्ञाचा जाणता तूंच आहेस; हे कृष्णा, दुर्योध नास प्रिय वाटावें म्हणून मीजी पांडवांस निंद्य दुष्टभाषणें केलीं तेणें करून आतां मला फार पश्चात्ताप झाला आहे ज्याकाली सव्यसाची युद्धामध्यें माझा प्राण घेईल त्याकालीं चयनारंभ होणार आतां शस्त्रयज्ञांत भीम सेन दुःशासनाचें रुधिर प्राशन करून ज्याकालीं त्यास यमगृहीं पाठवील त्याकालीं यज्ञांतर्गत सुत्यनामक याग प्रसिध्द होईल. पांचालपुत्र ज्या- लीं द्रोणाचार्यांचा व भीष्माचार्यांचा वध करतील त्याकालीं यज्ञाचा म- ध्य भाग झाला मणून समज आणि ज्याकालीं भीमसेन दुर्योधनास मा रून पृथ्वीवर पाडील त्याकालीं यज्ञाची समाप्ती झाली असें समजावें. धृ- तराष्ट्र राजाच्या स्नुषा प्रभृती भर्तृमरणोत्तर गांधारी सहवर्तमान रुद- न करीत असतां त्यांच्या नेत्रांतून जे अश्रू त्यांच्या शरिरावर पडतील तें. यज्ञसंबंधि अवभृतस्नान होय. हे कृष्णा, विद्यावृध्द, वयोवृध्द जे सक- ल क्षत्रिय आले आहेत तेया कुरुक्षेत्रीं वृथा प्राणत्याग न करतां युध्दय- ज्ञामध्यें प्राणत्याग करून स्वर्गलोकीं जातील हा उपकार तुझा क्षत्रियां वर मोठा होईल. हे कृष्णा, निःशेषें करून हें क्षत्रमंडळ शस्त्राच्या योगें स्व र्गास जाईल असें कर. कोणी घांतून ठेऊनको कधीतरी मृत्यु आहेच धारा तीर्थीं मरण आल्यास जन्मांतर सार्थक होईल आणि धारातीर्थीं जे मरण पावतील त्यांची कीर्त्ती अविछिन्न राहील हा एक मोठा उपकारच क्षत्रि यकुलावर करतोस यांत तुजाही कृष्णा बहुत पुण्य लागेल. असें झालें असतां भारत नामक मोठा ग्रंथ होऊन सकळ ब्राम्हण पृथ्वीवर क्षत्रि

यांचें यशोवर्णन करतील. हे केशवा, मी तर निश्चय केला आहे कीं क्ष- त्रियांस युद्धामध्यें मरण श्रेष्ठ आहे. हाच क्षत्रियांचा पराक्रम यामध्येंच क्षत्रियांची अक्षय्य कीर्ति आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१४२ अध्याय एकशें बेचाळीस :— संजय भाषण करतो हे धृत राष्ट्र राजा, कर्णानें भाषण ऐकून केशव भाषण करतो हे कर्णा, तुझें कल्याण व्हावें म्हणून सकल पृथ्वीचें राज्य तुला देत असतां ग्रहण करीत नाहींस तर तूं आतां निश्चयें करून जाण कीं पांडवांचा जय होणार. हे कर्णा, ज्याकालीं संग्रामामध्यें श्वेताश्वांनीं युक्त रथाचे ठायीं अर्जुन स्थित असून मी त्याचा सारथी असेन असा समर्थ अर्जुन अशनीसमान गांडीवानें विस्फूर्जन करून ऐंद्रास्त्रादिकांचा प्रयोग करील त्याकालीं कृत त्रेता द्वापारादि युगांचे भेद अगदीं नष्ट होतील असें समज. ज्याकालीं संग्रामामध्यें भीमसेन दुःशासनाचें रुधिर प्राशन करील तसेंच संग्रामामध्यें द्रोणाचार्य, भीष्म, सुयोधन, जयद्रथ युद्धास आले असतां सव्यसाची त्या सर्वांनें एकाकालीं निवारण करील त्याकालीं युगत्रयाचा नाश झाला असें समज. हे कर्णा, आतां द्रोण, कृपाचार्य व शांतनव यांस जाऊन सांग कीं ह्या मास युद्धास फार चांगला आहे, इंधनें, तृण, वनस्पती व फल, पुष्पें ज्यामध्यें उत्तम आहेत, मक्षिकांचा उपद्रवही स्वल्प आहे, पंक नाहीं, उदकें चोंहीकडे परिपूर्ण आहेत, अति ऊष्णता नसून शरीर ऋतु अत्यंत सुखकारक आहे तेव्हां सात दिवस गत झाल्यावर अमावास्या प्राप्त होईल त्या दिवशीं शक्रदेवता समय चांगला उत्तम पाहून संग्रामास आरंभ होईल. जे क्षत्रिय युद्धास आले आहेत त्यांस दुर्योधनाकडून सांग कीं, जी तुमची मनीषा आहे त्या प्रमाणें राजे, राजपुत्र महश झाले यांस शस्त्रें करून मरण सन्निध आलें आहे ते मृत होऊन उत्तमगतीस जातील. असा विषय या अध्यायांत आहे.

१४३ अध्याय एकशें त्रेचाळीस :— संजय भाषण करतो हे राजा, केशवाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे केशवा, तूं सकल जनास पूज्य आहेस; या कालीं राज्याचा लोभ दाखवून मला मोह घालण्याची

इच्छा धारण केली आहेस; हें मी जाणतों परंतु तूं निश्चयें करून समज कीं या सकल पृथ्वीच्या नाशास शकुनी, मी, दुःशासन आणि राजा दुर्योधन हे चौघे कारण आहेत. आमच्या करितां पांडव कौरव यांचें मोठें घोर युद्ध उपस्थीत होऊन सकल पृथ्वी मांस, रुधिर, कर्दमानें व्याप्त होईल. दुर्योधनास जे राजे व राजपुत्र वश झाले आहेत ते सर्व शस्त्राग्नीनें दग्ध होऊन यमसदनीं जातील. हे मधुसूदना, याविषयीं नानाप्रकारचीं घोर स्वप्नें व नानाप्रकारचे अशुभसूचक घोर उत्पात हीं माझ्या दृष्टीस पडतात त्याजवरून मी खचीत जाणलें कीं धृतराष्ट्र पुत्रांचा पराजय आणि पांडवांचा जय होणार. हे वार्ष्णेया, ते घोर स्वप्न उत्पात पाहून माझ्या अंगावर रोमांच उत्पन्न झाले आहेत. प्राजापत्य नामक नक्षत्रास तीक्ष्ण महाघोर शनैश्चर नामक ग्रह पीडा करीत आहे असें मी पाहिलें. अथवा दुर्योधनाचें जन्मनक्षत्र उत्तरा भाद्रपदा त्या नक्षत्रास शनीची पीडा घडून आली आहे, मंगळ नामक ग्रह वक्र होऊन ज्येष्ठा नक्षत्रास प्राप्त न होतां अनुराधा नक्षत्रास प्राप्त होतो, याजवरून स्पष्ट दिसतें कीं, कौरवांस कांहींतरी मोठें भय उत्पन्न व्हावें, विशेष करून महापात नामें ग्रह चित्रा नक्षत्रास पीडा करीत आहे, याचें फळ असें आहे कीं, क्षत्रियांस याउपर अत्यंत भय प्राप्त होणार तसाच क्षीण चंद्रही पापसूचक आहे. अमावास्येचे दिवशीं रवि राहुग्रस्त होऊन तेच दिवशीं राहु वक्र होत आहे याजवरून सोमवंशीय व सूर्यवंशीय राजांस मोठें भय उत्पन्न होऊन त्यांचा क्षय व्हावा असा अशुभकारक योग आला आहे. पृथ्वी थरथर कांपते अशीं अनेक चिन्हें दारुण उपस्थीत झालीं आहेत याजवरून सकल प्राण्यांचा नाश होतो असें दिसतें. तसाच दुर्योधनाच्या सैन्यांत हा एक मोठा चमत्कार झाला कीं मनुष्यें, घोडे, हत्ती इत्यादिक स्वल्प भक्षण करितात आणि मल, मूत्र फार होतें हें पराभवाचें लक्षण असें साधुजन म्हणतात. पांडवांकडील सकल वाहनें हर्षायमान दिसतात. पांडव गमन करीत असतां त्यांच्या अनुलक्षें करून मयूर, हंस, सारस इत्यादि पुण्यकारक पक्षी जातात असें अनेक प्रकारचीं आमच्या पराभवाचीं दुश्चिन्हें

दृष्टीसपडतात. हे जनार्दना, आणखी एक मोठा चमत्कार मी स्वप्नांत पाहिला तो असाकीं, उंट लावलेल्या रथांत मी, भीष्मद्रोण व दुर्योधन बसून दक्षिणादिशेस चाललों आहोंत. मी व इतर क्षत्रियगण, गांडी वाग्नीमध्यें आतां लवकर प्रवेश करतों याविषयीं आतांकांही संशय नाहीं. असें कर्णानें भाषण ऐकून श्री कृष्ण बोलतो हे कर्णा, माझें वचन तुझ्या हृदयांत प्रवेश करीत नाहीं म्हणून या पृथ्वीचा विनाश काल उपस्थित झाला आहे. असें खचीत समज. असें ऐकून कर्णभाषण करतो हे महा बाहो, जर या क्षत्रिय रणापासून आम्हीं जिवंत राहून तुला पाहूं तर क्षत्रिय विनाशार्णवा पासून तूंच आमचें उत्तारण केलेंस असें आम्हीं समजूं जर युद्धांत मरण पावलों तर पुनः तुमची आमची भेट स्वर्गी निश्चयें करून होईलच हेंच सत्य आहे. संजय भाषण करतो हे राजा, याप्रकारें कर्णानें भाषण केलें असतां श्री कृष्णानें कर्णास आलिंगन देऊन कर्ण रथापासून खालीं उतरला आणि दुसऱ्या रथांत बसून दीनमनानें दुर्योधनाकडे आला. नंतर केशवही सात्यकी सहवर्तमान सारथ्यास अश्वांस लवकर प्रेरणाकर असें भाषण करीत करीत परम त्वरेनें कौरवांकडूनपांडवांकडे आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४४ अध्याय एकशें चव्वेचाळीस :— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, श्रीकृष्ण ज्याकार्या करितां कौरवांकडे गेला होता तें कार्य सिध्धीस नगेल्यामुळें पुन्हा तो पांडवां कडे आल्यावर इकडे विदुर कुंतीकडे येऊन मंद मंद शोकयुक्त बोलला हे पुत्री, कौरव पांडवांचा विग्रह नसावा असा सर्वथा माझा अभिप्राय आहे तो तूं जाणतच आहेस; परंतु कायकरूं मी वारंवार दुर्योधनास प्रतिबोधित केला असतां ही तो माझें भाषण ऐकत नाहीं. पहा बरें! धर्मराजास सकल भ्राते, चेदी, पांचाल, कैकेय, श्री कृष्ण इतके जरी अनुकूल आहेत तथापि धर्माचें रक्षण व्हावें म्हणून तो दुर्बला सारखा होऊन बसला आहे. धृतराष्ट्र राजा तर वयानें वृध्द जरी झाला आहे तथापि धर्महीन विमार्गस्थ व पुत्राच्या लोभानें मत्त होऊन बसला आहे त्यास काय करावें, इत

का कलह ज्ञातीमध्यें उत्पन्न करणारे जयद्रथ, कर्ण, दुःशासन आणिश कुनी हे चौघे आहेत. सूक्ष्म विचार पाहिला असतां कौरवांचा अधर्म ध र्मासारखा दुसन्यास भासतो परंतु मला असें वाटतें कीं, या अधर्मा पासून कौरवांचा नाश होईल. असें विदुराचें भाषण ऐकून कुंती भाषण करते हे विदुरा, या अर्थास धिःकार असो, कायरे, या अर्थाकरतां ज्ञाती व सुहृद यांचा वध करावा लागतो आतां माझे पुत्र, पांचाल, चेदी व सकूल यादव प्राप्त झाले आहेत. हे आतां कौरवांशीं युद्ध करणार ना! कायरे या दुःखापे क्षां दुसरें दुःख अधीक मलानाहीं. कारण पितामह भीष्म, आचार्य, द्रो ण आणि कर्ण हेति घे योध्दे दुर्योधनाकडे मोठे प्रबळ आहेत ते पांडवां चा जय होऊं देणार नाहींत, यातिघांस पाहून वारंवार माझे मनास भय उत्पन्न होतें. कदाचित् असें वाटतें कीं, द्रोणाचार्य माझ्या पुत्रांवर दयाकरी ल. पितामह भीष्म ही कदाचित् माझ्या पुत्रांवर प्रेम करील परंतु दुर्मति क र्ण तो कधींही पांडवांवर दयाकरणार नाहीं. त्याणें अर्जुन वधाविषयीं मोठी प्रतिज्ञा केली आहे त्याविषयीं मलामोठी शंका उत्पन्न झाली आहे, वास्त वीक पहातां कर्ण माझाच पुत्र आहे. असें म्हणून कुंतीनें बाल्यावस्थेंती ल कर्णाच्या उत्पत्तीची सर्वकथा विदुरास सांगीतली. आणि पुनः भाष ण केलें कीं, हे विदुरा, मी प्रार्थना केली असतां कर्णास दया उत्पन्न होई ल, आतांमी जाऊन कर्णाची प्रार्थना करतें असें बोलून कुंती भागीरथी ती रीं कर्णजप करीत होता तेथें गेली आणि त्याच्या उत्तरीय वस्त्राच्या छायें त कर्णाच्या जपसमाप्तीची मार्गप्रतीक्षा करीत उभी राहिली. नंतर जपस माप्त झाल्यावर कर्ण कुंतीस पाहून अभिवादन पूर्वक भाषण करूं ला गला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४५ अध्याय एकशें पंचेचाळीस :– कर्ण भाषण करतो हे कुंती, मी राधेय आधिरथ्याचा पुत्र कर्ण तुला अभिवादन करतों, कशा करतां आपलें गमन झालें तें सांगावें म्हणजे त्याप्रमाणें करण्यास मी उद्युक्त आहें. असें ऐकून कुंती भाषण करते हे कर्णा, तूं कौंतेय आहेस; आधिर थ्याचा पुत्र तूं राधेय नव्हेस; तूं माझ्या पासून झालास, पूर्वी मी तुला कु

क्षींत धारण केला. कौमार अवस्थेंत कुंती भोजराजाचे यहीं मी वास करीत अ सतां अत्यंत तपनशील प्रकाश करणारा सूर्य यापासून तूं माझे ठायीं उत्पन्न झालास तेव्हां तूं पार्थच आहेस, राधेय नव्हेस. हे कर्णा, कुंडली, बध्दकवची, देव, श्रीकरून युक्त असा माझे उदरा पासून उत्पन्न झालास, तूं मोठाशूर व शस्त्रधारण करणारांमध्यें मान्य असतां आपल्या भ्रात्यांचा त्याग करून मोहास्तव धृतराष्ट्र पुत्राकडे गेलास हें चांगलें नाहीं, हे पुत्राचे धर्म नव्हेत जेणें करून आपले मातापितर संतुष्ट होतील असें पुत्रानें आचरावें हाच पुत्राचा धर्म होय. हे पुत्रा, अर्जुनानें जी पूर्वी राजश्री संपादन केली होती ती असाधु जे धृतराष्ट्र पुत्र यांणीं कपटें करून हरण केली ती आतां पुन्हा ग्रहण करून तिचा उपभोग तूं करावास. हे कर्णा, सर्वगुणांनीं तूं युक्त आहेस यास्तव माझा पुत्रांत तूं श्रेष्ठपुत्र फारचांगला शोभशील, तूं आपल्यास सूतपुत्र असें म्हणूंन को, शौर्यवान् असा पृथेचा पुत्र तूं पार्थ आहेस असें समज. असा विषय या अध्यायांत आहे.

१४६ अध्याय एकशेंशेंचाळीस:– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुंतीचा आणि कर्णाचा संवाद होत आहे तों इतक्यांत आकाशामध्यें दुरत्यय आणि पित्या सारखी उपदेश कारक सूर्यापासून अकस्मात अशी वाणी उत्पन्न झाली कीं, हे कर्णा, पृथा जें भाषण करीत आहे तें सर्व सत्य आहे, मातेच्या भाषणा प्रमाणें आचरण केलें असतां तुझें अत्यंत कल्याण होईल यास्तव मातृ वाक्या प्रमाणेंच आचरण कर. या प्रकारें आकाशवाणी झाली असतांही कर्णाच्या मनीस कांहीं एक विपर्यास झाला नाहीं, मातेनें ही बहुत बोध केला परंतु उभयतांच्याही वाक्यापासून कर्णाच्या मनीस चंचलता न भास होऊन पुनः तो कुंतीस भाषण करतो हे क्षत्रिये, तुझें भाषण मी ऐकिलें परंतु तुझ्या भाषणावर माझी श्रध्दा किमपि नाहीं, तूं माझा त्याग केलास त्यामध्यें माझा नाश किती झाला तो एक, मी हीन जाती कुळांत गेलों तेणें करून माझी अपकीर्ती झाली. क्षत्रिय धर्मापासून मी भ्रष्ट झालों, कन्या अवस्थेंत गर्भ राहिला तो प्रगट न व्हावा म्हणून तूं माझा त्याग केलास आणि अपकीर्ती दोषापासून मुक्त झालीस; इतकेंच तुला सुख झालें परंतु माझी तर जन्माची हानी झाली ते

ह्मां तुझासारखा शत्रु माझा कोणी नाहीं, सर्वथा क्षत्रिय जातींतून मला काढण्यास तूंच कारण आहेस, तुझासारखी पापिणी यापृथ्वीवर दुसरी कोणी नसेल. ज्याकाळीं आधिरथ्यानें माझे संस्कार केले त्याकाळीं तरी तूं जाऊन त्यास सांगावयाचें होतें म्हणजे माझे क्षत्रिय संस्कार झाले असते तें हीं तूं केलें नाहींस, आतां तुझावर संकट आलें आहे म्हणून ही पाठी मागली कथा मला सांगतेस, परंतु जन्मापासून मी मुकलों याचा विचार करीत नाहींस. तूं केवळ आत्महितेच्छु आहेस माझेंहित कांहींच पाहिलें नाहींस; असो जी गोष्ट झाली ती पुन्हा फिरत नाहीं अर्जुन हा माझा भ्राता आहे असें न समजून जी मी प्रतिज्ञा केली आहे ती प्रतिज्ञा मन्नास माझ केली पाहिजे-यास्तव आतां तुमच्या कडे येणे मला योग्य नाहीं. परंतु तुला एक निश्चय सांगतोंकीं, कृष्णा सह वर्तमान अर्जुन रणांगणीं प्राप्त झाला असतां त्याचें ही कठीण आहे असें जरी मी समजतों तथापि आतां मला तुमच्या कडे येणें अत्यंत गर्हित होय. मी तुमचे कडे आलों असतां सर्व माझी निंदा करतील. बरें वास्तविक पाहतां दुर्योधन राजानें मला कांहीं न्यून केलें नाहीं. तो माझा सत्कार चांगला करतो, जे जे इच्छिले पदार्थ मला पाहिजेत त्यां विषयीं कांहीं दुर्योधना कडून न्यूनता नाहीं. यास्तव त्याचा त्याग करूं, काय? धृतराष्ट्र पुत्रानीं सकळांशीं वैर उत्पन्न केलें तें निर्भीस जाणून करतां ते माझी उपासना बहुत करतात, मी त्यांस सर्वथा अनुकूल आहे म्हणून ते निरंतर अशी इच्छा करतात कीं, शत्रु म्हणजे काय पदार्थ आहे. असा धृतराष्ट्र पुत्रानीं माझ्यावर भरंवसा ठेविला आहे तेव्हां त्याचा मनोरथ कसा भंग करूं! हे कुंती, प्राणा पेक्षांही जरी मजवर संकट आलें तथापि प्राण त्याग करीन परंतु कौरवां चा त्याग करणार नाहीं व धृतराष्ट्र पुत्रां करतां मी तुझ्या पुत्राशीं युद्ध करणार यांत माझा आणि तुझा पुत्रांचा किमपि दोष नाहीं. मला आपले कडे येण्याविषयीं इतउत्तर जे जे तूं उपचार करशील तेते सर्व तुझे निरर्थक होतील; परंतु इतकें मात्र तुला सांगतों संग्रामा मध्यें माझाशीं युद्ध करण्या करतां युधिष्ठीर, भीमसेन व नकुल सहदेव हे तुझे चार पुत्र जरी आले तथापि त्यांचा वध कधीं मी करणार नाहीं, एक अर्जुनाचा व माझा संग्रा

म होईल त्यांत अर्जुन मला मारो अथवा मी अर्जुनास मारीन ही प्रतिज्ञा खचित आहे. हे पृथे, अर्जुन मरण पावला असतां सकर्ण तुझे पांचपुत्र आहेत अथवा मी जर मरण पावलों तर सार्जुन तुझे पांच पुत्र आहेत. हे कुंती, तुझे पांच पुत्र अवशिष्ट रहतील याविषयीं कांहीं काळजी करूं नको. असें कर्णानें भाषण ऐकून कुंती भाषण करते हे कर्णा, या तुझ्या भाषणावरून आतां सकल कौरवांचा क्षय होणार असें खचीत दिसतें अस्तु. दैव बलवत्तर आहे दैवापुढें कोणाची गती नाहीं. युध्दामध्यें युधिष्ठिरादि चार भ्रात्यांशीं युध्द करणार नाहीं म्हणून जें तूं मला अभय वचन दिलेंस त्याची तरी स्मृती ठेव तुझें कल्याण असो. असें कुंतीनें भाषण केल्यावर कर्णानें तथास्तु असें उत्तर केलें असतां उभयतांही आपापले स्वस्थानीं गेलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१४७ अध्याय एकशें सत्तेचाळीस :— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, श्रीकृष्ण उपप्लव्य ग्रामीं येऊन कौरवांकडील सकल वृत्त पांडवांस सांगून ते स्वस्थानीं गेले असतां पांडवांनीं विराट प्रभृती राजांस स्वस्थानीं जाण्यास आज्ञा दिली इतक्यांत सूर्यास्तसमय प्राप्त होतांच संध्यावंदनादि कर्में करून धर्मराजानें पुन्हा कृष्णास कांहीं विचारणया करतां आव्हान केलें तेव्हां श्रीकृष्ण पांडवांकडे आले असतां युधिष्ठीर भाषण करतो हे श्रीकृष्णा, तूं हस्तनापुरीं गेलास तेव्हां धृतराष्ट्र पुत्रानें आणि तुझें भाषण काय झालें तें मला सांग. असें ऐकून वासुदेव भाषण करतो हे राजा, मी हस्तनापुरीं जाऊन हितकारक अशीं भाषणें धृतराष्ट्र पुत्रास सभेच्या ठायीं बहुत बोललों, परंतु त्या दुर्मतीनें माझ्या भाषणांचा किमपि अंगीकार केला नाहीं. असें ऐकून युधिष्ठीर पुन्हा प्रश्न करतो हे कृष्णा, दुर्योधनास धृतराष्ट्र, भीष्माचार्य, द्रोणाचार्य व गांधारी, विदुर व इतर राजे यांणीं काय बोध केला तो मला सांग. असें ऐकून वासुदेव भाषण करतो हे युधिष्ठिरा, कौरवांची सकल सभा जमली असतां मला जें बोलावयाचें तें मी बोललों. तें ऐकून धृतराष्ट्रपुत्रानें माझे भाषणाचा उपहास केला हें पाहून भीष्म क्रोधानें बोलला हे दुर्योधना, तुझ्या कुलास हित असेल तें कर अहिताकडे लक्ष देऊं नको, तुला यारा‑

ज्याविषयीं पूर्वींची एक कथा सांगतों. सकल लोकांत विख्यात असा शंत-
नु नामक माझा पिता त्यास मी एकच पुत्र होतों तेव्हां त्यास अशी बुध्दी
झाली कीं आपणास आणखी एक दुसरा पुत्र असावा. अशी पित्याची मनी
षा पाहून सत्यवती नामक माझी माताइजपाशीं मी अशी प्रतिज्ञा केली कीं
हे माते, आजपासून मी राज्यासनावर आरूढ न होतां अविवाहित निरंतर
असेन त्या प्रतिज्ञेचें पालन बहुत दिवस मी केलें पुढें कांहीं दिवसांनंतर मा
झ्या मातेस विचित्रवीर्य या नामें एक पुत्र झाला. नंतर माझा पिता शंतनु.
स्वर्गवासी झाल्यावर विचित्रवीर्यास मी राज्यासनीं बसऊन भृत्या सारखा-
त्याजपाशीं वागत होतों युध्दामध्यें मी सकल राजे पराजित करून त्यांच्या ह
रण केलेल्या उत्तमोत्तम स्त्रिया विचित्रवीर्यास बहुत आणून दिल्या. पुढें प
रशुरामाचें आणि माझें द्वंद्वयुध्द झालें तेंही सकळांस विदित आहे. रामा
च्याभयानें नागरीक लोकांनीं विचित्रवीर्यास दूर नेऊन ठेविलें होतें. पुढें-
विचित्रवीर्य राजा बहुत स्त्रियांशीं अत्यंत क्रीडारत झाला म्हणून राजय
क्ष्मा नामक रोग उत्पन्न होऊन मृत्यु पावला. त्याकाळीं कोणी पृथ्वींत राजा
नसल्यामुळें प्रजेमध्यें पातकें बहुत होत चाललीं. याकारणानें पर्जन्याचा
अभाव झाला. तेव्हां सकळ प्रजा माझ्याकडे येऊन प्रार्थना करूं लाग-
ल्या कीं, हे भीष्मा, आम्ही अत्यंत क्षीण झालों. आमचा राजा तूं हो आणि-
अनावृष्ट्यादिक अरिष्टांचें निवारण कर. हे भीष्मा, तूं जिवंत असतां हें राष्ट्र
नाश न पावो. असा प्रजेचा आक्रोश ऐकून पूर्वीं मी राज्याचा अधिका
री होणार नाहीं अशी प्रतिज्ञाच केली होती त्यामुळें माझें मन क्षोभातें पा
वलें नाहीं. नंतर माझी माता, भृत्य व पुरोहित, आचार्य, बहुश्रुत ब्राम्हण-
हे माझ्या अग्रभागीं येऊन मला बोध करूं लागले कीं हे भीष्मा, तुझा पि-
तामह प्रतीप नामक राजा याणें हें राज्य संपादन केलें तें राज्य आतां तूं न-
ष्ट करूं नको. आमच्या हिताकरतां आमचा राजा हो. असें ऐकून पुन्हा मीं स
र्वांस सांगीतलें कीं मी राज्याधिकारी होणार नाहीं आणि विवाह करणा
र नाहीं अशी माझी प्रतिज्ञा आहे यास्तव मला राज्य करण्याचा आग्र-
ह करूं नका. नंतर मातेच्याच इच्छेनें मीं व्यासाची प्रार्थना केली कीं, आ

पण भ्रातृदारेशीं रत होऊन वंशवृध्दी करावी त्याकाळीं व्यास भ्रातृदारे-शीं रत झाले असतां धृतराष्ट्र, पांडु व दासीपासून विदुर असे तीन पुत्र झाले, पुढें धृतराष्ट्र अंध असें जाणून तो ज्येष्ठ असतांही राज्याधिकारी न होऊन-पांडु राज्याधिकारी झाला. अशी भीष्मानीं कथा सांगून दुर्योधनास भाषण केलें हे दुर्योधना, त्या पांडुराजाचे पुत्र हे पांडव तुझे दायाद आहेत यांस राज्यांश अवश्यक देणें आहे तो दिला पाहिजे तो तुला कधींहि चुकणार नाहीं. हे तात, कलह करूं नको, वास्तवीक पाहतां मी जिवंत असतां या राज्यास दुसरा कोणत्याही कोण योग्य आहे. हे दुर्योधना, माझे वचनावर विश्वास ठेव जरे तूं व पांडव यांमध्यें माझी प्रीति समानच आहे जसा तूं तसेच पांडव, मी, तुझा पिता. गांधारी आणि विदुर तसेच द्रुपद यांचीं भाषणें ऐक नाहीं तर सर्वथा नाशापावशील, आणि पृथ्वीही नाश पावेल. असा विषय या अ० आ०

१४८. अध्याय एकशें अठ्ठेचाळीस :- श्री वासुदेव भाषण करतात हे धर्मराजा, भीष्मानें भाषण झाल्यावर त्याच सभेंत द्रोणाचार्य बोलतात हे दुर्योधनराजा, प्रतीप नामक शंतनूचा पिता पूर्वीं राज्य करीत होता पुढें तें शंतनु करूं लागला, त्यानंतर या राज्याचा अधिकार भीष्माचाच होता परंतु त्यानीं या राज्याचा उपभोग कर्तव्य नाहीं म्हणून टाकिला. नंतर सकल कुरुवंशामध्यें परम धार्मिक असा जो पांडुराजा याणें कांहीं दिवस राज्य करून नंतर धृतराष्ट्र व विदुर यांच्या संमत्तानें तो उभयतां भार्यासहवर्तमान वनांत गेला. पाठिमागें विदुरसहवर्तमान धृतराष्ट्र राजानें राज्य चालविलें सकल प्रजाही पांडुराजाचें जसें सेवन करीत होती तशीच धृतराष्ट्राचें सेवन करूं लागली. पांडुराजाही सकल पृथ्वींतील राजांपासून करभार घेऊन आपणच श्रेष्ठ झाला होता, इकडे विदुर यौवराजाचें काम करीत असतां त्यानें कोश संचय, दान, भृत्यांवर नजर ठेवणें इत्यादिकांची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेविली होती ती पाहून भीष्म संतुष्ट झाले. हे दुर्योधना, तुझा पित्यानें विदुर साह्यें करून अशी उत्तम राज्याची व्यवस्था ठेविली असतां त्या कुलामध्यें तूं आज कलह उत्पन्न करतोस हें काय! कलह करूं नको, भ्रात्यांसहवर्तमान राज्याचा उपभोग कर तुम्हीं उभयतांही भीष्मास समान

व आह्मां भीतर अश्वत्थाम्यावर जशी प्रीति करतों तशीच अर्जुनावर करतों. हे दुर्योधना, जिकडे धर्म तिकडेच जय, वासुदेव सांगतात हे धर्मराजा, या प्रकारें द्रोणानीं भाषण केल्यावर विदुरानें भाषण केलें हेमी ध्या, कौरववंश आज बुडतो त्याचा उध्दार तुम्ही करा हा कुलपांसु दुर्योधन यास मी बोध करीत असतां माझे भाषणाचा हा अनादर करतो यास्तव जेणें करून कौरव कुलनाश पावणार नाहीं असें तुम्ही करा. जसें धृतराष्ट्र आणि मी राज्य करीत असतां तूं आम्हांस चित्रासारखें ठेविलें होतेंस. तसाच या धृतराष्ट्र पुत्रासंठेव. हे महाबाहो, विनाश काल फार सन्निध आला आहे अथवा मी तूं आणि धृतराष्ट्र हे त्रिवर्ग वनामध्यें जाऊं मग आपल्या पाठीमागें कांहीं होवो त्याची आपल्यास चिंता करणें नको किंवा हा दुर्मती दुर्योधन याचें बंधन करून सर्व राज्य पांडवांचे स्वाधीन कर. हे राज शार्दूल, या दोन्ही भाषणें केलीं आहेत यांतून एकाचा तरी स्वीकार कर. कुरुपांडवांचा द्वेषभाव उत्पन्न झाल्यानें प्रजाक्षय होईल. असें विदुर भाषण करून विराम पावला असतां गांधारी भाषण करते हे दुर्योधना, हें राज्य या कुरुवंशात पूर्वी पासून अनुक्रमानें प्राप्त झालें आहे हें अनुक्रमानेंच राज्य करावें असा पूर्वी पासून या कुलाचा धर्म होय. पूर्वी तुझा पिता आणि विदुर हे उभयता राज्याचे अधिकारी होतेते असून जिवंत आहेत तसाच राज्याधिकारी भीष्म ही जिवंत आहे, त्याणेंच आपण होऊन राज्याचा अधिकार पांडुराजास दिला, त्या पांडुराजाचे पुत्र पांच असतां तूं एकटाच राज्यांश ग्रहण करून बसलास हा तुझा अभाग्य किती आहे बरें! अनुक्रमानें पाहतां कुरुवंश राज्य युधिष्ठिरास प्राप्त झालें तें युधिष्ठिरानेंच करावें याविषयीं तुझ्या पित्याची व भीष्माची आज्ञा आहे ती परिपालन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१४९. अध्याय एकशें एकुण पन्नास :— वासुदेव भाषण करतात हे धर्मराजा, गांधारीचें भाषण झाल्यावर धृतराष्ट्र बोलतो हे दुर्योधना, कुरुवंशाचा अग्रज सोमनामक प्रजापती होय, त्यापासून नहुषाचा पुत्र ययातीराजा हा सहावा, त्यास पांच पुत्र झाले त्यापैकीं देवयानी पासून यदु हा ज्येष्ठ, शर्मिष्ठेचा कनिष्ठपुत्र पुरु, त्या पुरुपासून आम्हीं सकल उत्पन्न झालों

तो आमचा पूर्वज होय. ज्येष्ठ जो यदु तो यादव वंशाचा मूळ पुरुष होता त्यानें पित्याची आज्ञा उल्लंघन केली म्हणून ययाति राजानें त्यास व त्यास जे पुत्र-अनुकूल होते त्यास राज्य न मिळण्याविषयीं शाप दिला. आणि कनिष्ठ पुत्र पुरु, त्यास राज्य दिलें तेव्हां ज्येष्ठाचा त्याग करून कनिष्ठास राज्य प्राप्त होण्याचा मार्ग पूर्वीपासून चालत आला आहे तसाच माझ्या पित्याचा पितामह प्रतीप नामक राजा, तो धर्मानें राज्य शासन करीत असतां त्यास देवापी, बाल्हीक आणि शंतनु असे तीन पुत्र झाले. त्यांतून तिसरा पुत्र जो शंतनु तो आमचा पितामह होय आणि या तिघांतून ज्येष्ठ जो देवापि तो धार्मीक, सत्यवादी आणि पित्याची आज्ञा परिपालन करणारा होता. बाल्हीक आणि शंतनु या उभयतां भ्रात्यांचें अत्यंत मित्रत्व असे, कांहीं दिवसानीं प्रतीपास अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, आतां आपला वृध्दाप काल झाला तेव्हां ज्येष्ठपुत्र जो देवापी यास राज्याभिषेक करून आपण वनांत जावें. असा विचार करून त्यानें सामोग्री सिध्द केली तेव्हां सकल ब्राम्हणांनीं राजास सांगितलें कीं देवापीचे शरीरास कुष्ठरोग आहे, यास्तव यास राज्याधिकार देऊं नको. असें ऐकून देवापि वनांत गेला. दुसरा बाल्हीक पुत्र तोही मातुल कुलीं गेला परंतु जाते समयीं त्यानें शंतनूस राज्य दिलें तेव्हां शंतनूनें पित्याच्या मागें राज्य केलें, तसाच मी तीन बंधूमध्यें ज्येष्ठ असतांही हीनांग म्हणून मला राज्य प्राप्त न होतां माझा कनिष्ठ बंधु जो पांडु यास प्राप्त झालें तो पांडुराजा मरण पावल्यावर त्याचे पुत्र राज्याचे अधिकारी आहेत. हे दुर्योधना, अराजाचा पुत्र तूं असतां दुसऱ्याचें राज्य हरण करण्याची कां इच्छा करतोस; न्यायानें प्राप्त झालेलें जें राज्य त्याचा अधिकारी युधिष्ठीरच होय. हे दुर्योधना, आतां पांडवांस अर्धराज्य दे म्हणजे तुझी अवशिष्ट राहिलेली जी संपत्ती तिचा उपभोग करीत चिरकाल राहशील. असा विषय या अध्यायांत आहे.

१५० अध्याय एकशें पन्नास :— वासुदेव भाषण करतात हे धर्मराजा, भीष्म, द्रोण, विदुर, गांधारी आणि धृतराष्ट्र याणीं दुर्योधनास बहुत प्रकारें बोध केला तो न ऐकतां दुर्योधन सभेंतून एकाएकीं उठून चालला. त्याचेपाठीमागून सकल क्षत्रिय समुदायही चालला, सकल राजानीं आपली जीवि

त आशा सोडून दिल्ही हें पाहून दुर्योधन बोलला हे पार्थिव हो, आज पुष्य नक्ष त्र रुक्षदीन आहे यास्तव तुम्ही आपापलें सैन्य घेऊन कुरुक्षेत्री जा. असें ऐकून सैन्यासह वर्तमान सकल पृथ्वीपाल कुरुक्षेत्री गेले. दुर्योधनानें भीष्मास सेनापत्य दिल्हें, एकादश अक्षोहिणी सैन्यासही कुरुक्षेत्रीं जाण्यास आज्ञा दिली. हे राजा, तुजपाशी यथातथ्य कौरवसभेंतील वृत्तांत सांगीतलें ज्याकाली मी कौरवसभेंत प्रवेश केला त्याकाली प्रथम तुमचें बंधुत्व राहवें व प्रजेचा क्षय न व्हावा म्हणून कौरवांसी सामोपाय रूपानें भाषण केलें तेणें करून आपलें काम त्र साध्य हो त नाही. असें दिसल्याकर मी नानाप्रकारची भयंकर रूपें दाखवि ली आणि दुर्योधनाची बहुत निर्भत्सना करून कर्णास व शकुनीस भय दाखविलें परंतु त्या मूर्खांनी ऐकिलें नाही. शेवटी पांचग्राम तरी पांडवांस देऊन कलहाची शांति करावी असें मी बोललों तथापि त्या दुष्टानी ऐकिलें नाहीं तेव्हां चतुर्थ उपाय दंड या पाप्यास योग्य आहे हे धर्मराजा, युध्दावांचून तु ला राज्य कौरव देत नाहीत. सर्वांचा आतां विनाश काल समीप आला आहे दुर्योधनाच्या आज्ञेनें सकल नराधिप युध्दा करतां कुरुक्षेत्रीं गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५१. अध्याय एकशें एकावन्न :- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, जनार्दनाचें भाषण ऐकून युधिष्ठिर आपल्या भ्रात्यांस म्हणतो कीं, कौरव सभेंतील वृत्तांत तुम्ही ऐकिलात ना आतां आपलें सात अक्षोहिणी सैन्य आहे त्यांत द्रुपद, विराट, धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकी, चेकितान आणि भीमसेन हे सात वीर आहेत परंतु यांत भीष्माचा पराभव करणारा असा सेनापती कोण करावा. असें ऐकून सहदेव भाषण करतो हे राजा, मला असें वाटतें की, आपला संबंधि असून समरदुर्धर्ष जो विराटराजा यास सेनापति करावा. असें ऐकून नकुल भाषण करतो हे धर्मराजा, मला असें वाटतें की, शस्त्रास्त्र निपुण द्रोणाचार्य व भीष्म यांशीं निरंतर स्पर्धा करणारा असा जो द्रुपदराजा त्यास सेनापति करावा. असें ऐकून अर्जुन बोलतो हे धर्मराजा, तप सामर्थ्यानें अग्नि कुंडांतून उत्पन्न झालेला, सिंहासारखी गर्जना करणारा असून द्रोणाच्या नाशा विषयीं उत्पन्न झालेला जोध

धृष्टद्युम्न त्यास आपले सैन्याचा अधिपति करावा तो भीष्माचे बाण सहन करील. असें ऐकून भीमसेन भाषण करतो हे धर्मराजा, शिखंडी नामक द्रुपद राजाचा पुत्र भीष्माच्या वधा करतांच उत्पन्न झाला आहे, तो युद्धांत भीष्मास मारील. यास्तव त्यास सेनापति करावा. असें ऐकून धर्मराज बोलतात हे श्रीकृष्णा, तूं सकल जगताचें सारासार बल जाणणारा आहेस यास्तव तूं जो सांगशील तो आमच्या सैन्याचा सेनापति, तो कृतास्त्र असो अथवा अकृतास्त्र असो. असें ऐकून भगवान धनंजयाकडे पाहून बोलतात हे राजा, धनंजयास ज्या कालीं ते समरामध्यें पाहतील त्याकालीं एकही योद्धा धनंजयाचे अग्रभागीं उभा राहण्यास समर्थ होणार नाहीं तसाच क्रुध्द झालेला भीमसेन, नकुल, सहदेव, युयुधान, धृष्टद्युम्न, अभिमन्यु, द्रौपदेय, विराट, द्रुपद आणि दुसरेही अक्षौहिणी पति महापराक्रमी हे सकल रणामध्यें आले असतां धृतराष्ट्र पुत्र काय करतील. हे धर्मराजा, आपल्या सैन्याचा सेनापति धृष्टद्युम्न करावा असें माझें मत आहे. असें कृष्णानें भाषण करतांच सकल योध्यांस बहुत हर्ष झाला आणि एकाएकीं सकल योध्यांमध्यें अरे चला लवकर सिध्द व्हा. आपापलीं आयुधें घ्या. असे शब्द झाले, हयवारण यांचे शब्द होऊं लागले, रथांच्या चक्राग्राचे घोष होऊं लागले, शंख, दुंदुभी इत्यादिक वाद्यांचे गजर झाले तेणें करून सकल दिशा नादित झाल्या. वैशंपायन सांगतात हे राजा, जसा सागर क्षोभ पावला असतां भयंकर दिसतो तसे पांडवांचे सैन्यामध्यें पायदळ, रथपती, गज व कवचें बंधन केलेले योध्दे इकडे तिकडे धांवत असतां ते समुद्राच्या लाटांसारखे दिसूं लागले. नंतर पांडव द्रौपदी सहीत सर्व स्त्रियांस उपप्लव्य नगरांत ठेऊन कुरुक्षेत्रीं जाण्यास निघाले जाते समयीं त्यानीं ब्राम्हणांस गाई व हिरण्ये इत्यादिक देऊन संतुष्ट केलें. कैकेय, धृष्टकेतु, काश्यराजाचा पुत्र वसुदान, शिखंडी, वगैरे ही शस्त्रास्त्रें धारण केलेले राजे युधिष्ठीर राजानें रक्षण करीत त्याच्या पाठीमागून गेले. तसेच अनाधृष्टी, चेकितान, धृष्टकेतु, सात्यकी हे योध्दे, वासुदेव आणि धनंजय यांचे रक्षणार्थ बरोबर होते हें सकल पांडवांचे सैन्य कुरुक्षेत्रीं जाऊन शंखादि वाद्यांचा गजर करूं लागलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१५२. अध्याय एकशें बावन्न :- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, पांडवांचें सैन्य परमत्वरेनें जात असतां तें पुण्यकारक असा देश पाहून तेथें राहिलें. श्रीकृष्ण व अर्जुन हेही त्या स्थळीं कांहीं वेळ राहून नंतर उभय-तां कांहीं राजे बराबर घेऊन चालले असतां मार्गामध्यें धृतराष्ट्रपुत्राचें सैन्य बहुत भेटलें त्याचें अतिक्रमण करून जातां जातां पुढें त्यांनीं कुरुक्षेत्रांतील हिर-ण्वतीनदी पाहिली तेव्हां श्रीकृष्ण भाषण करितात हे अर्जुना, ही नदी उत्तम आ हे, इचें जल फार चांगलें स्वच्छ दिसतें यास्तव येथें वास करावा अशी आज्ञा हो तांच सकल सेनासमुदाय त्या स्थळींच उतरला, धृष्टद्युम्न आणि सात्यकी या णी कोणाचीं शिबिरें कोठें करावयाचीं याचा विचार करून केशवाच्या अनु-मतें धर्मराजाच्या शिबिराचा नेम केला आणि त्याच्या आसमंताद्भागीं ज्याची जसी योग्यता त्याप्रमाणें सकल राजांचीं शिबिरें सिध्द केलीं. सैन्याचें रक्षण उ त्तम झालें पाहिजे यास्तव उत्तम सुदृढ अशी परिखा खनन करून त्यामध्यें से ना राहण्यास स्थळ केलें आणि भक्ष्य, भोज्य, अन्नपान, द्रव्यें सहस्रावधी सि ध्द करून ठेविलीं. त्यांस वेतनें बहुत दिलेलीं असे शिल्पी बहुत बरोबर होते, प्र त्यंचा, धनुष्यें, बाण व कवचें याचे पर्वतप्राय समुदाय बराबर घेतले होते. तसे च सहस्रांचा प्राण घेणारे असे गज सभागमें बहुत होते. अशी धृष्टद्युम्नानें राहण्याची सिध्दता अग्रभागीं जाऊन करतांच युधिष्ठिर राजा तेथें जाऊन ह र्षानें राहिला इतक्यांत युधिष्ठिराचे इष्टमित्र बहुत येऊन मिळाले, तसेंच ब्र म्हचर्य व्रत धारण करणारे, यज्ञांत बहुत दक्षिणा देणारे असे कांहीं क्षत्रिय पां डुपुत्राचा जय व्हावा म्हणून त्यास भेटावयास आले. असा विषय या अध्या यांत आहे.

१५३. अध्याय एकशें त्रेपन्न :- जनमेजय प्रश्न करतो हे वैशंपायन ऋषे, युधिष्ठिर राजा कुरुक्षेत्रीं जाण्यास निघाला ही वार्ता समजतांच दुर्योध-नानें काय केलें हें मला सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पांड वांस घेऊन श्रीकृष्ण कुरुक्षेत्रीं जाण्यास निघाला ही वार्ता ऐकतांच दुर्योधन बोल ला. हे कर्ण, दुःशासन, शकुनीहो, पहा कृष्ण आपले कडे येऊन कृतकार्य न झा-ल्यामुळें पार्थांस जाऊन मिळाला आतां हा क्रोधानें आपल्या सकल सैन्याचा

दाह करून टाकील. महाबली जो भीमसेन यास श्रीकृष्ण साह्य असतां ही भी त्याचा पूर्वी फारछल केला व त्याच्या सहोदरांस अत्यंत पीडा दिली यास्तव तो मा झा यास मयी द्वेष साधील यास्तव आतां सैन्याची सिध्दता करून कुरुक्षेत्रीं राह ण्या करतां, शत्रूंनीं प्रवेश करण्यास अशक्य अशीं मोठी शिबिरें सिध्द करा. आणि जलस्थापन करण्या करतां मोठमोठी चर्मभांडी सहस्रावधी सिध्द करून पताका ध्वज इत्यादि करून सुशोभित आणि नानाप्रकारचीं विपुल आयुधें-त्यांत स्थापित केलीं असे रथ असंख्यात सिध्द करा. उद्यीक प्रातःकालीं निघून जाण्यास दिवस उत्तम आहे यास्तव सकल सैन्यानीं व क्षत्रियानीं आपापली सिध्दता करावी. असें ऐकून सकल राजे वालुकापटीत सिध्द झालेले जे रथी होते ते रथांत बसले. हयारूढ होते ते अश्वांवर. गजशिक्षा विशारद होते ते गजांवर बसले. तेव्हां दुर्योधनाचें नगर अत्यंत शोभायमान दिसूं लागलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१५४. अध्याय एकशें चौपन्न :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कौरव सभेंत जो वृत्तांत झाला तो वासुदेवानें धर्मराजास सांगितला असतां-धर्मराज भाषण करतो हे कृष्णा, ज्याकालीं तूं कौरव सभेंत गेलास त्याकालीं दुर्योधन, कर्ण, शकुनी, विदुर, भीष्म व कुंती यानीं काय भाषण केलें हें मला सांग. असें ऐकून श्रीकृष्ण भाषण करतो हे युधिष्ठिरा, धर्मार्थ युक्त वाक्यानीं दुर्योधनास मी बहुत बोध केला परंतु कर्णाच्या आश्रयानें त्यानें ऐकिलें नाहीं. भीष्म द्रोण हे त्याचें मतास अनुसरून त्याच्या भाषणा प्रमाणें करण्यास उद्युक्त झाले आहेत, एक विदुर मात्र त्याचे मतास अनुसरला नाहीं. शकुनी, कर्ण आणि दुःशासन यांणीं तुला अवाच्य भाषणें बहुत केलीं तीं संक्षेप करून पूर्वीं तुला निवेदन केलीच आहेत यास्तव युध्दा खेरीज दुसरा उपाय नाहीं असें जाणून मीही युध्दाची सिध्दता करण्यास अनुमोदन दिल्हें. असें ऐकून धर्मराजानें भीम व अर्जुन यांसह वर्तमान सकल क्षत्रियांस आज्ञा दिली कीं सर्वांनीं आपली सिध्दता करावी. अशी आज्ञा होतांच सर्व सैन्यास हर्ष झाला. परंतु धर्मराजाचे मनांत वारंवार दुर्योधनादिक आपले भ्राते अवध्य असतां त्यांचा वध कसा करावा याविषयीं शंका उत्पन्न होऊन तो भीमसेन आणि अर्जुन यांस

बोलतो कीं, गुरु व वृद्ध यांचा युद्धांत वध केला असतां आम्हांस विजय तरी कसा प्राप्त होईल. अवध्य जे भ्रातृपुत्र यांचा वध आमचे हातून कसा होईल. असें ऐकून अर्जुन बोलतो हे राजा कृष्णानें कुंति व विदुर यांचा अभिप्राय तुला सांगितला तो ऐकून तूं युद्धाविषयीं आपले मतीचा निश्चय केलास असें असतां याकालीं युद्धापासून उपरममती करण्यास तूं योग्य नाहींस. असें ऐकतांच युधिष्ठिरानें पुन्हा युद्धाविषयीं निश्चय करून भ्रात्यांसह वर्तमान तीरात्र अतिक्रांत केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१५५. अध्याय एकशें पंचावन्न :— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं दुर्योधन राजानें आपले एकादश अक्षौहिणींचा विभाग करून जे उत्तम बलवान् नर, गज व अश्व जितके होते त्यांस सैन्याचे अग्रभागीं केलें. मध्यम होते त्यांस सैन्याच्या मध्यभागीं आणि कनिष्ठ होते त्यांस पृष्ठभागीं स्थापित करून सर्वांस शस्त्रास्त्रें घेण्यास आज्ञा केली असतां त्या आज्ञेप्रमाणें सकलांनीं नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें घेतलीं. युद्धांत रथाचें काष्ठ भग्न झालें असतां त्यास्थानीं दुसरें काष्ठ स्थापित करण्यास योग्य अशीं काष्ठें घेतलीं. बाणांचे कोश, रथाच्या गुप्ती, लोहमयदंड, शत्रूच्या अंगावर तप्त करून टाकण्या करितां तेल, अग्नी मन्त्रित होणारा करितां लाक्षा गंधकादि द्रव्यें सैन्याबरोबर घेतलीं. कांहीं योध्दे हयशास्त्र जाणणारे असून शस्त्र विद्येंत परम निष्णात कवच धारण केलेले असे जे सैन्यांत होते त्यांची सारथ्य कर्माविषयीं दुर्योधनानें योजना केली. मोठमोठ्या योध्यांच्या रथास चार चार वाजी होते. रथाच्या धुरीवर एक पुरुष, चार हयामध्यें दोन हयांवर आरूढ झालेले दोन पुरुष, स्वतः रथी आणि पार्ष्णी भागीं पुरुष श्रेष्ठ दोन एकूण दर रथास पांच पुरुषांची योजना दुर्योधनानें केली. एक रथास दहा गज, एक एक गजास दहा दहा अश्व व एक एक अश्वास दहा दहा पदाती अशा योजनेनें कांहीं सैन्य होतें. एक रथास पन्नास गज व एक एक गजास शत हय व एक एक हयास सात पुरुष असें कांहीं सैन्य होतें. पांचशें गज, पांचशें रथ हे ज्या समुदायांत आहेत त्यास सेना असें म्हणावें. तीच सेना दशगुणीत झाली असतां तीस पृतना असें म्हणावें. आतां दुसरा पक्ष सांगतों श्रवण कर पंचवीस

पदाती, पंधराशें घोडे स्वार हे ज्या सैन्यांत आहेत त्यास सेना असें म्हणतात, पांच सहस्त्र गज, पांच सहस्त्र रथ, पंचवीस सहस्त्र पदाती व पंधरा सहस्त्र अश्व हे ज्यासेना समुदायांत आहेत त्यास पृतना असें म्हणावें. पन्नास हजार गज, तिन केंच रथ, अडीच लक्ष पदाती व दीड लक्ष वाजी ज्यांस वाहिनी असें म्हणावें. या प्रकारें कुरुराजानें अकरा अक्षौहिणी सैन्याचा सेनाविभाग केला असतां पांडवांनींही सात अक्षौहिणीचा तशाच सेना विभाग केला. पंचावन्न पदात्यांस पत्ती असें म्हणतात ती पत्ती संख्या त्रिगुणित झाली असतां सेनामुख असें म्हणतात. तीन सेनामुखें म्हणजे एक गुल्म, तीन गुल्मे म्हणजे एक गण असे अयुतशः गण दुर्योधनाच्या सैन्यांत होते, महापराक्रमी असे अगणित योद्धे हस्तनापुराहून आले त्या सैन्यामध्यें महाधनुर्धारी कृपाचार्य, द्रोणाचार्य, शल्य, जयद्रथ, कांबोज, कृतवर्मा, अश्वत्थामा, कर्ण, भूरिश्रवा, शकुनी आणि बाल्हीक असे अकरा योद्धे प्रत्येक अक्षौहिणीचे नायक करून दिवसा दिवसाचे ठायीं वारंवार दुर्योधन त्यांची पूजासत्कार करीत असे. असा विषय या अध्यायांत आहे.

१५६. अध्याय एकशें छप्पन्न:-- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, याप्रमाणें सकल सैन्याचा विभाग केल्या नंतर दुर्योधन बोलतो हे भीष्मा, माझे सैन्या समुख्य सेनापती कोणी नाहीं यास्तव त्याच्या नियमना विषयीं कोणीतरी एक मुख्य सेनापती अवश्य पाहिजे या विषयीं पूर्वी मी एक गोष्ट ऐकिली आहे ती सांगतों कोणी एक काळीं ब्राम्हण, वैश्य आणि शूद्र हे तीन वर्ण एक विचारानें वागूं लागले आणि क्षत्रिय वर्णाचा समुदाय स्वतंत्र वागूं लागला. यास कांहीं काळ गेल्यावर तीन वर्णामध्यें कांहीं कारणास्तव वैमनस्य उत्पन्न होऊन परस्पर कलह करूं लागले क्षत्रिय समुदाय एकच धर्मी एक वर्णी होता म्हणून त्यामध्यें कांहीं एक कलह नसतां यज्ञयागादि क्रिया करून स्वस्थ होते. असें झाल्यावर ब्राम्हणानीं विचार केला कीं आपल्या मध्यें कलह कां होतो आणि क्षत्रिय एक विचारें, एक मतें चालतात यांमध्यें कलह कां होत नाहीं तेव्हां आपण आपल्या कलहाचें कारण क्षत्रियांस विचारावें. असा विचार करून हय हय कुलस्थ क्षत्रियांस ब्राम्हणांनीं आपल्या कलहाचें कारण विचारलें असतां सकल क्षत्रिय धर्मज्ञ होते त्याणीं उत्तर दिलें

कीं, हे ब्राह्मण हो,आह्मीं एकच जातीचे महाबुद्धिमान् एकत्र आहोंत ह्मणून आम-
च्यामध्यें कलह होत नाहीं. तुह्मीं पृथक् पृथक् जातीचे असून एकत्र मिळा
ले आहांत, यास्तव तुह्मांमध्यें कलह होतो, याजकरितां तुह्मीं आपल्याम-
ध्यें कोणीतरी एक नायक करून त्याची आज्ञा मानीत जा. ह्मणजे तुह्मांमध्यें
कलह उत्पन्न होणार नाहीं. असें ऐकून ब्राह्मण, न्याय शास्त्रामध्यें कुशल,
शूर व परम बुद्धिमान असा एक ब्राह्मण सेनापतिसारखा मुख्य करून त्या
ची आज्ञा मानूं लागले. तेव्हांपासून ब्राह्मणादिक त्रैवर्णिकांत कलह ना-
हिंसा झाला. यास्तव हे पितामह, तूं आमचा सेनापति हो ह्मणजे देवांचाही
पराजय करण्यास आह्मीं समर्थ होऊं. असें ऐकून भीष्म बोलले हे दुर्योधना,
तूं व पांडव मला समानच आहांत, परंतु मीं तुज जवळ कबूल केलें आहे,
त्याप्रमाणें तुझ्या अर्थाकरितां शत्रूशीं युद्ध करीन. या पृथ्वीवर माझ्यास-
मान योध्दा दुसरा कोणी नाहीं. एक धनंजय मात्र आहे तो माझ्याशीं युद्ध
करण्यास योग्य आहे. असें मी जाणतो. हा धनंजय कोणी एक देवाचा अं-
श आहे. यास देवांपासून बहुत दिव्यास्त्रें प्राप्त झालीं आहेत. याचा परा-
जय युद्धामध्यें माझ्यानें होणार नाहीं. माझें इतकें सामर्थ्य आहे कीं, ए-
क क्षणांमध्यें जगत् निर्मनुष्य करीन; परंतु पांडवांचा मात्र क्षय करणार
नाहीं. असें होत असल्यास तुझ्या सैन्याचा सेनापति मी होतो. अथवा क-
र्ण माझ्याशीं रणसंबंधी बहुत स्पर्धा करीत असतो, यास्तव त्यानें पूर्वीं यु-
द्धास जावें, नंतर मी जाईन. असें ऐकून कर्ण भाषण करतो हे दुर्योधना,
हा गांगेय जोपर्यंत जीवंत आहे तोपर्यंत मी अर्जुनाशीं युद्ध करणार ना-
हीं. गांगेय हत झाल्यावर मी गांडीवधन्व्याशीं युद्ध करीन. असें ऐकून
दुर्योधनानें प्रथम भीष्मास सेनापत्याचा अभिषेक करतांच त्याकाळीं
शंखभेरी इत्यादिक सहस्रावधि वाद्यांचे गजर झाले. नंतर आकाशवा-
णी होऊं लागल्या. दिवसास उल्कापात झाला. असीं भयंकर अशुभ
कारक चिन्हें अनेक प्रकारचीं होऊं लागलीं. भीष्मानें गमनकाळीं ब्राह्मणां-
स गायी हिरण्य इत्यादिक बहुत दान केलें. नंतर दुर्योधनराजा भीष्मास
सकल सैन्याच्या अग्रभागीं करून सकल भ्रात व कर्ण यांसह वर्तमान

कुरुक्षेत्रीं शिबिरांमध्यें गेला. असाविषय या अध्यायांत आहे.

१५७ अध्याय एकशेंसत्तावन — जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायनऋषे, दुर्योधनानें भीष्मास सेनापति केलें तेव्हां, युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन आणि श्रीकृष्ण यांनीं काय केलें हें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, दुर्योधनानें भीष्मास सेनापत्य दिल्हें. हें ऐकून धर्मराज आपले सकल भ्रात व श्रीकृष्ण यांस बोलला कीं, प्रथम युध्द प्रसंग भीष्माचा आहे सावध असा. आपल्या सैन्याचे सात नायक कोण कोण केले आहेत ते पाहूं द्या, असें ऐकून श्रीकृष्ण भाषण करतो. हे धर्मराजा, द्रुपद, विराट, सात्यकि, धृष्टद्युम्न, धृष्टकेतु, शिखंडी, सहदेव, मागध, या सात योध्यांस सप्त अक्षौहिणी सैन्याचे पति केले आहेत. असें ऐकून धर्मराजानें त्या सात योध्यांस सेनापतित्वाचा अभिषेक केला. आणि धृष्टद्युम्नास सर्व सेनापतित्वाचा अभिषेक करून सेनापतीचाही पति अर्जुनास केलें. व त्या अर्जुनाचाही सारथी श्रीकृष्ण झाला. हें महायुध्द पाहावें अशा बुध्दीनें अक्रूरप्रभृति गद, सांब, उध्दव, प्रद्युम्न इत्यादिकांस घेऊन बलराम पांडवांकडे येतांच युधिष्ठिर व श्रीकृष्ण यांनीं बलरामास आसनावर बसविलें, व त्याची पूजा केली. नंतर वासुदेवाच्या मुखाकडे पाहून बलराम भाषण करतो कीं, सकल पुरुषांचा क्षय होणार. प्रारब्ध अति दुर्धर आहे. मी वासुदेवास वारंवार एकांतीं बहुत सांगितलें कीं, हे सकल आपले संबंधी आहेत. यांजवर समान दृष्टि ठेव. जसे आपल्यास पांडव तसेच आपल्यास धृतराष्ट्र पुत्र आहेत. यास्तव त्यांचेंही साहाय्य कर, व पांडवांचेंही सहाय्य कर. तें न करतां कृष्ण धनंजयाचे लोभास्तव पांडवांचा अभिमानी होऊन बसला. तस्मात् पांडवांचाच या युध्दामध्यें जय होणार. जिकडे वासुदेव तिकडेच मी आहें. परंतु गदायुध्दविशारद असे भीम आणि दुर्योधन हे मला समानच आहेत. उभयतांही माझेच शिष्य, यास्तव मी दोघांवर लोभ समान करतों. असें बोलून धर्मराजास म्हणतो. हे धर्मा, मी आतां तीर्थयात्रेस जातों असें बोलून पांडवांनीं सत्कृत बलराम तीर्थयात्रेस गेला. असाविषय या अध्यायांत आहे.

१५८ अध्याय एकशें अठ्ठावन्न — वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, बलराम तीर्थयात्रेच्या निमित्तानें पांडवांकडून गेले इतक्यांत भीष्मक राजा त्यास हिरण्यरोमा असें ह्मणतात त्याचा पुत्र रुक्मी, पांडवांकडे गंध मादनपर्वत निवासी कोणी एक किंपुरुष होता त्याचा हा शिष्य त्याजपासूनच यास चतुष्पाद धनुर्वेद आणि गांडीव व शार्ङ्ग या धनुष्यांसारखें माहेंद्र नामक धनुष्य प्राप्त झालें. गांडीव, माहेंद्र आणि शार्ङ्ग हीं धनुष्यें देवांनीं धारण केलेलीं स्वर्गामध्येंच निरंतर राहाणारीं, समान बलिष्ट अशीं होतीं. तीं या पृथ्वीवर प्राप्त झालीं. त्यांतून शार्ङ्ग नामक धनुष्य श्रीकृष्णास, गांडीव नामक धनुष्य अर्जुनास, द्रुमनामक किन्नरापासून माहेंद्र धनुष्य रुक्मीस प्राप्त झालें. शार्ङ्ग धनुष्याच्या योगें श्रीकृष्णानें भौमासुरास मारून अदितीचीं मणि कुंडलें घेतलीं. अपत्तून माहेंद्र धनुष्य रुक्मीस प्राप्त झाल्यावर युध्दांत त्याचा जय झाला. नस्कत तें धनुष्य घेऊन तो एक अक्षौहिणी सैन्यासह वर्तमान कवच, खड्ग, धनुष्य धारण करून पांडवांकडे आला. आणि सर्व पांडवांचे वीर बसले असतां धनंजयास बोलला. हे धनंजया, जर तुला कौरवांपासून भय प्राप्त झालें असलें तर मी एक अक्षौहिणी सैन्य घेऊन तुला साहाय्य आलों आहें. द्रोण, कृप, कर्ण, भीष्म अथवा इतर राजे आले आहेत तथापि त्यांचा पराजय करून सकल पृथ्वी तुझे स्वाधीन करीन. असें ऐकून अर्जुन भाषण करतो. अरे रुक्मी मी पांडुराजाचा पुत्र, द्रोणाचार्यांचा शिष्य, व वासुदेव मला सहाय्य आहे व मी गांडीव धनुष्य धारण करणारा असें असतां तूं भाषण केलेंस हें व्यर्थ होय. अरे घोषयात्राप्रसंगीं महाबली जे गंधर्व यांसह वर्तमान मी युध्द केलें त्यासमयीं मला साह्य कोण होता? तसेंच खांडव वनाचा मी दाह केला याशिवाय मी अनेक पराक्रम केले त्या काळीं मला सहाय्य कोण होता? मी दिव्य गांडीव धनुष्याचा धारण करता, असंख्य माझे भाते, दिव्यास्त्रांतें जाणणारा असा मी असून माझ्यासारख्यास युध्दास भितोस असें कथयशस्कर भाषण केलेंस याविषयीं तुला लज्जा कशी वाटत नाहीं? हे रुक्मी, इंद्र जरी युध्दास आला तथापि मी भिणार

नाहीं. मला सहाय्याची गरज नाहीं. जर तुझी इच्छा असेल तर आमचे कडे ये, असें अर्जुनाचें भाषण ऐकून रुक्मी राजा सेनेसहित दुर्योधनाकडे गेला, आणि त्यास बोलला हे राजा, अर्जुनानें माझें प्रत्याख्यान केलें, यास्तव एक अक्षौहिणी सैन्य घेऊन तुझ्याकडे मी आलों आहें. असें ऐकून दुर्योधनानेंही त्याचा त्याग केला. तेव्हां तो आपल्या देशास गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५९ अध्याय एकशेंएकुणसाठ— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, कौरव आणि पांडव यांचीं सैन्यें कुरुक्षेत्रीं मिळालीं असतां पुढें परस्परांनीं काय केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, कौरव पांडवांचें सैन्य कुरुक्षेत्रीं गेल्यावर धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, कुरुपांडवांच्या सेनेंत काय वृत्तांत झाला तें मला सांग. मला असें वाटतें कीं, दैवच प्रधान असून पराक्रम हा निरर्थक आहे. युध्दांतक्षयरूप दोष बहुत असतां दैवेंकरून आमचे कपाळीं युध्दच प्राप्त झालें. आपलें हित व्हावें ह्मणून दुर्योधनास मी बहुत बोध केला परंतु त्याणें माझें कांहींच ऐकलें नाहीं. दुर्योधनाच्यायोगानें माझीही बुध्दि दोषयुक्त झाली ती आतां फिरत नाहीं. आतां जसें होईल तसें होवो, असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा, जें भवितव्य तेंच होतें. दुर्योधनावर दोषाचा आरोप देऊं नको. साधारण असा नेम आहे कीं, जो दुष्ट आचरण करतो त्यास अशुभच फल प्राप्त होतें. यास काल किंवा दैव प्रधान आहे असें ह्मणूं नये. हे राजा, तुमच्यामुळें पांडवांनीं किती बरें दुःखें सोसलीं! तुह्मी पांडवांचें अहित व्हावें ह्मणून किती उपाय केलेत! त्यायोगें तुह्मांस हा कुलक्षयरूप दंड ईश्वरानें उपस्थित केला. तुमच्या परस्पर युध्दांमध्यें गजाश्वं व इतर राजे यांनीं जीं पापें केलीं आहेत त्यांचेंही फल त्यांनच त्यांस प्राप्त होणार. हे महाराज, इतःपर सर्व लोकांचा क्षय करणारा असा एक मोठा काल प्राप्त होऊन सकल क्षत्रियगणांचा क्षय होणार. आतां जें जें होईल तें तें पहा, इतकेंच तुझें कार्य आहे. आणखी एक तुला सिध्दांत सांगतो. पुण्य आणि पाप यांचा कर्ता पुरुष स्वतंत्र आहे असें नाहीं. तस्मा-

त हे राजा, जो अनर्थ प्रस्तुत प्राप्त झाला आहे याचा परिणाम कसाकाय होईल. तो स्थिर होऊन ऐक. असा विषय या अध्यायांत आहे.

१६० अध्याय एकशेंसाठ — संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, हिरण्वतीचे ठायीं पांडव राहात असतां दुर्योधनराजाही सकलराजे व सैन्य यांसहवर्तमान हिरण्वतीस आला. नंतर कर्ण, दुःशासन, शकुनी यांसहवर्तमान दुर्योधनानें विचार केला कीं, पांडवांकडे आपण एक दूत पाठवावा आणि त्याजकडून पांडवांची निंदा करवावी असा विचार करून दुर्योधनानें उलूकास बोलावून सांगितलें कीं, हे उलूका सोमकांसहवर्तमान पांडव व श्रीकृष्ण बसले असतां माझा निरोप पांडवांस सांग कीं, बहुत वर्षें ज्याची चिंता तुम्ही करीत होतां तो समय आतां आला आहे. ज्या ज्या प्रतिज्ञा तुम्हीं केल्या आहेत त्या त्या आपल्या आतां समाप्तीस न्या. असें सकल पांडवांस भाषण करून ज्येष्ठ जो धर्मराज यास सांग कीं, तूं आपल्यास मोठा धार्मिक ह्मणवितोस आणि आतां सकल भ्राते, सोमक व केकय यांसहवर्तमान कां अधर्माविषयीं मन धारण केलेंस? निःस्यात् तुझें प्रच्छिन्न पाप करणारें असें बैडालव्रत आहे असें मला वाटतें. याविषयीं अशी एक गोष्ट आहे कीं, कोणे एके दिवशीं प्रल्हाद दैत्यांस भाषण करतो कीं हे सुरद्विषांनो, जो कोणी आपले ह्रदयांमध्यें निरंतर धर्म धरून मी मोठा धार्मिक आहें असें दुसऱ्यास समजण्याकरितां धर्माचीं चिन्हें दाखवितो तो मनुष्य गुप्त पातकें निश्चयें करून करतो. लोकांस मात्र तो दांभिकपणानें ठकवितो. या व्रतास बैडालव्रत ह्मणावें. या बैडालव्रताचें आख्यान नारदानें माझ्या पित्यास सांगितलें होतें, तें मी तुला सांगतों. कोणी एक दुष्ट मार्जार ऊर्ध्व बाहु करून गंगातीरीं निश्चल बसला होता. तो प्राणिमात्रांस असें ह्मणत असे कीं, आतां मी मनाची उत्तम शुद्धि करून उत्तमप्रकारचा धर्म आचरित आहें. यास कांहीं काळ गेल्यावर समग्र अंडज मार्जारावर परम विश्वास ठेवून त्याची प्रशंसा करूं लागले. परंतु तो मार्जार पक्ष्यांचीं पिलें चोरून दुसऱ्यास न कळतां भक्षण करीत असे. त्याचें कृत्य अंडजांस माहित नव्हतें, ह्मणून त्यांनीं त्याजवर मोठा विश्वास ठेविला. त्या

काळीं मार्जाराची पक्की खात्री झाली कीं माझ्यावर या अंडजांचा पूर्ण विश्वा सबसला आतां माझें कार्य झालें. यास कांहीं काळ गेल्यावर कांहीं मूषकां चा समुदाय तेथें येऊं लागला आणि धार्मिकव्रतचारी अशा मार्जारास पा हून त्या मूषकसमुदायाचे मनांत आलें कीं हा कोणी तरी दांभिक आहे या जवर विश्वास कामाचा नाहीं. पुनः ते आपले मनांत विचार करतात कीं. आपल्यास शत्रु फार आहेत आणि मित्र थोडे आहेत यास्तव यास आप ण मित्र करावें हा आपला मातुल होय. वृद्ध व बाल यां सर्वांचें हा रक्षण उत्तम प्रकारें करील. हा विचार सर्वांचे मनांत येऊन सर्व मूषक मार्जारास म्हणतात हे महाराज, तूं मोठा धार्मिक आहेस; धर्माचें ठायीं तुझी भक्ति बहुत आहे यास्तव तूं आमचें रक्षण कर. असें मूषकांनी भाषण केलें असतां मार्जार सर्वांस भाषण करतो. हे मूषक हो, तपश्चर्या किंवा तुमचें रक्षण या दोन्ही गोष्टी एककाळीं साधत नाहींत असो तुम्हीं म्हणतां त्यापेक्षां मी तुमचें भाषण मान्य करतों माझें ही वचन निरंतर तुम्हीं मा न्य करीत जा. आतां मी दृढ व्रताच्या योगें व तपाच्या योगें बहुत श्रांत झा ल्यामुळें कोठें जाण्यास मला शक्ति राहिली नाहीं. यास्तव मला प्रतिदि वशीं नदीच्या तीरीं नेऊन ठेवीत जा. असें मार्जाराचें भाषण ऐकून सर्व मूषकांनी सांगितलें कीं, फार चांगलें आहे. नंतर त्या दिवसापासून मूष क आपले वृद्ध व बाल जितके होते तितके मार्जाराचे स्वाधीन करून - आपण संचार करावयास जाऊं लागले. ते संचार करण्यास गेले म्हण जे मागें दुष्टात्म्या मार्जाराने मूषकांचें यथेच्छ भक्षण करावें तेणें करू न कांहीं दिवसांनीं मार्जार मोठा पुष्ट बळकट व तेजस्वी असा झाला. इकडे मुषकांचा गण क्षीण होत चालला असतां सकल मूषकांची मं डळी एकत्र जमून विचार करूं लागली कीं कायहो, आपला मातुल दि वसेंदिवस बहुत पुष्ट होत चालला आणि मंडळी क्षीण होत चालली. हें काय! तेव्हां याचा पक्का विचार केला पाहिजे. इतक्यांत त्या मूषकस- मुदायांत डिंडिक म्हणून एक शाहणा उंदीर होता त्याणें सर्वांस असा- विचार सांगितला कीं एके दिवशीं तुम्हीं सकल मूषक नदीतीरीं संचार-

करावयास जा. मी सर्वांच्या मागून मातुलास बराबर घेऊन येईन. असें ऐकून सर्व मूषक डिंडिकाचे भाषणाप्रमाणें वर्तूं लागले. कांहीं दिवसानीं डिंडिकासही मार्जारानें भक्षण केलें तेव्हां सकल मूषक पुन्हा विचार करूं लागले असतां त्यांमध्यें कोलिक नामक एक फार वृध्द मूषक होता तो बोलला हे मूषक हो, अरे हा तुमचा मातुळ धार्मिक नाहीं बरें. यानें कपटधर्माचा अवलंब केला आहे असें तुम्ही पक्कें समजा. अरे जे फलमूलें भक्षण करणारे त्यांच्या विष्ठेमध्यें लोम नसतात याच्या विष्ठेमध्यें तर लोम दिसतात आणि दिवसेंदिवस हा पहा कसा पुष्ट होत चालला व आपला गण क्षीण होत आहे आज सात आठ दिवस झाले डिंडिक नामक मूषक कोठें दिसत नाहीं असें त्या वृध्द मूषकानें भाषण केलें असतां ते सर्व मूषक पळाले. नंतर मार्जार ही तेथून गेला तसें हे धर्मराजा, तूं मार्जारासारखें व्रतधारण केलें आहेस. आमच्या ज्ञातीमध्यें तूं मार्जारासारखा होऊन बसला आहेस, भाषण एक प्रकारचें करतोस आणि आचरण एक प्रकारचें करतोस यास्तव हे राजा, हा छद्मवेष टाकून क्षत्रधर्माचा आश्रय कर. तुमच्या मातेनें बहुत वर्षेंपर्यंत दुःख सोसलें यास्तव आम्हास रणामध्यें जिंकून तिच्या दुःखाचें परिमार्जन कर. तुम्ही आमच्या पाशीं पांच ग्राम मागत असतां आम्ही तुम्हांस युध्दावांचून कसे द्यावे असें उत्तर पाठविलें होतें तेणें करून तुम्हांस कोप आला आहे त्याची आतां शांति करून घ्या. असें पांडवांस भाषण करून वासुदेवास माझा निरोप सांग कीं आमच्या सभेमध्यें मायेनें जें रूप आम्हांस दाखविलें स तसेंच पुन्हा अर्जुनासहवर्तमान आपलें भयंकर रूप प्रगट करून दाखवीव म्हणजे सांगतो. मजपाशीं अशा कृत्रिम विद्या बहुत आहेत. मायें करून मी आकाश, स्वर्ग, पाताळ यांत प्रवेश करतों. मी आपल्या शरीरांत बहुत रूपें दाखवितों. इंद्रजाल, मायाइत्यादिक लोकांत प्रगट केल्यानें त्यास ईश्वर म्हणत नाहीत. अशा प्रकारानें लोकांस कधींहि मोह व्हावयाचा नाहीं जो वास्तविक खरा परमेश्वर आहे तो सकल प्राणिमात्रांस मनानेंच तत्काल वश करतो आतां रणामध्यें सिध्द-

होऊन युध्द कर. हे उलूका, पशुतृषभतुल्य भीमसेनास सांग कीं, तूं सभेमध्यें दुःशासनाचें रुधिर प्राशन करीन अशी प्रतिज्ञा केलीस ती आपली प्रतिज्ञा मिथ्या करूं नको. जर तुजमध्यें शक्ति असेल तर रुधिर प्राशन कर. अरे तूं विराट नगरींत आचारीपणाचें काम करून बल्लव असें नाम पावला होतास. यांत तुझें पौरुष काय राहिलें. आतां तूं पराक्रमी किंवा मी पराक्रमी याचा विचार कर. आणखी तूं अशी प्रतिज्ञा केली आहेस कीं, धृतराष्ट्राच्या सर्व पुत्रांचा मी नाश करीन, तो समयच आतां प्राप्त झाला आहे. अरे तुझी प्रतिष्ठा भोजनांत असावी, युध्दांत तुझी प्रतिष्ठा नाहीं. कोठें जेवण आणि कोठें युध्द याचें बहुत अंतर आहे. हे वृकोदरा, माझ्या गदाघातेंकरून जेव्हां तूं हत होशील तेव्हां तूं सभेमध्यें वल्गना केलेल्या सर्व वृथा होतील. हे उलूका, तूं नकुलास माझा निरोप सांग कीं, आतां तूं युध्द कर. तुझें पौरुष काय आहे तें संग्रामामध्यें मी पाहतों असें नकुलास बोलल्यावर सहदेवासही माझा निरोप सांग कीं, जे तुला बहुत क्लेश झाले आहेत त्यांचें वारंवार स्मरण करून आतां युध्द कर. विराट आणि द्रुपद या उभयतांस सांग कीं, तुम्ही अत्यंत मूढ आहांत. मी गुणवान् राजा असून माझा त्याग केलात, आणि निर्गुणी जो धर्मराज याचा आश्रय केलात. असो आतां तुम्ही माझ्याशीं युध्द करीत असतां तुमची अवस्था काय होईल ती समजेल. तसाच धृष्टद्युम्नास सांग कीं, द्रोणाचार्यांचा वध करण्याची प्रतिज्ञा केलीस ती सिध्द कर. हे उलूका, शिखंडीस सांग कीं, तूं स्त्री आहेस असें जाणून भीष्म तुझ्यावर बाण प्रक्षेप करणार नाहीं. आतां निर्भय होऊन युध्द कर. हे उलूका, पार्थास पुनः असें सांग कीं, आमचा पराजय करून पृथ्वीचें शासन कर, अथवा आह्मांपासून मरण पाव. द्रोणाचार्यांच्या वधाची पार्थानें इच्छा केली आहे हें व्यर्थ आहे. द्रोण व भीष्म यांचा वध करण्याच्या इच्छेनें जो या उभयतांच्या अग्रभागीं प्राप्त होईल त्याचा पादस्पर्श भूमीस न होतां तो तत्काळ मरण पावेल. हे उलूका, अर्जुनास इतकेंच सांग कीं, तुझे अक्षय्य बाण आहेत, अग्नीनें तुला रथ दिला आहे. तुझ्या केतूचे अग्रीं वानर स्थित आहे. हें तुझें सकल ऐश्वर्य मला ज्ञात आहे तें ऐश्वर्य घेऊन युध्द कर. फार भाषणें करूं नको. तुला वासुदेव सहाय्य आहे.

तालमात्र उच्च तुझें गांडीव धनुष्य. तुझ्यासारखा योध्दा या पृथ्वींत कोणी नाहीं. हें सकल तुझें शौर्य मी जाणतों. इतकें जरी शौर्य तुझें आहे तथापी मी तुझें राज्य हरण केलें किंवा नाहीं. तूं विलाप करीत असतांही मी तेरा वर्षेपर्यंत राज्याचा उपभोग केला. पुनः आतांतरी युध्दांत सबांधव तुझा वध करून राज्य मीच करीन. अरे ज्याकाळीं आह्मीं तुह्मांस पणामध्यें जिंकून दास केलें त्याकाळीं अर्जुना तुझें गांडीव व भीमसेनाचें बल कोठें गेलें होतें? व द्रौपदीची निर्भर्त्सना केली त्याकाळीं तुमचीं शस्त्रास्त्रें कोठें गेलीं होतीं? वेणी धारण करून स्त्रीवेषानें विराट नगरीं वास केला तो तूंच ना. हे उलूका, फाल्गुनास इतकेंच सांग कीं, मी तुला अथवा केशवास कोणासही भीत नाहीं. केशवासहवर्तमान तूं माझ्याशीं युध्द कर आणि त्यामध्यें तूं माझा पराजय करून राज्य कर. अन्यथा तुला राज्य मिळणार नाहीं. हे राजा, हजारों वासुदेव युध्दांत प्राप्त होतील अथवा शतशः अर्जुन येतील युध्दांत माझे अग्रभागीं हतवीर्य होऊन दाही दिशेस पळतील. आमचा सेनासमुद्र ज्याकाळीं पाहाशील त्याकाळीं पृथ्वीचें राज्य करण्याची तुझी इच्छा नष्ट होईल. तुला राज्याची इच्छा फार आहे खरी परंतु हें राज्य तुला बहुत दुर्लभ आहे. आतां या राज्याविषयीं इच्छा धरूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

१६१ अध्याय एकशें एकसष्ट — संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा. दुर्योधनाचें भाषण ऐकून उलूक पांडवांच्या सैन्यांत येऊन धर्मराजास भाषण करतो हे राजा, तूं सूज्ञ आहेस यास्तव मी दुर्योधनाकडून कांहीं निरोप सांगण्याकरितां आलों आहें. माझ्या भाषणावर क्रोध करूं नको. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतो, हे उलूका, कांहीं भिऊं नको मत्सुब्ध व अज्ञानी जो धृतराष्ट्रपुत्र यानें जो निरोप सांगितला असेल तो निर्भयपणें मला सांग. असें ऐकून उलूक भाषण करतो. हे युधिष्ठिर राजा, दुर्योधनराजानें तुला निरोप सांगण्यास सांगितला आहे तो मी सांगतों. दुर्योधनाचें असें ह्मणणें आहे कीं, द्यूतामध्यें आह्मीं तुमचा पराजय केला. कृष्णेस सभेंत आणिली. द्वादशवर्षेंपर्यंत वनवास तुमच्याकडून करविला. एक संवत्सरपर्यंत विराटगृहीं तुह्मीं अज्ञातवास केला. तुमचें राज्य हरण केलें. इतक्या

कर्मांचें स्मरण होऊन तुला फार क्लेश होत असतील, तर तूं पराक्रमी असल्यास या दुःखाची शांति कर. अशक्त जो भीमसेन त्यानें अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, मी दुःशासनाचें रुधिर प्राशन करीन, तर भीमसेनानें तें कार्य अवश्य करावें. आणि केशवास बरोबर घेऊन तुह्मीं उदर्दैक युध्दाची तयारी करावी. भीष्म व द्रोण यांचा पराक्रम न जाणतां तुझी वल्गना व्यर्थ आहे. भीष्मद्रोण हे युध्दांत आले असतां तुमचा पादस्पर्शही भूमीस होऊं देणार नाहीं. तसेंच तूं प्राच्य, प्रतीच्य, दाक्षिणात्य इत्यादि योध्यांनीं माझी सेना गुप्त असतां तिचा पराक्रम कांहींच जाणत नाहींस. याप्रकारें उलूकानें धर्मराजास सांगून अर्जुनास भाषण केलें. हे अर्जुना, दुर्योधनानें तुला असें सांगितलें आहे कीं, व्यर्थ बडबड कां करतोस? जें तूं भाषण करतोस तें युध्दानें साध्य कर. तुला वासुदेव साहाय्य आहे. तालमात्रप्रमाण तुझें गांडीव धनुष्य आहे. तुझ्यासारखा योध्दा नाहीं हें मी जाणतों. आतां सबांधव तुझा नाश करून पुनः राज्य शासन मीच करणार. विराट नगरीं स्त्रीवेष धारण करून तूंच नृत्य करीत होतास. तसाच भीमसेन आचारी कर्म करीत होता यांत तुमचें पौरुष झालें किंवा आमचें झालें? क्षत्रियांनीं वेणी धारण करून दुसऱ्याचे कन्येस नर्तन शिकवणें हें त्याचें कर्म अगदीं निंद्य आहे. हे अर्जुना, तुला अथवा वासुदेवाला भिऊन ह्मणजे मी राज्य देईन असें नाहीं. केशवासह वर्तमान तूं माझ्याशीं युध्द करून राज्य हरण कर. सहस्रावधि वासुदेव अथवा शतावधि अर्जुन जरी माझ्याशीं युध्दास प्राप्त झाले तथापी त्यांस निर्वीर्य करून दाही दिशेस पळवीन. हे अर्जुना, सेनासमुद्र शस्त्रास्त्रांनीं अक्षय्य अति वृध्द झालेला यांत सबांधव ज्याकाळीं स्नान करशील त्याकाळीं तुझे बांधव नष्ट होऊन तूं परिताप पावशील. हे पार्था हें राज्य तुला अतःपर दुर्लभ आहे असें जाण. असा विषय या अध्यायांत आहे.

१६२ अध्याय एकशें बासष्ट— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, उलूकानें अनेकप्रकारचें निंदायुक्त भाषण ऐकून अर्जुन बहुत क्रुध्द झाला. तसेंच सकल पांडवही बहुत क्रुध्द होऊन आपआपल्या आसनावरून उठून बाहूंचा प्रक्षेप करीत एकमेकांकडे पाहूं लागले. भीमसेन आरक्त नेत्र करीत केशवाकडे पाहूं लागला. तेव्हां कृष्ण भाषण करतो हे उलूका, लौकर जाऊन

तूं दुर्योधनास सांग कीं, तुझ्या सकल भाषणाचें तात्पर्य जाणलें. जें तुला इष्ट आहे तेंच लौकर प्राप्त होईल. याप्रकारें भाषण करून श्रीकृष्ण धर्मराजाकडे पाहूं लागले असतां पुनः उलूकानें सकल राजसभेमध्यें पूर्वीसारखींच भाषणें करतांच पार्थ अत्यंत क्रुध्द झाला. तसेंच धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकि, कैकेय, पंचभ्राते, घटोत्कच, द्रौपदीचे पुत्र, अभिमन्यु, धृष्टकेतु, भीमसेन, नकुल आणि सहदेव इतके योध्दे आरक्तलोचन करीत बाहूंचें आस्फोटन करून बोलले. कायहो हा मूर्ख! कृष्णाची आणि पार्थाची निंदा करतो! असें ते परस्पर भाषण करीत आहेत इतक्यांत वृकोदर क्रोधानें उठून बोलला हे मूर्खा, सर्व क्षत्रिय बसले असतील व कर्ण पुत्र आणि तुझा पिता शकुनी हे ऐकतील अशा वेळेस जाऊन दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, हे मूर्खा आम्ही ज्येष्ठभ्रात्याचे आज्ञा परिपालक आहोंत. ज्याकाळीं तुम्ही आमची छळणा केली त्याकाळीं युधिष्ठिराची आज्ञा नव्हती म्हणून तुमचा वध केला नाहीं. वास्तविक पाहातां तुम्हीं त्याच काळीं वधास योग्य होतां. परंतु काय करावें भ्रातृप्रियत्वामुळें अडचण आली म्हणून तूं आपल्यास मोठा असें मानूं नको. तुझ्या दुराचाराचें फल लौकरच तुला प्राप्त होईल. असो संग्राम उदईक व्हावा अशी आमचीही इच्छा आहे. तुझ्या सकल भ्रात्यांचा मी वध करीन, व दुःशासनाचें रुधिर प्राशन करीन म्हणून प्रतिज्ञा केली आहे ती प्रतिज्ञा मी शेवटास नेईन. न नेईन तर मला परमेश्वराची शपथ आहे. याप्रकारें भीमाचें भाषण झाल्यावर माद्रीपुत्र सहदेव क्रोधानें भाषण करतो. हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, तुझा संबंध धृतराष्ट्राशीं झाला म्हणून धृतराष्ट्रही कुबुध्दि झाला. या तुझ्या उभयतांचा संबंध आमचे कुलास झाला म्हणून कौरवांचें व आमचें वैर झालें. या वैराचा अंत मोठा कठिण आहे. हे उलूका तुला पूर्वी मी मारून पश्चात् सकल योध्दे पाहात असतां शकुनीचा घात करीन ही माझी प्रतिज्ञा सत्य जाण असें ऐकून फाल्गुन बोलतो हे भीमा, ज्यांनीं तुझ्याशीं वैर संपादन केलें ते मंद आपले गृहीं सुखी कधींही राहावयाचे नाहींत. ते मृत्यूच्या पाशांत सांपडले असें जाण. हा उलूक दूतत्व करून आला आहे. याचा वध करूं नको. कारण यांत दूताचा अपराध नाहीं. यजमानाचा जमा

निरोप असेल तसा दूताने सांगणें अवश्य आहे. याप्रकारें भीमसेनास भाषण करून नंतर धृष्टद्युम्न प्रभृति वीर व इतरजे आपले सुहृद होते त्यांस भाषण करतो. अहो मित्रहो, पापी धृतराष्ट्र पुत्राचें भाषण ऐकलेंतना. यांत वासुदेवाची आणि माझी किती निंदा आहे ती ऐकलीत्च असाल. आतां तुह्मी हितेच्छु आहांत यास्तव आतां लौकर तयार व्हा. वासुदेवाची कृपा व तुमचा प्रयत्न येणेंकरून हें सकल पार्थिव सैन्य धृतराष्ट्र पुत्रानें जमविलें आहे याची मी गणना करीत नाहीं. आतां तुमच्या अनुमतानें उलूकास काय उत्तर सांगतों तें ऐका. असें बोलून नंतर उलूकास भाषण करतो हे उलूका, उदईक जें मला कर्तव्य आहे तें मी सैन्यमुखीं येऊन गांडीव धनुष्याच्या योगेंकरून दाखवीन. हा माझा निरोप तूं जाऊन दुर्योधनास सांग. उत्तरास प्रत्युत्तरें देत बसतात ते क्लीब जाणावे. कार्य करून दाखवावें बोलून दाखवूं नये. याप्रकारें अर्जुनानें उलूकास उत्तर केलें असतां सकल राजे अर्जुनाच्या भाषणाची प्रशंसा करूं लागले. नंतर धर्मराज बोलले हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, धर्मराजानें विशाल व्रत धारण केलें ह्मणून ह्मणतोस त्याव्रताचें कारण हेंच कीं, तुह्मी पापी व वक्रबुद्धि यास्तव तुह्मांशीं वक्रभावानेंच राहून तुमचें कदन केलें पाहिजे. आतां माझें जें वीर्य आहे तें प्रगट करून तुह्मांस सर्व योध्यांस युध्दाकर्ता आव्हान करतों. आह्मांस निरोप पाठविलास हें क्षत्रिय पुत्राचें कार्य नव्हे. हे कुलाधम, मान्य जे भीष्मादिक व अमात्य जे तुझे पुत्र लक्ष्मणादिक यांचा आश्रय करून आत्मवीर्याची प्रशंसा करतोस. यांत तुझा थोरपणा काय? असें अनेक प्रकारें धर्मराजाचें भाषण झाल्यावर श्रीकृष्ण भाषण करतात. हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, हे दुर्मते, उदईक तुझें काय पौरुष असेल तें प्रसिध्द कर. हे मूढा, मी युध्द करणार नाहीं, ह्मणून तूं जाणतोस. तथापी सारथ्य करून पांडवांस सहाय्य करीन. कर्ण व इतर पार्थिव यांस सांग कीं, श्रीकृष्ण निश्चयेंकरून युध्द करीत नाहीं. जर युध्द करील तर आजच तुमचा मृत्युकाल प्राप्त होईल. युधिष्ठिराची आज्ञा मला ग्रहण करणें अवश्य आहे. व फाल्गुन माझा सखा आहे. इतक्यांकारणावरून मी अर्जुनाचें सारथ्य करणार. जरी तूं तीन लोकांत जाऊन

बसशील अथवा भूतलामध्यें प्रवेश करशील तथापी त्या त्या ठिकाणीं अर्जुनाचा रथ प्रविष्ट झालेला तूं पाहाशील. दुःशासनाचें रुधिर भीमसेन प्राशन करणार ही त्याची प्रतिज्ञा तूं व्यर्थ जाणूं नको. ती सत्यच आहे. पार्थ, युधिष्ठिर, भीमसेन व नकुलसहदेव यांस प्रतिकूल जे भाषण करतील ते सर्व यमाचे घरीं जातील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६३ अध्याय एकशें त्रेसष्ट— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, उलूकाचें भाषण ऐकून अर्जुन ह्मणतो हे उलूका, दुसऱ्याचे आश्रयानें जो शत्रूस युध्दाकरितां आव्हान करतो त्याला या लोकीं पुरुषाधम असें ह्मणतात. हे दुर्बुध्दे युध्दामध्यें प्रथम भीष्माचा वध करीन, ही माझी प्रतिज्ञा दुर्योधन आणि जे सकल राजे आले असतील त्यांस सांग. हे उलूका, सकल कौरवांस हर्ष उत्पन्न व्हावा ह्मणून सभेमध्यें भीष्मानें अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, शृंजय, शाल्व, कैकेय यांचा हंता मी आहें. हा भार कौरवांचा मजवर आहे. पांडवांपासून तुह्मीं कांहीं भय बाळगूं नका. भीष्मास माझा जाऊन निरोप सांग कीं, युध्दप्रसंगीं प्रथम तुझा वध करतों नंतर इतर योध्द्यांचा वध करीन. हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, वासुदेवासह वर्तमान मी रणांगणीं आलों असतां तूं आपल्या जीवित्वाचीच आशा सोड. मग राज्याची इच्छा कां करतोस. भीष्म, द्रोण व सूतपुत्र हे रणांगणीं पडल्यावर तूं आपल्या जीवित्वाविषयीं व राज्याविषयीं निराश होशील. भीमसेनानें तुझे भ्राते मारल्यावर व पुत्रही युध्दांत मृत झाल्यावर जीं जीं दुष्कृत्यें केलीं असशील त्या दुष्कृत्यांचें त्यावेळेस तुला स्मरण होईल, असें अर्जुनानें भाषण केल्यावर धर्मराज भाषण करतो. हे उलूका, माझाही निरोप तूं दुर्योधनास सांग कीं, तूं आपल्या स्वभावाशीं माझा स्वभाव लावूं नको. सत्य आणि अनृत यांमध्यें जितकें अंतर तितकें अंतर तुझ्या व माझ्या स्वभावामध्यें आहे. वासुदेव तुह्मांकडे शम करण्यास आला असतां त्याचेंही भाषण ऐकलें नाहींस. आतां फार काय बोलावें, तूं माझें अत्यंत अप्रिय केलेस, यास्तव सबांधव युध्दास सिध्द हो. जें तुला इच्छित आहे तेंच मला आहे. असें धर्मराजाचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो. हे उलूका,

दुर्मति दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, मीं जी प्रतिज्ञा केली आहे ती मी सत्य करीन. न करीन तर मला शपथ आहे. रणांगणीं दुःशासनास मारून त्याचें रुधिर मी प्राशन करीन. तुझ्या मांडीचा भेद करीन आणि तुझे जितके बंधु आहेत तितक्यांस मी यमसदनास पाठवीन. जे राजपुत्र युध्दसमारंभास प्राप्त झाले आहेत त्यांना मृत्यु अभिमन्यु आहे असें भीमानें भाषण केल्यावर सहदेव भाषण करतो. हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांगकीं, तुला जी मति उत्पन्न झाली आहे ती सर्व व्यर्थ आहे. सपुत्र ज्ञाति बांधव तुझा वध झाला ह्मणजे आह्मांसच क्लेश होईल. तूं नरब हुन वल्गना करतोस याची तुला कशी लज्जा वाटत नाहीं. नंतर विराट आणि द्रुपद भाषण करतात हे उलूका, दुर्योधनास तूं आमचा निरोप सांगकीं, आह्मीं पांडवांचे दास झालों आहों ह्मणून तूं भाषण केलेंस. त्यास साधूंचे दास होण्यास कांहीं चिंता नाहीं. आतां आह्मी दास आहोंत किंवा अदास आहोंत याचा प्रत्यय तुह्मांस लौकरच दृष्टीस पडेल. असें ऐकून शिखंडी भाषण करतो हे उलूका, माझा निरोप तूं दुर्योधनास सांग कीं, ज्याच्या आश्रयानें युध्दांमध्यें तूं विजयाची इच्छा करतोस त्या भीष्मास मी युध्दांमध्यें रथाखालीं पाडलेला पाहाशील. ब्रह्मदेवानें भीष्मवधाकरितांच मला उत्पन्न केलें आहे असें शिखंडीचें भाषण झाल्यावर धृष्टद्युम्न भाषण करतात. हे उलूका, दुर्योधनास माझा निरोप सांग कीं, रणांमध्यें सबांधव सगण अशा द्रोणाचार्यांचा मी प्राण घेईन. धर्मराज भाषण करतात हे उलूका, तूं सुयोधनास सांग कीं, ज्ञाति वध करण्याविषयीं माझी मति होत नाहीं. परंतु हे दुर्बुध्दे, तुझ्याकरितां हा प्रसंग करणें आह्मांस प्राप्त होतें. या ज्ञातिवधास कारण तूंच आहेस. हे उलूका, तूं आतां लौकर जाऊन सर्व निरोप दुर्योधनास सांग अथवा येथें राहाण्याची इच्छा असेल तर एथें राहा. आह्मीं तुझे बांधव आहोंत असें धर्मराजाचें भाषण ऐकून उलूकानें सुयोधनाकडे जाऊन श्रीकृष्ण, पांडव व त्यांचे वीर यांचीं पौरुषयुक्त भाषणें यथाक्रमें सांगितलीं असतां दुःशासन, कर्ण आणि शकुनि यांनीं आपले जितके राजे होते त्यांस आज्ञा दिल्ही कीं, उदयीक सूर्योदयीं आपआपलें सैन्य घेऊन सिध्द असावें. असा नि० या० अ० आ०

१६४ अध्याय एकशें चौसष्ट— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, उलूकाचें भाषण ऐकून धर्मराजानें धृष्टद्युम्न, पुरोगमयोध्देपदानी, नाग, रथी, अश्व इत्यादि चतुरंगसेना, सिध्द होण्यास आज्ञा देतांच सागरासारखी चातुरंगसेना तत्काळ सिध्द झाली. नंतर कोणी कोणाशी युध्द करावें याची योजना करून धृष्टद्युम्न सर्वयोध्यांस बोलला कीं, अर्जुनानें सूतपुत्राशीं युध्द करावें. भीमसेनानें दुर्योधनाशीं, धृष्टकेतूनें शल्याशीं, उत्तमोजानें गौतमाशीं, नकुलानें अश्वत्थाम्याशीं, शैब्यानें कृतवर्म्याशीं, सात्यकीनें जयद्रथाशीं, शिखंडीनें भीष्माशीं, सहदेवानें शकुनीशीं, चेकितानानें शलाशीं, द्रौपदेयांनीं पंचत्रिगर्तांशीं, अभिमन्यूनें वृषसेनाशीं अशीं युध्दें करावीं. अवशिष्ट जे राहिले त्यांनीं आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें जे जे राजे येतील त्यांच्याशीं यथाशक्ति निःशंक युध्द करावें. याप्रकारें धृष्टद्युम्नानें द्वंद्व युध्दाचा पृथक् पृथक् विभाग करून आपण सेनापति झाला. आणि त्यानें द्रोणाचार्यांशीं युध्द करण्याची इच्छा धरिली. असा विषय या अध्यायांत आहे.

१६५. अध्याय एकशेंपासष्ट— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, भीष्मवधाची प्रतिज्ञा पार्थानें केली असतां दुर्योधनादिक माझे पुत्रांनीं काय केलें? तसेंच भीष्मांनीं काय भाषण केलें? कौरवांच्या सैन्याचें आधिपत्य भीष्मास प्राप्त झाल्यावर त्याची स्थिति कशी काय झाली? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे धृतराष्ट्रराजा, भीष्मास सैन्याचें आधिपत्य प्राप्त झाल्यावर तो दुर्योधनास हर्षकारक असें बोलला. हे दुर्योधना, कार्तिकस्वामीस माझा नमस्कार असो. आज तुझा मी सेनापति झालों यांत संशय नाहीं. सेनाकर्मामध्यें मी मोठा निपुण आहें. तसेंच नानाप्रकारचे व्यूह मला विदित आहेत. देव, गंधर्व मानुष इत्यादिक व्यूहाचा मी अभिज्ञाता आहें. तेणेंकरून सकल पांडवांस मी मोह उत्पन्न करीन. तूं कांहीं भय पावूं नकोस. असें ऐकून दुर्योधन भाषण करतो. हे गांगेय, समस्त देवासुर जरी युध्दास आले तथापी मी भीत नाहीं. तशांतून तूं व द्रोणाचार्य हे उभयतां तुह्मी अग्रभागीं असल्यावर माझा विजय सहज आहे. आतां आपली व पांडवांची रथसंख्या एकंदर किती आहे ती सांगा. असें ऐकून भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, सहस्रावधि

प्रयुत अर्बुद तुमच्या सैन्यांत रथी आहेत. परंतु त्यांत मुख्य किती आहेत त्यांची संख्या सांगतो. दुःशासन प्रभृति तुह्मी शंभर भ्राते त्यांमध्यें तू अग्रेसर, तुह्मां सर्वांस महारथी अशी संज्ञा आहे. तुह्मी गदा, प्रास, चर्म इत्यादिकांनी शत्रूंशीं युध्द करणारे आहांत. सकल शस्त्रविद्या तुह्मांस विदित आहेत. द्रोणाचार्य व कृपाचार्य यांजपासून तुह्मांस अस्त्रविद्या प्राप्त झाली. हे तुह्मी, पांचाल यांचें हनन कराल, अशी तुमची योग्यता आहे. हे दुर्योधना, मी तुमचा सेनापति पांडवांस तृणप्राय करून शत्रूंस मारीन. कृतवर्मा व शल्य हे दोन अतिरथी आहेत. हे पांडवांशी मोठें युध्द करतील. जयद्रथ यास द्विरथी ह्मणावें. हे राजा, द्रौपदी हरणकाळीं पांडवांनी यास बहुत क्लेश दिल्हे आहेत. त्याकाळीं यानें मोठें दारुण तप करून दुर्लभ वर प्राप्त करून घेतला आहे. त्यायोगें हा प्राणजाईपर्यंत पांडवांशीं युध्द करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६६ अध्याय एकशें सासष्ट— भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, सुदक्षण, नीलनामक राजा, विंदानुविंद हे एकरथी, त्रिगर्त पंचभ्राते हे महारथी हे व तुझा पुत्र लक्ष्मण व दुःशासनाचा पुत्र हे पांडवांशीं युध्द करतील. तसाच दंडधार हा एक रथी व बृहद्बलराजा हा एकरथी व उग्रायुध हे पांडवांशीं बहुत मोठें युध्द करतील. कृपाचार्य हा अतिरथी होय. हा शरद्वता पासून शरस्तंभीं उत्पन्न झाला. याची सेना युध्दांत निपुण असून विपुल आहे यास्तव तो अग्नीसारखा शत्रुसैन्याचा दाह करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६७ अध्याय एकशें सदुसष्ट— भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, तुझा मातुल शकुनी हा एकरथी आहे. यानें पांडवांशी मोठें वैर केलें यास्तव तो त्यांशीं मोठें युध्द करील. तसाच अश्वत्थामा महा धनुर्धारी याचें अस्त्र अत्यंत दृढ आहे. यानें मनांत आणिलें असतां आपल्या अस्त्रेंकरून तिन्ही लोकांचा हा दाह करील. तसाच द्रोणाचार्य यानें दिव्यास्त्रांमध्यें यास मोठा निपुण केला आहे. परंतु हा रथी महा रथी किंवा अतिरथी अशी कोणती योग्यता यास असावी याविषयीं माझी बुध्दि चालत नाहीं. या ब्राह्मणास आयुष्याची बहुत इच्छा आहे. चिरंजीवित्व असण्याविषयीं हा निरंतर यत्नांत असतो. तलघोषानें पर्वताचें विदारण करण्याची यास

शक्ति आहे. हा भरतसैन्याचा एक भाग स्वतंत्र आहे. हा युध्दाचे अंतीं कांहीं एक विचित्र कर्म करील. याचा पिता द्रोणाचार्य अति वृध्द असून तरुणासारखें कृत्य करणारा आहे. हा रणामध्यें पंडुपुत्राच्या सैन्याचा तत्काळ अस्त्राच्या योगें नाश करील. यास महा अतिरथी ह्मणणे योग्य आहे. हा सृंजयाचा अंत करील. यास धनंजय अत्यंत प्रिय आहे. पार्थाचे गुण पाहून त्यास मारण्याविषयीं याची कधींही इच्छा होत नाहीं. हे दुर्योधना, पौरवनामक राजा याची महारथ्यांत गणना आहे. हा पांचाळांस दग्ध करून टाकील. सत्यश्रवानामक राजाची एकरथ्यांत गणना आहे. बृहद्बलनामक राजा, कर्णाचा पुत्र वृषसेन हे एकरथी आहेत. तसाच जलसंधनामक राजा हा एकरथी आहे. बाल्हिकनामक राजा हा अतिरथी आहे हे सर्व शत्रूशीं निकट युध्द करतील. तसाच अलंबुष नामक राक्षसेंद्र हा बहुत माया प्रगट करून चमत्कारिक युध्द करील. हे दुर्योधन राजा, भगदत्त नामक राजा महाप्रतापी आहे. याचें आणि अर्जुनाचें पूर्वीं बहुत दिवस युध्द झालें होतें. त्या युध्दांत उभयतांस ही जयप्राप्त झाला नाहीं. नंतर त्याचा सखा इंद्र होता त्यानें उभयतांची मैत्री करून दिल्ही. असा हा शूर आहे. हा गजाचे स्कंधावर बसून संग्रामामध्यें युध्द करील. असा विषय या अध्यायांत आहे.

१६८ अध्याय एकशें अडुसष्ट—भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, अचल आणि वृषक हे उभयतां भ्राते एकरथी होत. हे तुझ्या शत्रूंचा विध्वंस करतील. तसाच हा कर्ण तुझा मित्र आहे. हा तुझ्या बुध्दीस वारंवार उत्तेजन देत असतो तूं त्याला बंधूसारखा मानिला आहेस. हा मोठा मानी आहे. यास रणामध्यें मी अतिरथी असें ह्मणणार नाहीं. यास पूर्वीं सहज कवच कुंडलें होतीं तीं याजपासून नष्ट झालीं. निरंतर हा लोकांची निंदा करणारा याला परशुरामाचा मोठा शाप झाला आहे. हा कवचें कुंडलांनीं ज्यापेक्षां हीन झाला आहे त्यापेक्षां हा अर्धरथीच मला मान्य आहे. हा ज्याकाळीं अर्जुनाच्या अग्रमार्गी प्राप्त होईल त्याकाळीं जिवंत राहावयाचा नाहीं. असा कर्णाचा वृत्तांत सांगितल्यावर द्रोणाचार्य भाषण करतात. हे दुर्योधना, भीष्मांनीं कर्णाविषयीं जें भाषण केलें तें सर्व सत्य आहे

कोणचेंही युध्द प्राप्त झालें असतां कर्णाचा अभिमान आहेच. बरें युध्दांतू-
न हा पलायनही करतो. तस्मात् हा मोठा निंदक असून प्रमादशील आहे त्या
पेक्षां अर्धरथीच हें मला मान्य आहे. असें द्रोणाचार्यांनी भाषण केल्यावर रा
धेय क्रोधानें भीष्मास भाषण करतो. हे पितामह वाकूशरेंकरून मला कृंतन
करतोस काय? तुझा मी कांहीं अपराध केला नाहीं, व तुझामाझा कांहीं द्वेष
नाहीं. तुमचा आमचा संबंध दुर्योधनाकरितांच आहे. जसा कुपुरूष असतो
तसा मला तू अगदीं मूर्खच मानितोस काय? हे गांगेया मला असें वाटतें कीं,
तूच अर्धरथी आहेस. कौरवांचें अहित होण्याविषयीं तुझी बुध्दि निरंतर आ-
हे. परंतु हें तुझें कुकर्म दुर्योधन राजा जाणत नाहीं. अरे समान योध्दे क्षात्र कर्मा
मध्यें उदार असतां त्यांचा तेजोवध करून शत्रूंच्या गुणांचा तूं वारंवार उत्कर्ष
करतोस त्यापेक्षां महारथ्यांमध्यें तुझी संख्या करण्यास मी अगदीं इच्छीत
नाहीं. अरे ज्यास बहुत वर्षें झालीं. ज्यापाशीं बहुत वित्त आहे अथवा बंधु ज्या-
चे बहुत आहेत म्हणून तो महारथी गणला जातो असें नाहीं. ज्याचें बल श्रेष्ठ
तोच महारथी होय. तूं पाहिजे त्यास महारथी व अतिरथी करतोस. आरे अस-
तांही त्यांस मोहें करून अथवा द्वेषें करून न्यून करतोस काय. असें प्रथम भी-
ष्मास भाषण करून नंतर दुर्योधनास भाषण करतो हे दुर्योधना, माझें भाष-
ण ऐकून हा दुष्ट पापी भीष्म याचा त्याग कर. हे राजा, भीष्माच्या भाषणामुळें आ-
पली सेना भिन्न होईल. भीष्म वारंवार पार्थाचें वर्णन करीत असतो तेणेंकरून
तुह्मांकडील क्षत्रिय आहेत त्यांच्या मनास कांहीं तरी अन्यारा उत्पन्न होऊन
सैन्य द्विधा होईल. रथी अतिरथी यांचें ज्ञान भीष्मास काय आहे? अल्पबुध्दि
जो भीष्म यानें पांडवांचें निवारण होणार नाहीं. मी एकाकी पांडव सैन्याचें नि-
वारण करतों. आतां भीष्माचें वय फार झालें, यास्तव त्याचे बुध्दीस मांद्यत्व
बहुत आलें आहे. कालाचें गृह लौकरच तो पाहाणार. एकादी मसलत विचा-
रली असतां तीही त्यास समयोचित सांगतां येत नाहीं. आणि एकटा असून
सर्व जगताशीं स्पर्धा करतो हा एक याचा मोठा दोष आहे. याच्या दृष्टीनें दुस-
रा पुरूष या भूमंडळी कोणीच पराक्रमी नाहीं. वृध्द जे आहेत यांचीं भाषणें
ऐकून मात्र घ्यावीं, त्याजवर शंका करूं नये. जितके वृध्द आहेत त्यांची गणना

बालांमध्येंच होय. हे दुर्योधना, याचे भाषणावर कांहीं विश्वास ठेवूं नको. मी एकटा पांडव सैन्याचा पराभव करतों. हे राजा, तुझ्या मनांत आलें असेल कीं, भीष्मास सेनापति केला ह्मणजे आपल्यावर कांहीं संकट नाहीं. यशाचा अथवा अपयशाचा धनि भीष्म होय. परंतु तुला एक निश्चय सांगतों. भीष्मास तूं सेनापति केला असतां कधींही तुला यश यावयाचें नाहीं. मीतर भीष्म जिवंत असतां पांडवांशीं युध्द करणार नाहीं. भीष्म हत झाल्यावर सर्व महारथ्यांसहवर्तमान मी एकटा युध्द करीन, असें कर्णाचें भाषण ऐकून भीष्म बोलतात. हे कर्णा, या सकल सेनासागराचा भार धृतराष्ट्रपुत्रानें माझ्यावर ठेविला आहे. याचा काळ आतां समीपच आला. बहुत वर्षेपर्यंत आह्मीं दुर्योधनाचें अन्न भक्षण केलें त्याचें सार्थक आतां लौकरच आह्मीं करून दाखवूं. अरे उगीच वडबड करून माझ्यामध्यें आणि दुर्योधनामध्यें भेदमात्र उत्पन्न करशील तो करूं नको. तो न केलास तर कांहीं दिवस वांचशील, नाहीं तर आतांच तुझ्या जिवाचें तुला रक्षण केलें पाहिजे. तुला मी वृध्द दिसतों परंतु तूं तरुण आणि मी. तुझी माझी बरोबरी व्हावयाची नाहीं. हे कर्णा, युध्दाविषयीं मला जितकी श्रध्दा आहे तितकी तरुणासही नसेल. ज्याकाळीं जामदग्न्य रामाचें आणि माझें युध्द झालें त्याकाळीं रामाचे शस्त्रापासून किंचितही मला व्यथा झाली नाहीं. तेव्हां तुझ्यापासून माझें काय व्हावयाचें? हे कर्णा, तुला मी आपली पुरातन गोष्ट सांगतों. काशीराजाच्या कन्यांच्या स्वयंवर काळीं सकल क्षत्रिय एकत्र जमले असतां त्या सकलांचा मीं एकट्यानें पराभव केला, आणि काशीराजाच्या कन्या हरण केल्या, असा माझा पराक्रम आहे. नाहीं तर पाहा, दुर्योधनानें तुझा आश्रय केला असतां त्याचें फल असें झालें कीं, परस्पर वैरमात्र तूं उत्पन्न केलेंस. हें वैर केवळ कुरुवंशाच्या विनाशाचें कारण आहे. हे दुर्मते, पार्थाशीं स्पर्धामात्र करतोस. आतां पार्थ रणांगणीं आला ह्मणजे कसकसें युध्द करतोस तें पाहातों. याप्रकारें भीष्मांनीं कर्णाची निंदा केली असतां दुर्योधन भाषण करतो. हे गांगेय, माझ्याकडे पाहा कर्णाकडे पाहूं नको. तुह्मांस कर्ण नाहीं तर कर्णाशीं तुमचा संबंध काय? माझें जें मोठें कार्य उपस्थित

झालें आहे. त्याचा भार तुह्मीच घेतला आहे. आतां जेणेंकरून माझें कल्याण होईल तें करा. तुह्मीं उभयतांही मोठे आहां. महत्कर्म करण्याची तुह्मां उभयतांचीही शक्ति आहे. असो. उभयतां आपआपल्यांमध्यें कलह करूं नका. हे भीष्मा आमच्या सैन्यांतील रथी महारथी अतिरथी इत्यादिक तुह्मीं सांगितलेत. आतां शत्रूचें बल किती आहे व त्यांत रथी महारथी व अतिरथी किती आहेत याची गणना लौकर सांगा. ही रात्र गेल्यावर उद्यीक प्रातःकाळीं युध्दास आरंभ व्हावयाचा आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१६९ अध्याय एकशें एकूण सत्तर—भीष्म भाषण करतात हे दुर्योधन राजा, पांडवांकडे रथी अतिरथी किती आहेत याची संख्या सांगतो. धर्मराज महारथी हा अग्नीसारखा समरांमध्यें संचार करील. भीमसेन अष्टरथी. भीमसेनासारखा गदायुध्दांमध्यें आणि बाणयुध्दांमध्यें दुसरा कोणीं नाहीं. दाहा हजार नागांचें यास बल. याचें तेज मनुष्याचें नव्हे. माद्रीपुत्र यांची संख्या रथ्यांमध्यें आहे. हे ज्याकाळीं सैन्यांत उभे राहातील त्याकाळीं सर्व क्लेशांचें यांस स्मरण होईल. युध्दांमध्यें हे रुद्रासारखा संचार करतील. तुझ्या सैन्यांत ज्याकाळीं हे येतील त्याकाळीं सकल सैन्य हे भग्न करून टाकतील. यांच्यांशीं युध्दप्रसंग करणें राजा बहुत कठीण आहे. हे राजा तसाच अर्जुन भगवान नारायण प्रत्यक्ष ज्यास सहाय्य असा योध्दा पृथ्वीवर एकही वीर झाला नाहीं, व पुढेंही होणार नाहीं. ज्याचा सारथी वासुदेव स्वतः आपण योध्दा, गांडीव नामक दिव्य धनुष्य, वायूसारखे अश्व, अभेद्य व दिव्य कवच, तसेंच दिव्य अक्षय्य भाते इतकी सामोग्री ज्या पार्थाची त्याचा पराजय कोण करणार. माहेंद्र, रौद्र, कौबेर, याम्य, वारुण, इतकीं अस्त्रें ज्यास प्राप्त झालीं आहेत, तशाच परम भयंकर गदा, वज्रादिक मुख्य आयुधें ज्यापाशीं आहेत, ज्यानें एकरथी होऊन हिरण्यपुरवासी सहस्त्रावधि दानवांचा वध केला असा पराक्रमी जो अर्जुन तो राजा तुझ्या सैन्याचा समूळ नाश करील. अर्जुनासमान मी किंवा द्रोणाचार्य तिसरा कोणीं नाहीं. भीष्मापासून अर्जुनाचा या प्रकारचा पराक्रम ऐकून दुर्योधन प्रभृति राजे प्रत्यक्ष पाहिलेल्या अर्जुनाच्या सामर्थ्याचें स्मर

ण करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७० अध्याय एकशें सत्तर— भीष्म सांगतात हे दुर्योधना, द्रौपदीचे पांच पुत्र व विराटराजाचा पुत्र उत्तर हे महारथी आहेत. अभिमन्यु हा अतिरथी आहे. याची योग्यता पार्थासमान असून वासुदेवासारखें शत्रूचें हनन करणारा इत्यादि यामध्यें मोठे गुण आहेत. हा मोठा पराक्रम करील. सात्यकीनामक वृष्णीवीर हा अतिरथी आहे. हे दुर्योधना उत्तमोजा आणि युधामन्यु हे महारथी आहेत. हे मोठें निकर युध्द करतील. शेवटीं युध्दांमध्यें आपले तनूचा त्यागही करण्यास सिध्द होतील. परंतु युध्द पराङ्मुख व्हावयाचे नाहींत. विराट आणि द्रुपद हे उभयतां महारथी युध्दांमध्यें शत्रूंनीं पराजय करण्यास अशक्य आहेत. तसेच वयोवृध्द असून हे पृथक् पृथक् अक्षौहिणी सैन्य घेऊन संग्रामामध्यें विलक्षण शक्ति प्रगट करतील. असा विषय या अध्यायांत आहे.

१७१ अध्याय एकशें एकाहत्तर— भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, पांचाल राजाचा पुत्र शिखंडी महारथी पार्थासमान्य असा आहे. हा संग्रामामध्यें आपल्या पूर्व स्थितीचा ह्मणजे स्त्रीत्वाचा त्याग करून तुझ्या सैन्यांत अघटित कर्म करील. पांडवांच्या सकल सैन्याचा अधिपति धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांचा शिष्य अतिरथी आहे. हा संग्रामामध्यें शत्रुसैन्याचें बहुत कदन करील. हे राजा, क्षत्रधर्मनामक धृष्टद्युम्नाचा पुत्र हा अर्धरथी आहे. तसाच शिशुपालाचा पुत्र धृष्टकेतु पांडवांचा संबंधी आहे. हा महारथी आहे. तसाच क्षत्रदेवाचा पुत्र क्षत्रधर्म हाही मोठा योध्दा आहे. जयंत आणि अमितौजा हेही महारथी आहेत. अज आणि भोज हेही महारथी आहेत. केकय पंच भ्राते हे महारथी आहेत. काशीराजा, नील, सूर्यदत्त, शंख, मदिराश्व, वार्धक्षेमी, चित्रायुध, चेकितान, सत्यधृति, व्याघ्रदत्त, चंद्रसेन व सेनाबिंदु हे सर्व महारथी आहेत. काश्य हा एकरथी आहे. परंतु ज्याकाळीं हा युध्दांत प्राप्त होतो त्याकाळीं अष्टगुणित रथ्यांचें बल प्राप्त येतें. हे सर्व योध्दे युध्दांत अघटित कर्म करतील. तसाच सत्यजित हा अतिरथी आहे. हा युध्दामध्यें महत्कर्म करील. तसाच पांड्यराजा महारथी आहे

श्रेणीमान आणि वसुदान हे उभयतां अतिरथी असून शत्रूंचा नाश करतील. असा विषय या अध्यायांत आहे.

१७२ अध्याय एकशें बाहात्तर— भीष्म सांगतात हे दुर्योधना, पांडवांकडील रोचमान नामक योध्दा महारथी आहे. तो अमरांसारखा शत्रुसैन्यांत संचार करील. पुरुजित नामक राजा अतिरथी आहे. हा शत्रुसैन्यांत युध्द करील. याचे बरोबर युध्द विशारद असे योध्दे बहुत आहेत. तसाच हैडिंब नामक भीमसेनाचा पुत्र अतिरथी आहे यास्तव हे दुर्योधना, हा मायीक युध्दें बहुत करील. या राक्षसाचे आणखीही सचीव याच्या आज्ञेंत वागणारे माहा वीर असे बहुत आहेत. हे दुर्योधना, याप्रकारें बहुत राजे पांडवांकडे आहेत. श्रीवासुदेव ज्यांमध्यें मुख्य असे पांडवांचे हितकर्ते रथी अतिरथी व अर्धरथी यांची संख्या तुला सांगितली. हे सकल राजे युधिष्ठिराच्या सैन्याचें रक्षण करून शत्रूचें सैन्य बहुत मारतील. जशी देवसेना इंद्रानें संरक्षित आहे तशी अर्जुनानें ही सेना संरक्षित आहे. हे दुर्योधना, इतके पांडवांकडील जयाची इच्छा करणारे वीर माझ्या अग्रभागीं आले असतां मी त्यांशीं मोठें युध्द करीन. वासुदेव, अर्जुन ज्याकाळीं एकत्र होऊन रणांगणीं येतील त्याकाळीं बहुत सैन्याचा ध्वंस होईल. हे राजा, मी तुझ्या सैन्याचे रक्षण प्राण जाईपर्यंत करण्यास अंतर करणार नाहीं. परंतु शिखंडी माझ्यापुढें युध्दास आला असतां त्याशीं मी युध्द करणार नाहीं. पित्याचें इच्छित सिध्द होण्याकरितां मी व्रत धारण केलें आहे तें सकल लोकांस विदितच आहे. पितृपैतामह राज्य मला प्राप्त होत असतां त्याचा मी त्याग करून ब्रह्मचर्य व्रत धारण केलें, आणि चित्रांगदास राज्याधिपत्याचा अभिषेक करून विचित्रवीर्यास यौवराज्याचा अधिकार दिला. नंतर मीं ब्रह्मचर्य धारण करून सकल राजांमध्यें अशी प्रतिज्ञा केली कीं, मी स्त्रीचा वध करावयाचा नाहीं. व जो पूर्वी स्त्री असून नंतर पुरुष होईल त्याचाही वध करावयाचा नाहीं. हे राजा, शिखंडी तर पूर्वी स्त्री होता नंतर पुरुष झाला. यास्तव माझ्या अग्रभागीं युध्दास आला असतां त्याशीं मी युध्द करणार नाहीं. शिखंडीवांचून सर्व राजे मी युध्दांत मारीन. आणखी

ही माझी प्रतिज्ञा आहे कीं, कुंतीसुतांस युध्दांमध्यें मी मारणार नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१७३ अध्याय एकशें त्र्याहत्तर– दुर्योधन भाषण करतो हे भीष्मा, शिखंडीचा वध करणार नाहीं ह्मणून प्रतिज्ञा केली आहे असें सांगतां आणि पूर्वी तर अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, सोमकांसह पांचालांचा मी वध करीन. तेव्हां शिखंडी पांचाल असतां त्याचा वध तुह्मीं कां करणार नाहीं. तुमच्या प्रतिज्ञेस व्यत्यास येतो किंवा नाहीं तें सांगा. असा प्रश्न ऐकून भीष्म भाषण करतात हे राजा, माझा पिता धर्मात्मा शंतनूनामक होता तो कांहीं दिवसांनीं मरण पावला. तो जिवंत असतां मी प्रतिज्ञा केली कीं, राज्याचें ग्रहण करणार नाहीं, ती प्रतिज्ञा सिध्द होण्याकरितां माझा भ्राता चित्रांगद यास मी राज्यारूढ केला. तो कांहीं दिवसांनीं मरण पावल्यावर सत्यवतीच्या अनुमतें कनिष्ठ जो माझा बंधु विचित्रवीर्य यास राज्याभिषेक केला नंतर त्याचा विवाह करावा असा विचार करून काशी राजाच्या तीन कन्या अंबा, अंबिका आणि अंबालिका त्या अनुक्रमें रूपानें अप्रतीम असून उपवर आहेत. आणि त्यांच्या स्वयंवराकरितां सकल राजे तेथें आले आहेत हें समजतांच मी रथारूढ होऊन काशी पुरीं गेलों. नंतर तेथें त्या तीन कन्या अलंकारयुक्त अत्यंत रूपवान् पाहून सकल क्षत्रियांस युध्दाविषयीं आव्हान करीत तिन्ही कन्या रथांत घालून चाललों आणि सकलांस सांगितलें कीं मी शांतनव भीष्म या कन्यांचें हरण करतों. कोणाची इच्छा असेल तर या कन्या न्यावा. या कन्यांचें मोल्य जो वीर्यवान सकलांचा पराजय करील त्यानें घ्याव्या हेंच आहे. कोणाचें सामर्थ्य असल्यास या. असें भाषण करून सारथ्यास रथ चालविण्याविषयीं सांगतांच सारथ्यानें रथ पुढें चालविला. नंतर रथ, गज, अश्व इत्यादिक सेनेसह वर्तमान सर्व राजे माझ्यावर बाण वर्षाव करूं लागले. तेव्हां सर्व राजांचा शर वर्षावें करून मी पराजय केला. सहस्रावधि राजे पृथ्वीवर पाडले. तसेंच गज, अश्व, व रथाचे सारथी भूमीवर पाडले असतां माझें युध्द लाघव पाहून शेष राहिलेले राजे पराङ्मुख पावले. नंतर त्या कन्या घेऊन मी हस्तनापुरीं आ

लों आणि सर्ववृत्त सत्यवतीस सांगितलें. असा विषय या अ॰ आहे.

१७४ अध्याय एकशें चौऱ्याहत्तर— भीष्म भाषण करतात हे दुर्योधन राजा, माझी माता सत्यवती इच्या अग्रभागीं त्या तीन कन्या नेऊन सांगितलें कीं, हे माते काशीनामक राजाच्या त्या कन्या सकल पार्थिवांस युध्दांत पराजित करून आणिल्या आहेत. जो पराक्रमी आहे त्यानें त्या कन्या घ्याव्या, असें ठरलें होतें. तेव्हां पराक्रम हाच या कन्यांचें मोल्य. हे माते विचित्रवीर्यास स्त्रिया करण्याकरितां या मी आपल्या पराक्रमसामर्थ्यानें आणिल्या आहेत. असें ऐकून सत्यवती माझ्या मुर्ध्याचें अवघ्राण करून बोलली हे पुत्रा, तूं आपल्या पराक्रमानें त्या स्त्रिया आणिल्यास काय? अरे तूं सर्व जगत् जिंकिलेंस. असें तिनें भाषण केल्यावर तिच्या नेत्रांतून अश्रुपात होऊं लागले. नंतर सत्यवतीनें आतां विचित्रवीर्याचा विवाह करावा असें मला सांगतांच काशी राजाची जेष्ठ कन्या अंबा बोलल्ये. हे भीष्मा तूं सर्व शास्त्र जाणतोस व सूज्ञ आहेस. यास्तव माझें भाषण ऐक. पूर्वी मी पितृगृहीं पित्याचे अंतः पुरांत एकांतीं बसल्यें असतां तेथें शाल्व राजाची कीर्ति ऐकून निश्चय केला कीं, शाल्व राजा मी वरीन, दुसरा वरणार नाहीं. यास्तव हे भीष्मा, माझ्या धर्माचें उल्लंघन करून विचित्रवीर्यास मला देऊं नको. मला एथून सोडा ह्मणजे मी शाल्वपतीस जाऊन वरल्यें. मी शाल्वास वरणार हें त्यास विदित आहे. त्यापेक्षां तो माझी वाट पाहात बसला असेल. यास्तव मला लौकर तिकडे जाण्याविषयीं आज्ञा दे. असा विषय या अध्यायांत आहे.

१७५ अध्याय एकशें पंचाहत्तर— भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, अंबेनें शाल्व राजाकडे जाण्याविषयीं माझी प्रार्थना केल्यावर मी आपल्या मातेस व ऋत्विज, मंत्रि, पुरोहित यांस विचारून अंबेची शाल्व राजाकडे जाण्याविषयीं मुक्तता केली. तेव्हां अंबा आपले नगरीं जाऊन विद्वान ब्राह्मण व दासदासी यांसह वर्तमान शाल्व राजाच्या नगरीं जाऊन राजास बोलली हे महाबाहो, तुझा उद्देश धारण करून मी येथें आल्यें. माझ्यावर कृपा करावी. असें ऐकून शाल्व राजा भाषण करतो

तूं कोणताही वर जेव्हां वरला नवतास तेव्हां मी तुझी इच्छा केली होती. आतां ज्यापेक्षां तूं भीष्माचा अंगिकार केलास त्यापेक्षां मी तुझा अंगिकार करणार नाहीं. तूं पुनः भीष्माकडेसच जा. असें शाल्वाचें भाषण ऐकून अंबा कामबाणानें पीडित होऊन बोलल्ये. हे राजा असें भाषण करण्यास तूं योग्य नाहींस. अरे भीष्मानें माझें हरण केलें खरें, परंतु माझी प्रीति भीष्मावर नाहीं. मी रोदन करीत असतां बलात्कारानें भीष्मानें माझें हरण केलें, यास्तव मी अनपराधी आहें, मी तुझी भक्त आहें, यास्तव तूं माझा त्याग करूनको. मीं भीष्मास असें सांगितलें आहे कीं, शाल्वराजास मी पूर्वी मनेंकरून वरला. यास्तव तूं मला सोड ह्मणजे शाल्वाकडे जाल्यें. त्याजवरून भीष्मानें मला मुक्त केलें असतां त्याची आज्ञा घेऊन मी त्वरित तुझ्याकडे आलें. तशांतून भीष्मानें आपलेकरितां मला आणिलें नाहीं. आपले भ्रात्याकरितां आणिलें असें ऐकिलें. दुसऱ्या माझ्या दोन भगिनी अंबिका आणि अंबालिका ह्या भीष्मानें विचित्रवीर्यास अर्पण केल्या. हे शाल्वा दुसऱ्या वराचें ध्यानही मी मनांत करीत नाहीं. तूंच माझा पति असा निश्चय केला आहे. हे राजा, तुझ्याशिवाय पूर्वी व आतां जर मी दुसऱ्या पतिची इच्छा केली असेल तर आत्म्याचीच शपथ करतें. हे राजा मी स्वतः तुला वरण्यास आल्यें आहें. माझा अंगिकार कर. अंबेनें शाल्व राजाची बहुत प्रार्थना केली असतां शाल्वानें अंबेचा त्याग केला. नंतर अंबेस बहुत क्रोध येऊन ती बोलल्ये. हे राजा तूं माझा त्याग केलास तर आतां जेथें जेथें मी जाईन तेथें तेथें माझें रक्षण साधु करोत. याप्रकारें अंबा भाषण करून रोदन करीत निघाली असतां पुनः शाल्व भाषण करतो. हे कन्ये, भीष्मानें तुझा परिग्रह केला यास्तव मी तुझा परिग्रह भीष्मभयास्तव करीत नाहीं. असें ऐकून काशीराजाची कन्या हरिणीसारखी रोदन करीत शाल्वपुरापासून गेली. मार्गामध्यें ती चिंताग्रस्त होऊन आपली निंदा करीत ह्मणत्ये कीं, माझ्यासारखा संकटकाळ कोणत्याही स्त्रीस आला नसेल. ही आपत्ति आपल्या हातूनच मी आपल्यास करून घेतली. बंधूपासून हीन झाल्यें. शाल्वतर माझा अंगिकार करीत नाहीं. पुनः हस्तनापुरीं भीष्माकडे जावें तर, त्याची आज्ञा घेऊन शाल्वाकडे आल्यें. तेव्हां आतां मी

आपले आत्म्याची निंदा करूं किंवा भीष्माची निंदा करूं, अथवा माझ्यापित्यानें माझा स्वयंवर केला त्याची निंदा करूं. मी कोणाचीच निंदा करीत नाहीं हा सर्व दोष माझाच आहे. मींच हें सर्व कर्म केलें त्याचें फल मला हें प्राप्त झालें. आतां भीष्मास धिःकार असो. तसाच माझ्या पित्यासही धिःकार असो. जर माझें मौल्य, पराक्रम हें नसतें तर भीष्मानें कशाकरितां माझें हरण केलें असतें. अरुक या शाल्वराजास धिःकार असो. तसाच ब्रह्मदेवासही धिःकार असो. इतक्या आपत्तींत मी आल्यें हें सर्व माझ्या दैवानेंच झालें. दैवापुढें कोणाची गति नाहीं. दैवेंकरून सर्व लब्ध होतें. व दैवानेंच सर्व नष्ट होतें. ज्या भीष्मानें मला या आपत्तींत घातलें त्या भीष्माकडे पुनः मागें जाणें हें ही योग्य नाहीं. आतां अरण्यांत जाऊन तप करून दुःखाची शांतिकरावी, असा निश्चय करून अंबा वनांमध्यें संचार करीत पुण्यशील जे तपस्वी यांच्या सहवासानें तिनें ती रात्र तेथेंच अतिक्रांत केली. दुसरे दिवशीं तिनें भीष्मांनीं आपलें हरण केलें व शाल्वानें आपला परित्याग केला इत्यादिक सविस्तर कथा तापसांस सांगितल्यावर शैखावत्य या नामें मुनि होता तो बोलला हे कन्ये, तुझी जी इच्छा असेल तें माग. असें ऐकून अंबा भाषण करते हे तापस हो, माझ्यावर अनुग्रह करा. मी सन्यास दीक्षा धारण करून दुश्चर तप करण्याची इच्छा धारण करतें. मींजींजीं कर्में मूढ भावेंकरून केलीं त्यांचें हें फल मला प्राप्त झालें. तस्मात् आतां वनाचाच आश्रय करावा, अशा हेतूनें तुमच्यासंनिध आल्यें आहे. असें भाषण ऐकून ऋषींनीं वेदयुक्तीनें तिचें शांतवन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१७६ अध्याय एकशेंशाहात्तर- भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, नंतर अरण्यनिवासी सकल तापस एकत्र जमून ही कन्या एथें आली आहे तेव्हां इच्याविषयीं काय विचार करावा याविषयीं बोलूं लागले असतां कोणी ह्मणाले कीं हिला आपले पित्याचे गृहीं नेऊन पोंचवावी. कोणी ह्मणूं लागले कीं, आपले आश्रमींही सहज आली, तेव्हां हिच्याशीं विवाह करावा. कोणी ह्मणूं लागले हिचा तसाच स्वीकार करावा. कोणी ह्मणूं लागले कीं, शाल्व राजाकडे जाऊन त्यास सांगावें कीं, इचा स्वीकार कर. कोणी ह्मणूं लागले कीं, शाल्व

राजाकडे पुनः नेणें चांगलें नाहीं. असा परस्पर संवाद होऊन पुनः वि‍चार करतात कीं, कन्येस विचारावें आणि तिच्या विचारास जसें येईल तसें करावें. हे राजा, या प्रकारें ते तपस्वी विचार करून नंतर राजकन्येस बोलतात हे भद्रे, तूं सन्यासदीक्षा धारण करूं नको. आपल्या पित्याच्या घरीं जा, आणि तो सांगेल तसें कर हे भद्रे तुला पित्यावेरीज अन्य गति नाहीं. स्त्रियांस पिता अथवा भर्ता या दोहों शिवाय तिसरी गति नाहीं. आणखी तुमच्यासारख्या रूपवती स्त्रियांस दुसरा एक उपसर्ग आहे तो सांगतों. तूं आश्रमीं वास करीत असतां कोणी राजे मृगया करितां वनांमध्यें येतात ते तुला पाहातांच नेतील, तस्मात् तूं अरण्यांत वास करूं नको. असें ऐकून अंबा बोलली हे तापस हो, पुनः पित्याचे गृहीं जाण्यास आतां मी योग्य नाहीं. आतां जर मी गेल्यें तर बांधवादिक माझी बहुत अवज्ञा करतील यांत संशय नाहीं. या अरण्यांत तुह्मीं माझें रक्षण केलें असतां येथेंच तप करून राहाण्याची माझी इच्छा आहे. तुमच्या सन्निध परोपसर्ग दोष लागणार नाहीं. मी राजाची कन्या असतां हें दुर्भाग्य माझे कपाळीं आलें तस्मात् मी आतां तपच करतें दुसरा विचार नाहीं. भीष्म सांगतात हे दुर्योधना, याप्रकारें सकल तपस्वी मंडळीमध्यें अंबा भाषण करीत असतां इतक्यांत महातपस्वी होत्रवाहन नामक राजर्षि आला. त्यास पाहून सकल तपस्वीजनांनीं आगतस्वागत प्रश्न केला, आणि पाद्यादिक पूजा करून आसनावर राजास बसविलें. नंतर राजा विश्रांत झाला असतां पुनः ते तापस अंबेस प्रश्न करतात. तों त्या प्रश्नांत काशी राजाचें नांव ऐकतांच होत्रवाहननामक राजर्षिनें अंबेस परम कृपेनें आपले अंकावर बसवून तिला प्रश्न केला असतां अंबेनें आपलें साकल्य वर्तमान त्यास सांगितलें. त्या कालीं राजा, अंबेस बोलला हे कन्ये, तुझ्या मातेचा मी पिता असें भाषण करून नंतर कांहीं वेळ दुःखित होऊन पुनः दुःखानें कन्येस ह्मणतो. हे कन्ये, तूं पितृगृहीं जाऊं नको. मी तुझा पितामहच एथें आलों. आतां जेणें करून तुझें दुःख निवृत्त होईल त्याविषयीं मी यत्न करतों. हे पुत्री तूं शोकें करून फार कृश झालीस व तुझ्या मनास फार दुःख झालें. असो आतां

कांहीं चिंताग्रस्त होऊं नको. मी सांगतों तो यत्न त्वां केला असतां निश्चयेंक-रून तुझ्या दुःखाची शांति होईल. महा तपस्वी जो जमदग्नीपुत्र परशुराम याजकडे जाऊन तूं माझा निरोप सांग ह्मणजे तो तुझें दुःख निवारण करील. जर भीष्म तुझ्या भाषणाप्रमाणें न ऐकेल तर भार्गवराम रणामध्यें भीष्माचा वध करील, आणि तुझी कार्यसिध्दी करून देईल. असें मातामहाचें भाषण ऐकून अंबा आपल्या नेत्राश्रूसंबंधीं उदकाचा त्याग करीत होत्रवाहनास भाषण करते. हे मातामह फार चांगला तुह्मीं मला उपदेश केलात. आतां तुह्मांस अभिवादन करून तुमच्या आज्ञेनें मी जाण्यास सिध्द होतें. परंतु माझा असा प्रश्न आहे कीं, परशुराम कोठें वास करतात, आणि मला जें दुःख झालें आहे त्याचा नाश करण्यास ते कसे समर्थ होतील हें सांगा असें ऐकून होत्रवाहन भाषण करतो हे भद्रे, महेंद्र पर्वताचेठायीं परशुराम उग्र तप करीत आहे. तेथें तूं जा आणि अभिवादन कर. नंतर माझें नामाभिधान सांगून पश्चात् जें तुला इष्ट साध्य कर्तव्य असेल तें सांग. परशुराम माझा परम सखा असून त्याचें माझें उत्तम सख्य आहे यास्तव तो तत्काळ तुझें कार्य करील यामकार होत्रवाहन अंबेस भाषण करीत आहे इतक्यांत अकृतव्रण नामक रामाचा सेवक तेथें आला असतां होत्रवाहन राजा संभाषण करतो. हे मुनिश्रेष्ठ, सांप्रत जामदग्न्य राम कोठें आहेत. त्यांचें दर्शन करण्याची मला फार इच्छा उत्पन्न झाली आहे. असें ऐकून अकृतव्रण भाषण करतो, हे राजा, तुह्मीं रामाचें दर्शन करण्यास बहुत उत्कंठित असून रामाचें तुमचें बहुत मित्रत्व आहे. यास्तव उदयीक सूर्योदयीं परशुराम तुमचे भेटीकरितां येऊन तुह्मांसह वर्तमान या सकल ऋषींस दर्शन देतील. हे राजऋषे, ही कन्या कोणाची. कशाकरितां या वनांत आली, ही तुझीच कोणी संबंधी आहे किंवा काय? असा प्रश्न ऐकून होत्रवाहन भाषण करतो. हे विभो, ही काशीराजाची जेष्ठ कन्या आणि माझी नात होय. काशीराजानें या त्रिवर्ग कन्यांचा विवाहसमारंभ करण्याकरितां सकल पार्थिवांस आमंत्रण केलें असतां त्यांमध्यें महावीर्यवान् शंतनुपुत्र भीष्म हा आला आणि सकल राजांचा पराभव करून अंबा, अंबिका, आणि अंबालिका त्या त्रिवर्ग काशीरा-

आच्या कन्या आपल्या रथांत बसवून हस्तना पुरीं गेला. त्या कन्या आपले मातेस दाखवून नंतर तिच्या आज्ञेनें कनिष्ठभ्राता जो विचित्रवीर्य याचा त्या कन्येशीं विवाह करण्याचा त्यानें निश्चय केला. तेव्हां अंबेनें भाषण केलेंकीं, मी शाल्वनामक राजा मनेंकरून वरला आहे. यास्तव त्या राजासमी पति करीन. दुसरा पति करण्यास इच्छित नाहीं. तू आपल्या भ्रात्यास मला देण्या विषयीं विचार करूं नको. असें अंबेचें भाषण ऐकून भीष्मांनीं अंबेस शाल्वाकडे जाण्यास आज्ञा दिल्ही असतां अंबा हर्षानें शाल्वनगरीं जाऊन राजास बोलली. हे राजा, भीष्मानें माझा त्याग केला ह्मणून मी तुझ्यासन्निध आल्यें, आतां तू माझा स्वीकार कर. असें ऐकून राजाचे मनांत कांहीं शंका उत्पन्न होऊन त्यानें अंबेचा त्याग केला. तीही काशी राजाची कन्या अंबा नप करण्यास आली तिला पाहून मी सांगितलें कीं, हा सर्व अपराध भीष्माचा आहे. असा अंबेचा वृत्तांत होत्रवाहनराजानें अकृतव्रणास सांगितल्यावर अंबा अकृतव्रणास भाषण करत्ये. हे ऋषे, माझा सकल वृत्तांत होत्रवाहन राजानें आपल्यास सांगितला. हा राजा माझ्या मातेचा पिता होय. यास संजय होत्रवाहन असें ह्मणतात. हे तपोधना, आतां पितृगृहीं अपमानभयास्तव जाण्यास मी फार लज्जित झालें आहें. आतां सकल विश्वास रामावर ठेविला आहे. परशुराम जें मला सांगतील तीच माझी गति. असा विषय या अध्यायांत आहे.

१७७ अध्याय एकशें सत्याहत्तर— अकृतव्रण भाषण करतो हे कन्ये, तुला दोन दुःखें एकदांच उत्पन्न झालीं आहेत. त्यांतून जसें तुला कर्तव्य असेल तसें सांग ह्मणजे त्याप्रमाणें घडेल. जर शाल्वराजानें तुझा स्वीकार करावा अशी तुझी इच्छा असल्यास परशुराम त्याविषयीं यत्न करतील. अथवा गांगेय भीष्माशीं तुझा संबंध व्हावा अशी इच्छा असल्यास भार्गवराम भीष्मास रणांमध्यें जिंकून तुझ्या इच्छेप्रमाणें ती गोष्ट सिद्धीस नेतील. असें ऐकून अंबा भाषण करत्ये हे ब्राह्मणा, माझी इच्छा भीष्माविषयीं नसतां त्यानें ज्यापेक्षां मला बलात्कारें करून आणली त्याजपेक्षां भीष्माची इच्छा मला नाहीं. शाल्वराजाच मी इच्छितें. असा माझ्या मनांतील विचार

मी तुला सांगितला. त्याचा तूं यथान्याय विचार करून जें कर्तव्य असेल तें कर. असें ऐकून अकृतव्रण भाषण करतो हे कन्ये, तूं भाषण केलेंस हें सर्व योग्य आहे. आतां माझ्या विचारास जें आलें आहे तें मी तुला सांगतों. जर भीष्मानें तुला हरण करून हस्तनापुरीं नेलें नसतें तर शाल्वराजा तुझा स्वीकार करता. परंतु भीष्मांनीं तुला बलात्कारानें हरण करून नेली यामुळें शाल्वास तुझ्याविषयीं कांहीं संशय येऊन तुझा तो स्वीकार करीत नाहीं. पुरुषाभिमानी जो भीष्म यानें हा सर्व तुझा घात केला. यास्तव त्यास कांहीं शासन करावें. याविषयीं तूं यत्न कर. असें ऐकून अंबा भाषण करते. हे ब्राह्मणा, माझाही मनांत तेंच आहे. सर्व माझा घात भीष्मानें केला. परंतु त्याचा आपण घात करण्याची इच्छा केली असतां ती कशी सिध्दीस जाईल. हे महाबाहो, यांत भीष्माचा अपराध किंवा शाल्वाचा अपराध याचा तारतम्य विचार पाहून जेणेंकरून माझें रक्षण होईल असें कर. या प्रकारें दोघांचा संवाद होत असतां तो दिवस अतिक्रांत होऊन रात्र प्राप्त झाली. इतक्यांत धनुष्यबाण, खड्ग, परशु इत्यादि शस्त्रें घेऊन शिष्यांसह वर्तमान परशुराम अकस्मात् सृंजयराजाच्या अग्रभागीं आला तेव्हां सकल तापसीजन हस्त जोडून रामाच्या अग्रभागीं उभे राहिले. अंबाही रामाच्या अग्रभागीं उभी राहिली. नंतर ब्राह्मणांसहवर्तमान सृंजयराजानें मधुपर्कपूर्वक परशुरामाची पूजा करून सर्व आपले आसनावर बसल्यावर सृंजय भाषण करतो. हे भार्गवश्रेष्ठा, ही काशीराजाची कन्या आणि माझी नात इचें कांहीं एक कार्य आहे तें ऐका. असें ऐकून परशुराम बोलतात हे कन्ये, जें तुझ्या मनांत दुःख झालें असेल तें मला सांग. असें ऐकून अंबेनें परशुरामास झालेला वृत्तांत सांगितला. तो ऐकून राम ह्मणतात हे कन्ये, भीष्मास मी निरोप पाठविला तर तो माझे भाषणाचा अनादर कधींही करणार नाहीं. कदाचित् करील तर अमात्यांसहवर्तमान शस्त्राग्नीच्यायोगें मी भीष्मास दग्ध करून टाकीन. अथवा भीष्माच्याठायीं तुझी प्रीति नसून शाल्वाच्याठायीं जर असेल तर त्याचीच तुजविषयीं योजना करतों. असें ऐकून अंबा भाषण करते हे रामा, भीष्मानें मला पूर्वी हरण केलीं हें समजतांच शाल्व

राजा माझा अंगिकार करील नाहीं. यासर्व दोषांचें मूळ भीष्मच आहे. यास्तव भीष्माचा वध होईल असें कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१७८ अध्याय एकशें अठ्याहत्तर—भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, वारंवार माझ्याच वधाविषयीं रामाची प्रार्थना करून अंबा रोदन करीत असतां राम बोलले हे कन्ये, माझा असा निश्चय आहे कीं, जे ब्रह्मवेत्ते आहेत त्यांजवर मी शस्त्र धरीत नाहीं. यास्तव दुसरा एकादा कार्य होण्याचा मार्ग सांग. भीष्म आणि शाल्वराजा हे माझे वचनांत आहेत, त्यांस मी जें सांगेन तें ते मान्य करतील. असे ते माझ्या वचनांत असतां त्यांजवर मी कसें शस्त्र धरूं. आणखी दुसरी माझी अशी प्रतिज्ञा आहे कीं, ब्राह्मणांच्या आज्ञेवांचून मी क्षत्रियांवर शस्त्र धरणार नाहीं. तुझा तर आग्रह दिसतो कीं, भीष्माचा वध करावा हें कसें घडेल. असें ऐकून अंबा भाषण करते हे भगवन् भीष्माचाच वध करहीच माझी इच्छा आहे. याप्रकारें अंबा आणि भार्गव राम या उभयतांचा संवाद होत असतां अकृतव्रण भाषण करतो हे महाबाहो, ही शरणागत कन्या आली आहे इचा तूं त्याग करूं नको. रणांमध्यें भीष्मास तूं आव्हान केलें असतां तो तत्काळ तुला असें भाषण करील कीं, मी आतां पराजित झालों. असें भीष्मांनीं भाषण केल्यावर मग या कन्येविषयीं जें तुला सांगणें असेल तें सांग. यांत तुझा व कन्येचा संकल्प सिध्दीस जाईल, आणि तुझी पूर्वींची प्रतिज्ञा सिध्दीस जाऊन अंबेसहवर्तमान जें तूं भाषण केलेंस तेंही यांत सत्य होईल, आणि भीष्म न ऐकेल तर त्याशीं युध्द करावें. यांत तुला कांहीं दोष नाहीं. असें अकृतव्रणाचें भाषण ऐकून राम भाषण करतो. हे ऋषीसत्तमा, जसी इच्छा आहे त्याप्रमाणें सामोपचारानें न घडेल तर पूर्वीं मींजी प्रतिज्ञा केली आहे तिचें स्मरण करून तूं ह्मणतोस त्याप्रमाणें भीष्माशीं युध्द करीन. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सकळअरण्यनिवासी तापस स्नानसंध्या व जपहोमादिकर्में करून भीष्मवध पाहाण्याकरितां रामासहवर्तमान जाण्यास उद्युक्त झाले. तेव्हां परशुराम अंबेस घेऊन ऋषींसहवर्तमान कुरुक्षेत्रीं आले. भीष्म ह्मणतात हे दुर्योधना, तिसरे दिवशीं रामानीं मला सांगून पाठविलें कीं, मी तुला भेटण्याकरितां आलों

आहे. हें ऐकतांच मी ब्राह्मण, ऋत्विज, पुरोहित यांसह वर्तमान रामाची पूजा केली. नंतर परशुराम माझी पूजा ग्रहण करून बोलले. भीष्मा, तूं विवाहाविषयीं निष्काम असतां काशीराजाची कन्या प्रथम हरण करून नंतर तिचा त्याग केलास. याजवरून शाल्वराजास शंका उत्पन्न होऊन त्यानें तिचा त्याग केला. यांत तिचा नाश किती झाला बरें? असो आतां माझ्या आज्ञेनें तूं अंबेचा स्वीकार कर. असें ऐकून मी बोललों हे ब्रह्मन्, इनें शाल्व राजा मनें करून वरिला आहे. यास्तव हिला आपले भ्रात्यास मी देणार नाहीं. असें भीभाषण केल्यावर राम क्रोधानें बोलले हे भीष्मा, माझ्या भाषणाचा अंगिकार न करशील तर आजच अमात्यांसह वर्तमान तुझा वध करीन. असें ऐकून मी बोललों हे भृगुश्रेष्ठ, माझ्यावर प्रसन्न होऊन क्षमा करा. तुह्मांस मी साष्टांग नमस्कार करतों. माझ्याशीं युध्द करण्यास तुह्मीं बुध्दि धारण केली याचें तात्पर्य काय. बाल्यावस्थेमध्यें तुह्मांपासूनच चतुर्विध अस्त्रें मला प्राप्त झालीं. यास्तव मी तुमचा शिष्य आहें. माझ्यावर आपण कोप करूं नये. असें ऐकून राम बोलले हे भीष्मा, मी तुझा गुरु हें तूं जाणत असतां माझें भाषण तूं कां स्वीकारीत नाहींस. जर माझें प्रिय व्हावें अशी तुझी इच्छा असेल तर काशी राजाच्या कन्येचा स्वीकार कर. तेणें करूनच माझी शांति होईल, नाहीं तर होणार नाहीं. असें ऐकून मीं उत्तर केलें हे ब्रह्मर्षे, कशाकरितां श्रम करतां? मी या कन्येचा अंगिकार करणार नाहीं. तुमच्याठिकाणीं गुरुत्व आहे असें जाणून पूर्वी तुह्मांस मी विनंति केली तेणें करून गुरूचा सत्कार झाला ज्या स्त्रीनें परपुरुषावर भाव ठेविला ती सर्पिणीसारखी दुष्ट तिचा अंगिकार कोण सत्पुरुष करील? यास्तव मी अंबेचा अंगिकार करणार नाहीं. धर्मत्यागाविषयीं साक्षात् इंद्रासही भिणार नाहीं. मग इतरांची कथा काय? हे गुरो प्रसन्न होऊन मजवर कृपा करा, आणि दुसरें एकादें कार्य मला सांगा. हे भार्गवरामा, मरुत्त नामक राजाचा एक फार प्राचीन श्लोक आहे त्यांत असा अर्थ आहे कीं, कार्याकार्य न जाणणारा व अभिमानी असा जरी गुरु आहे तथापि त्याचा त्याग करावा. हे परशुरामा, तुह्मीं तर माझे गुरु यास्तव प्रेमानें पूर्वींच मी तुमचा अत्यंत सत्कार केला असतां आपण ज्यापेक्षां

आपला गुरुपणा रक्षण करीत नाहीं. त्यापेक्षां मी युध्दास सिध्द आहें. पूर्वी मी तुमची क्षमा कशाकरितां केली याचें तात्पर्य सांगतों. युध्दांमध्यें गुरूस मारूं नये. तशांतून तो न पोहचे व क्षमाशील असल्यास त्याचा वधच योग्य नाहीं. तू माझा गुरु असून ब्राह्मण आहेस ह्मणून मी पूर्वी युध्दाविषयीं मति धरली नवती. दुसरें असें धर्मशास्त्र आहे कीं, जो ब्राह्मण हस्तांत बाण घेऊन युध्दास सन्नद्ध झाला त्यास ब्राह्मण ह्मणूं नये. क्षत्रिय असें समजून त्याचा वध केला असतां दोष नाहीं. हे ब्रह्मन् मी क्षत्रिय जातीचा असून क्षत्रियधर्मांतच आहें. जर तुझी इच्छा असेल तर मी युध्द करण्यास सिध्द आहें. आज माझें बाहुवीर्य किती आहे तें पाहा. हे भृगुपुत्रा, तू सकल लोकांपाशीं अशी वल्गना करतोस कीं मी एकट्यानें पृथ्वी निःक्षत्रीय केली, ही तुझी वल्गना मिथ्या केली पाहिजे. अरे तू असें समज कीं, ज्या काळीं तू क्षत्रिय जिंकिलेस त्याकाळीं हा भीष्म क्षत्रिय कुलांमध्यें उत्पन्न झाला नव्हता. अथवा माझ्यासारखा पराक्रमी दुसरा क्षत्रिय कोणी नव्हता, ह्मणून निःक्षत्रीय पृथ्वी केलीस. पश्चात् मी उत्पन्न झालों. यास उपाय काय. आतां तू असें समज कीं, निःक्षत्रीय पृथ्वी मी केली असा जो तुला अभिमान झाला आहे तो अभिमान दूर करण्याकरितांच क्षत्रियकुलांमध्यें हा भीष्म उत्पन्न झाला आहे. हे परशुरामा, युध्दांमध्यें तुझा दर्प मी उतरतों. यांत संशय नाहीं. भीष्म सांगतात हे दुर्योधनराजा, या प्रकारें मी भाषण केलें असतां राम किंचित् हास्य करून बोलले हे भीष्मा, तू माझ्याशीं युध्दास सिध्द झालास तर माझें प्रारब्ध उदयास आलें असें मी समजतों. आतां तू कुरुक्षेत्रीं चल. युध्दांमध्यें मी तुझा वध केलेला माता भागिरथी पाहील. असें जामदग्न्यांनीं भाषण केल्यावर मी गुरूस साष्टांग नमस्कार करून ह्मटलें कीं, फार चांगली गोष्ट आहे असें ऐकतांच राम कुरुक्षेत्रीं गेले. नंतर मी नगरांत येऊन सकल वृत्तांत सत्यवतीस सांगितला. आणि धनुष्यादिक शस्त्र घेऊन शस्त्र कवच शस्त्र अश्व रथास जोडले आणि मातेची आज्ञा घेऊन सारथ्यासह वर्तमान हस्तनापुरापासून कुरुक्षेत्रीं परशुरामांचे सन्निध गेलों. नंतर उभयतांच्या भेटी होऊन मी रथारूढ असतां शंखाचा नाद

केला तेणेंकरून वनसंबंधी पक्षी तसेच तापस त्रस्त होऊन भयभीत झाले. इंद्रासहवर्तमान सकल देवांनीं माझ्यावर पुष्पवृष्टी करून वाद्यांचे गजर केले. तेव्हां माझी माता भागिरथी मजला बोलली कीं, हे भीष्मा, तु भार्गवरामाशीं युध्द करूंनको. असें मातेचें भाषण ऐकून मी पूर्वीचा सर्व वृत्तांत मातेस सांगितला. तो वृत्तांत ऐकून माझी माता गंगा भार्गव रामाकडे जाऊन बोलली हे रामा, भीष्म तुझा शिष्य आहे यास्तव त्याच्या अपराधाची क्षमा करून युध्द करूंनको. वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें गंगेनें भाषण केलेलें न ऐकतां परशुराम युध्दास सिध्द झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७९ अध्याय एकशें एकूण ऐंशी— भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, रामानें मला बोलावितांच मी आश्चिर्ययुक्त होऊन बोललों हे रामा, तूं भूमीवर असतां तुझ्याशीं मी युध्द करणार नाहीं. तूं रथारूढ हो आणि कवच धारण कर. म्हणजे मी तुझ्याशीं युध्द करतों. त्याकाळीं भार्गवराम बोलले हे भीष्मा. पृथ्वी ही माझा रथ आहे. चार वेद हे रथाचे अश्व आहेत. वायू हा माझ्या रथाचा सारथी आणि वेदमाता गायत्री, सावित्री आणि सरस्वती हें माझें कवच आहे. या सकल युध्दसामोग्रीनें मी सिध्द होऊन आलों आहें. असें भाषण करून एकाएकीं रामानें शरसमुदायें करून चारी दिशा व्याप्त करून टाकल्या. इतक्यांत सर्व आयुधांनीं युक्त, पुण्यकारक नगरासारखा विस्तीर्ण, दिव्य अश्वांनीं युक्त, कांचनानें विभूषित असा रामाचा रथ अकस्मात् मी पाहून त्या रथामध्यें चंद्रसूर्य यांनीं चिन्हित कवच धारण करून धनुष्यबाण हस्तामध्यें घेतलेला बध्दांगुलीसहित अशा परशुरामास पाहिलें. नंतर भार्गवरामाचा सखा वेदवेत्ता अकृतव्रण नामक ऋषी रथावर सारथी दृष्टीस पडला. अशा साहित्यासहवर्तमान परशुरामानें ज्याकाळीं मला युध्दास आव्हान केलें त्याकाळीं हे दुर्योधना, मला बहुतच आल्हाद झाला. भार्गवराम वारंवार मोग आक्रोश करून अरे भीष्मा, सत्वर युध्दास ये असें बोलूं लागला असतां मी रथाखालीं उतरून परशुरामाची उत्तम प्रकारें पूजा करून नमस्कार केला. नंतर असें भाषण केलें कीं, हे रामा, तु-

मच्याशीं मी युध्दास आलों आहें. माझा साक्षात् तू गुरू आहेस. यास्तव युध्दांमध्यें माझा जय असावा, ह्मणून मी शिष्य आपली प्रार्थना करीत आहें. असें ऐकून राम बोलले हे भीष्मा, जो जयशाली आहे त्याचा हा धर्मच आहे. त्यानें प्रथम असेंच केलें पाहिजे. परंतु भीष्मा, तुला आतां खचित सांगतों युध्दापासून तू विमुख होऊं नको, जर होशील तर तुला मी शाप देईन. तुला जयाचा आशिर्वाद मी देणार नाहीं. युध्दांमध्यें माझाच जय होईल. जा आतां तू विजयाविषयीं प्रार्थना करूं नको; परंतु तुझ्या आचरणेंकरून मी संतुष्ट झालों. आतां युध्दास सिध्द हो. असें रामानें भाषण करतांच मी त्यास नमस्कार करून रथारूढ झालों, आणि उभयतांचे युध्दास आरंभ झाला. प्रथम रामांनीं कंकपत्र साठ बाणांचा मजवर प्रहार केला. नंतर सन्नत पर्व नऊशें बाणांचा प्रहार केला. त्यायोगें माझ्या रथाचे चारी अश्व ह्मन व मी अगदीं पीडित झालों. नंतर मी, ब्राह्मण व देव यांस नमस्कार करून भार्गवरामास बोललों, हे गुरो, तुह्मीं निर्मर्याद जरी झालां तथापी तुमची आचार्यता मी रक्षण केली. तुह्मांवर मी प्रहार करणार नवतों, परंतु तुह्मी ब्राह्मण असून क्षत्रधर्माचा आश्रय करून रणांगणीं आलां त्यापेक्षां माझ्या धनुष्याचें वीर्य व बाहूचें बल कसें आहे तें पाहा. असें भाषण करून मी एक भल्ल बाणांचा त्याजवर प्रहार केला असतां त्या बाणांच्या योगें परशुरामाचा धनुष्याची प्रत्यंचा छिन्न होऊन पृथ्वीवर पडली. नंतर शतावधि नत पर्व, पृषत्क व कंकपत्र या बाणांचा जामदग्न्याचे रथावर प्रक्षेप केला असतां वायूच्या वेगानें ते बाण परशुरामाच्या शरिरास लागले. त्यायोगें त्याचे शरिरापासून रक्ताचे स्त्राव होऊं लागले. नंतर परशुरामानें दुसरें धनुष्य घेऊन शतसंख्याक बाणांचा माझ्यावर प्रहार केला त्यायोगें मी बहुत त्रस्त होऊन भयाभीत झालों. नंतर तेजस्वी बाणांचा मी रामावर वर्षाव केला असतां त्या बाणांनीं राम व्याप्त होऊन स्तब्ध राहिला. हें पाहातांच रामाची मला बहुत दया उत्पन्न होऊन मी आपली निंदा करून असें भाषण केलें कीं, अरे या क्षत्रिय धर्मास धिःकार असो. काय हो मी पापी! या क्षत्रिय कुलामध्यें उत्पन्न झाल्यामुळें असें घोर कर्म करणें मला प्रा-

सझालें. पाहा, माझा गुरु धर्मात्मा ब्राह्मण असतां त्यास शरानें मी पीडित केलें. याप्रकारें मी दुःखित होऊन भाषण केल्यावर पुनः रामावर प्रहार केला नाहीं. संध्याकाळीं सूर्य अस्ताचलास गेला असतां युध्दापासून मी माघारा फिरलों. असा विषय या अध्यायांत आहे.

१८० अध्याय एकशें ऐंशी — भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, मी युध्दापासून माघारा गेल्यावर माझे शरिरांत व सारथ्याचे शरिरांत व अश्वांचे शरिरांत रामाचे जे शर प्रविष्ट झाले होते ते सारथ्यानें काढून टाकिले. नंतर ती रात्र अतिक्रांत झाल्यावर मी रथारूढ होऊन समरामध्यें युध्दास गेलों. हें पाहून रामानेंही आपला रथ सिध्द केला. इतक्यांत मी रामास नमस्कार करून पुनः रथावर आऊन बसलों. इतक्यांत रामानें नाना प्रकारचीं दिव्यास्त्रें माझ्यावर प्रक्षिप्त केलीं. त्या सर्वांचें आपल्या अस्त्रांनीं निवारण करून जामदग्न्यावर वायव्यास्त्राचा प्रयोग केला. तेव्हां रामांनीं गुह्यकास्त्रें करून त्याचें निवारण केलें. नंतर मी अग्न्यस्त्राचा प्रयोग केला असतां रामांनीं वारुणास्त्रें करून त्या अस्त्राचें निवारण केलें. याप्रकारें रामानेंही मजवर अस्त्रांचा प्रयोग केला. तेव्हां त्या सकल अस्त्रांचें मी निवारण केलें. नंतर रामानें मला सव्य करून क्रोधानें उरप्रदेशीं कांहीं बाणांनीं वेध केला. तेणेंकरून मी विव्हल होऊन रथोपस्थावर पडलों. तेव्हां माझ्या सारथ्यानें माझा रथ युध्दापासून माघारा फिरविला. त्या काळीं अकृतव्रण प्रभृति रामाचे शिष्य माझा उपहास करूं लागले. तशीच काशीराजाची कन्या ही हर्षातें पावली. यास कांहीं काळ गेल्यावर पुनः मला संज्ञा प्राप्त होऊन मी सारथ्यास भाषण केलें. हे सूता, माझी वेधना गेली आतां मी युध्दास सिध्द आहें माझा रथ लौकर रामाचे अग्रभागीं ने असें ऐकून सूतानें माझा रथ रामाच्या अग्रभागीं नेतांच मी हजारों बाणांचा रामावर वर्षाव केला. त्या सकल बाणांचा तीन तीन बाणें करून रामानें नाश केला असतां हे राजा दुर्योधना, रामबाणांच्या योगें माझ्या प्रत्येक बाणाचीं तीन तीन किंवा दोन दोन अशीं शकलें होऊन सहस्त्रावधि बाण पृथ्वीवर पडले. पुनः मी एक

शर रामाचा घात करावा या हेतूनें त्याजवर टाकिला असतां त्या बाणानें रामास अत्यंत व्यथा उत्पन्न होऊन पृथ्वीवर पडला. त्याकाळीं एकाएकीं हाहाकार झाला. नंतर रामाचे शिष्य त्याच्यासन्निध येऊन सीतळजलानें रामास सिंचन करून जयघोषाचा शब्द करीत वारंवार त्यास अश्वासन देऊं लागले. काशीराजाच्या कन्येनेंही रामास आलिंगन दिलें. असें असतां कांहीं कालानें राम सावध होऊन बोलला. हे भीष्मा, धनुष्य बाण घेऊन लौकर सिध्द हो, मी युध्दास आलों. असें ह्मणून रामानें शीघ्रास्त्रानें माझ्या रथाचे हय मारून मजवर बाणजालांची वृष्टि केली. तेव्हां मीही रामावर बाणवृष्टि केली. त्याकाळीं रामाचे आणि माझे बाण एकत्र होऊन सूर्याची प्रभा अदृश्य झाली. नंतर रामांनीं लक्षावधि बाणांची वृष्टि माझ्यावर केली असतां ते बाण मीं छिन्न करून टाकिले. याप्रकारें माझें व गुरूचें युध्द होत असतां सूर्यास्त झाल्यावर माझा गुरू जामदग्न्य स्वस्थानीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८१ अध्याय एकशें एक्यायशी — भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, आह्मां उभयतांचा युध्दास आरंभ झाला. तेव्हां रामानें महा भयंकर शक्ति माझ्यावर टाकिली असतां मीं त्या शक्तीचे तीन भाग करून पृथ्वीवर पाडली. हें पाहून रामानें दुसऱ्या बारा शक्ति माझ्यावर टाकिल्या. तेणेंकरून मी विव्हल झालों. सकल दिशांचेठायीं अग्नीचे स्फुलिंग जसे दीसतात तशा त्या शक्ति सर्व दिशांचेठायीं तेजोमय दिसूं लागल्या अशा त्या बारा शक्तींचाही मी नाश केला. पुनः रामानें सुवर्णदंडानें चित्रविचित्र अशा घोर शक्ति माझ्यावर टाकिल्या असतां मी ढालीनें त्या शक्तींचें निवारण करून खड्गानें तोडून पृथ्वीवर पाडल्या. आणि दिव्य बाणांनीं जामदग्न्य रामाच्या रथाच्या अश्वांस व सारथ्यास ताडित केलें नंतर परशुरामानें दुसरें एक दिव्यास्त्र माझ्यावर टाकून बहुत बाणांची वृष्टि केली त्यामुळें हय सूत व रथ यांसहवर्तमान मी अगदीं व्यास होऊन गेलों. नंतर मीही शरसमुदायेंकरून गुरूस व्याप्त केलें असतां गुरूच्या शरिरापासून रक्ताचे स्राव होऊं लागले. तसाच माझ्याही शरीरापासून

रक्ताचा स्राव होऊं लागला. नंतर सूर्य अस्तास गेल्यावर उभयतां माघारे गेलों. असा विषय या अध्यायांत आहे.

१८२ अध्याय एकशें ब्याहत्तर—भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, दुसरे दिवशीं पुनः भार्गवरामाचें आणि माझें युध्द होऊं लागलें असतां परशुरामानें मजवर बाणांची वृष्टि केली. त्यायोगें माझा सारथी मरण पावला असतां मला बहुत भय उत्पन्न झालें. हें पाहून रामानें एक बाण माझा प्राण घ्यावा अशा हेतूनें माझ्यावर टाकिला असतां मी पृथ्वीवर पडलों. हें पाहून राम मी मरण पावलों असें समजून मोठी गर्जना करूं लागले. इतक्यांत अग्नि व सूर्यासारखे तेजस्वी अष्ट वसु ब्राह्मणांचीं रूपें घेऊन माझ्यासन्निध आले, आणि आपल्या बाहुबलें करून त्यांनीं मला अंतरिक्षांत उचलून धरिला, पृथ्वीस स्पर्श करूं दिल्हा नाहीं. आणि मला आशिर्वाद दिला कीं, हे भीष्मा, भिऊं नको भिऊं नको. तुझें कल्याण असो अशा त्यांच्या वाणी ऐकून मी उभा राहिलों. इतक्यांत माझी माता भागिरथी माझ्या रथावर बसून सारथ्य करीत आहे असें पाहातांच मी मातेचे दृढ चरण धरून रथारूढ झालों. नंतर हात जोडून मी मातेस सांगितलें कीं, आतां मी आपल्या कृपेनें सावध झालों. माझ्या रथाचें व हयांचें आपण रक्षण केलेंत हें फार चांगलें झालें. आतां आपण जावें अशी मी प्रार्थना करतांच माझी माता अदृश्य झाली. नंतर मी पुनः रथारूढ होऊन एक मोठा बाण रामावर टाकला. त्यानें राम मूर्छित होऊन पृथ्वीवर पडला. त्याकाळीं एकाएकीं आकाशांतून मेघ रुधिराचा वर्षाव करूं लागले. उल्कापात झाले. इत्यादिक अनेक उत्पात झाले. नंतर अकस्मात् राम उठून पुनः युध्द करूं लागले. इतक्यांत सूर्य अस्तास गेल्यावर युध्द समाप्त झालें. हे राजा, याप्रकारें आह्मां उभयतांचें तेवीस दिवस युध्द झालें. असा वि० या अ० आ०

१८३ अध्याय एकशें त्र्यायशीं—भीष्म भाषण करतात हे दुर्योधन राजा, रात्रीं मी आपले स्वस्थानीं येऊन एकांत स्थलीं निद्रा करीत असतां ब्राह्मण, पितर, देवता इत्यादिकांस साष्टांग नमस्कार करून प्रार्थना केली कीं, जामदग्न्यरामाचें आणि माझें परम दारुण युध्द होतां होतां बहुत

दिवस झाले. परंतु रामाचा पराभव झाला नाहीं. आतां मी रामास जिंकण्यास समर्थ आहें किंवा नाहीं? जर समर्थ आहे तर या रात्रींत तुह्मीं सर्वांनीं मला दर्शनें द्यावीं. या प्रकारें देवतांची प्रार्थना करून मी निजलों असतां ज्या आठ ब्राह्मणांनीं मला उचलून धरिलें होतें तेच ब्राह्मण स्वप्नांत माझ्या अग्रभागीं येऊन बोलले हे भीष्मा, तूं मनांमध्यें कांहीं भय बाळगूं नको. युध्दांमध्यें तुझ्या शरिराचें आह्मीं रक्षण करूं. जामदग्न्यराम तुझा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं. तूंच त्याचा युध्दांमध्यें पराजय करशील. हे भीष्मा प्रजापतीपासून प्राप्त झालेलें जें प्रस्वाप नामक अस्त्र तें तुला विदितच आहे. तें अस्त्र परशुरामास विदित नाहीं. व इतरही जे योध्दे पृथ्वीवर आहेत त्यांसही विदित नाहीं. यास्तव तें अस्त्र परशुरामावर टाक ह्मणजे तो युध्दांत पराजित होईल. साक्षात् मृत्यु रामाला कदापीही नाहीं. असें ह्मणून ते अष्टवसु अदृश्य झाले. अ॰ विं॰ या अ॰ आहे.

१८४ अध्याय एकशेंचौऱ्यायशीं — भीष्म भाषण करितात हे दुर्योधन राजा, प्रातःकाळीं मी जागृत होतांच त्या स्वप्नाचें स्मरण होऊन परम हर्षानें युध्दास गेलों. तें युध्द फारच भयंकर झालें. भार्गवानें माझ्यावर बहुत बाणांचा वर्षाव केला असतां मी शरजालेंकरून त्याचें निवारण केलें. तेणेंकरून जामदग्न्यरामानें परम क्रुध्द होऊन महाभयंकर अग्नीसारखी तेजस्वी अशी एक शक्ति माझ्यावर टाकिली असतां ती माझ्या कक्षास्थानीं लागून रक्ताचा स्राव होऊं लागला. नंतर मी क्रोधानें रामावर एक बाण टाकिला असतां तो बाण रामाच्या ललाटप्रदेशीं शोभूं लागला. नंतर रामानें कालांतकासारखा एक बाण माझ्यावर टाकिला असतां तो बाण वक्षस्थळीं प्रहार करून पृथ्वींत गेला. त्या बाणाच्यायोगें मी पृथ्वीवर पडलों. नंतर मी सावध होऊन एक शक्ति रामावर टाकिली. तेणेंकरून रामाच्या सर्व शरिरास कंप सुटला. त्याकाळीं अकृतव्रणानें रामाचें समाधान केल्यानंतर रामास परम कोप येऊन त्यानें मजवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्राच्या निवारणार्थ मी ब्रह्मास्त्राची योजना करतांच उभयतां अस्त्रांचा समागम होऊन एक मोठें जाज्वल्यमान परम भयंकर तेज उत्पन्न झालें. तेणेंकरून सकल प्राणिमात्रास परम पीडा होऊं लागली. पृथ्वी कंपायमान झाली. इतक्यांत प्रस्वाप

अस्त्राचें मला स्मरण झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

१८५ अध्याय एकशें पंचायशीं — भीष्म भाषण करतात हे दुर्योधनराजा, प्रस्वापनामक अस्त्राचा प्रयोग करण्यास ज्याकाळीं मीं बुध्दि धारण केली त्याकाळीं एकाएकीं आकाशामध्यें हाहाकार उत्पन्न होऊन सकल प्राणिमात्र शब्द करूं लागले कीं, हे भीष्मा, या प्रस्वाप अस्त्राचा तूं भृगुनंदनावर प्रयोग करूंनको. तथापी तें भाषण मीन ऐकतां अस्त्राचा प्रयोग करूं लागलों. इतक्यांत नारदऋषि माझ्या अग्रभागीं येऊन बोलले हे भीष्मा, तूं परशुरामावर प्रस्वाप अस्त्राचा प्रयोग करूंनको. जामदग्न्य महातपस्वी ब्राह्मण असून ब्रह्मवादी तुझा गुरूही आहे. त्याचा अवमान करणें तुला योग्य नाहीं. असें नारद भाषण करीत आहेत इतक्यांत आकाशामध्यें ब्रह्मवादी आठ ब्राह्मण मीं पाहिले असतां ते बोलले कीं, हे भीष्मा, नारद जें तुला सांगतात तेंच हितकारक आहे. तूं त्याचें ऐकिलें असतां कल्याण होईल. असें ऐकतांच मी प्रस्वाप अस्त्राचा उपसंहार केला. हें पाहून परशुराम बोलले हे भीष्मा, मला जिंकिलेंस यांत संशय नाहीं. असें भाषण करीत आहेत इतक्यांत रामाचा पिता जमदग्नी आणि दुसरे पितर रामाच्या अग्रभागीं येऊन बोलले हे रामा, असें साहस कर्म पुनः तूं करूंनको. भीष्म हा क्षत्रिय आहे यास्तव त्याच्याशीं तर करूंच नको. क्षत्रियांचा युध्द करणें हा तर धर्मच आहे. यास्तव भीष्माशीं आतां युध्द करूंनको. याप्रकारें ते रामास बोलून मजला बोलले. हे भीष्मा, रामाशीं तूं अतः पर युध्द करूंनको. तुझा तो गुरु आहे. युध्दामध्यें रामाचा पराभव करण्यास तूं योग्य नाहींस. हे गांगेया, ब्राह्मणांचा मान क्षत्रियांनीं अवश्य ठेविला पाहिजे. तशांतून आह्मीं तुमचे गुरु ह्मणून तुझें निवारण करतों. तूं अष्ट वसूंतला एक वसू आहेस. शंतनूचा तूं पुत्र गांगेय असें तुला ह्मणतात. यास्तव हे पुत्रा, तूं बहूत दिवस जिवंत राहा. याप्रकारें रामाचे पितर मला उपदेश करून पुनः रामाकडे गेले, आणि त्यास बोलले हे रामा, अर्जुन हा पांडव असून इंद्राचा सुत आहे यास नर असें ह्मणतात तो भीष्मास मारणार आहे. असें पितरांचें भाषण ऐकून राम बोलतो. हे पितर हो, मी युध्दापासून विमुख होणार नाहीं.

हेंच माझें व्रत होय. आजपर्यंत कधींही मी युध्दापासून विमुख झालों नाहीं. यास्तव हे पितामहहो, भीष्माचेंच तुह्मी युध्दापासून निवारण करा, असें ऐकून ऋचीक प्रभृति ऋषि नारदास बरोबर घेऊन पुनः मजकडे येऊन बोलले. हे तात रणापासून तूं निवृत्त होऊन ब्राह्मणाचा मान ठेव. त्याकाळीं मीं उत्तर केलें कीं मी क्षत्रिय आहें यास्तव मी युध्दापासून माघारा फिरावयाचा नाहीं. असें ऐकून नारदप्रमुख ऋषि व माझी माता भागीरथी हीं रामाकडे जाऊन बोललीं. हे भार्गवा, तूं आतां शांत होऊन युध्द करूं नको. भीष्म हा तुला अवध्य आहे. तूंही भीष्मास अवध्य आहेस असें बोलून रामाच्या पितरांनीं त्याजकडून रणामध्यें शस्त्र ठेवविलें तों इतक्यांत आठ ब्राह्मण मी आकाशामध्यें पाहिले असतां ते माझ्या अग्रभागीं येऊन बोलले हे भीष्मा, राम हा तुझा गुरू असून सकल लोकांचाही गुरू आहे. यास्तव तूं आतां युध्द करूं नको. असें ब्राह्मणाचें भाषण ऐकून मी तत्काळ रामाच्या सन्निध जाऊन त्यास नमस्कार केला, आणि अग्रभागीं उभा राहिलों असतां परशुराम बोलले हे भीष्मा, तुझ्यासारखा क्षत्रिय कुलामध्यें या लोकीं दुसरा कोणी नाहीं. या युध्दांत मी परम संतुष्ट झालों, आतां स्वस्थानीं जा. असें बोलून राम काशी कन्येस बोलूं लागले. अ० वि० या अ० आ०

१८६ अध्याय एकशें शायशीं — राम भाषण करतो हे कन्ये, यथाशक्ति मी भीष्माशीं युध्द केलें परंतु भीष्माचा पराजय करण्यास मी समर्थ झालों नाहीं. आतां जिकडे तुझी इच्छा असेल तिकडे जा अथवा दुसरें एकादें कार्य असल्यास मला सांग, किंवा भीष्मास शरण जा. भीष्मावांचून दुसरी गति नाहीं. असें ऐकून अंबा बोलली हे भगवन् यथाशक्ति तुह्मीं युध्द केलेंत परंतु काय करावें भीष्म मोठा शक्तिमान असल्यामुळें देवही त्याचा पराभव करण्यास अशक्य आहेत. माझा तर निश्चय आहे कीं, मी पुनः भीष्माकडे जाणार नाहीं. आतां जेणेंकरून मीच भीष्मास युध्दामध्यें मारीन असा जो उपाय असेल तो करितें. याप्रकारें बोलून अंबेनें तप करण्याचा निश्चय केला. नंतर जामदग्न्यराम मला गृहीं जाण्याविषयीं आज्ञा देऊन आपण महेंद्र पर्वतीं गेले. मीही रथारूढ होऊन स्वनगरीं आलों.

आणि झालेला वृत्तांत सत्यवती व मोठे मोठे जे मान्य पुरुष होते त्यांस सांगित ला, तो ऐकून सर्व हर्ष पावले. कांहीं कालानंतर काशीराजाची कन्या तपक रण्यास सिध्द झाली. हें ज्यादिवशीं मीं ऐकलें त्यादिवसापासून अगदीं खिन्न झालों. परंतु मनांत असा निश्चय कीं, युध्दांमध्यें माझा पराजय करील असा क्षत्रिय या पृथ्वीवर कोणीं नाहीं. जर कोणीं ब्रह्मवेत्ता व तपस्वी असेल तर तो कदाचित युध्दांमध्यें माझा पराजय करील. कोणे एके दिवशीं नारदास व व्यासास मीं आपलें दुःख सांगितलें असतां ते उभयतां बोलले हे भीष्मा, काशीराजाच्या कन्येविषयीं तू कांहीं भय मानूं नको. देवाचा पराभव पौरुषानें करण्यास कोण समर्थ आहे? नंतर त्या काशी राजाच्या कन्येनें ऋषींच्या आश्रमीं जाऊन यमुना तीरीं अमानुष तप केलें. काष्ठासारखी अचल होऊन साहामहिनेपर्यंत वायु भक्षण केलें. यमुनाजलांमध्यें एक संवत्सर पर्यंत उदकप्राशन करून ती राहिली. एकवर्षपर्यंत गलित पानें भक्षण करून राहिली. पादांगुष्ठाग्रावर एक वर्षपर्यंत उभी राहिली. याप्रकारें तप करतां करतां तिचीं बारा वर्षे अतिक्रांत झालीं. त्यायोगें आकाश व पृथ्वी यांचा दाह होऊं लागला. ज्ञातीय मनुष्यांनीं अंबेस बहुत निषेध केला. परंतु तिनें कोणाचें ऐकलें नाहीं. नंतर कांहीं दिवसांनीं वत्सभूमीनामक क्षेत्र तेथें जाऊन तीर्थातीर्थाचे ठायीं तप केलें. याप्रकारें अंबेनें अनेकठिकाणीं तप करून राम ऱ्हद इत्यादि तीर्थीं तप केलें. कोणेएके दिवशीं जलामध्यें माझ्या मातेनें काशी कन्येस भाषण केलें कीं, हे भद्रे, तू इतका क्लेश आपले शरिरास कशाकरितां देतेस? याचें कारण मला सांग. त्या काळीं काशी कन्या बोलली कीं, भीष्मानें जामदग्न्य रामास रणामध्यें पराजित केलें. तेव्हां या पृथ्वीवर भीष्मास जिंकण्याविषयीं कोणीं क्षत्रिय नाहीं, असें जाणून मलाच भीष्माचा वध करण्याचें सामर्थ्य यावें याकरितां हें दारुण तप मी करीत आहें. असें ऐकून माझी माता गंगा बोलली हे अंबे, या कुटिल इच्छेनें तू तप करण्यास योग्य नाहींस. जर भीष्माच्या विनाशार्थ तू तप करीत आहेस तर तू व्रतस्थ असतांच या शरिराचा त्याग करून आठमहिने वाहाणारी नदी होशील. या

प्रकारें माझी माता भाषण करून अदृश्य झाल्यानंतर काशी कन्या कधीं अष्टमासांनीं व कधीं दाहामासांनीं जल प्राशन करून तप करूं लागली. कोणएके काळीं काशीकन्या तीर्थलोभानें वत्सभूमीवर गेली असतां अर्धदेह अपवित्र अशी अंबानामक नदी झाली, व अर्धदेहाची कन्या झाली. असाविषय या अध्यायांत आहे.

१८७ अध्याय एकशेंसत्यायशीं— भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, काशीकन्येचा तपाविषयीं अत्यंत निग्रह पाहून सर्व तापस बोलले हे कन्ये, तुला काय कर्तव्य आहे तें सांग असें ऐकून ती बोलल्ये हे ऋषीहो, भीष्मानें माझा त्याग केल्यामुळें मी पतिधर्मापासून भ्रष्ट झालें. तेव्हां मला अत्यंत कोप येऊन भीष्मवधार्थ ही दीक्षा धारण केली आहे. ज्याकाळीं मी भीष्माचा वध करीन त्याकाळीं माझ्या चित्ताची शांति होईल. इतक्यांत शंकर साक्षात् स्वरूपानें प्रगट होऊन तापसीस बोलले. हे कन्ये, तूं हें घोर तप कशाकरितां करतेस? असें ऐकून कन्या बोलल्ये हे भगवन् भीष्माच्या वधार्थ हें व्रत मी धारण केलें आहे. असें ऐकून महादेव भाषण करतात हे कन्ये, भीष्माचा तूं वध करशील, कांहीं चिंता करूं नको. असें महादेवाचें भाषण ऐकून कन्या बोलल्ये हे महादेवा, मी स्त्री असतां भीष्माचा पराजय करण्यास कशी समर्थ होईन. असें ऐकून महादेव बोलले हे भद्रे, माझें भाषण अनृत होणार नाहीं. दुसऱ्या देहीं तूं द्रुपद कन्या होशील आणि पुरुषत्व पावून भीष्मास मारशील, व तुला पूर्वदेहाचें स्मरण राहील. असें शंकर भाषण करून अदृश्य झाल्यानंतर अंबेनें मोठी चिता सिद्ध केली. नंतर त्यामध्यें अग्नि प्रज्वलित केल्यावर सकल ऋषींस असें भाषण केलें कीं, हे तापसहो, भीष्माचा वध करण्याकरितां मी अग्नींत प्रवेश करतें, हें माझें तुम्हीं अघटित कर्म पाहा. असें भाषण करून अंबेनें अग्नींत देहत्याग केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८८ अध्याय एकशें अठ्यायशीं— दुर्योधन प्रश्न करतो हे भीष्मा, शिखंडी पूर्वीं कन्या असून पश्चात् पुरुष झाला याचें तात्पर्य काय तें मला सांग. असा प्रश्न ऐकून भीष्म भाषण करतात हे राजा, द्रुपदाची स्त्री

पूर्वी अपुत्रा होती. कांहीं कालानें पुत्रसंतान व्हावें ह्मणून द्रुपदराजानें तपक-
रून शंकरास प्रसन्न केलें. हे भगवन् भीष्माचा वध करील असा मला पुत्र
द्या. कन्या देऊं नका. असें ऐकून भगवान् भाषण करतात हे द्रुपदा, भीष्मव-
धाकरितां पुत्र व्हावा ह्मणून इच्छा केलीस. परंतु प्रथम तुला कन्या होऊन
ती पुढें पुरुष होईल, आणि भीष्माचा वध करील. असें ऐकून द्रुपद स्वगृ-
हीं येऊन भार्येस बोलला हे स्त्रिये, तपानें महादेवास मी पुत्राकरितां संतुष्ट
केला असतां त्यानें मला सांगितलें कीं, तुला प्रथम कन्या होऊन पश्चात् तो-
च पुत्र होईल. कांहीं काळानें द्रुपदापासून स्त्रीच्यागर्भी गर्भ राहिला. हें व-
र्तमान नारदानीं येऊन मला सांगितलें. यास कांहीं काळ गेल्यावर द्रुपदरा-
जाची स्त्री कन्या प्रसवली. हें वर्तमान समजल्यावर राजानें सर्व नगरांत आ-
पल्यास पुत्र झाला असें कळवून पुत्रसंबंधीं जीं जीं कृत्यें कर्तव्य तीं केलीं
आणि त्याचें शिखंडी असें नांव ठेविलें. हे दुर्योधना, हा सकल वृत्तांत नार-
दानें मला सांगितला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८९ अध्याय एकशें एकूणनवद — भीष्म ह्मणतात हे राजा, द्रुप
दराजानें आपले कन्येस सकल विद्या प्राप्त होण्याकरितां विद्येंत निपुण अ-
सा गुरु ठेवून लेखनादि विद्येंत परम निपुण केलें. धनुर्विद्येमध्यें द्रोणाचा-
र्यांनीं शिखंडीस निपुण केलें असतां आपला पुत्र सकल विद्येंत परिपूर्ण
झाला असें जाणून त्याची माता द्रुपदास बोलली कीं आतां आपल्या पुत्राचा
विवाह करावा. असें ऐकून तो चिंताग्रस्त होऊन भार्येस ह्मणतो कीं, ही आ-
पली कन्या यौवनदशेंत आली. इचें तेज कन्येसारखें दिसतें, आणि आपण
तर इचें स्त्रीत्व गुप्त राखून लोकांत पुरुषत्व प्रकट केलें याची मोठी मला चिं-
ता लागली. असें ऐकून भार्या भाषण करत्ये हे महाराज, शिवाचें भाषण
वृथा व्हावयाचें नाहीं. आपली कन्या पुरुषत्व पावेल, याविषयीं तूं चिंता
करूं नको. आतां याचा विधियुक्त विवाह करावा हें मला बरें दिसतें. न के-
ला असतां याविषयीं लोक अनेक प्रकारचे तर्क करूं लागतील. याप्रका-
रें उभयतांचा संवाद होऊन शिखंडीच्या लग्नाचा निश्चय झाला. नंतर
दशार्णदेशाचा राजा हिरण्यवर्मा यानें आपली कन्या शिखंडीस देऊन

उत्तम प्रकारचा विवाहसमारंभ केल्यावर भार्येसहवर्तमान शिखंडी पुनः कांपिल्य नगरीं आला. कांहीं काळ गेल्यावर हिरण्यवर्मानामक राजाच्या कन्येस आपला पति शिखंडी हा पुरुष नाहीं स्त्री आहे असें समजल्यावरून ती आपल्या दासीस बोलली कीं, माझा पति यौवनावस्थेंत आला, मीही यौवनामध्येंच आहें असें असतां पतीचा व माझा संग कां नाहीं तेव्हां ही स्त्री आहे असें वाटतें. असें ऐकून दासी व सख्या यांनीं हिरण्यवर्मा राजास निरोप पाठविला कीं, एथें कांहीं तरी तुमच्या जामाता विषयीं संशय आहे याची चोकशी करावी. हें वर्तमान समजतांच राजानें दासी व कांहीं स्त्रिया शिखंडीच्या चोकशीकरितां पाठविल्या. त्यांनीं शिखंडीची परीक्षा करून राजास सांगितलें कीं, महाराज तुमचा जामात स्त्री आहे. हें वर्तमान समजतांच हिरण्यवर्मा दूतास बोलला. हे दूता, तूं द्रुपदराजाकडे जाऊन एकांतीं भेट आणि त्यास माझा असा निरोप सांग कीं, हे राजा, तूं माझ्याशीं अत्यंत कपट केलेंस तेणें करून मला अत्यंत क्रोध आला आहे. अरे हा दुष्ट विचार तुला कोणीं सांगितला. तुझी कन्या असतां पुत्र आहे अशी प्रसिध्दी करून माझी कन्या आपले कन्येप्रत देवविलीस. या तुझ्या कापट्याचें फळ तुला लौकरच प्राप्त होईल. हे दुर्मते, आतां सिध्द अस तुझा समूळ नाश करून टाकतो. असा विषय या अध्यायांत आहे.

१९० अध्याय एकशें नव्वद— भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, दूतानें हिरण्यवर्म्याचा निरोप द्रुपदास सांगितला असतां द्रुपदराजा चोरासारखा स्तब्ध बसला. हें वृत्त दूतानें येऊन राजास सांगतांच हिरण्यवर्म्यानें निश्चय केला कीं, द्रुपदपुत्र शिखंडी हा कन्या आहे यास्तव आपले मंत्री व सैन्याचे अधिकारी यांसहवर्तमान द्रुपदाचे नगरीं जाऊन शिखंडी कन्या आहे असें खचित समजल्यास द्रुपदास बंधन करून आणूं. आणि शिखंडी सहवर्तमान त्याचा नाश करून पांचाल देशीं दुसरा राजा स्थापूं. हा विचार मंत्री व सैन्याधिकारी यांनीं मान्य केल्यावर पुनः राजानें दूतास सांगितलें कीं, द्रुपदास आमचा निरोप असा सांग

आतां आह्मीं तुझा समूळ नाश करण्याकारितां लौकरच येतों, तूं सिध्द ऐस. हें वर्तमान पुनः दूतानें द्रुपदास सांगतांच राजा अपराधी होता यामुळें त्यास मोठें भय उत्पन्न होऊन तो भार्येस बोलला कीं, आपला संबंधी हिरण्य वर्मी राजा मोठा बलि आहे. तो चतुरंग सेना समागमें घेऊन येणार. आपला पुत्र शिखंडी ही कन्या आहे. असें त्यास खचित समजलें. तो माझा नाश करील. आतां मी काय करूं तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१९१ अध्याय एकशें एक्याणणव — भीष्म सांगतात हे दुर्योधना, द्रुपदाचें भाषण ऐकून स्त्री बोलल्ये माझ्या सपत्न्या बहुत आहेत त्यांच्याभयास्तव कन्या झाली असतां तुला पुत्र ह्मणून मीं सांगितलें तें भाषण मान्य करून कन्या असतांही पुत्रसंबंधी जींजीं कर्मे कर्तव्य तीं तीं केलींस आणि राजाच्या कन्येशीं विवाह केलास असो. याविषयीं तूं आपल्या मंत्र्यांचा विचार घे. असें ऐकून द्रुपदानें मंत्र्यांसह वर्तमान विचार करून देवतांचें आराधन करण्यास आरंभ केला. नंतर आपल्या मातापितरांस दुःख झालेलें पाहून शिखंडिनी दुःखानें स्थूणाकर्णनामक यक्षाचे आश्रमां गेली. आणि तिनें तपें करून आपलें शरीर शुष्क केलें. यास कांहीं दिवस गेल्यावर स्थूणाकर्ण शिखंडिनीस बोलला कीं, मीं तुझें तप पाहून प्रसन्न झालों. यास्तव वर माग. असें ऐकून शिखंडिनीनें आपलें सर्व वृत्त स्थूणाकर्णास सांगितलें. आणि भाषण केलें हे यक्षा, मला पूंस्त्व दे. असा विषय या अध्यायांत आहे.

१९२ अध्याय एकशें ब्याणणव — भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, शिखंडीचें भाषण ऐकून यक्ष बोलतो हे शिखंडिनी, आतां कांहीं कालपर्यंत मी आपलें पुल्लिंग तुला देतों आणि तुझें स्त्रीलिंग मी घेतों. तुझें कार्य झालें ह्मणजे माझें पुल्लिंग मला दे, आणि तुझें स्त्रीलिंग तुला देईन. यांत तूं अंतर करूं नको. असें ऐकून शिखंडिनी भाषण करत्ये. हे भगवन् कांहीं कालपर्यंत तुझें पुल्लिंग मी धारण करतें, माझें कार्य झालें ह्मणजे निश्चयें करून तुझें पुल्लिंग तुला आणून देईन, आणि मी आपलें स्त्रीलिंग धारण करीन. असा उभयतांचा संवाद झाल्यावर यक्षानें आपलें पुल्लिंग शिखंडीस देऊन. शिखंडीचें स्त्रीलिंग धारण केलें. शिखंडी आपले नगरांत येऊन त्यानें

झालेला सकल वृत्तांत द्रुपदास सांगितला. तेव्हां द्रुपद भार्येसह वर्तमान महेश्वरानें स्मरण करूं लागला. नंतर त्यानें दूतास सांगितलें कीं, तूं हिरण्यवर्मा राजाकडे जाऊन माझा निरोप सांग कीं, माझा पुत्र पुरुष आहे किंवा नाहीं याची चौकशी करण्याकरितां तूं यावेंस हें ऐकतांच राजा कांपिल्य नगरीं आला आणि त्यानें ब्राह्मणांकडून द्रुपदास सांगून पाठविलें कीं, आपल्या कन्येस तूं माझी कन्या वरलीस या पातकाचें फल तूं लौकरच पावशील. याप्रमाणें दूतानें द्रुपदास सांगतांच द्रुपद राजा बोलला. हे ब्राह्मणा, आतां याचें प्रतिउत्तर मी दूतद्वारा राजास कळवितों असें त्यास सांगून राजानें एक ब्राह्मण दूत हिरण्यवर्म्याकडे पाठविला. त्या ब्राह्मणानें जाऊन राजास सांगितलें कीं, शिखंडी पुत्र आहे याची चौकशी आपण स्वतः येऊन करावी. असें ऐकून हिरण्यवर्म्यानें सुंदर रूपवती अशा स्त्रिया शिखंडीची परीक्षा करण्याकरितां पाठविल्या. तेव्हां त्या स्त्रिया शिखंडीची परीक्षा करून हिरण्यवर्म्यास बोलल्या हे राजा, शिखंडी पुरुषच आहे. त्याविषयीं किमपीही संशय करूं नको. असें ऐकतांच राजानें द्रुपदाकडे येऊन त्याचें शांतवन केलें. नंतर परमप्रीतीनें शिखंडीस कांहीं द्रव्य, गजाश्व, गायी व दासदासी देऊन त्याची पूजा केली. आणि आपल्या कन्येची निर्भर्त्सना करून तो स्वदेशीं गेला. इकडे स्थूणाकर्ण नामक यक्षाच्या आश्रमीं कुबेर येऊन अनुचरास बोलला कीं, चित्रविचित्र, अति सुगंधिक पुष्पांनीं सुवासित, मणि रत्न सुवर्ण यांच्या माळा इत्यादिकें करून युक्त हें गृह स्थूणाकर्णाचें असून तो माझे दर्शनास आला नाहीं. यास्तव त्याला कांहीं दंड केला पाहिजे. असें ऐकून यक्ष भाषण करतात हे महाराज, द्रुपद राजाची शिखंडिनी नामक कन्या होती तीस कांहीं एक संकट प्राप्त झालें ह्मणून स्थूणाकर्णानें आपलें पुल्लिंग त्यास देऊन त्याचें स्त्रीलिंग आपण धारण केलें. यामुळें तो लज्जित होऊन तुमचे दर्शनास आला नाहीं. असें ऐकून कुबेर भाषण करतो हे अनुचर हो, बरें तर आतां आपलें विमान एथें उभें करून स्थूणाकर्णास माझे सन्मुख आणा ह्मणजे त्यास कांहीं तरी दंड करतों. असें ऐकतांच अनुचरांनीं स्थूणाकर्णास कुबेराचे

सन्मुख आणिला. तेव्हां कुबेरानें शाप दिला हे पाप कर्म्या, आजपासून तूं स्त्रीच राहाशील, आणि द्रुपदपुत्र शिखंडी पुत्र होईल. असें ऐकून यक्षानीं कुबेराची प्रार्थना केली. हे भगवन् तुह्मीं शाप दिला हा तर सत्यच आहे. परंतु पुनः या स्थूणाकर्णास कांहीं तरी उशाप द्यावा. असें ऐकून कुबेर बोलला हे यक्षहो, जोंकालपर्यंत शिखंडी जिवंत आहे तोंकालपर्यंत हा यक्षस्त्रीच राहील. शिखंडी मरण पावला ह्मणजे पुरुष होईल. आतां जोंपर्यंत शिखंडी जिवंत आहे तोंपर्यंत यानें निरुद्योगी होऊन स्वगृहीं स्वस्थ असावें. असें कुबेराचें भाषण ऐकून स्थूणाकर्ण खिन्न झाला. कुबेर यक्षगणांस ह्वर्तमान विमानारूढ होऊन गेला. कांहीं कालानंतर शिखंडी आपल्या पूर्व प्रतिज्ञेप्रमाणें स्थूणाकर्णाशीं येऊन बोलला. हे भगवन् आतां आपलें पुल्लिंग घेऊन माझें स्त्रीलिंग द्या. असें ऐकून स्थूणाकर्ण बोलतो अहो आतां मी तुह्मांवर बहुत संतुष्ट झालों असें ह्मणून झालेलें वर्तमान स्थूणाकर्णानें सांगितलें, आतां तुह्मीं स्वस्थ घरीं जावें. असें ऐकून शिखंडी हर्षानें स्वनगरीं आला, आणि त्यानें ब्राह्मण देवता यांची पूजा करून ब्राह्मणांस बहुत दक्षणा दिल्या. नंतर द्रुपदराजानें शिखंडी द्रोणाचार्यास शिष्यत्वाकरितां अर्पण केला. भीष्म भाषण करतात हे दुर्योधन राजा, याप्रकारें शिखंडी पूर्वींस्त्री असून नंतर पुरुष झाला. त्यास द्रोणाचार्यांनीं चतुष्पाद धनुर्वेद सांगितला. वास्तव हे दुर्योधना, मी शिखंडीचा वध करणार नाहीं. हें तुला शिखंडीच्या जन्माचें तत्व सांगितलें. हा सर्व वृत्तांत ऐकून दुर्योधन भीष्माची प्रशंसा करीत स्तब्ध बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९३ अध्याय एकशें त्र्याण्णव—संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तुझा पुत्र दुर्योधन सकलसैन्यामध्यें भीष्मास बोलला, हे गांगेया, तुह्मीं, द्रोणाचार्य, कृप, कर्ण, अश्वत्थामा हे पांच योध्दे यांतील प्रत्येक योध्दा पांडवांकडील सर्व सैन्य किती दिवसांत मारील हें मला सांगा. असें ऐकून भीष्म भाषण करतात हे दुर्योधना, प्रत्येक दिवशीं मी शत्रूंचे दाहा हजार योध्दे आणि सहस्त्र रथी यांचा नाश करीन. आतां लक्षावधींचा नाश करणारीं अशीं

महान् असें सोडलीं तर एक मासांत मी शत्रूच्या सैन्याचा नाश करीन. असें भीष्माचें भाषण ऐकून दुर्योधन द्रोणाचार्यांस बोलला हे आचार्य, पांडुपुत्राच्या सैन्याचा तुह्मीं किती दिवसांत क्षय कराल? असें ऐकून द्रोणाचार्य बोलले हे राजा, मीही एक महिन्यांत पांडवांचें सैन्य नष्ट करीन. असें द्रोणाचार्यांनीं भाषण केल्यावर कृपाचार्य बोलले हे राजा, दोन मासांमध्यें मी पांडवांचें सैन्य नष्ट करीन. अश्वत्थामा बोलला हे राजा, दाहा दिवसांमध्यें मी पांडवांचें सैन्य नष्ट करीन. नंतर कर्ण बोलला हे दुर्योधना, मी पांच दिवसांत पांडवांचें सैन्य नष्ट करीन. असें कर्णाचें भाषण ऐकून भीष्म हास्य करीत बोलले हे कर्णा, शंख व धनुष्यबाण धारण केलेला वासुदेवासहित अर्जुन रणामध्यें जोंकालपर्यंत पाहिला नाहींस तोंकालपर्यंत त्या तुझ्या वल्गना आहेत. असा विषय या अध्यायांत आहे.

१९४ अध्याय एकशें चौऱ्याण्णव— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुर्योधनाकडील वर्तमान ऐकून धर्मराज बोलतो हे भ्राते हो, आमचे दूतांनीं येऊन अशी बातमी सांगितली कीं, गतरात्रीं दुर्योधनानें भीष्मादिक पांच वीरांस प्रश्न केला कीं, पांडवांचें सैन्य तुह्मी प्रत्येक किती दिवसांत माराल. तेव्हां भीष्मांनीं एक महिन्यांत, द्रोणांनीं एक महिन्यांत, कृपाचार्यांनीं दोन महिन्यांत, अश्वत्थाम्यानें दाहा दिवसांत, आणि कर्णानें पांच दिवसांत मारूं या प्रमाणें सर्वांनीं सांगितलें. आतां हे अर्जुना, मीही तुला प्रश्न करतों कीं, तूं शत्रूचें सैन्य किती दिवसांत मारशील. असें ऐकून अर्जुन बोलला हे राजा, मी रथारूढ होऊन वासुदेव सहाय्यानें पाशुपत अस्त्राच्या योगें एक क्षणांत कौरव सैन्याचा नाश करीन. हे राजा, तसेंच विराट, द्रुपद, भ्रंरव, घटोत्कच, सात्यकि, अभिमन्यु, व द्रौपदीचे पांच पुत्र हे सकल तुझ्याकडील योध्दे आहेत. हे देवांचाही पराभव करण्यास समर्थ आहेत. तसाच तूंही त्रैलोक्याचा नाश करण्यास समर्थ आहेस. अ० वि० या अ० आ०

१९५ अध्याय एकशें पंचाण्णव— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दुसरे दिवशीं प्रातःकाळीं दुर्योधनानें आपले सकल योध्यांस रणभूमीवर जाण्यास आज्ञा दिल्ही. नंतर सकलांनीं स्नानें करून माळा व शुक्लू

वस्त्रें धारण केलीं. आणि आपआपलीं शस्त्रास्त्रें सिध्द केलीं. नंतर स्वस्तिवाचनपूर्वक अग्नीचे ठायीं होम करून युध्दरूप मनाचा संकल्प करून सर्व निघाले. तेव्हां सर्वांच्या शरिराचेठायीं युध्दाचीं चिन्हें दिसूं लागलीं. सर्वही धनुर्विद्येमध्यें निपुण असून सर्वांची इच्छा युध्द करण्याविषयीं एकसारखीच झाली. रणामध्यें मृत होऊन परलोक साध्य करण्याविषयींसर्वांस वारंवार इच्छा उत्पन्न झाली. युध्दाचेठायीं अत्यंत श्रध्दा त्यांनीं धारण केली. बाल्हिका सहवर्तमान अवंत्यदेशींचे राजे विंदानुविंद व केकेय, भारद्वाज प्रभृति इतर योध्दे, अश्वत्थामा, भीष्म व जयद्रथ, दक्षिण देशीय राजे, प्रतीच्य देशीय राजे, पार्वतीय, शकुनी, प्राच्य, उदीच्य, शक, किरात, यवन व शिबि हे सकल योध्दे आप आपलीं सैन्यें घेऊन दुसरे दिवशीं रणभूमीवर आले. तसेच सैन्यासह वर्तमान कृतवर्मा, सुशर्मा, भ्रात्यांसहवर्तमान दुर्योधन, शल, भूरिश्रवा, शल्य, कौशल्य, बृहद्रथ हे आप आपल्या सैन्यासहवर्तमान कुरुक्षेत्रीं आले. नंतर दुर्योधनानें दुसरें हस्तनापुरच काय असें सकलपदार्थांनीं युक्त उत्तम प्रकारचें शिबिर करून त्यांत वास केला. व इतर राजांस हजारों शिबिरें राहाण्याकरितां तयार करून दिलीं. तशीच नानाप्रकारचे भक्ष्यभोज्यादिक पदार्थांची सिध्दता ठेविली. असा विषय या अध्यायांत आहे.

१९६ अध्याय एकशें शाण्णव — वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, दुर्योधनानें आपले सैन्यास रणभूमीवर जाऊन उभे राहाण्याची आज्ञा दिल्ही. हें समजतांच युधिष्ठिरानेंही धृष्टद्युम्न प्रभृति आपले सकल वीरांस रणांगणीं पाठविण्याचा निश्चय करून प्रथम चेदी, कारुष याचा सेनापती जो धृष्टकेतु यास जाण्याविषयीं आज्ञा दिली. नंतर विराट, द्रुपद, युयुधान, शिखंडी, युधामन्यु, उत्तमौजा, यांसही जाण्यास आज्ञा दिल्ही असतां ते सकल योध्दे चित्रविचित्र कुंडलें व कवचें धारण करून सिध्द झाले. दुसरेही बहुत योध्दे आप आपल्या सैन्यासहवर्तमान युधिष्ठिराकडे आले होते. त्यांस युधिष्ठिरानें रणभूमीवर जाण्याची आज्ञा देऊन त्यांस भक्ष्यभोज्य इत्यादि सामग्री पाठविली. नंतर

धृष्टद्युम्न प्रमुख अभिमन्यु, बृहंन व द्रौपदीचे पांच पुत्र यांस धर्मानें रणभूमीवर पाठवून भीमसेन आणि अर्जुन यांस अनुक्रमानें पाठविलें. नंतर कांहीं राजे बरोबर घेऊन द्रुपदासहवर्तमान युधिष्ठिर रणभूमीवर जाण्यास निघाला. द्रौपदीचे पांच पुत्र, अभिमन्यु, नकुल सहदेव आणि प्रभद्रक इत्यादिक योध्यांमध्यें भीमसेन आपण प्रमुख होऊन दाहा हजार अश्व, दोन हजार गज, दाहा हजार पदाती आणि पांचशें रथी इतकें सैन्य घेऊन प्रथम रणभूमीच्या मध्यभागावर उभा राहिला. विराट, जयत्सेन व युधामन्यु, उत्तमौजा या योध्यांत वासुदेव व धनंजय प्रमुख होऊन वीस हजार योध्दे, पांचहजार गज, धनुष्य, खड्ग, गदा धारण करणारे असे सहस्त्रावधि पदातीसहवर्तमान रणभूमीच्या मध्यभागीं उभे राहिले. ज्याठिकाणीं युधिष्ठिर राजा उभा होता त्याठिकाणीं कांहीं राजे हजार गज, दहा हजार अश्व, सहस्त्ररथ व कांहीं पदाती घेऊन युधिष्ठिराच्या रक्षणाकरतां उभे होते. चेकितान, धृष्टकेतू हे आपलें सैन्य घेऊन युधिष्ठिरा सन्निध आले. सात्यकी लक्ष रथी घेऊन युधिष्ठिर सैन्यांत उभा राहिला. क्षत्रदेव आणि ब्रह्मदेव हे उभयतां रथारूढ होऊन युधिष्ठिराच्या सैन्याचा ध्वजभाग संरक्षण करण्याकरितां पाठीमागून आले. भक्ष्य भोज्यान्नें, रथ छिन्न झाले असतां त्यांस उपयुक्त सामग्री, सहस्त्रनाग, अयुत अश्व, युध्दास उपयुक्त इतर लाहान मोठे पदार्थ इत्यादि घेऊन युधिष्ठिर राजा सर्वांच्या पाठीमागून चालला असतां सत्यधृति, सौचित्ती, श्रेणीमान, रुदान हे योध्दे वीस हजार रथ, दहा कोटी अश्व, दंतप्रहारी असे वीस हजार, महान् कुलोद्भव मदोन्मत्त झालेले असे आठहजार, व आणखी इतर जातीचे दाहा हजार गज इतकें सैन्य घेऊन युधिष्ठिराच्या पृष्टभागीं चालले. याप्रकारें युधिष्ठिराचें सैन्य धृतराष्ट्र पुत्राशीं युध्दास सिध्द झालें असतां हजारों सेनासंबंधी मनुष्य, नाना प्रकारचे महान् भयंकर नाद करूं लागले. कांहीं सैनिक सहस्त्रावधि नगारे व शंख यांचे नाद करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

इति उद्योगपर्व समाप्त.

श्री.

# अथभीष्मपर्वप्रारंभः

१. अध्याय पहिला:- जनमेजय प्रश्न करितो. हे वैशंपायन ऋषे, कौरव, पांडव, सोमक व नानादेशांपासून आलेले सकल पार्थिव याणीं कसें युद्ध केलें तें मला सांगा? असें ऐकून वैशंपायन बोलतात हे पृथ्वीपते, सोमकांसहवर्तमान पांडव व कौरव कुरुक्षेत्रीं परस्पर जयाच्या इच्छेनें युद्धार्थ आले. ते सैन्यासहवर्तमान पांडव कुरुक्षेत्राच्या पश्चिमभागीं धृतराष्ट्र पुत्राचे सैन्यासन्मुख उभे राहिले. स्यमंतपंचकाचे बाहेर युधिष्ठिर राजानें आपल्या योद्ध्यांस राहण्या करितां शिबिरें केलीं होतीं व सूर्याचा प्रकाश आहे तितक्या प्रदेशांतील या युद्धप्रसंगीं बाल व वृद्ध यां शिवाय सर्व पृथ्वीवरील योद्धे, रथ, गज व अश्व यांसहवर्तमान आल्यामुळें सर्व पृथ्वी शून्य झाल्या सारखी झाली. या युद्धसमयीं सर्व वर्ण एकत्र झाल्यामुळें सर्व देश, नद्या, पर्वत व वनेंही आक्रांत होऊन बहुत योजनें पर्यंत मंडल पडलें होतें. म्लेंच्छ, कैवर्त, अंध्रादि प्रत्यंत देशवासी, नीचवर्णासह जे सकल महायोद्धे पांडवांकडे आले होते त्यांस युधिष्ठिर राजा भक्ष्य भोज्य व नानाप्रकारच्या शय्या देण्या विषयीं आज्ञा देऊन आपण त्यांचा सत्कार करी. अशी युधिष्ठिर राजानें सर्वांची यथास्थित व्यवस्था करून युद्धसमयीं त्यांचें आपल्यास अभिज्ञान होण्या करितां कांहीं चिन्हें व आभरणें दिलीं; तेंव्हां दुर्योधन पार्थाचें ध्वजाग्र पाहून व्यूहरचना करूं लागला. बंधूंसहवर्तमान दुर्योधनराजा उभा राहिलेला पाहून सर्व पांचाल हर्षानें आपआपल्या शंखांचे महान् महान् नाद व भेरींचे मधुर स्वर करूं लागले. सकल सेना हर्षित झालेली पाहून सर्व पांडव व वासुदेव परम हर्ष पावले. नंतर कृष्णार्जुन याणीं रथामध्यें बसून दिव्य शंखाचा नाद केला. तो ऐकून कांहीं योद्ध्यांनीं मलमूत्रस्राव केला. जसा सिंहाच्या गर्जनेचा शब्द श्रवण करून इतर मृग त्रास पावतात तसें कृष्णार्जुनाच्या शंखनादश्रवणानें सर्व सैन्य त्रस्त झालें. त्या कालीं सैन्यसमर्दनानें पृथ्वीपासून जे रज उडाले तेणें करून सूर्य आच्छादित झाल्यामुळें अस्तमान झाल्यासारखा झाला; सैन्यांमध्यें सर्व दिशांस मांसशोणित मय पर्जन्य पडूं लागला. हें अद्भुत पाहून सर्वांस आश्चर्य झालें. हे धृतरा-

श्रु,त्या काळीं दोन्ही सेना युद्ध करितां उभ्या राहिलेल्या क्षोभ पावलेल्या समुद्रासारख्या दिसूं लागल्या. जसा दोन सागरांचा समागम होतो तसा ह्या दोन्हीं सैन्यांचा अद्भुत समागम झाला. कौरव पांडव व सोमक हे धर्मयुद्ध व्हावें म्हणून त्यानीं नेम केला कीं, युद्धविराम झाल्यानंतर परस्परानीं एकमेकांवर आपली प्रीति ठेवावी. कोणी कोणाशीं द्वेष करूं नये. एकाशीं एक योद्धा युद्ध करीत असतां दुसऱ्यानें मध्येंच जाऊं नये. जो आपल्यासमान असेल त्याच्याशींच युद्ध करावें. वाणीनें जे युद्ध करतील त्यांशीं वाणीनेंच युद्ध करावें. सैन्यामधून जो बाहेर निघेल त्यास कधीं मारूं नये. रथ्यानीं रथ्यांशीं युद्ध करावें. गजस्थितानीं गजस्थितांशीं युद्ध करावें. अश्वारोहानीं अश्वारोहांशीं व पदात्यानीं पदात्यांशीं यथेच्छेनें, यथोत्साहानें, यथाबलानें युद्ध करावें. योद्ध्यास हांक मारून सावध केल्या नंतर प्रहार करावा. जो विश्वासानें उभा आहे किंवा जो विव्हळ झाला आहे त्याजवर प्रहार करूं नये. जो कोणी पूर्वीं एकाशीं युद्ध करून श्रांत झाला आहे तर त्याजवर, जो शरण आला असेल किंवा पराङ्मुख झाला असेल त्यास मारूं नये. तसाच जो क्षीणशस्त्र झाला असेल अथवा जो छिन्नकवच झाला असेल त्यास मारूं नये. सारथ्यावर, रथधुरीवर बसणाऱ्यावर, शस्त्रें आणणारावर व भेरी शंख इत्यादि वाद्यें वाजविणारांवर प्रहार करूं नये. अशी कौरव, पांडव व सोमक परस्पर प्रतिज्ञा करून एकमेकांकडे पहात त्दष्टांतःकरणानें सैन्यासह वर्तमान रणभूमीवर युद्धास सिद्ध झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

२. अध्याय दुसरा— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कौरव पांडवांचें सैन्य पाहून आतां पुढें घोर संग्राम होणार हें जाणून शोकसंतप्त झालेला जो धृतराष्ट्र यास एकांतस्थलीं व्यास बोलला कीं, हे राजा, तुझ्या पुत्रांस व इतर सर्व राजांस विपरीत काल आला आहे हे संग्रामामध्यें परस्पर निश्चयें करून नाश पावतील. हें कालवैपरीत्य पाहून तूं शोकयुक्त मन करूं नको. हे विशांपते, हा संग्राम जर तुला पाहण्याची इच्छा असेल तर मी तुला चक्षु देतों त्या चक्षूनीं तूं पुत्रांचें युद्ध पहा. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे ब्रह्मर्षिश्रेष्ठ व्यासा, ज्ञातिवध पाहण्याची मी इच्छा करीत नाहीं. तुझ्या प्रभावानें

हें युद्ध मी श्रवण करीन असें कर. हें ऐकून व्यासानीं संजयास वर देऊन ते धृतराष्ट्रास बोलले हा संजय तुला सर्व युद्ध सांगेल. यास शस्त्रें भेद करणार नाहींत. तसाच श्रमही बाधा करणार नाहीं. हा गावल्गणी या युद्धापासून मुक्त होईल. मी तर या कौरव पांडवांची कीर्ति प्रख्यात करीन. तूं शोक करूं नको. दैवास अन्यथा करण्यास कोण समर्थ आहे? जिकडे धर्म तिकडेच जय, हा निश्चयच आहे असें व्यास भाषण करून पुनः धृतराष्ट्र राजास बोलतात. हे महाराजा, या युद्धामध्यें महा क्षय होणार. या विषयीं भयप्रद निमित्तें जीं दृष्टीस पडतात तीं मी तुला सांगतों. श्येन, गृध्र, काक, कंक हे बकासहवर्तमान वृक्षाचे ठायीं एकत्र होऊन उड्डाण करितात. आणि युद्धसंबंधीं आनंद पावून आपल्यासमीपभागीं येतात. तसेंच कांहीं पक्षी निर्भयपणें भय सूचविणारे भयंकर शब्द करितात. उदय आणि अस्तसंधीच्या ठायीं नित्य कबंधानीं परिवेष्टित असा सूर्य दृष्टीस पडतो. चंद्रसूर्यांचा समागम एकनक्षत्रीं अशी जी तिथि अमावास्या तिचा दिनक्षय झाला आहे. याजवरून हें अहोरात्र महाभयास कारण होईल. वाजविल्यावांचून दुंदुभींचे शब्द उत्पन्न होतात. क्षत्रियांचे रथ अश्व जोडल्यावांचून चालतात असे दिसतात. उभय संधीच्या ठायीं दिशा दाहकारक दिसतात. पर्जन्य धुळीची वृष्टि करितो. हा शनैश्चर रोहिणीस पीडा करीत स्थित आहे. अभ्र नसतां महाघोर मेघ गर्जनेचा शब्द श्रवण होतो. वाहनें रोदन करीत असतां त्यांचे अश्रुबिंदु पतन पावतात. असा विषय या अध्या॰ आहे

३. अध्याय तिसरा— व्यास बोलतात हे धृतराष्ट्र राजा, गायींच्या ठायीं गर्दभ मिथुनभाव धारण करितात. पुत्र मातेसहवर्तमान रममाण होतात. गर्भिणी स्त्रिया पुत्र जाहल्यानंतर त्या मोठ्या भयंकर दिसतात. तीन शृंगें, चार नेत्र, पांच पाय, दोन शिश्नें व दोन मस्तकें ज्यास असे अशुभदायक पशु मुख पसरून अकल्याणदायक शब्द करितात. ब्रह्मवेत्ते जे ब्राह्मण यांच्या स्त्रियांपासून मयुर व गरुड तुझ्या नगरांत उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. याजवरून महान् क्षय होईल असें दिसतें. हे भारता अशीं दुर्निमित्तें श्रवण करून तूं आलेला जो काळ याचें निवारण करून उच्छेद होणार नाहीं असें कर. असें व्यासाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र भाषण करितो हे व्यासा, नरक्षय होईल

हें मी पूर्वीं देवानेंच जाणतों. बरें क्षत्रिय धर्मेंकरून जर पार्थिवसंग्रामामध्यें मरण पावतील तर ते वीरलोकास जाऊन सुख पावतील. असें ऐकून व्यास बोलतो हे राजा, कालच जगताचा क्षय उत्पन्न करतो. येथें शाश्वत राहणारा कोणी नाहीं. असें खरें; परंतु तुझे ज्ञातीय कौरव व सुहृद संबंधी यांस सन्मार्गाचा उपदेश करून युद्धापासून त्यांचें निवारण करण्यास तूं समर्थ आहेस. ज्ञातीचा वध करणें हें कुत्सक कर्म आहे असें सर्व मुनी ह्मणतात यास्तव ज्ञातिक्षय करून माझें अप्रिय करूं नको. हा दुर्योधन पुत्ररूपानें कालच तुला उत्पन्न झाला आहे व यापासून कांहीं हितही नाहीं. जो तूं आपत्तिरहित असतां आपत्तिमान् पुरुषासारखा उन्मार्गगामी होतोस. यास तुला कालच प्रेरित आहे. हे दुर्धर्षा ज्या राज्याच्या लोभें करून तूं पापी झालास त्या राज्यें करून तुला काय कर्तव्य आहे. कौरव शांत होऊन पांडवांचें राज्य पांडवांस प्राप्त होवो. असें नानाप्रकारें व्यास बोलत असतां त्याच्या वाक्याचा तिरस्कार करून धृतराष्ट्र व्यासास बोलतो. हे तात जसे उत्पत्ति व विनाश तुह्मीं जाणतां तसे मीही यथार्थ जाणतों. तुह्मीं आह्मांस गति दाखविण्या विषयीं समर्थ आहां. हे महर्षे, दुर्योधनादिक माझे स्वाधीन नाहींत व अधर्म करण्यास माझी बुद्धि प्रवृत्त होत नाहीं. तुह्मीं धर्माचे प्रवर्तक असून भारतीय यश व कीर्तीस कारण आहांत. तसेंच कौरव व पांडव या उभयतांसही मान्य आहांत. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून व्यास बोलतात हे राजा, जें तुझ्या मनामध्यें आहे तें यथासुखें करून आचरण कर. आतां तुला जो संशय असेल तो मला विचार त्याचें मी छेदन करतों. असें ऐकून धृतराष्ट्र भाषण करितो हे भगवन्, पूर्वीं संग्रामामध्यें विनाश होण्याचीं चिन्हें सांगितलीं. आतां संग्रामामध्यें विजयशालि पुरुषास जीं चिन्हें होतात तीं मी श्रवण करण्याची इच्छा करितों. असें ऐकून व्यास बोलतात हे धृतराष्ट्रराजा, विजय होणें असल्यास अग्निज्वाला विधूम होऊन दक्षिणमार्गानें ऊर्ध्व गमन करितात. ज्याच्या सेनेमध्यें शंख व मृदंगांचे गंभीर घोष होतात व ज्यास चंद्रसूर्य शुद्ध रश्मी दिसतात, जो युद्धार्थ जातो त्याच्या पुढें वायसादि शब्द करितात ते त्यास निषेधसूचक होत. अलंकार, कवचें व ध्वज व सुखकारक मनुष्यांचे शब्द व अश्वांचे हर्षित शब्द येणें करून ज्याची सेना तेजो

वती दिसते, त्याचा जय होतो. हे भारता, ज्याच्या पुष्पमाला म्लान होत नाहींत ते रणोदधीतें तरून जातात. जो युद्धांत जात असतां पूर्वींच अरे तूं युद्ध करूं नको. मरण पावशील अशा अनिष्ट वाणी निघतात त्या त्यास मरण सूचक होत. शब्द, रूप, रस, स्पर्श, गंध विकाराप्रत पावत नाहींत. ज्याच्या योद्ध्यांस निरंतर हर्ष असतो, तें त्याच्या जयाचें लक्षण जाणावें. जो फड्यास गमन करीत असतां ज्याच्या मागून अनकूळ वायु स्फुरतो तशींच अभ्रें, पक्षी, मेघ, इंद्रधनुष्यें अनकूळ असतात तीं त्याच्या जयाचीं लक्षणें होत. हे नराधिपा हींच लक्षणें विपरीत झालीं असतां मरण सूचक होत. आणखी एक तुला असा निश्चय सांगतों कीं, सेना अल्प असो किंवा महान् असो, योद्ध्यांस हर्ष असला म्हणजे हें एक जयाचें लक्षण सांगितलें आहे. जसा महान् जलाचा ओघ माघारा फिरवत नाहीं तशी भग्न झालेली सेना माघारी फिरविण्यास परम दुःख आहे. योद्धे भ्याले व भग्न झाले हें इतरानीं पाहिलें असतां ते ही भयाभीत होऊन दिशोदिशेस पळून जातात. हे राजा या प्रकारें सेनाचें होंकडे पळाली असतां शूरही त्या सेनेस एकत्र करण्यास समर्थ होत नाहींत. राजानें युद्धार्थ चतुरंग सेना एकत्रमात्र करावी. परंतु जर शत्रु सामें करून, प्रार्थनें करून किंवा दानें करून आपल्यास वश होत असेल तर तो विजय श्रेष्ठ ह्मणतात. शत्रूचा भेद करून जय झाला असतां त्यास मध्यम जय असें ह्मणतात. शत्रूस मारून जय झाल्यास त्यास अधम जय ह्मणतात. युद्धांत सकलांचा क्षय होतो यास्तव युद्ध करणें यास महान् दोष सांगितला आहे. कदाचित् एकटाही योद्धा महान् सेनेचा प्रतिकार करण्यास समर्थ होतो. बहुत सेना असतां निरंतर जय होतो असेंही नाहीं. जय होण्यास एक प्रारब्धच कारण आहे. संग्रामामध्यें जे जय पावतात ते कृतकृत्य होतात. तुला असें वाटत असेल कीं, माझ्या पुत्राकडे बहुत अक्षौहिणी सेना आहे त्यापेक्षां अवश्य त्याचाच जय होईल असा निश्चय मानूं नको. असा वि. या. भ. आहे.

४. अध्याय चवथा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, असें धृतराष्ट्र राजास व्यासानीं नाना प्रकारें सांगून ते गेले असतां धृतराष्ट्र एक मुहूर्त पर्यंत ध्यान करून वारंवार श्वासोच्छ्वास टाकीत संशितात्मा होऊन संजयास प्रश्न

करितो हे संजया, युद्धाविषयीं आनंद पावलेले असे हे शूर महीपाल उच्चावच शस्त्रांनीं परस्पर एकमेकांस मारण्यास उद्युक्त झाले आहेत. हे परस्परांसमारून यमगृहाची वृद्धि करतील. याजवरून मला वाटतें कीं, भूमीच्या लाभा करितां हे सर्व मरण पावणार यास्तव या भूमीचे सर्व गुण मला सांग. कुरु जांगल देशांत सहस्रावधि प्रयुत अर्बुद कोटिशः वीरलोक आले आहेत आणि तुला व्यासाचे प्रसादानें ज्ञानचक्षु व दिव्य बुद्धि प्राप्त झाली आहे यास्तव कुरुजांगल देशाचें तसेंच इतर देशाचें व नगराचें परिमाण तत्वें करून सांग. हें ऐकून संजय बोलतो हे महाप्राज्ञा, तूं अंध नाहींस, शास्त्रचक्षु तुला आहेत. आतां तुला मी भूमीचे गुण सांगतों ऐक. या भूतलावर स्थावर आणि जंगम अशीं दोन प्रकारचीं भूतें आहेत. यामध्यें जंगमाचे पक्षी व सर्पादिक, स्वेदज ह्मणजे मत्कुण, उवादिक आणि जरायुज ह्मणजे मनुष्य व पश्वादिक असे तीन भेद आहेत. जंगम सृष्टीमध्यें जरायुज निश्चयें करून श्रेष्ठ आहेत. त्यामध्यें ही त्रैवर्णिक मनुष्यें व गाई, शेळ्या, मेंढ्या इत्यादि पशु श्रेष्ठ आहेत. त्यांचे नानारूप धारण केलेले चौदा भेद आहेत ते वेदामध्यें सांगितले आहेत. त्यांचे ठायीं यज्ञ प्रतिष्ठित होतात. या चौदा पशूंमध्यें सात ग्राम्यपशु व सात अरण्यपशु आहेत. या सर्व भूतांचे अन्योन्य आश्रयें करून उपजीवन होतें. सप्त ग्राम्यपशूंमध्यें मनुष्य श्रेष्ठ होत व सप्त अरण्य पशूंमध्यें सिंह श्रेष्ठ. उद्भिज ह्मणजे भूमीचा भेद करून झालेले वृक्षादिक हे स्थावर सृष्टींत गणले आहेत. अश्वत्थ वटादिक वृक्ष, गुल्म ह्मणजे कुशकाशादिक, लता ह्मणजे वृक्षादिकांचा आश्रय करणाऱ्या गुडूच्यादिक, वल्ली ह्मणजे भूमीवर पसरणाऱ्या, त्वक्सार ह्मणजे वेळवादिक हे पांच भेद आहेत. उद्भिजाचे पांच व जरायुजाचे भेद चौदा मिळून एकुणीस विकृति व पांच प्रकृति ह्मणजे पंचमहाभूतें मिळून चोवीस अक्षर साम्यांत प्रकृतीविकृत्यात्मक चोवीस प्रकारची सृष्टि गायत्रीच उत्पन्न झाली. या विकृति भेदांत उद्भिज व जरायुज आले. स्वेदज व अंडज राहिले त्यांची व्यवस्था सांगतों. उद्भिज भूमिभेद करून उत्पन्न होतात व स्वेदज जलभेदें करून उत्पन्न होतात तर हें असें साम्य आहे यास्तव स्वेदज्यांचा उद्भिजांमध्यें अंतरभाव करावा. तसाच मिथुनजन्यधर्मास्तव अंडज्यांचा

जरायुजांमध्यें अंतरभाव करावा. जरायुज ह्मणजे गर्भवेष्टन तद्रूप अंडजांच्याअभिप्रायें करून चोवीस भेद होतात. तेंहें कार्यकारणात्मक गायत्र्याख्य ब्रह्म आहे असें त्या त्या श्रुतींनीं प्रतिपादित केलें आहे. अशा सर्व गुणान्वित गायत्रीस तत्वें करून जो जाणतो तो लोकांमध्यें कधींही नष्ट होत नाहीं. सर्व भूमीवर उत्पन्न होतें आणि सर्व भूमीच्या ठायींच नाश पावतें. सर्व भूतांची प्रतिष्ठा भूमि आहे. यास्तव भूमीच सनातन ब्रह्म होय. हे धृतराष्ट्रराजा, आतां तुला सप्तग्राम्यपशु व सप्त अरण्यपशु कोणते ते सांगतों. सिंह, व्याघ्र, वराह, गेंडा, गज, ऋक्ष व वानर हे अरण्यपशु होत. गाय, अजा, मेंढा, मनुष्य, अश्व, खेचर आणि गर्दभ हे ग्राम्यपशु होत. हे चतुर्दश, साधूनीं पशत्वें करून सांगितले आहेत. ज्याची ही भूमी त्याचेंहें स्थावर जंगम जगत होय. या हेतुस्तव सकल राजे लोभी होऊन एकमेकांचा घात करितात. असा विषय या अध्यायांत आहे.

५. अध्याय पांचवा.- धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, तूं पृथ्वीचें प्रमाण जाणतोस यास्तव या पृथ्वीवरील नद्या, पर्वत, देश, अरण्यें व या भूमीचा-आश्रय करून राहणारे जे इतर पदार्थ यांचीं नावें व पृथ्वीचें प्रमाण मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे महाराजा, पृथ्वी, आप, वायु, अग्नि आणि आकाश हीं पंच महाभूतें कृत्स्न ब्रह्मांडरूप पृथ्वींत आहेत असें पंडित सांगतात. हीं प्रत्येक भूतें एकमेकांपेक्षां उत्तरोत्तर गुणानीं वृद्धिंगत असून या सर्वांत भूमी प्रधान आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच गुण भूमीचे आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस हे चार गुण उदकाचे आहेत. शब्द, स्पर्श, रूप हे तीन गुण तेजाचे आहेत. शब्द, स्पर्श, हे दोन गुण वायूचे आहेत. आकाशाचा, शब्द गुण आहे. या प्रकारें पंचमहाभूतांवर पांच गुण राहतात. या पांच भूतानीं ब्रह्मांड व्याप्त आहे. ज्या काळीं ब्रह्मापासून च्युति होते त्या काळीं भोक्ता, भोग्य जे देहादिक यानें युक्त होऊन देहवान् होतो, त्यास भोग्य पदार्थ सूक्ष्मरूपें करून स्ववासनेस उत्पन्न करितात. हीं भूम्यादि पंच महाभूतें आकाशादि क्रमें करून उत्पन्न होऊन भूम्यादिक्रमानें नष्ट होतात. ज्या काळीं सिद्ध पुरुष ब्रह्मांडभेद करून जेथें जातात तेथें वासनामय पंचमहाभौतिक धातु सा

स दिसतात. असें असतांही ज्योतिषशास्त्रादिकवेत्ते आहेत, ते तर्कानें, सूर्यगतीनें, देशभेदानें, दिनमान भेदानें व पादच्छायादि भेदानें त्याचीं प्रमाणें काढतात. कोणी या पृथ्वीला कंदुकाकार, कोणी चतुरस्त्र, कोणी त्रिकोण व कोणी चक्राकारआ हे अशी कल्पना करितात. अशा प्रकारचें भूमिप्रमाण बहुत प्रकारचें बहुतानीं वर्णिलें आहे. जे भाव जगज्जन्मोपादान निमित्त परिमाण धर्माधर्मादिक पदार्थ चिंतन करण्यास अयोग्य आहेत. त्यांचें तर्कानें साधन करून अप्रतिष्ठितत र्कानें गंभीरार्थाचा निश्चय होत नाहीं यास्तव हे जरी तर्कानें असाध्य आहेत तथापि लोककल्पित गणितादि प्रमाणानें पृथिवीदिकांचीं आकृतिप्रमाणें सिद्ध केलीं आहेत तीं सांगतों. हे कुरुनंदना या दृश्यमान ब्रह्मांडास सुदर्शनद्वीप असें ह्मणतात. यां त एक जंबुवृक्ष आहे ह्मणून त्यास जंबुद्वीप ह्मटलें आहे. आतां या सुदर्शनद्वी पाची आकृति सांगतों श्रवण कर. या द्वीपाची आकृति चक्राकार असून नदीज लानीं परिच्छिन्न, अभ्रतुल्य पर्वतानीं युक्त, नाना प्रकारच्या नगरानीं रम्य व पु ष्प फल विशिष्ट वृक्षानीं संमृद्ध, धनधान्यानीं संपन्न व आसमंताद्भागीं लवणस मुद्रानीं परिवेष्टित आहे. जसा पुरुष आदर्शामध्यें आपलें मुख अवलोकन क रितो तसें सुदर्शनद्वीप चंद्रमंडलामध्यें दृश्य होतें. या चंद्रमंडलाच्या मनाचे एक- देशावर अश्वत्थ आहे. तसाच एक देशावर महा शश आहे. मनाचे वृत्तीस अनंत्य आहे यास्तव अनंत मनाचा एक देश म्हणजे एकाकार वृत्त्यंश तेथें दोन प्रका रें कार्यकारणरूपें करून किंवा स्थूलसूक्ष्म रूपें करून वक्ष्यमाण ह्मणजे पुढें सांगावयाची जी गीता तीमध्यें वक्ष्यमाण जो अश्वत्थ म्हणजे संसाराश्वत्थ आ हे तो व महान् शश म्हणजे ससासारखा शीघ्रगति परमात्मा आहे येणें क रून कार्यकारण, प्रपंच, जीव, ईश्वर हे ब्रह्माधिष्ठानाचे ठाईं मनें करून कल्पि त आहेत. या शशास प्रत्येकीं अभेद आहे व प्रपंचाहून पृथकत्व आहे. या श शाहून आपादि पंचमहाभूतें भिन्न आहेत म्हणजे भूत आणि भौतिक जें कार्य तें शशापेक्षां म्हणजे परमेश्वरापेक्षां भिन्न आहे. कारण रूपवस्तुमा त्र शशाहून अन्य नाहीं. आतां शेष संक्षेप काय तो श्रवण कर. समस्त कार्य प्रलय होऊन असतां जें रहतें त्यास शेष म्हणतात. संक्षेप म्हणजे कार्याचें स्व स्वरूप आहे तें आकुंचिता वयव कूर्मासारखें असतें. यास्तव व्याकृत व अव्या

कून याहून जें अन्य त्यास शश म्हणजे शब्द ब्रह्म म्हणतात. तेंच प्रत्यगा त्म्याचे ठायीं प्रतिष्ठित झालें म्हणजे त्यास जीव अशी संज्ञा प्राप्त होत्ये. असें वेदांमध्यें निरूपण केलें आहे. तें ब्रह्म तुझे ठायीं व माझे ठायीं प्रतिष्ठितआहे. कारण हा आत्मा ब्रह्मस्वरूपीआहे इत्यादिक श्रुतींमध्यें परमात्म्यासच प्रत्य गात्मत्व सांगितलें आहे. आत्म्यापेक्षां जीव म्हणजे कोणी एक पदार्थ भिन्न आहे असें नाहीं या प्रकारें सर्वांतर्यामी अभिन्न रूपानें राहाणारा शशाख्य ब्रह्म तें संक्षेपें करून तुला निरूपण केलें, असा विषय या अध्यायांत आहे. .

६. अध्याय सहावा:- धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, यथाविधि द्वी पाचा संक्षेप सांगितलास तो मी ऐकिला, आतां ब्रह्याचे ठायीं जितका भूमीचा अवकाश आहे त्याचें प्रमाण पूर्वी सांगून नंतर पिप्पल हें काय तें सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे राजा, पूर्व पश्चिम समुद्रास स्पर्श कर णारे हिमवान्, हेमकूट, निषध, वैडूर्यमण्यानीं युक्त असा नील, श्वेत आणि शृंगवान् असे हे सहा देशमर्यादासूचकपर्वत सिद्धचारणानीं सेवित आ हेत. त्यांच्या मध्यभागाचा विस्तार शतशः योजनें आहे. त्या मध्यें जे देशआ हेत त्यांस वर्ष असें म्हणतात. त्या देशांत नानाप्रकारच्या ज्ञातींचे प्राणीआ हेत. हे राजा आपण ज्या खंडांत राहतों त्यास भारतवर्ष असें म्हणतात. हें हिमवान् पर्वताच्या दक्षिणेस आहे. हिमाचलाच्या उत्तरेस हैमवत वर्षआ हे. हेमकूट पर्वताचे पलीकडे हरिवर्ष आहे. नीलपर्वताचे दक्षिणेस व नि षधपर्वताचे उत्तरेस पूर्वपश्चिम समुद्राप्रत पावलेला माल्यवान् पर्वत आहे. माल्यवान पर्वताचे पलीकडे गंधमादन पर्वत आहे. माल्यवान्, गंधमादन यांच्यामध्यें मंडलाकार सुवर्णमय मेरुपर्वत बालादित्यासारखा भासमान; विधूमअग्नीसारखा तेजस्वी चौऱ्यायशीं योजनें उंच व चौऱ्यायशीं योजनें भू मीच्या गर्भांत असून ऊर्ध्वभागीं, अधोभागीं व आसमंतात् भागीं लोकांस वेष्टण करून आहे, त्याच्या पार्श्वभागीं भद्राश्व व केतुमान, जंबु आणिपु ण्यवानाच्या आम्रमानीं युक्त असें उत्तर कुरु अशीं चार द्वीपें आहेत. मेरु पर्वतावर सुपर्णाचा पुत्र सुमुखनामाचा होता त्याणें तेथें सुवर्णाचे काक पाहून असा विचार केला कीं, ज्या पेक्षां हा मेरुपर्वत उत्तम, मध्यम, अधम

पक्ष्यांस समान करितो त्यापेक्षां याचा त्याग करून उत्तर कुरूस जावें असें ह्मणून तो मेरुपर्वताचा त्याग करून उत्तर कुरूच्या ठायीं गेला. त्या मेरु पर्वतास सूर्य निरंतर प्रदक्षिणा करितो. तसाच नक्षत्रांसह वर्तमान चंद्र व वायु हे यास प्रदक्षिणा करितात. ब्रह्मदेव, रुद्र व सर्व देवांचा राजा इंद्र हे एकत्र होऊन तेथें अनेक दक्षिणायुक्त असें नानाप्रकारचें यजन करितात. तुंबरु, नारदादि गंधर्व, विश्वावसु, हाहाहूहू हे तेथें येऊन नानाप्रकारच्या स्तवें करून देवाचें स्तवन करतात. सप्तऋषि, कश्यप व प्रजापती हे पर्वपर्वाच्या ठायीं तेथें जातात. त्या पर्वताच्या मस्तकावर दैत्यांसहवर्तमान शुक्र वास करितो. त्या पर्वताचीं कांहीं शृंगें रत्नमय आहेत. तीं स्वतंत्र पर्वतासारखींच आहेत त्यांतील चतुर्थांश भागाचें कुबेर ग्रहण करून त्यांतून षोडशांश मनुष्यांस वित्त देतो. त्याच्या उत्तरपार्श्वभागीं सर्वऋतु पुष्पानीं युक्त, दिव्य रानवृक्षांचीं वनें शिलासमुदायानीं व्याप्त आहेत. गंधमादन पर्वताच्या पार्श्वभागीं त्याच्याच अवयवभूत असे बुडबुड्यासारखे क्षुल्लक शैल बहुत आहेत. तेथें अकरासहस्र वर्षें मनुष्यास परमायुष्य आहे. तेथें राहाणारे नर महान्, बलवान्, तेजस्वी व हर्षित असतात. तशाच स्त्रियाही उत्पल वर्णासारख्या प्रियदर्शना आहेत. नीलपर्वतापलीकडे उत्तरेस श्वेतद्वीप आहे. श्वेतद्वीपापलीकडेही हिरण्यक द्वीप आहे. हे महाराजा, धनुष्याच्या कोटीसारखें दक्षिणेस भरत वर्ष उत्तरेस ऐरावत वर्ष आणि मध्यभागीं पांच वर्षें एकूण सात वर्षें पृथ्वीवर आहेत. तीं वर्षें उत्तरोत्तर गुणानीं अधिक आहेत. त्यांतील सर्व भूतें मित्रभावानें असतात. तसाच या पृथ्वीवर सुवर्ण शृंगानीं युक्त कैलासनामक महान् पर्वत आहे. त्या पर्वतावर वैश्रवण कुबेर गुह्यकांसहवर्तमान आनंदानें राहतो. त्याच्या पार्श्वभागीं महान् दिव्य, शुभ्रकांचन वालुकाज्या मध्यें असें रम्यबिंदुसरोवर आहे. तेथें भगीरथ राजानें भागीरथीच्या दर्शना करितां बहुत वर्षें पर्यंत वास केला. मणिमय चित्रविचित्र सुवर्णयूप बहुत आहेत. महायशस्वी सहस्राक्ष येथेंच याग करूनसिद्धी स पावला. या स्थळीं महातेजस्वी शिव सर्वभूतांसह वर्तमान राहतो. त्या

ची सर्व उपासना करितात. बिंदुसरोवरीं नरनारायण, ब्रह्मदेव, मनु व स्थाणु हे प्रथम तप करून संतुष्ट झाले. नंतर ब्रह्मलोकांपासून भागीरथी या पर्वतीं येऊन नंतर तिचें पृथ्वीवर वस्वोकसारा, नलिनी, सरस्वती, जंबुनदी, शीता, गंगा, व सिंधु या नावानें सात ओघ प्रसिद्ध झाले. हे सात ओघ अचिंत्य महातेजस्वी, प्रभूचे अंशभूत होत. त्याणेंच सर्वलोकपावनार्थ हे उत्पन्न केले. यांचे ठायीं सहस्र युगपर्यंत देव उपासना करितात. सरस्वती नदी कोठें दृश्य कोठें अदृश्य अशी आहे. ह्या दिव्य सप्तगंगा तीन लोकांमध्यें विख्यात आहेत. हिमवान् पर्वतावर राक्षस, हेमकूट पर्वतावर गुह्यक, निषधपर्वतावर सर्प व नाग राहतात. गोकर्णनामक तपोवन आहे. देव व असुर या सर्वांचें स्थान स्वेतपर्वत होय. निषध पर्वतावर गंधर्व, नीलपर्वतीं ब्रह्मऋषी राहतात. शृंगवान पर्वत तर सर्वदेवांचें विहारस्थान होय. हे राजा, हीं सप्त वर्षे विभागें करून तुला सांगितलीं यावर राहणारीं स्थावर जंगमात्मक सर्वभूतें होत. याची दैविक व मानुषी संमृद्धि बहुत प्रकारची आहे. या प्रकारें शशाख्य प्रकृतीचें तुला निरूपण केलें. ही प्रकृति मायिक असल्यामुळें तिचें स्वरूप सांगण्यास फार अशक्य आहे. तूं श्रद्धेनें मला विचारलेंस ह्मणून मी तुला सांगितलें. याच शशाख्य स्वरूपाच्या दक्षिणेस भरतवर्ष व उत्तरेस ऐरावत वर्ष आहे. तसेंच याच्या कर्णस्थानीं नागद्वीप व काश्यपद्वीप आहे. तसाच ताम्रपर्णा शिलानीं सुशोभित असा मलयनामक पर्वत या शशावर आहे. हें एक द्वीपच आहे असें ह्मणतात. तात्पर्य मलयनामक जें सशाचें द्वितीयरूप सांगितलें हें वासनामय ब्रह्माचें द्वितीयरूप होय. तेव्हां मूर्त आणि अमूर्त ह्मणजे स्थूलसूक्ष्म अशीं परमेश्वराचीं अचिंत्यदानरूपें प्रदर्शित केलीं. या दोन्हीं रूपांचें हे धृतराष्ट्र राजा, तूं चिंतन करावेंस. असा विषय या अध्यायांत आहे.

७. अध्याय सातवा:- धृतराष्ट्र भाषण कर्तो हे संजया, आतां मेरु पर्वताच्या पार्श्वभागाचें व माल्यवान पर्वताचें मला निरूपण कर. असें ऐकून संजय भाषण करतो, हे राजा, नीलपर्वताच्या दक्षिणेस व मेरुपर्वताच्या उत्तरेस सिद्धांनीं सेवन केलेले, पुण्यरूप उत्तर कुरुनामक देश आहे. त्यांमध्यें स्वादु फलांचे वृक्ष, नित्य पुष्पफलानीं भरलेले असतात. कांहीं वृक्ष अमृतोपम

षड्रस स्त्रवणारे असे आहेत. ह्मणून त्या वृक्षांस क्षीरीनामक वृक्ष असें ह्मणतात. कांहीं वृक्षांच्या फलांपासून वस्त्रभूषणें उत्पन्न होतात. सर्व भूमि मणिमय फार मृदु, सुवर्ण वालुकेची, सर्व ऋतूंत सुखकारक स्पर्श जीचा अशी भूमि व पंकरहित आहे. तेथें देवलोकांपासून च्युत झालेले मानव विष्णुभक्तांचा संग करीत वास करितात. त्यांचें दर्शन केलें असतां अत्यंत आल्हाद होतो. स्त्रिया ही तेथें अप्सरोपम उत्पन्न होतात. हीं सर्व स्त्रीपुरुषें त्या क्षीरी वृक्षाचें अमृतोपम क्षीरप्राशन करितात. स्त्री पुरुषांचीं मिथुनें समानकालीं उत्पन्न होऊन वृद्धि पावतात तशींच रूपानें गुणानें व वयानें समान असतात. जसे चक्रवाक पक्ष्यांचें मिथुन निरंतर एकत्र असतें तसें तेथें स्त्रीपुरुषांचा भिन्न भाव न होतां उभयतांची एकत्र स्थिति असते. या लोकीं कोणास रोग होत नाहींत. निरंतर हर्षित असतात. अकरा सहस्त्र वर्षे पर्यंत त्यांस आयुष्य आहे. स्त्रीपुरुषांचें मिथुन एकमेकांचा त्याग न करितां शेवटीं एक कालींच उभयतां शरीराचा त्याग करितात. तेथें महाबलवान व तीक्ष्ण चंचूचे भारुंडनामक पक्षी आहेत. ते तेथील मानव कोणी मरण पावले असतां त्यांस उचलून दरीमध्यें टाकतात. हे राजा, या प्रकारें तुला उत्तर कुरूचें विस्तारें करून निरूपण केलें. आतां मेरूच्या पार्श्वभागाचें यथातथ्य निरूपण करितों. या मेरूच्या पार्श्वभागीं भद्राश्वनामक खंडांत भद्रसाल नामक एक वन आहे त्या वनामध्यें कालाम्र ह्मणून मोठा एक वृक्ष नित्य पुष्पफलानीं पूर्ण शुभकारक व एक योजन उंच असा आहे त्या वृक्षाचें सिद्ध चारण सेवन करितात. तेथील पुरुष श्वेतवर्ण, तेजोयुक्त, महाबलवान आहेत तशाच स्त्रिया चंद्रविकासिकुमुदां सारख्या वर्णानीं युक्त, सुंदरी, प्रियदर्शनी अशा असून चंद्रा सारखी ज्यांची प्रभा पूर्ण चंद्रासारखीं मुखें व चंद्रासारखीं शीतल ज्यांचीं गात्रें व नृत्यगायनामध्यें कुशल अशा आहेत. तेथें दाहासहस्त्र वर्षे आयुष्य आहे तेथें स्त्रिया व पुरुष कालाम्र वृक्षसंबंधी रसाचें निरंतर प्राशन करून तरुण असतात. नीलपर्वताच्या दक्षिणेस व निषधाच्या उत्तरेस सुदर्शन नामक मोठा सनातन जंबु वृक्ष आहे तो सर्व कामीं फलानीं युक्त, पुण्यरूपी, सिद्धचारणानीं सेवन केलेला असा असून त्याच्याच नावानें जंबुद्वीप बहुतकाल प्र

ख्यात झालें. त्या वृक्षाचीं अकराशें योजनें उंची असल्यामुळें तो गगनास स्पर्श करितो असें भासतें. त्या वृक्षांचे पक्कफलांचा विस्तार अडीच हजार अरत्नि (कोंपरापासून कनिष्ठिकाग्रापर्यंत मुष्टिवळलेला हस्त) आहे. ज्या काळीं तीं फलें पृथ्वीवर पडतात त्या काळीं महान् शब्द होतो. आणि त्यापासून रजतासारख्या वर्णाचा रसस्राव होत असतां त्याची नदी होऊन ती मेरूस प्रदक्षिणा करून उत्तर कुरूस जाते. कुरुसंबंधी जन त्या नदीच्या रसप्राशनानें शांतमनस्क व पापरहित असतात. त्यांस जरा प्राप्त होत नाहीं. त्या रसापासून जांबूनदनावाचें सुवर्ण उत्पन्न होऊन देव त्या सुवर्णाचीं भूषणें धारण करतात. तें सुवर्ण इंद्रगोपकमण्यासारखें देदीप्यमान दिसतें. तेथें मनुष्यें तरुण सूर्यासमान वर्णाचीं उत्पन्न होतात. माल्यवान पर्वताच्या शृंगावर निरंतर संवर्तनामाचा अग्नि दिसतो. त्यासच कामाग्नि असें ह्मणतात. तसेच माल्यवानाच्या शृंगावर क्षुल्लक पर्वत आहेत. माल्यवान् पर्वत अकरा सहस्र योजनें लांबरुंद आहे. येथें ब्रह्मलोकापासून च्युत झालेले मानव सुवर्णासारखे शोभिवंत होऊन सर्वांमध्यें श्रेष्ठ असे होतात. आणि ते सर्व भूतांच्या संरक्षणार्थ ऊर्ध्वरेते होऊन सासष्ट सहस्र वर्षें तप करून दिवाकराच्या लोकीं जातात आणि शेवटीं सासष्ट सहस्र वर्षें पर्यंत चंद्रमंडलामध्यें प्रवेश करतात. असा विषय या अध्यायांत आहे.

८. अ. आठवा:- धृतराष्ट्र बोलतो हे संजया, पृथ्वीवर वर्षें किती व पर्वत किती याचें तूं निरूपण केलेस आतां जे पर्वतावर राहतात ते मला सांग. असें ऐकून संजय भाषण करतो. हे राजा, श्वेतपर्वताच्या दक्षिणेस व निषध पर्वताच्या उत्तरेस रमणकनावाचें वर्ष आहे त्यांतील मानव शुक्लवस्त्र धारण करणारे, मत्रवंद्रक्रपरायण, शत्रुत्वादि दोष भाववर्जित असे उत्पन्न होतात. यांस साडे अकरा सहस्र वर्षें पर्यंत आयुष्य आहे. नीलपर्वताच्या दक्षिणेस व निषाधाच्या उत्तरेस हिरण्मयनामक वर्ष आहे त्या वर्षामध्यें हैरण्वती नदी आहे. येथें पक्ष्याचा राजा गरुड आपल्या अनुचरांसह वर्तमान राहतो. येथील जन निरंतर हर्षित मनस्क असतात. त्यांच्या आयुष्याचें प्रमाण साडे बारा सहस्र वर्षें पर्यंत आहे. हे मनुजाधिपा, या पर्वताचीं एक म

णिमय दुसरें सुवर्णाचें तिसरें सर्वरत्नमय व नानाप्रकारच्या मंदिरानींउप शोभित अशीं तीन शृंगें आहेत. या स्थलीं स्वयंप्रभा शांडिली देवी निरंतर राहते. शृंगवान् पर्वताच्या उत्तरेस समुद्राच्या प्रांतीं एक ऐरावत नामक वर्ष आहे. हें वर्ष पूर्वीं सांगितलेल्या वर्षांपेक्षां श्रेष्ठ आहे. येथें सूर्याचा ताप नाहीं. मानव जीर्णता पावत नाहींत. नक्षत्रांसह वर्तमान चंद्रमा आसमंतात प्रकाशमान होतो. येथील मानवांची प्रभा, त्यांच्या शरीराचा धर्म, त्यांचे नेत्र, व शरीराचा सुगंध पद्मा सारखा आहे. त्यांस घर्म येत नाहीं. निराहारजितेंद्रिय व स्वच्छ असे असतात. देवलोका पासून भ्रष्ट झालेले ते येथें जन्मपावतात. तेरासहस्र वर्षें पर्यंत येथील मनुष्याचें आयुष्य प्रमाण आहे. क्षीर समुद्राच्या उत्तरपार्श्वभागीं अष्टचक्रानीं युक्त, सुवर्णभूषित अशा शकटयानाचे ठायीं वैकुंठवासी हरी वास करितात. तो प्रभु सर्वत्र व्यापक असून जीवाचा नियंता, संहारकर्ता व पालनकर्ता होय. त्यासच यज्ञ असें ह्मणतात. पृथ्वी, आप, आकाश, वायू व तेज तोच होय. सर्व भूतांमध्यें मुख्य जो हुताशन तो या परमेश्वराचें मुख असल्यामुळें यज्ञद्वारा परमेश्वर तृप्त होतो. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र राजा स्व पुत्राच्यानाशाचें कारण चिंतन करीत ध्यानस्थ होऊन बोलतो. हे संजया कालच जगताचा संक्षेप निःसंशय करतो. पुनः तोच सर्वांस उत्पन्न करतो. येथें मेरु पर्वतादिक ही शाश्वत राहणारे कोणी नाहींत. नर व नारायण हे उभयतां मिळून एकच सर्वज्ञ सर्व भूतहृदयस्थ आहेत. या परमेश्वरास सर्व देव वैकुंठ असें ह्मणतात. व मानव त्यास विष्णु असें ह्मणतात. असा विषय या अध्यायांत आहे.

९. अध्याय नववा.- धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, भरतखंड प्राप्त होण्या विषयीं हें सर्व सैन्य मोह पावलें आहे. तसाच माझा पुत्र दुर्योधन व पांडव व माझें मनही त्या विषयीं लुब्ध झालें आहे याचें कारण काय तें सांग! असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, मी जें बोलतों तें ऐक. या भारत वर्षास पांडव लुब्ध झाले आहेत असें नाहीं. दुर्योधन व शकुनि हे ही या विषयीं लुब्ध झाले आहेत. तसेंच नाना देशाचे सकल क्ष

त्रिय आलेले नेहीं या भारतवर्षा विषयीं लोभी होऊन एकमेकांची जल्पना करी
त नाहींत. हे धृतराष्ट्रा, हें भारतवर्ष, इंद्र, देव व वैवस्वतमनु, पृथु, वैन्य, महात्मा
इक्ष्वाकु, ययाति, अंबरीष, मांधाता, नहुष, मुचकुंद, उशीनर राजाचा पुत्र शिबि, ऋ
षभ, ऐल, नृगराज, कुशिक, दुर्धर्ष गाधिराजा, सोमक, दिलीप व अन्य बलवान्
क्षत्रिय या सर्वांस हें भारत खंड प्रिय होतें. या भारतवर्षाचें प्रमाण तुला क
थन करितों. महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्षवान्, विंध्य, पारियात्र, हे सात
श्रेष्ठ पर्वत या भारत वर्षांत मुख्य आहेत. यांचे समीपभागीं सहस्रावधि
अन्य पर्वत बलवंत व चित्रविचित्र बहुत शृंगानीं युक्त असे आहेत. तसेंच
कांहीं अविज्ञात व कांहीं विज्ञात असे लहान मोठे पर्वत बहुत आहेत. श्रेष्ठ
श्रेष्ठ असे म्लेंच्छ त्या पर्वतावर राहून गंगाप्रभृति नद्यांचें जल प्राशन करि
तात. गंगा, सिंधु, सरस्वति, गोदावरी, नर्मदा, आदि करून त्या अनेक नद्या म
हाफलदायक विश्वाच्या माता प्रसिद्ध आहेत. तशाच अन्य शतशः सहस्र
शः अप्रसिद्ध आहेत आतां या भारतखंडांतील देशांचें निरूपण करितों. कु
रु, पांचाल, शाल्व, माद्रेय, जांगल, शूरसेन, पुलिंद, बोध, माल, मत्स्य, आदिक
रून प्राच्य उदीच्य देश मुख्यत्वें करून सांगितले. अशी ही पृथ्वी धर्मार्थ
काम फल देणारी होय. जशी कामधेनु कामना पूर्ण करित्ये तसें या भूमीचें उ
त्तम प्रकारें पालन केलें असतां ती मनोरथ पूर्ण करील. अशी ही पृथ्वी अस
ल्यामुळें शूर व धर्मार्थ काम जाणणारे असे पार्थिव संग्रामामध्यें प्राणाचा
त्याग करून इजविषयीं लुब्ध होतात. देव व मनुष्य यांस ही भूमि आश्रय
आहे. जसे श्वान आमीषा करितां एकमेक कलह करितात. तसे या पृथ्वीचे
उपभोगा करितां सर्व पार्थिव कलह करितात. हे भरतश्रेष्ठ, सर्व पार्थिव या
पृथ्वीचा उपभोग करीत असतां आजपर्यंत कोणाच्या कामाची तृप्ति होत ना
हीं यास्तव या भूमीचा कुरुपांडव सामदान, दंड भेदें करून परिग्रह करण्या
ची इच्छा करितात. सर्व प्राणिमात्रांस सूर्यलोक इतर लोक किंवा पिता, मा
ता, पुत्र, इत्यादिक ही पृथ्वी होय. असा विषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दहावा:- धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, या भारत व
र्षाचें व हैमवती वर्षाचें प्रमाण व त्यांतील राहणाऱ्या मनुष्यांचें आयुष्य प्र

माण बल शुभाशुभ विस्तारें करून मला सांग. तसेच हरिवर्षाचेंही प्रमाणसां ग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो. हे भरतश्रेष्ठ या भारत वर्षामध्यें कृत, त्रेता, द्वापार आणि कलि अशा क्रमानें चार युगें येतात. कृतयुगामध्यें चार सहस्त्र वर्षें आयुष्याची संख्या. त्रेतायुगामध्यें तीन सहस्त्रें सांप्रत द्वापारयुगामध्यें दोन सहस्त्र कलियुगामध्यें आयुष्याच्या प्रमाणाची स्थिति नाहीं. कित्ती एक गर्भामध्यें असतांच मरण पावतात. कृतयुगामध्यें महाबलवान्, धनिक, प्रियदर्शनीय, तपोधन अशा प्रजा उत्पन्न होतात. त्रेतायुगामध्यें सर्व क्षत्रिय चक्रवर्ति होतात. द्वापारामध्यें महावीर्यवान् परस्पर जयेच्छु असे उत्पन्न होतात. कलियुगामध्यें अल्पतेजानें युक्त, क्रोधी, लोभी, अनृत भाषणी असे जन उत्पन्न होतात. हे राजा या द्वापारयुगामध्यें पूर्वी दोन युगांतील गुणापेक्षां न्यूनता आहे. हैमवत वर्ष हें भारत वर्षा पेक्षां गुणानें अधिक आहे आणि हरिवर्ष हें हैमवत वर्षा पेक्षां गुणानें अधिक आहे. असाविषय या अध्यायांत आहे.

११.अध्याय अकरावा.- धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, तूं जंबुखंडाचें यथास्थित निरूपण केलेंस आतां त्याचें परिमाण व समुद्राचें परिमाण, शाकद्वीप, कुशद्वीप, शाल्मली व क्रौंचद्वीपांचें आणि राहु, सोम व सूर्य यांचें प्रमाण मला सांग. असें संजय ऐकून बोलतो. हे राजा, पृथ्वीवर बहुत द्वीपें आहेत या द्वीपानीं सकल जगत व्याप्त जाहलें आहे; परंतु त्यांतील मुख्य मुख्य सप्तद्वीपें व चंद्र सूर्य यांचें परिमाण सांगतों ऐक. जंबुद्वीपाचा विस्तार आठ हजार सहाशें योजनें आहे. जंबुद्वीपाच्या आसमंतात् भागीं जो लवण समुद्र आहे त्याचा विस्तार जंबुद्वीपा पेक्षां द्विगुणित आहे. जंबुद्वीपा पेक्षां शाकद्वीप द्विगुणित आहे व त्याचे आसमंताद्भागीं जो क्षीर समुद्र आहे तो शाकद्वीपापेक्षां द्विगुणित आहे. या शाकद्वीपांत नानाप्रकारचे पुण्यकारक देश आहेत. कोणी जन तेथें मरण पावत नाहींत. हे भरतश्रेष्ठा, या प्रकारें तुला शाकद्वीपाचें संक्षेपें करून निरूपण केलें असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र भाषण करितो. हे संजया, आतां तत्वें करून त्याचा विस्तार मला सांग. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, या द्वीपांत मण्याचे सात पर्वत आहेत. तशाच

रत्नांच्या खाणी व नद्या आहेत. या द्वीपांत जे पदार्थ आहेत ते सर्व गुणानीं श्रेष्ठ आहेत. देव ऋषि गंधर्वांनीं युक्त असा मेरुपर्वत या द्वीपामध्यें आहे. पूर्वपश्चिम दीर्घ असा एक मलयनामाचा पर्वत या द्वीपांतच आहे, त्या पासून मेघप्रवृत्त होऊन आसमंताद्भागीं जातात. मलयाच्या पलीकडे जलधारनामक मोठा पर्वत आहे. त्या पासून इंद्र जलग्रहण करून वर्षाकालीं वृष्टि करितो. तसाच या द्वीपांत रैवतक नामानें एक उच्चगिरि आहे. मंडलाकृति रेवती नामक जें नक्षत्र आकाशांत फिरतें तें दिव्यरूपें करून या पर्वतावर आहे. अशी या पर्वताची ब्रह्मदेवानें मर्यादा केली आहे. त्याच्या उत्तरेस श्यामनामक एक महागिरि आहे, त्याची कांति नूतन मेघा सारखी असून तो देदीप्यमान व स्वच्छ असा आहे. या पर्वताच्या योगें येथील प्रजा श्यामवर्ण होतात. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, या पर्वताचे योगें प्रजा श्यामवर्ण होतात, ह्मणून तूं सांगतोस तर हा मोठा मला संशय जाहला आहे. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, सर्व द्वीपांमध्यें गौर व कृष्ण उभय मिश्रित अशा वर्णाच्या प्रजा आहेत. हा पर्वत श्यामवर्ण असल्यामुळें याजवर श्यामवर्ण अशा प्रजा उत्पन्न होतात ह्मणून यास श्यामगिरि असें ह्मणतात. त्याच्या पलीकडे दुर्गशैल ह्मणून एक पर्वत आहे तसाच एक केशरयुक्त केशरीनामक पर्वत आहे या पर्वता पासून वायु प्रवृत्त होतो. या समग्र पर्वतांचा योजन विष्कंभ एक एकापेक्षां एक एकाचा यथाविभागें करून द्विगुणित आहे. आतां पूर्वोक्त द्वीपांत जीं वर्षे महर्षींनीं कथन केलीं आहेत, तीं सांगतो. महामेरु, महाकाश, जलद, कुमुदोत्तर, जलधार, सुकुमार, कौमार हीं सात वर्षे रैवत द्वीपांत आहेत. श्यामामध्यें मणिकांचन वर्ष आहे, केशरामध्यें मोदाकी वर्ष आहे त्या पलीकडे दीर्घत्वानें व ऱ्हस्वत्वानें जंबुद्वीप परिमाणाचा एक शाकनामक वृक्ष आहे. तेथें पुण्यकारक असे देश आहेत त्या देशांत शंकराची पूजा करितात तेथें सिद्धचारण व देवता यांचें गमन आहे. तेथें चारी वर्णांच्या प्रजा धार्मिक व स्वकर्मामध्यें निरत अशा आहेत. तेथें कोणी चोर नाहींत. सकलांस दीर्घायुष्य आहे. त्यांस जरा व मृत्यु नाहीं. वर्षाकाळीं जशा समुद्रगामिनी नद्या वृद्धि पावतात, तशा तेथील प्रजा वृद्धिंगत होतात. तेथें नद्या पुण्यजलाच्या आ

हेत. गंगातर बहुत मार्गांनीं गेली आहे. सुकुमारी, कुमारी, महानदी, चक्षुवर्धनी इत्यादि पुण्यकारक नद्याही तेथें बहुत आहेत. तशाच सहस्रशः पुण्योदका च्या नद्या इंद्रानें वृष्टि करून वृद्धि पावविलेल्या अशा तेथें आहेत. त्यांचीं नावें व परिमाण संख्या सांगतां येत नाहीं. तेथें पुण्यरूप व सर्व लोकांस मान्य मंग, मशक, मानस, मंदग हे चार देश आहेत. मंगदेशामध्यें ब्राह्मण, मशक देशामध्यें धार्मिक असे राजे, मानस देशामध्यें वैश्य, मंदग देशामध्यें शूद्र या प्रमाणें राहतात. तेथें कोणी राजा नाहीं कोणास दंड नाहीं आणि दंड करण्यास योग्य असे पुरुषही तेथें कोणी नाहींत. ते धर्मज्ञ जन स्वधर्में करून आप आपलें रक्षण करितात. या द्वीपामध्यें जें सांगण्यास योग्य होतें तें तुला सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२. अध्याय बारावा:— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, उत्तर द्वीपाविषयीं जी कथा मी श्रवण केली आहे ती सांगतों. उत्तर द्वीपामध्यें घृतोद समुद्र, त्या पलीकडे दधि, मंडोद, त्या पलीकडे सुरोद सागर, दुसरा एक जलसागर आहे हे परस्पर सागर एकमेकांपेक्षा द्विगुणित आहेत. हे नराधिपा, सकल द्वीपें व पर्वत समुद्रानीं वेष्टित आहेत. मध्यम द्वीपामध्यें गौरनामक मनशीलांचा मोठा पर्वत आहे. त्या पर्वताच्या पश्चिमभागीं श्री कृष्ण राहून स्वतः दिव्यरत्नांचें रक्षण करितो आणि स्वप्रजांवर प्रसन्न होऊन सुख देतो. कुशद्वीपांत सकल देशाच्या मध्यभागीं कुशस्तंभ आहे. शाल्मली द्वीपामध्यें सांवरीचा एक वृक्ष आहे त्या वृक्षाची तेथील जन पूजा करितात. क्रौंचद्वीपामध्यें रत्नाचा क्रौंचपर्वत आहे. त्याची निरंतर चारी वर्ण पूजा करतात. ज्या स्थळीं सर्व धातूंनीं युक्त व महान् असा गोमंत पर्वत आहे त्यास्थळीं श्रीमान् कमललोचन प्रभु नारायण मोक्षेच्छु पुरुषानीं नित्य संगत असा वास करतो. कुशद्वीपामध्यें विद्रुम युक्त, दुसरा हेम तिसरा कुमुदनामक, चवथा पुष्पवान्, पांचवा कुशेशय नामक सहावा हरी असे आहेत. हे सहा पर्वत उत्तम आहेत. यांच्या मध्यभागींचा विस्तार एक एकापेक्षां एक एकाचा यथाविभागें करून द्विगुणित आहे. हे राजा आतां तुला वर्षांचें निरूपण करितों. औद्भिद, वेणुमंडल, सुरथाकार, कंबल, धृतिमत्प्रभा

कर आणि कांपिल अशीं सात वर्षें आहेत. या वर्षांच्या मर्यादासूचक पूर्वीं सांगितलेले सात पर्वत आहेत. यांचे ठायीं देव गंधर्व व प्रजा विहार करितात. तेथें जन कोणी मरण पावत नाहींत त्या स्थळीं चोरांचे समुदाय नाहींत व म्लेंच्छजातीय पुरुष ही नाहींत. तेथील सर्व जन बहुत करून गौरव सकुमार असे उत्पन्न होतात. आतां राहिलेल्या द्वीपाचें वृत्त जें मी श्रवण केलें आहे तें तुला सांगतों. क्रौंचद्वीपामध्यें क्रौंचनामें करून महापर्वत आहे त्याच्या पलीकडे वामनक पर्वत आहे, त्याच्या पलीकडे अंधकार पर्वत त्याच्या पलीकडे मैनाक पर्वत त्याच्या पलीकडे गोविंदगिरि व त्याच्या पलीकडे निबिडनामक पर्वत आहे, ते क्रमें करून उत्तरोत्तर एकएकापेक्षां द्विगुणीत आहेत. आतां त्यांतील देशांचें निरूपण करितों. क्रौंचामध्यें कुशल देश, वामनामध्यें मनोनुग, त्याच्या पलीकडे उष्णदेश त्याच्या पलीकडे पावरक देश त्या पलीकडे अंधकारक देश त्या देशा पलीकडे मुनि देश मुनि देशा पलीकडे सिद्धचारणानीं संकीर्ण गौरप्राय असा दुंदुभी स्वन देश आहे. हे राजा, हे पूर्वोक्त देश देव गंधर्वांनीं निरंतर सेवित असतात. पुष्करामध्यें मणिरत्नानीं युक्त असा पुष्करनामक एक पर्वत आहे. तेथें स्वतः प्रजापति राहतात. सकल देव व महर्षि प्रजापतीची तेथें निरंतर उपासना करितात. जंबुद्वीपापासून नाना प्रकारचीं रत्नें तेथें येतात. या सर्व द्वीपांच्या ठायीं ब्रह्मचर्य, सत्य, दम येणें करून प्रजांचें आयुष्य व आरोग्य एकमेकांच्या प्रमाणापेक्षां द्विगुणित होतें. या सर्व द्वीपांमध्यें देश एकच धर्म एकच आहे. स्वतः प्रजापति ईश्वर दंड घेऊन या सर्व द्वीपांचें रक्षण करीत नित्य उभा राहतो. तोच सर्वांचा कल्याणकर्ता राजा, तोच सर्वांचा पिता व तोच सर्वांचा प्रपितामह होय. मूर्ख व पंडित अशा सर्व प्रजा तोच करितो. तोच आपण सिद्धान्न उत्पन्न करितो त्या सिद्ध अन्नाचें सर्व प्रजा भोजन करितात. हे महाराजा, चतुर दलानें युक्त, कमला सारखे चतुर नेत्र जें जंबुमंडळ त्याचा परिधि पूर्वीं अठरा हजार साहाशें योजनें सांगितला आहे त्याचा मध्यम मंडल परिधि तेहतीस योजनें आहे. या मंडलाच्या चारबाजूंस लोकसंमत व महान् महान् गंडस्थळाचे वामन, ऐरावत, सुप्रतिम, म

भंजन हे चार दिग्गज आहेत. त्या गजांच्या महत्वाचें प्रमाण किती आहे याची संख्या करण्यास मी समर्थ नाहीं. तिर्यक् भागीं, ऊर्ध्वभागीं व अधोभागीं ते महत्वानें असंख्यात आहेत. येथूनच वायु सुटतात. त्या असंबद्ध वायूतें ते दिग्गज शुंडाग्रानें ग्रहण करून पुनः शतधा मार्गे करून नित्य सोडतात. त्या दिग्गजांच्या सुस्कान्यानीं सुटलेल्या वायूंच्या योगें प्रजा सुखी राहतात. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, तूं द्विपांचा विस्तार व त्यांची स्थिति सांगितलीस आतां सूर्य, चंद्र व राहू यांचें प्रमाण मला सांग. हें ऐकून संजय बोलतो. हे राजा, राहूचें परिमंडल बारा सहस्र योजनें आहे व त्याचा परिधि छत्तीस सहस्र साठ योजनें आहे. चंद्रमंडल अक्रा सहस्र योजनें आहे आणि त्याचा परिधि तेहतीस हजार एकुणसाठ योजनें आहे. सूर्यमंडल दाहा सहस्र योजनें आहे व त्याचा परिधि तीस सहस्र अठ्ठावन्न योजनें आहे. हे राजा, या प्रकारें शीघ्रगामी जो सूर्य याचें मंडल प्रमाण सांगितलें. राहू यथाकाळीं आपल्या महत्वें करून चंद्रसूर्यांस आच्छादन करितो. हीं ग्रहमंडलें तुला संक्षेपानें निरूपण केलीं. हे राजा, तूं जो मला प्रश्न केलास त्याचें उत्तर शास्त्रचक्षूनें मी यथातत्वें करून सांगितलें. हें सर्व माझें ऐकून शांतीतें पाव. हें जगत आपले कर्मानें जसें निर्माण जाहलें तसें मी तुला सांगितलें. आतां तूं आपल्या दुर्योधन पुत्राचें सांत्वन कर. हे भरतश्रेष्ठा, हें भूमिपर्व जो श्रवण करील तो श्रीमान् नृपति सिद्धार्थी व साधूनीं संमत असा होईल. जो नियमित व्रतीराहून हें प्रकरण पर्वकाळीं ऐकेल त्याचें आयुष्य, बल, कीर्ति, तेज वृद्धिंगत होईल. त्याचे पितर व पितामह संतुष्ट होतील. आपण ज्यांत वास करितों तें हें पुण्यरूपा पूर्वजानीं प्रवृत्तींत केलेलें हें भारत वर्ष होय. याचा सर्व वृत्तांत तूं श्रवण केलासच आहेस. असा विषय या अध्यायांत आहे.

१३. अध्याय तेरावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्र फार चिंताग्रस्त असतां संजय भीष्म मरण पावला हें वर्तमान सांगण्यास संग्रामांतून माघारा येऊन परम दुःखानें धृतराष्ट्रास बोलला कीं, हे भरतश्रेष्ठा, मी संजय आलों आहें तुला नमस्कार करितों. हे राजा, तुमचा

गुरु भीष्म शिखंडीनें मारल्यामुळें तो संग्रामामध्यें शरशय्येवर शयन करीत आहे. या महारथी भीष्मानें पूर्वी काशीपुरीमध्यें सर्व पृथ्वीपाल एकत्र मिळाले अ- सतां संग्रामामध्यें एक रथामध्यें बसून सर्वांचा पराजय केला, त्यास आज शिखंडीनें मारिलें. नरामध्यें केवळ सिंहरूपी व दुरासद असतांही पांचाल पुत्र जो शिखंडि त्याणें त्यास संग्रामामध्यें पाडिलें. जसें सिंहास अवलोकन करून गोवृंद भयाभीत होतें तसें पांडवांचें सैन्य रणांमध्यें भीष्मास पाहू न भयभीत होत होतें, तो भीष्म आज दाहा दिवस पर्यंत तुझ्या पुत्राच्या सेनेचें रक्षण करून अस्तास पावला. जसा इंद्र असोभ्य पर्जन्याची वृष्टि क रितो तसा या भीष्मानें रणामध्यें दहा दिवसांत अर्बुद योद्ध्यांचा नाशकेला. तो आज वातभग्न वृक्षा सारखा तुझ्या दुष्ट मसलतीनें मरण पाऊन रणभू मीचे ठायीं शयन करीत आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

१४. अध्याय चवदावा.– धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, भीष्म शिखंडी नें मारल्यावर रथापासून तो कसा पतन पावला. तो मरण पावल्यावर माझेपु- त्रानीं काय केलें? व माझ्या पुत्रांचें मन कसें जाहलें तें सांग. हे संजया, भीष्म रणामध्यें पडला येणें करून माझे हृदयास बहुत दुःख होतें. बरें त्याच्याप ष्ठभागीं व अग्रभागीं कोण कोण योद्धे होते. भीष्म युद्ध करीत असतां त्याचे अग्रभागीं कोण उभे राहिले? कौरव सैन्याचें दहा दिवस रक्षण करून दुष्कर कर्म कर्ता कर्ता आदित्या सारखा कसा अस्तास पावला. इंद्रासारख्या बाण वृष्टीनें रणांगणीं दहा दिवसांत ज्या भीष्मानें अर्बुद संख्याक शत्रूंचे योद्धे नाश पावविले तो आज माझ्या दुष्ट विचारामुळें वातभग्न द्रुमासारखा भूमी वर शयन करितो, जो जामदग्न्य राम याच्याशीं स्पर्धा करीत असतां रामानें कधीं त्यास जिंकिलें नाहीं. शिखंडी प्रमुख सर्व पांडव ज्या काळीं भीष्मावर धांऊन आले त्या काळीं भीष्माच्या संरक्षणार्थ कोणी नवता कीं काय? भीष्मां सारखा- योद्धा मरण पावलेला श्रवण करून माझें हृदय लोहमय असल्यामुळें विदी र्ण होत नाहीं असें वाटतें. प्रत्यंचेचा घोष हीच ज्याची गर्जना, बाण हेच थें- बी ज्याचे पर्जन्य बिंदु, धनुष्याचा टणत्कार हाच ज्याच्या विद्युल्लताशब्द; असा हा भीष्मरूपीमेघ सृंजय पांडव व पांचाल यांजवर वृष्टि करून इंद्रज

सा दानवांस मारितो तसा हा शत्रूंच्या योद्ध्यांस मारीत असतां शत्रूंचे योद्ध्यां नीं कसें त्यास मारिलें? भीष्म कोपानें जाज्वल्यमान जाहला असतां समुद्र वेळे सारखें कोणी त्याचें निवारण केलें? हे संजया, रणांमध्यें शत्रूंचा नाशक रणारा असा भीष्म दुर्योधनाच्या हितार्थ महत्कर्म करीत असतां त्याच्या अ ग्रभागीं कोण वीर होते? अमित तेजस्वी भीष्माचें त्या काळीं दक्षिणचक्र कोणी रक्षण केलें? पृष्ठभागीं रक्षणार्थ कोण उभे होते? भीष्माच्या संनिध भागीं व पुढें कोण होते? भीष्म युद्ध करीत असतां उत्तर चक्राचें कोणी रक्ष ण केलें? भीष्माच्या वामचक्राच्या रक्षणार्थ कोण योद्धे उभे राहून सृंजया चें निवारण करते झाले. सेनेच्या अग्रभागीं कोणी भीष्माचें संरक्षण केलें. मा झा पिता भीष्म मरण पावला ह्मणोन सांगतोस हें काय? हा महा वीर्यवान भीष्म ज्या काळीं उत्पन्न झाला त्या काळीं याचें उत्तम लक्षण पाहून सक ल लोकांमध्यें विख्यात असा याचा शंतनुनामक पिता यानें शोक, दैन्य व दुः ख यांचा त्याग केला. ज्याचे गुण वर्णनास योग्य, जो शुचि, स्वधर्म निरत, वे द वेदांग तत्वज्ञ, सर्वास्त्र शिक्षायुक्त, शांत, दांत, मननशील असा भीष्म मर ण पावला ह्मणून तूं सांगतोस त्या पेक्षां जें अवशिष्ट सैन्य राहिलें असेल तें मेल्या सारखेंच मी समजतों. हे संजया, हा भीष्म वृद्ध व पांडवांचा गुरु अस तां हे पांडव त्याचा वध करून राज्याची इच्छा करितात त्या पेक्षां मला असें वाटतें कीं, धर्मापेक्षां अधर्माचें प्राबल्य झालें. जामदग्न्य राम तो काशिराजा ची कन्या जी अंबा तिच्या करितां भीष्माशीं युद्धास उद्युक्त झाला असतां भीष्मानीं जामदग्न्य रामास युद्धामध्यें जिंकिलें. तो इंद्रासारखा पराक्रमी व धनुर्धारी पुरुषांमध्यें श्रेष्ठ असा भीष्म संग्रामामध्यें मरण पावला ह्मणू न तूं सांगतोस त्याजपेक्षां दुसरें दुःख आणखी मला काय व्हावें. भीष्मा- चें व पांडवांचें कसें युद्ध झालें तें मला निवेदन कर. हे संजया, भीष्म म रण पावल्यावर माझ्या सेनेची अवस्था गतभर्तृका स्त्रीसारखी जाहली. भी ष्म मरण पावला असतां जसे पार जाणारे पुरुष अगाध सलिला मध्यें बुड णाऱ्या नौकेस पाहून घाबरतात तसे माझे पुत्र घाबरून शोक करीत अस तील. भीष्म मरण पावला त्या पेक्षां स्वकीय किंवा परकीय योद्धा माझ्या

पुत्रांचें रक्षण करील असा कोणी मला दिसत नाहीं. पण हा बरें क्षत्रियांस-हा धर्म दारुणच ऋषीनीं कथित केला आहे. हे संजया, शांतनव भीष्मास मारून पांडव राज्याची इच्छा करितात. तसेंच आम्हींही पांडवांस मारून राज्याची इच्छा करितों. भीष्म मरण पावल्यावर दुर्योधन, कर्ण, सुबलपुत्र शकुनि व कपटी दुःशासन यानीं काय भाषण केलें? कोण कोण योद्धे भीष्मानीं जिंकिले? कोणांस जयाची इच्छा झाली? भीष्म मरण पावला हें ऐकून माझी शांति होत नाहीं. पुत्र मरणरूप पीडा माझे हृदयाचे ठायीं महान् जाहलीआहे ती तें तूं वारंवार घृतसेकानें उद्दीपन जाहलेल्या अग्नीसारखें उद्दीपन करितोस. सर्व लोकांत विख्यात व युद्धरूप महान् भार ज्याणें उचललेला असा जो भीष्म त्यास मृत झालेला अवलोकन करून माझे पुत्र शोक करीत असतील, असें वाटतें. दुर्योधनानें उत्पन्न केलेल्या दुःखाचें मी वारंवार श्रवण करितों. तस्मात् या दुर्योधनाच्या मंद बुद्धीनें जें वृत्त जाहलें असेल व जयेच्छु जो भीष्म याणें संग्रामामध्यें जें तेजोयुक्त कर्म केलें असेल तें मला सांग. तसेंच कौरव पांडवांच्या सैन्यांत क्रमें करून ज्या ज्या काळीं ज्या ज्या वीरांचें युद्ध जाहलें असेल तें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१५. अध्याय पंधरावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, तूं मला प्रश्न केलास हा योग्यच आहे. हा दोष दुर्योधनावर ठेवण्यास तूं योग्य नाहींस. जो कोणी पुरुष दुष्कर्म करितो त्या पापाचें अशुभ फळ त्याचें त्यास प्राप्त होतें. त्या विषयीं अन्यांची शंका करूं नये. हे महाराजा, जो पुरुष निंद्यकर्म करितो तो सर्व लोकांस वध्य होतो. सत्यप्रतिज्ञ पांडवानीं तुझ्याकडे पाहून अमात्यांसह वर्तमान सर्व दुःखें सहन केलीं व चिरकाल वनामध्यें वास केला. युद्धामध्यें हय गज व महापराक्रमी राजे यां विषयीं प्रत्यक्ष जाहलेलें व मी पाहिलेलें तें सर्व तुला सांगतों. ज्या माहात्म्या व्यासाच्या प्रसादें करून दिव्य ज्ञान, अतींद्रिय दृष्टि, दुरून श्रवण शक्ति, परचित्ताचें ज्ञान, भूत-भविष्याचें ज्ञान, उन्मार्गानें गमन करणाऱ्याच्या उत्पत्तीचें ज्ञान, आकाशाचेंठायीं गति व युद्धामध्यें शस्त्रस्पर्श अंगास न होणें त्या सर्व विद्या मला प्राप्त जाहल्या त्या बुद्धिमान पराशरपुत्र व्यासास नमस्कार करून विचित्र व परम-

अर्जुन असें जें भारताचें लोम हर्षणयुद्ध जाहलें तें विस्तारें करून तुह्मांसां गतों ऐक. हे राजा कौरव पांडवांची सेना यथाशास्त्रविधान पूर्वक व्यूहरचना करून उभी राहिली असतां दुर्योधन दुःशासनास बोलला कीं, हे दुःशासना, भीष्माच्या संरक्षणार्थ बहुतरथी व सैन्य सिद्ध ठेव. आज रणामध्यें एक भीष्माच्या संरक्षणा वांचून तुह्मांस दुसरें कार्य कांहीं नाहीं. भीष्माचें संरक्षण जाहलें असतां तो पांडव, सोमक व सृंजय यांचा नाश करील.या विशुद्ध आत्म्या भीष्मानें पूर्वी असें सांगितलें आहे कीं मी शिखंडीस मारणार नाहीं. हा पूर्वी स्त्री होता. यास्तव युद्धामध्यें याचें वर्णन करून इतर सर्वांशीं युद्ध करील यास्तव विशेषें करून सर्वांनीं भीष्माचें रक्षण करावें. जे आमच्याकडील योद्धे आहेत त्याणी शिखंडीच्या वधा विषयीं यत्न करावा. प्राच्य, प्रतीच्य, दाक्षणात्य व उत्तर हे योद्धे सर्व शास्त्रविशारद आहेत, त्याणीं पितामहाचें रक्षण करावें. महाबलवान सिंह असून तो संरक्षित जर नाहीं तर लांडगा त्याचा घात करितो. यास्तव जंबुका सारखा जो शिखंडी त्याच्या हातून भीष्म सिंहाचा घात करवूं नका. ज्याचें वामचक्र युधामन्यु पांचालानें संरक्षित आहे तसेंच ज्याचें दक्षिणाचक्र उत्तमोजानें संरक्षित आहे असा जो फाल्गुन तो शिखंडीच्या संरक्षणार्थ आला आहे. हे दुःशासना, भीष्मानीं तर शिखंडीस युद्धामध्यें मी मारणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून युद्धाविषयीं वर्जित केला त्याच शिखंडीचें पार्थानें संरक्षण केलें आहे तस्मात् आतां जेणें करून शिखंडि गांगेय भीष्माचा वध न करील अशी सिद्धता ठेवा.असा विषय या अध्यायांत आहे.

१६. अध्याय सोळावा.- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं प्रातःकालीं सर्व योद्ध्यांचा असा शब्द होऊं लागला कीं, अरे युद्धार्थ सैन्याची सिद्धता करा. योद्ध्यांच्या गर्जना व दुसरे इतर शब्द सर्व एकत्र जाहल्या मुळें सैन्यामध्यें एकाएकीं गलबलाट जाहला, हे राजा, सूर्योदयकालीं कौरव पांडवांच्या सेना शस्त्रास्त्र कवचादिकानीं विराजित होऊन युद्धास उभ्या राहिल्या. तुझ्या व पांडवांच्या सैन्यांतील शस्त्रें, गज, जांबूनद परिष्कृत केलेहे रथ विद्युल्लता युक्त,

मेघ सदृश देदीप्यमान दिसूं लागले. रथांचे समुदाय दुरून केवळ नगरा सारखे दिसूं लागले. त्या रथसमुदायांत तुझा पिता भीष्म पूर्ण चंद्रा सारखा शोभूं लागला. तसेच सहस्रावधी गज, पायदळ, रथी व अश्व शत्रुबंधनार्थ जाळ्या सारख्या आकारानें उभे राहिले. त्या काळीं तुझ्या व पांडवांच्या सैन्यांतील नाना प्रकारच्या आकृतीचे उभारलेले सहस्रावधी ध्वज परम शोभायमान दिसूं लागले. युद्धाची आकांक्षा करणारे वीर सिद्ध होऊन उभे राहिले. सौबलेय शकुनी, शल्य, जयद्रथ, विंदानुविंद, कैकेय, कोशलदेशाचा राजा बृहद्बल व कृतवर्मा हे दशसंख्याक महाशूर, परिघासारिखे बाहू ज्यांचे अक्षौहिणीचे पती युद्धांत स्थित होते. तसेच दुसरेही दुर्योधनास वश जाहलेले बहुत राजे व राजपुत्र नीतिमान् व महारथी दुर्योधनाकरितां युद्धामध्यें मरणाविषयीं दीक्षा धारण करून कृष्णाजिन परिधान केलेले आपआपल्या सैन्यामध्यें युद्धाविषयीं सिद्ध होऊन दहा अक्षौहिणी सेनेसहवर्तमान उभे होते. हे राजा, तुमचें एक अक्षौहिणी सैन्य सर्व सैन्याच्या अग्रभागीं जेथें शांतनव भीष्म उभे होते तेथें उभें राहिलें. त्याकाळीं भीष्मानीं श्वेत उष्णीष धारण करून श्वेतहय रथास जोडले होते. तसेंच कवच ही श्वेतच धारण केलें होतें, त्यामुळें तो उदयास पावलेल्या पूर्णचंद्रासारखा सुशोभित सर्वांस दिसला. जृंभमाण सिंहास अवलोकन करून जसे क्षुद्रक मृग भयाभीत होतात तसे सृंजय व महाधनुर्धारी धृष्टद्युम्न प्रमुख वीर भीष्मास पाहून भयाभीत जाहले. हे राजा, या प्रकारें युद्धश्रीनें युक्त असें तुझें अकरा अक्षौहिणी सैन्य. तसेंच महान् वीरानीं संरक्षित असें पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य युद्धार्थ उभें आहे. उभयतांचे हे सेनासमुद्र उन्मत्त मकरानीं व आवर्तानीं युक्त आणि महाग्राहानीं संकुल असल्यामुळें प्रळयकाळीं क्षुब्ध जाहलेल्या सागरा सारखे दिसूं लागले. हे राजा कौरव पांडवांच्या दोन्हीं सेना एकत्र जाहलेल्यांचा जो समुदाय तो आज मी अवलोकन केला. असा पूर्वीं कधींही पाहिला नाहीं व श्रवणही केला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१७. अध्याय सत्रावा — संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, ज्या

प्रकारें पूर्वी कृष्णद्वैपायन व्यास बोलले त्याप्रमाणें सर्व राजे युद्धार्थ आले. ज्या दिवशीं हे सर्व राजे कुरुक्षेत्रीं युद्धार्थ एकत्र जाहले त्या दिवशीं चंद्राची पितृलोकीं वस्ति होती. कारण युद्धांत जे मरण पावतात त्यांस स्वर्गादि लोकांची प्राप्ती होण्यास चंद्र कारण आहे. आकाशामध्यें सप्तग्रह देदीप्यमान दिसूं लागले. उदयकाळीं सूर्य द्विधाभूत जाहल्या साररवा दिसून वारंवार त्याचे किरण अतिजाज्वल्यमान दिसूं लागले. सर्व दिशेच्या ठायीं कोल्हे व वायस मांस व शोणित भक्षणाच्या इच्छेनें महाभयंकर शब्द करितात. प्रतिदिवशीं प्रातःकाळीं कुरुपितामह भीष्म व द्रोण हे पंडुपुत्रांचा जय असो असें बोलत संकेताप्रमाणें तुझ्या पुत्राकरितां युद्धार्थ उभे राहिले त्या काळीं भीष्म सर्व राजांस बोलावून असें बोलला कीं हे क्षत्रियहो, तुम्हांस हें स्वर्गाचें द्वार उघडलें आहे यास्तव या द्वारानें इंद्रलोकीं व ब्रह्मलोकीं तुम्ही गमन करा. हाच अविनाशी शाश्वत मार्ग तुमच्या पूर्वजानीं पूर्वी सेवन केला आहे. नाभाग, ययाति, मांधाता, नहुष हे राजे अशा कर्मेंकरून मोठे सिद्ध होऊन परमस्थानास गेले. गृहीं राहून क्षत्रियास व्याधीनें मरण आलें तर त्यास तो अधर्म होय. क्षत्रिय युद्धामध्यें मरण पावले तर तोच त्यांचा सनातन धर्म जाणावा. हे राजा या प्रकारें भीष्मांनीं सकल राजांस सांगितलें असतां ते आप आपलीं सैन्यें घेऊन युद्धार्थ निघाले. भीष्मानीं अमात्य व बंधूंसहवर्तमान कर्णाकडून शस्त्र ठेवविलें होतें त्यामुळें कर्णाशिवाय सकल तुझे पुत्र व अन्य राजे निघाले त्या काळीं सकल तुझें सैन्य श्वेतछत्रें, पताका, ध्वज, गज, अश्व, पदाती इत्यादिकें करून परम शोभायमान दिसूं लागलें. पंचतारात्मक तालगात्र उच्च अशा ध्वजानें युक्त जो रथ त्यामध्यें तुमचा चमूपती भीष्म स्वच्छ जाहलेल्या सूर्यासाररवा उभा होता. तुमच्याकडील महा धनुर्धारी राजे भीष्मानीं अज्ञापित देशाचा ठायीं उभे होते. सिंह पुच्छानें युक्त ध्वज, त्यारथाचे ठायीं अश्वत्थामा आरूढ होऊन सेन्याच्या अग्रभागीं उभा राहिला, श्रुतायुधः चित्रसेन, पुरुमित्र, विविंशति, शल्य, भूरिश्रवा, विकर्ण, हे सात महा धनुर्धारी योद्धे उत्तम कवचें धारण करून अश्वत्थाम्यास पुढें करून भीष्माच्या अग्रभा-

गीं उभे राहिले. सुवर्णमय कमंडलूनें विभूषित वेदीचें चिन्ह ज्या द्रोणाचार्यांच्या ध्वजाचे ठायीं तो आचार्यांचा ध्वज धनुष्या सहवर्तमान सैन्यामध्यें परम शोभला. सहस्रावधी सैन्य बरोबर घेऊन दुर्योधन गमन करीत असतां त्याचा मणिमय नागचिन्हित ध्वज फारच सुशोभित दिसूं लागला. पौरव, कालिंग व सुदक्षिण यांसहवर्तमान कांबोज, क्षेमधन्वा व शल्य हे दुर्योधनापुढें उभे राहिले. वृषभकेतूनें युक्त रथाचे ठायीं कृपाचार्य आरूढ होऊन मागधसैन्याचें आकर्षण करतोच काय असा आला. वृषकेतूनें व द्रुमाबें संरक्षित शरदकालाच्या मेघा सारिखें जें भाच्यानें महान् सैन्य त्याच्या मुखावर वराहचिन्हित केतूनें युक्त रथाचे ठायीं महायशा जयद्रथ आरूढ होऊन उभा राहिला असतां रजतमय केतूच्या योगें फारच शोभूं लागला. त्या काळीं जयद्रथाचे बरोबर एक लक्ष रथारोह, आठ हजार गज, दुसरे साठ हजार घोडेस्वार आणि असंख्याक अश्व, गज, पदाती असल्यामुळें तें सेनामुख फारच शोभूं लागलें. साठ सहस्र रथ व दहा हजार गज यांसहवर्तमान कलिंग राजा आला. त्याबरोबर पर्वतासारखे महारथी यंत्रें, तोमरें व भाते धारण केलेले होते ते राजाच्या योगानें फारच सुशोभित दिसूं लागले. कलिंगराजा श्वेतछत्रानें, कंठाभरणानें व चामर व्यजनानें सुशोभित होऊन व उत्तम अंकुश हस्ताचे ठायीं धारण करून गजारूढ जाहलेला सेनामुखाचे ठायीं उभा असतां तो मेघस्थ सूर्या सारखा दिसूं लागला. जसा इंद्र वज्र धारण करून गमन करतो तसा तेजें करून देदीप्यमान भगदत्तराजा श्रेष्ठ गजावर बसून आला. वीर्यानें भगदत्तासमान असे जे अवंतीदेशाचे राजे विंदानुविंद उभयतां भाते गजावर बसून केतुमानाच्या अनुलक्षानें उभे राहिले. याप्रमाणेंच सर्व तयारी करून उभे राहिले होते. त्या काळीं भीष्माचार्य, द्रोण, अश्वत्थामा, बाल्हीक व कृपाचार्य यांणीं या सर्व सेन्याचा सर्वतो मुख नावाचा व्यूह केला. त्या व्यूहाच्या कांहीं अंगस्थानीं गज, शीर्षभागीं सर्व नृपती, पक्षस्थानीं अश्व व इतर अंगस्थानीं रथ व पदाती उभे केले: असा विषय या अध्यायांत आहे.

१८. अध्याय अठरावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा,

कांहीं काळानंतर युद्धाच्या इच्छेनें उभे राहिलेल्या योद्ध्यांचा तुमुल शब्द होऊं लागला. तेणेंकरून सकलांचीं हृदयें कंपित झालीं. तुझ्या पुत्रांचा व पांडवांचा समागम झाला असतां उभयतांचे सैनिकही कंपित झाले. या सेन्यांतील सुवर्णानें विभूषित केलेले असे रथ, विद्युल्लता सहवर्तमान मेघासारखे शोभूं लागले. महेंद्रगृहाचेठायीं जसे महेंद्र केतू दिसतात तसे तुझ्या व पांडवांच्या सेन्यामध्यें रथावरील ध्वज शोभूं लागले. तुझ्याकडील कांहीं योद्धे चित्रविचित्र आयुधें व कार्मुकें धारण करून सेनामुखावर उभे राहिले होते. तुझे कांहीं पुत्र भीष्माच्या पृष्ठभागाचें रक्षण करून उभे होते. दुःशासन, दुर्विषह, दुर्मुख, दुःसह, विविंशति, चित्रसेन, महारथी विकर्ण, सत्यव्रत, पुरुमित्र, जय, भूरिश्रवा, व शल हे योद्धे वीस सहस्र रथ्यांस व अभिषाह, शूरसेन, शिबी, वसाती, शाल्व, मद्र, अंबष्ठ, त्रैगर्त, केकेय, सौवीर, केतव, प्राच्य, प्रतीच्य व उदीच्य हे द्वादश देशांचे अधिपती यांस बरोबर घेऊन पितामहाचें रक्षण करीत होते. दहासहस्र गजांसहवर्तमान मागध भीष्माचे पृष्ठभागीं उभा राहिला. रथांचे चक्ररक्षक व गजांचे पादरक्षक तुमच्या सेनेमध्यें साठ लक्ष सहाशें होते. हजारों पदाती धनुष्य, ढाल, तरवारी, प्रास इत्यादि आयुधें घेऊन सेनेच्या अग्रभागीं उभे होते. हे धृतराष्ट्रराजा, याप्रकारें तुझ्या पुत्राचें अकरा अक्षौहिणी सैन्य यमुनांतर्गत गंगेच्या प्रवाहासारखें रणभूमीचेठायीं परम शोभायमान दिसूं लागलें. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

१९. अध्याय एकुणिसावा.— धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, कौरवांकडील अकरा अक्षौहिणी सेनेचा व्यूह पाहून मनुष्य, देव, गंधर्व, असुर इत्यादि व्यूह जाणणारा युधिष्ठिर राजा आपल्या अल्प सेन्याचा प्रती व्यूह करून भीष्मापुढें कसा उभा राहिला हें मला सांग? असें ऐकून संजय भाषण करितो हे राजा, धर्मराज धनंजयास बोलतो हे धनंजया, व्यासाचें व बृहस्पतीचें असें वचन आहे कीं, अल्प योद्ध्यांनीं बहुत योद्ध्यांशीं युद्ध कर्तव्य आहे तर पुढील द्वार लहान असा व्यूह करून युद्ध करावें. तसेंच योद्ध्यांशीं युद्ध कर्तव्य असल्यास विशाकलित स-

मुदायांनीं उभें राहून केल्यास चिंता नाहीं, आपलें सैन्य तर अल्प आहे या-स्तव जसा तुला प्रतिव्यूह करणें असेल तसा कर. असें त्याचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे राजा मी तुझ्या करितां उत्तम-दुर्जय व अचल असा वज्राख्य नामक इंद्रानें केलेला व्यूह करितों. रणामध्यें भीमसेन आपल्या-सैन्याच्या अग्रभागीं युद्ध करील. हा युद्ध करीत असतां दुर्योधन पुरोगम सर्व कौरव यास पहातांच त्रस्त होऊन माघारे फिरतील. इंद्राच्या आश्रयानें जसे सर्व देव रहातात. तसे भीमसेनाच्या आश्रयानें आम्हीं निर्भय राहूं. हा भीमसेन क्रुद्ध झाला असतां यास पहाण्यास या लोकीं कोणीं समर्थ नाहीं. मग याजवर युद्धास जाणारा असा कोण आहे. या प्रमाणें अर्जुनानें भाषण करून तत्काल आपल्या सैन्याचा व्यूह केल्यानंतर कौरवांची सेना आपल्यावर येते हें पाहून गंगेसारखी पूर्ण जाहलेली अशी पांडवांची सेना मंदमंद गतीनें युद्धार्थ पुढें चाललेली परम शोभायमान दिसूं-लागली. त्या सैन्याच्या अग्रभागीं वीर्यवान् धृष्टद्युम्न-नकुल-सहदेव व धृष्टकेतु यांसहवर्तमान भीमसेन उभा राहिला. विराटराजा भ्राते-पुत्र व एक अक्षौहिणी सैन्य यां सहवर्तमान रक्षण करीत राहिला. माद्री पुत्र नकुल सहदेव भीमाचे चक्ररक्षक झाले. अभिमन्यू सहवर्तमान द्रौपदीचे पांचपुत्र भीमाचे पृष्ठरक्षक होते. पांचाल-धृष्टद्युम्न-द्रौपदेय व अभिमन्यु याच्या संरक्षणार्थ उभे होते. यांच्या पाठीमागें कांहीं रथ मुख्य सेनेंतील शूर बरोबर घेऊन धृष्टद्युम्न उभा होता. अर्जुनानें संरक्षित असा शिखंडी भीष्मवधार्थ युद्धाकरितां चालला. महाबलवान सात्यकी अर्जुनाच्या पृष्ठभागीं गेला. युधामन्यु व उत्तमौजा हे उभयतां पांचाल अर्जुनाचे चक्ररक्षक झाले. कैकेय, धृष्टकेतु, वीर्यवान व चेकितान् हे अर्जुनाचे दोहीं बाजूस उभे राहिले. भीमसेन गदा घेऊन सैन्यामध्यें संचार करूं लागला. त्या काळीं बीभत्सु सकळ सैन्यामध्यें उभा राहून असें बोलला कीं, हे भीमसेना हे धृतराष्ट्राचे पुत्र युद्धा करितां आपलेकडे पहात उभे आहेत यांस पहा. असें पार्थाचें भाषण ऐकून सकळ सैनिकानीं युद्धाविषयीं अनुकूल वाणीचें त्याचें स्तवन केलें. राजा युधिष्ठिर अचलपर्वता सारखे मोठमोठे मत्त झालेले कुंजर घेऊन

उभा होता. तुझ्या व पांडवांच्या सैन्यांत बहुत ध्वज होते; परंतु अर्जुनाचा महाकपिचिन्हित ध्वज सर्व ध्वजांचा तेजोभंग करून एकाकी सैन्यांत परमशोभायमान दिसूं लागला. भीमसेनाचे संरक्षण कर्ते सहस्रशः पदाती, असि, शक्ति भाला इत्यादि शस्त्रें धारण करून त्याच्या अग्रभागीं चालले. पर्वतासारखे अचल असे दहासहस्र गज धर्मराजाच्या पाठीमागें गेले. भीमसेन परिघासारखी भयंकर गदा घेऊन महान् सैन्याचें आकर्षण करीत असतां सकल योद्धे त्यास पहाण्यास असमर्थ झाले. हे राजा असा हा सर्वतोमुख अर्जुनानें संरक्षित व्यूह करून पांडव त्या व्यूहामध्यें युद्धार्थ उभे राहिले. हा पांडवानीं रक्षण केलेला व्यूह मनुष्यलोकांमध्यें अजय आहे, हे धृतराष्ट्रा सूर्याच्या उदयसंधीचाठायीं दोन्ही सेना युद्धार्थ उभ्या राहिल्या असतां, अभ्रावांचून महान गर्जना युक्त तीक्ष्ण वायु सुटून थोडे थोडे पर्जन्य बिंदु पडूं लागले. तसेच अधोभागीं वायु सुटून पृथ्वीसंबंधी धूळ उडाल्यामुळें सर्व सैन्य आच्छादित होऊन गेलें. मोठी एक उल्का गर्जना करीत सूर्यउदय होत असतां त्यास ताडित करून पृथ्वीवर पडून विशीर्ण झाली. युद्धाविषयीं आनंद पावलेले पांडव तुझ्या पुत्राचें सैन्य पाहून प्रतिव्यूहरचनेनें स्थित जाहले असतां सर्व योद्ध्यांस ग्रस्त करतोच काय असा गदापाणी भीमसेन सैन्याच्या अग्रभागीं उभा राहिलेला पाहून तुझे योद्धे भयाभीत झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

२०. अध्याय विसावा.— धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, सूर्योदयकाळीं भीष्म प्रमुख माझे सैनिक व भीमसेन प्रमुख पांडवांचे सैनिक युद्धाच्या इच्छेनें हर्षित होऊन उभे राहिले असतां वायू कोणास अनुकूल होता, कोणाच्या सैन्यामध्यें श्वापदें व श्वान भयंकर शब्द करीत होते, कोणाच्या कडील योद्ध्यांचीं मुखें सुप्रसन्न होतीं हे सर्व वृत्त मला सांग? असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, उभयतांचें सैन्य व्यूह रचना करून उभें राहिलें असतां, वनपंक्ती सारिखें चित्रविचित्र शोभायमान दिसूं लागलें. या दोन्हीं सेना स्वर्गजयाकरितांच उत्पन्न केल्या अशा दिसत. कौरवांची सेना पश्चिमाभिमुख उभी राहिली असतां दैत्येंद्र सेने सारखी शोभूं लागली. व पांडवांची सेना पूर्वेकडे

मुख करून उभी राहिली असतां इंद्रसेने सारखी शोभूं लागली. त्याकाळीं पांडवसैन्याच्या पृष्ठभागापासून वायु सुटला. कौरव सैन्यामध्यें श्वापदें नानाप्रकारचे भयंकर शब्द करूं लागलीं. सकल सैन्यामध्यें तुझा पुत्र दुर्योधन, गंडस्थळांतून मदस्राव होत आहे अशा गजावर आरूढ होऊन सैन्याच्या मध्यभागीं उभा राहिला, त्याच्या जवळ पर्वतसंबंधी व गांधारदेशीय वीरांसहवर्तमान शकुनी आला. सर्व सैन्याच्या अग्रभागीं भीष्म उभा होता. सर्वांचा गुरु द्रोणाचार्य धनुष्य बाण घेऊन सैन्यामध्यें पश्चात्भागीं राजासारखा उभा होता, शारद्वतकृपाचार्य. शक, किरात, यवन, पल्लव यां वीरांसहवर्तमान सैन्याच्या उत्तरभागीं उभा होता, अंधक, वृष्णी, भोज व सुराष्ट्रक इत्यादिक योद्ध्यांसहवर्तमान कृतवर्मा सैन्याच्या दक्षिणभागीं उभा होता, अर्जुनास जिंकण्या करितां किंवा मारण्या करितां उत्पन्न झालेले अयुतसंख्याक समशप्तक नामक त्रिगर्त देशींचे योद्धे हस्तामध्यें आयुधें धारण करून जिकडे अर्जुन उभा होता तिकडे गेले. हे राजा, तुझ्या सैन्यांत लक्ष संख्याक गज होते त्या प्रत्येक गजाचे संरक्षणार्थ पृष्ठभागीं शत शत रथ, प्रत्येक रथाचे संरक्षणार्थ शंभर शंभर अश्व, प्रत्येक अश्वाच्या पृष्ठभागीं दहा दहा धनुर्धारी. व प्रत्येक धनुर्धाऱ्याच्या पृष्ठभागीं शंभर शंभर ढाल तरवारी धारण केलेले योद्धे उभे होते. या प्रकारें भीष्मानें व्यूहाची रचना केली असतां रथ, अश्व, गज इत्यादिकानीं व्याप्त जें तुझें सैन्य तें समुद्रा सारखें शोभलें. हे राजा, तुझी सेना जशी भयंकर दिसत्ये तशी पांडवांची दिसत नाहीं; परंतु केशव व अर्जुन हे पांडवांच्या सैन्याचे नायक असल्यामुळें त्यांची सेना मोठी दुर्जय आहे असें मीं मानितों. असा विषय या अध्यायांत आहे.

२१. अध्याय एकवीसावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, तुझ्या पुत्राच्या सेनेचा अभेद्य व्यूह पाहून धर्मराज विवर्ण होत्साता अर्जुनास भाषण करितो हे अर्जुना, भीष्मानें शास्त्रविधिपूर्वक असा व्यूह रचिला आहे त्याचा भेद करण्यास आपण कसे समर्थ होऊं! असें धर्मराजानें भाषण करितांच भीष्माचा व्यूह पाहून धर्मराजास मोठें भय झालें असें जा·

णून अर्जुन बोलतो हे राजा, प्रज्ञेनें, गुणानें व शौर्यानें शत्रुसमुदाय जरी अधिक आहे तथापि अल्प समुदाय त्या बहुनांचा पराजय करितो याचें कारण तुला सांगतो तें तूं असूया रहित होऊन ऐक. तें कारण नारद ऋषी, भीष्म, व द्रोण यांस विदित आहे; पूर्वी देवासुरांचें युद्ध झालें त्या काळीं पितामह ब्रह्मदेव, इंद्रादि देवांस असें बोलला कीं, जयेच्छु पुरुष सत्यानें, दयाळूपणानें, धर्मानें व उद्योगानें जसे जय पावतात तसे बलानें व वीर्यानें जय पावत नाहींत यास्तव धर्म व अधर्म यांचा विचार करून अहंकार रहित युद्ध करा जिकडे धर्म तिकडेच जय होणार यात संशय नाहीं. हे धर्मराजा देवासुरांस कथन केलेलें ब्रह्मदेवाचें वाक्य तुला सांगितलें आहे, हें सत्य मानिलेंस तर आपला जय होईल जिकडे कृष्ण तिकडेसच जय आहे असें नारदानींही पूर्वी सांगितलें आहे व हा सनातन पुरुष जिकडे असेल तिकडेच जय होईल. पूर्वी हा हरी सुरासुरांस व्यथा पावण्यासारखें असें बोलला कीं, कोण कोणास जिंकील त्या काळीं देव बोलले कीं हे कृष्णा, या असुरांस आम्हीं कसें जिंकावें, तेव्हां हरिप्रसादानें शक्रादि देवांनीं, असुरांस जिंकून त्रैलोक्य आपल्या स्वाधीन केलें, यास्तव हे धर्मराजा विश्वभोक्ता त्रैलोक्याधीश आज तुझ्या जयाची आकांक्षा करीत असतां तुला किमपीही व्यथा नसावी. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

२२. अध्याय बाविसावा— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिरानें भीष्म सेन्याच्या प्रतिविरोधी असा व्यूह करून ज्या ज्या स्थळीं ज्या ज्या योध्यांची योजना केली ते ते योद्धे त्या त्या स्थळीं स्वर्गाची इच्छा करीत युद्धा विषयीं उभे राहिले. मध्यभागीं सव्यसाचीनें संरक्षित केलेल्या शिखंडीचें सैन्य, भीमसेनानें संरक्षित जो धृष्टद्युम्न तो सैन्याच्या अग्रभागीं, सात्यकी आपले सात्वत सैनिक बरोबर घेऊन सैन्याच्या दक्षिणभागीं या प्रमाणें उभे राहिले. सुवर्ण व रत्नानीं खचित असा हस्तनापुरातून रथ आणून त्यांत युधिष्ठिर राजा बसला त्या काळीं हस्तिदंत शलाकायुक्त पांडुर वर्ण छत्र धर्मराजाचे मस्तकावर फारच शोभायमान दिसूं लागलें. महान् महान् ऋषींनीं त्याची इंद्रासारखी स्तुति केली. राजाचे पुरोहितानीं त्यास शत्रुआ-

शीर्वाद दिला. इतर वेदशास्त्रज्ञ ब्रम्हऋषी जप, मंत्र, औषधी इत्यादिकांनीं राजा तुझी स्वस्ति असो असें बोलले. त्या आशीर्वादवाणी धर्मराजानें श्रवणकरून वस्त्रें, गाई व पुष्प फलें त्यांस देऊन देवांसहवर्तमान इंद्र जसा गमन करितो तसा तो युद्धार्थ निघाला. सुवर्णानें चित्रविचित्र, श्वेत अश्वानीं व उत्तम चक्रानीं युक्त केशवानीं संरक्षित अशा रथांत अर्जुन गांडीव धनुष्य व बाण घेऊन आलेला फारच शोभला. या अर्जुना सारिखा धनुर्धर मागें कोणी झाला नाहीं व पुढें कोणीं होणार नाहीं, हे राजा भीमसेन, माद्रीपुत्र नकुल सहदेव यांसहवर्तमान् सैन्याच्या अग्रभागीं आला असतां त्यास पाहून तुझे सैनिक व्यथा पावले. हे धृतराष्ट्र राजा त्याकाळीं सकळसैन्याच्या मध्यभागीं श्रीजनार्दन अर्जुनास बोलला कीं, हे अर्जुना जो क्रोधेंकरून संतप्त झालेला सिंहा सारिखा सेनेच्या मध्यभागीं उभा राहून सेनेचें रक्षण करितो हा कुरुवंशाचा केतु भीष्मच होय. याणें तीनशें वाजीमेध पूर्वी केले आहेत, या सर्व सैनिकांस युद्धामध्यें मारून भरतश्रेष्ठ जो भीष्म याच्याशीं संग्राम करण्याची इच्छा धारण कर. अ. वि. या अ आहे.

२३. अध्याय तेविसावा - संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, कौरवांचें सैन्य युद्धार्थ उभें राहिलेलें पाहून कृष्ण बोलला कीं हे महाबाहो, संग्रामामध्यें शत्रूंच्या पराजयार्थ दुर्गादेवीचें स्तवन कर. हें ऐकून अर्जुनानें दुर्गेचा स्तव केला कीं, हे सिद्धसेनानी, हे आर्ये, हे भद्रकाली, तुला नमस्कार असो. जंबूद्वीपराजधानी चैत्य व देवनालयें इत्यादिकांचे ठायीं तूं वास करणारी आहेस यास्तव तुला नमस्कार असो. दुर्गाचे ठायीं तुझ्या भक्तांस शत्रूपासून भय झालें असतां तें भय तूं निवारण करित्येस. तुलाच जंभनी, मोहिनी, माया, ह्री, श्री, संध्या, प्रभावती, सावित्री, जननी, तुष्टी, पुष्टी, धृती, चंद्रादित्यविवर्धिनी असें म्हणतात, आत्मानात्मविवेकरूप समाधीचे ठायीं जीवन्मुक्त सत्यगात्मत्वेंकरून तुला अवलोकन करितात किंवा संगतीमानानें ऐश्वर्य तूंच आहेस म्हणून तुला भूति असें म्हणतात. संजय भाषण करितो हे राजा, असा अर्जुनानें दुर्गेचा स्तव केला असतां, मानवांवर वात्सल्य करणारी दुर्गा पार्थाचें वात्सल्य जाणून गोविंदाच्या अग्रभा-

गीं अंतरिक्षहोऊन असें बोलली कीं हे अर्जुना, स्वल्पकालामध्यें तूं शत्रूं चा पराजय करशील, साक्षात् इंद्रही तुझा पराजय करण्यास अशक्य आहे, मग हे अरी रणामध्यें तुझा पराजय करण्यास कसे समर्थ होतील, असें देवी अर्जुनास भाषण करून अंतर्धान पावल्यावर देवीच्या प्रसादेंकरून आपला विजय झाला असें जाणून अर्जुन रथावर बसला. नंतर कृष्णार्जुनानें आपल्या दिव्य शंखाचे नाद केले. हे राजा हें दुर्गेचें स्तोत्र जो मानव प्रातःकाळीं उठून पठन करील त्यास यक्ष, राक्षस व पिशाच्च यांजपासून तसेच रिपू, सर्प किंवा राजकुलापासून ही भय प्राप्त व्हावयाचें नाहीं, विवादामध्यें हें स्तोत्र पठण करणाऱ्यास जय होईल, लक्ष्मीची प्राप्ति होईल, आरोग्य व बलसंपन्न होऊन शंभर वर्षेंपर्यंत वांचेल, हा दुर्गेचा व अर्जुनाचा संवाद झालेला व्यास प्रसादेंकरून प्रत्यक्ष मी श्रवण केला. हे धृतराष्ट्र राजा, अर्जुन आणि कृष्ण हे नरनारायणाचे अवतार आहेत हें दुरात्मे तुझे पुत्र मोहेंकरून जाणत नाहींत, द्वैपायनव्यास, नारद, कण्वऋषी व परशुराम हे तुझ्या पुत्रास बोध करीत असतां त्याणें त्यांचें भाषण श्रवण केलें नाहीं, अरे जेथें धर्म तेथेंच द्युति, कांति, ही, श्री, व मति वास करितात, जिकडे धर्म तिकडेच कृष्ण आणि जिकडे कृष्ण तिकडेच जय असा निश्चय आहे. अ. वि. या अ. आहे.

२४. अध्याय चोविसावा — धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, उभयतांच्या सैन्यामध्यें प्रथम कोणाचे योद्धे हर्षित होऊन युद्ध करूं लागले, कोणाच्या योद्ध्यांच्या मनास दैन्य होतें हें सर्व मला सांग? परस्पर योद्धे गर्जना करीत असतां शुभकारक वाणी कोणाच्या सैन्यामध्यें होऊं लागल्या? असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे राजा. उभयतांचें सैन्य व्यूहरचना करून उभें राहिलें असतां उभयतांच्या संसर्गानें एकमेकांचीं मुखें विवर्ण होऊन गेलीं. उभयतांच्या सैन्यांतील प्रहरणशील योद्ध्यांचा नाद व गजांचा नाद एकत्र होऊन सर्वांस परम आश्चर्य झालें. अ. वि. या अ. आहे.

२५. अध्याय पंचवीसावा — भारतांत सर्व वेदांचा अर्थ, भारताचा

सर्व अर्थ गीतेच्याठायीं सांगितला आहे यावरून सर्व शास्त्रमयी गीता आहे. त्यांत सहा अध्याय कर्मकांड, सहा अध्याय उपासना कांड, सहा अध्याय ज्ञान कांड याप्रमाणें गीताशास्त्राच्या अठरा अध्यायांचे सातशें श्लोक आहेत. भगवान् श्रीकृष्णानीं देवकीचेठायीं जगाचे पालनार्थ अवतार घेतला आणि जगाचा उद्धार आत्मज्ञानानें व्हावा याकारितां शोक समुद्रांत निमग्न झालेल्या अर्जुनास निमित्त करून गीताशास्त्राचा उपदेश केला आहे तो प्रसंग असा कीं, कोणे एके कालीं युद्ध करण्याविषयीं मिळालेल्या शूरांचा वृत्तांत ऐकावा म्हणून धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया. माझे पुत्र दुर्योधनादिक आणि पांडुराजाचे पुत्र धर्मराजादिक याणीं युद्ध करण्याच्या इच्छेनें कुरुक्षेत्रीं काय केलें हें सांगावें. असें ऐकून संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, व्यूह रचना करून उभें राहिलेलें पांडवांचें सैन्य पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांस बोलला हे आचार्य, तुमचा शिष्य धृष्टद्युम्न याणें पांडवांच्या सेनेची व्यूह रचना केली ही पहावी. त्या सेनेंत भीमार्जुन. सात्यकि, विराट. द्रुपद. धृष्टकेतु, चेकितान, काशिराजा, पुरुजित्, कुंतिभोज, शैब्य, युधामन्यु, उत्तमौजा, अभिमन्यु, प्रतिविंध्यादिक द्रौपदीचे पांच पुत्र आणि पांडवांपासून अन्य स्त्रियांचेठायीं झालेले घटोत्कचादिक आहेत. आतां आमचे सैन्यांत तुह्मी. भीष्म. कर्ण. कृपाचार्य. अश्वत्थामा, विकर्ण, भूरिश्रवा. जयद्रथ. शल्य. कृतवर्मादिक नानाप्रकारचीं खड्गादिक शस्त्रें घेऊन माझ्या कारितां युद्धांत प्राणत्याग करणारे आहेत. आता पांडवांचें सैन्य सात अक्षोहिणी आहे. आमचें सैन्य अकरा अक्षोहिणी असल्यामुळें तें पांडवांचे सैन्यास वेढा घालण्याविषयीं समर्थ आहे यास्तव तुह्मी सर्वांनीं व्यूहप्रवेश मार्गांत राहून भीष्माचें रक्षण करावें. इतक्यांत भीष्मानीं सिंहनाद करून शंख वाजविला हें ऐकून सर्व वीरांनीं एकदांच शंख. नगारे. वाजविले. तसेंच श्वेतहयानीं युक्त अशा रथांत बसणाऱ्या श्रीकृष्णार्जुनानीं शंख वाजविले त्यांत कृष्णानीं पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त. भीमानें पौंड्र, धर्मराजानें अनंतविजय. नकुलानें सुघोष. सहदेवानें मणिपुष्पक या नांवांचे शंख वाजविले. नंतर सात्यकी, अभिमन्यु, विराटादिक वीरानीं आपा-

पले पृथक् पृथक् शंख एकदांच वाजविले त्यांत कृष्णानीं आपले शंखाचा शब्द मोठ्यानीं केला त्यानें आकाश व पृथ्वी व्याप्त झाली. जसा सूर्योदय झाल्यावर नक्षत्रांचा लोप होतो तसा पांचजन्याच्या शब्दानें कौरवांच्या शंखशब्दांचा लोप होऊन दुर्योधनादिकांचीं त्हृदयें विदारण झालीं यावरून पांडवांस जय होईल असें श्रीकृष्णानीं सूचविलें, नंतर अर्जुन, दुर्योधनादिक युद्धास प्रवृत्त झालेले पाहून श्रीकृष्णास ह्मणतो हे कृष्णा, तुह्मीं उभयसेनेच्या मध्यभागीं माझा रथ न्यावा असें ऐकून श्रीकृष्ण उभयसेनेच्या मध्यभागीं रथ उभा करून बोलतात हे अर्जुना, तूं भीष्मादिक सर्व कौरवांस पहा. नंतर अर्जुनानें भूरिश्रवा, भीष्म, शल्य, दुर्योधन, अश्वत्थामा, कृतवर्मा इत्यादि सर्वांस पाहून कृष्णास भाषण केलें कीं, हे स्वकीय जन युद्धास आले यांस पाहून माझें मुख शुष्क झालें. व हातांतून गांडीव धनुष्य पडलें, आतां स्वकीय जनांस मारून राज्यादिकांची इच्छा मी करीत नाहीं. कारण ज्यां करितां राज्य भोग सुखें संपादन करावयाचीं ते द्रोणाचार्यादिक युद्धांत प्राण टाकण्याविषयीं प्रवृत्त झाले यास्तव आपलाच नाश झालेला चांगला; परंतु पृथ्वीच्या अर्थाविषयीं त्यांस मारावें हें फार अयोग्य आहे. तुह्मीं ह्मणाल कीं, अपराधी यास मारलें असतां दोष नाहीं; परंतु दुर्योधनादिकांस आम्हीं मारावें यांत सुख नाहीं, जरी ते लोभाविष्ट होऊन कुलक्षय झाल्याचें पातक न पहातील तरी आम्हांस पहाणें आहे. कारण कुलक्षय झाल्यानें कुलपरंपरागत धर्माचा नाश होऊन अधर्मानें कुलस्त्रिया दोष करितात यामुळें वर्णसंकर होऊन नरकप्राप्ति होत्ये. नंतर पिंडोदक क्रियांचा लोप झाल्यानें पितर पतन पावतात आणि त्या दोषानें जातिधर्म व कुलधर्म यांचा नाश होऊन मनुष्यास नरकवास होतो तेव्हां राज्यसुखाच्या लोभानें आम्हीं मोठें पाप करण्याविषयीं प्रवृत्त झालों यास्तव हें पाप आह्मीं न करितां त्याणीं आम्हांस मारिलें असतां फार चांगलें होईल. संजय ह्मणतो हे राजा, असें बोलल्यावर अर्जुन गांडीव धनुष्य टाकून रथांत बसला. अ. वि. या अ. आहे.

२६. अध्याय सव्विसावा:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, तूं ह्मणशील कीं, अर्जुन युद्ध करीत नाहीं तेव्हां माझे पुत्रास राज्य मिळेल तरी अशीइच्छा

करूं नकोस, कारण स्नेहानें व्याप्त आणि अज्ञानानें खिन्न झालेला अर्जुन भगवानाच्या ज्ञानोपदेशानें तुझ्या पुत्रादि कांस मारील यास्तव तूं जया- शा करून नकोस. श्रीभगवान् ह्मणतात हे अर्जुना. युद्धसंकटीं कीर्ति व स्वर्ग र- हित असा मोह तुला कोठून झाला? आतां त्याचा त्याग करून तूं युद्धकर - ण्यास ऊठ. असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे भगवन्, भीष्म व द्रोण हे मला पू- ज्य आहेत त्यांस बाणीनें युद्ध करितों असें बोलण्यास मला योग्यता नाहीं, म- ग बाणांनीं युद्ध कसें करावें यास्तव गुरूंस नमारितां लोकांत भिक्षा मागून आ- म्हीं निर्वाह करावा हें चांगलें आहे, युद्धांत आम्ही त्यांस जिंकूं किंवा ते आह्मां- स जिंकतील हें ही कळत नाहीं यास्तव याचा निश्चय सांगावा मी आपला शि- ष्य आहें. संजय म्हणतो हे धृतराष्ट्र राजा. अर्जुनानें मी भिक्षा मागून निर्वा- ह करीन असें पूर्वीं भाषण केलें यावरून त्यास साधनचतुष्टयाचा अधिका- र आला. अर्जुन मी युद्ध करीत नाहीं असें बोलून उगाच राहिला तेव्हां भ- गवान् हसून ह्मणतात हे अर्जुना. शोक करण्यास अयोग्य जे भीष्म व द्रो- णादिक यांजकरितां तूं शोक करून बुद्धिमान् पुरुषां सारिखीं भाषणें बो- लतोस; परंतु तूं बुद्धिमान् नव्हेस कारण मृत व जिवंत अशा मनुष्यांचा पंडित शोक करित नाहींत यास्तव देहनाश झाल्यानें आत्मनाश होतो असें मानणारा तूं मूर्ख आहेस हे अर्जुना, तूं मी व हे सर्व राजे अनादि आणि अ- नंत आहेत, कारण कालत्रयीं आत्मस्वरूप निरंतर आहेच आतां देहधारी पु- रुषास स्थूल व सूक्ष्म असे दोन देह आहेत त्यांत स्थूल देहास जशा बाल्य, ता- रुण्य, वृद्ध, या तीन अवस्था क्रमेंकरून होतात तशी सूक्ष्म देहास दुसऱ्या देहाची प्राप्ति होते ह्मणून त्या विषयीं पंडित मोह पावत नाहींत यावरून योगी पुरुषानीं सर्व शरीरीं एक आत्मतत्व आहे असें जाणावें. आतां इं- द्रिय वृत्तीला शब्दादि विषयांचे जे संयोग होतात ते पुरुषांस सुख, दुःख, शीत, उष्णादि देणारे असून त्यांचा उत्पत्ति व नाश आहे यास्तव तूं त्यांचे सहन कर. ज्या पुरुषास विषय संयोग व्यथा करीत नाहीं तो पुरुष मोक्ष- भावास योग्य होतो. हे अर्जुना, देहादिकांचा नाश होतो व सहस्र ब्रह्मांचा नाश होत नाहीं, आत्मा ज्या ब्रह्मानें हें सर्व आकाशादिक व्यापिलें आहे त्या-

चा नाश करण्यास कोणी योग्य नाहीं, देहधारी पुरुषाचे देह अनित्य आहेत; परंतु तो नित्य आहे तस्मात् तूं युद्ध कर. जो पुरुष मला मारणारा ह्मणून जाणतो व जो देह हनन झाल्यानें आत्मा मेला म्हणून मानितो हे दोघे मूर्ख जाणावेत आत्मा जन्म मृत्यु रहित आहे शरीर नाश झाल्यानें आत्म्याचा नाश होत नाहीं म्हणून नाशरहित आत्म्यास तूं जाण. जसा पुरुष जीर्ण वस्त्रांचा त्याग करून नवीं वस्त्रें धारण करितो तसा हा प्राणी जीर्ण शरीरें टाकून नवीं शरीरें धारण करितो अशा आत्म्याचा शस्त्रें नाश करीत नाहींत तसेच अग्नि, उदक, वायु हे ही नाश करीत नाहींत म्हणून सर्वगत आत्मा नित्य आहे यास्तव तूं यास जाण ह्मणजे तुला शोक होणार नाहीं अथवा हा नित्य होणारा व नित्य नाश पावणारा असें जरी मानिलेंस तरी तूं शोक करण्यास योग्य नाहींस आतां जन्म घेणाऱ्या पुरुषास मृत्यु व मृत झालेल्यास जन्म निश्चयानें आहे. तशींच आकाशादिक भूतें व जरायुजादिक हीं अदृष्ट-दृष्ट, नष्ट-निरंतर होणारीं आहेत यास्तव यांविषयीं प्रलाप तूं करूं नकोस कोणी आत्मतत्व जाणणारा पुरुष ह्या प्रपंचास आश्चर्या सारखें पहातो व बोलतो तसाच श्रवण करितो परंतु खरेपणा जाणत नाहीं तस्मात् तूं प्राणिमात्रांचा शोक करूं नको. क्षत्रिय जे आहेत ते प्रार्थना न करितां सुखानें युद्ध करून स्वर्गी जातात तसा तूं युद्ध न करशील तर तुझ्या कीर्तीचा नाश होऊन पाप तुला घडेल. संभावितास अकीर्ति मरणापेक्षा अधिक आहे, सांप्रतकालीं तुझे शत्रु दुर्योधनादिक बोलतील कीं, आमच्या कर्णाला पाहून अर्जुन भयानें पळाला तेव्हां अशी अनेकप्रकारची तुझी निंदा झाल्यावर याहून दुःख कोणतें यास्तव तूं रणांत मरण पावला असतां स्वर्गास जाशील अथवा शत्रूंस मारिलें असतां पृथ्वीचें राज्य भोगशील तस्मात् तूं निश्चयेंकरून युद्धकरण्याविषयीं ऊठ. युद्ध केल्यानें तुला पाप लागणार नाहीं याविषयीं सांख्यशास्त्रांत जी बुद्धि सांगितली आहे ती ऐक ह्मणजे तुला ज्ञानाची प्राप्ति होईल ह्या मोक्षमार्गास लागणाऱ्या पुरुषाचा नाश कोणतेही कारणानें होत नाहीं तस्मात् निश्चयात्मिक एक बुद्धि आहे तीचा स्वीकार करावा. आतां वेदांतील अर्थवाक्यासक्त पुरुष अविचारी आहेत कारण कर्मांच्याच मुख्यत्वानें ते स्वर्ग, पशु, फल,

ऐश्वर्यादिक यांची इच्छा करितात त्यामुळें चित्त भ्रष्ट होऊन त्यांस समाधि प्राप्त होत नाहीं यास्तव अर्थवादाकडे लक्ष न देतां तूं आत्मज्ञानी हो, जसें मोठ्या उदकावर गेलें ह्मणजे स्नानादिक सर्व निर्वाह होतो तसें पुरुष तत्वज्ञानी झाला ह्मणजे सर्व वेदोक्तकर्माचें फल त्यास प्राप्त होतें. अथवा जसें कूपाबरही पुरुषास जितकें प्रयोजन तितकेंच उदक मिळतें तसें ब्रह्म जाणणाऱ्या पुरुषास सर्व वेदतात्पर्य उपनिषद्वाग्श्रवणानुष्ठान केल्यानें सर्व वेदार्थ अनुष्ठान केल्याचें फळ मिळतें. आतां तूं कर्म कर परंतु फलाची इच्छा करूंनकोस ह्मणजे या अधिकारानें योग तुला प्राप्त होईल मग बुद्धियोग झाल्यानें पुण्य व पाप यांचा त्याग करशील फलत्याग केल्यानें जसे विवेकी पुरुष मोक्षास पावतात तसा ज्या कालीं तुझी बुद्धि निश्चल होईल त्या कालीं तूं हीस माधि सुखास पावशील. असें ऐकून अर्जुन म्हणतो हे कृष्णा. मी परब्रह्म आहे असें ह्मणून ज्याची प्रज्ञा स्थिर झाली तो समाधिस्थ असतां दुसऱ्याशीं कसा बोलतो व समाधिरहित असतां कसा बोलतो, कसा रहातो, कसा गमन करितो. अशा चार प्रश्नांचें उत्तर सांगा? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, जो सर्व इच्छा टाकून आत्मप्रीतीनें संतोष पावतो त्यास स्थितप्रज्ञ ह्मणावें. जो दुःखें झालीं असतां खेद पावत नाहीं व सुखें झालीं असतां हर्ष पावत नाहीं आणि ज्यास राग-भय-क्रोध हे नाहींत त्यास स्थितबुद्धि असें ह्मणावें. जो सर्व धन, दारा, देहादिक यांशीं स्नेह न करणारा व शुभ अथवा अशुभ प्राप्त झालें असतां हर्ष व द्वेष न करणारा त्याची प्रज्ञा स्थित झाली असें समजावें. जसा कूर्म आपलीं अंगें उपसंहार करितो तसा जो योगी विषयापासून इंद्रियें आपले स्वाधीन ठेवितो त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित होते. जशी ब्रह्मसाक्षात्कार झालेल्या पुरुषाची प्रीति विषयापासून दूर होते तसें ब्रह्मप्राप्त्यर्थ पुरुषाचें मन स्थिर नसल्यामुळें त्याची प्रीति विषयापासून दूर होत नाहीं आतां विषयांचें ध्यान करणाऱ्या पुरुषाची विषयावर प्रीति होते तिजपासून काम, त्यापासून क्रोध, क्रोधापासून मोह, त्यापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश, त्यापासून पुरुषाचा नाश होतो यास्तव ज्या पुरुषानें इंद्रियें वश केलीं त्यास प्रसाद होऊन सर्व दुःखांची हानि होते. अप्रसन्न चित्त पुरुषा-

स सुख कोठून होईल. मन इंद्रियांच्या अनुलक्षानें चाललें ह्मणजे पुरुषाची प्रज्ञा हरण होते तीच प्रज्ञा इंद्रियांचा निग्रह केल्यानें प्रतिष्ठित होते आतां सर्व अज्ञान्यांची जी रात्र ती योग्यांचा दिवस आणि त्यांचा दिवस तो योग्यांची रात्र जाणावी, योगी समुद्रा सारिखा होऊन ब्रम्हसुखास पावतो आणि निस्पृह पुरुष त्या ब्रह्मनिष्ठेस पावून शेवटीं मोक्षास पावतो. अ॰ या अ आ॰

२७. अध्याय सत्ताविसावा- अर्जुन प्रश्न करितो हे कृष्णा, कर्माहून ज्ञान जर श्रेष्ठ आहे तर घोरकर्मावर माझी योजना कां करितोस? कोठें कर्म प्रशंसा, कोठें ज्ञान प्रशंसा सांगतोस अशा द्वैधभावानें माझे बुद्धीस मोह झाला या साठीं ज्या योगानें माझें कल्याण होईल असा एक निश्चय सांगावा. असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, पूर्वाध्यायीं मी तुला निष्ठा एकच सांगितली; परंतु या लोकांत अधिकारिभेदें करून दोन प्रकार सांगितले त्यांत आत्मानात्म विचार पहाणारे, सांख्यपुरुष, वेदांतश्रवण, मनन, निदिध्यासन, अशा ज्ञानोपायें करून ते ब्रह्मनिष्ठेस पावतात व योगी संध्योपासनादि निर्विकल्पक समाधीच्या अनुष्ठानानें ब्रह्मनिष्ठेस पावतात असे दोन प्रकार आहेत; परंतु निष्ठा एकच आहे केवल कर्म टाकिल्यानें पुरुष सिद्धीस पावतो असें नाहीं. सर्व लोक आपापले स्वभावानें कर्में करितात. आतां कर्मेंद्रियांचें नियमन करून मनांत विषयांचें ध्यान करणारा पुरुष कपटी जाणावा. व ज्यानें मन निर्विषय करून कर्मेंद्रियानीं कर्मयोग चालविला आहे तो योगी श्रेष्ठ जाणावा. तूं फलांचा संग टाकून संध्योपासनादि नित्य कर्में कर यज्ञरूपी विष्णु आहे ह्मणून ब्रह्मदेवानीं पूर्वीं त्रैवर्णिक प्रजा उत्पन्न केल्या आणि त्यांस सांगितलें कीं, तुह्मीं यज्ञ करून देवांचा संतोष करावा ह्मणजे ते देव तुम्हांस पर्जन्य वृष्टीनें संतोष करितील. जे पुरुष देवानीं दिलेल्या अन्नाचा पंचमहायज्ञ करून अवशिष्ट अन्न भक्षण करितात तें अमृतासमान जाणावें. आतां पंचमहायज्ञ न करणाऱ्या पुरुषांस चोर ह्मणावें आणि त्यांस स्वर्गप्राप्ती ही नाहीं कारण कंडन, पिष्ट, चूल, उदक, संडासंमार्जन हीं करणाऱ्या पुरुषास जें पातक होतें तें वैश्वदेव केल्या वांचून नाश पावत नाहीं यास्तव वैश्वदेवादिक कर्में करावीं ह्मणजे त्या त्या

पापांपासून मुक्त होऊन तो स्वर्गास जातो. तीं कर्में वेदांपासून झालीं ते वेद ब्रह्मापासून आहेत तें नित्य ब्रह्म सर्व व्यापक असल्यामुळें यज्ञांत प्रतिष्ठित आहे या प्रमाणें चाललेल्या जगच्चक्रास जो अनुवर्तन करीत नाहीं तो पापी जाणावा. आतां ज्याची प्रीति आत्म्याचे ठायीं आहे त्याला कर्तव्य कोणतेंही राहिलें नाहीं तेव्हां कर्माचें प्रयोजन त्यास नाहीं यास्तव तूं फलाची इच्छा टाकून कर्म कर कारण फलत्याग करणारे जनकादि क्षत्रियक र्मानेंच सिद्धि पावले. ज्ञानसंपन्न झालेल्या पुरुषास लोकसंग्रहार्थ कर्म केल्यानें बद्धता होत नाहीं यास्तव तूंही कर्म कर. जसा श्रेष्ठ आचरण करितो तेंच प्रमाण धरून इतर लोक आचरण करितो यास्तव हे अर्जुना, मला ह्या तीन लोकीं कर्तव्य कांहीं नसून मी कर्म करितों कारण मी जर कर्म न करीन तर सर्व मनुष्यें माझ्या मार्गास लागतील आणि त्यानें सर्व लोकांचा नाश होईल तेव्हां कर्म न केल्यानें वर्णसंकर कर्ता मी होईन आणि त्या पासून प्रजा नाश पावतील यास्तव मी कर्में करितों. मूर्ख पुरुष फलेच्छेनें जसे कर्में करितात तसे ज्ञानी पुरुषानीं आसक्त न होतां लोकसंग्रहार्थ कर्में करावीं. आतां कर्मसंगी पुरुषांच्या बुद्धीस भेद उत्पन्न न करितां आपण त्यांचे सारिखेंच वागावें. परमेश्वराच्या प्रकृतीचे जे सत्व, रज, तम, गुण त्यानीं केलेल्या सर्व कर्मांचा मी कर्ता असें अहंकारानें मोहितचित्त झालेला पुरुष मानितो. तत्ववेत्ता ह्मणतो कीं, सत्वादि गुण कर्में करितात मी कर्ता नव्हे ह्मणून तो कर्मांत आसक्त होत नाहीं आणि मंदपुरुषाच्या बुद्धीस भेद ही करीत नाहीं यास्तव तूं सर्व कर्में मला अर्पण करून युद्ध कर. अशा माझ्या मतास जीं मनुष्यें अनुसरून वागतात तीं कर्मांपासून मुक्त होतात जे माझ्या मताचा स्वीकार करीत नाहींत ते मूर्ख जाणावे. ज्ञानवान् पुरुषही प्रकृतीला सोडून निग्रह करीत नाहीं यास्तव राग व द्वेष हे तूं टाकून स्वधर्म करावा कारण परधर्म केल्यानें पुरुषास नरक होतो. अर्जुन प्रश्न करितो हे कृष्णा, जसा बलात्कारानें पुरुषास बिगारीला योजितात तसा इच्छा करीत नसतां त्या प्राण्यास पाप कर्म करण्यास कोण योजितो तो सांगा? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, रजोगुणापासून होणारा जो काम तो पुरुषाचा वैरी आहे, जसा धूमानें अग्नि, मलानें आरसा, ग-

र्भवेष्टन चर्मानें गर्भ हें वेष्टिले असतात तसा या कामानें सर्वांस वेष्टिलें आहे म्हणून हा काम ज्ञानी पुरुषाचा नित्य वैरी आहे यास्तव ज्ञानास आच्छादन करून देहाभिमानी पुरुषास मोह उत्पन्न करितो, तस्मात् तूं प्रथम इंद्रियांचें नियमन करून त्या कामाचा नाश कर म्हणजे तुला ज्ञान होईल. आतां इंद्रियें श्रेष्ठ, त्याहून मन, त्याहून बुद्धि, बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आहे त्यास जाणून तूं त्या कामरूपी शत्रूचा नाशकर. अ. वि. या अ. आहे.

२८. अध्याय अठ्ठाविसावा- श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, या दोन अध्यायांत सांगितलेला जो योग तो मी सूर्यास सांगितला. त्यानें आपला पुत्र जो मनु त्यास सांगितला त्यानें आपला पुत्र इक्ष्वाकु यास अशा रीतीनें परंपरागत योग राजर्षि याणीं ही जाणला असतां कांहीं कालानें तो योग नष्ट झाला तो योग तूं माझा परम सखा म्हणून आज मी तुला सांगितला. असें ऐकून अर्जुन म्हणतो हे कृष्णा, तुमचें जन्म देवकीचेठायीं झालेलें नूतन असून सूर्याचें जन्म बहुकालिक असतां मी सूर्यास सांगितलें म्हणतां हें खरें कशावरून? असें ऐकतांच श्रीभगवान् म्हणतात हे अर्जुना, तुझीं व माझीं जन्में बहुत गेलीं तीं सर्व मी जाणतों. तूं जाणत नाहींस, मी जन्मरहित ईश्वर असतां मायेंकरून अवतार धारण करितों. ज्या ज्याकाळीं धर्महानि होते त्या त्या काळीं साधूंच्या रक्षणार्थ व पापी पुरुषांस मारून धर्मस्थापना करण्याविषयीं युगायुगीं अवतार घेतों. अशा प्रकारानें तत्वतः मला जो जाणतो तो माझ्या जवळ येतो पुनर्जन्म त्यास होत नाहीं अशा प्रकारचे पुरुष राग, भय, क्रोध टाकून मत्स्वरूपास पावले आहेत, आतां कर्मफलांची इच्छा करणाऱ्या पुरुषानीं इंद्रादिक देवतांची पूजा केली असतां त्यांस तत्काल सिद्धि होते. चार वर्ण मी उत्पन्न केले; परंतु कर्मांचा लेप मला नाहीं असें जनकादिकानीं जाणून कर्म केलें तसें तूं कर. कर्म तीन प्रकारचें आहे विहित कर्म, विकर्म, अकर्म. त्यांचें जाणणें फार दुर्बोध आहे आतां कर्माचेठायीं अकर्माचा अभाव आणि अकर्माचेठायीं कर्म जो पुरुष पहातो तो बुद्धिमान् जाणावा. जसा नावेंत बसलेला पुरुष नाव चालली असतां तीरीं वृक्ष चालत आहेत असें पहातो; परंतु नावेंतच असतां प्रमाण बुद्धीनें पाहू लागतांच

नों ते ह्रस्व कांहीं गमन करीत नाहींत त्या प्रमाणें देहेंद्रियादिक कर्मकरणारीं आहेत आत्मा कर्म न करणारा आहे अशा रीतीनें पहाणारा पुरुष मनुष्यांत ज्ञानी होतो आणि ज्ञानाग्नीनें सर्व कर्में दग्ध करणाऱ्या पुरुषास पंडित असें सत्पुरुष ह्मणतात यासाठीं कर्मांच्या फलाचा संग टाकून स्वेच्छा लाभानें संतोष पावणारा पुरुष शरीर निर्वाहाविषयीं कर्म केल्यानें पापाचा अधिकारी होत नाहीं कारण संग टाकून मुक्त झालेल्या पुरुषाचें सर्व कर्म ब्रह्मार्पण होतें त्यानें तो ब्रह्मस्वरूपास पावतो. आतां कोणी द्रव्य यज्ञ करितात तसे अन्य योगी ब्रह्माग्नीचेठायीं जीवाचें हवन करितात अशा प्रकारचे बहुत यज्ञ मोक्षप्राप्तीविषयीं करितात; परंतु ते कर्मापासून होणारे आहेत असें तूं जाणावेंस. आतां सर्वांहून श्रेष्ठ ज्ञानयज्ञ आहे तो पुरुषानीं आचरण केल्यास त्यांच्या सर्व कर्मांची समाप्ति त्या ज्ञानयज्ञाचेठायीं होते त्याच्या प्राप्तीचा उपाय क्रमानें सांगतों. प्रथम ब्रह्मवेत्त्यास दंडासारखा नमस्कार घालावा मग त्याची सेवा करावी नंतर प्रश्न करावा. मग ते ब्रह्मवेत्ते या शिष्याची निष्ठा पाहून आत्मसाक्षात्काररूपज्ञान त्यास उपदेशानें संपादन करितात मग ते शिष्य कृतार्थ होतात त्या प्रमाणें तूं ज्ञान जाणिलें असतां पुनः मोह तुला होणार नाहीं त्या ज्ञानयोगानें सर्व पापापासून तूं मुक्त होशील. जसा प्रदीप्त झालेला अग्नि काष्टें भस्म करितो तसा ज्ञानाग्नि सर्व कर्में भस्म करितो म्हणून ज्ञानासारखी पावन करण्याची शक्ति अन्यास नाहीं; तें ज्ञान बहुकालानें पुरुष योगसिद्ध झाला ह्मणजे आत्म्याचेठायीं जाणतो. भक्तिवान् पुरुषाला ज्ञान मिळतें त्यानें त्याचा संशय दूर होऊन त्यास कर्माचा बंध होत नाहीं नास्तीक पुरुषाला भक्ति नाहीं आणि संशय फार असल्यामुळें नाश पावतो तस्मात् ज्ञानखड्गानें हृदयांतील संशय दूर करून तूं निष्काम कर्म कर आणि युद्ध करण्याविषयीं ऊठ. असें भगवंतानीं अर्जुनास सांगितलें. अ. वि. या अ. आहे.

२९. अध्याय एकुणतिसावा.- अर्जुन प्रश्न करितो हे कृष्णा, ज्ञानाचीइच्छा करणारा मी मला सन्यास आणि कर्मयोग हे दोन परस्पर विरुद्ध असता कसे सांगतोस तस्मात् दोहोंपैकीं एक निश्चयानें मला सांग? अ-

सें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, सन्यास आणि कर्मयोग हे ज्ञानोत्पत्ति करणारे असून कल्याणकारक आहेत; परंतु त्यांत कर्मयोग अधिक आहे. राग आणि द्वेष टाकणारा पुरुष नित्य संन्याशी जाणावा तोच आयास न करितां बंधांतून मुक्त होतो, तेव्हां सांख्य आणि योग हे पृथक् असें बोलणारे पुरुष मूर्ख आहेत ज्ञानी या दोहोंस पृथक् असें बोलत नाहींत कारण दोघांचें फल एक आहे ह्मणून सांख्य आणि योग यांस एक पहाणारा पुरुष ज्ञानी जाणावा असा जो पुरुष नैष्कर्म्य योगानें युक्त होतो तो शीघ्र ब्रह्मास पावतो, तेव्हां कर्मयोगानुष्ठाना वांचून पुरुषास संन्यास दुःख देणारा आहे यास्तव आत्मा देहेंद्रियादिकांहून निराळा असून त्यांचा साक्षी आहे तेव्हां देहेंद्रियादिकानीं केलेलें कर्म आत्म्यास नाहीं असें जाणणारा पुरुष कर्म लिप्त होत नाहीं आणि तोच योगयुक्त ज्ञानी रूपादिक पहात शब्द ऐकत सुगंधाचा वास येत तसेंच भोजन, गमन, निद्रा, श्वासोच्छ्वास, भाषण, मलमूत्रादिकांचा उत्सर्ग, अशारीतीनें इंद्रियांचे व्यापार करीत असतां मी कांहीं करीत नाहीं असें मानितो व निष्कामबुद्धीनें परमेश्वराचेठायीं सर्व कर्म जो अर्पण करितो तो पुरुष जसें कमलाचे पत्र उदकानें लेप पावत नाहीं तसें तो पापानें लिप्त होत नाहीं ह्मणून अहंकार रहित मनादिक इंद्रियें करून योगी कर्म करितात त्यानें चित्तशुद्धि होऊन सुख होतें, जो केवळ कामाच्या प्रेरणेनें फलाविषयीं आसक्त होऊन कर्म करितो तो बंध पावतो. आतां ज्याणें चित्ताचा जय केला तो योगी सर्व कर्म ईश्वरार्पण करून नऊ द्वारानीं कर्मे करीत असतां अकर्ता होतो. ज्या पुरुषाचा जसा स्वभाव त्या प्रमाणें तो प्रवृत्त होतो. आत्म्यावर कर्तृत्वाची प्रवृत्ती कांहीं नाहीं, परमेश्वर कोणाचें पाप व पुण्य ग्रहण करीत नाहीं, आपले स्वस्वरूपाचें ज्ञान आपले जवळ असून तें ईश्वर मायेनें आच्छादन केलें त्यामुळें प्राणी मोह पावतात. आतां ज्यांचें अज्ञान नाश पावलें त्यांचें ज्ञान जसा सूर्य सर्व जगास तमाचा नाश करून प्रकाशित करतो त्या प्रमाणें आत्मतत्वें करून प्रकाश करतें मग ते पुरुष आत्मतत्वज्ञानानें मोक्षास पावतात आणि ब्राह्मण, गाय, हस्ति, श्वान, चांडाल यांचेठायीं समदृष्टीनें जे पहातात त्यांस पंडित ह्मणावें. अशारीतीनें

सर्वत्र ब्रह्म पहाणारे ब्रह्माचेठायीं स्थित आहेत असें योग्यानीं जाणावें. असा स्थिर बुद्धि जो झाला तो ब्रह्मीभूत होऊन अक्षय सुखास पावतो. विषय आणि इंद्रियें यांचे संबंधापासून होणारे भोग दुःखास कारण आहेत, ह्मणून ज्ञानी त्याविषयीं आसक्त होत नाहींत आतां याच देहांत असतां ज्याणें काम व क्रोध यांचा वेग सहन केला तो उत्तम सुखी होतो आणि आत्मस्वरूपाचेठायीं प्रीति करतो. तसाच अंतर्यामी सुखी होऊन जिवंत असतां ब्रह्मसुखास पावतो: यःप्रमाणें योगाभ्यासानें मन स्वाधीन करून ऋषी मोक्षसुखास पावतात यास्तव ज्याणीं आत्मतत्व जाणिलें ते जिवंत असोत अथवा मृत असोत त्यांस ब्रह्मसुखानुभव सर्व काळीं होतो यासाठीं योगाभ्यासानें ज्ञानें इंद्रियादिकांचें नियमन करून इच्छा, भय, क्रोध टाकिले तो सर्वदां मुक्त जाणावा. आतां प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां उपकार करणारा असा जो मी हरि निर्गुणस्वरूपीं आहे असें ज्यानीं जाणिलें ते ब्रह्मसुखास पावतात. अ. वि. या. अ. आहे.

३०. अध्याय तिसावा— श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना. कर्मफलाची इच्छा करीत नसतां जो नित्य व नैमित्तिक कर्में करितो तो सन्यासी आणि योगी होतो. ज्यास कर्मफलत्यागानें संन्यासी ह्मणतात त्यासच योगी असें तूं जाण कारण संकल्प त्याग केल्या शिवाय कोणताही योगी होत नाहीं तेव्हां यम नियमादि अष्टांगयुक्त जो योग त्यावर आरोहण करणाऱ्यास कारण कर्म आहे तसेच योगारूढ झालेल्या पुरुषास शम हें कारण आहे जेव्हां श्रोत्रादि इंद्रियांच्या विषयाचाठायीं योगी आसक्त होत नाहीं तेव्हां त्यास योगारूढ असें ह्मणावें. आतां आपणच आपला उद्धार करावा आपला बंधु हित करणारा आपणच तसा संसार संकटांत घालणारा शत्रु आपणच यासाठीं ज्याणें मनानें देहेंद्रियादिकांस जिंकिलें त्याचें मन उपकार करणारें होतें व ज्याणें मनादिकांचा दम केला नाहीं त्यास तीं शत्रु सारिखीं होतात ज्याणें मनादिकांचा जय केला आहे आणि सुख, दुःख, शीत, उष्ण, मान, अपमान हे झाले असतां ज्याचें मन शांत असतें तो योगी शास्त्र व गुरूच्या उपदेशें करून तृप्त झालेला आणि इंद्रियांचा जय करू-

न मृत्तिकेचा गोळा, पाषाण, सुवर्ण, यांस समान पहाणारा त्यास योगसिद्ध झाला असें विद्वान् पुरुष ह्मणतात. हे अर्जुना, प्रत्युपकाराची अपेक्षा न धरितां हितकर्ता, मित्र, शत्रु, इत्यादिकांचे ठायीं तसेच साधू व पापी यांचे ठायींही ज्याची बुद्धि समान आहे तो श्रेष्ठ होतो तोच योगी, एकांतस्थलीं कोणी ज्यास सहाय नाहीं असा बुद्धियोग करितो त्यानें अनुष्ठाना करितां पुण्यदेशांत फार उंच नव्हे फार सखल नव्हे आणि अगोदर दर्भ त्यावर कृष्णाजिन त्यावर कंबलादि वस्त्र अशा आसनावर बसून मनाची एकाग्रता करावी आणि आपले नासिकेचे अग्रावर निरंतर दृष्टि ठेवून दिशांकडे न पहातां माझे ठायीं चित्त ठेवावें ह्मणजे त्याचें मन शांत होऊन तो ब्रह्मसुखास पावतो आणि भोजनादिक करणाऱ्यास योग होत नाहीं यास्तव त्याणें आहार, फिरणें, बोलणें, पहाणें, ऐकणें, निद्राकरणें, जागरण हीं परिमित करावीं म्हणजे त्यास दुःख नाश करणारा योग सिद्ध होतो मग चित्तशांत झाल्यानें जसा दीप वातवर्जित स्थानीं निश्चल रहातो तसा योग्यास निर्विकल्प समाधि प्राप्त होतो आणि आत्मसाक्षात्कार होऊन तो ब्रह्मानंद सुखास जाणतो. तसाच द्वैत मिथ्या आहे असें खरेपणानें जाणून तार्किकादिकांचीं जीं नाना प्रकारचीं मतें आहेत त्यांचें खंडन करून तो ब्रह्मसुखाचे ठायींच निश्चय बुद्धीनें रहातो मग ब्रह्मसुखाचा लाभ झाल्यावर याहून अधिक कोणतेंही सुख नाहीं असें मानतो. अशा निश्चयानें मनांतील सर्व काम टाकून योगाभ्यासानें मन निश्चल करितो मग शांतमन झालेला तो योगी आपले बुद्धिवृत्तीस प्रत्यक्ष ब्रह्मसुखाच्या अनुभवानें अत्यंत सुखास पावतो अशा समदर्शन झालेल्या योग्याच्या रक्षणार्थ मी जवळ रहातों कारण आपल्या प्रमाणें तो सर्वांस सुख व दुःख पहाणारा होतो ह्मणून त्यावर माझी कृपा आहे असें तूं जाण. असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे भगवन्, जो योग तुह्मी सांगितला हा फार कठीण आहे कारण वायूपेक्षांही अधिक मन चंचल आहे तेव्हां त्या मनाचा निग्रह कसा होईल? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, तूं सांगतोस हें खरें आहे; परंतु पूर्वी तुला जो ब्रह्मसुखाचा लाभ सांगितला त्याच्या प्राप्तीविषयीं दृढ निश्चयानें अभ्यास करावा त्या योगानें

वैराग्य होतें मग त्याची विषयाकडे वृत्ति न होतां केवल आत्माकार वृत्ति होते मग अर्थात मन स्थिर होतें या वांचून अन्यथा योग प्राप्त होणार नाहीं. असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे भगवन्, जो योग आपण सांगीतला तो योग करणाऱ्या पुरुषास आयुष्याचे अल्पत्वामुळें किंवा दृढ वैराग्य नसल्यामुळें योग प्राप्त झाला नाहीं आणि तो मरण पावला तर तो कोणते गतीस जातो? तसेंच कर्ममार्ग आणि योगमार्ग या दोहों मार्गांतून भ्रष्ट होऊन तो निराश्रय झाला ह्मणजे त्याचा नाश होतो किंवा नाहीं हें मला सांगा. असें ऐकून श्रीभगवान् बोलतात हे अर्जुना. त्या योग्याचा नाश होत नाहीं व दुर्गतीही त्यास नाहीं तर तो उत्तम लोकास जाऊन बहुत वर्षे तेथें राहून मग श्रीमान् पुरुषाचे गृहीं जन्म पावतो अथवा योग्यांचे कुळीं जन्म घेतो मग योगाभ्यासाविषयीं पुनः यत्न करितो मग त्या यत्नानें अनेक जन्म संसिद्ध होऊन मोक्षसुखास पावतो ह्मणून सर्वांपेक्षां योगी अधिक आहे यास्तव हे अर्जुना. तूं योगी हो. अ. वि. या अ. आहे.

३१. अध्याय एकतिसावा.- श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, ज्याचें मन माझे ठायीं आसक्त आणि समाधीचें अनुष्ठान करणारा तो निःसंशय मला जाणील. तो व जो मी ईश्वर तो तुला सत्यज्ञानानंद स्वरूप प्राप्त होणारें असें जें ज्ञान तें सांगतो. जें प्रत्यक्षानुभवात्मक ज्ञान जाणिलें असतां जीवन्मुक्त होतो मग त्याहून दुसरें ज्ञातव्य ह्मणून रहात नाहीं. हजारों मनुष्यांत कोणी एखादा आपणास ज्ञान व्हावें ह्मणून प्रयत्न करितो अशा सहस्रावधी प्रयत्न करणाऱ्यांमध्यें एखादाच मला तत्वतः जाणतो. पृथिवी. उदक. तेज. वायु. आकाश. मन. बुद्धि. अहंकार या आठ भेदानीं भिन्न अशी आठ प्रकारची माझी प्रकृति व दुसरी जीवस्वरूप प्रकृति आहे ज्या जीवस्वरूप प्रकृतीनें हें जग धारण केलें आहे या माझ्या दोन परापर प्रकृति आहेत त्या उत्पत्ति, स्थिति, लय यांस कारण आहेत असें तूं जाण हे अर्जुना, माझे शिवाय दुसरें कोणतेंही श्रेष्ठ स्वतंत्र कारण नाहीं. जसे मणी सूत्रांत ओंवळेले राहतात तसें सर्व जग माझे ठायीं आहे, उदकाचा सारभूत रस, चंद्र आणि सूर्य यांची प्रभा. सर्व वेदांचे सारभूत जो ओंकार, आकाशीं जो शब्द, मनु-

ह्यांत पुरुषाचा भाव ह्मणजे पौरुषरूप, पृथिवीचा जो उत्तम गंध, अग्नीचे-ठायीं जें तेज, सर्व भूतांत जें आयुष्य, तपस्वी यांचें जें तप, सर्व पिंडब्रह्मांड-स्वरूप भूतांचें बीज, बुद्धिमंताचेठायीं जी बुद्धि, तेजस्वी पुरुषांत जें तेज, याप्रमाणें बल, काम, हे सर्व मी आहें आणि सात्विक, राजस, तामस हे भाव मजपासून होतात असें तूं जाण. या तीन भावानीं मोह पावलेलें जग मला जाणत नाहीं अशी माझी दैवी माया आहे, जे भक्त भक्तीनें मला भ-जतात ते या मायेपासून तरतात. पापाचरण करणारे जे ते मला न भजतां आसुर भावास पावतात. आतां तस्करादिकानीं पीडा केलेला, आत्मतत्व समजावें अशी इच्छा करणारा, धनादिकांची इच्छा करणारा, ज्ञानी, हे च्यार प्रकारचे पुरुष मला भजतात त्यांत ज्ञानी श्रेष्ठ आहे; परंतु बाकीचे तीन तेही मला प्रिय आहेत तथापि ज्ञानी माझा आत्मा आहे तो बहुत ज-न्माचे अंतीं माझे स्वरूपास पावतो. आतां द्रव्यादिकांच्या इच्छेनें जे पुरुष जे जे नियम सांगितले आहेत त्या त्या नियमानें अन्य देवांस भजतात त्यांची भक्ति त्या त्या देवतेचेठायीं मी उत्पन्न करतों मग त्या भक्तीनें त्या मूर्तीची ते पूजा करतात नंतर त्यापासून त्या भक्तांचे मनोरथ मीच पूर्ण करितों; परंतु त्यांस फल जें प्राप्त होतें तें अल्पसुख देणारें असून नाशरूप आहे यास्तव मा-झी भक्ति करणाऱ्यास माझी प्राप्ति होते. मोह पावलेले पुरुष देहाभिमानानें माझ्या निर्गुण रूपास जाणत नाहींत; कारण मी सर्वांस प्रकाशरूप आहें असें मायेच्या योगानें कळत नाहीं ह्मणून हा लोक मला जाणत नाहीं मी मा-त्र सर्वांस जाणतों. प्राणी जन्मास आले ह्मणजे मोह पावतात त्यांतून पुण्य-वान् जे कोणी आहेत ते मला भजतात ते जन्म व मरण यांपासून मुक्त व्हा-वें या करितां यत्न करितात ते ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, आणि अधिदे-व यांहींकरून युक्त साधियज्ञ, यांस जाणून प्रयाणकालींही मला जाणतात. असा वि॰ या अ॰ आहे.

३२. अध्याय बत्तिसावा — अर्जुन प्रश्न करितो हे भगवन्, तें ब्रह्म कोणतें, तसेंच अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदेव कोणास ह्मणतात आणि अधियज्ञ या देहांत कोण आहे व प्रयाण कालीं योगी तुला कसें जाणतात हें स-

र्वे मला सांगावें? असें ऐकून भगवान् सांगतात हे अर्जुना. आकाशादिकां-
स व्यापून सर्व ठिकाणीं अति सूक्ष्म प्रकाशानें व्यापक आहे तें व ज्याहून दुसरें
थोर कोणी नाहीं त्यास अक्षरपरब्रह्म जाणावें. आतां अध्यात्म ह्मणजे स्व-
भाव, कर्म ह्मणजे भूतांचा सात्विकादि स्वभाव आणि उत्पत्ति यांचें कारण
यज्ञ त्यास कर्म ह्मणावें. अधिभूत हें सर्व प्राण्यास कर्मफलाचा उपभोग दे-
णारें आहे, अधिदैवत ह्मणजे शरीरांत शयन करतो तो पुरुष. अधियज्ञ ह्म-
णजे जो या देहांत यज्ञाभिमानी विष्णु अंतर्यामि राहणारा तो मीच आहें,
मरण समयीं माझें स्मरण जो करितो तो माझ्या स्वरूपास पावतो. या प्रमाणें
भगवान् अर्जुनाच्या प्रश्नांचीं उत्तरें सांगून ह्मणतात हे अर्जुना. मरणका-
लीं पुरुष ज्या ज्या वस्तूचें स्मरण करीत असतां शरीराचा त्याग करतो तो त्या
त्या वस्तुरूपास पावतो. याकारणास्तव सर्व काल माझें स्मरण तूं कर ह्मण-
जे माझे स्वरूपास पावशील. अभ्यास योगानें आदित्यमंडलांतर्वर्ती जो पु-
रुष सूक्ष्मापेक्षांही फार सूक्ष्म आणि अज्ञान स्वरूपाहून पलीकडील अ-
शा दिव्य पुरुषास प्राणाचा निरोध केला असतां सुषुम्नानाडीचे द्वारा भृकु-
टीचे मध्यभागीं प्राणाचें स्थापन केल्यानें योगी त्या पुरुषास पावतो त्यास
अक्षर परब्रह्म असें योगी बोलतात आणि निस्पृह यत्न करणारे सन्यासी
त्या स्वरूपांत प्रवेश करितात ज्याच्या प्राप्तीविषयीं ब्रह्मचर्य व्रतानें धारणा
करितात त्याचें प्राप्तीचें लक्षण तुला संक्षेपानें सांगतों. प्रथम श्रोत्रादि नव
द्वारांचें नियमन करून मनाचा हृदयाचे ठायीं निरोध करून मूलाधारापा-
सून मस्तक पर्यंत सुषुम्ना नाडीचे द्वारानें प्राणस्थापना करणें. अशी योग
धारणा करून ओम् इति एकाक्षर ब्रह्म याचा जप करीत असतां माझें चिं-
तन करून जो योगी देहास टाकून जातो तो परम गतीस पावतो. असा योग
न होईल तर हे अर्जुना, मरणपर्यंत माझें चिंतन करणाऱ्या योग्यास मी
सुलभ रीतीनें ब्रह्मस्वरूपास पाववितो. आतां ब्रह्मलोक सुद्धां सर्व लोकां-
स गेलेले प्राणी पुनर्जन्मास येतात; परंतु माझी प्राप्ति ज्यास झाली त्यास
पुनर्जन्म नाहीं, आतां मनुष्यांचें एक वर्ष ह्मणजे देवांचा अहोरात्र एक दि-
वस, ते पंधरा झाले ह्मणजे एक पक्ष, दोन पक्षानें एक मास, ते बारा मास

ह्मणजे एक वर्ष होतें. या प्रमाणें देवांचीं बाराहजार वर्षे गेलीं ह्मणजे कृतादिक चार युगें होतात, तीं चार युगें एक हजार वेळ गेलीं ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो आणि तितकेच मानानें एक रात्र होते तेव्हां या मानानें शंभर वर्षे ब्रह्मदेवाचें आयुष्य आहे यास्तव हे अर्जुना, सहस्र युगें पर्यंत ब्रह्मदेवाचा दिवस त्या प्रमाणेंच रात्र आहे ह्मणजे अहोरात्र एक दिवस त्याचा होतो. हे अर्जुना, हा स्थावर जंगमात्मक सर्व भूतांचा समुदाय ब्रह्मदेवाच्या दिवसाचे आरंभीं पुनः पुनः उत्पन्न होऊन त्याच्या रात्रीचे आरंभी लीन होतो असा कल्प कल्पाचे ठायीं होऊन लीन होणारा आहे, आतां याहून पलीकडे असणारा जो तो माझा भाव ह्मणजे ब्रह्मदेवादि सर्व भूतें नाश पावलीं तरी नाश पावत नाहीं त्यास अक्षर परब्रह्म असें ह्मणतात. तीच उत्कृष्ट गति त्याहून दुसरी गति नाहीं, तें माझें निर्गुण ब्रह्मस्वरूप आहे ह्मणून पुरुष त्या स्वरूपास पावला असतां पुनर्जन्म त्यास नाहीं त्या परमात्म्याचा साक्षात्कार वेदांतवाक्यें आणि ब्रह्मवेत्ता जो गुरु त्याची भक्ति या दोन कारणांनीं पुरुषास होतो. आतां उपासकास दोन मार्ग आहेत ते मी तुला सांगतों. अग्नि, ज्योति, अहर्देवता, शुक्लपक्ष, षण्मासात्मक उत्तरायणकालाची देवता या कालांत जे ब्रह्मवेत्ते देहत्याग करितात ते ब्रह्मलोकास जातात, तसाच धूम, रात्रि, कृष्णपक्ष, षण्मासात्मक दक्षिणायनाची देवता या कालांत जो देहत्याग करितो तो योगी चांद्रमस तेजापर्यंत जाऊन परत जन्मास येतो. हे दोन मार्ग जाणणारा योगी कोणते काळीं मोह पावत नाहीं, तस्मात् तूं सर्व काळीं योगाभ्यास करणारा हो. आतां या मार्गांची अपेक्षा न करितां ज्ञानानें ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन योगी परब्रह्मरूप स्थानास पावतो. असा विषय या अध्यायांत आहे.

३३. अध्याय तेतिसावा— श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, आतां अत्यंत गोप्य जें ज्ञान तें तुला सांगतों. ज्ञान, वेदांतवाक्यश्रवण, मनन, निदिध्यासन, भगवद्भक्ति, भगवत्प्रसाद, या साधनानीं जाणलें असतां या देहांत ब्रह्मसाक्षात्कार होतो ह्मणून सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ आणि पावन करणारें असून ज्याचा प्रत्यक्षानुभव आहे; परंतु याविषयीं भक्ति न करणारे पुरुष

मजला न पावून जन्म मरण प्रवाहरूप संसारांत भ्रम पावतात. हे अर्जुना, ब्रह्मस्वरूप जो मी त्याणें हें सर्व जग व्यापिलें आहे हीं सर्व भूतें माझेठायीं रहातात; परंतु मी त्यांचे ठायीं नाहीं, ह्मणजे जो व्यापक असून आकाश सारिखा निराळा आहे, पहा पहा अर्जुना, माझेठायीं रहाणारीं भूतें नाहींत असें माझें ऐश्वर्य यो गाचें सामर्थ्य आहे मी भूतांस धारण करणारा व पोषण करणारा आणि उत्पत्ति करणारा असा असून निराळा आहें. जसा वायु आकाशांत रहाणारा असतांही आकाशासीं त्याचा संबंध नाहीं तशी सर्व भूतें माझेठायीं असून ही माझ्याशीं त्यांचा संबंध नाहीं असें तूं जाण. सर्व भूतें कल्पक्षयीं माझ्या प्रकृतीस पावतात. पुनः कल्पादिकीं त्या भूतांस मीच उत्पन्न करितों आणि मी आपल्या प्रकृतीस अवलंबून सर्व भूतसमुदायास पुनः पुनः उत्पन्न करतों हे अर्जुना, त्या प्रकृतीचीं कर्में मला बंधक होत नाहींत त्यामुळे त्यांत उदासीना सारखा मी रहात आहें, मी निर्विकार प्रकाशमात्र स्वरूपानें केलेली प्रकृति सर्व जगास उत्पन्न करते या निमित्तानें हें सर्व जग नानाविधविकारानीं युक्त होतें ह्मणून मनुष्य माझी अवज्ञा करितात कीं, हा कृष्ण मनुष्यच आहे; परंतु ते माझा परंभाव निर्गुण ब्रह्म जें यातें जाणत नाहींत त्या कारणानें ते मनुष्य, राक्षसी, आसुरी, मोहिनी, या तीन प्रकृतींचा आश्रय करितात त्यानें त्यांचीं आशा, कर्में, ज्ञानहीं निष्फल होतात. आतां हे अर्जुना, महात्मे जे सत्पुरुष आहेत ते शमादि लक्षण दैवी प्रकृतीचा आश्रय करून मला भजतात आणि निरंतर माझें कीर्तन करणारे होतात असे जे भक्त ते मला नमस्कार करून माझीच उपासना करतात. कोणी भक्त ज्ञान यज्ञानें एकत्व भावास पावून माझी उपासना करितात, आतां श्रौतकर्मरूप क्रतु, पंचमहायज्ञ, स्वधा, औषध, मंत्र, आज्य, अग्नि, हुत, या जगाचा पिता, माता, धाता, पितामह, वेद्य, पवित्र, ओंकार, ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, गति, भर्ता, प्रभु, साक्षी, निवास, शरण, सुहृत्, प्रभव, प्रलय, स्थान, निधान, बीज, हे सर्व मी आहें. तसेंच हे अर्जुना, मी सूर्य होऊन जगास तापवितों आणि वृष्टि करितों. देवांचें भक्ष्य जें अमृत तें मी, सर्व प्राण्यांचा नाशरूप मृत्यु मी, कार्य व कारण हें मीच आहें, तीन वेदांस जाणणारे पुरुष प्र-

ग्निष्टोमादिक यज्ञानीं माझें यजन करितात, मग ते सोमपानानें पापापासून मुक्त होऊन स्वर्गास जावें ह्मणून प्रार्थना करितात, नंतर ते इंद्रलोकीं जाऊन स्वर्गविषय भोगाचा उपभोग करितात, मग त्यांचें पुण्य क्षीण झालें ह्मणजे ते मनुष्यलोकीं येऊन गर्भवासादि यातना अनुभवितात. आतां अनन्य जे माझे भक्त त्यांची उपासना मजवांचून दुसरी नाहीं, तेव्हां शरीर स्थिति होण्यास साधनभूत जें योग क्षेम तें मी करितों. जे कोणी अन्य देवांचें भक्तीनें पूजन करितात तें पूजन त्याणीं केलेलें माझेंच होतें कारण मी सर्व यज्ञांचा भोक्ता आहें असें मला जाणलें नाहीं तर ते अज्ञानी पुरुष ज्ञाननिष्ठेपासून भ्रष्ट होऊन जन्ममरण प्रवाहांत पडतात. आतां देवांची भक्ति करणारे जे मनुष्य ते देवलोकास जातात. त्या प्रमाणें पितृभक्त पितृलोकास, यक्षादिकांचे जे भक्त ते यक्षराक्षसांचे स्थानास जातात, हे अर्जुना माझी आराधना करणारे पुरुष माझ्या वैकुंठलोकीं येतात. जो भक्त मला पत्र, पुष्प, फल, उदक, यांतून कांहीं जें मिळेल तें भक्तीनें अर्पण करतो तें त्या भक्तानें दिलेलें साक्षात् परमेश्वर मी भक्षण करितों यास्तव तूं कर्म, भक्षण, होमादिक, ब्राह्मणादिकांस अन्न किंवा द्रव्यादिक दान जें करशील तें मला अर्पण कर ह्मणजे तूं कर्मबंधापासून मुक्त होऊन माझ्या स्वरूपास पावशील मी सर्व भूतांचे ठायीं आनंदरूपानें सारखा आहें. जे मनुष्य भक्तीनें मला भजतात ते माझे ठायीं रहातात आणि त्यांचे ठायीं मी रहातों. हे अर्जुना, माझा भक्त दुराचार करणारा जरी आहे तरी त्यास साधु आहे असें मानावें तो माझे भक्तीचे महात्म्यानें शीघ्र सदाचार संपन्न होतो आणि ब्रह्मसुखास पावतो. हे अर्जुना, मी प्रतिज्ञेनें सांगतों कीं, माझा भक्त नाश पावत नाहीं. स्त्रिया, वैश्य, शूद्र हे तीन पाप योनींत जरी आहेत तरी ते माझ्या भक्तीनें उत्तम गतीस पावतात. मग पुण्ययोनि ब्राह्मण तसे राजर्षी भक्त हे उत्तम गतीस पावतील ह्मणून काय वारंवार सांगावें. या कारणास्तव तूं आपलें मन माझे ठायीं ठेवून माझा भक्त हो आणि पूजा माझीच करून नमस्कार मलाच कर ह्मणजे माझ्या रूपास पावशील. असा विषय या अध्यायांत आहे.

३४. अध्याय चोतिसावा - श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, माझ्या वाक्यानें तूं संतोष पावतोस यास्तव तुझ्याच हिताचें मी बोलतों, देवांस व महर्षीस माझें प्रादुर्भावादि ऐश्वर्य कळत नाहीं. कारण कीं इंद्रादि देवांचा व भृग्वादि महर्षींचा आदिकारण मी आहें आतां मजवांचून थोर देव दुसरा कोणी नाहीं असें मला जाणून जो पुरुष मोहरहित होतो तो सर्व पापापासून मुक्त होतो. बुद्धि, ज्ञान, संमोह नकरणें, क्षमा, सत्य, शम, दम, सुख, दुःख, भव, भाव, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश, अयश, हे भाव प्राण्यांस मजपासून प्राप्त होतात. भृग्वादिसप्त महर्षी तसेच च्यार मनु हे माझ्या मानसीक संकल्पानें झाले त्यांजपासून ब्राह्मणादि प्रजा होत आहेत असा विभूति आणि योग जो जाणतो तो समाधि योगानें युक्त होतो असें सामर्थ्य माझें जाणून ज्ञानी मला भजतात. मग त्यांचें चित्त माझेठायीं राहून ते तत्व बोधाच्या गोष्टि परस्पर बोलतात आणि संतोष पावतात. मग त्या भक्तांचा उद्धार करावा ह्मणून मी त्यांस बुद्धि योग देतों आणि ते त्या बुद्धियोगानें मला पावतात हे अर्जुना, असा त्यांच्या अज्ञानाचा नाश करून ज्ञानदीप त्यांच्या ह्रदयांत प्रगट करतों. असें ऐकून अर्जुन प्रश्न करतो हे भगवन्, तूं साक्षात् परब्रह्म आहेस आणि तुला आदिदेव असें सर्व ऋषी तसे नारदऋषी, असित, देवल, व्यास ह्मणतात व तूंही बोलतोस तें ह्मां हें सर्व सत्य आहे असें मी मानतों तुझ्या स्वरूपाचा अंत देवादिकांस लागत नाहीं तुझा तूंच जाणतोस यासाठीं तुझ्या विभूती कोणत्या कोणत्या आहेत त्या सर्व मला सांगाव्या. असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, सर्व भूतांच्या ह्रदयांचेठायीं जो आत्मा तो मी आहें, द्वादशादित्यांत विष्णु, तेजांमध्यें सूर्य, मरुतदेवांत मरीचि, नक्षत्रांत चंद्र, वेदांमध्यें सामवेद, देवांत इंद्र, इंद्रियांमध्यें मन, भूतांत चेतना, रुद्रांमध्यें शंकर, यक्षराक्षसांत कुबेर, अष्टवसूमध्यें पावक, पर्वतांत मेरु, पुरोहितांमध्यें बृहस्पति, सेनापतीमध्यें स्वामी कार्तिक, सरोवरांमध्यें समुद्र, महर्षींत भृगु, वर्णांत ओंकार, यज्ञामध्यें जपयज्ञ, स्थावरांत हिमालय पर्वत, सर्व वृक्षांमध्यें अश्वत्थ, देवर्षींत नारद, गंधर्वांमध्यें चित्ररथ, सिद्धांमध्यें कपिल महामुनी, अश्वांत उच्चैःश्रवा, ह-

त्तीमध्यें ऐरावत, मनुष्यांत राजा, शस्त्रामध्यें वज्र, धेनूमध्यें कामधेनु, उ-
त्पत्तिकरणारांत मदन, सर्पांत वासुकि, नागांमध्यें शेष, जलचरांत वरुण,
पितरांमध्यें अर्यमा, संयमन करणाऱ्यांमध्यें यम, दैत्यांमध्यें प्रल्हाद, गणना
करणाऱ्यांमध्यें काल, पशूंमध्यें सिंह, पक्ष्यांमध्यें गरुड, पवन करणाऱ्यां-
मध्यें वायु, शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें परशुराम, किंवा राम मत्स्यजाती
मध्यें मकर जातीचा मत्स्य, नद्यांत भागीरथी, उत्पत्ती ज्या होतात त्यांचा आदि,
अंत व मध्य, विद्यामध्यें ब्रह्मात्मविद्या, बोलण्यांत स्थापन करणारा जो वाद तो
मी, अक्षरांत अकार, समासांचे समुदायामध्यें द्वंद्वसमास, कालांत अक्षयका
ल मी, धाता, सर्वकर्म फलदाता, संहार करणाऱ्यांमध्यें मृत्यु, पुढें होणारें जें
कल्य आणि उद्भव, स्त्रियांमध्यें कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा, धृति, क्षमा,
ह्या सात धर्मपत्नी मी, सामवेदांत बृहत्साम, छंदामध्यें गायत्री छंद मी, मासां-
त मार्गशीर्षमास, ऋतूमध्यें वसंत तसेच छल करणारांत द्यूत, जय, सत्व, ते-
ज थांत तेज मी, यादवांमध्यें वासुदेव मी, पांडवांत अर्जुन मी, मुनींमध्यें व्यास,
शुक्राचार्य, दंड करण्याची शक्ति, नीति, मौन, ज्ञानवान् पुरुषामध्यें जें ज्ञान तें
मी, सर्व भूतांचें मूल कारण मी, या प्रमाणें मुख्य विभूती मी आहें, आतां माझे
वांचून चराचर भूत नाहीं हे अर्जुना, माझ्या विभूतीचा अंत नाहीं जी कांहीं वि-
भूति आहे ती माझ्याच तेजाच्या अंशापासून होते असें तूं जाण. आतां बहु-
त विभूतीच्या ज्ञानानें तुला काय व्हावयाचें आहे तेव्हां तूं इतकेंच जाण कीं, भ
गवान् या सर्व जगास एकांशानें व्यापून राहिला आहे. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

३९. अध्याय पस्तिसावा — अर्जुन प्रश्न करतो हे भगवन्, मला अनु-
ग्रह करावा म्हणून तुह्मीं दुसऱ्या अध्याया पासून दहा अध्याय पर्यंत ज्ञान सां-
गितलें त्यानें माझा मोह गेला. आतां तुझें सर्व विश्वात्मक विश्वरूप सर्व व्या-
पक आहे तें पहाण्या विषयीं मी योग्य आहें असें जर मानशील तर मला दा
खीव? असें ऐकून श्री भगवान् ह्मणतात हे अर्जुना, पहा पहा सहस्रावधी
माझीं रूपें नाना प्रकारचे वर्ण व आकृति व देवां सुद्धां सर्व विश्व माझ्या या देहा
ठेठायीं तूं पहा हे अर्जुना, कोट्यावधि वर्षें भ्रमण केली तरी पहाण्यास शक्य
नाहीं तें आतांच मी तुला दिलेल्या दिव्य चक्षूनें पहा. संजय ह्मणतो हे धृतरा-

ष्ट्रा, या प्रमाणें बोलून भगवंतानीं आश्चर्यकारक सर्व पदार्थ धारण केलेलें विश्वरूप अर्जुनास दाखविलें. तें रूप सहस्रसूर्यांचा समुदाय उदयास पावून त्यांची जी कांति ती श्रीभगवंताच्या विश्वरूपाचे कांतीस उपमा घेण्यास योग्य नाहीं असें निरुपम तेजानें युक्त जें विश्वरूप तें अर्जुनानें भगवंताच्या देहाचे ठायीं पाहिलें. नंतर आश्चर्ययुक्त होऊन अंगावर रोमांच उभे राहिलेला अर्जुन भगवंतास नमस्कार करून बोलतो हे भगवन्- तुमच्या देहाचे ठायीं ब्रह्मदेव, सर्व ऋषी, वासुकीप्रभृती नाग. कैलासस्थित व पाताळस्थित शेषादि. अनेक बाहू व उदरें, मस्तकें, नेत्रें आहेत असा अनंत रूपी ज्याची यत्ना कोणास ही होत नाहीं अशा तुजला मी पहातों. हे भगवन्, तुमचें परब्रह्म निर्गुण जें रूप त्याचा साक्षात्कार तुह्मीं मला केल्यानें विश्वादिकांस व्यापक तुझें रूप खरें आहे असा अनुभव मला आला. आतां हें उग्ररूप भयंकर मी पाहिलें त्यांत महर्षी व सिद्ध, रुद्रादित्यादि सर्व देव- गंधर्वादि सर्व आहेत, कोणी स्तुति करतात व कोणी प्रवेश करतात, कोणी हस्त जोडून आमचें कल्याण करावें ह्मणतात, अशा प्रकारानीं युक्त तुमचें रूप पाहून मला भय झालें यास्तव जसा मी सुख पावेन तसें तुह्मीं करावें. कारण दुर्योधनादिक, भीष्म, द्रोण, कर्ण जयद्रथादि सर्व राजे तुझ्या मुखांत प्रवेश करितात, कोणी दातांचे संधींत लोंबणारे दिसतात. जशा नद्या समुद्रांत प्रवेश करितात अथवा प्रदीप्त झालेल्या अग्नींत पतंग प्रवेश करतात त्या प्रमाणें हे सर्व लोक तुझ्या मुखांत प्रवेश करितात. तेव्हां असा उग्ररूप धारण करणारा कोण तूं आहेस तो मला सांग. असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना सर्व संहार करणारा. कालरूपी मी परमेश्वर आहें लोकांचा संहार करावा ह्मणून प्रवृत्त झालों यास्तव तुझ्या वांचून हे सर्व भीष्मादिक व उभे राहिलेले जे शत्रु आहेत ते सर्व मरण पावतील तस्मात् तूं ऊठ आणि शत्रूंस जिंकून राज्याचा उपभोग कर. द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण, आणि अन्य योद्धे, या सर्वांस मीच मारलें आहे तूं निमित्तमात्र होऊन युद्ध कर ह्मणजे शत्रूंस जिंकशील. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, भगवंताचें भाषण ऐकून अर्जुन कृष्णास नमस्कार करून ह्मणतो हे भगवन्, तुह्मीं जें बोललां हें सर्व खरें

आहे आतां तुला सिद्ध नमस्कार करितात, राक्षस भिऊन पळतात, म्स्मात् तूं आदिदेव खरा आहेस तुझ्याहून दुसरा थोर कोणी नाहीं यास्तव तुला मी हजार वेळ नमस्कार करितों, तसाच पूर्वभागीं आणि पृष्ठभागीं तुला माझा सर्व देशीं नमस्कार असो. आतां जें कांहीं तुझा महिमा न जाणल्यामुळें मी बोललों असेंन तें सर्व मूर्खपणाचें माझें भाषण आहे असें जाणून तुह्मीं मजवर कृपादृष्टीनें पहावें आणि भयपावलेल्या मला पूर्वींचें तुमचें चतुर्भुजकृष्ण अवताराचें रूप दाखवावें. असें ऐकून श्रीभगवान् बोलतात हे अर्जुना, तुजवर प्रसन्न होणारा जो मी याणें आपलें विश्वरूप दाखविलें. हें रूप तुजवांचून पूर्वीं दुसऱ्यानीं पाहिलें नाहीं यास्तव चार वेदांचें अध्ययन, यज्ञ, कर्में, महादानें, उग्रतपें हीं कोणी पुरुषानें केलीं तरी त्यास हें रूप पहाण्याविषयीं शक्य होणार नाहीं, आतां तूं व्यथादिक टाकून माझें चतुर्भुजादिकयुक्त कृष्णरूप पहा. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, या प्रमाणें बोलून भगवंतानीं अर्जुनास चक्रादियुक्त आपलें चतुर्भुज रूप दाखविलें. त्या कृष्णमूर्तीस पाहून अर्जुन ह्मणतो हे भगवन्, मी तुमचें हें सौम्यरूप पाहून स्वस्थ झालों आहें. असें ऐकून भगवान् ह्मणतात हे अर्जुना, तूं माझें जें रूप पाहिलेंस हें पुरुषाला पहाण्यास फार अशक्य आहे, कारण इंद्रादिदेवही त्यारूपास पहाण्याची नित्य इच्छा करतात तेव्हां वेदाध्ययनादिकांनीं ही मी पुरुषांस प्रसन्न होत नाहीं तर अनन्य भक्ति करणाऱ्यांस मी प्रसन्न होतों. मग माझ्या रूपाचें जाणणें व पहाणें आणि प्रवेश करणें या विषयीं ते भक्त समर्थ होतात, यास्तव तूं माझा भक्त निर्वैर हो ह्मणजे मला पावशील. अ० वि० या अ० आहे.

३६. अध्याय छत्तिसावा.– अर्जुन प्रश्न करतो हे भगवन्, तुमच्या सगुणरूपाचें व निर्गुणब्रह्माचें चिंतन करणारे भक्त या दोन प्रकारच्या भक्तांत श्रेष्ठ कोण? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, प्रथम माझ्या सगुणरूपीं भक्तीनें मनाची एकाग्रता करून जे पुरुष उपासना करतात त्यांस निर्गुण स्वरूपाचें दर्शन होतें ह्मणून ते भक्त अतिशयें करून मला मान्य होतील. आतां केवल प्रथमच निर्गुणपरब्रह्माची उपासना करणा-

रे भक्त इंद्रियसमुदायांचें नियमन करून सर्वत्र समबुद्धियोगानें तेही मला पावतात; परंतु त्यांस फार क्लेश होतात. कारण देहधारी पुरुष जे आहेत त्यांस निराधार गति दुःखानें प्राप्य आहे यास्तव हे अर्जुना, जे भक्त मलासर्व कर्मे अर्पण करून निरंतर ध्यान योग करतात त्यांचा उद्धार मी करतों. तेव्हां तूं मन आणि बुद्धि माझेठायीं स्थापन कर ह्मणजे मला पावशील. आतां तुझें चित्त स्थिर न होईल तर अभ्यास योग कर. त्याविषयीं समर्थ न होशील तर माझें भजन कर ह्मणजे तूं सिद्धि पावशील. तेंही करण्याविषयीं समर्थ न होशील तर सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर. हे अर्जुना, अभ्यासाहून ज्ञान प्रशस्त आहे. ज्ञानाहून ध्यान प्रशस्त. त्याहून सर्व कर्म फलत्याग प्रशस्त आहे, त्यापासून पुरुषांस सुख होतें. आतां सर्व भूतांत कोणाचाही द्वेष न करणारा, मित्र, करुण, ममताबुद्धिरहित, निरहंकार, ज्यांस सुखदुःखें समान आहेत, सहनशील, निरंतर आत्मसुखानें संतोषी, या प्रकारच्या गुणानीं युक्त आणि ज्यानें मन व बुद्धि मला अर्पण केली असा दृढ निश्चय केलेला भक्त मला प्रिय आहे. आतां ज्यापासून जन व्यथा पावत नाहीं व जनांपासून ज्याला व्यथा होत नाहीं आणि हर्ष, परोत्कर्ष सहन न करणें, भय, मी एकटा स्त्रियांदिकां वांचून कसा जगेन ह्मणून उद्वेग ज्यास नाहीं तो मला प्रिय आहे. हे अर्जुना, ज्याला अपेक्षा नाहीं व कर्मफलत्याग करणारा असा भक्त मला प्रिय आहे, जो प्रियलाभ झाल्यानें हर्ष पावत नाहीं, अनिष्ट प्राप्त झाल्यामुळें द्वेष करीत नाहीं, तसेंच शोक, इच्छा, शुभ, अशुभ यांचा त्याग करणारा, शत्रु, मित्र, मान, अपमान, यांविषयीं समान असणारा आणि निंदा व स्तुति ज्यास सारख्या, मौनी, अशा प्रकारानीं युक्त जो भक्त तो मला प्रिय आहे. आतां जे पुरुष मी सांगितलेलें धर्मरूप अमृतच आहे असें मानून याची उपासना करतात ते भक्त मला अत्यंत प्रिय आहेत. अ. वि. या अध्या. आहे.

१७. अध्याय सदतिसावा:- श्रीभगवान सांगतात हे अर्जुना, त्या शरीरास क्षेत्र असें ह्मणावें. यास जो जाणतो त्याला विवेकी पुरुष क्षेत्रज्ञ असें ह्मणतात, तो क्षेत्रज्ञ मी सर्व क्षेत्रांत आहें असें तूं जाण. या प्रमाणें

क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तें जीवांच्या अविद्येचें नाशक आहे असें माझें मन आहे. आतां क्षेत्र म्हणजे शरीर हें ज्या विकारानें युक्त आहे आणि क्षेत्रज्ञ ज्या सामर्थ्यानें यांत आहे हें सर्व संक्षेपानें तूं मजपासून श्रवण कर. हे अर्जुना, त्या क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचें यथार्थ स्वरूप वसिष्ठादिक जे ऋषी त्यांनीं बहुत प्रकारानीं वर्णिलें आहे व वेदानीं अनेक प्रकारानीं निरूपिलें आहे आणि ब्रह्मबोध करून देणारीं जीं सूत्रें व पदें त्यानीं बहुत प्रकारानीं वर्णन केलें आहे तें क्षेत्र तुला सांगतों, पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, सर्व जगाचें कारण तें अव्यक्त, पंचज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें, मन, पंच विषय, यांस सांख्य- चतुर्विंशति तत्वें असें म्हणतात. आतां इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात (शरीर व इंद्रियें यांचा समुदाय) चेतना, धृति, हे धर्म शरीरांत मनोरूपच आहेत. या प्रमाणें मी तुला क्षेत्र संक्षेपानें सांगितलें. आतां क्षेत्रज्ञाच्या प्राप्तीविषयीं धर्म सांगतों. आपलीच आपण श्लाघा न करणें, लोकांत आपली ख्याति न दाखविणें, अहिंसा, क्षमा, आर्जव, मोक्ष साधनाविषयीं गुरूची सेवा करणें, शौच, (अंतःकरण व शरीर यांची शुद्धि) स्थैर्य करणें, देहेंद्रियादिकांचा समुदाय आपले स्वाधीन ठेवणें, विषय वैराग्य, अहंकार न करणें, जन्म, मृत्यु, जरा, व्याधि, यां पासून होणारें दुःख, व दुसऱ्याचे दोष पहाणें, पुत्रादिकांचेठायीं प्रीति न करणें, नित्य समचित्तत्व असणें, माझी भक्ति करणें, एकांतीं बसणें, आत्मज्ञान विमुखांच्या सभेंत न जाणें, आत्मानात्मविवेकज्ञान नित्य पहाणें, ब्रह्म साक्षात्काराचें नित्य पहाणें, हे अर्जुना, यांस ज्ञान म्हणावें. यांहून विपरीत- मानित्वादिक जें त्यास अज्ञान असें तूं जाण. आतां ज्ञेय तुला सांगतों. जें पुरुषानें जाणलें असतां त्यास मोक्ष होतो, ज्याच्या आदिं दुसरें कोणतें ही नाहीं म्हणून स्वयंप्रकाश तें परब्रह्म, कार्य आणि कारण यांहून निराळें, सर्वांस व्यापून निर्विकार स्वरूपानेंच स्थित आहे आणि सर्वांस धारण करणारें असून निर्गुण आहे आतां त्याचें स्वरूप तत्वदेत्ते सूक्ष्मज्ञान दृष्टीनें पहातात. याप्रमाणें त्याचीं बहुत लक्षणें सांगून भगवान् म्हणतात हे अर्जुना, मी तुला क्षेत्र, ज्ञान, ज्ञेय हीं संक्षेपानें सांगितलीं. माझा भक्त यांस जाणून मोक्षास जाण्यास योग्य होतो. आतां प्रकृति आणि पुरुष हे अनादि आहेत असें तूं जाण. त्यांत प्र-

कृति हें कारण, पुरुष हा भोक्ता यांचा द्रष्टा या देहांत परमात्मा ह्मणून निराळा आहे; या प्रकारें करून जो भक्त प्रकृति आणि पुरुष यांस जाणतो त्यास पुनः जन्म होत नाहीं. आतां कोणी योगी प्रत्यक्षानुभवात्मक ध्यानें करून अन्य सांख्यज्ञानानें तसेंच अन्य निष्काम कर्मयोगानें आत्म्यास जाणतात. आतां ज्यांस स्वतः विचार होत नाहीं ते गुरूपासून आत्मस्वरूप समजून घेऊन आत्म्याची उपासना करितात तेही संसारापासून मुक्त होतात हे अर्जुना, जें कांहीं स्थावर किंवा जंगम भूत उत्पन्न होतें तें सर्व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होतें असें तूं जाण. मी सर्व भूतांत सारखा आहें असें प्रत्यक्ष ज्ञानानें पाहून जो योगी सर्व कर्में प्रकृतीनें केलीं असें पहातो तो भेदरहित ज्ञानानें ब्रह्मास पावतो. परमात्मा शरीरांत रहात असतांही आकाशासारिखा लिप्त होत नाहीं. जसा एक सूर्य सर्व लोकांस प्रकाश करितो तसा क्षेत्रांत राहणारा आत्मा सर्व क्षेत्रास प्रकाश करितो. या प्रमाणें जे योगी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा भेद व भूतांच्या प्रकृतीपासून मोक्ष यांस जाणतात ते परब्रह्मास पावतात. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

३८. अध्याय अडतिसावा. श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, पुनः ज्ञानामध्यें उत्तम ज्ञान मी तुला सांगतों. जें ज्ञान जाणून मुनी सिद्धीस पावले. त्याच ज्ञानानें पुरुष माझ्या रूपास पावून कोणते काळीं ही उत्पत्ति प्रळयाची व्यथा पावत नाहींत. माझें प्रवेशस्थान जें तें महत्‌ब्रह्म व तेंच सर्व भूतांचें उत्पत्तीस कारणभूत आहे. ब्रह्मदेवास मी उत्पन्न करितों नंतर त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते ह्मणून बीज देणारा सर्वांचा पिता मी आहें. आतां त्या मूलकारण प्रकृतीपासून सत्वादि तीन गुण उत्पन्न झाले. ते पुरुषास बंधन करितात. त्या गुणांत सत्वगुण, सुखसंगभूत ज्ञानानें. रजोगुण कर्मसंगानें, तमोगुण मोह व आलस्यादिकानीं बंधन करितो. सत्वगुणानें सुख होतें. रजोगुणानें कर्माविषयीं प्रवृत्ति होते. तमोगुणानें मोह होतो. आतां रज व तम यांचा पराभव करून सत्वगुण वृद्धीस पावतो. तसेंच सत्व व तम यांचा पराभव करून रजोगुण वृद्धीस पावतो. सत्व व रज यांचा पराभव करून तमोगुण वृद्धीस पावतो. पुरुषाच्या देहांत प्र-

काशरूप ज्ञानझाल्यानें सत्वगुणाची वृद्धि, लोभादिक झाल्यानें रजोगुणाची, मोहादिक झाल्यानें तमोगुणाची वृद्धि जाणावी. पुरुष सत्वगुण वाढल्यानें उत्तम लोकास जातो. रजोगुण वाढल्यानें कर्मानुष्ठान करणाऱ्या मनुष्यांच्या योनींत जन्म पावतो. तमोगुण वाढल्यानें पशुपक्षी इत्यादिकांचे ठायीं जन्म पावतो. योगी पुण्यकर्माचें फल सात्विक आहे ह्मणून बोलतात, रजोगुणाचें दुःख तसें तमोगुणाचें फल अज्ञान ह्मणून बोलतात. आतां सत्वगुणी पुरुषास ज्ञान उत्पन्न होतें. रजोगुणानें लोभ. तमोगुणानेमोहादिक होतें. सत्वगुणी पुरुष ऊर्ध्वलोकीं गमन करितात. रजोगुणी मनुष्य लोकीं जन्म पावतात. तमोगुणी अधोलोकीं जातात तेव्हां पुरुषाच्या देहेंद्रियादिकांपासून जीं कर्में होतात त्यांचा कर्तासत्वादिगुण जे त्याहून अन्य कोणी नाहीं तर गुण जे तेच सर्व कर्मांचे कर्ते आहेत असें ज्ञानी विचारानें पहातो तेव्हां गुणाहून पर निर्विकार परमात्मा आहे असें जाणतो, तो पुरुष गुणातीत होऊन जन्मादि दुःखापासून मुक्त होतो आणि मोक्षास पावतो. असें ऐकून अर्जुन प्रश्न करितो हे भगवन्, गुणांचा अतिक्रम केलेला जो गुणातीत तो कोणते चिन्हानीं युक्त होतो व त्याचा आचार कसा आणि या तीन गुणांपासून अतीत कसा होतो? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, सत्वगुणाचें कार्य प्रकाश, रजोगुणाचें कार्य प्रवृत्ति, तमोगुणाचें कार्य मोह, हीं आपआपले कारणानें प्राप्त झालीं असतां द्वेष करीत नाहींत व निवृत्त झालीं तरी इच्छा करीत नाहींत असा उदासीना सारखा गुणानीं चलन पावत नाहीं तोच आपल्या स्वस्वरूपानंदाचे ठायीं रहाणारा होतो त्यास गुणातीत ह्मणावें. आतां जो प्रेमलक्षण भक्तियोगानें माझें चिंतन करितो तो या गुणांचा अतिक्रम करून मोक्षास योग्य होतो. हे अर्जुना, ब्रह्माची व धर्माची, एकांतिक सुखाची प्रतिष्ठा मी वासुदेव आहें. अ. वि. या अ. आहे.

३९. अध्याय एकुणचाळिसावा.- श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, या संसार वृक्षाचें मूल ऊर्ध्व आहे, त्यास कारण परब्रह्म असें ह्मणतात. हें ज्याचें मूल आणि ब्रह्मदेवादिक जे जीव ते या संसार वृक्षाच्या शाखास्था-

नीं आहेत, तो वृक्ष शाखा नाश पावणारा आहे; परंतु प्रवाह रूपानें विनाशी आहे त्याचें जीव वेदोक्त कर्मांनीं सेवन करितात ह्मणून जीवांस सुखादिक फलें इच्छायें प्रमाणें रक्षण करणारीं होतात अशा प्रकारच्या वृक्षास जो जाणतो तो ब्रह्मतत्त्व जाणणारा होतो. आतां त्या संसार वृक्षाच्या शाखा मनुष्य लोकीं संततीचे द्वारानें पसरल्या आहेत आणि वर ब्रह्मलोक पर्यंत पावलेल्या आहेत, असा विस्ताररूप जो संसार वृक्ष त्याची वृद्धि सत्वादिक गुणानीं व विषयानीं होत आहे ह्मणून त्याचीं मूळें मनुष्य लोकीं संततीच्या प्रवाहानें कर्में करण्याविषयीं निरंतर आहेत तेव्हां या वृक्षाचें वर्णन केलेलें रूप व नाश आदि संस्थिति, जाणावयास कोणी समर्थ होत नाहींत; कारण स्वप्न, मृगजल, गंधर्वनगर या प्रमाणें मिथ्यारूप जो संसार वृक्ष याचा असंगशस्त्रानें छेद करून ब्रह्मात्मबोध होण्यासाठीं गुरूस शरण जाऊन त्यापासून साक्षात्कार झाला ह्मणजे जीव ब्रह्मास पावतात मग त्यांस पुनर्जन्म होत नाहीं. या प्रमाणें अभिमान, मोह, संगदोष कामादिक यांचा त्याग करणारे पुरुष माझ्या पदास जातात. तें पद असें आहे कीं, ज्यास सूर्य, चंद्र व अग्नि हे प्रकाश करण्यास समर्थ होत नाहींत तें माझें अक्षरपरब्रह्मस्वरूप आहे या स्वरूपास जो ज्ञानी पावेल त्यास पुनर्जन्म होत नाहीं. आतां माझ्या परमात्म्याचाच अंश जीव या देहांत कर्ता भोक्ता ह्मणून भासतो. जसा जलांत प्रतिबिंबित सूर्याचा अंश असतो या साररवा तो आहे. तो पंच ज्ञानेंद्रियें व सहावें मन यांस आकर्षण करितो. कोणते काळीं ह्मणशील तर देहेंद्रिय समुदायाचा स्वामी जीव जेव्हां पूर्व शरीराचा त्याग करून दुसरे शरीरांत गमन करितो तेव्हां जीं पूर्वी सांगितलेलीं मनासुद्धां सकल इंद्रियें आणि प्राण यांस घेऊन तो जातो. जसा वायु पुष्पादिकांपासून गंध घेऊन दुसरे ठिकाणीं गमन करितो त्या प्रमाणें. नंतर तो जीव मनासुद्धां इंद्रियें करून विषयांचें सेवन करितो, तेव्हां तो देहांत रहाणारा असून त्या देहाचा त्याग करून जातो यास प्रत्यक्ष अनुभवानें पहाणारे तेच पहातात. देहाभिमानी मूर्ख पुरुष यास पहात नाहींत, तेव्हां पुरुषानीं याविषयीं यत्न करून आत्मदर्शन करून घ्यावें. आतां

जें सूर्याचेठायीं रहाणारें पूर्वोक्त ब्रह्मज्योति तेज व जें चंद्राचे व अग्नीचेठायीं तेज तें माझें आहे ह्मणून सूर्यादिक हे जगास प्रकाश करितात त्याप्रमाणें मी पृथ्वींत प्रवेश करून बलानें पृथ्वीवर सर्व भूतांस धारण करितों व चंद्र होऊन औषधी रसयुक्त करितों व प्राण्यांच्या देहांत मी जठराग्नि होऊन त्याणीं भक्षण केलेल्या अन्नाचें पचन करितों, तेव्हां सर्वांच्यात्दयीं प्रवेश माझाच आहे ह्मणून प्राण्यांस स्मरणादिक मजपासून होतें यास्तव असा मी थोर देव आहे यासाठीं सर्व भूतें आणि कूटस्थ पुरुष यांहून अन्य जो उत्तम पुरुष परमात्मा ह्मणून सांगितलेला आहे तो मीच आहें यास्तव तूं मला जाण, कारण त्या लोकांत व वेदांचे ठायीं प्रसिद्ध मी आहें ह्मणून मला सर्व जन पुरुषोत्तम असें ह्मणतात या सर्व कारणानीं मला सर्वभावानें भजणारा पुरुष हें गीताशास्त्र जाणून कृत कृत्य होतो. या योग्य कारणावरून ब्राह्मण कुलांत जन्म प्राप्त झालेल्या पुरुषानीं भगवत्तत्त्वज्ञानाचें संपादन करावें ह्मणजे हाच मुख्य पुरुषार्थ साधून तो कृतकृत्य होतो. असें भगवंतानीं अर्जुनास कृतकृत्यता सांगण्याचें कारण आहे. मनूनेंही असें सांगितलें आहे, यास्तव तें प्राप्त झाल्यावर दुसरें कर्तव्य रहात नाहीं. अ० वि० या अ० आहे.

४०. अध्याय चाळिसावा- श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, भय रहित असणें, देहाची शुद्धि, ज्ञानयोगाचा स्वीकार, दान, दम, यज्ञ, वेदपठन, तप, आर्जव, अहिंसा, सत्य, अक्रोध, कर्मफलत्याग, शांति, दुसऱ्याचे पाठीमागें त्याच्या दोषाचें कथन न करणें, भूतांवर दया, इंद्रियांस विकार होऊं न देणें, मृदु बोलणें, लज्जा धरणें, अचापल, तेज, क्षमा, धैर्य, शौच, दुसऱ्यास मारण्याविषयीं शस्त्रग्रहण न करणें, अत्यंतमान रहित असणें, हे धर्म दैवी ऐश्वर्य धारण करणाऱ्यास होतात. मी मोठा धार्मिक आहें असें प्रसिद्ध करणें, दर्प, अभिमान, क्रोध, कठोर भाषण, अज्ञान, हे आसुरी संपदेचे धर्म होत. दैवी संपदा धारण केल्यानें पुरुषास मोक्ष होतो. व आसुरी संपदा धारण केल्यानें प्राण्यांस बंध होतो. हे अर्जुना, तुझेठायीं दैवीसंपदा आहे. आतां या दोहोंसंपदांतील आसुरी संपदेचा विस्तार तुला सांगतो. संसारांत प्रवृत्ति व संसारांतून

निवृत्ति कोणते प्रकारानें होते, हें आसुर स्वभावाचे प्राणी जाणत नाहींत आणि शौच, आचार, सत्य, हे धर्म त्यांचेठायीं रहात नाहींत असें असून ते या जगांत ईश्वर नाहीं आणि हें जग स्त्री व पुरुष यांच्या संयोगापासून उत्पन्न होतें या शिवाय दुसरें कारण नाहीं असें बोलतात. मग या बुद्धीनें ते आत्मज्ञाना पासून नष्ट झालेले जगाचा नाश करितात आणि ते काम, मद, मान यांचा आश्रय करून अशुद्धपणानें वागणूक करितात. त्या कारणानें मरण पर्यंत चिंतनें सर्वकाळ युक्त होऊन ते स्त्रियादिकांचा उपभोग करून जें सुख होतें याहून श्रेष्ठ सुख दुसरें कांहीं नाहीं असा निश्चय करितात आणि आशा, काम, क्रोध, यांचा आश्रय करून ते अन्यायानें द्रव्य संपादन करितात आणि बोलतात कीं, आज आह्मांस अमुक द्रव्य मिळालें आह्मीं शत्रूंस मारून आणीक द्रव्य संपादन करूं. ईश्वर, बलवंत, सुखी असे आह्मीं आहों. कोणी कुबेरास द्रव्यवान् आहे असें ह्मणतात; परंतु द्रव्याविषयीं आमच्यापेक्षां तो कमीच आहे आमच्या बरोबरीचा अन्य कोणी नाहीं. यज्ञ करून दुसऱ्याचा पराभव करणें, नटादिकांस पुष्कळ द्रव्य देणारे, संसारांत आनंद पावणारे असे आह्मीं आहों. या प्रमाणें ते अनेक प्रकारें चित्तास भ्रम झालेल्या अज्ञानानें मोह पावतात आणि कामभोगाचे ठायीं प्रसक्त असल्यामुळें ते नरकांत पडतात. असे ते द्रव्याच्या मदानें युक्त आणि शास्त्र विधी टाकून अहंकार, बल, काम, क्रोध यांचा आश्रय केल्यानें ते आत्मपर देहांत मी परमेश्वर जो त्याचा द्वेष करतात. मग मी त्या द्वेष करणाऱ्या पुरुषांस सर्प व व्याघ्रादिक क्रूर योनींचे ठायीं जन्मास घालतों. मग ते जन्म जन्माचे ठायीं त्या दुष्ट योनी भोगून त्यांस माझी प्राप्ती न होतां ते अधम गतीस पावतात. हे अर्जुना, पाप्यास नरक प्राप्त होण्यास कारण काम, क्रोध, लोभ हे तीन आहेत यास्तव यांस टाकून जो मुक्त झाला त्यानें आपलें कल्याणाचें आचरण केलें ह्मणजे तो मोक्षास पावतो. तस्मात् जो पुरुष शास्त्र विधि टाकून केवळ निषिद्ध कर्माचें आचरण करितो त्यास या लोकीं व परलोकीं सुख नसून तो गतीस ही पावत नाहीं. त्या कारणास्तव हे अर्जुना, हें कर्तव्य व हें न कर्तव्य याच्या व्यवस्थेविषयीं शास्त्र प्रमाण आहे तस्मात् तूं शास्त्रविधीनें सांगितलेलें कर्म जाणून तें करण्याविषयीं योग्य

आहेस. अ. वि. या अ. आहे.

४१. अध्याय एकेचाळिसावा:- अर्जुन प्रश्न करितो हे भगवन् जे पुरुष वेद व शास्त्रानें सांगितलेल्या विधीचा त्याग करून केवळ भक्तीनें युक्त होऊन देवपूजादिक अनुष्ठान करितात तेव्हां ती त्यांची सात्विकी निष्ठा, राजसी किंवा तामसी यांतून कोणती ह्मणावी? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, पुरुषांची स्वभावपूर्वक सात्विकी इत्यादिक तीन प्रकारची भक्ति होते. सर्व प्राणिमात्रांची श्रद्धा सत्वगुणात्मकरूपच आहे ह्मणून ज्यास जी श्रद्धा होते तन्मय तो पुरुष होतो. आतां सात्विक स्वभावाचे पुरुष देवांचें, राजस स्वभावाचे पुरुष यक्ष व राक्षस यांचें, तमोगुणात्मक पुरुष पिशाच्च व सप्तमातृकादिक भूतगणांचें पूजनादिक करितात. त्यांत अहंकार, काम, राग इत्यादियुक्त पुरुष अशास्त्रविहित घोर तप करितात, तें तप त्यांचें आसुर निश्चयात्मक आहे असें तूं जाण. आतां सर्व प्राणिमात्रांचा आहार तीन प्रकारचा आहे व यज्ञ, तप, दान, यांचे ही तीन तीन प्रकारें भेद सांगितले आहेत ते तुला सांगतों. आयुष्य, चित्तस्थैर्यता, शरीर सामर्थ्य, व्याधी न होणें, भोजनानंतर आनंद, प्रीति, मधुर रसानें युक्त, घृतादिकानें स्नेहयुक्त, स्थिर, हृदयास प्रिय, हे अन्नादिक आहार सत्वगुणी पुरुषास प्रिय आहेत. तिखट, आंबट, खारट, उष्ण, कडू, रूक्ष, मोहऱ्या, इत्यादिक हे आहार रजोगुणी पुरुषास प्रिय आहेत; परंतु दुःख, शोक, रोग, देणारे आहेत. आतां एक दिवस गेलेलें अन्न, दुर्गंधि, अहोरात्र होऊन गेलेलें, उच्छिष्ट, अपवित्र, हें भोजन तमोगुणी पुरुषास प्रिय आहे. आतां फलेच्छारहित पुरुषानीं केलेला यज्ञ, सात्विक जाणावा. फलाची इच्छा धरून केलेला यज्ञ तो राजस जाणावा. शास्त्र विधी टाकून मंत्र व दक्षिणा रहित केलेला यज्ञ त्यास तामस यज्ञ असें बोलतात. देव, ब्राह्मण, पिता व माता आणि उपदेश करणारा आचार्य, वेदार्थ जाणणारे प्राज्ञ यांचें पूजन, शौच, आर्जव, निषिद्ध मैथुन न करणें, अहिंसा, यांस शारीर तप असें ह्मणतात. सुखकारक असून सत्य, प्रिय हितकारी जें भाषण, वेदाभ्यास करणें, यांस वाङ्मय तप ह्मणतात. मनाची प्रसन्नता, शुद्धभाव, मौनादिक यांस मानस तप ह्मण-

तात. फलेच्छा रहित पुरुषानीं भक्ती करून केलेलें तीन प्रकारचें तप सात्विक जाणावें. सत्कार, मान, आपली पूजा व्हावी म्हणून दंभानें केलेलें तप, यास राजस म्हणतात. दुसऱ्याचा नाश करावा या अर्थी केलेलें तप तामस जाणावें. आतां पुण्यदेशीं, पुण्यकालीं, सत्पात्र ब्राह्मण, ज्या पासून उपकार न होणारा, अशा ब्राह्मणास जो दान देतो तें सात्विक जाणावें. या पुरुषा पासून आपल्यास उपकार होईल अशा फलाच्या उद्देशानें जो दान करितो तें राजस जाणावें. देश व काल रहित आणि अपात्र ब्राह्मण यास जो दान देतो तें दान तामस आहे असें शिष्ट बोलतात. आतां ओम्, तत्, सत्, हीं तीन प्रकारचीं ब्रह्माचीं नामें आहेत म्हणून या नाम निर्देशें करून ब्राह्मण, वेद, यज्ञ, हे पूर्वीं मीं उत्पन्न केले त्या कारणास्तव ब्राह्मणांच्या यज्ञादिक क्रिया ओंकाराचा उच्चार करून निरंतर होतात. मोक्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानीं फलेच्छा टाकून यज्ञादि कर्में तें तत् त्या निर्देशानें करितात. आतां साधुभाव आणि लोकांत या पुरुषास पुत्र आहे व वेदाचे ठायीं जगास कारण ब्रह्म आहे. प्रशस्त कर्म विवाहादिक इत्यादिकांचे ठायीं सत् शब्दाचा निर्देश योजितात. हे अर्जुना, पुरुषानीं श्रद्धा टाकून जो होम केला व दान केलें तप आणि दुसरें जें कांहीं स्तुति नमस्कार रूप कर्म केलें त्यांस असत् आहे असें म्हणतात, कारण अश्रद्धेनें केलेलें कर्म त्या लोकीं आणि परलोकीं फल देणारें होत नाहीं. अ. वि. या अ. आहे.

४२. अध्याय बेचाळिसावा — अर्जुन प्रश्न करितो हे भगवन्, संन्यास व त्याग या शब्दांचा अर्थ एक आहे किंवा भिन्न आहे हें मला सांगा? असें ऐकून श्रीभगवान् सांगतात हे अर्जुना, चातुर्मास्य, इष्टि, पशु, सोम, इत्यादिक कर्मांचा त्याग त्यास कोणी संन्यास असें म्हणतात. कोणी सर्व कर्मांच्या फलाचा जो त्याग त्यास त्याग असें म्हणतात. कोणी बुद्धिमंत दोष उत्पन्न करणारीं कर्में आहेत त्यास्तव त्यांचा त्याग करावा असें म्हणतात. कोणी यज्ञ, दान, तप, हीं कर्में टाकूं नयेत असें म्हणतात. या दोहों पैकीं निश्चय मी तुला सांगतों तो असा कीं, त्याग तीन प्रकारें सांगितला आहे, यास्तव यज्ञ, तप, दान, हीं कर्में फलेच्छा सोडून करावींत, कारण हीं कर्में ज्ञानी पुरुषास पवित्र

करणारीं आहेत असा माझा निश्चय आहे. हे अर्जुना, नित्य कर्मांचा त्याग करणें हें योग्य नाहीं. कोणी पुरुषानीं मोहें करून त्यांचा त्याग केला तर तो त्याग तामस जाणावा. शरीरास क्लेश होतील ह्मणून त्याग केला तर तो राजस जाणावा. जो पुरुष संग व फलें यांचा त्याग करून नित्य व नैमित्तिक कर्में करितो तो त्याचा त्याग सात्विक जाणावा. जो सत्वगुणी पुरुष काम्य व निषिद्ध कर्में प्राप्त झालीं असतां त्यांचा द्वेष करीत नाहीं व पुण्य कर्मांचेठायीं मी कर्ता ह्मणून अभिमान करीत नाहीं तो सात्विक त्यागी जाणावा. जो सर्व कर्म फलांचा त्याग करतो तो परमार्थ जाणणारा होतो. आतां कर्मांचें फल तीन प्रकारचें आहे त्यांत अनिष्ट ह्मणजे पशु व पक्षी इत्यादिकांचें जन्म येणें, इष्ट ह्मणजे देवादिकांचे शरीर प्राप्त होणें, मिश्र ह्मणजे मनुष्य शरीर, हें तीन प्रकारचें फल त्याग न करणारास होतें, सन्याशास तें फल होत नाहीं. हे अर्जुना, शरीर, कर्ता, इंद्रियादि तत्व समुदाय, नानाप्रकारचे प्राणादिकांचे व्यापार, दैव, हीं पांच कारणें मनुष्याच्या कर्मसिद्धीस कारण आहेत त्यांचा कर्ता आत्मा आहे असें पहाणारा मूर्ख जाणावा. ज्या पुरुषास मी कर्ता ह्मणून संशय कधींच बुद्धिवर येत नाहीं त्यानें तीन लोकांचें हनन केलें तरी त्यास बंध होत नाहीं. ज्ञान, ज्ञेय, परिज्ञाता, हे तीन प्रकार. तसेंच कारण, कर्म, कर्ता, हे तीन प्रकार आहेत त्यांत सर्वांभूतीं एक भाव पहाणारा त्याचें सात्विक ज्ञान. पृथक् भेदें करून पहाणाऱ्याचें राजस. ईश्वर नाहींच असें जें ज्ञान त्यास तामस ज्ञान ह्मणतात. फलेच्छा टाकून केलेलें कर्म सात्विक जाणावें. कामाच्या इच्छेनें जें कर्म तें राजस. मोहें करून हिंसादिक केलेलें तें तामस जाणावें. संगादिक टाकणारा कर्ता सात्विक, कर्मफलाची इच्छा करणारा राजस. आळशी, दीर्घसूत्री, अयुक्त, असा जो तो तामस जाणावा. आतां बुद्धि व धृति यांचे तीन तीन प्रकार सांगतों. बंध व मोक्ष यांस जो जाणतो त्याची सात्विकी बुद्धि, कार्याकार्य संशयरूप बुद्धि ज्याची ती राजसी, अधर्मास धर्म ह्मणणाऱ्याची तामसी बुद्धि जाणावी. जो पुरुष धैर्यानें मनादिक आपले स्वाधीन ठेवितो तें त्याचें सात्विक धैर्य जाणावें. ज्या धैर्यानें फलाची इच्छा करितो तें धैर्य राजस, शोकादिक न टाकणारा त्याचें

धैर्य तामस जाणावें. आतां तीन प्रकारच्या सुखांत पूर्वी विषा सारखें असू-न पश्चात् अमृता सारिखें तें सात्विक सुख जाणावें. प्रथम अमृता सारिखें असून पुढें विषा सारिखें तें राजस सुख जाणावें. निद्रा व आलस्यादिकांनीं युक्त जें सुख तें तामस जाणावें. हे तीन गुण प्राणिमात्रांत आहेत. शम, द-म, तपादिक कर्में करावीं हा ब्राह्मणाचा स्वभाव, शौर्यादिक कर्में हा क्षत्रि-याचा स्वभाव. पशुपालन, क्रयविक्रयादिक हीं कर्में करणें हा वैश्याचा स्व-भाव जाणावा. तीनं वर्णांची सेवा करणें हा शूद्राचा स्वभाव जाणावा. आ-तां आप आपले स्वभाव विहित कर्म करणारा मनुष्य सिद्धि जाणतो. पर-धर्माहून आपला स्वधर्म कल्याण करणारा आहे यास्तव दोष युक्त आप-ले स्वभावाचें कर्म जरी आहे तरी त्याचा त्याग करूं नये हे अर्जुना, जो निरि-च्छ झाला तो सन्यासानें नैष्कर्म्य सिद्धीस पावतो या विषयीं संक्षेपानें तुला सांगतों. शुद्ध बुद्धीनें युक्त होऊन धैर्यानें आत्म्याचें नियमन करावें आणि शब्दादि विषय व राग द्वेषादिक टाकून ध्यानयोगाचा आश्रय करावा. मग प्र-सन्नास्वस्थ, शांत असा योगी ब्रह्मभावा कारणें योग्य होतो. नंतर माझी भ-क्ति त्यास होते. मग जेव्हां मी आहें तेव्हां मला जाणून स्वरूपाचेठायीं प्रवेश करितो. असा माझा भक्त माझ्या प्रसादानेंच शाश्वत पदास पावतो तेव्हां तूं निरंतर माझेठायींच चित्त ठेव म्हणत्या योगानें सर्व संकटांतून मु-क्त होशील. हे अर्जुना, ज्या अहंकाराचा आश्रय करून युद्ध करीत नाहीं असें तूं मानितोस तो अहंकार मिथ्या आहे, कारण माझी प्रकृति तुझे कडू-न युद्ध करवील. पृथिव्यादिक महाभूतें व सर्व आणि यांच्या अंतर्यामी रहा-णारा ईश्वर आपले स्वसामर्थ्यानें सर्व भूतांचें ऊर्ध्व व खालीं भ्रमण करि-तो त्यास तूं शरण जा म्हणजे त्याच्या प्रसादानें तूं विष्णुपदास पावशील. हे अर्जुना, या प्रमाणें गोप्य जें ज्ञान तें मी तुला सांगितलें. आतां सर्व गोप्या-हून गोप्य माझें भाषण श्रवण कर. तूं माझेठायीं मन ठेव आणि माझा भ-क्त हो. पूजा व नमस्कारादिक मलाच कर म्हणजे माझे स्वरूपास पावशील हें प्रतिज्ञेनें मी तुला सांगतों. तूं सर्व धर्म व अधर्म मला अर्पण करून मला-च शरण ये म्हणजे मी सर्व पापा पासून तुला मुक्त करीन शोक करूं नकोस.

आतां हें गीताशास्त्र भक्त्यादिकानीं शून्य जो पुरुष त्यास न सांगतां माझ्या भक्तास सांग ह्मणजे त्या सांगणाऱ्या पुरुषास माझ्या स्वरूपाची प्राप्ति होते आणि मनुष्यामध्यें त्या पुरुषा सारिखा प्रिय करणारा अन्य कोणी एक नाहीं. आतां आह्मां उभयतांचा संवाद रूप या ग्रंथाचें जो अध्ययन करितो त्या पुरुषानें ज्ञान यज्ञें करून माझें यजन केलें, अशी माझी बुद्धि होते व श्रवण करणारा पुरुष मुक्त होऊन उत्तम लोकास पावेल हे अर्जुना, हें गीताशास्त्र ऐकल्यानें तुझा मोह नाश पावला किंवा नाहीं? हें ऐकून अर्जुन ह्मणतो हे भगवन्, माझा मोह नाश पावून आपले स्वरूपाचें ज्ञान मला झालें. आतां मी निःसंशय झालों तुमचे सांगण्या प्रमाणें युद्ध करितों. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, या प्रमाणें वासुदेव व अर्जुन या उभयतांचा संवाद मी व्यासाच्या प्रसादानें झालेला दिव्यचक्षुलाभ येणेंकरून ऐकिला. हे राजा, साक्षात् श्रीकृष्ण सांगणारा आणि अर्जुन ऐकणारा या उभयतांच्या संवादाचें मला वारंवार स्मरण होऊन हर्ष होत आहे व श्रीकृष्णानें अर्जुनास दाखविलेल्या रूपाचें स्मरण झालें ह्मणजे परम विस्मयानें मला पुनःपुनः हर्ष होतो. हे राजा, ज्या ज्या पक्षाचेठायीं योगाचा ईश्वर श्रीकृष्ण आहे. तसाच ज्या पक्षीं गांडीव धनुष्य धारण करणारा अर्जुन आहे त्या धर्मराजाच्याच पक्षाचेठायीं दिव्य सभादिक शोभा, विजय, ऐश्वर्य, हें निश्चयेंकरून होणार असा माझा अभिप्राय आहे तस्मात् तूं पांडवांशीं सख्य करावेंस हें चांगलें आहे. अ· वि· या अ· आहे.

४३. अध्याय त्रेचाळिसावा – वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पद्मनाभाच्या मुखकमला पासून निघाली जी गीता तीचें पठण केलें असतां अन्यशास्त्र अवलोकनाचें काय प्रयोजन आहे. गीता सर्व शास्त्रमयी आहे. हरी सर्व देवमय आहे, गंगा सर्व तीर्थमय आहे व मंत्र सर्व वेदमय आहे. गीता, गंगा, गायत्री व गोविंद हे च्यार गकार ज्याच्या हृदयांत आहेत त्यास पुनर्जन्म नाहीं. या गीतेंत केशवानें सहाशेंवीस, अर्जुनानें सत्तावन्न, संजयानें सदुसष्ट व धृतराष्ट्रानें एक असे श्लोक कथित केले आहेत. या

प्रकारें श्रीकृष्णानें भारत सागराचें मंथन करून गीतारूप अमृतसार का-
ढलेलें धनंजयाच्या मुखामध्यें हुत केलें. संजय बोलतो हे धृतराष्ट्रा. श्रीकृ-
ष्णानें अर्जुनास गीतेचा बोध केल्यावर अर्जुनानें धनुष्यबाण धारण के-
लें हें पाहून संपूर्ण महारथ्यानीं नाद केला. तसेच पांडव व सृंजय यांच्या
अनुरोधानें वागणाऱ्या वीरानीं हर्षानें शंखनाद केले तेव्हां भेरी इत्यादि वा-
द्यें एका एकीं वाजूं लागलीं तो शब्द तुमुल झाला त्या काळीं गंधर्वांसह-
वर्तमान देव, पितर, सिद्ध, चारण यांचे समुदाय व भाग्यवान ऋषी, इंद्रा-
स पुढें करून युद्ध पहाण्यास आले. समुद्रा सारख्या दोन्ही सेना युद्धा-
र्थ उभ्या राहिलेल्या पहातांच युधिष्ठिर राजा धनुष्य बाण टेवून पादचारी
भीष्माकडे चालला हें पाहून श्रीकृष्ण व बंधूं सहित अर्जुन व सकल पार्थि-
व त्याच्या मागें गेले असतां अर्जुन, भीमसेन, नकुल, सहदेव, बोलतात हे
युधिष्ठिरा, तूं आम्हांस टाकून पादचारी प्राङ्मुख होऊन शत्रुसेनेमध्यें कां-
जातोस? असें ऐकून धर्मराज तसाच पुढें चालला. तेव्हां कृष्ण हास्य करी-
त बंधूंस बोलला कीं, मी याचा अभिप्राय जाणला. भीष्म, द्रोण, कृपाचा-
र्य, व शल्य हे याचे गुरु आहेत. यास्तव हा त्यांस नमस्कार करावयास चाल-
ला आहे असें श्रीकृष्ण बोलत आहे तों दुर्योधनाच्या सैन्यांत मोठा हाहा:
कार झाला. कित्येक धर्मराजास पाहून बोलले कीं, हा आपले भ्रात्यांचें
रक्षण होण्याकरितां येऊन रक्षणाची याचना करतो काय हो हें आश्चर्य-
कीं, अर्जुन, भीमसेन, नकुल, व सहदेव हे याचे नाथ असून हा भीती पाऊ-
न कसा येतो. याजवरून वाटतें कीं, हा विख्यात क्षत्रिय कुळांत उत्पन्न झा-
ला नाहीं. हा अल्प सत्व असल्यामुळे याचें हृदय संग्रामामध्यें भीति पाव-
तें. यां प्रकारें ते सैनिक भाषण करून कौरवांची प्रशंसा करीत हर्षानें वस्त्रें
उडवूं लागले. पुनः ते सकल सैनिक बंधू व केशव यां सहवर्तमान धर्मराजा-
ची निंदा करून निःशब्द झाले. हा धर्मराज काय बोलेल, भीष्म काय उत्तर दे-
तील, रणश्लाघी भीमसेन व अर्जुन हे काय भाषण करतील यांचें इच्छित
काय आहे याविषयीं उभय सेन्यांमध्यें मोठा संशय उत्पन्न झाला. नंतर
धर्मराज बाणशक्तींनीं युक्त जी शत्रुसेना तीमध्यें भ्रात्यां सह वर्तमान प्र-

वेश करून प्रथम भीष्माकडे गेला आणि दोनीं हस्तानीं त्याचे चरण धरून भाषण करूं लागला हे भीष्मा, मी तुझी आज्ञा घेऊन तुजसहवर्तमान युद्ध करण्याची इच्छा करितों यास्तव मला अनुमोदन देऊन आशीर्वाद द्यावा. असें ऐकून भीष्म बोलतात हे धर्मराजा, युद्धाचे पूर्वीं जर तूं आला नसतास तर तुझा पराजय होण्याचा शाप दिला असता; परंतु तुझ्या आगमनें करून मी संतुष्ट झालों. तूं संग्रामामध्यें जय पावशील हे महाराजा, कौरवानीं मला अर्थें करून बद्ध केलें आहे यास्तव मी क्लीबासारिखें तुला भाषण करतों कीं, युद्धाहून अन्य जें मागशील तें तुला मी देण्यास सिद्ध आहें. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे महाराजा, कौरवांकरितां तुम्ही युद्ध करा; परंतु माझें हित होईल असा विचार करून साह्य करा हेंच माझें मागणें आहे. असें ऐकून भीष्म बोलतात हे कुरुनंदना, परार्थ मी युद्ध करीत असतां तुझें साह्य कसें करूं याशिवाय तुला इच्छित जें असेल तें माग. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करितो हे भीष्मा, अपराजित अशा तुम्हांस आम्हीं संग्रामांत कसें जिंकूं. असें ऐकून भीष्म भाषण करितात हे कौंतेया, साक्षात् इंद्र जरी माझ्याशीं युद्धार्थ आला तथापि तो मला जिंकण्यास समर्थ होणार नाहीं. असें ऐकून युधिष्ठिर प्रश्न करितो कीं, तूं आपल्या पराजयाचा उपाय कांहीं तरी मला सांग ? असें ऐकून भीष्म बोलतात हे धर्मा, संग्रामामध्यें मला कोणी जिंकील असें मी पहात नाहीं व सांप्रत माझा मृत्युकालही नाहीं यास्तव पुनः ये म्हणजे माझ्या वधाचा उपाय मी तुला सांगेन. तेव्हां धर्मराज त्यास नमस्कार करून बंधूंसहवर्तमान द्रोणाचार्यांच्या रथाकडे गेला आणि त्यास नमस्कार करून आपले कल्याणार्थ बोलला कीं, हे आचार्य, मी आपली आज्ञा घेऊन तुजसहवर्तमान युद्ध करण्याची इच्छा करितों तर आम्हीं शत्रूंस कसें जिंकूं. असें ऐकून द्रोण भीष्माप्रमाणेंच बोलून म्हणतात हे धर्मा, तुझा जय होईल युद्ध कर जय पावशील. साधारण असा निश्चय आहे कीं, जिकडे धर्म तिकडे कृष्ण आणि जिकडे कृष्ण तिकडेच जय होणार. हे कौंतेया, जा आणि युद्धास आरंभ कर. याशिवाय तुला काय मागावयाचें असेल तें माग.

असें ऐकून धर्म बोलतो हे द्विजश्रेष्ठा, मी तुह्मांस कसा जिंकीन- हें ऐकून आचार्य भाषण करितात हे धर्मराजा, जों पर्यंत मी रणामध्यें युद्ध करीत आहें तों पर्यंत तुझा जय व्हावयाचा नाहीं यास्तव माझ्या नाशाविषयीं बंधूं सहवर्तमान शीघ्र यत्न कर. असें ऐकून धर्मराज बोलतो हे आचार्य, आपल्या वधाचा जो उपाय असेल तो मला सांगा. असें ऐकून आचार्य भाषण करितात हे तात, मी युद्ध करीत असतां मला मारील असा कोणी पुरुष दिसत नाहीं, कदाचित् सत्य भाषण करणाऱ्या पुरुषापासून रणामध्यें महान् अप्रियवाक्य ऐकून रणांत शस्त्र ठेवीन त्या कालीं मला मारावें. असें ऐकून धर्मराज कृपाचार्याकडे गेला तेव्हां कृपाचार्य भीष्मद्रोणासारखें बोलून ह्मणतात हे धर्मा, मी तर अवध्य आहें तथापि तुला जय प्राप्त होईल. असें ऐकून धर्मराज शल्याकडे गेला तेव्हां शल्यही पूर्ववत् बोलून ह्मणतो हे धर्मा, मी तुझें कोणतें सहाय करूं असें ऐकून धर्मराज ह्मणतो जो तुह्मी संग्रामांत कर्णाचा तेजोभंग करीन असा मला वर दिल्हात तोवर सत्य करा. असें ऐकून शल्य बोलतो हे राजा, तूं युद्ध कर तुझा मनोरथ मी पूर्ण करीन. असें ऐकतांच धर्मराज शल्याची आज्ञा घेऊन बंधूं सहवर्तमान आपले सैन्यांत गेला, तेव्हां कृष्ण पांडवां करितां कर्णाकडे जाऊन बोलतात हे राधेया, मी असें श्रवण केलें कीं, तूं भीष्माच्या द्वेषास्तव युद्ध करीत नाहींस, यास्तव पांडव व कौरव यांवर जर तुझी समदृष्टी आहे तर जों पर्यंत भीष्म जिवंत आहेत तों पर्यंत आमचें साह्य कर, भीष्म मरण पावल्या नंतर तूं पुनः संग्रामामध्यें दुर्योधनास साह्य कर. असें ऐकून कर्णानें उत्तर केलें कीं, हे कृष्णा धार्तराष्ट्राचें कधीं मी विप्रिय करणार नाहीं. असें ऐकतांच श्रीकृष्ण माघारा फिरून मार्गांत पांडवांस मिळून आपले सैन्यांत आला. नंतर दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं धर्मराज उभा राहून मोठ्यानें असें बोलला कीं, या काळीं जो आह्मांस साह्य करण्यास येईल त्याचा मी अंगिकार करीन. असें ऐकतांच युयुत्सूनें धर्मराजास भाषण केलें कीं हे महाराजा, संग्रामामध्यें जर तूं मला आपलेकडे घेशील तर तुह्मांकरितां मी धृतराष्ट्रपुत्रांशीं युद्ध करीन. हें ऐकून ध-

र्मे बोलला हे युयुत्सु, तूं आह्मांकडे ये. वासुदेव तूं व आह्मीं सर्व मिळून अपंडित जे तुझे बंधू यां सहवर्तमान युद्ध करूं. धृतराष्ट्राच्या संततीचा तंतु तूंच राहून पुढें त्यांस पिंड देणारा तूंच रहाशील असें दिसतें. असें ऐकतांच युयुत्सु धृतराष्ट्रपुत्रांस सोडून आपल्या दुंदुभी वाजवीत पांडवसेन्यांत आला. नंतर युधिष्ठिर व त्याचे भ्राते आपआपल्या रथामध्यें बसून पूर्वी जसे व्यूहांत उभे होते तसेंच उभे राहून सिंहनाद करूं लागले. त्याकाळीं समग्र सैन्यामध्यें पांडव रथस्थ झालेले पाहून धृष्टद्युम्नादि राजे पुनः हर्षित झाले. पुरुषांचा सत्कार करणारे जे पांडुपुत्र यांचे गौरव व ज्ञाती विषयीं त्यांचें सौहृद कृपा व दया किती आहे हें पाहून सर्व राजे परस्पर त्यांचें कीर्तन करूं लागले. तशाच सैन्यामध्यें शाबास शाबास अशा कीर्तिमान पांडुपुत्रांच्या पुण्यवाणी मनास हर्ष करणाऱ्या निघाल्या. म्लेंच्छ व अन्य कुलिन राजे पांडुपुत्रांचें चरित्र पाहून व ऐकून किती एकांस सुख व किती एकांस दुःख झालें. अ. नि. या अ. आहे.

४४. अध्याय चौवेचाळिसावा. - धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, माझे व इतर योद्धे व्यूहरचना करून उभे राहिले असतां पूर्वी कोणी प्रहार केले. असें ऐकून संजय भाषण करितो हे राजा, दुर्योधनाचें वाक्य ऐकतांच दुःशासन भीष्मास पुढें करून सेनेंसहवर्तमान रणांगणीं गेला. तसेंच भीमसेन प्रभृती पांडव भीष्माशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें पुढें आले. दोन्हीं सेनेमध्यें सिंहनाद व अश्व कुंजर यांचे शब्द होऊं लागले. परस्पर सैनिक एकमेकांवर धांवून जात असतां मोठा तुमुल शब्द झाला. अशी कौरव पांडवांची महान् सेना शंख व मृदंग नादानें वायूनें वनकंपित झाल्या सारखी झाली. विद्युल्लतांच्या शब्दानें जसे लोक त्रस्त होतात तसे भीमसेनाच्या गर्जनेनें तुझे योद्धे त्रस्त झाले. सिंहाच्या शब्दानें इतर मृग मलमूत्र स्राव जसा करितात तशी सर्व वाहनें मलमूत्रस्राव करूं लागलीं. भीमसेन येतो हें पाहून दुर्योधनाचे कनिष्ठ बंधू बाणसमुदायानीं भीमास आच्छादित करून राहिले. नंतर दुर्योधन, दुर्मुख इत्यादि तुझे पुत्र हे विद्युल्लते सहवर्तमान मेघा सारखी महा धनुष्यें कंपित करीत उभे

राहिले. नंतर पांडवांकडील द्रौपदीचे पांच पुत्र. महारथी अभिमन्यु. नकुल. सहदेव व धृष्टद्युम्न हे धृतराष्ट्र पुत्रांस पीडित आले. हा प्रथम संग्रामीं तुझे व पांडवांचे योद्धे प्रत्यंचेचा भयंकर शब्द व गर्जना करीत असतां कोणीही पराङ्मुख झाले नाहींत. हे भरतश्रेष्ठा. लक्ष वेधी व बाण सोडणारे जे द्रोणशिष्ययांचें हस्तलाघव मी पाहिलें. नंतर सर्व राजे आपल्या देहाची निवृत्ति करण्याकरितां एकमेकांवर आवेशानें धांवले. त्या कुरु पांडवांच्या गजाश्व रथांनीं व्याप्त ज्या सेना त्या चित्रित पटासारख्या दिसूं लागल्या. हे राजा. उभयतांच्या सेनासमागमानें पृथ्वीपासून जें रज उडालें तेणेंकरून सूर्य अंतर्धान पावला. स्वकीय व परकीय सैन्यामध्यें कोणी भग्न होऊन माघारा फिरलेला दिसला नाहीं. असें तें युद्ध भयंकर झालें असतां सर्व सैन्यांचें अतिक्रमण करून तुझा पिता भीष्म अतिशोभायमान दिसूं लागला. अ. दि. या अ. आ.

४५. अध्याय पंचेचाळिसावा :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा. त्या प्रथम भयंकर दिवसाच्या पूर्वार्धीं महा घोर राजांच्या देहांचें कंदन करणारें असें युद्ध प्रवृत्त झालें. जयाची इच्छा करणारे जे कुरु संजय यांच्या संग्रामामध्यें सिंहनादाप्रमाणें महान् नाद उत्पन्न झाल्यामुळें आकाश व भूमि नादित झाली. त्याकाळीं धनुष्यांचा टणत्कार. पदातींचा पादशब्द, आयुधांचा शब्द. गजांच्या घंटांचा शब्द. परस्पर धांवत असतां पर्जन्य नादासारखा रथांचा घडघडाट शब्द भयंकर रोमांच उभा करणारा असा झाला. हे राजा. तुझेकडील योद्धे पांडवांवर धांवून येत असतां स्वतः भीष्म धनुष्य घेऊन धनंजयावर धांवतांच अर्जुनही गांडीव धनुष्य घेऊन गांगेयावर धांवला. ते उभयतां परस्पर वधेच्छु रणामध्यें आले असतां परस्परांस कंपित करण्यास समर्थ झाले नाहींत. सात्यकी. कृतवर्म्याच्या सन्मुख आला असतां उभयतांचें युद्ध रोमहर्षण झालें. महाधनुर्धारी अभिमन्यु व कोसलदेशाचा राजा बृहद्बल या उभयतांचें युद्ध होत असतां बृहद्बलानें अभिमन्यूचा ध्वज छेदून सारथ्यास पाडतांच अभिमन्यूनें आपला सारथी नष्ट झाला हें पाहून नव बाणांनीं बृहद्बलास वेधून त्याचे सारथ्यास छिन्न केला. नंतर त्यानें हें वैर उत्पन्न केलें असा जो तुझा

पुत्र दुर्योधन यासहवर्तमान भीमसेन युद्ध करूं लागला. त्यांचें युद्ध संपूर्ण भूतांनीं पहातांच तीं विस्मय पावलीं. दुःशासनानें नकुलाशीं, युधिष्ठिर राजा स्वतः मद्रराजाशीं, धृष्टद्युम्नानें द्रोणाशीं, शिशुपालाचा पुत्र धृष्टकेतु बाल्हीकाशीं, अलंबुष घटोत्कचाशीं, शिखंडी अश्वत्थाम्याशीं, भगदत्त विराटाशीं, कैकेय जो बृहत्क्षत्र तो कृपाचार्याशीं, द्रुपदराजा जयद्रथाशीं, तुझा पुत्र विकर्ण सुतसोमकाशीं, चेकितान सुशर्म्याशीं, धर्मपुत्र प्रतिविंध्य शकुनीशीं, कांबोजराजा सुदक्षिणाशीं, अर्जुनपुत्र इरावान् श्रुतायूशीं, अवंतीदेशाचे राजे विंदानुविंद महारथी कुंतिभोजाशीं, कैकेय पंचभ्राते सैन्यांसहवर्तमान् पांच गांधाराशीं, तुझा पुत्र वीरबाहु उत्तराशीं, चेदिराज उलूकाशीं, या प्रमाणें ते सर्व योद्धे परस्परांशीं युद्ध करीत होते. या प्रकारें रथ, अश्व, गज व पायदळ यांचीं सहस्रशः द्वंद्व युद्धें तुझ्या व पांडवांच्या सेन्यामध्यें एक मुहूर्त पर्यंत मधुर दर्शन जहालीं. नंतर उन्मत्ता साररवें घोर युद्ध प्रवृत्त झालें असतां कोणास कांहीं दिसेनासें झालें. तें युद्ध परम दुर्धर्ष होत असतां संपूर्ण सैनिक व्याकूळ झाले. देव, ऋषी, सिद्ध, चारण हे देवासुरांसाररव्या या युद्धास पहाण्यास आले असें युद्ध होतां होतां कांहीं काळानें हजारों गज, रथ, अश्व व पदात्यांचे समुदाय हे सर्व तो द्वंद्व युद्ध क्रम टाकून निर्मर्याद युद्धास प्रवृत्त झाले. अ॰ चि॰ या अ॰ आहे.

४६. अध्याय शेचाळिसावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, लक्षावधी पायदळ सहस्रशः पदाती निर्मर्याद युद्ध करूं लागले तें तुला सांगतो. त्या युद्ध प्रसंगीं पुत्र पित्यास, पिता औरस पुत्रास, भ्राता भ्रात्यास, भागिनेय मातुलास मातुल भागिनेयास व सरवा सरव्यास हे एकमेकांस ओळरवेनासे झाले. भूत बाधेनें पीडित झाल्या साररवे पांडव कौरवांसहवर्तमान युद्ध करूं लागले. कोणी रथदंडानीं रथदंड भग्न केले. कोणी सन्मुरव होऊन मारण्याच्या इच्छेनें युद्ध केलें. मदस्रावी गज गजाशीं येऊन युद्ध करीत असतां त्यानीं परस्परांचें विदारण केलें. मदोन्मत्त गज परस्पर युद्ध करीत असतां क्रौंच पक्ष्या साररवा नादक

रून पळाले. त्या गजांचे पादरक्षक आयुधें घेऊन पलायन करीत असतां परस्पर मारण्याच्या इच्छेनें धांवतात असें दिसलें. परस्पर शूर धांवत असतां मनुष्यांच्या रक्तानीं भरलेले खड्ग शोभायमान दिसूं लागले. वीरानीं वीरांस अधोमुख पाडून त्यांच्या मर्माचे ठायीं खड्गपात करीत असतां त्याचा तुमुल शब्द झाला. गदा, मुसल व उत्तम खड्ग यांनीं भिन्न झालेले जे प्राणी त्यांचा शब्द नरकांतील प्राण्या सारखा होऊं लागला. कित्येक अश्वारोह चामर व शिरोभूषणें धारण करून एकामेकांच्या सन्मुख आले तेव्हां जांबूनदविभूषित बाणांचा परस्परानीं वर्षाव केला. कित्येक गजानीं अश्वांचें अतिक्रमण करून आपल्या पायानीं मर्दन केलें. युद्धाची गर्दी झाली असतां कित्येक गज आपल्या उन्मादाच्या योगानें अश्वारूढ योध्यांस शुंडाग्रानीं ताडण करून पृथ्वीवर पाडून रथसमुदायांमध्यें भ्रमण करूं लागले. कित्येक वीरानीं आपल्या हस्तानीं टाकलेल्या शक्ति नराश्व देहाचें व लोहमय कवचाचें भेदन करून विमल उल्के प्रमाणें पतनपावल्या चित्र विचित्र व्याघ्रचर्माच्या कोशामध्यें ठेवलेले खड्ग प्रयोग काळीं विकोश होऊन रणामध्यें शत्रूंचा नाश करून गेले. तेच खड्ग पुनः एकाकीं उड्डाण करून कांहीं अंगाचें विदारण झालेल्या वीरांस स्वपराक्रम दाखवीत पतन पावले. कोणी वीर खिळ्यानीं विदारित झालेले, कोणी परशूनीं छिन्न झालेले, कोणी गजानीं मर्दित केलेले आक्रोश करूं लागले. कोणी आपले पित्यास, कोणी मित्रासहवर्तमान भ्रात्यास, कोणी मातुलास, कोणी भागिनेयास, कोणी इतर जनांस हांकामारूं लागले. कोणी रक्तानीं भरलेलें वक्लिष्ट झालेले वीर आपली व तुझ्या पुत्राची निंदा करूं लागले. हे राजा, त्याकाळीं ठिकठिकाणीं कोणी दंतें करून आपल्या ओंठाचें दंशन करून भयादिक उत्पन्न करूं लागले असा महान् क्षय होत असतां सैन्यामध्यें मोठे भयंकर शब्द होऊं लागले. त्या काळीं पांडवांची सेना भीष्मास पहातांच कंपित झाली. अ. वि. या अ. आहे.

४७. अध्याय सत्तेचाळिसावा - संजय बोलतो हे धृतराष्ट्र रा-

जा, त्या दिवशीं पूर्वाण्ह भाग गेला असतां महाभयंकर संग्रामामध्यें तुझा पुत्र जो दुर्योधन याच्या प्रेरणेनें दुर्मुख, कृतवर्मा, कृपाचार्य, शल्य व विविंशति त्या अतिरथ्यानीं भीष्माचें रक्षण केलें. भीष्मानीं पांडवांच्या सेनेंत प्रवेश केल्यानंतर चेदि, करुष, काशि, पांचाल, यांमध्यें आपला ध्वज दृश्यमान करून महान् वेगवान् भल्ल बाणानीं जूं व ध्वजा सहवर्तमान कित्येक रथ्यांचीं शिरें भग्न केलीं. त्याकाळीं अभिमन्यु पिंगट वर्णाच्या अश्वानीं युक्त जो रथ त्यामध्यें बसून भीष्माकडे येऊन त्यांस व दुर्मुख प्रभृती योध्यांस ताडण करून एका तीक्ष्ण बाणानें भीष्माचा ध्वज छेदून त्याशीं युद्ध करूं लागला. त्यानें एका बाणानें कृतवर्म्यास, पांच बाणानीं शल्यास, नऊ बाणानीं पुनः प्रपितामहास ताडण केलें. दुसरा एक आकर्ण पर्यंत बाण ओढून त्या बाणानें सुवर्ण विभूषित भीष्माचा ध्वज छिन्न केला. भल्ल बाणानें दुर्मुखाच्या सारथ्याचें शिर हरण केलें. दुसऱ्या एका भल्ल बाणानें नृत्य करितां करितां सुवर्ण विभूषित कृतवर्म्याचें धनुष्य छेदन करून पुनः तीक्ष्णाग्र बाणानीं सर्वांस ताडण केलें. हें पाहून देवता संतुष्ट झाल्या. भीष्म प्रमुख योध्यांनीं अभिमन्यूस साक्षात् अर्जुनच काय असें मानिलें. अभिमन्यु आपलें हस्तलाघव प्रदर्शित करीत असतां दहादिशेस भ्रमण करणारें जें त्याचें धनुष्य तें गांडीव धनुष्या सारखें शोभलें. त्या काळीं भीष्मानें नवू बाणानीं अभिमन्यूस वेधून तीन भल्ल बाणानीं त्याचा ध्वज छेदून त्याचे सारथ्याचा वध केला. तसेच कृपाचार्य, कृतवर्मा, व शल्य हे अभिमन्यूस वेध करीत असतां तो मैनाक पर्वता सारखा अचल उभा राहून पांच महारथ्यांवर त्यानें बाण वृष्टि करून भीष्मावर ही शर वर्षाव केला. असें अभिमन्यु युद्ध करीत असतां त्याचें बाहुबल महत् दृष्टीस पडलें. अभिमन्यु युद्ध करीत असतां भीष्मानेंही बहुत बाणें करून त्यास ताडन केलें. अभिमन्यूनें भीष्म धनुष्यापासून सुटलेल्या बाणांचें छेदन करून नवू बाणानीं भीष्माचा ध्वज छेदन केला असतां कित्येक वीर आक्रोश करूं लागले तो भीष्माचा महान् स्कंदयुक्त ध्वज अभिमन्यूच्या बाणानीं छिन्न झाला असतां पृ-

थ्वीवर पतन पावलेला भीमसेनानें पहातांच अभिमन्यूस हर्षित करीत मोठ्यानें गर्जना केली. त्या भयंकर रणामध्यें भीष्म बहुत महास्त्रें प्रगट करून सहस्रशः बाणानीं अभिमन्यु सर्वेष्टित करून मोठें अद्भुत कर्म करीत असतां अभिमन्यूच्या रक्षणार्थ पांडवांकडील दहा महारथी आले. पुत्रासहवर्तमान् विराट, धृष्टद्युम्न, भीमसेन, पांच केकेय व सात्यकी हे वेगानें येत असतां शांतव भीष्मानें धृष्टद्युम्नास ताडण करून सात्यकीस प्रहार केला. एका क्षुरप्रबाणानें भीमसेनाचा ध्वज च्छेदन केला असतां तो सिंहचिन्हित ध्वज पृथ्वीवर पडला. भीमसेनानें तीन बाणानीं भीष्मास व एक बाणानें कृपाचार्यास वेध करून आठ बाण कृतवर्म्यावर टाकिले. इतक्यांत विराटपुत्र वर क्रीडा केलेल्या गजावर बसून मद्राधिपति जो शल्य याजवर धांवला असतां आपल्या रथावर उत्तर येतो हें शल्यानें पाहून गजानें निवारण करितांच त्या गजानें क्रुद्ध होऊन पायानें शल्याच्या रथयुगाचें आकर्षण करून चारी अश्वांचा नाश केला. त्या काळीं शल्यानें उत्तराचा अंत करणारी अशी शक्ति घेऊन त्याजवर फेंकतांच उत्तर भिन्न कवच होऊन पडला तेव्हां शल्यानें रथाखालीं उडी टाकून उड्डाण करून खड्गानें गजेंद्राचा शुंडादंड छेदन केला तेव्हां तोही पृथ्वीवर पडून मरण पावला. नंतर शल्य कृतवर्म्याच्या रथांत बसून युद्ध करूं लागला. आपला बंधु उत्तर मरण पावला व पुढें सात महारथी उभे आहेत हें श्वेतानें पाहून सात बाणानीं सात महारथ्यांचीं धनुष्यें छेदन केलीं तेव्हां त्यानीं ही श्वेतावर सात बाण टाकिले पुनः श्वेतानें सात बाणानीं तीं ही त्यांचीं धनुष्यें छिन्न करितांच त्यानीं श्वेतावर सात शक्ति टाकिल्या श्वेतानें त्या जवळ येण्याचें पूर्वीं सात भल्ल बाणानीं छेदन करून टाकिल्या. नंतर शल्यानें सर्व देहाचें विदारण करणारा असा एक बाण घेऊन श्वेताच्या रथावर टाकिला असतां तो बाण श्वेताचे देहांत गेला त्या काळीं श्वेत रथोपस्थांत मूर्च्छित पडला तेव्हां त्याच्या सारथ्यानें त्याचा रथ तेथून माघारा फिरविला. क्षणमात्रानें श्वेत सावध झाल्यावर हेमविभूषित सहा अश्व रथास जोडून युद्धार्थ आला आणि त्या योद्ध्यांचे ध्वज छेदून शेष राहिलेल्या

योद्ध्यांच्या अश्वांचा व सारथ्यांचा त्यानें नाश केला व त्या सर्वांस बाण वृष्टीनेंतो आच्छादित करून शल्यावर धांवला हें पाहून तुझ्या सैन्यामध्यें हलकल्लोळ झाला. त्या काळीं सैन्यांसहवर्तमान दुर्योधनानें भीष्मास पुढें करून शल्यास मृत्युमुखांतून सोडविलें. नंतर तुझ्या सैन्याचें व शत्रुसैन्याचें भयंकर युद्ध होत असतां कुरुवृद्ध भीष्मानें अभिमन्यु, भीमसेन, सात्यकि, केकेय, विराट, धृष्टद्युम्न व चेदि यांजवर बाण वर्षाव केला. भ. वि. या अ. आ.

४८. अध्याय अठ्ठेचाळिसावा:- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, श्वेत शल्य रथाजवळ आला असतां कौरव पांडव आणि भीष्म यानीं काय केलें तें मला सांग? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा. श्वेतास पुढें करून सहस्रावधी महारथी युद्धास आले असतां ते श्वेताचें रक्षण व्हावें या इच्छेनें शिखंडीस पुढें करून सुवर्ण अलंकृत जो भीष्म रथ त्याजकडे गेले ते युद्ध तुला सांगतों शांतनव भीष्मानें बहुत रथ शून्य करून कित्येक वीरांचीं मस्तकें छिन्न केलीं. भीष्मानें रथावर टाकलेल्या बाणानीं सूर्य आच्छादित झाला त्या काळीं बाणानीं विद्ध झालेली शत्रूंची शिरें असंख्यात पृथ्वीवर पडलीं. रथांवर रथ, अश्वांवर अश्व व गजांवर गज येऊन परस्पर पडूं लागले. कित्येक वीर खड्ग, भाले व बाण ईहींकरून बद्ध असतां त्यांचीं कवचें छिन्न झाल्यामुळें ते भूमीवर पडले. कित्येक द्वंद्व युद्धास प्रवृत्त होत आहेत. या प्रकारें सैन्यामध्यें गर्दी झाली असतां कोणी एक गज एकाएकीं सुटून रथासहवर्तमान रथ्यांचें मर्दन करीत सैन्यामध्यें संचार करूं लागला. कोणी एक वीर रथामध्यें बसून आपल्या बाणानीं दुसऱ्यास पीडित करीत असतां दुसऱ्या वीरानीं येऊन त्याचा सारथी मारून त्यास मारण्यास प्रवृत्त व्हावें. असें घोर युद्ध होत असतां रजःकणानें अंधःकार झाल्यामुळें एक धनुष्याचा शब्द व योद्ध्यांचा गात्रस्पर्श झाला तर मात्र ज्ञान, नाहीं तर कोणी कोणास ओळखेनासा झाला. या प्रकारें उभय सैन्यामध्यें युद्ध होत असतां परस्परांचा बाण शब्द ऐकूं येईनासा झाला. कित्येकांचीं चक्रें, कित्येकांचे यु-

ग, कित्येकांच्या धुरी भग्न झाल्या असतां सारथ्यासहवर्तमान ते रथी ती-क्ष्ण बाणानीं विद्ध होऊन पृथ्वीवर पडले. अशा संग्रामामध्यें भीष्म शत्रूंस मारित असतां कोणी भीष्मबाण लागल्या वांचून राहिला नाहीं. कोणी शीर छिन्न होऊन कोणी मर्म भिन्न होऊन पतन पावले. त्याकाळीं श्वेत, स्वतः त्या महान् संग्रामामध्यें पुढें येऊन शतशः राजपुत्रांचीं शिरें, बाहू व धनुष्यें छेदन करूं लागला. हे राजा, अशी श्वेतानें गर्दी केली असतां कित्येक श्वेतभयानें उत्तम रथांचा त्याग करून पलायन करीत तुझ्या सैन्याच्या अग्रभागीं हें युद्ध पहाण्या करितां बाणांचा टप्पा सोडून उभे राहिले. कौरव सैन्यांत भीष्ममात्र श्वेतास न भीतां मेरुपर्वता सारखा अचल उभा होता जसा वज्रपाणी संग्रामामध्यें असुरांस मारितो तसा भीष्म शत्रूंस मारित असतां ते त्यास सोडून गेले. दुर्योधन प्रियेच्छु भीष्म आपल्या जीविताची आशा सोडून एकाएकीं श्वेतावर धांवला तेव्हां श्वेतानें भीष्म आपल्या पुढें आलेला पाहून त्याजवर बाण जालांची दृष्टि केली. नंतर भीष्मानेंही श्वेतावर बाणांची दृष्टि केली उभयतांही परस्परांच्या वधाच्या इच्छेनें युद्ध करूं लागले. जर श्वेत पांडव सैन्याचें रक्षण न कर्ता तर भीष्म एक दिवसांत पांडवांची सेना नष्ट करता. श्वेतानें भीष्मास पराङ्मुख केलेला पाहून पांडवांस हर्ष झाला. तुझा पुत्र दुर्योधन विमनस्क होऊन इतर राजां सहवर्तमान पांडवसेनेमध्यें आला. हें पाहून श्वेतानें भीष्मास सोडून तुझ्या पुत्राच्या सेनेचा नाश केला. नंतर तो भीष्म उभा होता तेथें आला, श्वेतानें सात बाणानीं भीष्मास वेध केला असतां भीष्मानें त्यांचें निवारण केलें. पुनः श्वेतानें भीष्माचें धनुष्य छिन्न करून वल्लीमवाही अशा एका बाणानें ताला सारख्या ध्वजाचें शीर्ष छेदन केलें असतां तुझा पुत्रानीं भीष्माचा ध्वज छिन्न झालेला पाहून भीष्म आज श्वेतवश होऊन मृत्यु पावला असें जाणिलें. इकडे पांडवानीं शंख वाजविले हें पाहून दुर्योधनानें सैन्यांस आज्ञा केली कीं, तुम्हीं जाऊन यत्नानें भीष्माचें रक्षण करावें. अशी आज्ञा झाल्यावर ते वीर त्याजकडे पाहूं लागले असतां पुनः दुर्योधन त्यांस बोलला कीं, हे वीरहो हा

श्वेत आज भीष्मास मारील असें वाटतें. हें ऐकून कांहीं महारथी चतुरंगसै-न्यासहवर्तमान भीष्माचें पालन करण्याच्या इच्छेनें बाल्हीक, कृतवर्मा, शल, शल्य, जलसंध, विकर्ण, चित्रसेन, विविंशति, हे तरेनें भीष्माच्या संरक्षणार्थ जाऊन श्वेतावर बहुत शस्त्रवृष्टि करूं लागले. हें श्वेतानें पाहून आपलें हस्तलाघव दाखवीत त्या योद्ध्यांचें निवारण करून मोठ्या बाणवृष्टीनें भीष्माचें धनुष्य छेदन केलें. त्याकाळीं भीष्मानें दुसरें धनुष्य घेऊन कंकपत्र बाणानीं श्वेतास वेध केला असतां श्वेतानेंही तीक्ष्ण लोहमय बाणेंकरून सर्वलोक पहात असतां भीष्मास वेध केला. श्वेतानें भीष्माचें निवारण केलें हें दुर्योधनानें पाहून तो बहुत दुःखित झाला. सर्व सैन्यामध्यें असा निश्चय झाला कीं, भीष्म श्वेतवश होऊन मरण पावला. नंतर भीष्मानें श्वेतावर बहुत बाणवृष्टि केली असतां त्यानें भीष्माचें धनुष्य छिन्न केलें. भीष्मानेंही त्यास विरथी केला. श्वेतानें सुवर्णमय शक्ति घेऊन भीष्मास असें भाषण केलें कीं, हे पुरुषश्रेष्ठा या काळीं तूं उभा राहून सावधपणानें मला पहा. असें बोलून श्वेतानें सर्पोपम शक्ति भीष्मावर टाकिली असतां तुझ्या पुत्राच्या सैन्यामध्यें एकाएकीं हाहाकार झाला. हें पाहून भीष्मानें आठबाणानीं तिचे नवू तुकडे केले हें पाहून तुझे पुत्रांस हर्ष झाला. नंतर विराटपुत्रास पुढें काय करावें हें अगदीं सुचेनासें झालें. पुढें तो भीष्माच्या नाशाविषयीं एक गदा घेऊन भीष्मावर धांवला त्या काळीं भीष्म श्वेतवेग अनिवार आहे असें जाणून त्यापासून मुक्तहोण्याकरितां रथापासून भूमीवर आले इतक्यांत श्वेतानें ती गदा भीष्मरथावर टाकल्यामुळें रथाचें भस्म झालें. हें शल्यप्रभृती योद्ध्यानीं पाहून ते भीष्मसंरक्षणार्थ धांवले. नंतर भीष्म दुसरे रथांत बसून धनुष्याचा टणत्कार करीत मंदमंद गतीनें श्वेतावर जात आहे तों आकाशवाणी झाली कीं हे भीष्मा, श्वेतास मारण्याविषयीं यत्न कर श्वेताचा पराजयाचा काळ ब्रह्मदेवानीं हा नेमला आहे हें ऐकतांच भीष्म हर्षित होऊन श्वेताच्या वधाविषयीं विचार करूं लागला. हें पाहून पांडवांकडील महारथी सात्यकी, भीमसेन धृष्टद्युम्न, कैकेय, धृष्टकेतु व अभिमन्यु हे त्याचे रक्षणार्थ आले हें पाहून

भीष्म, द्रोण, कृपाचार्य व शल्य यानीं त्याचें निवारण केलें तेव्हां श्वेतानें खड्ग काढून भीष्माचें धनुष्य छेदितांच भीष्म तें धनुष्य टाकून व देवदूताच्या वाक्याचें स्मरण करीत दुसरें धनुष्य घेऊन श्वेतावर धांवले तों भीमसेन येत आहे असें पाहून त्याजवर सात, अभिमन्यूवर तीन, सात्यकीवर शंभर, धृष्टद्युम्नावर वीस, केकयांवर पांच बाण सोडून त्यांचें निवारण करीत श्वेतावर धांवले आणि मृत्युतुल्य भारसाधन एक बाण घेऊन ब्रह्मास्त्रानीं संयुक्त करून धनुष्यास आकर्षण करीत असतां देव, गंधर्व, पिशाच, उरग व राक्षस हे कौतुक पहाण्यास आले. तो बाण भीष्माच्या धनुष्यापासून सुटला असतां श्वेताचें कवच व हृदय यांचा भेद करीत त्याचें जीवित्व हरण करून गेला. हें पाहून पांडवांकडील वीरांस बहुत दुःख झालें व तुझ्या पुत्रांसहवर्तमान कौरव हर्षित झाले. हे राजा, तुझा पुत्र दुःशासन श्वेतास पडलेला पाहून घोर वाद्यांचा गजर करीत नृत्य करूं लागला. भीष्मानें श्वेतास संग्राममध्यें पाडला असतां शिखंडी प्रमुख योद्धे कोपित झाले. कृष्णार्जुन श्वेत मरण पावला असतां हळु हळु सैन्याचा अवहार करीत मागें परतले. अ. वि. या अ. ४८.

४९. अध्याय एकुणपन्नासावा — धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, संग्राममध्यें श्वेतास शत्रूंनीं मारलें असतां महाधनुर्धारी पांचाल व पांडव यांनीं काय केलें व श्वेताच्या रक्षणार्थ जे वीर होते त्यांणीं पलायन केलें हें ऐकून माझें मन फार संतुष्ट होतें; परंतु श्वेतवधार्थ प्रत्युपाय चिंतन करणारे पांडव माझ्या योद्ध्यांवर येतील असें वाटतें. भीष्म तर महावीर व वृद्ध असून कुरुपति आमचा पिता होय त्यासहवर्तमान या विराटपुत्रानें पूर्वीं वैर करून त्या भयास्तव पांडवांचा आश्रय केला व तो सर्वस्व टाकून दुर्गामध्यें जाऊन राहिला. सांप्रतकाळीं पांडवांच्या प्रतापेंकरून तो शतशः शत्रुसमुदायामध्यें अवस्थित होता. तो दुर्मति युधिष्ठिरभक्त असतां कसा मारला गेला. आतां हा पुरुषाधम दुर्योधन पातालामध्यें पडल्यासारखा झाला आहे. या दुर्योधनास युद्ध करण्यास मी, गांधारी व भीष्मादिक यांचें अनुमोदन नसतां कर्ण, शकुनि व दुःशा-

मन यांच्या विचारानें पांडवांशीं स्पर्धा केल्यामुळें त्यांस आज मोठें घोर दुःख प्राप्त झालें, कारण श्वेताचा वध झाला व भीष्माचा विजय झाला हें पाहून कृष्णासहवर्तमान अर्जुन, धृष्टद्युम्न यानीं काय केलें? हे संजया, मला असें वाटतें कीं, माझ्याच अपराधानें हे सर्व नाश पावतील. महात्म्या पांडवांचें ही मन आतां प्रज्वलित झालें आहे त्या पांडवांच्या क्रोधाची मी चिंता करीत असतां रात्रंदिवस मला चैन पडत नाहीं या करितां त्यांचें युद्ध कसें झालें तें मला सांग? असें ऐकून संजय बोलतो हे राजा, हा दोष दुर्योधनाचा नाहीं तुझाच आहे उदक गेल्यावर जसा सेतुबंध करावा तशी तुझी बुद्धि आहे. आतां त्या दिवसाचा परम दारुण असा पूर्वाण्ह भाग गेल्यावर श्वेतास भीष्मानें मारला असतां कृतवर्म्या सहवर्तमान शल्य एक रथांत बसलेला पाहून विराट पुत्र शंख शल्यावर धांवून गेला आणि त्यानें सर्वांनें निवारण करून शल्यरथावर बाणवृष्टि केली. हें पाहून कोशल बृहद्बल, मागध जयत्सेन, शल्य पुरुक्मरथ, विंदानुविंद, सुदक्षिण, कांबोज, बृहत्क्षत्राचा दायाद जयद्रथ, या योद्ध्यानीं कार्मुकें घेऊन शंखाचे मस्तकावर बाणवर्षाव केला हें पाहून शंख त्या सात योद्ध्यांचीं धनुष्यें छिन्न करून सेन्यामध्यें नृत्य करूं लागला हें पाहून भीष्मानें मेघासारखी गर्जना केली आणि तलमात्र प्रमाण धनुष्य घेऊन तो शंखावर धांवला हें पहातांच पांडव सेना त्रस्त झाली तेव्हां अर्जुन भीष्मापासून त्यानें रक्षण करावें अशा हेतूनें भीष्माशीं युद्ध करूं लागला त्या युद्ध प्रसंगीं शल्यानें गदा घेऊन शंखाचे चारी अश्व मारिले असतां शंख गदा घेऊन पळाला आणि अर्जुनाच्या रथामध्यें बसून शांति पावला. भीष्म बाणें करून पांचाल मत्स्य, केरल व प्रभद्रक बहुत मरण पावले. नंतर भीष्म सव्यसाचीस सोडून द्रुपदराजावर धांवला व त्यानें त्याचें सैन्य शरानें दग्ध केलें. द्रुपद राजाचें तें सैन्य शिशिरऋतूच्या अंतीं अग्नीनें दग्ध झालेल्या वनासारखें दिसूं लागलें. आणि भीष्म तर विधूम पावका सारखा रणामध्यें उभा राहिला. पांडव भयपीडित होऊन ते आसमंतात्भागीं आपल्यास को

संरक्षक आहे किंवा नाहीं ह्मणून पाहूं लागले. गांगेयाच्या शरानें पीडित झालेल्या पांडवसेनेंत मोठा हाहाकार झाला. इतक्यांत सूर्यही अस्ताचलीं जाण्याची संधी येऊन एकमेकांस दिसेनासे झाले तेव्हां भीष्म बहुत कोपित झाला आहे तस्मात् आतां सैन्यांचा अवहार करावा असा पार्थानें विचार केल्यावर उभयसैन्यानीं अवहार केला. अ. वि. या अ. आ.

५०: अध्याय पन्नासावा - संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, प्रथम दिवशीं सैन्यांचा अवहार झाल्यावर संग्रामामध्यें भीष्म युद्धा विषयीं सज्ज असल्यामुळें दुर्योधन हर्षित झालेला पहातांच धर्मराज सर्व बंधू व नृपती यांसहवर्तमान जनार्दनास बोलला हे कृष्णा, भीष्माचा भयंकर पराक्रम पाहिलासना. ग्रीष्म ऋतूंमध्यें जसा अग्नि तृणासदहन करतो तसें माझ्या सैन्यानें भीष्म दहन करितो. यम, इंद्र, वरुण, कुबेर यांस आह्मीं जिंकूं; परंतु भीष्मास जिंकण्यास आह्मीं समर्थ नाहीं. हे वार्ष्णेया, आपल्या बुद्धीच्या दुर्बलतेनें माझी अशी अवस्था झाली यास्तव आतां मी जर वनांत जाईन तर श्रेयस्कर आहे नाहीं तर जिवंत राहून उपयोग काय? या सर्व राजांस मी भीष्मरूप मृत्यूच्या स्वाधीन करण्यास समर्थ होत नाहीं. महापराक्रमी माझे बंधू भीष्मबाणानीं व्याप्त होऊन दुःखित झाले आहेत. आर्जव युद्धानें हा शतवर्षांनीही पराजित होणार नाहीं आमच्या सैन्यामध्यें तर अस्त्रवेत्ता एक तुझा सखा अर्जुन आहे तो तर आह्मीं भीष्मद्रोणांच्या बाणानीं दग्धमान झालों असतां आमची उपेक्षा करितो. भीष्मद्रोणांनीं सोडलेलीं अस्त्रें सर्व क्षत्रियांस दग्ध करितात. भीष्म सर्व राजांसहवर्तमान् आमचा निश्चयेंकरून क्षय करील. हे महाभागा, मेघ जसा दावाग्नीचें शांतवन करितो तसा आपले सैन्यामध्यें युद्धांत भीष्माचें शांतवन करील अशा पुरुषाचें तूं चिंतन कर ह्मणजे तुझ्या प्रसादानें पांडव बांधवांसहवर्तमान आनंद पावतील असें बोलून धर्मराज ध्यानस्थ बसला हें पाहून श्रीकृष्ण सर्व पांडवांस हर्ष उत्पन्न करीत बोलला हे भरतश्रेष्ठ धर्मराजा, तुझे बंधू महान् शूर व सर्व लोकांमध्यें विख्यात असतां तूं कां शोक करितोस. तुझें प्रियकर-

ण्या करितां मी, सात्यकी, विराट, द्रुपद व धृष्टद्युम्न सिद्ध आहोंत हा तुम
चा सेनापति धृष्टद्युम्न नित्यशः तुमच्या हिताविषयीं तत्पर आहे हे महा
बाहो, शिखंडी तर केवळ भीष्माचा मृत्युच असें जाण. असें ऐकून ध
र्मराज वासुदेवा समक्ष त्यास भाषण करितो हे धृष्टद्युम्ना, मी सांगतो
हें ऐक. पूर्वी जसा कार्तिकस्वामी देवांचा सेनापति झाला तसा तूं वासुदे
वास मान्य असा पांडवांचा सेनापति हो. तूं आतां पराक्रम करून संग्रा
मामध्यें कौरवांस मार. मी, भीमसेन, कृष्ण, नकुल, सहदेव, द्रौपदीचे
पांच पुत्र व अन्य मुख्य मुख्य राजे हे आम्ही सर्व तुझ्या पाठीमागून
येतों. असें ऐकून धृष्टद्युम्न बोलतो हे धर्मराजा, पूर्वी मला शंकरानीं
यांच्या वधाकरितांच उत्पन्न केलें तर मी भीष्म, द्रोण, कृपाचार्य, शल्य
जयद्रथ या सर्वांशीं संग्राम करतों. या प्रमाणें धृष्टद्युम्न भाषण करू
न पांडवां सहवर्तमान युद्धाविषयीं सिद्ध झाला तो पुनः धर्मराज बोलतो
हे धृष्टद्युम्ना, आज सर्व शत्रूंचा नाश करणारा क्रौंचारुण नामाचा व्यूह
करावास, ही व्यूहरचना देवासुर युद्धामध्यें बृहस्पतीनें इंद्रास सांगित
ली होती. असें धर्मराजानें भाषण केल्यावर दुसरे दिवशीं सूर्योदय झाला
असतां प्रातःकाळीं सर्व सैन्याच्या पुढें धनंजय उभा राहिला त्याच्या र
थाचा केतु देदीप्यमान शोभूं लागला. हा ध्वज पूर्वी इंद्राज्ञेवरून विश्व
कर्म्यानें निर्माण केला. या रजतमय केतूच्या योगें पार्थ व पार्थाच्या योगें
हा केतु परस्पर युक्त झालेले मेरुपर्वतस्थ सूर्यासारिखे शोभूं लागले. त्या
क्रौंचव्यूहाच्या शिरप्रदेशीं द्रुपदराजा, नेत्रांचे ठायीं कुंतिभोज व चैद्य, ग्री
वेचा ठायीं दाशार्णक, प्रभद्रक, दाशेरक, अनुपक व किरात, पृष्ठभागीं
पटच्चर, पौंड्र, पौरवक व निषाध या वीरांसहवर्तमान धर्मराज, पक्षभागीं
धृष्टद्युम्न व भीमसेन, दक्षिणभागीं द्रौपदीचे पांच पुत्र, अभिमन्यु, सा
त्यकि, व पिशाच, दरद, पौंड्र, कुंडी, विष, मारुत, धेनुक, तंगण, परतंगण,
बाल्हीक, तितिर, चोल व पांड्य; अग्निवेश्य, हुहुंड, मालव, दानभारी, श
बर, उद्रस, वत्स, नाकुल यांसहवर्तमान नकुल सहदेव वामपक्षाच्या आश्र
यानें उभे राहिले, पक्षस्थानीं दहा हजार रथी, शिरस्थानीं लक्षरथी. पृ

ष्ठभागाचे ठायीं एक अर्बुद व वीस सहस्र रथी, ग्रीवेचे ठायीं एक लक्ष व सत्या-
हत्तर हजार रथी उभे राहिले, पक्ष्यांच्या अग्रभागीं गज संचार करूं लाग-
ले. कैकेयांसहवर्तमान विराटराजा, काशिराज व शैब्य हे तीन अयुत रथ
घेऊन सैन्याच्या पृष्ठभागीं याप्रमाणें सर्व वीर उभे राहिले. असा भरतश्रे-
ष्ठ धर्मराजा व्यूह करून सूर्योदयाची मार्गप्रतीक्षा करीत उभा राहिला-
असतां त्याच्या रथावरील व गजावरील श्वेतछत्रें सूर्याप्रमाणें दिसलीं
अ·वि·या अ·आहे.

५१. अध्याय एकावन्नावा - संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, पांडवानीं
क्रौंचनामाचा व्यूह केलेला पाहून दुर्योधन हा द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य,
सोमदत्ती, विकर्ण, अश्वत्थामा, दुःशासनादि सर्व बंधु व सर्व राजे यांस बो-
लतो हे वीरहो, तुम्ही सर्व शस्त्रास्त्रपारंगत आहांत या तुम्हांतून एक ए-
क वीर पांडुपुत्रांस मारण्यास समर्थ आहे, मग आतां तर सर्व तुम्ही एक-
त्र आहांत त्यापेक्षां पांडवांस मारण्यास तुम्हांस काय अशक्य आहे? भी-
ष्मानीं संरक्षित आमचें सैन्य बहुत आहे. तसेंच भीमसेनानें संरक्षित पां-
डवांचें सैन्य अल्प आहे यास्तव आतां संस्थाननायक वीर, शूरसेन, नि-
कर्ण, कुकुर, रेचक, त्रिगर्त, मद्रक व यवन, या वीरांनीं शत्रुंजय, दुःशासन,
विकर्ण, सुवीर, नंदक, उपनंदक, चित्रसेन व पारिभद्रक यांसहवर्तमान भी-
ष्माचें रक्षण करावें. असें दुर्योधनानें भाषण केल्यानंतर भीष्म, द्रोण व
तुझे पुत्र पांडवांस पीडित करण्यास व्यूहरचना करूं लागले. भीष्म महा
सैन्यांसहवर्तमान इंद्रासारखा पांडवसेनेचें आकर्षण करीत गेला त्या-
च्यामागून द्रोणाचार्य, कुंतल, दशार्ण, मागध, विदर्भ, मेकल, कर्णप्राव-
र्ण यांसहवर्तमान, गांधार, सिंधु, सौवीर, शिबी, वसाती व शकुनि हे भा-
रद्वाजाचे रक्षणास गेले. दुर्योधन आपले बंधु व अश्वातक, विकर्ण, अंब-
ष्ठ, कोसल, दरद, शक, क्षुद्रक, मालव या वीरांसहवर्तमान शकुनीचें सैन्य
रक्षण करूं लागला. भूरिश्रवा, शल, शल्य, भगदत्त, अवंतीदेशाचे विं-
दानुविंद हे व्यूहाच्या वामभागाचें रक्षण करूं लागले. सोमदत्ती, सुश-
र्मा, कांबोज, सुदक्षिण, श्रुतायु, अच्युतायु हे व्यूहाच्या दक्षिणभागीं

उभे राहिले, अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा हे सेनेच्या पृष्ठभागीं उभे राहिले व त्यांच्या पृष्ठभागीं केतुमान, वसुमान, काश्यराजाचा पुत्र व इतर राजे उभे राहिले. हे सर्व वीर उभे राहून सिंहनाद व शंखनाद करूं लागले असतां त्यांचा तो शब्द ऐकून भीष्मानें उच्चस्वरानें सिंहनाद केला. नंतर शंख भेरी इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं असतां महान् शब्द उत्पन्न झाला. त्या काळीं कृष्णार्जुन यांणीं आपले देवदत्त व पांचजन्य शंख, वृकोदरानें पौंड्रनामक शंख, धर्मराजानें अनंतविजयनामक शंख, सुघोष आणि मणिपुष्प नामांचे शंख नकुळसहदेव यानीं वाजविले व सर्व वीरानीं आपापले शंखानें नाद केले. त्या काळीं त्या वीरांच्या नादानीं आकाश व पृथ्वी व्याप्त झाली. असे कुरुपांडव परस्पर पीडित करीत युद्धार्थ गेले. अ. वि. या अ. आ.

५२. अध्याय बावन्नावा :- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, कौरवांची व पांडवांची सेना व्यूह करून उभी राहिली असतां त्यानीं कसें युद्ध केलें तें सांग? असें ऐकून संजय भाषण करितो हे राजा, एक काळीं सर्व सेना व्यूह रचना करून उभी राहिली असतां दुर्योधन आपले सैन्यास बोलला कीं, हे वीरहो आतां सर्वांनीं सिद्ध होऊन युद्ध करावें असें ऐकून कौरवांकडील वीर जीविताची आशा टाकून पांडवांवर गेले असतां तुझ्या व पांडवांच्या वीरांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. तेव्हां भीष्मानें अभिमन्यु, भीमसेन, अर्जुन, कैकेय, विराट, धृष्टद्युम्न, चेदि व मत्स्य या वीरांवर बाणवृष्टी करितांच महाव्यूह कंपित होऊन सर्व सैन्याचा समागम झाला. त्याकाळीं भीष्मास पाहून अर्जुन बोलला हे कृष्णा, जेथें भीष्म उभा आहे तेथें रथ ने. कारण हा निश्चयें करून माझ्या सैन्याचा नाश करील. द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य, विकर्ण, हे दुर्योधनासहवर्तमान सर्व धार्तराष्ट्र भीष्मानें संरक्षित असल्यामुळें पांचाल नाश पावतील यास्तव मी भीष्माचा वध करितों. असें ऐकून जनार्दन भाषण करितो हे अर्जुना, सावध हो. हे वीरा हा मी तुला भीष्माच्या पुढें नेतों असें बोलून कृष्णानें अर्जुनास भीष्माजवळ नेलें. अर्जुन सैन्याचा नाश करीत येतो हें पाहून भीष्म, कैकेयम-

मुख्य वीरां सहवर्तमान अर्जुनावर आला. संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, अर्जुनावर भीष्म, द्रोण, कर्ण यांवांचून कोण रथी पुढें येण्यास समर्थ आहे. अर्जुन आला असतां त्यावर भीष्मानें सत्याहत्तर. द्रोणाचार्यानें पंचवीस. कृपाचार्यानें पन्नास, दुर्योधनानें चौसष्ट, शल्य व जयद्रथ यानीं नव्व नव्व, विकर्णानें दहा, शकुनीनें पांच. या प्रमाणें सर्व वीरांनीं अर्जुनास बाण मारिले असतां भीष्म, कृपाचार्य, द्रोण, विकर्ण, दुर्योधन या सर्वांस अर्जुनानें बाणेंकरून ताडन केलें. इतक्यांत सात्यकी, विराट, धृष्टद्युम्न, द्रौपदीचे पांच पुत्र व अभिमन्यु हे सर्व त्याजपाशीं आले. भीष्मप्रियाविषयीं रत जो द्रोणाचार्य याशीं धृष्टद्युम्न सोमकांसहवर्तमान युद्धास सिद्ध झाला. भीष्मानें पांडवांस ऐशीं बाणेंकरून वेध केला तेव्हां तुझे सैनिकानीं हर्षशब्द केला तो ऐकून धनंजय हर्षित होऊन युद्ध करूं लागला. हें पाहून दुर्योधन बोलला हे भीष्मा, अर्जुन कृष्णासहवर्तमान या आपल्या सैन्यास पीडित करितो. हे गांगेया, तुम्ही व द्रोणाचार्य जिवंत असतां अर्जुनानें सर्व सैन्य पाडून आमचें मूळच्छेदन करावें काय? हा कर्ण माझा हितकर्ता असून तुझ्या करितां पांडवांशीं युद्ध करीत नाहीं यास्तव तूं तरी अर्जुन नाश पावेल असें कर. असें ऐकून महाव्रती भीष्म या क्षत्रियकर्मास धिःकार असो. असें म्हणून अर्जुनरथाकडे गेला त्या काळीं दोघेही श्वेताश्व परस्पर समोर आलेले पाहून सर्व वीरानीं शंखनाद केले. अश्वत्थामा, दुर्योधन, विकर्ण हे भीष्मास वेष्टून व सर्व पांडव अर्जुनास वेष्टून उभे राहिले असतां युद्ध प्रवृत्त झालें. गांगेयानें नव बाणें करून पार्थास ताडन केलें असतां अर्जुनानें प्रथम मर्मभेदी दहा बाणानीं भीष्मास वेध करून पुनः सहस्र बाणानीं त्याच्या दाही दिशा व्यापून टाकिल्या तेव्हां भीष्मानें आपल्या बाणजालानीं पार्थाच्या बाणजालानें निवारण केलें. परस्परांपासून सुटलेलीं बाणजालें छिन्न विछिन्न होऊन पृथ्वीवर पडलीं. उभयतां परस्पर अश्व, रथ, रथईषा व रथचक्र यांचे ठायीं वेध करीत असतां भीष्मानें तीन बाणानीं वासुदेवाच्या स्तनांतरीं वेध करितांच तो किंशुकवृक्षासारखा शोभला. हें पाहून अर्जुनानें तीन बाणानीं भीष्माच्या सा-

रथ्यास वेध केला. उभयतां परस्परांच्या वधाविषयीं इच्छा करीत असतां कोणीही एकमेकांचा नाश करण्यास समर्थ झाले नाहींत. परस्पर एकमेकावर प्रहार करीत असतां ते छिद्रांचें शोधन करूं लागले. तसेच त्यानीं सिंहनाद मिश्रित शंखनादही केले. त्या काळीं उभयतांचें अंतर कोणास कळेनासें झालें. असा उभयतांचा पराक्रम पाहून ऋषीं सहवर्तमान देव, गंधर्व, चारण बोलले कीं, हे उभयतां महारथी देवासुर गंधर्वांनीं व सर्व लोकांनीं जिंकण्यास समर्थ नाहींत असें युद्ध पुढें कधीं होणार नाहीं हे परस्परांस जिंकण्यास समर्थ नाहींत, सर्व लोकामध्यें हें युद्ध सम विख्यात होईल, तुझे व पांडवांचे कित्येक वीरानीं एकमेकांस बाणानीं ताडित केलें. असें घोर युद्ध प्रवृत्त झालें असतां द्रोणाचार्यांचा व पांचालांचा समागम झाला. अ. छि. या अ. आ.

५३. अध्याय त्रेपन्नावा:- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, द्रोणाचार्य व धृष्टद्युम्न यानीं युद्ध कसें केलें तें सांग? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, पांडव इंद्रादिदेवांस ही संग्रामामध्यें जिंकण्यास अशक्य आहेत. धृष्टद्युम्न युद्धार्थ आला हें पाहून भारद्वाजानें बाणानीं त्यास वेध करून त्याच्या सारथ्यास खालीं पाडला असतां धृष्टद्युम्न आचार्यांचे चार अश्व मारून व त्यास वेधकरून उभारहा उभारहा असें बोलला असतां द्रोणाचार्य धृष्टद्युम्नाच्या वधास्तव एक बाण घेऊन धनुष्यास लावण्यास उद्युक्त झाला असतां सैन्यामध्यें एकाएकीं हाहाकार झाला हें पाहून धृष्टद्युम्नानें त्या बाणानें छेदन करून भारद्वाजावर बाणवृष्टी केली हें पांडवानीं पाहून मोठा नाद केला. नंतर धृष्टद्युम्नानें द्रोणवधाच्या इच्छेनें सुवर्ण विभूषित महाघोर शक्ति घेऊन टाकिली असतां ती येत्ये हें पाहून भारद्वाजानें तिचे तीन तुकडे केले हें पाहून धृष्टद्युम्नानें द्रोणावर बाणवृष्टी केली द्रोणाचार्यानें तिचें निवारण करून धृष्टद्युम्नानें धनुष्य मध्यभागीं छेदन केलें, तेव्हां त्यानें एक लोहमय गदा घेऊन द्रोणावर टाकिली तिचें द्रोणानें निवारण करून धृष्टद्युम्नावर सुवर्णमुख व शिलाशित बाण टाकिले असतां त्या

बाणानीं त्यानें कवच भेद करून रुधिर प्राशन केलें. त्याकाळीं धृष्टद्युम्न गदा घेऊन आपला पराक्रम दाखवीत द्रोणाच्या पुढें आला हें पाहून द्रोणानें त्याच्या गदेचें छेदन केलें. नंतर धृष्टद्युम्न चर्म घेऊन द्रोणाचा वध करण्याच्या इच्छेनें त्याजवर धांवला त्याकाळीं द्रोणाचार्यानें अस्त्र योगें करून आपलें बाहुबळ दाखवून त्याचें निवारण केलें. धृष्टद्युम्न ही आपलें स्थळ न सोडून उभा राहिला इतक्यांत धृष्टद्युम्नाच्या साह्यार्थ भीमानें येऊन सात तीक्ष्ण बाणानीं द्रोणास वेध करून त्यास दुसरे रथांत बसविला. नंतर दुर्योधनानें द्रोणाचार्यांच्या रक्षणा करितां सेनेसह कलिंगराजास आज्ञा केली तेव्हां तो भीमसेनावर आला. इकडे द्रोणाचार्य पांचालास सोडून वृद्ध जे विराट आणि द्रुपद यांसहवर्तमान युद्ध करूं लागला असतां धृष्टद्युम्न धर्मराजाकडे गेला. नंतर कलिंगाचें आणि भीमसेनाचें महा घोर जगत क्षय करणारें असें युद्ध झालें. अ. वि. या अ. आ.

५४. अध्याय चोपन्नावा - धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया. दुर्योधनानें कलिंगराजास आज्ञा केली असतां भीमसेनाशीं त्यानें कसें युद्ध केलें? असें ऐकून संजय भाषण करितो हे राजा. सैन्यासहवर्तमान कलिंगराज भीमसेनावर जातांना भीमसेनानें पाहून त्याचें निवारण केलें तों श्रुतायुराजा क्रुद्ध होऊन भीमसेनावर आला. नसेंच अयुत कुंजर व निषाधाचे वीर यांसहवर्तमान केतुमानानें भीमसेनास आसमंतात् भागीं वेष्टन केलें. चेदि, मत्स्य, करूष व इतर राजांसहवर्तमान भीमसेन निषाधाशीं युद्धास सिद्ध होतांच परस्पर मारण्याच्या इच्छेनें धांवत असतां महान् दैत्यसेनेसहवर्तमान जसें इंद्रानें युद्ध झालें तसें भीमानें त्याशीं युद्ध झालें. मांस शोणित कर्दम युक्त रणभूमी झाली असतां स्वकीय कोण व परकीय कोण हें कळेनासें झालें. असा तो अल्प वीरांचा बहुत वीरांशीं महान संग्राम चालला असतां कलिंगासहवर्तमान चेदि व निषाधराजे भीमसेनास सोडून माघारे फिरले. भीमसेन व्यास झाला असतांही रथोपस्थापासून चंचल झाला नाहीं त्याका-

ळीं शक्रदेवानें भीमसेनावर धांवून निशित बाणांची जलदासारखी वृष्टी केली त्याकाळीं भीमसेनाचे अश्व नष्ट झाले असतां त्यानें रथाचाठायीं उभें राहून गदा शक्रदेवावर टाकिली त्या गदेनें शक्रदेव ताडित होऊन रथापासून सारथी व ध्वज यांसहवर्तमान भूमीवर पडला हें कलिंगानें पाहून तो भीमसेनावर गेला त्या काळीं भीमसेन आपली गदा टाकून दारुण कर्म करण्याच्या इच्छेनें खड्ग घेऊन उभा रहातांच कलिंगराजानें भीमसेनाच्या वधार्थ सर्प विषोपम एक बाण सोडिला हें पाहून भीमसेनानें त्याचे दोन तुकडे करून मोठा नाद केला. नंतर भीमसेन पुनः मोठ्यानें गर्जना करीत खड्गासहवर्तमान् वेगानें उड्डाण करून कलिंग पुत्राच्या गजावर बसला इतक्यांत कलिंगानें त्याजवर शक्ति सोडिली असतां भीमसेनानें आपल्या खड्गानें तिला द्विधा करून गजाच्या स्कंधावर खड्गाचा प्रहार केला त्याचे योगें तो गज पृथ्वीवर पडला व भीमसेन कित्येक वीरांचीं शरीरें व शिरें खड्गानें तोडित श्येनपक्ष्यासारखा सैन्यामध्यें संचार करूं लागला. नंतर भीमानें कित्येक रथ्यांस शोधून शोधून ध्वजासहवर्तमान खड्गानें छिन्न केलें, वारंवार वेगानें भीमसेन दाही दिशेस धांवत व आपला खड्गमार्ग दाखवीत असतां कित्येक त्याचें तें कर्म पाहून विस्मय पावले. भीमसेनानें कित्येकांस पायानें मारिलें, कित्येकांस ओढून आपटलें, कित्येकांस खड्गानें छिन्न केलें. या प्रकारें भीमसेनानें कलिंगसैन्याचा विध्वंस केला असतां पुनः ती सेना भीष्माच्या रक्षणास्तव भीमावर धांवतांच भीमसेनानें त्या सैन्याच्या पुढें श्रुतायूस पाहून तो त्या पुढें गेला तेव्हां श्रुतायूनें नव बाणानीं भीमसेनास स्तनांतराचाठायीं वेध केला त्या काळीं भीमसेनानें लोहमय सात बाणानीं कलिंगाचा वध केला. दोन बाणानीं दोन कलिंगाचे चक्ररक्षक सत्यदेव व सत्य प्रसिद्ध होते त्यांस मारून तीन बाणानीं केतुमानास मारिला आणि रथाखालीं उतरून त्यानें सातशें वीरांस यमगृहीं पाठविले. पुढें कलिंगाचे आणखीं दोन सहस्र योद्धे मृत्युलोकास पाठविले असतां सर्व योद्धे भीमसेनाचें कर्म मोठें आश्चर्यासारिखें मानूं

लागले. जसें महान् सरोवर मगरांनीं खळबळलें जातें तसें महान् सैन्य भीमानें त्रस्त केलें असतां एका एकीं कलिंगवीर कोणी जातात कोणी पलायन करितात हें पाहून पांडवसेनापति धृष्टद्युम्नानें आपल्या सैन्यामध्यें आज्ञा केली कीं हे वीरहो युद्ध करा. असें ऐकून शिखंडी प्रमुख योद्धे भीष्माच्या अग्रभागीं युद्ध करूं लागले. त्यांच्या रक्षणास्तव धर्मराज महान् गजसैन्या सहवर्तमान उभा राहिला. तसाच धृष्टद्युम्नही आपल्या वीरांस प्रेरणा करून कांहीं उत्तम योद्ध्यांसहवर्तमान भीमसेनाच्या पार्श्वभागाचें रक्षण करण्यास आला. पांचाल धृष्टद्युम्नास भीमसेन व सात्यकि यां वांचून प्राणाहून प्रिय कर्ता अन्य कोणी नव्हता यास्तव त्यानें भीमसेना जवळ येऊन बहुत हर्षानें सिंहनाद व शंखनाद केला असतां भीमसेनानें पारव्यां सारख्या वर्णाच्या अश्वांनीं जोडलेल्या रथामध्यें बसलेल्या धृष्टद्युम्नास व त्याच्या ध्वजास पाहून आपल्यास आश्रय आला असें जाणून अंतःकरणांत तो हर्षित होऊन विश्रांत झाला. इतक्यांत सात्यकीनें वृकोदर व धृष्टद्युम्न कलिंग सैन्यामध्यें युद्ध करितात हें पाहून त्यांचे पार्श्वभागाचें रक्षण केलें. सात्यकीनें शत्रूंचा बहुत नाश केला असतां कलिंगाच्या सैन्यामध्यें मांसशोणित कर्दम युक्त नदी झाली. ती पाहून भीमसेनानें तिचें अतिक्रमण केलें. हें पाहून ते आक्रोश करीत बोलले कीं, हा आज भीमरूपी काळच येऊन कलिंगाशीं युद्ध करितो. तो नाद ऐकून भीष्म व्यूह रचित सैन्यासहवर्तमान पुढें आला. हें पाहून भीमसेन, सात्यकि व धृष्टद्युम्न या त्रिवर्गांनीं भीष्मावर जाऊन तीन तीन घोर बाणांनीं वेध केले. भीष्मानें त्यांस तीन तीन बाण मारून सहस्रावधीं बाणांनीं वेष्टित करून नंतर सुवर्ण अलंकृत भीमसेनानें अश्व तीन बाणांनीं मारिले. त्या काळीं भीमसेनानें रथावर बसून गांगेयावर शक्ति टाकिली हें पाहून गांगेयानें ती जवळ येण्याचे पूर्वीं तिचे तीन तुकडे केले. जसा अग्नि तृणास जाळितो तसा भीमसेन प्रज्वलित होऊन कलिंगाच्या सेनेमध्यें सर्वांस मारून उभा राहिला हें पाहून तुझे वीर खिन्न झाले. नंतर सकल सैनिक पहात असतां धृष्टद्युम्नानें भीमसेनास आ

पले रथांत बसवून संग्रामांतून नेला असतां पांचाल व मत्स्यवीर धृष्टद्यु-
म्नाचें स्तवन करूं लागले. नंतर सात्यकी भीमसेनाजवळ येऊन बोल-
ला कीं हे भीमा- तूं दैवयोगानें हा कलिंगाचा महाव्यूह एकट्यानें मर्दि-
त केलास असें बोलून सात्यकी त्यास आलिंगन देऊन आपले रथांत ब-
सला आणि त्यानें क्रोधानें तुझ्या सैन्याचा नाश करून भीमसेनाच्या
सैन्याचें रक्षण केलें. अ- वि- या अ- आ-

५५. अध्याय पंचावन्नावा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा.
त्या दिवसाचा पूर्वाण्ह भाग संपल्यावर रथाश्व, नाग, वसादि यांचाक्ष-
य झाला असतां अश्वत्थामा, कृपाचार्य व शल्य या वीरांसह वर्तमान
धृष्टद्युम्न युद्धास आला. धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्याचे लोकविख्यात जे
अश्व त्यांचा बाणानीं नाश केल्यावर त्यानें शल्याच्या रथांत बसून धृ-
ष्टद्युम्नास बाणानीं आच्छादन केलें. हें पाहून अभिमन्यूनें पंचवीसबा-
णानीं शल्यास, नव्व बाणानीं कृपाचार्यास, आठ बाणानीं अश्वत्थाम्या-
स वेध केला. अश्वत्थामा, शल्य, कृपाचार्य यानीं अभिमन्यूवर वृष्टि
केली. तुझा पौत्र लक्ष्मण व अभिमन्यु यांचें युद्ध प्रवृत्त झालें. लक्ष्म-
णानें अभिमन्यूस वेध करितांच तें कर्म मोठें आश्चर्या सारिखें दृष्टीस
पडलें. अभिमन्यूनें बंधूस पांचशें बाणानीं वेध केला. लक्ष्मणानें एका
बाणानें अभिमन्यूचें धनुष्य छेदन केलें असतां सर्व लोक आक्रोश
करूं लागले. अभिमन्यूनेंही दुसरें धनुष्य घेऊन पुनः ते एकमेकांवर बा-
णवृष्टि करूं लागले हें पाहून दुर्योधन तेथें आला. सर्वही राजे अभिम-
न्यूकडे गेले तरी अभिमन्यु कांहींही भय पावला नाहीं. इकडे अर्जुन-
आपल्या पुत्राचें रक्षण करण्या करितां तेथें आला हें पाहून भीष्मप्रमु-
ख योद्धे सव्यसाचीवर आले. त्यासमयीं नराश्व, गज यांच्या पादसंम-
र्दानीं उद्भूत झालेल्या रजानें सूर्य अदृश्य झाला. सहस्रावधी गज व
नृपती अर्जुनाच्या बाणदृष्याच्या आंत उभे रहाण्यास असमर्थ झाले.
अर्जुनाच्या बाणसमुदायानीं आकाश, दिशा, भूमि व सूर्य हे कांहींच
दिसेनासे झाले. अर्जुनानें रुद्रा सारिखें रूप धरून कित्येक वीरांचे गदां-

सहवर्तमान व खड्गासहवर्तमान बाहू छेदन केले. या प्रकारें कौरव सैन्यांत अर्जुनानें पराक्रम केला असतां कित्येक छिन्न झालेले परिघ, मुद्गर, प्रास, इतर दुसरीं शस्त्रें यांच्या राशींच्या राशी ठिक ठिकाणीं पडल्या. हे राजा, त्या काळीं अर्जुनावर जाण्यास तुझ्या सैन्यामध्यें कोणीही समर्थ झाला नाहीं. नंतर कृष्णार्जुनांनीं आपल्या शंखांचे नाद केले असतां कौरव सैन्य भग्न झालेलें पाहून भीष्म रणामध्यें विस्मय पावून द्रोणाचार्यास बोलला हे आचार्य, हा पांडुपुत्र अर्जुन कृष्णासहवर्तमान आज सैन्यामध्यें जें करील तें करो आणि हा सूर्य तर सर्व लोकांच्या चक्षूंचें हरण करीत असताचलास जातो यास्तव आतां अवहार करावा. हे राजा, कौरव सैन्यामध्यें अवहार केल्यानंतर इकडे पांडवांच्याही सैन्यामध्यें अवहार होत आहे तों सूर्य अस्ताचलास जाऊन संध्याकाळ झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

५६. अध्याय छपन्नावा- संजय भाषण करितो हे राजा, दुसरे दिवशीं प्रातःकाळीं भीष्मानें पुनः सैन्यास युद्धार्थ आज्ञा देऊन तुझ्या पुत्राचा जय व्हावा या इच्छेनें गरुडनामक महाव्यूह केला. त्या व्यूहाच्या मुखावर स्वतः भीष्म, भारद्वाज व कृतवर्मा हे चक्षुस्थानीं, अश्वत्थामा व कृपाचार्य हे शिरस्थानीं, भूरिश्रवा कंठदेशीं, दुर्योधन आपले भ्राते व सेवकगण यांसहवर्तमान पृष्ठभागीं, वृषसेन पुच्छस्थानीं, मागध, कलिंग व दाशेरक हे दक्षिणभागीं, कारूष, विकुंज, मुंड, कुंडी, वृष हे बृहद्बलासहवर्तमान वामपक्षीं या प्रमाणें उभे राहिले. असा तो व्यूह पाहून धृष्टद्युम्नासहवर्तमान अर्जुन त्या व्यूहाचा प्रतिस्पर्धी अर्धचंद्राकार व्यूह करून तो उभा राहिला. त्या व्यूहाच्या दक्षिणभागीं भीमसेन, त्याच्या जवळ विराट व द्रुपद, आयुधगणांसहवर्तमान नील राजा, धृष्टद्युम्न, शिखंडी, इतर पांचाल, प्रभद्रक, गजसैन्यासहवर्तमान धर्मराज हे मध्यभागीं, त्याच्या पलीकडे सात्यकी, द्रौपदीचे पांच पुत्र व अभिमन्यु, त्यांच्या जवळ इरावान, त्याच्या जवळ घटोत्कच, त्याच्या पलीकडे कैकेय व अर्जुन वामशृंगीं या प्रमाणें ते उभे राहिले. पांडव उभारा-

राहिल्यावर परस्परांचे गज व रथ एकमेकांमध्यें मिसळून एकमेकांस मारीत असतां युद्ध प्रवृत्त झालें त्या युद्धामध्यें धांवणारे जे रथी यांच्या दुंदुभीच्या शब्दमिश्रित भयंकर नादानें आकाश नादित झालें. अ. वि. या अ. आ.

५७. अध्याय सत्तावन्नावा :- संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा, तुझे व पांडवांचे वीर रणामध्यें उभे राहिले असतां धनंजय तुझ्या रथसैन्याचा नाश करूं लागला त्याकाळीं पार्थानें युद्धामध्यें तुझ्या वीरांस विद्ध केलें असतां ते अर्जुनास युगक्षयकालींचा हा काळ आहे असें मानून मृत्यूस मागें टाकून केवळ यशाच्याच इच्छेनें युद्ध करूं लागले. या युद्धामध्यें तुझ्या वीरांनीं एकाग्र चित्तें करून पांडवांच्या सेनेचा बहुत नाश केला. तुझे व पांडवांचे वीर आस्मंतात् पलायन करीत असतां भूमीनें रज उडून त्या रजानें सूर्य आच्छादित झाला यामुळें कांहीं दिसेनासें झालें. केवळ संज्ञा अनुमान व नामगोत्रें यानींच युद्ध प्रवृत्त झालें. त्याकाळीं द्रोणानीं संरक्षित कौरवांचा व्यूह पांडवांच्या योगें भग्न झाला नाहीं तसाच भीमार्जुनानें रक्षित पांडवांचा व्यूह कौरवांच्या योगें भग्न झाला नाहीं. कित्येक वीर सेनाग्रापासून बाहेर निघून पुनः गजाश्वांस एकत्र करून युद्ध करूं लागले. अश्वारोहानीं कित्येक अश्वारोह पाडले. गजस्वार गजस्वारांस बाणसमुदायानीं व तोमरानीं प्रहार करूं लागले. याप्रमाणें परस्पराशीं परस्पर युद्ध करीत असतां हजारों ध्वज, प्रास, कार्मुकें, शक्ति इत्यादिकानीं रणभूमि अलंकृत केल्यासारखी दिसली. त्याकाळीं पूर्वींचे भूमीसंबंधी उडालेले रज नरशोणितानीं शांत होऊन आकाश व दिशा स्वच्छ दिसूं लागल्या. आस्मंतात् भागीं हजारों कबंधें उठून नृत्य करूं लागलीं. त्या दारुण संग्रामामध्यें कित्येक पडत असतां कित्येक धांवत असतां सर्व जगताच्या नाशाचीं अनेक चिन्हें दिसूं लागलीं. भीष्म, द्रोण, जयद्रथ, पुरुमित्र, विकर्ण, शकुनी यानीं संग्रामामध्यें पांडवसैन्याचा पराजय केला. तसाच भीमसेन, घटोत्कच, सात्यकि, चेकितान व द्रौपदीचे पांच पुत्र हे वीर सर्व राजांसहवर्तमान तुझ्या सेनेस प-

ळवूं लागले. त्या संग्रामामध्यें परस्पर योद्धे मारीत असतां कित्येक रक्तां-
ग होऊन दानवांसारिखे शब्द करूं लागले. त्या काळीं उभय सैन्यांतील
मृत झालेले वीर आकाशांतील ग्रहांसारिखे रणभूमीवर दिसूं लागले.
तुझा पुत्र दुर्योधन सहस्र रथ्यांसहवर्तमान पांडवांवर व घटोत्कचावर गे-
ला. तसेच पांडवांचे वीर भीष्म, द्रोण यांजवर गेले. अर्जुन अन्य राजा-
शीं युद्ध करूं लागला. अभिमन्यु व सात्यकि हे दोघे शकुनीच्या से-
न्याकडे गेले. या प्रकारें परस्पर जिंकण्याच्या इच्छेनें उभे राहिले अ-
सतां महान् संग्राम प्रवृत्त झाला. अ. वि. या. अ. भा.

५८. अध्याय अठ्ठावन्नावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा-
त्या युद्धप्रसंगीं कित्येक पार्थिव अर्जुनास पाहून बाणांनीं ताडन करूं
लागले. कित्येक वीरांनीं शक्ती, तीक्ष्णगदा, परिघ, प्रास, परशु, मुद्गल,
मुसल, या अस्त्रांची वृष्टी फाल्गुन रथावर शलभासारिखी केली असतां
अर्जुनानें त्या सर्व वृष्टीचें निवारण केलें. त्या काळीं हें अर्जुनाचें मह-
त् हस्तकौशल्य व अतिमानुषकर्म पाहून देव, दानव, गंधर्व, पिशाच, उ-
रग, राक्षस या सर्वांनीं शाबास अर्जुना शाबास असें बोलून त्याचें स्तवन
केलें. सात्यकि व अभिमन्यु हे महत् सैन्यासहवर्तमान संग्रामांत शकु-
नीसहवर्तमान गांधार वीरांशीं युद्ध करूं लागले असतां गांधार वीरांनीं
सात्यकीच्या रथाचे तिळाप्रमाणें तुकडे केले. त्या काळीं तो अभिमन्यूच्या
रथांत बसल्यावर उभयतांनींही शकुनीच्या सैन्याचा नाश केला. तसेच
भीष्म व द्रोण यांनीं धर्मराजाच्या सैन्याचा नाश केला. त्या काळीं धर्मरा-
ज व नकुळ सहदेव द्रोणसैन्यावर जाऊन तेथें तुमुलयुद्ध करूं लागले. भी-
मसेन व घटोत्कच हे उभयतां महत्कर्म करितात हें पाहून दुर्योधन त्यांचें नि-
वारण करीत असतां घटोत्कचानें पित्यापेक्षांही अतिमहत् कर्म केलें. भी-
मसेनानें एका बाणानें दुर्योधनाच्या हृदयीं प्रहार केला असतां दुर्योधन मू-
र्च्छित होऊन रथोपस्थांत पडला हें पाहून सारथ्यानें त्यास रणापासून दूर
नेल्यावर सर्व सैन्य पळूं लागलें तें पळत असतां भीमसेनानें पाठीमागें जा-
ऊन कित्येकांचा नाश केला. त्या काळीं भीष्म व द्रोण हे महारथी तेथें असतां

त्या सैन्याचें निवारण करण्यास असमर्थ झाले. अभिमन्यु व सात्यकि एक रथांत बसून शकुनी सैन्याचा नाश करीत असतां अमावास्येच्या दिवशीं जसे सूर्य चंद्र एकत्र शोभतात तसे ते शोभले. अर्जुन बाणानीं कौरव सैन्य वध्य होऊन पळतें हें पाहून भीष्मानीं आपल्या सैन्याचें निवारण केलें. नंतर दुर्योधनानें स्वतः पलायन करणाऱ्या सैनिकांस आश्वासन दिलें असतां क्षत्रियांचे महारथी ज्या ज्या ठिकाणीं दुर्योधनास पहात त्या त्या ठिकाणीं माघारे फिरून उभे रहात. कित्येक लज्जेनें अधोमुख होऊन उभे राहिले. या प्रकारें कौरव सैन्य माघारें फिरलें असतां त्यांचा वेग चंद्रोदयकाळीं पूर्यमाण समुद्रा सारिखा झाला. नंतर दुर्योधन आपले सर्व वीर माघारी फिरलेले पाहून भीष्मास बोलतो हे पितामहा- माझें वाक्य ऐका. तुम्ही, द्रोणाचार्य, कृपाचार्य जिवंत असतां आपलें सैन्य पलायन करतें हें मला बरें वाटत नाहीं, तुह्मां पुढें पांडव पराक्रमी आहेत असें नाहीं; परंतु हे पितामहा, पांडवांवर तुमचा अनुग्रह आहे त्यावरून पांडव आमच्या सेनेचा वध करीत असतांही तुह्मी उपेक्षा करितां. पूर्वींच तुह्मी मला असें सांगितलें असतें तर मी कर्णासहवर्तमान कर्तव्य कार्याचा विचार केला असता. असो जर तुमच्या उभयतांच्या मनांत माझा त्याग करावयाचा नसला तर यथा योग्य पराक्रम करून युद्ध करा. असें ऐकून भीष्म हास्य करीत बोलतो हे राजा देवांसहवर्तमान इंद्र जरी पांडवांशीं युद्धास आला तरी पांडव त्यांस अजय आहेत अशा तुम्हा बहुत हितकारक गोष्टी पूर्वींच कथन केल्या आहेत. आतां मी वृद्ध झालों माझ्यानें यथाशक्ति जें युद्ध होईल तें करतों हें तूं बंधू सहवर्तमान पहातच आहेस आज सैन्यासहवर्तमान पांडुपुत्रांचें निवारण करीन. माझें कर्म सर्व सैनिक आज पाहोत. असें भीष्मानें भाषण केलें असतां दुर्योधनानें शंख व भेरी यांचा नाद केला तो ऐकून पांडवानीं आपल्या सेन्यामध्यें शंख भेरींचे गजर केले. अ- वि- या अ- आहे.

५९. अध्याय एकुणसाठावा - धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, माझ्या पुत्राच्या भाषणावरून भीष्मानें प्रतिज्ञा केली असतां पांडव

व पांचाल यानीं काय केलें ? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, त्या दिवसाचा पूर्वाण्ह भाग जाऊन पश्चिम दिशेस कांहीं सूर्य गेल्यावर पांडवांस जय होऊन ते हर्षित झाले असतां भीष्म तुझ्या पुत्रांसहवर्तमान पांडव सेन्यावर गेला त्या काळीं हे राजा, तुझ्या अन्यायानें हें घोर युद्ध प्रवृत्त झालें. त्या युद्धांत धनुष्याच्या प्रत्यंचेचा व हस्ततलांचा महान् शब्द उत्पन्न झाला. अरे उभा रहा अरे हा मी उभा आहें. अरे याचा वध कर. अरे माघारा फीर अरे तूं सावध हो. असे ठिकठिकाणीं वीरांचे शब्द होऊं लागले. सहस्रशः योध्यांचे बाहू व मस्तकें पडलेलीं परम सुशोभित दिसूं लागलीं. त्या काळीं रुधिरवाहिनी नदी मोठमोठे अश्व, गज व नर यांच्या शरीरापासून उत्पन्न झालेली परलोकरूप समुद्रास गेली. हे राजा, जसें तुझ्या पुत्रांचें व पांडवांचें युद्ध झालें असें युद्ध पाहिलें नाहीं व ऐकिलें ही नाहीं. कित्येक वीर भिन्न झाले असतां ही तसेच दीन न होतां दांत ओंठ खाऊन शत्रूंवर गेले. कित्येक हे तात, हे भ्रात्या, हे मातुला, मला टाकून जाऊं नको असे आक्रोश करीत पडले. कित्येक अरे ये, हा मी उभा आहें जाऊं नको, कां भ्यालास, असा आक्रोश करितात इतक्यांत तेथें भीष्म येऊन पांडवांच्या रथ्यांस निवडून निवडून मारूं लागला. सृंजय व पांडव भीष्माचें हस्तलाघव पाहून त्यास सहस्र योध्यां सारखा मानूं लागले. कोणी वीर पूर्वीं त्यास पूर्व दिशेस पाहून पश्चिम दिशेस युद्ध करितो. कोणी वीर पूर्वीं उत्तरेस पाहून दक्षिणेस युद्ध करितो असें पाहून हा केवळ मायेनेंच नाना प्रकारचीं रूपें घेतो काय असें मानूं लागले. भीष्माकडे पहाण्यास पांडव सैन्यामध्यें कोणास ही सामर्थ्य राहिलें नाहीं. जो जो भीष्मा पुढें येई तो तो तीक्ष्ण बाणानीं विद्ध होऊन यमगृहीं जाई तेव्हां ते वीर सहस्र मार्गानें पळूं लागले. श्रीकृष्णार्जुन हे त्या सेनेस आश्वासन देत असतां ती सेना उभी रहाण्यास समर्थ झाली नाहीं. त्या काळीं कित्येक गज, अश्व, पदाती पतन पावल्यामुळें पांडवांचें सैन्य हा हा भूत होऊन अचेतन झालें. त्या गर्दींत पिता पुत्रास, पुत्र पित्यास, व सखे सख्यांस मारूं लागले. पांडवांचें सैन्य उद्भ्रांत झालेल्या गाईंच्या समुदायां सारखें अस्ताव्यस्त

होऊन आर्त शब्द करूं लागलें हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनास बोलतो हे पार्था, ज्या कालाची तूं इच्छा करीत होतास तो काल आज आला आहे, आतां या भीष्मावर प्रहार न केलास तर अज्ञानानें मोह पावशील. हे वीरा, पूर्वी भीष्मद्रोण प्रमुख सर्व धार्तराष्ट्राकडील योद्ध्यांचा एकत्र समागम झाला होता त्यावेळेस तूं बोललास कीं, धार्तराष्ट्राचे सैनीक जे जे माझ्या पुढें येतील त्यांस मी सबांधव मारीन तें तूं भाषण सत्य कर. सिंहास पाहून मृग जसे पळतात. तशी तुझ्या सैन्याची अवस्था झाली. असें ऐकून अर्जुन बोलतो हे कृष्णा. ज्या ठिकाणीं हा भीष्म उभा आहे त्या ठिकाणीं जाण्यास माझ्या अश्वांस प्रेरणा कर ह्मणजे त्यास आज मी पाडितों. असें ऐकतांच कृष्णानें त्या स्थलीं रथ नेला. हें पाहून पांडवाचें सैन्य भग्न झालें होतें तें पुनः माघारी फिरलें. नंतर भीष्मानें अर्जुनाचा रथ बाणानीं अदृश्य केला. नंतर पार्थानें दिव्य धनुष्य घेऊन भीष्माचें धनुष्य छेदन केलें असतां भीष्मानें दुसरे धनुष्याचें आकर्षण केलें इतक्यांत अर्जुनानें तेंही धनुष्य तोडलें असतां भीष्म त्याच्या हस्तलाघवाचें स्तवन करून बोलला कीं, हे महाबाहो शाबास शाबास तुझाच ठायीं हें महत्‌कर्म योग्य आहे मी येणें करून संतुष्ट झालों आतां तूं मजसहवर्तमान युद्ध कर. अशी भीष्मानें अर्जुनाची प्रशंसा करून नंतर दुसरें धनुष्य घेऊन अर्जुन रथावर पुनः बाणांची वृष्टी केली तेव्हां वासुदेवानें अश्वयानाचें परम बल व हस्तलाघव दाखवण्याकरितां अश्वांस मंडलाकार फिरवून भीष्माचे सर्व बाण व्यर्थ घालिवले. पुनः भीष्मानें लक्षावधी बाणानीं कृष्णार्जुनांच्या सर्व दिशा व्याप्त करून तीक्ष्ण बाणानीं वासुदेवास कंपित केलें त्या काळीं श्रीकृष्ण भीष्माचा पराक्रम व अर्जुनाची मृदुयुद्धता पाहून मनांत विचार करूं लागला कीं, हा भीष्म तर दोन प्रहरच्या सूर्यासारखा सर्वांस संतप्त करीत चालला आहे, पांडवांच्या उत्तम उत्तम सैनिकांस मारीत हा पुढें पुढें प्रवेश करीत येतो याजवरून वाटतें कीं, हा आज एक दिवसांत देवदानवांचा देखील नाश करील मग पांडवांची तर कथा काय? इतक्यांत पुनः भीष्म अर्जुनावर बाणवृष्टी करूं लागला आणि अनेक सहस्र गजाश्व-

रथी व पदाती यानीं अर्जुनास वेष्टित केलेला पाहून त्यांचें निवारण करण्याकरितां सात्यकि एका एकी पुढें सरून इंद्राचें विष्णु जसें साह्य करितो तसें अर्जुनास साह्य करून नंतर धर्मराजाचें सैन्य भीष्मानें त्रस्त केल्यामुळें पळालें. हें पाहून सात्यकि दांत ओंठ खाऊन बोलतो हे सैनिकहो, तुह्मीं कोठें न जातां आपल्या वीर धर्माचें रक्षण करा. या प्रकारें भग्न झालेल्या योद्ध्यांचें सात्यकी निवारण करी व अर्जुनाची मृदु युद्धता पाहून श्रीकृष्ण सात्यकीची प्रशंसा करून बोलतो हे सात्यकि. जे जातील त्यांस जाऊंदे. जे उभे रहातील ते राहोत. संग्रामामध्यें गणांसह वर्तमान द्रोणाचार्यास व भीष्मास मी आज पाडलेला तूं पहा यास्तव मीच उग्रचक्र धारण करून भीष्माचा व द्रोणाचा प्राण हरण करून पांडवांची प्रीति संपादन करितों आणि सर्व धृतराष्ट्र पुत्र व त्यांचे पक्षपाती सर्व राजे या सर्वांस मारून राज्य दानेंकरून अजात शत्रूस हर्षित करीं असें बोलून सुनाभचक्र घेऊन रथाखालीं उतरला आणि आपल्या चरणानीं पृथ्वी कंपित करीत भीष्मावर गेला. आकाशामध्यें विद्युल्लतानीं मेघ जसा शोभतो तसा लंबायमान पीतांबरानें श्रीकृष्ण शोभला. भगवानाचा देह हेंच एक कमल, बाहू हाच एक दंड अशा कमलचक्रास धारण करून श्रीकृष्ण जातो हें पाहून सर्व भूतें कौरवांचा आज नाश झाला असें समजून आक्रोश करूं लागलीं. वासुदेव चक्र घेऊन येतो हें पहातांच शांतनव भीष्म धनुष्य बाण घेऊन बोलला हे देवेशा, ये ये तुला नमस्कार असो. तूं मला मारिलें असतां तीन लोकांमध्यें माझी प्रख्याति होईल. असें भीष्म बोलत आहे तों अर्जुनानें सावध होऊन कृष्णाच्या पाठीमागें जाऊन दोन हातानें श्रीकृष्णास धरिला त्याकाळीं श्रीकृष्ण तसाच अर्जुनास ओढीत जाऊं लागला असतां पार्थ कृष्णास दहावे पावलावर उभा करून बोलला हे केशवा. कोपाचा उपसंहार कर. पांडवांची गति तूं आहेस यास्तव मी आपल्या प्रतिज्ञेचा त्याग करीन नाहीं. तूं अशी मला प्रेरणा करशील तसा मी कौरवांचा नाश करीन. असें ऐकून जनार्दनानें चक्रासहवर्तमान अर्जुनाच्या रथावर बसून आपला शंख वा-

जविला त्या नादानें दाही दिशा व आकाश नादित झालें. शंखधारण केलेल्या श्रीकृष्णास पाहून कौरवांच्या वीरानीं मृदंगादिक वाद्यांचे नाद करून सिंहासारख्या गर्जना केल्या. अर्जुनाच्या सुटलेल्या बाणानीं आकाश व दिशा व्याप्त झाल्या असतां दुर्योधन, भीष्म, भूरिश्रवा व अन्य हे धनुष्य बाण घेऊन अर्जुनाशीं युद्ध करूं लागले. भूरिश्रव्यानें सुवर्ण अलंकृत सातबाण, दुर्योधनानें उग्र वेगाचें एक तोमर, शल्यानें गदा व भीष्मानें शक्ति अर्जुनावर टाकिली असतां अर्जुनानें सात बाणानीं भूरिश्रव्याच्या बाणांचें निवारण करून एक तीक्ष्ण बाणानें दुर्योधनाचें तोमर छिन्न केलें व दोन बाणानीं भीष्माची शक्ति व शल्याची गदा छिन्न केली. नंतर दोन बाहूनीं गांडीव धनुष्याचें आकर्षण करून यथाविधि महेंद्र अस्त्राचा प्रयोग करतांच त्या अस्त्रापासून एकाएकीं उत्पन्न झालेल्या अग्निवर्ण बाण जालानीं सर्व कौरव सैन्य विदीर्ण झालें. ते बाण कौरव सैन्यांतील गजाश्व व धनुष्यें यांचा भेद करून नंतर गजाश्वांच्या देहांत त्यानीं प्रवेश केला. या प्रकारें घोर युद्ध चाललें असतां गांडीव धनुष्याच्या शब्दापुढें शंख, दुंदुभी व रथ यांचे नाद ऐकूं येई नासे झाले. गांडीवाचा शब्द ऐकून विराट प्रमुख पांडवांकडील योद्धे व पांचालराज द्रुपद हे उदार मनानें अर्जुनाकडे आले. जिकडे जिकडे गांडीवाचा शब्द होई तिकडे तिकडे सैनिक माघारे फिरत. अर्जुनापुढें जाण्यास कोणासही सामर्थ्य राहिलें नाहीं. ऐंद्रास्त्राच्या योगें अर्जुनानें हजारों गजाश्व व वीर यांच्या देहांचें छेदन केलें असतां त्यांच्या अंगापासून रक्तोदकाची नदी उत्पन्न झाली. त्या नदीला पाहून चेदी, पांचाल, करुष, मत्स्य व पार्थ हे सर्व एका एकीं व एककालीं कौरव सैन्यास त्रस्त करीत त्यानीं महानाद केले. तसेंच कृष्णार्जुनानीं ही कौरवांची सेना नष्ट झाली ह्मणून महान् नाद केले. नंतर कौरवांचे वीर शस्त्रें करून क्षतांग झाले असतां अर्जुनाचें ऐंद्रास्त्र असाह्य व रात्रीची संधी जवळ आलेली पाहून भीष्म, द्रोण, बाल्हीक व दुर्योधन यां सहवर्तमान पळूं लागले. इकडे अर्जुन शत्रूंचें मर्दन करून व लोकां-

मध्यें निर्मळ कीर्ति पावून रात्र झाली असतां आपल्या बंधूं सहवर्तमान शिबिरांत गेला. नंतर प्रदोषकाळीं कौरवांच्या सेन्यामध्यें असा नाद झाला कीं, आज रणामध्यें अर्जुनानें अयुत रथी व सातशें गज मारिले. तसेंच शाच्य, सौवीरगण व क्षुद्रक मालवाचे सर्व गण नाश पावविले. हें त्यानें महत्कर्म केलें असें कर्म करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं. अंबष्ठपति, श्रुतायु, दुर्मर्षण, चित्रसेन, द्रोणाचार्य, कृपाचार्य, सैंधव, बाल्हीक, भूरिश्रवा, शल, शल्य व दुसरे शतशः योद्धे अर्जुनानें क्रुद्ध होऊन स्वबाहूवीर्यानें भीष्मासहवर्तमान जिंकिले. संजय बोलतो हे राजा, या प्रकारें कौरवांचें सैन्य विद्ध होऊन शिबिरामध्यें गेलें. अ. वि. या अ. आ.

६०. अध्याय साठावा - संजय बोलतो हे राजा, ती रात्र अतिक्रांत होऊन दुसरे दिवशीं कौरव सैन्याच्या पुढें भीष्म शत्रुसेनेवर जात असतां द्रोणाचार्य, दुर्योधन, बाल्हीक, दुर्मर्षण, चित्रसेन व जयद्रथ हे आप आपल्या सैन्यासहवर्तमान चोहीं कडून पांडव सैन्यावर आले, तेव्हां त्या रथ्यानीं भीष्मास वेष्टन केलें असतां देवांमध्यें देवराज जसा शोभतो तसा त्यांमध्यें भीष्म शोभला. त्या सैन्याच्या पुढें गजांवर उभारलेल्या रक्त पीत पांडुरवर्ण पताका शोभायमान दिसूं लागल्या. त्या काळीं भीष्मानें संरक्षित कौरवांची सेना गंगेच्या ओघासारखी अर्जुनावर गेली. हें पाहून अर्जुन त्यांपुढें गेला. अर्जुनाच्या रथाचे अश्व कृष्णानीं धरलेले व कपियुक्त ध्वज पाहून तुझ्या पुत्रांसहवर्तमान कौरवांचे वीर खिन्न झाले. कित्येक वीर अर्जुनाचा व्यूह पाहून बोलले कीं, पूर्व दिवशीं जसा धर्मराजानें व्यूह करून लोकांस अनुभव दिला तसा याचा अनुभव येईल. असें बोलून कित्येकानीं रणामध्यें सहस्रावधी भेरींचे व शंखांचे नाद केले. नंतर हजारों वीरानीं आप आपल्या धनुष्यांचे टणत्कार व शंखनाद केले असतां पूर्वी झालेल्या भेरी, पणव नादाचा लोप झाला; त्या नादानीं व पृथ्वीच्या उडालेल्या रजानें आकाश व्याप्त झालें असतां कौरवांचे योद्धे युद्धास प्रसन्न झाले. रथ्यानें रथी मारला

असतां अश्वसारथी व ध्वज यां सहवर्तमान तो खालीं पडला. कित्येक गजानीं गज व पदात्यानीं पदाती पाडले. कित्येक अश्ववृंदे, प्रास व खड्ग यांच्या आघातानें उध्वस्त होऊन भ्रमण करीत पळूं लागलीं. कित्येक सूर्यासारखी तेजस्वी वीरांचीं शस्त्रें व शरीरें परशु व प्रासानें छिन्न भिन्न होऊन भूमीवर पडलीं. असा त्या मुहूर्तीं महाक्षय होत असतां भीष्म अर्जुनास पाहून त्याजवर गेला तेव्हां त्याच्या मागें कृपाचार्य, शल्य, विविंशति, दुर्योधन व सोमदत्ति हे धांवले, त्यांस पाहून अभिमन्यु वेगानें रथसैन्यांतून निघून त्यांचे पुढें गेला आणि त्यांच्या महान् अस्त्रांचें निवारण करूं लागला. संग्रामांत भीष्म एका एकीं रक्ताची नदी उत्पन्न करून व अभिमन्यूचें अतिक्रमण करून अर्जुनावर चालला असतां अर्जुनानें तीक्ष्ण बाणानीं त्यास व्याप्त केला. तसेंच भीष्मानें ही अर्जुनाच्या बाणांचें निवारण करून त्यास बाणानें व्याप्त केला. असें भीष्म व अर्जुन यांचें युद्ध चाललें असतां कुरु सृंजयांचे वीर व अन्य जन तें युद्ध पाहूं लागले. अ. वि. या अ. भा.

६१. अध्याय एकसष्टावा — संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, अश्वत्थामा, भूरिश्रवा, शल्य, चित्रसेन व शल्य पुत्र हे अभिमन्यूशीं युद्ध करूं लागले असतां पांच गजानीं वेष्टित सिंहशिशु जसा शोभतो तसा अभिमन्यु शोभला. अभिमन्यूनें शौर्य, पराक्रम, लाघव व अस्त्र यां विषयीं कौरव सैन्यामध्यें कोणी ही बराबरी करण्यास समर्थ झाला नाहीं हें पाहून अर्जुनानें मोठा सिंहनाद केला. तुझ्या सैन्यास अभिमन्यु पीडित कर्तो हें पाहून कित्येक योद्धानीं त्यास वेष्टिलें. अभिमन्यूनें धार्तराष्ट्र सैन्याशीं युद्ध करीत असतां अश्वत्थाम्यास एक व शल्यास पांच बाणानीं वेध करून आठ बाणानीं सायंमनीच्या ध्वजास वेध केला. सुवर्णदंडाची सर्पाकार अशी शक्ति भूरिश्रव्यानें टाकलेली एक बाणानें छिन्न करून व शतशः शल्य बाणांचें निवारण करून त्याचे च्यारी अश्व नाश पावविले. भूरिश्रवा, शल्य, अश्वत्थामा, सायंमनी व शल हे अर्जुनपुत्र अभिमन्यूच्या बाहूबलाच्या अतिक्रमणास असमर्थ झाले. तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें त्रिगर्तांचे वीर केकेया सहवर्तमान मद्रक व शत्रूनी अजय्य असे पंचवीस हजार

अन्य योद्धे सपुत्र अर्जुनास वेष्टन करून राहिले. हें पाहून धृष्टद्युम्न अश्व व पायदळ यांचे समुदाय घेऊन धनुष्याचा टणत्कार करीत मद्रक व केकेय यांच्या सैन्यावर येत असतां तें सैन्य शोभायमान दिसूं लागलें. अर्जुनसन्मुख वीरां सहवर्तमान येणारा जो कृपाचार्य यास धृष्टद्युम्नानें जतुप्रदेशीं ताडन करून दहा बाणांनीं मद्रकाचे दहा वीर मारिले. एक भल्लबाणानें कृतवर्म्याचा पृष्ठरक्षक मारून पौरव राजाचा पुत्र दमन नामक होता त्याचा एक तीक्ष्ण बाणानें नाश केला. नंतर सांयमुनीच्या पुत्रानें त्यास व त्याच्या सारथ्यास दाहा दाहा बाणांनीं विद्ध करितांच धृष्ट द्युम्नानें दांत ओंठ खाऊन भल्लबाणानें त्याचें धनुष्य तोडून पंचवीस बाणांनीं त्यास ताडण करून त्याचे पार्ष्णी सारथी व अश्व यांचा नाश केला. हें पाहून सायंमनी पुत्र लोहमय असा एक खड्ग घेऊन द्रुपदपुत्र रथस्थ असतां त्याजवर धांवला त्या काळीं आकाशांतून एकाएकीं ओघपडल्या सारखा पांडव व धृष्टद्युम्न यांणीं पाहिला. नंतर धृष्टद्युम्नानें क्रुद्ध होऊन तो आपल्या रथाजवळ येतांच गदेनें त्याचें शिर छेदन केलें असतां त्यास परम यश मिळालें. तो मरण पावला असतां तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला. नंतर सायंमनी आपला पुत्र नष्ट झालेला पाहून त्यानें धृष्टद्युम्नास तीन बाणांनीं ताडन केलें. नंतर शल्य व धृष्टद्युम्न या उभयतांचें युद्ध प्रवृत्त झालें. अ. वि. या अ. आ.

६२. अध्याय बासष्टावा - धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, पराक्रमापेक्षां दैवच थोर आहे असें मी मानितों. पहा बरें पांडुपुत्रांचें सैनीक माझ्या पुत्रांचें सैन्य निरंतर नष्ट करितात. तसेंच माझ्या पुत्रांकडील योद्धे निरंतर मरण पावतात. कौरवांचे योद्दे यथा शक्तीनें पराक्रम करीत असतां त्यांस पांडव जिंकितात हें तूं मला सांगतोस आणि दुर्योधनानें केलेलीं दुःसह अशीं बहुत दुःखें मी तुझ्या मुखापासून ऐकतों; परंतु हे संजया, ज्या उपायेंकरून पांडव हीन होऊन माझे पुत्र युद्धामध्यें जय पावतील असा उपाय मला सुचत नाहीं. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, शल्यानें नऊ बाणेंकरून धृष्टद्युम्नास पीडित केला असतां त्यानें

लोहमय बाणानीं शल्याचें निवारण केलें. त्या काळीं धृष्टद्युम्नाचा पराक्रम अद्भुत दृष्टीस पडला. तें त्यांचें युद्ध एक मुहूर्त पर्यंत परम तीव्र झालें. नंतर शल्यानें धृष्टद्युम्नास पीडित केलें हें पाहून अभिमन्यूनें शल्यास तीन बाणानीं वेध केला. नंतर दुर्योधन, विकर्ण, दुःशासन, विविंशति, दुर्मर्षण, दुःसह, चित्रसेन, दुर्मुख, सत्यव्रत, पुरुमित्र, विकर्ण, हे वीर अभिमन्यूपासून शल्याचें रक्षण करण्या करितां त्याच्या रथा जवळ आले. असतां भीमसेन, धृष्टद्युम्न, द्रौपदीचे पांच पुत्र, अभिमन्यु व नकुळ सहदेव यानीं नाना प्रकारचीं शस्त्रें सोडून त्यांचें निवारण केलें. हे राजा, तुझ्या दुष्टमसलतीनें कौरव पांडवांचे योद्धे परस्पर वधाच्या इच्छेनें संग्रामामध्यें आले. दुर्योधन प्रमुख सर्वांनीं धृष्टद्युम्नास बाणानीं वेध केला. धृष्टद्युम्नही आपलें हस्तलाघव दाखवीत प्रत्येक योद्ध्यांस पंचवीस पंचवीस बाण मारूं लागला. सत्यव्रत व पुरुमित्र या दोघांस अभिमन्यूनें दहा बाणें करून वेध केला. शल्यास नकुळ सहदेव यानीं तीक्ष्ण बाणानीं वेध केला. शल्यानें ही त्यांस बाणवृष्टीनें आच्छादित केलें असतां ते अचल उभे राहिले. भीमसेन दुर्योधनास पाहून याचा अंत करावा या इच्छेनें गदा घेऊन उभा रहातांच तुझे पुत्र पळून गेले. दुर्योधन परम क्रुद्ध होऊन मागध राजास दहा सहस्र गजांसहवर्तमान पुढें करून आला. हें पाहून भीमसेन गदा घेऊन कित्येक गजांस मारीत संचार करूं लागला. नंतर द्रौपदीचे पुत्र, अभिमन्यु, नकुळ, सहदेव, धृष्टद्युम्न हे भीमाच्या पृष्ठभागाचें रक्षण करून बाण वृष्टीनें गजांस ताडण करीत गेले असतां गजारोहांच्या पडलेल्या शिरानीं व बाहूनीं रणभूमि व्याप्त झाली. अशी धृष्टद्युम्नानें गर्दी केली असतां मागधराज ऐरावतोपम गजावर बसून अभिमन्यूच्या रथावर आला. हें पाहून अभिमन्यूनें एक भल्ल बाणानें मागधराजाचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. भीमसेनानें ही गजसेन्यामध्यें संचार करून कित्येक गजांस मारिलें. भीमसेनानें मथन केलेले गज एका एकीं धांवत असतां कित्येकानीं तुझ्या सेन्याचें मर्दन केलें. त्या काळीं अभिमन्यु प्रमुख वीरानीं भीमसेनाचें रक्षण केलें. भीमसेन ती

रक्तानें भरलेली गदा घेऊन फिरत असतां लोकांनीं त्यास यम किंवा रुद्र असें मानिलें स्मशानांत जसा शूलपाणी शूल धारण करून उभा रहातो तसा संग्रामामध्यें भीमसेन उभा राहिला. अ-वि-या अ-आ.

६३. अध्याय त्रेसष्टावा- संजय बोलतो हे राजा, तें गजाचें सर्व सैन्य मरण पावलें हें पाहून दुर्योधनानें भीमसेनास मारावें अशी सर्व सैन्यास आज्ञा केली तेव्हां सर्व सैनीक भीमसेनावर धांवले. देवांनीं ही जिंकण्यास दुःसह असा सेनासमूह आलेला पाहून भीमसेनानें त्याचें निवारण केलें. त्याकाळीं त्याचें अतीमानुषकर्म सर्वांच्या पहाण्यांत आलें. असा भयंकर संग्राम होत असतां धृष्टद्युम्न, द्रौपदीचे पुत्र, अभिमन्यु, शिखंडी व इतर वीर यांनीं भीमसेनास सोडिलें नाहीं. नंतर भीमसेन लोखंडाची जड शक्ति घेऊन रथ अश्ववृंदाचें मर्दन करीत संचार करूं लागला व त्यानें सर्व सैन्याचें मर्दन केलें तेव्हां त्याची गदा, मज्जा वसा व मांस रुधिर याणीं युक्त होऊन परम शोभायमान दृष्टीस पडली. ठिक ठिकाणीं मरण पावलेले गजाश्व रथी व पदाती याणीं तें रणांगण मृत्यूच्या आघात स्थाना सारखें शोभूं लागलें. या प्रकारें भीमसेन वारंवार सैन्यास पळवितो हें पाहून तुझे वीर खिन्न झाले. जिकडे जिकडे भीम गदा घेऊन पाही तिकडे तिकडे सेना विदीर्ण होई. हें पाहून भीष्मानें त्यास बाणवृष्टीनें आच्छादन केलें. हें पाहून क्रोधानें भीमही त्याच्या पुढें आला. सात्यकी भीष्माच्या पुढें आला असतां तुझे वीर सात्यकीवर बाणवृष्टी करूनही त्याचें निवारण करण्यास असमर्थ झाले हें पाहून अलंबुष राक्षसानें दाहा बाणानें सात्यकीस वेध केला. सात्यकीनें चार बाणानीं त्यास वेध करून मोठ्यानें गर्जना केली. भीमसेन सर्व सैन्यास संतप्त करीत जात असतां राजा तुझ्या सैन्यामध्यें भूरिश्रव्यावांचून सर्वही खिन्न झाले. आपले रथी सात्यकीनें पीडित केलेले पाहून भूरिश्रव्यानें सात्यकीशीं युद्ध करावें या इच्छेनें तो त्याच्या पुढें आला. अ-वि-या अ-आ.

६४. अध्याय चौसष्टावा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, नंतर सात्यकी युद्धास आला असतां भूरिश्रव्यानें नऊ बाणानीं सात्य-

कीस वेध केला. सात्यकीनेंही असंख्यात बाणानीं भूरिश्रव्यास व्याप्त केलें. नंतर दुर्योधन आपल्या बंधूं सहवर्तमान भूरिश्रव्याच्या साह्यास येतांच सर्व पांडव सात्यकीच्या रक्षणार्थ आले. भीमसेनानें दुर्योधन प्रमुख तुझ्या पुत्रांचें निवारण केलें. त्याकाळीं नंदकानें भीमसेनास तीक्ष्ण बाणानें वेध केला. तसेंच दुर्योधनानेंही नऊ बाणानीं भीमसेनाच्या उरस्थ-लीं ताडण केलें. नंतर भीमसेन विशोक नामक सारथ्यास बोलला हे सुता, हे धृतराष्ट्र पुत्र आज मलाच मारण्यास उद्युक्त झाले आहेत तर मी यांस मारितों हें तूं पहा. आतां तूं सावध होऊन माझ्या अश्वांचें रक्षण कर. असें बोलून भीमसेनानें सुवर्ण विभूषित दहा बाणानीं दुर्योधनास वेध करून तीन बाणानीं नंदकाच्या स्तनांतरीं वेध केला असतां दुर्योधनानें तीन बाणानीं विशोक सारथ्यास वेध करून तीन बाणानीं भीमाचें धनुष्य छेदि-तांच भीमसेनानेंही त्याचें धनुष्य बाणें करून छेदिलें. तेव्हां दुर्योधनानें दुसरें धनुष्य घेऊन काल व मृत्यू सारखा घोर बाण त्यास लावून भीम-सेनाच्या स्तनांतरीं सोडिला तेव्हां तो अतिविद्ध होऊन रथोपस्थांत मूर्छित पडला हें पाहून अभिमन्यु प्रमुख पांडवांच्या योध्यानीं तुझ्या पुत्राच्या मस्तकीं बाणवृष्टी केली. इतक्यांत भीमसेन सावध होऊन त्यानें दुर्योधनास आठ व शल्यास पंचवीस बाणानीं वेध केला. तेणें करून शल्य विद्ध होऊन रणापासून पळाला. हें पाहून सुषेण, जलसंध, सुलोचन, उग्र, भीमरथ, भीम, उग्रबाहू, अलोलुप, दुर्मुख, दुःप्रदर्षण, विवत्सु, विकट, व सम हे तुझे चौदा पुत्र बाण सोडीत सोडीत भीमसेनावर आले. हें पाहून भीमसेनानें एक क्षुरप्र बाणानें सेनापतीचें शिर छेदन केलें. तीन बाणानीं जलसंध व सुषेण यांस मारून यमलोकीं पाठविलें. या प्रमाणेंच तुझे नवदा पुत्र त्यानें मारले. शेष राहिलेले इतर तुझे पुत्र भीमसेनास पाहून दाही दिशेस पळून गेले. नंतर भीष्म सर्व महारथ्यांच्या पुढें येऊन बोलला कीं, अरे हा भीमसेन मुख्य मुख्य महारथ्यांस मारितो यास्तव यास सर्वांनीं लौकर धरावें. असें ऐकतांच दुर्योधनाचे सैनीक भीमसेनावर धांवले. त्यामध्यें भगदत्त मदस्रावी गजावर बसून ज्याठिकाणीं

भीमसेन उभा होता त्या ठिकाणीं एका एकीं येऊन त्यानें भीमसेनास बाणवृष्टीनें आच्छादन केलें. हें पाहून अभिमन्यु प्रमुख महारथ्यांनीं भगदत्तास बाण वृष्टीनें वेष्टण करून गजासही बाणवृष्टीनें भेदिलें. भगदत्तानें त्या गजास पुनः प्रेरणा केली असतां गज पूर्वीपेक्षां द्विगुणित वेगानें व पायानें पृथ्वी कंपित करीत पुढें आला हें पाहून सर्व महारथी हा असाध्य आहे असें जांणून खिन्न झाले. भगदत्तानें भीमाच्या स्तनांतरीं भेद केला असतां तो ध्वजस्तंभाचा आश्रय करून राहिला, तेव्हां भगदत्तानें मोठ्यानें गर्जना केली. हें पाहून घटोत्कच आपली माया धरून पुढें उभा राहिला. घटोत्कच स्वतः मायामय ऐरावतावर बसून येतांच त्याच्या पाठीमागें अंजन, वामन व महापद्म या तीन गजांवर बसून राक्षस आले. घटोत्कचानें तर भगदत्तास मारावें या इच्छेनें त्याचे गजावर आपल्या गजास प्रेरणा केली. दुसऱ्या च्यार दंताचे तीन गजांनीं तीन दिशांनीं येऊन भगदत्ताच्या गजास आपल्या दंतांनीं पीडित केलें. त्या काळीं भगदत्ताचा गज पीडित झाला असतां भयंकर शब्द करूं लागला. तो ऐकून पितामह भीष्म, द्रोणाचार्य व दुर्योधन यांस बोलले कीं, भगदत्त संग्रामामध्यें घटोत्कचासहवर्तमान युद्ध करीत असतां तो महान् संकटामध्यें पडला आहे घटोत्कच राक्षस तर अतिकोपी व मायावी आहे हे दोघे कालमृत्यू सारिखे संचार करितात. हा पांडवांचा हर्षित शब्द ऐकूं येतो व भगदत्ताचा गज तर भयाभीत होऊन त्याचा रोदन ध्वनि ऐकूं येतो यास्तव आपण राजाचे रक्षणास्तव तेथें जाऊं. जर या संग्रामामध्यें आपण लोकर जाऊन त्याचें रक्षण न केलें तर तो मरण पावेल याजकरितां हे महावीर हो, विलंब करूं नका. हा संग्राम बहुत वृद्धि पावतो. हा भगदत्त तर महान् शूर आपला भक्त व सेनापति आहे यास्तव त्याचें परिभ्रमण करणें हें आपणास योग्यच आहे. असें भीष्मानें भाषण ऐकून भारद्वाज प्रमुख सर्व योद्धे भगदत्ताच्या रक्षणा करितां आले. हें पाहून युधिष्ठिर पुरोगम पांडव पांचालांसहवर्तमान घटोत्कचाच्या पृष्ठभागीं आले तेव्हां त्यानें महान् नाद केला. घटोत्कचाचा व गजाचा महान् नाद ऐकून भीष्म बो-

लतो हे भर द्वाजा, घटोत्कचाशीं संग्राम करणें मला योग्य दिसत नाहीं. सांप्रत काळीं हा बलवीर्यानें व साहाय्यानें युक्त असल्यामुळें इंद्रास ही आज अजय्य आहे, पांचाल व पांडवां सहवर्तमान आज सर्व दिवस युद्ध केलें. आज त्यांचा जयाचा काल दिसतो यास्तव युद्ध करणें बरें वाटत नाहीं, आतां सैन्यामध्यें असा घोष करावा कीं, सर्वांनीं अवहार करावा. हें ऐकून सर्वांनीं अवहार केला. हें पाहून पांडव शंखनाद करूं लागले. हे राजा, असें कौरव पांडवांचें युद्ध घटोत्कच पुरःसर झालें असतां कौरवांचे योद्धे लज्जेनें अधोमुख होऊन आप आपले शिबिरांत गेले. तसेच पांडव ही जय पावून भीमसेन व घटोत्कच यांस पुढें करून आप आपल्या शिबिरांत गेले. दुर्योधन राजा तर बंधूवधानीं दीन व दुःखित होऊन आपल्या शिबिरास गेला. अ. वि. या अ. आ.

६५. अध्याय पांसष्टावा.– धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, पांडुकुमारांचें कर्म देवांस ही दुष्कर असें ऐकून मला मोठें भय व विस्मय ही झाला. हे संजया, सर्व प्रकारें माझ्या पुत्रांचा पराभव ऐकून पुढें कसें होईल या विषयीं चिंता उत्पन्न झाली आहे, विदुराचीं वाक्यें आतां खचित माझ्या हृदयास दहन करितात. दैवयोगानें त्याच्या भाषणा प्रमाणें झालेलें दिसतें. भीष्म प्रमुख असूनही व शूर यांस पांडवांच्या योद्ध्यानीं बहुत त्रस्त केले असे दिसतात. आतां पांडुपुत्र अवध्य कां व माझे पुत्र वध्य कां. रणामध्यें आपले सैनीक विमुख झालेले पाहून दुर्योधन, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, शकुनि, जयद्रथ, अश्वत्थामा, विकर्ण यांचा काय निश्चय झाला हें सर्व सांग? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, पांडव तर शक्तिमान् आहेत, संग्रामामध्यें यथान्यायें करून ते युद्ध करितात. जिकडे धर्म तिकडेच जय होतो असा नेम आहे ह्मणून रणामध्यें पांडव जयशाली होतात. तुझे पुत्र तर पापकर्माविषयीं रत आहेत ह्मणून रणामध्यें जय पावत नाहींत असें असतांही तुझे पुत्र पांडवांचा बहुमान करीत नाहींत ह्मणून केलेल्या पापाचें फळ त्यांस मिळालें त्या फळाचें पुत्र पौत्र व सुहृद जन यांसहवर्तमान आज तूं सेवन कर. पूर्वीं विदुर, भीष्म, द्रोण याणीं व मी

वारंवार जरी तुझें निवारण केलें तरी कोणाचें हित वाक्य तूं ऐकिलें नाहींस. आतां पांडवांच्या जयाचें कारण जसें मी ऐकिलें तसें तुला सांगतों. याच कारणा विषयीं पूर्वीं दुर्योधनानें भीष्मास प्रश्न केला होता तो तुला सांगतों ऐक. हे राजा, महारथी आपले बंधू पराजित झालेले पाहून दुर्योधनानें भीष्मास विचारिलें कीं हे पितामह, द्रोणाचार्य, तुह्मी, शल्य, कृपाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा, कांबोज सुदक्षण, भूरिश्रवा, विकर्ण व भगदत्त हे महारथी आपला देहत्याग करणारे, लोकांत विख्यात असतां आज कोणी पांडवांच्या पुढें उभे रहाण्यास समर्थ होत नाहींत या विषयीं मला मोठा संशय वाटतो. हे भीष्मा, कुंतीपुत्र पदापदाचेठायीं आह्मांस जिंकितात याचें कारण काय? असें ऐकून भीष्म बोलतात हे दुर्योधनराजा, मी तुला पूर्वीं बहुत प्रकारें हित सांगितलें; परंतु तूं ऐकिलें नाहींस. हे भरतश्रेष्ठा, पांडवां सहवर्तमान शम करावा यामध्यें सर्व पृथ्वीचें व तुझें कल्याण आहे असें मी पूर्वीं आक्रोश करून तुला सांगत असतां तूं ऐकिलें नाहींस तें हें आज पांडवांच्या अवमानाचें फळ मिळालें. अक्लिष्टकर्मे जे पांडव यांचा अवध्यत्व हेतु तुला सांगतों. कृष्णानें पांडव संरक्षण केल्यामुळें त्यांस तीन लोकामध्यें जिंकील असा कोणी मागें झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं. हे दुर्योधना, पांडवां विषयीं जें पूर्वीं मुनीनीं पुराणांत कथन केलें आहे तें यथार्थपणें मी सांगतों. पूर्वीं सर्व देवऋषी गंधमादनपर्वताचाठायीं पितामहाचें सेवन करीत असतां ब्रह्मदेवानें अकस्मात आकाशामध्यें कांतीनें जाज्वल्यमान असें एक विमान पाहिलें. आणि त्या विमानांत कोण बसलें आहे तें जाणून परमेश्वरास नमस्कार केला. हें पाहून सर्व महान आश्चर्यकारक स्वरूप पहात उभे राहिले. ब्रह्मदेव यथाशास्त्र पुरुषोत्तमाची पूजा करून स्तुति करूं लागला. हे देवा, तूंच विश्वावसु, विश्वमूर्ति, विश्वाचा ईश आणि वासुदेव होस. तुलाच योगात्मा असें जाणून मी शरण येतो, हे विश्वरूपा, तुझा जयजयकार असो, सर्व पंचमहाभूतें, आत्मतत्व व लोक यांचा उद्भव तुझ्या पासूनच आहे, उत्तम भक्तिमानास मुक्तिरूप विजय देणार तूंच आहेस, सर्व प्रजापतीचा पति तूंच आहेस, पृथ्वी देवी तुझे पाद आहेत, दि-

शा हे तुझे बाहू व आकाश हें तुझें मस्तक होय. या प्रमाणें जगत तुझ्या आश्रयें करून राहतें. हे योगेशा, तुझें तेज, बल इत्यादिक आह्मीं जाणत नाहीं, तुझ्या भक्तीमध्यें आह्मीं तत्पर असून तुझें पूजन करितों. ऋषी, देव, गंधर्व, इत्यादि जगत तुझ्या प्रसादानें मी पृथ्वीवर उत्पन्न केलें. हे पद्मनाभा, तुझ्या प्रसादानें पृथ्वी निर्भय आहे या हेतूस्तव तूं धर्मसंस्थापनार्थ कृष्ण या नामानें उत्पन्न होऊन आमचें इच्छित पूर्ण करावें. ब्रह्मऋषी, देव व भक्त हे तुझें गायन करितात. अ० वि० या अ० आ०

६६. अध्याय सासष्टावा:- भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, नंतर भगवान् गंभीर वाणीनें ब्रह्मदेवास बोलले हे ब्रह्मदेवा, तुझें सर्व इच्छित मी योगानें जाणलें तें सर्व होईल. असें भाषण करून भगवान् तेथेंच अंतर्धान पावल्या नंतर देव, गंधर्व, ऋषी विस्मय पावून ब्रह्मदेवास बोलले कीं हे पितामहा, तुह्मीं विनयानें नमस्कार करून उत्तम वाणीनें ज्याचा स्तव केलात हा कोण? असें ऐकून ब्रह्मदेव ऋषी, देव व गंधर्व यांस बोलतात कीं, त्रिकाळ असणारें जें ब्रह्म त्याशीं मी संवाद केला. जगताच्या अनुग्रहार्थ मी जगत्पतीची अशी प्रार्थना केली कीं, असुरांच्या वधार्थ वासुदेव या नावानें तुह्मीं महीतलाचे ठायीं उत्पन्न व्हावें. पुढें स्वतः भगवान नरास हवर्तमान् या मनुष्य योनीचा आश्रय करून महीतलाचे ठायीं संचार करील. हे नरनारायण रणामध्यें उभे राहिले असतां देवांसही अजय आहेत. ते या मनुष्य लोकामध्यें अमित कांतियुक्त उत्पन्न झाले. त्यांस हे मूढ जन नरनारायण ऋषी असें जाणत नाहींत. ज्याचा मित्र मी, सर्व लोकांचा जो पति, वासुदेव ज्यास ह्मणतात, त्यास तुह्मीं सर्वांनीं शरण असावें. जो कोणी मंदबुद्धि पुरुष हृषीकेशास न जाणून हा मनुष्य आहे असें बोलेल तर त्यास पुरुषाधम असें ह्मटलें आहे, वासुदेवाचा अवमान करणारा तामसी पुरुष घोर नरकामध्यें निमग्न होतो. असा तत्वार्थ जाणून सर्व लोकांनीं वासुदेवास नमस्कार करावा. भीष्म ह्मणतात हे दुर्योधना, या प्रकारें ब्रह्मदेव बोलून आपले स्थानीं गेले. नंतर गंधर्वांसहवर्तमान देव, मुनी ब्रह्मदेवानीं गायन केलेल्या कथा ऐकून स्वर्गलोकीं गेले. हे दुर्योधना, असें पू-

र्वी मी सर्व ऋषींच्या सभेंत वासुदेवाचें महात्म्य ऐकिलें. तसेच जामदग्न्यराम, मार्कंडेय, व्यास व नारद यांजपासून ही हाच अर्थ ऐकून हा वासुदेवमहात्मा, सर्व लोक प्रभु व अव्यय आहे असें जाणतों. सर्व जगताचा पिता ब्रह्मदेव ज्याचा आत्मज तो वासुदेव मनुष्यांनीं अर्चन पूजनास कसा योग्य होणार नाहीं, हे बापा, पूर्वीं मी व सर्व मुनीनीं तुला सांगितलें कीं, वासुदेवाशीं व पांडवांशीं तूं संग्राम करूं नको; परंतु तूं मोहें करून ऐकिलें नाहीं स यावरून तूं तमोवेष्टित केवळ राक्षस आहेस असें मी जाणतों, कारण गोविंद व पांडव जो धनंजय हे दोघे नारायण देव आहेत यांचा राक्षस कर्मावांचून कोण मनुष्य द्वेष करील बरें. याहेतूस्तव मी तुला सांगतों कीं, हा वासुदेव शाश्वत व अवध्य आहे याच्या योगानें पांडवांचा संग्राममध्यें जय होतो. अ० वि० या अ० आ०

६७. अध्याय सदुसष्ठावा- दुर्योधन प्रश्न कर्तो हे भीष्मा, वासुदेव महद्भूत ह्मणून सर्व लोकामध्यें ज्याचें गायन होतें त्याचें ज्ञान व प्रतिष्ठा मी जाणण्याची इच्छा कर्तो. असा प्रश्न ऐकून भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, वासुदेव महद्भूत सर्व देवतांचें दैवत आहे. या पुंडरीकाक्षाहून दुसरें कांहीं दिसत नाहीं, हा गोविंद आप, वायु व तेज उत्पन्न करून पृथ्वी उत्पन्न केल्या नंतर त्यानें आपल्या योगें करून उदकांत शयन केलें. त्याच्या मुखापासून अग्नि व प्राणापासून वायु उत्पन्न झाले. जो शेष भूतास व पृथ्वीस धारण करतो त्यास महातेजस्वी ब्राह्मण ध्यानयोगानें जाणतात. कर्णमलापासून उत्पन्न झालेला मधुनामा दैत्य यास पुरुषोत्तमानें मारला ह्मणून त्यास मधुसूदन असें ह्मणूं लागले. याच्याच शरीरापासून ब्राह्मण प्रमुख चार वर्णांची उत्पत्ति झाली. जे कृष्णास शरण जातात ते कधीं मोह पावत नाहींत. महाभयामध्यें बुडालेल्या पुरुषाचें जनार्दन नित्य रक्षण करितो. असें जाणून युधिष्ठिर यास शरण गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

६८. अध्याय अडुसष्ठावा- भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, पूर्वीं ब्रह्मऋषीनीं व देवानीं परमेश्वराचा केलेला जो स्तव तो सांगतों. सा-

ध्य व देव यांचा श्रीकृष्ण प्रभु असें नारदऋषी ह्मणतात. भूत, वर्तमान, भाविष्य या पासूनच होतें असें मार्कंडेयऋषि ह्मणतात. हाच देवांचाही देव असे भृगुऋषि ह्मणतात. सर्व भूतांचा स्रष्टा हाच असें अंगिराऋषि ह्मणतात. या प्रमाणें निरंतर योगवेत्ते सनत्कुमार प्रमुख मुनि पुरुषोत्तमाचें स्तवन करून पूजन करितात. भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, हें केशवाचें तत्व तुला सांगितलें तूं आतां केशवाचे ठायीं संतुष्ट हो. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, असें भीष्माचें भाषण ऐकून दुर्योधनानें केशवास व पांडवांस श्रेष्ठ मानिलें. हे राजा, पुनः भीष्म भाषण करितात हे दुर्योधना, हे नरनारायण देव आहेत यांची अवज्ञा केली असतां नाश पावशील. असें बोलून भीष्म स्तब्ध झाला आणि सर्व राजांस आप आपल्या शिबिरास पाठवून नंतर आपण शिबिरामध्यें गेला. नंतर त्या रात्रीं दुर्योधन भीष्मास नमस्कार करून आपल्या शुभ्र शय्येवर निजला. असा विषय या अध्यायांत आहे.

६९. अध्याय एकुणहत्तरावा - संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, ती रात्र अतिक्रांत होऊन दुसरे दिवशीं सूर्योदय झाला असतां दोन्ही सेना युद्धार्थ बाहेर निघून परस्पर योद्धे एकमेकांस जिंकण्याच्या इच्छेनें क्रुद्ध होऊन एकमेकांकडे पहात युद्धा विषयीं धांवले. त्याकाळीं भीष्मानें आपले सैन्याचा मकरव्यूह करून त्याचें संरक्षण केलें. इकडे पांडवानीं आपल्या सैन्याचा श्येनव्यूह करून त्याचें रक्षण केलें. हे राजा, तुझा पिता भीष्म मोठ्या रथसमुदाया सहवर्तमान युद्धास निघाला असतां इतर योद्धे आपआपल्या नेमलेल्या जाग्यावर उभे होते ते त्याच्या पृष्ठभागीं गेले. कौरवांचें सैन्य उभें राहिलेलें पाहून पांडवही श्येनव्यूह करून युद्धार्थ उभे राहिले. त्या व्यूहाच्या मुखप्रदेशीं भीमसेन, नेत्रस्थानीं शिखंडी व धृष्टद्युम्न, शिरस्थानीं सात्यकि, कंठस्थानीं पार्थ, वामपक्षस्थानीं द्रुपद, दक्षिणस्थानीं कैकेय, पृष्ठभागीं द्रौपदीपांच पुत्र व अभिमन्यु, त्यांच्या पृष्ठभागीं युधिष्ठिर, नकुल, सहदेव या प्रमाणें ते सर्व उभे राहिले. त्याकाळीं भीमसेनानें मकरव्यूहाच्या मुखमार्गानें शत्रुसैन्यांत जाऊन भीष्मास बाणानीं आ-

च्छादन करितांच भीष्मानें पांडुपुत्रावर व त्यांचे सैनिकांवर मोहास्त्राची वृष्टी करून त्यांस मोहित केलें. त्या समयीं धनंजयानें सहस्र बाणांनीं भीष्मास वेध केला आणि त्याणें सोडलेल्या अस्त्राचें निवारण करून तो आपल्या सैन्यासहवर्तमान युद्धास उभा राहिला असतां दुर्योधन द्रोणास बोलतो हे द्रोणा, पूर्वी माझ्या सैन्याचा व बंधूंचा वध झाला हें तुम्हीं पाहिलेंच आहे. आतां माझें हित करणारे तुम्हीच आहांत तुमच्या आश्रयें करून मी देवांसही जिंकण्याची इच्छा करितों. हीन पराक्रमी जे पांडव यांची तुम्हां पुढें कथा काय? आतां पांडव जेणें करून वध्य होतील असें लौकर करावें. असें भाषण ऐकून द्रोणानें सात्यकी पहात असतां पांडवसैन्यानें निवारण केलें. नंतर सात्यकीही द्रोणाचें निवारण करण्यास प्रसन्न झाला असतां घोर युद्ध प्रवृत्त झालें. भरद्वाजानें दहा बाणें करून सात्यकीच्या जत्रुप्रदेशाचाठायीं वेध केला असतां भीमसेनानें द्रोणाचार्यापासून सात्यकीचें रक्षण करण्यास्तव त्यास बाणें करून वेध करितांच द्रोणाचार्य, भीष्म व शल्य यानीं बाणवृष्टीनें भीमसेनास आच्छादन केलें. त्याकाळीं अभिमन्यु व द्रौपदीचे पांच पुत्र हे बाणें करून सर्वांस वेध करूं लागले. भीष्म व द्रोण हे पुढें येतात हें पाहून शिखंडीनें त्यांजवर बाणांची वृष्टी केली तेव्हां त्याचें स्त्रीत्व स्मरण करून भीष्म त्यास सोडून इतरांशीं युद्ध करूं लागला असतां द्रोणाचार्य तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें भीष्माच्या रक्षणार्थ आला. हें पाहून शिखंडी त्यास सोडून इतर स्थळीं गेला. नंतर दुर्योधन महत् यश मिळावें ह्मणून सैन्यासहवर्तमान भीष्माजवळ येऊन त्याचें रक्षण करूं लागला. तसेंच सकल पांडव धनंजयास पुढें करून जयाविषयीं भीष्मावर आले असतां त्या उभयतांचें युद्ध देव दानवांसारखें झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

७०. अध्याय सत्तरावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, भीमसेनाच्या भयापासून तुझ्या पुत्राचें रक्षण करावें ह्मणून भीष्म तुमुल युद्ध करूं लागला. तें युद्ध पूर्वाण्हभागीं कौरव व पांडवांकडील राजांचें व मुख्य मुख्य शूरांचें नाश करणारें असें झालें. त्या संग्रामामध्यें महान् महान् गजा-

श्वांच्या शब्दानीं आणि भेरीव शंख यांच्या नादानीं आकाश व्याप्त झाले. आकाशापासून पाषाणवृष्टी जशी होत्ये तशी निशितबाणानीं योद्ध्यांचीं शिरें पडूं लागलीं. कौरव आणि पांडव यांचा समागम तीव्र झाला असतां कित्येक क्षत्रियानीं युद्धाविषयीं दुर्मद होऊन बाणजालांची वृष्टी केली. कित्येक गजानीं मोठ्यानें आक्रोश केले. शर, शक्ति, गदा व खड्ग याणीं छिन्न झालेलीं हस्तपादभूषणें यांच्या राशीच्या राशी भीमसेन व भीष्म समागमामध्यें पडलेल्या दिसल्या. त्या काळीं कालानें प्रेरित झालेले क्षत्रिय परस्पर गदा, खड्ग, प्रास व बाण यांचे प्रहार करूं लागले. नंतर दुर्योधन बहुत कालिंग वीरांसहवर्तमान भीष्मास पुढें करून पांडवांवर येतांच सर्व पांडव आवेशानें वृकोदरास पुढें करून भीष्मावर धांवले. असा विषय या अध्यायांत आहे.

७१. अध्याय एकाहत्तरावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, भीष्मानें आपले बंधूस व सुहृद जनांस व्याप्त केलेलें पाहून अर्जुन भीष्मावर धांवला त्याकाळीं पांचजन्य शंखाचा व गांडीव धनुष्याचा शब्द ऐकून व पार्थाचा ध्वज पाहून सर्वांस भय उत्पन्न झालें. अर्जुन तुझ्या सेनेस गारित चालला असतां घोर शब्द श्रवणांत आला. अर्जुनानें भीष्मावर भयंकर अस्त्रवृष्टि केली. त्याकाळीं मी त्याच्या अस्त्रानीं मोहित झाल्यामुळें प्राची व प्रतीची दिशा कोणची हें काहींच कळेनासें झालें. कौरवांचे योद्धे परस्पर आलिंगन करून तुझ्या पुत्रांसहवर्तमान भीष्मामागें लपून राहिले असतां भीष्मानें त्यांस आर्त पाहून आश्रय दिला. गांडीव धनुष्याचा शब्द रासभासारखा ऐकून कित्येक रथी रथाखालीं पडले. अशी कौरवांची सेना भयाधीन होऊन लपून राहिली असतां कांबोजदेशीय सहस्रावधी अश्व, मद्र, सौवीर व गांधारदेशीय वीर, त्रिगर्त व सर्व कालिंगांसहवर्तमान कलिंगाधिपति सर्व राजांसहित दुःशासनास पुढें करून आला. तसाच सर्व राजांसहवर्तमान जयद्रथही अग्रभागीं आला. तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें चौदासहस्र अश्वस्वार शकुनीस पुढें करून युद्धास आले. हें पाहून सर्व पांडवांचे योद्धे तुझ्या वीरांस मारूं लागले. त्याकाळीं गजाश्वरथांच्या योगें उडाले-

ले जे रज त्यानीं रणभूमि भयंकर दिसूं लागली. त्या समयीं भीष्म तोमर, प्रा-
स व नाराच याणीं युद्ध करणारे, कित्येक गजाश्व योद्धे यांसहवर्तमान अ-
र्जुनाशीं, काशिराजाशीं अवंत्य राजा, भीमसेनाशीं जयद्रथ, धर्मराजा-
शीं शल्य, सहदेवाशीं विकर्ण, शिखंडीशीं चित्रसेन; दुर्योधन व शकुनि यां-
शीं मत्स्य, द्रुपद, चेकितान व सात्यकि हे पुत्रांसहवर्तमान द्रोणाचार्यांशीं, कृ-
पाचार्य, कृतवर्मा हे धृष्टद्युम्नाशीं याप्रमाणें युद्ध करूं लागले. याप्रकारें ग-
जाश्व रथी इकडे तिकडे पळत असतां आस्मंतात द्वंद्व युद्धें प्रवृत्त झालीं. आ-
काशापासून महान उल्का उत्पन्न झाल्या. महान् भयंकर वायु सुटल्या मु-
ळें रज उडून आकाशामध्यें सूर्य आच्छादित झाला व सैन्यही व्याप्त झालें.
कित्येक ठिकाणीं योद्ध्यांचीं शिरें व शरीरें छिन्न होऊन पडलीं. कित्येक ग-
जानीं दाही दिशांस गर्जना करीत मध्यभागीं आलेल्या कित्येक रथ्यांस आ-
पल्या शुंडेनीं आकर्षण करून भूमीवर पाडलें. अ. वि. या. भ. भा.

७२. अथ [illegible] बाहनगवा - संजय: भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा,
विराटासह[illegible] रेत्य शिखंडी भीष्माशीं द्रोणाचार्य, कृपाचार्य, विकर्ण यां-
शीं अर्जुन, जयद्रथ, प्राच्य, दक्षिणात्य, दुर्योधन व दुःसह यांशीं भीमसे-
न, शकुनि व उलुक यांशीं सहदेव, युधिष्ठिर गजसेन्याशीं, नकुळ त्रिगर्ता-
शीं, सात्यकि, चेकितान व अभिमन्यु हे संग्रामामध्यें शाल्व व केकेय यांशीं
धृष्टकेतु[illegible] राक्षस घटोत्कच हे रथसैन्याशीं, सेनापति धृष्टद्युम्न द्रोणाचा-
र्यांशीं [illegible] प्रमाणें युद्ध करूं लागले. हे तुझे व पांडवांचे वीर संग्रामामध्यें
एकत्र होऊन परस्पर प्रहार करूं लागले. सिंह जसे गर्जना करितात तसे
सर्व वीरानीं परस्पर जिंकण्याच्या इच्छेनें गर्जना केली. संजयांच्या वीरानीं
कौरवांशीं युद्ध केलें. त्या काळीं आकाश, दिशा, विदिशा व सूर्य बाणानीं आ-
च्छादित झाला असतां कांहीं दिसेनासें झालें. चित्र विचित्र कवचें व भूषणें यां-
च्या प्रभेनीं दिशा विदिशा आकाश प्रकाशित झालें. मनुष्यश्रेष्ठ व रथीश्रेष्ठ
असे वीर रणामध्यें आलेले आकाशांतील ग्रहां सारिखे शोभूं लागले. त्या
काळीं भीष्मानें सर्व सैनीक पहात असतां भीमसेनाचें निवारण करून सु-
वर्णपुंख शिलाशित व तैलधौत बाणानीं त्यास वेध केला. भीमसेनानें सर्पा-

सारखी शक्ति घेऊन भीष्मावर टाकिली असतां भीष्मानें घोर बाणांनीं ति-चें छेदन करून एका बाणानें भीमसेनाच्या धनुष्याचे दोन तुकडे केले. हें पहातांच सात्यकीनें बहुत बाणांनीं भीष्मास वेध केला तों भीष्मानें तीक्ष्णबाण धनुष्यास लाऊन रथापासून त्याचे सारथ्यास खालीं पाडतांच अश्व संग्रामापासून पळून गेले असतां कौरव सैन्यामध्यें मोठा हर्षशब्द झाला. पांडवसैन्यामध्यें हाहाकार शब्द होऊन अरे धांवा अरे अश्वांस धरा असा शब्द झाला. जसा इंद्र असुर सेना नष्ट करितो तसा भीष्मानें पांडवसैन्याचा जरी नाश केला तथापि सोमकांसहवर्तमान पांचाल भीष्मबाणांनीं वध्य होऊन युद्धाविषयीं आर्यवृत्तीनें त्याजवर धांवले. तसेच धृष्टद्युम्नप्रमुख पांडवांनीं रणामध्यें भीष्मावर धांऊन तुझ्या पुत्राच्या सेनेस पीडित केलें. भीष्म द्रोण प्रमुख कौरवांचे वीर पांडवसैन्यावर धांवले असतां परस्परांचें युद्ध प्रवृत्त झालें. अ. बि. या अ. आ.

७३. अध्याय त्र्याहत्तरावा — संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, विराटराजाचें व भीष्माचें, अश्वत्थाम्याचें व अर्जुनाचें, दुर्योधनाचें व भीमसेनाचें, अभिमन्यूचें व चित्रसेनाचें या प्रमाणें मोठें परस्परांचें प्राणघातक करणारें असें युद्ध चाललें असतां परस्पर वधाच्या इच्छेनें तुझे व पांडवांचे वीर प्राणांचें हवन करीत गेले. कित्येक स्थानहीन झाले असतां कौरवांसहवर्तमान संजयांचें बाहूयुद्ध प्रवृत्त झालें. त्याकाळीं भीष्मानें पांडवांची सेना नाश पावविली असतां कित्येक हतवीर व गज यांनीं पृथ्वी अगदीं व्याप्त होऊन गेली. अ. बि. या अ. आ.

७४. अध्याय चौऱ्याहत्तरावा — संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, सात्यकी दृढ धनुष्य घेऊन आपल्या हस्तलाघवानें तीक्ष्ण व विषोपम बाण सोडितो केव्हां हें कोणास कळेनासें झालें. त्याकाळीं दुर्योधनराजानें त्याच्या अग्रभागीं जाण्यास एक अयुत रथ्यांस आज्ञा करितांच ते गेले. नंतर सात्यकी दिव्यास्त्रांनीं त्यांचा नाश करून भूरिश्रव्याचे पुढें आला. तेव्हां भूरिश्रव्यानें हजारों बाण सात्यकीवर टाकिले. हें पाहून सात्यकीचे दहा पुत्र भूरिश्रव्यावर येऊन बोलले कीं, अरे कौरवदायादा, अरे हे महाबला येथें संग्रामाम-

ध्यें तुझी इच्छा असल्यास आह्मां सर्वांसहवर्तमान युद्ध कर. अथवा आह्मां एक एकाशीं युद्ध कर. आह्मांस जिंकून यश पाव. असें ते बोलले तेव्हां भूरिश्रवा भाषण करितो हे वीर हो. तुह्मांस आज मी रणामध्यें मारितों. असें ऐकून सात्यकी पुत्रांनीं बाणवृष्टीनें त्यास व्याप्त केला असतां यमदंड व वज्रतुल्य ते बाण येण्याचे पूर्वीं भूरिश्रव्यानें छेदून टाकिले. सात्यकी पुत्र पुनः भूरिश्रव्यावर बाणवृष्टि करून त्यास मारण्याच्या इच्छेनें उभे राहिले तेव्हां भूरिश्रव्यानें निमेषमात्रांत दहा बाणांनीं त्यांचीं दहा शिरें छेदन केलीं. हें पाहून सात्यकि भूरिश्रव्याच्या रथाशीं रथ लाऊन युद्धास प्रवृत्त झाला तेव्हां दोघेही विरथी होऊन खड्गचर्म घेऊन युद्धार्थ उभे राहिले. नंतर भीमसेनानें सात्यकीस आपल्या रथांत बसविला व दुर्योधनानें भूरिश्रव्यास आपल्या रथांत बसविलें. असा घोर संग्राम प्रवृत्त झाला असतां पांडव भीष्माशीं युद्ध करूं लागले. सूर्य अस्ताचलास जातो हें धनंजयानें पाहून दुर्योधनानें पाठविलेले पंचवीस सहस्र महारथी नष्ट करून टाकिले. मत्स्य व केकय वीर अर्जुनास वेष्टन करून उभे होते. आदित्य अस्ताचलास जाता धीत व मेघ याणीं अंधःकार झाला हें पाहून भीष्मानें सैन्याचा अन्यास र्वांचा व पांडवानींही अवहार केला. पुढें संजयांसहवर्तमान पांडव व कौरवानांनी [illegible] करून शिबिरांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

७५. अध्याय पंचाहत्तरावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं कौरव व पांडव युद्धास निघाले तेव्हां सर्व वीर युद्धास सिद्ध झाले असतां परस्पर सैन्यामध्यें वाद्यांचे घोष होऊं लागले. नंतर युधिष्ठिर धृष्टद्युम्नास बोलला हे धृष्टद्युम्ना, मकर व्यूहाची आज योजना कर. असें ऐकून त्यानें त्या व्यूहाची योजना केली. ती अशीकीं, द्रुपदराजा व धनंजय हे शिरदेशीं, नकुळसहदेव हे चक्षुस्थानीं, भीमसेन मुखस्थानीं, अभिमन्यु, द्रौपदीचे पांच पुत्र, घटोत्कच, सात्यकि व धर्मराज हे व्यूहाच्या ग्रीवादेशीं, विराट आणि धृष्टद्युम्न हे महासेनेसहवर्तमान पृष्ठभागीं, केकय पांच बंधु वामपक्षीं, धृष्टकेतु दक्षिण देशीं, कुंतिभोज पादस्थानीं व शिखंडी पुच्छस्थानीं या प्रमाणें उभे राहिले. इकडे भीष्मानें

आपल्या सैन्यामध्यें त्याच्या प्रतिस्पर्धी क्रौंच व्यूह करून त्या व्यूहाच्या मुखावर भारद्वाज, अश्वत्थामा व कृपाचार्य हे नेत्रस्थानीं. कांबोज व वाल्हीक वीरांसहवर्तमान कृतवर्मा हे शिरप्रदेशीं. दुर्योधन व शूरसेन हे ग्रीवास्थानीं. भगदत्त उरस्थलीं. आपल्या सैन्यासहवर्तमान सुशर्मा वामपक्षीं. तुखीक व वशातक यांसहवर्तमान तुषार व यवन हे दक्षिणपक्षीं. श्रुतायु, शतायु व भूरिश्रवा हे त्रिवर्ग जघनस्थानीं या प्रमाणें ते सर्व योद्धे उभे राहिले असतां परस्परांचें युद्ध होऊं लागलें. त्यासमयीं भीमसेन, अर्जुन, नकुळ, सहदेव व अन्य महारथ्यानीं पांडवांची जी संरक्षित सेना ती नक्षत्रवेष्टित रात्री सारखी शोभली. तशीच भीष्म, कृप, द्रोण, शल्य व दुर्योधनादिक वीरानीं युक्त कौरवांची सेना ग्रहवेष्टित आकाशा सारखी शोभली. भीमसेन रथांत बसून द्रोणसेन्यावर गेला असतां द्रोणाचार्यानें ही नऊ बाणानीं भीमसेनाच्या मर्माचेठायीं वेध केला तेव्हां भीमसेनानें त्याच्या सारथ्यास यमलोकीं पाठविला. त्याकाळीं [illegible]र्य स्वतः अश्वांच्या रश्मि धारण करून अग्नि जसा कापसाच [illegible] रथ करितो तसा पांडवी सेनेस नाशित करूं लागला. पुढें कौ[illegible]सेनाचे [illegible]मान संजयांचे वीर भीष्म व द्रोण बाणानीं वध्य झाल्यामुळें [illegible]असता [illegible] तसेंच कौरवांचें सैन्य भीमार्जुनानीं वध्य केलें असतां ठिकठिकाणीमोह[illegible]ऊन पळालें. असा सैन्या[illegible] क्षय प्रचंड झाला असतां दोन्ही व्यूह भिन्न होऊन परस्पर योद्धे एकत्र मिळाले तें मोठें आश्चर्यकारक आह्मीं पाहिलें. या महारणामध्यें कौरव पांडवानीं एकमेकांवर महान् महान् अस्त्रांचे प्रयोग केले. अ. वि. या अ. आ.

७६. अध्यायशाहत्तरावा. - धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, माझें सैन्य बहुत गुणानीं युक्त असतां नित्य नाश पावतें ह्मणून सांगतोस त्यापेक्षां देवा वाचून अन्यथा कांहीं नाहीं. हे गावलगणे, हें माझें सैन्य युद्धाविषयीं कुशळ. प्रास, ऋष्टी, तोमर, युद्ध इत्यादिकांविषयीं कुशळ, सर्व विद्येमध्यें निपुण असतां वारंवार नष्ट होतें ह्मणून सांगतोस यावरून मी देवासच प्राधान्य मानितो. द्रोण, भीष्म, कृतवर्मा, कृपाचार्य, दुःशासन, जयद्रथ, भगदत्त, विकर्ण, अश्वत्थामा, शकुनि इत्यादिक वीर असतां संग्राम

ध्यें पांडव जिंकिले जात नाहींत त्याजवरून मला सर्व विपरीत दिसतें अथवा पांडवांकरितां देवच त्यांजकडे येऊन माझ्या सैन्याचा वध करितात. महात्म्या विदुराचें जें मन होतें तें त्याणें पूर्वी दुर्योधनास सांगितलें; परंतु तें त्याणें ऐकिलें नाहीं. हे संजया, हे सर्व प्रकार असे होणारच. जें धात्यानें उत्पन्न केलें तें अन्यथा होण्यास समर्थ नाहीं. अ. वि. या अ. आ.

७७. अध्याय सत्याहत्तरावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, जीं तूं धर्मसंकर कर्में केलींस त्या दोषानेंच हें द्यूत प्रवृत्त होऊन आतांयुद्धही तुझ्याच दोषानें पांडवांशीं झालें. आतां तूं जें पापकर्म केलेंस त्याचें फल तूंच भोग. तुझ्या कर्माचें फळ झालेलें सांगतों. हे राजा, भीष्मानें संरक्षित जी कौरवांची सेना तिचा भेद करून दुर्योधनादिक अन्य यांद्धे जेथें होते तेथें भीमसेन आला हें पाहून दुःशासन प्रभृती बोलले हे वीर हो, आपण या भीमसेनास जिवंत धरूं असा निश्चय केल्यानंतर त्यांनीं भीमसेनास वेष्टित केला तरी तो किमपीही भीति पावला नाहीं. नंतर भीमसेनानें सर्व सैन्य मारून विचार केला कीं, हे सर्व धार्तराष्ट्र आपल्यास जिवंत धरण्याची इच्छा करितात तर आपण या सर्वांचा वध करावा. असा विचार केल्यानंतर तो रथाचा त्याग करून व हातांत गदा घेऊन धार्तराष्ट्रांच्या सेनासमुद्रामध्यें जाऊन कित्येकांस त्यानें मारिलें. भीमसेन धार्तराष्ट्रसैन्यांत गेल्यावर धृष्टद्युम्न द्रोणाचार्यास सोडून जेथें शकुनी उभा होता तेथें आला आणि भीमाच्या सारथ्यास पाहून त्यास बोलतो हे सारथे, मला प्राणाहून प्रिय असा भीमसेन कोठें आहे? असें ऐकतांच विशोक सारथी हात जोडून बोलतो हे धृष्टद्युम्ना, भीमसेन मला येथें उभा करून एकाएकीं धृतराष्ट्रसैन्यांत गेला तेव्हां तो मला बोलला तूं येथें एक मुहूर्तपर्यंत माझी वाट पहात उभा रहा. असें बोलल्यानंतर भीमसेनाचा व कौरवांकडील योद्ध्यांचा संग्राम चालला असतां भीमसेन महाव्यूह भेदकरून आंत गेला. असें ऐकून धृष्टद्युम्न बोलतो हे विशोका, जर मी भीमसेना वांचून माघारा गेलों तर हे क्षत्रिय मला काय बोलतील याजकरितां जेथें तो असेल तेथें शत्रूंस मारीत जातों. असें बोलून धृष्टद्युम्न जिकडून भी

मसेन गजसैन्याचें मर्दन करीत गेला त्याच मार्गानें तो गेला. भीमसेनानें कौरव सैन्याचें कदन चालविलें असतां एका एकीं सैन्यामध्यें हाहाकार झाला. कौरव सैन्यानें भीमसेनास वेष्टिन केलें हें पाहून धृष्टद्युम्नानें त्यास आपले रथामध्यें बसवून आलिंगन दिलें त्या काळीं दुर्योधन आपल्या बंधूंस बोलला हे वीर हो, द्रुपदपुत्र भीमसेनाशीं संयुक्त झाला यास्तव आपण आतां यास मारण्याकरितां सर्व जाऊं. आतां हा आपला शत्रु आपले सैन्यांत पुनःमाघारी न जाई असें करा. तेव्हां सर्व वीरांनीं धृष्टद्युम्नावरं जाऊन बाणवृष्टी केली. धृष्टद्युम्नानें तुझ्या पुत्रांस मारण्याच्या इच्छेनें मोहनास्त्राची योजना केली. त्या अस्त्रानें तुझे पुत्र गत बुद्धि व गत सत्व होऊन मोह पावले. इकडे द्रोणाचार्यांचा व द्रुपदाचा समागम होतांच द्रुपदराजा द्रोणाचें पूर्वीचें वैर स्मरून पळाला तेव्हां द्रोणानें शंखनाद केला. इतक्यामध्यें द्रोणाचार्यानें धृतराष्ट्र पुत्र मोहनास्त्रानीं मोहित झाले हें ऐकून मोठ्या त्वरेनें तेथें येऊन प्रज्ञास्त्रानें मोहनास्त्राचें शांतवन केल्यावर तुझे पुत्र सावध होऊन पुनः भीमसेन व धृष्टद्युम्न या उभयतांशीं युद्धास सिद्ध झाले. नंतर युधिष्ठिर आपले सैनिकांस बोलला हे वीर हो, अभिमन्यु प्रमुख द्वादश वीर सिद्ध होऊन भीम व धृष्टद्युम्न यांच्या शोधार्थ जावोत. हें ऐकून अभिमन्यू प्रमुख द्वादश वीर, मध्यान्हीं सूर्य आला असतां मोठ्या सेने सहवर्तमान सूचीमुख व्यूह करून गेले आणि त्यानीं कौरव रथसैन्याचा भेद केला असतां पूर्वीं भीमसेन भयानें पीडित झालेली व धृष्टद्युम्नानें मोहित केलेली तुझी सेना अभिमन्यु प्रमुख वीरांचा पराभव करण्यास असमर्थ झाली. हे पांडवांचे वीर भीमसेन व धृष्टद्युम्न यांस शोधित गेले. हे वीर आलेले पाहून धृष्टद्युम्न व भीमसेन पुनः तुझ्या सेनेचें कदन करूं लागले. आपला गुरु द्रोणाचार्य पुढें आलेला पाहून द्रुपदराजा परम भयभीत झाला तेव्हां भीमसेन द्रोणावर धांवला इतक्यांत द्रोणानें भल्ल बाणानें द्रुपदाचें धनुष्य छेदून त्याजवर शतशः बाणांची वृष्टि केली. पुनः द्रोणानें द्रुपदाचें धनुष्य छेदून एक भल्लबाणानें सारथ्यास यमलोकीं पाठविला. तेव्हां द्रुपदराजा अभिमन्यूच्या रथांत बसला इतक्यांत गजाश्व रथी यांसहवर्तमान पांडवांची से-

ना भीमसेन व धृष्टद्युम्न पहात असतां द्रोणानें भग्न करितांच त्याचें निवारण करण्यास कोणी महारथी समर्थ झाले नाहींत. हें पाहून तुझ्या सैनिकांनीं हर्षानें चोंहींकडून साधु साधु अशी द्रोणाचार्याची प्रशंसा केली. असा विषय या अध्यायांत आहे.

७८. अध्याय अठ्याहत्तरावा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा- दुर्योधनराजा पुनःमाघारा फिरून भीमावर बाणवृष्टी करूं लागला असतां इतर सर्व तुझे पुत्र एकत्र होऊन भीमावर बाणवृष्टि करूं लागले. त्याकाळीं भीमसेनानें दृढ धनुष्य घेऊन तुझ्या पुत्रास बाणेंकरून वेध केला. दोघेही परस्पर क्रुद्ध होऊन एकमेकांस ताडण करीत असतां दुर्योधनाचे सर्व कनिष्ठ बंधू आपल्या जीविताची आशा टाकून पुनः त्यास धरण्याचा उपक्रम करूं लागले तेव्हां भीमानें तीक्ष्ण बाणांचा तुझ्या पुत्रांवर प्रहार केला. नंतर भीमसेन धर्मराजानें पाठविलेल्या अभिमन्युप्रमुख द्वादश महारथ्यांस व अन्य आपल्या सर्व सैन्यास ठिक ठिकाणीं उभें करून युद्ध करूं लागला असतां पांडवांची सेना पहातांच तुझे पुत्र भीमसेनाचा त्याग करून अन्यत्रस्थलीं गेले. ते सर्व जिवंत गेले हें पाहून भीमसेनास परम खेद झाला. नंतर दुर्योधनप्रभृति महारथी हस्तामध्यें धनुष्य बाण घेऊन पांडव जेथें उभे होते तेथें आले. त्या काळीं अपराण्ह समय झाला असतां पुनः कौरव पांडवांचा संग्राम प्रवृत्त झाला. अभिमन्यूनें विकर्णरथास हताश्व करितांच तो चित्रसेनाच्या रथांत बसला तेव्हां उभयतांस अभिमन्यूनें बाणानीं आच्छादित केलें. दुर्जय व विकर्ण यानीं अभिमन्यूस तरी वेध केला तथापि त्यानें युद्ध केलें. कैकेयां सहवर्तमान दुःशासनाचें युद्ध परम आश्चर्यकारक झालें. द्रौपदीचे पांच पुत्रांचें व दुर्योधनाचें मोठें तुमुल युद्ध झालें. गुराखी जसा पशुगणांस ताडण करीत नेतो तशी भीष्मानें पांडवांची सेना ताडण करीत नेली. कौरव सैन्याच्या दक्षिणभागास अर्जुन उभा राहून शत्रूंस मारीत असतां एकाएकीं गांडीव धनुष्याचा शब्द होऊं लागला. त्याकाळीं उभयतांचें रण अद्भुत झालें. तेथें कोणास ह्मणून युद्धाची इच्छा नाहीं असें नाहीं. या प्रकारें तुझे वीरानीं जयाची इच्छा ध-

रून पांडवांशीं युद्ध केलें. अ. वि. या अ. आ.

७९. अध्याय एकुणऐंशिवा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, दुर्योधन भीमसेनास मारण्या करितां धांवून येतो हें भीमसेनानें पाहून तो बोलतो हे दुर्योधना, ज्या काळाची आह्मीं बहुत दिवस इच्छा करीत होतों तो आज आला आहे यास्तव तूं रणाचा त्याग करून न गेलास तर तुला मी मारीन. तूं मरण पावला असतां कुंतीचा क्लेश, वनवास संबंधी दुःखें व द्रौपदीचा क्लेश दूर होईल. अरे, तूं कर्णाच्या व शकुनीच्या नादीं लागून पांडवांची गणना न करितां यथेष्ट पाहिजे तसें आचरण केलेंस. श्रीकृष्णानें तुमचे सभेंत येऊन तुमचा व आमचा शम होण्याविषयीं याचना केली असतां तूं त्याचा अपमान केलास. असें भाषण केल्यावर क्रुद्ध होऊन भीमसेनानें ज्वलनाग्नी शिखे सारिखे बाण दुर्योधनावर टाकिले व दोन बाणानीं सारथ्यास वेध केला. पुनः दोन बाणानीं राजाचें छत्र तोडून तीन बाणानीं केतूचें छेदन केलें आणि मोठ्यानें गर्जना केली. दुर्योधनाचा ध्वज छिन्न झालेला सर्व वीरानीं पाहिला. पुनः भीमसेनानें दहा बाणानीं दुर्योधनास वेध केला हें जयद्रथानें पाहून तो त्याचे पार्ष्णिभाग रक्षणार्थ आला. पुढें कृपाचार्यानें येऊन दुर्योधनास आपल्या रथामध्यें घेतलें हें पाहून भीमानें वेध केला असतां तो मूर्छित रथोपस्थांत पडला. इतक्यामध्यें जयद्रथानें हजारों वीरांसहवर्तमान भीमसेनाच्या दाही दिशा वेष्टित केल्या असतां धृष्टकेतु, अभिमन्यु, कैकेय पंचभ्राते व द्रौपदीचे पांच पुत्र हे तुझ्या पुत्राशीं युद्ध करूं लागले. चित्रसेन, सुचित्र, चित्रांग, चित्रदर्शन, सुचारु, चारुचित्र, नंद, उपनंद यानीं पुढें येऊन अभिमन्यूच्या रथास वेष्टिलें तेव्हां त्यानें एकएकास पांच पांच बाणानीं वेध करून दोदा भल्ल बाणानीं विकर्णास वेध केला नंतर विकर्णाचा ध्वज, सारथी, च्यारी अश्व व धनुष्य यांचें छेदन करून व दुसरे तीक्ष्ण बाण विकर्णावर टाकिले. त्या काळीं कांहीं बाण विकर्णाच्या रक्तानीं भरलेले दिसले हें पाहून त्याचे दुसरे सहोदर भ्राते अभिमन्यू प्रमुख रथ्याशीं युद्ध करूं लागले याप्रमाणें मोठें तुमुल युद्ध झालें. हे धृतराष्ट्रराजा, सूर्य अस्त होण्यास एक मु-

हूर्त अवकाश राहिला असतां त्या संधीस रथी वसादी हजारों मिश्रित होऊन युद्ध करूं लागले. इकडे भीष्म पांचाल व पांडव सैन्यास पीडित करून व कित्येकांस यमलोकीं नेऊन सूर्य अस्त झाला असतां युद्धाचा अवहार करून शिबिरामध्यें गेला. तसाच धर्मराज, धृष्टद्युम्न व वृकोदर यांस पाहून उभयतांच्या मस्तकांनें अवघ्राण करून सैन्यासहवर्तमान आपल्यां शिबिरामध्यें गेला. असा वि. या अ. आ.

८०. अध्याय एेशींवा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, कौरव पांडवांचे योद्धे आप आपल्या शिबिरामध्यें जाऊन परस्परांची स्तुति करून पुनः युद्धास सिद्ध होतात तों दुर्योधन चिंताग्रस्त झालेला शांतनव भीष्मास बोलला कीं हे पितामहा, व्यूहरचना करून माझी सेना उभी राहिली असतां पांडवांच्या वीरानीं तिचें विदारण करून आह्मांस मोहित केलें व भीमसेनानें घोर बाणानीं मला ताडण केलें ते- व्हां मी शांति पावत नाहीं मी पांडवांस मारावें व तुमच्या प्रसादानें जय मिळवावा या इच्छेनें त्या कर्मास प्रवृत्त झालों. असें ऐकून भीष्म बोलतो हे राजपुत्रा, तुझ्याशीं ज्यानीं वैर केलें ते आतां जिंकण्यास समर्थ नाहींत. मी तर त्यांच्याशीं आपल्या जीविताची आशा टाकून तुझ्या करितां युद्ध करितों. तुझ्या करितां देव दैत्यां सहवर्तमान सर्व लोक जाळून टाकीन मग तुझे शत्रु जाळीन या विषयीं तुला काय संशय आहे? आतां तुझें जें प्रिय होईल तें करितों. असें ऐकून दुर्योधन राजा संतुष्ट होऊन बोलला कीं, युद्धार्थ सर्वांनीं जावें. अशी आज्ञा ऐकून सर्व सैनीक हर्षयुक्त होऊन गेले असतां मार्गामध्यें जे रज उडाले तेणें करून सूर्य आच्छादित झाला. सर्व राजे आप आपल्या धनुष्याचा टणत्कार करीत असतां कृतयुगीं देवासुर मथित सागरध्वनि सारखा शब्द झाला. त्याकाळीं तें सैन्य शत्रुसैन्यास हरण करील असें दिसलें. अ. वि. या अ. आ.

८१. अध्याय एक्यांशींवा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, दुर्योधन ध्यानस्थ बसलेला पाहून गांगेय बोलला कीं हे दुर्योधना, मी, द्रोणाचार्य, शल्य, कृतवर्मा, अश्वत्थामा, विकर्ण, भगदत्त, शकुनी, इत्यादि वीरां-

सहवर्तमानें बाल्हीकराजा, त्रिगर्तराज, मगधराज, कोसल बृहद्बल, चित्रसेन व विविंशति हे वीर. या खेरीजही तुझ्या करितां जीविताची आशा टाकून उभे राहिलेले देवांसही जिंकण्यास समर्थ आहेत असें वाटतें; परंतु हे दुर्योधना, जेणेंकरून तुझें हित होईल तें बोलणें प्राप्त आहे. पांडवांस नर वासुदेव साह्य आहे व ते इंद्रासहवर्तमान सर्व देवांनीं युद्धामध्यें जिंकण्यास अशक्य आहेत. हे राजा, मला तर सर्वथा तुझें वचन पालन करणें प्राप्त आहे यास्तव मी पांडवांशीं युद्ध करितों; परंतु रणामध्यें ते मला जिंकितील किंवा मी त्यांस जिंकीन. असें बोलून भीष्मानें दुर्योधनास विशल्य करणारी व वीर्यसंपन्न अशी ओषधी दिली. नंतर प्रातःकाळ होतांच भीष्मानें मंडळ नामाचा व्यूह केला त्या व्यूहाच्या आस्मंतात भागीं पदाती, गज, अनेक सहस्त्र रथी, प्रास, तोमर धारण करणारे असे अश्व समूह उभे करून एक एक गजामागें सात सात रथ, एक एक रथामध्यें सात सात अश्व व एक एक अश्वामागें दाहा दाहा धनुर्धारी व प्रत्येक धनुर्धाऱ्यामागें दाहा दाहा ढालाईत असा व्यूह केल्यावर महारण होण्या करितां भीष्म उभा राहिला व त्याचे रक्षणार्थ चित्रसेनादि महाशूर तुझे पुत्र दाहा सहस्त्र अश्व, दहा सहस्त्र गज व दाहा सहस्त्र रथ्यां सहवर्तमान उभे राहिले त्याकाळीं दुर्योधन इंद्रासारखा रणामध्यें शोभला. तो व्यूह पाहून युधिष्ठिरराजानें वज्र व्यूहाची योजना केली. सर्व पांडवांचे सैनीक व्यूह रचनेनें आप आपल्या नेमलेल्या स्थानीं उभे राहिले. कित्येक वीर व्यूह भेदाच्या इच्छेनें युद्ध करण्यास सिद्ध झाले. भारद्वाज विराटाशीं, अश्वत्थामा शिखंडीशीं, दुर्योधन राजा द्रुपदाशीं, नकुळ सहदेव शल्याशीं, विंदानुविंद युधामन्यूशीं, सर्व राजे धनंजयाशीं, कृतवर्मा भीमसेनाशीं, चित्रसेन, दुर्मर्षण व विकर्ण यांशीं अभिमन्यु, भगदत्ताशीं घटोत्कच, अलंबुष राक्षसाशीं सात्यकि, भूरिश्रवा धृष्टकेतूशीं, श्रुतायु राजा धर्मराजाशीं, चेकितान कृपाचार्याशीं, शेष राहिलेले तुझे वीर कांहीं भीमसेनाशीं व कांहीं अर्जुनाशीं याप्रमाणें परस्पर युद्ध करूं लागले. सहस्त्रावधी राजांनीं शक्तितोमर इत्यादिं आयुधें घेऊन अर्जुनास वेष्टन केलें असतां अर्जुन बोलतो हे माधवा, व्यूहवेत्ता जो भीष्म याणें धन-

राष्ट्रपुत्राच्या सेनेची कशी व्यूहरचना केली आहे ती पहा. हा त्रिगर्तराज सुशर्मा बंधूंसहवर्तमान युद्धास आला आहे तर तूं पहात असतां यास मी पाडितों इतकें बोलून अर्जुनानें राजगणावर बाणवृष्टी केली असतां जसे वर्षाऋतूमध्यें मेघ जलधारांनीं तडाग पूरित करितात तसें त्या योध्यांनीं अर्जुनास बाणवृष्टीनें पूरित केलें त्या काळीं तुझ्या सेन्यामध्यें मोठा हाहाकार होऊन पुनः सर्वांनीं कृष्णार्जुनास बाणांनीं आच्छादित केलें हें पाहून देव, ऋषी व गंधर्व हे परम विस्मय पावले. नंतर अर्जुनानें ऐंद्रास्त्राच्या प्रयोगानें शत्रूंनीं केलेल्या बाणवृष्टीचें निवारण केलें. हें पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. त्या काळीं अर्जुन शस्त्रानें कोणी वीर भिन्नांग झाला नाहीं असें नाहीं तेव्हां ते शांतनव भीष्मास शरण गेले असतां भीष्मानें त्यांस तारिलें. ते सर्व वीर चोहींकडे भग्न झाले असतां महा वायूनें सागर क्षुब्ध झाल्या सारखे दिसूं लागले. अ. वि. या अ. भा.

८२. अध्यायब्यायशिवा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, असा संग्राम होऊन अर्जुनानें सुशर्म्यास व अन्य वीरांस. भग्न केल्यावर ते माघारे फिरले असतां समुद्रासारिखें कौरवांचें सैन्य खवळलेलें पाहून भीष्म अर्जुनावर चालला तेव्हां पार्थाचा पराक्रम पाहून दुर्योधन परमत्वरेनें सर्व राजांमध्यें सुशर्म्यास बोलला कीं. हा भीष्म धनंजयाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें जीविताची आशा टाकून चालला आहे तर आतां सर्वांनीं भीष्माचें रक्षण करावें. अशी आज्ञा झाली असतां ते सर्व भीष्माकडे गेले. महान् रथामध्यें बसून जाणारा जो धनंजय याजवर भीष्म येत असतां तुझ्या सेन्यामध्यें मोठा नाद झाला. कृष्णानें अर्जुनाच्या अश्वांच्या रश्मी धरल्यामुळें त्याजकडे कोणास पहावेना. तसेंच शांतनव भीष्मासही पांडव पहाण्यास असमर्थ झाले. हे राजा, पुढें विराट व त्याच्या पुत्रा सहवर्तमान द्रोणाचें मोठें भयंकर युद्ध झालें. नंतर विराटपुत्र शंख भारद्वाज बाणानें ताडित होऊन पित्याचे समीप मरण पावला हें पाहून विराट तेथून पळाला. हे धृतराष्ट्रराजा, शिखंडीचें अश्वत्थाम्याशीं व सात्यकीशीं अलंबुषराक्षसाचें मोठें भाणांतकरणारें युद्ध झालें. संग्रामामध्यें

इंद्रासही जिंकण्यास अशक्य असा जो अलंबुषराक्षस त्यास सात्यकीनें जिंकून व कांहीं वीरांस पीडित केल्यामुळें ते वीर पळाले. हे राजा, त्या अवकाशामध्यें धृष्टद्युम्नानें दुर्योधनास तीक्ष्ण बाणानीं आच्छादित केलें. तेव्हां दुर्योधनानें एक बाणानें धृष्टद्युम्नास वेध करून पुनः तीस बाणानीं ताडण केलें. धृष्टद्युम्नानें ही तुझ्या पुत्रास रथांतून खालीं पाडिलें. इतक्यांत राज्यलोभी शकुनीनें त्यास आपल्या रथांत बसविला या प्रकारें धृष्टद्युम्नानें तुझ्या पुत्रास जिंकून सर्व सैन्यास मारिलें. पुढें भीमसेनानें व कृतवर्म्याचें मोठें युद्ध झालें त्यांत भीमसेन क्रुद्ध होऊन दंडपाणी अंतकासारखा तुझ्या सैन्याचा नाश करूं लागला. भ. वि. या अ. आ.

८३. अध्याय त्यांशिवा— धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, पांडवांशीं माझ्या पुत्रांचीं हें रथ युद्धें झालेलीं सांगितलींस त्यामध्यें कौरवांचा पराभव झालेला सांगतोस याजवरून दैवच मला श्रेष्ठ वाटतें. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, तुझे वीर संग्रामामध्यें यथाशक्ति पराक्रम दाखवीत युद्ध करितात; परंतु पांडवां पुढें त्यांचें कांहींच चालत नाहीं. हे राजा, तुझ्या व तुझ्या पुत्रांच्या अपराधानें पृथ्वीचा क्षय होणार. हे योद्धे युद्ध करून पुण्यवानांच्या लोकास जाण्याची इच्छा करितात व सेनेमध्यें निरंतर प्रवेश करून स्वर्गपरायण होऊन युद्ध करितात. हे राजा, त्या दिवसाच्या पूर्वाण्हभागीं क्षय झाला तो सांगतों. अवंत्य इरावानाशीं युद्ध करूं लागले. हें पाहून इरावानानें तीक्ष्ण बाणानीं उभयतां बंधूस वेध केला तसाच त्या दोघानीं इरावानास वेध केला. नंतर इरावानानें अनुविंदाचे च्यार अश्व मारून यमलोकास पाठविले, तेव्हां तो रथाचा त्याग करून विंदाचे रथांत बसला आणि दृढ धनुष्य घेऊन बाणवृष्टी करूं लागला. उभयतां बंधूनीं एक्या रथामध्यें बसून इरावानावर पुष्कळ बाण सोडले. इरावानानेंही त्यांस बाणवृष्टीनें पीडित करून सारथ्यास रथाखालीं पाडिला असतां त्यांचे अश्व मोकळे झाल्यामुळें रथासहवर्तमान दाही दिशेस भ्रमण करूं लागले. पुढें इरावानानें तुझ्या सैन्याचें मर्दन केलें. राक्षसेंद्र घटोत्कच आदित्यवर्ण सध्वज रथामध्यें बसून भगदत्तावर आला. भगदत्तानें पांडवांची सेना दाही दिशेस नेली असतां कोणी

त्या सेनेचें त्राण करण्यास राहिला नाहीं. एक घटोत्कचानें मात्र बाण दृष्टी करून भगदत्तास आच्छादित केलें. नंतर यम वरुणास जिंकण्यास अशक्य जो घटोत्कच त्यास संग्रामामध्यें भगदत्तानें जिंकिल्यावर तो त्याचा गज पांडवांची सेना मर्दन करीत चालला. इकडे शल्यानें नकुळ सहदेवाशीं संगत होऊन बहुत बाणानीं आपल्या भागिनेयास आच्छादित केलें असतां सहदेवानें आपल्या बाण ओघानें शल्यास आच्छादित केलें. त्या काळीं शल्यानें त्या दोघांवर आपल्या भगिनीच्या संबंधानें प्रीति ठेऊन चार बाणानीं नकुळाचे चार अश्व यमलोकीं पाठविले. नंतर तो सहदेवाच्या रथांत बसल्यावर दोघे बंधूनीं शल्यरथास बाणें करून आच्छादित केलें. पुढें त्यांच्या बाणानीं शल्य विद्ध होऊन मूर्च्छित रथोपस्थावर पडला. हें पाहून सारथ्यानें त्यास रणापासून एकीकडे नेलें. हें कौरवानीं पाहून ते सर्व खिन्न झाले व अरे हें बरें नाहीं असें बोलले. इकडे नकुळ सहदेवानीं आपल्या मातुलास जिंकिल्या नंतर मोठ्या हर्षानें शंख वाजवून सिंहनाद केले व तुझ्या सैन्यासही पळविलें. अ. वि. या अ. भा.

८४. अध्याय चौऱ्यांशिवा – संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा. दोन प्रहरच्या संधीस युधिष्ठिर राजानें श्रुतायूस पहातांच नऊ बाणानीं त्यास वेध केला. श्रुतायूनें ही त्याजवर सात बाण टाकिले ते बाण धर्मराजाच्या कवच्याचा भेद करून त्याच्या प्राणाचा शोध करूं लागले. त्या काळीं धर्मराजास परम कोप येऊन प्रळय काळींचा अग्नि प्राण्यांस जाळितो कीं काय असा तो दिसूं लागला असतां देव, गंधर्व, राक्षस त्यास पाहून भय पावले. धर्मराजानें मोठ्या धैर्यानें त्या कोपाची शांति केल्यानंतर श्रुतायूनें धनुष्य मुष्टीदेशाचे ठायीं छेदून एक बाणानें त्याच्या स्तनांतरीं वेध केला. पुनः त्याचे च्यारी अश्व व सारथी मारले असतां तो पळाला. धर्मराजानें श्रुतायूस जिंकिल्यावर कौरवांचें सैन्य पराङ्मुख झालें. या प्रकारें धर्मराजानें पराक्रम करून पुढें तो पसरलेल्या मुखाच्या अंतका सारखा तुझ्या सैन्यास मारूं लागला. यादव वीर चेकितान यानें सर्व योद्ध्यां समक्ष गौतम रथावर जाऊन त्यानें त्यास बाणें करून आच्छादित केलें. कृपाचार्यानें त्याच्या बाणांचें निवारण करून एक भल्ल बाणानें त्याचें धनुष्य छेदून व त्वरेनें सार-

थ्यास रथाखालीं पाडून च्यारी अश्व व पार्ष्णी सारथी यांस यमलोकीं पाठविलें असतां चेकितान गदापाणी होऊन त्यानें कृपाचार्याचे अश्व व सारथी यांस मारिलें. पुनः कृपाचार्य ही त्याजवर धांवला. उभयतांही बलवान खड्गधारी तीक्ष्ण खड्गानें परस्पर अंगाचें छेदन करून खड्गवेगानें ताडित होऊन पृथ्वीवर पडले असतां कोणी एक करकर्ष नामक चेकितानाचा सुहृद येऊन त्यानें चेकितानास आपल्या रथामध्यें बसविला व शकुनीनें पुढें येऊन गौतमास आपल्या रथांत बसविला. महाबलवान् धृष्टकेतूनें भूरिश्रव्यावर जाऊन तीक्ष्ण बाणानीं त्याच्या वक्षस्थलाचा ठायीं वेध केला. भूरिश्रव्यानें संग्रामामध्यें धृष्टकेतूस विरथी केला असतां त्यानें शतानीकाच्या रथामध्यें आरोहण केलें. चित्रसेन, विकर्ण, दुर्मर्षण हे तीन रथी अभिमन्यूवर धांवले असतां वात, पित्त, कफाशीं जसें शरीराचें युद्ध होतें तसें अभिमन्यूचें त्या तीन रथ्याशीं घोर युद्ध झालें, तेव्हां अभिमन्यूनें भीमप्रतिज्ञेचें स्मरण करून तुझ्या पुत्रांस विरथी करून जिवंत सोडिले. नंतर गजाश्वरथ ईहीं करून गमनकरणाऱ्या बहुत राजानीं वेष्टित असा जो भीष्म त्याजवर अभिमन्यु गेला असतां त्यास पाहून दुरून अर्जुन वासुदेवास बोलतो हे देवा, शूर व कृतास्त्र असे हे बहुत रथी जेथें युद्ध करितात तेथें आपल्या अश्वांस प्रेरणाकर व जेणेंकरून ते आपल्याशीं युद्ध न करतील असें कर. असें ऐकून भगवान् श्रीकृष्णानें तो रथ कौरवसैन्याकडे नेला. अर्जुन क्रोधानें तुझ्या सैन्यावर येत असतां एकाएकीं सैन्यामध्यें मोठा नाद उत्पन्न झाला. भीष्माच्या संरक्षणार्थ जे राजे उभे राहिले होते तिकडे जाऊन अर्जुन सुशर्म्यास बोलला हे सुशर्म्या, तूं युद्धामध्यें मोठा कुशल आहेस असें मी मानितों. तूं आमचा अत्यंत पूर्वीचा वैरी आहेस आज तुझे मरण पावलेले पूर्वज तुला दाखवितों. असें बीभत्सूनें भाषण करून त्यास क्रोध उत्पन्न करण्याविषयीं जरी यत्न केला तथापि सुशर्म्यानें अर्जुनास बाणांनीं आच्छादित केला. तुझा व पांडवांचा शोणित उत्पन्न करणारा असा घोर संग्राम झाला. अ. वि. या. प्र. आ.

८५. अध्याय पंच्यांशिवा :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा,

तुझ्या वीरानीं अर्जुनास बाणवृष्टीनें पीडित केलें असतां अर्जुनानें महारथ्यांचीं धनुष्यें छिन्न करून सर्वांस बाणानीं आच्छादित केलें. त्या काळीं ते वीर रक्तानीं पूर्णांग झाले. कौरव सैन्यांची अशी दशा पाहून सुशर्मा आपल्या रथासहवर्तमान पुढें आला. सुशर्म्याच्या रक्षणार्थ बत्तीस वीर होते. त्यांस पार्थानें यमलोकीं पाठविलें आणि पुनः तो भीष्मवधार्थ परमहर्षानें पुढें सरसावतांच त्रिगर्तराजा अर्जुनाच्या वधार्थ पुढें आला. त्या काळीं शिखंडी प्रमुख वीर अर्जुनाच्या रक्षणार्थ आले. तेव्हां अर्जुन पुनः भीष्मवधा करितां जात असतां मार्गांत दुर्योधन व जयद्रथादि राजे यांच्याशीं दोन घटिका युद्ध करून जेथें भीष्म होता तेथें आला. उग्रबली युधिष्ठिर ही शल्यास सोडून नकुळ सहदेव व भीमसेन यांसहवर्तमान भीष्मावर आला. त्या सर्व वीरानीं भीष्मास वेष्टिलें असतां भीष्म कांहीं व्यथा न पावतां संग्रामास उभा राहिला. इतक्यामध्यें जयद्रथराजानें पुढें येऊन महारथ्यांचीं धनुष्यें छिन्न केलीं. युधिष्ठिर, भीमसेन, कृष्णार्जुन, नकुळ, सहदेव यांस दुर्योधनानें ताडण केलें. कृपाचार्य, शल्य, शल व चित्रसेन याणीं पांडवांच्या वीरांस बाणें करून विद्ध केलें. इतक्यामध्यें भीष्मानें शिखंडीनें धनुष्य तोडिलें असतां धर्मराजा बोलला हे शिखंडी, तूं आपल्या पित्याच्या समक्ष प्रतिज्ञापूर्वक बोलला होतास कीं, महाव्रती भीष्मास मी मारीन तर हे वीरा, तूं मिथ्या प्रतिज्ञ होऊं नकोस. सत्यप्रतिज्ञ होऊन स्वयश, धर्म व कुल यांचें रक्षण कर. रणामध्यें शांतनव भीष्मानें तुझें धनुष्य तोडिलें असतां तूं आतां सहोदर व बंधू यांस टाकून कोठें जातोस. हे द्रुपदपुत्रा, भीष्मास पाहून तूं भीति पावलास असें वाटतें. अर्जुनास श्रुत केल्यावांचून या रणामध्यें भीष्मापासून तूं पळशील तर आम्हांस केवळ भयच उत्पन्न होईल. असें ऐकतांच शिखंडि भीष्मवधार्थ गेला तेव्हां शल्यानें अस्त्रानें त्यास अवरोध केला. शिखंडीही इंद्रतुल्य पराक्रमी असल्यामुळें त्यानें संग्रामध्यें वारुणनामक उग्र अस्त्रानें त्या अस्त्राचें निवारण केलें. हें त्याचें कर्म आकाशस्थ देवानीं व सर्व राजानीं पाहिलें. भीष्मानें धर्मराजाचें धनुष्य व ध्वज छेदन करून त्यास भयानें पीडित झालेला पाहून मोठ्यानें गर्जना केली. त्या-

संधीस भीमसेन पदाति होऊन हस्तामध्यें गदा घेऊन जयद्रथास मारण्या करितां वेगानें धांवला असतां जयद्रथानें यमदंड तुल्य नऊ बाणानीं भीमसेनास ताडण केलें तेव्हां भीमसेनानें त्याचे चारी अश्व मारिले. हें दुर्योधनानें पाहून तो आपल्या रथासहवर्तमान भीमसेनास मारण्या करितां पुढें आला. हें पाहून भीमसेनही त्याच्या पुढें आला असतां तुझी सेना उभी रहाण्यास समर्थ झाली नाहीं. एक चित्रसेनमात्र मोहित न होतां भीमसेनावर आला तेव्हां भीमानें एक गदा घेऊन चित्रसेनावर टाकिली असतां त्यानें तिचें निवारण केलें. हें पहातांच तुझ्या सेनेनें चित्रसेनाचें स्तवन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

८६. अध्याय शायशिवा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, चित्रसेन विरथी झालेला पाहून विकर्णानें त्यास आपल्या रथांत बसविलें असा घोर संग्राम चालला असतां भीष्म धर्मराजावर गेला तेव्हां सृंजयांच्या वीरानीं धर्मराज आज मृत्युमुखांत सांपडला असें मानिलें. युधिष्ठिरानें नकुळ सहदेवां सहवर्तमान भीष्मास हजारों बाणानीं आच्छादित केलें. भीष्मानें ही अर्धनिमेषामध्यें धर्मराजास बाणानीं अदृश्य केलें. युधिष्ठिरानें तीक्ष्ण विषोपम एक बाण भीष्मावर टाकिला असतां तो येण्याचे पूर्वीं भीष्मानें छेदून धर्मराजाच्या अश्वांस मारिले तेव्हां धर्मराजा नकुळाच्या रथामध्यें बसतांच भीष्मानें नकुळ सहदेवांस ही बाणानीं आच्छादित केलें. हें पाहून धर्मराजास भीष्मवधाची चिंता उत्पन्न होऊन त्यानें सर्वराजांस आज्ञा केली कीं भीष्मास सत्वर मारावें. असें ऐकतांच सर्व राजानीं मोठ्या रथसमुदायां सहवर्तमान भीष्मास वेष्टित केलें, तेव्हां भीष्मानें त्यांस धनुष्याचा प्रहार करीत क्रीडा केल्या सारखें कर्म केलें. हे राजा, भीष्मानें हजारों योद्ध्यांचीं शिरें भूमीवर पाडलीं असतां प्रतिध्वनि झाला. असें घोर युद्ध चाललें असतां व्यूहभेद होऊन परस्पर क्षत्रिय एकमेकांस हांक मारून युद्धार्थ उभे राहिले. पांचाल्य शिखंडी भीष्मावर मोठ्या वेगानें जाऊन उभा रहा उभा रहा असें बोलला. त्याकाळीं भीष्म त्याचें स्त्रीत्व स्मरून त्याचा अनादर करीत सृंजयांचे वीरांवर गेला असतां सृंजयांच्या वी-

ानीं सिंहनाद केला. नंतर सूर्य पश्चिम दिशेस जात असतां रथ व गज यांचें संकर युद्ध होऊं लागलें. पांचाल, धृष्टद्युम्न व सात्यकि यांनीं तुझ्या सैन्यास बाणवृष्टीनें ताडण केलें त्या काळीं तुझ्या वीरांनीं यथा उत्साहें करून युद्ध केलें. धृष्टद्युम्नानें तुझ्या सैन्याचा नाश करितांच त्यांचा आक्रोश ऐकून तुझ्या कडील महारथी अवंतिदेशाचे नृपती विंदानुविंद पुढें येऊन त्यांनीं धृष्टद्युम्नाचे अश्व मारून बाणवृष्टीनें त्यास आच्छादित केला. त्या काळीं धृष्टद्युम्नानें सात्यकीच्या रथांत आरोहण करितांच युधिष्ठिर मोठ्या सेनेसहवर्तमान अवंत्यावर धांवला. तसाच तुझा पुत्रही मोठ्या यत्नानें विंदानुविंदाचें रक्षण करण्यास्तव आला. जसा वज्रपाणी असुरांशीं संग्राम करितो तसा अर्जुन क्रुद्ध होऊन तुझ्या योद्ध्यांशीं संग्राम करूं लागला. जसा अग्नि कापसाच्या राशीस दहन करितो तसा द्रोणाचार्य सर्व पांचालांस दहन करूं लागला. दुर्योधन प्रमुख तुझे पुत्र पांडवांशीं युद्ध करूं लागले. सूर्य अस्तास चालला असतां दुर्योधनानें भाषण केलें कीं, हे वीर हो आतां त्वरेनें युद्ध करा अवकाश थोडा राहिला. असें ऐकून तुझे योद्धे परम दुष्कर कर्म करीत असतां सूर्य अस्तास गेल्यामुळें कांहीं दिसे नासें झालें. त्या काळीं संग्रामामध्यें रक्त ओघ वहाणारी अशी नदी उत्पन्न झाली. राक्षस, पिशाच्च व सहस्रशः रक्त भक्षण करणारे हजारों जीव तेथें आले. त्याच समयीं अर्जुन सुशर्म्यादिक राजांस जिंकून आपल्या शिबिरामध्यें गेला. युधिष्ठिर राजा नकुळ सहदेव व आपल्या सैन्यासहवर्तमान स्वस्थानीं गेला. भीमसेनही दुर्योधन प्रमुख रथ्यांस जिंकून आपल्या शिबिरांत गेला. हे धृतराष्ट्र राजा, रात्र झाल्यामुळें पांडव व कौरव युद्धापासून माघारे फिरून आप आपल्या शिबिरीं गेले. नंतर उभयतांच्याही सेना विश्रांत होऊन निद्रिस्थ झाल्या असतां परमशोभायमान दिसूं लागल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

८७. अध्याय सत्यायशीवा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, कौरव पांडव प्राणी ती रात्र सुखानें अतिक्रांत केल्यावर पुनः ते सर्व युद्धार्थ निघाले असतां दोन्ही सेनेचा शब्द समुद्रा सारखा झाला. त्या काळीं दुर्योधन, चित्रसेन, विविंशति, भीष्म व द्रोणाचार्य हे कौरवांचे रथी एकत्र होऊन

पांडवांशीं युद्ध करितां त्यानीं भीष्मानें सांगितल्या प्रमाणें सागराकृति महा घोर असा व्यूह निर्माण केला. त्या व्यूहाच्या अग्रभागीं भीष्म, त्याच्या पलीकडे द्रोणाचार्य, त्याच्या पलीकडे मागध, कलिंग, पिशाच्च गणांसहवर्तमान भगदत्त, त्याच्या पलीकडे बृहद्बल, त्याच्या पलीकडे त्रैगर्त बहुत कांबोजांसहवर्तमान, त्याच्या पलीकडे अश्वत्थामा, त्याच्या पलीकडे दुर्योधन, त्याच्या पलीकडे कृपाचार्य या प्रमाणें उभे राहिले. त्या काळीं कौरवांची सेना परम शोभायमान दिसूं लागली. तो कौरवांचा व्यूह पहातांच युधिष्ठिर बोलला हे धृष्टद्युम्ना, हा कौरवानीं सागरोपम महाव्यूह निर्माण केलेला पाहून तूं आतां याच्या प्रतिस्पर्धी व्यूहाची लौकर रचना कर. असें ऐकून त्यानें शृंगाटक नामक व्यूह निर्माण केला. त्या व्यूहाच्या दोन शृंगभागीं भीमसेन व सात्यकि, नाभिस्थानीं अर्जुन, व्यूहाच्या मध्यभागीं माद्रीपुत्र व युधिष्ठिर, इतर सर्व महारथी सैन्यासहवर्तमान ठिक ठिकाणीं त्यांच्या पाठीमागें अभिमन्यु, विराट, द्रौपदेय व घटोत्कच या प्रमाणें सर्व उभे राहिले. या प्रकारें पांडवांचे वीर व्यूहरचना करून जयाच्या इच्छेनें उभे राहिले. नंतर परस्परांचे योद्धे परस्परांवर धांवले. हे राजा, हजारों योद्धे परस्परांस हांका मारून युद्धास प्रवृत्त झाले असतां तुझ्या व पांडवांच्या सैन्यांतून हजारो तीक्ष्ण बाण, शक्ति, गदा, वृषभाच्या चर्माच्या ढाली संग्रामामध्यें पडल्या असतां परम शोभायमान दिसूं लागल्या. या प्रकारें उभयतांच्या सेना व्यूह करून उभ्या राहिल्या असतां देवदैत्यसेने सारख्या दिसूं लागल्या. रथ्यांशीं रथी व गज्यांशीं गज युद्ध करूं लागले. तरवर व प्रास यांणीं युद्ध करणारे पदाती परस्परांवर धांवून बाणानीं ताडण करून यमलोकीं गेले. त्या काळीं महाप्रतापी भीष्मानें पांडुपुत्रांस मोह उत्पन्न केला असतां धृष्टद्युम्न प्रमुख पांडवांचे महारथी भीष्माच्या पुढें जातांच तुझ्या वीरांचें व पांडवांच्या वीरांचें घोर युद्ध प्रवृत्त झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

८८. अध्याय अठ्यायशिवा – संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, भीष्म आत्मंतान् भागीं वीरांस संतप्त करीत असतां त्याजकडे पहाण्यास पांडव असमर्थ झाले. त्या काळीं धर्मराजाच्या आज्ञेनें सर्व सेना भीष्मावर धां-

वली असतां सृंजय, सोमक व पांचाल यांचा भीष्मानें बहुत नाश केला. पांचाल मृत्यूचें भय टाकून भीष्मावर गेले असतां भीष्मानें कित्येकांचीं शिरें व कित्येकांचे बाहू तोडिले. त्याकाळीं भीमा वांचून पांडवांचे वीर सर्व भीष्मअस्त्रानें मोहित झाले. भीमसेनानें भीष्माचें निवारण केलें. भीष्माचा व भीमसेनाचा घोर प्रसंग चालला असतां सर्व सैन्यामध्यें भयंकर नाद उत्पन्न झाला व पांडवही हर्षित झाले, तेव्हां दुर्योधन आपल्या सहोदरांसह वर्तमान भीष्माच्या रक्षणार्थ आला. भीमानें भीष्माचा सारथि मारला असतां त्याचे अश्व आस्मंतात्‌भागीं भ्रमण करूं लागले. नंतर भीमसेनानें एक स्फुरप्रबाणानें सुनाभाचें शिर छेदिलें. हें पाहून आदित्यकेतु, बव्हासि, कुंडधार, महोदर, अपराजित, पंडितक, विशालाक्ष हे दुर्योधनाचे सात भ्राते यांनीं भीमसेनावर बाण टाकिले असतां हें कर्म भीमसेनास सहन न होतां त्यानें त्या सर्वांस यमलोकीं पाठविलें. इकडे दुर्योधनराजा बंधू मरण पावल्यामुळें दुःखानें पीडित होऊन तुझ्या वीरांस बोलला हे वीरहो, हा भीमसेन उभा आहे यास युद्धामध्यें तुह्मीं सत्वर मारा. अशी आज्ञा केल्यानंतर दुर्योधन विदुर वाक्याचें स्मरण करून विचार करूं लागला कीं, विदुरानें जें पूर्वीं भाषण केलें त्या प्रमाणें आज अनुभवास आलें. हे धृतराष्ट्रा, पुत्रांच्या प्रीतीस्तव विदुरानें सांगितलेलें पथ्य व हितकारक वाक्य त्वां ऐकिलें नाहींस. हा बलवान् भीमसेन तुझ्या पुत्रांच्या वधार्थच उत्पन्न झाला आहे असो. हे राजा, नंतर दुर्योधन बोलला हे पितामहा, भीमसेनानें युद्धामध्यें माझे पराक्रमी बंधू मारिले. अन्यही सैनीक त्यास मारण्याचा यत्न करीत असतां कित्येक मरण पावले. तुह्मीं तर मध्यस्था सारखे निरंतर आमची उपेक्षा करितां. मी तर कुमार्गाचा आश्रय केला. पहा हें माझें दैव कसें आहे. असें त्यानें भाषण ऐकून पितामह बोलतो हे बापा, मी, द्रोणाचार्य, विदुर व यशस्वी जी गांधारी याणीं तुला पूर्वीं बहुत हिताच्या गोष्टी सांगितल्या; परंतु त्या काळीं तूं समजला नाहींस, तशांतून पूर्वीं मी तुला संकेत करून असें सांगितलें कीं, तुह्मीं मला व द्रोणाचार्याला सोडूं नये, कारण धार्तराष्ट्रांस भीमसेनानें पाहिलें असतां तत्काल तो त्यांस मारील. अद्यापही तूं स्थिर होऊन रणाविषयीं दृढ बुद्धी धारण करून केवळ स-

गपरायण पांडवांशीं युद्ध कर. पांडव तर इंद्रासहवर्तमान संपूर्ण देवांनींही युद्धामध्यें जिंकण्यास अशक्य आहेत मग आमची कथा काय. तर हे दुर्योधना, आतां तूं स्थिर होऊन युद्ध कर. यांतच जें होईल तें होईल. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

८९. अध्याय एकुणनवदावा:- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, भीमसेनानें माझे बहुत पुत्र मारिले हें पाहून भीष्म, द्रोण, कृपाचार्य याणीं काय केलें? हे संजया, भीष्मद्रोणादि योद्ध्यांच्या मध्यभागीं माझे पुत्र उभे असतां युद्धामध्यें मरण पावतात तेव्हां दैवाहून अन्य काय सांगावें. पूर्वीं मी, भीष्म, विदुर व गांधारी याणीं दुर्योधनास बहुत बोध केला; परंतु त्याणें तो ऐकिला नाहीं, त्याचें हें फल त्यास आज मिळालें. भीमसेन विशेषेंकरून माझ्या पुत्रांसच यमलोकीं पाठवितो. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, विदुर, द्रोणाचार्य, भीष्म व अन्यहितेच्छु जनाचें हितकारक वाक्य न ऐकिल्यामुळें सर्व कौरव क्षय पावतील तो समय आतां आला आहे त्याविषयीं झालेलें वर्तमान ऐक. हे राजा, मध्यान्हकाळीं परम भयंकर संग्राम प्रवृत्त झाला. धर्मराजाच्या आज्ञेवरून सर्व सेना भीष्मवधाच्या इच्छेनें त्याजवर धांवली. अर्जुन, द्रौपदीचे पांच पुत्र व चेकितान हे दुर्योधनाच्या आज्ञेनें आलेल्या राजांवर गेले. अभिमन्यु, घटोत्कच व भीमसेन हे कौरवांवर धांवले. या प्रकारें पांडव आपल्या सेन्याचे तीन विभाग करून कौरवांशीं युद्ध करूं लागले असतां कौरवही आपल्या सेन्यांचे तीन विभाग करून युद्ध करूं लागले. रथीश्रेष्ठ द्रोणाचार्य संजयांसहवर्तमान सोमकांस यमलोकीं पाठवावें या इच्छेनें त्यांजवर क्रुद्ध होऊन त्यांचा वध करीत असतां सृंजयसेन्यामध्यें मोठा नाद झाला. द्रोणानें हजारों क्षत्रिय मारिले. भीमसेनानें काला सारिखें भ्रमण करून कौरवसेन्याचें घोर कदन केलें. परस्पर सर्व सेन्याचा वध होत असतां तेथें घोर रक्तवाहिनी अशी नदी झाली. असा संग्राम होत असतां भीमसेनानें गजसेन्यास यमलोकीं पाठविलें. नकुल सहदेवानें अश्वसेन्यामध्यें प्रवेश करून त्यांस पृथ्वीवर पाडलें. अर्जुनानें रणामध्यें हजारों राजे मारिले. रणामध्यें भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा व इतर कौरवांचे वीर क्रुद्ध झाले असतां पांडवसेन्याचा बहुत क्षय झाला. तसेच पांडवांचे वीर क्रुद्ध झाले असतां कौरवसेन्याचा बहुतक्ष-

य झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

९०. अध्याय नवदावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, असा कौरव पांडव से न्यांचा महान् क्षय झाला असतां सुबल पुत्र शकुनि तसाच यादव वीर कृतवर्मा यानीं पांडवांची सेना वेष्टित केली. हें पाहून अर्जुनपुत्र इरावान कांहीं तित्तिरपक्ष्यासारिख्या वर्णाचे कांहीं शुभ्र असा वायुवेग सुवर्ण अलंकृत अश्वांसहवर्तमान कौरवांच्या हर्षित सैन्यावर गेला, तेव्हां तें युद्ध परम दारुण झालें. हा इरावान अर्जुनापासून नागराज कन्याजी उलूपी ई-चाठायीं उत्पन्न झाला. उलूपी अनपत्य असतां तिचा भर्ता गरुडानें भक्षण केल्यामुळें तीस दीन झालेली ऐरावतनागानें पाहून अर्जुनास भार्यार्थ दिली असतां परक्षेत्राचेठायीं हा पुत्र अर्जुनापासून उत्पन्न होऊन नागलोकीं त्यास मातेनें वाढवून रक्षण केला. अर्जुनद्वेषास्तव त्याच्या पितृव्यानें त्याचा त्याग केला असतां इरावानानें अर्जुन स्वर्गास गेला हें ऐकून तोही तेथें गेला आणि हस्त जोडून पिता जो पार्थ यास नमस्कार करून मी तुझा पुत्र इरावान तुझ्या दर्शनार्थ येथें आलों. असें भाषण करून पूर्वींचा मातृसमागम सर्व निवेदन करून उभा राहिला. तेव्हां अर्जुनानें आलिंगन देऊन हा गुणानीं आपल्या सारखाच आहे असें जाणून त्याजवर परम प्रीति ठेविली आणि त्यास अशी आज्ञा केली कीं, हे पुत्रा, ज्याकाळीं आमचा युद्धसमय येईल त्या काळीं आमचें साह्य करावेंस. असें ऐकतांच इरावानानें फार उत्तम आहे असें बोलून तेथून तो गेला आणि प्रस्तुत युद्धदिवस आला आहे असें जाणून येथें आला. हे धृतराष्ट्रराजा, जसे समुद्रावर हंस एकाएकीं उड्डाण करितात तसे स्वइच्छेनें वेगवर्ण धारण करणारे सुवर्णभूषित नानावर्णाचे इरावानाचे अश्व तुझ्या अश्वांवर उड्डाण करून गेले असतां त्यांच्या वेगानें कित्येक तुझे अश्व भूमीवर पडले. असा घोर संग्राम प्रवृत्त झाला असतां दोघांच्या सेनेंतील अश्वसमुदाय नष्ट झाले. तसेच कित्येक योद्धे नाश पावले. हे राजा, बहुतेक अश्वसैन्य नष्ट झालें असतां शकुनीचे बंधू पुढें आले. वायुसारखा वेग व स्पर्श ज्यांचा अशा अश्वांवर आरोहण केलेले गज, गवाक्ष, वृषभ, चर्मवान, आर्जव व शुक हे सहा बलसंपन्न शकुनीचे कनिष्ठ बंधू बलात्कारानें यु

द्धार्थ येत असतां शकुनीनें व इतर योद्ध्यांनीं जरी त्यांचें निवारण केलें तथापि ते स्वर्गाच्या इच्छेनें पुढें आले. हें पाहून इरावान आपले वीरांस बोलला हे वीरहो, हे धृतराष्ट्र पुत्रांचे योद्धे सैन्य व वाहनासहवर्तमान युद्धार्थ येतात तर आतां सर्वांनीं मिळून यांस माघारे जाऊं देऊं नये. असें ऐकतांच सर्वही योद्धे रणामध्यें परम दुर्जय जें गांधार सैन्य त्यास मारण्यास प्रवृत्त झाले. हें सुबल पुत्रांस सहन न होतां ते इरावानास वेढा घालून युद्ध करूं लागले. गांधार वीरांनीं इरावानास तीक्ष्ण प्रासांनीं ताडण केलें तेव्हां इरावान रुधिरानें व्याप्त झाला तेव्हां इरावानानें गांधार आपल्यास वेष्टन करून गृहण करण्याच्या इच्छेनें जवळ आलेले पाहून खड्गें करून त्यांचीं गात्रें, आयुधें व भूषित बाहू कृंतन करून त्यांस भूमीवर पाडलें. एक भमात्र सर्वांगानीं विद्ध होऊन त्यांतून मुक्त झाला. हें पाहून दुर्योधन आर्षशृंगी नामक राक्षसास बोलला हे वीरा, हा मायावी इरावान माझ्या सैन्याचा क्षय करितो तस्मात् तूं आतां जाऊन त्याचें निवारण कर. तूंही स्वइच्छेनें गमन करणारा व मायास्त्राविषयीं निपुण आहेस. तशांतून पार्थाशीं तुझें वैर असल्यामुळें याचा तूं वध कर. असें दुर्योधनानें भाषण ऐकतांच आर्षशृंगी फार सुंदर आहे असें बोलून सिंहनाद करीत करीत ज्या ठिकाणीं अर्जुन पुत्र उभा होता तेथें तो दोन सहस्र अश्वयोद्ध्यांशीं आर्षशृंगी इरावानाच्या पुढें आला असतां इरावान क्रुद्ध होऊन त्याचें निवारण करिता झाला. हें पाहून राक्षसानें माया प्रदर्शन करण्यास उपक्रम केला. मायेनें हजारों अश्व व त्यांजवर बसणारे राक्षस नानाप्रकारचीं शस्त्रें धारण केलेले पुढें येऊन आवेशानें युद्ध करीत असतां परस्पर प्रहारानें दोन सहस्र वीर मरण पावून यमलोकीं गेले. तें सैन्य मरण पावलें असतां उभयतांची युद्धाविषयीं दुर्मद असल्यामुळें संग्रामामध्यें वृत्रवासवासारखे पुढें येऊन उभे राहिले. एकाएकीं राक्षस चाल करून आपल्यावर येतो हें पाहून इरावानानें त्याजवर धांवून त्याचें धनुष्य छेदन केलें. त्याकाळीं आर्षशृंगीनें मायेनें इरावानास मोहित केलें. इरावानही आकाशांत उड्डाण करून मायेनें राक्षसास मोहित करून त्याच्या गात्राचें छेदन करूं लागला. त्या राक्षसाचें शरीर इरावानानें निक ठिकाणीं छिन्न केलें असतां पुनः पुनः

नवीन उत्पन्न होऊन बलवृद्धी व्हावी. नंतर आर्षशृंगीनें खड्गें करून कुंडलें व मुकुट यांसहवर्तमान इरावानाचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. तेव्हां दुर्योधना सहवर्तमान तुझे इतर पुत्र विशोक होऊन भयंकर नाद करूं लागले. तसाच भीष्म मर्मच्छेदी बाणानीं पांडवांचे महारथी मारून सर्व सेना कंपित करूं लागला. भीमसेन, धृष्टद्युम्न व सात्यकि यांणींही रणामध्यें भयंकर बहुत कर्म केलें. द्रोणाचार्याचा पराक्रम पाहून पांडवांस भय उत्पन्न झाल्यामुळें ते असें भाषण करूं लागले कीं, हा द्रोण एकटाच सर्व सैनिकांस मारण्यास समर्थ आहे. मग सर्व पृथ्वीच्या वीरानीं वेष्टित असतां सर्व सैन्याचा नाश करीलच यांत काय संशय आहे. अ. नि. या अ. भा.

९१. अध्याय एक्याण्णव. – धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया. इरावानास मारलेला पाहून महारथी पांडवानीं काय केलें तें सांग? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा. युद्धामध्यें इरावानास मारलेला पहातांच घटोत्कचानें मोठ्यानें गर्जना केली त्याच्या गर्जनेनें समुद्र, आकाश, पर्वत व वना सहवर्तमान पृथ्वी कंपित होऊन तुझे वीर इकडे तिकडे पळूं लागले. हें पाहून राजा दुर्योधन स्वतः घटोत्कचावर धांवला असतां त्याच्या पाठीमागें दाहा सहस्र गजां सहवर्तमान वंगराज गेला. हें पाहून घटोत्कच राक्षसां सहवर्तमान युद्धास प्रवृत्त झाला. तें गजांचें सैन्य पाहून राक्षसानें बाण, शक्ती, पर्वताग्रें व वृक्ष इत्यादिकांची त्यांजवर वृष्टी केली. त्या काळीं कित्येक गज भिन्न गात्र झाले असतां दुर्योधनानें जीविताची आशा टाकून राक्षसांवर तीक्ष्ण बाण सोडिले आणि मुख्य मुख्य राक्षस मारिले तेव्हां घटोत्कच दुर्योधनास बोलला हे दुर्योधना, तुझा आज वध करून मातेच्या व पित्याच्या ऋणापासून मुक्त होतों. तूं दुरात्म्यानें पांडवांस कपटद्यूतामध्यें पराजित करून दीर्घकाळपर्यंत वनांत प्रवासित केलेस. हे दुष्टबुद्धे, द्रौपदी एकवस्त्रा व रजस्वला असतां तूंच तिला सभेमध्यें आणून बहुत क्लेशित केलीस. तुझें प्रिय करण्या करितां द्रौपदी आश्रमीं एकटी असतां जयद्रथानें माझ्या पितरांचा तिरस्कार करून हरण करून नेली. हे कुलाधमा. हे व अन्य जेजे तूं पांडवांचे अपमान केले असशील त्यांची शांति आज तूं रणाचा त्याग करून न गेलास तर मी

करीन असें बोलून त्यानें दुर्योधनावर बाणवृष्टी केली. अ. वि. या अ. आ.

९२. अध्याय ब्याण्णव :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, घटोत्कचाची बाणवृष्टी दुर्योधनानें सहन करून सर्पासारखा क्रुद्ध होऊन घटोत्कचावर पंचवीस बाण टाकिले, तेव्हां घटोत्कचानें अशनिसमान शक्ति घेऊन दुर्योधनावर टाकावी तों इतक्यांत वंगराजाच्या गजानें दुर्योधनाचा मार्ग रोधलेला पाहून घटोत्कचानें ती उगारलेली शक्ती वंगराजाच्या गजावर टाकिली. त्या काळीं वंगराजाचा गज भूमीवर पडून मरण पावला. गज पडत असतां वंगराज गजावरून उडी टाकून पृथ्वीवर उभा राहिला. हे दुर्योधनानें पाहून क्षत्रियधर्माच्या पुरस्कारानें एक तीक्ष्ण बाण परम क्रोधानें राक्षसावर सोडिला तो घटोत्कचानें चुकवून पुनः मोठ्यानें गर्जना करून प्रळयकाळींच्या मेघासारखा सैन्यास त्रास उत्पन्न केला. तो भयंकर नाद ऐकून भीष्म द्रोणाचार्यास बोलतो हे आचार्य, हा घटोत्कच निश्चयें करून दुर्योधनाशीं युद्ध करतो. हा कोणी भूतानीं रणामध्यें जिंकण्यास समर्थ नाहीं यास्तव तुम्हीं तेथें जाऊन दुर्योधनानें रक्षण करावें. असें ऐकून सोमदत्त, बाल्हीक, जयद्रथ, कृपाचार्य, अश्वत्थामा, इत्यादिकांसह वर्तमान द्रोणाचार्य ज्या ठिकाणीं दुर्योधन उभा होता त्या ठिकाणीं त्यास शोधित आले. तेव्हां राक्षसानें व दुर्योधनसैन्यानें युद्ध प्रवृत्त झालें. वीरांच्या कवचांवर पडलेल्या शस्त्रांचा ध्वनि पर्वत भिन्न झाल्यासारखा होऊं लागला. घटोत्कचानें अर्धचंद्राकार बाणानें आचार्यानें धनुष्य छिन्न केलें, एक भल्ल बाणानें सोमदत्ताचा ध्वज छेदिला. तीन बाणानीं बाल्हीकाच्या स्तनांतरीं वेध करून एक बाणानें कृपाचार्यास व तीस बाणानीं चित्रसेनास विद्ध केलें. नंतर आकर्णपर्यंत एक बाण ओढून विकर्णाच्या जत्रुदेशाचे ठायीं ताडण केलें असतां तो रक्तांग होऊन रथोपस्थांत मूर्च्छित पडला व पंधरा बाण भूरिश्रव्यास मारिले ते त्याच्या कवच्याचा भेद करून पृथ्वींत गेले. या प्रमाणें उभयतांचें घोर युद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

९३. अध्याय त्र्याण्णव :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, घटोत्कच राक्षस तुझ्या वीरांस पराङ्मुख करून दुर्योधनास मारण्याच्या

इच्छेनें धांवला. हें पाहून तुझ्या वीरानीं बाणवृष्टीनें त्यास व्याप्त केला. त्याकाळीं त्यानें गरुडासारखें उड्डाण करून नादानें दाही दिशा व्याप्त केल्या. इकडे राक्षसाचा शब्द ऐकून युधिष्ठिर बोलतो हे भीमसेना, हा घटोत्कच निश्चयेंकरून धार्तराष्ट्र महारथ्याशीं युद्ध करितो. पहा हा त्याचा भयंकर नाद श्रवणांत येत आहे त्याजवर आज मोठा भार पडला आहे असें वाटतें. भीष्म तर क्रुद्ध होऊन पांचालांस मारण्यास उद्युक्त झाला आहे व अर्जुन पांचालांचें रक्षण करण्यास्तव युद्ध करितो. यास्तव हे महाबाहो तूं लौकर जाऊन घटोत्कचाचें रक्षण कर. असें ऐकून भीमसेन रोषानें घटोत्कचाजवळ आला. भीमसेनाच्या पाठीमागून सत्यधृति, सौचित्ती, श्रेणिमान्, वसुदान, काश्यपुत्र, अभिमन्यु, द्रौपदेय, क्षत्रदेव इत्यादि व दुसरेही सहाहजार उन्मत्त गज घटोत्कचाचें रक्षणार्थ आले. हें तुझ्या सैनिकानीं पाहून ते भीमसेनाच्या भयानें खिन्न होऊन घटोत्कचास सोडून माघारी फिरले असतां तुझ्या व पांडवांच्या योद्ध्यांचा महान् संग्राम प्रवृत्त झाला तेव्हां शस्त्रांचा व मनुष्यांचा महान् शब्द उत्पन्न झाला. गजाश्व व मनुष्यें यांच्या रक्ताची नदी उत्पन्न झाली. घोडे घोड्याशीं, हत्ती हत्तीशीं, मनुष्य मनुष्याशीं, असें युद्ध झालें. या प्रमाणें मोठा संग्राम होऊन दुर्योधनाचें सैन्य पराङ्मुख झालें. अ. वि. या अ. आ.

९४. अध्याय चौऱ्याण्णव — संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, आपलें सैन्य नष्ट झालेलें पाहून दुर्योधनानें तीक्ष्ण बाण वृष्टीनें भीमसेनाचें धनुष्य छेदिलें आणि पर्वत विदारण करणारा असा एक बाण काढून त्यानें भीमसेनास ताडण करितांच भीमसेन त्या वेधनेनें व्यथित होऊन सर्पासारखी जिव्हा चाटीत ध्वजाचा आश्रय करून राहिला. हें पाहून घटोत्कच व अभिमन्यु प्रमुख वीर आक्रोश करीत राजावर धांवले तेव्हां द्रोण तुझ्या वीरांस बोलला हे वीर हो, तुमचें कल्याण असो. हे पहा महाधनुर्धारी पांडवांचे महारथी ज्याच्या इच्छेनें दुर्योधनावर धांवतात त्यांच्या भयंकर नादानें सर्व राजांस त्रास होतो यास्तव तुम्हीं जाऊन त्याचें रक्षण करावें. असें द्रोणानें भाषण केलें असतां सोमदत्त

प्रमुख तुझे वीर पांडवांवर गेले. कृपाचार्य, भूरिश्रवा, शल्य, अश्वत्थामा, चित्रसेन, विकर्ण इत्यादिक वीर दुर्योधनास वेष्टण करून पांडवसैन्यावर जात असतां आपल्या स्थानापासून वीस पाउलें जाऊन प्रहार करूं लागले, तेव्हां द्रोणाचार्यानें वीस बाणानीं भीमसेनास प्रथम ताडण केलें. नंतर भीमसेनानें त्वरेंकरून दाहा शिलीमुख बाणानीं आचार्याच्या सव्यपार्श्वभागीं वेध करितांच आचार्य मूर्च्छित होऊन रथोपस्थांत पडला. हें पाहून दुर्योधन व अश्वत्थामा हे उभयतां भीमसेनावर धांवले तेव्हां भीमसेन गदा घेऊन भूमीवर अचल उभा राहिला. त्याकाळीं त्याची यमदंडोपम गदा व त्यास शृंगवान् कैलासासारखा पाहून अश्वत्थामा व दुर्योधन हे उभयतां बरोबर धांवले हें पाहून भीमसेनही वेगानें धांवला असतां द्रोणाचार्य प्रमुख कौरवांचे महारथी भीमसेनाच्या वधाच्या इच्छेनें त्याच्या उरावर नानाप्रकारच्या शस्त्रास्त्रांचे प्रहार करूं लागले. हें पाहून अभिमन्यु प्रमुख पांडवांचे महारथी आपल्या जीविताची आशा सोडून त्याच्या संरक्षणार्थ धांवले. भीमसेनाचा परमसखा अनूपाधिप नीलराजा नीलमेघासारखा क्रुद्ध होऊन अश्वत्थाम्यावर धांवला. तो निरंतर अश्वत्थाम्याशीं स्पर्धा करीत असे त्यामुळें त्याणें अश्वत्थाम्यास एक बाणानें विद्ध केलें असतां अश्वत्थाम्यानेंही त्यास विद्ध करितांच तो मूर्च्छित होऊन रथोपस्थांत पडला. हें पाहून घटोत्कच व दुसरेही दुर्मद राक्षस त्याजवर धांवले तेव्हां अश्वत्थाम्यानें घटोत्कचाचे जे जे मुख्य राक्षसयुद्धें होते त्यांचा नाश केला. हें पाहून घटोत्कचानें घोर रूप दारुण माया उत्पन्न करून अश्वत्थाम्यास मोह उत्पन्न केला, त्याकालीं तुझे वीर मायेनें पराङ्मुख होऊन एकमेकांकडे पाहूं लागले. द्रोण, दुर्योधन, शल्य, अश्वत्थामा व अन्य बहुतेक कौरवसैन्यांतील वीर राक्षसमायेनें मोहित व विध्वस्त झाले. अ. वि. या अ. आ.

९५. अध्याय पंचाणव— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा. संग्रामामध्यें दुर्योधन घटोत्कचाचा विजय व आपल्या सैनिकांचा पराजय झाल्याचें वर्तमान भीष्मास सांगून बोलला हे भीष्मा, मी तुमच्या आश्रयेंकरून पांडवांशीं हा युद्ध प्रसंग आरंभिला. ही अकरा अक्षौहिणी सें-

ना व मी हे तुमच्या आज्ञेमध्यें चालत असतां भीमसेनप्रमुख पांडवानीं घटोत्कचाच्या आश्रयानें मला युद्धामध्यें जिंकिलें. यास्तव हे महाभागा, तुमच्या प्रसादेंकरून राक्षसाधम घटोत्कच्यास स्वतः मारावें अशी इच्छा करितों तर तुम्हीं आश्रय देऊन हें पार पाडावें. असें ऐकून भीष्म बोलतो हे कौरवेंद्रा, राजानें राजाशीं संग्राम करावा. यास्तव धर्मराज, भीमसेन, अर्जुन, नकुल सहदेव यांतून कोणाशीं वाटेल त्याशीं संग्राम कर. मी, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा, शल्य, दुःशासनप्रमुख तुझे बंधू हे सर्व आम्ही तुझ्याकरितां घटोत्कच्याशीं युद्ध करितों. जर तुला राक्षसेंद्राचा संग्राम भयंकर वाटत असेल तर हा इंद्रतुल्य भगदत्त युद्धास जाईल. असें दुर्योधनास सांगून त्यानें समक्ष भगदत्तास बोलला हे भगदत्ता, तूं घटोत्कचाचें निवारण कर अथवा त्याचा वध कर. असें भीष्मानें भाषण ऐकून भगदत्त सिंहनाद करीत शत्रूंच्या सन्मुख आला. हें पाहून भीमसेन, अभिमन्यु, घटोत्कच, द्रौपदीचे पांच पुत्र, सत्यधृति, क्षत्रदेव इत्यादिक पुढें आले असतां भगदत्तराजा सुप्रतीक गजावर बसून त्याजवर आला त्याकाळीं पांडुपुत्रांचें व भगदत्ताचें घोर यमराष्ट्रवर्धक युद्ध झालें. असा रोमांच उभा करणारा संग्राम चालला असतां भीमसेनानें शतसंख्याक पारक्षकांचा नाश केला. हें पाहून भगदत्तानें आपला गज भीमसेनावर घातला हें पांडवाकडील वीरानीं पाहून कैकेय, अभिमन्यु, द्रौपदेय, क्षत्रदेव, दशार्णाधिपति, चेदिपति व चित्रकेतु यांनीं भीमसेनास पुढें करून त्या गजास चोंहीकडून वेष्टिलें. नंतर तो गज मोठ्या वेधनेनें पीडित होऊन वेगानें भयंकर नाद करीत आपल्या सैन्यास मर्दन करीत गेला. जसा वायु वृक्षांस पाडित जातो तसा भगदत्ताचा गज पांडवसैन्यामध्यें योद्ध्यांस पाडित जात असतां ते योद्धे एकदांच सिंहनाद करीत भीमसेनास पुढें करून भगदत्तावर बाणवनानाप्रकारचीं शस्त्रें सोडीत धांवले. हें भगदत्तानें पाहून निर्भयपणें गजास पुढें जाण्याविषयीं प्रेरणा केली असतां तो गज प्रळयकाळींच्या अग्नीसारखा रथाश्व गज यांचें मर्दन करीत गेला. हें पाहून घटोत्कचानें पर्वत विदारण करणारा असा एक शूल गजास मारण्याकरितां फेंकला असतां

भगदत्तानें अर्धचंद्राकार बाणानें त्याचे दोन तुकडे करून भूमीवर पाडला. नंतर सुवर्णदंडाची अग्निज्वालोपम शक्ति राक्षसावर टाकून अरे उभा रहा असें तो बोलला. ती शक्ति आकाशमार्गानें येत्ये हें घटोत्कचानें पाहून उड्डाण करून ती धरली आणि मोठ्यानें गर्जना करून भगदत्त पहात असतां तिचे दोन तुकडे केले. हें पाहून आकाशामध्यें देव, गंधर्व व मुनी याणीं शाबास शाबास असा शब्द केला. तसेच पांडवही भूमीवर त्याची स्तुति करून महान् नाद करूं लागले. तो भगदत्तास सहन न होतां त्याणें आपल्या धनुष्याचा टणत्कार करून तीक्ष्ण बाणांचा सर्व पांडवांच्या महारथ्यांस प्रहार केला. नंतर एक बाणानें भीमसेनास, नऊ बाणानीं घटोत्कचास, तीन बाणानीं अभिमन्यूस व पांच बाणानीं पांच केकयांस प्रहार करून एक बाण आकर्णपर्यंत ओढून त्या बाणानें क्षत्रदेवाच्या दक्षिण बाहूचा भेद केला तेव्हां त्याचें सशर धनुष्य भूमीवर पडलें. पुनः पांच बाणानीं द्रौपदी पुत्रांस ताडण करून भीमसेनाचे अश्व मारिले व त्याचा ध्वज छिन्न केला. नंतर विशोक सारथ्यास वेध केला असतां तो रथांत मूर्च्छित पडला. त्याकाळीं भीमसेन हताश्व झाल्यामुळें रथाखालीं उडी टाकून उभा राहिला असतां तुझ्या वीरांस भय उत्पन्न झालें, तेव्हां श्रीकृष्ण ज्याचा सारथि असा अर्जुन शत्रूंस मारीत जेथें भीमसेन व घटोत्कच युद्ध करीत होते तेथें येऊन शत्रूशीं युद्ध करूं लागला. हें दुर्योधन राजानें पाहून आपल्या सेनेस आज्ञा केली कीं, तुम्हीं अर्जुनाशीं युद्ध करा तेव्हां कौरवांची सेना युद्धार्थ आली. हें पाहून अर्जुन त्या सेनेशीं युद्ध करूं लागला. भगदत्तराजाही रणामध्यें आपल्या गजावर बसून पांडवसैन्याचें मर्दन करीत युधिष्ठिरावर धांवला त्याकाळीं पांचाल, पांडव व केकय यां सहवर्तमान भगदत्ताचें मोठें युद्ध झालें. भीमसेनानें कृष्णार्जुन आलेले पाहून इरावान मरण पावला इत्यादि झालेलें वृत्त त्यांस सांगितलें. अ. वि. या अ. आ.

९६. अध्याय शाण्णव– संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, आपला पुत्र मरण पावला हें ऐकून अर्जुन श्वासोच्छ्वास टाकीत कृष्णास बोलतो हे वासुदेवा, कौरव पांडवांचा नाश होणार हें विदुरास पूर्वीच कळल्यामुळें त्याणें

धृतराष्ट्राचें वारंवार निवारण केलें होतें. हे मधुसूदना, हे आमचे वीर कौरवां- नीं संग्रामामध्यें बहुत मारिले. तसेच आम्हींही कौरवांचे वीर बहुत मारि- ले. हे नरश्रेष्ठा, अर्थाकरितां आम्हीं हें निंद्य कर्म आचरण करितों यास्तव या अर्थास धिःकार असो अर्थामुळें हा ज्ञातीचा क्षय होत आहे. अधना- स मरण आलें तर श्रेयस्कर आहे; परंतु ज्ञातीवधानें द्रव्य मिळालें असतां बहुत दुःख आहे. हे कृष्णा, हे आलेले ज्ञातीय यांस मारून आम्हांस का- य श्रेय आहे? दुर्योधन शकुनि यांच्या अपराधानें व कर्णाच्या दुष्ट मसल- तीनें हे क्षत्रिय मरण पावतात. पूर्वीं युधिष्ठिर राजा आपल्या निर्वाहा करि- तां पांच ग्राम दुर्योधना जवळ मागत होता हें त्यानें सुचून आतां मला क- ळतें इतकें धर्मराजानें प्रार्थना करून मागितलें असतांही त्या दुष्टमतीनें कांहींच मान्य केलें नाहीं. हे पराक्रमी क्षत्रिय भूतलावर निजलेले पाहून मी आपली निंदा करितों या क्षत्रिय धर्मास धिःकार असो. युद्धाविषयीं हा अर्जुन अशक्त आहे असें जर क्षत्रिय म्हणतील तर म्हणोत; परंतु मला ज्ञातीशीं युद्ध करणें बरें वाटत नाहीं असो. हे केशवा, आतां लौकर दुर्योधन- सेनेवर आपल्या अश्वांस प्रेरणा कर म्हणजे हा समरोदधि दोन भुजांनीं त- रून जाईन; परंतु माधवा, मला वाटतें हा काळ या समुद्रांतून पार पडून जा- ण्याचा दिसत नाहीं. असें अर्जुनानें भाषण केलें असतां केशवानें अश्वांस कौरवसैन्याकडे जाण्यास प्रेरणा केली त्या काळीं कौरवसैन्यांत वायूनें चंच- ल केलेल्या समुद्रासारखा शब्द उत्पन्न झाला. हे धृतराष्ट्रा, अपराण्हकाळीं पांडवांशीं भीष्माचा संग्राम प्रवृत्त झाला असतां जसे वसु इंद्रावर धांवतात तसे तुझे पुत्र द्रोणाचार्यास पुढें करून भीमसेनावर धांवले. भीष्म, कृपाचा- र्य, भगदत्त व सुशर्मा हे अर्जुनावर, कृतवर्मा व बाल्हीक हे उभयतां सात्यकी- वर, अंबष्ठराजा अभिमन्यूवर, शेष राहिलेले इतर राजे शेष राहिलेल्या इ- तर महारथ्यांवर या प्रमाणें धांवून संग्राम करूं लागले. असें युद्ध चाललें असतां भीमसेन तुझ्या पुत्रांस पाहून संग्राम करूं लागला, तेव्हां तुझ्या पु- त्रांनीं भीमसेनास बाणवृष्टीनें आच्छादित केलें. नंतर भीमसेनानें व्यूढो- रस्क, कुंडली, अनाधृष्टी, कुंडभेदी, वैराठी, दीर्घलोचन, दीर्घबाहू, सुबा-

हु) कनकध्वज त्या तुझ्या पुत्रांस मारिलें. नंतर शेषराहिलेले तुझे पुत्र भीमसेनास काळरूपी असें मानून पळाले, तेव्हां भीमसेन तुझ्या पुत्रांस मारितो हें पाहून द्रोणाचार्य भीमसेनावर बाणवृष्टि करूं लागला तेव्हां भीमसेनानें आचार्याचें निवारण केलें. गांगेय, भगदत्त व कृपाचार्य हे तिघे महारथी अर्जुनाचें निवारण करीत असतां त्यानें आपल्या अस्त्रांनीं त्यांचीं अस्त्रें निवारण करून महान् महान् वीरांस यमलोकीं नेलें. अभिमन्यूनें अंबष्ट राजास विरथी केला असतां तो लज्जेनें कृतवर्म्याच्या रथांत बसला. हें अभिमन्यूनें पाहून आपल्या हस्तलाघवानें त्याचा छेद केला तेव्हां शाबास शाबास असा शब्द झाला. धृष्टद्युम्न प्रमुख वीर तुझ्या सैन्याशीं युद्ध करीत असतां उभय सैन्यामध्यें मोठा आक्रोश झाला. परस्पर योद्धे दुष्कर कर्म करीत असतां कोणी केशांचेठायीं आकर्षण करून, कोणी नखदंतानीं, कोणी मुष्टीनीं, कोणी जानूनीं इत्यादिकांनीं परस्परांवर प्रहार करूं लागल्यामुळें यमलोकीं गेले. पिता पुत्रास, पुत्र पित्यास मारूं लागले व नाना प्रकारचीं शस्त्रें धारण करणारे वीर गत प्राण होऊन पृथ्वीवर पडले असतां जिवंत प्राण्या सारखे दिसूं लागले. अमोलिक राजचुडामण्यांनीं, छिन्न झालेल्या छत्रचामरांनीं, सुंदर कुंडलां सहवर्तमान पद्मेंदुमुखांनीं पृथ्वी व्याप्त झाली असतां ग्रहनक्षत्रयुक्त आकाश जसें सुशोभित दिसतें तशी ती दिसूं लागली. हे धृतराष्ट्रराजा, या प्रकारें उभयतांच्या सेना परस्पर संग्रामामध्यें युद्ध करतां करतां श्रांत होऊन भग्न झाल्या असतां सूर्य अस्ताचलास जाऊन अंधःकार झाला. त्या काळीं आपल्या अग्रभागीं व पृष्ठभागीं जाणारे सेवक जन दिसेनासे झाले. हें पाहून उभयतांच्या सेना युद्धाचा अवहार करून स्वइच्छेनें आपल्या शिबिरांत सुखानें गेल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

९७. अध्याय सत्याण्णव — संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, दुर्योधन, शकुनि, दुःशासन व कर्ण हे एकत्र होऊन बोलले कीं, संग्रामामध्यें गणांसहवर्तमान पांडवांस कसें जिंकावें. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे कर्णा, द्रोणाचार्य, भीष्म, कृपाचार्य, शल्य, सोमदत्ती हे संग्रामामध्यें पांडवांस पी-

डित करीत नाहींत याचें कारण काय? पांडवांचें सैन्य वध्यमान न होतां माझें सैन्य तर क्षीण होतें, मी क्षीण बल व क्षीण शस्त्र झालों. सर्व देवांस अवध्य व शूर जे पांडव याणीं माझी अशी अवस्था केली यामुळें मी संशयांत पडलों. आतां रणामध्यें मी कसा प्रहार करूं. असें ऐकून कर्ण बोलतो हे दुर्योधनराजा तूं शोक करूं नकोस तुझें प्रिय मी करीन. शांतनव भीष्ममात्र रणांतून दूर झाला पाहिजे ह्मणजे भीष्माच्या समक्ष सोमकांसहवर्तमान पांडवांस मी मारीन. संग्रामामध्यें भीष्म निरंतर पांडवांवर दया करितो व पांडवांस जिंकण्यास तो अशक्त आहे. हे दुर्योधनराजा, आतां तूं येथून सत्वर भीष्मशिबिरांत जा आणि त्याजकडून शस्त्र ठेवीव ह्मणजे पांडव आज मेले असें तूं जाण. असें ऐकून दुर्योधन दुःशासनास भाषण करितो हे दुःशासना, स्वारीची सिद्धता लौकर कर. नंतर तो पुनः कर्णास बोलतो हे कर्णा, मी भीष्माकडून शस्त्र ठेववून तुजकडे सत्वर येतों. भीष्म रणांतून निघाला असतां आपण शत्रूवर शीघ्र प्रहार करूं. असें बोलून तो बंधूंसहवर्तमान भीष्माकडे गेला. तसाच दुःशासन मुकुट व हस्ताभरणें धारून गेला. दुर्योधन भीष्माचे शिबिरास जात असतां इंद्रामागें देव जसे जातात तसे त्याचे बंधू व अन्य राजे त्याच्या मागून गेले. त्याच्या आस्मंतात् मार्गी सुवर्णा रंगाच्या मशाली सुगंधिक तेलानीं भिजवून प्रज्वलित केल्या होत्या त्यामुळें तो नक्षत्रमान ग्रहवेष्टित चंद्रासारखा शोभूं लागला. सुवर्णअलंकार धारण केलेले सेवक हस्तामध्यें वेताच्या काठ्या घेऊन राजाच्या मार्गी पुढें जनांस मंदगतीनें दूर करीत भीष्मशिबिरास गेले. तेथें जातांच दुर्योधन सुवर्णमय आसनावर बसून हस्त जोडून भीष्मास बोलला हे भीष्मा, आह्मी तुमच्या आश्रयेंकरून इंद्रादिसुरासुर गणांस संग्रामामध्यें जिंकण्याची इच्छा करितों मग पांडवांस जिंकूं याचें आश्चर्य काय. हे गांगेया, सर्व सोमक, पांचाल व करूष यांस मी मारीन असें जें पूर्वी तुह्मीं भाषण केलें तें सत्य करावें. हे प्रभो, जर पांडवांच्या दयेनें आणि माझ्या द्वेषभावानें पांडवांचें रक्षण करीत असाल तर कर्ण रणामध्यें महत् कर्म करून सुहृज्जन बांधवांसहवर्तमान पांडवांस जिंकील असें बोलून दुर्योधन तेथेंच स्तब्ध बसला. अ. वि. या अ. आ.

१८. अध्याय अर्थ्याणव:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, तुझ्या पुत्रानें वाक्‌बाणेंकरून भीष्मास ताडण केलें असतां तो दुःखित होऊन प्रिया प्रिय न बोलतां कांहीं वेळ ध्यान करून नंतर दुःख शोकानें श्वासोच्छ्वास टाकून बोलतो हे दुर्योधनराजा, मी तुझ्या प्रिया करितां प्राणाचाही त्याग करण्यास इच्छितों असें असतां तूं मला वाक्‌बाणानीं आतां कां पीडित करतोस? ज्या काळीं अर्जुनानें इंद्रास जिंकून खांडववन अग्नीस दिलें, ज्या काळीं गंधर्व आपल्या पराक्रमानें तुला बांधून नेत असतां तुझे शूर सहोदर भ्राते व सूतपुत्र कर्ण हे पळाले नंतर अर्जुनानें तुह्मांस सोडविलें त्या काळींच अर्जुनाच्या पराक्रमाचें निदर्शन आह्मांस कळलें. या प्रमाणेंच पुष्कळ वेळीं याच्या पराक्रमाचें निदर्शन आह्मांस कळलें आहे. हे दुर्योधना, तूं तर मोहेंकरून वाच्या वाच्य जाणत नाहींस. शंखचक्रगदाधारी वासुदेव ज्याचा संरक्षणकर्ता त्यास जिंकण्यास कोण बरें समर्थ आहे. नारदादिक महर्षीनीं बहुत वेळ तुला सांगितलें कीं, सर्वेश्वर, देवदेव पांडवांचा संरक्षक असतां त्यांस जिंकण्यास कोण समर्थ आहे? जसा मरणारा पुरुष सर्व वृक्षांस सुवर्णमय पहातो तसा तूं दुर्योधना विपरीत बोलतोस. संजयांसहवर्तमान पांडवांशीं तूं स्वतः वैर उत्पन्न केलेंस तर आतां रणामध्यें त्यांच्याशीं संग्राम कर. जे सोमक व पांचाल मजसहवर्तमान युद्धास येतील त्यांस शिखंडीशिवाय सर्वांस मीमारीन आणि तुला हर्षित करीन. अथवा त्यानीं मला मारिलें असतां मी यमलोकीं जाईन. हे राजा, शिखंडी द्रुपदराजाचे गृहीं स्त्रीरूपानें पूर्वी उत्पन्न झाला. नंतर वरप्रदानेंकरून पुढें त्यास पुरुषत्वप्राप्त झालें. तो ही शिखंडी तो स्त्री आहे यास्तव प्राणत्याग समय जरी आला तथापि मी शिखंडीस मारणार नाहीं. असें ऐकून दुर्योधन आपले गृहीं आला आणि प्रातःकाळ होतांच दुसरे दिवशीं उठून सर्व राजांस सेना सिद्ध करावी अशी आज्ञा करून बोलला कीं, रणामध्यें शांतनव भीष्म क्रुद्ध होऊन सोमकांस मारणार आहे. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, इकडे भीष्म दुर्योधनाच्या वाक्याचें स्मरण करून परवशतेची निंदा करून अर्जुनाशीं युद्धाच्या इच्छेनें त्या रात्रीं कांहीं वेळ ध्यान करीत बसला. दुर्योधनानें भीष्मानें नें इंगित जाणून दुःशासनास

आज्ञा केली कीं हे दुःशासना, भीष्माच्या रक्षणार्थ रथ सिद्ध करावे. तसेंच सेनेचे बेवीस विभाग करून भीष्मानें रक्षण करावें. मी बहुत वर्षें चिंतन करीत होतों कीं, पांडव सैन्याचा वध व राज्याची प्राप्ति व्हावी तो दिवस आज आला आहे यास्तव सर्वांनीं मिळून भीष्माचें रक्षण करावें हेंच कार्य आज आहे. भीष्माचें रक्षण केलें असतां तो आह्मांस साह्य होऊन पांडवांस मारील. शिखंडी शिवाय करून सर्वांस मी मारीन असें भीष्मानें मला भाषण केलें आहे यास्तव सर्व प्रकारें गांगेयाचें पालन करावें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून तुझ्याकडील सर्व योद्धे व तुझे पुत्र चोंहींकडून रथसमुदायानें भीष्माचें रक्षण करून भूमि व स्वर्ग यांस कंपित करीत करीत व पांडवांस क्षोभ उत्पन्न करीत आनंदानें पुढें आले असतां देवासुर युद्धामध्यें जसे संपूर्ण देव इंद्रास वेष्टन करून जातात तसे कौरव भीष्मास वेष्टन करून रणामध्यें आलेले परम शोभायमान दिसूं लागले. ज्यानें वामचक्र युधामन्यूनें व दक्षिणचक्र उत्तमौजानें संरक्षित असा अर्जुन शिखंडीचें रक्षण करूं लागला. त्याकाळीं शिखंडीचे रक्षणार्थ अर्जुन उभा राहिलेला दुर्योधनानें पाहून तो दुःशासनास बोलला हे दुःशासना, या शिखंडीचें अर्जुनानें रक्षण केलें. आतां हा भीष्मास न मारील अशी कांहीं योजना करावी. असें ऐकून दुःशासन भीष्मास पुढें करून सैन्यासहवर्तमान युद्धार्थ पुढें झाला. तेव्हां अर्जुन धृष्टद्युम्नास बोलला हे धृष्टद्युम्ना, आज भीष्मापुढें शिखंडीस नेऊन उभा करावा मी आज त्याचें संग्रामामध्यें भीष्मापासून रक्षण करीन. अ. वि. या भ. आ.

९९. अध्याय नव्व्याणवा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, सेनेसहवर्तमान शांतनव भीष्मानें युद्धार्थ बाहेर निघून सर्वतोभद्रनामक महाव्यूहाची रचना केली. कृपाचार्य, कृतवर्मा, शैब्य, शकुनि, जयद्रथ व कांबोज, सुदक्षिण हे तुझ्या पुत्रांसहवर्तमान व्यूहाच्या मुखावर, द्रोणाचार्य, भूरिश्रवा, शल्य हे व्यूहाच्या दक्षिणभागीं, अश्वत्थामा, सोमदत्त, अवंत्य हे वामपक्षीं, त्रिगर्तांसहवर्तमान दुर्योधन मध्यभागीं, अलंबुष व श्रुतायु हे पृष्ठभागीं या प्रमाणें ते सर्व उभे राहिले. या प्रकारें तुझ्या वीरानीं व्यूहरचना करून ते युद्धार्थ सिद्ध झालेले अग्नीसारिखे जाज्वल्यमान दिसूं लागले असतां इकडे

युधिष्ठिर राजानें दुर्जयमहाव्यूहाची रचना करून भीमसेन व नकुल सहदेवयां- सहवर्तमान आपण व्यूहाच्या मुखावर, धृष्टद्युम्न-विराट, सात्यकि, शिखंडि, विजय, राक्षसघटोत्कच, चेकितान, कुंतिभोज, अभिमन्यु, द्रुपद, कैकेयपां- चभ्राते हे आपली सेना घेऊन व्यूहाच्या त्या त्याठिकाणीं सिद्ध होऊन उभे राहिले. तुम्याकडील राजे सेनेसह सिद्ध होऊन व भीष्मास पुढें करून युद्धार्थ पांडव सैन्यावर आले तेव्हां पांडवही भीमसेनास पुढें करून युद्धाच्या व जयाच्या इच्छेनें गर्जना करीत व शंखादि वाद्यें वाजवीत आले. परस्पर योद्धे धांवून प्रहार करूं लागले असतां त्या शब्दानें पृथ्वी कंपित झाली, पक्षी घोर शब्द करूं लागले, सूर्य प्रभारहित दिसूं लागला, महत्भय सूचक तीव्रवायु वाहूं लागले. या प्रमाणें अतिशय अपशकुन होऊं लागले. जशीं महान् वायूनें वनें कंपित होतात तशीं शंखमृदंगनादानीं पांडव कौरवांचीं सैन्यें कंपित झालीं. अ-वि-या अ-आ-

१००. अध्याय शंभरावा - संजयभाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, अभिमन्यु पिंगटवर्णाच्या अश्वानीं जोडलेल्या रथामध्यें बसून दुर्योधनसैन्यांत येऊन मेघासारख्या बाणधारानीं त्याच्या सैन्यावर वृष्टी करूं लागला असतां त्याचें निवारण करण्यास कोणी समर्थ झाले नाहींत त्याच्या बाणानीं हजारों क्षत्रिय यमलोकीं गेले. रथ व रथी, अश्व व स्वार, गजारोह व गज हे बहुत विदीर्ण झाले. तें अभिमन्यूनें कर्म पाहून सर्व राजे त्याच्या कर्माचें पूजन करून प्रशंसा करूं लागले. जसा वायु आकाशामध्यें कापसाच्या राशीस उडवितो तशी अभिमन्यूनें ती सेना सर्व दिशेस पळविली असतां चिखलामध्यें निमग्न झालेल्या गजासारखी त्या सेनेची अवस्था होऊन कोणीही तिचें त्राण करण्यास समर्थ झाला नाहीं. सुवर्णांग रथाचे ठायीं अभिमन्यु आरूढ होऊन संचार करीत असतां त्याचें अंतर कोणास कळलें नाहीं. अभिमन्यु आपल्या हस्तलाघवानें द्रोणाचार्य, कृपाचार्य, अश्वत्थामा, बृहद्बल व जयद्रथ यांस मोहित करून संचार करीत असतां त्याचें धनुष्य केवळ मंडळाकार आलीं पाहिलें. अभिमन्यूनें कौरवसेना पीडित केली हें पाहून दुर्योधन अलंबुषराक्षसास भाषण करितो हे महाबाहो, हा पहा अभिमन्यु दुसरा

अर्जुनच काय? असा क्रोधानें सेनेस पळवितो याचें निवारण करणारा तुझ्या वांचून दुसरा कोणी नाहीं यास्तव तूं सत्वर जाऊन त्याचा वध करावास. भीष्म द्रोण पुरोगम आम्हीं अर्जुनास मारितों. असें ऐकून अलंबुष त्वरेनें गर्जना करीत गेला. त्याच्या नादानें पांडवांचें महान् सैन्य खवळलेल्या समुद्रासारखें चोंहींकडून चंचल झालें. कित्येक योद्धे राक्षसाच्या नादानें भयाभीत होऊन प्रिय प्राणाचा त्याग करून पृथ्वीवर पडले. अभिमन्यु मोठ्या आनंदानें धनुष्य बाण घेऊन रथोपस्थांत नृत्य केल्या सारखा राक्षसावर धांवला असतां राक्षसानें अभिमन्यूवर येऊन जवळ उभी राहिलेल्या पांडवांच्या सेनेस पीडित केलें. नंतर सहस्त्र बाणानीं पांडवी सेनेस पळवून आपला पराक्रम प्रदर्शित केला असतां पांडवांची सेना भयानें रणा पासून पळाली तेव्हां द्रौपदीचे पांच पुत्र अलंबुषावर धांवले आणि सुवर्ण भूषित बाणानीं त्यास पीडित करतांच तो अत्यंत विद्ध होऊन एक मुहूर्त पर्यंत मूर्च्छित पडला. नंतर त्यानें पांच बंधूंचीं धनुष्यें व ध्वज छिन्न करून एक एकास एक एक बाणानें विद्ध केलें. नंतर पुनः द्रौपदेयांचे अश्व व सारथी मारून त्यांस विरथ केलें आणि तो त्यांस मारण्याच्या इच्छेनें जवळ गेला हें पाहून अभिमन्यु राक्षसावर धांवून आला. जसा पूर्वी शक्र व शंबरासुर यांचा समागम झाला तसा अभिमन्यु व अलंबुष यांचा समागम महा घोर झाला. अ. वि. या अ. आ.

१०१. अध्याय एकशें एक - धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, अभिमन्यु रणामध्यें महारथ्यांस मारीत असतां अलंबुष व अभिमन्यु या उभयतानीं कसें युद्ध केलें? माझ्या सैन्यामध्यें अर्जुन, भीमसेन, घटोत्कच, नकुळ, सहदेव, सात्यकी यानीं काय केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, संग्रामामध्यें अलंबुष राक्षस अभिमन्यूवर जाऊन मोठ्यानें गर्जना करून उभा रहा उभा रहा असें भाषण करीत असतां अभिमन्यूही सिंहा सारखी गर्जना करून हा राक्षस आपल्या पित्याचा अत्यंत वैरी आहे असें जाणून त्याजवर आला त्या काळीं उभयतांही देवदानवांसारखें युद्ध करूं लागले. त्यांत राक्षस मोठा मायावी व अर्जुन पुत्र दिव्यास्त्रवेत्ता होता. जसा इंद्र रणामध्यें मयासुरास पराङ्मुख करतो. तसें अभिमन्यूनें तीक्ष्ण बा-

णानीं राक्षसास पराङ्मुख करून वध्यमान केलें असतां राक्षसानें तामसी माया उत्पन्न केली. त्या मायेच्या योगें सर्व जन अंधःकारानें व्याप्त होऊन स्वकीय आणि परकीय वीरांस कोणी ओळखेनासे झाले. तेव्हां अभिमन्यूनें भास्करास्त्राचा प्रयोग केला असतां राक्षस माया नष्ट होऊन सर्व जगत् प्रकाशित झालें. त्याकाळीं सर्वास्त्रवेत्त्या अभिमन्यूनें राक्षसाची माया नष्ट करून बाणानीं त्यास वध्य केला असतां तो आपल्या रथाचा त्याग करून पळाला. हें पाहून शांतनव भीष्मानें मोठ्या रथ समुदायानें अभिमन्यूस वेष्टन केलें. त्या काळीं धार्तराष्ट्रा कडील बहुत महारथ्यानीं एकाकीं अभिमन्यूस कोंडून बहुत बाणानीं ताडण केलें असतां पितृतुल्य व वासुदेव तुल्य पराक्रमी जो अभिमन्यु याणें पिता व मातुल यां सारखें महत् कर्म केलें. इकडे धनंजय तुझ्या सैनिकांस मारीत मारीत आपल्या पुत्राच्या रक्षणा करितां क्रोधानें भीष्मावर येतो हें पाहून भीष्म अर्जुनावर धांवला त्याकाळीं तुझे पुत्र रथाश्व गजांसहवर्तमान भीष्मास वेष्टून त्याचें रक्षण करूं लागले. तसेच पांडव धनंजयास वेष्टून संग्रामा करतां सिद्ध होऊन उभे राहिले. अर्जुनाचें व कृपाचार्याचें पुढें सात्यकीचें व अश्वत्थाम्याचें अशीं अंत करणारीं परस्परांचीं युद्धें प्रवृत्त झालीं. जसा राहू चंद्रास ग्रस्त करतो तसें सात्यकीनें आपल्या पुत्रांस ग्रस्त केलें. हें द्रोणाचार्यानें पाहून त्यास बाणानें वेध केला. पुत्र रक्षणा करितां द्रोणाचार्य पुढें आलेला पाहून सात्यकीनें गुरुपुत्रास सोडून आचार्यास वेध केला. त्यासंधीस अर्जुन क्रुद्ध होऊन रणामध्यें द्रोणाचार्यावर धांवला असतां जसें आकाशामध्यें बुध शुक्र युद्ध करितात तसें पार्थ व द्रोणाचें युद्ध झालें. अ॰ वि॰ या अध्या॰ आ॰

१०२. अध्याय एकशें दोन-: धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, द्रोणाचार्य व अर्जुन युद्धार्थ कसे आले? भारद्वाजास पांडव व पांडवांस आचार्य प्रिय असतां त्यानीं कसें युद्ध केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, द्रोणाचार्य रणामध्यें पार्थास प्रिय असें मानित नाहीं तसाच पार्थही क्षत्रिय धर्मास पाहून गुरूस रणामध्यें प्रिय जाणत नाहीं. रणामध्यें क्षत्रिय परस्पर प्रेम ठेवीत नाहींत. द्रोणाचार्य पुढें आला अ-

सतां अर्जुनानें तीन बाणानीं त्यास वेध करितांच त्याणेंही बाणवृष्टीनें अ-
र्जुनास आच्छादित केलें. त्या काळीं दुर्योधन सुशर्म्यासि बोलतो हे त्रिगर्तरा-
जा, तूं द्रोणाचार्यांचा पार्श्वभाग संरक्षक आहेस यास्तव तूं अर्जुनावर जा.
असें ऐकतांच त्यानें पार्थास बाणानीं आच्छादन केला. नंतर अर्जुनानें पु-
त्रासहवर्तमान सुशर्म्यास तीक्ष्ण बाणानीं ताडित केलें असतां कौरवांकडी-
ल योद्धे मरणाचा निश्चय करून अर्जुनावर बाण वृष्टि करूं लागले. ती वृ-
ष्टि एकट्या अर्जुनानें निवारित केलेली पाहून देवदानव संतुष्ट झाले. अर्जु-
नानें त्रिगर्तावर वायव्य अस्त्राचा प्रयोग केला असतां त्यापासून वायु उत्पन्न
होऊन आकाशास क्षोभ करणारा असा वाहूं लागला. हें आचार्यांनीं पाहू-
न त्या अस्त्राच्या निवारणार्थ घोरपर्वतास्त्राचा प्रयोग करतांच वायु शांत
होऊन दाही दिशा स्वच्छ झाल्या. नंतर अर्जुनानें त्रिगर्तांचे रथी पराङ्मुख
केले असतां दुर्योधन, कृपाचार्य, शल्य, अश्वत्थामा, कांबोज, सुदक्षिण,
अवंत्य, बाल्हीकराज या वीरानीं त्याच्या दिशा वेष्टिल्या. भगदत्त व श्रुतायु
यानीं भीमसेनाच्या दिशा व्यापिल्या. भूरिश्रवा, शल व शकुनि यानीं न-
कुल सहदेवाचें निवारण केलें. भीष्मानें तर धृतराष्ट्र सैनिकां सहवर्तमान यु-
धिष्ठिरावर जाऊन चोंहींकडून त्यास वेष्टिलें. भीमसेन गजसैन्यास मा-
रीत असतां त्यानीं आर्तनाद केला. भीमसेनानें कित्येक गजांस धारण क-
रून निर्दळ केलें. कित्येक गजांनीं त्यांच्या दंतानींच गंडस्थळें फोडलीं. असें
तो कर्म करीत असतां रुद्रासारखा शोभूं लागला. त्या काळीं शेष राहिलेले
गज व गजवीर भयानें आपल्या सैन्यास मारीत दाही दिशांस पळाले. तेव्हां
दुर्योधनाचें सैन्य युद्धापासून पराङ्मुख झालें. असा वि॰ या भ॰ भा॰

१०३. अध्याय एकशेंतीन.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, दो-
न प्रहरच्या संधीस सोमकांसहवर्तमान भीष्माचा लोकक्षयकारक संग्राम प्र-
वृत्त झाला. भीष्मानें पांडवांच्या सैन्यास लक्षावधी बाणानीं नाशित केलें त्या-
काळीं धान्याचीं कणसें तोडल्यावर त्याजवरून वृषभ जसे फिरतात तसेंसै-
न्यास भीष्मानें मर्दित केलें. हें पाहून धृष्टद्युम्न, शिखंडी, विराट व द्रुपदया-
णीं भीष्मावर बाणांचा प्रहार केला त्या काळीं भीष्मानें धृष्टद्युम्नास कांहीं

बाणांनीं वेध करून तीन बाणांनीं विराटास व एक बाणानें द्रुपदास वेध केला असतां ते वीर उरगासारखे क्रुद्ध होऊन भीष्मावर धांवले. शिखंडी-नें पुढें होऊन कांहीं बाणांनीं भीष्मास वेध केला असतां भीष्मानें त्याचें स्त्रीभयरूप चिंतन करून बाण सोडिला नाहीं. धृष्टद्युम्नानें तीन, द्रुपदानें पंचवीस, विराटानें दाहा, शिखंडीनें पंचवीस बाणांनीं भीष्मास वेध केला तेव्हां भीष्मानें त्या त्रिवर्गांस कांहीं बाणांनीं वेध करून द्रुपदाचें धनुष्य छिन्न केलें असतां द्रुपदानें दुसरें धनुष्य घेऊन भीष्मास पांच बाणांनीं व त्याचे सारथ्यास मूर्धप्रदेशीं तीन बाणांनीं ताडण केलें. त्या संधीस भीमसेन, द्रौपदीचे पांच पुत्र, केकेय पांच भ्राते, सात्यकी, युधिष्ठिर प्रमुख दुसरे वीर भीष्मावर येऊन शिखंडीच्या रक्षणार्थ उभे राहिले. तसेच तुझे वीर भीष्माच्या रक्षणार्थ येऊन पांडव सैन्यावर धांवले असतां उभयतांचें यमराष्ट्रवर्धक महान् युद्ध झालें. त्याकाळीं हें घोर रण पाहून कित्येक क्षत्रिय आक्रोश करून असें बोलले कीं, दुर्योधनाच्या अपराधानें क्षत्रिय क्षय पावतात. पांडुपुत्र गुणवान असतां पापात्मा धृतराष्ट्रराजा पुत्रलोभानें मोहित होऊन कसा त्यांचा द्वेष करतो? अशा बहुत प्रकारच्या भयंकर वाणी तुझ्या पुत्राच्या श्रवणांत येऊं लागल्या. अशा वाणी ऐकून दुर्योधन, भीष्म, द्रोण, कृपाचार्य व शल्य यांस बोलला कीं हे वीरहो, अहंकार सोडून युद्ध करा. कां विलंब करतां. असें दुर्योधनानें भाषण केलें असतां अक्षद्यूतापासून निर्माण झालेलें हें घोर कौरवांचें पांडवांशीं युद्ध झालें. हे धृतराष्ट्रराजा, पूर्वीं महात्म्यांनीं बहुत प्रकारांनीं निवारण केलें असतां तूं त्यांचें वाक्य ऐकिलें नाहींस त्याचें हें दारुण फळ पहातोस. पांडुपुत्र व कौरवही आपल्या प्राणांचें रक्षण करीत नाहींत यास्तव दैवानें किंवा तुझ्या अन्यायानें हा घोर जनक्षय प्राप्त झाला हें कांहीं कळत नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१०४. अध्याय एकशेंचार :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, अर्जुनानें सुशर्म्याच्या मागें आलेल्या राजांस तीक्ष्ण बाणांनीं यमलोकीं नेलें असतां सुशर्म्यानें अर्जुनास प्रथम बहुत बाणांनीं व कृष्णास सत्तर बाणांनीं वेध करून पुनः अर्जुनास नऊ बाणांनीं ताडण केलें. अर्जुनानें सुशर्म्याचे दा-

ण माघारे फिरवून त्याचे कांहीं योद्ध्यांस यमलोकीं पाठविलें. त्याकाळीं कांहीं योद्धे सुशर्म्याचे दाही दिशेस पळाले. तेव्हां दुर्योधन सैन्यासहवर्तमान भीष्मास पुढें करून अर्जुनावर धांवला. इतर सर्व त्याचे भ्राते शेष राहिलेल्या राजांसहवर्तमान पळाले. सर्व पांडव अर्जुनाच्या रक्षणा करितां जेथें भीष्म उभा होता तेथें येऊन गंगापुत्रावर धांवले. त्याकाळीं पांडव कौरवांच्या योद्ध्यांचा मध्यंगत सूर्य समयीं महान् संग्राम प्रवृत्त झाला. सात्यकीनें कृतवर्म्यास, द्रुपदानें द्रोणाचार्यास व त्याच्या सारथ्यास, भीमसेनानें बाल्हीकास याप्रमाणे वेध केले. चित्रसेनानें बहुत बाणानीं अभिमन्यूस वेध केला असतां त्यानें तीन बाणानीं चित्रसेनाच्या हृदयामध्यें भेद केला. दोघेही परस्पर संग्रामांत बुध शनैश्चरासारखे शोभूं लागले. अभिमन्यूनें चित्रसेनाचे चारी अश्व मारून व नऊ बाणानीं सारथी यमलोकीं पाठवून गर्जना करितांच चित्रसेन हताश्व रथाखालीं उडी टाकून दुर्मुखाचे रथांत बसला. द्रोणाचार्यानें द्रुपदास बहुत बाणानीं वेध करून त्याचे सारथ्यास विद्ध केला असतां तो पूर्व वैरानें स्मरण करून पळाला. भीमसेनानें सर्व सैनिकांचे समक्ष एक मुहूर्तामध्यें बाल्हीकास अश्व, सारथि व रथ यानीं हीन करितांच तो एकाएकीं संशयांत पडून रथाखालीं उडी टाकून लक्ष्मणाच्या रथामध्यें बसला. सात्यकीनें कृतवर्म्याचें निवारण करून बहुत बाण सोडीत भीष्मावर जाऊन साठ बाणानीं भीष्मास प्रहार करून नृत्य केल्यासारखा धनुष्याचा टणत्कार करीत तो रथोपस्थाचे ठायीं बसला. हें पितामहानें पाहून लोहमय व नागकन्योपम अशी एक उत्तम शक्ति सात्यकीवर फेकली असतां सात्यकीनें हस्तलाघवानें छिन्न करतांच त्याच्या रथाजवळ जाण्याचे पूर्वीं महान् उल्के सारखी भूमीवर पतन पावली. नंतर सात्यकीनें सुवर्णभूषित शक्ति आपल्या भुजवेगानें भीष्मावर सोडली ती भीष्मानें दोन क्षुरप्र बाणानीं छिन्न करून सात्यकीच्या रथाच्याठायीं नऊ बाणानीं वेध केला त्याकाळीं सात्यकीच्या रक्षणा करितां रथाश्वनागांसहवर्तमान पांडवानीं येऊन भीष्मास वेष्टिलें तेव्हां उभयतांचें लोमहर्षण युद्ध जाहलें. अ. वि. या अं. आ.

१०५. अध्याय एकशेंपांच - संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा,

रणामध्यें भीष्म संचार करीत असतां त्यास पांडवानीं वेष्टिलेला पाहून दुर्योधन आपल्या बंधूस बोलतो हे दुःशासना, हा महाधनुर्धारी भीष्म पांडवांच्या वीरानीं आच्छादित केला आहे यास्तव तूं त्याचें रक्षण कर म्हणजे तो पांडवांसहवर्तमान पांचालांस मारील. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून दुःशासन भीष्माच्या रक्षणार्थ उभा राहिला असतां एक लक्ष अश्वांसहवर्तमान शकुनि पुढें येऊन नकुल, सहदेव व धर्मराज यांचा रोध करून उभा राहिला. नंतर दुर्योधनानें दाहा हजार अश्वारोह पांडवांवर पाठविले असतां त्या अश्वांच्या खुरांच्या नादानीं भूमि कंपायमान झाली. जसे हंस मोठ्या सरोवरास खवळवितात तशी अश्वसेनेनें पांडवांची सेना क्षुब्ध केली. त्याकाळीं समुद्राची वेला समुद्राचा वेग सहन करिते तसे युधिष्ठिर, नकुळ, सहदेव यांणीं अश्वांचा वेग सहन करून सन्नत पर्व बाणानीं कित्येक अश्वारोहांचीं शिरें छिन्न केलीं. कित्येक योद्धे आयुधें घेऊन दाही दिशेस संचार करीत असतां आयुधानीं छिन्न होऊन भूमीवर पडले. या प्रकारें पांडवानीं शत्रूस जिंकून शंख व भेरी यांचे नाद केले असतां दुर्योधन बोलला हे शल्या, हा ज्येष्ठपांडुपुत्र, नकुळ सहदेवां सहवर्तमान सेनेस पळवितो तर तूं त्याचें निवारण कर. असें ऐकतांच महा प्रतापी शल्य जेथें धर्मराज उभा होता तेथें येऊन युद्ध करूं लागला. त्याकाळीं धर्मराजानें शल्यास दाहा बाणानीं व नकुळ सहदेवानीं सात बाणानीं ताडण केलें. शल्यानें धर्मराजास साठ बाणानीं वेध करून माद्रीपुत्रांस दोन दोन बाणानीं ताडण केलें. त्याकाळीं धर्मराज शल्याच्या स्वाधीन झालेला पाहून त्याच्या रक्षणार्थ महा बाहू भीमसेन येऊन युद्धास प्रवृत्त होतांच सूर्य अस्तास जाण्याचे संधीस शल्याचें व भीमसेनाचें घोर युद्ध प्रवृत्त झालें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१०६. अध्याय एकशेंसहा :- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, तुझा पिता भीष्म सैन्यासहवर्तमान पांडवांशीं युद्ध करूं लागला असतां त्यानें भीमसेनावर बाराबाण, सात्यकीवर नऊ, नकुलावर तीन, सहदेवावर सात या प्रमाणें बाण मारिले. धर्मराजाचा बाहू व उर यांच्याठायीं वेध करून व धृष्टद्युम्नास कांहीं बाणानीं ताडण करून मोठ्यानें गर्जना केली तेव्हां नकुलानें

बारा बाण, सात्यकीनें तीन, धृष्टद्युम्नानें सत्तर, भीमसेनानें सात, युधिष्ठिरानें बारा या प्रमाणें बाण सोडून भीष्मास वेध केला. द्रोणाचार्यानें सात्यकीस व भीमसेनास वेध केला तेव्हां भीमसेन व सात्यकी याणीं तीन तीन बाणानीं द्रोणास वेध केला. हें पाहिलें असतांही सौवीर, कितव, प्राच्य, प्रतीच्य, उदीच्य, मालव इत्यादि वीरानीं भीष्मास सोडिलें नाहीं. नाना देशांचे राजे नाना प्रकारचीं आयुधें घेऊन पांडवांवर गेले असतां पांडवांनीही भीष्मास वेष्टिलें. गहन वनामध्यें जसा अग्नि प्रज्वलित होऊन वृक्षादिकांस जाळितो तसा भीष्म क्षत्रियांस जाळूं लागला तेव्हां त्याचा एक ही बाण व्यर्थ गेला नाहीं. उत्तम कुळांत झालेले, ध्वजानीं युक्त असे चेदी, काशी, कारुष यांचे चौदा हजार महारथी भीष्मापुढें येतांच त्यानें ते यमलोकीं पाठविले. या प्रमाणें बहुत सेना व गजाश्व हजारों नष्ट करून मोठा अनर्थ केला. अशी भीष्मानें पांडवांची सेना नष्ट केल्यामुळें ती भग्न जाहली. पांडवांच्या सैन्यांतील रथ, नाग, अश्व विद्ध होऊन रथाचे ध्वज पडल्यामुळें एकाएकीं सैन्यामध्यें हाहाकार शब्द होऊं लागला. पिता पुत्रास व पुत्र पित्यास न ओळखतां परस्पर मारूं लागले त्यावेळीं पांडवसैन्य आर्तनाद करूं लागलें हें पहातांच कृष्ण अर्जुनास बोलतो हे पार्था, जो तुझा इच्छित काल तो आज आला आहे, तूं पूर्वी विराटनगरामध्यें सर्व राजांचा समागम झाला असतां संजयाचे समीप असें बोललास कीं, भीष्मद्रोणप्रमुख सर्व दुर्योधनाचें सैनीक सुहृदजनांसहवर्तमान जे जे मजशीं युद्धास येतील त्यांचा मी वध करीन तें आपलें वाक्य सत्य कर. असें वासुदेवानें भाषण केलें असतां अर्जुन वक्रदृष्टीनें अधोमुख करून बोलतो हे वासुदेवा, अवध्याचा वध करून अंतीं नरक आहे तर असें राज्य करून काय उपयोग! दुःख किंवा वनवास जरी आह्मांस प्राप्त झाला तथापि काय चिंता आहे आतां तूं सांगतोस ह्मणून तुझें वचन पालन करितों. जेथें भीष्म उभा आहे तेथें अश्वांस प्रेरणा कर ह्मणजे भीष्मास मी पाडितों. असें ऐकून श्रीकृष्णानें जेथें भीष्म उभा होता तेथें अश्वांस प्रेरणा केली, तेव्हां युधिष्ठिराचें सैन्य अर्जुन युद्धास चालला पाहून पुनः युद्धास प्रवृत्त झालें, तेव्हां भीष्मानें सिंहासारखी गर्जना करून अर्जुनाच्या

रथावर बाण वृष्टि केली आणि एका क्षणांत अश्वरथांसहवर्तमान त्यास अदृश्य केला. त्या बाणवृष्टीनें कोणास कांहीं सुचेनासें झालें. वासुदेवानें मात्र न घाबरतां धैर्य धरून छिन्नांग झालेल्या अश्वांस प्रेरणा केली. नंतर अर्जुनानें दृढ धनुष्य घेऊन तीक्ष्ण बाणानीं भीष्माचें धनुष्य छिन्न केलें तेव्हां भीष्मानें दुसरें धनुष्य घेतलें इतक्यांत अर्जुनानें तें ही धनुष्य छिन्न केलें. तेव्हां भीष्म बोलला हे कुंतीपुत्रा, शाबास. तुझें हें कर्म पाहून मी संतुष्ट झालों. हे धृतराष्ट्रराजा, असें भाषण केल्यावर भीष्मानें दुसरें धनुष्य घेऊन अर्जुनावर बाणवृष्टि केली असतां वासुदेवानें ही आपल्या अश्वयानाचें चातुर्य दाखविलें. भीष्मानें सोडलेले बाण श्रीकृष्णानें अश्वांस मंडलाकार हांकिले म्हणून सर्व व्यर्थ गेले. पुनः भीष्मानें बाणवृष्टि करून कृष्णार्जुनास व्याप्त केलें. श्रीकृष्णानें अर्जुनाची मृदुयुद्धता पाहून व भीष्म, रथामध्यें सतत बाणवृष्टि करून आदित्यासारखा सेनेस संतप्त करतो व पांडवांचे मुख्यमुख्य वीर मारितो व धर्मराजाच्या सैन्यामध्यें प्रळयकाळासारखें कर्म करतो. हें पाहून कृष्णास तें सहन न झाल्यामुळें तो हस्तांत चाबुक घेऊन एका एकीं रथाखालीं उतरला आणि भीष्मावर धांवला. जगदीश्वर श्रीकृष्ण हातांत चाबूक घेऊन सिंहासारखी गर्जना करीत व पृथ्वीस आपल्या पायानें विदारण केल्यासारखा जगताचाच संहार करतो कींकाय? अशा रूपानें एका एकीं भीष्मावर जात असतां तुझ्या सैनिकांचीं अंतःकरणें त्रस्त होऊन अरे भीष्म मेला असा शब्द झाला. हें पाहून भीष्म बोलला हे पुंडरीकाक्षा, येथें तुला नमस्कार असो. हे कृष्णा, महारणामध्यें तूं आज मला पाड. हे देवा, संग्रामामध्यें तूं मला पाडलें असतां माझें कल्याण आहे, तूं माझा वध केला असतां त्रैलोक्यामध्यें माझी ख्याति होईल तूं आज यथेच्छ मजवर प्रहार कर मी तुझा दास आहें. असें भीष्माचें व कृष्णाचें संभाषण होत आहे तों अर्जुनानें दोन बाहूनीं कृष्णास धरिलें तरी भगवान् त्यास घेऊन वेगानें तसाच जाऊं लागला तेव्हां अर्जुन दाहावे पाउलीं कृष्णास धरून बोलला हे वासुदेवा, माघारा फीर तूं आपलें वाक्य मिथ्या करण्यास समर्थ नाहींस. हे केशवा, पूर्वी तूं बोललास कीं, मी युद्ध करणार नाहीं यास्त-

व तें आपलें वचन तूं सत्य कर. नाहीं तर हे लोक तुला मिथ्यावादी असें म्हण-
तील. हा सर्व भार मला आहे. हे देवा, मी पितामहास मारीन याविषयीं सत्याची,
शस्त्राची आणि सुकृताची शपथ करतों. आज त्या भीष्मास मी पाडलेला तूं
पहाशील असें ऐकून वासुदेव त्यास कांहीं उत्तर न देतां तसाच क्रोधानें पुनः र-
थांत बसला. उभयतांही नर व्याघ्र रथामध्यें बसले असतां मेघ जसा पर्वतावर वृ-
ष्टि करतो तसा शांतनव भीष्म पुनः कृष्णार्जुनास बाण मारूं लागला. जसा सू-
र्य शिशिरऋतूच्या अंतीं आपल्या किरणानें तेजाचें गृहण करतो तसें भीष्मानें
हजारो योद्ध्यांचे प्राण घेतले असतां पांडवांची सेना भग्न झाली. कित्येक पळू-
न गेले. कित्येक शेष राहिलेले मूर्च्छित आणि निरुत्साह होऊन भीष्मास पहा-
ण्यास असमर्थ झाले. या प्रकारची पांडवसेनेची अवस्था झाली त्यासंधीस
सूर्य अस्तास गेल्यावर सर्व सैनिकांचीं मनें युद्धाचा अवहार करण्याविषयीं
उद्युक्त झालीं. अ. वि. या अ. आ.

१०७. अध्याय एकशेंसात - संजय भाषण करतो हे राजा, भीष्माचा
पराक्रम पाहून सूर्य अस्तास गेल्यावर पांडवांनीं युद्धाचा अवहार केला. तं
तर रात्र झाली असतां यादवांसह वर्तमान सृंजय व पांडव एकत्र होऊन विचा-
र करूं लागले. त्यामध्यें राजा युधिष्ठिर वासुदेवास बोलला हे कृष्णा, हा भी-
ष्म माझ्या सैन्याचें मर्दन करितो कारण त्यास पहाण्यास आम्ही समर्थ नाहीं.
तीक्ष्णविषाचा जसा तक्षक सर्प तसा हा तीक्ष्ण शस्त्राचा धनार्पी भीष्म होय.
क्रुद्ध झालेला यम किंवा वज्रपाणी इंद्र, पाशधर वरुण अथवा गदाधारी कुबे-
र यांस आम्ही जिंकण्यास समर्थ आहोंत; परंतु भीष्मास जिंकण्यास कोणी
समर्थ नाहीं. हे कृष्णा, आतां मला युद्धाची इच्छा नाहीं. आम्हांस भीष्म मा-
रील यांत संशय नाहीं यास्तव मी आतां वनांत जातों तेथें माझें परम श्रेय आ-
हे. जसा अग्नि प्रज्वलित झाला असतां त्यामध्यें पतंग जाऊन उडी घालतो त-
सा भीष्मापुढें राज्याकरितां क्षय पावेन. माझे बंधू हे शूर असतां बहुत पी-
डित झाले. माझ्याकरितां बंधू वनामध्यें गेले व द्रौपदीस क्लेश झाले तर आ-
तां मी वनांत जाऊन धर्माचरण करीन. असें ऐकतांच श्रीकृष्ण बोलला हे यु-
धिष्ठिरा, तूं खेद करूं नकोस. तुझे बंधू शूर व दुर्जय असून शत्रूचे नाशक

स समर्थ आहेत. अर्जुन, भीमसेन तर वायु आणि अग्नी सारखे तेजस्वी आहेत. नकुल सहदेव तर देवेश्वरा सारखे पराक्रमी आहेत. हे पांडवा, प्रेमानें तूं मला आज्ञा केली असतां मी भीष्माशीं युद्ध करीन. हे महाराजा, तूं मला आज्ञा केली असतां रणामध्यें कोणतें मी कर्म करणार नाहीं. जर अर्जुनास युद्धाची इच्छा नसली तर सर्व धार्तराष्ट्र पहात असतां भीष्मास मारून तुला यश देईन. हे पांडुपुत्रा, जो तुमचा शत्रु तोच माझा शत्रु, जी माझी अर्थ सिद्धि तीच तुमची, तुमची जी अर्थ सिद्धि तीच माझी आहे. हे राजा, तुझा बंधु अर्जुन माझा सखा शिष्य व संबंधी आहे तर अर्जुना करितां अंगाचें मांस कृंतन करूनही देईन व हा अर्जुनही माझ्या करितां जिवाचा त्याग करील. आमचा उभयतांचा संकेत असा आहे कीं, परस्पर रक्षण करावें यास्तव हे राजा, मला आज्ञा कर हा मी तुझा योद्धा होतों; परंतु उपप्लव्यग्रामीं पूर्वीं अर्जुनानें अशी प्रतिज्ञा केली कीं, सर्व लोकांच्या समक्ष मी भीष्मास मारीन तें भाषण अर्जुनास सत्य करणें आहे, यास्तव पूर्वीं अर्जुनास विचारूं त्यानें आज्ञा दिली तर मी भीष्मास मारितों. दैत्य दानवां सहवर्तमान देव जरी अर्जुनाशीं युद्धास आले तरी अर्जुन त्यांस मारील मग भीष्माचा पदार्थ काय! महावीर्यवान् भीष्म गतसत्व व अल्पआयुष्य झाला असें तूं जाण. अर्जुन पुढें आला असतां भीष्मास कर्तव्य काय हें सुचणार नाहीं. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे महाबाहो, तूं बोलतोस तें यथार्थ आहे. हे सर्व वीर रणामध्यें तुझा वेग धारण करण्यास समर्थ नाहींत. मी जें मनांत आणिलें तें निश्चयें करून मला मिळेल. हे पुरुषव्याघ्रा, माझ्या पक्षाविषयीं साक्षात् तूं उभा आहेस तर आम्हांस काय न्यून आहे बरें. पूर्वीं भीष्मानें माझ्याशीं असा संकेत केला होता कीं, तुमच्याशीं मी प्राणांत युद्ध करणार नाहीं दुर्योधनाच्या संतोषा करितां मात्र अल्प युद्ध करीन. असें भीष्मानें भाषण केल्यामुळें तो आज मला राज्याचा व मसलतीचा दाता होय. यास्तव हे मधुसूदना, तुजसहवर्तमान आम्ही भीष्माच्या वधोपायार्थ भीष्माकडे जाऊन त्यास मसलत विचारून जसें तो सांगेल तसें आचरण करूं. असें ऐकून श्रीकृष्ण बोलतो हे महाप्राज्ञा, तुझें भाषण मला फार रुचलें.

भीष्म युद्धाविषयीं मोठा कुशळ असून केवळ पहाण्यानेंच दहन करणारा आहे यास्तव त्याच्यावधाचा उपाय विचारण्या करितां त्याजकडे जाऊं. याप्रकारें कृष्णानें भाषण केल्यावर सर्व पांडव शस्त्रें ठेवून व कवचें काढून भीष्मसदनीं गेले. वासुदेवही त्यांजबरोबर गेला. पांडव भीष्मशिबिरांत गेल्यावर भीष्मास नमस्कार करून शरण गेले असतां भीष्म बोलतो हे वार्ष्णेया. हे धनंजया. हे धर्मराजा, हे भीमसेननकुलसहदेवहो. तुमचें स्वागत असो. तुमचें आज प्रीतिवर्धक कार्य काय असेल तें मला सांगा. मी करण्यास सिद्ध आहें. तेव्हां धर्मराज दीनात्मा होऊन बोलतो हे भीष्मा, आम्हीं कसे जय पावूं. आम्हांस कसें राज्य प्राप्त होईल. सर्व राजांचा क्षय होत चालला यास्तव आपल्या वधाचा उपाय आपण आम्हांस सांगण्यास योग्य आहांत. असें ऐकून भीष्म भाषण करतो हे कौंतेया, मी जिवंत असतां रणामध्यें तुझा जय कधीं होणार नाहीं हें मी तुला सत्य सांगतों. हे पांडवहो. युद्धांत तुम्हीं मला जिंकिलें असतां तुमचा जय होईल यास्तव तुम्हांस जर जय प्राप्त होण्याची इच्छा आहे तर सत्वर माझ्यावर तुम्हीं प्रहार करा. मी तुम्हांस आज्ञा देतों. मी नष्ट झालों असतां हें सर्व कौरवांचें सैन्य नष्ट झाल्या सारखेंच आहे. असें ऐकून युधिष्ठिर बोलतो हे भीष्मा, असें जर आहे तर आम्हीं तुम्हांस संग्रामामध्यें जिंकूं याविषयीं उपाय सांगावा. अंतका सारखा तूं क्रुद्ध होऊन रणामध्यें आला असतां तुला कोणी पहाण्यास समर्थ नाहीं. इंद्र, यम व वरुण यांस आम्हीं जिंकण्यास समर्थ आहोंत; परंतु सुरासुरां सहवर्तमान इंद्रादिदेवांस ही तूं जिंकण्यास अशक्य आहेस. असें धर्मराजाचें भाषण ऐकून भीष्म बोलतो हे महाराज. तूं बोलतोस तें यथार्थ आहे. इंद्रासहवर्तमान सुरासुरांस ही मी असमर्थ आहें. एकदां मी धनुष्य बाण घेऊन युद्धास सिद्ध झालों असतां पुनः मी शस्त्र ठेवीतोंपर्यंत कोणी मला मारण्यास समर्थ नाहीं. ज्या पुरुषानें शस्त्र ठेविलें. जो पडला. कवच व ध्वज ज्याचा भग्न झाला, ज्यानें पलायन केलें, मी तुझा आहें असें ज्याणें भाषण केलें, स्त्रीचें ज्यास नाव आहे. जो अंगहीन झाला, ज्यास एक पुत्र आहे त्याशीं व अकीर्तिमान् पुरुषांशीं युद्ध करणें मला रुचत नाहीं. हे राजा, पूर्वीचा माझा एक संकल्प आहे तो सांगतों. अमंगलदायक असा ज्या पुरुषा-

चा ध्वज आहे त्याशीं मी युद्ध करणार नाहीं, द्रुपदपुत्र शिखंडी नामक जो तुम-
च्या सैन्यामध्यें आहे तो पूर्वी स्त्री उत्पन्न होऊन पुढें पुरुषत्व पावला हें तुह्मी
सर्व जाणतच आहांत यास्तव मी तुह्मांस सांगतों कीं, हा शूर अर्जुन शिखंडी-
स पुढें करून तीक्ष्ण बाणांची वृष्टी करीत मजवर धांवो. स्त्रीपूर्व शिखंडीच्या
अमंगलध्वजावर कधीं मी प्रहार करण्याची इच्छा करणार नाहीं हें पाहून
अर्जुन त्वरेनें माझा नाश करो मी पडलों असतां तुह्मांस जय येईल. असें
भीष्मानें भाषण केलें असतां पांडव भीष्मास नमस्कार करून आपल्या शि-
बिरांत गेले. भीष्माचें भाषण ऐकून अर्जुन लज्जेनें बोलतो हे माधवा, आम-
चा गुरु जो पितामह भीष्म त्याच्याशीं कसें मी युद्ध करूं, हे कृष्णा, मी बाल्या-
वस्थेमध्यें क्रीडा करतां करतां धुळीनें लिप्तगात्र झालेला तसाच भीष्मास आ-
लिंगन करीत होतों. हे गदाग्रजा, मी त्याच्या अंकावर बसून तो आमच्या ताता-
चा तात असून मी त्यास हे तात असें भाषण केलें असतां त्याणें मला ह्मणावें कीं,
अरे बाला, मी तुझा तात नाहीं असा जो बाल्यावस्थेंत बोलणारा त्यास मी कसा
मारावा तो आमचें सैन्य सुखानें मारो आमचा जय होवो किंवा वध होवो त्या म-
हात्म्याशीं मी युद्ध करणार नाहीं. हे कृष्णा, याविषयीं तुझा काय अभिप्राय
आहे. असें ऐकून वासुदेव बोलतो हे जिष्णो, पूर्वी तूं संग्राममध्यें भीष्मवधा-
ची प्रतिज्ञा करून क्षत्रियधर्मी चेठायीं स्थित असतां यास कसा मारीत नाहीं-
स. हे पार्था, युद्धदुर्मद जो क्षत्रिय यास रथाखालीं पाडावा. रणामध्यें गंगापुत्र
जो भीष्म यास जिंकल्या वांचून तुझा विजय होणार नाहीं. पूर्वी देवानींही असें
भविष्य कथन केलें आहे कीं, भीष्म या प्रकारें यमगृहीं जाईल. हे पार्था, जें पूर्व
कथित तें कधीं अन्यथा होणार नाहीं. मुख पसरलेल्या अंतका सारख्या दुरा-
धर्ष भीष्मास लौकर मार. तुझ्या वांचून त्याशीं युद्ध करण्यास वज्रधरही स
मर्थ नाहीं मग इतराची कथा काय! पूर्वी बृहस्पतीनें इंद्रास सांगितलेलें वचन
तुला सांगतों. कोणी ही आपल्याहून ज्येष्ठ व गुणानीं जरी वृद्ध आहे तथापि
तो आपल्यास मारण्यास जर शस्त्र घेऊन येत आहे तर त्यास मारलें असता-
तां दोष नाहीं. क्षत्रियाचा शाश्वत धर्म असा आहे कीं, युद्ध करावें, प्रजेचें र-
क्षण करावें व असूया न करतां यजन करावें. हीं तिन्हीं कर्में क्षत्रियास अव-

श्य सांगितलीं आहेत. असें ऐकून अर्जुन बोलतो हे वासुदेवा, भीष्म निरंतर शिखंडीस पाहून माघारा फिरतो यास्तव भीष्माचा मृत्यु शिखंडी निमित्त्यें करून होणार आतां सर्वांनीं शिखंडीस पुढें करून भीष्मास पाडावा असें मला वाटतें. असा पांडवांनीं कृष्णासहवर्तमान निश्चय केल्यावर ते मनानें भीष्माचें पूजन करून आप आपल्या शिबिरांत निजले. अ. वि. या अ. आ.

१०८. अध्याय एकशें आठ - धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, शिखंडी भीष्मापुढें संग्रामामध्यें कसा आला व भीष्म पांडवांवर कसा गेला तें मला सांग? असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, सर्व पांडव सूर्योदयकालीं शंखवाजवीत शिखंडीस पुढें करून युद्ध करूं लागले असतां शिखंडी सर्व सेनेच्या पुढें उभा राहिला. भीमसेन व अर्जुन हे त्याचे चक्ररक्षक झाले. पाठीमागें द्रौपदेय व अभिमन्यु त्यांच्या रक्षणार्थ सात्यकि व चेकितान, सर्वांच्या पाठीमागें पांचालानें संरक्षित धृष्टद्युम्न याप्रमाणें उभे राहिले. नंतर युधिष्ठिर राजा नकुळ सहदेवासहवर्तमान सिंहनाद करीत युद्धार्थ आला. त्याच्यापाठीमागें मोठ्यासेनेसहवर्तमान विराट, त्याच्या पाठीमागें द्रुपद आला. केकय पांच बंधू व धृष्टकेतु हे पांडवसैन्याच्या पृष्ठभागाचें रक्षण करीत होते. या प्रकारें पांडव महासेनेचा व्यूह करून आपल्या जीविताची आशा टाकून तुझ्या सैन्यावर धांवले असतां कौरवही भीष्मास पुढें करून पांडवांवर आले. तुझ्या पुत्रानें रक्षित केलेला द्रोणाचार्य पुत्रासहवर्तमान भीष्माच्या मागें आला. त्याच्यापाठीमागें गजसैन्यासहवर्तमान भगदत्त, त्याच्यामागें कृतवर्मा व कृपाचार्य, त्यांच्यामागें कांबोजराज व सुदक्षिण, त्यांच्या मागें जयत्सेन, सौबल, बृहद्बल व अन्यही सुशर्माप्रभृतिराजे याप्रमाणें संरक्षण करीत होते. दिवसा दिवसाचे ठायीं भीष्मानें असुर, पैशाच्च, राक्षस असे व्यूह केले. त्या काळीं उभयतांचें युद्ध परस्पर यमराष्ट्रवर्धक असें झालें. अर्जुन प्रमुख पांडव, शिखंडीस पुढें करून युद्ध करूं लागले. भीमसेनानें तुझ्या वीरांस ताडण केलें असतां ते परलोकीं गेले. नकुल सहदेव व सात्यकी यांणीं तुझ्या कांहीं सैनिकांस पीडित केलें त्या काळीं तुझें सैन्य दाही दिशेस गेलें. असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, पांडवांनीं माझी सेना पीडित केलेली पाहून पराक्रमी भीष्मानें काय केलें व पांडवांसहवर्तमान तो युद्ध

करीत असतां सृंजयांसहवर्तमान सोमकांचा त्यानें कसा वध केला तें मला सांग? असें ऐकून संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, पांडव हर्षित होऊन तुझ्या सेनेस मारित असतां नराश्वगजांचा नाश झालेला पाहून भीष्मास तें सहन न होतां त्यानें पांडव, पांचाल व सृंजय यांस तीक्ष्ण बाणांनीं ताडण करून आपल्या जीविताची आशा टाकून पांडवांच्या पांच रथ्यांचें निवारण केलें. तसेच हजारों रथी, घोडे, पायदळ, गज, इत्यादिक सेनेचा नाश केला. हें पाहून इंद्रावर जसे असुर येतात तसे पांडव भीष्मावर आले. तो बाण घेतो केव्हां व टाकितो केव्हां हें कोणास ही कळेना त्याचें धनुष्यमात्र दिसे. असें भीष्माचें कर्म पाहून तुझ्या पुत्रानीं त्याचें पूजन केलें. युद्धाचा दशम दिवस आला असतां जसा अग्नि अरण्य जाळितो तसें भीष्मानें शिखंडीच्या रथसैन्यास जाळिलें तेव्हां शिखंडीनें भीष्मास तीन बाणानीं वेध केला असतां भीष्म शिखंडीस पाहून हास्य करीत बोलला हे शिखंडि, तूं सुखें करून माझ्यावर प्रहार कर. ब्रह्मदेवानें शिखंडिनी नामक कन्या पूर्वी तुला उत्पन्न केली यास्तव मी तुझ्याशीं युद्ध करीत नाहीं. असें ऐकतांच तो बोलला हे भीष्मा, तुझें व जामदग्न्य रामाचें युद्ध झालेलें पूर्वी मी श्रवण केलें त्यामध्यें तुझा दिव्य प्रभाव जाणून मी तुझ्याशीं युद्धार्थ आलों. पांडवांचें व आपलें प्रिय करण्यास्तव आज तुझ्याशीं युद्ध करून तुला मी पाडितों ही शपथ करतों. तुला जें योग्य दिसेल तें कर. मजपासून तूं जिवंत रहाणार नाहींस. संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, शिखंडीनें असें बोलून पांच बाणानीं भीष्मास वेध करतांच सव्यसाची बोलला हे शिखंडि, हाच समय आहे तूं पुढें हो मी शत्रूंस मारीत तुझ्या मागें येतों. रणामध्यें आज तूं भीष्मास मारल्या वांचून माघारा जाशील तर लोकांमध्यें तुझा व आमचा उपहास होईल यास्तव जेणेंकरून उपहास होणार नाहीं असें कर्म करून प्रयत्नानें भीष्मास मार मी तुझें रक्षण करतों. द्रोण, अश्वत्थामा, कृपाचार्य, दुर्योधन, चित्रसेन, विकर्ण, जयद्रथ, विंदानुविंद, भगदत्त, इत्यादिकांचें मी आपल्या महारथ्यांसहवर्तमान निवारण करतों तूं भीष्माशींमात्र युद्ध कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१०९. अध्याय एकशें नऊ. - धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, शिखंडी भीष्मावर कसा आला व त्याच्या रक्षणार्थ कोण उभे होते. शांतनव भीष्मानें दहावे

दिवशीं कसें युद्ध केलें? भीष्मावर शिखंडी एकटा गेला असतां त्याचा रथभंगव धनुष्यभंग कांहींच झाला नाहीं हें ऐकून मला बरें वाटत नाहीं. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, शिखंडी भीष्माशीं युद्ध करीत असतां तुझे सहस्रावधी वीर नसेच गजाश्व, योद्धे सिद्ध होऊन भीष्मास पुढें करून युद्ध करूं लागले. त्या काळीं भीष्म पूर्व प्रतिज्ञे प्रमाणें पांडवसैन्याचा क्षय करण्यास प्रवृत्त झाला असतां पांडवांसहवर्तमान पांचाल दाहावे दिवशीं शत्रुसेना जाळणारा जो भीष्म यास लक्षावधी बाणांनीं पीडित करून त्याचा अपजय करण्यास समर्थ झाले नाहींत. हें अर्जुनानें पाहून कौरवांच्या रथ्यांस त्रस्त करीत तो काला सारखा सैन्यामध्यें संचार करूं लागला. त्या काळीं अर्जुनाच्या शस्त्रानें कौरवांचें सैन्य त्रस्त झालें. अर्जुनानें आपल्या सैन्यास जिंकिलें हें पाहून दुर्योधन बोलतो हे भीष्मा, ही पहा. आपली सेना अर्जुनानें त्रस्त केल्यामुळें पलायन करते. भीम, सात्यकी, नकुल सहदेव, अभिमन्यु, धृष्टद्युम्न हे एकाएकीं माझ्या सेनेस पीडित करतात यास्तव तूं त्यांचें निवारण कर असें ऐकून भीष्म एक मुहूर्त पर्यंत ध्यान करून बोलला. हे दुर्योधना, सावध होऊन मी सांगतों हें ऐक. मी पूर्वी तुमच्या जवळ अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, प्रतिदिवशीं दहा सहस्र शत्रूचे रथी मारून नंतर संग्रामांतून बाहेर निघेन तें मी बोलल्या प्रमाणें केलें. आतां मी महत् कर्म करतों. शत्रूंनीं मला मारलें तर मी भूमीवर शयन करीन अथवा मी त्यांस मारीन. हे पुरुषव्याघ्रा, मी आज सेनामुखामध्यें मरण पावलों असतां तुझ्या ऋणापासून मुक्त होईन. असें बोलून भीष्म क्षत्रियांवर बाण सोडीत पांडवसैन्यावर चालला असतां पांडवांनीं त्याचें निवारण केलें. दाहावे दिवशीं भीष्मानें आपली शक्ति दाखवून लक्षावधी वीर मारले. जसें सूर्य जल ग्रहण करतो तसें भीष्मानें पांचालांमध्यें मुख्य मुख्य महारथ्यांचें व राजपुत्रांचें तेज ग्रहण केलें. सृंजयांचे व पांडवांचे महारथी भीष्मानें पीडित केले असतां त्यांनीं आवेशानें त्यास मारण्या करितां पुढें येऊन बाणवृष्टीनें त्यास आच्छादन केलें. त्या काळीं भीष्म बाणांनीं आच्छादित झाला असतां तुझ्या पुत्रांनीं भीष्मास वेष्टित करतांच परस्परांत महाभयंकर युद्ध प्रवृत्त झालें. अ. ११९ अ. आ.

११० . अध्याय एकशें दहा - संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, अ-

र्जुन भीष्माचा पराक्रम पाहून शिखंडीस बोलतो कीं, तूं पितामहावर जा. कारण मी पितामहास तीक्ष्ण बाणानीं आज रथाखालीं पाडितों. असें ऐकून शिखंडी, धृष्टद्युम्न, अभिमन्यु, विराट, द्रुपद व कुंतिभोज हे सर्व भीष्मावर धांवले. नकुल, सहदेव, धर्मराज व इतर सर्व सैनीक भीष्मावर येऊन युद्ध करूं लागले. हे राजा, चित्रसेन चेकितानाशीं युद्धार्थ आला. धृष्टद्युम्न भीष्मास मारण्याच्या इच्छेनें जातो हें पाहून कृतवर्म्यानें त्याचें निवारण केलें. भीमसेनाचें भूरिश्रव्यानें, नकुलाचें विकर्णानें, सहदेवाचें कृपाचार्यानें, घटोत्कचाचें दुर्मुखानें, सात्यकीचें दुर्योधनानें, अभिमन्यूचें सुदक्षिणानें, विराट व द्रुपद यांचें अश्वत्थाम्यानें, युधिष्ठिराचें भारद्वाजानें, अर्जुनाचें दुःशासनानें याप्रमाणें तुझ्या योद्ध्यानीं पांडवांच्या महारथ्यांचें निवारण केलें. धृष्टद्युम्न वारंवार सैन्यामध्यें सर्व योध्यांस हांकामारून बोले हे वीर हो, हा अर्जुन भीष्मावर जात आहे: परंतु तुम्हीं भीष्माची भीति न बाळगतां त्याजवर जा. तुम्हीं भीष्मापुढें गेला असतां तो तुम्हांस पीडित करणार नाहीं. आज रणामध्यें अर्जुनापुढें इंद्रही जाण्यास समर्थ नाहीं मग भीष्म कसा जाईल. असें ऐकून पांडवांचे महारथी भीष्मरथावर धांवले. तुझा पुत्र दुःशासन जीविताचें भय टाकून भीष्माच्या जीविताच्या इच्छेनें पांडुपुत्र जो पार्थ याजवर धांवला. तसेच शूर पांडव रणामध्यें भीष्मरथावर धांवून तुझ्या पुत्राशीं संग्राम करूं लागले तो संग्राम परम आश्चर्यकारक झाला. अर्जुनानें दुःशासनाच्या रथाजवळ येऊन कांहीं विशेष पराक्रम केल्यामुळें दुःशासनानें अर्जुनाचें निवारण केलें. त्याकाळीं दुःशासनास अर्जुनानें पीडित केला असतां तो तेथून परावृत्त होऊन भीष्माकडे गेला. पुनः दुःशासनानें सावध होऊन इंद्र जसा वृत्रासुरावर बाण टाकितो तसे अर्जुनावर कांहीं बाण टाकिले तरी अर्जुन त्या बाणांपासून कांहीं व्यथा पावला नाहीं. अ. वि. या अ. आ.

१११. अध्याय एकशें अकरा: संजय बोलतो हे राजा, संग्रामामध्यें सात्यकी भीष्मावर जातो हें पाहून अलंबुष त्याचें निवारण करूं लागला. सात्यकीनें राक्षसास नऊ बाणानीं वेध केला असतां राक्षसानेंही नऊ बाणानीं सात्यकीस पीडित केलें. त्या संधीस भगदत्तानें पुढें येऊन तीक्ष्ण बाणानीं

सात्यकीस प्रहार केला असतां त्यानें राक्षसास सोडून भगदत्तावर बहुत बाण सोडले. भगदत्तानें एक भल्लबाणानें सात्यकीचें धनुष्य छिन्न करतांच त्यानें दुसरें धनुष्य घेऊन भगदत्तास बाणांनीं वेध केला त्याकाळीं भगदत्तानें यमदंडोपम दृढ शक्ति सात्यकीवर फेंकली तेव्हां सात्यकीनें एक बाणानें तिचे दोन तुकडे करतांच ती भूमीवर पडली. हें पाहून तुझा पुत्र दुर्योधन मोठ्या रथसमुदायानें सात्यकीस वेढा घालून क्रोधानें सर्व बंधूंस बोलला हे बांधवहो, आतां या रथसमुदायांतून सात्यकी पुनः माघारा जाणार नाहीं अशी कांहीं मसलत करा. तो मरण पावला असतां सर्व पांडवांचें सैन्य आज मेलें असें मी मानितों. असें ऐकून सर्वही महारथ्यांनीं सात्यकी भीष्माकडे चाललेला पाहून ते त्या सहवर्तमान युद्ध करूं लागले. कांबोजराजानें अभिमन्यूस प्रथम कांहीं बाणांनीं वेध करून पुनः चौसष्ट व पांच बाणांनीं वेध केला आणि भीष्माच्या जीविताच्या रक्षेनें नऊ बाणांनीं त्याचे सारथ्यास वेध केला तेव्हां उभयतांचें भयंकर युद्ध झालें. शिखंडी भीष्मावर जात असतां विराट व द्रुपद हे तुझ्या सेनेचें निवारण करतात हें पाहून अश्वत्थाम्यानें विराट व द्रुपद यांशीं युद्ध प्रवृत्त झालें. विराटराजानें दाहा बाणांनीं व द्रुपदराजानें तीन बाणांनीं गुरुपुत्रास वेध केला. त्याकाळीं अश्वत्थाम्यानें बहुत बाणांनीं विराट व द्रुपद यांस वेध केला. त्या युद्धप्रसंगीं उभयतां वृद्धांचें चरित्र मोठें आश्चर्यकारक आम्हीं पाहिलें. सहदेव भीष्माकडे जातो हें पाहून कृपाचार्यानें त्यास सत्तर बाणांनीं ताडण केलें. सहदेवानें त्याचें धनुष्य छिन्न करून नऊ बाणांनीं त्यास वेध केला तेव्हां कृपाचार्यानें दुसरें धनुष्य घेऊन दाहा बाणांनीं सहदेवाच्या उरावर ताडण केलें असतां सहदेवानें ही त्याच्या उराच्याठायीं प्रहार केला तेव्हां उभयतांचें घोर युद्ध झालें. नकुलावर विकर्णानें भीष्मरक्षणार्थ साठ बाण सोडले असतां नकुलानें ही त्यास च्याहत्तर बाणांनीं ताडित केलें. घटोत्कच तुझ्या सेनेस मारित चाललेला पाहून तुझा पुत्र दुर्मुख यास घटोत्कचानें एक बाणें करून ताडण करतांच त्यानें साठ बाणांनीं घटोत्कचाच्या मस्तकावर प्रहार करून मोठ्यानें गर्जना केली. धृष्टद्युम्न चें कृतवर्म्यानें निवारण केलें त्याकाळीं भीष्माकरितां उभयतांनें इन्द्रवृत्रासारखें युद्ध झालें. भीमसेन भीष्मवधाच्या इच्छेनें जातो हें पाहून भूरिश्रव्यानें

त्याच्या स्तनांतरीं एक बाणानें वेध केला असतां तो शोभायमान दिसूं लागला. उभयतांही सूर्य तुल्य पराक्रमी परस्पर बाण सोडित असतां भीमसेनावर सोमदत्तीनें व सोमदत्तावर भीमसेनानें परस्पर बाण प्रहार केले. युधिष्ठिरराजा मोठ्या सेनेसहवर्तमान भीष्मावर जातो हें पाहून द्रोणाचार्यानें त्याचें निवारण केलें. द्रोणाच्या रथाचा नाद पर्जन्याच्या सारखा ऐकून प्रभद्रकांचे वीर कंपित झाले. हे राजा, पांडुपुत्रांच्या सेनेचें आचार्यानें निवारण केलें असतां ती एक पाऊल ही पुढें जाण्यास असमर्थ झाली. चेकितान भीष्मावर जातो हें पाहून चित्रसेनानें त्याचें निवारण करून परमशक्तीनें युद्ध केलें. तसेंच चित्रसेनाचें चेकितानानें ही निवारण केलें तेव्हां उभयतांचें घोर युद्ध झालें. तुझ्या पुत्रानें अर्जुनाचें जरी बहुत प्रकारें निवारण केलें तथापि त्यानें तुझ्या पुत्रास पराङ्मुख करून सेनेचें मर्दन केलें. तसेंच दुःशासनानें ही त्याचें निवारण केलें. त्या काळीं तुझ्या पुत्राची सेना पांडवांच्या महारथ्यानीं ठिकठिकाणीं पीडित केलेली रणांगणीं दिसूं लागली. असा विषय या अध्यायांत आहे.

११२. अध्याय एकशें बारा :- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, द्रोणाचार्य पांडवसेनेस पीडित करीत असतां अनेक दुष्ट निमित्तें पाहून आपल्या पुत्रास बोलतो हे अश्वत्थामा, अर्जुन रणामध्यें परम प्रयत्नानें भीष्मास मारण्याची बहुत दिवस इच्छा करीत होता तो दिवस आज आला आहे. आज तर राजांचीं सर्व शरीरें निस्तेज दिसतात. सुयोधनाच्या सैन्यामध्यें कोणी हुषार दिसत नाहीं, दोन्हीं सेनेच्या आसमंतात् भागीं पांचजन्याचा व गांडीवाचा शब्द ऐकूं येतो, अर्जुन सर्व योद्ध्यांस टाकून उत्तमास्त्राचा प्रयोग करीत पितामहावर धांवतो. हे पुत्रा, भीष्मार्जुनाचा समागम पाहून माझ्या अंगावर रोमांच उभे रहातात व मन अस्वस्थ होतें, पापात्माजो पांचाल शिखंडी यास पुढें करून अर्जुन भीष्माशीं युद्ध करण्या करितां रणामध्यें आला आहे. आणि धात्यानें या शिखंडीस पूर्वी स्त्री उत्पन्न करून पुढें तो दैवानें पुरुष झाला यास्तव भीष्मानें तर प्रतिज्ञा केली आहे कीं, मी शिखंडीस मारणार नाहीं. शिखंडीचा ध्वज अमंगल जाणून गंगापुत्र त्याजवर प्रहार करणार नाहीं. हे अश्वत्थामा, अर्जुन रणामध्यें कुरुवृद्ध भीष्मावर धांवून जातो

हें पाहून माझें मन फार व्यथित होतें. युधिष्ठिराच्या क्रोधानें, भीष्मार्जुनाच्या समागमानें व माझ्या अस्त्रांच्या आवेशानें आज सर्व प्रजांचा नाश होणार असें मला वाटतें. अर्जुन तर महा बलवान् असल्यामुळें इंद्रादि देवांसही तो अजय आहे यास्तव त्याचा मार्ग सोडून दूर जा. हे पुत्रा, बलवान् भीमसेन व माद्रीपुत्र ज्याचे बंधू व वासुदेव ज्याचा नाथ उभा आहे त्या पुढें जाण्यास कोण समर्थ होईल. दुर्योधनाच्या क्रोधाग्नीनें भारती सेना दग्ध होते यास्तव हे पुत्रा, तूं सत्वर पांचालपुत्र शिखंडीवर जा आणि त्याजवर अस्त्रयोजना करून राजांशीं आणि भीमसेनाशीं युद्ध कर. पुत्र बहुत दिवस जिवंत रहावा अशी सर्वांस इच्छा आहे तथापि मी क्षत्रियधर्माचा पुरस्कार करून तुझी योजना करतों. हा महा भीष्म रणामध्यें मोठ्या सेनेस दहन करतां युद्धा विषयीं केवळ हा यम आणि वरूण तुल्य आहे यांत संशय नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

११३. अध्याय एकशें तेरा — संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, भगदत्त, कृपाचार्य, शल्य, कृतवर्मा, विंदानुविंद, अवंत्य, जयद्रथ, इत्यादि दहा तुझे योद्धे अनेक देशांपासून आलेल्या मोठ्या सेनेसहवर्तमान् रणामध्यें भीष्मास महत् यश प्राप्त व्हावें या इच्छेनें भीमसेनाशीं युद्ध करूं लागले असतां शल्यानें नऊ बाणानीं, कृतवर्म्यानें तीन बाणानीं, कृपाचार्यानें नऊ बाणानीं, चित्रसेनानें दहा बाणानीं, विकर्णानें दहा बाणानीं, भगदत्तानें दहा बाणानीं, जयद्रथानें तीन बाणानीं, विंदानुविंदानीं पांच पांच बाणानीं व दुर्मर्षणानें तीस बाणानीं भीमसेनास ताडण करतांच भीमसेनानें सात बाणानीं शल्यास व आठ बाणानीं कृतवर्म्यासि, तीन तीन बाणानीं विंदानुविंदांस, पांच बाणानीं दुर्मर्षणास, वीस बाणानीं चित्रसेनास, दाहा बाणानीं विकर्णासि, पांच बाणानीं जयद्रथास वेध करून मोठ्यानें गर्जना केली याप्रकारें उभयतांचें मोठें युद्ध झालें. भीमसेनानें अद्भुत कर्म करतां करतां महारथ्यांस वेधून त्यांचें निवारण केलें. व जयद्रथास सर्व लोक पहात असतां विरथी केला. हें पाहून शल्यास तें त्याचें कर्म न सहन झाल्यामुळें तो धनुष्य सिद्ध करून अरे उभा रहा उभा रहा असें बोलून त्यानें तीक्ष्ण बाणानीं भीमसे-

नास वेध केला. कृपाचार्य, कृतवर्मा, भगदत्त, विंदानुविंद अवंत्य, चित्रसेन, दुर्मर्षण व जयद्रथ यानीं शल्या करितां भीमसेनास वेध केला. भीमसेनानें त्या सर्वांस पांच पांच बाणानीं वेध करून व शल्यास सत्तर बाणानीं वेध केला, तेव्हां शल्यानें भीमास नऊ बाणानीं वेध करून एक भल्ल बाणानें त्याच्या सारथ्याच्या मर्मदेशाचा ठायीं प्रहार करतांच विशोक सारथी व्यथित झाला. हें पाहून भीमसेनानें तीन बाणानीं शल्याचा बाहु व उराचा ठायीं ताडण करून व इतर वीरांस तीन तीन बाणानीं वेध केला. या प्रमाणें त्यानें सर्व योध्यांस ताडण केलें. असा शत्रूशीं भीमसेनाचा महारण प्रवृत्त होऊन तो शत्रूंस मारीत रथा सहवर्तमान जातो हें अर्जुनानें पाहून तोही भीमसेना जवळ आला. नंतर दोघानीं एकत्र होऊन परस्परांकडे पाहिलें असतां हे राजा, तुझ्या वीरांस जयाची आशा राहिली नाहीं. भीमसेन महारथ्यांशीं युद्ध करतो हें अर्जुनानें पाहून तो भीष्मवधाच्या इच्छेनें शिखंडीस पुढें करून जे पूर्वीं तुझ्याकडील दहा वीर भीमसेनाशीं युद्ध करीत होते त्यां पुढें येऊन भीमाचें प्रिय करण्यास्तव त्यानें सर्वांस बाणानीं वेध केला. त्या काळीं दुर्योधन सुशर्म्यास बोलला कीं, तूं बहुत सैन्य घेऊन अर्जुन व भीमसेनाचा वध करण्या करितां जा आणि त्या उभयतांस मार. असें ऐकतांच तो भीमसेन व अर्जुन यांजवर धांवला तेव्हां अर्जुनाचें त्यांसहवर्तमान मोठें युद्ध प्रवृत्त झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

११४. अध्याय एकशें चौदा - संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, शल्य युद्ध करतो हें पाहून अर्जुनानें तीक्ष्ण बाणानीं त्यास आच्छादित करून कृपाचार्य व सुशर्मा यांस तीन तीन बाणानीं वेध केला व भगदत्त, जयद्रथ, चित्रसेन, विकर्ण, कृतवर्मा, दुर्मर्षण व अवंत्य या सर्वांस तीन तीन बाणांनीं ताडण करून तुझ्या सेनेस बहुत पीडित केलें त्या काळीं त्याणींही त्यांजवर बहुत बाण सोडिले तेव्हां भीमार्जुनानीं त्रिगर्तांचें सैन्य बहुत पीडित केलें असतां सुशर्माही पार्थास नऊ बाणानीं पीडित करून मोठ्यानें गर्जना करीत सर्व सैन्यास त्रास देऊं लागला, अन्यही रथ्यानीं भीमसेन व धनंजय यांस सुवर्णपुंख तीक्ष्ण बाणानीं वेध केले. त्या काळीं भीमार्जुनाच्या युद्धानें बहुत र-

थ भग्न झाले व राजांचे चंदनलिप्त बाहू व ऊरू भूमीवर पडून पृथ्वी आस्तीर्ण झाली. या प्रकारें अर्जुनाचें अद्भुत कर्म आह्मीं पाहिलें. जे जे वीर पुढें येत त्यांस मारीत अर्जुन चालला असतां तुझा पुत्र भीमार्जुनाचा पराक्रम पाहून भीष्माच्या रथाजवळ जाऊन उभा राहिला. त्या काळीं कृपाचार्य, कृतवर्मा, जयद्रथ, विंदानुविंद अवंत्य हे युद्ध करीत असतां भीमार्जुनानीं कौरवांच्या महान् सेनेस पळविलें. नंतर सर्व राजानीं एकत्र होऊन मोराच्या पिसाऱ्याचे अर्बुदसंख्याक बाण अर्जुनरथावर टाकिले असतां अर्जुनानें आपल्या बाणजालानें त्या बाणांचें निवारण करून कित्येक वीरांस यमलोकीं पाठविलें. शल्यानें रणामध्यें क्रीडा केल्यासारखें गमन करून अर्जुनाच्या उराचाठायीं भल्ल बाणें करून ताडण केलें. त्या काळीं अर्जुनानें शल्याचें धनुष्य छिन्न करून तीक्ष्ण पांच बाणानीं त्याच्या मर्माचाठायीं वेध केला असतां शल्यानें दुसरें धनुष्य घेऊन क्रोधानें अर्जुनास तीन बाणानीं व वासुदेवास पांच बाणानीं ताडण करून भीमसेनाचा बाहू व ऊर यांचाठायीं नऊ बाणानीं प्रहार केला. द्रोणाचार्य व मागध दुर्योधनाच्या आज्ञेनें ज्या ठिकाणीं भीमार्जुन कौरव सैन्याचा नाश करीत होते तेथें आले असतां जयत्सेन नामक मागधानें भीमसेनास आठ बाणानीं वेध केला. भीमसेनानें त्यास पंधरा बाणानीं वेधून भल्ल बाणानें त्याच्या सारथ्यास रथाखालीं पाडिलें असतां त्याचे अश्व उद्भ्रांत होऊन फिरूं लागले. त्या संधीस द्रोणाचार्यानें शिलीमुख पांसष्ट बाणानीं भीमसेनास ताडण केलें असतां भीमसेनानें द्रोणास नऊ भल्ल बाणानीं वेध करून पुनः साठ बाणानीं त्यास ताडण केलें. अर्जुनानें सुशर्म्यास वेधून त्याचें सैन्य पळविलें. नंतर भीष्म व बृहद्बल हे क्रुद्ध होऊन भीमसेन व धनंजय यांजवर आले असतां उभयतांचा संग्राम प्रवृत्त झाला त्याच समयीं सेनेसहवर्तमान पांडव व धृष्टद्युम्न हे शिखंडीस पुढें करून भीष्मावर धांवले तेव्हां भीष्मानें पांडवांच्या सेनेचें निवारण केलें. अ. वि. पा. प्र. आ.

११५. अध्याय एकशेंपंधरा - धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, दाहावे दिवशीं भीष्मानें सृंजय पांडवांसहवर्तमान कसें युद्ध केलें ? तसेंच कौरवानीं पांडवांचें कसें निवारण केलें ? हें सर्व मला सांग. असा प्रश्न ऐकून संज-

य बोलतो हे धृतराष्ट्रा, अर्जुनाच्या उत्तमास्त्रानीं दिवसा दिवसाचेठायीं तुझे महारथी परलोकास गेले. त्या प्रमाणेंच भीष्म पूर्व प्रतिज्ञा स्मरून पांडवसैन्याचा क्षय करूं लागला. कौरवांसहवर्तमान भीष्म पांचाल्य शिखंडी सहवर्तमान अर्जुनाशीं युद्ध करीत असतां सर्वांस जयाविषयीं संशयच झाला. दहावे दिवशीं भीष्मार्जुनाचा समागम झाला तेव्हां घोर सेनेचा क्षय झाला असतां ज्यांचीं नामगोत्रें कोणास ही विदित नाहींत असे वीर भीष्मानें मारिले. या प्रकारें भीष्म दहा दिवस पांडवांच्या सेनेस सतत मारून आपला वध व्हावा या इच्छेनें युधिष्ठिरास बोलला हे युधिष्ठिरा, मी या देहानें बहुत खिन्न झालों व बहुत प्राण्यास मारतां मारतां असा माझा काळ गेला यास्तव तूं माझें प्रिय इच्छित असशील तर पांचाल व सृंजय यांस पुढें करून माझ्या वधाविषयीं यत्न कर. हें ऐकून युधिष्ठिर राजा सृंजयां सहवर्तमान भीष्मावर गेला. युधिष्ठिरानें सेनेस आज्ञा दिली कीं, अरे धांवा अरे युद्ध करा. अरे भीष्मास जिंका, शत्रूंस जिंकणारा अर्जुन हा तुमचें रक्षण करील. सेनापति धृष्टद्युम्न व भीमसेन हे तुमच्या शत्रूंस आज पाडतील. हे सृंजयहो, आज युद्धामध्यें तुह्मीं भीष्माचें भय बाळगूं नये. असा पांडवानीं दहावे दिवशीं संकेत करून ते शिखंडी व अर्जुनास पुढें करून भीष्मास पाडण्याविषयीं यत्न करूं लागले. सात्यकी अश्वत्थाम्याशीं, धृष्टकेतु भूरिश्रव्याशीं, अभिमन्यु दुर्योधनाशीं, विराटराजा जयद्रथाशीं या प्रमाणें युद्ध करूं लागले. युधिष्ठिर शल्याशीं युद्ध करूं लागला. कांहीं वीर बरोबर घेऊन भीमसेन गजसेनेवर धांवला. बंधूंसहवर्तमान धृष्टद्युम्न अश्वत्थाम्याशीं, बृहद्बल अभिमन्यूशीं, सर्व राजांसहवर्तमान तुझे पुत्र अर्जुन व शिखंडी यांशीं युद्ध करूं लागले. असा तो दोन्हीं सेनेचा संग्राम होत असतां भूमि कंपायमान झाली. तुझ्या व शत्रूच्या सेना भीष्मास रणामध्यें पाहून पुढें पुढें येत असतां सर्व दिशेचाठायीं वीरांचे पादतळ शब्द, शंख दुंदुभीचे घोष, गजांचे शब्द व योद्ध्यांचे सिंहनाद असे दारुण शब्द झाले. उभयसैन्यांतील शक्ती, ऋष्टी, बाण इत्यादि शस्त्रांनीं व्याप्त झालेलें आकाश निष्प्रभ दिसूं लागलें. गज गजावर, अश्व अश्वावर, रथी रथ्यावर व पदाती पदात्यावर येऊन भीष्मा करितां

कौरव पांडवांचें युद्ध जाहलें . दोन्हींसेनेचें युद्ध चाललें असतां परस्पर व-धाची व जयाची इच्छा धरून संग्राम करूं लागले. अ. वि. या अ. आ.

११६. अध्याय एकशें सोळा :- संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, भीष्म रक्षणा करितां दुर्योधन पुढें आलेला पाहून त्याशीं युद्ध करण्या करितां अभिमन्यु पुढें आला तेव्हां दुर्योधनानें क्रुद्ध होऊन त्याच्या उरावर नऊ बाणानीं ताडण केलें. त्या काळीं अभिमन्यूनें एक घोर शक्ती दुर्योधनाच्या रथावर टाकिली हें पाहून तुझ्या पुत्रानें तिचे दोन तुकडे केले. या प्रकारें उभयतांचें युद्ध विचित्ररूप व सर्व राजांच्या दृष्टी यांस भीति उत्पन्न करणारें प्रवृत्त झालें. सात्यकीस पाहून अश्वत्थाम्यानें नाराच बाणानीं ताडण केलें असतां सात्यकीनेंही गुरुपुत्राच्या सर्व मर्माचाठायीं ताडण केलें या प्रमाणें उभयतांचें युद्ध झालें. पौरव राजानें धृष्टकेतूस बहुत बाणानीं आच्छादन करून विदारण केलें असतां धृष्टकेतूनें त्वरेनें तीस बाणानीं पौरवास वेध केला. असे ते नानाप्रकारें युद्ध करीत असतां परस्परांवर प्रहार करून एक काळीं भूमीवर पडले तेव्हां दुर्योधनानें पौरवास आपल्या रथामध्यें बसवून रणांगणा पासून दूर नेला. तसाच माद्रीपुत्रानें धृष्टकेतूस आपल्या रथांत बसवून दूर नेला. पांडवांकडील सुशर्मा पुढें आला असतां तुझा पुत्र जो चित्रसेन याचें व त्याचें बहुत प्रकारानें युद्ध झालें. भीष्माच्या यशाची वृद्धि करण्या करितां बृहद्बल आलेला पाहून अभिमन्यु अर्जुनाकरितां त्याशीं संग्राम करूं लागला. कौसलेंद्रानें अभिमन्यूस पांच लोहमय बाणानीं वेध केला असतां अभिमन्यु कंपित न होतां त्यानें त्यास बहुत बाणानीं ताडण करून व त्याचें धनुष्य छिन्न करून पुनः तीस बाणानीं त्याच्या उरावर प्रहार केला त्या काळीं कोसलेंद्रानें दुसरें धनुष्य घेऊन अभिमन्यूस बहुत बाणानीं वेध केला असतां देवासुर संग्रामामध्यें बली वासवांचें जसें युद्ध झालें तसें उभयतांचें युद्ध झालें. भीमसेनानें पर्वतप्राय गज मारले असतां कित्येक गज भूमीस कंपित करीत पतन पावले. मोठ्या सेने सह वर्तमान शल्यास रणामध्यें उभा राहिलेला पाहून युधिष्ठिरानें त्यास पीडित केलें असतां शल्यानेंही त्यास भीष्म संरक्षणा करितां पीडित केलें. हे धृतराष्ट्र राजा, जयद्रथानें विराटराजास नऊ

बाणांनीं वेध केला असतां विराटसेनापतीनें ही जयद्रथाच्या स्तनांतरीं ताडण केलें. उभयतांही चित्रविचित्र खड्ग धारण करणारे रणामध्यें परम शोभायमान दिसूं लागले. महारणामध्यें द्रोणाचार्यानें धृष्टद्युम्नाशीं संगत होऊन त्यानें धनुष्य छिन्न करून पन्नास बाणांनीं त्यास ताडण केलें असतां धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन त्याजवर बहुत बाण टाकिले असें नानाप्रकारें द्रोणाचार्य व धृष्टद्युम्न यांचें युद्ध झालें. अर्जुनानें भीष्मावर जाऊन त्यास तीक्ष्ण बाणांनीं पीडित केला असतां भगदत्त राजा गजावर बसून अर्जुनापुढें येतांच अर्जुनानें तीक्ष्ण बाणांनीं त्याचे गजास वेध करून शिखंडीस भाषण केलें हे पांचालपुत्रा तूं भीष्मापुढें जाऊन लौकर त्याचा वध कर. त्यासंधीस भगदत्तानें अर्जुनास सोडून द्रुपदरथाकडे गमन केलें असतां अर्जुन शिखंडीस पुढें करून त्वरेनें भीष्मावर जाऊन युद्धास प्रवृत्त झाला. त्याकाळीं तुझे वीर मोठ्यानें आक्रोश करून अर्जुनावर धांवले असतां सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. तुझ्या पुत्राची सेना पुढें येतांच वायु जसा अभ्रास आकाशामध्यें उडवितो तशी अर्जुनानें तुझ्या सेनेची अवस्था केली. शिखंडीनें भीष्मावर जाऊन त्यास वेध केला असतां जसा प्रदीप्त झालेला अग्नि अरण्यामध्यें वायूच्या साह्यानें तृणास दग्ध करीत अधिक प्रज्वलित होतो तसा भीष्माग्नीनें क्षत्रियरूप तृणास दिव्यास्त्रानें दहन केलें त्या काळीं भीष्मानें अर्जुनाच्या पृष्ठभागीं जाणाऱ्या सोमकांस मारून कित्येक गजाश्ववीर यांचा नाश केला. भीष्मपराक्रम पाहून सर्व लोकांस वाटलें कीं, यासर्व वीरांस आज भीष्म यमपुरास नेतो कीं काय! त्या काळीं अर्जुन व शिखंडी यां वांचून भीष्माच्या अग्रभागीं जाण्यास कोणी ही योद्धा समर्थ झाला नाहीं. अ-वि-या अ-आ.

११७. अध्याय एकशें सतरा - संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, शिखंडीनें रणामध्यें जाऊन भीष्मास दहा भल्ल बाणांनीं स्तनांतराचाठायीं वेध केला असतां भीष्मानें शिखंडीस क्रूर दृष्टीनें पाहिलें आणि त्याचें स्त्रीत्व स्मरून तो त्यास मारण्यास उद्युक्त झाला नाहीं हें त्याचें कारण शिखंडीस कळलें नवतें. त्या युद्धप्रसंगीं अर्जुन बोलला हे शिखंडि, तूं सत्वर भीष्माचा वध कर. असें ऐकतांच शिखंडीनें नानाप्रकारच्या बाणांनीं भीष्मा-

स ताडण केलें असतां भीष्मानें शिखंडीच्या बाणांची गणना न करून ती-क्ष्ण बाणानीं पांडवांची बहुत सेना यमलोकीं पाठविली. तसेंच पांडवानीं ही भीष्मास आच्छादन केलें. त्याकाळीं एकटा तुझा पुत्र दुःशासन हा अर्जुनास-हवर्तमान सर्व पांडवांशीं युद्ध करीत असतां पांडव त्याचें निवारण करण्यास समर्थ झाले नाहींत. शेवटीं अर्जुनानें त्यास जिंकून तो भीष्माकडे गेला ते-व्हां दुर्योधन बोलला हे वीर हो. तुह्मीं सत्वर अर्जुना जवळ जाऊन युद्ध क-रा मी ही अर्जुनावर जातों. असें ऐकतांच विदेह, कालिंग, दासेरकांचे गण, इत्यादि सर्व एकाकीं अर्जुनावर गेले. तेव्हां पार्थानें त्यांस दिव्यास्त्रानें वेध करू-न सहस्रावधि गज, अश्व यांचा नाश केला. त्याकाळीं भीष्म दिव्यास्त्रांचा प्र-योग करून अर्जुनावर धांवतांच शिखंडी पुढें येऊन उभा राहिला तेव्हां भी-ष्मानें पावक तुल्य अस्त्राचा उपसंहार करतांच अर्जुनानें आपल्या अस्त्रा-नें भीष्मास मोहित करून तुझ्या सेनेस मारिलें. अ. वि. या अ. आ.

११८. अध्याय एकशें अठरा— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र रा-जा. सर्व सैनीक ब्रह्मलोक परायण होऊन युद्धार्थ उभे राहिले असतां रथी रथ्या-शीं, गज गजाशीं, अश्व अश्वाशीं युद्ध करूं लागले. शल्य, कृपाचार्य, चि-त्रसेन, दुःशासन व विकर्ण हे रथामध्यें बसून पांडव सेनेस कंपित करीत यु-द्ध करूं लागले तेव्हां अर्जुनानें सेंपा सारखे बहुत गज पाडून कित्येकांस ह-जारो बाणानीं पीडित केलें असतां ते गज आर्त शब्द करून पृथ्वीवर पड-ले. पूर्वीं तुझ्या पुत्रानीं दिलेल्या बहुत क्लेशाचें स्मरण करून पांडव तुझ्या पुत्राशीं युद्ध करूं लागले. त्याकाळीं सेनापति धृष्टद्युम्न आपल्या सेनेस बोलला हे सोमक हो, सृंजयां सहवर्तमान तुह्मी भीष्मावर धांवा. असें ऐकतां-च सृंजयां सहवर्तमान सोमक भीष्मावर धांवून बाणवृष्टीनें त्यास ताडण क-रूं लागले. त्याकाळीं भीष्म क्रुद्ध होऊन त्यांशीं युद्ध करूं लागला. पूर्वीं शत्रु-नाशक अस्त्रशिक्षा जी रामानें भीष्मास उपदेशिली केली होती तिचें भीष्मानें स्मरण करून शत्रुसेनेचा तो क्षय करीत असतां, दिवसा दिवसाचाठायीं पांड-वांच्या सेनेतील दहा सहस्त्र वीरांस त्यानें मारिलें. आज दशम दिवस आला असतां एकाकीं भीष्मानें मत्स्य व पांचाल यांचे असंख्याक गजाश्व मारून

सात महारथी व पांच सहस्र रथी, चौदा हजार पदाती यांचा नाश केला. गज व अश्व दहा सहस्र मारून शिक्षाबलानें सर्व राजांच्या सेनेस नाशित करीत विराटाचा प्रिय बंधु जो शतानीक यास मारला. नंतर सहस्र राजांस यमलोकीं पाठविलें. या प्रकारें भीष्म पांडवांच्या सेनेस त्रस्त करीत दोन्हीं सैन्याच्या मध्यभागीं उभा असतां श्रीकृष्ण भाषण करतो हे अर्जुना, हा भीष्म दोन्हीं सेनेच्या मध्यभागीं उभा आहे यास तूं आपल्या बलें करून मारलें असतां तुझा विजय होईल. असें ऐकतांच अर्जुनानें भीष्मास ध्वज व रथ यां सहवर्तमान बाणानीं आच्छादन केलें तेव्हां भीष्मानेंही त्या बाणांचें निवारण केलें. नंतर द्रुपद, धृष्टकेतु, भीमसेन, धृष्टद्युम्न, नकुल, सहदेव, चेकितान, केकय पांच भ्राते, सात्यकि, अभिमन्यु, घटोत्कच, द्रौपदीचे पांच पुत्र, शिखंडी, कुंतिभोज, सुशर्मा व विराट हे भीष्मबाणानीं पीडित झाले असतां अर्जुनानें त्यांस तारिलें. नंतर शिखंडी मोठें धनुष्य घेऊन वेगानें भीष्मावर गेला हें पाहून सर्व पांडवांकडील वीर भीष्मावर गेले तेव्हां भीष्मानें त्या सर्वांचे बाण दूर करून शिखंडीचें स्त्रीत्व स्मरीत त्याजवर बाण न सोडितां द्रुपदसेनेमध्यें प्रवेश केला आणि सात रथी पाडिले. त्या काळीं अर्जुनानें शिखंडीस पुढें करून भीष्मास ताडण केलें. अ. वि. या अ. आ.

११९. अध्याय एकशें एकुणवीस — संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा सर्व पांडव शिखंडीस पुढें करून रणामध्यें भीष्मावर बाणांचा प्रहार करूं लागले तेव्हां भीष्मानें व्यथित न होतां पांडव सैन्यांत शिरून सात्यकि, भीमसेन, धनंजय, द्रुपद, विराट व धृष्टद्युम्न त्या सहा वीरांस मर्मभेदी बाणानीं वेध केला त्या काळीं त्या सहा महारथ्यानीं भीष्माच्या बाणांचें निवारण करून दहा दहा बाणानीं त्यास पीडित केलें. अर्जुनानेंही आवेशानें शिखंडीस पुढें करून भीष्मानें धनुष्य छिन्न केलें तेव्हां भीष्मानें दुसरें धनुष्य घेतलें असतां तेंही अर्जुनानें तीन बाणानीं तोडलें या प्रमाणें जें जें धनुष्य भीष्मानें घ्यावें तें तें अर्जुनानें तोडावें. अशीं भीष्माचीं धनुष्यें अर्जुन तोडित असतां भीष्मानें वज्रासारखी एक शक्ति अर्जुनावर टाकिली तेव्हां अर्जुनानें तिचे पांच बाणानीं छेदन केलें. हें पाहून भीष्म आपल्या मनांत वि-

चार करूं लागला कीं, भगवान् जर पांडवांचा संरक्षक नसता तर मी आज ए-
क धनुष्यानें सर्व पांडवांस जिंकण्यास समर्थ झालों असतों; परंतु श्रीकृष्ण
पांडवांचा संरक्षक आहे हेंच महत् कारण जाणून मी आतां पांडवांशीं युद्ध क
रीत नाहीं. पांडव तर अवध्य आहेत, शिखंडी तर पूर्वी स्त्री होता, मला तर पूर्वी
सत्यवतीच्या विवाहकाळीं पित्यानें संतुष्ट होऊन स्वच्छंद मरण व रणामध्यें
अवध्यत्व दिलें इत्यादि कारणावरून आजच माझा मृत्युकाल असें मी मा-
नितों. इतके भीष्मे विचार करतो तों त्याचें तत्त्व जाणून अष्टवसू व ऋषी
आकाशामध्यें उभे राहून बोलले हे भीष्मा; तूं जें निश्चित केलेंस तें आह्मांस
ही प्रिय आहे तूं आतां युद्धापासून बुद्धीनें परावर्तन करून केलेला विचार
सिद्धीस न्यावास इतके ऋषी भाषण करतात तों त्या संधीस वायु सुगंधयुक्त
सुटला. देव दुंदुभी वाजूं लागले. भीष्माच्या मस्तकीं पुष्पवृष्टी झाली. संज-
य ह्मणतो हे राजा, हा ऋषींचा व वसूंचा संवाद झालेला भीष्मानें व व्यास
कृपेनें मी ऐकिला. हे राजा, शिखंडीनें क्रुद्ध होऊन नऊ बाणानीं भीष्माच्या
उराचाठायीं ताडण जरी केलें तथापि भीष्म अचल उभा राहिला. नंतर भी-
ष्मानें तीन भल्ल बाणानीं त्रिवार अर्जुनास ताडण केलें असतां जें जें धनुष्य
भीष्मानें घेतलें तें तें निमिषार्धात अर्जुनानें छिन्न केलें. या प्रमाणें अर्जुनानें भी-
ष्माचीं बहुत धनुष्यें छिन्न केलीं असतां भीष्म अर्जुनाचें अतिक्रमण कर-
ण्यास समर्थ झाला नाहीं. नंतर भीष्म बोलतो हे दुःशासना, हा पांडवांतील
महारथी पार्थ सहस्त्रावधी बाणानीं रणामध्यें मला ताडण करतो यास जिं-
कण्यास आज इंद्रही समर्थ नाहीं. देव, दानव, राक्षस हे जरी एकत्र होऊन
अर्जुनाशीं युद्धास आले तथापि ते अर्जुनास जिंकण्यास समर्थ होणार
नाहींत हे दुःशासना, हे बाण अर्जुनानें सोडलेले माझ्या गात्रास कृंतन कर-
तात ते बाण शिखंडीचे नव्हेत असें भाषण करून नंतर शांतनव भीष्म पां-
डवांस आतांच जाळितो काय असा क्रुद्ध होऊन त्यानें अर्जुनावर एक शक्ति
फेंकली त्या शक्तीचे अर्जुनानें तीन तुकडे केले. तेव्हां भीष्म सुवर्ण अलंकृत
चर्म व खड्ग धारण करून मृत्यूच्या अग्रभागीं जय प्राप्त होण्याकरितां धां-
वणार इतक्यांत अर्जुनानें भीष्म रथाखालीं उतरण्याचे पूर्वी तें चर्म शतधा

छिन्न केलें असतां तें त्याचें कर्म मोठें आश्चर्या सारखें सर्वांनीं पाहिलें. त्याकाळीं युधिष्ठिर बोलतो हे सैनिक हो, भीष्मावर तुह्मी धांवा. अशी आज्ञा होतांच पांडवांचे योद्धे तोमर, प्रास, बाण, पट्टीश, इत्यादि आयुधांची वृष्टि करीत भीष्मावर धांवले. तुझे पुत्रही भीष्माच्या जयाच्या इच्छेनें त्याचे रक्षणार्थ पुढें येऊन सिंहनाद करूं लागले. या भीष्मार्जुन प्रसंगाच्या दहाव्या दिवशीं भीष्म आपल्या मर्माचा भेद होत असतांही नित्य नेमाप्रमाणें दहा हजार शत्रूंचे रथी मारून उभा राहिला. हे धृतराष्ट्र राजा, त्याकाळीं मी व इतर योद्धे धनंजयाच्या निशित शस्त्रांनीं पीडित होऊन पळालों. पांडवांच्या योद्ध्यानीं लक्षावधी बाण भीष्मावर टाकिले असतां त्याच्या गात्रास बाण लागल्या वांचून दोन अंगुळेंही जागा राहिली नाहीं. तसाच भीष्माचा ध्वज, अश्व, सारथि यांचा पार्थानें नाश केला. या प्रकारें भीष्म, बाणानीं विशकलीकृत झाला असतां अर्जुनानें रणामध्यें तीक्ष्ण बाणानीं त्यास वेध करतांच भीष्म पूर्वेकडे मस्तक करून रथापासून खालीं पडला तेव्हां आकाशांत देवांचा व भूमीवर राजांचा हाहाकार शब्द झाला. भीष्म पडलेला पाहून आमचीं सर्वांचीं हृदयें नष्ट झालीं. इंद्रध्वजा सारखा तुझा पिता भीष्म बाणसंघानें वेष्टित झाल्यामुळें पृथ्वीस स्पर्श न करून बाणशय्येवर तोथीं निजला. भीष्म रथाखालीं पडतांच दिव्यभाव प्राप्त झाला. पर्जन्य वृष्टि होऊन पृथ्वी कंपायमान झाली. भीष्म रथाखालीं पडतां पडतां सूर्य दक्षिणामार्गानें जातो हें पाहून भीष्म काळविचार करतो तों इतक्यांत आकाशामध्यें अशी दिव्य वाणी झाली कीं, सर्व शस्त्रवानामध्यें श्रेष्ठ, नर व्याघ्र, गंगापुत्र, महात्मा भीष्म दक्षिणायन सूर्य असतां कसा मृत्यु पावेल अशी वाणी ऐकतांच हा मी स्थित आहें असें ह्मणून नंतर उत्तरायणाची मार्ग प्रतीक्षा करीत तो तसाच राहिला. भीष्माचें मनोगत जाणून गंगेनें ऋषींस हंसरूपानें त्याजकडे जाण्यास प्रेरणा केली असतां ते हंसरूपानें ज्या स्थळीं भीष्मानें बाणशय्येवर शयन केलें होतें त्या ठिकाणीं येऊन बोलले, हा महात्मा भीष्म दक्षिणायनामध्यें कसा प्रयाण करील. असें भाषण करून ते हंस दक्षिणमार्गानें जात असतां त्यांस पाहून भीष्म भाषण करतो कीं, मी दक्षिणायन

असतां कधीं जाणार नाहीं असा माझा निश्चय आहे. हे हंसहो, मी तुह्मांस असें सत्य सांगतों कीं, जें माझें स्वकीय पुरातन स्थान आहे तेथें उत्तरायणामध्यें जाईन. प्राणत्याग करणें हें माझ्या स्वाधीन आहे यास्तव मी उत्तरायणापर्यंत प्राण धारण करीन. पित्यानें मला पूर्वीं स्वच्छंद मृत्यु तुला असो असा जो वर दिला तो त्याचा सत्य असो. या प्रकारें भाषण करून भीष्म बाणशय्येवर निजला. कौरवांचा शृंगभूत भीष्म पडला असतां पांडव, सृंजय सिंहनाद करूं लागले कौरवांस महान् मोह प्राप्त झाला. कृपाचार्य व दुर्योधन प्रमुख योद्धे सुस्कारे टाकीत रोदन करूं लागले. भीष्म अवध्य असून हत झाला हें पाहून कोणीं ही कौरवांचे वीर पांडवांवर धांवले नाहींत. त्या काळीं ऋषी, पितर व भरतकुलाचे पूर्वज भीष्माचें स्तवन करूं लागले. भीष्म महाउपनिषद्भागाचें चिंतन करीत योगधारणेनें उत्तरायण काळाची मार्गप्रतीक्षा करीत व जप करून सुखानें रणांगणीं राहिला. अ. वि. या अ. आ.

१२०. अध्याय एकशें वीस - धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, देवतुल्य पराक्रमी असा जो भीष्म तो पडल्यानंतर आह्मां कडील योद्ध्यांनीं काय केलें? ज्या काळीं भीष्मानें दयाभावानें द्रुपद पुत्रावर प्रहार केला नाहीं त्याकाळींच हे सर्व कौरव व अन्य वीर पांडवांनीं मारिले असा मी निश्चय केला. आज मी दुष्ट बुद्धि, भीष्म पडल्याचें वृत्त ऐकतों; परंतु माझें हृदय भिन्न होत नाहीं त्यापेक्षां तें लोखंडा सारखें आहे असें मला वाटतें. आतां भीष्मानें जयाच्या इच्छेनें रणामध्यें पडल्यावर जें चेष्टित केलें तें मला सांग? जो भीष्म पूर्वीं जामदग्न्यरामाच्या दिव्यास्त्रानें ही नष्ट झाला नाहीं तो आज द्रुपदपुत्र शिखंडीनें मारला हें कसें सत्य वाटेल बरें. असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा, भीष्म सायंकाळीं रणभूमीवर पडला असतां तुझ्या पुत्रांस खेद व पांचालांस हर्ष झाला. ज्या काळीं भीष्म रथाखालीं पडला त्या काळीं त्यानें भूमीस स्पर्श न करितां बाण शय्येवर शयन केलें त्यासमयीं सर्व भूतांचा हाहाकार नाद उत्पन्न झाला. कौरव ह्यांच्या सैन्यांतील क्षत्रियांस भय उत्पन्न झालें. शांतनव भीष्म पडला असतां सिद्ध चारणांस हर्ष वर्तमान ऋषी असें ह्मणाले कीं, हा भीष्म ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ व मुख्य आहे.

पूर्वी आपला पिता शंतनु कामार्त झालेला जाणून या भीष्मानें आपल्यास ऊर्ध्वरेतस्त्व धारण केलें. शांतनव भीष्म पडला असतां तुझे पुत्र लज्जेनें अधोमुख करून बसले. रणांगणीं पांडवांस जयप्राप्त झाल्यामुळें ते हर्षित झाले. भीष्म पडलेला पाहून दुर्योधनआज्ञेनें आपल्या सेनेसहवर्तमान दुःशासन द्रोणसैन्यांत गेला आणि त्यानें द्रोणास भीष्माचें वर्तमान सांगतांच द्रोण किंचित् मोह पावला आणि सावध होऊन त्यानें आपल्या सैनिकांचें निवारण केलें. कौरवपांडवांचे योद्धे युद्धापासून निवृत्त झाले असतां आप आपलीं कवचें काढून भीष्माजवळ आले आणि त्यांनीं त्यास नमस्कार केला हें पाहून भीष्म बोलतो हे महाभागहो, तुमचें स्वागत असो. तुमच्या दर्शनानें मी संतुष्ट झालों. हें माझें शीर शय्येच्या खालीं लोंबत आहे यास कांहीं तरी उशाद्या. असें ऐकतांच सर्वही राजे आपल्या बारीक व मृदु उशा पुढें आणून उभे राहिले असतां त्या उपधानास पाहून पितामह भीष्म त्यांचें गृहण न करतां हास्य करून भाषण करतो हे पार्थिव हो, हीं उपधानें या वीर शय्येस आतां योग्य नाहींत असें बोलून अर्जुनास म्हणतो हे महाबाहो, शीर शय्येपासून लंबायमान् होत आहे यास्तव या रणशय्येस जें उपधान तुला योग्य दिसत असेल तें मला दे. असें ऐकून अर्जुन बोलतो हे कुरुश्रेष्ठा, हा मी तुमचा दास उभा आहे काय आज्ञा असेल ती मला सांगावी. असें ऐकून पितामह भाषण करतो हे फाल्गुना, या वीर शय्येस योग्य जें उसें असेल तें मला दे. असें ऐकतांच अर्जुनानें गांडीव धनुष्यास तीन बाण लावून भूमीमध्यें मारले असतां ते बाण भूमीचा भेद करून भीष्माच्या मस्तकास आश्रय देऊन उभे राहिले. अर्जुनानें उसें दिलेलें पाहून भीष्म हर्षानें बोलतो हे वीरश्रेष्ठा, माझ्या शय्येस योग्य उसें तूं दिलेंस याहून दुसरें कांहीं उपधान देतास तर क्रोधानें तुला शाप दिला असता. हे महाबाहो, स्वधर्माचा ठायीं राहणाऱ्या क्षत्रियानें रणामध्यें अशा बाणशय्येवर शयन करावें, असें अर्जुनास बोलून संन्निध आलेल्या राजांस भाषण करतो हे राजेहो, हें अर्जुनानें दिलेलें उपधान पहा. सूर्याचें गमन उत्तर मार्गानें होईपर्यंत मी या शय्येवर शयन करतों तो पावेतों जे मला पहाण्यास येतील त्यांच्या मी दृष्टीस पडेन. माझ्या शयन-

स्थानाच्या आसमंतात् भागीं खंदक खणा ह्मणजे मी सूर्याची उपासना करीन. हे राजेहो, सर्वांनीं वैर सोडून संग्रामापासून आतां उपरम करावा. या प्रकारें भीष्म राजांशीं भाषण करतो तों इतक्यांत अंगांतून शल्यें काढण्याविषयीं कुशल शस्त्रवैद्य तेथें आले तेव्हां भीष्म ह्मणतो हे दुर्योधना. हे चिकित्सक वैद्य आले आहेत तर यांस द्रव्य देऊन विसर्जन करावें. अशी माझी स्थिति झाली असतां या वैद्यांशीं मला काय कर्तव्य. क्षत्रिय धर्माविषयीं प्रशस्थ जी परम गति ती मला प्राप्त झाली. असें ऐकून तुझ्या पुत्रानें त्या शस्त्रवैद्यांचें यथायोग्य पूजा करून विसर्जन केलें. त्याकाळीं नानादेशीय राजांनीं भीष्माची धर्मस्थिति पाहून त्यांस मोठें आश्चर्य झालें. तुझ्या पित्यास अर्जुनानें उपधान दिल्यानंतर दुर्योधनानें भीष्माच्या संरक्षणार्थ कांहीं सेवक जन ठेऊन ते सर्व आपआपल्या शिबिरीं गेले. त्या काळीं श्रीकृष्ण भगवान भाषण करतो हे युधिष्ठिरा, तूं परम भाग्योदयानें भीष्मास पाडलास. मनुष्यांनीं जो अवध्य, महारथी, सत्यप्रतिज्ञ, सर्व देवांसहवर्तमान् भूतांस अजिंक्य जो भीष्म तो तुझ्या घोर चक्षूनें दग्ध झाला. असें ऐकून धर्मराज बोलतो हे केशवा, तुझ्या प्रसादानें जय व तुझ्या क्रोधानें पराजय होतो. तूं भक्तास अभय देणारा व आमचें रक्षण करणारा आहेस. ज्याचा रक्षण कर्ता तूं आहेस त्याचा जय झाला ह्मणून आश्चर्य काय! अ· वि· या अ· आ·

१२१. अध्याय एकशें एकवीस – संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, ती रात्र अतिक्रांत झाल्यावर दुसरे दिवशीं पांडव व कौरव हे भीष्माच्या जवळ येऊन उभे राहिले. हजारों कन्यांनीं चंदनादिकांची भीष्मावर वृष्टि केली. त्याकाळीं भीष्म बोलला हे राजेहो, अरे जल आणा जल आणा असें भाषण करीत असतां सर्व राजांनीं नानाप्रकारचे उच्च उच्च भक्ष्यपदार्थ व शीतळ उदकांचे कुंभ भीष्माच्या अग्रभागीं आणिले. ते पाहून भीष्म बोलतो हे दुर्योधना, आतां मला मनुष्यांचे भोग योग्य नाहींत. मी मनुष्यांतून उठून या बाणशय्येवर शयन करतों असें बोलून अर्जुनास ह्मणतो हे अर्जुना, तुझ्या बाणाग्नीं मी पीडित झाल्यामुळें माझें शरीर परम दग्धमान् होतें व मर्मस्थानें बहुत दुःख देतात, मुख शुष्क होतें यास्तव या

काळीं जें उदक मला योग्य असेल तें देण्यास तूं समर्थ आहेस. असें ऐकून अर्जुनानें गांडीव धनुष्यास एक बाण पर्जन्य अस्त्रानें अभिमंत्रण करून भीष्माच्या दक्षिणपार्श्वभागीं भूमीस वेध करतांच तिजपासून परम कल्याणरूपिणी उदकाची धारा भीष्ममुखामध्यें पडली त्या काळीं अर्जुनाचें अतिमानुष कर्म पाहून सर्व राजे विस्मय पावले. शांतनव भीष्म जलधारेनें तृप्त होऊन बोलला हे धनंजया, या कर्माचें तुझाठायीं आश्चर्य नाहीं, तूं वासुदेव सात्यानें महत्कर्म करशील असें मला पूर्वीं नारदानी सांगितलें होतें. देवांसहवर्तमान् इंद्रही जें कर्म करण्यास समर्थ नाहीं तें कर्म तूं करशील. असें भीष्म वाक्य ऐकतांच दुर्योधन दीनमनस्क होऊन बसला, तेव्हां भीष्म भाषण करतो हे दुर्योधना, अर्जुन जिंकण्यास अशक्य आहे यास्तव राज्याचा अर्धभाग तूं पांडवांस दे. असें बोलून भीष्म ध्यानस्थ बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२२. अध्याय एकशें बावीस — संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, सर्व राजे आपल्या स्थानीं गेल्यावर एकाकी भीष्म ध्यानस्थ आहे हें पाहून कर्ण भाषण करतो हे महाबाहो, मी राधेय नित्य तुझ्या दृष्टी पुढें आलों असतां तूं सर्वदा माझ्याशीं द्वेषभाव दाखवीत होतास तो आज मी तुला पेरण्यास आलों आहें असें बोलून कर्ण स्तब्ध राहिला असतां भीष्म एकांतस्थान पाहून सर्व रक्षक जनांस दूर करून पिता जसा पुत्रास हातानें धरतो तसा कर्णास हस्तानें धरून प्रेमानें भाषण करतो हे कर्णा, तूं राधेचा पुत्र नव्हेस तूं कुंतीचा पुत्र कौंतेय आहेस तुझा पिता अधिरथी नव्हे. हे महाबाहो, तूं सूर्यापासून कुंतीचेठायीं झालास असें नारदानीं, व्यासानीं व श्रीकृष्णानीं मला सांगितलें आहे. माझा तुजविषयीं द्वेष नाहीं हें मी तुला सत्य सांगतों. हे कर्णा, तुझ्या तेजोवध निमित्त मी तुला क्रूर भाषणें बोललों, कारण तूं पांडवांची कारणा वांचून निंदा करतोस. हे कर्णा, तुझेठायीं ब्रह्मण्यता, शौर्य व दानाचाठायीं परम स्थिति जी आहे ती मी जाणतों. हे कर्णा, कुरुराजास कन्याप्राप्त होण्या करितां तूं धनुष्य बाणधारण करून एकाकीं काशीपुरीस गेलास आणि बहुत राजाचें मर्दन केलेंस

महाबलवान् जो जरासंध राजा तोही रणामध्यें तुझ्याशीं समता पावला नाहीं. असें ऐकून कर्ण भाषण करतो हे भीष्मा, मी कौंतेय आहें सूतज नाहीं हें जें तुह्मीं बोललांत तें सर्व मी जाणतों; परंतु कुंतीनें माझा त्याग केला. सूतानें मला वाढविलें व दुर्योधनाच्या ऐश्वर्याचा मी उपभोग केला तें सर्व आतां मिथ्या करण्यास मी समर्थ नाहीं. वसुदेव पुत्र श्रीकृष्णानें अर्जुना करितां आपलें द्रव्य, शरीर, पुत्र, स्त्रिया व यश यांचा दृढ निश्चयानें जसा त्याग केला तसा मी दुर्योधनाकरितां सर्व टाकून क्षत्रियांस गृहांत व्याधीनें मरण न यावें या हेतूस्तव दुर्योधनाचा नित्य आश्रय करून पांडव मी कोपित केले. अवश्य जें होणें त्याचें निवारण करण्यास कोणी समर्थ नाहीं. असें ऐकून भीष्म बोलतो हे कर्णा, जा तूं पांडवां सहवर्तमान युद्ध कर इत्यादि अनेक प्रकारें बोलला. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, असें भीष्म वाक्य ऐकून कर्ण भीष्मास नमस्कारपूर्वक विचारून तुझ्या पुत्राकडे गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

भीष्मपर्व समाप्त.

श्री

# द्रोणपर्व.

१ अध्याय एक.— जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायनऋषे, शिखंडीनें भीष्मास मारलें हें धृतराष्ट्रराजानें ऐकून काय केलें व भीष्माकडून पांडवांचा पराजय करवून राज्याची इच्छा करणारा असा जो धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन याणें पुढें काय केलें? असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीष्म मरेण पावले असें धृतराष्ट्र राजानें श्रवण करून दुःख शोकानें तप्त होऊन तो चिंता समुद्रांत निमग्न झाल्यामुळें त्याचें अंतःकरण अगदीं नष्ट होऊन पुत्राचा विजय व्हावा, अशा इच्छेनें अतिशय विलाप करूं लागला. जसा एकादा रोगी रोगानें व्याप्त होऊन विलाप करितो तसा धृतराष्ट्र विलाप करीत असतां त्याची शांती करण्या करितां शिबिराहून संजय आला हें पाहून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, भीष्म मेले असें ऐकून काळग्रस्त कौरवांनीं काय केलें? व पांडवांस जिंकील असा कौरवांनें त कोण महारथी आहे. असें ऐकून संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, कौरव पांडव भीष्मास पृथक् पृथक् नमस्कार करून बाणाच्या शय्येवर भीष्मास निजवून त्यास सर्वांनीं प्रदक्षिणा केल्यानंतर क्रोधानें आरक्त नेत्र होऊन परस्पर युद्ध करूं लागले. वाद्यांचा गजर व दुंदुभींचे नाद करित तुझे पुत्र युद्धा करितां निघाले असतां तुझ्या पुत्रांच्या मोहानीं व भीष्माच्या वधानीं सर्व कौरव सकल राजां सहवर्तमान मृत्युरूप अग्नीनें हुत झाल्या सारखे दिसूं लागले भीष्ममेले त्याकाळीं अरण्यांतील श्वापदें देखील शोक करूं लागलीं व नक्षत्र रहित आकाश, धान्यावांचून पृथ्वी हीं जशीं विशोभित दिसतात तशी कौरवांची सेना भीष्मावांचून विशोभित झाली. त्या सेनेतील सर्व राजे भयानें त्रास पावून आपले ठिकाणीं स्वस्थ बसले नंतर सर्व शस्त्रास्त्र जाणणाऱ्या योध्यांमध्यें श्रेष्ठ दुसरा भीष्मच काय असा जो कर्ण त्याचें स्मरण करून सर्व कौरव हे कर्णा हे कर्णा, असा आक्रोश करून ह्मणो लागलें कीं, आमचा हितकर्ता जो राधेय त्याका या पाषा आपतकाळीं बंधु जसें सांत्व करितो तसें कर्ण आपल्यास सांत्व

करील, सर्व क्षत्रियांमध्यें भीष्मानें कर्णास अतिरथी असतां अर्धरथी ह्मट लें ह्मणोन कर्णानें अशी प्रतिज्ञा केलीकीं, मी मोठा योद्धा देव दैत्य यांस जिंकण्यास योग्य असतां मला भीष्मानीं अर्धरथी ह्मटलें यापेक्षां भीष्म या सैन्यांत जिवंत असतां मी युद्धच करणार नाहीं जर भीष्मानीं पांडवांस मारलेंतर मी दुर्योधनाची आज्ञा घेऊन वनांतरीं जाईन अथवा पांडवांनीं भीष्मास मारलेंतर मी एकरथा सहवर्तमान पांडवांस जिंकीन असें ह्म- णणारा जो कर्ण त्याचें हे धृतराष्ट्रा, सर्व कौरवांनीं स्मरण करून भाषण केलें कीं, हे कर्णा, मोठे भयापासून गोविंदानीं जसें देवांस तारलें तसें पांडवांपासू न तूं आमचें संरक्षण कर. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र श्वासोच्छ्वास टाकीत पुनः संजयास बोलतो हे संजया, सर्व कौरव कर्णाचें चिंतन करीत अ सतां तो कर्ण माझ्या पुत्राचें साह्य करील कींनाहीं हें मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दोन— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, भीष्म मरण- पावल्यानंतर तुझे पुत्राची सेना दुःखसागरांत निमग्न झाली असें कर्णानें ऐ कून सागरांतून बुडालेली नौका जशी काढितात त्याप्रमाणें कौरव सैन्याचें रक्षण करीन अशी प्रतिज्ञा करून तो दुर्योधनास भाषण करतो राजा, सर्व- शस्त्रास्त्र विद्येमध्यें निपुण, बुद्धिमान, महा पराक्रमी, इंद्रियांचें दमन करणारा सत्य प्रतिज्ञा ज्याची असा जो भीष्म तो मरण पावला. आतां सर्व योद्धे युद्धाम ध्यें असोन सर्व मृत्युप्राय दिसतात आतां सूर्योदय झाल्यावर कोणी तरी- योद्धा युद्ध करण्यास सिद्ध होईल असें मला दिसत नाहीं असें कर्णाचें वाक्य दुर्योधनानें व दुसरे सैनिकानीं श्रवण करतांच ते मोठा आक्रोश करून ने त्रांतून अश्रुपात करूंलागले, हें कर्णानें अवलोकन केलें असतां तो पुनःसु खकारक अशीं वाक्यें बोलूं लागला कीं, भीष्म जरीं मेले तरीं चिंता करूंन- का पांडव जरीं बलाढ्य आहेत तथापि माझ्या पुढें ते उभे राहतील असें नाहीं, एकाक्षणांत पांडवांची सेना व सर्व पांडव यांचा मी सव्हार करून कुरुचें सं रक्षण करून हें सर्वराज्य दुर्योधनास देववितों असें बोलून नाना प्रकारचीं- शस्त्रें व गळ्यामध्यें माळा धारण करून रथास कांहीं श्वेत कांहीं अभ्ररंगा

चे असे अश्व जोडून त्यारथांत आरूढ होऊन दुंदुभीचानाद करीत त्याणें प्रयाण केलें. गावांतील लोक सुवर्णाच्या वाट्यांत दहीं घालून सामोरे आले नंतर कर्णानें सारथ्यास आज्ञा केलीकीं, जेथें धर्मराजा, भीमसेन, अर्जुन अससतील तेथें माझा रथ ने ज्या धर्मराजाच्या सैन्यांत श्रीकृष्ण सात्यकी प्रभृती योद्धे आहेत त्या सैन्याचा पराभव दुसऱ्या योध्याच्यानें कधींही होणार नाहीं याजकरितां त्या सैन्याचा मीच पराभव केला पाहिजे सर्वांचा नाश करणार मृत्यु जरीं अर्जुनाचें संरक्षण करण्यास समरा मध्यें आला तरी मी अर्जुनास मारीन अथवा भीष्माचे मार्गास अनुसरेन सर्वकौरवांचे योद्धे जरीं मला साह्य झाले नाहींत तरीं चिंतानाहीं परंतु मी एकटाच रणामध्यें उभा राहून सर्वांचा पराभव करीन असें ह्मणोन कर्ण रथामध्यें बसून ज्या कालीं निघाला त्याकालीं देवांसह वर्तमान इंद्र जसा शोभतो तसा शोभला. असाविषय या अध्यायांत आहे

३ अध्याय तीन:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, अशा प्रकारानें कर्ण निघाला तो जेथें भीष्मनिजले होते तेथें जाऊन भाषण करतोकीं हे महाराज, मी कर्ण आलों मज कडे पाहा युद्धामध्यें पांडव कौरवांचा आज कुलक्षय करणार, इंद्राच्या वज्रें करून जसे दैत्य पराभव पावले तसे अर्जुनाच्या बाणानीं सर्व कौरव पराभव पावतील. ज्याच्या ध्वज स्तंभी स्थित जो मारुती त्याच्या भुभुःकारानें सर्वांचे कान बधीर झाले असा जो अर्जुन त्याशीं युद्ध करण्यास महाराज आपल्या खेरीज कोणी नाहीं आपण तर शराचे शय्येवर निजलां तस्मात् त्या अर्जुनास आजमी संग्रामामध्यें मारण्यास इच्छितो ती माझी इच्छा पूर्ण व्हावी असा मला आशीर्वाद द्यावा. असा विषय या अध्यायांत आहे.

४ अध्याय चार:— याप्रकारें कर्णानीं प्रश्न केला असतां कालदेश वर्तमान पाहून भीष्म भाषण करितात हे कर्णा, सर्व नद्यांचें रक्षण करणारा जसा समुद्र तसा तूं कौरव सैन्याचा रक्षणार हो तुझे बांधव तुझ्या पराक्रमें करून जिवंत असोत. जसा दुर्योधन आपले ज्ञाती विषयीं अभिमानी आहे तसा तूं कौरवांचा अभिमानी होऊन शत्रूंचा

पराभव कर. हाच मी तुला आशीर्वाद देतों जसा दुर्योधन तसाच तूं आ ह्मांस पौत्रासमान आहेस. असें ऐकून दुर्योधन प्रमुख जेथें होते ते थें कर्ण आला हें दुर्योधन प्रमुख कौरवांनीं पाहून सिंहासारखा नाद व धनुष्याचे टणत्कार करून कर्णाचा मोठा सत्कार केला. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय पांच:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, कर्ण रथारूढ हो ऊन आलेला दुर्योधनानें अवलोकन करून कर्ण रथस्थ असतां त्यास बो लतो हे कर्णा, भीष्म मेल्या पासून माझें सैन्य अनाथा सारखें होतें परंतु आ ज सनाथ झालें आतां पुढें जें कर्तव्य असेल त्याचा विचार करावा. असें ऐ कून कर्ण बोलतो हे दुर्योधना, तुझी आज्ञा सर्व मान्य करिनील परंतु कार्या कार विचार जसे द्रोणाचार्य जाणतात नसे या सैन्यामध्यें कोणी जाणतना हींत. असें ऐकून दुर्योधन ह्मणतो हे कर्णा, भीष्मानें दाहा दिवस सेनेचें रक्ष ण करून सहस्त्रावधी रथी मारिले तो भीष्म आज शरपंजरीं पडल्या पा- सून माझी सेना दोन घटकाही उभी राहाण्यास समर्थ नाहीं. सारथी नस ल्यामुळें रथ जसा चालत नाहीं तशी माझी सेना सेनापती नसल्यामुळें उभी रहात नाहीं याज करितां हे कर्णा, तूं ज्यास करण्यास सांगशील त्यास सेना पती करूं असें ऐकून कर्ण ह्मणतो हे दुर्योधना, तूं ह्मणतोस हें खरें सेनाप ती कोणी तरीं पाहिजे; परंतु एक द्रोणाचार्या खेरीज कोणी आपले सैन्यांत दिसत नाहीं याज करितां त्यास सेनापती करावा हें योग्य. असा विषय या अध्यायांत आहे.

६ अध्याय सहा:- संजय ह्मणतो हे राजा, असें ऐकून दुर्योधन भाषण करतो हे आचार्य, आपण आमच्या सेने मध्यें श्रेष्ठ आहां अक्रा अक्षौहिणी सेने सहवर्तमान शत्रूचा पराभव करून बंधूं सहवर्तमान धर्मराजा यास युद्धामध्यें जिंकण्यास तुह्मीं कधीं शंका पावणार नाहीं. असें ऐकून आचार्य ह्मणतात हे दुर्योधना, तुझी अशी इच्छा आहे तर तूं शत्रूचा पराभव करण्यास समर्थ होशील नंतर सैनिकां सहवर्तमान कौ रवांनीं सिंहनाद केले. असा विषय या अध्यायांत आहे.

७ अध्याय सात:- आचार्य ह्मणतात हे दुर्योधना, तुझे आज्ञेनें मी पांडवांशीं युद्ध करितों परंतु ईश्वरानें धृष्टद्युम्नास माझ्या वधा करितां उत्पन्न केला आहे ह्मणोनमीयास संग्रामा मध्यें मारणार नाहीं याशिवाय सर्व सोमक यां सहवर्तमान पांडवां शीं युद्ध करीन असें ऐकून जसें पूर्वी इंद्र प्रमुख देवानीं कार्तिक स्वामीस सेनापत्याचा अभिषेक केला तसा दुर्योधन प्रमुख कौरवांनीं द्रोणाचार्यास अभिषेक केला, त्या कालीं वाद्यांचे गजर होऊं लागले. द्रोणाचार्यास सेनापत्याचा अभिषेक झाल्याबर आचार्य सैन्याचा व्यूह करून युद्धास सिद्ध झाले त्या व्यूहाच्या दक्षिण भागीं जयद्रथ, कलिंग, विकर्ण, दुर्योधन त्यांच्या पाठी मागें शकुनी, सव्यभागीं कृपाचार्य, कृतवर्मा, चित्रसेन, विविंशति, दुःशासन त्यांच्या पाठीमागें कांबोज देशाचे राजे यवन, मद्रदेशाचे राजे त्रिगर्त, अंबष्ट, प्रतीच्य, उदीच्य, मालव, शिबि, शूरसेन, सौवीर, प्राच्य, कितव, दाक्षणात्य याप्रमाणें उभे राहिले, नंतर कांहीं सैन्य व कांहीं यास्त्रे घेऊन अर्जुनाशीं युद्ध करण्या करितां कर्ण आला. त्या कर्णाचा केतु सूर्याचे तेजा सारखा त्याचें तेज सर्व सैन्यावर पडून सर्वांचे डोळे दिपून गेले. कौरवांचे सैनिक एकमेकांस बोलतात या कर्णापुढें पांडवांचा टिकाव लागणार नाहीं कर्णास पाहून भीष्म गेल्या विषयीं कोणास दुःख झालें नाहीं असें ह्मणोन त्याजबरोबर युद्धा करितां सर्व निघाले. इकडे धर्म राजानीं सांगितल्या प्रमाणें पांडवांनीं क्रौंचव्यूह करून त्या व्यूहाच्या अग्रभागीं कृष्ण धनंजय उभे राहिले. योध्यांमध्यें अर्जुन, धनुष्यांमध्यें गांडीव, भूतांमध्यें वासुदेव, चक्रांमध्यें सुदर्शनचक्र श्रेष्ठ हीं त्यारीतेजें एकत्र मिळाल्यानंतर त्याचें वर्णन काय करावयाचें, असो पांडवांच्या सेनेंत मुख्य धनंजय, कौरवांच्या सेनेंत मुख्य कर्ण हे उभेराहून एकमेकांस पाहूं लागले तों सैन्य व रथ यां सहवर्तमान द्रोणाचार्य आले त्यांच्या रथघोषें करून जी धूळ निघाली तिणें अंधःकार केला. त्याकालीं आकाशा पासून यास व रुधिर पडूं लागलें, सूर्यास खळें पडलें, मेघ विद्युल्लते सह वर्तमान मोठे शब्द करूं लागले व आणखी दुसरेही उत्पात होऊं लागले नंतर उभयतांचा युद्धास आरंभ झाला.

अर्जुनानें हजारों बाण कर्णावर टाकिले, कर्णानें त्याजवर टाकिले व नानाप्रकारचीं अस्त्रेंही एकमेकांवर त्यांनीं टाकिलीं. असें युद्ध होत असतां कर्णानें एकक्षणांत पांडवसेनेस दुःखित केलें हें पाहून धृष्टद्युम्नानें शरवर्षावानें द्रोणसैन्याचा पराभव केला द्रोणानीं शत बाण धृष्टद्युम्नास मारले धृष्टद्युम्नानें द्रोणावर बाणवृष्टि केली असें उभयतांनें युद्ध झालें इतक्यांत अर्जुनानें ही कर्णावर बाणांचा वर्षाव केला, कर्णानें अर्जुनावर केला असें कौरव पांडवांनें आवर्तांत चक्रासारखें युद्ध होत असतां कर्णानें मायेचें गंधर्वनगरासारखें नगर करून त्यामध्यें रथारूढ होऊन पांडवांचा पराजय केला. असा विषय या अध्यायांत आहे.

८ अध्याय आठ— संजय ह्मणतात हे राजा, द्रोणाचार्यानें रथ गज, अश्व इत्यादिकांना बहुत नाश केला हें पाहून पांडव दुःखित झाले-तेव्हां धर्मराज, धृष्टद्युम्न व अर्जुन यांस बोलतो आचार्यांनीं आपल्या सैन्यास बहुत पीडा दिली याजकरितां सर्वांनीं त्याचें निवारण करावें. असें ऐकून अर्जुन, धृष्टद्युम्न केकेय, भीमसेन, घटोत्कच, नकूल, सहदेव, सात्यकी इत्यादि योद्धे धर्मराजास पुढें करून युद्धास निघाले हें पाहून द्रोणाचार्य-पांडवांच्या सेनेचा नाश करावा या बुद्धीनें धांवले त्याकाली द्रोण जरी वृद्ध होते तथापि तरुणासारखे दिसूं लागले. वेगवान अश्वानीं युक्त जो रथ त्यांत यमासारखे आचार्य बसलेले पांडवांच्या योध्यांनीं पाहून ते पळूं लागले, तेव्हां मोठा शब्द झाला. नंतर द्रोणाचार्यांनीं आपलें नांव विख्यात केलें व भीमावर बाणाची वृष्टी करून अनेक योध्यांचीं शिरें तोडलीं त्याच्या रथ व धनुष्य टणत्कारें करून सीत कालीं जशा गाई कांपतात तशी पृथ्वी कंपायमान झाली. अश्व, गज, पदाती यांच्या प्रेतांचे ढीग पडले असा द्रोणाचार्यांनीं धृष्टद्युम्न, द्रुपद, काशिराज व इतर पांडवांकडील योद्धे यांस अलौकीक पराक्रम दाखवून शेवटीं ते मृत्युग्रस्त होऊन सूर्य जसा अस्तास जातो तसे एका एकीं धृष्टद्युम्नाच्या बाणें करून स्वर्गास गेले हें पाहून पांडवांनीं सैन्यामध्यें दुंदुभी व वाद्यांचे गजर केले. कौरवांचे सैनिक व द्रोणाचे बांधव आह्मांस धिःकार असो असें ह्मणोन मोठा आक्रोश करूं लागले. अ. वि. अ. आहे.

९ अध्याय नउ— धृतराष्ट्र संजयास बोलतो हे संजया, सर्व शस्त्रास्त्रां मध्यें निपुण जो द्रोणाचार्य यास धृष्टद्युम्नानें कसें मारिलें सर्व पराक्रम व विद्या हीं सर्व व्यर्थ आहेत दैवच प्राधान्य. मी असें मानीत होतोंकीं. द्रोणाचार्यास कोणीही मारणारा नाहीं परंतु दैवाची गती! ज्याची बुद्धी बृहस्पती सारखी,नीती ज्याची शुक्रासारखी असा जो द्रोण तो मरण पावला काय! द्रोण मेल्यानंतर लाल रंगाचे घोड्यांची काय अवस्था झाली? पहा ज्या द्रोणाच्यार्या पाशीं धनुर्धर विद्येचा अभ्यास करून सर्व योद्धे युद्धामध्यें निपुण झाले त्यालाच आज धृष्टद्युम्नानें मारिलें! त्या कालीं कौरवांचे योध्यानीं धृष्टद्युम्नाचें निवारण केलें नाहीं कीं काय! कौरवांचे योद्धे युद्धामध्यें द्रोणाचार्या जवळ कोण होते. गंगेमध्यें जितके वाळवंचे कण तितक्या ज्याणें ब्राह्मणांस गाई दान केल्या असा जो उशीनर राजाचा नातु शैब्य त्याचा कोणी पराभव केला व कोण कोण योद्धे मरण पावले? असा विषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दहा— वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, धृतराष्ट्रानीं पूर्वी संजयास प्रश्न करून आपल्या पुत्राच्या जया विषयीं निराश होऊन तो अकस्मात् पृथ्वीवर पडला नंतर सावध होऊन पुनः ह्मणतो हे संजया, युद्धामध्यें द्रोणाचार्यानें पांडवांचे सेनेस कसें मारिलें व माझे पुत्र दुर्योधनादिक अर्जुनाचे अग्रभागीं कसे उभे राहिले? श्रीकृष्ण सारथी व पार्थ हे दोघे जेथें असतील त्यास कधीही पराजयाचा मार्ग दिसणार नाहीं सर्पासारखे पांडव क्रुद्ध झाले असतां त्यांच्या समोर इंद्रही युद्धास टिकणार नाहीं सत्यशील धैर्यवान जो धर्मराज त्याणें द्रोणास मारण्यास कशी मसलत दिली, अभिमन्यूचा प्राण कोणी घेतला? धृष्टद्युम्न, वार्धक्षमी इत्यादिक कैकेयाचे पांच बंधु यांस पराजित केलें त्यांचीनांवे सांग. पांडवांच्या आई त्याभगिनीचा पुत्र जयार्थी त्यास कोणी पराजित केलें, घटोत्कचाचें कोणी निवारण केलें, माझ्या पुत्राच्या हिताकरितां आलेले जे योद्धे त्यांची अवस्था काय झाली? श्रीकृष्ण जो भगवान पांडवांचा हितार्थी त्याच्या पराक्रमाचें वर्णन संजया तुला सांगतो. अ.वि.अ. आहे.

११ अध्याय अकरा— धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, श्रीकृष्ण गोकुळा मध्यें बाळक्रीडा करीत असतां त्यानें शकटा कृति दैत्य व पूतना नामक राक्षसी यांचा वध केला, यमलार्जुन नामक कुबेराच्या पुत्राचा वृक्षत्वा पासून उद्धार केला व धेनुकनामक दैत्याचा ताल वनामध्यें वध केला. बैलाचें रूप धारण करणारा वृषासूर, प्रलंबासुर, नरकासुर, कंस एक अक्षौहिणी सेने सहवर्तमान कंसाचे भाऊ सुनामा यांचा त्यांच्यासेनेसह कृष्णानें वध केला. दूर्वास नामक ब्राह्मणाची कुटुंबासहित सेवा करून वरदान ग्रहण केलें, जरासंदाचा भीमसेना कडून प्राण घात केला, शिशुपालाचा पशूसाररवा प्राण घेतला, सौभनामक दैत्याचा समुद्रा मध्यें नाश केला तसेच अंग, कलिंग, वंग, मागध, वात्स्य, गार्ग्य, करुष, पौंड्र, अवंत्य, दाक्षणात्य, इत्यादि देशांचे राजांचा वासुदेवानें आपल्या वीर्यें करून पराभव केला. समुद्रा मध्यें प्रवेश केल्यावर वरुणाशीं युद्ध करून त्यास जिंकिला. पातालांत राहाणारे पंचजन्यास जिंकून पांचजन्य शंरवरवेतला तो अद्यापि भगवंताच्या हस्तांत आहे खांडव वनामध्यें अर्जुना सह अग्नीचा संतोष केला, गरुडावर आरोहण करून अमरावती पासून पारिजात नामक वृक्ष आणिला असा श्रीकृष्ण व अर्जुन हे जिकडे आहेत तिकडेच निश्चयें करून विजय आहे कृष्णार्जुन हे सर्व कौरवांचा संहार करून कुंतीस पृथ्वी दान करतील. संजया श्रीकृष्ण व अर्जुन यांचा आत्मा एकच आहे शरीरें मात्र वेगवेगळीं दिसतात जे भीष्म द्रोण सर्व शस्त्रास्त्रां मध्यें निपुण, कीर्तिमान युद्धामध्यें शत्रूस अजिंक्य यांस पाहून यमही भीती पावतो त्यांस युद्धामध्यें मरण यावें किं काय? तस्मात् कालरूपी जो भगवान् याणें द्रोणाचार्यास ग्रासिलें. हे संजया द्रोणाचार्य यांचें मरण कोणत्या प्रकारें जाहालें हें सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारा— संजय भाषण करतो हे राजा धृतराष्ट्र, द्रोणाचार्य पांडवां पासून कसे मरण पावले हें प्रत्यक्ष मी पाहिलेलें सांगतो. द्रोणाचार्यास सेनापत्याभिषेक केल्यानंतर आचार्य बोलले हे दुर्योधना, भीष्म मेल्यानंतर तूं मला सेनापत्याभिषेक केलास जसें भीष्मानीं तुझें हित के-

लें नसें मी हिन करितों आतां जें काय पुढें करणें असेल तें मला सांग. असें-ऐकून दुर्योधन भाषण करितो हे आचार्य, धर्मराजास जिवंत धरून माझे स्वाधीन करावें हाच वर मागतों. असें ऐकून आचार्य सर्वसैन्यास हर्ष करीत बोलले हे दुर्योधना, जर तुला राज्य मिळविण्याची इच्छा आहे तर सर्व पांडवांस युद्धामध्यें जिंक ह्मणजे सहजच राज्य प्राप्त होईल ती इच्छा टाकून धर्मराजास जिवंतधरण्याची इच्छा धरलीस याचें कारण काय? असें ऐकून दुर्योधन भाषण करतो हे आचार्य, जर धर्मराजाचा आह्मीं वध केलातर हा अर्जुन आमच्या सर्वकुळाचा क्षय करून टाकील व या पांडवांतून एकही जरी राहिला तरीं आमचा कुळक्षय करील. यांजपुढें देवदेखील युद्धकरण्यास समर्थनाहीं ह्मणून सत्य प्रतिज्ञ जो धर्मराज यास धरावा आणि पुनः द्यूत क्रीडा करून त्यास जिंकावा आणिपुनः अरण्यामध्यें वनवासास भ्रात्यांसहित पाठवावा ह्मणजे आमचा जय होऊन चिरकालराज्य आह्मीं करूं.हा कुटिल अभिप्राय जाणोन द्रोणही कृत्रिमानें वरदेण्यास प्रवृत्त होऊन ह्मणतात हे दुर्योधना, अर्जुन धर्मराजाचें संरक्षण करण्या करितां जवळ नसेल असा समय पाहून मीत्यास तुझे स्वाधीन करीन कारण पार्थ धर्मराजाचें संरक्षण करण्या करितां आलातर धर्मराज कधींही सांपडणार नाहीं याज करितां तो यासैन्यांत नाहीं असा उपाय कर ह्मणजे मी धरून तुझे स्वाधीन करीन असें ऐकून तुझे पुत्र जयघोष करूंलागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१३ अध्याय तेरा.— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, धर्मराजास धरण्याची आचार्यांनीं प्रतिज्ञाकेली हें सैनिकांनीं ऐकून मोठा वाद्यांचा-घोष केला हें वर्तमान दूतांनीं येऊन धर्मराजास सांगितलें असतां धर्मराज आपल्या बंधूस बोलावुन भाषण करतो हे अर्जुना. द्रोणाचार्यांनीं दुर्योधनाजवळ अशी प्रतिज्ञा केली आहे कीं. अर्जुन ज्याकाळीं सैन्यांत नसेल त्याकाळीं मी धर्मराजास धरून तुझ्या स्वाधीन करीन, तेव्हां ती प्रतिज्ञा सिद्धिस न जाण्याविषयीं कांहीं उपाय केला पाहिजे. असें ऐकून अर्जुन भाषण करतो हे धर्मराज, जशी मी द्रोणास मारणार नाहीं ह्मणोन प्रतिज्ञा केली त

शी तुझा परित्याग कधीं करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करतों मी जिवंत अ-
सतां तुला धरण्या विषयीं कोणी ही समर्थ नाहीं. अशी प्रतिज्ञा करून अर्जु-
नानें अकस्मात सैन्यामध्यें शंख, भेरी, मृदंग इत्यादिकांचा शब्द केला तो ऐ-
कून कौरवांच्या सैनिकांनीं ही तसाच शब्द केला नंतर कौरव पांडव यांनें सै-
न्य समोरा समोर उभें राहून युद्धास आरंभ झाला. प्रथम द्रोणाचार्य व पां-
चाल यांनें परस्पर युद्ध होऊं लागलें असतां आचार्यांच्या बाणवेगांनीं सर्व-
पांडवांचे योद्धे त्रस्त होऊन दाही दिशेस पळाले. कोणी ही योद्धा बाण टाकण्या-
स समर्थ राहिला नाहीं. आचार्यांनीं पांडवांच्या सैन्यास मूर्च्छित करून ती-
क्ष्ण बाणानीं धृष्टद्युम्नानें सैन्य मारून दाही दिशा व आकाश बाण समुदाया-
नें व्यास केल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चवदा.— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा. द्रोणाचा-
र्य सुवर्णाच्या रथांत आरूढ होऊन पांडवांच्या सैन्यास भोंवता आलात
चक्रा सारखा रथ फिरवूं लागला असतां पांडवां कडील रथी, अश्व, गज, पा-
यदळ हे पळूं लागले योध्यांच्या हातांतून शस्त्रास्त्रें गळून गेलीं. असा य-
मा सारिखा जो द्रोणाचार्य त्याणें एक घटकेंत रक्ताची नदी उत्पन्न केली.
त्या नदीमध्यें मांस खाण्यास वायस आदीकरून पक्षी बसले. संग्रामामध्यें
मरण पावलेले वीर व हत्ती हें तीर, मांस हाच कोणी चिखल, अस्थि हीच वा-
ळू, वीरांचीं पागोटीं हाच कोणी फेन, ढाल तरवारी त्या मत्स्य कच्छा सार-
ख्या, रथ्यांचीं छत्रें हंसा सारखीं व केश जीमध्यें शेवाळा सारखे शोभूं
लागले. अशी भयंकर नदी हजारों रथी मारून उत्पन्न केली त्या काळीं
लोकांस मोठें भय उत्पन्न झालें. असें कौरव पांडवांचें युद्ध होत असतां
मायावी जो शकुनी हा एका एकीं सहदेवावर धांवला तेव्हां सहदेवानें आ-
पल्या शरानें शकुनीचा सारथी व घोडे मारिले व धनुष्य तोडलें नंतर शकु-
नीनें हातांत गदा घेऊन सहदेवास गदेचा प्रहार केला. नंतर दोघेही वि-
रथी होऊन हातांत गदा घेऊन मोठें युद्ध करूं लागले. द्रोणाचार्यांनें धृ-
ष्टद्युम्नावर दाहा बाण टाकिले धृष्टद्युम्नानें हीं हजारों बाण द्रोणावर टा-
किले. भीमसेनानें विविंशतीवर वीस बाण टाकिले असतां विविंशतीनें भीमा

वर बाणवृष्टी केली नंतर भीमानें हातांत गदा घेऊन विविंशतीचे घोडे मारून त्यास रथाखालीं पाडला नंतर विविंशति हातांत ढाल तरवार घेऊन भीमावर धांवला. शल्यानें आपल्या भगिनीचा पुत्र जो नकुल याजवर बाण टाकिले नकुळानें त्या बाणांचें निवारण करून शल्याचें छत्र व धनुष्य तोडून घोडे मारून मोठ्यानें शंखाचा नाद केला. धृष्टकेतूनें कृपाचार्यावर बाणांची वृष्टी करून ध्वज तोडला असतां कृपाचार्यांनीं हजारों बाणांची वृष्टी करून धृष्टकेतूस आच्छादित केला. नंतर सात्यकी व कृतवर्मा यांचें युद्ध झालें. धृष्टद्युम्नानें सुशर्म्यावर बाणांची वृष्टी केली. सुशर्म्यानें तोमरास्त्र करून त्याजवर प्रहार केला विराट राजानें आपल्या पराक्रमानें कर्णावर वृष्टी केली त्यानें त्याचें निवारण केलें. द्रुपद राजा सैन्यासहवर्तमान भगदत्ताशीं युद्ध करूं लागला सोमदत्तीनें शिखंडीवर बाणांची वृष्टी केली शिखंडीनें ही त्याजवर केली भूरिश्रव्यानें धृष्टद्युम्नास बाणवृष्टीनें आच्छादन करून टाकिला. पुनः शिखंडीनें सोमदत्तीवर बाण टाकिले त्यामुळें सोमदत्ती पळून गेला घटोत्कच आणि अलंबुष राक्षस यांचें परस्पर युद्ध होत असतां माया धारण करावया. जसें पूर्वयुगीं हिरण्याक्ष आणि विष्णूचें युद्ध झालें त्या प्रमाणें लक्ष्मण व क्षत्रदेव युद्ध करूं लागले. पौरवानें अभिमन्यूवर हजारों बाणांची वृष्टी केली तेव्हां अभिमन्यूनें पौरवाचा ध्वज व धनुष्य, छत्र तोडून घोडे व सारथी मारून पौरवास जमीनीवर पाडला हें पांडवांच्या सैनिकानीं पाहून ते सिंहनाद करूं लागले, अभिमन्यूनें पुनः पौरवाच्या हृदयावर दोन बाणांचा प्रहार करून त्याचा सारथी मारला आणि सिंह जसा बैलास पाडतो तसा पौरवास पाडला हें पाहून जयद्रथास मोठा कोप येऊन तो अभिमन्यूवर धांवला हें पाहून अभिमन्यूनें श्येनपक्षी जसा इतर पक्ष्यावर उडी टाकितो त्याप्रमाणें उड्डाण करून जयद्रथाची तरवार मोडली. जयद्रथ दुसरी तरवार घेऊन अभिमन्यूवर धांवला नंतर उभयतांनें युद्ध होत असतां कांहीं वेळानें जयद्रथ लांब जाऊन दुसरे राजे बरोबर घेऊन युद्ध करूं लागला. अभिमन्यूनें कौरवांच्या सैन्यास मोठा संताप उत्पन्न केला असें पाहून शल्यानें लोहमय शक्ती घेऊन अभिमन्यूवर टाकि-

ली असतां अभिमन्यूनें त्या शक्तीचीं शकलें केलीं, आणि आपण दुसरी शक्ती घेऊन शल्यावर टाकिली असतां त्या शक्तीनें त्यानें शल्याचा सारथी व शल्य यांस भूमीवर पाडलें हें पाहून पांडवांचे योद्धे विराट, द्रुपद, धृष्टकेतु, धर्मराज, सात्यकी, केकेय, भीम, धृष्टद्युम्न, शिखंडी, नकुल, सहदेव यांणीं वाहावा ह्मणोन शब्द केला नंतर कांहीं वेळानें सर्व कौरवांचे योद्धे एकत्र मिळून अभिमन्यूवर गेले. असा वि॰ या अ॰ आहे.

१५ अध्याय पंधरा:- धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, तुझ्या मुखापासून योध्यांचीं द्वंद्व युद्धें बहुत श्रवण केलीं तेणें करून मी तृप्त झालों नाहीं यास्तव ज्या युद्धाचें ऐकण्यानें लोक बहुत संतुष्ट होतात असें जें कौरव पांडवांचें युद्ध त्यामध्यें अभिमन्यूचें व कोणाचें युद्ध झालें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, शल्य लोखंडाची गदा घेऊन रथाखालीं उतरला इतक्यांत भीमा एक मोठी गदा घेऊन शल्यावर धांवला, अभिमन्यु गदा घेऊन शल्यास युद्ध कर. असें ह्मणोन त्याजवर धांवला असतां शल्यही अभिमन्यूवर धांवला त्याकालीं भीमसेन त्याचें निवारण करून आपण पुढें झाला भीमसेन गदा घेऊन मंडळाकार फिरवून शल्यावर टाकणार तों शल्य गदा घेऊन भीमावर धांवला उभयतां एकमेकांवर गदेचे प्रहार करीत असतां त्या प्रहारानीं उभयतांच्या अंगांतून रक्तें निघालीं व दोघांच्या क्रोधापासून जो अग्नि निघाला तो सर्वसैन्यास त्रास देऊं लागला. असें घोर युद्ध होत असतां दोघेही पृथ्वीवर पडले तेव्हां कृतवर्म्यानें शल्यास रथांत घालून नेलें कांहीं वेळानें भीमसेनही सावध होऊन आपल्या सैन्यांत गेला. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, कृतवर्म्यानें शल्यास रथांत घालून नेलें हें पाहून तुझे पुत्र व सैनिक दाही दिशेस पळूं लागले पांडवांनीं कौरवांचा पराभव केला त्याकालीं पांडवांचे योद्धे शंखाचे नाद करून दुंदुभी, मृदंग इत्यादि वाद्यें वाजवूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळा:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, पांडवांच्या सेनेचा जय झाला असें पाहून अरुण मायावी जो वृषसेन याणें दाही दि-

शोस बाण टाकिले तेणें करून गज अश्व हे भयाभीत होऊन पळूं लागले असा जो वृषसेन ज्यास भीतीच नाहीं तो पांडवांच्या सैन्यावर शरांचा वर्षाव करीत असतां नकुलाचा पुत्र शतानिक याणे दाहा बाणे करून वृषसेनाच्या कवचाचा भेद केला वृषसेनानें शतानिकाचा ध्वज तोडून हजारों बाणानीं त्या सवेष्टित केलें त्या काळीं इतर द्रौपदीच्या पुत्रानीं आपल्या भ्रात्यांच्या समीप भागीं जाऊन कर्णपुत्रास बाण समुदायानीं अदृश्य केला हें अश्वत्थाम्यादिकरथी यानीं पाहून द्रौपदेयावर हजारों बाण टाकिले हें पाहून पांडवांचे योद्धे पांच्याल, केकेय, मत्स्य हे अश्वत्थाम्यावर बाण वृष्टी करूं लागले असें परस्पर युद्ध होत असतां भीम, कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा सात्यकी हे आपले सैन्यामध्यें सूर्या सारखे दिसूं लागले. धर्मराजानें दोन घटिकेंत सर्व कौरवांचें सैन्य जिंकिलें असें पाहून द्रोणाच्यार्य सर्व योध्यांस बोलले हे शूर हो किंचित् उभे राहा मी त्या पांडवांच्या सैन्याचा समाचार घेतों असें ह्मणोंन युधिष्ठिरावर बाणाचा वर्षाव करूं लागला. युधिष्ठिर त्या बाणाचें निवारण करून आपणही वृष्टी करूं लागला हें पाहून द्रोणानीं युधिष्ठिराच्या धनुष्याचा भंग केला, धृष्टद्युम्नानें द्रोण आपल्या कडे आला असें पाहून हजारों बाणांचा वर्षाव केला तेव्हां आचार्यांनीं धृष्टद्युम्नाचा पराभव करून शिखंडी, उत्तमोजा, नकुल, सहदेव, धर्मराज, धृष्टद्युम्न, सात्यकी व विराट यांवर बाणांचा प्रहार केला नंतर ते युधिष्ठिरास धरण्या करितां रथा जवळ आले तेव्हां युगंधर राजानें त्यांचें निवारण केलें नंतर आचार्यांनीं युधिष्ठिरास बाणांनीं आच्छादित करून युगंधरास रथाखालीं पाडला असतां विराट, द्रुपद, सात्यकी, केकेय, शिबि, पांच्याल याणीं युधिष्ठिराचें रक्षण केलें इतक्यांत सिंहसेन पन्नास बाणांचा आचार्यांवर प्रहार करून त्यांची थट्टा करूं लागला तेव्हां आचार्यांनीं त्याचें मस्तक तोडिलें हें पाहून सैनिक युधिष्ठिराजवळ येऊन उभे राहिले इतक्यांत कौरवांच्या सैन्यांत युधिष्ठिरास धरला असा शब्द उत्पन्न होऊन परस्पर सर्व लोक बोलूं लागले कीं, धृतराष्ट्र राजा आज कृतार्थ होईल तों अर्जुनानें येऊन आचार्यांचें निवारण केलें-आणि कौरवांचे मोठे मोठे योद्धे, अश्व, गज, पदाती इत्यादिक मारिले. दि-

शा व आकाश पृथ्वी बाणांच्या अंधःकारानें दिसेनाशी केली. कौरवांच्या सैन्यानीं अस्तमान झाला कीं काय असें जाणोन युद्धाविषयीं तोंडें माघारीं फिरविलीं नंतर पार्थही आपली सर्व सेना एकत्र मिळवून उभा राहिला या प्रकारें अर्जुनानें शत्रू जिंकिल्यावर सायंकाळीं पांडवांची सेना आप आपल्या शिबिरांत गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सत्रा— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, दुसरे दिवशीं कौरव पांडवांची युद्धाची तयारी झाली असतां आचार्य बोलतात हे दुर्योधना, मी पूर्वींच तुला सांगितलें होतें कीं, अर्जुन सैन्यांत असतां धर्मराजास धरणें दुर्घट आहे आतां असा उद्योग करकीं, अर्जुन दुसरे कडे युद्धास गुंतून सैन्यांत एकटाच धर्मराज राहील असें झाल्यावर धर्मास मी जिवंत धरीन. असें ऐकून त्रिगर्तांचा राजा सुशर्मा आपल्या भ्रात्यांस बोलतो, अर्जुनानें आह्मांस अपराधा वांचून बहुत वेळा दुःख दिल्या मुळें आमचे मनांत होतें कीं, कधींतरीं आपण यास कोणतेंही प्रकारानें दुःख द्यावें. तो समय आज प्राप्त झाला जें तुह्मांस इष्ट तें आह्मांस ही इष्ट आहे यास्तव आह्मीं अशी प्रतिज्ञा करितों कीं, अर्जुनास या रण भूमीच्या बाहेर नेऊन युद्धामध्यें मारितों तसें न घडल्यास त्रिगर्त नाहीं अशी पृथ्वी होईल या प्रकारें प्रतिज्ञा करून सत्यरथ, सत्यवर्मा, सत्यव्रत, सत्येषु, सत्य कर्मा हे पांच बंधु दाहा हजार रथांसहवर्तमान युद्ध भूमीच्या एका बाजूस गेले तसेंच मालव, तुंडिकेर हे तीस हजार रथांसह वर्तमान व ललित्थ व मद्र देशचे राजे हे आपल्या सैन्याशीं सहवर्तमान त्रिगर्तास मिळून परस्पर एकमोठा अग्नी पेटवून बोलले कीं, आज पार्थास युद्धामध्यें जर न मारूं तर अनृत भाषण करणाऱ्या लोकांस जी गती, ब्रह्मघात करणारास जी गती प्राप्त होते ती आह्मांस प्राप्त होवो. असें परस्पर भाषण करून ते अर्जुनास दक्षिण दिशेकडे युद्धा करितां आव्हान करूं लागले तेव्हां पार्थ बोलतो हे धर्मराज, बंधुं सहवर्तमान सुशर्मा मला युद्धा करितां आव्हान करितो व इकडे सम समक ही हांक मारितात याजकरितां मध्यम बंधू सह वर्तमान सुशर्मी याचा वध करून सम समकांकडे जाईन असें, ऐकून धर्म भाषण करि-

तो हे अर्जुना, द्रोणाची प्रतिज्ञा जेणें करून शेवटास न जाईल त्या प्रमाणें करावें. असें ऐकून अर्जुन भाषण करितो हे धर्मराज, तूं किमपीही भीती धरूं नको. धृष्टद्युम्न तुझें युद्धामध्यें संरक्षण करील. कदाचित् धृष्टद्युम्न मेला असतां युद्धामध्यें एक ठिकाणीं मात्र उभा राहूं नको. असें धर्मराजास सांगून नंतर अर्जुन मोठ्या उत्साहानें त्रिगर्ता कडे युद्धास गेला हें पाहून धर्मराजास धरण्या करितां दुर्योधन निघाला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरा.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, समसमक आपले युद्ध भूमीवर सैन्यासह वर्तमान मोठ्या हर्षानें उभे असतां अर्जुन आपल्या कडे युद्धा करितां आला असें पाहून त्यानीं मोठा भयंकर शब्द करून दाही दिशा व्याप्त केल्या तें पाहून अर्जुन भाषण करतो हे कृष्णा, पाहा बरें आज त्रिगर्तांचा नाशाचा काल आला असेल अथवा हर्षाचा ही काल प्राप्त झाला असेल आज यास युद्धामध्यें मारून यमलोकास पाठवितों असें बोलून हातांत देवदत्त शंख सुवर्णानें मढविलेला घेऊन अर्जुनानें मोठा नाद केला त्या नादानें त्रिगर्तांची सेना निचेष्ट पडली. नंतर कांहीं वेळानें त्रिगर्तांची सेना सावध होऊन अर्जुनावर बाणांची वृष्टी करूं लागली.- अर्जुनानें ते बाण आले नाहींत इतक्यांत पंधरा बाणें करून त्याच्या बाणांचें निवारण केलें पुनः त्याणी दहा दहा बाण टाकिले. अर्जुनानें त्या बाणांचे तीन तीन बाणें करून छेद केले असें उभयतांचें युद्ध होत असतां सुबाहूनें बहुत बाण अर्जुनाच्या मुगुटावर टाकिले त्या बाणें करून अर्जुनाचा मुगुट सूर्यासारखा तेजस्वी दिसों लागला अर्जुनानें सुबाहूचे बाण आपल्या बाणानीं तोडून हजारों बाणांची वृष्टी केली. सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु याणीं पुनः अर्जुनावर बाणांची वृष्टी केली त्या सर्व बाणांचा अर्जुनानें छेद करून सर्वांचे ध्वज तोडले आणि सुबाहुनें धनुष्य तोडून घोडे मारिले व त्याचें मस्तक तोडून पृथ्वीवर पाडलें असें पाहून सर्व सैनिक भयानें दुर्योधनाच्या सैन्या कडे पळाले तेव्हां अर्जुनानें शरें करून त्या सर्व सैन्याचा नाश केला. हें पाहून सुशर्मा क्रोधानें आप

त्या योध्यांस बोलतो हे शूर हो अर्जुनाचें भय धरूनका पूर्वीं तुह्मीं सर्व से त्या मध्यें शपथ काय केल्यान आतां कसेपळतां तुमची लोकामध्यें थट्टा हो ईल याज करितां येथेंच उभेराहा. तेव्हां शंख व भेरी इत्यादिकांचा नाद करी त सर्व मापारी आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९ अध्याय एकूणीस.– संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र, समसप्तक ग ण मायारी फिरले असें पाहून अर्जुन बोलतो हे कृष्णा, ज्या ठिकाणी समस प्तक गण आहेत तेथें माझा रथ लौकर ने या समसप्तकांस आज रणभूमी त्यादायीं मारतों असें ऐकून कृष्णानें अर्जुनाचा रथ समसप्तकांकडे नेला. तेव्हां समसप्तकांच्या गणानीं मुहूर्तमात्र पर्यंत बाण वृष्टी केली त्या वृष्टीनें अर्जुन व श्रीकृष्ण दोन घटिका दिसेनासे झाले नंतर अर्जुनानें त्वष्ट्यानें दि लेल्या अस्त्राचा प्रयोग करून हजारों कृष्णाव अर्जुन उत्पन्न केले तेव्हां अ रे हा अर्जुन हा कृष्ण असें ह्मणोन समसप्तक मोहानें एकमेकांस मारूं ला गले एकक्षणामध्यें समसप्तकांचें सैन्य बहुत नाश पावलें कांहीं वेळानें- त्या योध्यानीं अर्जुनावर हजारो बाणांनी वृष्टी केली त्या बाणाचें अर्जुना नें आपल्या बाणानीं निवारण करून ललित्थ, मालव, मावेल्लक व त्रिगर्त- यांजवर हजारों बाण टाकिले पुनः त्या योध्यानीं अर्जुनावर बाणवृष्टी क रून कृष्णार्जुनास दिसेनासें केलें आणि कृष्ण व अर्जुन हे दिसत नाहींत त्या पेक्षां हे मेले असा निश्चय करून शंख दुंदुभि इत्यादि वाद्यें वाजविलीं तेव्हां कृष्ण ह्मणतो हे अर्जुना सावध हो आणि त्या बाणांचें निवारण कर असें ऐकून अर्जुनानें वायव्य अस्त्रानें त्या सर्व बाणांचें निवारण करून समसप्तकांचे गजाश्व, रथ, पायदळ आकाश पर्यंत उडविले आणि तीक्ष्ण बाणें करून हजारों योद्धे मारले भल्लबाणें करून कोणाचीं शिरें कोणाचे हा त कोणाचे पाय तोडून पाडले. इकडे द्रोणाचार्य युधिष्ठिरास धरावें या बु द्धीनें सैन्या सहवर्तमान पुढें येऊन युद्ध करूं लागले असतां त्याकाळीं युधि ष्ठिराचें व आचार्याचें युद्ध परम निकराचें झालें. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

२० अध्याय वीस.– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, अर्जु न समसप्तकांकडे युद्धा करितां गेला असें आचार्यांनीं पाहून धर्मराजास

धरण्या करितां सूपर्ण व्यूह केला त्या व्यूहाच्या मुख स्थानीं स्वतः द्रोणाचा र्य उभे राहिले. बंधुसहवर्तमान शिरस्थानीं दुर्योधन, चक्षुस्थानीं कृतवर्मा व कृपाचार्य, मानेच्या ठायीं भूतशर्मा, क्षेमशर्मा, करकाक्ष कलींग, सिंहल प्राच्य, अभीर, शक, यवन, कांबोज हे, दक्षिण बाजूस शूरसेन, दरद, मद्र, केकेय व भूरिश्रवा, शल्य, सोमदत्त, बाल्हिक हे दक्षणेस, डावे बाजूस विंदानुविंद, कांबोज कृ दक्षिण हे पृष्ठ भागीं, कलिंग, मागध, पौंड्र, गांधार, प्राच्य पार्वतीय हे पुच्छ भागीं कर्ण पुत्रा सहवर्तमान उराचे भागीं जयद्रथ, संपाती, वृषभ, धूर्मांजय, वृषक्राथ, नैषध, हे सेनेसीं सहवर्तमान उभे राहिले आणखीही पक्ष प्रपक्ष भागीं मोठे मोठे योद्धे उभे राहिले त्या सर्व व्यूहामध्यें प्रागज्योतिष नामक राजाचा गज जसा काय पौर्णिमेचे दिवशीं नक्षत्रांमध्यें चंद्र शोभतो असातो सेनेमध्यें शोभूं लागला असा व्यूह आचार्यानीं केलेला आंत प्रवेश करण्यास मोठा दुर्घट युधिष्ठिरानें पाहून तो धृष्टद्युम्नास ह्मणतो द्रोणाचार्यास जेणें करून मी सांपडणार नाहीं असी कांहीं युक्ती काढिली पाहिजे हें ऐकून धृष्टद्युम्न भाषण करतो हे धर्मराज, मी जिवंत असतां तुला आच्यार्यांच्या हस्तगत कधींही होऊं देणार नाहीं तूं किमपीही भिऊंनको असें बोलून त्यानें एक क्षणांत द्रोणास उदास केला हें दुर्योधनाचा बंधु दुर्मुख याणें पाहून तो धृष्टद्युम्नावर धांवला तेव्हां उभयतानीं एकमेकांवर बाणांची वृष्टी केली असें परस्पर उभयतांचें युद्ध होत असतां वायूनें मेघ जसे च्छिन्न भिन्न होतात तसे इकडे द्रोणानीं धर्मराजाचें सैन्य विच्छिन्न केलें असें युद्ध होतां होतां त्या युद्धामध्यें शत्रूचे योद्धे कोणचे व आपले कोणचे हें समजेनासें झालें. असें युद्ध होत असतां त्या पासून अग्नि उत्पन्न होऊन तो आकाशापर्यंत गेला. कित्येक मेलले हत्ती, घोडे व रथी यांचे पर्वता येवढे ढीग पडले, रक्त व मांस हें निरवल रूप झालें त्या मध्यें राहिलेली सेना उभी राहून परस्पर पिता पुत्रास व पुत्र पित्यास मारूं लागले असें युद्ध होत असतां योध्यांचीं कवचें, शस्त्रें, पताका, छत्रें रक्तानें भरलीं. पुनः ते योद्धे रथामध्यें बसून मोहन पावतां हजारों बाणाची वृष्टी एकमेकांवर करूं लागले असें भयंकर युद्ध होत असतां पांडवांचे सैन्यास मोह उत्पन्न करून युधि-

ष्ठिरास धरण्या करितां आचार्य त्याचे जवळ आले. अ. वि. या अ. आहे.

२१ अध्याय एकवीस— हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिरास धरण्या करितां आचार्य आले हें पाहून युधिष्ठिराचे सैनिक मोठा शब्द करूं लागले. सत्यजितानें द्रोणाचार्यांवर बाण वृष्टी करून सारथ्यास पांच बाणें करून व अश्वांस दहा बाणांनीं, बाजूस जे योद्धे होते त्यांस दहा दहा बाणांनी वेध करून आचार्यांचा ध्वज छिन्न केला हें पाहून आचार्यानें याचा अंतकाळ जवळ आला असें समजून सत्यजिताचें धनुष्य तोडलें त्यानें दुसरें धनुष्य घेऊन द्रोणाचार्यांस वेध केला तेणें करून आचार्य कांहींसे घाबरले हें पाहून वृकही बाण वृष्टी करूं लागला. सत्यजित व वृक यांणी द्रोणाचार्यांस बाणांनीं आच्छादन केलें हें पाहून पांडवांचे सैनिक हर्ष पावले नंतर आचार्यांनें वृकाचा वध केला. सत्यजितानें आचार्यांवर बाण वृष्टी करून सारथी व घोडे यांस मारिलें नंतर द्रोणानें त्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें हें पाहून धर्म इकडे तिकडे पाहूं लागला तों पांचाल, कैकेय, चेदि, कारूष हे धर्माचें संरक्षण करण्यास आले हें पाहून द्रोणानें त्यांजवर बाणांची वृष्टी केली. विराटाचा बंधु शतानिक याणें द्रोणावर व त्याच्या सारथ्यावर बाण टाकिले तेव्हां द्रोणानीं शतानिकाचें कुंडलांनीं सुशोभित शिर तोडून पृथ्वीवर पाडलें तें पाहून मत्स्यादि पळूं लागले नंतर द्रोणानें मत्स्य, केकय, चेदी, कारूष, कोशल, पांचाल यांचाही पराभव केला. असें द्रोणाचार्यानें कर्म करून मोठी भयंकर रक्ताची नदी उत्पन्न केली-त्याकाळीं युधिष्ठिराचे योद्धे द्रोणाचार्य याचें निवारण करण्यास युधिष्ठिराचे-जवळ येऊन शिखंडी प्रमुख यानीं द्रोणावर बाण वृष्टी केली. नंतर आचार्यानें या सर्व योध्यांचें अतिक्रमण करून दृढसेनाचा प्राण घेऊन पांडव सैन्याचा रक्षण कर्ता जो युधिष्ठीर याचें संरक्षण करण्यास कोणी नाहीं असें पाहून-धर्मावर नऊ, शिखंडीवर बारा, उत्तमोज्यावर वीस बाण टाकून भल्लाकार-बाणानें वसुधानाचें शीर तोडलें. हें पाहून पांचाल द्रोणावर बाण वृष्टी करीत धांवला असतां द्रोणानी त्याचें धनुष्य तोडून शीर भूमीवर पाडलें हें पांडवांच्या सैनिकांनीं पाहून सैन्यांत अरे द्रोणास मारा मारा असा शब्द झाला.-तो ऐकून आचार्यानें पांडव सेनेस पीडित केलें हें पाहून दुर्योधन प्रमुख कौ

रवांस मोठा हर्ष झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बावीस— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, पांडव सैन्यांतून आचार्यांसमोर युद्ध करण्या करितां कोण आला? द्रोणाचार्यास पाहून कोण कोण पळाले व कोण युद्धास उभे राहिले? हें श्रवण करून संजय ह्मणतो राजा, द्रोणाचार्यांचे भयानें पांडव सैन्य पळालें हें पाहून कौरवां कडील योध्यानीं मोठा शब्द केला. त्याकाळीं दुर्योधन कर्णाकडे पाहून बोलला हे कर्णा, द्रोणाच्या बाणानीं पांडवांचे योद्धे त्रस्त होऊन दाही दिशेस पळाले ते पुनः युद्धा करितां एकत्र मिळतील असें नाहीं हा भीम आमच्या योध्यानीं व्यास केलेला पाहून मलातर फारच आनंद होतो असें ऐकून कर्ण बोलतो हे दुर्योधना, पांडवांचा पराभव युद्धामध्यें कधींही होणार नाहीं द्यूतक्रीडेने वनवासांत क्लेश पावलेले जे पांडव ते खचित तुमचा सूड घेतील त्या कालीं तुमचें संरक्षण करण्यास कोणीही समर्थ होणार नाहीं याज करितां सर्वांनीं मिळून आचार्याजवळ राहावें. असें ऐकून सर्व भारद्वाजाजवळ जाऊन उभे राहिले. असा विषय या अध्यायांत आहे.

२३ अध्याय तेवीस— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, द्रोणाचार्यांचा पराभव करण्या करितां पांडवांचे भीमसेन प्रभृति योद्धे आले होते त्यांच्या अश्वांचे रंग व ध्वजांवर चिन्हें कोण कोणतीं होतीं व धनुष्यें कोणकोणीं कशीं धारण केलीं होतीं तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतो हे राजा, वृकोदराच्या रथाचे अश्व आस्वलाच्या रंगासारखे, सात्यकीच्या रथाचे घोडे शुभ्र वर्णासारखे, जरासंधाच्या पुत्राच्या रथाचे घोडे कापरा सारख्या रंगाचे, पांचालयांच्या रथाचे घोडे लाल रंगाचे, धृष्टद्युम्नाच्या रथाचे घोडे पारव्या रंगाचे, नकुलाच्या रथाचे घोडे कांबोज्य देशाचे पोपटाचेपराच्या रंगासारखे सहदेवाच्या रथाचे अश्व तित्तीर पक्ष्या सारखे, धर्मराजांच्या रथाचे घोडे शुभ्र रंगाचे, अभिमन्यूच्या रथाचे घोडे पिंगट वर्णाचे, घटोत्कजाच्या रथाचे घोडे चित्र विचित्र होते. याशिवाय दुसऱ्या अनेक राजांचे घोडे चित्र विचित्र रंगाचे होते तसाच द्रोणाचार्यांचा ध्वज कमंडलु व कृष्णाजिन चिन्हानीं युक्त, भीमसेनाचा ध्वज सिंह चिन्ह युक्त, धर्मराजाचा ध्वज-

चंद्र व नक्षत्र गणानीं युक्त, नकुलाचा ध्वज शरभ पक्ष्याच्या चिन्हानीं युक्त; सहदेवाचा ध्वज हंस व घंटा पताकानीं युक्त, द्रौपदेयांच्या ध्वजावर क्रमें करून धर्म, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव यांच्या प्रतिमेचि चिन्हें होतीं, अभिमन्यूचा ध्वज शारंग पक्ष्याच्या चिन्हानीं युक्त, घटोत्कचाचा ध्वज गृध्रपक्ष्याच्या चिन्हानीं युक्त होता. धर्मराजानें महेंद्रनामक धनुष्य, भीमसेनानें वायव्य, अर्जुनानें गांडीव, नकुलानें वैष्णवी, सहदेवानें अश्विनीकुमारानें निर्माण केलेलें, घटोत्कचानें पौलस्त्य नामक, द्रौपदीचे पांचपुत्र याणीं रौद्र, अग्नेय, कौबेर, याम्य व गिरीश अशीं धनुष्यें धारण केलीं व अभिमन्यूनें बलरामापासून प्राप्त झालेलें रौद्र धनुष्य धारण केलें. याप्रकारें सर्वराजे स्वयंवराकरितां जसे जातात तसे आपले रथ वसैन्यासह वर्तमान द्रोणाचार्य याजवर धांवले. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चौवीस:— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, भीमसेनास अग्रभागीं करून सर्व पांडवांचे योद्धे जेव्हां द्रोणावर धांवले तेव्हां माझ्या पुत्रांस भयवाटलें किंवा नाहीं? मला वाटतें कीं, तेरावर्षें पर्यंत अरण्यामध्यें दुःखित झालेले जे पांडव ते आमच्या पुत्रांचा समूळ नाश करतील. धर्मराजाला आह्मीं राज्याचा भाग दिला नाहीं ह्मणून पांडवतर फारच कोपले आहेत मी दुर्योधनास पूर्वीं ह्मणत होतों कीं, पांडवांस अर्धराज्य दे परंतु तें त्याणें न ऐकतां युद्धास आरंभ केला परंतु युद्धांत भीष्म मरण पावल्यावर तरी समजावयाचें होतें तेव्हांही समजला नाहीं. पूर्वीं मला विदुरानीं सांगितलें होतें कीं, सर्व तुझे पुत्रांत दुर्योधन हा दुष्ट आहे त्याचा त्याग कर तें मी ऐकिलें नाहीं हे संजया, त्या युद्धांत कोण पळाले, कोण उभेराहिले व कोणी कोणाचा पराभव केला हें मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अध्याय पंचवीस— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, पांडवांनीं ज्याकाळीं द्रोणाचार्यास बाणानीं व्याप्त केला त्याकालीं पृथ्वीपासून जो धूळ निघाली तेणें करून सर्वसेनेच्या दृष्टी नष्ट झाल्या हें पाहून दुर्योधनानें पांडवांच्या सेनेचें निवारण केलें, दुर्मर्षणानें भीमाच्या जीव घ्यावा ह्मणोन हजारों बाणांची दृष्टी केली त्या सर्व बाणांचें भीमानें निवारण केलें. कृतवर्मा, शैनेय याणीं परस्पर यु

द्धामध्यें एकमेकावर बाणटाकून शेवटीं शीनेयानें कृतवर्म्याचा पराभव केला. जयद्रथ युद्धास आला हें पाहून सुधन्व्यानें दहा बाणें करून जयद्रथाचाध्व जव धनुष्य तोडलें, जयद्रथानें दुसरें धनुष्य घेऊन सुधन्व्यावर बाण वृष्टी केली, युयुत्सुनें सुबाहूवर बाण वृष्टी करून सुबाहूचे दोन्ही हस्त तोडले, शा ल्यानें युधिष्ठिरावर बाणांची वृष्टी केली असतां युधिष्ठिरानें मर्मभेदी बाणा नीं शल्यास वेध केला तेव्हां त्याणें चौसष्ट बाणानीं यास वेध केला असतां- त्याणें धर्मानें धनुष्य छेदिलें. बाल्हिकानें आपल्या सैन्यासहवर्तमान.सहा निकाचा पराभव केला, विंदानुविंद सैन्याशीं सहवर्तमान विराटाशीं युद्ध क रूं लागले. भूत कर्म्याणें शतानिकावर बाणांची वृष्टीकेली शतानिकानें भूत कर्म्याचे बाहू व शीर तोडून पृथ्वीवर पाडलें विविंशतीनें सुत सोमाचा पराभ व केला. त्याकालीं सुतसोमानें विविंशतीचा पराभव करून शाल्व राजास सार थ्या सहवर्तमान मारलें, चित्रसेनाच्या पुत्रानीं श्रुतकर्म्याचा पराभव केला तसे च द्रौपदेय व अश्वत्थामा यानें परस्पर युद्ध होऊं लागलें. अश्वत्थाम्यानें द्रौपदे यांवर बाण टाकिले असतां ते सर्व द्रौपदेयानीं तोडून अश्वत्थाम्यावर बाणवृ- ष्टी करून ते भारद्वाजावर धांवले त्याकालीं दौशासनीनें द्रौपदेयाचें निवारण केलें तेव्हां अर्जुनाचा पुत्र दुःशासन पुत्राचा सारथी मारून द्रोणाजवळ गेला हें पाहून लक्ष्मण बाण वृष्टी करूं लागला. त्याकालीं अर्जुनाचा पुत्र लक्ष्मणाचें धनुष्य तोडून बाण वृष्टी करूं लागला, विकर्णानें शिखंडीचा पराभव केला, अं गदानें उत्तमौजाचा पराभव केला त्याकालीं अंगद व उत्तमौजा यांचें परस्पर मो ठें युद्ध झालें दुर्मुखानें पुरोजिताचा पराभव केला. कर्ण व कैकेय यांचें परस्प र युद्ध होत असतां कर्णानीं कैकेयावर बाणाची वृष्टी केली त्या बाण वृष्टीनें कै केयानीं त्रस्त होऊन त्याजवर बाणांचा वर्षाव केला. क्षेमधूर्ती व बृहंत बला तन यांचें परस्पर युद्ध होत असतां अंबष्ठानें अस्थी भेदिनी शक्ती चेदि वर टाकिली त्याकालीं तो पडों लागला. वार्धक्षेमी व कृपाचार्य यांचें पर स्पर द्वंद्व युद्ध होऊं लागलें, सोमदत्ती व मणिमंत या उभयतांचें द्वंद्व युद्ध होत असतां त्यानें मणिमंताचे सारथ्याचें शीर पृथ्वीवर पाडलें हें भूप केतूनें पाहून सोमदत्तीचा सारथी व अश्व मारून रथव ध्वज तोडून सोमदत्तीवा

बाण महारानीं प्राण घेतला. पांड्य राजावर वृषसेनानें बाण वृष्टी करून प राजित केलें. गदा,परिघ,पट्टे तोमर इत्यादिक अस्त्रें व पाषाण वृक्ष इत्यादि कां सहवर्तमान कौरवसेनेस भय देणारा जो घटोत्कच याच्याशीं अलंबुष नामक राक्षस युद्ध करूं लागला जसें पूर्वी इंद्र व शंभरासुर यांचें युद्ध झा लें तशीं हीं महान युद्धें भयंकर झालीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२६ अध्याय सव्वीस— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, पांडवांचें व माझे पुत्रांचें कसें युद्ध झालें व समसप्तकांकडे अर्जुन गेल्यावर तिकडे काय झालें हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, परस्परांचें युद्ध होत असतां दुर्योधन हत्तीसहवर्तमान भीमावर धांवला हें पाहून भी मसेनानें आपल्या बाहुबलें करून पर्वतासारख्या गजास एकक्षणांत वि- मुख केलें याप्रमाणें आपल्या गजाची दाणादाण झाली हें पाहून दुर्योधना नें भीमावर बाणांचा प्रहार केला ते बाण भीमानें आपल्या बाणानीं तोडून पुनः दुर्योधनावर सूर्यासारख्या तेजस्वी बाणांची वृष्टी केली त्या बाणानीं दु र्योधन व्याकुळ झाला हें पाहातांच अंगराजा आपल्या हत्तीवर बसून भीमास मारण्याकरितां जवळ आला तेव्हां भीमानें अंगराजाच्या हत्तीच्या गंडस्थळा चा भेद करून अंगराजाचें शिर तोडलें हें पाहून सर्व सैनिक भयानें इकडे तिकडे पळूं लागले हें पाहून भगदत्तानें आपला हत्ती भीमावर नेला तेव्हां हत्ती नें भीमाचा रथ दोन पायांत धरून त्यावर सोंडेचा प्रहार केला तेणें करून घो डे जोडलेला रथ त्याचे तुकडे तुकडे झाले त्याकाळीं भीम रथाखालीं उडी टा- कून हत्तीच्या पोटाखालीं बसला आणि बुक्या मारूं लागला त्यामुळें तो हत्तीच क्रासारखा फिरूं लागला. इतक्यांत भीम दृष्टीस पडला तेव्हां हत्तीनें भीमाच्या मांडीवर सोंडेचा प्रहार करून सोंडेनें त्यास फिरविला पुनः भीम मुष्टीप्रहार क रीत सोंडेचा वेढा सोडवून पुनः त्याचे पोटाखालीं लपला, त्याकालीं भीम कोठें नाहीं असें पाहून भीम मेला असें ह्मणत सैनिक ओरडूं लागले हा शब्द ऐकू न धर्मराजानें पांचाल व आणखी रथी यांसहवर्तमान पुढें येऊन भगदत्ता वर बाणवृष्टी केली मग भगदत्तानें आपल्या हत्तीकडून त्यास व बाणांचा ना श केला असें भगदत्ताचें व पांडवांचें महाभयंकर युद्ध होत असतां दशार्ण-

देशाचा राजा आपल्या हत्तीवर बसून भगदत्तासमोर युद्धास आला त्याका लीं भगदत्तानें व दाशार्णानें युद्ध होत असतां भगदत्ताच्या हत्तीनें दशार्णा च्या हत्तीचा प्राण घेऊन पृथ्वीवर पाडला नंतर तोमरास्त्रें करून भगदत्ता नीं दशार्णवाचा प्राण घेतला हें पाहून धर्मराज पुनः भगदत्तावर बाण टाकूं लागले.नंतर भगदत्ताच्या हत्तीनें सात्यकीचा रथ सोंडेमध्यें धरून फेंकून दि ला इतक्यांत सारथी रथाचे अश्व हातांत धरून सात्यकीजवळ आला. भग दत्ताच्या हत्तीनें दुसरेही रथ आपल्या सोंडेनें फेंकून दिले.या प्रकारें पांडवां- च्या सेनेची दाणादाण जाली असतां गजाश्व मोठ्यानीं ओरडूं लागले हें पा हून भीमसेन पुनः भगदत्ताशीं युद्ध करण्याकरितां उभा राहिला तेव्हां रुचि पर्व्यानें भीमावर बाण वृष्टी केली रूपर्वा याणें त्या बाणांचें निवारण करून रुचिपर्व्याचा प्राण घेतला इतक्यांत अभिमन्यु, द्रौपदेय, चेकितान, धृष्टके तु, युयुत्सु हे सर्व भगदत्तावर बाणांची वृष्टी करूं लागले इतक्यांत भगदत्त अं- कुश आपल्या हत्तीस टोंचून युयुत्सु जवळ आला त्याच्या रथाचे घोडे व सा रथी यांस त्याच्या हत्तीनें सोंडेंत धरून ओढले त्याकाळीं युयुत्सु रथाखालीं उडी टाकून सेन्या जवळ आला पांडवांच्या योध्यानीं त्या हत्तीवर बाणांची वृष्टी केली इतक्यांत दुर्योधनही हत्तीवर बसून अभिमन्यु व युयुत्सुसीं युद्ध क- रूं लागला. तेव्हां दुर्योधनावर अभिमन्यु, युयुत्सु, द्रौपदेय धृष्टकेतु याणीं बाण टाकिले त्याकालीं दुर्योधनानें अंकुश करून आपला हत्ती माघारा फि रविला.असे कौरव पांडवांचें युद्ध होत असतां पांडवांचे योद्धे भगदत्तास- भिऊन ह्मणो लागले कीं, भगदत्ताच्या हत्ती पासून आतां आमचें त्राण होणें कठीण दिसतें. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्तावीस.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, याप्र- कारें भगदत्ताचें व युधिष्ठिराचें युद्ध होत असतां भगदत्ताच्या हत्तीचा शब्द ऐकून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, हा शब्द भगदत्ताच्या हत्तीचाच असें मी जाण तों हा भगदत्त आज पांडवांचा सेनेचा नाश करील याचा पराभव तुझ्याव माझ्या वांचून व्हावयाचा नाहीं याजकरितां जेथें भगदत्त असेल तेथें रथ- न्यावा असें ऐकून कृष्णानीं भग दत्ताकडे रथ चालिवला इतक्यांत चौदा

हजार समसप्तक, दहा हजार त्रिगर्त, चार हजार नारायणगण, यांणी अर्जु-
नास जातोस कोठें मागारा फीर ह्मणोन हांक मारिली हें ऐकून अर्जुनाचें मन-
निकडे जाण्यास द्विधा झालें. तसे दुर्योधन व कर्ण याउभयतांचें मन अर्जु-
नास मारण्या विषयीं अथवा धर्मराजास धरण्या विषयीं द्विधा झालें. पुढें
अर्जुन विचार करून समसप्तकां कडे गेला. तेव्हां समसप्तकानीं बाण वृष्टीनें कृ-
ष्ण व अर्जुन यांस रथा सहवर्तमान व्याप्त केलें तेणें करून अर्जुनास मूर्च्छा
आली हें पाहून कृष्ण अर्जुनास सावध करून ह्मणतात कीं, ह्या बाणांचें-
निवारण कर त्याकाळीं अर्जुनानें ब्रह्मास्त्रानें सर्व बाणांचा छेद करून सम
सप्तकांचे कितेकांचे धनुष्या सहित हात तोडले कितेकांचे ध्वज तोडले किते
कांचे सारथी व अश्व मारिले तें अर्जुनाचें घोर कर्म पाहून कृष्ण बोलतात हे
अर्जुना, यम कुबेर ही असें करण्यास असमर्थ तें तूं कर्म आज युद्धाच्या ठा-
यीं केलेंस हें पाहून मला फारच हर्ष झाला हें ऐकून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा,
जेथें भगदत्त असेल तेथें माझा रथ लोकर न्यावा. अ. वि. अ. आहे.

२८ अध्याय अठ्ठावीस.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, नंतर-
कृष्णानें भगदत्ता कडे रथ चालविला हें पाहून सुशर्मा आपल्या बंधु सहवर्त
मान अर्जुनास हांका मारूं लागला तेव्हां अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, जेथें सुश
र्मा असेल तेथें रथ न्यावा. नंतर कृष्णानीं सुशर्म्या कडे रथ नेला त्या काळीं
अर्जुनानें सात बाणानीं सुशर्म्यास वेध करून धनुष्य व ध्वज तोडला नंतर
सुशर्म्यानें भावास साहा बाणें करून अश्व व सारथी सहित मारिला हें पाहू
न सुशर्म्यानें लोखंडाची शक्ती अर्जुनावर टाकिली व कृष्णावर तोमरास्त्र टा
किलें ती शक्ती व तोमरें तीन तीन बाणानीं तोडून सुशर्म्यास बाण वृष्टीनें मूर्छि
त करून अर्जुन कौरव सैन्या कडे आला अर्जुनानें बाणवृष्टीनें कौरवांचें सै-
न्य व्याप्त करून भगदत्तावर व कौरव सैन्यावर बाणवृष्टी केली तेणें करून कौ
रवांचें सैन्य त्रासून पळालें नंतर कौरवां कडील दाहा हजार सैनिकानीं अर्जु
नावर जावें असा निश्चय करून आप आपल्या मध्यें शासा करून सर्व योद्धे-
अर्जुनावर गेले त्या काळीं अर्जुनानें त्यांचा पराभव केला हें पाहून भगदत्त ह
त्तीवर बसून अर्जुना वर धांवला तेव्हां भगदत्तानें अर्जुनावर जे बाण टाकावे

ते अर्जुनानें जवळ येतांच बाणांनीं तोडावे. अर्जुनाचे बाण भगदत्तानें तो-
डावे भगदत्तानें पार्थास मारण्या करितां आपले हत्तीस प्रेरणा केली तेव्हां
अर्जुन क्रोधानें भगदत्ताच्या हत्तीस मारून रथ फिरवून उजवे बाजूस
उभा राहिला तेव्हांच अर्जुनानें भगदत्तास मारला असता परंतु यो-
ध्याचे बाजूस उभें राहून त्याचा प्राण घेऊं नये असा धर्म स्मरून भगद-
त्ताचा प्राण घेतला नाहीं. भगदत्ताच्या हत्ती नें पांडवांचे सैन्यातील हत्ती, रथ
घोडे इत्यादिकांचा बहुत नाश केला हें पाहून अर्जुन भगदत्तावर बाणवृष्टी
करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२९ अध्याय एकुणतीस:– धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, अर्जुन
क्रोध पावल्यानंतर त्यानें व भगदत्तानें कसें युद्ध केलें तें मला सांग. अ-
सा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, अर्जुन व भगदत्त एकमेकांवर बा
ण टाकूं लागले त्याकालीं सर्व सैनिकानीं भगवंत व अर्जुन या युद्धांत मरता
त असा निश्चय केला भगदत्तानि कृष्णा व अर्जुनावर बाणाची वृष्टी केली. अ
र्जुनानें चौदा तोमर शस्त्रानि त्या वृष्टीचें निवारण करून भगदत्ताच्या हत्ती
चें चिलखत तोडलें त्याकालीं हत्तीच्या अंगांतून रक्ताचे पाझर निघूं लाग
ले हें पाहून भगदत्तानें कृष्णावर लोखंडाची शक्ती टाकिली ती शक्ती अर्जु-
नानें आपल्या बाणें करून छेदून भगदत्ताचा ध्वज व छत्र यांचा छेद करू
न दहा बाणानीं प्रहार केला. पुनः भगदत्तानें अर्जुनाच्या किरीटावर प्रहार
केला या प्रहारानें अर्जुनाचा मुगुट कांहींसा वांकडा झाला. तेव्हां अर्जु
न ह्मणतो हे भगदत्ता, प्रहार करावा तो चांगला करावा हें भाषण ऐकतांच
भगदत्तानें हातांत धनुष्य घेऊन कृष्णा व अर्जुनावर बाणाची वृष्टी केली ते
बाण अर्जुनानें एकेचाळीस बाणानीं तोडून भगदत्ताचें कवच तोडलें तेव्हां
भगदत्तानें अंकुशावर वैष्णवा स्त्रा चा प्रयोग करून अर्जुनाच्या उरावर टा-
किलें नंतर भगवंतानीं अर्जुनास किंचित मागें करून तें अस्त्र आपण सह
न केलें त्याकालीं तें अस्त्र भगवंताच्या गळ्यांत वैजयंती माले सारखें शो-
भूं लागलें. हें पाहून अर्जुन किंचित् दुःखित होऊन ह्मणतो हे कृष्णा, तुझी पू
र्वीची प्रतिज्ञा रथ हांकण्याची आहे ती प्रतिज्ञा संरक्षण कर ही शक्ती मी सह

न करण्यास समर्थ असतां तूं काय ह्मणोन सहन केलीस? येणें करून म
ला फार दुःख झालें.असें ऐकून कृष्ण सांगतात हे अर्जुना, मी लोकांच्या
संरक्षणा करितां आपल्या देहाचे चार भाग करून चार मूर्ती उत्पन्न केल्या
त्यांतील एक मूर्तीनें तपामध्यें पृथ्वीवर ठेविली, एक मूर्ती जगताचें चांगलें पा
हाण्या करितां ठेविली, एक मूर्ती मनुष्यांमध्यें कर्म करण्या करितां ठेविली व
एक सहस्त्र वर्षपर्यंत निद्रिस्त ठेविली अशा त्या च्यार मूर्ती आहेत त्यांती
ल चौथी मूर्ती सहस्त्र वर्षे झाल्या नंतर उठते आणि कोणी तपश्चिर्या करू
न वर मागणारे असतील त्यांस वर देते. एकदां पृथ्वीनें तप करून चौथीजी-
माझी मूर्ती इच्या जवळ वर मागितला कीं, माझा पुत्र नरकासुर हा देवदानव-
यांस जिंकील अशी एक वैष्णवी शक्ती यासदे हें माझ्या मूर्तीनें ऐकून नरका
सुरास वैष्णवास्त्र देऊन तूं सर्वलोकांस अजिंक्य आहेस असा वर दिला.-
त्या नरकासुरानें ही वैष्णवी शक्ती भगदत्तास दिली ह्मणोन या शक्तीचा परा
भव करण्यास या त्रैलोक्यांत कोणी नाहीं ह्मणोन ही माझी वैष्णव शक्ती मी
धारण केली ही वास्तविक गोष्ट तुला सांगितली.आतां जसा मी नरकासुराचा
वध केला तसा हा भगदत्त हतशस्त्र झालेला त्याचा तूं वध कर हें पार्थानें भ
गवंताचें वाक्य ऐकतांच भगदत्तावर बाणाची वृष्टी करून त्याच्या हत्तीच्या पं
टा व पायांतील सोन्याच्या सांखळ्या तोडून टाकिल्या. नंतर भगदत्त कोपावि
ष्ट होऊन अर्जुनास मारण्यास हत्ती सहवर्तमान धांवला.हें अर्जुनानें पाहू
न हत्तीच्या गंडस्थलावर बाणाचा वेध केला.त्यामुळें हत्तीनें मोठ्यानें ओरडून
प्राण सोडिला. भगदत्तानें आपल्या पांपण्यास पट्या बांधल्या होत्या त्या अर्जु
नें तोडल्या तेणें करून डोळ्यावर पापण्या येऊन दृष्टीस अवरोध झाला हें अ-
र्जुनानें पाहून दुसरा बाण मारला त्या काळीं मोग वारा सुटून भगदत्ताचें शी
र पृथ्वीवर पडलें. आणि तुझा जय इच्छिणाऱ्या बहुत पुरुषांचा नाश केला.
असा विषय अध्यायांत आहे.

३० अध्याय तीस — संजय ह्मणतो हे राजा, इंद्राचा सखा जो भ
गदत्त यास पार्थानें मारला हें कौरवांकडील योध्यानीं पाहून गांधार राजा-
चे पुत्र वृषक व अचल हे एक अग्रभागीं व एक पृष्ठभागीं उभे राहून त्या

णीं बाणांची वृष्टी केली त्याकालीं अर्जुनानें त्याच्या बाणांचा नाश करून वृषकाचा ध्वज छत्र व धनुष्य अश्व यां सहित त्याच्या रथाचा नाश केला. त्याचे संरक्षणा करितां पंन्नास गांधारराजाचे पुत्र आले त्यांसही अर्जुनानें मारून यमलोकास पाठविलें तेव्हां वृषक हा आपले भावाचे रथांत बसून दोघे ही अर्जुनावर बाण वृष्टी करूं लागले. त्या कालीं अर्जुनानें एका रथांत दोघे भाऊ बसलेले पाहून एक बाणानें एक कालीं दोघांचीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडलीं. दुर्योधनाचे वृषक व अचल हे मेले असें पाहून दुर्योधन आपले बंधूं सह अर्जुनावर बाणाची वृष्टी करूं लागला. व मायावी जो शकुनी याणें ही आपले बंधु मेले असें पाहून अर्जुन व कृष्ण यांजवर तो नानाप्रकारच्या शस्त्रांची वृष्टी करूं लागला. व मायें करून त्यानें सर्व दिशेस सिंह व्याघ्रादि नाना प्रकारचीं श्वापदें व राक्षस उत्पन्न करून अर्जुनाच्या नाशास पाठविले. हें पाहून अर्जुनानें दिव्यास्त्रें करून सर्व शस्त्रास्त्रें. श्वापदें व राक्षस यांचा नाश केला मग शकुनीनें मायें करून पुनः अंधःकार उत्पन्न केला. पार्थानें तेजोमय अस्त्रानें अंधःकाराचा नाश केला. पुनः शकुनीनें प्रलय काला सारखी पर्जन्याची वृष्टी उत्पन्न केली त्याचा आदित्य अस्त्रें करून अर्जुनानें नाश केला अशा नाना प्रकारच्या शकुनीनें माया उत्पन्न केल्या त्यांचा पार्थानें नाश केला त्या कालीं शकुनी रथांत बसून पळून गेला. नंतर अर्जुनानें हजारों बाणांची कौरवांच्या सैन्यावर वृष्टी केली तेणें करून त्या सेनेचे दोन भाग झाले आणि कांहीं सेन्य द्रोणाकडे व कांहीं दुर्योधनाकडे पळोन गेले. नंतर दक्षिण भागीं धर्मराजाशीं बहुत योद्धे युद्ध करतात हें पाहून अर्जुनानें हजारों योध्यांचा प्राण घेतला. संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, अर्जुनानें तुझे पुत्रांच्या सैन्याचा नाश केला त्याकालीं कौरवांचे योद्धे आप आपल्यांत मारूं लागले कित्येक पळूं लागले व युद्धामध्यें तुझ्या पुत्राचे हत्तीं घोडे अर्जुनानें जे मारले ते भक्षण करण्यास कोल्हे व कुत्रीं व कावळे येऊन मोठा भयंकर शब्द करूं लागले या प्रकारें सैन्याची दुर्दशा झाली. अ. वि. या. आहे.

३१ अध्याय एकतीस— धृतराष्ट्र ह्मणतो संजया, अर्जुनानें कौरव सैन्याचा पराभव केल्यानंतर जे राहिलेले व पळालेले योद्धे याणीं काय के

लें हें मज्ला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, पळालेले कौरवां नें योद्धे आपल्यास संरक्षण करणार द्रोण आहेत असा मनांत विचार करून द्रोणा कडे गेले. धर्मराज युद्ध करून रथामध्यें स्वस्त बसले हें पाहून भीम, सात्यकी, धृष्टद्युम्न हे पुढें झाले इतक्यांत पांडवांचे सेनेमध्यें हा द्रोण हा द्रोण ह्मणोन ओरडूं लागले तिकडे कौरवांच्या सैन्यांत द्रोण नव्हे असा परस्परसै न्यांत संवाद होऊं लागला इकडे द्रोणाचार्य पांचाळ राजास जिकडे मारण्यास जाई तिकडे धृष्टद्युम्न द्रोणाचें निवारण करण्यास उभा असे त्या सैन्यांत भयंकर युद्ध करणारे जे वीर ते परस्पर आपलीं दुःखें स्मरण करीत एकमेकां वर प्रहार करून मरण पावत कांहीं युद्धांत पळालेले जे रथी त्यांस लज्जा उत्पन्न होऊन आपला प्राण त्याग कसा तरी करावा या बुद्धीनें पांडवांचे योध्यांवर बाण वृष्टी करीत पांडवां कडील योद्धे यांणीं द्रोणास पाहिलें ह्मणजे तेबाणांची वृष्टी करीत असें द्रोणाचें व पांडवांचें युद्ध मागें कधीं ही जालें नसेल पुढें ही होणार नाहीं असें जाहालें. द्रोण पांडवांच्या सेनेचा पराभव करण्यास आले असतां धृष्टद्युम्न द्रोणाचें निवारण करी. निलनामक पांडवां कडील योद्धा आपल्या बाणें करून कौरव सैन्यास जाळूं लागला हें पाहून अश्वत्थामा बोलतो हे नीला, त्या सैन्याशीं तूं किमर्थ युद्ध करतोस मज एकट्याशीं युद्ध कर असें ह्मणतांच नीलानें अश्वत्थाम्यावर बाण वृष्टी केली त्या बाणें करून अश्वत्थामा पीडित झाला असतां भल्ल संज्ञक तीन बाणें करून नीलाचा ध्वज व छत्र तोडून त्यास रथाखालीं पाडला. नंतर नील हातांत ढाल तरवार घेऊन अश्वत्थाम्याचें शीर तोडावें ह्मणोन त्याचे आंगावर धांवला इतक्यांत अश्वत्थाम्यानें भल्ल बाणें करून नीलाचें चंद्रासारखें सुशोभित शिर तोडून पृथ्वीवर पाडलें हें पाहून पांडवांचे सैनिक ह्मणतात कीं, संसप्तक व नारायण गण यांचा पराभव करण्यास अर्जुन दक्षिणेस गेला तेव्हां आमचें संरक्षण आतां कसें होईल ह्मणोन विचार करूं लागले. अ. ३१ या अ. आहे.

३२. अध्याय बत्तीस.— संजय सांगतो हे धृतराष्ट्रा, हें पाहून कौरवांच्या सैन्याचा नाश करीत आपल्या सैन्याचा नाश पाहून भीमानें क्रोधानें द्रोणाचार्यावर साठ कर्णावर दाहा बाण टाकिले त्या काळीं द्रोणानी भीमा-

त्या प्राण घेण्या करितां वरचेवर त्याच्या मर्माचे ठायीं सवीस बाण टाकिले. कर्णानें बारा अश्वत्थाम्यानें सात दुर्योधनानें साहा बाण टाकिले ते सर्व बाण भीमानें तोडून पुनः द्रोणावर पन्नास कर्णावर दाहा दुर्योधनावर बारा अश्वत्थाम्यावर आठ बाण टाकिले तेव्हां कौरवांच्या सैन्यांत मोठा हाहाकार झाला हें पाहून धर्मराज ह्मणतो हे योद्धे हो, लौकर जाऊन भीमाचें संरक्षण करा. असें ऐकून युयुधान प्रभृति योद्धे व नकुल सहदेव सर्व मिळून भीमाच्या रक्षणा करितां कौरवांस मारण्यास धांवले त्या युद्धाच्या मर्दीत घोड्यावर घोडेस्वार हत्तीवर हत्ति रथावर रथ पडून कितीकांचा नाश झाला व शक्ती बाण इत्यादिकें करून किती एक पराभव पावले. कांहीं मेलेलीं मनुष्यें हत्तीच्या दातांत अडकून हत्ती इकडे तिकडे पळूं लागले. कोणाचे ध्वज मोडले. या प्रकारें बाणायुद्ध होऊन नंतर सर्व योद्धे गदायुद्ध करूं लागले व एकमेकांचे केश धरून मुष्टी प्रहार करूं लागले तेव्हां द्रोणानीं पांडवांचे रथ इत्यादिकांचा बहुत नाश केला पुनः पांडवां कडील योध्यानीं दुसऱ्या रथांत बसून मेघासारखी बाणाची वृष्टी आचार्यांवर केली त्या बाणाचें कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा, जयद्रथ यांणीं निवारण केलें पांडवां सह पांचालानीं पुनः द्रोणावर हल्ला केला. पुनः आचार्यांनीं चेदी, पांचाल व पांडव यांच्या सैन्याचा मोठा नाश केला. इतक्यांत अर्जुन तेथें येऊन त्यानें कौरवांच्यासैन्यास त्रास दिला त्यामुळे घोडे, हत्ती, योद्धे नाना प्रकारचे भयंकर शब्द करीत दाही दिशेस पळाले व कांहीं योद्धे हे कर्णा, हे कर्णा. आमचें संरक्षण कर ह्मणोन ओरडूं लागले त्याकालीं तो शब्द ऐकून कर्णानें भिऊं नका भिऊं नका असें ह्मणोन अर्जुनावर आग्नेय अस्त्र टाकिलें त्या अस्त्राची अर्जुनानें शांती करून बाणाची वृष्टी केली. नंतर धृष्टद्युम्न, भीम, सात्यकी, यांणीं कर्णास तीनतीन बाण मारले ते बाण कर्णानें तोडून एक शक्ती टाकिली आणि सर्व सैन्यांत सर्प उत्पन्न केले ते धृष्टद्युम्न, भीम, सात्यकी यांणीं पाहून तीन तीन बाणें करून त्यांचा नाश केला नंतर कर्णानें मोठा शब्द करून पार्थावर बाणांची वृष्टी केली त्याकालीं पार्थानें सात बाण कर्णावर टाकून कर्णाचा पुत्र शत्रुंजय याचें साहा बाणानीं शिर तोडलें आणखी तीन बाणें करून तीन पुत्र मारले इतक्यां

न भीमानें रथाखालीं उडी टाकून कर्णाच्या एका बाजूचे दहा व एक बाजूचे पां च योद्धे मारिले नंतर पुनः रथांत बसून सारथी घोडे मारिले धृष्टद्युम्नानें त रवार घेऊन बृहत्क्षत्र,नैषध यांस मारिलें सात्यकीनें चौसष्ट बाणांचा प्रहार क र्णावर करून भल्लाकार बाणानीं धनुष्य तोडलें. पुनः बाहू,ऊर व शीर यांजव र तीन बाण टाकिले हें पाहून दुर्योधन व जयद्रथ कांहीं सेना बराबर घेऊन सात्यकीवर धांवले त्या कालीं धृष्टद्युम्न,भीम,अभिमन्यु,अर्जुन,नकुल हे सा- त्यकीच्या रक्षणास येऊन कौरवसैन्यावर बाण वृष्टी करूंलागले. याप्रमाणें युद्ध होत असतां हजारों रथी,अश्वगज मेले कोणाच्या जिव्हा तुटल्या. त्या कालीं कौरवांच्या सैन्यांत मोठा हाहाकार झाला. पुनः रथी एकमेकांस पाहून मारण्यास धांवत असा परस्पर महान् संग्राम होत असतां सूर्य अस्तास- गेला त्याकालीं कौरव पांडव आप आपले सैन्यासीं सहवर्तमान शिबिरां त गेले. असा विषय अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेतीस:– संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा अर्जुनानें धर्मराजानें रक्षण केल्यामुळें द्रोणाचार्याचा संकल्प व्यर्थ झाला तेव्हां तुझ्या- कडील योद्धे पराजय पावल्यामुळें उद्विग्न होऊन दशादिशेस पहात असतां द्रो णाचार्यांच्या संमतानें सेनेचा अवहार करून अर्जुनाचें व केशवाचे स्नेह व र्णन करीत स्तब्ध बसले नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं दुर्योधन द्रोणाचार्यां स बोलला हे आचार्य तुह्मीं आमच्याशीं कृत्रिम केलें धर्मराज तुह्यांस युद्धाचे- ठायीं सांपडत असतां बुद्ध्या त्यास सोडून दिला हें काय? थोर आपल्या भक्ता ची आशा भंग करीत नाहींत. असें ऐकून द्रोण ह्मणतात हे दुर्योधना, तुझ्या कार्या विषयीं मी इतका झटत असतां हें बोलणें तुला योग्य नाहीं पूर्वींच तुला सांगितलें कीं, अर्जुनानें धर्मराजाचें संरक्षण केलें असतां देवादिक ही त्याचा पराभव करण्यास समर्थ नाहींत मग इतरांची कथा काय? अरे तूं असें पहा कीं, सर्व सृष्टीचा उत्पन्न करणार जो भगवान तो जेथें आहे व सर्व सेनेचा नायक अ र्जुन तो ज्या सैन्यांत आहे त्या सैन्याचा पराभव करण्यास एक शंकरा खेरीज कोणी नाहीं परंतु दुसरी आज प्रतिज्ञा करितों कीं, पांडवांकडील एका महार थ्यास मारीन आणि असा एक व्यूह करीन कीं, तो देवां दिकांसही अभेद्य होईल

परंतु अर्जुन त्या युद्धांतून दूर जाईल अशीतूं कांहीं युक्ती कर असें ऐकतांच स मसप्तक अर्जुनास युद्धाकरितां दक्षिणदिशेस हांक मारूं लागले त्या काळीं अर्जुन समसप्तकांकडे जाऊन मोठें भयंकर युद्ध करूं लागला इकडे द्रोणानें दोनप्रहरच्या वेळेस सूर्य तप्त होऊन जसा दृष्टीस संताप देतो तसा व्यूह केला. त्या चक्रव्यूहांत धर्मराजाच्या आज्ञेनें अभिमन्यूनें प्रवेश करून हजारों वीर मारले नंतर साहा महारथ्यानीं वेढल्या मुळें दुःशासन पुत्राच्या स्वाधीन होऊन त्यानें प्राणत्याग केला. त्याकाळीं कौरवांस मोठा हर्ष व पांडवांस मोठा शोक झाला असतां सर्वसैन्यामध्यें युद्धाचा अवहार झाला. धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, सर्वयोध्यांमध्यें श्रेष्ठ जो अभिमन्यु याचा प्राण घेतला येणें करून माझें मन तर फारच उदास झालें काय हा क्षत्रियधर्म कोणी केला असेल आपले हिताकरितां बालाचा मात्र नाश केला तस्मात् क्षत्रियधर्मास धिकार असो! आतां शस्त्रास्त्र विद्येमध्यें निपुण जो अभिमन्यु यास कोणी कसें मारलें हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, अभिमन्यू व्यूह भेद करून पराक्रम करीत असतां तुझ्या कडील वीरांस मोठें भय उत्पन्न झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

३४ अध्याय चवतीस— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, पांडव गुण, कीर्ति व यश इहीं करून मोठे थोर होते यांची बरोबरी देवही करण्यास समर्थ नाहींत त्यामध्यें धर्मराज तर इंद्रियांचा निग्रह करणारा ब्राह्मणाविषयीं त्याची मोठी भक्ती निरंतर सुख स्वर्गवासा प्रमाणें भोगणारा तस्माच भीमसेन परशुराम व यम यां सारखा आहे, प्रतिज्ञा पालन करणारा अर्जुना समान पृथ्वीवर कोणी नाहीं. भक्ती सौंदर्य नम्रता व इंद्रियनिग्रह व पराक्रम इत्यादि गुणांनि बरोबरी करण्यास नकुला शिवाय कोणीच नाहीं गांभीर्य पराक्रम येणें करून युक्त जो सहदेव याचे गुणास दुसरा कोणी योग्य नाहीं. कृष्णामध्यें जे गुण व पांच पांडवांमध्यें जे गुण ते एकट्या अभिमन्युत होते ते असे कीं, युधिष्ठिरा सारखें वीर्य कृष्णा सारखा आचार भीमा सारखा पराक्रम अर्जुनास मानरूप सहदेवासारखा नम्र व नकुला सारखा रूपवान असा होता. धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया असा जो अभिमन्यु तो युद्धांत कसा मरण पावला?

हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, आचार्यांनीं चक्रा साररवा व्यूह करून इंद्रासाररवे पराक्रमी जे राजे व तुझे पुत्र यांस ठिकठिका णीं उभे केले व सर्व राजे प्रतिज्ञा करून अभिमन्यूवर धांवले त्याकाळीं तुझा पुत्र दुर्योधन सेनेच्या मध्यभागीं उभा होता त्याचे जवळ कर्ण दुःशासन उभे होते. द्रोणाचार्य, कर्ण दुःशासन, जयद्रथ यां सहवर्तमान अग्रभागीं उभे होते जयद्रथाच्या पाठीमागें अश्वत्थामा व तुझे तीस पुत्र उभे होते. गांधार राजा, शकुनी, शल्य भूरिश्रवा हे महारथी जयद्रथाचे बाजूस उभे होते अशी आचार्यांनीं व्यूहाची योजना केली असतां उभयतांच्या युद्धास आरंभ झाला. असा विषय अध्यायांत आहे.

३५. अध्याय पसतीस— संजय सांगतो हे राजा, पांडवांकडील सात्यकी, चेकितान, धृष्टद्युम्न, द्रुपद, अभिमन्यु, नकूल, सहदेव, घटोत्कच, युधामन्यु, शिखंडी, उत्तमौजा, विराट, द्रौपदीचे पांच पुत्र इत्यादिक योद्धे हातांत शस्त्रास्त्रें घेऊन भारद्वाजाशीं युद्ध करण्या करितां धांवले तेव्हां भारद्वाजानें बाण वृष्टीनें सर्वांचें निवारण केलें हें पाहून धर्मराज बोलतात हे अभिमन्यू, या चक्रव्यूहाचें भेद करण्याचें ज्ञान तूं व अर्जुन कृष्ण व प्रद्युम्न यांचें यांवांचून दुसरे कोणास नाहीं यास्तव अर्जुन येऊन आमची निंदा न करील असें कर असें ऐकून अभिमन्यू ह्मणतो हे महाराज पितरांच्या जयाकरितों द्रोणाचार्यांच्या व्यूहाचा भेद करितों या व्यूहाचा भेद करण्याचा उपदेश पूर्वीं अर्जुनानें केला आहे परंतु माघारी येण्याचा मात्र केला नाहीं. असें भाषण ऐकून धर्मराज ह्मणतात हे वत्सा, तूं व्यूह भेद करून ज्या द्वारानें जाशील त्या द्वारानें आह्मीं पाठीमागून तुझें संरक्षण करितां येतों. असें युधिष्ठिर बोलल्यावर भीम ह्मणतो हे मुला, तूं कांहीं चिंता करूं नको एकदां तूं व्यूह भेद केलास ह्मणजे तुझ्यापाठीमागें मी, धृष्टद्युम्न सात्यकी, केकेय, पांचाल इत्यादि येऊन मोठमोठ्या वीरांस मारूं असें ऐकून अभिमन्यु ह्मणतो जसा पतंग अग्नींत उडी घालतो तसा मी आज द्रोणाच्या व्यूहावर उडी घालून दोन्ही वंशास हितावह मामा व पिता यांस प्रीती कारक असें आज कर्म करतों व दुसरी अशी प्रतिज्ञा करतों कीं हे स

वं योद्धे मला पहात असतां एक रथानें सर्व कौरव योध्यांचा नाश करीत चक्र-व्यूहाचा भेद करून आंत जातों न जाईन तर अर्जुना पासून सुभद्रेच्या उदरांत जन्मच घेतला नाहीं. अशीप्रतिज्ञा केल्यावर युधिष्ठिरराज आशीर्वाद देत ह्मणतात कीं, हे अभिमन्यु, तुझ्या बलाची वृद्धी असो द्रोण सैन्यास जिंकीन ह्मणोन जी प्रतिज्ञा केलीस ती तुझी सफल होवो रुद्र व देव यांच्यासारखे जे आमचे योद्धे हे तुझें संरक्षण करोत. असें ऐकून अभिमन्यूनें सारथ्यास द्रोणाचार्यांच्या सैन्याकडे रथ चालीव ह्मणोन आज्ञा केली. अ॰ ३५.

३६ अध्याय छत्तीस.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, अभिमन्यूनें सारथ्यास द्रोणाचार्यांकडे रथ नेण्यास सांगितला त्या कालीं सारथी बोलतो हे अभिमन्यु, पांडवांनीं सर्व भार तुझ्यावर ठेविला तस्मात् चांगलेरीतीनें द्रोणाच्यार्यांसीं युद्ध कराल परंतु मला असें वाटतें कीं, द्रोण तर शस्त्रास्त्र विद्येमध्यें परम निपुण आहेत तूं तर अस्त्रविद्येमध्यें फार निपुण आहेस असें नाहीं याजकरितां द्रोणा बरोबर युद्ध कसें करिशील. असें ऐकून अभिमन्यु ह्मणतो हे सारथे, क्षत्रियकर्मामध्यें निपुण जो द्रोणाचार्य अथवा देवां सहवर्तमान इंद्र, भूतांसहवर्तमान शंकर यांतून कोणीही मज बरोबर युद्धास आल्यास त्याचा पराभव करण्यास मी समर्थ आहें. कौरवांचें सैन्य तर पराक्रमा विषयीं माझ्या सोळावे कले प्रमाणें ही नाहीं. हे सारथे, फार काय सांगूं माझा मातुल जो श्रीकृष्ण व साक्षात् पिता जो अर्जुन हे ही युद्धांत आले असतां त्यांचा पराभव करण्यास सोडणार नाहीं. असें निर्भय वचन ऐकून सारथ्यानें द्रोणाकडे रथ नेला. द्रोणाचार्य प्रमुख कौरवांचे रथी अभिमन्यु आला असें पाहून त्याजवर धांवले तेव्हां अभिमन्यु कौरवांवर धांवला कौरवांनीं अभिमन्यूवर बाण वृष्टी केली त्या कालीं कौरव पांडवांच्या योध्यांचा संग्राम प्रवृत्त झाला असतां अभिमन्यूनें त्या संधींत द्रोणाच्या व्यूहाचा भेद करून आंत प्रवेश केला हें पाहून कौरवांकडील हजारों योद्धे, गज, अश्व, पायदळ घेऊन अभिमन्यूवर धांवले त्यावेळेस नाना प्रकारच्या वाद्यांचा गजर होऊं लागला. या प्रकारें कौरव सैन्यांत गर्दी झाली असतां अभिमन्यूनें आपल्यास मारण्यास आलेल्या योध्यांचे रथ मोडले कोणाचे बाहू कोणाचीं मुगुटें

सहित शिरें एक मुहूर्तांत तोडलीं. संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, त्याकाळीं तुझे पुत्र आपले बंधु व आप्त यांस मारलेले पाहून पळण्याची मसलत करूंलागले. असा विषय अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतीस.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, अभिमन्यूनें कौरव सैन्याचा पराभव केला असें पाहून दुर्योधन प्रमुख अभिमन्यूवर धांवले हें पाहून द्रोणाचार्य ह्मणो लागला कीं, हे योद्धे हो अभिमन्यूचें निवारण मी करतों तुह्मीं सर्वमिळोन दुर्योधनाचें रक्षण करावें असें ऐकतांच सकल वीरानीं दुर्योधनाच्या रक्षणास जाऊन अभिमन्यूवर बाणानी वृष्टी केली त्या बाण वृष्टीनें अभिमन्यु क्रुध्य होऊन त्यानें कौरवांचे रथी, सारथी व घोडे यांसमारून त्यांचा पराभव केला. पुनः कौरवांकडील योद्धे रथांत बसून अभिमन्यूवर बाणाची वृष्टी करूंलागले ते सर्वबाण अभिमन्यूनें अंतरिक्ष असतांच तोडले नंतर कौरवांचे योद्धे फारच क्रोधित होऊन अभिमन्यूवर बाणवृष्टी करूं लागले त्याकाली अभिमन्यूनें सर्व कौरवांचें सैन्य थोपून धरिलें. असें अभिमन्यु व कौरव यांचें युद्ध होत असतां अभिमन्यूवर दुःसह, दुःशासन, कृपाचार्य, द्रोणाचार्य, विविंशती, कृतवर्मा, बृहत्‌बल, अश्वत्थामा, दुर्योधन इत्यादिकानीं बाण वृष्टी केली नंतर अभिमन्यूनें कृतवर्मादिक जे कौरवांचे योद्धे यांस तीनतीन बाणें करून वेधून-आपली धनुर्विद्या दाखवावी ह्मणोन आश्मकेश्वर नामक राजाकडे आपला रथ वळविला आणि दहा बाणानीं त्यास वेधून सारथी व घोडे मारले नंतर राजाचें बाहू शीर तोडून पृथ्वीवर पाडलें तें पाहून सर्वसैनिकांची फुटाफूट होऊंलागली तेव्हां कर्ण, कृपाचार्य, द्रोण, अश्वत्थामा दुर्योधन इत्यादिकानीं अभिमन्युवर बाणाची वृष्टी केली त्यावृष्टीनें अभिमन्यु किंचित् दुःखित-होऊन त्यानें परकायेचा भेदकरणारा असा बाण धनुष्यास लाऊन कर्णावर टाकिला तो बाण कर्णाचें चिलखत व हृदय यांचा भेदकरून पृथ्वींत शिरला त्या बाणाचे दुःखानें कर्ण व्याकूल होऊन कांपूं लागला इतक्यांत सुषेण, दीर्घलोचन व कुंडभेदी यांस निशित बाणें करून ताडन केलें नंतर अभिमन्यूस कर्णानें पंचवीस, अश्वत्थाम्यानें वीस, कृतवर्म्यानें सात बाणें करू

न वेधला तेव्हां अभिमन्यु क्रोधित होऊन त्यानें शल्यावर बाण वृष्टी केली-त्यामुळें शल्यास किंचित् मूर्च्छा येऊन तो रथामध्यें पडला हें पाहून दुर्योधनादिक पळूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतीस— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, अभिमन्यु तीक्ष्णबाणें करून कौरव सैन्याचा नाश करीत असतां आमच्या कडील कोणच्या योध्यानीं त्याचें निवारण केलें? असें ऐकून संजय सांगतो हे राजा, शल्य मूर्च्छित झाला हें पाहून त्याचा धाकटा बंधु क्रोधानें अभिमन्युजवळ आला आणि दहा बाणें करून अभिमन्यूचे घोडे व सारथी यांस त्यानें वेध केला इतक्यांत अभिमन्यूनें आपल्या बाणें करून शल्याच्या भावाच्या रथाचे घोडे मारून छत्र व ध्वज तोडला आणि दुसरे बरोबर आलेले योद्धे व चक्ररक्षक सारथी यांस मारून भल्ला कार बाणानीं त्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें हें पाहून सेवक व त्याचे दुसरे बंधु दाही दिशेस पळाले तेव्हां दुसरे कौरवांचे योद्धे हातांत शस्त्रास्त्रें घेऊन अभिमन्यूवर चालून गेले तेव्हां अभिमन्यूनें कृष्णानीं व अर्जुनानीं दिलेलीं अस्त्रें त्या योध्यांवर टाकावयाची योजना करून धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला आणि सूर्यासारख्या तेजस्वी बाणांची त्या योध्यांवर वृष्टी केली त्या बाण वृष्टीनें योद्धे पळूं लागले. असा विषय अध्यायांत आहे.

३९ अध्याय एकुणचाळीस— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, माझ्या पुत्राच्या सैन्याचा अभिमन्यूनें पराभव केला तेणें करून मला तर फारच दुःख झालें यास्तव अभिमन्यूनें कौरवांसी युद्ध कसें केलें तें मला सांग. असें ऐकून संजय ह्मणतो हे राजा, अभिमन्यूनें सर्व कौरवांचे रथी कृपाचार्य, द्रोणाचार्य, कर्ण, शल्य व दुर्योधन इत्यादिकांच्या भोंताली आपला रथ फिरवून बाणवृष्टी केली त्याकालीं भारद्वाज कृपाचार्यां कडे पाहून ह्मणतात कीं हे आचार्य, हा अभिमन्यु आपल्या सुहृदांस आनंद करीत सैन्यांत कसा फिरतो हें पहा याच्या सारखा युद्धामध्यें दुसरा कोणी ही नाहीं असा जो धनुर्धर यास मारण्यास माझी इच्छा झाली तथापि मीं मारीत नाहीं. असें ऐकून दुर्योधन, कर्ण, बाल्हिक, दुःशासन, शल्य इत्यादिकांस भा-

षण करतो कीं, हे योद्धे हो, हा द्रोणाचार्य आपल्या शिष्याचा पुत्र जो अभिमन्यू यास मारण्याची इच्छा करित नाहीं आणि ह्मणतो कीं, यास साक्षात यम ही मारण्यास समर्थ नाहीं मग आमच्या मानवांची कथा काय? अभिमन्यू तर मीच पराक्रमी ह्मणोन आपले ठिकाणीं मानितो याज करितां सर्वांनीं त्याचें निवारण करावें. इतकें दुर्योधनाचें भाषण ऐकतांच सर्व राजे तत्काल अभिमन्यूस मारण्यास धांवले हें पाहून दुःशासन भाषण करतो- हे दुर्योधना, आज मी पांडव व पांचाल यांचे समक्ष अभिमन्यूचा संग्रामांत ग्रास करीन नंतर अभिमन्यू मेला असें ऐकतांच कृष्ण व अर्जुन तत्काल आपला प्राणत्याग करतील. अर्जुन कृष्ण यांणीं प्राण टाकिल्यावर दुसरे पंडुचे पुत्र हतसाह्य होऊन आपला प्राण देतील याज करितां अभिमन्यूस मारण्यास उद्युक्त होतों तुझा मला आशीर्वाद असो. असें बोलून- दुःशासनानें अभिमन्यूवर शरांची वृष्टी केली अभिमन्यूनें वीस बाणें करून दुःशासनास ताडण केलें पुनः दुःशासनानें अभिमन्यूवर बाणवृष्टी केली त्या कालीं अभिमन्यू व दुःशासन युद्ध करीत असतां नाना प्रकारचीं सव्यदक्षिण रथाचीं मंडलें करूं लागले व सैन्यामध्यें शंख, मृदंग, दुंदुभी, भेरी इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं. असा विषय या अध्यायांत आहे.

४० अध्याय चाळीस— संजय सांगतो हे राजा, या प्रकारें अभिमन्यु व दुःशासन यांचें युद्ध होत असतां अभिमन्यु बोलतो हे निष्ठुर भाषण करणाऱ्या दुःशासना, तूं आज माझ्या समोर दैवानें आलास तुला आज मी माझा पराक्रम दाखवितों. अरे कौरव सभेंत धृतराष्ट्र असतां तूं धर्मराजाची निंदा करून त्यास क्रोधित केलास याचें फल आज तुला दाखवितों तूं यमलोकास गेलास ह्मणजे मी पितरांचे ऋणापासून मुक्त होईन. अरे पतिव्रता जी द्रौपदी इची सभेंत विटंबना केलीस त्या योगें हें तुला फल प्राप्त झालें याज करितां रणांतून गेलास तर तुला जिवंत सोडणार नाहीं. असें बोलून अभिमन्यूनें त्यावर काला सारख्या बाणाचा प्रहार केला तो बाण दुःशासनानें त्दृदय फोडून गेला. पुनः अभिमन्यूनें अग्नी सारख्या तेजस्वी पंचवीस बाणें करून ताडण केलें तेणें करून दुःशासन रथामध्यें मूर्च्छित पडला.

हें पाहून सारथ्यानें रथ रणापासून नेला. नंतर पांचाल,सृंजय व पांडव यांनीं युधिष्ठिरास पुढें करून द्रोणावर हल्ला केला त्या कालीं आचार्याचें व पांडवांचें युद्ध मोठें भयंकर झालें. असें भयंकर युद्ध चाललें असतां दुर्योधन भाषण करतो हे कर्णा, पहा बरें अभिमन्यूनें रणाचे ठायीं दुःशासनास मूर्च्छित केला व सिंहासारखे पराक्रमी पांडव अभिमन्यूचें संरक्षण करण्यास आले आहेत असें ऐकतांच कर्णानें अभिमन्यूवर बाणांची वृष्टी केली; त्या कालीं कर्णाच्या अनुचरांनींही तीक्ष्ण वृष्टी केली. अभिमन्यु त्याहातर बाणांनीं कर्णास वेधून द्रोणाचार्यांवर धांवला असतां अभिमन्यूचें निवारण करण्यास एकही योद्धा पुढें आला नाहीं पुन: कांहीं वेळानें कर्णानें अभिमन्यूवर अस्त्रांची वृष्टी केली त्या अस्त्रांनीं अभिमन्यु किंचित् पीडित होऊन त्यानें कांहीं वेळानें भल्लाकार बाणांची कर्णावर वृष्टी करून छत्रध्वज तोडून सारथी व अश्व मारिले नंतर कर्णानें नतपर्व बाणांनी अभिमन्यूवर वृष्टी केली असतां ते बाण अभिमन्यूनें सहन करून एक मुहूर्तांत एक बाणानें कर्णाचा ध्वज धनुष्य छेदून पृथ्वीवर पाडलें या प्रकारें अभिमन्यूनें कर्णास पीडित केलेला त्याचे कनिष्ठ भावानें पाहून तो धनुष्य धारण करून अभिमन्यूवर धांवला. हें अभिमन्यूचें कृत्य पांडव सैनिकांनीं पाहून अभिमन्यूची स्तुती केली. अ॰ विषय या अध्यायांत आहे.

४१ अध्याय एकेचाळीस— संजय ह्मणतो हे राजा, नंतर कर्णभ्रात्यानें हस्तांत धनुष्य घेऊन गर्जना करीत अभिमन्युस छत्र ध्वज सारथी व अश्व यां सहित दहा बाणानीं वेध केला त्या बाणें करून अभिमन्यु पीडित झाला हें पाहून तुझे पुत्र बहुत संतोषित झाले नंतर अभिमन्यूनें किंचित् हास्य करून एक कंकपत्री बाणानें कर्णाच्या भावाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें आणि तो इतर योध्यावर धांवला. त्या कालीं गजाश्वरथ पदाती यांस अभिमन्यूनें पीडित केलें असतां संपूर्ण तुझें सैन्य पळालें त्यांत जयद्रथ मात्र पळाला नाहीं. अभिमन्यूनें रथ अश्व गज यांचा नाश करून कोणाचीं शिरें कोणाचे बाहू कोणाचीं सुवर्णाच्या मालांनी व कुंडलांनीं सुशोभित शिरें तोडून पृथ्वीवर पाडलीं असा विषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळीस :— धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, वयाने लहान, आपल्या बाहूबलें करून विख्यात, योध्यांत श्रेष्ठ व सर्वांस मान्य असा जो अभिमन्यु त्यानें कौरवांच्या सैन्यांत ज्याकाळीं प्रवेश केला त्या काळीं पांडवांकडील योद्धे कोणी बरोबर होते किंवा नव्हते हें मला सांग. असें ऐकून संजय ह्मणतात हे राजा, अभिमन्यूनें कौरवसैन्यांत जेव्हेळेस प्रवेश केला त्यावेळेस बरोबर युधिष्ठिर, भीमसेन, शिखंडी, सात्यकी, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद इत्यादि पाठीमागें होते तेव्हां कौरवांकडील योद्धे युधिष्ठिरादिकांस पाहून पळाले हें पाहून जयद्रथानें पांडवांकडील योध्यांचा पराभव केला. असें ऐकून धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, जयद्रथ एकटा असतां त्यानें पांडवांचा पराभव कसा केला? व त्यानें पूर्वी कांहीं तप व होम हवन इत्यादि अनुष्ठान केलें होतें किंवा काय? असें ऐकून संजय ह्मणतात हे राजा, पूर्वी पांडव वनवासांत असतां जयद्रथानें कपटें करून अरण्यांत द्रौपदीचें हरण केलें त्या काळीं भीमसेनानें त्याचा पराभव व बहुत प्रकारें विटंबना करून द्रौपदीस माघारी आणिली तेणेंकरून जयद्रथास मोठा संताप होऊन त्यानें शिवाचें आराधन केलें त्या काळीं भगवान शिव स्वप्नामध्यें जयद्रथास ह्मणतात की, तूं कोणाच्या कारणास्तव हें घोर तप करितोस बरें आतां तुझा तपें करून मी संतुष्ट झालों वर माग. त्याकाळीं जयद्रथ भाषण करतो. हे भगवन, युद्धामध्यें मी एकटा पांडवांचा पराजय करीन असा वर दे हें ऐकून शिव ह्मणतात जे वेळेस अर्जुन पांडवांच्या सैन्यांत नसेल ते दिवशीं तूं चौघांजणांचा एकटा पराभव करशील असा वर दिला त्या वराच्या योगानें जयद्रथानें पांडवांचा पराभव केला त्याकाळीं आपला पराभव झाला असें पाहून पांडवांचे सैनिक माघारे फिरले व कौरवांकडील योध्यांस हर्ष झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळीस :— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, जयद्रथ रथांत बसून अभिमन्यूच्या भयानें जी सेना पळाली होती ती सर्व एकत्र करून पांडवांकडील योध्यांवर बाणवृष्टी करूं लागला. धर्मराजानें भल्लसंज्ञक बाणानीं जयद्रथाचें धनुष्य तोडलें नंतर जयद्रथानें दुसरें धनुष्य घे

ऊन पार्थास दहा व दुसरे योद्धे यांस तीन तीन बाण मारिले भीमानें जयद्रथा नें ध्वज, धनुष्य तोडलें नंतर जयद्रथानें दुसरें धनुष्य घेऊन भीमाचा ध्वज व धनुष्य तोडून अश्वांस वेध केला तेव्हां भीम रथाखालीं उडीटाकून सात्यकीच्या रथांत बसला. हें पाहून तुझे पुत्र वाहवा ह्मणोन शब्द करूं लागले. अभिमन्यूनें चक्रव्यूह भेद करते वेळेस रथाश्व, गज, पदाती यांस मारून धर्मराजा दिकांस आंत जाण्या करितां जो मार्ग केला होता तो जयद्रथानें बंद करून टाकिला. त्याकालीं पांडवांचे योद्धे व्यूह भेद करण्यास जेजे उद्योग करीत त्या सर्वांनें जयद्रथानें निवारण केलें. अ· वि· या अ· आहे.

४४ अध्याय चवेचाळीस:— संजय ह्मणतात हे राजा, जयद्रथानें पांडवांचा चक्रव्यूहांत प्रवेश करण्या विषयीं निरोध केला असतां अभिमन्यूस मोठा राग येऊन तो कौरव सैन्यांत शिरला त्याकालीं कौरवांच्या योध्यानीं अभिमन्यूवर बाणांची वृष्टी केली तेव्हां अभिमन्यूनें वृषसेनाचा ध्वज व धनुष्य तोडुन सारथी मारिला आणि अश्वांवर बाणांचा प्रहार केला तेव्हां वृषसेनाच्या अश्वानीं रथ रणाबाहेर नेला हें पाहून अभिमन्यूच्या सारथ्यानें त्याचा रथ पुढें चालविला तेव्हां वसाती यानें अभिमन्यूस साठ बाणानीं ताडण करून प्रतिज्ञा केली कीं, आजजर अभिमन्यू या रणभूमीचे ठायीं जिवंत राहीलतर मी आपला जीव ठेवणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून तो अभिमन्यूवर बाणवृष्टी करीत असतां अभिमन्यूनें एक बाणानें वसाती याचें शिर छेदून पृथ्वीवर पाडलें. हें पाहून सर्व सैनिक अभिमन्यूस मारण्या करितां धनुष्याचे शब्द करूं लागले. त्याकालीं अभिमन्यूचें व कौरवांचें मोठें घोर युद्ध होऊन अभिमन्यूनें कित्येक योद्ध्यांचीं बाणांसहित धनुष्यें तोडलीं व कित्येक योध्यांचीं कुंडलानीं सुशोभित शिरें तोडलीं. याप्रमाणें अभिमन्यु सर्व सैन्याचा नाश करीत सूर्यासारखा उभा असतां त्यास पाहण्याविषयीं कोणीच समर्थ झाले नाहींत. असा विषय या अध्यायांत आहे.

४५ अध्याय पंचेचाळीस— संजय ह्मणतात हे राजा, अभिमन्यु कौरव सैन्याचा प्राण घेत असतां सत्यश्रवा, अभिमन्यूस मारावें ह्मणून

पुढें आला तों अभिमन्यूनें सत्यश्रव्यास मारिलें तेव्हां अभिमन्यूवर एका एकीं कौरवांचे सर्व योद्धे धांवले त्याकालीं अभिमन्यूनें त्यासर्वांस मारून टाकिलें हा अनर्थ पाहून कौरवांची सेना पळूं लागली. तेव्हां शल्याचा पुत्र रुक्मरथ कौरवसैन्यास ह्मणतो हे योद्धे हो, तुह्मीं भिऊंनका मी अभिमन्यूस जिवंत धरितों असें ह्मणोन त्यानें अभिमन्यूवर बाणवृष्टी केली इतक्यांत अभिमन्यूनें त्याचें धनुष्य तोडून शिर पृथ्वीवर पाडलें तेव्हां रुक्मरथाचे स्नेही शंभर राजपुत्र याणीं अभिमन्यूवर बाणांचा वर्षाव केला. त्या वृष्टीनें अभिमन्यु अगदीं आच्छादित होऊन दिसेनासा झाला हें पाहून दुर्योधन अभिमन्यु मेला असा निश्चय करून हर्ष पावला. पुनः त्या राजपुत्रानीं अभिमन्यूचा सारथी व ध्वज व्यास करून टाकिला असतां अभिमन्यूनें तुंबरु प्रमुख गंधर्व याणीं अर्जुनास दिलेलें गांधर्व अस्त्र या राजपुत्रांवर टाकिलें त्या अस्त्राच्या योगानें अभिमन्यूच्या हजारों व्यक्ती दिसों लागल्या त्यामुळें राजपुत्र मोहित होऊन अभिमन्यूस मारण्याच्या इच्छेनें धांवत असतां आपल्याच योध्यांस मारूं लागले त्याकालीं अभिमन्यूनें राजपुत्रांचीं धनुष्यें व बाहू तोडून शिरें तोडलीं हें पाहून दुर्योधनादिक युद्धापासून परान्मुख झाले. अ. वि. या अ. आहे.

४६. अध्याय शेचाळीस— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, एकट्या अभिमन्यूनें योध्यांसहवर्तमान सर्व कौरवांस युद्ध करून पराजित केलें, हें आश्चर्य मला सांगतोस तर तेव्हां माझे पुत्र अभिमन्यूस मारण्याविषयीं कोणाची योजना करूं लागले ते मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, अभिमन्यूनें दुर्योधनादिकांस परान्मुख केलें त्याकालीं द्रोणाचार्य-अश्वत्थामा, बृहतबल, कृपाचार्य, दुर्योधन, कर्ण, कृतवर्मा, शकुनी हे कौघानें अभिमन्यूवर एकदांच धांवले असतां एकट्या अभिमन्यूनें त्यांचें निवारण केलें त्याकाळीं दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण हातांत धनुष्य घेऊन अभिमन्यूचे समोर आला त्यास साहाय्य करण्यास दुर्योधन ही मागून आला असतां इतरही महारथी त्याचे साहाय्यार्थ आले आणि अभिमन्यूवर बाणवृष्टी करूं लागले तेव्हां अभिमन्यूनें त्यासर्व बाणांचे निवारण करून लक्ष्मणास भाषण केलें अरे मुला, तुझे बांधव सर्व पहात असतां तूं आज ह्यालो

करावून यमलोकास जाशील असें ह्मणोन सर्पासारख्या बाणानें लक्ष्मणाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें त्याकालीं सर्व क्षत्रि यांचीं धैर्येंच तुटलीं तेव्हां द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, अश्वत्थामा, बृहद्बल, कृतवर्मा हे साहा रथी अभिमन्यूचें निवारण करण्या करितां आले हें पाहून अभिमन्यूनें त्यांचा पराभव केला व तो जयद्रथाचे सैन्याकडे जाऊं लागला. हें पाहून कलिंग, निषाद व क्राथ पुत्र यांणीं गज सैन्यासह अभिमन्यूचा मार्ग रोधला असतां अभिमन्यूनें त्या गजसैन्याचा नाश केला हें पाहून क्राथ याणें अभिमन्यूवर बाणांची वृष्टी केली इतक्यांत द्रोणादि रथी अभिमन्यूवर धांवले त्यांचें अभिमन्यूनें बाणानीं निवारण करून क्राथपुत्राचें ही निवारण केलें पुनः क्राथा च्या पुत्रानें वृष्टी केली तेव्हां अभिमन्यूनें क्राथ पुत्राचा ध्वज व रथ मोडून क्राथ पुत्राचें शिर तोडलें. असा विषय या अध्यायांत आहे.

४७ अध्याय सत्तेचाळीस— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, अभिमन्यु युद्ध करीत असतां त्याचें कोणी निवारण केलें हें मला सांग. असें ऐकून संजय सांगतो अभिमन्यूनें योध्यांस पराजित केलें हें पाहून द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, बृहद्बल, कृतवर्मा हे अभिमन्यूचें निवारण करण्यास प्रवृत्त झाले त्या काळीं जयद्रथ सैन्या सह वर्तमान युधिष्ठिराशीं युद्ध करण्यास गेला इकडे अभिमन्यूवर कौरवांच्या योध्यानीं बाणांची वृष्टी केली त्या सर्व बाणांचें अभिमन्यूनें निवारण करून द्रोणाचार्यास पंनास, बृहद्बलास वीस, कृतवर्म्यास ऐंशी, कृपाचार्यास साठ, अश्वत्थाम्यास दाहा बाण मारून कर्णाचे कानावर बाणाचा वेध केला. आणि कृपाचार्याचे अश्व व चक्ररक्षक मारिले तेव्हां कृपाचार्यांनीं अभिमन्यूस दहा बाण मारिले इतक्यांत अभिमन्यूनें कुरुकुलांतील विख्यात वृंदारक नामक योध्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें हें पाहून अश्वत्थाम्यानें पंचवीस बाण अभिमन्यूवर टाकिले तेव्हां अभिमन्यूनें तीक्ष्ण साठ बाण अश्वत्थाम्यास मारिले त्या बाणानीं अश्वत्थामा भयभीत न होतां पर्वता सारखा उभा राहिला. तुझ्या पुत्राच्या हिता करितां द्रोणानीं शंभर, अश्वत्थाम्यानें साठ, कर्णानें बेवीस, कृतवर्म्यानें वीस, बृहद्बलानें पन्नास, कृपाचार्यांनीं दहा बाण अभिमन्यूस मारले त्या सर्व बाणांनें

अभिमन्यूनें निवारण करून सर्वांस दहा बाण मारिले या युद्धानें अभिम न्यु बहुत त्रासून क्रोधानें इकडे तिकडे पाहूं लागला. इतक्यांत कोशल देशचा राजा बृहद्बल याणें एक बाण अभिमन्यूचे हृदयावर मारला असतां अभिमन्यूनें त्याचा ध्वज व धनुष्य तोडून घोडे व सारथी मारला त्याकाळीं कौशल्याधिपती हातांत ढाल तरवार घेऊन अभिमन्यूस मारावें ह्मणोन त्याचे अंगावर धांवला त्याकाळीं अभिमन्यूनें पुनः बृहद्बलाच्या हृदयांत बाण मारतांच तो पृथ्वीवर पडला. याप्रमाणें अभिमन्यु दहाहजार रथी व बृहद्बल यांस मारून बाकी उरलेले कौरवांचे योद्धे यांजवर बाणांची वृष्टी करीत रणांत संचार करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

४८ अध्याय अठ्ठेचाळीस :— संजय सांगतो हे राजा, याप्रमाणें अभिमन्यु रणामध्यें संचार करीत असतां त्यानें कर्णास पन्नास बाण मारिले तेव्हां कर्णानेंही अभिमन्यूस पन्नास बाण मारिले. असे परस्पर एकमेकांस बाण मारीत असतां दोघेंही रक्तानें भरले. नंतर कांहीं वेळानें अभिमन्यूनें कर्णाचे साहा प्रधान मारिले तसेच दुसरे दहा रथी यांचा प्राण घेतला व मगधाचापुत्र याचा ध्वज तोडून त्याचे अश्व मारून साहा बाणानीं त्यासही मारिला. नंतर भोज व कुंजरकेतन नामक राजे या दोघांवर शरांची वृष्टी करून त्यांस मारिलें त्याकाळीं दुःशासनाच्या पुत्रानीं अभिमन्यूच्या घोड्यास च्यार बाण व सूतास एक बाण व अभिमन्यूस दहाबाण यानीं वेध केला त्याकाळीं अभिमन्यूनें दुःशासनाच्या पुत्रास सात बाणानीं वेध करून भाषण केलें अरे मूर्खा, तुझा पिता तर युद्ध करतां करतां युद्धांतून पळाला आतां दैवानें तुझी गांठ पडली आहे तर आज तुला जिवंत सोडित नाहीं असें ह्मणोन एक बाण त्यास मारिला. हें अश्वत्थाम्यानें पाहून अभिमन्यूवर तीन बाण टाकिले त्याकाळीं अभिमन्यूनें अश्वत्थाम्याचा ध्वज छेदून तीनबाणानीं शल्यास ताडण केलें तेव्हां शल्यानें नऊबाण अभिमन्यूस मारिले असतां अभिमन्यूनें शल्याचा ध्वज तोडून दोन्ही बाजूंचे चक्ररक्षक यांस मारिलें आणि शल्यास दहाबाणें करून ताडण केलें. त्याकाळीं शल्य आपले रथांतून उतरून दु-

सन्याचे रथांत जाऊन बसला. अभिमन्यूनें शत्रुंजय, चंद्रकेतु, मेघवेग, क्रवर्चस व सूर्यभास या पांचांस पांच बाणांनीं मारून शकुनीस ताडन केलें तेव्हां शकुनी तीन बाणांनीं अभिमन्यूस ताडण करून दुर्योधनास बोलला कीं या अभिमन्यूनें पूर्वीं आह्मांस फार दुःख दिलें आहे तरि आपण सर्व मिळून यास मारूं इतकें बोलल्यावर कर्ण द्रोणाचार्यांस भाषण करतो-कीं, या अभिमन्यूनें पूर्वीं आह्मांस फार दुःख दिलें आहे यास्तव याच्या वधाचा उपाय आह्मांस लौकर सांगावा. नाहींतर हा आह्मांस जिवंत सोडीत नाहीं. हें कर्णाचें भाषण ऐकून द्रोणाचार्य भाषण करतात हे कर्णा, या मुलाचें-हस्तकौशल्य व हा बाण सोडितो तो कोणाच्या दृष्टीस देखील पडत नाहीं व ज्याचा रथ रणामध्यें अलात चक्रा सारखा कसा फिरतो व धनुष्या पासून जे बाण सुटतात त्या पैकीं एकही रथी मारल्या खेरीज फुकट जात नाहीं या चे बाण सुटतांच माझे मनास तर फारच आनंद होतो. वारंवार याचें युद्धकौशल्य पाहून मला वाटतें कीं, याजवर एकही बाण टाकूं नये. फार काय सांगूं कीं, अर्जुन देखील याचे समोर तुछ आहे या योध्या प्रमाणें उभय सैन्यांत दुसरा योद्धा सांपडणें मोठें दुर्घट आहे. असें ऐकून कर्ण बोलतो हे आचार्य, आह्मीं अभिमन्यूच्या बाणांनीं पीडित झालों आमच्यानें येथें उभें देखिल राहवत नाहींस लोक हंसतील ह्मणोन आह्मीं उगीच प्राण पोटाशीं धरून राहिलों आहों. यास्तव याच्या वधाचा उपाय आह्मांस लौकर सांगावा. असें ऐकून आचार्य बोलतात हे कर्णा, मीपूर्वीं याचे पित्यास कवच धारण विद्या सांगितली आहे तेणें करून याचें कवच कोणी भेद करण्यास समर्थ नाहीं तर आतां असें करा कीं, याचें कवच व धनुष्य व धनुष्याची दोरी रथाचे घोडे, सारथी तसेच दोन्ही बाजूंचे चक्र रक्षक मारून यास युद्धा पासून पराङ्मुख करा. नंतर मारण्याचा इलाज करा. असें केल्या वांचून हा देव दैत्यानींही जिंकिण्यास शक्य नाहीं. असें ऐकून कर्णानें तत्काल अभिमन्यूचें धनुष्य तोडलें नंतर आचार्यांनीं घोडे मारिले, कृतवर्म्यानें सारथी व चक्र रक्षक मारिले नंतर दुसरे योध्यानीं बाणांची वृष्टी केली. अभिमन्यु आपलीं सर्व आयुधें रथ व सारथी गेले असें पाहून हातांत ढाल तरवारी सहित आकाशमार्गें उडाला त्या काळीं कौरवांचे योद्धे अभिमन्यूचें

आश्चर्य युक्त कर्म पाहून मनांत शंका धरूं लागले. हा खड्गासहित कोणा वर उडी टाकून कोणाचा प्राण घेईल याचा भरवसा नाहीं असें समजून वरपा हूं लागले. त्या काळीं द्रोणाचार्यांनीं तीक्ष्ण बाणें करून अभिमन्यूनें खड्ग तोड लें, कर्णानें ढाल तोडली तेव्हां अभिमन्यु चक्र घेऊन द्रोणावर धांवला. आणि कृष्णासारखा पराक्रम करीत राजमंडळांत शोभूं लागला. अ. वि. अ. आ.

४९ अध्याय एकुणपन्नास.– संजय सांगतो हे राजा, असातो अभिमन्यू चक्र हातांत घेऊन संग्रामांत संचार करीत असतां कौरव सैनिकांनीं त्याचें चक्र छेदिलें तेव्हां अभिमन्यू हातांत मोठी गदा घेऊन अश्वत्थाम्यावर धांवला असतां अश्वत्थामा रथांतून उडी टाकून पळाला नंतर अभिमन्यूनें अश्वत्थाम्याचे पार्ष्णी सारथी व चक्ररक्षक मारून रथाचे तुकडे केले आणि सुबलाचा भाऊ कालिकेय व त्याचे सेवक, गांधार राजाचे पुत्र सत्याहात्तर, वसाती राजे दहा मारिले, कैकयाचे सात रथी व दहा हत्ती मारिले. दुःशासनाच्या पुत्राचा अश्वांसहित रथ मोडला त्या काळीं दुःशासनाचा पुत्र हातांत गदा घेऊन अभिमन्यूशीं युद्ध करूं लागला तेव्हां दोघांचें युद्ध होत असतां उभयतां ही पृथ्वीवर पडले नंतर दुःशासन पुत्रानें हस्तांत गदा घेऊन अभिमन्यू सावध होऊन उठतो इतक्यांत मस्तकावर प्रहार केला. त्यायोगें युद्धाच्या श्रमानें अभिमन्यू मूर्च्छित होऊन पृथ्वीवर पडला. त्याकाळीं धरणीकंप होऊन मोठा वारा सुटला सूर्य तेजोहीन दिसूं लागला. सरोवरें शुष्क झालीं. अभिमन्यूस पडलेला पाहून कौरव सिंहनाद करूं लागले. कौरवांच्या सैन्यातील दुसरे योद्धे यांच्या नेत्रांतून अश्रुपात होऊं लागले आकाशामध्यें यक्ष गंधर्व किन्नरादि आक्रोश करूं लागले. संजय ह्मणतात हे राजा, द्रोण कर्ण प्रभृति साह्मांनीं एकटा अभिमन्यू जो बाल यास मारिला हा अधर्म झाला. जसे समुद्रांतील पर्वत दुरून शोभतात तशीं योध्यांचीं शस्त्रें, शिरें, कलेवरें व हत्तीचीं कलेवरें यांचे ढीग पडलेले रणभूमीमध्यें शोभूं लागले. अशा पृथ्वीवर पडलेल्या अभिमन्यूस पाहून कौरव सिंहनाद करूं लागले व पांडवांस शोक झाला. असा तरुण बाल अभिमन्यू मेला. असतां पांडवांचें सर्वसैन्य पळूं लागलें त्या काळीं धर्मराज बोलला कीं हे वीरहो, अभिमन्यू मेला असें समजून का युद्धा

पासून पराङ्मुख न होतां ज्यानें लक्षावधी योद्धे मारिले व सर्व सैन्य विदारण केलें तो स्वर्गासच गेला. भिऊंनका हे सर्व रिपू आज यमलोकास पाठवितों असें ह्मणोन धर्मराजानें आपलेसैन्यास अश्वासन दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नास.— संजय ह्मणतात हे राजा, कौरवानीं पांडवांचा एक श्रेष्ठवीर अभिमन्यु यास मारल्यानंतर पांडवांच्या बाणानीं पीडित झालेले व रक्तानें भरलेले तुझे वीर सूर्य अस्तास गेल्यावर आप आपल्या शिबिराकडे गेले. पांडवही आमचे समक्ष अत्यंत दीन होऊनशिबिरांतगेले त्याकालीं रणभूमी मोठी भयंकर दिसूं लागली हजारों श्वापदें आंत प्रवेश करून मांस भक्षण करूं लागलीं काय हो आश्चिर्यपहा काळानें कोणास सोडलें नाहीं. कोल्हे कुत्रे कावळे इत्यादि श्वापदानीं मेलेल्या मनुष्यांचीं डोकीं, पोटें विदारण करून मांस भक्षण केलें आणि ते संतुष्ट होऊन मनांत ह्मणतात कीं, आज आपला दिवस सणाचा आला आहे असा दिवस वारंवार येवो या प्रमाणें रणभूमी एकाएकीं भयंकर दिसूंलागली. अ. वि. या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्न.— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, कौरवांनीं अभिमन्यूस मारिलें हें पाहून पांडवांचे योद्धे दुःखानें अभिमन्यूची प्रशंसा करीत करीत धर्मराजाजवळ येऊन बसले त्याकालीं धर्मराज मोठ्या दुःखानें विलाप करून ह्मणतो कीं, अभिमन्यू द्रोणानीं केलेल्या व्यूहाचा भेद करून आंत शिरला आणि त्यानें मोठमोठे अस्त्र विद्या विशारद योद्धे मारून दुःशासनाचाही पराभव केला, परंतु दैव योगानें दुःशासनाच्या पुत्रानीं त्यास मारिलें आतां अर्जुन व सुभद्रा यांस तोंड कसें दाखवूं! श्रीकृष्ण भगवान् आणि अर्जुन हे ह्मणतील कीं, आपल्या हिता करितां माझा पुत्र मारविला भोजन व अलंकार इत्यादिक ज्या बालकास प्रथम द्यावयाचे तो अभिमन्यू आज आह्मीं युद्धामध्यें पुढें करून मारिला त्याची विद्या पूर्ण झाली होती असें नाहीं. ही गोष्ट अर्जुनास कळतांच तो क्रोधानें आह्मांस जाळण्यास सिद्ध होईल परंतु मला असें वाटतें कीं, कौरवानीं अधर्मानें या बालकास मारिलें येणें करून अर्जुन मोठा क्रुद्ध होऊन कौरवांचा सैन्य रूप जो साग

र याचें एकाएकीं सोषण करील नंतर दुर्योधन ही आपले सैन्याचा नाश झा ल्यावर आपले जीवित्वाचा धिःकार करील आतां आमचा जय होवो अथवा आह्मांस इंद्राची संपत्ती मिळो परंतु अभिमन्यूच्या शोकानें त्या सर्वसंप- त्तीचा उपभोग करावा अशी इच्छा होत नाहीं. अ. नि. अ. आहे.

५२ अध्याय बावन्न :— संजय ह्मणतात हे राजा, असा तो धर्म राज नानाप्रकारचे विलाप करीत असतां अकस्मात् व्यास तेथें आले ते- व्हां धर्मराजानीं त्यांचें अर्घ्यपाद्यादिकें पूजन करून आसनावर बसवि लें आणि शोकानें भाषण केलें हे भगवन् अधार्मिक जे कौरवांचे योद्धे या णीं बाल जो अभिमन्यु याम मारिलें आह्मी पूर्वी त्या बालकास चक्रव्यूह भेद करण्यास तूं पुढें हो आह्मी पाठी मागोन येतों ह्मणोन सांगितलें त्या प्रमाणें तो चक्रव्यूह भेद करून आंत शिरला आणि त्याचे संरक्षणास आ ह्मीं पाठीमागोन जाऊं लागलों तों व्यूहाच्या मुखासीं जयद्रथ उभा होता त्या नें आमचा सर्वांचा पराभव करून आह्मांस आंत जाऊं दिलें नाहीं अभि मन्यू मात्र एकटा आंत गेला आणि कालमुखांत सांपडून मृत्यु पावला हें एक दुःख व ज्याची योग्यता आमचा पराभव करण्यास नसून त्याणें आ मचा पराभव केला. हें दुसरें दुःख त्या दुःखानें मला आतां कांहीं सुचत नाहीं. असें ऐकून व्यास धर्मराजाचें शांतवन करतात हे धर्मा, तूं मोठा ज्ञा नी सर्वशास्त्र जाणणारा असा असतां या दुःखांत निमग्न होऊन शोक क रितोस हें आश्चर्य आहे. ज्या अभिमन्यूनें हजारों रथी मारून अलौकि क कर्म केलें तो कुत्सित लोक टाकून स्वर्गासच गेला. मरणा पासून देव दान व हेहि चुकले नाहींत. असें ऐकून युधिष्ठिर भाषण करतात हे व्यासा, हजा रों हत्तींचें ज्यांस बल असे राजे पृथ्वीवर मरून पडले आहेत हे मेले असें मी समजत नाहीं कांकीं त्या राजांचा निश्चयच होता कीं, आह्मीं जिंकूं आम चा जय असावा शत्रूचा नाश करूं अशा भावनेने जे मेले ते कांहीं मेले अ सें समजूं नये; परंतु अभिमन्यूस तसें नसतां आह्मीं त्यास उत्तेजन दिल्या मुळें तो आपल्या प्राणास मुकला ते व्हां तो कोण लोकास गेला असेल तो न कळे. याज करितां हा मृत्यु कोण? कोणापासून उत्पन्न झाला व मोठमोठे

पराक्रमी तपस्वी यांचा संहार कां करितो हें मलासांगा. असें ऐकून व्यास ह्मण तात हे राजा, अकंपन नामक राजा पुत्रशोकानें व्याप्त झालेला त्यास नारदानीं उपदेश करून उत्तम लोकास पाठविला तो चरित्रभाग तुला सांगतों त्याचरित्राच्या श्रवणानें तूं सर्व दुःखापासून मुक्त होशील. पूर्वी कृतयुगीं अकंपन नामक राजा मोठा विख्यात होता तो युद्धांत शत्रूचे स्वाधीन झाला त्याचा पुत्र हरीनामक विष्णू सारखा बलवान तोही शत्रूशीं युद्ध करीत असतां मृत्यु पावला तेव्हां त्याचें एकादशाहांत कर्म करून राजा शुचिर्भूत झाला आणि रात्रंदिवस पुत्राची चिंता करितां करितां सुखाचा लेशही त्यासनाहीं हें नारदास समजल्यानंतर ते कोणे एके कालीं राजानें समाधान करण्या करितां राजगृहीं आले तेव्हां नारदाची पूजा करून राजा पुत्रवधाची कथा सांगूं लागला. हे नारदा, माझा पुत्र कांतीनें व पराक्रमानें विष्णू सारखा तो शत्रूनीं युद्धांत मारिला तेव्हां पासून माझें मन उदास झालें हा मृत्यु कोणी उत्पन्न केला हें कळत नाहीं तेव्हां याचे उत्पत्तीचें कारण काय तें मला सांग. असें ऐकून नारद सांगतात हे राजा, पूर्वी ब्रह्मदेवानीं स्थावर जंगमसृष्टि उत्पन्न करून तिचा संहार कसा होईल व संहार न झाला तर या पृथ्वीस मोठा भार होईल इत्यादि कचिंतेनें तो व्याप्त झाला त्या कालीं त्या रोषाच्या योगानें ब्रह्मदेवा च्या शरीरा पासून एक मोठा भयंकर अग्नि उत्पन्न होऊन तो चराचर जगतास जाळूं लागला. हें पाहून भगवान शिव ब्रह्मदेवास शरण गेला त्याकालीं ब्रह्मदेव बोलतात हे पुत्रा, तूं कोणाच्या कारणास्तव मला शरण आलास तें मला सांग. तें मी पुरें करण्यास समर्थ आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

५३ अध्याय त्रेपन्न— शिव ह्मणतात हे ब्रह्मदेवा, एवढी प्रजा उत्पन्न करण्या विषयीं तूं यत्न करून भूतें, ग्राम इत्यादिक उत्पन्न केलीस तींच पुनः क्रोधाग्नीनें जाळितोस हें मी पाहून मला फार दया उत्पन्न झाली असें ऐकून ब्रह्मदेव ह्मणतात हे पुत्रा, प्रजेचा संहार व्हावा अशी माझी इच्छा नाहीं, परंतु पृथ्वीचा भार कसा उतरावा या विषयीं विचार करूं लागलों तों अकस्मात् मला क्रोध उत्पन्न होऊन हा संहाराग्नि उत्पन्न झाला असें ऐकून रुद्र ह्मणतात हे ब्रह्मदेवा. स्थावर जंगमात्मक जी प्रजा ती तुझ्या प्रसादानें-

वागते यास्तव या क्रोधाग्नीचा उपशम कर ह्मणजे प्रजेचा नाश होणार नाहीं हाच मला वर द्यावा. नारदसांगतात हे राजा, असें रुद्राचें भाषण ऐकून ब्रह्मदेवानीं क्रोधाग्नीचा उपसंहार केला. नंतर तो क्रोधाग्नि ब्रह्मदेवाच्या दरएक इंद्रिया पासून बाहेर निघून त्याची एक स्त्री कृष्ण, रक्त, पिंगट इत्यादिक रंगांची, लाल जिव्हा, आरक्त नेत्र कानांत कुंडलें घातलेली अशी उत्पन्न झाली आणि ती दक्षिण दिशेस जाऊन राहिली तिला पाहून शिव ब्रह्मदेवयानीं आश्चिर्य केलें नंतर ब्रह्मदेवानीं त्या स्त्रीस मृत्यु ह्मणोन हांक मारून सांगितलें कीं, तूं माझ्या रोषा पासून उत्पन्न झालीस ह्मणोन माझ्या आज्ञेनें त्या प्रजेचा नाशकर हें ऐकून ती स्त्री चिंताग्रस्त होऊन रुदन करूं लागली त्या कालीं तिच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले ते ब्रह्मदेवानीं आपले अंजळींत घेऊन त्या स्त्रीस बहुत प्रकारें बोध केला. असा विषय या अध्यायांत आहे.

५४ अध्याय चौपन्न:— नारदसांगतात हे राजा, त्या कालीं ती मृत्यु स्त्री विनयानें ब्रह्मदेवास बोलली हे पितामह, तूं मला उत्पन्न केलेंस आणि हें क्रूर कर्म करण्यास मला आज्ञा देतोस हें कसें या अधर्मास मी फार भित्यें याजकरितां मजवर कृपा करून संहार करण्याचें काम मजला सांगूं नको आतां मी तुझे आज्ञेनें धेनुकाश्रमीं तप करण्यास जाऊन तुझेंच आराधन करीत बसेन. असें ऐकून पुनः ब्रह्मदेव भाषण करतात कीं, प्रजेचा संहार करण्यास्तव तुला मी उत्पन्न केलें यास्तव मृत्युलोकास जाऊन सर्व प्रजेचा क्षय कर हाच तुला वर दिला आहे लोकांमध्यें माझ्या वरानें तुझी निंदा कधींही होणार नाहीं असें ऐकून मृत्यु स्त्री भाषण करते हे भगवन् प्रजेचा संहार करण्यास मी कधींही उद्युक्त होणार नाहीं असें ऐकून ब्रह्मदेव तटस्थ बसले नंतर ती मृत्युरूप कन्या ब्रह्मदेवास पुसून तप करण्या करितां धेनुकाश्रमीं गेली आणि एक पायावर उभी राहून ब्रह्मचर्य व्रतानें तिनें षोडश पद्म वर्षें तप केलें व तेथेंच पांच पद्म वर्षें पर्यंत इंद्रियांचा निग्रह करून तप केलें तेथून निघोन पुष्पारण्यास गेली तेथें कांहीं वर्षें एक पायावर उभी राहून तप केलें नंतर नंदा नदीतीरीं सात हजार एक वर्षें तपश्चर्या केली कांहीं दिवस कौशिकी नदीच्या तीरीं वायू व जल भक्षण क

रुन तप केलें कांहीं दिवस पंच गंगे मध्यें व कांहीं दिवस वेतसक देशामध्यें तप करून पुनः भागिर्थीतीरीं कांहीं दिवस तप केलें आणि मेरू व हिमालय यांवर एक निरखर्व वर्षे पर्यंत तप केलें पुढें गोकर्ण व नैमिष येथें जाऊन तप करून आपलें सर्व शरीर कृश केलें तेव्हां ब्रह्मदेव येऊन मृत्यूस ह्मणो लागले कीं, तुला इच्छित असेल तें माग. त्याकाळीं मृत्यु स्त्री ह्मणते हे ब्रह्मदेवा, मी लोकांचा संहार करणार नाहीं अधर्मास भिऊन म्यां हें तप केलें आतां हाच व र द्यावा कीं संहाराकडे माझी योजना नसावी असें ऐकून ब्रह्मदेव ह्मणता-त हे स्त्रिये, तुला प्रजेच्या संहारा पासून अधर्म कधीं घडणार नाहीं हें तु-ला सत्य सांगितलें तूं जो संहार करशील हा तुझा धर्मच समज या कर्मे क-रून तूं लोकांमध्यें विरज्या नामें प्रसिद्ध होशील.असें ऐकून स्त्री ह्मणत्ये हे महाराज, तुमचें वाक्य मी शिरसामान्य करित्ये. परंतु ह्मणत्ये येवढें मा-झें ऐकावें लोभ, क्रोध, द्रोह, मोह, हर्ष त्यानीं मला वश असावें ब्रह्मदेव ह्मण-तात तूं ह्मणतेस याप्रमाणें होईल आतां जा. सर्व प्रजेच्या संहारा विषयीं अनमान करूनको तुझ्या अश्रुबिंदु पासून जे रोग उत्पन्न झाले हेच जाऊ-न प्राण्यास मारतील तूं निमित्तास मात्र पुढें हो तुझ्यापासून अधर्माचा लेशाही घडणार नाहीं. नारद ह्मणतात हे अकंपन राजा, ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून मृत्यु स्त्रीनें मनांत विचार केला कीं, हें जर न ऐकावें तर हा शाप देईल यास्तव तें वाक्य मान्य करून त्या कर्मास ती अनुसरली तस्मात व्याधी व रोग हेंच प्रथम प्राण्यास मारितात मृत्यूचें नाव मात्र आहे मृत्यूनें कोणास सो-डलें नाहीं तस्मात् हे राजा, पुत्र शोक टाकून दे तुझा पुत्र मोठा शूर पराक्रमी होता तो आतां उत्तम लोकास गेला याचा हर्ष मान. व्यास ह्मणतात हे धर्मा, असें नारदाचें वाक्य ऐकून अकंपन राजा ह्मणतो हे नारदा, तुझ्या उपदेशा-नें मी कृत कृत्य झालों आतां पुत्र शोकाचा त्याग करितो तूं आज मला सा-क्षात् ईश्वरच भेटलास असें ह्मणोन शोकाचा त्याग करून राजा पूर्वस्थि-तीवर आला हा इतिहास जो श्रवण करील अथवा लोकांस कळवील त्या-स बहुत पुण्य लागेल व या लोकीं त्याची कीर्ती होऊन मेल्यानंतर स्वर्गमा-सी होईल. असा हा इतिहास ऐकून अभिमन्यूच्या वधाचा खेद टाकून धर्म

राजानें भ्रात्यांसहित युद्ध करण्याचा उपक्रम केला. अ. वि. या अ. आहे.

५५ अध्याय पंचावन्न:— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, मृत्यूची उत्पत्ती व मृत्यूचें कर्म ऐकून धर्मराज भाषण करतात हे व्यासा, कोणी राजानें कसे यज्ञ केले व किती दक्षिणा दिल्या त्या राजांचें चरित्र मला सांगोन माझ्या दुःखाचा परिहार करावा. असें ऐकून व्यास सांगतात हे धर्मराजा, पूर्वी शैब्य नामक राजाचा पुत्र सृंजय नामक होता त्याचे दोन मित्र पर्वत व नारद असे होते ते उभयतां एके दिवशीं राजाच्या भेटीस आले राजानें उभयतांची पूजा करून आसनावर बसविलें. इतक्यांत राजकन्या येऊन तेथेंच बसली तेव्हां पर्वत ऋषीनें त्या कन्येस पाहून राजास प्रश्न केला कीं, ही सुंदरी स्त्री कोणाची आहे? सृंजय राजा ह्मणतो महाराज ही माझी कन्या वराची योजना करावी ह्मणोन प्रार्थना करितें. असें ऐकून नारद ऋषी ह्मणतात हे राजा, ही कन्या मला द्यावी तेव्हां राजा ह्मणतो हे नारद ऋषी जर तुझी इच्छा आहे तर ही कन्या तुला देईन असें ऐकून पर्वत ऋषी क्रोधानें ह्मणतो हे नारदा, ही कन्या पूर्वी मनांत मी वरली ती तूं वरशील तर तुला पाप लागोन स्वर्गास तुझें कधींही गमन होणार नाहीं असें ऐकून नारद उत्तर देतो कीं केवल मनानें वरणें हें योग्य नव्हे मन वाणी बुद्धि संभाषण पूर्वक उदक सोडून पाणिग्रहणाचे मंत्र झाले ह्मणजे यालाच विवाह असें ह्मणतात तेव्हां तूं असें न करितां उगीच मनानें वरिली ह्मणतोस-त्यापेक्षां या पातकानें तूंही स्वर्गास जाणार नाहींस या प्रमाणें उभयतां शाप देऊन कलह करूलागले असतां राजानें दोघांचेंही शांतवन करून त्यांस आपले घरीं ठेवून घेतलें. नंतर राजास अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, आपल्यास एक पुत्र असावा या करितां कांहीं अनुष्ठान करावें असें मनांत आणोन त्यानें महान् तपस्वी वेद वेदांग जाणणारे ब्राह्मण यांस बहुत द्रव्य देऊन संतुष्ट केलें त्याकालीं ब्राह्मण वर देण्यास सिद्ध झाले तेव्हां नारद ह्मणतात हे राजा, ब्राह्मण प्रसन्न होऊन तुला पुत्र व्हावा असें इच्छितात तर तुला जसा पुत्र इच्छित असेल तसा माग. असें ऐकून राजा बोलला हे नारदा, रूपवान्, कीर्तिमान्, सर्वगुणानीं युक्त तेजस्वी असा पुत्र व्हावा व त्या

त्या मल, मूत्र व घर्म यां पासून सुवर्ण उत्पन्न व्हावें. असें ऐकून नारद भाषण करतात हे राजा, तूं इच्छिल्याप्रमाणें पुत्र होईल पुढें राजास पुत्र झा — ल्यावर त्याचें नाव सुवर्णष्ठिवी तो पुत्र राजगृहीं वृद्धिंगत पावून त्याजपासून ब्राह्मणानीं वरदिल्याप्रमाणें हाजारों भार सुवर्ण उत्पन्न होऊं लागलें तंतर राजानें त्या सुवर्णाचे प्रासाद व किल्ले बांधून व ब्राह्मणांस सुवर्णाचीं घरें बांधून दिलीं असें तें सर्व राजाचें शहर कांचन मय झालें हें पाहून चोरानीं राजपुत्रास चोरून नेला आणि अरण्यांत नेऊन मारून टाकिला त्यास मारिल्यानंतर त्या पुत्रास व्यर्थ मारिला आपले घरीं बाळगला असतातर पुष्कळ सुवर्ण उत्पन्न झालें असतें असो झालें तें झालें या प्रमाणे ते चोर पश्चात्ताप पावले राजपुत्र मरण पावल्यावर त्याजपासून उत्पन्न होणारें सुवर्ण नष्ट झालें. इकडे राजा पुत्र मेला असें पाहून विलाप करूं लागला तें ऐकून नारद राजास बोध व्हावा ह्मणोन सांगतात हे शृंजया, तूं पुत्राचा शोक करूं नको व्यर्थ मरण पावशील पूर्वी मरुत नामक राजा याणें हिमालयाच्या प्रदेशीं मोठा यज्ञ केला त्या यज्ञामध्यें बृहस्पती सह वर्तमान देवही आले होते, यज्ञाचे मार्ग व भूमी आसमंतात कांचनाच्या केल्या होत्या, ब्राह्मणांस दुग्ध, दधी, घृत, मधु इत्यादिक प्रकारचीं उत्तम अन्नें भक्षणास घालून तृप्त केलें त्याकाळीं सर्व ब्राह्मण मरुत राजा हाच चंद्र हाच सूर्य असें ह्मणोन त्याच्या यज्ञाची व संपत्तीची व पराक्रमाची वारंवार स्तुती करीत आनंदयुक्त झाले राजानें ब्राह्मणांस अपरिमित द्रव्य दिलें त्या द्रव्यानें ब्राह्मण कंटाळून आपले घरीं जातां जातां तें द्रव्य नेववेना ह्मणोन वाटेनें टाकूं लागले — त्या राजाचें तप, ब्रह्मचर्य व्रत व तेज यांच्या योगें धान्यादिक उत्पन्न होतें असा तो राजा हजारों वर्षे पर्यंत पराक्रमानें राज्य करून शेवटीं मृत्यु पावला तस्मात् जन्म मरण सर्वांस लागलें आहे. यज्ञ करो, धर्म करो, पृथ्वी ब्राह्मणास दान करो, परंतु मृत्यु कोणास सोडित नाहीं हें पाहून आपले मनाचें समाधान कर. असा विषय या अध्यायांत आहे.

५६ अध्याय छपन्न — नारद ह्मणतात हे सृंजया, सुहोत्र राजा मोठा पराक्रमी देवांनींही जिंकण्यास अशक्य, धर्म करून प्रजेचें संरक्षण

करीत असतां त्यानें पुरोहितास प्रश्न केला कीं, माझें कल्याण कशानें होईल पुरोहितानें सांगितलें कीं, हे राजा, प्रजा पालन, दान, यज्ञ, शत्रूचापराजय हे राजाचे धर्म ते तूं केल्यानें तुझें कल्याण होईल. असें ऐकून राजानें त्या प्रमाणें केलें तेव्हां त्याचे राज्यांत ज्याकाळीं जसा पर्जन्य पाहिजे तितका पडत असे, सर्व नद्यांमध्यें पाण्या प्रमाणें सुवर्ण वाहात असे त्यांत सुसरी इत्यादि प्राणी सुवर्णाचे असत असा तो राजा राज्य करीत असतां त्याणें हजारों अश्वमेध केले व ब्राह्मणांस यज्ञामध्यें दक्षिणा देऊन तोषविलें तोही राजा तुझ्या पुत्रा पेक्षां पुण्यवान असतां मरण पावला याजकरितां व्यर्थ पुत्र शोक करूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

५७ अध्याय सत्तावन्न:— नारद ह्मणतात हे सृंजया, तसाच पौरव नामक राजा ज्यानें हजारों अश्वमेध केले त्या समारंभास देशोदेशींचे विद्वान, ज्ञानी, वेद वेत्ते असे ब्राह्मण लक्षावधी आले होते त्या यज्ञांत बहुत दक्षणा, हजारों गज उत्तम प्रकारचे अश्व ब्राह्मणांस दिले नाना प्रकारें अलंकार युक्त दासी व सुवर्णाची गृहें व गाई ब्राह्मणांस अगणीत दिल्या. त्या दानानें ब्राह्मण संतुष्ट होऊन त्याराजाचे गुण गायन करीत असत असातो पौरव राजा तुझ्या पुत्रा पेक्षां लक्षगुणीत पुण्यवान असतांही काल वशेंकरून मरण पावला. याजकरितां पुत्रशोक टाक. असा विषय या अध्यायांत आहे.

५८ अध्याय अठ्ठावन्न: नारद ह्मणतात हे सृंजया, तसाच शिबि राजा महान् विख्यात त्यानें सप्त द्वीपा पृथ्वी अरण्य पर्वता सहित चर्मा सारखी घेऊन टाकिली होती. पृथ्वीवरील शत्रूचा क्षय करीत अपार द्रव्य आणोन नाना प्रकारचे यज्ञ केले आणि ब्राह्मणांस दक्षिणा देऊन तृप्त केलें. कोणे एके कालीं सर्व पृथ्वी धान्य, गजाश्व, रथ, हिरण्य यां सह वर्तमान ब्राह्मणास दान दिली. पृथ्वीवर जितके परमाणू तितक्या शिबिराजानें यज्ञामध्यें ब्राह्मणास गाई दान दिल्या त्याचे यज्ञशालेचे आसमंतात दहीं दुधाचे डोह्हो सांचले होते उत्तम प्रकारच्या अन्नाचेही पर्वत पडले होते. त्यास शिवानीं वर दिला होता कीं, राजा तुझी कीर्ती अखंड राहील आणि तूं उत्तम लोकास जाशी-

ल असा शिबाचा वर झाला असतां कांहीं कालानें तो हि मरण पावला याज करितां पुत्रशोक करूनको. अ. विषय या अध्यायांत आहे.

५९ अध्याय एकुणसाठ.— नारद ह्मणतात तसाच दशरथ राजाचा पुत्र रामचंद्र ज्यानें आपले पित्याच्या आज्ञेनें चौदा वर्षे लक्ष्मणा सहवर्तमान वनवास केला दंडकारण्यांत जाऊन चौदा हजार राक्षस मारून ऋषींचें संरक्षण केलें ज्याची साध्वी भार्या जनक राजाची कन्या तीस रावणानें छ द्मानें चोरून नेली तो रावण देव,असुर यांसही अजिंक्य असतां युद्धामध्यें रामचंद्रानीं मारिला आणि वनवास झाल्यानंतर सर्व पृथ्वीचें निष्कंटक राज्य करून देव ऋषी ब्राह्मण यांस तुष्ट केलें,नाना प्रकारचे यज्ञ व अश्वमेध केले,सर्व विद्वान ब्राह्मण व इतरवर्ण आप आपलीं कर्मे करून वागत असत त्याच्या राज्यांत ज्येष्ठानीं कनिष्ठाचीं श्राद्धादि कर्मे केलीं नाहींत असा तो अजानबाहू रामचंद्र दाहासहस्त्र वर्षे राज्य करून शेवटीं चतुर्विध प्रजेसी सहवर्तमान स्वर्गास गेला.हे सृंजया, मोठ मोठे राजे मरण पावले तेथें तुझ्या पुत्राची कथाकाय तस्मात् पुत्र शोकाचा त्यागकर. अ. वि. अ. आहे.

६० अध्याय साठ.— नारद ह्मणतात हे सृंजया, तसाच भगीरथराजा ज्यानें स्वर्गांतून गंगा पृथ्वीवर आणिली आणि त्यानें दहा लक्ष कन्या ब्राह्मणास दान केल्या त्या अशाकीं, प्रत्येक कन्येस रथांत घालून त्या प्रत्येक रथाच्या मागें शंभर शंभर हत्ति एक हत्तीच्यामागें सहस्त्र सहस्त्र घोडे, प्रत्येक घोड्याच्यामागें शंभर शंभर गाई प्रत्येक गाईच्यामागें शंभर शंभर शेळ्या या प्रमाणें कन्यादान केल्या त्या दानाच्या उदकानें पृथ्वी भिजली. कन्यादान करीत असतां गंगा राजाच्या मांडीवर बसली. तेव्हां तिचें नांव भागीरथी असें पडलें. त्या दानाची देव,गंधर्व इत्यादिक स्तुतीकरीत होते त्या राजाच्या गृहीं ब्राह्मणास अदेय नसूनच नव्हतें असें असतां तोही राजा मरण पावून उत्तम लोकास गेला याजकरितां तूं पुत्रशोक करूंनको. असा विषय या अध्यायांत आहे.

६१ अध्याय एकसष्ट.— नारद ह्मणतात हे सृंजया,तसाच दिलीपराजा ज्याणें हजारो यज्ञ करून वेदवेत्ते लक्षावधी ब्राह्मणांस बहु

त दक्षिणा देऊन तृप्त केलें, यज्ञांत पृथ्वी सुवर्णयुक्त ब्राह्मणास दिली. यज्ञ शालेच्या भूमी आसमंतात सुवर्णाच्या केल्या होत्या तेथें देव आपआपलीं स्वरूपें धारण करून राहात असत त्याच्या यज्ञांत बेचाळीस हजार अप्सरा नृत्य करीत असतां विश्वावसु वीणा वाजवीत होता तसाच खट्वांग राजाचे गृहांत वेदघोष, धनुष्याचा शब्द, प्राशन करा, भोजन करा, इच्छेस येईल ते घ्या हे ध्यानशब्द कधींही लय पावले नाहींत असे हे दोन राजे मरण पावून उत्तम लोकास गेले तस्मात तूं आपल्या पुत्राचा शोक टाक. असा विषय या अध्यायांत आहे.

६२ अध्याय नारद म्हणतात हे सृंजया, तसाच मांधाता नामक राजा जो देव, असुर, मानव, जिंकून आपण एकटाच राज्य करीत असे, मांधात्याचा बाप युवनाश्व मृगये करितां अरण्यांत गेला असतां जलानें तृषित होऊन उदकाचा शोध करीत फिरूं लागला तेथें आसमंतात ऋषी यज्ञ करीत होते त्याचा धूर पाहून त्या स्थानीं गेला. आणि ऋषी जवळ त्यानें पाणी मागितलें तेव्हां पृषदाज्य नामक ऋषीनीं राजास यज्ञ शाळेंतील पाणी प्यावयास दिलें त्यायोगें राजाचे उदरांत गर्भ उत्पन्न झाला तो अश्विनी कुमार याणीं बाहेर काढिला त्यापासून दिव्यबालक उत्पन्न झाला. कोणे एके दिवशीं तो बालक राजा आपले मांडीवर घेऊन बसला असतां देव त्यास भेटावयास आले. देव तें बालक पाहून एकामेकास भाषण करतात कीं हा पुरुषा पासून उत्पन्न झाला हा कोणास पिईल हें ऐकून इंद्र म्हणतो कीं मला पिईल असें म्हणोन इंद्रनें आपला हात त्याबालकापुढें केला तों हाताच्या बोटांमध्यें ईश्वर इच्छेनें दुग्ध उत्पन्न होऊन तो बालक पिऊं लागला त्याप्रमाणें तो बालक इंद्राचें दुग्ध पिऊन बारावर्षांचा झाला. तो हा मांधाता याचें नांव मांधाता पडण्यास कारण असें कीं, मला पिईल असें इंद्र बोलला म्हणोन मांधाता असें नाव राजानें ठेविलें पुढें तो मोठा पराक्रमी होऊन त्यानें पृथ्वीवरील राजे जनमेजय, सुधन्वा इत्यादिकांस जिंकून सर्वपृथ्वी आपल्या स्वाधीन केली. शंभर अश्वमेध व राजसूय यज्ञ करून ब्राह्मणांस अपारद्रव्य देऊन सं

तुष्ट केलें ज्याच्या यज्ञशालेच्या आसमंतात अन्नाचे पर्वतासारखे ढीग पडले असत व घृताचे डोह सांचले असत व मधुइत्यादिकांच्या नद्या वा-हात असत तोही मांधाता पृथ्वी ब्राह्मणास दान देऊन आपण आपल्या कीर्तीनें उत्तम लोकास गेला. याजकरितां हे स्टृंजया, तूं पुत्र शोकाचा त्याग कर. असा विषय या अध्यायांत आहे.

६३ अध्याय त्रेसष्ट.— नारद ह्मणतात हे स्टृंजया, तसेंच ययाति याणें हजारों राजसूय याग, शंभर अश्वमेध व पुंडरीक सहस्त्र, वाजपेय शत, अतिरात्र चातुर्मास्यें सहस्त्र असें करून म्लेच्छाचें सर्व द्रव्य ब्राह्मणांस दिलें देवासुर यांचें युद्ध होत असतां स्वर्गास जाऊन असुरांचा पराभव केला, देवयानी व शर्मिष्ठा या स्त्रियांचे ठायीं धर्मे करून प्रजा उत्पन्न केली व नाना प्रकारचे गंधपुष्प इत्यादिक सुगंध द्रव्यांनीं युक्त जो बाग त्या बागेंत स्त्रियां सहवर्तमान तो क्रीडा करीत असे. आपल्या इच्छेनें पाहि-जे तें उत्पन्न करी कोणे एके दिवशीं ईश्वर इच्छेनें त्यानें मनांत या संसाराचा त्रास येऊन पुत्राचे स्वाधीन राज्य करून तो भार्येसहित वनांत गेला. जातानां या पृथ्वीवरजें धान्य, द्रव्य, पशु, व स्त्रिया या पदार्थांनीं एकाचीही आशा तृप्त होणार नाहीं असें मानून त्यानें सर्व इच्छेचा परित्याग केला शेवटीं तोही मृत्यू पावून उत्तम लोकास गेला. हे स्टृंजया, तुझ्या पुत्रानें यज्ञ केले नाहींत, ब्राह्मणांस बहुत दक्षिणा दिल्या नाहींत असें असतां त्या विषयीं उगाच कां शोक करितोस? असा विषय या अध्यायांत आहे.

६४ अध्याय चवसष्ट.— नारद ह्मणतात हे स्टृंजया, तसाच अंबरिष नामक राजा याने लक्षावधी राजांशीं एकट्यानें युद्ध करून त्यांस आपले आज्ञेंत ठेविलें त्याकालीं त्या सर्व राजांनीं अंबरिष यास सांगितलें कीं, आह्मीं शरण आलों जितकें आमच्या जवळ द्रव्य आहे तें तुह्मांस देतों, या पृथ्वीचें राज्य निष्कंटक तुह्मीं करावें. असें ऐकून राजानें त्यासर्वांस बंधांतून मुक्त केलें आणि त्यापासून मीळालेलें जें द्रव्य त्याचे यज्ञयागादि कर्में करून ब्राह्मण तृप्त केले. मोदक, अपूप, शष्कुली इत्यादि श्रेष्ठ अन्नांनीं ब्राह्मण तृप्त होऊन अंबरिषाचें स्तवन करूं लागले. अंबरिषाच्या य

त्यामध्यें दुसरें कित्येक राजे हिरण्याचीं कवचें धारण करून श्वेत छत्रव पताका व सुवर्णाचेबुरूजे घातलेले रथ रत्नखचित त्यामध्यें बसून ब्राह्मणांस विपुल द्रव्य देत असत, अंबरिषाच्या यज्ञा सारखा यज्ञ पाठी मागें कधींही झाला नाहीं व पुढें ही कधीं होणार नाहीं. असा तो अंबरिषराजाही मृत्यु पावला त्या पुढें तुझ्या पुत्राची कथा काय तस्मात हे सृंजया तूं पुत्रशोकाचा त्याग कर. असा विषय या अध्यायांत आहे.

६५ अध्याय पांसष्ट.— नारद ह्मणतात हे सृंजया, तसाच शशबिंदु नामक राजा श्रीमान् सत्य पराक्रमी त्यास लक्ष बायका होत्या, एक एक भार्येस सहस्रसहस्र पुत्र सर्व पराक्रमी हिरण्याचीं कवचें धारण करणारे, योध्यांमध्यें श्रेष्ठ, वेद वेदांग जाणणारे त्या पुत्रांचें राजानें अश्वमेधामध्यें ब्राह्मणांस दान केलें तें असें कीं, एकेक पुत्राबरोबर शंभर शंभर हत्ती व शंभरशंभररथ व सुवर्ण अलंकारासहित शंभर कन्या, एकेक कन्येबरोबर शंभर शंभर हत्ती, प्रत्येक हत्तीमागें शंभर रथ प्रत्येक रथामागें शंभरशंभर घोडे प्रत्येक घोड्यामागें हजार गाई प्रत्येक गाईमागें पन्नास शेळ्या या प्रमाणें अश्वमेधांत दान केलें. ज्याचे यज्ञमंडपास रत्नखचित सुवर्णाचे स्तंभ होते व जेथें अन्नाचे पर्वतप्राय ढीग असत तोही राजा मरण पावला आणि स्वर्गास गेला. तस्मात् हे सृंजया, पुत्र शोकाचा त्याग कर. असा विषय या अध्यायांत आहे.

६६ अध्याय सासष्ट.— नारद ह्मणतात हे सृंजया, तसाच गय नामक राजा ज्यानें शंभर वर्षे पर्यंत हुतान्न शेष भक्षण केलें तेव्हां अग्नि प्रसन्न होऊन राजास ह्मणों लागला कीं, तूं या काळीं वर माग. असें ऐकून राजानें वर मागितला हे अग्नि, माझें तप, ब्रह्मचर्य व्रत व गुरूचा प्रसाद येणें करून वेदाचें ज्ञान मला व्हावें व धर्माचे ठायीं अक्षयी प्रीती असावी, असंख्य धन असावें. ब्राह्मणांस द्रव्य द्यावें अशी इच्छा असावी व आपले स्त्रियांचे ठायीं प्रजोत्पत्ती व्हावी, धर्मकार्या विषयीं कधींही विघ्न होऊं नये, श्रद्धेनें अन्नदान करीत असतां धर्माचे ठाईं मन रमावें असे वर मागितले असतां अग्नीनें सांगितलें कीं तूं ह्मणतोस त्याप्रमाणें होईल असा वर देऊन अ

ग्नि गुप्त झाला. नंतर राजानें धर्में करून पृथ्वी वरील शत्रु जिंकून दर्श पौर्ण मास अग्रायण चातुर्मास्यें व नाना प्रकारचे यज्ञ करून ब्राह्मणांस शत सहस्त्र गाई अलंकारासहित दक्षिणा दिली, सुवर्णमय पृथ्वी ब्राह्मणास दिली. त्याचे यज्ञांत सुवर्णाचे स्तंभ होते. तीस योजनें रुंद व छत्तीस योजनें लांब अशी सुवर्णाची वेदी होती, ब्राह्मण भोजन संतर्पण होऊन अवशेष पंचवीस अन्नाचे पर्वत राहिले होते, नद्या रसादिकांच्या वाहात होत्या वस्त्र अलंकार व सुवासिक पदार्थ यांच्या राशी होत्या. ज्याच्या सामर्थ्यें करून तीन लोकांत विख्यात असें गया नामक क्षेत्र आहे तेथें अक्षय्य नामक वट व ब्रह्मसरोवर प्रसिद्ध आहे असा तो राजा पुण्यवान असतां कालवशें करून मरण पावला त्यापुढें तुझ्या पुत्राची कथा काय याजकरितां पुत्रशोकाचा त्याग कर. असा विषय या अध्यायांत आहे.

६७ अध्याय सदुसष्ट— नारद म्हणतात हे सृंजया, रंतिदेव याना मे राजा पूर्वी विख्यात होता त्याचे घरीं दोन लक्ष आचारी व वाढणारे होते. अतिथी व अभ्यागत हे कोणत्याही वेळेस आले असतां नाना प्रकारचीं पक्वान्नें करून त्यास वाढावीं आणि त्यांणी भोजन करून संतुष्ट व्हावें या जकरितां ठेविले होते. त्याणें हजारों यज्ञामध्यें पशु मारिले त्यांच्या कातड्यांची रास व रक्ताची नदी उत्पन्न झाली तिला चर्मण्वती असें म्हणतात यज्ञांतील मारिलेले पशु हे स्वर्गास जाऊन राजा उत्तमलोकास जावो म्हणोन इच्छा करीत असत राजा आपले मनांत असें म्हणत असे कीं, मी मेल्यावर ब्राह्मणाचे हातास याज्ञा होतकी ठून लागेल असें समजून सूर्योदया पासून सूर्यास्ता पर्यंत ब्राह्मणास इच्छेस येईल तें दान करीत असे. सुवर्णाचे ग्राम, पर्वत, घरें अशीं ब्राह्मणांस दान देत असे, ब्राह्मण त्या रंतिदेवाचे गुण गायन करीत असत कीं या रंतिदेवासारखें ऐश्वर्य व द्रव्य कुबेर याजपाशींही नाहीं. रंतिदेव राजाचे गृहीं ज्या रात्रीं अतिथी राही त्या दिवशीं त्यास एकवीस सहस्त्र गाई प्राप्त होत असत असा तो राजा त्याचे घरीं प्रत्यक्ष देव पितर येऊन हव्य कव्यें ग्रहण करीत असत तोही राजा कालवशें करून मरण पावला तस्मात् हे सृंजया, व्यर्थ पुत्र शोक करूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

६८ अध्याय अडसष्ट— नारद ह्मणतात हे संजया, दुष्यंनाचा पुत्र भरत याणें बाल्यावस्ते मध्यें वनामध्यें राहून सिंह,व्याघ्र,हत्ती,गेंडे व वनगाई इत्यादि क्रूर प्राणी यांस आपले पराक्रमानें हतवीर्य करून आपले घरीं आणून बांधावीं ह्मणोन सर्वांनीं त्याचें नाव सर्व दमन ठेविलें.त्याचे आईनें त्यास सांगत असावें कीं, तूं लहान बालक असलीं कर्मे करीत जाऊं नको परंतु याणें तें न ऐकतां नित्य वनांत जाऊन सिंव्हादिकांस मारावें धरावें आणि घरीं आणून बांधावें असें करीत असतां कांहीं दिवसानंतर त्या भरतानें यमुना तीरीं शंभर अश्वमेध केले,सरस्वती तीराचे ठायीं तीनशें आणि गंगातीराचे ठायीं च्यारशें अश्वमेध केले.राजसूय अग्निष्टोमादि याग करून ब्राह्मणांस अपार दक्षिणा देऊन संतुष्ट केलें.सुवर्णाचीं पद्यें सहस्र कण्व ऋषीस देऊन त्याचाही संतोष केला.सोन्याचे अश्व,हत्ती,उष्ट्र,गाई असे लक्षावधी ब्राह्मणांस दिल्या.असा तो भरत राजा सर्वचक्रवर्ती सर्वजगतांत विख्यात तोही कालवशें करून मरण पावला.याजकरितां पुत्र शोकाचा त्याग कर.असा विषय या अध्यायांत आहे.

६९ अध्याय एकुणसत्तर— नारद ह्मणतात हे संजया,वेन राजाचा पुत्र पृथु यास सर्वऋषीनीं राजसूय यज्ञाचे ठायीं साम्राज्याचा अभिषेक केला.तेणेंकरून पृथ्वी मध्यें त्याचें पृथु असें नांव पडलें तो सर्वांचीं दुःखें निवारण करी ह्मणोन त्यास क्षत्रियही ह्मणत,त्याचे राज्यांत पृथ्वींत धान्य पेरल्यावांचून उत्पन्न होत असे.गाई बहुत दूध देत असत,सर्व वृक्षांचे पानास मध उत्पन्न होई.सुवर्णाचे दर्भ व सुवर्णाचीं वस्त्रें उत्पन्न होत असत,अमृता सारखीं स्वादिष्ट फलें वृक्षास येत असत,प्रजेस इतर राजा पासून किमपीही दुःख होत नसे,ज्यानें सर्व पृथ्वींत विभाग नवत्ता तो विभाग केला.व नद्यांचें पाणी शहरांत येऊन वरकड समुद्रास पाणी लाऊन दिलें.कोणी मनुष्य वाटेनें आले असतां राजाचे भयानें पर्वतही मार्ग देत असत असा तो राजा महान् पराक्रमी त्यास एके दिवशीं देव,असुर,राक्षस ऋषी,दैत्य,गंधर्व इत्यादि येऊन राजाची प्रार्थना करून ह्मणो लागले कीं,हे राजा तूं सर्वपृथ्वीचें संरक्षण करणारा आह्मांस पित्याप्रमाणें मान्य आहे-

स ह्मणोन आह्मीं तुजपाशीं एक वर मागतों तो तूं देण्यास समर्थ आहेस अ सें ऐकून पृथु ह्मणाला कीं, तुह्मीं इच्छित वर असेल तो मागा असें ऐकून- सर्व ह्मणातात हे राजा, आह्मीं निरंतर तृप्त राहूं असें कर हें ऐकून पृथु हातां त आजगव नामक धनुष्य धारण करून मोठे भयंकर बाणाची धनुष्यावर- योजना करीत पृथ्वीस बोलला कीं देव, गंधर्व, वनस्पती इत्यादिकांस जें इ- च्छित असेल तें तूं दे ह्मणजे तुझें कल्याण करीन नाहींतर याच कालीं तु- झा नाश करितों त्या कालीं पृथ्वी ह्मणाली हे राजा, मी तुझी कन्या जें तूं ह्मण शील तें मी देण्यास समर्थ आहें. असें ऐकून पृथुराजा देवासुरादिकांस ह्मणों लागला कीं, तुह्मांस जें इच्छित असेल तें या पृथ्वी पासून दोहन क रून घ्या त्या कालीं वनस्पती पुढें झाल्या आणि ह्मणतात कीं, प्रथम आह्मीं दोहन करूं असें ह्मणून त्यानीं पृथ्वीस गाय कल्पिली, शाल वृक्ष वत्स झाला. पिंपरीचा वृक्ष दोहन करणारा होऊन त्यानें आपल्यास कोणी तोडलें अ सतां पुनः अंकुर फुटावे हें दुग्ध घेतलें, औदुंबर वृक्ष पात्र झाला याप्रमाणें औ षधीनीं दोहन केलें. नंतर पर्वत दोहन करूं लागले त्याकालीं उदयाचल प र्वत वत्स झाला मेरु दोहन करणारा होऊन त्यानें पाषाण मय पात्रांत औ षधीरूप दुग्ध घेतलें, देवानीं दोहन करून तेज घेतलें, असुरानीं अर्कपात्रा चे ठायीं माया दोहन केली. या प्रमाणें ज्यास जशी इच्छा त्या प्रमाणें त्याणीं पृथ्वी पासून दोहन करून घेतलें हें सर्व पृथुराजाच्या आश्रयानें झालें नं नर कांहीं दिवसानीं पृथुनें नाना प्रकारचे यज्ञ करून ब्राह्मण भोजनें केलीं. सासष्ट हजार सुवर्णाचे हत्ती ब्राह्मणांस दिले ही सर्व पृथ्वी रत्नानीं व सुव र्णानीं भूषित करून ब्राह्मणास दिली. असा तो पृथुराजा महान् विख्या त तोही कालवशें करून मरण पावला याजकरितां हे संजया, व्यर्थ पुत्रशो क करूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

७० अध्याय सत्तर:— नारद ह्मणतात हे संजया, तसाच जमद ग्नीचा पुत्र परशराम महान् तपस्वी, शूर, पराक्रमी सर्व लोकांस मान्य ज्याणें- ब्रह्म द्वेष करणारे जे क्षत्रिय त्यांचा हजारों वेळ युद्धामध्यें पराभव केला. सह स्रार्जुन व त्यांच्या कुलांतील हयहय संज्ञक राजे यांस खड्डे करून रथांध-

सहवर्तमान आपल्या बापाच्या द्वेषा करितां मारून काश्मीर, दरद, कुंती इत्यादिक देशीय राजांचीं कुलेंचीं कुलें मारिलीं या प्रकारें परशुरामानें एकवीस वेळा निःक्षत्र पृथ्वी केली पुढें नाना प्रकारचे याग करून ब्राह्मणांस दक्षिणेनें संतुष्ट केलें. नंतर अश्वमेध करून ही सप्तद्वीपा पृथ्वी कश्यप ऋषीस दान केली ती कश्यप ऋषीनीं दान घेऊन परशुरामास सांगितलें कीं, ब्राह्मणास दान केल्या पृथ्वींत तूं राहूं नको. असें ऐकून परशुराम महेंद्र पर्वतावर गेला. आणि त्यानें समुद्र मागें हटवून आपल्यास राहाण्यास अपूर्व स्थल उत्पन्न केलें असे ज्याचे पराक्रम तो परशुरामही मरणार यास्तव हे स्टंजया, तूं पुत्रा विषयीं शोक करूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

७१ अध्याय एकाहात्तर:— व्यास ह्मणतात हे युधिष्ठिरा, नारदानें सृंजय राजास षोडशीय राजांची कथा सांगितली त्या कालीं तो स्वस्थ बसला तेव्हां नारद ह्मणाले हे राजा, मी ज्या कथा तुला सांगितल्या तेणें करून तुला कांहीं ज्ञान उत्पन्न झालें किंवा सर्व व्यर्थ गेलें राजा ह्मणाला हे महाराज, आपल्या सारखा बोध करणारा मला कधि कोणी भेटणार नाहीं आतां माझें अज्ञान नष्ट झालें. मला कोणत्याही गोष्टीचा विस्मय राहिला नाहीं पुढें आतां काय कर्तव्य तें सांगावें. नारद ह्मणतात हे राजा, दैवयोगें जें तुला इच्छित आहे तें तुला प्राप्त होईल. जो तुझा पुत्र मेला तो पुनः जिवंत होईल. व्यास ह्मणतात हे धर्मराजा, नारदाच्या वाक्यानें सृंजय राजास पुत्र प्राप्त झाला नंतर सृंजय राजानें त्या पुत्राशीं सहवर्तमान हजारों यज्ञयागादि करून ब्राह्मणांस दक्षिणा देऊन संतुष्ट केलें. तो सृंजय राजाचा पुत्र त्याणें यज्ञयागादि क्रिया पूर्वीं केल्या नवत्या ह्मणोन नरकास गेला होता तो नारदाच्या योगानें पुनः राजास भूलोकीं भेटला परंतु तुझा पुत्र अभिमन्यू मोठा शूर पराक्रमी शस्त्रास्त्रांमध्यें निपुण एकट्यानें हजारो शत्रूचा प्राण घेतला तो धारातीर्थाच्या ठायीं मरण पावला त्यास गती योध्यास जी होणार नाहीं ती झाली. यास्तव त्याच्या शोकाचा त्याग कर. मृत्यूची उत्पत्तीही पूर्वीं तुला सांगितली आहे त्याजवर दृष्टि देव आणि पुढें काय कर्तव्य तें कर. असें सांगून व्यास एकाएकीं गुप्त झाले युधिष्ठिरही सर्व शोकाचा परित्याग करून अर्जुन आला ह्मणजे त्यास काय सांगावें याचा विचार करीत बसला. असा वि

षय या अध्यायांत आहे.

७२ अध्याय बाहात्तर:— संजय सांगतात हे धृतराष्ट्रा, समसप्तकां कडे अर्जुन युद्ध करीत असतां त्यानें समसप्तकांचा क्षय केला. इतक्यांत सूर्य अस्तास गेला ह्मणोन अर्जुन व कृष्ण आपल्या रथांत बसून शिबिराकडे ये ऊं लागले तों वाटेनें अर्जुन ह्मणतो हे गोविंदा, आज माझें मन फार उदास झा लें अंगास शहारे येतात व नाना प्रकारचे उत्पात होतात याजवरून धर्मरा ज आपल्या भ्रात्यांशीं सहवर्तमान कुशली असेलना? कृष्ण ह्मणतात हे अ र्जुना, भ्रात्यांशीं सहवर्तमान धर्मराज कुशली आहे, परंतु कांहींतरी अनिष्ट झालें असावें. असें ऐकून उभयतां संध्याकाळीं शिबिराकडे येत असतां धर्म- राजाच्या शिबिराचा ध्वज मोडलेला पाहून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, आपल्या शिबिराकडे कांहीं तरी नाश झालेला असावा कारण कीं, दुरून ध्वज मोडलेला दि सतो, वाद्यांचा शब्द ऐकूं येत नाहीं. वाटेनें जे आपल्यास योद्धे भेटतात ते आप ल्याशीं नबोलतां खालीं तोंडें करून तसेच पुढें जातात याजवरून माझें मन फा र व्याकूळ झालें. हे गोविंदा, माझे बंधु विराट व पांचाल तसाच भ्रात्यांसह वर्तमा न माझा पुत्र अभिमन्यु हे सुखरूप असतीलना? असें बोलत उभयतांनीं र- थावरून उतरून शिबिरांत प्रवेश केला तेव्हां भ्रात्यांशीं सहवर्तमान धर्मरा जास पाहून अर्जुन स्वस्थचित्त झाला पुढें कांहीं वेळानें अभिमन्यु नित्या- प्रमाणें भेटावयास यावयाचा तो आला नाहीं असें पाहून अर्जुन ह्मणतो हे धर्मा, मी असें ऐकिलें होतें कीं, द्रोणाचार्यांनीं आपली सेना रक्षण करितां- चक्रव्यूह केला होता तो व्यूह भेद करण्याची विद्या एक अभिमन्यूस मी सांगि तली होती परंतु पुन: परावृत्त होण्याची सांगितली नव्हती तो व्यूह भेद करण्याक- रितां त्या बालाची योजना तुह्मी निकडे केली नाहींना? वयानें लहान, सुभद्रेस मोठा प्रिय, कृष्णाचा मोठा लाडका मलाही निरंतर आनंद करणारा असा जो अभिमन्यू तो माझ्या दृष्टीस जर पडला नाहीं तर मी आपला प्राण ठेवणार ना हीं मला असें खचित वाटतें कीं, तुह्मी कोणी बोलत नाहीं त्यापक्षीं युद्धामध्यें अभिमन्यु मरण पावला असेल हरहर ईश्वरा! ज्या बालकास कधींही दु:ख ठा ऊक नाहीं शयन व भोजन याविषयीं सुख ज्यास तो आज कोल्हे कुत्र्यांनीं

रवाल्ला असेल प्रातःकाळीं सूतमागध, बंदीजन यांणी स्तुती करून जागा क-
रावा त्याला आज श्वापदानीं रणामध्यें व्यास केला असेल, ज्याचे मस्तकावर
छत्रानीं छाया करावी त्याचे मुखावर आज रणभूमीची धूळ बसली असेल
हे पुत्रा, आज पर्यंत मी तुझें मुख पाहून दिवस घालविले आतां मी भाग्यही
न कोणाचें मुख पाहूं आज तूं मृत्युलोक टाकून यमलोकीं गेलास तर तेथें-
यम, वरुण, इंद्र, कुबेर तुझा सत्कार करतील, पहा कीं जो एकटा शत्रूंच्या रणा-
मध्यें शिरून शत्रूंचा नाश करून युद्धा पासून माघारा फिरला नाहीं व ज्यास
साह्य ही नाहीं त्याणें खचित माझें स्मरण केलें असेल कर्ण, द्रोण यांच्या बाणां
चे वेग सहन करते वेळेस तो खचित ह्मणाला असेल कीं, यावेळेस जर माझा-
पिता जवळ असता तर त्यानें खचित यांचा नाश केला असता असा अर्जुन शो
क करीत पुनःपुनः त्याचे शौर्याचें स्मरण करून निचेतन भूमीवर पडला आ
णि पुनः सावध होऊन विचार करितो कीं, सुभद्रा मला विचारील तेव्हां तिला-
मी काय सांगूं व द्रौपदीनें ही गोष्ट ऐकिल्यावर ती दुःखानें पृथ्वीवर पडेल त्या
काळीं कोणत्या प्रकारें मी तिचें शांतवन करूं! हे पुत्रा, ही तुला अवस्था दैवग
तीनें प्राप्त झाली जो तूं शय्येवर स्त्रियांशीं सह वर्तमान आनंदानें शयन कर-
णारा तो तूं रक्तानें भिजलेल्या रणभूमीवर शयन केलेंस हे जर सुभद्रेनें ऐकि
लें तर ती शोकानें आपला प्राणत्याग करील, काय माझें लोखंडा सारखें हृदय तु
ला मी एकटा टाकून समसप्तकांकडे गेलों तात्पर्य मी दुरभाग्य माझा नाश असा
च व्हावयाचा ज्या काळीं तुला दुष्टानीं सर्व मिळोन अधर्मानीं मारिला ते वेळेस
त्यांस मोठा आनंद झाला असेल व आमची त्यानीं थट्टाही केली असेल परंतु
त्या दुष्टानीं असें मनांत समजावें कीं, तुमच्या घरामध्यें आज यमानें प्रवेश के
ला या अधर्मानें फळ तुह्मीं लौकरच पावाल. पुत्र ही बहुत असतात परंतु हे-
अभिमन्यु तुझ्या सारखा पुत्र सर्वगुण व पराक्रमें करून युक्त असा सांपडणें-
कठीण या प्रकारें अर्जुन विलाप करीत असतां त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा चा
लल्या त्याकाळीं त्याचें शांतवन करण्यास कोणी पुढें प्रवृत्त होईना. त्या काळीं कृ
ष्ण पुढें होऊन अर्जुनाचें शांतवन करतात हे अर्जुना, तुला एवढा मोह प्राप्त झा-
ला याचा त्याग कर तूं रडतोस तो मार्ग कोणास सुटला नाहीं क्षत्रियांस युद्धाचे

ठायीं मरणही त्यांची उपजीविका आहे त्यांतच त्यांची कीर्ती हे अर्जुना, तूं विचारकर कीं, एकटा तुझा पुत्र योद्धा,मानी ब्रह्मच्यारी,परशत्रूंच्या व्यूहांत शिरून लक्षावधी रथी, पाडून पराङ्मुख नहोतां तसाच मरण पावला त्या अभिमन्यूस सामान्य लोक प्राप्त झाला असेल काय! हा तूं मनांत संशय धरूंनको तो-उत्तम लोकासच गेला आतां तूं शोक करूंनको तुझा शोकानें इतकेंच मात्र होईल कीं सर्व तुझे भ्राते यांस मोठा शोक उत्पन्न होऊन ते अनर्थ करतील याजकरितां माझाकडे व धर्मराजाकडे पाहून काय करणें असेल तें कर. असें ऐकून अर्जुन कांहीं सावध होऊन आपल्या भ्रात्यांस अभिमन्यूच्यामरणाची कथा विचारूं लागला. हे भ्राते हो, तुह्मी इतकेंच सांगा कीं, अभिमन्यूस कोणी कसा मारिला त्या मारणारांचें इंद्र,कुबेर,यम,वरुण इत्यादिकानीं जरीं संरक्षण केलें तथापित्यां सहवर्तमान त्याचा नाश करीन असें ह्मणोन अर्जुन पुनः धर्मराजास भाषण करतो कीं, अभिमन्यु एकटा आंत गेला असतां त्याचें संरक्षण तुमच्यानें झालें नाहीं तस्मात तुमच्या पराक्रमास धिःकार असो तुम्हींहीं शस्त्रास्त्रें कशास बाळगलीं?अहो ज्या बालावर शत्रूंनीं बाणांची वृष्टी केली त्या शत्रूंचें निवारण तुमच्यानें झालें नाहीं तस्मात् तुमच्या शस्त्रास्त्रांस ही धिःकार असो.त्या कालीं अर्जुन संतप्त झालेला पाहून धर्मादिक अगदीं स्तब्ध बसले नंतर कांहीं वेळानीं श्रीकृष्ण व धर्मराज अर्जुनाशीं बोलूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

७३ अध्याय त्याहानंतर— धर्मराज ह्मणतात हे अर्जुना, तूं ज्या कालीं समसप्तकांकडे युद्धा करितां गेलास तेव्हां इकडे द्रोणाचार्यानीं मला धरण्याविषयीं बहुत प्रयत्न केला परंतु सात्यकीनें द्रोणाचें बहुत वेळ निवारण केलें त्याकालीं द्रोणाचार्यांस मोठा कोप येऊन त्यानें बाणेंकरून आह्मांस दुःख दिलें आणि कसा पराक्रम केला याचें वर्णन करवत नाहीं पुढें चक्रव्यूह केला त्याचा भेद करण्याचें सामर्थ्य आह्मां कोणांत नाहीं त्याकालीं मी अभिमन्यूस सांगितलें कीं, हा चक्रव्यूह भेद तूं कर तुला ही विद्या माहीत आहे असें ह्मणतांच अभिमन्यू व्यूह भेद करण्यास प्रवृत्त झाला आणि व्यूहाचा भेद करून आंत शिरला इतक्यांत आह्मीं सर्व संरक्षणा करितां मागें गेलों

तों व्यूहाचे मुखावर जयद्रथ उभा होता त्याणें आह्यांशीं मोठें युद्ध करून शिवाच्या प्रसादानें आमचा सर्वांचा पराभव केला.त्याकालीं आमच्यानें आंत जावेना ह्मणोन आह्मीं माघारी फिरलों.अभिमन्यूनें आंत प्रवेश करून सर्व राजांचा पराभव करण्यास आरंभ केला त्याकालीं द्रोणाचार्य,कृपाचार्य,कर्ण, अश्वत्थामा, कोसल, कृतवर्मा या साहानीं त्याच्या रथाच्या भोवती गराडा घालून असंख्यात बाणांची वृष्टी केली नंतर सर्वांनीं त्यास विरथी केला नंतर अभिमन्यूनें हजारों गजाश्व पायदळ आठ हजार रथी,दोनहजार राजपुत्र मारिले बृहद्बल नामक राजा याचा ही प्राण घेतला व अनेक राजे मिळाले होते त्यांचे कोणाचे रथ मोडले,कितेकांचे घोडे,हत्ती,पायदळ यांचा नाश करून एक क्षणामध्यें रणभूमीवर प्रेतांचे पर्वत पाडून रक्ताच्या नद्या वाहविल्या परंतु कालगतीनें दुःशासनाच्या पुत्रानीं त्याचा प्राण घेतला तें पुढें आह्मास कळल्यानंतर आह्मीं शोक करीत बसलों. अभिमन्यू तर उत्तम लोकास गेलाच असेल परंतु आह्मास मात्र शोक करून गेला असें ऐकून अर्जुन पुनः दुःखित होऊन हे पुत्रा हे पुत्रा, ह्मणोन रडूं लागला.आणि मूर्च्छित होऊन पृथ्वीवर पडला. नंतर श्वासोच्छ्वास टाकीत बोलला कीं, जयद्रथ मला धर्मराजास अथवा श्रीकृष्णास जर शरणत येईल तर उद्यां सायंकाल पर्यंत त्याचा प्राण घेईन न घेईन तर मातेचा वध करणारे,विश्वासघाती, गुरु दारेशीं गमन करणारे इत्यादिकास जी गती प्राप्त होते ती मला प्राप्त होईल आणि या दुष्टाचा प्राण न घेतां सूर्य अस्तास जाईल तर तेथेंच अग्नि प्रज्वलित करून त्यांत प्रवेश करीन अशी प्रतिज्ञा करून अर्जुनानें गांडीवाचा टणत्कार केला त्या शब्दानें आकाश भरून गेलें ही प्रतिज्ञा ऐकून कृष्णानें ही पांचजन्य वाजविला तसा अर्जुनानें ही देवदत्त वाजविला.त्याकाली दोन्ही शंखांचे नाद होतांच युधिष्ठिराच्या सैन्यामध्यें वाद्यांचा गजर होऊं लागला व कांहीं वीर सिंहनाद करूं लागले. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

७४ अध्याय चवऱ्याहात्तर— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, इकडे पांडवांच्या सैन्यांत शंख व वाद्यांचा जो शब्द झाला तेणें करून सर्व कौरवांचें सैन्य त्रासलें आणि अर्जुनानें जी प्रतिज्ञा केली ती गुप्तरूपानें फिरणारे

दूतयाणी जयद्रथास सांगितली तेव्हां जयद्रथ मोहानें व्याप्त होऊन द्रोण, दुर्योधन, कृप, कर्ण, शल्य, बाल्हीक, दुःशासन यांस ह्मणतो की, अर्जुनानें प्रतिज्ञा केली आहे तिचा भंग करण्यास देव, गंधर्व, असुर, राक्षस हे ही समर्थ नाहींत असें मी खचित समजतों परंतु सर्वांनीं उद्याचा दिवस मी अर्जुनाच्या दृष्टीस पडणार नाहीं असें करावें. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे जयद्रथा, भिऊं नको तूं शूरांत व क्षत्रियांत श्रेष्ठ आहेस मी, कर्ण, चित्रसेन, विविंशती, भूरिश्रवा, शल, शल्य, द्रोण, अश्वत्थामा, शकुनी इत्यादि तुझे संरक्षणास असतां तुला युद्धामध्यें मारण्यास कोण समर्थ होईल? तूं अर्जुना पासून मरण्याचें भय बाळगूं नको. असें दुर्योधनानें जयद्रथास आश्वासन दिल्यानंतर जयद्रथ दुर्योधना सहित द्रोणाचार्यांच्या शिबिरांत जाऊन द्रोणाचार्यांस भाषण करितो हे महाराज, माझे पेक्षां अर्जुन अस्त्र विद्येंत कोणत्या प्रकारानें अधिक आहे तें मला सांगा. मी व अर्जुन उभयतां समानच आहोंत असें ऐकून आचार्य ह्मणतात की, तूं व अर्जुन मला समानच आहां परंतु तुझा पेक्षां माझा अर्जुनाशीं सहवास फार व त्याणें दुःखें ही बहुत भोगिलीं याजकरितां तुझा पेक्षां अर्जुनावर प्रीती विशेष खरी परंतु तूं अर्जुना पासून जी भीती पावलास तिचा त्याग कर तुझ्या संरक्षणा विषयीं उद्या मी असा एक व्यूह करीन कीं, त्यांत पार्थाची गती होणार नाहीं मग इतरांची तर कोठून? मनुष्य देह प्राप्त होणें मोठें दुर्घट आहे एतदर्थ करितां यादेहांत अप्राप्त पदार्थ संपादन करावे मृत्यु कोणास सुटला असें नाहीं याजकरितां तपस्वी यांस तपें करून जे उत्तम लोक प्राप्त होतात ते लोक क्षत्रियांस युद्धामध्यें मरण पावले असतां मिळतात यास्तव युद्धामध्यें मरण्याचें क्षत्रियांनीं भय कधींही बाळगूं नये यास्तव आतां पार्थाशीं युद्ध कर भिऊं नको. असें द्रोणाचार्यांनीं जयद्रथास आश्वासन दिलें असतां जयद्रथानें शिबिरांत येऊन युद्धा विषयीं मोठें धैर्य धरिलें आणि सैन्यामध्यें वाद्यें व दुंदुभी यांचा नाद केला. असा विषय या अध्यायांत आहे.

७५ अध्याय पंचाहात्तर— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, जयद्रथाच्या वधा विषयीं पार्थानें प्रतिज्ञा केल्यानंतर श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, तूं आप

त्या प्रमाणें त्यांचें मन न घेतां जयद्रथास उद्यां मारीन ह्मणोन जी प्रतिज्ञा केली स हें फार साहस केलेंस याविषयीं संमती माझी घेतली नाहींस आतां तु झी लोकांमध्यें थट्टा होईल, कारण मी गुप्तरूपें दुर्योधनाच्या सैन्यांत दूत पाठविले होते ते आतांच आले त्यांणीं बातमी सांगितली कीं, अर्जुनानें जी प्रतिज्ञा जयद्रथास मारण्याची केली ती सर्व कौरवांस कळली तेणेंक रून त्यांच्या सैन्यामध्यें मोठा कोलाहल जाला. जयद्रथ ही दुःखानें व्या प्त होऊन दुर्योधनास बोलला कीं, हे राजा. उद्यांक सायंकाळ पर्यंत माझें संरक्षण न केलें तर तुमचा पक्ष सोडून मी घरीं जाईन असें समजा. असें ऐकून दुर्योधनानें खालीं तोंड घातलें तेव्हां जयद्रथ बोलला हे राजा, म ला असें वाटतें कीं. अर्जुनानें ज्यास मारीन ह्मणोन प्रतिज्ञा केली त्याचें निवारण करण्यास तुमच्या सैन्यांत महान् धनुर्धारी योद्धा असा कोणीत हीं पहा कीं. भगवंतानें साह्य ज्या अर्जुनास त्याच्या गांडीवाचा शब्द होऊं ला गला असतां त्यापुढें उभें राहण्यास कोणाची शक्ती नाहीं, ज्याणें हिमालयप र्वतीं शिवाशीं युद्ध केलें असा जो अर्जुन त्यास देव देखील मारण्यास समर्थ नाहींत परंतु मी अशी इच्छा करितों कीं, अश्वत्थाम्याशीं सहवर्तमान द्रोणा चार्यांनी माझें संरक्षण करावें. असें भाषण करून उभयतां द्रोणाचार्यांकडे गे ले तेव्हां आचार्यांनीं जयद्रथाच्या संरक्षणाविषयीं योजना केली ती अशी कीं. शकटाकार व्यूह करून मध्यें पद्मव्यूह करावा त्याच्यामध्यें सूचिव्यूह क रून त्यांत जयद्रथास ठेवावा आणि कर्ण, भूरिश्रवा, अश्वत्थामा, वृषसेन, कृ पाचार्य, शल्य हे माहारथी त्याच्या संरक्षणास जवळ ठेऊन इतर रथी त्या चे भोंवतालीं व त्याचे भोंवतालीं रथि, नाग, अश्व, पायदळ, घोडेस्वार उभे करा वे. कर्ण अश्वत्थाम्यादिक माहारथ्यांनीं असा निश्चय केला आहे कीं, आ पला प्राण गेला तरीं चिंता नाहीं परंतु जयद्रथास हातीं लागूं द्यावयाचा ना हीं यास्तव हे अर्जुना, हे माहारथी जिंकल्या वांचून जयद्रथ आपले हा तीं कधीं लागणार नाहीं. आतां आपले मंत्री, सचीव व सुहृदजन यांस- हवर्तमान तुह्मी व आह्मीं मिळोन यास मारण्याचा दुसरा विचार करूं. अ सा विषय या अध्यायांत आहे.

७६ अध्याय शाहात्तर:— अर्जुन ह्मणतो हे कृष्णा. तूं ह्मणतोस कीं, कौरवांचे साहा रथी यांस जिंकणें अशक्य आहे परंतु मला असें वाटतें कीं, हे साहा रथी मिळोन माझें अर्धबल देखील नाहीं त्यांचीं अस्त्रें मी आपल्या अस्त्रानें समराचे ठायीं छिन्न विछिन्न करून द्रोणाचार्य यांचे समक्ष उद्यां जयद्रथाचें शीर पृथ्वीवर पाडीन. पार्थाचा संरक्षण करणारा भगवान तूं, गांडीवा सारखें धनुष्य, विजयी रथ असें असतां त्याचा रणामध्यें पराजय होऊन प्रतिज्ञा भंग होईल कीं काय? माझ्या गांडीवापासून सुटलेले जे बाण त्यांचा वेग सहन करण्यास कौरवसैन्यांत कोणता योद्धा अग्रभागीं उभा राहील तें पाहातों, माझ्या शरांच्या वेगें करून हजारों राजांचीं शिरें पृथ्वीवर पडतील त्यांचे ढीग तूं उद्यां पाहाशील, उद्यां मला असें करावयाचें आहे कीं, या पृथ्वीवर पार्थावांचून धनुर्धर कोणी ठेवावयाचा नाहीं हे कृष्णा, जर तुझी मजवर कृपा आहे तर ही प्रतिज्ञा सर्व सिद्धीस जाईल मग उगीच कां माझी थट्टा करितोस? जसा मेरूपर्वत कधींही चलणार नाहीं तशी माझी प्रतिज्ञा कधींव्यर्थ होणार नाहीं माझा पराक्रम जो आहे तो उद्यां मी समरामध्यें तुला दाखवीन. अ. वि. या. अ. आहे.

७७ अध्याय सत्याहात्तर:— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा अर्जुन आणि श्रीकृष्ण हे मोठे क्रुद्ध होऊन श्वासोच्छ्वास टाकूं लागले हे पाहून देवही मोठे चिंताग्रस्त झाले. इकडे कौरवांच्या सैन्यांत त्या रात्रीस घोर आणि रूक्ष वारा सुटला, अशनीपात होऊं लागले. विद्युल्लतेनें भयंकर शब्द होऊन पर्वता सहित पृथ्वी कांपूं लागली इत्यादिक दुःश्चिन्हें पाहून कौरवांस मोठें भय उत्पन्न झालें. इकडे अर्जुन भाषण करतो हे श्रीकृष्णा, तुझे भगिनीस व स्नुषेस बहुत शोक झाला त्याचें कोणातेंही प्रकारें शांतवन कर. असें ऐकून श्रीकृष्ण भगिनीचें शांतवन करण्या करितां अर्जुनाच्या गृहांत गेले आणि स्नुषे सहवर्तमान सुभद्रेचें नानाप्रकारच्या वाक्यांनीं शांतवन करतात हे भगिनी युद्धांत मरण क्षत्रियांस चुकलें नाहीं, तुझा पुत्र एकटा वीर, पित्या सारखा पराक्रमी मोठे कुलांत उत्पन्न झालेला, एकट्यानें परराष्ट्रांत प्रवेश करून हजारों राक्षस क्षत्रिय मारिले त्याच्या पराक्रमाचें काय वर्णन करावयाचें-

असा पुत्र बहुत दिवस वांचला असतां आपले मातापितरांस बहुत संतोष करितो हें खरें परंतु अंतीं तरीं तो मरणार तेव्हां त्याच्या पितरांस दुःख होणार हें खचित तो पुत्र आज मेला ह्मणोन त्याचा फार काय शोक करावा? असा विचार कर कीं, मोठे मोठे पुण्यवान तपस्वी हजारों वर्षे तप करून ज्या गतीची इच्छा करितात ती गती तुझ्या पुत्रास प्राप्त झाली. धन्य तूं अशा स्त्रीस असा पराक्रमी पुत्र उत्पन्न होऊन शेवटीं त्यानें उत्तम गती मिळविली त्या पुत्राच्या योगें तुझी व भर्त्याची सर्व जगतांत ख्याती झाली, तुझ्या पुत्रास मारणारा जो जयद्रथ त्याचा बांधवांसहित वध करण्याची प्रतिज्ञा तुझ्या भर्त्यानें केली आहे ती प्रतिज्ञा सिद्धीस गेलेली तूं उद्यां ऐकशील आतां तुला जो शोक प्राप्त झाला त्याचें परिमार्जन तूं आपले अंतःकरणांत विचार करून कर आणि हीउत्तरा इचेंही बहुत प्रकारें शांतवन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

७८ अध्याय अठ्याहात्तर.– श्रीकृष्ण भाषण ऐकून सुभद्रा विलाप करूं लागली आणि ह्मणाली कीं. हे पुत्रा, पित्यासारखा पराक्रमी तूं असतां एका एकीं मरण पावलास, आतां तुझें मुख माझ्या दृष्टीस कोठून पडेल। सर्व लोकांनीं पाहाण्यास योग्य त्या मुखावर रणांतील धूळ बसून तें विरूप झालें असेल, मृदुशय्येवर आस्तरण घालून नित्यशः सुखानें शयन करणारा तो तूं आज शत्रूंच्या बाणांनीं विद्ध होऊन भूमीवर पडला असशील, तुला पांडव, वृष्णी व पांचाल हे महान् महान् पराक्रमी संरक्षणास असतां आज तूं अनाथ होऊन रणभूमीवर पडलास, मंदभाग्य मी मला धिःकार असो आतां यमलोकास मी लोकरच जाईन हा भीमसेन याच्या बलास व पार्थाचे धनुष्यास व वृष्णी वीरांच्या वीर्यास, पांचालांच्या बलास व केकय, चेदी, मत्स्य संजय यांस धिःकार असो. श्रीकृष्णाचा तूं भाचा गांडीवधन्वा जो अर्जुन त्याचा पुत्र तूंही स्वतः शूर असतां दुष्टानीं तुझा प्राण कसा घेतला? तुझी ही भार्या तरुणी पुत्रहीन कशी मी संरक्षण करूं आतां जी गोष्ट झाली ती झाली याग करणारे पुण्यवान, दानशील संपन्न, मातापितर यांची शुश्रुषा करणारे, आपल्या स्त्रीशीं ऋतुकालीं गमन करणारे इत्यादिकांस जी गती– ती गती हे पुत्रा, तुला प्राप्त होवो. याप्रकारें सुभद्रेनें विलाप केला इतक्यांत उत्

रे सहवर्तमान द्रौपदी येऊन पोंचली आणि सुभद्रेचा विलाप पाहून त्या ही विलाप करीत पृथ्वीवर पडल्या तेव्हां कृष्णानें त्यांच्या डोळ्यांस उदक लाऊन त्यांस सावध केल्यानंतर कांहीं वेळानीं पुनः कृष्ण सुभद्रेस बोलले कीं, आतां शोक करूंनको शोकाचा त्यागकर आणि हीउत्तरा इला अश्वासन दे आह्मीं सर्व अशी इच्छा करितों कीं, जीगती अभिमन्यूस प्राप्त झाली ती आह्मांस प्राप्त होवो याप्रमाणें सुभद्रा व द्रौपदी व उत्तरा यांस सांगून श्रीकृष्ण तेथून निघाले तसाच धर्मराज शिबिराजवळ येऊन सर्वांस अभिनंदन करून अंतःपुरांत गेला असतां सर्वराजे आप आपल्या शिबिरांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

७९ अध्याय एकुणऐंशी:— संजय ह्मणताात हे धृतराष्ट्रा, नंतर कृष्णानें अर्जुनाच्या शिबिरांत प्रवेश करून स्तंडिल केलें त्याजवर पाचेसारख्या हिरव्या रंगाच्या दर्भांची शय्या करून त्या शय्येच्या आसमंतात भागीं आयुधें ठेविलीं आणिनाना प्रकारच्या पुष्पानीं ती शय्या सुशोभित करून ठेविली पार्थ हस्तपाद प्रक्षालन करून परिचारिका सहवर्तमान त्या शय्येच्या शेजारीं बसला आणि त्र्यंबक नामक बलीची पूजा करून तो बली पार्थानें कृष्णास उपहारा करितां दिला, तेव्हां श्रीकृष्ण हर्षानें ह्मणाले हे पार्था, या शय्येवर तूं आजरात्रीस स्वस्त अंतःकरणें करून शयन कर तुझ्या प्रतिज्ञेचा भंग नव्हावा त्या प्रयत्ना करितां मी येथोन जातों असें ह्मणोन शिबिराच्या द्वारास पाहारे ठेऊन श्रीकृष्ण दारुका सहवर्तमान आपले शिबिरास गेला आणि शयन करीत असतां मनामध्यें चिंता करतो कीं, आतां पार्थाची प्रतिज्ञा कशी सिद्धीस जाईल पार्थास यश यावें ह्मणोन योगयुक्त होऊन भगवान् श्रीकृष्ण शयनावर निजले असें झाल्यावर त्या रात्रीस पांडवांकडील सर्व योद्धे एकमेकांस बोलले कीं, अर्जुन पुत्रशोकानें संतप्त होऊन विचार न करितां त्याणें एकाएकीं जयद्रथास मारण्याची प्रतिज्ञा केली ती कशी सिद्धीस जाईल? हें मोठें अर्जुनानें वाईट केलें आपलें सामर्थ्य पाहून प्रतिज्ञा करावयाची तें न करितां उलटें आपणास शोकास कारण करून घेतलें आतां याची याद काय हो

ईल व सत्यप्रतिज्ञ कर जो धर्मराज याच्यासत्यतास बट्टा लागेल,ईश्वरा जी अ-
र्जुनानें प्रतिज्ञाकेली ही मिथ्या नहोय असें कर आणि धर्माचें सत्य संरक्ष-
णकर आम्हीं आजपर्यंत जें दान करून पुण्य संपादन केलें असेल तें पुण्य
अर्जुनाची सत्यप्रतिज्ञा सिद्ध होण्यास उपयुक्त होवो. इकडे श्रीकृष्ण जागेहो
ऊन दारुकास सांगतात कीं अर्जुनानें उद्यां सायंकाळ पर्यंत जयद्रथास मा
रण्याची प्रतिज्ञा केली ती दुर्योधनास कळून त्याणें सर्व अक्षौहिणी जयद्र
थाच्या आसमंतात उभ्या करून द्रोणाचार्य, अश्वत्थामा हे त्याच्या संरक्षणार्थ
सिद्ध आहेत. द्रोणानीं ज्याचें संरक्षण केलें त्याचा वध करण्यास सर्व त्रैलोक्य
न समर्थ नाहीं परंतु अर्जुनाची प्रतिज्ञा मी उद्यां सत्य करीन जी अर्जुनानें प्र-
तिज्ञा केली ती मीच केली असें समज मला अर्जुना पेक्षां दुसरें कोणी प्रिय-
नाहींत या अर्जुनाकरितां रथ, अश्व, पदाती यांसह वर्तमान कर्ण व सुयोधन
यांस मारून जयद्रथाचा वध करीन मी क्रुद्ध झालों असतां काय करीन काय
न करीन याचा भरवसा नाहीं. अर्जुनाचें व माझें किती सख्य आहे हें उद्यां देव,
गंधर्व, पिशाच, राक्षस हे पाहातील. जो अर्जुनाचा द्वेष्टा तोच माझा द्वेष्टा अर्जु
न हा माझें अर्धशरीर आहे तस्मात् याचें प्रियकरणें मला अवश्य आहे आतां तूं
पाहांटेस माझा रथ सिद्ध करून ये ह्मणजे त्या दुष्टाचा वध करूं, अर्जुन ज्याच्या
ज्याच्या वधाकरितां उद्युक्त होईल तिकडे तिकडे रथ नेण्याची सिद्धता ठेव असें
ऐकून दारुक ह्मणतो हे भगवन् ज्याचा तूं सारथी झालास त्याचा सर्वदा जयच-
आहे आतां तूं सांगितल्या प्रमाणें पाहांटेस रथ सिद्ध करून येतों असा वि
षय या अध्यायांत आहे.

८० अध्याय ऐशी:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा. इकडे
अर्जुन आपण जी प्रतिज्ञा केली इचें वारंवार स्मरण करून मोह पावला इत
क्यांत स्वप्नामध्यें अर्जुनानें असें पाहिलें कीं. श्रीकृष्ण आपल्यास मोठ्या वे
करून भेटावयास आला आहे त्यास अभ्युत्थान देऊन आसन बसावयास-
मी दिलें त्या आसनावर बसून कृष्णानें भाषण केलें कीं, हे अर्जुना, तुझ्या म-
नांत जो एवढा विषाद आला त्याचा त्याग कर कारण सर्व भूतें जीं आहेत त्यांचें
नियमन करणारा काळा खेरीज दुसरा कोणी नाहीं व्यर्थ तुझ्या विषादानें का-

होणार? शोक हा कार्यनाशक आहे जें तुला काय कर्तव्य आहे तें कशानें होई-
ल याचा विचार कर तस्मात ज्या कार्याविषयीं तुला शोक झाला त्याचा त्यागकर
शोकानें मनुष्य क्षयास पावतो हें वासुदेवाचें वाक्य स्वप्नामध्यें ऐकून अर्जुन
बोलतो हे वासुदेवा, मी जी प्रतिज्ञा केली ती मिथ्या व्हावी ह्मणोन धृतराष्ट्रा-
च्या पुत्रांनीं सर्वांचे पाठी मागें जयद्रथास ठेऊन अकरा अक्षौहिणी सैन्यत्या
चे आसमंतात उभें केलें आहे तेव्हां ही माझी प्रतिज्ञा कशी सिद्धीस जाईल.
सूर्योदय ही होण्याची लौकरच संधी आली आहे असें अर्जुनानें भाषण के-
ल्यावर कृष्णानें अर्जुनास हितोपदेश केला हे अर्जुना, तूं पाशुपत अस्त्राचें स्म
रण कर तेणें करून तूं उद्यां जयद्रथास मारशील पाशुपताच्या योगें कोट्याव-
धी दैत्य यांस शिवानीं मारिलें यास्तव शिवास शरण जा ह्मणजे त्याच्या प्रसा
दानें या महत् संकटा पासून तूं तरशील. असें ऐकून अर्जुनानें भूमीवर ब-
सून शिवाचें ध्यान केलें त्याकालीं ब्राह्मी मुहूर्तामध्यें (रात्रीचा चवथ्याप्रहरीं)
कृष्णा सहवर्तमान अर्जुन आकाशामध्यें एकाएकीं गेला पुढें जातांजातां त्या
नीं हिमालयाच्या पायथ्याशीं मणिमंत नामक पर्वत पाहून पुढें श्वेतनामक
पर्वत, कुबेराचें क्रीडा करण्याचें स्थान व नाना प्रकारच्या ऋषींचे आश्रमानीं
व्याप्त मंदराचल नामक पर्वताच्या एका बाजूनें जाणारी किन्नर गंधर्वांच्याना
दानें सनादीत अशी गंगा, कालपर्वत, ब्रह्मतुंगनामक पर्वत, वनें, अथर्वणमु
नीचें स्थान, मंदराचलपर्वत, सुवर्णासारख्या धातूनें विचित्र चंद्रासारखी सु
शोभित पृथ्वी, नानाप्रकारचे अद्भुत चमत्कारिक समुद्र इत्यादि स्थानें अनुक्र
में पाहून पुढें सूर्य, चंद्र, अग्नि यांच्या तेजासारखा तेजःपुंज असा एक पर्वत
पाहिला त्या पर्वताच्या शिखरावर भगवान् शिव तपोमय मूर्ती सहस्त्र सूर्या
सारखें ज्याचें तेज हस्ताचे ठायीं शूल व शस्त्र वल्कलें व कृष्णाजिनें परिधा-
न केलेला अंकावर पार्वती बसवून भूतगणानीं युक्त असा सर्वजगताचें पा
लन करणारा जो शिव यास पाहून प्रथम श्रीकृष्णानें साष्टांग नमस्कार के-
ला. तंतर पार्थानेंही साष्टांग नमस्कार करून उभयतां शिवाचा स्तव करूं लाग
ले ज्या कृष्णास ज्ञानी विद्वान वंदन करितात तो कृष्ण, भगवान् शिव यास शर
ण गेला हें पाहून शिव ह्मणतात कीं, हे नरव्याघ्र, उठा आतां तुह्मांस कारश्र

म झाले आतां येथें येण्याचें कारण काय असेल तो वर मागावा. असें ऐकून वासुदेवार्जुन मोठ्या संतोषानें स्तव करूं लागले कीं, हे पशुपते, सर्व भयाचें नाश करणारा तूं आहेस तूं कार्तिक स्वामीचा गुरू तुला नीलग्रीव असें ह्मणतात तुझ्या ध्वजावर वृषभाचें चिन्ह आहे ह्मणोन तुला वृषभ ध्वज असें ह्मणतात सर्व सृष्टीची उत्पत्ती, पालन व क्षय तुझ्या पासून होतो. हे भगवन्, भक्तांवर दया करणारा जो तूं तुला वारंवार आमचा साष्टांग नमस्कार असो. याप्रकारें वासुदेवार्जुनानीं अस्त्राच्या प्राप्तीकरितां स्तुती करून शिवास प्रसन्न केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

८१ अध्याय एक्यायशी:— संजय ह्मणतो हे राजा, पार्थानें हस्त जोडून शिवाकडे पाहिलें तो रात्रीस नित्य कर्म करतां श्रीकृष्णानें जो आपल्यास करावयास सांगितला तोही शिवाच्या समीप भागीं पाहून पार्थ भाषण करतो हे शिवा, पाशुपत अस्त्र प्राप्त व्हावें ह्मणोन आह्मीं येथें आलों. असें ऐकून शिव ह्मणतात कीं तुह्मी उभयतां हें अमृत सरोवर दिसतें तेथें जा. त्यामध्यें माझें दिव्य धनुष्य बाण आहे तें घेऊन या इतकें ह्मणतांच शिवाच्या गणां सह वर्तमान श्रीकृष्णार्जुन त्या सरोवरांत शिरून पाहातात तो सूर्य मंडळा सारखा तेजस्वी एक सर्प दृष्टीस पडला नंतर कांहीं वेळानीं सहस्त्र शिरांचा नाग अग्नी सारखा तेजस्वी पाहून कृष्णार्जुनानीं शिवाचें ध्यान करीत करीत त्या नागाची स्तुती केली तेव्हां नागानें आपलें स्वरूप टाकून तें धनुष्य बाण झालें तें धनुष्य बाण कृष्णार्जुनानीं घेऊन शिवास दिलें, शिवानीं तपोनामें क्षेत्रामध्यें जाऊन त्या धनुष्यास दोरी बांधून बाण लाविला आणि हा सर्व क्रिया कलाप अर्जुनास दाखवून पाशुपतमंत्राचा उपदेश केला नंतर तें धनुष्य बाण अर्जुनानें घेऊन पुनः सरोवरांत टाकिले आणि अरण्या मध्यें जो आपल्यास शिवानीं उपदेश केला त्याची चिंता करीत आज मी कृत कार्य झालों असें तो मानूं लागला आणि आपले प्रतिज्ञेची पारणा शिवाच्या प्रसादानें खचित होईल असा निश्चय करून पुनः कृष्णार्जुन आप आपल्या शिबिरास आले. असा विषय या अध्यायांत आहे.

८२ अध्याय ब्यायशी:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा,

इकडे कृष्ण आणि दारुक यांचें भाषण चाललें आहे इतक्यांत प्रातःकाळ होऊन धर्मराज जागृत झाला आणि अवश्य कार्यें करावयाचीं तीं करून भद्रासनावर बसला नंतर आठ हजार स्नापकानीं हातांत कांचनाचे कुंभ घेऊन राजास नाना प्रकारच्या सुगंधी द्रव्यानीं स्नान घातलें. नंतर राजानें शुभ्रवस्त्रें परिधान करून नाना प्रकारचीं सुगंधी द्रव्यें अंगास लाविलीं आणि सुगंधी पुष्पांच्या माळा घालून पूर्वेसमुख करून तो जपजाप्य करावयास बसला नंतर अग्नी प्रदीप्त करून समिधादि द्रव्यानीं होम करून राजानें द्वितीय द्वारांत गमन केलें, तेथें वेदवेदांग जाणणारे ब्राह्मण यांचें पूजन करून कोणास अलंकारानीं युक्त शंभर अश्व, कोणास वस्त्रें कोणास सवत्स कपिला गाई ही दिल्या इतर जनांस जें ज्यास द्यावयाचें तें त्यास देऊन तिसरे द्वारांत गमन केलें तेथें परिचारक जनानीं मुजरे केल्यानंतर विश्वकर्म्यानें निर्मित वैडूर्यमणी व मोतीं यानीं युक्त सुवर्णाच्या आसनावर धर्मराज जाऊन बसला आणि युद्धांत ज्यानीं ज्यानीं पराक्रम केले त्या सर्वांस अलंकार भूषणें देऊन आपण ही नाना प्रकारचीं भूषणें वस्त्रें अलंकार परिधान केले त हेमदंडानीं युक्त जीं चामरें व छत्रें तीं सेवकजन हातामध्यें घेऊन उभे राहिले. शत्रूस शोक करणारें व मित्रास हर्ष करणारें असें राजाचें स्वरूप बंदी, मागध याणीं पाहून ते राजाचा स्तव करूं लागले एक मुहूर्त पर्यंत वाद्यादिकांचा घोष झाला. नंतर धर्मराज तेथून उठोन एकांतस्थळीं जाऊन श्रीकृष्ण भगवान् याचें ध्यान करीत बसला इतक्यांत श्रीकृष्ण बाहेर येऊन उभे राहिले आणि त्यानीं भृत्यजनाकडून आंत सांगून पाठविलें कीं, मी कृष्ण आलों आहें. धर्मराजानी भृत्य जनाचें वाक्य ऐकून येण्यास आज्ञा दिली असतां श्रीकृष्ण भगवान् शिबिरांत आले तेव्हां धर्मराजानीं कृष्णाची अर्घ्यपाद्यादिकें पूजा करून त्यास आपले आसनावर बसविलें. असा विषय या अध्यायांत आहे.

८३. अध्याय त्र्यायशी— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, युधिष्ठिर श्रीकृष्णास आसनावर बसवून परस्पर भाषण करीत असतां विराट, भीमसेन, धृष्टद्युम्न, सात्यकी, द्रुपद, शिखंडी इत्यादिकांस श्रीकृष्ण धर्मराजास भे

ावयास आले अशी बातमी समजतांच ते धर्मराजाचे शिबिरांत श्रीकृष्णा स भेटावयास आले आणि सर्व राजे कृष्णास व धर्मराजास नमस्कार करून आप आपले आसनावर बसले नंतर त्या राजांचे समक्ष युधिष्ठिर बोलतो हे कृष्णा, तुझ्या एकट्याच्या आश्रयानें युद्धामध्यें आह्मीं जयाची इच्छा करितों. आमचें शौर्य कितो आहे हें तुला माहितच आहे तशांतून अनेक प्रकारच्या दुःखानीं आह्मी व्याप्त होऊन आमच्या पराक्रमाची हानी झाली व शत्रूनीं आह्मांस फार दुःख दिलें परंतु हे कृष्णा, तुझा आश्रय आह्मांस होता ह्मणोन आह्मीं सर्वदुःखांतून पार पडलों परंतु आतां एक महत् संकट प्राप्त झालें आहे या संकटांतून हे भगवन् तूं जर न पार पाडशील तर अर्जुनाची प्रतिज्ञा भंग होऊन तो आपल्या जीवितास मुकेल यास्तव याची प्रतिज्ञा सत्य होईल असें कर. असें ऐकून कृष्णानें उत्तर केलें कीं, हे धर्मराज, तूं खचित समज कीं, अर्जुनासारखा पराक्रमी देवांत ही कोणी नसेल मग मनुष्यांत कोठून तो समराचे ठायीं मोठा पराक्रम करून शत्रूचीं शिरें तोडून जयद्रथाचें ही शिर तोडील हें तूं उद्यां लोकरच पाहाशील. जसा अर्जुन तसा तूंही मला फार प्रिय आहेस यास्तव तुला जी चिंता प्राप्त झाली तीचा त्याग कर. असा विषय या अध्यायांत आहे.

८४ अध्याय चवऱ्यायशीं— संजय सांगतात हे धृतराष्ट्र राजा श्रीकृष्ण आणि धर्मराज या उभयतांचें इकडे बोलणें चाललें आहे इतक्यांत अर्जुन येऊन धर्मराजाच्या अग्रभागीं उभा राहिला त्याकाळीं धर्मराज भाषण करतो हे अर्जुना, जशी तुझी इच्छा त्याप्रमाणें तुझा विजय होईल. श्रीकृष्णाची मर्जी तुझ्यावर फार आहे असें ऐकून अर्जुन ह्मणतो जें सर्व घडेल तें श्रीकृष्णाच्या प्रसादानेंच घडेल असें भाषण करून त्यानें रात्रीं स्वप्नामध्यें जें पाहिलें तें श्रीकृष्णास व धर्मराजास सांगितलें. तें ऐकून श्रीकृष्ण, धर्मराज, अन्य दुसरे राजे वारंवार शंकरास नमस्कार करीत वाहावा ह्मणोन शब्द करूं लागले. नंतर धर्मराजानें सर्व राजांस सांगितलें कीं, तुह्मीं आतां सर्वांनीं युद्धास सिद्ध व्हावें असें ऐकून सर्व राजे सिद्ध होऊन कौरवांच्या सैन्याकडे निघाले. सात्यकी व कृष्ण एका रथांत बसून अर्जुनाकडे आले आणि पूर्वीं जो दारुकास रथ सिद्ध करून आणावयास कृष्णानीं सांगितला होता त्या रथांत श्रीकृष्ण, अर्जुन

सात्यकी हे तिथे बसले. वृद्ध ब्राह्मण यांणीं पार्थास जयाचा आशीर्वाद दिला त्या आशीर्वादें करून पार्थ सूर्यासारखा शोभूं लागला. श्रीकृष्ण हातांमध्यें रश्मी धरून अर्जुनाचा रथ चालवूं लागले. पांडवांच्या सेनेची तयारी होऊन योद्धे बाहेर निघाले. त्याकालीं मंगल वाद्यांचा गजर होऊं लागला. मागध बंदी जन अर्जुनाची स्तुती करूं लागले. इतर लोक अर्जुनास जयाचे आशीर्वाद देऊं लागले. जातां जातां सुगंधी वारा सुटला. नाना प्रकारचीं शुभचिन्हें होऊं लागलीं. तिकडे कौरव बाहेर निघाले त्यांस अशुभचिन्हें होऊं लागलीं. अर्जुनानें नाना प्रकारचीं शुभ चिन्हें पाहून भाषण केलें हे सात्यकी, हीं सर्व चिन्हें जयाचीं दिसतात आज जयद्रथ निश्चयें करून यमलोक पाहील असें-ह्मणोन पुनः तो भाषण करतो कीं, हे सात्यकी, जशी माझी प्रतिज्ञा जयद्रथास मारण्याची तशीच धर्मराजाचें युद्धामध्यें संरक्षण करण्याची आहे; परंतु आतां तुला सांगतों कीं, तूं सर्व योध्यांत मोठा श्रेष्ठ पराक्रमी आहेस तुझा आजपर्यंत कोणी पराभव केला असें नाहीं तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे याजकरितां जेव्हां मी जयद्रथास मारण्याकरितां कौरवांच्या सैन्यांत प्रवेश करीन तेव्हां तूं माझे पाठीमागें धर्मराजाचें संरक्षण कर. असें ऐकून सात्यकी ह्मणतो हे अर्जुना, तूं बोललास त्याप्रमाणें मी धर्मराजाचें संरक्षण करीन असें भाषण करून सात्यकी धर्मराजाकडे गेला. अ. वि. अ. आहे.

८५. अध्याय पंचायशी:— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, अभिमन्यु युद्धांत मरण पावला असतां पांडव दुःखित होऊन त्यानीं माझ्या पुत्राशीं कसकसें युद्ध केलें पांडवांचा अपराध केल्यामुळें माझ्या पुत्रांस कांहीं भय वाटलें किंवा नाहीं तें मला सांग. कालमी जयद्रथाच्या शिबिरांत नाना प्रकारचे वाईट शब्द ऐकिले तेव्हांपासून माझ्या मनास फार दुःख उत्पन्न झालें; पहा काय चमत्कार कीं, कौरव पांडव अश्वत्थाम्याच्या बलाची प्रशंसा करितात त्याच्याही शिबिरांत मी दुःखाचे शब्द ऐकिले तसेच विंदानुविंद, सोमदत्ती, द्रोणाचार्य यांच्या शिबिरांतही दुःखाचे शब्द ऐकिले. जेव्हां श्रीकृष्ण पांडवांकडून मध्यस्थी करण्याकरितां आमचे घरीं आला तेच वेळेस मीं दुर्योधनास सांगितलें कीं भगवान् श्रीकृष्ण याच्या वाक्याची तूं अमर्यादा करूं

नको पांडव कोप पावले आहेत त्यांचें शमन जसें होईल तसें कर श्रीकृष्णा आपल्यास हिताचें सांगेल असें मी सांगत असतां दुःशासन, कर्ण आणि शकुनी यांच्या नादी लागून त्यानें श्रीकृष्णाच्या वाक्याची अमर्यादा केली आणि जें ह्मां कपट द्यूत उत्पन्न केलें त्याकाली मीं व विदुर उभयतानीं बहुत प्रकारें सांगितलें; परंतु मूर्खानें आमच्या वाक्याचा अवमान केला. भीष्म, शल्य, भूरिश्रवा, जयद्रथ, पुरोजित, अश्वत्थामा, कृपाचार्य, द्रोणाचार्य यांच्याही मनांत द्यूत खेळावें असें नव्हतें जो सर्वांचें ऐकितो तो सर्वांचा सखा, सर्वांचा मित्र, चिरंजीव निरोगी असा होतो पांडव मधुर वाणीनें बोलणारे सर्वांस प्रिय कुलिन स्वतः ब्राह्मणांतें केशवाच्या मनास अनुसरले त्यापेक्षां ते पुढें सुख पावतील असेंच ते वेळेस मी बोलत होतों. पहा ते आतां सर्वांचा पराभव करून आपल्या वडिलानीं संपादित जी पृथ्वी इचा उपभोग करतील, द्रोण, विकर्ण, बाल्हिक व आणखीही वृद्ध वृद्ध ते वेळेस असें ह्मणत असत कीं, जिकडे श्रीकृष्ण तिकडेच जय तें आज अनुभवास आलें याप्रमाणें बहुत प्रकार मी दुर्योधनास सांगितले परंतु काळाच्या गतीनें ते सत्य होण्याचा समय आला आहे. भीमसेन, श्रीकृष्ण, अर्जुन, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रुपद, विराट इत्यादि कांचा युद्धामध्यें पराभव करण्यास दुर्योधन, कर्ण किंवा शकुनी, दुःशासन यांचे योधापैकीं आपल्या सैन्यांत कोणी नाहीं. परंतु हे संजया तुला खचीत सांगतों कीं, श्रीकृष्ण आणि अर्जुन एक्या रथांत बसून समराच्याठायीं युद्धास आले असतां आपल्या सैन्यांतील एकही रथी यांच्या पुढें युद्धास टिकणार नाहीं हा सर्व विचार पूर्वी मी दुर्योधनास सांगितला. परंतु त्याणें याचा विचार न करितां युद्धास आरंभ केला. आपल्या योध्यांत श्रेष्ठ जो भीष्माचार्य तोही मरण पावला द्रोणाचार्यांची तीच वाट होणार असें दिसतें. विदुरानें दुर्योधनास बहुत उपदेश केला त्याचें ही दुष्टानें ऐकिलें नाहीं. संजया तुला आतां विचारितों कीं, अर्जुन तर पुत्र मरणानें संतप्त होऊन जयद्रथाचा तर प्राण घेईल, परंतु माझी पुत्राशीं तो आतां कसा कसें युद्ध करणार व दुर्योधन, दुःशासन प्रभृतीयानीं या महत् संकटाच्या परिमार्जनाचा उपाय काय योजला आहे? हे संजया आतां चांगलें वाईट काय झालें तें मला सांग. अ० वि० त्या अ० आ०

८६ अध्याय शायशी.– संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, मला वाटतें कीं, तुझा शोक सर्व व्यर्थ आहे याचा विचार जर पूर्वी केला असतास तर कांहीं उपयोग झाला असता जें भवितव्य तें चुकत नाहीं. अतः पर शोक करूंनको. धर्मराजाशीं तुझे पुत्र द्यूत खेळण्यास प्रवृत्त झाले ते वेळेस अथवा दुर्योधनानें पांडवांशीं युद्ध करण्याचा ठराव केला ते वेळेस तूं त्याचें निवारण केलें नाहींस ह्मणून तुला हें दुःख पहावें लागलें, जो धर्मानें वागणारा त्यास दुःखाचा मार्ग कधींही प्राप्त व्हावयाचा नाहीं आज पर्यंत पांडवानीं तुमच्या करितां महत् संकटें सोशिलीं आतां त्यांचा उदयकाल आला आहे त्याचें निवारण तुमच्यानें आतां होणार नाहीं यास्तव हे राजा, तूं व्यर्थ शोक करूंनको श्रीकृष्णा तुझी प्रतिष्ठा पूर्वी जशी ठेवीत होता तशी अर्जुन धर्मराज, भीष्म द्रोण यांची ही ठेवीत नव्हता जेव्हां तूं पुत्राच्या बुद्धीनें अधर्माचा अवलंब करून पांडवांचा द्वेष करूं लागलास तेव्हां पासून कृष्णा तुझी-अवहेलना करूं लागला. पांडवांचा बाप ज्या कालीं मरण पावला त्या कालीं पांडव हे लहान अज्ञान तेव्हां तूं त्यांचें संरक्षण करावें तें न करितां अनेकप्रकारें त्यांस क्लेश देऊन घराच्या बाहेर काढोन दिलेंस हा काय तुझा थोरपणा? ज्या अर्जुनाचा श्रीकृष्ण भगवान सारथी आपण स्वतः योद्धा सात्यकी व भीम हे ज्यास साह्य त्याचा पराभव या पृथ्वीवर मनुष्य तर कोणी करणार दिसत नाहीं व याच्याशीं द्वेष करणारे तुमच्या खेरीज त्रैलोक्यांत कोणी दिसत नाहींत आतां कौरव पांडवांचें भयंकर युद्ध झालें त्याचें वृत्त सांगतों. असा विषय या अध्यायांत आहे.

८७ अध्याय सत्यायशी.– संजय भाषण करतो हे राजा, अभिमन्यूस मारल्यावर ती रात्र अतिक्रांत होऊन दुसऱ्या दिवशीं द्रोणाचार्यानीं व्यूह रचनेचा उपक्रम आरंभिला सैन्यामध्यें कोणी धनुष्यास गुणचढवूं लागले, कोणी धनुष्याचा टणत्कार करूं लागले, कोणी आप आपले जागीं शस्त्रास्त्रे घेऊन कृष्ण, अर्जुन, भीम यांस धरा मारा ह्मणोन ओरडूं लागले. अशी सैन्यामध्यें गर्दी झाली असतां द्रोणाचार्य जयद्रथास ह्मणतो कीं, तूं, सोमदत्ती, कर्ण अश्वत्थामा, शल्य, वृषसेन, कृपाचार्य हे साहा रथी-

लक्ष अश्व, साठ हजार रथ, चौदा हजार गज, एकवीस हजार पायदळ असे घेऊन व्यूहाच्या पृष्ठभागीं उभा रहा ह्मणजे तुला देव देखील नेण्यास समर्थ होणार नाहींत मग पांडवांची कथा काय? यामकारें द्रोणाचार्यांनें जयद्रथास आश्वासन दिलें असतां दुर्योधन पंधराशें गज बरोबर घेऊन सर्व सैन्याच्या अग्रभागीं उभा राहिला. दुःशासन, विकर्ण हे जयद्रथाच्या संरक्षणार्थ सैन्याच्या अग्रभागीं उभे राहिले इकडे आचार्यांनीं चौवीस कोश लांब रुंद शकट व्यूह करून त्या व्यूहाच्या पाठीमागल्या भागांत पद्मगर्भ व्यूह करून त्याचे मध्यें गुप्त शक्ती व्यूह केला त्या व्यूहांत द्रोणाचार्यांनीं सांगितल्या प्रमाणें सर्व योद्ध्यां सह्वां जयद्रथ जाऊन बसला स. ची व्यूहाच्या मुखावर कृतवर्मा व पाठीमागें कांबोज, जलसंध, दुर्योधन, कर्ण हे चतुरंगसेनेसह उभे राहिले. शकट व्यूहाच्या अग्रभागीं श्वेत वर्ण कवच व उष्णीष शिरोभूषण धारण करून द्रोणाचार्य धनुष्याचा टणत्कार करीत अग्नि सारखा क्रुद्ध होऊन उभा राहिला व त्याच्या पाठीमागें भोज उभा राहिला तेव्हां द्रोणाचार्यांचा रथ पाहून संपूर्ण कौरव आनंद पावले. सिद्धचारणानीं हा व्यूह पाहून त्यांस ही आश्चर्य वाटलें हा व्यूह सर्व पृथ्वीचा ग्रास करील असें सर्व देव मानूं लागले ती व्यूहरचना पाहून दुर्योधन हर्षित झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

८८ अध्याय अठ्ठ्यायशी — संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, कौरव पांडव यांचे योद्धे युद्धास सिद्ध होऊन आप आपले जागीं उभे राहिले असतां नाना प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं कोणी भयंकर शखांचे नाद करूं लागले त्या वाद्यांचा गजरानीं सर्वांस भय उत्पन्न झालें पृथ्वी कंपायमान होऊं लागली अर्जुन रथामध्यें बसून कौरव सैन्याकडे पाहूं लागला तों कौरव सैन्यांत वायस पक्ष्यांचे समुदाय अग्रभागीं क्रीडा करितात, मृग कोल्हीं इत्यादि श्वापदें नाना प्रकारचे दुष्ट शब्द करितात, इतर पक्षी व श्वापदें दक्षिण मार्गानें जातात, आकाशांत उल्कापात होतात विजेचे कडकडाट चालले आहेत, वारा सुटून धूळ सैन्यांत उडाली असें पाहून आपल्या सैन्याच्या अग्रभागीं नकुळाचा पुत्र व धृष्टद्युम्न उभे आहेत असें त्यानें पाहिलें. इकडे सहस्त्र रथ, शंभर हत्ती, तीन हजार घोडे स्वार दोनशें पायदळ इतक्यांसह वर्तमान पांचशें धनुष्यांच्या अंतानीं दुर्मर्षण अर्जु

ना समोर उभा राहून भाषण करतो कीं, युद्धानें उन्मत्त झालेला अर्जुन याचें निवारण मी एकटा करीन सर्व रथ्यांनीं आज मला साह्य न करितां मी अर्जुनाशीं युद्ध कसें करतों हें पहावें. याप्रकारें सर्व रथ्यांमध्यें दुर्मर्षणानें भाषण केलेलें ऐकून अर्जुन यमासारखा क्रुद्ध झाला आणि अंगामध्यें अभेद्य कवच घालून हस्तामध्यें खड्ग घेऊन रथारूढ झाला आणि गांडीव धनुष्याचा टणत्कार करून शंख वाजवूं लागला कृष्णानें घोड्याच्या रश्मी हातामध्यें धरून आपला पांचजन्य शंख वाजिवला ध्वजस्तंभीं मारुतीनेंही भभःकार केला हे तिन्हीं शब्द एकत्र मिळाले त्या शब्दानें आकाश व पृथ्वी व्याप्त होऊन कौरवांच्या योध्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले कितीएक रथाचे घोडे, हत्ती व इतर घोडे भयानें कंपित होऊन मलमूत्राचा श्राव करूं लागले, कितीएक पलायन करूं लागले कांहीं योद्धे एकमेकांस हांक मारूं लागले तेव्हां दुर्मर्षणाच्या भाषणानें अर्जुन क्रुद्ध होऊन श्रीकृष्णास भाषण करूं लागला. अ· वि· ग्री अ· आ·

८९ अध्याय एकुणनवद — अर्जुन भाषण करतो हे कृष्णा, जेथें दुर्मर्षण असेल तिकडे माझ्या रथाचे घोडे फिरीव मी गजाश्व इत्यादिकांचे मर्दन करून शत्रुसैन्यांत प्रवेश करितों असें ऐकून श्रीकृष्णानें जिकडे दुर्मर्षण उभा होता तिकडे रथाचे घोडे फिरविले कौरवांच्या योध्यांनीं अर्जुन आला असें पाहून बहुत बाणांची वृष्टी केली अर्जुनानें त्या बाणवृष्टीचें निवारण करून कौरवांकडील योध्यांवर अखंड बाणांची वृष्टि केली आणि कितीएकांचे हात कितीएकांचे पाय कितीएकांचीं शिरें तोडून पाडलीं असतां रक्तानें भरलेल्या योध्यांच्या मस्तकांनीं रणभूमी शोभूं लागली हजारों कबंधें अर्जुनानें पाडलेलीं कांहीं हातांत धनुष्य व तरवारी घेऊन नृत्य करूं लागलीं कांहीं घायाळ झालेले योद्धे पृथ्वीवर पडून अरे हा अर्जुन आला यास मारा म्हणोन शब्द करूं लागले, कांहीं योद्धे हातांत ढाल तरवारी घेऊन परस्पर एकमेकांस मारून कितीएक मेले कांहीं योद्धे धरणीवर पडून आपले बंधुवर्गास म्हणों लागले कीं, आम्ही तर आतां मरतोंच; परंतु तुम्हीं तरीं अर्जुनाचा सूड युद्धाच्या ठायीं उगवावा जे जे योद्धे पार्थासमोर आले त्यांचे कोणाचे पाय तुटले कोणाचे हात तुटले अर्जुनाचा एकही बाण योध्यांस लागल्यावांचून पुढें गेला नाहीं कित्येक घो

डे व घोड्यावर बसणारे कितेक हत्ती व हत्तीवर बसणारे कित्येक सारथी व रथांत बसणारे या प्रत्येकांना एकेक बाणेंकरून अर्जुनानें वध केला. असतां त्याजकडे पाहाण्यास कौरवांकडील योद्धे असमर्थ झाले. घोडेस्वार आपल्या घोड्यांस अर्जुनाकडे नेत असतां ते घोडे पुनः पुनः भिऊन पाठीमागें पळून जात तसे हत्तीही पुढें नेत असतां तेही पळून जात. असें अर्जुन व कौरवांचे योद्धे यांचें युद्ध मोठें भयंकर होत असतां कौरवांकडील योद्धे खिन्न होऊन अर्जुनासमोर जाण्यास तोंड चुकवूं लागले. अ. नि. या अ. आहे.

९० अध्याय नव्वद — धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, अर्जुनानें आमच्या सैन्याचा नाश करून योध्यांस त्रस्त केलें असतां पुनः आमच्याकडील कोण कोण योद्धे अर्जुनाशीं युद्ध करूं लागले व शकटव्यूहामध्यें द्रोणाचार्यांचा आश्रय करून कोण राहिले होते तें सांग. असें ऐकून संजय ह्मणतात हे राजा, अर्जुनानें तुझ्या पुत्राच्या सैन्याचा फार नाश केला हें पाहून दुःशासन स्वतः क्रुद्ध होऊन विलक्षण घालून दाहा सहस्र हत्तीसह वर्तमान अर्जुनाशीं युद्ध करण्यास गेला. हत्तींच्या घंटांच्या शब्दानें धनुष्याच्या टणत्कारानें पृथ्वी व आकाश दोन मुहूर्त पर्यंत भरून गेलें. दुःशासन आपल्याशीं युद्ध करण्यास आला हें पाहून क्रोधानें धनंजय ही बहुत सैन्य घेऊन दुःशासनावर धांवला त्याकाली अर्जुनाच्या घोड्याच्या शब्दानें व धनुष्याच्या टणत्कारानें, तसेच देवदत्त व पांचजन्य शंखांच्या नादानें दुःशासनाचे हत्ती सर्वत्रस्त होऊन माघारी पळूं लागले. पार्थानें त्या हत्तींवर मेघा सारखी बाणाची वृष्टी केली त्यामुळें सर्व हत्तींच्या अंगास हजारों क्षतें पडलीं व गंडस्थलें फुटलीं वरचे बसणार यांस बाणाचे वेध लागून ते पृथ्वीवर पडले कितेक योध्यांचीं कुंडलासहित शिरें तुटलीं कांहीं हत्ती पळूं लागले तसेच घोडे रथी व पायदळ यांची अवस्था त्याप्रमाणें झाली. याप्रमाणें अर्जुनानें दोन घटकेंत दुःशासनाच्या सैन्याची धुळधाणी करून टाकिली तेव्हां आपली अवस्था आतां कठिण आहे असें समजून दुःशासन शकटव्यूहांत पळून गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्याण्णव — संजय सांगतो हे राजा, अर्जुनानें दुःशा

सनानें सर्व सैन्य मारून दुःशासनास पळ विलें नंतर द्रोणाचार्यांच्या व्यूहां-त प्रवेश करण्या करितां समीप येऊन हात जोडून कृष्णाच्या अनुमतानें भाषण केलें हे आचार्य हे गुरो, मला आशीर्वाद असावा तुमच्याच प्रसादें करून यासेनेचा भेद करून आंत जाण्याची मी इच्छा करितों आपण मला धर्म राजा समान आहां जशी आपण अश्वत्थाम्यावर रक्षणा विषयीं कृपादृष्टी ठेवितां तशी माझ्यावर ठेवावी जयद्रथाचा वध करण्या विषयीं मीजी आज प्रतिज्ञा केली आहे तिचें संरक्षण आपल्या वांचून कोण करणार, असें ऐकून आचार्य ह्मणतात हे अर्जुना, माझा पराभव केल्या वांचून जयद्रथास मारण्या विषयीं कोणी समर्थ होणार नाहीं असें बोलून त्यानीं अर्जुना वर तीक्ष्ण बाणांची वृष्टी केली अर्जुनानें त्या बाणांचें निवारण करून भयंकर बाण वृष्टीनें आचार्यांच्या पायांस वेध केला पुनः आचार्यांनीं अर्जुनाच्या धनुष्याची प्रत्यंच्या तोडून ध्वज तोडला घोडे व कृष्ण सारथी यांसही बाणीं करून जरजर केले तित क्यांत अर्जुनानें धनुष्यास दुसरी प्रत्यंच्या लाऊन आचार्यास हांक मारून एकदम साहाशें बाण टाकिले पुनः कांहीं वेळानें सातशें बाण टाकून हजारों बाणांची वृष्टी करून द्रोणाचार्यांचें सैन्य विध्वस्त केलें युगांत कालीं सूर्याचे रश्मीनी ब्रह्मांड जसें जळतें त्याप्रमाणें अर्जुनाच्या तेजस्वी बाणानीं कौरवांचें सैन्य जळूं लागलें तेव्हां द्रोणानीं मेघास्त्राची योजना करून सर्व सेन्यास मेघवृष्टीनें शांत केलें. असें युद्ध होत असतां हे महापराक्रमी अर्जुना माझ्या शिष्या, अशी द्रोणानीं हांक मारून एकक्षणांत बाण समुदायानें अर्जुनास अदृश्य करून टाकिलें इतक्यांत अर्जुन मोठेंच पळाई करून रथास-ह वर्तमान बाहेर निघाला द्रोणाचार्यांचें व अर्जुनाचें युद्ध पाहून श्रीकृष्ण मनामध्यें ह्मणतात कीं, द्रोणाचार्यांच्या संकटा पासून अर्जुनाचें निघणें कसें होतें याची चिंता करीत करीत अर्जुनास ह्मणतात हे अर्जुना, द्रोणाचार्यांशीं युद्ध करून उगीच काल कां घालवितोस आपल्यास कर्तव्य तें पुढेंच आहे असें ऐकून अर्जुनानें द्रोणाचार्यास सव्य घालून त्याच्यावर बाण वृष्टी करीत आपला रथ पुढें नेला त्या कालीं द्रोणाचार्य ह्मणतात हे अर्जुना, रणामध्यें शत्रूस जिंकिल्या वांचून तूं पुढें जातोस हें योग्य नाहीं तेव्हां अर्जुन ह्मणतो हे आचार्य, आपण माझे शत्रून-

हे गुरु आह्मांन मी तुमचा शिष्य आहें तशांतून तुमचा पराभव करण्यास या लो कांमध्यें कोणी दिसत नाहीं असें ह्मणोन अर्जुनानें कौरव सैन्यांत प्रवेश केला त्या चे चक्ररक्षक युधामन्यु व उत्तमौजा हे ही त्याजबरोबर कौरव सैन्यांत शिरले त्या कालीं कृतवर्मा कांबोज व श्रुतायुध यांणी अर्जुनावर बाणाची वृष्टी केली नंतर दहा हजार रथ्यांशी सहवर्तमान शूरसेन, शिबी, मावेल्लक इत्यादिक द्रोणाचार्यां- स पुढें करून बाणवृष्टी करूं लागले तेव्हां अर्जुन एकटाच कौरवांच्या योध्यांशीं युद्ध करूं लागला असतां त्याचें निवारण करण्यास सर्व कौरव यत्न झाले. असा विषय या अध्यायांत आहे.

९२ अध्याय त्याण्णव — संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, अर्जुनानें कौ रव सैन्यांत प्रवेश केल्यावर द्रोणाचार्य प्रभृति योध्यांनीं अर्जुनास वेढून टा किला त्या कालीं अर्जुन क्रुद्ध होऊन त्यानें कौरव सैन्यास अखंड बाण वृष्टीनें सं तप्त करून कोणाचीं छत्रें पाडिलीं रथ मोडले कांहीं रथी युद्धापासून पळविले- असा अनर्थ धनंजयानें कौरव सैन्यांत केल्यावर द्रोणाचार्यांनीं अर्जुनावर पंच वीस बाण टाकिले तेव्हां अर्जुनानें द्रोणाचे बाण तोडून टाकिले, पुनः आचार्यांनीं अर्जुनावर ब्रह्मास्त्र टाकिलें अर्जुनानें ब्रह्मास्त्रें करून त्या अस्त्राचें निवार ण केलें नंतर पार्थानें आचार्य कोपले असें पाहून आपलें मुख फिरविलें आ णि कृतवर्म्याच्या सैन्यावर बाण वृष्टी केली तेव्हां कृतवर्म्यानें तीन बाण मारु न अर्जुनास मोहित करून श्रीकृष्णास पंचवीस बाण मारिले नंतर अर्जुन सा वध होऊन त्यानें त्र्याहात्तर बाणानीं कृतवर्म्याचें धनुष्य तोडलें असें उभय तांचें बाण युद्ध होत असतां श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, कृतवर्म्यासीं यु द्ध करून उगीच काल कां घालवितोस आतां त्याचा वध कर असें ऐकतांच पार्थानें कृतवर्म्यावर मोहनास्त्र टाकून आपला रथ कांबोज्याच्या सैन्याकडे वळविला तों इतक्यांत कृतवर्मा सावध होऊन अर्जुनाचे चक्ररक्षक युधाम न्यु व उत्तमौजा यांजवर बाण वृष्टी करूं लागला असें उभयतांचें युद्ध होत अ सतां युधामन्यु उत्तमौजा यानीं कृतवर्म्यास मारून त्याचा ध्वज छेदला व का र्मुक तोडलें. कृतवर्म्यानें दुसरें कार्मुक घेऊन युधामन्यु व उत्तमौजा यांवर बा ण वृष्टी केली इतक्या संधींत अर्जुनानें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. पाठीमागून

युधामन्यु व उत्तमौजा जाऊं लागले तों कृतवर्म्यानें उभयतांस द्वारावर प्रतिबंध केला त्या कालीं उभयतांनीं ही कौरव सैन्याचा बहुत नाश केला अर्जुनास कृतवर्मा मारण्यास सांपडला असतां ही अर्जुनानें त्यास सोडून देऊन पुढें प्रवेश केला इतक्यांत श्रुतायुनें तीन बाण पार्थावर टाकून सत्तर बाण श्रीकृष्णावर टाकिले त्याकालीं अर्जुनानें नव्वद बाण श्रुतायुधावर टाकिले असें उभयतांचें युद्ध कांहीं वेळ होऊन अर्जुनानें बाणवृष्टीनें श्रुतायुधाचे अश्व व सारथी मारिले त्याकालीं श्रुतायुध ह्या आपला पिता वरुण यानें दिलेली गदा हस्तामध्यें घेऊन मोठ्या कोपानें पार्थावर धांवला श्रुतायुध ह्या वरुणाचा पुत्र याच्या मातेचें नांव परणाशा नामक नदी श्रुतायुध उत्पन्न झाल्यावर ती वरुणास ह्मणते कीं, हा माझा पुत्र शत्रूस अवध्य व अमर राही असा यास वर दे. असें ऐकून वरुण ह्मणतो कीं मनुष्यामध्यें अमर कोणी नाहीं जितके उत्पन्न होतात तितके कालांतरें करून मरणार हें खचित परंतु या पुत्रास एक दिव्य अस्त्र असें देतों कीं, आपल्या वधास जो प्रवृत्त होईल त्याजवर तें अस्त्र टाकिलें असतां तो मरण पावेल युद्धास न येता इतरांस त्याजवर हें अस्त्र टाकिलें तर तोच मरेल असें सांगोन वरुणानें एक गदा मंत्रानें अभिमंत्रित करून श्रुतायुधास दिली ती श्रुतायुधानें हातामध्यें घेऊन कृष्णावर टाकिली ती गदा श्रीकृष्णानें आपल्या वक्षस्थलावर सहन केली त्या गदेच्या आघातानें श्रीकृष्णाच्या शरीरास कांहीं पीडा न होतां तो विंध्याद्रि पर्वताप्रमाणें रथावर स्वस्थ बसला होता कांहीं कालानें ती गदा माघारी उलटून श्रुतायुधाच्या मस्तकावर पडून तो एकाएकीं मरण पावला त्याकालीं सर्व सैन्य व योद्धे जिकडे तिकडे पळूं लागले इतक्यांत कांबोज्याचा पुत्र सुदक्षिण रथामध्यें बसून पार्थासमोर आला आणि त्यानें पार्थावर सात बाण टाकिले असतां अर्जुनानें दहा बाण त्याजवर टाकिले तेव्हां सुदक्षिणानें तीन बाण कृष्णास मारून खेरवंडाची शक्ती अर्जुनावर टाकिली अर्जुनानें चौदा बाणें करून त्या शक्तीचे तुकडे केले आणि अश्व व सारथी यांसहवर्तमान एक बाण सुदक्षिणाच्या हृदयांत मारून त्याचें शिर तोडून पाडलें. याप्रकारें श्रुतायुध व सुदक्षिण यांस अर्जुनानें मारिल्यावर कौरवांचें सैनिक भयाभीत होऊ

न पळूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

९३ अध्याय त्यांतव:— संजयसांगतो हे राजा, श्रुतायुध व सु दक्षिण यांस अर्जुनानें मारिल्यावर कौरवांकडील एकशें सात रथी अर्जु नावर बाणांची वृष्टी करीत धांवले त्याकाली अर्जुनानें त्या योध्यांवर बाणांची वृ ष्टी करून त्यांस पळविलें आणि बाण वृष्टीनें कोणाचे हात कोणाचे पाय कोणा चीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडलीं हें पाहून कौरवांकडील श्रुतायु व अच्युतायु हे अर्जुनावर बाणवृष्टी करूंलागले तें पाहून अर्जुनानें त्या उभयतांवर सहस्र बाण टाकिले. त्याकाली श्रुतायूनें अर्जुनावर तोमरास्त्र टाकिलें त्या अस्त्राच्या योगानें श्रीकृष्णा सहवर्तमान अर्जुन मूर्च्छित झाला पुनः श्रुतायूनें अर्जुनाव र शूलाचा प्रहार केला तेणें करून अर्जुन ध्वजस्तंभीं मूर्च्छित होऊन पडला इकडे श्रीकृष्ण सावध होऊन पार्थाकडे पाहातात तों पार्थ मूर्च्छित पडला असें पाहून ते त्यास म्हणतात कीं हे अर्जुना,सावध हो शत्रू फारबलिष्ठ झाले आहेत त्यांच्यावर बाणांचीवृष्टीकरून त्यांचा पराभवकर असें ऐकून अर्जुन हातांमध्यें धनुष्यबाण घेतो इतक्यांत उभयतांनीं कृष्णाव अर्जुन यांजवर बाण वृष्टी करून त्यांस रथाश्वांसहित अदृश्य केलें त्याकाली अर्जुन मोठा घाबरला नंतर कांहीं वेळानें पुनः सावध होऊन त्यानें शक्रास्त्र त्यांजवर टाकिलें त्या एका अस्त्रा पासून हजारों बाण उत्पन्न झाले त्या बाणांनीं उभयतांचीं शरीरें विदारण हो ऊन ते पृथ्वीवर पडले तेव्हां कौरवांकडील पन्नास रथी अर्जुनाशीं युद्ध कर ण्यास पुढें आले अर्जुनानें तत्क्षणीं त्यांचाही नाश केल्यावर श्रुतायु व अच्यु तायु या उभयतांचे पुत्र नियुतायु व दीर्घायु हे अर्जुनासमोर येऊन त्यावर बा णांची वृष्टी करूं लागले तेव्हां अर्जुनानें एकमुहूर्त पर्यंत त्यासीं युद्ध करून शे वटीं त्यांस यमलोकास पाठविलें तेव्हां अंगदेशचे राजे आपल्या हत्तीवर ब सून मोठ्या क्रोधानें सैन्याशीं सहवर्तमान अर्जुनाशीं युद्ध करूंलागले नंतर प्राच्य दाक्षणात्य कलिंग प्रमुख अनेक राजे आप आपली सेना घेऊन अर्जु नाशीं युद्ध करूंलागले अर्जुनानें कांहीं कालपर्यंत त्यांच्याशीं युद्ध करून शे वटीं बाणांनीं कोणाचे बाहू कोणाचीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडिलीं इतक्यांत गाईच्या अंगापासून उत्पन्न झालेले म्लेंच्छ ओसरी माया जाणणारे यवन,

पारद, दरद, पुंड्र, बाल्हीक व शक इत्यादि कौरवांकडील योद्धे आप आपल्या सैन्या सहवर्तमान अर्जुनावर व श्रीकृष्णावर सायकांची वृष्टि करूं लागले, त्यानीं शस्त्रें अस्त्रें व असुरी माया अर्जुनावर टाकून त्यास घाबरा केला तनंतर अर्जुनानें त्या सर्व शस्त्रास्त्रांनें आपल्या बाणानीं निवारण करून त्यांजवर बाणांची वृष्टि केली तेव्हां ती सेना भयाभीत होऊन पळूं लागली कितेक पर्वताच्या गुहेंत जाऊन दडले कित्येक राहिलेले अर्जुनानें ठार मारिले त्या कालीं रक्ताची नदी वाहूं लागली या प्रकारें अर्जुनानें कौरव सैन्याचा बहुत नाश केला इतक्यांत अंबष्ट नामक राजा अर्जुनाशीं युद्ध करूं लागला. अर्जुनानें अंबष्टावर बाणाची वृष्टी करून त्याचें धनुष्य तोडलें व घोडे मारिले तेव्हां अंबष्टानें लोखंडाची गदा घेऊन श्रीकृष्ण व अर्जुन या उभयतांवर गदेचा प्रहार केला असें युद्ध होत असतां अर्जुनानें अंबष्टाचे गदासहित दोन हस्त दोन बाणानीं तोडून एक बाणानें त्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. असा विषय या अध्यायांत आहे.

९४ अध्याय चवऱ्याण्णवा:— संजय ह्मणतात हे राजा, जयद्रथाच्या वधा करितां अर्जुनानें द्रोणाचार्यांच्या सैन्याचा भेद करून आंत प्रवेश केला आणि सुदक्षिण व श्रुतायुध मारल्यावर सर्व कौरवांची सेना भागून पळूं लागली हें पाहून दुर्योधन आचार्यांसमीप येऊन भाषण करतो हे आचार्य, अर्जुन आंत शिरून सर्व सैन्याचा क्षय करितो हें तुह्मी पाहातांना! आतां अर्जुनाचें निवारण होण्याचा उपाय लौकर करावा नाहींतर अर्जुन सर्व सैन्याचा नाश करील. पूर्वी आमच्या कडील योध्यांस असा भरवसा होताकीं, द्रोणाचा पराभव करून अर्जुन व्यूहांत कधीं जाऊं सकणार नाहीं. परंतु अर्जुनानें व्यूह भेद करून सर्व सैन्याचा नाश केला तेव्हां पासून आमच्या योध्यांचा धीर तूटून ते युद्ध न करितां उगीच उभे राहिले आहेत. हे आचार्य, आह्मीं आजपर्यंत आपली बहुत प्रकारें सेवा केली परंतु त्याचें फळ आह्मांस कांहींच झालें नाहीं. पांडवांस तुह्मीं विरुद्ध असतां अर्जुनाचें युद्धामध्यें रक्षण करतां हें मोठें आश्चर्य आहे तुमच्या वाक्यावर भरवसा ठेऊन मी जयद्रथास अभ्यासन दिलें तो जयद्रथ आज यमाच्या दंष्ट्रेंत सांपडला त्याचें त्राण करण्यास तुह्मीं कां

होंच उपाय करीत नाहीं आतां हे गुरो माझी एवढी प्रार्थना आहे कीं, जेणें करून जयद्रथ वांचेल आणि आपल्या प्रतिज्ञेचा भंग न होई असें लौकर करावें. असें ऐकून आचार्य ह्मणतात हे दुर्योधना, मी तुझ्याशीं कपट करीतों किं काय, जसा अश्वत्थामा तसाच तूं असें असतां व्यर्थ तूं माझी निंदा कां करितोस अर्जुनाचें युद्धाचे ठायीं मी संरक्षण करीतों ह्मणोन जें तूं ह्मणतोस त्याचें तात्पर्य असें आहे कीं, अर्जुनाचा सारथी श्रीकृष्ण भगवान् व सर्व त्रैलोक्यांतील जे उत्तम हय ज्याचे रथास तो अर्जुन व्यूहाचा भेद करून आंत शिरला याचें नवल काय माझ्यावर त्यानें बाण वृष्टी केली ते बाण माझ्या आसमंतात पडले आहेत ते पहा मी तर वयानें वृद्ध माझ्यानें अर्जुना सारखी चपलाई करून युद्ध करवत नाहीं परंतु मी जी पूर्वी प्रतिज्ञा केली आहे कीं, युधिष्ठिरास धरून तुझे स्वाधीन करीन ती प्रतिज्ञा सत्य होण्या करितां मी व्यूहाच्या मुखावर बसलों आहें मी अर्जुनाशीं युद्ध करण्यास इच्छित नाहीं तूं युद्ध कर जय पावशील. असें ऐकून दुर्योधन ह्मणतो हे आचार्य, तुह्मी व्यूहाच्या मुखावर उभे असतां तुमचा पराभव करून अर्जुन आंत शिरला त्या अर्जुनाशीं मला युद्ध करण्यास सांगतां हें तुह्मांस कसें बरें दिसतें, अर्जुनानें कृतवर्म्याचा व तुमचा पराभव करून श्रुतायुध व सुदक्षिण मोठे मोठे योद्धे यांचा प्राण घेतला त्या पुढें मी काय युद्ध करूं मला तर शस्त्रास्त्र विद्या कांहींच ठाऊक नाहीं आतां मी तुमच्या स्वाधीन आहें जेणें करून माझें यश संरक्षण होईल तसें करा असें ऐकून आचार्य ह्मणतात हे दुर्योधना, तूं कांहीं चिंता करूं नको अर्जुन युद्धामध्यें पराजित करण्यास अशक्य आहे तथापि त्याचा पराजय करण्याची विद्या आज मी तुला सांगतों ती अशी कीं हें सुवर्णाचें कवच मी आपल्या हातानें मंत्रून तुला घालतों तेणे करून हजारों बाण तुझे अंगावर आले असतां त्यां पासून तुला अणुमात्र व्यथा होणार नाहीं यास्तव हें कवच घालून अर्जुनाशीं युद्ध करण्यास सिद्ध हो असें द्रोणानीं भाषण करून उदक स्पर्श करीत कवचाचें अभिमंत्रण केलें आणि दुर्योधनाचा युद्धामध्यें जय व्हावा ह्मणोन द्रोणाचार्य देवतांची प्रार्थना करून ह्मणतात हे दुर्योधना, ब्रह्मदेव व महान महान ऋषि हे तुझें

कल्याण करोत सर्पांमध्यें श्रेष्ठ जे ते तुझें कल्याणकरोत तसेच दिशा, दिक्पाल, कार्तिकेय, सूर्य ग्रह इत्यादि देवता तुझ्याजयाची इच्छा करोत अशी देवतांची प्रार्थना करून द्रोणाचार्य दुर्योधनास ह्मणतात कीं, ही कवचविद्या पूर्वीं ज्यावेळेस वृत्रासुरानें सर्वदेव युद्धामध्येंपराजित करून स्वर्गांतून हांकून दिले त्याकालीं सर्वदेवानीं ब्रह्मदेवाची स्तुती केली त्याकालीं ब्रह्मदेवानीं सर्वदेवांस सांगितलें कीं, हा वृत्रासुर त्वष्ट्यापासून उत्पन्न झाला आहे त्वष्ट्यानें पूर्वी माहादेवास प्रसन्न केलें त्याकालीं महादेवानीं सांगितलें कीं, वरमाग त्याकालीं त्वष्ट्यानें वर मागितला कीं, सर्वदेवांचा पराभव करणारा असा एक पुत्र असावा त्याप्रमाणें त्वष्ट्यास हा वृत्रासुर पुत्रझाला तो हा तुह्मास पीडा करितो तस्मात् सर्वदेवानीं इंद्राशीं सह वर्तमान मंदराचलावर जाऊन भगवान् शिवास प्रसन्न करा ह्मणजे त्याच्या नाशाचा उपाय तो तुह्मांस सांगेल. असें ब्रह्मदेवानीं सांगितल्यावर इंद्रासहवर्तमान सर्व देवानीं मंदराचलावर जाऊन शिवास प्रसन्न केलें त्याकालीं शिवसर्वदेवांस ह्मणतात कीं, तुह्मी येथें कशाकरितां आलां हें मी जाणलें त्वष्ट्याचा पुत्र वृत्रासुर याणें तुह्मास फार दुःख दिलें ह्मणोन तुह्मीं येथें आलां आहां बरें आतां चिंता करूं नका त्यास मारण्याचा उपाय मी तुह्मास सांगतों असें ह्मणोन शिवानीं आपल्या शरीरावरचें कवच सुवर्णासारखें तेजस्वी काढून इंद्रास दिलें आणि मंत्राचा उपदेश करून सांगितलें कीं, हें कवच तूं अंगांत घातलेंस ह्मणजे वृत्रासुराचा वध सहज करशील तें कवच शिवानीं दिलेलें घालून इंद्रानें सैन्यासहवर्तमान वृत्रासुराचा वध केला द्रोण ह्मणतात हे दुर्योधना तो कवच मंत्र इंद्रानीं अंगिरास दिला अंगिरानीं बृहस्पतीस सांगितला बृहस्पतीनें अग्निवेश्यास सांगितला अग्निवेश्यानें मला सांगितला तो हा कवच मंत्र मी तुला आज देतों. असें ह्मणोन आचार्यांनीं कवच हातामध्यें घेऊन मंत्रविलें आणि दुर्योधनाच्या अंगांत घातलें त्या हर्षानें आचार्यांस नमस्कार करूनतो युद्धास सिद्ध झाला आणि हजार रथी, दहा हजार हत्ती, कांहीं त्रिगर्तांची सेना, लक्ष अश्व व दुसरे कांहीं माहारथी बरोबर घेऊन वाद्यांचा गजर करीत युद्ध कर-

ण्या करितां अर्जुना जवळ आला. अ. वि. या अ. आहे.

९५ अध्याय पंचाण्णव.— संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा, द्रोणा सहवर्तमान दुर्योधन कवच घालून रणामध्यें उभा असतां कृष्ण व अर्जुन याणीं एकाएकीं द्रोणावर बाण वृष्टी केली तशीच धृष्टद्युम्न प्रभृति पांडवांकडील योध्यानीं द्रोण सैन्यावर लक्षावधी बाणांची वृष्टि केली तेणेंकरून द्रोणसैन्य आच्छादित झालें. कौरव पांडवांनीं युद्ध होत असतां दोन्ही सेना एकमेकांत मिसळल्या आणि गजाश्वरथ यांच्या गमनानीं एकाएकीं धारा सुटल्या गदायुद्धाच्या आघातानें विजा चमकूं लागल्या तरवारी वशक्ती यांच्या आघातानें अग्नि उत्पन्न होऊन सैन्यास जाळूं लागला या प्रकारें उभयतांचे सैन्यांत आकांत झाला असतां सर्व पांडव कोणच्याही प्रकारानें द्रोणाचा पराभव व्हावा ह्मणोन यत्न करूं लागले द्रोणाचार्यांनीं केकेया सहवर्तमान पांडवांस बहुत त्रासदिल्हा व इतरही सर्व राजे मिळोन पांचालावर बाणाची वृष्टी करूं लागले त्याकालीं धृष्टद्युम्न द्रोणाच्या बाणानीं परमपीडित होऊन अर्जुन व आपण द्रोणाशीं युद्ध करूं लागला धृष्टद्युम्नानें हजारों बाणीं करून द्रोणाचार्यास व्यापून टाकिलें द्रोणाचार्य ज्याज्या योध्यांवर बाण टाकीते बाण धृष्टद्युम्न तोडून टाकी हें पाहून आचार्य धृष्टद्युम्न आपल्यास आतां आवरत नाहीं असें समजून दोन घटिका उगीच रथामध्यें स्तब्ध बसले तेव्हां धृष्टद्युम्नानें आपल्या सेनेचे तिनविभाग केले त्यांतील एक विभाग भोज्याशीं, दुसरा विभाग जलसंधासीं, तिसऱ्या विभागानी सेना घेऊन आपण द्रोणाचार्यासीं युद्ध करूं लागला ज्याकालीं सैन्याचे तीन विभाग करून कौरवांच्यासैन्याशीं पांडव युद्ध करूं लागले त्याकालीं सर्व कौरवांची सेना भयानें पळूं लागली अशी सैन्याची अवस्था झाली असतां द्रोणाचार्य एकाएकीं अग्नीसारखा क्रुद्ध होऊन धृष्टद्युम्न व अर्जुन यांचा आतांच प्राण घ्यावा अशा इच्छेनें पुन: उभयतांवर बाणांची वृष्टी करूं लागला द्रोणानी धृष्टद्युम्नाचे चारी अश्व व सारथी मारून एकबाण धृष्टद्युम्नाच्या हृदयांत मारिला तेणें करून धृष्टद्युम्न कांहींसा मूर्छित झाला ज्याकालीं द्रोणाचे बाण-

पांडव सैन्यावर येऊं लागले त्या काली सर्व पांडवांचें सैन्य भयाभीत हो ऊन पळण्याचा विचार करूं लागलें त्या कालीं कौरवां कडील योद्धे क्रुद्ध होऊ न कांहीं भीमसेनाशीं युद्ध करूं लागले. विविंशती, चित्रसेन, विकर्ण, क्षेम धूर्ति, बाल्हिक हे आप आपले सैन्या सहवर्तमान द्रौपदेयांसीं युद्ध करूं लागले, याप्रकारें उभयतां कडील योध्यांचा परस्पर मोठा संग्राम होत अस तां कौरवां कडील योध्यानीं जयद्रथास सर्वसैन्याचे पाठीमागें ठेऊन अ श्वत्थामा दक्षिण बाजूस व कर्ण उत्तर बाजूस असे चक्ररक्षक ठेऊन दुसरे योद्धे सोमदत्ती कृप इत्यादि पुढच्या बाजूस ठेविले आणि इतर योद्धे पांड वाशीं युद्ध करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

९६ अध्याय शाण्णव— संजय भाषण करतो हे राजा, याप्रकारें कौरव पांडवांनें आश्चर्यकारक युद्ध होत असतां द्रोणाचार्यानें व्यूहाच्या अग्रभागीं उभें राहून पांडवांवर असंख्यात बाणांची वृष्टी केली. पांडवां नीं ही द्रोणावर असंख्याक बाणांनी वृष्टी केली तेव्हां अवंती देशाचे राजे विंदानुविंद यानीं दहा बाणांचा विराटास प्रहार केला नंतर विराटानें असं ख्यात बाणानीं विंदानुविंद यांस मूर्च्छित केलें. द्रौपदीच्या पुत्रानीं बाल्हिक राजानें चिलखत बाणें करून तोडलें बाल्हिकानें नऊ बाणें करून या द्रौपदी चे पुत्रांस मूर्च्छित केलें. शैल्य व काशी राजानें युद्ध परस्पर मोठें भयंकर झालें. दुःशासनानें सात्यकीवर नऊ बाण टाकून त्यास मूर्च्छित केलें नंत र कांहीं वेळानें सात्यकीनें सावध होऊन दुःशासनाचा तीक्ष्ण दहा बाणानीं भेद केला. अलंबुष राक्षस कुंती भोज याशीं युद्ध करून पांडवाच्या सेनेस त्रास देऊं लागला तेव्हां कुंती भोजानें हजारों बाणें करून अलंबुषास हतवी र्य केलें. शकुनीवर नकुळ सहदेवानीं हजारो बाणांची वृष्टी करून पीडित केलें तेव्हां तो विमुख होऊन पळूं लागला, तो पाठीमागून माद्री सुतानीं हजारों बाणांची वृष्टी केली तेव्हां शकुनी रथांत बसून पळाला आणि घ टोत्कचाच्या अग्रभागीं येऊन युद्ध करूं लागला तेव्हां परस्पर एकमेकां वर मायेनीं अस्त्रें टाकूं लागले. युधिष्ठिरानें शल्यास पन्नास बाणें करून वेध केला. विविंशती, चित्रसेन व विकर्ण हे सेने सहवर्तमान भीमसेनाशीं

युद्ध करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सत्याण्णव.— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, पांडवांशीं युद्ध करण्या करितां कौरवांनीं आपल्या सेनेचे तीन विभाग केले त्यांतील एक विभागाचा मुख्य जलसंध भीमसेनाशीं, दुसरे विभागांतील प्रमुख कृतवर्मा युधिष्ठिराशीं, द्रोणाचार्य धृष्टद्युम्नाशीं याप्रमाणें युद्ध करूं लागले असतां हजारो रथी एक क्षणांत यमलोकास गेले. धृष्टद्युम्न व द्रोण एकमेकांशीं निकरानें युद्ध करूं लागले त्याकाळीं वीरांचीं मस्तकें तुटून पडलेलीं, पृथ्वीवर पडलेलीं कबंधें पुनः पुनः उठून नाचूं लागलीं कांहीं हातामध्यें शस्त्रास्त्रें घेऊन लोकांस मारण्या करितां धांऊं लागलीं. कित्येक योध्यांनीं शत्रूच्या भयास्तव आपल्या शस्त्रानीं आपले गळे कापून घेतले. कांहीं गजपतले त्यांच्या पायांखालीं तुडवून कितेक पायदळ, घोडे स्वार व रथ यांचा नाश झाला. असें धृष्टद्युम्न व द्रोण यांचें अमर्याद युद्ध होत असतां धृष्टद्युम्नानें आपले रथाचे अश्व द्रोणाचार्यांच्या अश्वांत मिश्रित केले आणि द्रोणाचार्यांचा प्राण घ्यावा या इच्छेनें ढाल तरवार हातामध्यें घेऊन धृष्टद्युम्न द्रोणाच्या रथामध्यें प्रवेश करणार इतक्यांत आचार्यांनीं आपला रथ पाठीमागें हटविला आणि शंभर बाणानीं धृष्टद्युम्नाचा मुगुट तोडून दाहा बाणें करून खड्ग तोडलें, चौसष्ट बाणें करून अश्व मारिले व चंद्राकार बाणें करून ध्वज व छत्र तोडून पार्श्वभागाचे सारथी मारिले त्याकाळीं धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांच्या बाणानीं बहुत पीडित झाला. तेव्हां सात्यकीनें चौदा तीक्ष्ण बाणांचा आचार्यांवर प्रहार करून धृष्टद्युम्नास सोडविलें नंतर सात्यकी हा धृष्टद्युम्नाचा संरक्षण करणारा आहे असें पाहून आचार्यांनें सव्वीस बाण सात्यकीस मारिले. सात्यकीनें त्या सर्व बाणांचें निवारण करून आचार्यांच्या उरस्थलावर प्रहार केला त्याकाळीं सर्व कौरवांकडील योद्धे धृष्टद्युम्नास टाकून एकाएकीं सात्यकीवर धांवले. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

९८ अध्याय अठ्याण्णव.— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, सात्यकीनें द्रोणाशीं कसकसें युद्ध केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, द्रोणाचार्य एकाएकीं सात्यकीवर बाणांची वृष्टी करूं ला

गला. त्या कालीं सात्यकी आपल्या सारथ्यास ह्मणों लागला कीं, हे सूता, ब्राह्मणानें आपलें ब्रह्मकर्म करावयाचें तें न करितां हा क्षात्रधर्म स्वीकारून कौरवांस अभय देऊन युद्धास प्रवृत्त झाला आहे तरि मा झार थ्यात्या अग्रभागीं ने ह्मणजे त्यानें क्षात्र कर्म कसें आहे तें मी पाहातों. असें ऐकून सारथ्यानें रथ आचार्यां समोर नेला तेव्हां द्रोणानीं लक्षावधी बाणांचा सात्यकीवर प्रहार केला सात्यकीनें त्या सर्व बाणांचें निवारण करून हजारों बाणानीं आचार्यांस त्रास केलें उभयतांच्या त्या बाणानीं सूर्यास अवरोध झाल्या मुळें अंधःकार पडला. रथाचे घोष मेघ गर्जने सारखे होऊं लागले, बाणांच्या परस्पर अघातानें विद्युल्लते सारखे अग्नि उत्पन्न होऊं लागले. उभयतांचीं छत्रें मोडलीं, ध्वज मोडले, उभयतांच्या अंगावर बाणांच्या प्रहारानीं रक्ताचे प्रवाह चालले हें युद्ध पाहाण्या करितां आकाशांतून अमर विमानांत बसून आले तसेच सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, उरग, यक्ष हे ही विमानांत बसून सात्यकी व आचार्य यांचें हस्त लाघव पाहून थक्क झाले आचार्यांनीं हातांत धनुष्य घेऊन बाण सात्यकीवर टाकावा इतक्यांत सात्यकीनें तें धनुष्य तोडून टाकावें सात्यकीनें धनुष्य घेऊन बाण टाकावा इतक्यांत आचार्यांनीं तें धनुष्य तोडावें याप्रमाणें सात्यकी व आचार्य याणीं एकमेकांचीं धनुष्यें हजारों तोडलीं त्या कालीं द्रोण सात्यकीस भंग करण्यास अशक्य असे एक धनुष्य बाण टाकणार इतक्यांत सात्यकीनें तें ही धनुष्य तोडलें. याप्रमाणें सात्यकीनें आचार्यांचीं सोळा धनुष्यें तोडलीं त्याकालीं द्रोणानीं मोठी प्रशंसा करून मान डोलवली आणि वाहावा ह्मणोन शाबासकी दिली. पुढें पुढें सात्यकीचें हस्त लाघव देवांस देखील दृष्टिगोचर होईनासें झालें असा सात्यकीचा मोठा भयंकर पराक्रम पाहून कौरवांकडील योद्धे सात्यकीची प्रशंसा करूं लागले. आचार्यांनीं सात्यकीवर अग्नि अस्त्र टाकिलें त्याजवर सात्यकीनें वरुणास्त्राची योजना केली तेव्हां सैन्यामध्यें एकाएकीं हाहाकार झाला तो कोलाहल ऐकून युधिष्ठिर, भीमसेन, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न इत्यादिक पांडवांचे योद्धे सात्यकीचे साह्यास आले कौरवांकडील दुःशासन प्रभृति राजपुत्र द्रोणाचार्यां

च्या साहाय्यास आले नंतर मोठेंच निर्मर्याद युद्ध झालें. पृथ्वी वरून धूळ उडाली ती आकाश दिशा यांस व्यापून कोणास कांहीं दिसेनासें झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

९९ अध्याय नव्याणवा.– संजय सांगतो हे राजा, असें परस्परांचें युद्ध होत असतां श्रीकृष्णानीं व्यूह भेद करून रथ आंत नेला आणि रथाचीं मंडळें घेतलीं नंतर अर्जुनानें शत्रूंचे प्राण घेणाऱ्या अशा बाणानीं एक कोश पर्यंत शत्रूंचीं शिरें कापून मैदान करून वेगानें रथ पुढें पुढें चालविला तों रथ, अश्व, गज, पदाति यांची चोहीं कडून दाटी झाली त्या कालीं अर्जुनाच्या रथाचे घोडे नाना प्रकारचीं मंडळं करूं लागले त्या मंडळाच्या वेगानें घोड्यांस श्रम झाला हें पाहून विंदानुविंद याणीं चौसष्ट बाण अर्जुनावर टाकिले व श्रीकृष्णावर सत्तर बाण टाकून शंभर बाणें करून घोड्यांस वेध केला. अर्जुनानें नऊ बाणें करून विंदानुविंद यांचे बाण नासित केले. भल्लबाणें करून विंदानुविंद यांचीं धनुष्यें तोडून सुवर्णा सारखे उभयतांचे ध्वज तोडले तेव्हां उभयतां क्रोधानें दुसरीं धनुष्यें हातांत घेऊन अर्जुनावर धांवले पुनः अर्जुनानें ही उभयतांचीं धनुष्यें तोडलीं आणि विशिख बाणें करून उभयतांचे अश्व व पार्ष्णी सारथी मारून विंदाचें शीर पृथ्वीवर पाडलें. हें पाहून अनुविंदानें श्रीकृष्णाच्या मस्तकावर गदेचा प्रहार केला त्या प्रहारानें श्रीकृष्ण किंचित् ही न भीतां मैनाक पर्वता सारखा अचल बसला होता इतक्यांत अर्जुनानें साहा बाणें करून अनुविंद याचे दोन पाय दोन भुज व शिर छेदून पृथ्वीवर पाडलें हें पाहून विंदानुविंद याचे सैनिकानीं अर्जुनावर शतशाहो बाणांची वृष्टी केली तेव्हां अर्जुनानें त्या सर्व बाणांचें निवारण करून हजारों गजाश्व पदाति सहित सैन्याचा नाश केला आणि तो कौरवांच्या सैन्याचा भेद करून पुढें चालला. तेव्हां अर्जुनाच्या रथाचे घोडे कमी धांऊं लागले. तृषेंकरून फार व्याकुळ झाले व शूरांच्या बाणांचीं क्षतें पडलीं तेणें करून ही बहुत हैराण झाले हें पाहून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, आपले घोडे अगदीं थकून गेले आतां शत्रूचा पराभव करणें कठिण याजकरितां घोड्यांस रथापासून सोडून खरारा वगैरे करून पाणी पाजावें आणि त्यांच्या शरीरां

न जीं बाणांचीं शल्यें रुतलीं असतील तीं काढून कांहीं वेळ त्यांस विश्रांती द्यावी. असें ऐकून कृष्ण ह्मणतात हे अर्जुना, माझे ही मनांत तसेंच आहे आतां तूं रथावरून खालीं उतर असें सांगतांच अर्जुन रथाखालीं उतरला नंतर कृष्ण हातांत घोडे धरून पाण्याचा शोध करतात इतक्यांत कौरवांक डील योध्यानीं अर्जुनास मारण्याची ही फार चांगली वेळ आहे असा निश्च यकरून ते सर्व एकदम अर्जुनावर बाणांची वृष्टी करूं लागले असतां अर्जु नानें त्या सर्व योध्यांचा पराभव केला. असें युद्ध होत असतां अर्जुनानें नि मिषमात्रांत सर्वांचीं शस्त्रास्त्रें छिन्न करून योध्यांस दूर पळविलें. अर्जु नाच्या व कौरवांच्या योध्यांच्या बाणांच्या संघर्षणानें विद्युल्लते सारखे आ काशांत अग्नि चमकूं लागले त्याकालीं सेनासमुद्र फारच शोभूं लागला. इ कडे कृष्ण ह्मणतात हे अर्जुना, येथें पाणी अल्प आहे आतां कसें करावें त्याकालीं अर्जुनानें एक बाण पृथ्वींत मारून एकाएकीं दिव्य सरोवर नि र्माण केलें त्या सरोवराच्या काठीं हंस, कारंड, चक्रवाक पक्षी क्रीडा करितात. प्रफुल्लित कमलें विस्तीर्ण झालेलीं ज्या सरोवरांत उत्तम प्रकारचीं शोभतात. हजारों ऋषिगण त्या सरोवराच्या तटाकीं बसले आहेत इतक्यांत नारदही भगवंताचें दर्शन घेण्या करितां आले आहेत व ज्यातटाकीं बाणांचे खांब व व भिंती असें शरगृह अर्जुनानें उत्पन्न केलें हें कृष्णानीं पाहिलें कौतुक पा हून अर्जुनास शाबासकी दिली आणि घोडे शरगृहांत नेऊन बांधिले. अ सा विषय या अध्यायांत आहे.

१०० अध्याय शंभर — संजय सांगतो हे राजा. रथाचे घोडे सोड ल्यावर अर्जुन पदाती होऊन हजारों योध्यांशीं युद्ध करून त्यानें त्यांचें नि वारण केलें हें पाहून सिद्ध, चारण, गंधर्व इत्यादिक ह्मणतात कीं, हें महा- काय आश्चर्य! भगवान् कृष्ण अर्जुनाच्या रथाचे घोडे हातीं धरून त्यांची चा करी करितो आणि अर्जुन पदाती होऊन महान् महान् वीरांचे बाण ग्रस्त क रितो कौरव ही वासुदेवार्जुनाचें अद्भुत कर्म पाहून आश्चर्य करूं लागले. श्री कृष्णानें घोड्यांच्या अंगांतील बाणांचीं शल्यें काढून जे व्रण पडले हो ते ते हस्त फिरवून बरे केले आणि घोड्यांस पाणी पाजून त्यांस स्नानघा

तलें नंतर कांहीं वेळ विश्रांती देऊन घोडे पुनः रथास जोडले आणि अर्जु न रथांत बसून कृष्णानें जयद्रथाकडे रथ चालविला. हें कौतुक आसमंता त कौरवां कडील योध्यानीं पाहून कांहीं ह्मणों लागले कीं, आह्मांस व धृतरा ष्ट्रास व त्याचे पुत्रांस धिःकार असो. आह्मीं सर्व योद्धे पहात असतां जयद्र थास मारण्याकरितां तिकडे रथ चालविला, आपण जाऊन लौकर यांचें नि निवारण करूं नाहींतर हे जयद्रथास मारतील. कांहीं योद्धे असें ही बोलूं ला गले कीं, दुर्योधनाच्या लोभास्तव धृतराष्ट्र आपला कुळक्षय करून घेतो- आणि संपूर्ण पृथ्वी रसातळास नेतो. आपले कांहीं योद्धे शस्त्रास्त्रे घेऊन अ- र्जुनावर धांवले; परंतु अर्जुनाचा नाश करण्यास एकाचेंही सामर्थ्य न होतां ते पुनः माघारे पळाले. श्रीकृष्णानें पांचजन्य शंखाचा नाद केला तेणें करून- योध्यांस नर फारच त्रास झाला त्याकाळीं दुर्योधन रथांत बसून हजारों सेना समुदाय बराबर घेऊन त्यानें कृष्णार्जुनावर बहुत बाणांची वृष्टी केली तेणे करून उभयतां अगदीं दिसेनासे झाले. रथांच्या चक्रानीं व हत्ती घोड्यांच्या संघर्षणानें धूळ उडून सूर्यास मंदता आली, दिशा व आकाश धुळीनें भरू न गेलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०१ अध्याय एकशें एक— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, कृष्णा र्जुन द्रोण सेनेचा पराभव करीत करीत पुढेंच चालले त्याकाळीं कौरवां कडील योद्धे उभयतांचा पाठलाग करीत त्यांच्यामागें चालले परंतु त्यांतून कांहीं अर्जुनाच्या पराक्रमास भिऊन माघारे फिरले त्यांस नर्कवास होईल- असो समुद्रांत मत्स्य जसे क्रीडा करितात तसे कृष्णार्जुन कौरव सागरांत क्री डा करूं लागले त्याकाळीं सर्व योध्यांनीं निश्चय केला कीं, आतां द्रोणाचा- र्य, कृपाचार्य यांणीं जयद्रथाच्या जीविताची आशा सोडावी; परंतु ते टाक णार नाहींत आपला व त्याचा उभयतांचा नाश करून घेतील. कोणी वीर ह्मणों लागले कीं, जेणें करून कृष्ण, पार्थ यांचा पराभव होईल तें करा त्या काळीं सर्व कौरव एकत असतां अर्जुन बोलला हे कृष्णा, साहा रथ्यानीं जयद्रथाचें रक्षण केलें आहे; परंतु कांहीं चिंता नाहीं. सर्व योद्धे पहात अ- सतां जयद्रथाचा प्राण मी घेईन. हें भाषण कौरवां कडील सर्व योद्धे ऐकि

तात परंतु एकही त्याच्या भाषणाचा विरस करण्यास समर्थ झाला नाहीं. उभयतां कृष्णार्जुन अनेक राजांच्या सेना उल्लंघन करून जयद्रथाच्या सन्निध चालले हें पाहून राजा, तुझे पुत्र आक्रोश करूं लागले. नंतर दुर्योधन बद्धकवच होऊन आपण स्वतः जयद्रथाच्या संरक्षणाकरितां तिकडे चालला तेव्हां कौरव सैन्यांत नाना प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं श्रीकृष्ण व अर्जुन यांचें व जयद्रथाचें थोडें अंतर उरलें इतक्यांत दुर्योधन रथारूढ होऊन तिकडे चालला हें पाहून कृष्ण अर्जुनास बोलूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१०२ अध्याय एकशें दोन:– श्रीकृष्ण भाषण करतात हे अर्जुना, दुर्योधन रथारूढ होऊन येत आहे हा अत्यंत अभिमानी, याणेंच हा कलह उत्पन्न करून येवढें युद्ध करण्यास आरंभ केला, हा केवळ अनर्थाचें मूळ होय तरी याकालीं याचा सारथी व रथासह त्वरित नाश कर तुझें वीर्य यास अजून ठाऊक नाहीं यानेंच द्यूत उत्पन्न करून तुह्मांस अतिशय दुःख दिलें व द्रौपदीस जें दुःख दिलें त्याचा तर मुखानें उच्चार करितां येत नाहीं असा जो दुर्योधन यास याकालीं मारावा अशी माझी इच्छा आहे, याचा नाश झाला ह्मणजे अतःपर कोणीही योद्धे आपल्याशीं युद्ध करणार नाहींत. असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, जें तुझ्या मनांत आहे तेंच मी इच्छित होतों परंतु आज सहजांत त्याची वेळ आली आहे आतां तूं सांगित त्या प्रमाणें मला हें कार्य अवश्य करणें आहे यास्तव याचें शिर कापून द्रौपदीस नेऊन दाखवितों ह्मणजे झालेले क्लेश द्रौपदी सर्व विसरून जाईल आतां दुर्योधन जिकडे असेल तिकडे रथ चालीव. असें भाषण होत आहे इतक्यांत उभयतांच्या सैन्यांत वाद्यांचा गजर झाला तो नाद ऐकून दुर्योधनानें एका एकीं अर्जुनाच्या अग्रभागीं येऊन त्यावर बाण टाकिले. अर्जुनानें ही दुर्योधनावर बाण टाकिले. याप्रमाणें उभयतांचें युद्ध मोठ्या निकरानें होऊं लागलें त्याकालीं कौरवांकडील योद्धे भयभीत होऊन बोलले कीं, दुर्योधन आतां वांचत नाहीं आतां आमच्या दशेस कशानें पडेल असें बोलून दुर्योधनाच्या जीविता विषयीं निराश होऊन उगीच उभे राहिले तेव्हां दुर्योधन-

बोलतो हे योद्धेहो, तुह्मी भिऊं नका स्वस्त असा कृष्णाव अर्जुन यांस यम-लोकाचा मार्ग आतांच दाखवितों असें ह्मणोन अर्जुनास हांक मारून भाषण करतो हे अर्जुना, तूं जर पांडूचा पुत्र खचित आहेस तर तुझी शस्त्रास्त्र-विद्या व पराक्रम जितका असेल तितक्यानें माझा नाश कर. तुह्मी उभयतां माझ्या पाठीमागें अति मोठमोठीं शौर्यें केलीं ह्मणोन लोक बोलतात; परंतु आज पर्यंत तर माझे दृष्टीस तुमचें पराक्रम पडले नाहींत आतां जर तुमचे अंगांत पराक्रम असतील तर दाखवावें मी पाहाण्यास तुमच्या अग्रभागीं उभा आहें. असा विषय या अध्यायांत आहे.

१०३ अध्याय एकशें तीन — संजय सांगतो हे राजा, दुर्योधनानें अर्जुनाशीं असें निर्भर्त्सनेचें भाषण करून तीन बाणानीं अर्जुनास, चार बाणानीं घोड्यांस वेधून दहा बाण श्रीकृष्णाच्या उरस्थलावर टाकले आणि भल्ल बाणें करून कृष्णाच्या हातांतील चाबूक तोडला त्याकालीं अर्जुनानें चित्र पुंख संज्ञक चौदा बाणें करून दुर्योधनास प्रहार केला ते बाण दुर्योधनाच्या कवच्यास लागून निष्फळ खालीं पडले तसेच दुसरे ही बाण अर्जुनानें दुर्योधनावर टाकिले ते ही निष्फळ झाले तेव्हां श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, आज मी फार आश्चर्याची गोष्ट पाहतों कीं, तुझे बाण कधींही व्यर्थ व्हावयाचे नाहींत परंतु आज जितके बाण तूं दुर्योधनावर टाकिलेस ते सर्व निष्फळ झाले आतां आपला विपरीत काळ आला कीं काय? असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा द्रोणाचार्यांनीं अभेद्यकवच धारणविद्या दुर्योधनास सांगून ते कवच आपले हातानें दुर्योधनास बांधलें तेणें करून माझ्या बाणांचा त्या कवच्यावर उपाय चालत नाहीं हें कवच इंद्राच्या वज्रानें ही भेद करण्यास अशक्य मग बाणें करून कोठून होईल? ही कवच धारण विद्या एक द्रोणाचार्य जाणतात किंवा मी जाणतों. इतर त्रैलोक्यांतील दृष्टपदार्थ उत्पन्न करणारा तूंच, भूत भविष्य वर्तमान तुला सर्व विदितच आहे असें असतां वळेंच वेड घेऊन मला विचारितोस हें मोठें आश्चर्य आहे. हे कृष्णा, दुर्योधनाच्या कवच्याचा भेद करून त्यास पराजित करीन तें तूं पाहाशील. हें कवच अंगिराऋषीस शंकरानीं दिलें त्यांणीं बृहस्पतीस दिलें, बृहस्पतीनें इंद्रास, इंद्रानें मला अर्पण केलें तें

व कवच इंद्रानें आचार्यांस दिलें आचार्यांनीं दुर्योधनास दिलें अशी कवचा ची परंपरा मला ठाऊक आहे असें ह्मणोन अर्जुनानें एक बाण दुर्योधना वर टाकिला हें पाहून अश्वत्थाम्यानें तो बाण तोडून टाकिला तेव्हां अर्जुन विस्मित होऊन केशवास ह्मणतो कीं, अस्त्र योजना या वेळेस करूंनये कारण अस्त्र या वेळेस टाकिलें असतां याच्या व माझ्या सैन्याचा नाश करील असें केशवासीं भाषण करतो इतक्यांत दुर्योधनानें विषाग्नि सारख्या नऊ बाणा नीं कृष्णार्जुनास वेध केला तेव्हां अर्जुनानें त्या बाणांचें निवारण केलें पुनः दुर्योधनानें हजारों बाणांची वृष्टी केली ती पाहून कौरवांकडील योद्धे वाद्यां चा गजर करूं लागले. नंतर पार्थानें तीव्र बाणानें दुर्योधनाचे मर्माचा भेद केला नंतर निशित बाणांनीं रथाचे अश्व मारून चक्ररक्षक मारिले नं तर धनुष्य तोडून रथाचे तुकडे करण्याची वेळ आली त्या कालीं दुर्योधन अर्जुनाच्या पराक्रमास भिऊन पळूं लागला. हें पाहून कौरवांकडील योद्धे अर्जुनावर बाणांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां अर्जुनानें बाणवीर्यें करून सर्व सैन्याचा नाश केला. आणि आपले रथाचे आसमंतात एक कोश पर्यंत जमीन ओसाड केली तेव्हां कृष्ण ह्मणतात हे अर्जुना, तूं धनुष्याचा शब्द कर आणि मी पांचजन्याचा शब्द करितों असें ह्मणोन कृष्णानीं शंखाचा व अर्जुनानें धनुष्याचा नाद केला त्या नादानें हजारों वीर प्राण त्याग करून पृथ्वीवर पडलेच अरण्यांतील प्राणी व वृक्षही कंपायमान होऊन पडले, पृथ्वी कंपायमान होऊं लागली, मोठे मोठे पर्वत ढासळले, समुद्र आपली मर्यादा टाकून बाहेर येऊं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०४ अध्याय एकशें चार.— संजय सांगतो हे राजा, कृष्णार्जुनाचें अद्भुत कर्म पाहून जयद्रथाच्या संरक्षणार्थ जे साहारथी होते ते रथांत आरोहण करून उत्तम अश्व रथास जोडून पार्थाकडे आले तसेंच पार्वतीय व सैंधव देशाचे राजे त्या साहा महारथ्यां बरोबर येऊन अर्जुनावर बाणवृष्टी करूं लागले. हें पाहून अर्जुनानें देवदत्त व कृष्णानीं पांचजन्य शंखाचा नाद करून सर्व शत्रूंस भय उत्पन्न केलें. कौरव सैन्यांत भेरी, मृदंग इत्यादिकांचा गजर होऊं लागला. हे सर्व महारथी जीविताची आशा न धरितां अर्जुनावर-

बाणांची वृष्टि करूं लागले त्या कालीं उभयतांकडील सैन्यांत कोलाहल होऊन योध्यांच्या रथाचे घोडे उद्विग्न होऊन कित्येक पळाले तेणेकरून उभय सैन्यातील लोक पराकाष्ठेनें त्रासले. दुर्योधन, कर्ण प्रभृति आठरथी बराबर घेऊन आला त्यांत अश्वत्थाम्यानें वासुदेवास ताडण करून अर्जुनास वेध केला. नंतर कर्णानें बत्तीस व वृषसेनानें सात, जयद्रथानें त्र्याहात्तर, कृपाचार्यांनें दहा शल्यानें दहा बाण टाकून अर्जुनास आच्छादित केलें. भूरिश्रव्यानें श्रीकृष्णाच्या हातांतील चाबुक तोडून त्र्याहात्तर बाणें करून अर्जुनास ताडण केलें अर्जुनानें भूरिश्रव्यास व्यथित केलें ह्मणून भूरिश्रवा उगीच रथांत बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

१०५ अध्याय एकशें पांच:- धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, पार्थाकडील व दुर्योधनाकडील योध्यांचे ध्वज कसकसे होते त्यांजवर चिन्हें कोणकोणतीं होतीं तें मला सांग. असें ऐकून संजय ह्मणतात हे राजा, रथाचे ध्वज नाना प्रकारच्या वर्णानें सैन्यांत फारच शोभूं लागले. कोणाचे ध्वजास कांचनाचे दंड, कोणाचे रत्नखचीत, कोणाचे नाना प्रकारच्या मालानीं सुशोभित असे होते. अर्जुनाच्या ध्वजावर सुशोभित वानराचें चिन्ह होतें, अश्वत्थाम्याच्या ध्वजावर हस्तकक्षाचें चिन्ह, कर्णाचा ध्वज कांचनाच्या मालानीं सुशोभित कृपाचार्यांच्या ध्वजावर गाय व वृषभ यांचें चिन्ह याप्रमाणें सर्वांचीं चिन्हें होतीं. नाना प्रकारच्या चित्रविचित्र रथाच्या चक्राचे विजे सारखे कडकडाट होऊं लागले, दुर्योधनाच्या हिता करितां देशोदेशींचे राजे हातांत धनुष्यें घेऊन अर्जुनावर बाण टाकूं लागले. संजय ह्मणतात धृतराष्ट्रा, हे सर्व राजे तुझ्या पुत्राच्या हिताकरितां आपला प्राण देण्यास उद्युक्त झाले खरे, परंतु हे सर्व यमाचा मार्ग पाहणार अर्जुनाचा एवढा पराक्रम पहा कीं, त्याच्या गांडीवा पासून जे बाण सुटतात ते कोणाच्या दृष्टिगोचर न होतां शत्रूचा प्राण घेतात असा जो अर्जुन यासीं युद्धाचा प्रसंग तुझ्या पुत्रानीं आणला हें बरें नाहीं. याप्रमाणें उभयतांचें युद्ध पराकाष्ठेचें होऊं लागलें. असा वि० या अध्या० आहे.

१०६ अध्याय एकशें साहा:- धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, अर्जुनानें जयद्रथाकडे गमन केल्यावर पाठीमागें पांचालानीं कसें युद्ध केलें असा

प्रश्न ऐकून संजय ह्मणतात, द्रोणप्रभृति कौरव व पांचाल यांचें युद्ध देव असुरां सारखें झालें तेव्हां पांडवां कडील योद्धे द्रोणाचार्यांच्या आसमंतात भागीं येऊन त्याजवर बाणवृष्टी करूं लागले. विकर्णानें नकुळावर व सहदेवावर, दुर्मुखानें सात्यकिवर, व्याघ्रदत्तानें वसोमदत्तीनें द्रौपदेयांवर, भीमसेन यावर आर्षश्रृंगीनें बाणांचा वर्षाव केला. याप्रकारें करून रामरावण यांचे युद्धासारिखें उभयतांचें युद्ध झालें. कौरवांचे योद्धे धर्मराजास न धरिला ह्मणोन बोलूं लागले इतक्यांत धर्म द्रोणावर बाण टाकूं लागला. द्रोणानीं त्या सर्व बाणांचा नाश केला त्याकालीं युधिष्ठिरास पराकाष्ठेचा कोप येऊन आरक्तनेत्र करून त्यानें हातांमध्यें मोठी भयंकर शक्ती घेऊन एकाएकीं भ्रमण करून द्रोणावर टाकिली त्याकालीं सर्व आकाशांतील गंधर्व, किन्नर द्रोणाचार्यांची स्वस्ती असो ह्मणोन आशीर्वाद देऊं लागले. नंतर द्रोणाचार्यांनीं ब्रह्मास्त्र टाकिलें त्या योगानें त्या शक्तीचें भस्म होऊन तें अस्त्र युधिष्ठिरास पीडा करण्यास आलें त्याचें युधिष्ठिरानें निवारण केलें. आचार्यांनीं चार बाणें करून युधिष्ठिराचे घोडे मारून ध्वज तोडला. आणि तीन बाणें करून युधिष्ठिरास प्रहार केला त्याकालीं युधिष्ठिर रथाखालीं उतरून गतधन्वा, गतसारथी द्रोणापुढें उर्ध्व बाहू करून उभा राहिला नंतर कांहीं वेळानें सिंह जसा मृगावर धावतो तसे आचार्य युधिष्ठिरावर धांवले त्याकालीं पांडव सैन्यांत धर्मराज मेला धर्मराज मेला असा महान् घोष झाला इतक्यांत सहदेवाच्या रथावर धर्मराजानें आरोहण करून तो पळाला. असा विषय या अध्यायांत आहे

१०७ अध्याय एकशें सात:— संजय सांगतात हे राजा, इकडे क्षेमधूर्तीनें बृहत्क्षत्राच्या उरस्थलावर प्रहार केला नंतर बृहत्क्षत्रानें क्षेमधूर्तीचे अश्व व सारथी मारून क्षेमधूर्तीचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. धृष्टकेतूनें वीरधन्व्यावर बाणांचा वर्षाव केला तसाच वीरधन्व्यानेंही धृष्टकेतूवर बाणांचा वर्षाव केला नंतर धृष्टकेतूनें शक्ति घेऊन वीरधन्व्यावर टाकिली त्या योगानें अश्व, रथ व सारथी यांचा नाश होऊन वीरधन्वा मरण पावला त्याकालीं कौरव सैन्यांत मोठा हाहाकार होऊन सैन्य दुभांग

झालें त्याकाळीं दुर्मुख सहदेवाच्या अग्रभागीं येऊन युद्ध करूं लागला. सहदेवानें दुर्मुखास विरथी केला. नंतर सहदेवानें त्रिगर्त राजाचा पुत्र निरमित्र यास मारिलें. नकुळानें विकर्णावर बाणांचा वर्षाव करून एक मुहूर्तांत त्यास पराङ्मुख केलें. सात्यकीनें व्याघ्रदत्ताचे अश्व व सारथी मारून त्याचा प्राण घेतला. मागध देशाचा राजा जो व्याघ्रदत्त हा मरण पावल्यावर त्याचे बांधव सात्यकीवर बाणवृष्टी करूं लागले तेव्हां सात्यकीनें त्या सर्वांस पळविलें तेव्हां कौरवांकडील सैन्य इकडे तिकडे पळूं लागलें. नंतर आचार्य भ्रूकुटी चढवून सात्यकीवर धांवले. असा विषय या अध्यायांत आहे.

१०८ अध्याय एकशें आठ— संजय ह्मणतो हे राजा, द्रौपदीचे पांच पुत्र पैकीं सहदेव पुत्रानें सोमदत्तीस मारिलें. नंतर अलंबुष परम क्रुद्ध होऊन भीमसेनाशीं युद्ध करूं लागला. अलंबुष ह्मणतो हे भीमा, बक नामक राक्षसास पूर्वी तूं मारिलेंस त्याचा सूड उगविण्याकरितां त्याचा भ्राता मी आलों आहें माझ्या परोक्ष भ्रात्याचा वध केलास तेणें करून मला फार रोष आला आहे मी आपला पराक्रम तुला दाखवितों. असें ह्मणोन तो त्याजवर बाणांचा वर्षाव करूं लागला. भीमसेनानें इकडे तिकडे अलंबुषास पाहून दिसेना असें समजल्यावर सर्व आकाश बाणें करून भरून टाकिलें हें पाहून राक्षसानें शक्ती, पाषाण, प्रासशूल, तोमर इत्यादिक पांडवांच्यासैन्यांत टाकिलीं त्यामुळें तें सैन्य नाश पावलें तेव्हां एकाएकीं रक्ताची नदी वाहूं लागली. ज्यामध्यें हत्ती ग्राहासारखे, छत्रें कमलिनीसारखीं व योध्यांचे बाहू सर्पासारखे शोभूं लागले अशी नदी पांडव सैन्यांत उत्पन्न झाली हें पाहून भीमसेनानें त्वाष्ट्र नामक अस्त्राचें अभिमंत्रण करून अलंबुषावर टाकिलें त्या अस्त्रानें हजारों शर उत्पन्न झाले तेणे करून राक्षसाच्या मायेचा नाश होऊन अलंबुष पराजित झाल्यामुळें द्रोणसैन्यांत पळून गेला हें पाहून पांडव सैनिक भीमसेनाची स्तुती करूं लागले. अ. वि. या अ. आ.

१०९ अध्याय एकशें नऊ— भीमसेन व अलंबुष यांचें युद्ध पाहून घटोत्कच तत्काल अलंबुषाशीं युद्ध करण्याकरितां आला ते समयीं सर्व पांडव वीर याशीं युद्ध करण्यास धांवले तेव्हां घटोत्कचानें मनांत विचार के-

लाकीं, आतां यास फार वेळ ठेविलातर आपल्या सैन्याचा हा फार नाश करी ल यास यमलोकास लौकरच पाठवावा असा विचार करून गरुड जसा सर्पावर झडप घालितो त्याप्रमाणें घटोत्कचानें आपल्या रथांतून अलंबुषा च्या रथांत उडी टाकून अलंबुषाशीं बाहुयुद्ध आरंभिलें. बहुत कालपर्यंत बा हुयुद्ध करून शेवटीं भरलेला कुंभ पाषाणावर जसा टाकितात तसा घटोत्क चानें अलंबुषास रथाखालीं आपटून टाकिला तेणें करून सर्व अस्थींचें चूर्ण होऊन तो एका एकीं मरण पावला. त्याकालीं सर्व पार्थ व द्रौपदेय घटो त्कच्यावर पुष्पांची वृष्टी करूं लागले. अलंबुषानें प्राणत्याग करते वेळेस ना ना प्रकारचे भयंकर शब्द केले तेणें करून कौरवांचे योद्धे पराकाष्ठेचें भयपा वून अलंबुषाच्या पराक्रमाचें वर्णन करीत आपले ठिकाणीं स्वस्थ उभे रा हिले पांडवांचे योद्धे घटोत्कचाच्या पराक्रमाचें वर्णन करीत करीत नाना प्र कारच्या वाद्यांचे शब्द करूं लागले त्या नादानें सर्व त्रिभुवन व्यापून गेलें. अ सा विषय या अध्यायांत आहे.

११० अध्याय एकशें दहा:— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, द्रोणाचा र्य यांचें निवारण सात्यकीनें कसें केलें? असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, द्रोणाचार्य व सात्यकी प्रमुख पांडव यांनें युद्ध होत असतां सात्य कीवर स्वतः आचार्य धांवून गेले त्याकालीं सात्यकीनें आचार्यांस पंचवीस बाणीं करून ताडण केलें तेव्हां आचार्यांनीं पांच हेम पुंख तीक्ष्ण बाणीं करून सात्यकीच्या उरस्थलावर प्रहार केला ते बाण सात्यकीचें कवच फोडून सर्पा सारखे पृथ्वीत गेले. बलवान् योद्धा सात्यकी आचार्यांच्या बाणप्रहारानीं व्यथित झाला हें पाहून धर्मराज आपले सैनिकांस ह्मणाले हे वीर हो, प्रह्लाना काय राहु जसा सूर्यास ग्रासतो तसा आचार्यांनीं सात्यकीस ग्रासला, धृष्टद्यु म्न व पांचाल यांणीं जाऊन त्यास साह्य करावें. असें ऐकून धृष्टद्युम्न व पांचाल आपली सेना घेऊन सात्यकी कडे गेले. भीमसेन इत्यादिक पांडव ही आपली सेना घेऊन सात्यकीच्या साह्यास गेले त्या कालीं रथाश्वगज यांच्या संमर्दानें जो शब्द झाला तो आकाशव्याप्त झाला सर्व वीरानीं एका एकीं द्रोणावर ती क्ष्ण बाणांची वहूं कडून वृष्टि केली तेणें करून द्रोणाचार्यांनीं परम विस्मय-

करून साधूजसे अतिथी आपले गृहांत आले असतां उदक व अन्न इत्या दिकें करून त्यांचा सत्कार करितात तसा आचार्यांनीं पांडवांच्या बाणांचा प्रकार सत्कार केला. पांडवांचे आलेले बाण तृप्त होऊन आचार्यांस दुःख देतां निःसत्व झाले. जसा सूर्य प्रलय काळीं कोपित झाला असतां सर्वांचें भस्म करितो तसा द्रोणाचार्यांनीं पांडवांच्या सैन्यास त्रास दिल्यावर सर्व पांडव दुःख सागरांत निमग्न होऊन त्राण करणारा कोणी नाहीं असें ह्मणूं लागले. द्रोणाच्या बाणें करून पंचवीस पांचाल महारथी मरण पावले ते ह्यांनें सर्व पळूं लागले इतक्यांत युधिष्ठिरानीं अकस्मात पांचजन्य शंखाचा शब्द श्रवण करून ते ह्मणतात कीं हा शंखाचा शब्द वासुदेवानेंच केला त्याजवरून कांहीं तरी पीडा अर्जुनास झाली असेल. धृतराष्ट्र पुत्र नानाप्रकारचे विजयाचे शब्द करितात व वासुदेवाच्या शंखाचा ही शब्द दुःश्चितच होतो त्याजवरून अर्जुनास महान् संकटप्राप्त झालें असें वाटतें नंतर सात्यकीस ह्मणतात कीं. हे सात्यकी, आतां याची योजना कशी करावी? तेथून अर्जुनाचें वर्तमान आपल्यास कशानें कळतें? धर्मशास्त्र असें कीं, आपल्यास महान् दुःख प्राप्त झालें असतां मित्रास निवेदन करावें मित्रा खेरीज दुःखाचें निवारण व्हावयाचें नाहीं. हे सात्यकी, तूं सर्व योध्यांत श्रेष्ठ असून तुझ्यासारखा मित्र मला कोणी नाहीं कदाचित् मित्रत्व करितां मित्र जे आहेत ते आपला प्राण त्याग करतात जें कठिण काम आहे तें मित्राखेरीज व्हावयाचें नाहीं. जसा श्री कृष्ण पांडवांच्या कार्या करितां निरालस्य तसेंच आह्मी सात्यकी तुला मानितों. पूर्वीं द्वारकेंत अर्जुनाचा व तुझा स्नेह संबंध पराकाष्टेचा आहे हें मी नेत्रेंच पाहिलें. हे सात्यकी, माझ्या वाक्यावरून तूं अर्जुनाकडे जाण्यास सिद्ध हो तुझे सांन्यास भीमसेन व आह्मीं सैन्या सहवर्तमान येऊन शत्रूंचें निवारण करूं. हे सात्यकी, सर्व कौरव सैन्यांत एकटा अर्जुन वासुदेवा सहित सूर्योदया पासून या वेळ पर्यंत युद्ध करतो तेणें करून त्यास फार श्रम झाला असेल. हे सात्यकी, अर्जुनाच्या श्रमाचें निवारण करणारा दुसरा तुझ्या खेरीज कोणी नाहीं. आचार्यांनीं आह्मांस व आमचे सैन्यास फार दुःख दिलें आचार्य उभे असतां सेनाव्यूहांत प्रवेश करणें फार कठीण येवढ्या करितां मी तुझी प्रार्थना करितों जेणें करून

सफल होईल तें कर मी कृष्णाविषयीं फार काळजी करीत नाहीं, कारण तो सर्व जगताचा संरक्षण करणारा आहे तोही अर्जुनाचें संरक्षण करण्यास समर्थ आहे; परंतु तूंहि तेथें जावेंस तुझ्या पुढें हें कौरवांचें सैन्य केवल दुर्बल आहे तुझा पराभव करण्यास या सैन्यांत कोणी नाहीं. हे मित्रा, अर्जुनाचें सान्निध्य लौकर कर आणि इकडे जो वृत्तांत झाला तो सर्व अर्जुनास निवेदन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१११ अध्याय एकशें अकरा.— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, धर्मराजाचें वाक्य ऐकून सात्यकी ह्मणतो हे राजा, मला जसा अर्जुन तसेच आपण अर्जुनाकरितां प्राणत्याग करीन तसाच तुझ्याकरितांही करीन. हे राजा, एकट्या अर्जुनाचें साह्य करीन आणि जयद्रथास मारून सर्व वृत्तांत तुला लौकरच सांगेन इतकें सामर्थ्य माझ्यामध्यें आहे खरें; परंतु माझा रलाज नाहीं वासुदेव व अर्जुन जेव्हां जयद्रथाच्या वधाकरितां येथून निघाले तेव्हां सर्व सैन्यांत तुझ्या देखतां त्यानीं मला सांगितलें कीं, तूं धर्मराजाचें संरक्षण द्रोणाचार्यांपासून ज्या रीतीनें होईल तसें कर यास्तव तुला टाकून मी अर्जुनाच्या शोधाकरितां जावें तर सर्वथा त्याच्या वाक्याचा भंग होईल तसाच भार ह्माज तर तुझ्या ग्रहणाविषयीं वाटच पाहातो तस्मात् अर्जुनाच्या वाक्याची अमर्यादा करून जाणें मला योग्य दिसत नाहीं तथापि न मी गेलों असतां तुझें संरक्षण द्रोणाचार्यांपासून कोण करील तें सांग ह्मणजे आतांच अर्जुनाकडे जातों. अर्जुनाचा पराभव होऊन त्यास कांहीं दुःख झालें असेल ह्मणोन जें कांहीं तुला भय प्राप्त झालें त्याचा त्याग कर कारण जेथें कृष्णार्जुन आहेत तेथें पराभवाचा व दुःखाचा लेशही नाहीं अर्जुनाविषयीं तूं कांहीं काळजी करूं नको. असें ऐकून युधिष्ठिर ह्मणतो हे सात्यकी, तूं जें बोललास तें सर्व खरें आहे; परंतु काय करूं, शंखाचा नाद ऐकिला तेव्हांपासून चित्तास उद्विग्नता प्राप्त झाली तूं या कालीं कितीही भाषणानीं माझें शांतवन केलेंस तथापि माझें चित्त शुद्ध होणार नाहीं तूं गेल्यावर भीमसेन द्रौपदेय, घटोत्कच, विराट, द्रुपद, शिखंडी इत्यादिक माझें संरक्षण करतील. भीमसेन व धृष्टद्युम्न हे द्रोण व कृतवर्मा जरी सैन्यासहवर्तमान मला धर

ज्यास आले तरी त्यांचा पराभव करतील. धृष्टद्युम्न हा कवच, धनुष्य, बाण खड्ग, वस्त्र व भूषणें यांसहवर्तमान अग्नी पासून द्रोणाच्या वधा करितांच उत्पन्न झाला आहे त्याच्यावर विश्वास ठेऊन हे सात्यकी, तूं अर्जुनाकडे जा अशी माझी इच्छा आहे. अ० १११ या अ० आहे.

११२ अध्याय एकशें बारा:— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, युधिष्ठिराचें वाक्य ऐकून सात्यकी मनांत विचार करतो की, जर युधिष्ठिराच्या वचना प्रमाणें करावें तर अर्जुनाचा रोष मजवर होईल अर्जुनाच्या वाक्या-प्रमाणें करावें तर युधिष्ठिराचा कोप होईल असो; परंतु अर्जुनाचा रोष झाला तरी चिंता नाहीं जर मी अर्जुनाकडे न गेलों तर माझ्या कुळाची उपहास्यता होईल व सर्व लोक ह्मणूं लागतील कीं, सात्यकी द्रोणाच्या व्यूहास भिऊन धर्माच्या संरक्षणाचें मिष करून अर्जुनाकडे जात नाहीं यास्तव पार्थाकडे जाण्याची तयारी करावी. असा विचार करून सात्यकी बोलतो हे धर्मराजा, मी अर्जुनाकडे जातो तूं आपलें कोणत्याही रीतीनें संरक्षण कर. तूं अर्जुन व कृष्ण यांवर जितका लोभ करतोस तसाच माझ्यावर असावा आतां तुझी आज्ञा शिरसा मान्य करून सन्मुख होऊन जें द्रोणाचार्याचें सैन्य तें अभेद्य असतां ही भेद करून जेथें जयद्रथ आहे तेथें जाईन. माझा रथ चार अश्व उत्तम बलवान्, सुवर्णाच्या जाळींनीं युक्त असे जोडून तयार करावा व मातलीचा कनिष्ठ बंधु सूत यास रथावर बसवून रथ हांकण्याची आज्ञा द्यावी. त्याप्रमाणें धर्मराजानें सर्व तयारी केल्या नंतर सात्यकी ब्राह्मणांचा आशिर्वाद घेत चालला असतां ग्रामांतील कन्या शरीरावर अलंकार घालून सात्यकीवर पुष्प वृष्टी करूं लागल्या. सुमुहूर्तावर सात्यकी पार्थाकडे जात असतां भीमसेनही तयार होऊन सात्यकीच्या पाठीमागेंच गेला. सात्यकी व भीमसेन उभयतां कौरव सैन्यांत जातात हें पाहून तुझे पुत्र द्रोणा पाशीं उभे राहिले इतक्यांत आपल्या पाठीमागें भीमसेनही येतो असें पाहून सात्यकी हर्षानें बोलतो हे भीमा, तूं धर्मराजाचें उत्तम प्रकारें संरक्षण कर मज विषयीं कांहीं काळजी करूं नको मी एकाकी कौरव सैन्याचा भेद करून अर्जुनाच्या सन्निध जातों. कोणत्या वेळेस द्रोणाचार्य

घाला घालून धर्मास धरील याचा नेम नाहीं याजकरितां युधिष्ठिरास फार जपन जावें. असें ऐकून भीमसेन ह्मणतो हे सात्यके, तुझ्या वाक्यावरून आतां मी माघारी जातों आणि धर्माचें चांगले प्रकारें संरक्षण करतों असें ह्मणोन भीमसेन माघारी फिरला. हे धृतराष्ट्रा, सात्यकी पुढें चालला हें पाहून तुझे पुत्र पळूंलागले. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

११३ अध्याय एकशें तेरा.— संजय ह्मणतो हे राजा, सात्यकी अर्जुनाकडे जाण्यास निघाला असतां धर्मराजही द्रोणाचार्यांवर निघाला त्या कालीं वसुधान नामक पांचाल राजाचा पुत्र पांडव सैन्यामध्यें असा शब्द करूं लागला कीं, हे कौरवांकडील योद्धे हो, तुह्मीं पहात असतां सात्यकी तुमच्या सैन्याचा भेद करून जातो तुह्मांस शौर्य असल्यास त्याचें निवारण करा अथवा आमच्याशीं तरी युद्ध करा. असें निर्भर्त्सनेचें वाक्य ऐकून कौरवांकडील हजारों योद्धे सात्यकीवर बाणांची वृष्टी करूं लागले. सात्यकीनें त्या सर्व बाणांचें निवारण करून कौरवांकडील सात महान् रथी मारून कित्येक राजे बाणांच्या प्रहारानीं मारिले तसेंच हत्ती व हत्तीवर बसणारे व घोडेस्वार, रथी यांचा बहुत नाश केला असतां कौरवांकडील योद्धे सात्यकीशीं युद्ध न करितां पळों लागले. याप्रकारें करून सात्यकी युद्ध करून ज्यामार्गानें अर्जुन व्यूहांत शिरला त्यामार्गानें जात असतां द्रोणाचार्यांच्या सन्निध गेला त्याकालीं आचार्यांनीं क्रोधानें पांच बाणें करून सात्यकीस ताडण केलें तेव्हां सात्यकीनें नौ तीस बाणानीं द्रोणास व्याप्त केला आणि एक बाणानें सारथी व चार बाणानीं चार अश्व मारून एका बाणानें ध्वज तोडला. या प्रकारें उभयतांचें बाणयुद्ध होत असतां सात्यकी आपल्यास अजय्य आहे असें समजून आचार्य भाषण करतात हे सात्यकी, अर्जुन मजशीं युद्ध न करितां मला प्रदक्षिणा करून एखाद्या कुपुरुषा सारखा आंत गेला तसा जर तूं न जाशील तर माझ्या हातून नाश पावशील. असें ऐकून सात्यकी ह्मणतो हे ब्रह्मन्, ज्या मार्गानें धनंजय आंत गेला त्याच मार्गानें मीही जातों. असें ह्मणोन आचार्यास प्रदक्षिणा करून सात्यकी सेनाव्यूहांत प्रवेश करतांना आपल्या सारथ्यास ह्मणतो हे सारथे, द्रोणाचार्य आमचें निवारण करण्या विषयीं यत्न करील त्या

रत्तव या मार्गानें लौकरच आंत रथ नेऊन पुढें अवंती देशचे राजे, बाल्हिक, कर्ण यांच्या सैन्यामध्यें उभाकर. असें ऐकतांच सारथ्यानें कर्णाच्या सैन्यांत रथ नेला. त्याकाळीं द्रोणानीं सात्यकीवर पाठी मागून बहुत बाणांची वृष्टी केली. सात्यकीनें कर्ण सैन्याचा भेद करून व्यूहांत प्रवेश केला हें पाहून कृतवर्म्यानें साहा बाणांनीं सात्यकीस वेध करून चार बाणांनीं अश्व मारिले असें उभयतांचें युद्ध होत असतां सात्यकीनें भल्ल बाणानें कृतवर्म्याच्या सारथ्यानें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें तेव्हां कृतवर्म्याच्या रथाचे घोडे निर्भय होऊन इकडे तिकडे पळूं लागले. त्याकाळीं कृतवर्मा सात्यकीशीं युद्ध न करितां भीमाकडे गेला नंतर सात्यकी कांबोज्याच्या सैन्याशीं युद्ध करूं लागला. सर्व कांबोज्यानीं मिळून सात्यकीवर बहुत बाणांची वृष्टी केली. परंतु सात्यकी व्यथित न होतां पर्वता सारखा उभा राहून युद्ध करूं लागला. द्रोणाचार्य भोज्यांस व्यूहाच्या मुखावर उभे करून आपण सात्यकीशीं युद्ध करण्या करितां आले. भीमसेन प्रभृति पांडव, पांचाल हे कृतवर्म्याशीं युद्ध करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

११४ अध्याय एकशें चवदा— धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, आमचे सैनिक युद्धांत निपुण द्रोणाचार्य यांणीं संरक्षित असे असतां अर्जुन व सात्यकी हे त्यांचा पराभव करून व्यूहामध्यें कसे शिरले. जेव्हां अर्जुन व सात्यकी आंत शिरले तेव्हां दुर्योधनादि माझे पुत्र कोठें होते व द्रोणाचार्य सर्व योध्यांमध्यें श्रेष्ठ असतां त्याचा ही पराभव करून उभयतां आंत शिरले त्या काळीं माझ्या पुत्रानीं यांचें परावर्तन होण्या विषयीं कांहीं यत्न केला किंवा नाहीं? मला असें वाटतें कीं, माझ्या सैन्याच्या तयारी सारखी तयारी दुसऱ्या कोणाचीही नसेल. मी आज पर्यंत असें समजत होतों कीं, जिकडे द्रोणाचार्य तिकडे पराभव कधींही व्हावयाचा नाहीं; परंतु तो निश्चय आज माझा भंग झाला. असो हे संजया, उभयतां व्यूहांत गेल्यावर कौरवांनीं काय केलें व सेना व्यूहाच्या समीप पांडवांकडील कोण कोण योद्धे उभे होते तें सर्व मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, सर्व अरिष्टास कारण तूं आहेस आतां मूर्ख मनुष्यासारखा शोक कां करितोस? विदुरा

दिकांनीं पूर्वी तुला पांडवांशीं कलह न करण्याविषयीं सांगितलें असतां-त्यांच्या वाक्यांना अनादर करून युद्धाविषयीं सिद्धता तूं केलीस. पूर्वी श्री कृष्णानीं तुमच्या सभेस येऊन पांडवांचें व तुमचें सख्य असावें ह्मणोन तु ह्मांस उपदेश केला असतां त्यांचा अवमान करून श्रीकृष्णाची अवहेल-ना केलीत-आतां कालीं श्रीकृष्ण तुमच्या ज्ञानाची परिक्षा करून धर्माच्या हिताविषयीं यत्न करूं आगला. इत्यादि बोलून संजय, सात्यकीनें व्यूहांत प्रवेश केल्या वरच्या वृत्तांत सांगतो हे राजा, सात्यकी व्यूहांत प्रविष्ट झाल्या वर भीमसेन प्रभृति पांडवां कडील योद्धे कृतवर्म्याशीं युद्ध करूं लागले-असतां भीमानें तीन, सहदेवानें वीस, धर्मराजानें पांच, नकुळानें शंभर, द्रौपदेयांनीं त्र्याहात्तर, घटोत्कचानें सात. धृष्टद्युम्नानें तीन बाणें करून कृत वर्म्यास घाबरा केला. नंतर विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न व शिखंडी यांणीं पां च पांच बाणें करून कृतवर्म्यास वेध केला नंतर कृतवर्म्यानें त्या सर्व बाणां चें निवारण करून एकएकास पांच पांच बाणानीं वेध करून भीमसेना चें धनुष्य व ध्वज तोडले आणि त्यास रथाखालीं पाडलें इतक्यांत भीम-सेनानें दुसरें धनुष्य घेऊन सत्तावीस बाणानीं कृतवर्म्याच्या उरस्थलाव र प्रहार केला. नंतर कृतवर्म्यानें भीमसेनास बाणानीं घाबरा करून-टाकिला त्या कालीं भीमसेनास मूर्छा नासें झालें. हें पाहून सर्व पांडवां कडील योध्यानीं कृतवर्म्यावर बाणांचा वर्षाव केला. इतक्यांत भीमसे नानें सावध होऊन सोनसंडाची शक्ती कृतवर्म्यावर टाकिली तेव्हां कृतवर्म्यानें त्या शक्तीचे तुकडे केले या प्रमाणें उभयतांचें युद्ध होत असतां कृतवर्म्यानें भी मसेनाचें निवारण केलें. नंतर शिखंडी व कृतवर्मा या उभयतांचें भयंकर यु द्ध होऊन कृतवर्म्यानें त्र्याहात्तर बाणानीं शिखंडीचें धनुष्य तोडून त्यास रथो पस्थावर पाडला. या प्रकारें एकट्या कृतवर्म्यानें पांडवांस युद्धापासून विमु ख केलें त्या कालीं सेने सहवर्तमान पांडव आपले जिवाचें त्राण करीत ज्यास जिकडे वाट सांपडली तिकडे पळाले. भ. वि. या अ. आ.

११५ अध्याय एकशें पंधरा- संजय ह्मणतो हे राजा, कृतवर्म्यानें आपल्यापराक्रमें करून सर्व पांडवांस पराजित केलें हें पाहून सात्यकी पांडवां-

चे संरक्षणार्थ क्रोधानें कृतवर्म्यावर बाणांची वृष्टी करूं लागला. कृतवर्म्या नें ही सात्यकीवर बाणांचा वर्षाव केला असें उभयतांचें युद्ध पराकाष्ठेनें होत असतां सात्यकीनें कृतवर्म्याच्या रथाचे अश्व मारून सारथी ही मारिला तेव्हां कृतवर्मा विरथी होऊन सैन्यामध्यें स्तब्ध उभा राहिला तेव्हां सात्यकी ह्मणतो हे सूता, हें त्रिगर्तांचें सैन्य दुरून फारच सुशोभित दिसतें यास्तव तिकडे रथ ने. असें ऐकतांच सूतानें रथ तिकडे नेला तेव्हां सात्यकीनें त्रिगर्तांचे हजारों हत्ती मारून कित्येक गजांस ताडण केलें तेव्हां ते चोंहीं कडे पळूं लागले. हें पाहून जलसंध मोठ्या गजावर बसून सात्यकीवर धांवला. सात्यकीनें जलसंधावर बाणांचा वर्षाव करून जलसंधाच्या गजास पाठी मागें हटविलें तेव्हां जलसंधानें भल्लबाणें करून सात्यकीचें धनुष्य तोडलें. असें उभयतांचें निकट युद्ध होत असतां उभयतांनीं उभयतांचीं धनुष्यें तोडलीं. नंतर सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन क्रोधानें जलसंधाचे बाहू तोडले आणि क्षुरप्रबाणें करून सुवर्णानें भूषित जलसंधाचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. अशी कौरव सैन्याची अवस्था सात्यकीनें केलेली पाहून द्रोणाचार्य सात्यकीशीं युद्ध करूं लागले. तें उभयतांचें युद्ध पराकाष्ठेचें भयंकर देवासुरां सारखें झालें. अ॰ वि॰ या अ॰ आहे.

११६ अध्याय एकशें सोळा:— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, द्रोणाचें व सात्यकीचें युद्ध होत असतां तुझे पुत्र एकाएकीं सात्यकीवर धांवून बाणांचा वर्षाव करूं लागले असतां द्रोणानीं सत्याहात्तर, दुर्मर्षणानें बारा, व दुःसहानें दहा बाणें करून सात्यकीवर प्रहार केला. नंतर दुर्योधनानें बाणवृष्टी करून सात्यकीस फारच दुःखित केलें. नंतर सात्यकीनें भारद्वाजावर तीन, दुःसहावर नऊ, विकर्णावर पंचवीस, चित्रसेनावर सात, दुर्मर्षणावर बारा, विविंशतीवर आठ, सत्यव्रतावर नऊ बाण टाकून दुर्योधनावर निबिड बाणांचा वर्षाव केला. दुर्योधनानेंही सात्यकीवर बाणांची वृष्टी बहुत केली उभयतांनें परस्पर मोठें भयंकर युद्ध होत असतां सात्यकीनें दुर्योधनाचा ध्वज तोडून निशित बाणानीं रथाचे अश्व मारिले आणि क्षुरप्रबाणांनीं सारथी मारून दुर्योधनास बाणजालानीं व्याप्त केला तेणें करून दु

र्योधन बहुत दुःखित होऊन चित्र धन्व्याच्या रथांत बसून पळाला हें-
पाहून कृतवर्मा सात्यकीजवळ आला आणि त्यानें सात्यकीवर सव्वीस-
बाण टाकून पांचबाण सारथ्यास, चार बाण चार अश्वांस मारिले, सात्य-
कीनें त्या सर्वबाणांचें निवारणकरून असंख्य बाणांनीं कृतवर्म्यास वेधके-
ला आणिएकबाण त्याजवर टाकला असतां तो बाण त्याच्या सुवर्णमय
कवचाचा भेदकरून रक्तानें व्याप्त झालेला पृथ्वींत शिरला त्या योगानें
तो बहुत व्याकूळ होऊन रथाखालीं पडला. याप्रकारें कृतवर्म्याचें निवार
ण करून अर्जुनाकडे चालला असतां कांहीं वेळानें कृतवर्मासावधहोऊन
पांडवांचें निवारण करण्याकरितां व्यूहाच्या मुखावर उभाराहिला. असा वि
षय या अध्यायांत आहे.

११७ अध्याय एकशें सतरा— संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा,
सात्यकीनें सैन्यास भयाभीत केलें हें पाहून द्रोणाचार्यांनीं तीनबाण
सात्यकीच्या ललाटावर मारिले. सात्यकीनें सहस्त्रावधी बाणांची आचा
र्यांवर वृष्टीकरून शंभर बाणांनीं सारथी मारिला. द्रोणांनीं सत्तर बाणांनीं
सात्यकीच्या रथाच्या अश्वांस वेधकरून एक बाणानें धनुष्यतोडून एक-
बाणानें ध्वज तोडला असें परस्परांचें निकट युद्ध होत असतां सात्यकी पर
म क्रोधित होऊन त्यानें अर्धचंद्राकार बाणें करून द्रोणाचार्यांचा सारथी
मारिला आणि कांहीं तीक्ष्ण बाणांनीं घोड्यांस वेध केला असतां रथाचे-
घोडे सुटून मंडळ करीत करीत पळाले. हें पाहून कौरवांकडील राजपुत्र ए
काएकीं आक्रोश करीत द्रोणापाशीं आले. नंतर कांहीं काळानें द्रोणाचार्य
आपले रथास दुसरे अश्व जोडून सात्यकीशीं युद्ध न करितां व्यूहाचे मुखाव
र उभे राहिले. अ. वि. या अध्यायांत आहे.

११८ अध्याय एकशें अठरा— संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, भार
द्वाज व कृतवर्मा या उभयतांस जिंकून सात्यकी अर्जुनाकडे चालला हें पाहू-
न कौरवांकडील सुदर्शन नामक राजा सात्यकीचें निवारण करण्यास प्रवृ-
त्त झाला. सुदर्शनानें सात्यकीवर तीक्ष्ण बाणांची वृष्टी केली. तेव्हां सात्यकी
नें चार बाणांनीं सुदर्शनाच्या रथाचे घोडे व एक बाणानें सारथी मारून

ध्वज तोडला आणि एक अर्धचंद्राकार बाणानें सुदर्शनाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. असा विषय या अध्यायांत आहे.

११९ अध्याय एकशें एकूणीस :— संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, सात्यकी सुदर्शनास मारून पुढें निर्भय जात असतां सूतास भाषण करतो हे सूता, मोठमोठे योद्धे मीं रणांत जिंकिले अर्जुनाच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार ऐकूं येत आहे याजवरून तर मला वाटतें कीं, आपले पासून अर्जुन फार लांब नाहीं आपल्यास शकुन चांगले होतात या जवरून असें दिसतें कीं, सूर्य अस्तास जाण्याचे पूर्वी जयद्रथास मारून अर्जुन समरामध्यें विजई होईल. असें ऐकून सारथी सात्यकीची बहुत स्तुती करून बोलतो हे सात्यकी, आतां तुजसें कोणी शत्रु जिंकण्याचे राहिले आहेत किंवा नाहींत? असें ऐकून सात्यकी भाषण करतो हे सूता, आतां दुसरे कोणी उरले नाहींत; परंतु यवनांचे समुदाय बहुत आहेत तसेच कांबोज, किरात, बरबर, शबर, यांचे ही समुदाय मार्गांत बहुत आहेत त्यांस जातां जातां यमलोकीं पाठवीन हें पाहून दुर्योधन देखील आश्चर्य करील. हे सारथे, माझी भक्ती पांडवांचे ठायीं किती आहे ती कौरवांस आज समजेल. हे सूता, आतां रथ पुढें लौकर ने. असें ऐकून सूतानें अश्वास लौकर हांकले तों मार्गांत कांबोज व यवन यांणीं सात्यकीवर बाणांचा वर्षाव केला त्याकालीं सात्यकीनें यवनांवर अर्धचंद्राकार बाणांची वृष्टि करून कोणाचे बाहू, कोणाचे पाय, कोणाचीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडलीं याप्रमाणें सात्यकीनें आठ हजार सातशें पांसष्ट यवनांचे व कांबोज्यांचे योद्धे मारिले. पुढें शबर व किरात व बरबर यांना ही पराभव करून तो अर्जुनाकडे चालला. सात्यकीचा पराक्रम पाहून त्यावर देव, गंधर्व, यक्ष, राक्षस पुष्पवृष्टि करूं लागले. कौरवांकडील योद्धे ही सात्यकीच्या पराक्रमाची प्रशंसा करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१२० अध्याय एकशें वीस :— संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा, कांबोज व यवन प्रभृति राजे यांस जिंकून सात्यकी अर्जुनाकडे चालला त्याकालीं कौरवांकडील योद्धे हा दुसरा सूर्यच येतो काय अशी शंका मनांत-

आणोन त्याशीं स्पर्धा न करितां उगेच उभे राहिले.नंतर दुर्योधन, चित्रसेन, दुःशासन, विविंशती, शकुनी, दुःसह, दुर्धर्षण इत्यादिक बहुत योध्यांनीं सात्यकीस बाण वर्षावानें अदृश्य करून टाकिलें तेव्हां सात्यकीनें पहिले-सपाट्यास तीनशें अश्व, चारशें हत्ती मारून दुर्योधन प्रभृतिवर विषासारख्या बाणांची वृष्टी करून त्यास मूर्च्छित केलें तेणें करून दुर्योधन प्रभृति फार त्रस्त होऊन दुर्योधनानें सात्यकीस तीन बाण मारिले आणि-सारथी व अश्व यांस तीन तीन बाणें करून वेध केला नंतर दुःशासनानें-बारा, शकुनीनें पंचवीस, चित्रसेनानें पांच, दुःसहानें पंधरा बाणांचा सात्यकीच्या उरस्थलावर प्रहार केला. सात्यकीनें त्या सर्व शरांचें निवारण करून तीन बाणांनीं शकुनीचें धनुष्य तोडून दुर्योधनाच्या उरस्थलावर तीन बाण मारिले आणि भल्लबाणें करून दुर्योधनाचा सारथी मारून पृथ्वीवर पाडला तेव्हां रथाचे घोडे इकडे तिकडे पळूं लागले तेव्हां दुर्योधनही पळून गेला. हें पाहतांच दुःशासन, चित्रसेन इत्यादिक योद्धे पळून गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१२१ अध्याय एकशें एकवीस.-- धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, सात्यकी आमच्या महान् सैन्याचें मर्दन करून अर्जुनाकडे जात असतां निर्लज्ज जे माझे पुत्र यांनीं काय केलें तें मला सांग. असें ऐकून संजय-ह्मणतात हे राजा, तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें शासमक युद्धाविषयीं क्रूरमती धारण करून पुनः उभे राहिले हजार घोडेस्वारांसह वर्तमान तुझा पुत्र दुर्योधन याणें शक, कांबोज, बाल्हिक, यवन व पार्वतीय इत्यादि योद्धे बरोबर घेऊन चोहों बाजूनें सात्यकीवर हल्ला केला. हें पाहून दुःशासन हीं सात्यकीशीं युद्ध करूं लागला. त्या काळीं सात्यकीनें दुःशासनाकडे जाऊन युद्धामध्यें कित्येक हत्ती व घोडे मारिले कांहीं हत्ती युद्धभयानें चोहोंकडे पळाले त्यांचे पादसंमर्दानें कितेक पदाती मरण पावले. नाना देशांतील नानाजातीचे लोक सात्यकीच्या बाणांनीं मरण पावले हें दुःशासनानें पाहून तो सर्व योध्यांस ह्मणाला कीं, हे योद्धे हो तुह्मी माघारी फिरा हें पार्वतीय योद्धे आतां पाषाणें युद्ध करून सात्यकीचा पराभव करतील. कौरव-

पांडव यांस पाषाण युद्ध कसें करावें हें ठाऊकें नाहीं असें ह्मणून पार्वतीय यांस दुःशासनानें पाषाण युद्ध करण्यास आज्ञा दिली त्या काळीं एका एकीं पार्वतीय हत्ती सारखे पाषाण घेऊन चोंहीं बाजूनें सात्यकीवर प्रहार करूं लागले. त्या काळीं सात्यकीनें आपल्या बाणें करून पार्वतीय यांचे पाषाण चूर्ण करून टाकिले आणि पार्वतीयांचीं कवचें, रथ, सैन्य यांची धुळधाणी करून टाकिली. हें पाहून द्रोणाचार्य बोलतात हे सूता, सात्यकीनें आपल्या सैन्याची फार खराबी केली या जकरितां आपला रथ तिकडे चालीव. असें ऐकून सूत ह्मणतो हे महाराज, वाटेंत प्रेतांचे पर्वत पडले आहेत तिकडे जाण्यास मार्ग नाहीं यास्तव आपण सात्यकीकडे न जातां पांचाल्य व पांडव तुह्मांस मारण्या करितां आले आहेत त्यांचें निवारण करा. असें ऐकतात तों इतक्यांत दुःशासन प्रभृति योद्ध्यांचा पराभव होऊन सर्व सैनीक द्रोणाचार्यां जवळ येऊन बोलले हे महाराज, आतां पुढें काय करावें सात्यकी पुढें आमचा इलाज चालत नाहीं. अ. नि. या अ. आ.

१२२. अध्याय एकशें बावीस - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, दुःशासन द्रोणाचार्यां जवळ आला त्या काळीं आचार्य बोलतात हे दुःशासना, सर्व रथ्यांसह वर्तमान तूं एका एकीं पळालास याचें कारण काय? दुर्योधनराजा स्वस्थ आहेना व जयद्रथही अजून स्वस्थ आहेना. दुर्योधनानें तुला यौवराज्यावर स्थापित केलें असतां तूं पलायन करावेंस हें योग्य दिसत नाहीं. कपटानें पांडवांस जिंकून त्यांची तूं निर्भर्त्सना केलीस त्या काळीं हा प्रसंग पुढें येईल हें तुला कसें कळलें नाहीं व ज्या काळीं द्रौपदीचीं वस्त्रें हरण करून दासी सारखा तिचा धिःकार करून बोललास कीं, हे तुझे पांचपती षंढ आहेत त्या भाषणाचें तुला स्मरण आहे किंवा नाहीं. आतां सात्यकीच्या बाणानीं तूं भय पाहून पळतोस हें तुला योग्य आहे कीं काय हे दुःशासना, तूं सात्यकीच्या युद्धास भिऊन पळालास मग अर्जुनाचीव तुझी सासान् गाठ पडल्यावर काय अवस्था होईल? आतां मला असें वाटतें कीं, पांडवांचा संतोष जेणें करून होईल तो उपाय योजावा. नाहीं तर कौरवं कुळाचा ते आजच क्षय करतील. हे दुःशासना, पूर्वीं जी तुझी मति क्रूर

होती ती आज कोठें गेली अरे पांडवांस काय काय भाषणें तूं बोललास तीं आ-
मच्यानें ऐकवेना. तूं आतां गळा मुखवटा रखवूं नकोस जेणेंकरून सात्यकी-
चा पराभव होईल तो उपाय कर. असें द्रोणवाक्य ऐकिलें न ऐकिलें करू-
न दुःशासन,कांबोज व यवन यांचे उरलेले योद्धे बरोबर घेऊन पुनः सा-
त्यकीकडे युद्धास गेला. इकडे द्रोणाचार्यांनीं पांडव सैन्यांत प्रवेश करू-
न युद्धास आरंभ केला. पांचालपुत्र वीरकेतूनें आचार्यांवर बाणांचा प्र-
हार केला, आचार्यांनीं पांच बाणांनीं वीरकेतूस ताडण करून, एका बाणा-
नें ध्वज तोडून दुसऱ्या बाणानीं सारथी मारला हें पाहून पांचालानीं मेघा-
साररव्या पाषाणांचा वर्षाव आचार्यांवर केला, आचार्यांनीं कालांतक बा-
ण वीरकेतूवर टाकून त्याचें शीर पृथ्वीवर पाडिलें. हें पाहून चित्रकेतु, सु-
धन्वा, चित्रवर्मा, चित्ररथ त्या त्यांच्या भ्रात्यांनीं आचार्यांवर बाणांची वृ-
ष्टी केली, तेव्हां आचार्यांनीं सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा बाणांनीं चार पां-
चालांचीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडलीं त्याकाळीं पांडव सैन्यांत मोठा हा-
हाकार झाला. सर्व लोक रुदन करूं लागले. धृष्टद्युम्नाच्याही नेत्रांतून अश्रु-
पात गळूं लागले. असें क्रूर कर्म द्रोणाचार्यांचें पाहून धृष्टद्युम्नानें नव्वद बा-
णांनीं आचार्यांच्या उरस्थलावर प्रहार केला त्या प्रहारांच्या योगानें द्रो-
णाचार्यांस कांहीं वेळ मूर्च्छा येऊन ते रथोपस्थावर पडले. नंतर धृष्टद्यु-
म्न हातामध्यें खड्ग घेऊन आपल्या रथांतून आचार्यांच्या रथांत गेला
आणि शीर तोडावें अशा मनसुब्यांत होता तों इतक्यांत आचार्य सावध
होऊन त्यानें धृष्टद्युम्नावर बाणांचा प्रहार केला. नंतर धृष्टद्युम्न आपल्या
रथांत बसून आचार्यांवर बाणवर्षाव करूं लागला. आचार्य ही परम को-
पित होऊन धृष्टद्युम्नावर बाणांचा वर्षाव करूं लागले. शेवटीं आचार्यां-
नीं धृष्टद्युम्नाच्या सारथ्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. आणि पुनः
ते व्यूहाच्या मुखावर येऊन उभे राहिले. अ. वि. या अ. आ.

१२२. अध्याय एकशें तेवीस. — संजय सांगतो हे धृतराष्ट्रराजा,
पांडव पराजित झाले असें पाहून दुःशासन शरजालाची वृष्टी करूं लाग-
ला तेव्हां सात्यकीनें दुःशासनावर शरजालाची वृष्टी करून त्यास अदृश्य

केलें. नंतर त्याचे चारी अश्व व सूत मारून ध्वज व रथ मोडून टाकिला हें पाहून त्रिगर्त रथाश्व व पदाती यांसहवर्तमान येऊन सात्यकीवर बाणवृष्टी करूं लागले. त्याकाळीं सात्यकीनें त्रिगर्तांच्या समुदायांतील मुख्य मुख्य पांचशें रथी मारिले, कित्येक गजांच्या शुंडा व पाय तोडून पृथ्वीवर पाडिले. तसेच कित्येक घोडे व पदाती छिन्नविच्छिन्न करून भूमीवर पाडले त्याकाळीं त्रिगर्तांच्या सैन्यास कोणी संरक्षक राहिला नाहीं म्हणून ते सर्व द्रोणाजवळ येऊन बोलले हे महाराज, या काळीं आमचें सात्यकी पासून रक्षण करावें नाहीं तर आह्मीं वांचत नाहीं. असें ऐकून दुःशासनानें सर्पांच्या विषासारख्या बाणानीं सात्यकीस वेध केला, सात्यकीनें नऊ बाणानीं दुःशासनास वेध केला असें उभयतांचें निकर युद्ध होत असतां सात्यकीनें निशित बाणें करून दुःशासनाचा सारथी मारला, भल्लबाणें करून ध्वज तोडला दोन बाणानीं पार्ष्णी सारथी मारले आणि चार बाणानीं चार अश्व मारले. त्याकाळीं दुःशासन इकडे तिकडे पाहून म्हणतो कीं, आतां त्या सात्यकी पासून माझें संरक्षण कोण करील इतक्यांत त्रिगर्त दुःशासनास आपल्या रथांत घालून पळून गेले. हे राजा, त्याकाळीं सात्यकी नें दुःशासनाचा प्राणच घेतला असता; परंतु भीमसेनानें सभेमध्यें प्रतिज्ञा केली तिचा भंग होईल याजकरितां त्यास जिवंत सोडून तो निर्वैर पृथ्वी करीत अर्जुनाकडे चालला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२४. अध्याय एकशें चोवीस — धृतराष्ट्र म्हणतो हे संजया, आमच्या सैन्यांत एकट्या सात्यकीनें प्रवेश करून सर्व कौरवांचा पराभव केला म्हणून तूं सांगतोस हें मोठें मला आश्चर्य वाटतें यास्तव हा सर्व वृत्तांत मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय म्हणतात हे राजा, सात्यकी हा सामान्य पराक्रमी समजूं नकोस ज्याकाळीं त्यानें व्यूहांत प्रवेश करून सर्व योद्ध्यांचें कंदन केलें तेव्हां सर्व सैनिक म्हणूं लागले कीं, अर्जुनासी युद्ध करणें पुरवेल; परंतु सात्यकीशीं युद्ध करणें परम कठीण आहे. हे राजा, याकाळीं कौरव पांडव यांच्या सेनेचा समूह एकत्र मिळाला असा सेनासमूह कोण-

च्याही युद्धांत नसेल व या सेनासमूहांत योद्धे जसे पराक्रमी आहेत तसे कोणच्याही सैन्यांत पूर्वी नसतील व पुढें ही होणार नाहींत त्यांतून जयद्रथ वधसमयीं तर द्रोणाचार्यांनीं व्यूहाची रचना फारच चमत्कारिक केली होती असें असतां सात्यकीनें स्वबलानें आंत प्रवेश केला त्यापेक्षां त्याच्या बलाचें काय वर्णन करूं. आतां तो अर्जुनाकडे जाईल तों पर्यंत किती योद्ध्यांचा नाश करील हें माझ्यानें सांगवत नाहीं असो. इकडे व्यूहमुखावर भीमसेन, धृष्टद्युम्न, नकुळ, सहदेव, धर्मराज हे एकाएकीं कौरव सैन्यावर हल्ला करून पुढें चालले तों इतक्यांत दुर्योधन आपल्या बरोबर कांहीं सैन्य घेऊन पांडवां समोर आला तेव्हां भीमसेन व पांचाल याणीं कौरव सैन्यावर बहुत बाणांची वृष्टी केली कौरवानीं ही भीमावर बाणांची वृष्टी केली असें भयंकर युद्ध होत असतां दुर्योधनानें पांडवांच्या सेनेंत शिरून हत्ती, घोडे, पदाती यांचा नाश केला. आणि भीमसेनास दहा, नकुळसहदेवांस तीन, तीन, धर्मराजास सात, विराट द्रुपद यांस शंभर, शिखंडीस दहा, धृष्टद्युम्नास वीस, द्रौपदेयांस तीन तीन याप्रमाणें बाण मारून पुनः तो पांडवांवर बाणवृष्टी करूं लागला त्याकाळीं धर्मराजानें भल्लबाणानें धनुष्य तोडून दहा बाणानीं दुर्योधनास प्रहार केला तों इतक्यांत दुर्योधन दुसरें धनुष्य घेऊन धर्मराजावर धांवला असतां सर्व पांचालानीं त्याचें निवारण केलें हें पहातांच आचार्यांनीं कांहीं योद्धे बरोबर घेऊन पांडवांशीं युद्धास आरंभ केला. तिकडे सात्यकी व कौरवांकडील योद्ध्यांचें मोठें युद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२५. अध्याय एकशें पंचवीस :- संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, अपराण्हकाल झाल्यावर चवथ्या प्रहरीं द्रोणाचार्य पांडव सैन्यावर बाणवृष्टी करीत असतां कैकेयांतील श्रेष्ठ जो बृहत्क्षत्र याणें द्रोणावर तीक्ष्ण बाणांची वृष्टी करून त्यांस दुःखित केलें द्रोणानें ही बृहत्क्षत्रावर सुवर्ण पुंख बाणांची वृष्टि केली तेव्हां बृहत्क्षत्रानें त्या बाणवृष्टीचा नाश करून पांच बाणांनीं आचार्यांचें धनुष्य तोडिलें त्याकाळीं आचार्यांनीं बृहत्क्षत्रावर ब्रह्मास्त्र टाकिलें बृहत्क्षत्रानें ब्रह्मास्त्र टाकून त्या अस्त्राचें निवारण केलें आ-

णि आचार्यांवर साठ बाण टाकिले, आचार्यांनीं त्या बाणांचें निवारण करून बृहत्क्षत्राचें कवच फोडून एक बाणानें सारथी व चार बाणांनीं चारी अश्व मारिले आणि एक बाणानें ध्वज व छत्र तोडून एक बाणानें बृहत्क्षत्राचें शिर पृथ्वीवर पाडलें. हें पाहून शिशुपालाचा पुत्र जो धृष्टकेतु याणें साठ बाणांनीं द्रोणाचार्यांस वेधून एक बाणानें ध्वज तोडला. नंतर आचार्यांनीं क्षुरप्रबाणानें त्या सर्व बाणांचा नाश करून धृष्टकेतूचें धनुष्य तोडलें. धृष्टकेतूनें दुसरें धनुष्य घेऊन सात बाणांनीं अश्व व सारथी यांसहवर्तमान आचार्यांस वेध केला तेव्हां आचार्यांनीं पंचवीस बाणांनीं धृष्टकेतूस वेध करून चार बाणांनीं अश्व मारले व एक बाणानें सारथी मारिला. नंतर धृष्टकेतूनें रथाखालीं उतरून एक गदा द्रोणावर टाकिली असतां ती गदा द्रोणानें बहुत बाणांनीं छेदून पृथ्वीवर पाडली आणि मोठा भयंकर नाद केला. पुनः धृष्टकेतूनें कनका सारखें तेजस्वी तोमर त्या आचार्यांवर टाकिलें, तेव्हां आचार्यांनीं पांच बाणांनीं त्या तोमराचा छेद करून धृष्टकेतूचा प्राणघ्यावा या बुद्धीनें एक बाणानें कवच फोडून दुसऱ्या बाणानें धृष्टकेतूचें शिर तोडिलें. इतक्यांत जरासंधाच्या पुत्रानें आचार्यांस तीक्ष्ण बाणांच्या वृष्टीनें अदृश्य केलें आचार्यांनीं त्या सर्व बाणांचें निवारण करून जरासंधाच्या पुत्रास वीस बाणांनीं वेध केला तेव्हां जरासंधाच्या पुत्रानें आचार्यांवर बहुत बाण टाकिले शेवटीं आचार्यांनीं अग्नी सारख्या बाणांनीं जरासंधाच्या पुत्राचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें आणि सृंजय, चेदि, कोसल यांजवर सहस्त्रावधी बाणांची वृष्टी केली तेव्हां सृंजय प्रभृतीनीं ही द्रोणावर तीक्ष्णबाणांची वृष्टी केली. पांडवांकडील दुसरे कित्येक योद्धे द्रोणाचार्यांस मारा मारा ह्मणून शब्द करून एकाएकीं गदा, तोमर, शक्ती, यष्टी इत्यादिक आयुधें घेऊन आचार्यांवर धांवले असतां आचार्यांनीं हजारों बाणांनीं चेदी, केकय यांस बहुत दुःखित केलें. त्या काळीं सर्व राजे द्रोणाचार्यांच्या भयानें भीमसेन व धृष्टद्युम्न यांची मार्गप्रतीक्षा करीत इकडे तिकडे पळूं लागले. हें पाहून क्षत्रधर्म याणें एक बाणेंकरून आचार्यांचें धनुष्य छेदिलें, आचार्य याणीं तत्काळ दुसरें धनुष्य घेऊन तीक्ष्ण बाणांनीं त्याचें शिर तोडलें. त्या

काळीं पांडव सैन्यांत मोठा हाहाःकार झाला. धृष्टद्युम्नाचा पुत्र क्षत्रधर्मा पराक्रमी असतांही प्राणास मुकला. हें पाहून चेकितानानें आचार्यांच्या हृदयावर दहा बाणांनीं वेध करून चार बाणांनीं घोडे व एक बाणानें सारथी यांस वेध केला आणि आचार्यांच्या दक्षिणभुजेवर सोळा बाणांचा प्रहार केला. नंतर आचार्यांनीं चेकितानाच्या रथाचे घोडे व सारथी मारून रथ मोडला आणि चेकितानाचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें तेणेंकरून सर्व पांडवांस मोठें भय प्राप्त झालें. इकडे द्रोणाचार्य ही युद्ध करतां करतां वयानें अतिवृद्ध चारशें वर्षांचा असतांही षोडश वर्षांसारखा तरुण कैंर व सैन्यांत दिसूं लागला. असा आचार्यांचा पराक्रम पाहून द्रुपद आपल्या सैनिकांस भाषण करतो हे योद्धे हो, त्या त्यानाच्यानें दुर्योधनाच्या लोभास गुंतून आमच्याकडील बहुत योद्धे मारिले याजकरितां सर्वांनीं मिळून याचें निवारण करावें. असें बोलून स्वतः द्रुपद सर्व पांडव व एक अक्षौहिणी सैन्य यांसहवर्तमान आचार्यांवर धांवून गेला त्या काळीं उभयतांचें पराकाष्ठेचें युद्ध झालें. अ. नि. या अ. भा.

१२६. अध्याय एकशेंसवीस - संजय म्हणतात हे धृतराष्ट्रा, द्रोणानें पांडवसैन्याचा पराभव केला त्या काळीं धर्मराज चिंताग्रस्त होऊन विचार करतात कीं, या संकटापासून आमचें कोण संरक्षण करील! अर्जुनाच्या शोधा करितां सात्यकीस व्यूहामध्यें पाठविला तोही तिकडेच गेला. आतां मला अर्जुन दृष्टीस पडत नाहीं व सात्यकीही दृष्टीस पडत नाहीं सात्यकीच्या शोधा करितां दुसरा कोणी पाठवावा तर द्रोणाचार्यांचा व्यूहभेद करून आंत जाण्यास कोण समर्थ होईल आतां लोकांमध्यें माझी अशी निंदा होईल कीं, अर्जुनाच्या शोधा करितां सात्यकीचा मात्र नाश झाला असा चिंताग्रस्त होऊन पुनः मनांत विचार करतो कीं, हें काम भीमसेनास सांगितलें असतां तो सिद्धीस नेईल कारण कीं, ज्याणें आपल्या बाहुबलानें वनामध्यें आमचें बहुत वेळ संरक्षण केलें यास्तव तो अर्जुनाकडे गेला असतां सात्यकी व अर्जुन या उभयतांस साह्य करील. भगवान श्रीकृष्ण आमचा संरक्षण कर्ता आहेच; परंतु

शंखाचा नाद ऐकल्या पासून माझें चित्त उदास झालें यास्तव हें कार्य भीमसेनास अवश्य सांगावें असा निश्चय करून धर्मराज सारथ्यास भाषण करतो हे सूता- जिकडे भीमसेन आहे तिकडे माझा रथ ने. असें ऐकून तत्काल सूतानें रथ भीमसेनाकडे नेला असतां धर्मराज बोलतो हे भीमा, अर्जुन व सात्यकी यांच्या शोधा करितां तुला पाठवावा असें माझ्या मनांत आहे. हें कार्य तुझ्या वांचून दुसऱ्यास होणार नाहीं. असें बोलून धर्मराज मूर्छा येऊन खालीं पडला. हें पाहून भीमसेन ह्मणतो हे युधिष्ठिरा. ऊठ. आतां जो तुझ्या मनांत अभिप्राय आहे तो सिद्धीस मी नेईन व्यर्थ तूं शोक करूं नकोस. असें ऐकून धर्मराज भाषण करितात हे भीमा- येवढी काळजी उत्पन्न होण्याचें मला कारण नवतें; परंतु अर्जुनाच्या शंखाचा शब्द विलक्षण ऐकिला तेव्हां पासून मला काळजी उत्पन्न झाली याचें निवारण तूं कर. असें ऐकतांच भीमसेन हर्षानें धर्मराजास भाषण करतो हे राजा, जिकडे सात्यकी व धनंजय गेले आहेत तिकडे मी जाऊन त्यांचें दुःख निवारण करून तिकडील वर्तमान सर्व तुला सांगेन किंवा न आलों तर सिंहा सारखा नाद करीन तेणेंकरून तूं समज कीं- आपले सर्व योद्धे व्यूहामध्यें कुशल आहेत. येवढा पराक्रमी तुझा भ्राता मी असतां तुला शोकसागरांत राहावें ही माझी योग्यता काय! अतःपर तूं कोणाच्या ही गोष्टी विषयीं शोक करूं नकोस. अ- वि- या अ- आ-

१२७. अध्याय एकशें सत्तावीस :- भीमसेन भाषण करतो हे राजा- ब्रह्मदेव, रुद्र, इंद्र, वरुण इत्यादि देव ज्या रथामध्यें बसून विजयी झाले त्याच रथामध्यें श्रीकृष्ण व अर्जुन बसून युद्धास गेले तेव्हां त्यांचा पराभव कोठून होईल; परंतु तुझी आज्ञा मजला शिरसा वंद्य आहे आतां मी तिकडे जातों तुझा आशिर्वाद असावा. असें धर्मास भाषण करून भीमसेन धृष्टद्युम्नास बोलतो कीं, मी आतां अर्जुन व सात्यकी यांच्या शोधा करितां व्यूहांत प्रवेश करतों तूं सर्व प्रकारें धर्मराजाचें संरक्षण कर. असें ऐकून धृष्टद्युम्न बोलतो हे भीमा- तूं निर्भय होऊन जा. धर्मराजा विषयीं कांहीं काळजी करूं नको. मी धृष्टद्युम्न जिवंत आहें तोंपर्यंत धर्मराजास धर-

ण्याविषयीं आचार्य समर्थ होणार नाहीं. असें ऐकून भीमसेन धर्मराजास नमस्कार करून आठ ब्राह्मणां पासून जयाचे आशिर्वाद घेत रथांत बसून निघाला त्या काळीं शुभ चिन्हसूचक कांहीं वारा सुटला शकुनही चांगले होऊं लागले. इतक्यांत कौरव सैन्यांतून पांचजन्य शंखाचा शब्द ऐकतांच धर्मराज बोलतो हे भीमा. तूं पांचजन्य शंखाचा नाद ऐकलास ना याजवरून खचित मला वाटतें कीं, अर्जुनास कांहीं तरी विघ्न आहे याजकरितां लौकर जा. असें ऐकून भीमसेन शंखाचा नाद व धनुष्याचा टणत्कार करीत निघाला त्याच्या बरोबर पांचाल व सोमक हे ही निघाले. भीमसेन युद्धास आला हें पाहून दुःशासन. चित्रसेन. कुंडभेदी. दुर्मुख. दीर्घबाहू. सुदर्शन. दुःसह. विकर्ण. शल. विंदानुविंद. सुमुख. वृंदारक इत्यादि धृतराष्ट्रा तुझे पुत्र सैन्यासहवर्तमान भीमसेनाच्या अग्रभागीं उभे राहून महान् महान् अस्त्रें व भयंकर तेजस्वी बाण यांची वृष्टि करूं लागले भीमसेनानें त्या सर्व बाणांचें व अस्त्रांचें निवारण करून एका एकीं शस्त्रास्त्रांच्या वृष्टीनें गजाश्व इत्यादिकांसहवर्तमान त्यांस पळविलें. हें पाहून द्रोणानें भीमाच्या ललाटावर प्रहार करून भाषण केलें हे भीमा. माझा पराभव करून व्यूहामध्यें प्रवेश करशील तर जिवंत रहाणार नाहींस पार्थाचा जर तूं बंधू आहेस तर माझ्या अनुमतानें व्यूहांत प्रवेश कर. असें ऐकून भीमसेन भाषण करितो हे आचार्य, आपण तर आह्मांस गुरु अथवा बंधू समान आहांत; परंतु या समयीं मला शत्रू सारखे दिसतां यास्तव तुमचा पराभव करून व्यूहांत प्रवेश करीन असें भाषण करून कालदंडा सारखी भयंकर गदा भीमानें आचार्यावर टाकिली तेणें करून आचार्यांच्या रथाचे अश्व व सारथी हत झाले आणि रथाचे तुकडे होऊन आचार्य मूर्च्छित होऊन पृथ्वीवर पडले. इतक्यांत धृतराष्ट्रा, तुझ्या पुत्रानीं भीमसेनावर बाणांचा वर्षाव केला. नंतर कांहीं वेळानें आचार्य सावध होऊन दुसऱ्या रथांत बसून व्यूहद्वारावर उभे राहिले. तेव्हां दुःशासनानें तीक्ष्ण शक्ती भीमसेनावर टाकिली त्या शक्तीचे भीमसेनानें दोन तुकडे करून तीन तीन बाणानीं सुषेण, दीर्घने-

त्र व कुंडभेदी यांचा वध केला. नंतर वृंदारक याचा वध करून अभय, रौद्रकर्मा, दुर्विमोचन यांचा तीन तीन बाणांनीं वध केला. त्या काळीं दुर्योधनादिक भीमसेनावर बाणवृष्टी करूं लागले, तेव्हां भीमसेनानें विंदानुविंद व सुवर्मा यांचा प्राण घेऊन नंतर सुदर्शनाचाही प्राण घेतला. हें पाहून सर्व योद्धे द्रोणा जवळ येऊन उभे राहिले. असें भीमसेनाचें अचाट कर्म पाहून द्रोणानें भीमावर बाण वृष्टि केली. अ. वि. या अ. आ.

१२८. अध्याय एकशें अठ्ठावीस :- संजय ह्मणतात हे राजा, सर्व पळून आचार्या जवळ येऊन उभे राहिल्यानंतर आचार्यांनीं भीमसेनावर पराकाष्ठेचा बाणांचा वर्षाव केला तेव्हां भीमसेन त्या सर्व बाणांचा नाश करून तुझ्या पुत्रावर गदा घेऊन धांवला असतां तुझ्या पुत्रांनींही भीमसेनावर बाणांची वृष्टि केली. भीमसेनानें हस्तांत गदा घेऊन गरुडा सारखें उड्डाण करीत रथाश्व, गज, पदाती यांचें चूर्ण केलें. हें पाहून आचार्य भीमसेनाचें निवारण करूं लागले. नंतर भीमसेनानें रथाखालीं उतरून द्रोणाचार्यांचा रथ दूर टाकून दिला तेव्हां आचार्य दुसऱ्या रथांत बसून व्यूहमुखावर येतात इतक्यांत भीमसेनानें व्यूहांत प्रवेश केला असतां त्याच्या पाठीमागून सारथ्यानें रथ आंत नेला. नंतर भीमसेन रथांत बसून पुढें वेगानें चालला जातां जातां कृतवर्म्याचा पराभव करून दरद व म्लेंछ यांशीं युद्ध करून वाटेनें सात्यकीस भेटला आणि मोठ्यानें गर्जना करीत करीत तसाच पुढें चालला. भीमसेनाची गर्जना ऐकून कृष्णार्जुन इकडे तिकडे पहातात तों सूर्या सारख्या तेजस्वी रथामध्यें बसून वृकोदर येतो असें उभयतांनीं पाहून ते त्याच्या पराक्रमाचें वर्णन करूं लागले. भीमसेनही कृष्णार्जुनास पाहून सिंहनाद करूं लागला. इकडे तो नाद ऐकून धर्मराज ह्मणतात कीं, भीमसेनानें जी मला खूण सांगितली ती मिळाली याजवरून आतां माझ्या शोकाचें निवारण झालें. कृष्णार्जुन व सात्यकी हे सर्व सुखरूप आहेत. अर्जुनास कोणापासून ही भय नाहीं धनंजय सत्य प्रतिज्ञ आहे तो सैंधवाचा सूर्य अस्ताच्या पूर्वीं वध करून दुर्योधनास शोक उत्पन्न करील त्या शोकाच्या योगानें तरी दुर्योधन आमच्याशीं शम करू-

न अर्धराज्य देण्यास कबूल होईल. या प्रकारें धर्मराज आपल्या मनांत चिंतन करतो तों इकडे सर्व सैनीक व योद्धे यांचें परस्पर युद्ध चाललें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२९. अध्याय एकशें एकुणतीस:- धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, भीमसेनानें व्यूहांत प्रवेश करून कोणासीं दारुण युद्ध केलें? भीमसेन अग्नी सारखा प्रदीप्त झाला असतां तृणासमान माझ्या पुत्रांचें दहन करील अशा भीमसेनाचें निवारण आमच्या सैन्यांत कोणी केलें किंवा नाहीं हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, भीमसेन व्यूहांत बहुत योद्ध्यांस पराजित करून अर्जुनाकडे चालला हें पाहून कर्ण भीमसेनावर शिलाशित बाणांची वृष्टि करूं लागला तेव्हां भीमानें कर्णाच्या बाणांचें निवारण करून त्याजवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली. भीमसेनाच्या गर्जनेनें कौरव सैन्यांतील गज व अश्व मलमूत्राचा त्याग करून भयानें पळूं लागले. असें उभयतांचें निकट युद्ध होत असतां कर्णानें शिशिरव बाणानें भीमसेनास ताडण करून पांच बाणानीं सारथ्यास ताडण केलें तेव्हां भीमसेनानें किंचित् हास्य करून चौसष्ट बाणानीं कर्णास वेध केला असें कर्णानें व भीमसेनाचें निकट युद्ध होत असतां भीमसेनानें कर्णाचें धनुष्य तोडून अश्व व सारथी मारून पृथ्वीवर पाडले. त्याकाळीं कर्ण भयानें वृषसेनाच्या रथ हृष्टीस पडतांच त्यांत बसून पळून गेला. हें पाहून भीमसेन हर्षानें शंखाचा नाद करूं लागला. इकडे युधिष्ठिरही हर्षित होऊन आपल्या सैन्यांत हर्षाचा ध्वनि करूं लागला. अर्जुनही भीमसेनाचा पराक्रम पाहून श्रीकृष्ण व आपण शंखाचा नाद करूं लागला तों इकडे युधिष्ठिरास बहुत हर्ष होत असे. असा विषय या अध्यायांत आहे.

१३०. अध्याय एकशें तीस:- संजय ह्मणतात हे धृतराष्ट्रा, अर्जुन, सात्यकि व भीमसेन यांणीं व्यूहांत प्रवेश करून कौरवांकडील सैन्याचा बहुत नाश केला. हें पाहून दुर्योधन क्रोधानें द्रोणाचार्या जवळ येऊन भाषण करतो हे आचार्य, पूर्वीं तुह्मीं अर्जुनास आंत जाऊन दिलांत व आतां सात्यकि व भीमसेन यांसही व्यूहांत जाऊं दिलें न येणें करून सैन्यांत तुमची मो-

ठी अपकीर्ति झाली. सर्व सैनिक असें ह्मणतातकीं, द्रोणाचार्य शस्त्रविद्ये मध्यें निपुण असून त्यांचा पराभव करून पांडवांकडील योद्धे आंत शिरले याजवरून मला असें वाटतें कीं, आमचा नाश आहे जें कृत्य कधींच घडावयाचें तें घडूं लागलें हा अपशकुन आमच्या नाशा विषयीं कारण आहे. हे आचार्य, तुह्मी असतां आमच्या सैन्यास कांहीं भंग नाहीं व आमचा पराभव करणारा या भूमंडळीं कोणीं नाहीं असें आह्मी समजत होतों; परंतु आतां आमचा धीर तुटला बरें झालें तें झालें. पुढें जयद्रथाच्या संरक्षणा विषयीं कसा यत्न करावयाचा तो सांगा ? असें ऐकून आचार्य भाषण करतात हे दुर्योधना, पांडवांकडील तीन योद्धे व्यूहांत गेले याचें कारण असें आहे कीं, हे इंद्रास देखील अजिंक्य यांजपुढें आमचा उपाय नाहीं. कोणाच्याही कार्यास आदि पश्चात् विचार करून आरंभ करावा. पूर्वीं तुह्मीं सर्वांनीं मिळून कृत्रिम फांशानीं पांडवांस जिंकून बहुत दुःख दिलें तेव्हां जयपराजयाची शंका कोठें गेली होती ज्या पांडवांनीं संपूर्ण राज्याचा उपभोग करावा अशी त्यांची सत्ता असतां तुह्मीं कपटानें धर्मराजास पराजित करून वनवासास पाठविलें तेव्हां तुह्मांस असें वाटलें होतें कीं, द्यूतामध्यें आमचा जय झाला; परंतु तुह्मीं असें समजा कीं, ज्या फांशानीं पांडवांस जिंकिलें तेच फांसे अर्जुनाचे बाण होऊन तुमचे प्राण घेतात आतां त्यांचें निवारण आमच्यानें व्हावयाचें नाहीं. जयद्रथाचें संरक्षण करणें हें आह्मांस उचितच आहे कारण कीं, ज्या काळीं अर्जुना पासून जयद्रथास भीति उत्पन्न झाली त्या काळीं आह्मीं सर्वांनीं त्यास आश्वासन दिलें त्यापेक्षां सायंकाळ पर्यंत कोणत्याही युक्तीनें त्याचें संरक्षण केलें पाहिजे. हे दुर्योधना, जे जे योद्धे जयद्रथाचें संरक्षण करीत असतील तिकडे तूं जाऊन त्यांस साह्य करून जयद्रथाचें संरक्षण कर हाच मी तुला आशिर्वाद दिला. आतां दुसरे पांडव व पांचाल आंत प्रवेश करतील याज करितां मी व्यूहमुखावर उभा रहातों आणि दुसरे योद्धे तुझ्या संरक्षणा करितां पाठवून देतों. असें ऐकून दुर्योधन जयद्रथाकडे गेला त्या काळीं युधामन्यु, उत्तमौजा अर्जुनाचे पार्ष्णी सारथी व्यूहा बाहेर राहिले होते त्याणीं ही कृतवर्म्याचा पराभव क-

रून व्यूहांत प्रवेश केला तें पाहून दुर्योधन त्याशीं युद्ध करूं लागला त्याकाळीं युधामन्यूनें तीन बाणानीं दुर्योधनास वेध करून वीस बाणानीं सारथी व घोडे यांस मूर्छित केलें तेव्हां दुर्योधनानें एक बाणानें युधामन्यूचा ध्वज तोडून दुसऱ्या बाणानें धनुष्य तोडलें आणि भल्ल बाणानीं सारथी मारून चारी अश्व मारिले. नंतर युधामन्यूनें दुर्योधनाच्या वक्षस्थलावर तीस बाण मारिले व उत्तमौजानें दुर्योधनाचा सारथी मारिला असतां दुर्योधनानें युधामन्यूच्या रथाचे चारी अश्व मारून पार्ष्णी सारथी मारिले तेव्हां युधामन्यु आपल्या भ्रात्याच्या रथांत बसून दुर्योधनावर हजारों बाणांची वृष्टी करूं लागला, दुर्योधन ही पदाती होऊन त्यानें युधामन्यु व उत्तमौजा या उभयतांवर गदेचे प्रहार करून अश्व व सारथी मारून रथाचे तुकडे केले त्याकाळीं युधामन्यु व उत्तमौजा हे दुसऱ्या रथांत बसले आणि दुर्योधनही शल्याच्या रथांत बसला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२१. अध्याय एकशें एकवीस — संजय ह्मणतो हे राजा, महाभयंकर संग्रामामध्यें संपूर्ण योद्धे पीडित झाले हें पाहून कर्ण भीमसेनावर धांवला. असें ऐकून धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, युधामन्यु व उत्तमौजा यांचें दुर्योधनाशीं युद्ध झाल्यावर कर्ण कोठें होता. भीमसेनानें पूर्वी कर्णाचा पराजय केला तेव्हां पासून कर्ण व भीमसेन यांचें युद्ध झालें किंवा नाहीं? हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतात हे राजा, भीमसेनानें कर्णाचा कांहींसा पराभव केला त्याकाळीं कर्ण क्रोधानें बोलला हे भीमा, माझा अपमान करून तूं पुढें जातोस हें ठीक नाहीं कुंतीच्या वाक्याचें स्मरण करून मी तुझ्याशीं भयंकर युद्ध करीत नाहीं; परंतु युद्ध जर न करावें तर क्षात्रधर्मास विरुद्ध येतें जर तुझ्यांत सामर्थ्य असेल तर माझ्या समोर युद्ध कर असें ऐकून भीमसेन कर्णावर बाणांचा वर्षाव करूं लागला तेव्हां कर्णानें भीमाच्या बाणांचा नाश करून त्याजवर मायेनें शस्त्रास्त्र वृष्टी केली भीमसेनानें बाण जालें करून कर्णास एक मुहूर्त पर्यंत अदृश्य केलें. असें उभयतांचें भयंकर युद्ध होत असतां कर्णानें जांबूनद बाणानें भीमसेनास वेध करून पांच बाणानीं रथाचे घोडे मारिले. भीमसेनानें नाराच बाणानें कर्णाचा सार-

थी मारून ध्वज तोडला. तसेंच कर्णानें एक बाणें करून भीमसेनानें कवच तोडलें. भीमसेनानें सर्पासारख्या भयंकर बाणानीं कर्णाच्या सर्वांगाचा भेद केला, कर्णानें भीमसेनावर हळू हळू बाणांची वृष्टि करावी भीमसेनानें कर्णावर मोठ्या निकरानें बाणवृष्टी करावी असें उभयतांचें युद्ध होत असतां भीमानें कर्णाचें धनुष्य तोडून चारी अश्व व सारथी मारला. त्या काळीं कर्णानें दुसऱ्या रथांत बसून भीमसेनाच्या रथाचे घोडे व सारथी बाणें करून जर्जर केले. असें उभयतांचें युद्ध होत असतां भीमानें कर्णाचें धनुष्य तोडून सारथी व अश्व मारून कर्णास नाराच बाणानीं त्दयावर प्रहार केला असतां ते बाण कर्णाच्या त्दयास भेद करून पृथ्वींत शिरले त्या काळीं महा अभिमानी कर्ण घाबरा होऊन दुसऱ्या रथांत बसला. अ. वि. या अ. आ.

१३२. अध्याय एकशें बत्तीस – धृतराष्ट्र ह्मणतात हे संजया, कर्णापासून आत्यांस जयप्राप्त होईल असा माझ्या पुत्राचा पूर्ण भरवसा होता त्या कर्णास युद्धामध्यें भीमसेनानें पराजित केलें ह्मणून तूं सांगितलेंस; परंतु त्या काळीं दुर्योधन काय बोलला व कर्ण भीमसेनानें युद्ध कस कसें झालें तें विस्तारें करून मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा, कर्ण दुसऱ्या रथांत बसून वायूसारख्या वेगानें एका एकीं भीमसेनावर धांवून गेला तेव्हां दुर्योधनानें असा निश्चय केला कीं, आज अग्निमुखामध्यें भीमसेन सांपडला आतां वाचणार नाहीं असो. कर्ण व भीमसेन धनुष्यानें टणत्कार करून परस्पर वधाच्या इच्छेनें युद्ध करीत असतां कर्णानें पूर्वीं कपट द्यूतें करून वनांत आत्यांस बहुत प्रकारें दुःख दिलें. तसेंच विराट नगरामध्यें आत्यीं अज्ञातवासी असतां आत्यांस दुःख देण्या करितां दुर्योधनाच्या सात्यानें तो गोंध करीत असे. इत्यादिक अनेक प्रकारचीं दुःखें स्मरीत या कर्णाचा सूड घेण्याचा आज वेळ आहे असें समजून भीमानें तेजस्वी बाणानीं कर्णास आच्छादित केलें त्या योगानें सूर्यप्रभा आच्छादित झाली तेव्हां कर्णानें किंचित हास्य करीत भीमसेनाच्या तीर जाळ्याचा नाश करून त्यास नऊ बाणानीं वेध केला त्या योगें भीमसेन जेर होऊन कांहीं वेळ स्तब्ध उभा राहिला नंतर श्वासोछ्वास टाकून त्यानें पुनः कर्णावर बाणवृष्टि केली आणि आपल्या रथाचे अश्व क-

र्णांचे रथाच्या अश्वांस मिळवलें. हें पाहून सर्व सैनीक ह्मणूं लागले कीं. कोणाचा जय व कोणाचा पराजय होईल याचा निश्चय करतां येत नाहीं. दोघांनीं एकमेकांवर बाणांचा वर्षाव करून आकाश व पृथ्वी व्याप्त करून टाकिली. उभयतांच्या बाणांच्या संमर्दानें कित्येक गजाश्व व पदाती मेले. या प्रकारें भीमसेनानें कौरवसैन्याचा क्षय करून एकाक्षणांत रणभूमि भरून टाकिली. असा विषय या अध्यायांत आहे.

१३३. अध्याय एकशेंतेहेतीस – धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, कर्णा सारखा पराक्रमी या पृथ्वीत कोणी नाहीं असें असतां त्याला भीमानें पराजित केलें ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे, पांडवही मोठे पराक्रमी आहेत त्यांशीं युद्ध करण्यास देवही समर्थ नाहीत त्या पांडवांस माझ्या पुत्रानीं कपटानें द्यूतांत जिंकून हर्ष मानिला; परंतु पुढें काय होईल याचा विचार केला नाहीं. धर्मराज आमच्याशीं युद्ध काय करणार ह्मणून आह्मी पूर्वी समजत होतों. परंतु तीं दुःखें स्मरून भीमानें कर्णाशीं युद्ध कसें झालें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय ह्मणतात हे राजा. कर्ण भीमानें युद्ध करून आश्चर्यकारक होत असतां कर्णानें सुवर्णासारख्या तीस बाणानीं भीमसेनास वेध केला तेव्हां भीमसेनानें त्या बाणाचें निवारण करून तिक्ष्ण बाणानीं कर्णानें धनुष्य तोडलें आणि भल्ल बाणानें सारथी पृथ्वीवर पाडला तेव्हां कर्णानें सुवर्णाचें नवें दूर्य भूषणानें जडलेली सुशोभित प्राणहरण करणारी अशी शक्ति भीमावर टाकिली असतां भीमसेनानें सात बाणें करून त्या शक्तीचा भेद केला. तेव्हां कर्णानें दुसरें धनुष्य घेऊन यमदंडासारख्या भयंकर बाणांची वृष्टि भीमसेनावर केली. असें उभयतांचें युद्ध होत असतां भीमानें कर्णाचें धनुष्य तोडून चारी अश्व मारिले. आणि बहुत बाणांची वृष्टि केली तेव्हां कर्ण हताश्व व हतसारथी होऊन स्तब्ध उभा राहिला. हें पाहून दुर्योधन आपला बंधू जो दुर्जय यास बोलला कीं. भीमसेनानें कर्णास अगदीं व्याप्त केलें याजकरितां तूं जाऊन त्याचें निवारण कर. असें ऐकून तो तत्क्षणींच भीमसेनावर बाणांचा वर्षाव करूं लागला तेव्हां भीमसेनानें युद्ध करतां करतां सारथी [illegible] दुर्जयास यमलोकीं धाडलें. कर्ण पदाती असतां संग्राम सोडून पळाला नाहीं त्यानें बाणवर्षाव करून भीमसेनास अह-

श्य केलें, भीमसेनानें ही कर्णास बाण जालानीं आच्छादित केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१३४. अध्याय एकशें चवतीस - संजय ह्मणतो हे राजा, कर्ण विरथी झालेला पुनः दुसरे रथांत बसून भीमसेनाशीं युद्ध करूं लागला. जसे मदोन्मत्त गज आपल्या दंताग्रानीं एकमेकांस टोंचितात तसे भीम व कर्ण बाणांच्या अग्रानीं एकमेकांस वेध करूं लागले तेव्हां परस्परांनें नानाप्रकारें युद्ध होत असतां भीमानें कर्णास सारथी व अश्व मारून विरथी केलें. हें पाहून दुर्योधन आपला भ्राता जो दुर्मुख यास भाषण करतो कीं हे दुर्मुखा, कर्ण विरथी झाला याज करितां तूं जाऊन त्यास साह्य कर. असें ऐकून दुर्मुख रथारूढ होऊन कर्णाजवळ आला आणि भीमाचें निवारण करूं लागला. भीमसेनानें दुर्मुख आला असें पाहून शिलीमुख बाणानीं कर्णाचें निवारण करून तो दुर्मुखाशीं युद्ध करूं लागला. दुर्मुखानें भीमसेनावर पराकाष्टेची बाण वृष्टी केली भीमसेनानें ही दुर्मुखावर बाणांची वृष्टी केली. असें परस्पर युद्ध होत असतां शेवटीं भीमसेनानें नऊ बाणानीं दुर्मुखास यमलोकीं पाठविलें हें पहातांच कर्णाच्या नेत्रांतून अश्रुपात चालले आणि तो एक मुहूर्त पर्यंत उगीच स्तब्ध उभा राहिला. नंतर दुर्मुख गतप्राण झाला असा निश्चय करून त्याचे रथांत बसला आणि त्यास एक प्रदक्षिणा करून पुनः भीमसेनाच्या अग्रभागीं येऊन युद्ध करूं लागला. शेवटीं भीमसेनानें भयंकर सात बाणानीं कर्णाचा सारथी व चारी अश्व मारले त्या काळीं कर्ण विरथी होऊन पळाला. हें पाहून भीमसेन धनुष्याचा टणत्कार करून समरंगणीं अग्नीसारखा तेजस्वी उभा राहिला. अ. नि. या अ. आ.

१३५. अध्याय एकशें पस्तीस - धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, मला असें वाटतें कीं, सर्व जें घडतें तें दैवानेंच घडतें विद्या किंवा पौरुष याणीं कांहीं होत नाहीं तस्मात् यांस धिःकार असो. अरे जो कर्ण अशी वल्गना करीत असे कीं, श्रीकृष्णासहवर्तमान पांडव जरी युद्धास आले तरी त्यांचा पराजय करीन मज सारखा योद्धा या भूमंडळांत कोणीच नसेल व दुर्योधन ही मजपाशीं असें ह्मणत असे कीं, कर्ण महान् बलाढ्य, दृढधन्वा, शत्रूंस अजिंक्य

तो मला साह्य आहे तों पर्यंत देवदेखील मजबरोबर युद्ध करण्यास समर्थ नाहींत मग हे निर्जीव पांडव माझ्याशीं युद्ध करून माझा काय पराभव करतील या दुर्योधनाच्या वाक्यावर माझा भरवसा होता; परंतु आज त्या कर्णास भीमसेनानें युद्धामध्यें पराजित केलें हें मोठें आश्चर्य वाटतें असो. यावेळेस अश्वत्थामा, शल्य, कृपाचार्य यांस भीमसेन व अर्जुन यानीं पराजित केलें. हा कर्ण भीमसेनाचा अनादर करून उभा राहिला तो आपलीं फळें सहज भोगील. सभेमध्यें भीमसेनानें माझ्या पुत्रांस मारण्याची प्रतिज्ञा केली ती तो सत्य करील. दुर्योधन बोलतो कीं, कर्ण, दुःशासन व मी तिघे मिळून पांडवांस पराजित करून राज्याचा यथेच्छ उपभोग करूं; परंतु मूर्खास अज्ञून कसें ज्ञान होत नाहीं, तस्मात् कृष्ण, पार्थ, भीमसेन, सात्यकि व पांचाल हे आज माझ्यापुत्रांस मारून राज्याचा उपभोग करतील. हे संजया, भीमानें युद्धांतून कर्णास पराजित केल्यावर पुनः युद्ध कोणीं केलें. असें ऐकून संजय ह्मणतो हे राजा, हें अरिष्ट होण्यास कारण तूंच आहेस, जिव जो आचरण करील त्याचें फल तो भोगील. झालेल्या गोष्टीवर विचार करणें मूर्खत्व आहे, भीमसेनानें कर्ण पराजित केला हें पाहून दुर्मर्षण, दुःसह, दुर्मद, दुर्धर, जय त्यानीं भीमसेनाचा प्राण घ्यावा या बुद्धीनें शलभासारखी बाण वृष्टी केली. भीमसेनानेंही त्यांजवर तीक्ष्ण बाणांची वृष्टी केली तों इतक्यांत कर्णही सावध होऊन भीमसेनावर बाण वृष्टि करूं लागला शेवटीं भीमसेनानें पंचवीस बाणानीं पांचजणांचीं शिरें तोडून पाडलीं. हें पाहून कर्ण धनुष्याचा टणत्कार करीत भीमाकडे पाहूं लागला. भीमसेनही कर्णाकडे पाहूं लागला. अ. वि. या अ. आ.

१३६. अध्याय एकशें छत्तीस — संजय ह्मणतो हे राजा, भीमसेनानें तुझे पुत्र मारले हें पाहून कर्ण आपल्या मनांत ह्मणतो कीं, मी जिवंत असतां दुर्योधनाचे बंधू भीमसेन मारतो काय! असें ह्मणून त्यानें भीमास ताडण केलें. भीमसेन, कर्ण यांचें मोठें तुमुल युद्ध झालें. कर्ण मनांत ह्मणतो कीं, भीमापुढें आपलें कांहींच चालत नाहीं पलायन करावें असा निश्चय करून तो पळाला तों पाठीमागून भीमानें हजारों बाण त्याजवर टाकिले. हें पाहून दुर्योधन आत्यांस ह्मणतो अरे भीमसेनानें कर्णास बहुत जर्जर केलें तर तु-

म्हीं जाऊन भीमसेनाचें निवारण करा. हें ऐकून चित्र, उपचित्र, चित्राक्ष, चारुचित्र, शरासन, चित्रायुध व चित्रवर्मा हे भीमसेनापुढें येऊन बाणांचा वर्षाव करूं लागले तेव्हां भीमानें एक एक बाणेंकरून साती बंधूचीं शिरें तोडिलीं. हें पाहून कर्णानें भीमसेनावर बाणांचा वर्षाव केला, पुनः भीमसेनानें कर्णाचें कवच तोडलें. असें उभयतांचें युद्ध होत असतां ते पळस वृक्षासारखे दिसूं लागले. भीमानें कर्णास पराजित केलें ह्मणजे इकडे अर्जुन, श्रीकृष्ण, सात्यकि, युधामन्यु, उत्तमोजा यांस बहुत आनंद होई. भीमसेनाचा पराक्रम पाहून सर्व सैनिक आश्चर्य करूं लागले. अ. त्रि. या अ. आ.

१३७. अध्याय एकशेंसदतीस - संजय ह्मणतो हे राजा, दुर्योधनाचे बंधू भीमसेनानें मारिले हें पाहून कर्ण श्वासोच्छ्वास टाकूं लागला. इकडे भीमसेनही हर्षित होऊन टाळ्या वाजवूं लागला. तें पाहून कर्ण ह्मणतो युद्ध करून भीमाचा प्राण घ्यावा किंवा आपला तरी द्यावा असा निश्चय करून कर्णानें सूर्यासारखा बाण भीमावर टाकिला. पुढें भीमसेनानें कर्णास दोन मुहूर्त अगदी आच्छादित केलें असतां कर्णास कांहीं सूचेनासें झालें तेव्हां भूरिश्रवा, कृपाचार्य, अश्वत्थामा, शल्य, जयद्रथ, उत्तमोजा, युधामन्यु, सात्यकि, केशवार्जुन हे ही भीमसेनाचा पराक्रम पाहून हर्षित झाले. हें पाहून दुर्योधन बंधूंस भाषण करतो कीं, तुह्मीं भीमसेनाचें निवारण करावें. असें ऐकून ते भीमाच्या अग्रभागीं येऊन बाण वृष्टी करूं लागले तेव्हां भीमानें सात बाणानीं शत्रुंजय, शत्रुसह, चित्र, चित्रायुध, दृढ, चित्रसेन, विकर्ण यांस मारिलें. तेव्हां भीम ह्मणतो हे विकर्णा, तूं आमचा मित्र खरा; परंतु मी प्रतिज्ञा केली ती सत्य होण्याकरितां तुला मारिलें. त्या वेळेस पांडव सैन्यांत वाद्यांचा गजर होऊं लागला, वृकोदराचा हर्षनाद श्रवण करून दुर्योधन तत्काल आचार्याजवळ जाऊन भाषण करतो कीं हे गुरो, माझे बंधू भीमसेनानें आजपर्यंत एकतीस मारिले. विदुर सांगत असतां त्याच्या वाक्याचा आह्मीं अवमान केला त्याचीं फळें पावलों इत्यादि बहुत प्रकारें तो शोक करूं लागला. संजय ह्मणतो हे राजा, हा सर्व तुझा अपराध, तूं दुर्योधनाच्या बुद्धीस लागून आपला समूळ घात करून घेतलास. अ. वि. या अ. आ.

१३८. अध्याय एकशें अडतीस - धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, जी गोष्ट झाली ती माघारी येत नाहीं अतःपर आह्मीं काय करावें याचा विचार तूं सांग? व कर्ण भीमसेन यांचें युद्ध होऊन कोणाचा पराजय झाला तें मला सांग. असें ऐकून संजय सांगतो हे राजा, भीमानें बाणांवर आपल्या नावाचें चिन्हकरून कर्णावर टाकिले त्या योगानें कर्णाचें सर्व शरीर भिन्न होऊन मी वांचतों किंवा नाहीं याचासंशय कर्णास पडला. नंतर कर्णानें आपल्या नावाचें चिन्ह करून भीमसेनावर हजारों बाण टाकिले. असें उभयतानें युद्ध होत असतां रक्त मांसाचे प्रवाह वाहूं लागले व आसमंतात् रणभूमीवर हजारों योध्यांचीं शिरें पडलीं, भीम व कर्ण उभयतांच्या युद्धानें गजाश्वरथ पदाति इत्यादि सैन्य एका एकीं नाश पावलें. अ. वि. या अ. आ.

१३९. अध्याय एकशें एकुणचाळीस - संजय ह्मणतो हे राजा, पुनः कर्णानें तीन बाणानीं भीमसेनास वेधिलें. नंतर भीमसेनानें तीन बाणानीं कर्णाचीं कुंडलें तोडून पृथ्वीवर पाडलीं. नंतर कर्णानें ढाल तरवार घेऊन भीमाचें शरीर तोडावें या बुद्धीनें तो धांऊन गेला तों भीमसेनानें ढालतरवारीचे तुकडे करून टाकिले. नंतर कर्णानें दुसरें धनुष्य घेऊन भीमसेनावर बाण वृष्टि केली तेव्हां भीमानें त्याचीं अनेक धनुष्यें तोडिलीं. कर्णानें ही त्याच्या रथाचा ध्वज मोडून त्यास रथाखालीं उतरविलें, तेव्हां भीमसेन पदाति झाला असतां गजाश्वांचीं कलेवरें घेऊन कर्णाच्या रथावर टाकूं लागला कर्णानें त्यांचा नाश करून पुनः भीमावर बाणवर्षाव केला तोंकांहीं वेळानीं पुनः भीमसेनास धनुष्य कोटीचा स्पर्श करून निंद्य भाषण करूं लागला कीं हे भीमा, हातांत शस्त्रास्त्र न धरितां तूं माझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ नाहींस युद्धकरणें हें तुझें शील नव्हे, तुझी योग्यता माझ्याशीं युद्ध करण्याची नाहीं, अरण्यांत जाऊन काष्ठांचा भारा आणावास. भृत्याचें काम करावें, दासासारिखें वागावें, मुनीसारखा अरण्यांत तूं वास करावास तुझी बाल्यपणीं जी लीला होती त्याजवरून तूं युद्धास योग्य आहेस असें नाहीं. जा आतां फार दुःखी होऊं नको, अरण्यांत जाऊन फळमूळ यांचें भक्षण करून आयुष्याचें कालक्रमण कर शस्त्रास्त्रविद्या तुला काय? मूर्खांचा राजा तूं आहेस असीं

दुर्भाषणें कर्णानें केलीं तीं भीमसेनानें श्रवण करून तो बोलतो हे कर्णा, मूर्खासारखा उगीच कांप्रलाप करितोस? तुला सहस्रवेळां युद्धांत पराजित करून पळविलें तथापि तुला लज्जा नाहीं. कर्णही भीमास प्रत्युत्तर न देतां उगीच उभा राहिला. तों अर्जुनानें कर्णावर बाणवृष्टि केली, गांडीवचापनिर्मुक्त बाण कर्णाच्या अंगावर हजारों पडूं लागले. भीमानें पूर्वी जर्जर केलाच होता तों इकडून अर्जुनही बाण टाकूं लागला तेणेंकरून कर्ण पराकाष्ठेचा पीडित होऊन पळून गेला. भीमसेनही सात्यकीच्या रथावर बसून अर्जुनाकडे गेला. धनंजयानें आरक्त नेत्र करून एक बाण कर्णावर टाकिला तो बाण अश्वत्थाम्यानें तोडून टाकिला. हें अर्जुनानें पाहून अश्वत्थाम्यावर चौसष्ट बाण टाकिले तेणेंकरून अश्वत्थामा बहुत दुःखित होऊन पळूं लागला तों पाठी मागून अर्जुनानें बहुत बाणांची दृष्टी केली तिच्या संमर्दानें कौरवांकडील गज, वाजी, रथ, पदाति यांचा बहुत नाश होऊन सैन्यांत मोठा हाहाःकार झाला. अ॰ वि॰ या अ॰ भा॰

१४०. अध्याय एकशेंचाळीस. - धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, युद्धामध्यें आमच्याकडील योद्धे बहुत मरण पावले. धनंजय क्रोधाग्नीनें सैन्याचा बहुत नाश झाला. अश्वत्थामा व कर्ण ज्या सैन्यांत मुख्यत्वें करून असतां अर्जुन, भीमसेन व सात्यकी याणीं व्यूहांत प्रवेश कसा केला? हें माझ्या मनांत वारंवार येऊन दुःख होतें. अर्जुनानें व्यूहभेद करून जेव्हां आंत प्रवेश केला तेव्हां पासून रात्रंदिवस मला निद्रा येत नाहीं फार करून मला असें वाटतें कीं, अर्जुनाच्या दृष्टिगोचर जयद्रथ होऊन मरण ही पावला असेल. हे संजया, सात्यकीनें आतां कोणाशीं युद्ध केलें? तें मला यथास्थित सांग. असा धृतराष्ट्राचा प्रश्न श्रवण करून संजय सांगतो हे राजा, भीमसेन कर्णाच्या बाणानीं पीडित होऊन सात्यकीच्या रथांत बसला तेव्हां सात्यकीनें भीमसेन श्रमी झाला असें पाहून तो कर्णावर धांवला. क्रोधेंकरून आरक्तनेत्र होऊन सात्यकीनें कौरवांची सेना बहुत नष्ट केली. हें पाहून अलंबुष राक्षस सात्यकीचें निवारण करण्यास अग्रभागीं आला आणि सात्यकीवर प्रचंड बाणवृष्टि करूं लागला. सात्यकीही अलंबुषावर बाणवृ-

ष्टि करूं लागला उभयतांनें युद्ध मोठें भयंकर अवर्णनीय झालें. नंतर कांहीं बाणानीं कुंडलांनीं रम्य अलंबुषाचें शिर सात्यकीनें पृथ्वीवर पाडलें त्या काळीं कौरव सैन्याचा धीर तुटला आणि सर्व सैन्य चारी दिशेस पळूं लागलें. जे जे रथी आपल्या रथांत आरूढ होऊन युद्धास आले होते तेही भयाभीत होऊन पळाले. या प्रकारें सात्यकीनें कौरव सैन्याची धुळधाणी केली. हें दुःशासनानें पाहून क्रोधानें सात्यकीच्या अग्रभागीं येऊन तो युद्ध करण्यास उभा राहिला. हें उभयतांनें युद्ध कांहीं काल पर्यंत झालें शेवटीं सात्यकीनें दुःशासनाचे घोडे मारिले. हें पाहून अर्जुन बहुत हर्षपावला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४१. अध्याय एकशें एकेचाळीस - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, दुःशासनावर सात्यकि आला हें पाहून त्रिगर्त सात्यकीशीं चोंहींकडून युद्ध करूं लागले. कित्येक अंगामध्यें सुवर्णाचीं चिलखतें घालून रथारूढ झालेले सात्यकीच्या आसमंतात् उभे राहून एकाएकीं बाणवर्षाव करूं लागले त्या काळीं सात्यकीनेंही त्रिगर्तांस बाणेंकरून बहुत जर्जर केलें. सात्यकीचा रथ पूर्वेस किंवा पश्चिमेस दक्षिणेस किंवा उत्तरेस आहे याचें ज्ञान कोणा योद्ध्यांस होईना. चार दिशेस पहातात तों सात्यकी युद्धच करतो असा अलातचक्रा सारखा रथ फिरवून एकावन्न योद्धे सात्यकीनें मारले तेव्हां त्रिगर्त भयाभीत होऊन पळूं लागले. जसा उन्मत्त झालेला गज कोणास आवरत नाहीं तसा सात्यकि योद्ध्यांस आवरेनासा झाला तेव्हां त्यानें त्रिगर्तराजाचा पराभव करून- कलिंगाशीं युद्ध करून त्याचाही पराभ केला आणि तो पार्थाकडे चालला हें केशवानीं पाहून तें अर्जुनास ह्मणतात कीं, हा तुझा शिष्य तुला भेटण्यास येतो आहे सर्व कौरवांस तृणप्राय करून तसेंच द्रोणाचार्य, कृतवर्मा, भूरिश्रवा यांच्या सैन्याचें कंदन करून हे अर्जुना, तुला भेटण्यास आला तो पहा. अर्जुना, सात्यकीच्या बरोबरीचा योद्धा आपल्या सैन्यांत किंवा कौरव सैन्यांत दुर्लभ आहे ज्यानें सर्वांचा पराभव करून व्यूहभेद केला वतों, तुझ्या चरणापाशीं आला हें घोर कर्म सात्यकीनें करून तो इकडे आला हें अवलोकन कर. असें कृष्णानें भाषण श्रवण क-

रून कौंतेय हर्षानें भाषण करतो हे कृष्णा, तूं ह्मणतोस कीं, सात्यकि तुझ्या कडे येतो आहे; परंतु सात्यकीचें आगमन मला या काळीं रुचत नाहीं; कारण धर्मराजाचें संरक्षण करण्या करितां यास योजिलें असतां त्याचा त्याग करून इकडे येतो तेव्हां धर्माची अवस्था काय झाली असेल. धर्माचें संरक्षण करावें हा माझा परम धर्म होय त्या धर्माचा त्याग करून सात्यकि कसा आला. द्रोणाचार्यांचा तर निग्रह आहे कीं, मी नसलों ह्मणजे धर्मास धरून दुर्योधनाच्या स्वाधीन करीन तर तो समय आला आहे तेव्हां धर्मास सोडून सात्यकि इकडे कशास आला पहाहा भूरिश्रवा मध्येंच आहे याचें उल्लंघन करून सात्यकि कसा येईल. सात्यकी तर युद्ध करतां करतां श्रांत झाला आहे व रथाचे घोडेही श्रांत झाले आहेत आणि भूरिश्रवा तर नवीन,कोणाशीं युद्ध न करितां उभा आहे तेव्हां या उभयतांचें युद्ध आतां होईल, गोष्पद प्रमाण कौरव सैन्य सात्यकीनें केलें आहे; परंतु भूरिश्रवा सात्यकीचा पराभव करील तर सात्यकीस माझा आशिर्वाद असो, त्याचें कल्याण असो; परंतु धर्मास सोडून इकडे आला इतकेंच मला दुःख झालें राजाचें वर्तमान यथास्थित असो हीच प्रार्थना करीत आहें. अ० वि० या अ० आ०

१४२. अध्याय एकशें बेचाळीस – संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, सात्यकि रथामध्यें बसून मोठ्या वेगानें येतो हें पाहून भूरिश्रवा बोलतो कीं हे सात्यके, मोठ्या दैवानें तूं येथें आलास तुझ्याशीं मी फार दिवस युद्ध करण्याची इच्छा करीत होतों जर तूं युद्धांतून न पळालास तर फार करून मी तुला जिवंत सोडीत नाहीं तुझ्या मरणानें आज दुर्योधन मोठा आनंद पावेल व केशवार्जुन बहुत शोक करतील धर्मराज तर लज्जेनें आपलें मुख लोकांस दाखविणार नाहीं माझ्या बाहूंत पराक्रम कसा आहे तो आज धनंजय पाहील, तुझ्या बरोबर युद्ध करावें हें माझ्या मनांत फार दिवस होतें तो दिवस आज सहज आला आहे, या सैन्यांत एकत्र झालेले योद्धे तुझें मरण पाहून बहुत हर्षित होतील. लक्ष्मणानें इंद्रजितास मारून रामचंद्रास जसें हर्षित केलें तसें आज मी दुर्योधनास हर्षित करीन, सर्व यादवांच्या स्त्रिया तुझ्या मरण शोकानें मृतप्राय होतील, जसा सिंहाच्या

मुखांत एखादा क्षुद्रमृग तत्काल नाश पावतो तसा तुझा नाश एकक्षणांतमी करीन, अशी वल्गाना ऐकून सात्यकि बोलतो हे भूरिश्रव्या, तूं केवळ आपल्या वाणीनें मला भय दाखवूं नको मला तर युद्धाचा अगदीं कंटाळा नाहीं युद्धामध्यें जो मला निःशस्त्र करील त्याजवर माझी फार प्रीति आहे व तो योद्धा बहुत वर्षे वांचो हा आशिर्वाद मी त्यास देईन; परंतु शरत्कालामध्यें मेघ जसे निष्फळ गर्जना करितात तशीं तुझीं निष्फळ वाक्यें ऐकून मला आश्चर्य वाटतें या कौरव सैन्यांत माझें व तुझें बहुत कालपर्यंत युद्ध व्हावें अशी मी फार दिवस इच्छा करीत आहें रणामध्यें मी युद्धास उभा राहिलों असतां कधींही थकणार नाहीं हा माझा स्वभावच आहे तस्मात् माझें वाईट तुझ्यानें जितकें होईल तितकें करण्यास आळस करूं नको. अशीं एकमेकांस भाषणें करून नंतर गजां सारखे क्रुद्ध होऊन बाण वर्षाव करूं लागले. भूरिश्रव्यानें सहस्रावधि बाणांनीं सात्यकीस आच्छादित करून दाहा बाणांनीं वेध केला सात्यकीनें भूरिश्रव्याच्या बाणांचा नाश करून आपण हीत्याजवर बहुत बाण वृष्टी केली. जसे मदोन्मत्त गज एकमेकांवर चालून जातात तसे ते चालून जाऊं लागले, व्याघ्र जसे नखें करून एकमेकांस घायाळ करितात तसे ते करूं लागले. उभयतांच्याही अंगांतून रक्ताच्या धारा चालूं लागल्या. हें युद्ध पाहून धृतराष्ट्रा तुझ्या पुत्रांस मोठा हर्ष झाला. नंतर ते उभयतां पुनः एकमेकांवर बाणवर्षाव करूं लागले परस्पर एकमेकांचे घोडे मारून धनुष्यें तोडून दोघेही पदाति झाले आणि हातांत ढाल तरवार घेऊन परस्परांवर प्रहार करूं लागले आणि भ्रांत उद्भ्रांत इत्यादि धनुष्यांच्यागति करूं लागले, एकमेकांची छिद्रें पाहून घाव टाकावे उभयतांनीं चुकवावेत. हें पाहून कौरव सैनिक टाळ्या वाजवूं लागले त्यांचा शब्द मोठा आकाशगामी होऊन सर्वांचे कान बधिर झाले. भुज, मुख व शिरें यांजवर प्रहार करावा म्हणून दोघेही प्रयत्न करूं लागले; परंतु उभयतांचाही यत्न सिद्धीस गेला नाहीं येणें प्रमाणें बत्तीस गति युद्धाच्या आहेत त्या परस्परांनीं केल्या असें उभयतांनें युद्ध होत असतां सात्यकि क्षीण युद्ध झाला तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात हे अर्जुना, यासात्यकी कडे पहा. युद्धें करून तो

बहुत श्रांत झाला आहे एकाकी असतां भारती सेनेचा भेद करून आंत आला तेणेंकरून बहुत श्रांत झाला आहे याची कांहीं तरी तजवीज कर असें भाषण होत आहे इतक्यांत भूरिश्रवा संतप्त होऊन पुनः सात्यकीवर अति तीक्ष्ण प्रहार करूं लागला हें पाहून पुनः श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, भूरिश्रव्यानें तुझ्या शिष्यास बहुत जर्जर केलें आतां याचें पालन करणें तुला योग्य आहे जेणें करून भूरिश्रव्यास सात्यकि जेर होणार नाहीं असा उपाय लौकर कर कौरवसैन्यांत महान् हाहाःकार झाला, कांहीं योद्धे मोठा हर्ष पावले आहेत असें भाषण श्रीकृष्ण करतात इतक्यांत भूरिश्रव्यानें सात्यकीस लत्ताप्रहारानें पृथ्वीवर पाडून हस्तांत खड्ग घेतला आणि सात्यकीच्या शिराचे केश धरून शिर तोडावें इतक्यांत श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, या काळीं सात्यकि बहुत हैराण झाला लौकर याचें त्राण कर. असें ऐकून अर्जुनानें गांडीवापासून क्षुरप्र बाण सोडिला तो भूरिश्रव्याचा खड्गासहित हात तोडून पृथ्वीवर पडला हें पाहून तुझे पुत्र मोठा हाहाःकार करूं लागले. अ·वि·या अ·आ·

१४३. अध्याय एकशें त्रेचाळीस:- संजय सांगतो हे राजा, अर्जुनानें भूरिश्रव्याचा बाहू तोडून पृथ्वीवर पाडला तेव्हां हें कृत्य अर्जुनाचेंच असें समजून भूरिश्रवा बोलला हे अर्जुना, हें कर्म फार तूं वाईट केलेंस अदृश्य होऊन माझा यात केलास हें तुला योग्य कीं काय? आजपर्यंत मी असें ऐकत होतों कीं, अर्जुन धर्मानें युद्ध करतो; परंतु आज माझी खात्री झाली. हा कुमार्ग इंद्रानें अथवा रुद्रानें किंवा द्रोणाचार्यांनीं तुला सांगितला कीं काय? अधर्मानें युद्ध करणें हें केवळ मूर्खांचें कर्म होय. प्रमत्त, भीत, विरथी अथवा व्यसनांत गुंतलेला त्याज बराबर सज्जन जे आहेत ते युद्धच करीत नाहींत तूं तर मोठ्याच्या कुलांत उत्पन्न झालास सर्व योद्धे तुझी प्रशंसा करितात तो तूं आज सैन्यामध्यें आपला धर्म सोडून निंद्य कर्म करण्यास प्रवृत्त झालास हें क्षुद्र कर्म करण्यास तुला श्रीकृष्णानें सांगितलें कीं काय? आपल्या कुलास बट्टामात्र लावून घेतलास तुला धिःकार असो. असें भूरिश्रव्याचें भाषण ऐकून अर्जुन उत्तर देतो हे भूरिश्रव्या, वृद्धपुरुषाची बुद्धि विपरीत होत्ये ह्मणून तूं माझी निंदा करतोस; परंतु संग्राम जाणणारे कधींही माझी निंदा करणार नाहींत

मी हा अधर्म केला ह्मणून तूं ह्मणतोस; परंतु हा अधर्म नव्हे. क्षत्रियाचा धर्म असा आहे कीं, आपले भ्राते, पितर, पुत्र, संबंधी कोणी ही रणामध्यें आले असतां त्यांशीं युद्ध करावें. सात्यकि माझा शिष्य त्याणें माझ्या रक्षणा करितां व्यूहांत प्रवेश केला त्याचें निवारण मी करूं नये कीं काय? जेणेंकरून मनुष्यानीं आपला आत्मा संरक्षित होईल असा उपाय करावा हा धर्मच आहे. सात्यकीचा घात झाला असतां माझाही अपाय होईल असें समजून मी तुझा बाहु छेदला. आपला धर्म संरक्षण केला ही माझी प्रशंसा करावयाची ती न करितां माझी निंदा करतोस तर तुझ्या सारखा मूर्ख कोणीच नसेल असें मला वाटतें. सात्यकि युद्धामध्यें श्रांत झाला, रथाचे घोडे अगदीं थकले, कवच छिन्नभिन्न झालें असें असतां त्याच्याशीं युद्धास तूं प्रवृत्त होऊन त्यास पृथ्वीवर पाडलेंस आणि केश धरून खड्गानें त्याचा शिरच्छेद करीत होतास हा मात्र तुझा धर्म. मी त्याला सोडविला हा माझा अधर्म ह्मणतोस. अरे माझें व्रत असें आहे कीं, मला जो शरण आला अगर माझा ज्यानें आश्रय केला त्याच्या सर्व विपत्ति मी दूर करीन तशांत सात्यकी तर माझा साक्षात् शिष्यच आहे त्याजकरितां शत्रूचा नाश करीन यांत काय संशय? असें हें अर्जुनाचें वाक्य ऐकून भूरिश्रवा सात्यकीस सोडून त्यानें मरणाविषयीं निश्चय केला आणि एका हातानें शराची शय्या करून ब्रह्मलोकास जाण्याच्या इच्छेनें प्राणास वायूचे ठायीं लीन चक्षु सूर्याचे ठायीं लीन करून निर्मल मनानें उपनिषद्भागाचा विचार करीत मुनी सारखा होऊन तो शरावर बसला. हें पाहून कौरव सैनिक भूरिश्रव्याची प्रशंसा करीत श्रीकृष्ण व अर्जुन यांची निंदा करूं लागले तेव्हां अर्जुन भाषण करतो हे योद्धे हो! माझ्या बाणगोचर प्राणी कोणी आला असतां त्याचा वध मी करूं नये कीं काय? शस्त्रहीन रथहीन सात्यकि माझा शिष्य त्याच्याशीं भूरिश्रव्यानें युद्ध करावें हें योग्य आहे काय बरें? एकानें एकाशींच युद्ध करावें असा जर तुमचा धर्म आहे तर विरथी, शस्त्ररहित, लहान बाळ एकटा जो अभिमन्यु त्यास सर्वांनीं मिळून मारिलें तेव्हां तुमचा धर्म कोठें गेला होता? आतां तुम्हांस माझ्या अग्रभागीं भाषण करण्याची कशी लज्जा वाटत नाहीं. असें अर्जुनानें भाषण

करतांच भूरिश्रवा आपलें शिर पृथ्वीवर टेंकून पराङ्मुख होऊन उगीच बसला तेव्हां त्याची काकुलती येऊन अर्जुन ह्मणतो हे भूरिश्रव्या, जशी माझी चार बंधूवर व श्रीकृष्णावर प्रीति आहे तशीच तुजवर आहे तूं कांहीं काळजी करूं नको. शिबि औशीनर राजे यां साररवा तूं उत्तम लोकास जाशील असें अर्जुनानें भाषण केल्यावर श्रीकृष्ण ह्मणतात हे भूरिश्रव्या, अग्निहोत्रादि क्रिया करून पुण्यलोकाची ज्यास प्राप्ति होत्ये ते लोक तर तुला तुच्छ आहेत; परंतु माझ्या साररवा गरुडाच्या यानांत बसून ब्रह्मलोकादि जे श्रेष्ठलोक यांस तूं लौकरच जाशील. असें कृष्णाचें भाषण ऐकतांच सात्यकि पृथ्वीवरून उठून हातांत रवड्ग घेऊन भूरिश्रव्याचें शिर तोडण्यास सिद्ध झाला त्याकाळीं अर्जुन व श्रीकृष्ण रवेरीज करून सर्व सैनिक भाषण करितात कीं, हे सात्यकि, व्यंग झालेला जो भूरिश्रवा याचा शिरच्छेद करूं नको अर्जुनानें त्यास मारलेंच आहे आतां तूं मारण्यांत काय अधीक आहे! आकाशामध्यें सिद्ध, चारण, गंधर्व इत्यादि भूरिश्रव्यास इंद्रा साररवा पाहून त्याच्या शौर्याची बहुत प्रशंसा करूं लागले आणि ह्मणतात कीं, हा अपराध श्रीकृष्णाचा अथवा अर्जुनाचा कोणाचा नव्हे ब्रह्मदेवानें याचा मृत्यु असाच नेमला असेल, आपल्या दैवापुढें कोणाची गति नाहीं, ईश्वरानें सात्यकीच्या हातून याचा मृत्यु नेमला नाहीं ह्मणून आपण कशावरून ह्मणावें इत्यादि प्रकारचीं भाषणें ऐकून सात्यकि ह्मणतो कीं, तुह्मीं सर्व ह्मणतां तें रवरें. याकाळीं मुनिव्रत धारण केलेला जो भूरिश्रवा याचा अधर्मे करून घात करूं नका असा धर्मवाद तुह्मीं आह्मांस सांगता; परंतु सुभद्रेचा बालक लहान शस्त्रास्त्र हीन झालेला जो अभिमन्यु याचा सर्वांनीं मिळून घात केला तेव्हां धर्म मृत्यु पावला होता कींकाय? माझी तर प्रतिज्ञा अशी आहेकीं, मी जिवंत असतां संग्रामामध्यें मला व्याकुळ करून पादहनन करील त्याचा तत्काल मी प्राण घेईन. तो देव अगर मुनि असो मला वध्य आहे तुह्मीं आतां असें समजा कीं, भूरिश्रवा मृत्यु पावला असें भाषण करून त्यानें भूरिश्रव्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें. हें पाहून सर्व सैनिक भूरिश्रव्याची स्तुति करीत उगीच स्तब्ध बसले. त्याकाळीं भूरिश्रव्याचें कांतियु-

क्त व तेजस्वी शिर व कलेवर आकाशांत अंतर्धान पावलें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१४४. अध्याय एकशेंचवेचाळीस — धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, द्रोण, कर्ण, विकर्ण, कृतवर्मा इत्यादिकांस जिंकून युधिष्ठिराच्या आज्ञेनें सात्यकि अर्जुनाकडे जात असतां भूरिश्रव्यानें सात्यकीचा पराभव करून पादताडण केलें ह्मणून तूं ह्मणतोस हें कसें घडलें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, सात्यकी व भूरिश्रवा यांची उत्पत्ती व दोघांचें वैर कशावरून पडलें याचें कारण सांगतों. अत्रिमुनीचा पुत्र सोम, त्याचा पुत्र बुध त्याचा पुत्र पुरूरवा, त्याचा पुत्र आयु, त्याचा पुत्र नहुषराजा, त्याचा पुत्र ययाति त्यापासून देवयानीचे ठायीं यदुनामक ज्येष्ठ पुत्र झाला त्याचा पुत्र देवमीढ त्याचा पुत्र शूरसेन नामक यादव, त्याचा पुत्र वसुदेव त्याच्या कुलामध्यें शिनि यानामें यादव एक उत्पन्न झाला. कोणे एके दिवशीं देवकनामक राजाची कन्या देवकी तिचा विवाह देवकराजानें वसुदेवाशीं केला. नंतर वधुवर यांस रथामध्यें बसवून शिनी राजाही बरोबर चालला तों मार्गांत बहुत राजे युद्धास आले त्या सर्वांचा पराभव करून शिनी पुढें चालला इतक्यांत सोमदत्त नामक राजा भूरिश्रव्याचा पिता युद्धास आला. शिनीनें व सोमदत्तानें युद्ध अर्धा दिवस पर्यंत मोठें तुमुल जाहलें. नंतर कांहीं काळपर्यंत बहुत युद्ध होऊन शेवटीं शिनीनें सोमदत्तास रथाखालीं पाडून त्याचे केश आपले हातांत धरून एका हातानें खड्ग उगारला आणि पायानें ताडण केलें त्याकाळीं सोमदत्तास मोठा कोप व खेद उत्पन्न झाला. नंतर शिनीस दया उत्पन्न होऊन त्यानें सोमदत्तास जिवंत सोडलें तेव्हां सोमदत्त मोठा लज्जित होऊन अरण्यांत गेला आणि त्यानें शंकराची आराधना करून त्यांस प्रसन्न केलें त्याकाळीं श्रीशंकर प्रसन्न होऊन भाषण करतात कीं — इच्छित वर असेल तो माग. असें ऐकून सोमदत्त ह्मणतो कीं महाराज, मला एक पुत्र असा द्यावा कीं, युद्धामध्यें सर्व राजे पहात असतां त्यानें शिनीच्या पुत्रास पृथ्वीवर पाडून त्याच्या शिरावर पादप्रक्षेप करावा. असें ऐकतांच शिव तथास्तु ह्मणून अंतर्धान पावले. त्या कारणास्तव राजा, भूरिश्रव्यानें सात्यकीस पृथ्वीवर पाडून त्याचे केश हातांत धरून पायानें ताडण केलें हा शिवाचा प्रसाद होय; परं-

नु रणामध्यें सात्यकीस जिंकण्यास कोणी समर्थ नाहीं. ज्यानें रणामध्यें देव-दानव इत्यादि बहुत वेळ पराजित केले त्याचा बाण कधींही आजपर्यंत व्यर्थ गेला नाहीं तो आपल्या पराक्रमानें युद्धांत वर्ततो, सर्व वृष्णीकुलामध्यें सात्यकी सारखा पराक्रमी दुसरा कोणी नाहीं, सर्व वृष्णीकुला बरोबर मृत्युलोकीं युद्ध करण्यास कोणी समर्थ नाहीं किंबहुना स्वर्गांत देव, गंधर्व, किन्नर हे ही समर्थ नाहींत मग मनुष्यांची त्यापुढें कथा काय ? अ. वि. या अ. आ.

. १४५. अध्याय एकशें पंचेचाळीस :- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, भूरिश्रवा मरण पावल्यावर कोणाचें कसकसें युद्ध झालें तें मला सांग. असें ऐकून संजय ह्मणतो हे राजा, भूरिश्रवा मरण पावल्यावर अर्जुन बोलतो हे वासुदेवा, आतां माझा रथ जयद्रथाकडे लौकर ने अवकाश थोडका राहिला सूर्य अस्तास गेला त्यणजे माझ्या प्रतिज्ञेचा भंग होऊन सर्व कौरव सैन्यामध्यें उपहास्यता होईल. असें ऐकतांच श्रीकृष्णानें जयद्रथाकडे रथ चालविला. हें पाहून दुर्योधन, कर्ण, वृषसेन, शल्य, अश्वत्थामा, कृपाचार्य हे अर्जुनाकडे गेले. दुर्योधन मोठ्या क्रोधानें अर्जुनास पहान कर्णासि बोलतो हे कर्णा, सायंकाळ पर्यंत अर्जुन जयद्रथाचा वध न करील असा उपाय लौकर करावा. दिनावशेष थोडा उरला सर्वांनीं मिळून एकदांच अर्जुनावर बाण वृष्टी करावी इतक्यांत सूर्य अस्त होऊन अर्जुनाची प्रतिज्ञा मिथ्या होईल आणि तो अग्नींत प्रवेश करून मृत्यु पावेल नंतर चारी बंधूही अर्जुनाच्या शोकानें मरण पावतील मग या निष्कंटक पृथ्वीचा आपण बहुत दिवस पर्यंत उपभोग करूं. मला असें वाटतें कीं, अर्जुनाला दैवानें सोडिलें ह्मणून त्यास असाध्य प्रतिज्ञा करण्याची इच्छा झाली याजवरून अर्जुन युद्धामध्यें लौकरच मृत्यु पावेल. कर्णा, तुझ्या सारखे योद्धे युद्धामध्यें जिवंत असतां अर्जुनाची प्रतिज्ञा सिद्धीस जाईल कीं काय? अश्वत्थामा, मी, दुःशासन इत्यादिकांनीं जयद्रथ संरक्षित असतां त्याचा घात करण्यास कोण समर्थ होईल ? असें ऐकून कर्ण ह्मणतो हे दुर्योधना, भीमाशीं युद्ध करून मी अगदी थकलों, भीमाच्या मुष्टी आघातानें माझे हातपाय बहुत व्यथेनें पावले, सर्व शरीर बाणजालानीं शिथिल झालें, आतां मला सं-

ग्रामामध्यें उभें रहाण्याची शक्ति अगदी राहिली नाहीं. माझ्या बाणांचा प्रहार पहिल्यापेक्षां कमी झाला; परंतु तुझ्या करतां मी इतकें दुःख सोसून संग्रामामध्यें उभा राहीन आणि अर्जुनास जयद्रथाकडे जाण्यास विघ्न करीन; परंतु आतां आमचा जय होईल याविषयीं निश्चय नाहीं. असें कर्ण दुर्योधनाचें भाषण होत आहे इतक्यांत अर्जुनानें कौरवसैन्यावर तीक्ष्ण बाणांची वृष्टी करून कोणाचे हात, कोणाचीं शिरें, कोणाचे बाहू, कोणाचे पाय तोडून बहुत योद्धे पृथ्वीवर पाडले. तसेच हत्ती, घोडे, पदाती यांस मारून रणभूमीवर पर्वतप्राय कलेवरांचे समुदाय केले, छत्र, ध्वज, पताका यांचा बहुत नाश करून टाकिला. याप्रकारें अर्जुनानें एकक्षणांत कौरवसैन्य रुधिरानें व्याप्त करून टाकिलें. रक्ताच्या नद्या मोठमोठ्या वाहूं लागल्या, तेव्हां दुर्योधन, कर्ण, वृषसेन, अश्वत्थामा, कृपाचार्य हे जयद्रथास पृष्ठभागीं ठेवून कृष्णार्जुनावर बाणवर्षाव करूं लागले. सर्व कौरवांकडील योद्धे सूर्यास्ताची प्रतीक्षा करीत पुनःपुनः पार्थावर बाणवर्षाव करीत असतां पार्थानें तीन तीन बाणेंकरून सर्वांचा पराभव केला. तेव्हां कृपाचार्यानें कृष्णार्जुनास दहा बाणांनीं वेध केला. अर्जुनानें शारद्वतावर बाणवर्षाव केला. असें उभयतांचें परस्पर युद्ध झालें. नंतर अश्वत्थाम्यानें पंचवीस, वृषसेनानें सात, दुर्योधनानें वीस, कर्णानें तीन, शल्यानें तीन बाणेंकरून अर्जुनास प्रहार केला. इतक्यांत कर्णानें भीमसेन व सात्यकी यांजवर बाणवृष्टी केली. त्या काळीं सात्यकीनें तीन बाणें करून कर्णास वेध केला. भीमसेनानें तीन व पार्थानें सात बाणेंकरून कर्णास वेध केला. कर्णानें त्या सर्व बाणांचा नाश करून साठ बाण अर्जुनावर टाकिले. एकटा कर्ण तीन रथ्यांशीं युद्ध करूं लागला. इतक्यांत पार्थानें कर्णावर शंभर बाणांची वृष्टी करून धनुष्य तोडिलें आणि एक बाणानें उरस्थलावर प्रहार करून कर्णाचा प्राण घ्यावा अशा बुद्धीनें सूर्यासारखा तेजस्वी एक बाण टाकिला तो बाण कर्णानें अर्धचंद्राकार बाणांनीं तोडला आणि हजारों बाणांनीं अर्जुनास वेष्टित करून आच्छादित केलें. असें उभयतांचें युद्ध होत असतां दुर्योधन आपल्या सैनिकांस बोलला हे योद्धेहो, तुह्मी सर्व मिळून राधेयाचें

संरक्षण करा. इतक्यांत अर्जुनानें कर्णाच्या रथाचे चारी अश्व मारून भल्ल-बाणानें सारथ्याचें शिर तोडलें आणि कर्णास बाणजालानीं आच्छादित केलें तेव्हां कर्ण हताश्व, हतसारथि होऊन आतां पुढें काय करावें हें त्यास सुचेनासें झालें. हें पाहून अश्वत्थामा कर्णास आपल्या रथावर बसवून अर्जुनाशीं युद्ध करूं लागला. इकडून शल्यानें तीस बाण अर्जुनावर टाकिले. कृपाचार्यांनीं वीस बाणानीं कृष्णास ताडण करून बारा बाण अर्जुनावर टाकिले. जयद्रथानें चार, वृषसेनानें सात बाणानीं कृष्णार्जुनास वेध केला. अर्जुनानें त्या सर्व बाणांचा नाश करून अश्वत्थाम्यास चौसष्ट, मद्रराजास शंभर, सैंधवास दहा, वृषसेनास तीन आणि कृपाचार्यास वीस बाणानीं ताडण केलें. आणि वारुणास्त्र टाकून पर्जन्य वृष्टि उत्पन्न केली त्या योगें कौरवांचे योद्धे बहुत त्रस्त झाले. अर्जुनानें वनवासाचे क्लेश आठवून पुनः पुनः कौरवांस जर्जरीत केलें. हे धृतराष्ट्रा, तुझ्या सर्व सैनिकानीं ही क्रोधानें प्रास, तोमर, शक्ति यांचे समुदाय अर्जुनावर टाकिले. अर्जुनानें त्या सर्वांचा नाश करून गजाश्व, पदाती यांचे समुदाय मारून यमाचें राष्ट्र वृद्धिंगत केलें. अ. वि. या अ. आ.

१४६. अध्याय एकशें शेचाळीस.- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा-अर्जुनाचें हें घोर कर्म पाहून तुझे सैनीक एकाएकीं अर्जुनावर धांऊन आले तेव्हां पार्थानें एक वेळ गांडीवाचा टणत्कार केला तेणेंकरून सर्व योद्धे अर्जुना समोर जाण्यास भ्याले. अर्जुनानें बाणांचा वर्षाव करून एका क्षणांत रक्ताची नदी उत्पन्न केली. एककालीं चारी दिशेस एक सारखी शस्त्रास्त्र वृष्टी केली त्या काळीं पार्थाकडे पहाण्यास तुझे योद्धे असमर्थ झाले. नंतर कौरवानीं ही एक क्षणांत शस्त्रांची वृष्टी करून अंधःकार उत्पन्न केला असतां पार्थानें त्या अंधःकाराचा नाश करून सूर्यास बाणजालानें आच्छादित केलें. जे कांहीं कौरव सैन्यांत शूर, मानी पुरुष होते त्यांचा पार्थानें शलभासारखा एक क्षणांत नाश केला. कोणाचीं शिरें तोडून पृथ्वीवर पडलीं, कोणाचे भूषणां सहित हात तोडले त्यामुळें एकाएकीं भयंकर रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. गृध्रादि पक्षीमां

स भक्षणा करितां हजारों निघाले. अशी भयंकर नदी पूर्वी कधींही झाली नव्हती ती नदी पहातांच मोठें भय उत्पन्न व्हावें. असें अर्जुन मोठें विलक्षण कर्म करून पुढें जयद्रथाकडे चालला तों मागाहून हजारों रथी अर्जुनावर बाण वृष्टी करूं लागले तेव्हां त्या सर्व बाणांचा नाश करून अर्जुन पुढें चालला तों अकस्मात् जयद्रथास पाहून त्यावर अर्जुनानें सहासष्ट बाण टाकिले. हें पाहून रथी हाहाःकार करूं लागले आणि एकमेकांस ह्मणतात कीं, अरे अर्जुन जयद्रथापर्यंत पोहोंचला त्याचें निवारण लौकर करा. असें ह्मणून ते चतुरंग सैन्यासह अर्जुनाचें निवारण करण्यास आले आणि त्यांनीं अर्जुनास बाणें करून व्याकुळ केलें त्याकाळीं अर्जुनानें अश्वत्थाम्यास पन्नास, वृषसेनास तीन, कृपाचार्यास पंधरा, शल्यास सोळा, कर्णास वीस, जयद्रथास चौसष्ट बाणीं करून वेध केला, जयद्रथानें अर्जुनाचे बाण सहन करून तीन बाणांनीं श्रीकृष्णास व सहा बाणांनीं अर्जुनास वेधिलें आणि आठरा बाणीं करून रथाचे घोडे तीन बाणांनीं ध्वज यांस वेध केला तेव्हां पार्थानें जयद्रथाच्या रथाचे घोडे मारून सारथ्याचें शिर तोडलें आणि वराह लक्षणानें युक्त जो ध्वज तोही तोडला. इतक्यांत श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, दिवस थोडा उरला आणि जयद्रथास सहा रथ्यांनीं मध्यें करून आपण आसमंतात् त्याचे संरक्षणार्थ उभे आहेत. हे नर संग्राममध्यें पराजित होण्यास मोठे दुर्धर, त्यांचा पराजय केल्यावांचून जयद्रथ मारण्यास सांपडत नाहीं तेव्हां मी आतां कांहीं योगानें सूर्यास आच्छादित करतों ह्मणजे सर्व सैनीक सायंकाळ झाला अर्जुनाची प्रतिज्ञा व्यर्थ झाली असें बोलतील तेव्हां जयद्रथास अतिशय हर्ष होऊन तो सूर्य आहे किंवा नाहीं हें पहाण्यास ऊर्ध्व मुख करील त्याच वेळेस त्याच्या मुखाचें संधान धरून बाणानें शिर उडीव. नंतर मी आपलें अंधःकाररूप तेज काढून घेऊन उजेड करीन, असें कृत्रिम केल्यावांचून जयद्रथ तुझ्या हातून आज सायंकाळपर्यंत मरणार नाहीं. असें ऐकून अर्जुन बोलला बरें आहे तूं जसें करशील त्यास मी मान्य आहें. असें ऐकून श्रीकृष्णानें आपल्या योगमायेनें एकाएकीं तम उत्पन्न केलें. तें पाहून धृतराष्ट्रा, तुझे पुत्र हर्षित झाले

कित्येक योद्धे नृत्य करूं लागले, अर्जुनाची प्रतिज्ञा नष्ट झाली ह्मणून तुझेपुत्र मोठ्यानें शब्द करूं लागले. इतक्यांत जयद्रथानें सूर्य अस्तास गेला किंवा नाहीं ह्मणून पहाण्यास ऊर्ध्व शिर केलें. तें पाहून श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, हाच समय आहे हें शिर जयद्रथानें वर केलें पहातोस काय! बाणेंकरून याचा छेद कर. त्या दुरात्म्यास मारण्याची हीच वेळ ही गेल्यावर अशी पुनः येणार नाहीं. असें ऐकतांच अर्जुनानें आसमंतात् जें सैन्य होतें त्याचा नाश करून कृपाचार्यावर वीस, कर्णास पन्नास, शल्यास व दुर्योधनास सहा, वृषसेनास आठ आणि सैंधवास साठ बाण मारिले. त्या समयीं सर्व सैन्य अतिक्षोभित होऊन पार्थावर चहूंकडून शरांची वृष्टि करूं लागलें. सर्वांचा विचार जयद्रथा पर्यंत अर्जुनास जाऊं देऊं नये अशा तात्पर्यानें अर्जुनास प्रतिबंध जितका होईल तितका करावा ह्मणून पुनः बाणजालांची वृष्टी करून त्यांनीं अर्जुनास अदृश्य केलें. अर्जुनानें त्या बाणजालांचा तत्काल नाश केला त्या काळीं अशी धामधूम झाली कीं, गजावर गज, घोड्यावर घोडे, रथावर रथ पडून बहुत सैन्य मरण पावलें, कित्येक हातापायानें व्यंग झालें. अशी कौरव सैन्याची धुळधाट झाली. नंतर अर्जुनानें जयद्रथाचे संरक्षक योद्धे, कर्ण, अश्वत्थामा, कृपाचार्य, शल्य, वृषसेन, सुयोधन यांस तीक्ष्ण बाणानीं आच्छादित करून कर्णाचें व वृषसेनाचें धनुष्य तोडलें, शल्याचा सारथि मारला व इतरांस बहुत बाणेंकरून हैराण केलें. त्या काळीं श्रीकृष्ण पुनः भाषण करतात हे अर्जुना, विलंब करूं नको हीच वेळ आहे लौकर अस्त्राची योजना कर. ते समयीं अर्जुनानें इंद्राच्या वज्रा सारखें अस्त्र योजून गांडीवास लाविलें. ते समयीं श्रीकृष्ण पुनः ह्मणतात हे अर्जुना, जयद्रथाचें शिर तोडून पृथ्वीवर पाडूं नको कारण कीं, वृद्धक्षत्र जयद्रथाचा पिता यास बहुत वर्षानें हा पुत्र झाला त्या काळीं अंतरिक्ष वाणी झाली कीं, हा पुत्र राज्यारूढ असतां युद्धामध्यें याचें शिर शत्रु तोडील, ती वाणी ऐकून वृद्धक्षत्र क्रोधानें ह्मणूं लागला कीं, याचें शिर संग्रामामध्यें जो कोणी तोडून पृथ्वीवर पाडील त्याचेंच शिर शतधा भेद होईल. इतकें ह्मणून जयद्रथास राज्याभिषेक करून आपण

वनांत निघून गेला. तो स्यमंतपंचका बाहेर तप करीत बसला आहे तेथें त्याचे मांडीवर शिर तोडून टाक ह्मणजे त्याचाच मूर्धा शतधा भिन्न होईल. असें ऐकून अर्जुनानें दिव्यास्त्राची योजना करून सर्व सैन्यामध्यें जयद्रथाचें शिर तोडलें आणि शराच्या शय्येसारखा मार्ग करून वृद्धक्षत्र संध्योपासना करीत बसला होता तेथें तें शिर नेऊन अकस्मात् त्याच्या उत्संकावर टाकिलें. तें वृद्धक्षत्र याणें पाहून पृथ्वीवर टाकिलें तेव्हां वृद्धक्षत्राचें शिर शतधाभिन्न होऊन पृथ्वीवर पडलें. हें पाहून सर्व योध्यांनीं हाहाःकार केला. तेसमयीं श्रीकृष्णानीं आपली योगमाया काढून सर्वांस सूर्य दर्शविला तेव्हां सर्व कौरवानीं जाणलें कीं. श्रीकृष्णानीं आपली माया प्रगट केली यांत कांहीं संशय नाहीं. जयद्रथ मरण पावल्यावर सर्व कौरव रडूं लागले. असो याप्रकारें अर्जुनानें आठ अक्षौहिणी सैन्य मारलें आणि एकाएकी देवदत्त शंखाचा नाद केला. भीमसेन, युधामन्यु, उत्तमौजा, सात्यकि याणींही आपल्या शंखाचे नाद मोठ्यानें केले, तो मोठा भैरव शब्द ऐकतांच अर्जुनानें जयद्रथ मारला यांत कांहीं संशय नाहीं असा निश्चय करून धर्मराजानेंही भैरव शंखाचा नाद केला व आपल्या योध्यांस नगारे वाजविण्याची आज्ञा दिली तेव्हां त्या योध्यांनींही नगारे व वाद्यें यांचा गजर केला. सर्व योद्धे हर्षित होऊन केशवार्जुनाची स्तुति करूं लागले. सूर्य अस्तगत झाला त्याकाळीं सर्व सोमक द्रोणावर बाण दृष्टि करूं लागले. द्रोणानींही त्यांजवर बहुत बाणांची वृष्टि केली. याप्रकारें उभयतांचें युद्ध झाल्यानंतर पांडवांचा जय झाला ह्मणून सर्व कौरव दुःखसागरांत निमग्न होऊन युद्धापासून विन्मुख झाले. त्याकाळीं धनंजय अग्नीसारखा सैन्यामध्यें शोभूं लागला. जे जे योद्धे त्याकाळीं युद्धास आले त्यांचा तत्काल अर्जुनानें नाश करून आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेली आणि श्रीकृष्णासहवर्तमान हर्षानें तो रथामध्यें विराम पावला. अ. वि. या अ. आ.

१४७. अध्याय एकशें सत्तेचाळीस - धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, अर्जुनानें महावीर जयद्रथ मारला असतां माझ्या योध्यांनीं काय केलें?

तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, अर्जुनानें जयद्रथ मारला हें पाहून कृपाचार्य अर्जुनावर बाणवृष्टि करूं लागले. तसाच अश्वत्थामाही रथांत बसून अर्जुनावर धांवला तेव्हां अर्जुनानेंही उभयतांवर बाणांची वृष्टि केली. नंतर उभयतांनीं अर्जुनास परम पीडित केलें. त्याकाळीं कृपाचार्य व अश्वत्थामा यांस मारावें अशा बुद्धीनें अर्जुनानें उभयतांच्या अस्त्रांनें आपल्या अस्त्रानें निवारण करून दोघांसही बहुत जर्जर केलें आणि बाण वृष्टि केली तेव्हां कृपाचार्य अर्जुनाच्या बाणानीं पीडित होऊन रथस्तंभीं मूर्च्छित पडला, त्याकाळीं हें सारथ्यानें पाहून रथ बाहेर नेला. हें पाहून अश्वत्थामाही दूर गेला. इतक्यांत कृपाचार्य मूर्च्छित पडलेला पाहून अर्जुन रडूं लागला आणि आपल्या मनांत ह्मणाला कीं, महाबुद्धिमान विदुर यानें धृतराष्ट्रास पूर्वीं सांगितलें होतें कीं, हा दुर्योधन पापी उत्पन्न झाला, यास आतांच मारावा नाहीं तर हा कुळाचा नाश करील या पासून कुरुकुळांतले जे वीर यांस मोठें भय उत्पन्न होईल. तें विदुराचें वाक्य अनुभवास आलें. या दुर्योधनाच्या योगें आज कृपाचार्य शरपंजरीं पडलेले मी पहातों या क्षत्रिय आचारास व बलपराक्रमास धिःकार असो. माझा सारखा असा कोणीच कर्म करणारा नाहीं. एक तर ऋषिपुत्र, माझा गुरु द्रोण याचा परम सखा हा रथोपस्थावर माझ्या बाणानीं पीडित होऊन पडला यास मीं विनाकारण पीडित केलें. हा आपण पडून माझ्या प्राणास पीडा करतो याच्या बाणानीं मी पीडित झालों असतां उपेक्षा करावयाची तीन करितां यासच मीं पीडित केलें. हा मला पुत्रवधापेक्षांही फार शोक करवितो. हे कृष्णा, तो आपल्या रथावर दीन होऊन पडला हे पहा. जे गुरूपासून विद्या संपादन करून त्याचे मनोरथ पुरवितात ते देवत्व पावतात आणि जे गुरूपासून विद्या संपादन करून गुरूस मारितात ते पुरुष अधम नरकांत जातात तसें, मी हें नरकांत जाण्याचें कर्म केलें. कृपाचार्यांनीं पूर्वीं मला अस्त्रविद्या शिकविली ते वेळेस मला सांगितलें कीं, गुरूवर बाण टाकूं नये तें मी गुरुवाक्य न ऐकिलें. तो पूज्य कृपाचार्य यास नमस्कार असो.

या प्रकारें अर्जुन कृपाचार्यांविषयीं विलाप करीत असतां जयद्रथ मेले-
ला पाहून एका एकीं कर्ण अर्जुनावर धांवला हें पाहून युधामन्यु, उत्तमौ-
जा आणि सात्यकि हे एका एकीं कर्णावर धांवले तेव्हां अर्जुन बोल-
तो हे कृष्णा, भूरिश्रवा मेला हें कर्णास न सहन होऊन तो सात्यकीशीं
युद्ध करण्यास येतो तिकडे माझा रथ चालीव. असें ऐकून कृष्ण बोलता-
त हे अर्जुना, सात्यकि एकटा कर्णाशीं पुरे. युधामन्यु, उत्तमौजा हे त्याजब-
राबर असतां काय भीति आहे कर्णाजवळ जो पर्यंत वासवी शक्ति आ-
हे तोंपर्यंत त्याशीं तुझा संग्राम योग्य नाहीं तुजकरितां ती शक्ति त्याणें ठे-
विली आहे याजकरितां तूं त्याच्याशीं युद्ध करावेंस हें नीट नाहीं. एकटा
कर्ण आह्मांस जिंकण्यास समर्थ आहे; परंतु दोष युक्त आहे याजक-
रितां समर्थ होत नाहीं यास्तव कर्ण आतां सात्यकीकडे जावो मी त्याचा
काल जाणतों तो समय आला म्हणजे तुला सांगेन. असें ऐकून धृतरा-
ष्ट्र प्रश्न करितो हे संजया, भूरिश्रवा व जयद्रथ हे मेले असतां सात्यकी-
चा व कर्णाचा संग्राम झाला तो मला सांग ! असा प्रश्न ऐकून संजय सां-
गतो हे राजा, पूर्वींच कृष्णाचे मनांत होतें कीं भूरिश्रव्याकडून सात्यकी-
स जिंकवावें; परंतु तो कृष्ण भूतभाविष्य जाणणारा याजकरितां त्यानें
पूर्वींच दारुक सारथ्यास सांगितलें होतें कीं माझा रथ सिद्ध करून ठेव त्याप्र-
माणें सारथ्यानें रथ सिद्ध केल्या नंतर युद्ध करतां करतां सात्यकी विर-
थी झाला व कर्ण पुढें आला हें पाहून कृष्णानीं शंख वाजवून दारुक सा-
रथ्यास संज्ञा केली तेव्हां दारुक सारथ्यानें रथ आणिला त्या रथांत कृष्णा-
च्या अनुमतानें सात्यकि बसून कर्णावर धांवला चक्ररक्षक युधामन्यु
व उत्तमौजा अर्जुनाच्या रथापासून सात्यकीच्या रथाकडे गेल्या नंतर
कर्ण बाण वृष्टि करीत सात्यकीवर धांवला तेव्हां कर्णानें सात्यकीस बा-
णवृष्टीनें आच्छादित केलें. त्याकाळीं सात्यकीनें कर्णास पारसव बा-
णानीं वेधकरून भल्लु बाणानीं सारथि रथाखालीं पाडला आणि चार
बाणानीं चारी अश्व मारून रथाचे तुकडे केले. नंतर कर्णाचा पुत्र वृषसेन,
शल्य व अश्वत्थामा त्या तिघानीं सात्यकीस वेष्टिलें, सात्यकीनें कर्णा-

स विरथी केलें असतां सर्व सैन्यांत हाहाःकार झाला. कर्ण सात्यकीच्या बाणानीं पीडित होऊन श्वासोच्छ्वास टाकीत दुर्योधनाच्या रथावर जाऊन बसला. तसेच दुःशासनादि नऊ ज्ञाने तुझे पुत्र पुढें आलेले त्यांस सात्यकीनें मारलेच असतें; परंतु भीमसेनाच्या प्रतिज्ञेचा भंग होईल याजकरितां विरथीमात्र करून सोडिले. तसेच अश्वत्थामा, कृतवर्मा व दुसरे महारथी एकाधनुष्यानें जिंकिले. इतक्यांत कर्णाचा सारथि रथ घेऊन आला त्या रथांत कर्ण बसून सात्यकीवर धांवला हें सर्व तुला सांगितलें आणखी ही तुझ्या अन्याया पासून झालेले दोष सांगतों. भीमसेनानें तुझे एकतीस पुत्र मारिले आणि अर्जुन व सात्यकि याणीं सहस्त्रावधि वीर मारिले व बहुत सैन्याचा नाश केला. अ. वि. या अ. आ.

१४८. अध्याय एकशें अठ्ठेचाळीस :- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, माझे व पांडवांचे योद्धे संग्रामांत आले असतां भीमसेनानें काय केलें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, भीमसेन विरथि होऊन कर्णाच्या वाग्बाणानीं पीडित झाला असतां अर्जुनास बोलला हे पार्था, हा कर्ण वारंवार मला हे मूर्खा, पोटभऱ्या, संग्रामांत मिथ्या युद्ध करूं नको असें ह्मणतो; परंतु तूं त्यास मारण्याची प्रतिज्ञा केलीसह्मणून सोडिला यास्तव आपली प्रतिज्ञा सत्य कर. असें ऐकून अर्जुन संग्रामांत पुढें येऊन बोलला हे कर्णा, हे सूतपुत्रा, संग्रामांत शूरांचीं कर्मे दोन प्रकारचीं एक जय दुसरा पराजय सात्यकीनें तुला विरथी करून सोडिलें आतां तूं दैवयोगानें भीमसेनास विरथी केलेंस आणि दुष्ट वचनें बोललास हा अधर्म केलास. पूर्वी मी, श्रीकृष्ण व इतर सैनिक पहात असतां भीमसेनानें संग्रामांत तुला बहुत वेळा विरथी केलें असें असतां कांहीं कटुभाषण तो तुला बोलला नाहीं आतां ज्यापेक्षां तूं भीमसेनास बोललास त्या पेक्षां माझ्या पाठीमागें तुह्मीं अभिमन्यूस मारिलात त्या कर्माचीं फळें आतां पावाल तूं त्याचें धनुष्य आत्मनाशा कारणें तोडलेंस या कारणा वरून तूं आतां मला वध्य आहेस तूं पहात असतां तुझा पुत्र वृषसेन यास मी मारितों व तुझ्या पुत्रास मागमें बुद्धिभ्रमानें जे मजवर येतील त्यांसही यमलोकास पाठ-

विनों. याप्रमाणें अर्जुनानें कर्णपुत्रवधाची प्रतिज्ञा केली असतां सर्व सैन्यांत हाहाःकार झाला, सूर्यही अस्तास गेला. नंतर अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून कृष्ण बोलतात हे अर्जुना, शाबास आज जयद्रथ मारलास ही मोठी प्रतिज्ञा पार पाडलीस, दैवयोगानें वृद्धक्षत्र राजा पुत्रासहवर्तमान मारलास, दुर्योधनाचें सैन्य पाहून देवसेनाही भीति पावेली असें असतां तूं मोठें कर्म केलेंस यांत संशय नाहीं. तुझा सारखा योद्धा पाहूं गेला असतां दुसरा कोणी नाहीं त्या दुर्योधनाकरितां मोठ मोठे प्रतापी राजे तुझ्या बरोबरीचे एकत्र मिळालेले तूं क्रुद्ध झालेला पाहून तुझ्या पुढें येण्यास कोणी समर्थ झाले नाहींत. तुझें वीर्यबल रुद्र, इंद्र, यम यांच्याच उपमेस योग्य होय. आतां कर्णास मारिलें असतां तुझी स्तुति करीन. असें ऐकून अर्जुन ह्मणतो हे देवा, आपल्यात प्रसादानें देवांस ही दुर्लभ जी प्रतिज्ञा ती पार पडली. ज्याचा स्वामी तूं आहेस त्याचा जय होण्यास काय आश्चर्य? तुझ्या प्रसादानें धर्मराज जय पावले आत्यांसमात्र नाचांस पुढें केलेंस असें ऐकून श्रीकृष्ण रणस्थानी रथ नेऊन ह्मणतात हे अर्जुना. संग्रामामध्यें जयाची इच्छा करून आलेले शूर शूर राजे भूमीवर पडलेले पहा. कित्येकांचीं शस्त्रें, भूषणें, गजाश्वरथ छिन्न भिन्न झालेले पहा. वाहनें, आयुधें व नानाप्रकारचीं छत्रचामरें इत्यादिकानीं पूर्ण झालेली पृथ्वी पहा. हें मोठें कर्म तुझ्या कीर्तीस वाढविण्यास योग्य आहे असें अर्जुनास रणांगण दाखवून पांचजन्य शंखाचा नाद करीत श्रीकृष्णानीं अर्जुनासहवर्तमान धर्मराजा जवळ येऊन जयद्रथाची वार्ता सांगितली. अ. वि. या अ. आ.

१४९. अध्याय एकशें एकुणपन्नास — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, श्रीकृष्णानीं धर्मराजास जयद्रथाची वार्ता सांगितली असतां धर्मराजा रथाखालीं उतरून जनार्दनास आलिंगन देऊन भाषण करतात कीं हे श्रीकृष्णा, हें तुझ्या पासून प्रिय ऐकून जो हर्ष झाला त्याचा अंत लागत नाहीं, अर्जुनानें हें अद्भुत कर्म तुझ्या प्रसादानें केलें. ज्यास तुझा आश्रय त्यास कांहीं न्यून नाहीं, तूं सर्व प्रकारें आनंदें प्रिय करण्यास तत्पर

आहेस हें कर्म देवांसही अशक्य असें असतां तुझ्या बुद्धिवीर्येंकरून अर्जुनानें केलें तूं ज्या दिवसापासून आमच्यावर अनुग्रह केलास त्या दिवसापासून सर्व शत्रु क्ष्यास जाऊन सर्व पृथ्वी आमचे हस्तगत झाली असें समजतों. पूर्वीं मार्कंडेय ऋषीनीं तुझे मनाप महात्म्य आह्मांस सांगितलें. तसेच असित, देवल, नारद व आमचा पितामह व्यास यांणीं ही तुझीं अद्भुत कर्मे सांगितलीं. तूं परब्रह्म आहेस, सर्व जगताचें कारण तूं, तूंच हें स्थावर जंगम उत्पन्न केलेंस, तूं जन्ममरण शून्य असे वेदवेत्ते ही सांगतात, तुझ्या कर्माची संख्या नाहीं. या प्रकारें धर्मराजानें स्तवन केलें असतां श्रीकृष्ण ह्मणतात हे धर्मा, तुझ्या उग्रतपें करून व धर्मेकरून हा दुष्ट जयद्रथ मरण पावला. अर्जुनानें सहस्रावधि योद्धे मारून जयद्रथ मारला या सारखा कुशलत्वा विषयीं व बाहुवीर्याविषयीं व शीघ्रते विषयीं दुसरा वीर कोठें नाहीं असें ऐकून धर्मराज अर्जुनास आलिंगन देऊन ह्मणतात कीं हे अर्जुना, तूं फारच मोठें कर्म करून केलेली प्रतिज्ञा पार पाडलीस. असें ऐकून केशवार्जुन भाषण करितात हे राजा, तुझ्या कोपाग्नीनें जयद्रथाचें भस्म झालें, दुर्योधनाचें सैन्य त्रस्त झालें तें ही आतां लौकरच मरणार, तुझ्या कोपाग्नीनें महान महान वीर दुर्योधना सहवर्तमान संग्रामामध्यें प्राण टाकितील. पूर्वीं देवांसहीं दुर्जय असा जो भीष्म तोही निस्तेज होऊन शरपंजरीं पडला. ज्यावर तूं क्रुद्ध होशील तो प्राण, पुत्र, सुख यांस टाकून मृत्यूचे स्वाधीन होईल. भीम व सात्यकि हे तुला नमस्कार करून उभे आहेत त्यांजकडे पहा. तसेच युधामन्यु व उत्तमौजा उभे आहेत त्यांजकडे पहा. त्या काळीं भीमसेन व सात्यकि उभे राहिलेले पाहून धर्मराज भाषण करतात कीं, तुह्मीं दैवयोगानें द्रोणाचार्य, कृतवर्मा, कर्ण, शल्य, यांस विमुख करून परतलांत, तुह्मीं माझें वाक्य पालन केलेंत, तुह्मांस उभे राहिलेले पाहून मला फारच आनंद होतो असें भाषण करून दोघांस आलिंगन देत नेत्रांतून आनंदाश्रु टाकूं लागला. नंतर सर्व पांडवांचें सैन्य आनंद पावून पुनः आतां युद्ध करावें अशी इच्छा करूं लागलें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१५०. अध्याय एकशें पन्नास.- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, इकडे जयद्रथ मेला असतां दुर्योधन श्वासोच्छ्वास टाकीत दुःखानें मनांत ह्मणतो कीं, भीम, अर्जुन, सात्यकि याणीं माझें बहुत सैन्य मारिलें, अर्जुन क्रुद्ध झाला असतां त्यापुढें द्रोण, अश्वत्थामा, कृपाचार्य, कर्ण हे उभे राहण्यास असमर्थ जाहले आतां सर्व माझें सैन्य मेलें असें जाणतों. ज्या कर्णाच्या आश्रयानें आह्मीं युद्ध आरंभिलें व पांडवांचा बहुत प्रकारें अवमान करून सभेमध्यें क्रूर भाषणें केलीं. व पांडवांकडूनच मध्यस्ति करितां आलेला जो कृष्ण यास तृणासारखा मानून त्यांची उपहास्यता केली तो कर्ण संग्रामांत पराजित करून अर्जुनानें जयद्रथ मारला आतां पुढें काय करावें? असा विलाप करीत द्रोणाचार्यांकडे जाऊन बोलला हे आचार्य, आमचे पितामह भीष्म यांस मारून शिखंडी पूर्ण मनोरथ झाला आणि सात्यकि व पांचाल यांसहवर्तमान तुझा शिष्य अर्जुन याणें सात अक्षौहिणी सेनेचा भेद करून जयद्रथ मारला, आमचे इष्ट, मित्र, सोयरेधायरे यमलोकास गेले. असा मी निंद्य पुरुष मित्रांचा क्षय करून सहस्रावधि अश्वमेधानींही पवित्र होण्यास अशक्य. आतां ही पृथ्वी भिन्न होऊन मला पोटांत कां घेत नाहीं? जो मी सर्व राजांमध्यें पितामह भीष्म रक्तानें प्रज्वलित संग्रामांत पडलेला पाहून त्यानें संरक्षण करावयाचें तें न केलें. असा मी दुष्ट माझी काय गति होईल, आतां जिवंत रहाणें व्यर्थ हे सर्व वीर माझ्या करितां शत्रूसमोर जाऊन परलोकीं गेले यांचे ऋणांतून मुक्त व्हावें ह्मणून मी आपल्या शक्त्यनुसार पराक्रम करितों. मी जे यज्ञयागादि केले त्यांच्या पुण्यानें पांडवांसहवर्तमान सर्व पांचाळ मारून शांति पावेन; परंतु मला कोणी साह्य नाहीं अर्जुन तुमचा शिष्य तुह्मी उपेक्षा करितां असें मला वाटतें. संग्रामकाळीं मला साह्य करणार व जयाची इच्छा करणार एक कर्ण दुसरा कोणी नाहीं. जो मित्राचा कार्यार्थ टाकून शत्रूस साह्य होतो तो अंतीं फल पावतो. शूरसेन, शिबि, वसाति, जयद्रथ, सोमदत्त हे मरण पावले त्याठिकाणीं मी जाऊन मरतों त्यांवांचून मला जिवंत रहाणें उचित नाहीं.

तुह्मीं पांडवांचे आचार्य तुह्मांस कळावें ह्मणून सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१५१. अध्याय एकशें एकावन्न:- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, जयद्रथ व भूरिश्रवा हे मरण पावल्यावर तुमच्या सैन्याचीं मनें कशीं झालीं? व दुर्योधनानें द्रोणास भाषण केल्यावर द्रोण काय बोलले? हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, दुर्योधनाचें भाषण ऐकून द्रोणाचार्य बोलतात हे सुयोधना, वाग्बाणें करून मला कां पीडित करतोस? वारंवार मी तुला सांगतों कीं, अर्जुन अजय्य आहे, अर्जुनानें संरक्षित शिखंडीनें भीष्मास मारिलें. जो भीष्म युद्धामध्यें देवदानव यांस अजय्य तो मेलेला पाहून मी जाणलें कीं, ही भारती सेना रहावयाची नाहीं. कौरवांच्या सभेंत शकुनीनें जे फांसे टाकिले ते आतां बाण होऊन तुमच्या उपयोगीं पडतात. त्या वेळेस बहुत प्रकारें विदुरानीं सांगितलें त्याचें वाक्य न ऐकिलेंत. तसेंच द्रौपदी सभेमध्यें आणिली त्याचें हें फल प्राप्त झालें. पांडवांचा कोपाग्नि दुःशासनानें पेटविला व कर्णानें वाढविला तो तुह्मांस जाळिलच यांत काय संशय? तूं माझ्यावर विश्वास ठेवितोस; परंतु मला ही अर्जुनापुढें जीविताची इच्छा नाहीं धृष्टद्युम्नाच्या तीक्ष्ण बाणानीं मी मरण पावेन. आतां आपल्या सैन्यामध्यें कृपाचार्य एक दुर्धर योद्धा आहे तोही जयद्रथाच्या मार्गास जाणार; परंतु अद्याप आहे हेंच मी फार मानितों. भीष्म पडलेला पाहून आतां ही पृथ्वी तुला मिळेल असें मला वाटत नाहीं, ही पांडव सृंजयांची सेना धांवते; परंतु आतां तुला एक प्रतिज्ञा करून सांगतों कीं, आज सर्व पांचालांस मारल्यावांचून कवच काढणार नाहीं. माझा पुत्र अश्वत्थामा यास सांगावें कीं, आपल्या जीविताचें संरक्षण करून सर्व सोमक यांचा वध करावा. मी शत्रूच्या सैन्यांत प्रवेश करितों. पांडवही आवेशानें युद्ध करतील तूंही समर्थ आहेस याजकरितां आपल्या सेनेचें संरक्षण कर. असें बोलून द्रोणाचार्य सर्व क्षत्रियांचें तेज हरण करीत पांडवांच्या सैन्यांत गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५२. अध्याय एकशें बावन :- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा, द्रोणाचार्य याणीं पांडवसैन्यांत प्रवेश केला असतां दुर्योधन क्रोधानें युद्धकरण्यास सिद्ध होऊन कर्णास बोलतो हे कर्णा, अर्जुनानें सर्व आपले योद्धे पहात असतां देवांसही दुर्लभ असा जो द्रोणांनीं केलेला व्यूह याचा भेद करून जयद्रथ पाडिला. तसेंच एकट्यानें सहस्रावधि वीर मारिले आतां आपलें सैन्य थोडें राहिलें. द्रोणाचे मनांत पांडवांचा जय व्हावा, अर्जुन त्यांस प्रिय ह्मणून त्याणीं अर्जुनास व्यूहभेद करून दिल्हा. जर पूर्वीं असें त्यानीं आह्मांस सांगितलें असतें तर जयद्रथास घरीं पाठवून इतकें कर्म करविलें नसतें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे दुर्योधना, गुरूची निंदा करूं नको. हा ब्राह्मण आपल्या शक्तीनें युद्ध करतो; परंतु प्रारब्धांत जें लिहिलेलें तें कधीं अन्यथा व्हावयाचें नाहीं. द्रोणाचा अतिक्रम करून अर्जुन आंत गेला ह्मणून द्रोणाचार्याकडे त्याचा दोष नाहीं. अर्जुन एकतर पुण्यवान्, युद्धाविषयीं दक्ष, तरुण, शूर, वानरचिन्हाच्या रथांत बसलेला, त्याचा सारथि श्रीकृष्ण, ज्याच्या अंगांत अभेद्य कवच, गांडीव धनुष्य धारण करणारा, इतक्या गोष्टीनीं संपन्न असून तो द्रोणाचार्यास जिंकून गेला हें त्यास योग्यच आहे. आचार्य तर वयानें वृद्ध, बाहुच्या चांचल्याविषयीं अशक्त या कारणानें मी द्रोणाचा कांहीं दोष पहात नाहीं. सार्वकाल आह्मीं कपटानें व पराक्रमानें वर्तत असतां सर्व व्यर्थ होतें. जो पुरुष दैवहत आहे त्यानें जें जें केलें तें तें सर्व दैवानें व्यर्थ होतें यास्तव मनुष्यानें जें जें कर्तव्य तें तें निःसंशय करावें सिद्धि दैवावर ठेवावी. हे राजा, पहा कीं, आह्मी पूर्वीं पासून कपटानें पांडवांस त्रस्त केलें, विषप्रयोग केले, लाक्षागृहांत जाळलें इत्यादि अनेक यत्न केले; परंतु दैवानें सर्व व्यर्थ केलें. आतां यत्न करून युद्धास सिद्ध हो. तुझी सेनाही बहुत, योद्धे मोठमोठे असतां पांडवांच्या अल्पवीरानीं तुमचे बहुत वीर मारिले व सेनेचाही बहुत नाश केला तेव्हां दैव बलवत्तर ह्मणून सर्व पराक्रम व्यर्थ गेले. असें कर्णदुर्योधन यांचें भाषण होत असतां पुनः पांडवांचे वीर पुढें आल्या नंतर युद्धास आरंभ झा-

ला. इतक्यास कारण हे धृतराष्ट्रा, तुझी मसलत. अ. वि. या अ. आ.

१५३. अध्याय एकशें त्रेपन– संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, कौरवांनें सैन्य पांडवांच्या सेनेचें अतिक्रमण करून चोंहीबाजूनें युद्ध करूं लागलें. पांचाल व कौरव परलोकाची दीक्षा घेऊन परस्पर बाण, तोमर इत्यादिकांचे प्रहार करूं लागले. रथी रथ्यांशीं युद्ध करीत असतां रक्ताचा स्राव चालला व हजारों योद्धे यमलोकास गेले. नंतर दुर्योधन जयद्रथाच्या मरणानें मरावें असा निश्चय करून पृथ्वी कंपायमान करीत पांडव सैन्यांत गेला त्या काळीं पांडवांचे वीर दुर्योधनाकडे पहाण्यास असमर्थ होऊन पळूं लागले. दुर्योधनानें पांडवांच्या योध्यांस जर्जर केलें हें पाहून भीमसेन प्रमुख पांचाल दुर्योधनावर धांवले. दुर्योधनानें भीमसेनास दहा, नकुळ सहदेवास तीन तीन, विराटास तीन, द्रुपदास तीन, शिखंडीस शंभर, धृष्टद्युम्नास सत्तर, धर्मराजास सात, कैकेय व चेदि यांस तीन तीन बाणांनीं वेध करून घटोत्कच व अन्य वीरांस हजारों बाणांनीं वेध केला. हें पाहून धर्मराजानें तीक्ष्ण भल्ल बाणानीं दुर्योधनाच्या धनुष्याचे तीन तुकडे केले व त्यास दहा बाणांनीं वेध करून पुनः दुर्योधनावर एक बाण टाकिला तेणें करून दुर्योधन मूर्च्छित होऊन रथावर पडला त्या काळीं पांचालांचे सैन्यांत राजा मेला असा शब्द झाला तेव्हां द्रोणाचार्य त्वरेनें पुढें येऊन युद्ध करूं लागले इतक्यांत दुर्योधनही सावध होऊन हातांत दुसरें धनुष्य घेऊन धर्मराजावर धांवला आणि त्यानें दहा बाणांनीं त्याचा ध्वज तोडला व इंद्रसेन सारथि याच्या ललाटावर तीन बाण मारिले आणि पुनः दुसऱ्या बाणांनीं धर्मराजाचें धनुष्य तोडून चार बाणांनीं चारी अश्वांस वेध केला. नंतर धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन दुर्योधनाचें निवारण केलें. हें पाहून द्रोणांनीं पांचालांचें निवारण केलें. अ. वि. या अ. आ.

१५४. अध्याय एकशें चोपन– धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, पांडवांच्या सैन्यांत द्रोणाचार्यांनीं प्रतिज्ञा करून प्रवेश केला असतां पांडवांनीं द्रोणाचार्यांचें कसें निवारण केलें? त्या काळीं द्रोणांचे चक्ररक्षक

व पुढें पाठीमागें वीर कोण कोण होते ? तो अग्नी सारखा जाज्वल्यमान असतां कसा मरण पावला ? हें मला सांग. असें ऐकून संजय सांगतो हे राजा, सायंकाळीं जयद्रथास मारलेलें पाहून दुर्योधना सहवर्तमान तुझे योद्धे संग्रामांत आले तेव्हां सात्यकि द्रोणावर धांवला. तसेंच भीमसेन, धर्मराज, धृष्टद्युम्न, विराट, केकेय, नकुळ सहदेव, घटोत्कच इत्यादिक आपले सैन्यासहवर्तमान द्रोणावर धांवले असतां मोठा संग्राम प्रवृत्त झाला. भालुका चोंहीकडून शब्द करूं लागल्या. गजाश्व यांचें रक्त वाहूं लागलें तेणें करून पृथ्वीवरील धूळ आच्छादित झाली त्या युद्धांत द्रोणानीं कित्येकांस पराजित करून युद्धविमुख केलें, कित्येक यमलोकीं पाठविले, कित्येकांस हातापायांनीं व्यंग केलें, गजाश्व, पदाति अयुत, प्रयुत संख्याक एकस्थानें छिन्न विच्छिन्न करून पराजित केले. असा विषय या अध्यायांत आहे.

१५५. अध्याय एकशें पंचावन -- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, पांडव सैन्यांत द्रोणानीं प्रवेश केल्या नंतर अर्जुनानें काय केलें ? जयद्रथ मेला असतां दुर्योधनानें काय केलें ? द्रोणाच्या भयानें पांडव पीडित झाले असतां समोर येऊन कोणीं युद्ध केलें ? द्रोणाचार्य पांडवांच्या सैन्यांत कसे मरण पावले ? रात्रीचे ठायीं कोणीं विचित्र युद्ध केलें ? प्रकाश कोणाचा होता ? हें सर्व मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, भयंकर रात्रीं युद्ध प्रवृत्त झालें असतां सोमकांसहवर्तमान पांडव द्रोणावर धांवले त्या काळीं द्रोणानीं केकेय वीर व धृष्टद्युम्नाचे पुत्र यमलोकीं पाठविले. तसेंच दुसरे महारथी जे जे पुढें आले त्यांतून कोणांना पराभव केला, कोणांस यमलोकीं धाडिलें, असा द्रोणाचार्य क्रुद्ध होऊन सैन्याचें मर्दन करितो हें पाहून पांडवांकडील शिबिनामक योद्धा द्रोणापुढें आला तेव्हां द्रोणानें दहा बाणानीं त्यास वेध केला आणि भल्ल बाणानीं घोडे मारून सारथ्यास रथाखालीं पाडिलें व शिबीचें शिरही तोडिलें. नंतर कलिंगाचा पुत्र, भीमसेन याणें आपला पिता मारलेला स्मरून सैन्यासहवर्तमान भीमसेनावर धांवला आणि प्रथम पांच व पुनः सात

बाणानीं वेध करून विशोक सारथ्यास तीन बाणानीं त्यानें वेध केला आणि एक बाण ध्वजावर टाकिला. हें पाहून भीमसेन रथाखालीं उतरून त्याच्या रथाजवळ गेला आणि त्यानें त्यास एक मुष्टिप्रहार केला त्या योगें त्याच्या अस्थीचें चूर्ण होऊन त्या अस्थि वेगवेगळ्या पडल्या. हें भीमाचें कर्म पाहून कर्ण व कलिंगाचे बंधु त्याजवर तीक्ष्ण बाण टाकूं लागले त्या काळीं भीमसेनानें कलिंगाचा बंधु जो ध्रुव त्याच्या रथाजवळ जाऊन त्यास ही मुष्टिप्रहारानें खालीं पाडलें. तसाच कर्ण पहात असतां कलिंगाचा जयरात नामक तिसरा बंधु यास डाव्या हाताच्या तलप्रहारानें यमलोकीं पाठविलें. हें पाहून कर्णानें सुवर्णाची शक्ति भीमसेनावर टाकिली तीच शक्ति भीमसेनानें हातांत घेऊन कर्णावर टाकिली ती आकाशांतच असतां शकुनीनें तोडून टाकिली. नंतर तुझे पुत्र भीमास वेढा घालून बाणवृष्टीनें आच्छादन करूं लागले तेव्हां भीमसेनानें दुर्मदाचा सारथि व चारी अश्व मारले. त्या काळीं दुर्मद हताश्व हतसारथि होऊन दुष्कर्णाच्या रथांत बसला. दुर्मद व दुष्कर्ण दोघे ही एक रथांत बसून भीमसेनास बाणानीं वेध करूं लागले. नंतर भीमसेनानें दुर्मद दुष्कर्ण यांच्या रथास लाथ मारून रथाचें चूर्ण केलें. त्या काळीं ते उभयतां न भितां तसेच युद्ध करूं लागले. पुनः उभयतांस मुष्टिप्रहार करून चरणानें मर्दन केलें. हें भीमसेनाचें कर्म पाहून कौरवांचे सैनिक पळूं लागले. या प्रमाणें कौरवांचें सैन्य रात्रीचे ठायीं भीमानें जर्जरित केलेलें पाहून सर्व राजानीं भीमसेनाची स्तुति केली. तशीच धर्मराजानें ही भीमसेनाची स्तुति केली. नंतर नकुळ, सहदेव, विराट, द्रुपद, कैकेय परम आनंद पावून भीमसेनाची स्तुति करूं लागले. अ. वि. या अ. आ.

१५६. अध्याय एकशें छपन :- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा, सात्यकीनें भूरिश्रवा मारला असतां सोमदत्त क्रोधानें बोलतो हे सात्यकि, पूर्वीं क्षत्रिय धर्मानें तूं रत असतां आतां तो धर्म टाकून चोरासारखा जो धर्म त्याचे ठायीं कां रत झालास ? जो पराङ्मुख, ज्याणें शस्त्र टेविलें त्यास अधर्म करून कसा मारलास ? आज मी दोहों पुत्रांची शपथ करतो कीं, ही रात्र

गेल्याच्या पूर्वीच एक बाणानें तुझें शिर तोडून टाकितों हें न केल्यास घोरनरकांत मी पडेन.असें बोलून सोमदत्तानें शंखनाद केला. नंतर सात्यकि बोलतो हे सोमदत्ता, तूं किती जरी बडबडलास तरी मला किंचित् ही त्रास नाहीं. तुझ्याशीं व अन्याशीं सुखें करून मी युद्ध करीन, कदाचित् द्रोण आले तर असो.अन्यास भीत नाहीं. जर तुझी इच्छा युद्धाची असेल तर तूं आपल्या मोठ्या बलें करून माझ्यावर प्रहार कर मी ही तुझ्यावर प्रहार करून तुला पुत्र बांधवांसह मारितों,असें बोलून दोघेही बाणवृष्टी करूं लागले. नंतर सहस्र रथ, दहा सहस्र अश्व यांसहवर्तमान् दुर्योधन सोमदत्तास वेष्टण करून उभा राहिला. तसाच शकुनि.पुत्र.पौत्र,बंधु यांसहवर्तमान् सोमदत्तास वेष्टण करून उभा राहिला. नंतर सोमदत्तानें तीक्ष्ण बाणानीं सात्यकीस आच्छादन केलें. इकडे धृष्टद्युम्न सैन्यासहवर्तमान् सात्यकि जवळ आला. दोन्ही ही सेना उभ्या राहिल्या असतां सोमदत्तानें सात्यकीस नऊ बाणें करून ताडण केलें. सात्यकीनें ही सोमदत्तास नऊ बाणानीं ताडण केलें असतां सोमदत्त विद्ध होऊन रथोपस्थावर मूर्छित पडला. हें पाहून सारथ्यानें सोमदत्तास दूर नेलें. इतक्यांत अश्वत्थामा क्रुद्ध होऊन सात्यकीवर धांवला. हें पाहून घटोत्कच रथांत बसून आला. इतक्यांत द्रोणाचार्य ही सात्यकीचा वध करावा या इच्छेनें त्याजवर धांवले. हें पाहून धर्मराज प्रभृति पांडवांचे वीर सात्यकीस वेष्टण करून उभे राहिले. आचार्यानीं बाणांच्या समुदायानें पांडवांचें सैन्य वेष्टित करून धर्मराजास वेध केला आणि सात्यकीस दहा बाणानीं ताडण केलें.वीस बाणानीं धृष्टद्युम्नास वेध केला.तसाच भीमसेनास नऊ, नकुलास पांच, सहदेवास आठ, शिखंडीस शंभर, द्रौपदीचे पांच पुत्रांस पांच पांच, विराटास आठ, द्रुपदास दहा, युधामन्यूस तीन, उत्तमौजास सहा बाणें करून ताडण केलें व अन्यही सैनिकांस वेधकरून तो धर्मराजावर धांवला. पांडवांचे सैनिक द्रोणानीं वध्यमान झाले असतां घाबरून दाही दिशेस पळूं लागले. हें पहातांच अर्जुन आवेशानें द्रोणाचार्याशीं युद्ध करूं लागला तेव्हां पांडवांचे सैनिक मागारी फिरले. हे राजा,

तुझे पुत्र नर द्रोणास वेष्टून उ ... ना व्रणानें पांडवांच्या सैन्यास जाळिलें त्याकाळीं त्याचें निवारण करण्यास कोणीच समर्थ झाला नाहीं. अशी ती पांडवांची सेना द्रोणाच्या बाणानीं जर्जर झाली असतां पुनः पळूं लागली. हें पाहून अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, आतां द्रोणाकडे चलावें असें ऐकून श्रीकृष्णानें द्रोणाचार्याकडे रथ नेला तेव्हां भीमसेनही आपल्या सारथ्यास बोलतो हे सूता, आतां आपला रथ द्रोणाकडे चालीव असें ऐकून सारथ्यानें अश्व हांकिले. दोघेही बंधु द्रोणावर धांवले तेव्हां पांचाल, सृंजय, मत्स्य, चेदि, कारुष, कोसल, कैकेय हे ही त्यांच्या पाठीमागें धांवले. अर्जुनानें दक्षिणभागास व भीमसेनानें उत्तर भागास रथाच्या समुदायासहवर्तमान तुझ्या पुत्रास वेष्टिलें. भीमार्जुनास पाहून धृष्टद्युम्न व सात्यकि समुद्रा साररवी गर्जना करीत पुढें गेले. तसाच घटोत्कच सोमदत्ताच्या रथा जवळ गेला तेव्हां तुझ्या पुत्राची सेना भयाभीत होऊन पळूं लागली. कित्येक गज, घटोत्कच याच्या सिंहनादानें भिऊन पळाले. नंतर राक्षसानें केलेली रक्तवृष्टि आसमंतात् झाली असतां लोहमय चक्रें, प्रास, भृशुंडि, तोमर, शूल, शतघ्नी हजारों पडूं लागलीं. असें हें अतिक्रूर युद्ध पाहून सर्व राजे पळाले. तसेच तुझे पुत्र व कर्ण हे ही दाही दिशांस पळूं लागले त्यामध्यें अश्वत्थाम्यानें मात्र राक्षसी मायेचें निवारण केलें. आपली माया नष्ट झाली असें पाहून घटोत्कचानें घोर बाणवृष्टि अश्वत्थाम्यावर केली तेव्हां ते बाण अश्वत्थाम्याच्या शरीरांत जाऊन पृथ्वीवर पडले. नंतर अश्वत्थाम्यानें घटोत्कचास दहा बाणानीं वेध केला तेव्हां घटोत्कचानें हजार पाकळ्यांचें चक्र महाभयंकर अश्वत्थाम्यावर टाकिलें असतां अश्वत्थाम्यानें बाणेंकरून त्याचें निवारण केलें तें चक्र भाग्यहीनाच्या संकल्या प्रमाणें व्यर्थ होऊन पडलें तेव्हां घटोत्कचानें अश्वत्थाम्यास बाणवृष्टीनें आच्छादन केलें. नंतर घटोत्कचाचा पुत्र अंजनपर्वा यानें अश्वत्थामा महावेगानें येतो असें पाहून त्यास बाणवृष्टीनें आच्छादन केलें; परंतु अश्वत्थाम्यानें त्या बाणवृष्टीची भीति न मानितां एक बाणानें अंजनपर्व्याचा ध्वज छेदला, दोन बाणानीं सारथि मा-

रला, तीन बाणानीं त्रिवेणु तोडला, एक बाणानें धनुष्य तोडलें, चार बाणानीं चारी अश्व मारले, त्याकाळीं अंजनपर्वा हातांत खड्ग घेऊन धांवला. इतक्यांत अश्वत्थाम्यानें तीक्ष्ण बाणेंकरून खड्गाचे दोन तुकडे केले. नंतर घटोत्कच पुत्रानें सुवर्णानें भूषित गदा अश्वत्थाम्यावर टाकिली ती गदा अश्वत्थाम्यानें विछिन्न करून पृथ्वीवर पाडली. नंतर अंजनपर्वा आकाशामध्यें उड्डाण करून वृक्षांची दृष्टि करूं लागला तेव्हां अश्वत्थाम्यानें त्यास तीक्ष्ण बाणेंकरून वेध केला असतां तो पुनः आकाशांतून खालीं उतरला आणि सुवर्णभूषित रथाचाठायीं बसून पुढें उभा राहिला असतां अश्वत्थाम्यानें त्यास मारिलें. नंतर आपला पुत्र मेलेला पाहून घटोत्कच अश्वत्थाम्या जवळ येऊन बोलला अरे द्रोणपुत्रा- तूं आज माझ्या पुढून जिवंत जाणार नाहींस असें ऐकून अश्वत्थामा भाषण करतो हे राक्षसा, जाजा आपली सेना असेल त्या सहवर्तमान युद्धास ये. हे घटोत्कचा, माझा रोष तुझाठायीं नाहीं. असें ऐकून घटोत्कच बोलतो हे अश्वत्थाम्या, तूं मला अशा भाषणानीं भय दाखविलेंस तथापि मी भ्यावयाचा नाहीं. मी भीमापासून कौरवांच्या कुलांत उत्पन्न झालों आज तूं माझ्या जवळून जिवंत जाणार नाहींस. असें बोलून त्यानें अश्वत्थाम्यावर बाणांची दृष्टि केली तेव्हां अश्वत्थाम्यानें आपल्या बाणानीं त्या बाण दृष्टीचें निवारण केलें. नंतर घटोत्कच पुनः अंतरिक्षांत मायेनें पर्वता सारखा होऊन त्यानें अश्वत्थाम्यावर शिखरांची दृष्टि केली. तेव्हां अश्वत्थाम्यानें घटोत्कचास पर्वत प्राय पाहून वज्रास्त्र टाकिलें त्या अस्त्रानें तो पर्वत छिन्न भिन्न झाला. पुनः घटोत्कच मेघरूप धरून त्यानें अश्वत्थाम्यास पाषाण दृष्टीनें आच्छादन केलें तेव्हां अश्वत्थाम्यानें वायव्य अस्त्रेंकरून त्या दृष्टीचें निवारण केलें आणि बाण समुदायानीं सर्व दिशा आच्छादित करून एक लक्ष रथ उत्पन्न केले. पुनः तो राक्षस सैन्यासहवर्तमान युद्धास आलेला पाहून अश्वत्थामा बोलला हे दुर्योधना- भिऊं नको उभा रहा! हा घटोत्कच आपले बंधू व सैन्य यां सहवर्तमान युद्धास आला आहे याचा मी वध करतों तूं आपल्या सैन्याचें रक्षण कर. असें ऐकून दुर्योधन म्हणतो हे अश्व-

त्थामा - तूं आमच्या विषयीं मोठें मन करून निकराचें युद्ध करतोस हें आ-
म्हीं जाणतों. असें अश्वत्थाम्यास बोलून शकुनीस बोलतो हे शकुनि, तूं
लक्ष रथ, साठ सहस्र गज घेऊन अर्जुनाशीं युद्ध करण्यास जा. कर्ण,
वृषसेन, कृपाचार्य, नील, पुरुमित्र, दुःशासन, निकुंभ, कुंडभेदि इत्या-
दि तुझ्या पाठीमागें येतील आणि साठ सहस्र पायदळही येईल. तूं भी-
मसेन, नकुळ सहदेव - धर्मराज यांस जिंकावेंस. माझी आशा जयाविष-
यीं तुझेठायीं आहे. पूर्वी अश्वत्थाम्यानें पांडवांस जर्जर केलेंच आहे आ-
तां तूं त्यांस मारावें. असें ऐकून शकुनि पांडवांस मारण्याच्या इच्छेनें गे-
ला. इकडे अश्वत्थामा व घटोत्कच यांचें रात्रीचे ठायीं युद्ध महान झालें अ-
सतां घटोत्कचानें अश्वत्थाम्यास दहा बाणानीं ताडण केलें तेणेंकरून
वृक्ष जसा कंपायमान होतो तसा अश्वत्थामा कंपायमान् झाला. पुनः
घटोत्कचानें अंजलीक बाणानीं अश्वत्थाम्यानें धनुष्य तोडिलें तेव्हां
अश्वत्थाम्यानें दुसरें धनुष्य घेऊन राक्षसाचें सैन्य जाळिलें. अश्वत्था
म्यानें राक्षसाचें एक अक्षौहिणी सैन्य मारिलें. हें पाहून घटोत्कचानें
राक्षसांस आज्ञा दिली कीं - तुम्हीं अश्वत्थाम्यास मारावें. अशी आज्ञा
होतांच त्या नाना स्वरूपी राक्षसानीं नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन
अश्वत्थाम्याच्या मस्तकावर प्रहार केला. हें पाहून कौरवांकडील वीर
घाबरले; परंतु अश्वत्थामा न भितां त्यानें त्या शस्त्रास्त्र वृष्टीचें वज्रा-
साररव्या बाणानीं निवारण केलें. नंतर अन्य बाणानीं राक्षसांस जर्ज
र केलें तेव्हां ते राक्षस अश्वत्थाम्यास मारण्या करितां धांवले त्याका-
ळीं अश्वत्थाम्यानें तीक्ष्ण बाणानीं राक्षसांस जाळिलें ते समयीं त्याज
कडे पहाण्यास पांडवांकडील घटोत्कचा वांचून दुसरा कोणीं सम-
र्थ झाला नाहीं. हें अश्वत्थाम्याचें कर्म पाहून घटोत्कच सारथ्यास भा-
षण करतो हे सूता, माझा रथ अश्वत्थाम्याच्या अग्रभागीं नेऊन उ
भा कर. असें ऐकतांच सारथ्यानें अश्वत्थाम्याच्या अग्रभागीं रथ ने-
ऊन उभा केला. नंतर अश्वत्थामा व घटोत्कच यांचें द्वयरथ युद्ध झालें. घ
टोत्कचानें आठ घंटेची अशनि शक्ति घेऊन अश्वत्थाम्यावर टाकिली;

ह्मां अश्वत्थाम्यानें उडि मारून ती शक्ति आपल्या हातांत घेतली. नंतर आपलें धनुष्य बाण रथावर ठेऊन पुनः तीच शक्ति घटोत्कचावर टाकिली तेव्हां घटोत्कच रथाखालीं उडी टाकून दूर गेला इतक्यांत ती शक्ति घटोत्कचाचे अश्व, सारथि, ध्वज यां सहवर्तमान रथाचें भस्म करून भूमीमध्यें गेली. नंतर घटोत्कच विरथी होऊन धृष्टद्युम्नाच्या रथांत बसला आणि अश्वत्थाम्याच्या उरावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागला. अश्वत्थाम्यानेंही घटोत्कचावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली. इतक्यांत हजार रथ, तीनशें हत्ती व सा० हजार घोडेस्वार घेऊन भीमसेन त्याठिकाणीं युद्ध करितां आला तेव्हां अश्वत्थामा घटोत्कच व धृष्टद्युम्न यांशीं युद्ध करूं लागला आणि निमेषमात्रांत त्यानें गजाश्व रथ यांसहवर्तमान एक अक्षौहिणी राक्षसांची सेना पाडली. या प्रकारें अश्वत्थाम्यानें एकाएकी रक्ताची नदी उत्पन्न करून घटोत्कचास बाणांनीं पीडित केलें. तसेंच भीमसेन व धृष्टद्युम्न यांस बाणसमुदायानें व्याप्त करून सुरथ नामक द्रुपदाचा पुत्र मारला. पुनः सुरथाचे पुत्र शत्रुंजय, बलानीक, जयानीक, जयाश्व, श्रुताह्वय, यांस मारून पृषध्र, चंद्रसेन यांस मारिलें आणि कुंतिभोजाचे दहा पुत्र दहा बाणांनीं मारून अन्य बाणांनीं रुक्ममालि, शत्रुंजय व बलि या तिघांस इंद्रलोकीं पाठविलें. आणि पुनः क्रुद्ध होऊन यमदंडोपम बाण घटोत्कचावर टाकिला तेणेंकरून घटोत्कच मूर्च्छित होऊन पडला. हें पाहून धृष्टद्युम्नानें रथ दूर नेला असतां सर्व सैन्य पळूं लागलें. या प्रमाणें अश्वत्थाम्यानें पांडवांचा पराभव करून मोठ्यानें गर्जना केली असतां सर्व कुरु पुत्र व सैनिक यांणीं अश्वत्थाम्याची फार स्तुति केली. सिद्ध, चारण, देव, गंधर्व, राक्षस हे ही अश्वत्थाम्याची स्तुति करूं लागले. अ. वि. या अ. आ.

१५७. अध्याय एकशें सत्तावन्न. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा, अश्वत्थाम्यानें द्रुपदाचे पुत्र तसेंच कुंतिभोजाचे पुत्र व हजारों राक्षस मारलेले पाहून धर्मराज, भीमसेन, धृष्टद्युम्न हे युद्ध करितां आले त्याकाळीं सोमदत्तानें सात्यकीस बाणवृष्टीनें आच्छादन केलें, तेव्हां भीम-

सेनानें दहा बाणें करून सोमदत्तास वेधिलें सोमदत्तानेंही भीमसेनास शंभर बाणानीं वेध करून सात्यकीस तीक्ष्ण बाणानीं ताडण केलें. नंतर भीमसेनानें दृढ परिघ घेऊन सोमदत्ताच्या मस्तकावर प्रहार केला. सात्यकीनेंही अग्नी सारख्या तेजस्वी बाणानीं सोमदत्ताच्या त्दयावर प्रहार केला असतां भीमाचा परिघ व सात्यकीचे बाण दोन्हींएकदांच रथाचेठायीं पडतांच सोमदत्ताच्या शरीरास वेध होऊन तो पृथ्वीवर पडला. हें पाहून बाल्हिकानें भीमावर बाण दृष्टि केली तेव्हां भीमसेनानें ही बाल्हिकास नऊ बाणेंकरून ताडण केलें. नंतर बाल्हिकानें भीमसेनाच्या उरस्थलावर शक्ति टाकिली तेणेंकरून भीमसेन मूर्च्छित पडला. नंतर क्षणमात्रानें सावध होऊन त्यानें गदेचा प्रहार बाल्हिकावर केला तेणें करून बाल्हीकराजा मरण पावला. नंतर नागदत्त, दृढरथ, महाबाहु, अयोभुज, दृढ, सुहस्त, विरजा, प्रमाथि, उग्र, अनुयायी या तुझ्या दहा पुत्रानीं भीमसेनास पीडा केली तेव्हां भीमानें दहा बाणानीं दहा पुत्र मारून कर्णाचा प्रियपुत्र जो दृषसेन याजवर बाणांची दृष्टि केली. तेव्हां कर्णाचा बंधु दृकरथ यानें तीक्ष्ण बाणेंकरून भीमास वेध केला. भीमसेनानें शकुनीचे सात रथी पाडून पांच बाणानीं पांच अतिरथी पाडले. तसाच शतचंद्र यास तीक्ष्ण बाणानी पाडून तो युद्ध करूं लागला. नंतर शतचंद्र पडलेला पाहून शकुनीच्या बंधूनीं तीक्ष्णबाणें करून भीमास ताडण केलें तेव्हां भीमानें पांच बाणानीं गवाक्ष, शरभ, विभु, सुभग, भानुदत्त, हे पांच रथी मारले. हें पाहून सर्व कौरवांकडील योद्धे भयाभीत झाले. नंतर धर्मराजानें तुझें बहुतसैन्य मारिलें, तसेंच अंबष्ठ, मालव, शूर, त्रिगर्त, शिबि, अभिषाह, शूरसेन वसाति, बाल्हिक, मद्रकाचे गण व अन्यही योद्धे यांस बाणेंकरून मृत्युलोकीं पाठविलें. या प्रमाणें धर्मराजानें सैन्यांत गर्दि केली. हें पाहून द्रोणाचार्यांनीं धर्मराजावर बाणदृष्टि करून वायव्य अस्त्र टाकिलें तेव्हां धर्मराजानें आपल्या अस्त्रेंकरून त्या अस्त्राचें निवारण केलें. पुनः आचार्यांनीं वारुण, याम्य, आग्नेय, त्वाष्ट्र, सावित्र हीं अस्त्रें धर्मराजास मा-

रावें ह्मणून एकदांच टाकिलीं त्या अस्त्रांचें धर्मानें आपल्या अस्त्रेंकरून निवारण केलें. पुनः द्रोणाचार्यांनीं धर्मराजास धरीन ह्मणून जी प्रतिज्ञा केली ती सत्य करण्या करितां ऐंद्र व प्राजापत्य या अस्त्रांचा प्रयोग केला तेव्हां धर्मानें आपल्या अस्त्रेंकरून त्या अस्त्रांचें निवारण केलें. नंतर द्रोणाचार्यांनीं ब्रह्मास्त्र प्रयोग करून सर्व सैन्यामध्यें अंधःकार उत्पन्न केला. तेव्हां धर्मानें ब्रह्मास्त्रें करून त्या अस्त्राचें निवारण केलें. असें उभयतांचें युद्ध होत असतां कांहीं कालानें द्रोणाचार्य धर्मराजास सोडून द्रुपदसैन्याचें मंथन करूं लागला. तेव्हां पांचाल पीडित होऊन पळूं लागले. त्याकाळीं हजार रथ्यांसहवर्तमान दक्षिण भागास अर्जुन व उत्तर भागास भीमसेन याणीं जाऊन द्रोणाचार्यांसि दोहीं कडून बाणवृष्टीनें व्याप्त केलें. नंतर ती कौरवांची सेना अर्जुनानें वध्यमान व अंधःकारानें पीडित झाली. अ. वि. या अ. आ.

१५८. अध्याय एकशें अठ्ठावन – संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, पांडवांचें सैन्य विजयी झालेलें पाहून दुर्योधन बोलतो हे कर्णा, जो मित्राचा साह्य करण्याचा काल तो हाच हें जाणून पांचाल, मत्स्य, कैकेय यां सहवर्तमान पांडवांचें निवारण कर. असें ऐकून कर्ण बोलतो हे राजा, भिऊं नको. अर्जुनाचें संरक्षण करण्यास इंद्र जरी आला तरी त्यास पराजित करून अर्जुनास मारीन. पांडवांमध्यें अर्जुन बलवान् आहे याजकरितां इंद्रानें दिलेली वासवी शक्ति त्याजवर टाकीन तो मेल्यावर धर्मराजप्रभृति त्याचे बंधु सर्व तुला वश्य होतील आणि पुनः अरण्यांत जातील. असें ऐकून कृपाचार्य भाषण करितात हे कर्णा, चांगलें भाषण केलेंस आज तूं बोललास हें जर सत्य होईल तर दुर्योधन सनाथ होईल. हे कर्णा, दुर्योधनापुढें फार बडबड करतोस तुझें बल व पराक्रम कांहींच नाहीं, पांडुपुत्रांशीं बहुत वेळ तुझा समागम झाला; परंतु सर्व ठिकाणीं पांडवानींच तुला जिंकिलें यास्तव हे कर्णा, कांहीं बडबड न करितां युद्ध कर. हे राधेया, जों पर्यंत अर्जुन युद्धास आला नाहीं तों पर्यंत गर्जना करून घे त्याच्या बाणानीं वध्यमान् झालास ह्मणजे गर्जनेस अवकाश कोठून? सर्व क्षत्रिय

बाहूनें शूर, ब्राह्मण तर वाणीनें शूर, अर्जुन तर धनुष्यें करून शूर, कर्णा, तूं तर मनोरथांनीं शूर असें कृपाचार्यांनीं भाषण केलें असतां कर्ण बोलतो हे कृपाचार्य, जसे वर्षाऋतूमध्यें मेघ गर्जना करून वृष्टिरूप फल देतात तसेच शूर ही गर्जना करून फल ही देतात, शूर जे मनांत आणतील तें सत्य करतील. मी कृतनिश्चय होऊन मनें करून चिंतन केलेलें तें गर्जनें करून सिद्ध करीन जे वृथा शूर आहेत ते कांहींच गर्जना करीत नाहींत आपलें सामर्थ्य जाणून पंडित गर्जना करितात तसा मी संग्रामांत श्रीकृष्णार्जुन यांस मनानें जिंकण्याची इच्छा करून गर्जना करितो त्या गर्जनेचें फल आज तूं लौकरच पहाशील. हे ब्राह्मणा, संग्रामामध्यें कृष्णासहवर्तमान् पांडवांस मारून दुर्योधनास निष्कंटक पृथ्वी करून देतों. असें ऐकून कृपाचार्य बोलतात हे कर्णा, ज्या पेक्षा तूं श्रीकृष्ण व अर्जुन यांची निंदा करतोस त्या पेक्षां मी तुला सांगतों कीं, ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण अर्जुन आहेत त्याच ठिकाणीं जय आहे श्रीकृष्ण अर्जुन हे अजय आहेत. धर्मराज तर ब्रह्मनिष्ठ, सत्यवाक्, दमनशील, धर्मांविषयीं निरंतर रत, कृतास्त्र, धैर्यवान् व त्याचे बंधु महाबलवान्, सर्वास्त्रां विषयीं कुशल, गुरुपूजना विषयीं रत आणि त्यांचे संबंधी इंद्रासारखे महान् पराक्रमी, धृष्टद्युम्न शिखंडि, द्रुपद, विराट, सुदर्शन, जयानीक, नकुल सहदेव, द्रौपदीचे पांच पुत्र, घटोत्कच इत्यादिक असतां त्यांचा क्षय कधीं व्हावयाचा नाहीं. हे कर्णा, श्रीकृष्णासहवर्तमान् पांडवांस जिंकीन त्सणतोस हा तुझा मोठा अन्याय आहे, असें ऐकून कर्ण भाषण करतो हे ब्राह्मणा, तूं खरें बोललास पांडवां विषयीं हें तुझें खरें वाक्य आहे तूं सांगितलेंस या शिवाय पांडुपुत्रांचे ठायीं बहुत गुण आहेत संग्रामांत इंद्रासहवर्तमान् देवांस ही अजय आहेत तथापि इंद्रदत्त वासवशक्तीनें मी अर्जुनास जिंकण्याची इच्छा करितों. मला इंद्रानें ही अमोघ शक्ति दिली. ती ज्याचावर टाकीन तो एक मरणार हें जाणून या शक्तीनें अर्जुनास संग्रामांत मारीन. तो मेला असतां त्याचे बंधु पृथ्वीचा उपभोग करण्यास समर्थ होणार नाहींत मग ही समुद्रवलयांकित पृथ्वी यत्ना वांचून दुर्योधनाच्या स्वाधीन होईल यांत कांहीं संश

य नाहीं हें जाणून हे ब्राह्मणा मी गर्जना करितों तूं तर ह्मातारा आणि ब्राह्मण, संग्राम करण्यास अशक्त विशेषें करून पांडवांचाठायीं स्नेह केलेला यास्तव तूं माझा अवमान करून बोलतोस हे द्विजा, जर आतां असें अप्रिय भाषण केलेंस तर हा खड्ग घेऊन तुझी जिव्हा छेदीन. हे ब्राह्मणा, भीष्म महान् पराक्रमी असून शरपंजरीं पडला. तसेंच विकर्ण, चित्रसेन, बाल्हिक, जयद्रथ, भूरिश्रवा, भगदत्त व अन्य देवांसही दुर्जय असे राजे पांडवानीं मारिले यास्तव दैवा वांचून काय होणार. हे द्विजा, पांडवांचे ही हजारो वीर आह्मीं मारिले उभयतांचें सैन्य क्षय पावलें यांत पांडवांचा ह्मणजे अधिक प्रभाव आहे असें नाहीं. आतां त्यांसहवर्तमान् यथा शक्तीनें मी संग्रामांत युद्ध करण्याची इच्छा करतों दैवीं असल्यास जय होईल. अ. वि. या अ. आ.

१५९. अध्याय एकशें एकुणसाठ — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा, या प्रमाणें कर्णानें कृपाचार्यांची निर्भर्त्सना केली असतां अश्वत्थामा क्रोधानें हस्तांत खड्ग घेऊन कर्णावर धांवला आणि त्यास बोलला हे दुष्टबुद्धे, जे अर्जुनाचाठायीं सत्य गुण त्याची स्तुति माझ्या मामानीं केली असतां तूं त्यांची निर्भर्त्सना करितोस संग्रामांत तुह्मांस अर्जुनानें जिंकून जयद्रथ मारिला असें ज्यानें साक्षात महादेवाशीं युद्ध करून त्यास तोषित केलें त्यास तूं जिंकण्याची इच्छा कशी करतोस. हे कर्णा, पहा आज तुझें या खड्गें करून शिर तोडून टाकितों असें बोलून अश्वत्थाम्यानें उड्डाण केलें आणि वेगानें तो कर्णाचा शिरच्छेद करण्यास चालला हें पाहून स्वतः दुर्योधन व कृपाचार्य यानीं त्याचें निवारण केलें त्या काळीं कर्ण बोलला कीं, यास सोडा सोडा माझ्या जवळ येऊन माझें वीर्य तर पाहूंद्या. असें ऐकून अश्वत्थामा बोलतो हे दुष्टबुद्धे, आह्मीं तुझे अपराध वारंवार सहन करतों तुझ्या येवढ्या गर्वाचा अर्जुन नाश करील. हें ऐकून दुर्योधन भाषण करतो हे अश्वत्थामन, क्षमा करून प्रसन्न व्हा आणि त्या सूतपुत्राचाठायीं कोप करूं नका हे पांडव कर्णाशीं युद्ध करण्यास येत आहेत, परस्पर हांका मारितात याजकरितां त्यांशीं युद्ध करावें. अ-

सें ऐकून अश्वत्थामा शांति पावला. नंतर कृपाचार्य बोलतात हे कर्णा, तु-
झे अपराध आम्हीं वारंवार सहन करतों अर्जुन सर्व तुझा गर्व परिहार क-
रील असे ते भाषण करीत असतां पुनः पांडव व पांचाल कर्णास पीडा क-
रीत आले तेव्हां कर्ण रथारूढ होऊन धनुष्यासहवर्तमान सर्व कौरवांनीं
वेष्टित असा आला. नंतर कर्णाचें व पांडवाचें युद्ध चाललें तेव्हां अर्जु-
नानें कर्णास बाणें करून आच्छादन केलें. नंतर कर्णानें अर्जुनास तीक्ष्ण-
बाणानीं आच्छादित करून गांडीव धनुष्याची प्रत्यंचा तोडली आणि कां-
हीं बाण कृष्णावर टाकिले असतां अर्जुनानें नवीन दृढ प्रत्यंचा धनुष्यास
लावून कर्णावर तीस बाण टाकिले व एका बाणानें धनुष्य धरलेल्या वाम-
हस्ताचे ठायीं वेध केला तेणेंकरून तें धनुष्य हस्तापासून खालीं पडलें.
पुनः तेंच धनुष्य कर्णानें घेऊन अर्जुनास बाणवृष्टीनें आच्छादिलें असें
उभयतांचें युद्ध होत असतां अर्जुनानें कर्णाचें धनुष्य मुष्टिप्रदेशाचा-
ठायीं तोडून चार भल्ल बाणानीं चारी अश्व मारिले नंतर सारथ्याचें शि-
र तोडून कर्णास चार बाणानीं ताडण केलें, त्याकाळीं कर्ण कृपाचार्या-
च्या रथांत जाऊन बसला. कर्णास अर्जुनानें जिंकिलें असें पाहून तुझे
पुत्र दाहिदिशेस पळाले तेव्हां दुर्योधन बोलला हे शूर हो, पळूं नका! मी
स्वतः अर्जुनाच्या वधाकरितां संग्रामांत जाऊन पांचालांसहवर्तमान त्या-
स मारितों असें बोलून स्वतः दुर्योधन सैन्यासहवर्तमान अर्जुनावर चाल-
ला हें पाहून कृपाचार्य बोलले हे अश्वत्थामा, दुर्योधन क्रोधानें पतंगा
सारखा अर्जुनावर जाण्याची इच्छा करतो यास्तव त्याचें निवारण कर
आम्ही येवढे वीर उभे असतां अर्जुना पुढें दुर्योधनानें जावें हें मला योग्य
दिसत नाहीं. असें ऐकून अश्वत्थामा बोलतो हे दुर्योधना, मी जिवंत अ-
सतां स्वतः तूं अर्जुनाशीं युद्ध करणें योग्य नाहीं आतां तूं उभा रहा आज
मी अर्जुनाचें निवारण करतों असें ऐकून दुर्योधन बोलतो हे अश्वत्थामा,
आमचे गुरु द्रोणाचार्य हे पांडवांचें आपल्या पुत्रा प्रमाणें पालन करता-
त तूंही पांडवांचे ठायीं निरंतर उपेक्षा करतोस यांजकरितां आतां प्र-
सन्न होऊन शत्रूंचा नाश करावा पांचाल व सोमक यांच्या वधांतून

जे शेष रहातील त्यांस आम्हीं मारूं. हे ब्राह्मणा, आदि अगर पश्चात् पांचाल व सोमक यांचा वध करण्यास तूंच उत्पन्न झालास हें तुझेंच कर्म असेंच सिद्धही सांगतात यास्तव तूं पांचालांस मार. अ. वि. या अ. आ.

१६०. अध्याय एकशेंसाठ. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, दुर्योधनाचें भाषण ऐकून अश्वत्थामा बोलला हे महाबाहो, तूं जें बोललास तें खरें आहे मला व माझ्या पित्यास पांडव प्रिय आहेत तसेंच आम्हीं ही दोघे त्यांस प्रिय आहोंत; परंतु युद्धामध्यें ही गोष्ट नाहीं. हे राजा, आतां तुझ्या करतां संग्रामांत जाऊन मोठ मोठे पांचाल व सोमक यांचा नाश करितों - असें बोलून तो युद्धास प्रवृत्त झाला आणि पांडवांसहवर्तमान् पांचालांस बोलला कीं हे योद्धे हो, सर्वांनीं आपले हस्त दाखवून माझ्यावर प्रहार करावा. असें ऐकतांच त्या वीरांनीं अश्वत्थाम्यावर शस्त्रास्त्र वृष्टि केली त्या शस्त्रास्त्र वृष्टीचें अश्वत्थाम्यानें निवारण करून धृष्टद्युम्नाचे दहावीर पाडले. हें पाहून सृंजय व पांचाल यांचे योद्धे अश्वत्थाम्यास टाकून पळाले तेव्हां धृष्टद्युम्न शंभर रथ्यांसहवर्तमान् पुढें येऊन अश्वत्थाम्यास बोलला हे गुरुपुत्रा, अन्यांस मारून तुला काय उपयोग? जर शूर आहेस तर माझ्या समोर युद्धास उभा रहा मी तुला आज यमलोकास पाठवितों असें बोलून त्यानें तीक्ष्ण बाणांनीं त्यास ताडण केलें तेणें करून तो अतिविद्ध होऊन निर्भयपणें हातांत बाण घेऊन बोला हे धृष्टद्युम्ना, तुला यमलोकीं पाठवी तों पर्यंत स्थिर होऊन दोन घटिका उभा रहा असें बोलून त्यानें तीक्ष्ण बाणांनीं त्यास आच्छादित केलें इतक्यांत धृष्टद्युम्न बोलला हे ब्राह्मणा, माझी प्रतिज्ञा व उत्पत्ति तूं जाणत नाहींस हे दुष्टबुद्धे, आतांच तुला मारला असता; परंतु पूर्वीं द्रोणास मारून नंतर तुला मारावयाचा आतां आज प्रातःकालीं तुझा पिता जो द्रोणाचार्य यास मारून नंतर तुला यमलोकास पाठवावें अशी माझी इच्छा आहे. अरे जो ब्राह्मण ब्रह्मकर्माचा त्याग करून क्षत्रिय कर्माचाठायीं रत होतो तो तुझ्या सारखा सर्व लोकांस वध्य होतो. असें धृष्टद्युम्नाचें कठोर भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नास बाणवृष्टीनें आच्छादन केलें तेव्हां धृष्टद्युम्नानें

अश्वत्थाम्यास बाण वृष्टीनें आच्छादन केलें असें दोघांचें अद्भुत युद्ध कांहीं वेळ होत असतां अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाचा ध्वज, छत्र व धनुष्य तोडून पार्ष्णी सारथि मारिले आणि चार बाणांनीं चारी अश्व मारून शंभर बाणांनीं शंभर पांचालांचे वीर मारिले त्याकाळीं ते पांचाल चोंही दिशेस पळाले. अ. वि. या. अ. आ.

१६१. अध्याय एकशें एकसष्ट – संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, अश्वत्थाम्याचा पराक्रम पाहून धर्मराज व भीमसेन यांणीं त्याचें निवारण केलें. नंतर दुर्योधन पांडवां पुढें संग्रामांत आला तेव्हां धर्मराजानें अंबष्ठ, मालव, वंग, शिबि, त्रिगर्त, अभिषाह, शूरसेन यांस मारून पृथ्वी रक्तानें पूरित केली. तेव्हां द्रोणाचार्यांनीं वायव्य अस्त्रेंकरून पांचालांचें मर्दन केलें असतां ते पांचाल पळूं लागले त्या काळीं मोठ्या रथ समुदाया सहवर्तमान अर्जुन व भीमसेन यांणीं द्रोणाचार्यास बाणांनीं ताडण केलें. भीमार्जुनाच्या मागून सृंजय, पांचाल व सोमक हे ही आले. तसेंच कौरवांचे रथी मोठ्या सेने सहवर्तमान द्रोणाजवळ आले. नंतर उभयतांचें युद्ध होत असतां अर्जुनानें कौरवांची सेना विद्ध केली त्यामुळें सर्व योद्धे पळूं लागले. अ. वि. या. अ. आ.

१६२. अध्याय एकशें बासष्ट – संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, सोमदत्त राजा महान् धनुष्य घेऊन पुढें आला हें पाहून सात्यकि आपल्या सारथ्यास ह्मणतो कीं हे सूता, माझा रथ सोमदत्ताकडे चालीव त्यास मारल्या वांचून आज मी माघारी फिरत नाहीं. असें ऐकून सारथ्यानें अश्वांस हांकिले सात्यकि वेगानें येतो असें पाहून सोमदत्तानें त्याजवर पर्जन्या सारखी बाणवृष्टि केली सात्यकीनें ही बाण समुदायानें सोमदत्तास आच्छादन केलें तेव्हां सोमदत्तानें अर्धचंद्राकार बाणानीं सात्यकीचें धनुष्य तोडून पंचवीस बाणानीं त्यास ताडण केलें तेव्हां सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन सोमदत्तास बाणांनीं वेध केला आणि भल्ल बाणानें सुवर्णाचा ध्वज तोडला तो ध्वज तुटलेला पहातांच सोमदत्तानें सात्यकीस पंचवीस बाणांनीं ताडण केलें. नंतर सात्यकीनेंही सोमदत्ताचें क्षुरप्रबाणानीं धनुष्य तो-

डून शंभर बाणांचा त्याजवर प्रहार केला. इतक्यांत सोमदत्तानेंही दुसरें धनुष्य घेऊन सात्यकीस बाणवृष्टीनें आच्छादन केलें. नंतर सोमदत्तास दहा बाणानीं भीमसेनानें ताडण केलें तेव्हां सोमदत्तानें तीक्ष्ण बाणें करून सात्यकीस ताडन केलें. नंतर भीमसेनानें नवा परिघ घेऊन सोमदत्तावर टाकिला तो परिघ आकाशमार्गे येतो असें पाहून सोमदत्तानें त्याचे दोन तुकडे केले. नंतर सात्यकीनें भल्लबाणानें सोमदत्ताचें धनुष्य तोडलें चार बाणानीं चारी अश्व मारिले आणि सारथ्याचें शिर तोडून.सुवर्णाच्या पिसाऱ्याचा बाण सोमदत्ताच्या ऱ्हदयावर टाकिला तेणेंकरून सोमदत्त रथाखालीं पडून मरण पावला हें पहातांच तुझ्या महारथ्यानीं बाणवृष्टीनें सात्यकीस आच्छादन केलें हें पाहून धर्मराजानें सैन्यासहवर्तमान द्रोणाचार्यांच्या सैन्यास पळविलें तेव्हां द्रोणानीं धर्मराजास सात बाणानीं वेध केला असतां धर्मराजानें ही आचार्यास पांच बाणानीं वेध केला नंतर आचार्यानीं धर्मराजाचा ध्वज तोडून धनुष्य तोडिलें इतक्यांत धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन सहस्त्र बाण आचार्यावर टाकिले तेणेंकरून अश्व, सारथि यां सहवर्तमान आचार्यांचा रथ आच्छादित झाला असतां दोन घटिका पर्यंत आचार्य ध्वजस्तंभीं मूर्च्छित होऊन पडले नंतर सावध होऊन त्यानीं वायव्य अस्त्र धर्मराजावर टाकिलें त्या काळीं धर्मराजानें आपल्या अस्त्रें करून त्या अस्त्राचें निवारण केलें हें पाहून श्रीकृष्ण ह्मणतात हे युधिष्ठिरा- द्रोणाचार्य तुला धरण्याविषयीं निरंतर इच्छा करतो याज करितां ह्या काळीं त्याच्याशीं तूं युद्ध करणें हें मला योग्य दिसत नाहीं याच्या नाशा करितां उत्पन्न झालेला जो धृष्टद्युम्न तो याचा वध करील. राजानीं राजाशीं युद्ध करावें हें नीट याज करितां गुरूस प्रदक्षिणा करून जिकडे दुर्योधन युद्ध करतो तिकडे जा. असें ऐकून धर्मराज अंतका सारखा तुझ्या योध्यांस मारीत जेथें भीमसेन युद्ध करीत होता तेथें गेला. अ. वि. या अ. आ.

१६३. अध्याय एकशेंत्रेसष्ट- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा- रात्रीच्या ठायीं घोर युद्ध प्रवृत्त झालें असतां अंधःकार व रज येणेंकरून पर

स्पर योद्धे अनुमानानें युद्ध करूं लागले. द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, भीमसेन, धृष्टद्युम्न, सात्यकि हे परस्पर गजाश्व, रथ, पायदळ यांचें मर्दन करूं लागले. असें ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, ती सेना परस्परांची अंधःकारांत युद्ध करीत असतां माझ्या व पांडवांच्या सैन्यांत कोणचा प्रकाश होता? हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, युद्धांतून शेष राहिलेल्या योद्ध्यांनीं सेनापतीच्या आज्ञेनें पुनः व्यूह केला त्या व्यूहाच्या अग्रभागीं द्रोणाचार्य पुढें शल्य पाठीमागें दोहों बाजूस अश्वत्थामा व शकुनि तसाच दुर्योधन सैन्याचें रक्षण करीत असतां रात्रीं युद्धास गेला आणि पदात्यांस बोलला हे योद्धे हो, तुह्मीं आतां आपलीं आयुधें टाकून प्रज्वलित दीप घ्या. असें ऐकतांच ते वीर प्रतिरथास पांच व प्रतिगजास तीन व अश्वास एक. या प्रमाणें दीप घेऊन उभे राहिले ती सर्व सेना हातामध्यें तेल व दीप घेऊन उभी असतां अंतरिक्षांत विद्युल्लते सहवर्तमान् मेघ जसे शोभतात् तसे हे वीर रणभूमीचा ठायीं शोभले. त्यामध्यें द्रोणाचार्य सुवर्णाच्या कवचानीं भूषित मध्यान्हकालींच्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला. सुवर्णाचीं भूषणें व पाजिवलेलीं शस्त्रें यांचा ठायीं दीपाची प्रभा पडून परम शोभा दिसूं लागली ती सेना दीपानीं प्रज्वलित झालेली पाहून धर्मराजानें ही पायदळांस आज्ञा केली कीं, प्रतीगजास सात, प्रतीरथास दहा, प्रती अश्वास दोन व अन्यही आसमंतात् कित्येक दीप प्रज्वलित करावे. अशी आज्ञा होतांच सैन्यामध्यें दीप प्रज्वलित होऊन सैन्य अतिशोभायमान् दिसूं लागलें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१६४. अध्याय एकशें चौसष्ट — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, रज व तम येणें करून अंधःकार झाला असतां दीपानीं त्या सर्व अंधःकाराचा नाश करून पुनः परस्पर योद्धे वधाच्या इच्छेनें युद्धास उभे राहिले, गजाशीं गज, अश्वाशीं अश्व, रथ्याशीं रथी भिडून युद्ध चाललें असतां अर्जुनानें कौरव सैन्याचें मंथन केलें. असें ऐकून धृतराष्ट्र राजा प्रश्न करतो हे संजया, माझ्या पुत्राच्या सैन्यांत अर्जुनानें प्रवेश केला असतां माझ्या पुत्राचें मन कसें झालें? व सैनिकानीं काय केलें? द्रोणाच्या

पुढें कोण युद्धास आले? व द्रोणाचार्य पांचालसेन्यांत प्रवेश करून पांचालाच्या महारथ्यांस दहन करीत असतां तो कसा मरण पावला? हे संजया, तूं निरंतर माझे योद्धे, रथी, विरथी, छिन्न भिन्न झाले ह्मणून सांगतोस; परंतु शत्रुसेन्यामध्यें कोण नष्ट झाला हें सांगत नाहींस आतां जें झालें त्याप्रमाणें सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, रात्रीचाठायीं युद्ध करावें असें द्रोणाचें मत जाणून दुर्योधन, कर्ण, वृषसेन, शल्य यांस बोलला हे योद्धे हो, आतां रात्रीचाठायीं सर्वांनीं सावध होऊन द्रोणाचें रक्षण करावें. कृतवर्मा दक्षिण चक्राचें रक्षण करील, शल्य उत्तरचक्रानें संरक्षण करील, जे त्रिगर्तांचे शेष राहिले योद्धे यांणीं धृष्टद्युम्नापासून आचार्यांचें रक्षण करावें ह्मणजे तो पांडव, संजय, सोमक यांस मारील हे सर्व वीर मेले असतां अश्वत्थामा धृष्टद्युम्नास मारील, कर्ण अर्जुनास मारील, मी भीमसेनास मारून शेष राहिलेले पांडव यांस ही मारीन याजकरितां यासमयीं सर्वांनीं द्रोणाचें रक्षण करावें असें बोलून त्यानें सैन्यास युद्ध करण्याची आज्ञा दिली असतां युद्ध प्रवृत्त झालें तेव्हां नाना प्रकारच्या शस्त्रसमुदायें करून अर्जुनानें कौरवांस ताडण केलें. तसेंच कौरवांकडील योध्यांनीं अर्जुनास शस्त्रसमुदायें करून ताडण केलें. अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नास व द्रोणाचार्यांनीं संजयांच्या वीरांस बाणें करून जर्जर केलें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१६९. अध्याय एकशेंपासष्ट - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, अशा भयंकर रात्रीं युद्ध प्रवृत्त झालें असतां धर्मराज आपल्या योध्यांस बोलला हे योद्धे हो, आतां द्रोणाच्या वधाकरितां सर्वांनीं तिकडे जावें. असें ऐकून सर्व योद्धे द्रोणावर धांवले, तसेंच तुझे योद्धे गर्जना करीत त्यांजवर धांवले, कृतवर्मा धर्मराजावर आला, द्रोणाचार्यांनीं सात्यकीवर बाणवृष्टि केली, सहदेव द्रोणावर आलेला पाहून त्याचें कर्णानें निवारण केलें, नकुलाचें शकुनीनें, शिखंडीचें कृपाचार्यानें, प्रतिविंध्याचें दुःशासनानें, घटोत्कचाचें अश्वत्थाम्यानें, द्रुपदाचें वृषसेनानें, विराटाचें शल्यानें, शतानीकाचें चित्रसेनानें, अर्जुनाचें अलंबुषराक्षसानें,

द्रोणाचें धृष्टद्युम्नानें निवारण केलें कृतवर्म्यानें धर्मराजाचें निवारण केलें असतां धर्मराजानीं प्रथम पांच व पुनः पंचवीस बाणानीं कृतवर्म्यास वेध करून उभा रहा असें भाषण केलें तेव्हां कृतवर्म्यानें धर्मराजाचें धनुष्य तोडून सात बाणानीं वेध केला इतक्यांत धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन कृतवर्म्याचा बाहु व उर यांचाठायीं दाहा बाणानीं वेध केला. कृतवर्मा धर्माच्या बाणानीं विद्ध असतां त्यानें सातबाणें करून धर्मास ताडण केलें. नंतर धर्मराजानें आपलें धनुष्य बाण ठेऊन सर्पासारखी शक्ति कृतवर्म्यावर टाकिली ती शक्ति कृतवर्म्याच्या दक्षिणबाहूचा भेद करून गेली इतक्यांत धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन कृतवर्म्यास बाण वृष्टीनें आच्छादित केलें तेव्हां कृतवर्म्यानें त्या बाण वृष्टीचा नाश करून अश्व सारथि यांसहवर्तमान धर्मराजाच्या रथाचें चूर्ण केलें. नंतर धर्मराज ढाल तरवार हातांत घेऊन धांवणार इतक्यांत तींही कृतवर्म्यानें तोडून पाडलीं. नंतर सुवर्णानें भूषित केलेलें तोमर धर्मानें पुनः कृतवर्म्यावर टाकिलें असतां कृतवर्म्यानें तें अंतरिक्षांतच त्याचे दोन तुकडे करून खालीं पाडलें आणि शंभर बाणानीं त्यास वेध केला त्या बाणानीं कवच विदारित होऊन भूमीवर पडलें त्याकाळीं धर्मराजा छिन्नधन्वा, विरथी, कवचहीन, बाणानीं पीडित होऊन संग्रामांतून पळाला. अ. वि. या अ. आ.

१६६. अध्याय एकशें सहासष्ट - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, सात्यकि युद्ध करण्यास येतो हें पाहून भूरीनें त्याचें निवारण केलें तेव्हां सात्यकीनें क्रुद्ध होऊन पांच बाणानीं त्यास ताडण केलें तेणेंकरून त्याच्या हृदयापासून रक्तस्राव होऊं लागला तसाच भूरीनेंही तीक्ष्ण बाणानीं सात्यकीस भुजाच्या मध्यभागाचाठायीं वेध केला त्या दोघांचें युद्ध दोन घटिका समरूप झालें. नंतर सात्यकीनें भूरीचें धनुष्य तोडून नऊ बाणानीं त्याच्या हृदयाचाठायीं भेद केला तेव्हां भूरीनें दुसरें धनुष्य घेऊन सात्यकीस तीक्ष्ण बाणानीं वेध करून त्याचें धनुष्य छेदिलें त्याकाळीं सात्यकीनें महान् शक्ति घेऊन भूरीच्या उराचाठायीं प्रहार केला त्या शक्तीनें भूरि छिन्न अंग होऊन मरण पावला. हें पाहून अश्वत्थामा क्रो-

धानें सात्यकीवर धांवला हें पाहून घटोत्कच बोलला हे अश्वत्थामा, उभा रहा तुला आज मी मारून तुझी युद्धश्रद्धा नष्ट करतों असें बोलून तो अश्वत्थाम्यावर धांवला आणि त्यानें स्थूल बाणांचा अश्वत्थाम्यावर प्रहार केला तेव्हां अश्वत्थाम्यानें आपल्या बाणांनीं त्या बाणांचें निवारण करून तीक्ष्ण बाणांनीं घटोत्कचास ताडण केलें. असें उभयतांचें कांहीं वेळ युद्ध होत असतां घटोत्कच अश्वत्थाम्याच्या बाणांनीं कंपित होऊन ध्वजस्तंभीं टेकला. हें पाहून तुझ्या सैन्यामध्यें घटोत्कच मेला असा शब्द करूं लागले. नंतर घटोत्कच क्षणमात्रानें सावध होऊन त्यानें अश्वत्थाम्याची आपल्या सारखीच अवस्था केली. नंतर अश्वत्थाम्यानें सावध होऊन यमदंडोपम बाण घटोत्कचावर टाकिला तो बाण त्याचें हृदय भेदून पृथ्वींत गेला तेणें करून घटोत्कच मूर्च्छित होऊन ध्वजस्तंभीं पडला तेव्हां त्याच्या सारथ्यानें रथ दूर नेला. अश्वत्थाम्यानें घटोत्कचास मूर्च्छित करून सिंहासारखा नाद केला असतां दुर्योधनासहवर्तमान तुझे पुत्र व योद्धे याणीं त्याची बहुत स्तुति केली. भीमसेन द्रोणाशीं युद्ध करतो हें पाहून दुर्योधनानें भीमसेनास दहा बाणांनीं वेध केला. भीमसेनानें ही वीस बाणेंकरून दुर्योधनास वेध केला असें दोघांचें युद्ध होत असतां भीमसेनानें दुर्योधनाचें धनुष्य तोडून दहा बाणांनीं ध्वजास वेध करून सब्बद बाण दुर्योधनावर टाकिले. नंतर दुर्योधनानें क्षुरप्र बाणांनीं भीमाचें धनुष्य तोडलें इतक्यांत भीमसेनानें दुसरें धनुष्य घेऊन सात बाणांनीं दुर्योधनास वेध केला पुनः दुर्योधनानें तेंही धनुष्य तोडलें अशीं भीमाचीं पांच धनुष्यें तोडून दुर्योधन उभा राहिला इतक्यांत भीमसेनानें पोलादाची शक्ति दुर्योधनावर टाकिली त्या शक्तीचे दुर्योधनानें तीन तुकडे करून पृथ्वीवर पाडले हें पाहून भीमसेनानें महान् गदा दुर्योधनाच्या रथावर टाकिली तेणें करून दुर्योधनाचे अश्व व सारथि यांचा नाश झाला त्याकाळीं दुर्योधन रथाखालीं उडी टाकून शल्याच्या रथांत बसला त्याकाळीं भीमसेनानें दुर्योधन मेला असें जाणून सिंहासारखी गर्जना केली आणि कौरवांस बाणें करून ताडण केलें. कौरवांचे सैनिक दुर्योधन मेला

असें समजून हाहाःकार शब्द करूं लागले. भीमसेनाची गर्जना ऐकून धर्मराज दुर्योधन मेला असें जाणून भीमसेना जवळ आला. अ॰ वि॰ या अ॰ अ॰

१६७. अध्याय एकशें सदुसष्ट- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, सहदेव द्रोणावर धांवला हें पाहून कर्णानें त्याचें निवारण केलें, सहदेवानें कर्णास नऊ बाणानीं वेध करून पुनः तीक्ष्ण दहा बाणानीं वेध केला, कर्णानें सहदेवास वीस बाणानीं वेध करून धनुष्य तोडलें नंतर सहदेवानें दुसरें धनुष्य घेऊन कर्णावर वीस बाण टाकिले असतां कर्णानें सहदेवाचे अश्व मारून सारथ्यास यमलोकीं पाठविलें. त्याकाळीं सहदेव खड्गचर्म घेऊन उभा राहिला असतां तेंही खड्गचर्म कर्णानें तोडलें. नंतर सहदेवानें मोठी गदा घेऊन कर्णाच्या रथावर टाकिली तेव्हां कर्णानें ती गदा बाणें करून भूमीवर पाडली पुनः सहदेवानें कर्णावर शक्ति टाकिली ती शक्ति कर्णानें तोडून टाकिली त्या काळीं सहदेवानें रथाचें चक्र कर्णावर फेंकलें तें चक्र काळचक्रा सारखें येतें असें पाहून कर्णानें सहस्र बाणानीं त्याचें छेदन केलें हें पाहून सहदेव संग्रामांतून गेला कर्णही त्याच्या मागें जाऊन बोलला हे सहदेवा माझ्या सारखे जे रथी यांच्याशीं तूं युद्ध करूं नको आपल्या बराबरीचे जे असतील त्यांचाशीं युद्ध कर हा अर्जुन कौरवांशीं युद्ध करतो तिकडे जा किंवा घरीं जा असें बोलून त्यानें धनुष्याच्या अग्रानें सहदेवास स्पर्श केला आणि पांडव पांचाल यांच्या सैन्याकडे गमन केलें. कर्णानें सहदेवास मारलेंच असतें; परंतु कुंतीच्या वाक्यानें स्मरण करून त्यास मारलें नाहीं. नंतर सहदेव कर्णाच्या वाग्बाणानीं पीडित होऊन जनमेजय जो पांचाल याच्या रथांत बसला. विराटराजा द्रोणाशीं युद्ध करतो हें पाहून शल्यानें त्याचें निवारण केलें शल्यानें विराटास शंभर बाणानीं वेध केला विराटानें शल्यास तीक्ष्ण नऊ बाणानीं वेध करून पुनः त्र्याहत्तर व शंभर बाणें करून वेध केला. शल्यानें विराटाचे चारी अश्व मारून एक बाणानें धनुष्य व एक बाणानें ध्वज तोडला त्याकाळीं विराटराजानें रथाखालीं उडी टाकून शल्यावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि केली नंतर विराटराजाचा बंधु शतानीक यानें विराटराजास विरथी झालेला पाहून आपला रथ शल्या-

पुढें आणला तेव्हां शल्यानें विशिख बाणेंकरून त्यास यमलोकीं पाठविलें. आपला बंधु शतानीक मेलेला पाहून विराटराजा रथांत बसला आणि त्यानें शल्यावर बाणवृष्टि केली तेव्हां शल्यानें एकबाणेंकरून विराटराजाच्याउरस्थलावर प्रहार केला, त्या प्रहारानें विराटराजा अतिविद्ध होऊन ध्वजस्तंभीं मूर्च्छित पडला हें पाहून सारथ्यानें संग्रामांतून रथ दूर नेला. नंतर ती सेना शल्याच्या बाणानीं पीडित झालेली रात्रीचाठायीं पळूं लागली तेव्हां श्रीकृष्ण व अर्जुन ज्या ठिकाणीं शल्य युद्ध करीत होता तेथें येऊन युद्ध करूं लागले. तों इतक्यांत काजळाच्या पर्वता सारखा अलंबुषराक्षस पुढें येऊन अर्जुनाच्या मस्तकावर हजारों बाण टाकूं लागला त्याकाळीं अर्जुन व अलंबुष या उभयतांचें फार भयंकर युद्ध झालें. प्रथम अर्जुनानें शंभर बाणानीं त्यास ताडण करून नऊ बाणानीं ध्वज तोडला तीन बाणानीं सारथि मारून चार बाणानीं चारी अश्व मारिले. त्याकाळीं अलंबुष राक्षस खड्ग घेऊन सिद्ध होतो इतक्यांत अर्जुनानें खड्गाचे दोन तुकडे केले आणि चार बाण अलंबुषावर टाकिले असतां त्या बाणांस भिऊन अलंबुषराक्षस पळून गेला. नंतर अर्जुनानें आचार्याच्या अग्रभागीं युद्ध करून हजारों वीर यमलोकीं पाठविले, कित्येक हत्ति, घोडे, छिन्न विच्छिन्न केले हें पाहून कौरवांचे सैनिक पळूं लागले. अ. वि. या भ. आ.

१६८. अध्याय एकशें अडुसष्ट — संजय सांगतो हे धृतराष्ट्रा, नकुळाचा पुत्र शतानीक कौरव सैन्याचा नाश करतो हें पाहून चित्रसेन त्याचें निवारण करण्यास पुढें आला तेव्हां शतानीकानें चित्रसेनास तीक्ष्ण बाणेंकरून वेध केला असें दोघांचें युद्ध होत असतां शतानीकानें चित्रसेनाचा सारथि व अश्व मारले तेव्हां चित्रसेन हताश्व हतसारथि होऊन कृतवर्म्याच्या रथावर बसला. द्रुपदराजा द्रोणावर धांवला हें पाहून कर्णपुत्र वृषसेनानें तीक्ष्णबाणेंकरून त्यास आच्छादन केलें. द्रुपदराजानें वृषसेनास साठ बाणेंकरून बाहु व ऊर यांचाठायीं प्रहार केला तेव्हां वृषसेनानें द्रुपदास नऊ बाणानीं वेध करून पुनः सत्तर बाण टाकिले आणि सहस्रावधि बाणांची वृष्टि करून भल्ल बाणानें त्याचें धनुष्य तोडलें असतां त्या बाणानीं द्रुपदराजा मू-

च्छिन झाला हें पाहून सारथ्यानें रथ दूर नेला, तेव्हां सोमक पीडित होऊन प-ळाले. नंतर वृषसेन ज्या ठिकाणीं धर्मराज युद्ध करीत होता त्या ठिकाणीं जा-ऊन युद्ध करूं लागला. धर्मराजपुत्र प्रतिविंध्य संग्रामामध्यें शत्रूंस जाळूं-लागला हें पाहून दुःशासनानें त्याचें निवारण केलें आणि उग्र बाणांनीं प्र-तिविंध्याचे अश्व मारून भल्लबाणांनीं सारथि मारला व रथाचे तुकडे के-ले तेव्हां विरथी झालेला प्रतिविंध्य हातांत धनुष्य घेऊन त्यानें दुःशासनाव-र शतशः बाणांची वृष्टि केली नंतर दुःशासनानें क्षुरप्रबाणांनीं तेंही धनुष्य तोडून दहा बाणांनीं त्यास वेध केला इतक्यांत आपला बंधु विरथि झालेला पा-हून प्रतिविंध्यानें बंधु मोठ्या सैन्यासह वर्तमान त्याजवळ येतांच भीमपुत्र-सुतसोम याच्या रथांत तो जाऊन बसला आणि त्यानें दुःशासनास बाणवृष्टी-नें आच्छादन केलें. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१६९. अध्याय एकशें एकुणहत्तर.- संजय म्हणतो हे धृतराष्ट्रा, न-कुळ हा तुझ्या सैन्याचा नाश करीत चालला हें पाहून शकुनीनें त्याजवर बाणवृष्टि केली आणि एक कर्णिक बाण नकुळावर टाकिला असतां न-कुळ मूर्च्छित होऊन ध्वजस्तंभीं पडला नंतर नकुळ सावध होऊन त्यानें साठ बाणांनीं शकुनीस वेध करून शंभर बाण स्तनांतरीं टाकिले आणि धनु-ष्यातें छेदन करून ध्वज तोडला त्याकाळीं शकुनि नकुळाच्या बाणांनीं विद्ध होऊन रथोपस्थावर पडला हें पाहून सारथ्यानें संग्रामांतून रथ दूर नेला. नं-तर नकुळ शकुनीस पराजित करून आपल्या सूतास बोलला हे सूता, मा-झा रथ द्रोणाचार्यांच्या अग्रभागीं लौकर नेऊन उभा कर. असें ऐकतांच सार-थ्यानें आचार्यांच्या अग्रभागीं रथ नेऊन उभा केला. शिखंडि द्रोणाशीं यु-द्ध करण्यास येतो हें पाहून कृपाचार्य वेगानें पुढें आले तेव्हां शिखंडीनें न-ऊ बाणें करून कृपाचार्यास ताडण केलें नंतर कृपाचार्यांनीं पांच पुनः वीस-अशा बाणांनीं शिखंडीस वेध केला, शिखंडीनें अर्धचंद्राकार बाणानें त्या-चें धनुष्य तोडलें, त्याकाळीं कृपाचार्यांनीं सुवर्णदंडाची भयंकर शक्ति शि-खंडीवर टाकिली ती शक्ति अंतरिक्ष येत असतां शिखंडीनें बहुत बाणें करू-न तोडून भूमीवर पाडली. नंतर कृपाचार्यांनीं दुसरें धनुष्य घेऊन शिखंडी-

स तीक्ष्णबाणानीं उ ... पाचार्यांच्या बाणानीं आच्छादित ... पडला. पुनः कृपाचार्यांनीं कांहीं बाण ....वर टाकिले तरी ... झाले त्या ... झाला हें पाहून पांचाल व सोमक त्यास वेष्टन करूं लागले. तसेच तुझे पुत्र येऊन कृपाचार्यास वेष्टूं लागले. ती रात्र दीपानीं प्रकाशित असतां दिवसा सारखी शोभूं लागली जसें सूर्योदयें करून तम दूर होतें तसें रात्रीचाठायीं दीप प्रदीप्त असतां तम नष्ट झालें. रात्रीचाठायीं युद्धांत पिता पुत्रास पुत्र पित्यास सखा सख्यास मामा भाच्यास भाचा मामास मारूं लागले तेसमयीं कांहींच मर्यादा राहिली नाहीं. अ. वि. या अ. आ.

१७०. अध्याय एकशें सत्तर — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, असें युद्ध प्रवृत्त झालें असतां द्रोणावर धृष्टद्युम्न चालला हें पाहून पांचाल व पांडव यानीं त्याचें संरक्षण केलें. तसेच तुझे पुत्र द्रोणाचें रक्षण करण्या करितां आले. धृष्टद्युम्नानें द्रोणाच्या हृदयाचेठायीं पांच बाणानीं वेध करून सिंहनाद केला, द्रोणानीं धृष्टद्युम्नास पंचवीस बाणानीं भेद करून भल्लबाणानीं धनुष्य तोडलें. नंतर धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन द्रोणाचा अंत करावा अशा बुद्धीनें एक बाण सोडिला तो बाण धनुष्यापासून सुटतांच सूर्य जसा उदयास पावून भूतांस संतप्त करितो तसा तो सर्व सैन्यास त्रास देऊं लागला. त्या घोर बाणास पाहून देव, गंधर्व, मनुष्य द्रोणाची स्वस्ति असो असें भाषण करूं लागले. इतक्यांत कर्णानें तो बाण तोडून धृष्टद्युम्नास दहा बाणानीं वेध केला तसेच अश्वत्थाम्यानें पांच, शल्यानें नऊ, दुर्योधनानें तीन, शकुनीनें पांच असे सात वीरानीं द्रोणाचें संरक्षण करण्या करितां धृष्टद्युम्नावर बाण टाकिले तथापि धृष्टद्युम्नानें न घाबरतां द्रोण, अश्वत्थामा, कर्ण, दुर्योधन, यांस तीन तीन बाण मारिले तसाच द्रुमसेन धृष्टद्युम्नावर तीन बाण टाकून उभा रहा उभा रहा असें बोलला तेव्हां धृष्टद्युम्नानें द्रुमसेनास तीक्ष्ण बाणानीं वेध करून भल्ल बाणानें त्याचें मस्तक तोडून पृथ्वीवर पाडलें. आणि त्या वीरांस बाणानीं वेध करून कर्णाचें धनुष्य तोडलें, नंतर कर्णानें दुसरें धनुष्य घेऊन सुस्कार टाकीत धृष्टद्युम्नास बा-

णा दृष्टीनें आच्छादन केलें. कर्ण पर... नो असें पाहून अश्वत्थामा इत्यादि सहा रथ्यांनीं धृष्टद्युम्ना... युद्धीनें त्यास वेष्टिलें. हें पाहून तुझ्या पुत्रांस असें वाटलें कीं, धृष्टद्युम्न आतां मृत्यूच्या मुखांत सांपडला. इतक्यांत सात्यकि तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत धृष्टद्युम्नाच्या रक्षणास आला तेव्हां कर्णानें त्याजवर दहा बाण टाकिले, सात्यकीनेंही कर्णावर दहा बाण टाकिले. असें उभयतांनें युद्ध इंद्र, बली यांसारखें होत असतां दुर्योधन व दुसरे सैनिक यानीं सात्यकीवर बाणवृष्टि केली त्या काळीं सात्यकीनें कर्णाच्या अस्त्राचें आपल्या अस्त्रानें निवारण करून वृषसेनाच्या दोन्हीं स्तनांच्यामध्यें बाणांचा प्रहार केला त्या बाणानीं वृषसेन पीडित होऊन धनुष्य रहित रथामध्यें मूर्च्छित पडला. नंतर कर्ण वृषसेन मेला असें जाणून पुत्रशोकानें पीडित झाला आणि त्यानें सात्यकीस पराकाष्ठेचा त्रास दिला तसेंच सात्यकीनें कर्णावर बहुत बाण टाकून सात बाण वृषसेनावर टाकिले आणि उभयतां पिता पुत्रांचीं सहस्र धनुष्यें तोडलीं. नंतर त्या दोघानीं दुसरीं धनुष्यें घेऊन सात्यकीस तीक्ष्ण बाणानीं वेध केला. असा महान् संग्राम चालला असतां गांडीव धनुष्याचा शब्द कर्णाच्या श्रवणांत येतांच तो दुर्योधनास बोलला हे राजा, अर्जुन महान् महान् राजे मारून कौरवांस मारण्याची इच्छा करतो हा त्याच्या गांडीवाचा व रथाचा शब्द ऐक. निश्चयेंकरून मी तुला सांगतों कीं, अर्जुन मोठें विलक्षण कर्म करील यांत संशय नाहीं हे राजा, ही भारती सेना पळून चालली कोणीही त्याजपुढें उभा रहात नाहीं. हा सात्यकि आमच्या मध्यभागीं उभा आहे आम्ही सर्व एकत्या कडे दृष्ट देऊं तर सर्वांस जिंकूं. हा धृष्टद्युम्न द्रोणाशीं संगत झाला आहे आतां सात्यकि व धृष्टद्युम्न यांस मारिलें असतां निःसंशयेंकरून आपला विजय होईल अर्जुन आला नाहीं तों पर्यंत दोघांस वेष्टन करून मारण्याविषयीं यत्न करावा सात्यकीस सर्वांनीं वेष्टिलें हें अर्जुनास न कळलें तर सात्यकि लौकरच परलोकास जाईल असें ऐकून दुर्योधन बोलतो हे शकुनि, दहासहस्र रथ व दहासहस्र गज घेऊन तूं अर्जुनाकडे युद्धा-

स जा. दुःशासन, सुबाहु, दुःप्रधर्षण, हे पायदळ घेऊन तुझ्या मागें येतील कार्तिकस्वामीनी जसें असुरांस मारिलें तसें तूं कृष्णार्जुन, धर्मराज, भीमसेन, नकुळ, सहदेव, यांस मारावेंस असें ऐकून शकुनि सेनेसहवर्तमान् पांडवांस मारण्याच्या इच्छेनें गेला. नंतर कर्ण मोठ्या सैन्यासहवर्तमान् सात्यकीशीं युद्ध करण्यास प्रवृत्त होऊन त्यानें हजारो बाणांची त्याजवर दृष्टि केली तसेच अनेक राजे सात्यकीवर बाण दृष्टि करूं लागले. अ. वि. या अ. आ.

१७१. अध्याय एकशें एकाहत्तर :- संजय ह्मणतो हे राजा, तुझे वीर चोंही बाजूनें कोष्टकाकार वेढा घालून तीक्ष्णबाणांची सात्यकीवर दृष्टि करीत असतां एकट्या सात्यकीनें त्यांच्या शस्त्रवृष्टीचें निवारण करून आप त्या उग्र बाणानीं गजांचे शुंडादंड, अश्वांच्या ग्रीवा, आयुधांसहवर्तमान् वीरांचे बाहु छेदिले तेव्हां दुर्योधन ह्मणतो हे सारथे, जेथें सात्यकि युद्ध करतो तेथें माझा रथ नेऊन उभा कर असें ऐकून सारथ्यानें सात्यकी जवळ रथ नेऊन उभा केला असतां सात्यकीनें दुर्योधनावर ऐशीं बाण टाकून चारी अश्व मारिले आणि एक बाणानें सारथ्यास रथाखालीं पाडलें. नंतर दुर्योधनानें मृताश्व रथाच्याठायीं बसून सात्यकीवर तीक्ष्ण बाण टाकिले पुनः सात्यकीनें दुर्योधनावर बाणदृष्टीकरून त्याचें धनुष्य तोडलें त्याकाळीं दुर्योधन कृतवर्म्याच्या रथांत बसून माघारा गेला नंतर सात्यकीनें तुझ्या सैन्याचा पराभव केला. इकडे शकुनीनें हजारों गजाश्वरथ यांसहवर्तमान् अर्जुनास वेढा घालून त्याजवर शस्त्रास्त्र दृष्टि केली तेव्हां अर्जुनानें हजारों गजाश्व मारिले हजारों पळविले. हें पाहून शकुनीनें नऊ बाणें करून अर्जुनास वेध केला नंतर अर्जुनानें शकुनीस वीस बाणानीं विद्ध करून इतर वीरांवर तीन तीन बाण टाकिले, कित्येक योध्यांचीं कुंडलानीं सुशोभित शिरें व आभरणानीं सुशोभित बाहु तोडून पृथ्वी भरून टाकिली असें अर्जुनानें विलक्षण कर्म करून पुनः शकुनीवर बाण टाकिले आणि तीन बाणानीं उलूकास ताडण केलें तेव्हां उलूक त्या बाणानीं विद्ध असतां त्यानें तीन बाण कृष्णावर टाकून सिंह नाद केला, अर्जुनानें शकुनीचें धनुष्य तोडून चारी अश्व यमलोकास पाठविले. नंतर शकुनि त्या रथांतून उ-

लूकाच्या रथांत बसला असतां दोघे पिता पुत्र अर्जुनावर बाण वृष्टि करूं लागले तेव्हां अर्जुनानें उभयतांस तीक्ष्ण बाणांनीं जर्जर करून शतावधि बाणांनीं तुझ्या सैन्यास पळविलें आणि कृष्णार्जुनांनीं शंख वाजविले. इकडे धृष्टद्युम्नानें द्रोणास तीन बाणांनीं वेध करून धनुष्याची प्रत्यंचा तोडली. द्रोणांनीं दुसरें धनुष्य घेऊन धृष्टद्युम्नावर सात बाण टाकून सारथ्यास पांच बाणांनीं वेध केला तेव्हां धृष्टद्युम्नानें त्या बाणांचें निवारण करून कौरवांची सेना पळविली. कोणांस हातापायानें व्यंग केलें. कोणांचीं शिरें तोडिलीं या प्रमाणें दोहों सेनेच्या मध्यभागीं धृष्टद्युम्नानें रक्ताची नदी उत्पन्न करून शंखाचा नाद केला. शिखंडि, नकुळ सहदेव, सात्यकि, भीमसेन यांणीं तुझ्या हजारों वीरांस जिंकून अनेक शंखाचे व दुंदुभींचे नाद केले. अ. वि. या अ. आ.

१७२. अध्याय एकशेंबाहत्तर — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रराजा, आपलें सैन्य पळूं लागलें असें पाहून दुर्योधन आवेशानें कर्णद्रोण यांजवळ येऊन बोलला हे आचार्य, तुह्मीं उभयतां बोलतां कीं, आह्मी पांडुपुत्रांस संग्रामामध्यें जिंकितों तें मी तुमचें वाक्य ऐकून तुमच्यावर भरवसा ठेवून रात्रीं युद्ध चालविलें आतां तुमचे मनांत माझें कल्याण व्हावें असें असल्यास पराक्रम करून यथा योग्य युद्ध करावें. असें ऐकून द्रोणाचार्य, कर्ण, अश्वत्थामा हे सात्यकि प्रमुख पांडवांचे वीर यांजवर धांवले, तसेच पांडवांचे वीर तुझ्या सैन्यांत आले, नंतर द्रोणाचार्यांनीं दहा, कर्णानें सात, दुर्योधनानें सात, वृषसेनानें दहा, शकुनीनें दहा बाण सात्यकीवर टाकून द्रोणाचार्य पांडवांच्या सेनेचा नाश करूं लागले हें पाहून सोमकाचे वीर द्रोणाचार्यावर बाण वृष्टि करूं लागले, त्या काळीं द्रोणानें त्या क्षत्रियांस यमलोकीं पाठविलें, अशी ती पांडवांची सेना द्रोणानें पीडित केली असतां रात्रीचा ठायीं हस्तांतील दीप टाकून पळूं लागली तेव्हां श्रीकृष्ण भाषण करतात हे अर्जुना, द्रोण व कर्ण हे पांचालांस पीडित करतात आतां यांची उपेक्षा केली असतां रात्रींतून कोणी शेष रहाणार नाहींत. असें कृष्ण अर्जुनास भाषण करतातों इतक्यांत भीमसेन सैन्याचा भेदकरून येतो हें पाहून पुनः श्रीकृष्ण

ह्मणतात हे अर्जुना, पहा हा भीमसेन, कर्णद्रोण यांजवर अतिक्रुद्ध होऊन सैन्यांस धीर देण्या करितां चालला असें बोलून कृष्णानीं अर्जुनाचा रथ द्रोण व कर्ण यांच्या अग्रभागीं नेला असतां पुनः परस्परांचें युद्ध होऊं लागलें, ज्या ठिकाणीं द्रोण व कर्ण युद्ध करीत होते तेथें मोठी गर्दी झाली असतां तुझ्या सैन्यामध्यें कित्येक वीर हातांतून दीपटाकून पळूं लागले. अ. वि. या अ. आ.

१७२. अध्याय एकशेंब्याहत्तरः- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, असें युद्ध होत असतां कर्णानें धृष्टद्युम्नावर दहा बाण टाकिले, धृष्टद्युम्नानें कर्णावर दहा बाण टाकून उभा रहा उभा रहा असें भाषण केलें तेव्हां कर्णानें धृष्टद्युम्नाचे चारी अश्व व सारथि यांस वेध करून तीक्ष्ण बाणानीं धनुष्य तोडलें आणि भल्लबाणानें सारथ्यास रथाखालीं पाडला, नंतर धृष्टद्युम्नानें हातामध्यें परिघ घेऊन कर्णाच्या रथाचें चूर्ण केलें, पुनः कर्णानें त्यास बहुत बाणानीं वेध केला असतां तो सहदेवाच्या रथांत जाऊन बसला. धृष्टद्युम्नास कर्णानें पराङ्मुख केलें हें पाहून सोमकांसहवर्तमान् पांचाल हातामध्यें शस्त्रास्त्रें घेऊन कर्णाच्या वधा करितां अग्रभागीं आले इतक्यांत कर्णाच्या सारथ्यानें शंखवर्ण सैंधव अश्व रथास जोडल्या नंतर कर्णानें पांचालावर बाणवृष्टि केली तेव्हां पांचाल व सोमक यांची सेना पळाली. जागोजाग कोणीं घोड्यावरून, कोणी हत्तीवरून, कोणी रथावरून वीर पडून मरण पावले त्या काळीं धर्मराज अर्जुना जवळ येऊन बोलले हे अर्जुना, पहा पहा! हा कर्ण हातामध्यें धनुष्य घेऊन प्रळयकाळीच्या सूर्या साररवा मध्यरात्रीं आमच्या सर्व सैन्यास संतप्त करतो याज करितां आतां कर्णाच्या वधाचा जो उपाय असेल तो लौकर योजावा असें धर्मराजानीं भाषण केलें असतां अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, धर्मराज आज कर्णाच्या पराक्रमानें भय पावला तूं तर कोणच्या हेतूनें कर्णापुढें मला नेत नाहींस हें मला कळत नाहीं आपण पहात असतां हा कर्ण वारंवार सेनेस त्रास देऊन निर्भयपणें संचार करितो यास्तव तूं आतां मला कर्णापुढें ने ह्मणजे आतांच त्यास मारीन. असें ऐकून श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, कर्णास संग्रामामध्यें मी महान् पराक्रमी जाणतों त्या पुढें तुझ्या वांचून किंवा घटोत्कचा वांचून दुसरा कोणीं जा

ण्यास समर्थ नाहीं जों पर्यंत कर्णाजवळ वासवी शक्ति आहे तों पर्यंत तु-
झा पुढें जाण्याचा समय नाहीं तुझ्या करितां ती शक्ति त्याणें ठेविली आहे या-
जकरितां घटोत्कचानें कर्णा बरोबर युद्ध करावें ह्मणजे तो कर्णास जिंकील
असें वाटतें. असें कृष्णानीं अर्जुनाशीं भाषण करून घटोत्कचास हांक मारि-
ली त्या काळीं घटोत्कच शस्त्रास्त्रानीं सिद्ध असतां पुढें येऊन त्यांस नम-
स्कार करून बोलला हे महाराज, काय आज्ञा आहे. असें ऐकून श्रीकृ-
ष्ण ह्मणतात हे घटोत्कचा, आतां तुझा पराक्रम करण्याचा समय आला
आहे हे पांडव आतां बुडतात यांस नौकेसारखा होऊन तार. पहा आतांही
पांडवांची सेना कर्णानें पीडित केली असतां पलायन करते तेव्हां याचा ना-
शकर्ता तुझ्या वांचून दुसरा कोणी नाहीं यास्तव तूं आतां पितरा करितां यो-
ग्य कर्म करावेंस, तुझें अस्त्र, बल व दिव्यमाया ही दुस्तर आहे त्यांत राक्ष-
साचा रात्रीच्याठायीं पराक्रम अधिक यास्तव मायेनें अर्धरात्रीचे ठायीं क-
र्णाचा तूं वध कर, पांडव द्रोणाचा वध करतील. असें कृष्णानीं भाषण केलें
असतां अर्जुन बोलतो हे घटोत्कचा, एक तूं, सात्यकि व तिसरा भीमसेन
मला मान्य आहांत, आतां तूं सात्यकीस साह्य घेऊन कर्णाचा वध कर. अ-
सें अर्जुनाचें वाक्य ऐकून घटोत्कच बोलतो हे अर्जुना, मी कर्णास मारण्या-
स समर्थ आहें तुह्मी ही द्रोणास मारण्यास समर्थ आहांत मी आज कर्णा-
स मारून अन्यही क्षत्रियांस मारीन आज रात्रीच्याठायीं कर्णाशीं असा
संग्राम करतों कीं, जों पर्यंत भूमि आहे तों पर्यंत सर्व लोक माझें गायन क-
रतील असें भाषण करून घटोत्कच कर्णाकडे गेला. अ. वि. या अ. आ.

१७४. अध्याय एकशें चवऱ्याहत्तर — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा,
घटोत्कच कर्णास मारण्यास आलेला पाहून दुर्योध बोलतो हे दुःशासना,
हा राक्षस कर्णावर येत आहे याजकरितां सैन्यासहवर्तमान जथें कर्ण यु-
द्ध करीत आहे तेथें जाऊन त्यापासून त्याचें तूं संरक्षण कर. असें बोलत
आहे इतक्यांत जटासुराचा पुत्र अलंबुष दुर्योधना जवळ येऊन बोलला
हे राजा, मी तुझे शत्रू जे पांडव यांस मारण्याची इच्छा करतों तूं आज्ञा
दिली असतां त्यांच्या सर्व साह्या सहवर्तमान त्यांस मारीन असें ऐकून दुर्यो-

धन बोलला हे अलंबुषा, मी, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा, यांसहवर्तमान् पांडवांस मारीन तूं आतां जाऊन संग्रामामध्यें घटोत्कचास मार. असें ऐकून अलंबुषानें बरें आहे असें बोलून घटोत्कचावर शस्त्रास्त्र दृष्टि केली त्याकाळीं अलंबुष, कर्ण व कौरवांचें सैन्य यासर्वांचें घटोत्कचानें निवारण केलें नंतर अलंबुषानें घटोत्कचाचें मायाबल पाहून नानाचिन्हांच्या हजारों बाणानीं घटोत्कचास वेध करून पांडवांच्या सेनेस बाणदृष्टीनें पळविलें, तशीच घटोत्कचाच्या बाणांनीं कौरवांची सेना हातांतील हजारों मशाली टाकून पळाली हें पाहून अलंबुषानें दहाबाणांनीं घटोत्कचास ताडण केलें नंतर घटोत्कचानें अलंबुषाच्या आयुधांसहवर्तमान् रथाचे तिळाप्रमाणें तुकडे करून टाकिले आणि बाणसमुदायानें कर्ण व दुसरे कौरवांचे वीर पीडित केले तेव्हां अलंबुषानें घटोत्कचास मुष्टिप्रहार केला त्यामुष्टिप्रहारानें घटोत्कच कंपित झाला नंतर घटोत्कचानें वज्रासारखा जो आपला बाहु त्याणें अलंबुषास प्रहार करून कांहीं कालानीं त्यास दोन्हीं बाहूनीं धरून पिळिलें त्याकाळीं अलंबुष घटोत्कचाच्या हातांतून सुटून पुनः वेगानें त्याजवर धांवला. त्याकाळीं घटोत्कचानें दक्षिणबाहु उचलून त्याच्या उरावर ताडण केलें असतां उभयतांचें महान् भयंकर युद्ध होऊं लागलें. दोघेही महान्पराक्रमी क्षणमात्रांत अग्नि मेघ क्षणांत गरुड तक्षक अशीं नानाप्रकारचीं स्वरूपें परस्पर वधाच्या इच्छेनें धरून युद्ध करूं लागले असें मायिक स्वरूपाचें युद्ध झाल्या नंतर गदा, प्रास, परिघ, मुद्गल यांची परस्पर दृष्टि करीत असतां अलंबुषाच्या वधाच्या इच्छेनें घटोत्कच श्येनपक्ष्या सारखा आकाशांत, उडून अलंबुषावर पडला आणि त्यानें त्यास हातांत धरून भूमीचाठायीं आपटिलें नंतर खड्गानें अलंबुषाच्या मस्तकाचा छेद करून तें मस्तक दुर्योधनाच्या रथाजवळ आणून भाषण केलें हे दुर्योधना, हा तुझा राक्षस मारिला आतां कर्णाची अशीच दशा करतों या राक्षसास मारून तुझे दर्शनास आलों रिक्ताम्याहस्तानें राजदर्शन घेऊं नये याज करितां हें शिर तुला अर्पण केलें असें बोलून घटोत्कच तीक्ष्णबाणांची दृष्टि करीत कर्णावर गेला. अ. वि. या अ. आ.

१७५. अध्याय एकशें पंचाहत्तर:- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, कर्ण व घटोत्कच याणीं मध्यरात्रीं युद्ध कसें केलें? व राक्षसाचें रूप, रथ, अश्व, ध्वज, कवच, कोणत्या प्रकारचें होतें? तें मला सांग. असे प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा: आरक्तनेत्र, आरक्त मुख, मोठें उदर, ऊर्ध्व रोमांच, शंकूसारखे कर्ण. जाडभिवया, काजळाप्रमाणें शरीर, रक्तवर्णाची ग्रीवा, महान् बाहू, मस्तक सर्व भूषणानीं युक्त, कांस्यमय कवच ज्याचें, चारशें हात उंच रथ ज्याचा, आठ चक्रानीं युक्त. शंभर अश्व महान् वेगवान् ज्यास जोडलेले, केतु ज्याचा आकाशापर्यंत लांब, धनुष्य ज्याचें बाराहात लांब, अक्षासारखे बाण ज्याचे, सारथि विरूपाक्ष राक्षस त्यासहवर्तमान् रथावर बसलेला घटोत्कच रात्रीचाठायीं कर्णावर धांवला तेव्हां कर्णानें त्याचें निवारण केलें त्या काळीं उभयतांचा संग्राम इंद्रशंबराप्रमाणें होत असतां दोघानीं हातांत धनुष्यें घेऊन बाणानीं एकमेकांचीं कवचें विदारण केलीं, कर्णानें दिव्य अस्त्राचा प्रयोग केला असतां घटोत्कचानें महा माया उत्पन्न केली त्या मायेनें शूल, मुद्गल, धारण करणारी अशी राक्षसांची सेना उत्पन्न होऊन हा प्रळयकाळींचा यमच काय? असे सर्व राजे मानूं लागले. नंतर राक्षस एकाएकीं चोहींकडून बाण दृष्टि करूं लागले, तशींच चक्र, भुशुंडि, शक्ति, तोमर, प्रास, इत्यादि आयुधांची दृष्टि होऊं लागली तें घटोत्कचाचें युद्ध पाहून तुझे पुत्र व योद्धे पळूं लागले, त्यामध्यें कर्णमात्र न भितां त्यानें घटोत्कचानें केलेली माया इचें निवारण केलें, असें दोघांचें युद्ध होत असतां घटोत्कचानें हजार पाकळ्यांचें चक्र कर्णाचा वध करावा या इच्छेनें त्याजवर टाकिलें तेव्हां कर्णानें बाणें करून कुंठित केलें असतां तें व्यर्थ होऊन भूमीवर पडलें त्याकाळीं घटोत्कचास परम रोष उत्पन्न होऊन त्याणें कर्णास बाणेंकरून आच्छादन केलें, कर्णानें ही घटोत्कचास तीक्ष्णं बाणानीं आच्छादन केलें, असें उभयतांचें युद्ध होत असतां पुनः घटोत्कचानें कर्णावर गदा फेंकली ती गदा त्यानें मध्यभागींच तोडून भूमीवर पाडली हें पाहून घटोत्कचानें आकाशामध्यें उडून दृक्षांची दृष्टि केली. कर्णानें घटोत्कचास आकाशामध्यें बाणानीं ताडण करून अश्वांस मारिलें आणि रथाचे तुकडे करून पुनः घटोत्कचास बाणदृष्टीनें व्याप्त करून टाकि-

लें त्याकाळीं घटोत्कच आपल्या अस्त्रानीं त्या दिव्य अस्त्राचें निवारण करून पुनः कर्णाशीं मायिक युद्ध करूं लागला कोणास न कळतां आकाशांतून अकस्मात हजारों बाण जालें पडली. कर्णानें युद्ध करतां करतां पुनः घटोत्कचास बाणानीं छिन्न भिन्न केला असतां तो आकाशांतून गतप्राणासारखा खालीं पडला हें पाहून दुर्योधनानें सिंहासारखी गर्जना केली, कांहीं कालानें घटोत्कच सावध होऊन क्षणांत शंभर मुखाचा, क्षणांत शंभर उदराचा, क्षणांत मैनाक पर्वतासारखा, क्षणांत अंगुष्ठमात्र अशीं मायेचीं नानास्वरूपें धारण करून पुनः दुसऱ्या रथांत बसला आणि पृथ्वी कंपायमान करीत कर्णास बोलला हे सूतपुत्रा, उभा रहा माझ्या पासून जिवंत कोठें जातोस? आज तुझी जयाची इच्छा पूर्ण करतो असें भाषण करून आकाशामध्यें गेला आणि रथाच्या अक्षा सारख्या स्थूल बाणांची कर्णावर वृष्टि करूं लागला तेव्हां कर्णानें त्या बाण वृष्टीचें निवारण केलें. असें उभयतांचें पराकाष्ठेचें युद्ध होत असतां घटोत्कचानें हास्य करून पुनः माया उत्पन्न केली. त्या मायेपासून हजारों राक्षस कोणी अश्वावर कोणी गजावर कोणी रथस्थ आले तेव्हां कर्णानें त्यांशीं युद्ध केलें. नंतर घटोत्कचानें कर्णास पांच बाणानीं वेध करून पुनः अंजलिक बाणानीं कर्णाचें धनुष्य तोडलें. त्याकाळीं कर्णानें दुसरें धनुष्य घेऊन अस्त्र वृष्टीनें राक्षसाच्या सेनेचा नाश केला. नंतर घटोत्कचास क्रोध आला तेव्हां त्याच्या नेत्रांतून अग्नीच्या ज्वाला उत्पन्न झाल्या आणि दात ओठ खात मायेच्या रथांत बसून त्यानें सारथ्यास कर्णाच्या अग्रभागीं रथ नेण्यास आज्ञा दिली, तेव्हां सारथ्यानें कर्णापुढें रथ आणिला असतां देवानीं जी निर्माण केलेली महान् घोर सात योजनें उंच एकयोजन विस्तीर्ण अशी अशनिशक्ति घटोत्कचानें कर्णावर फेकली त्याकाळीं कर्णानें आपलें धनुष्य रथावर ठेवून उडी मारली आणि ती शक्ति आपण धरून पुनः घटोत्कचाच्या रथावर फेकली तेणेंकरून अश्व रथ सारथि यांचें भस्म होऊन ती शक्ति पृथ्वींत गेली त्यावेळेस आकाशांतून देव, गंधर्व आश्चर्य पावून कर्णाची स्तुति करूं लागले असें कर्णानें विलक्षण कर्म करून पुनः घटोत्कचास बाण वृष्टीनें आच्छा

दिन केलें पुनः घटोत्कचानें अंतर्धान पावून कर्णाच्या बाणवृष्टीचें निवारण के-
लें आणि तो पुनः सिंहव्याघ्रादि नानाप्रकारच्या माया धारण करून कर्णास
भय दाखवीत त्याच्या पुढें आला तेव्हां त्या सिंहव्याघ्रांचाही कर्णानें नाश के-
ला असतां पुनः घटोत्कच अंतर्धान पावला आणि राक्षस पिशाचादि अने-
क प्रकारचीं स्वरूपें घेऊन कर्णास भक्षण करण्या करितां आला त्याकाळीं
कर्णानें दिव्य अस्त्रें करून राक्षसी मायेचा नाश केला आणि घटोत्कचा
चे अश्व मारून पृथ्वीवर पाडले पुनः घटोत्कच बोलला हे कर्णा, मी तुला
आतांच मारतों असें बोलून अंतर्धान पावला. अ. वि. या अ. आ.

१७६. अध्याय एकशेंशाहत्तरावा - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्ररा-
जा, कर्ण व घटोत्कच यांचें युद्ध होत असतां अलायुधराक्षस नानाप्रका-
रचें रूप धारण करून राक्षस सैन्यासहवर्तमान् दुर्योधना जवळ येऊन
बोलला हे राजा, भीमसेनानें हेडंब, किर्मिर इत्यादिराक्षस मारिले आ-
णि हेडिंबा माझी कन्या इचा परामृष केला तसेंच अन्यही बहुत राक्षस
मारिले याजकरितां मी आपल्या सैन्यासहवर्तमान् भीम व घटोत्कच
यांस मारण्यास आलों आहें तस्मात् मला युद्ध करण्यास आज्ञा द्यावी
असें ऐकून बंधुसहवर्तमान् दुर्योधन बोलला हे अलायुधा, तुझ्या रा-
क्षसी सैन्यासहवर्तमान् आह्मी तुला पुढें करून शत्रूशीं युद्ध करतों तूं
त्यांस मारावेंस. असें ऐकून अलायुध सैन्यासहवर्तमान् घटोत्कचाच्या
रथा सारख्या रथांत बसून घटोत्कचावर धांवला त्या काळीं सर्व कौरवां-
चे योद्धे आनंद पावून पांडवांशीं युद्ध करूं लागले. अ. वि. या अ. आ.

१७७. अध्याय एकशें सत्याहत्तर - संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा,
तुझ्या पुत्रांस व योद्ध्यांस अलायुधराक्षसास पाहून आनंद झाला. इक
डे कर्ण व घटोत्कच यांचें अपरात्रीं युद्ध होत असतां द्रोण, अश्वत्थामा, कृ-
पाचार्य प्रभृति घटोत्कचाचा आवेश पाहून आज बरी अवस्था नाहीं अ-
सें समजून कर्णाच्या जीविताविषयीं निराश झाले तेव्हां दुर्योधन बोलला हे
अलायुधा, हा कर्ण घटोत्कचाशीं संगत झाला आहे त्या घटोत्कचानें कर्णा-
पेक्षां अधिक पराक्रम करून अनेक राजे मारिले यास्तव तूं आतां पुढें जा-

ऊन त्याचें निवारण कर असें ऐकतांच अलायुधराक्षस घटोत्कचावर धांवला घटोत्कचही कर्णास सोडून अलायुधावर धांवला असतां उभयतांचें युद्ध प्रवृत्त झालें. इकडे घटोत्कचानें कर्णास सोडिलें असतां कर्ण भीमसेनावर धांवला तेव्हां भीमसेनानें त्याचा अनादर करून अलायुधाच्या अग्रभागीं येऊन बाणवृष्टीनें सर्व राक्षसांसहवर्तमान् त्यास आच्छादन केलें तशीच अलायुधानेंही बाणवृष्टि केली. नंतर त्या सर्व राक्षसानीं शस्त्रास्त्रें घेऊन भीमसेनावर बाण वृष्टि केली तेव्हां भीमसेनानें पांच बाणेंकरून त्या राक्षसांस वेध केला असतां ते राक्षस भयंकर नाद करून दाही दिशेस पळाले हें पाहून अलायुधानें भीमावर बाण वृष्टि केली. नंतर भीमसेनानें वज्रा सारखी गदा अलायुधावर टाकिली असतां अलायुधानें आपल्या गदेंकरून त्या गदेचें निवारण केलें असें उभयतांचें युद्ध होत असतां अलायुधाच्या आज्ञेनें कित्येक राक्षसानीं पांचाल व सृंजय यांस पीडित केलें. हें पाहून श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, पहा हा भीमसेन राक्षसेंद्राच्या हस्तगत झाला आतां उपेक्षा करूं नको. धृष्टद्युम्न, शिखंडि, उत्तमौजा, द्रौपदीचे पांच पुत्र हे सर्व कर्णावर जावोत. नकुळ, सहदेव, सात्यकि हे इतर राक्षसांस मारोत. तुह्मीं द्रोणासहवर्तमान् युद्धकरून हें महाभय प्राप्त झालें याचें तूं निवारण कर. असें श्रीकृष्णानें सांगितलें असतां अर्जुनाच्या आज्ञेवरून ते महारथी त्या त्या ठिकाणीं गेले. इकडे अलायुधराक्षसानें भीमसेनाचें धनुष्य तोडून सारथि व चारी अश्व मारिले त्याकाळीं भीमसेनानें रथाखालीं उतरून महान् गदा अलायुधावर टाकिली ती गदा आपल्या गदेनें तोडून अलायुधानें महान् गर्जना केली. असें उभयतांचें युद्ध होत असतां परस्पर एकमेक मुष्टिप्रहार करूं लागले. नंतर रथाचीं चक्रें व अक्ष जें हातास येईल त्याणें प्रहार करूं लागले. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१७८. अध्याय एकशें अठ्याहत्तर – संजय ह्मणतो, हे धृतराष्ट्रा, अलायुधराक्षसानें भीमसेनास फार जर्जर केलें हें पाहून श्रीकृष्ण ह्मणतात हे घटोत्कचा, तूं व सर्व सैनिक पहात असतां अलायुधानें

भीमसेनास परम ग्रस्त केलें याजकरितां तूं आतां कर्णास सोडून अलायुधाशीं युद्ध कर आणि त्यास यमलोकीं पाठीव. असें ऐकून घटोत्कच अलायुधाशीं युद्ध करण्यास प्रवृत्त झाला असतां रात्रीचाठायीं उभयतांचें भयंकर युद्ध झालें. अलायुधाचे राक्षस मोठ्यावेगानें येतात हें पाहून नकुळसहदेव याणीं त्यांस बाणानीं आच्छादन केलें व अन्यवीरांचें अर्जुनानें निवारण केलें. कर्णानें धृष्टद्युम्न शिखंडि आदिकरून पाचालांचे वीर पीडित केलें हें पाहून भीमसेन कर्णावर धांवला. नंतर नकुळ, सहदेव, सात्यकि, राक्षसांस मारून कर्णाशीं युद्ध करूं लागले. अलायुधानें घटोत्कचाच्या मस्तकावर गदेचा प्रहार केला त्या गदेच्या प्रहारानें घटोत्कच किंचित् कंपित होऊन शंभर घंटानीं युक्त अग्निसार खी प्रज्वलित अशी गदा अलायुधावर त्यानें टाकिली त्यायोगें अलायुधाचे अश्व, सारथि व रथ यांचें चूर्ण झालें. नंतर अलायुधानें आकाशांत जाऊन रक्ताची वृष्टि केली तेव्हां घटोत्कचानें आपल्या मायेंकरून अलायुधाच्या मायेचें निवारण केलें. असें दोघांचें युद्ध वालि आणि सुग्रीव यांसारखें होत असतां घटोत्कचानें अलायुधास उचलून गरगर फिरवून पृथ्वीवर आपटिला आणि त्याचें शिर तोडून मोठ्यानें गर्जना केली. नंतर अलायुधाचें मस्तक घटोत्कचानें दुर्योधनापुढें टाकिलें असतां दुर्योधन सर्व सैन्या सहवर्तमान् खिन्न झाला. अलायुधानें आपलें पूर्वीचें वैर स्मरून भीमास मारीन अशी प्रतिज्ञा केली त्यावेळेस दुर्योधनास असें वाटलें कीं, याणें भीमास मारलें म्हणजे आपण चिरकाल राज्य करूं; परंतु त्यास भीमपुत्रानेंच मारल्यामुळें भीमसेन आपली प्रतिज्ञा सत्य करील असें दुर्योधनानें मानिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१७९ अध्याय एकशें एकुणऐंशी:- संजय सांगतो हे राजा, घटोत्कचानें अलायुधास मारून हर्षानें महान् गर्जना केली तो त्याचा गजांस कंपायमान् करणारा शब्द ऐकून कौरवांचे वीर भयाभीत झाले. अलायुधास मारलेला पहातांच कर्णानें पांचालांवर धांवून धृष्टद्युम्न व शिखंडि यांस दहा बाणानीं ताडण करून युधामन्यु, उत्तमौजा, सात्यकि यांस ता-

डित केलें आणि शत्रुसैन्यावर वज्रासारख्या बाणांची दृष्टि केली ते-व्हां कित्येक योद्धे छिन्न भिन्न होऊन पळाले. हें पाहून घटोत्कचानें व-ज्रा सारख्या बाणानीं कर्णास ताडण केलें त्या काळीं उभयतांचें युद्ध स मान झालें. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, या युद्धांत घटोत्कचापुढें कर्णाचा विशेष पराक्रम न चालल्यामुळें कर्णानें परम भयंकर अस्त्र प्रगट केलें असतां त्या अस्त्रानें घटोत्कचाचा अश्व सारथि यांसहवर्तमान् रथ नष्ट झा-ला तेसमयीं घटोत्कच विरथी झाल्यामुळें गुप्त झाला. धृतराष्ट्र भाषण कर-तो हे संजया, कपटी योद्धा घटोत्कच गुप्त झाला असतां माझ्या वीरानीं का-य केलें ? तें मला सांग. संजय सांगतो हे राजा, घटोत्कच अंतर्धान पावले-ला पाहून कौरव असा आक्रोश करूं लागले कीं, कपटयुद्धी राक्षसानें क-र्णाचा कसा पराभव केला नाहीं ? नंतर घटोत्कचानें मायेंकरून अग्नीच्या ज्वाळे सारखी शक्ति कर्णावर टाकिली तेणेंकरून हजारों विद्युल्लता उत्प-न्न होऊन त्या सैन्यास त्रास देऊं लागल्या आणि हजारों दुंदुभींचे नाद हो-ऊन बाण, शक्ति, ऋष्टि, प्रास, मुसळ, खड्ग, तोमर इत्यादि आयुधांची व पाषाणांची दृष्टि झाली त्याकाळीं कर्ण त्या बाणदृष्टीचें निवारण करण्यास असमर्थ झाला. कित्येक बाणानीं ताडित झाले, वज्रानें ताडित झालेले गज व पाषाणानें ताडित झालेले महारथी पृथ्वीवर पडून महाभयंकरश-ब्द करूं लागले. कित्येक योद्धे असा शब्द करूं लागले कीं हे कौरवहो, आतां अवस्था नीट नाहीं सर्वांनीं पळावें पांडवांकरितां इंद्रादिदेव आपल्यालाभा-रतात यांत संशय नाहीं. असा तो भग्नसैन्यामध्यें शब्द झालेला ऐकून कर्णा-नें घटोत्कचावर बाण दृष्टि केली ती कर्णाची बाणदृष्टि घटोत्कचानें निवा रण करून कर्णाचे चारी अश्व मारिले आणि दाही दिशा व्याप्त केल्या त्या-काळीं कर्ण हताश्व झाला असतां रथाखालीं उतरून कौरव पळतात हें पाहून मनांत विचार करीत स्वस्थ उभा राहिला तेव्हां सर्व कौरवां कडील योद्धे घोर महान् भयंकर राक्षसाची माया पाहून कर्णास बोलले हे क-र्णा, हे धृतराष्ट्रपुत्र मरण पावतात याजकरितां तूं आतां शक्तीनें घटो-त्कचाचा वध करावास. भीमार्जुन तर एकीकडेच राहिले; परंतु त्या रा-

त्रीं हा राक्षस आपल्यास मारतो नस्यात् याचा वध करावा. आज जर या राक्षसाच्या हातून आह्मीं मुक्त झालों तर उद्या पांडवांशीं युद्ध करूं याज करितां इंद्रानें दिलेली वासवी शक्ति इणें घटोत्कचाचा वध करावा ह्मणजे सर्व कौरव वांचतील. असें ऐकतांच बहुनकाल पर्यंत अर्जुनाच्या वधा करितां ठेवलेली जी शक्ति ती कर्णानें घटोत्कचावर टाकिली असतां ती घटोत्कचाचें त्हदय भेदून रात्रीचाठायीं आकाशमार्गें नक्षत्रमंडळामध्यें गेली. नंतर इंद्रशक्तीनें घटोत्कच मरण पावला असतां तो प्राणत्याग करतेसमयीं महापर्वता प्रमाणें रूप धारण करून पांडवांचें प्रिय करण्या करितां आकाशांतून शत्रुसैन्यांत पडला आणि त्यानें एक अक्षौहिणी सेना मारली घटोत्कच मरण पावला असतां कौरव सैन्यांत नानाप्रकारच्या वाद्यांचा गजर होऊं लागला नंतर कर्ण दुर्योधनाच्या रथांत बसून आनंदानें सैन्यांत गेला. अ· वि· या अ· आ·

१८०. अध्याय एकशें ऐंशि — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, घटोत्कच मेलेला पहातांच सर्व पांडव नेत्रांतून अश्रुधारा टाकूं लागले. श्रीकृष्णानें घटोत्कच मेलेला पहातांच मोठ्या आनंदानें सिंहनाद करून अश्वाचा लगाम सोडला आणि हर्षानें नृत्य करीत अर्जुनास आलिंगन दिलें त्या काळीं अर्जुन ह्मणतो हे कृष्णा, हा तुला दुःखस्थानीं हर्ष जाहला हें आश्चर्य वाटतें! हा घटोत्कच मेल्यानें आह्मां सर्वांसि दुःख झालें आणि आमचें सर्व सैन्य माघारें फिरलें तूं तर पराकाष्ठेचा हर्षित होऊन नृत्य करतोस तेव्हां याचें कारण काय? तें मला सांग. असें ऐकून श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, कर्णानें शक्ति घटोत्कचावर टाकिली आणि तो शक्तिहीन झाला तेणें करून आजच कर्ण मेला असें मी मानितों जों पर्यंत ही शक्ति कर्णाजवळ होती तों पर्यंत त्याच्या अग्रभागीं जाण्यास या लोकीं कोण समर्थ होता? दैवयोगानें याचीं कवचकुंडलें गेलीं व घटोत्कचावर शक्ति ही व्यर्थ गेली आतां कांहीं चिंता नाहीं जर हा कवच कुंडलां सहवर्तमान असता तर देवांसहवर्तमान् एकटा तीन्ही लोकांस जिंकिता तुझ्या करितां इंद्रानें त्याच्या कवच कुंडलांचें हरण केलें तेणें करून हा

वैकर्तन नाम पावला. ज्या दिवसापासून इंद्रानें कर्णासि शक्ति देऊन कुंड-लें घेतलीं त्या दिवसापासून कर्ण असें मानित होता कीं, मी ज्याच्या पुढें जा-ईन त्याचा वध करीन. हे अर्जुना, जरी हा आतां शक्तिहीन झाला आहे तथा-पि तुझ्यावांचून यास मारण्यास कोणी समर्थ नाहींत याचा वध तूंच कर. क-वच कुंडलें व शक्ति यानीं हीन झाल्यामुळें आज हा मनुष्यासारखा दिसूं लागला. हे पार्था, तुझें प्रिय होण्याकरितां जरासंध, शिशुपाल, एकलव्य, हे मी एक एक कारणानें मारिले. तसेंच हिडिंब, किर्मिर, बक, अलायुध, घ-टोत्कच हेही मारिले. अ. वि. या अ. आ.

१८१. अध्याय एकशें एक्यांशी: - अर्जुन भाषण करतो हे जना-र्दना, आमच्या हिताकरितां तूं जरासंध प्रभृति राजे कां मारिलेस याचें कारण काय? तें मला सांग. असें ऐकून श्रीकृष्ण भाषण करितात हे अ-र्जुना, जरासंध, शिशुपाल, एकलव्य, हे जर पूर्वी मारिले नसते तर या-काळीं ते पराकाष्ठेने प्रबळ झाले असते. कर्ण, जरासंध, शिशुपाल, एक-लव्य यांस दुर्योधन अवश्य वरिता आणि ते निरंतर आमचा द्वेष करणारे होते त्यानीं कौरवांचा आश्रय करून आम्हांस पराकाष्ठेचा त्रास दिला अ-सता, कोणे एके कालीं जरासंधानें आमच्या वधाकरितां एक गदा आमच्या वर टाकिली ती गदा आकाशा दुभांग करीत येतांना बळिरामानें पाहून ति-च्या निवारणार्थ स्थूणाकर्ण अस्त्र सोडिलें त्या अस्त्रानें ती गदा पृथ्वीस व पर्वतास कंपित करीत भूमीवर पडली असा पराक्रमी जो जरासंध हा उत्पन्न कालीं दोन मातांपासून पृथक् पृथक् अर्ध देहानें उत्पन्न झाला त्या-स जरानामक राक्षसीनें संधित केला ह्मणून जरासंध नाम पावला. तीरा-क्षसीही त्याच स्थूणाकर्ण अस्त्रें करून मरण पावली. तो गदेनें हीन झा-ला ह्मणून भीमसेनानें त्यास मारला. जर जरासंध गदापाणी असता तर त्यास मारण्यास इंद्रादि देवही समर्थ न होते तसेंच तुझ्या हिताकरितां ए-कलव्य यास अंगुष्ठहीन केलें त्यानें कृत्रिमानें वनांत मृत्तिकेचा द्रोण करू-न विद्याभ्यास केला तेव्हां तो परशुरामासारखा पराक्रमी झाला हें द्रोणा-चार्यांस कळतांच त्याणीं दक्षिणे करितां अंगुष्ठ मागून घेतला तो जर सांगुष्ठ

असता तर देव, दानव, राक्षस, उरग यास जिंकण्यास समर्थ न होते मग मनुष्यांची कथा काय? जो दृढमुष्टि व युद्धकुशल असा चेदिपति रात्रंदिवस युद्ध करणारा, देवदैत्यांस संग्रामांत जिंकण्यास अशक्य यास तुझ्या हिता करितां तुझ्या समक्ष संग्रामामध्यें मी मारला. हे अर्जुना, जेजे दैत्य अंशेंकरून देवशत्रु उत्पन्न झाले त्यांच्या वधार्थ आणि तुझ्या साह्यार्थ मी अवतार धारण केला. रावणासारखे पराक्रमी, ब्रम्हकर्माची निंदा करणारे हे डंब, बक, किर्मिर हे भीमापासून मारविले, तसाच मायावी घटोत्कच ही उपायेंकरून कर्णाच्या शक्तीपासून मारविला जर हा कर्णाच्या शक्तीनें न मरता तर मला मारावा लागता हा तुमच्या प्रीतीस्तव मी पूर्वी मारला नाहीं; परंतु हा ब्राह्मणाचा व यज्ञाचा द्वेष करणारा, धर्मलोपी राक्षस मरण पावला आणि इंद्राचीही शक्ति व्यर्थ घालविली, जे जे धर्मरोधन करणारे ते ते मला मारणें प्राप्त, धर्मस्थापनेची प्रतिज्ञा मी पूर्वी केली याजकरितां हें मला करणें अवश्य आहे, ज्या ठिकाणीं धर्म, सत्य, वेद, शम, ह्री, धृति, क्षमा हीं रहातात तेथें मी निरंतर वास करतों. या विषयीं तूं विषाद करूं नको हा विषाद दूर होण्याकरितां मी तुला उपदेश करीन. भीम संग्रामामध्यें दुर्योधनास मारील त्याच्याही वधाचा उपाय तुला सांगेन; परंतु ही आतां सेना दाही दिशेंस पळते व द्रोणाचार्य तुझ्या सेनेचा नाश करतो याचें निवारण कर. असा विषय या अध्यायांत आहे.

१८२. अध्याय एकशें ब्यांशि- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, अशी महान् भयंकर शक्ति कर्णाजवळ असतां त्यानें ती अर्जुनावर कां टाकिली नाहीं एक अर्जुन मेला असता तर सर्व सृंजय व पांडव मरण पावते अर्जुनाची प्रतिज्ञा अशी होती कीं, कोणी युद्धास बोलाविलें असतांनाहीं ह्मणावयाचें नाहीं अशी त्याची प्रतिज्ञा असतां कर्णानें त्यास द्वैरथ युद्धास बोलावून कां मारिला नाहीं? हे संजया, मला असें वाटतें कीं, माझे पुत्र बुद्धीनें हीन व असहाय आणि शत्रूनें त्यांचे सर्व उपाय कुंठित केलें त्यामुळें ते शत्रूस कोठून जिंकितील? कर्णाच्या भरवशाची शक्ति आज कृष्णानीं घटोत्कचावर व्यर्थ घालविली जसें वराहाचें व श्वानाचें युद्ध झालें अस-

तां चांडालास लाभ होतो तसा कर्णघटोत्कचाच्यायुद्धांत कृष्णास लाभ झाला जर कर्ण घटोत्कचाच्या हातून मरण पावता तर पांडवांस महत् लाभ होता जरी कर्णाच्या शक्तीनें घटोत्कच मरण पावला तरी घटोत्कचाच्या नाशेंक-रून पांडवांस लाभच झाला.महाबुद्धिमान् जो श्रीकृष्ण याणें पांडवांच्या प्रियास्तव कर्णाच्या हातून घटोत्कच मारविला हा चांगला विचार योजिला असो पुढें कसें काय झालें ? तें मला सांग. असें ऐकून संजय ह्मणतो हे राजा, कर्णाचे मनांत ही शक्ति अर्जुनावर टाकावी असें जाणून कृष्णा-नें द्वैरथ युद्धांत घटोत्कचाची योजना केली जर कृष्ण कर्णापासून अ-र्जुनाचें संरक्षण न कर्ता तर कर्णानें अर्जुनास कधींच नष्ट केला असता; परंतु श्रीकृष्णानें अर्जुनाचें संरक्षण केल्यामुळें कर्णाचा कांहींच उपाय चा-लला नाहीं. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, माझा पुत्र दुर्योधन वि-रोधी, कुमंत्री, अभिमानी, याचा अर्जुनाच्या वधाविषयीं जो उपाय होता तो व्यर्थ झाला महाबुद्धिमान् जो कर्ण याणें ती शक्ति कां टाकिली नाहीं? हे संजया.तूं ही त्यावेळेस कर्णास कां सुचविलें नाहींस? असें ऐकून सं-जय बोलतो हे राजा, दुर्योधन, शकुनी, मी व दुःशासन यांचा रात्री रात्री-चाठायीं विचारणा होत होती कीं, कर्णा, तूं उद्या सर्व वीरांस टाकून एक अ-र्जुनास मार तो मेला असतां सर्वांस मारून आपण राज्याचा उपभोग क-रूं अथवा अर्जुन मेला असतां कृष्णानें पांडवांस अन्यठिकाणीं ठेवण्या-चा विचार केला तर कृष्णास ही मार. सर्व पांडवांचें मूळ कृष्ण, पार्थ हा त्याचा स्कंध, पांडव सर्व शाखा व पांचाल सर्व पत्रस्थानीं होत. पांडवांस कृष्णाचा आश्रय याजकरितां पर्ण, शाखा यांस बीं आहे व त्यांचा पाल-न कर्ताही तोच सर्व नक्षत्रांस चंद्र जसा आधारभूत आहे तसा पांडवांचें रक्षण कर्ता कृष्ण. रवाव सोडून पांडवांचें मूळ जो कृष्ण याचा वध कर. ज-र कृष्णाचा वध केला असता तर पर्वत, वन, समुद्र यांसहवर्तमान् संपूर्ण पृथ्वी तुला वश्य होती अशी रात्रीं विचक्षणा केली असतां प्रातःकाळीं कृष्ण जागृ-त झाल्या नंतर कर्णास ती बुद्धि न सुचावी. कृष्णानें अर्जुनास कर्णापुढें क-धीं आणिलेंच नाहीं अन्य वीरांशीं युद्ध करण्या करितां अर्जुनास न्यावें आ-

णि कधीं ही शक्ति व्यर्थ जाईल अशी वाट पहात असावी. कर्णापासून जो अर्जुनाचें संरक्षण करितो तो आपलें संरक्षण करणार नाहीं कीं काय? मी मनांत विचार करून पहातां चक्रधारण करणारा जो श्रीकृष्ण यास त्रैलोक्यांत जिंकणारा कोणी दिसत नाहीं. नंतर ही शक्ति घटोत्कचावर व्यर्थ गेली असतां सात्यकीनें कृष्णास विचारलें कीं हे कृष्णा, त्या शक्तीचा प्रत्यय कर्णास होता तर ती शक्ति कर्णानें अर्जुनावर कां टाकली नाहीं? असें ऐकून कृष्ण ह्मणतात हे सात्यके, दुःशासन, कर्ण, शकुनि, जयद्रथ हे दुर्योधना सहवर्तमान् निरंतर कर्णास सांगत कीं हे कर्णा, ही शक्ति अर्जुना वांचून दुसरे कोणावर तूं टाकूं नको पांडवांस अर्जुन अधीक आहे तो मेला असतां सर्व पांडव आपल्यास वश होतील हे त्यांचें भाषण ऐकून कर्णानें तसें करण्याची प्रतिज्ञा केली आणि अर्जुनाचा वध करावा हें निरंतर त्याचे मनांत होतें; परंतु मी नित्यशः त्यास मोह उत्पन्न करून अर्जुनाच्या वधाविषयीं ती शक्ति टाकण्यास कर्णास विस्मरण करी त्याचे मनांत तर फार होतें; परंतु यामुळें तसें घडलें नाहीं, त्या शक्तीपासून अर्जुनाचा मृत्यु निवारण होणार नाहीं ह्मणून माझे चित्तास हर्ष निद्रा नव्हती, जसा मला अर्जुन प्रिय तसे मातापितर व तुह्मीं बंधुजन कोणी प्रिय नाहीं घटोत्कचावर ती शक्ति व्यर्थ जाऊन आज माझा अर्जुन मृत्यूच्या मुखांतून बाहेर आला ह्मणून येवढा हर्ष झाला. अ. वि. या. प्र. आ.

१८३. अध्याय एकशेंत्र्यांशी:- धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, तुह्मीं प्रारब्धहीन ह्मणून तृणतुल्य जो घटोत्कच याजवर शक्ति टाकली असो झालें तें झालें. आतां घटोत्कच मेला असतां कौरव पांडव यानीं काय केलें? सृंजयाचा संग्राम कसा झाला? भूरिश्रवा व जयद्रथ यांच्या वधानें द्रोणाचार्य आपली देह आशा सोडून पांडवसैन्यांत गेला असतां दुर्योधन, अश्वत्थामा, कृपाचार्य व कर्ण यानीं काय केलें? भीमार्जुन द्रोणावर गेले असतां माझ्या कोणत्या योद्ध्यानीं त्यांचें निवारण केलें? जयद्रथ व घटोत्कच यांच्या वधानें क्रुद्ध झालेले माझे व पांडवांचे योद्धे यानीं रात्रीचा ठायीं कसे कसें युद्ध केलें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो

हे राजा, घटोत्कच मेला असतां तुझे योद्धे युद्धाच्या इच्छेनें पुढें आल्या नंतर धर्मराजास दैन्य प्राप्त होऊन तो भीमास बोलतो हे भीमसेना, तूं दुर्योधनाच्या सैन्याचें निवारण कर. घटोत्कचाच्या वधानें मला मोह प्राप्त होतो असें बोलून मूर्च्छित झाला त्या काळीं श्रीकृष्ण भाषण करतात हे धर्मा, हें तुला योग्य नाहीं दुःखित होऊं नको जसें प्राकृत पुरुषाचे ठायीं दैन्य तसें तूं कां धारण करतोस? ऊठ युद्ध कर तूं अशी अवस्था पावलास तर आपला विजय कसा होईल? असें ऐकून धर्मराज भाषण करतो हे कृष्णा, मला कर्माची गति विदित आहे जो उपकार जाणत नाहीं तो ब्रह्महत्येचें फळ पावतो, आह्मी वनांत असतां आह्मांस घटोत्कचानें बाल्यावस्थेमध्यें फार सात्य केलें, अस्त्र प्राप्तिकरितां अर्जुन गेला हें जाणून घटोत्कच काम्यकवनीं आह्मां जवळ येऊन राहिला, ज्या काळीं आह्मी गंधमादन पर्वतावर गेलों त्या काळीं त्याणें महत् संकटा पासून आह्मांस तारिलें. द्रौपदी चालतांना श्रम पावली ह्मणून पाठीवर घेऊन तो चालले, जी माझी सहदेवावर प्रीति नव्हेच घटोत्कचावर होती माझा परम भक्त आज मरण पावला त्यामुळें मी शोकपीडित होऊन मूर्च्छा पावतों. हे कृष्णा- रात्री चारा थीं भीमाच्या व अर्जुनाच्या बलाचा अनादर करून द्रोण, कर्ण, दुर्योधन, हे घटोत्कचास मारून परम हर्षानें गर्जना करितात तो ऐकून हे कृष्णा, अर्जुन, तूं, मी, भीमसेन व इतर योद्धे जिवंत असतां घटोत्कच कसा मरण पावला? ज्या काळीं द्रोणानीं कर्णासि अभिमन्यु वधाचा उपाय सांगून सर्व कौरवानीं अभिमन्यूस मारिलें त्या काळीं अर्जुन जवळ नव्हता व आह्मांस ही जयद्रथानें अडविलें अशा अल्प कारणा वरून जयद्रथास अर्जुनानें मारिलें हें मला प्रिय नाहीं जर शत्रुवध अर्जुनास कर्तव्य तर आधीं द्रोण, कर्ण यांस मारावें हेंच आमच्या दुःखास मूळ कारण, आतां मला कर्णवध आधीं कर्तव्य असें बोलून तो धनुष्याचा टणत्कार करीत युद्धास धांवला. नंतर सहस्र रथ, तीनशें हत्ती, पांच हजार घोडे, कांहीं पांचाल व मद्रक यांच्या वीरांसह वर्तमान शिखंडि धर्मराजाचे मागें धांवला. धर्मराज सिद्ध होऊन पांचालांसह वर्तमान चालला हें पाहून श्रीकृष्ण ह्मणता-

त हे अर्जुना, हा धर्मराज क्रुद्ध होऊन कर्णास मारण्याच्या इच्छेनें चालला आ-
तां उपेक्षा नसावी. असें बोलून अर्जुनासहवर्तमान कृष्ण धर्माकडे गेले. धर्म-
राज शोकानें पीडित होऊन आवेशानें कर्णास मारण्यास चालला हें पहातांच
एका एकीं श्रीव्यास येऊन धर्मराजास भाषण करितात हे राजा, संग्रामांत
कर्णापुढें आज अर्जुन वांचला हें उत्तम झालें हेरथ युद्धांत दैवेंकरून अर्जु-
न त्यापुढें गेला नाहीं जर गेला असता तर दोघे अस्त्रज्ञ परस्पर अस्त्रवृष्टि
करीत असतां वासवी शक्ति कर्णानें अर्जुनावर टाकिली असती तर तुला
घोर व्यसन प्राप्त होतें; परंतु तें न होतां हा घटोत्कच राक्षस मरण पावला हें चां-
गलें झालें तुझ्या करितांच हा कृष्णानें राक्षस मारविला आणि शक्ति व्यर्थ घा-
लविली आतां शोक करूं नको सर्व प्राणिमात्रांची गति हीच आहे, सर्व रा-
जांसहवर्तमान तूं आतां कौरवांस मारशील आणि आजपासून पांचवे दिव-
शीं संपूर्ण पृथ्वी तुझे स्वाधीन होईल. हे पुरुषव्याघ्रा, धर्मचिंतन कर, तप,
दान, क्षमा, यांचें निरंतर सेवन कर. असें धर्मराजास सांगून व्यास तेथेंच
अंतर्धान पावले. अ. वि. घा अ. आ.

१८४. अध्याय एकशें चौऱ्यांशि :- संजय सांगतो हे राजा, या प्रमा-
णें व्यासांनीं सांगितलें असतां धर्मराज कर्णवधापासून माघारा फिरला.
घटोत्कचाच्या वधानें भीमसेन शोकसंतप्त होऊन दुर्योधनाची सेना म-
र्दन करीत चालला हें पाहून धर्मराज भाषण करितात हे धृष्टद्युम्ना, धनु-
ष्य, कवच, बाण यांसहवर्तमान द्रोणाच्या वधा करितां तूं अग्नीपासून उ-
त्पन्न झालास तुला किमपीही द्रोणाची भीति नाहीं याजकरितां आतां द्रो-
णावर जाऊन त्याचा वध कर. जन्मेजय, शिखंडि, यशोधर हे आनंदानें
चोहींकडून धांवोत, नकुळसहदेव, द्रौपदीचे पांचपुत्र, प्रभद्रक, द्रुपद, वि-
राट, सात्यकि, कैकेयाचे वीर व अर्जुन याणीं द्रोणाशीं युद्ध करावें. अशी ध-
र्मराजाची आज्ञा होतांच ते ते वीर द्रोणाच्या वधाकरितां वेगानें गेले तेव्हां द्रो-
णाचार्यांनीं पुढें येऊन त्यांचें निवारण केलें. नंतर दुर्योधन द्रोणाच्या जीवि-
ताची इच्छा करीत क्रोधानें पांडवांवर धांवला. कौरव पांडव परस्पर गर्जना
करीत करीत निद्रेनें व अंधःकारानें श्रमलेले युद्ध करूं लागले, तीन प्रहर रा-

त्र झाली असतां जी शेष राहिली ती योद्ध्यांस सहस्त्र प्रहरा सारखी दिसूं लागली. रात्रीचा ठायीं परस्पर वधाच्या इच्छेनें कौरव पांडव युद्ध करतां करतां उभयतांचे कित्येक योद्धे गतास्त्र, प्राणहीन, निरुत्साह होऊन उगीच उभे राहिले. कित्येक योद्धे शस्त्रें टाकून निद्रेनें अंध झाले असतां रथावर व अश्वावर शयन करूं लागले. अशी त्या वीरांची अवस्था पाहून अर्जुन गर्जना करून बोलला हे योद्धे हो, तुम्हीं वाहनांसह वर्तमान श्रमी झालांत, निद्रेनें अंध झालांत आणि अंधकारही सैन्यांत फार झाला याजकरितां क्षणभर येथेंच रणभूमीचा ठायीं दोन घटिका निद्रा घ्यावी ह्मणजे सुखानें युद्ध होईल. असें ऐकून पांडवांची सेना विश्रांति पावत असतां कौरवांची सेना विश्रांति पावली. देव, ऋषि, गंधर्व यांणीं अर्जुनाची वाणी ऐकून मोठ्या आनंदानें त्याचें पूजन केलें. एक मुहूर्तमात्रपर्यंत निद्रा घेऊन सर्वही विश्रांत झाले असतां कित्येक अर्जुनाचें पूजन करूं लागले. कित्येक हे अर्जुना, तुझ्या ठिकाणीं वेद, अस्त्र, बुद्धि, पराक्रम, धर्म हे निरंतर असोत, आह्मास विश्रांति देऊन सुख झालें हें तुला असो, तुझ्या मनांत इच्छित जे अर्थ ते तूं शीघ्र पावशील अशी प्रशंसा करीत. पुनः कोणी रथाचे ठायीं, कोणी गजावर, कोणी भूमीवर शयन करूं लागले. या प्रमाणें कौरव पांडव यांची सेना निद्रिस्थ झाली असतां पटाच्या चित्राप्रमाणें रणभूमीवर शोभली. नंतर कांहीं कालानें चंद्र उदय होऊन अंधःकार नाश पावला असतां युद्धास आरंभ झाला. अ. वि. या अ. आ.

१८५. अध्याय एकवों पंच्यांशि - संजय ह्मणतो हे राजा, पुनः युद्धास आरंभ झाल्यानंतर दुर्योधन क्रोधानें आचार्याजवळ येऊन बोलला हे आचार्य, आतां शत्रूची उपेक्षा करूं नये पूर्वी पांडवांचे वीर युद्धानें अगदीं त्रस्त झाले असतां तुह्मीं त्यांस मारिलें नाहीं, आतां तर ते विश्रांति पावून अतिबलाढ्य झाले ते तुह्मांस ऐकतील असें दिसत नाहीं तुह्मांस त्यांचें अवश्य संरक्षण करणें ह्मणून उपेक्षा करून हद्दि केलीत, तुह्मीं शस्त्रास्त्रांमध्यें निपुण असतां तुमच्या पुढें उभे रहाण्यास देव, गंधर्व, राक्षस कोणी समर्थ नाहीं मग पांडवांची कथा काय? असें असतां ते

तुमचे शिष्य म्हणून तुह्मीं त्यांचें संरक्षण केलेंत अथवा मी मंदभाग्य ह्मणून त्यांच्या पुढें तुमचा पराक्रम चालला नाहीं हें मला कळत नाहीं. असें ऐकून आचार्य क्रोधानें ह्मणतात हे राजा, मी वृद्ध तुझ्या कल्याणास्तव परम शक्तीनें युद्ध करीत असतां असें तूं बोलतोस हें योग्य नाहीं. अस्त्रवेत्यानीं अनास्त्रवेत्यांस मारूं नये हें क्षुल्लक कर्म तथापि आतां तुझ्या वचनावरून सर्व पांचालांस मारून कवच काढीन तूं असें समजतोस कीं, अर्जुनाचें सैन्य व अर्जुन वाहनासहवर्तमान श्रमी झाला होता तो आतां विश्रांतिमुळें पुनः बलाढ्य झाला; परंतु अर्जुनाचें वीर्य तुला सांगतों, अर्जुन क्रुद्ध झाला असतां देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, कोणीही त्याजपुढें उभे रहाण्यास समर्थ नाहींत, खांडववनामध्यें इंद्रानें येऊन पर्जन्यवृष्टि करितांच त्यानें इंद्राचें निवारण करून यक्ष, गंधर्व, राक्षस यांस मारिलें, घोषयात्रेमध्यें चित्रसेनादि गंधर्व यानीं तुह्मांस नेलें असतां गंधर्वांस जिंकून तुह्मांस सोडविलें, तसेच देवानीं संग्रामामध्यें अवध्य जे निवातकवच त्यांसही मारिलें असा जो पराक्रमी अर्जुन त्यास मनुष्यानीं कसें जिंकावें. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे आचार्य, तुह्मीं अर्जुनाची प्रशंसा करितां; परंतु मी दुःशासन-कर्ण व शकुनि इतके मिळून अर्जुनास मारितों. असें ऐकून पुनः आचार्य हास्य करून बोलतात हे राजा, अग्नी सारखा जाज्वल्यमान् जो अर्जुन यास कोणी जिंकण्यास समर्थ नाहींत त्यास जिंकण्याचें कर्म इंद्र, कुबेर, यम, वरुण, असुर, उरग, राक्षस यांसही दुर्घट आहे जे मूर्ख आहेत ते अर्जुनास आज युद्धामध्यें आह्मीं जिंकू अशी इच्छा करितात. तूं संशयी, निष्ठुर, पापी तुझ्या कल्याणाची आह्मीं इच्छा करतों आणि आह्मांस तूं असें बोलतोस तस्मात् आतां स्वतांच अर्जुनापुढें युद्धास जावेंस, तूं क्षत्रिय व कुलवान् आहेस, हे सर्व राजे निरापराधी यांस उगीच कां मारवितोस ? तूं या वैराचें मूळ यास्तव तूंच अर्जुनापुढें जावेंस, तुझा मामा जो शकुनि द्यूतद्वारा उत्पन्न करणारा हाही अर्जुनापुढें जावो. हे दुर्योधना, धृतराष्ट्र समक्ष प्रतिसभेस तूं असें भाषण करीत होतास कीं, मी, कर्ण, दुःशासन असे पांडवांस मारूं ती प्रतिज्ञा आज परिपालन कर. हा अर्जु-

न तुझा शत्रु तुझ्या पुढें उभा आहे कांहीं क्षत्रियधर्माकडे पहा, जय झाल्या पेक्षां क्षत्रियांचा संग्रामामध्यें वध झाला असतां श्रेयस्कर आहे आतां भिऊं नको, तुझें कांहीं राहिलें नाहीं. तूं दान, उपभोग व अध्ययन केलेंस याजकरितां आतां अर्जुना पुढें जाऊन युद्ध कर. असें बोलून आचार्य पुढें होऊन युद्ध करूं लागले. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१८६. अध्याय एकशेंदयांशि– संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, रात्रीचा तृतीयभाग शेष राहिला असतां कौरव पांडवांचे योद्धे आनंदानें युद्ध करूं लागले. नंतर अरुणोदय झाल्यावर द्रोणाचार्य आपल्या सैन्याचे दोन भाग करून क्रोधानें सोमक, पांचाल व पांडव यांजवर धांवले. हें पाहून श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, शत्रूंस सव्य अपसव्य मंडळें करीत चलावें. असें ऐकून तो कर्ण व द्रोण यांस सव्य करून चालला. हें पाहून भीमसेन भाषण करतो हे अर्जुना, ज्या करितां क्षत्रिय उत्पन्न होतात त्याचा काल हा आला आहे याजकरितां आतां पराक्रम करून शत्रुसैन्याचा भेद कर. असें ऐकून अर्जुन कर्ण द्रोण यांचें अतिक्रमण करून कौरव सैन्यास जाळित चालला असें अर्जुनाचें कर्म पाहून कौरवांकडील कित्येक योद्धे अर्जुनावर धांवले त्यांचाही नाश करून अर्जुन पुढें चालला. नंतर दुर्योधन, कर्ण, शकुनि हे अर्जुनाच्या अग्रभागीं येऊन बाणवृष्टि करूं लागले तेव्हां अर्जुनानें आपल्या अस्त्रांनीं त्यांच्या बाणवृष्टीचें निवारण करून दहा दहा बाणानीं त्यांस वेध केला आणि हजारों बाण सैन्यावर टाकिले त्याबाणवृष्टीनें अंधःकार उत्पन्न होऊन आपले वीर कोणते व शत्रूचे वीर कोणते हें कळेनासें झालें. कित्येक योद्धे संज्ञेनें युद्ध करितां करितां विरथी होऊन भुजाचाग्रयीं धरूं लागले, कित्येक योद्धे हताश्व हतसारथि झाले असतां भूमीवर निचेष्ट होऊन निजले, असें युद्ध होतां होतां कांहीं काला नंतर द्रोणाचार्य संग्रामा पासून उत्तर दिशेकडे उभे राहिले. हें पहातांच पांडवांकडील योद्धे आचार्यांस जिंकण्याची आशा सोडून उभे राहिले, कित्येक निरुत्साह झाले, विशेषें करून पांचाल द्रोणाच्या बाणानीं पीडित झाले असतां पुनः ते क्रुद्ध होऊन आचार्यांच्या अग्रभागीं आले, तसेच कि-

राट, द्रुपद व द्रुपदाचे तीन नातु व चेदीचे वीर हेही आले ते पुढें येतांच आचार्यांनीं तीन बाणानीं द्रुपदाचे तीन नातु यांस यमलोकीं पाठविलें आणि चेदि, मत्स्य, केकेय यांस पराङ्मुख केलें. हें पाहून द्रुपदानें द्रोणावर बाण वृष्टि केली, तशीच विराटानेंही बाणवृष्टि केली, नंतर द्रोणानें तीक्ष्ण बाणानीं द्रुपद, विराट यांस यमलोकीं पाठविलें. विराट, द्रुपद, द्रुपदाचे तीन नातु व चेदि, केकेय, मत्स्य यांचे योद्धे मरण पावले हें पाहून धृष्टद्युम्नानें सर्व योद्ध्यांत शपथ केली कीं; आज द्रोणास मी न मारीन तर क्षत्रिय कर्मापासून व यज्ञ यागादि कर्मापासून भ्रष्ट होईन. अशी शपथ केल्यानंतर सैन्यासहवर्तमान तो द्रोणावर धांवला तेव्हां कर्ण, शकुनि व दुर्योधन आपल्या बंधूंसहवर्तमान द्रोणाच्या रक्षणा करितां त्याजवळ आले. हें पाहून भीमसेन बोलला हे धृष्टद्युम्ना, तूं द्रुपदाच्या कुलांत उत्पन्न झालास आणि अस्त्रविद्येमध्यें महानिपुण असतां पित्याचा व पुत्राचा वध झालेला पाहून शत्रूची कशी उपेक्षा करितोस? तशीच सर्वांमध्यें शपथ करून कसा आतां उभा राहिलास? अस्तु आतां आचार्यांनीं पांडवांची सेना निःशेष केली नाहीं तोंपर्यंत मी जाऊन त्यांच्याशीं युद्ध करतों तुह्मी सर्व उभे राहून माझा पराक्रम पहा असें बोलून भीमानें आचार्यांच्या अग्रभागीं येऊन तीक्ष्ण बाणानीं ती सेना पळविली धृष्टद्युम्नानेंही पाठीमागून त्या सेन्यांत जाऊन द्रोणाशीं युद्ध केलें उभयतांचें युद्ध होतां होतां कित्येक रथांचीं वृंदेच्या वृंदें नाश पावलीं, कित्येक योद्धे मरण पावले, कित्येक पळाले या प्रमाणें भयंकर युद्ध होत असतां क्षणमात्रानीं सूर्य उदय संधीच्या ठायीं आला. अ. वि. या अ. आ.

१८७. अध्याय एकशें सत्यांशि — संजय ह्मणतो हे राजा, संग्रामामध्यें सर्व योद्धे बद्धकवच आले आणि सूर्य उदय पावलेला पहातांच उपस्थान करून पुनः युद्ध करूं लागले, सूर्योदयाचे पूर्वीं जे जे वीर एकमेकापुढें उभे होते तसेच पुढें सूर्योदयानंतर युद्ध करूं लागले. शंख, भेरी, मृदंग यांचे शब्द व धनुष्याचा टणत्कार व गजांच्या गर्जना यानीं आकाश, दिशा व्याप्त झाल्या असतां आपले वीर आपल्यास मारूं लागले. खड्ग, तोमर, परशु याणीं दारुण युद्ध होत असतां हजारों अश्व, गज, पाय-

दळ मरण पावून सैन्यांत रक्ताची महान् भयंकर नदी उत्पन्न झाली. नंतर दुर्योधन, दुःशासन, द्रोणाचार्य व कर्ण यांचें भीमसेन, अर्जुन, नकुळ, सहदेव यांसीं युद्ध प्रवृत्त झालें; त्यांत नकुळसहदेव यांशीं दुर्योधन, दुःशासन, भीमसेनाशीं कर्ण, अर्जुनाशीं, आचार्य युद्ध करीत असतां तें परस्परांचें युद्ध सर्व योद्धे पाहूं लागले. मेघ जसे पर्जन्यकाळीं पर्वतावर वृष्टि करितात तसे परस्पर एकमेकांवर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत असतां कित्येकांचे शस्त्रांसहवर्तमान् बाहु, कुंडलांसहवर्तमान् मस्तकें तुटलेलीं व छिन्नभिन्न झालेले गजाश्व इत्यादिकरून रात्रीचाठायीं नक्षत्रांसहवर्तमान् आकाश जसें शोभतें या प्रमाणें रणभूमि शोभूं लागली. असें युद्ध होतां होतां दुर्योधनाचा नकुळाशीं समागम झाल्यानंतर नकुळानें दुर्योधनास बाणवृष्टीनें अगदीं जर्जर करून पराङ्मुख केलें असतां सर्व सैनिक नकुळाचें पूजन करूं लागले. अ॰ वि॰ या॰ अ॰ आ॰

१८८. अध्याय एकशें अठ्यांशीं - संजय म्हणतो हे राजा, दुःशासन रथवेगानें पृथ्वीकंपायमान करीत येतो हें पाहून सहदेवानें दुःशासनाच्या सारथ्याचें शिर तोडून पृथ्वीवर पाडलें तेणेंकरून अश्व स्वइच्छेनें फिरूं लागले. नंतर सारथि गतप्राण झाला हें पाहून दुःशासनानें आपणच घोडे चालवून युद्ध केलें. पुनः सहदेवानें तीक्ष्ण बाणानीं त्या अश्वांस ताडण केलें असतां ते अश्व पुनः पळूं लागले. दुःशासन त्यांचा लगाम धरून त्यांस उभे करतो इतक्यांत त्याच्या हातांतील धनुष्य खालीं पडलें तें धनुष्य तो उचलून घेतो तों त्या लगामास सहदेवानें पुनः तोडून तीक्ष्ण बाणानीं अश्वांस वेध केला; त्याकाळीं दुःशासनाच्या संरक्षणार्थ कर्ण येतो हें पाहून भीमसेनानें तीन भल्लबाणेंकरून कर्णास वेध केला असतां ठेचलेला सर्प जसा माघारी फिरतो तसा कर्ण माघारी फिरून भीमाशीं युद्ध करूं लागला तेव्हां भीमसेनानें कर्णाच्या रथावर गदेचा प्रहार केल्यामुळें कर्णाचा रथ छिन्न भिन्न झाला तीच गदा कर्णानें भीमाच्या रथावर टाकिली असतां भीमसेनानें गदेनें गदेचें निवारण करून पुनः दुसरी गदा कर्णावर टाकिली तीच गदा कर्णानें भीमसेनावर टाकिली असतां ध्वजावर पडतांच ध्वज छिन्न भिन्न झाला आणि

सारथि मूर्च्छित पडला. नंतर पुनः भीमसेनानें आठ बाण टाकिले ते कर्णानें तोडून पुनः तीक्ष्ण बाणानीं भीमसेनास वेध केला तेणेंकरून सारथि मूर्च्छित होऊन अश्व मरण पावले असतां भीमसेन उड्डाण करून नकुळाच्या रथांत बसला आणि युद्ध करूं लागला. तसेच द्रोण अर्जुन चित्रविचित्र युद्ध करूं लागले, गुरुशिष्य परस्परांवर प्रहार करीत असतां शीघ्र संधान योगेंकरून हजारों योद्धे मरण पावले जे जे उपाय आचार्य अर्जुनाच्या वधाविषयीं करीत त्या त्या उपायानें अर्जुन निवारण करी असें युद्ध होतां होतां अर्जुना पुढें आपलें आतां कांहीं चालत नाहीं असें जाणून आचार्यांनीं ऐंद्र, पाशुपत, त्वाष्ट्र इत्यादि अस्त्रें अर्जुनावर सोडिलीं अर्जुनानें जीं जीं आचार्यांनीं अस्त्रें सोडिलीं त्या त्या अस्त्रांचें आपल्या अस्त्रें करून निवारण केलें. हें पाहून द्रोणाचार्यांनीं दिव्य अस्त्रांनीं पुनः अर्जुनावर दृष्टि केली अर्जुनानें पुनः त्या वृष्टीचें निवारण केलें असतां आचार्यांनीं मनानें अर्जुनाचें पूजन करून प्रशंसा केली तें युद्ध पहाण्यास हजारों देव, गंधर्व ऋषि व अप्सरा गण आले असतां आकाशाचाठायीं अंतरिक्ष वाणीनें द्रोणाचार्यांचा व अर्जुना स्तव करून बोलूं लागले कीं, हें युद्ध मनुष्यांचें नव्हे, असुरांचें नव्हे, देवगंधर्व यांचें ही नव्हे असें युद्ध आमच्या दृष्टीस कधींही पडलें नाहीं व ऐकिलें नाहीं या उभयतांनें अस्त्र युद्ध कोणी पहाण्यास समर्थ नाहीं जर रुद्र आपल्या देहाचे दोन विभाग करून युद्ध करील तरीच उपमा देण्यास शक्य होईल अन्यठिकाणीं शक्य नाहीं यानीं जर इच्छा केली तर हे देवांसहवर्तमान सर्व जगताचा नाश करतील या प्रमाणें पुरुषश्रेष्ठ द्रोणार्जुन यांची स्तुति झाल्यानंतर पुनः आचार्यांनीं ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला, तेणेंकरून अर्जुन संतप्त झाला. पर्वत व वृक्षांसहवर्तमान् भूमिकंप झाला, विषम वायु सुटला. नंतर त्या अस्त्राच्या योगानें सेनेमध्यें फारच त्रास उत्पन्न झाला. हें पाहून अर्जुनानें न घाबरतां आपल्या ब्रह्मास्त्रें करून त्या अस्त्राची शांति केली. असें दोघांचें युद्ध परम तुंबळ चाललें असतां कोणासही अंत लागला नाहीं. अ. वि. या अ. आ.

१८९. अध्याय एकशें एकुणनवद :- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा-द्रो-

णार्जुन यांचें युद्ध होत असतां दुःशासन धृष्टद्युम्नाच्या अग्रभागीं येऊन युद्ध करूं लागला तेव्हां धृष्टद्युम्नानें दुःशासनाच्या अश्वांस वेध करून ध्वज, सारथि व रथ यांसहवर्तमान् दुःशासनास बाणवृष्टीनें आच्छादित केलें आणि कांहीं कालानें दुःशासनास सोडून हजारों बाणांची वृष्टि करीत तो द्रोणाचार्याकडे गेला हें पाहून कृतवर्मा आपल्या तीन बंधूं सहवर्तमान् त्यांशीं युद्ध करूं लागला. नंतर धृष्टद्युम्नास कृतवर्म्यानें अवरोध केला हें पाहून नकुळ सहदेव युद्ध करूं लागले. ते सात महान् रथी महान् बलवान् मरणास पुढें करून परम कीर्तीच्या इच्छेनें युद्ध करीत असतां तुझ्या वीरांनें नकुळ सहदेवानीं निवारण केलें. नंतर धृष्टद्युम्न द्रोणावर गेला असतां कृतवर्मा तीन बंधूंसह वर्तमान् नकुळ सहदेवाशीं युद्ध करतां हें पाहून दुर्योधन हजारों बाण सोडीत सोडीत पुढें आला तेव्हां सात्यकि त्याचें निवारण करीत असतां उभयतांचें परम तीव्र युद्ध प्रवृत्त झालें. नंतर उभयतां बाल्य अवस्थेमध्यें केलेलीं कर्में यांचें स्मरण करून एकमेकांकडे डोळे वटारून पहात असतां दुर्योधन बोलला हे सात्यके, क्रोध, लोभ मोह, असहनत्व, क्षत्रियधर्म, आचार, बल व पराक्रम यांस धिःकार असो. हे सख्या, पूर्वीं तूं मला प्राणाहून प्रिय होतास तसाच मी ही तुला प्राणाहून प्रिय होतों बाल्यावस्थेंतील सर्व कर्मांचें मला स्मरण आहे; परंतु प्रस्तुत त्या सर्व कर्मांचें विस्मरण होऊन तुझा व माझा प्रसंग आला त्यापेक्षां क्रोध लोभा वांचून दुसरें कांहीं नानाहीं. असें ऐकून सात्यकि बोलला हे दुर्योधना, हें आचार्यांचें घर ही नाहीं, ज्या सभेमध्यें आपण क्रीडा केली ती सभा ही नाहीं हें रणांगण आहे, येथें युद्ध करावें दुसरें कांहीं नाहीं. असें ऐकून पुनः दुर्योधन बोलला हे सात्यके, आपण बाल्यावस्थेमध्यें केलेली क्रीडा कशानें गेली तिचें स्मरण आहेच; परंतु प्रस्तुत हा कालच विलक्षण आला आहे. असें ऐकून सात्यकि बोलला हे दुर्योधना, क्षत्रियांचें व्रत हेंच कीं, आपल्या गुरूस मारावें यास्तव हे राजा, मी तुला प्रिय आहें तर आतां विलंब न करितां माझा वध करावास म्हणजे मी उत्तम लोकांस जाईन. असें परस्पर बोलून सात्यकि दुर्योधनावर धांवला तेव्हां दुर्योधनानें बाणवृष्टीनें त्यास आच्छादन करून

टाकिले. पुनः दुर्योधनानें दहा बाण सात्यकीवर टाकिले. तसेच सात्यकीनें दुर्योधनावर दहा बाण टाकून पुनः तीन व दहा बाण टाकून त्यास विद्ध केलें. असें दोघांचें युद्ध होत असतां दुर्योधन अतिशय विद्ध झाला तेव्हां तो दुसरे ठिकाणीं जाऊन कांहीं वेळ विश्रांति घेऊन पुनः बाण सोडित सात्यकि जवळ आला तेव्हां सात्यकीनें ही दुर्योधनावर बाण वृष्टि केली असें उभयतांचें युद्ध होत असतां सात्यकीचा पराक्रम विशेष पाहून दुर्योधनाच्या रक्षणा करितां कर्ण जवळ आला तेव्हां भीमसेन बाण सोडित सोडीत कर्णावर गेला, कर्णानें हांस्य करून भीमसेनाच्या बाणांचें निवारण करून भीमसेनाचें धनुष्य तोडिलें आणि सारथ्यास वेध केला त्या काळीं भीमसेनानें गदा धारण करून कर्णावर फेंकली तेणेंकरून ध्वज सारथि व रथाचें एक चक्र भग्न झालें तथापि कर्ण एक चक्र रथावर बसून कांहीं न भीतां युद्ध करूं लागला. असें उभयतांचें युद्ध होत असतां इकडे धर्मराज पांचाल व मत्स्य यांचे वीरांस बोलला हे वीर हो, आमचे प्राणाहून योद्धे दुर्योधनाच्या सैन्यामध्यें युद्धास गेले आहेत आणि मूर्खा सारिखे तुह्मी कां उगीच उभे राहिला? ज्या ठिकाणीं आमचे योद्धे युद्ध करितात त्या ठिकाणीं जाऊन क्षत्रियधर्माचा पुरस्कार करून युद्ध करा जयपावण्याच्या इच्छेनें युद्ध करीत असतां मरण पावाल तर उत्तम गतीस जाल आणि संग्रामांत कदाचित् जय प्राप्त झाला असतां पुण्यानें उत्तम लोकांस जाल. असें ऐकतांच सर्व योद्धे सेनेचे चार विभाग करून द्रोणावर गेले. नकुळ, सहदेव, भीमसेन हे अर्जुनास हांक मारून बोलले हे अर्जुना, पांचाल द्रोणास मारतील तूं आतां कौरवांचें निवारण कर. असें ऐकून अर्जुन कौरवांवर गेला. अ· वि· या अ· आ·

१९०. अध्याय एकशें नव्वद.- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, पूर्वी जसा इंद्रानें दानवांचा नाश केला तसा द्रोणानें पांचालांचा नाश केला असतां कित्येक वध्यमान झालेले महारथी द्रोणापुढें आपलें कांहीं चालत नाहीं असें समजून उगीच स्तब्ध उभे राहिले. या प्रमाणें आचार्यांनीं रथसमुदाय व गजाश्व पायदळ यांचा नाश केला असतां पांडव जयप्राप्त हो-

ण्याविषयीं निराश झाले नसान अर्जुनही त्यापुढें जाण्यास असमर्थ झाला. त्या काळीं श्रीकृष्ण ह्मणतात हे अर्जुना, द्रोणाचार्य कोणाच्यानें जिंकला जात नाहीं; परंतु हा जर शस्त्र ठेवील तर याचा पराभव होईल यास्तव कांहीं आपला धर्म टाकून याचा वध होईल असा उपाय योजावा. अश्वत्थामा मेला असतां हा युद्ध करणार नाहीं असें मला वाटतें. हें कृष्णाचें भाषण अर्जुना वांचून सर्वांस रुचलें. नंतर भीमसेनानें तुझ्या सैन्यांतील इंद्रवर्मा मालव राजा याचा अश्वत्थामा ह्मणून एक हत्ति होता तो गदेनें मारिला आणि लज्जित झाल्या सारखा तो होऊन संग्रामांत द्रोणाजवळ आला आणि गज हीं अक्षरें हळूच बोलून अश्वत्थामा मेला असें उच्च स्वरें करून बोलला. तें ऐकतांच आचार्यास परम आश्चर्य वाटून ते मनांत खिन्न झाले कांहीं वेळानें हें मिथ्या आहे असें समजून क्षणमात्रानें स्वस्थ चित्त झाले नंतर त्यांनीं धृष्टद्युम्नावर रोषानें सहस्र बाणांची वृष्टि केली नंतर वीस हजार पांचालांचे रथी यांणीं चोहोंकडून बाणवृष्टीनें द्रोणास अगदीं आच्छादित करून टाकिलें असतां आचार्यांनीं पांचालांचा नाश करण्या करितां ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला त्या अस्त्रानें पंचवीस हजार पांचाल मरण पावल्या नंतर भल्ल बाणें करून वसुदानाचें शिर तोडलें आणि पुनः क्रोधित होऊन पांचशें मत्स्याचे वीर मारिले, सहा हजार सृंजयांचे वीर मारिले, दहा हजार हत्ति मारिले व दहा हजार घोडेस्वार मारिले. असा द्रोणानीं क्षत्रियांचा नाश केला हें पाहून अग्नीस पुढें करून देव, ऋषि तसेच विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, भृगु, तसेच अन्य महाऋषि द्रोणास ब्रह्मलोकीं नेण्या करितां आकाश मार्गें येऊन बोलले हे द्रोणा, तूं आतां अधर्मानें युद्ध कसें केलेंस? आतां तुझा अंतकाल समय आला यास्तव आह्मीं तुला नेण्यास आलों आहोंत आह्मां बरोबर चलावें आतां याहून तूं क्रूर कर्म करण्यास योग्य नाहींस. तूं वेदवेदांग जाणता, सत्यधर्मीं रत विशेषेंकरून तूं ब्राह्मण त्यापेक्षां तुला युद्ध कर्म योग्य नाहीं आतां मोह सोड आणि आयुध ठेवून शाश्वतमार्गाचाठायीं प्रवृत्त हो, तूं ब्रह्मास्त्रें करून हे अस्त्र न जाणणारे यांस मा-

रिलेंस हें चांगलें केलें नाहींस आतां विलंब न करितां लौकर चलावें पुनः अ-
सें पापिष्ठ कर्म करूं नको. असें तें देवऋषींचें वाक्य ऐकतांच भीमसेन वाक्या-
चें स्मरण करून तो खिन्न झाला आणि आपला पुत्र अश्वत्थामा मेला किं-
वा न मेला हें दुसरे कोणास न पुसतां धर्मवक्ता तीन लोकांचें ही ऐश्वर्य प्रा-
प्त झालें असतां आपलें सत्य न सोडणारा असा जो धर्मराज यास पुस-
ण्या करितां त्याजवळ आला. आचार्य येतो हें पाहून श्रीकृष्ण बोलले
हे धर्मराजा, मी त्रिवार सत्य सांगतों तें ऐक. जर क्रोधाचा आश्रय करू-
न अर्धा दिवस द्रोण युद्ध करील तर तुझी सर्व सेना मारील याजकरितां
तूं आमचें संरक्षण कर. सत्याश्रित वाक्य टाकून जीवित्वा करितां असत्य
भाषण केलें तर असत्य होत नाहीं, कामिनी स्त्रिया, विवाह, गाय, स्व-
प्राण, ब्रह्मकार्य इतक्या विषयीं असत्य भाषण केलें तर पाप नाहीं, अ-
सें कृष्ण बोलतात तो भीमसेन बोलला हे राजा, तुझ्या सेनेचें मर्दन कर-
णारा जो इंद्रवर्मा मालवराजा याचा अश्वत्थामा नामक गज इंद्रगजा
सारखा पराक्रमी त्यास मी संग्रामांत मारिलें याज करितां द्रोणास अ-
श्वत्थामा मेला आतां युद्ध करूं नये असें सांगावें तुझ्या वाक्याचा त्या-
स विश्वास येईल यास्तव हें कृष्ण वाक्य ऐकावें. द्रोणास अश्वत्थामा मेला असें
तूं सांगितलें असतां तो कधीं ही युद्ध करणार नाहीं. या प्रमाणें श्रीकृष्ण
व भीमसेन यांचें भाषण झाल्यावर अश्वत्थामा मेला किंवा न मेला हें
सत्यवक्ता जो धर्मराज यास विचारण्यास आले तेव्हां धर्मराज गज हीं
अक्षरें मनामध्यें ह्मणून अश्वत्थामा मेला ही अक्षरें स्पष्ट बोलला. त्या का-
ळीं धर्मराजाचा रथ जो पूर्वीं पृथ्वीवर चार अंगुळें स्पर्श न करितां फिर-
त असे तो संदिग्ध वाक्यें करून लागलाच पृथ्वीस स्पर्श करूं लागला.
असें धर्मराजाचें वाक्य ऐकतांच द्रोणाचार्य पुत्र शोकानें संतप्त झालेले
जीविताविषयीं निराश होऊन मूर्च्छित झाले. अ. वि. या अ. आ.

१९१. अध्याय एकशें एक्याण्णव — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा,
पुत्रशोकानें दुःखित झालेला जो द्रोणाचार्य यास पाहून धृष्टद्युम्नानें अ-
ग्नीपासून द्रोणाच्या विनाशा करितां यज्ञांत उत्पन्न झालेलें धनुष्य हस्ता-

मध्यें घेऊन त्यास दिव्य शरसंधान करण्याची योजना केली. जैत्रनामक धनुष्याच्या अप्रतिम तेजानें सूर्याच्या रश्मी सारख्या दाहीदिशा प्रकाशित झाल्या असतां संपूर्ण सैनिक असें मानूं लागले कीं, आज अंतकालच प्राप्त झाला कीं काय? नंतर धृष्टद्युम्नानें शरसंधान केलेलें पहातांच द्रोणाचार्य आपल्या देहाचा अवसान काल प्राप्त झाला असें समजून बाणाचें निवारण करण्यास यत्न करूं लागले; परंतु आचार्यांच्या अस्त्रानें तेज त्यापुढें चालेना याप्रमाणें दिवसाच्या तिसऱ्या भागामध्यें युद्ध होत असतां संपूर्ण शर क्षय पावले. नंतर आचार्यांनीं आंगिरस नामक धनुष्य घेऊन ब्रह्मदंडासारख्या बाणांचें शरसंधान केलें आणि धृष्टद्युम्नावर हजारों बाणांची वृष्टि केली. नंतर ध्वज व सारथि पृथ्वीवर पाडला तेव्हां धृष्टद्युम्नानेंही भल्लबाणें करून आचार्यांच्या स्तनांतरीं भेद केला पुनः आचार्यांनीं धृष्टद्युम्नाचें धनुष्य बाण छेदून रथाचे अश्वांस वेध केला त्याकाळीं धृष्टद्युम्नानें आपला रथ द्रोणाचार्यांच्या रथासन्निध नेऊन मिश्र केला असतां पारव्या वर्णाचे व तांबड्या वर्णाचे अश्व एकत्र झाल्यामुळें बहुतच शोभा दिसूं लागली. त्या काळीं आचार्यांनीं धृष्टद्युम्नाचा ईषाबंध, चक्रबंध, रथबंध यांचा नाश करून धनुष्य, बाण, ध्वज, सारथि यांचाही नाश केला. नंतर छिन्नधन्वा जो धृष्टद्युम्न हा महान् एक गदा घेऊन आचार्यांवर धांवला तेव्हां आचार्यांनीं तीक्ष्ण बाणें करून तीही गदा तोडिली पुनः धृष्टद्युम्न ढाल, तरवार हस्तामध्यें घेऊन आचार्यांच्या रथापाशीं आला, हें पाहून आचार्य त्याचें निवारण करण्यास सिद्ध झाले; परंतु निवारण न होतां धृष्टद्युम्नानें आचार्यांच्या रथाचे अश्व मारिले. ज्या काळीं धृष्टद्युम्न खड्ग बाण घेऊन आचार्यांवर धांवला त्याकाळीं पूर्वी हिरण्यकश्यपूच्या वधकाळीं जसें विष्णूचें क्रूर रूप सर्वांस दिसलें तसें धृष्टद्युम्नाचें क्रूररूप सर्वांस दिसलें. नंतर भ्रांत (मंडलाकार) उद्भ्रांत (ऊर्ध्वमंडलाकार) इत्यादि शस्त्राच्या गति दाखवून धृष्टद्युम्न आपला प्राण घेण्यास उद्युक्त झाला हें पाहून आचार्यांनीं वैतस्तिक बाणें करून धृष्टद्युम्नाच्या अस्त्राचा छेद केला. ते वैतस्तिक बाण कृपाचार्य, पार्थ, कर्ण, प्रद्युम्न, युयुधान, अभिमन्यु यां खेरीज दुसऱ्यापाशीं न-

वने. नंतर धृष्टद्युम्न जवळ आलेला पाहून आचार्यांनीं त्यास मारण्याच्या इच्छेनें एक तीक्ष्ण बाण सोडिला. इतक्यांत दुर्योधन, कर्ण हे पहात असतां सात्यकीनें त्या बाणाचा छेद केला. द्रोणाचार्यांनीं धृष्टद्युम्नास ग्रासलेला पाहून कर्ण, दुर्योधन, कृपाचार्य यांचे मध्यभागीं सात्यकीनें धृष्टद्युम्नास सोडविलें. नंतर अर्जुन बोलला हे कृष्णा, पहा! हा सात्यकि रणामध्यें क्रीडा करीत आत्या सहवर्तमान मला बहुत आनंद पाववितो हा माझ्या शिष्येंकरून रणामध्यें कसा संचार करितो हें पहा! सात्यकीचा अद्भुत पराक्रम पाहून कौरव पांडवांचे सैनिक याची बहुत स्तुति करितात नी ऐक. असा विषय या अध्यायांत आहे

११२. अध्याय एकशें ब्याण्णव:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, असें सात्यकीचें कर्म पहातांच दुर्योधनादि चोंहोंकडून सात्यकीचें निवारण करण्यास प्रवृत्त झाले. कृपाचार्य, कर्ण व तुझे पुत्र त्वरेनें सात्यकीच्या अग्रभागीं येऊन त्याजवर बाणवृष्टि करणार इतक्यांत धर्मराज, भीमसेन, नकुळ, सहदेव हे सात्यकीच्या रक्षणार्थ आले. कर्ण, दुर्योधन, कृपाचार्य इत्यादि सात्यकीवर चोंहोंकडून बाणांची वृष्टि करीत असतां सात्यकीनें आपल्या दिव्यास्त्राच्या योगें त्यासर्वांचें निवारण केलें. असा परस्परांचा घोर संग्राम होत असतां कोणाचे हस्त, कोणांचीं मस्तकें, कोणांचीं धनुष्यें, कोणाच्या रथाचीं चक्रें भग्न होऊन संपूर्ण पृथ्वी व्याप्त झाली. महान् महान् ध्वज व तुरुंगारूढ योद्धे यांच्या मरण पावलेल्या अश्वांनीं पृथ्वी पूरित झाली हें पाहून धर्मराज आपल्या योद्ध्यांस बोलला हे योद्धे हो, लौकर द्रोणावर धांवा धृष्टद्युम्न व द्रोणाचार्य यांचा संग्राम चालला आहे त्यामध्यें द्रोणाचें रूप भयंकर दिसतें व धृष्टद्युम्नही क्रुद्ध झाला आहे तस्मात् तो आज आचार्यांचा घात केल्या वांचून कधींही रहाणार नाहीं तुह्मी मात्र आतां संपूर्ण योद्धे एकत्र होऊन भारद्वाजाच्या वधाविषयीं इच्छा धरा. अशी त्याची आज्ञा होतांच सृंजयाचे महारथी द्रोणास मारण्या करितां एका एकीं धांवले हें पाहून आपला प्राण गेला तरी चिंता नाहीं; परंतु आपली प्रतिज्ञा सिद्ध करावी असा निश्चय करून आचार्य योद्ध्यांच्या अग्रभागीं आले त्या काळीं भू

मि कंपायमान् होऊन भयंकर वारा सुटला, विद्युल्लते साररवे आकाशाम-
ध्यें शब्द होऊन उल्कापात होऊं लागले त्यायोगें उभयतांच्या सैन्यामध्यें
एकाएकीं प्रकाश पडला, द्रोणाचार्यांचीं शस्त्रास्त्रें प्रज्वलित झालीं, रथा-
च्याअश्वांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या, आचार्यांचें तेज नष्ट झालें, वा-
म बाहु व नेत्रस्फुरण पावूं लागलें; परंतु आचार्यांनीं तसाच धीर धरून आ-
पल्या अग्रभागीं आलेले क्षत्रिय यांचा नाश करण्याची इच्छा धरून
वीस हजार क्षत्रियांचें मर्दन केलें. पुनः तीक्ष्ण बाणांच्या योगें इतर क्षत्रि-
यांचा बहुत नाश केला त्याकाळीं आचार्यांच्या शस्त्र संमर्दनें महान् अ-
ग्नि उत्पन्न झाला. पुनः क्षत्रियांचा समूळ नाश करावा याबुद्धीनें आचार्यां-
नी ब्रह्मास्त्राची योजना करून द्रुपदपुत्रास विरथी केलें हें पहातांच भी-
मसेन धृष्टद्युम्नास आपले रथांत घेऊन बोलला हे महाबाहो, तुझ्या वांचू-
न आचार्यांशीं युद्ध करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं तुझ्यावर आम-
चा सर्वांचा भार आहे धीर सोडूं नको. असें ऐकतांच धृष्टद्युम्नानें हस्तांत
दृढ धनुष्य घेऊन शरसमुदायानें आचार्यांस अदृश्य केलें. नंतर आचार्य
त्या बाणांचें निवारण करण्यास प्रवृत्त झाले असतां पुनः धृष्टद्युम्नानें दिव्या-
स्त्रांचा वर्षाव करून आचार्यांच्या संरक्षणार्थ वसाति, बाल्हिक व तुझें सै-
न्य पृष्ठभागीं होतें त्यास व्यथित केलें. त्या काळीं धृष्टद्युम्न सूर्याच्या तेजा-
प्रमाणें देदीप्यमान् सर्व सैन्यांत दिसूं लागला इतक्यांत आचार्यांनीं शिली-
मुख बाणानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य तोडून संपूर्ण शरीरास व्यथा उत्पन्न के-
ली. हें पहातांच भीमसेन आपला रथ आचार्यांच्या सन्निध नेऊन बोल-
ला हे ब्राह्मणा, जर युद्ध न करितास तर कुरुक्षत्रिय कुळ क्षय न पावतें जर तूं
आपल्या ब्राह्मणवृत्तीनें राहिला असतास तर हा क्षत्रियांचा संग्राम कशा
करितां झाला असता? अहिंसा धर्म संपूर्ण वर्णांस आहे; विशेषेंकरून ब्राह्म-
णानीं त्या धर्माचें पालन अवश्य करावें. तूं तर ब्रह्मवेत्ताच आहेस तेव्हां जसे
चांडाळ आपल्या पुत्रदारांच्या संरक्षणा करितां अज्ञानेंकरून पशूंची हिं-
सा करितात तसा तूं अज्ञानेंकरून एका करितां हजारों क्षत्रियांचा नाश कु-
शा करितां करतोस? ही लज्जा तुला कशी वाटत नाहीं. आपलें स्वकर्म टाकू-

न परक्षत्रियाचें कर्म करूं धारण केलेंस? असें भीमाचें वाक्य ऐकतांच द्रोणाचार्यांनीं तत्काल आपलें धनुष्य खालीं ठेविलें आणि पांडवांस भाषण केलें कीं, तुमचें कल्याण असो आतां तुमच्याशीं मी युद्ध करणार नाहीं मला मारण्याविषयीं तुह्मीं पाहिजे तसा यत्न करा संपूर्ण भूतांस मजपासून अभय आहे. संजय ह्मणतो हे राजा, असें आचार्यांनीं भाषण करून संग्रामामध्यें एकाएकीं उच्चस्वरानें अश्वत्थाम्यास हांक मारिली इतक्या अवकाशांत धृष्टद्युम्न हस्तांत खड्ग घेऊन रथाखालीं उतरला आणि आचार्यांचा वध करण्यास आला त्याकाळीं संपूर्ण प्राणिमात्र आचार्य धृष्टद्युम्नाच्या वश झालेला पाहून हाहाःकार करूं लागले. आचार्यांनीं आपला अंतकाल समीप आला असें जाणून योगधारणेच्या योगानें आपलें तेज ब्रह्माचाठायीं समर्पण केलें आणि पुराण पुरुष भगवान् व पापहारिणीगंगा यांचें स्मरण करून नेत्र झांकिले या प्रकारें भगवान् अनंत याचें ध्यान करीत आपले प्राण स्वर्गास नेले त्याकाळीं संपूर्ण लोकांस असा भास झाला कीं, दोन सूर्य एकदांच उदयास पावले कीं काय? आचार्यांच्या तेजानें संपूर्ण आकाश एकाएकीं देदीप्यमान् झालें आणि निमिषांत तें तेज आकाशांत मावळलें असतां एकाएकीं आकाशामध्यें देवांचा हर्षित शब्द झाला याप्रमाणें ब्रह्मलोकीं आचार्यांचें तेज गेलें असतां धृष्टद्युम्नही चकित झाला. हें ब्रह्मतेज अंतर्धानकालीं मी, धनंजय, वासुदेव, धर्मराज व अश्वत्थामा इतक्यानीं मात्र पाहिलें आमच्या शिवाय इतर कोणी पहाण्यास समर्थ झाले नाहींत. नंतर मृत झालेल्या द्रोणाची शिखा धृष्टद्युम्नानें आपले हस्तांत धरली आणि खड्गानें भारद्वाजाचा शिरच्छेद करून सिंहासारखी गर्जना केली आणि आपला खड्ग घेऊन सर्व सैन्यांत प्रदर्शित केला असतां तो रक्तानें भरलेला पाहून धृष्टद्युम्नानें आचार्यांचा प्राण घेतला यांत संशय नाहीं असा सर्वांनीं निश्चय केला. मस्तकच्छेदकालीं अर्जुन व सर्व सैनिक दयेनें बोलले अरे धृष्टद्युम्ना, आचार्यांस मारूं नको असें सांगत असतां तें न ऐकतां धृष्टद्युम्नानें आचार्यांचा वध करून तें शिर तुझ्या सैन्यांत मध्यभागीं टाकून दिलें तें पहातांच तुझे पुत्र व सैनिक पलायना विषयीं उद्युक्त झाले. संजय ह्मणतो हे राजा, कृष्णाच्या प्रसादानें आचार्य आका-

शा मार्गानें स्वर्गास गेले हें मी प्रत्यक्ष पाहिलें एका एकीं मोठी ज्योति आकाशांत प्रविष्ट झाली ती पहातांच संपूर्ण तुझ्या योद्ध्यांचा उत्साह भग्न होऊन सर्व सैन्य चोहींकडून पळालें तुझे पुत्र पराजयाच्या भीतीनें मृतप्राय झाले. इकडे पांडवांस जयाचा हर्ष होऊन ते सैन्यांत सिंहनाद करूं लागले. भीमसेन व धृष्टद्युम्न सैन्याच्या मध्यभागीं येऊन एकमेकांस आलिंगन देत असतां भीमसेन बोलला हे धृष्टद्युम्ना, सूतपुत्र व दुर्योधन हे मरण पावतील त्याकाळीं पुनः मी तुला असेंच हर्षानें आलिंगन देईन. हे राजा, असें भीमसेन धृष्टद्युम्नास बोलून संपूर्ण प्राण्यांस त्रास देऊं लागला. अ॰ वि॰ या अ॰ आ॰

१९३. अध्याय एकशें त्र्याण्णव:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, पूर्वीं हिरण्याक्ष मेला असतां जसे सर्व दैत्य दाही दिशेस पलायन करीत हिरण्यकश्यपु जवळ आले, तसे द्रोणाचार्य मरण पावले असतां सर्व कौरव पांडवांस हर्षित झालेले अवलोकन करून अश्रुपूर्णाक्ष होत्साते आर्तस्वर करीत तुझ्या पुत्राचें संरक्षण करण्यास जवळ आले आणि क्षुधा व तृषा ईहीं करून व्याप्त होऊन भास्कराचें जसें पतन, समुद्राचें जसें शोषण, इंद्राचा जसा पराजय, तसें भारद्वाजाचें पतन पहातांच निरुत्साह होऊन पळाले. द्रोण मेलेला ऐकून आप आपल्या सैन्यासहवर्तमान् शकुनि, कर्ण, शल्य, कृपाचार्य, कृतवर्मा, उलूक, दुःशासन, वृषसेन, दुर्योधन, सुशर्मा हे पळाले. कोणी वीर अंगांतील कवचें काढून परस्पर हांका मारीत गेले. असें कौरवांचें सैन्य त्रास पावून पळत असतां प्रवाहामध्यें पुनः उलटा मगर जसा येतो तसा द्रोणपुत्र अश्वत्थामा शत्रुसैन्यांत येऊन शिखंडि, प्रभद्रक, पांचाल, चेदि, केकय यां सहवर्तमान् युद्ध करीत असतां आपलें सैन्य पळतें हें पाहून दुर्योधनास बोलला हे राजा, ही सेना आज कां पळते? तसाच तूं ही कां पळतोस? हे महाबाहो, सर्व तुझे सैनिक कुशल आहेत ना, तुझ्या सैन्यांत कोणता वीर पडून ही सेना अशी अवस्था पावली हें मला सांग. असें ऐकून दुर्योधन घोर अप्रिय वृत्तांत सांगण्यास समर्थ न होतां कृपाचार्यास बोलला हे आचार्य, हें सैन्य कां पळतें? हें तुह्मीं अश्वत्थाम्यास सांगा. असें ऐकून कृपाचार्यांनीं सर्व वृत्तांत अश्वत्थाम्यास सां-

गितला. हे अश्वत्थामा आत्मीं आचार्यास पुढें करून पांचालांसीं संग्राम प्रवृत्त केला तो होत असतां परस्परांचे अनेक वीर पतन पावले. युद्धामध्यें धृतराष्ट्राचे वीर क्षय पावत असतां तुझ्या पित्यानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला व सहस्रशः भल्लु बाणें करून पांडवांचे वीर मारिले. एक सहस्र पायदळ, दोन सहस्र गज आचार्यानें यमलोकास पाठविले. आचार्य वयें करून वृद्ध असतां सोळा वर्षांचे वयस्का सारिखा संग्रामामध्यें संचार करून संपूर्ण सैनिकांस क्लेश देत असतां पांचालांस विन्मुख करिता झाला. हें हितेच्छु जो श्रीकृष्ण याणें पाहून पांडवांस बोलला कीं, द्रोण जरी साक्षात् इंद्र आला तरी त्यास युद्धामध्यें तो अटोपणार नाहीं यास्तव तुह्मीं आतां आपला धर्म टाकून कसा तरी जय मिळवा आणि जेणें करून द्रोणाचार्य तुमचें हनन न करील तें करा. अश्वत्थामा मेला असतां आचार्य युद्ध करणार नाहीं असें मला वाटतें तर अश्वत्थामा मेला ह्मणून कोणी त्यास लवकेंच सांगावें. हें कृष्णानें वाक्य सर्वांसि रुचलें, धर्मराजास कष्टानें रुचलें, अर्जुनास तर अगदींच रुचलें नाहीं. नंतर भीमसेन तुझ्या पित्यास लज्जित होऊन बोलला कीं हे आचार्य, अश्वत्थामा मरण पावला असें भीमाचें वाक्य तुझ्या पित्यानें ऐकून हें सत्य किंवा असत्य असा शंकित होऊन सत्यवक्ता धर्मराज ह्मणून त्यास पुसावयास येऊन अश्वत्थामा मेला किंवा न मेला हें त्यास पुसलें त्याकाळीं धर्मराज असत्याच्या भयामध्यें निमग्न होऊन पूर्वीं भीमसेनानें मालवेंद्र राजाचा अश्वत्थामा गज मारून उच्चस्वरें करून द्रोणास भाषण केलें कीं, ज्या करितां तूं शस्त्र धारण करतोस तो तुझा प्रिय पुत्र अश्वत्थामा भूमीवर शयन करतो. असें भीमाचें कर्म ह्मणून गज हीं अक्षरें अस्पष्ट बोलून अश्वत्थामा मरण पावला हें मोठ्यानें बोलला तेव्हां आचार्य परम संतप्त होऊन आपल्या दिव्यास्त्राचें विसर्जन करून परम दुःखित झाले. हें धृष्टद्युम्नानें पाहून द्रोणाचा प्राण घेण्याचा हा चसमय असा मनामध्यें विचार करून तो आपल्या दिव्यास्त्राचा त्याग करून रणामध्यें शिरला आणि सव्य हस्तें द्रोणाचे केश धरून त्याचा शिरच्छेद केला सर्व वीर अरे धृष्टद्युम्ना यास मारूं नको असें ह्मणत असतां त्या-

नें ऐकिलें नाहीं, तसाच अर्जुन रथाखालीं येऊन धृष्टद्युम्नाचें निवारण करीत असतां ऐकिलें नाहीं क्रूरकर्म्यानें तुझा पिता मारिला त्याकाळीं संपूर्ण योद्धे पळूं लागले आह्मीही निरुत्साह होऊन तसेच पळूं लागलों. असें कृपाचार्याचें वाक्य ऐकतांच अश्वत्थामा पायानें लत्ताप्रहार केलेल्या सर्पासारखा क्रुद्ध होऊन श्वासोच्छ्वास टाकूं लागला. अ. वि. या अ. आ.

१९४. अध्याय एकशें चौऱ्याण्णव.- धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, धृष्टद्युम्नानें अधर्मकरून द्रोणास मारिलें असतां अश्वत्थाम्यानें पुढें काय केलें? मानुष, वारुण, आग्नेय, ब्राह्म, नारायण, हीं अस्त्रें ज्यामध्यें निरंतर वास करीत असत, ज्याणें परशुरामापासून धनुर्विद्येचा अभ्यास करून ती आपले पुत्रास समर्पण केली तो पुत्र अश्वत्थामा योद्ध्यांमध्यें मोठा पराक्रमी झाला व ज्याचे शिष्यही मोठमोठे विशारद झाले तो आचार्य रामापेक्षांही श्रेष्ठ, पुरंदरासारखा युद्धांत कुशल, पर्वतासारखा स्थिर, वायूसारखा चपळ, यमासारखा भयंकर, ज्यानें आपल्या पराक्रमानें धरणी पीडित केली, संग्रामामध्यें कधीं ज्यास दुःखप्राप्त झालें नाहीं, वेदामध्यें निष्णात असा जो अश्वत्थाम्याचा पिता द्रोणाचार्य यास अधर्मकरून धृष्टद्युम्नानें मारिलें हें ऐकतांच अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाच्या मृत्यूची योजना केलीच असेल; परंतु अश्वत्थाम्यानें पुढें काय भाषण केलें? तें मला सांग. अ. वि. या अ. आ.

१९५. अध्याय एकशें पंचाण्णव.- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, कपटानें आपला पिता धृष्टद्युम्नानें मारला हें ऐकतांच अश्वत्थामा नेत्रांतून अश्रु टाकीत असतां प्रळयकाळीच्या यमासारखा क्रुद्ध होऊन दुर्योधनास बोलला हे राजा, माझा पिता न्यस्तशस्त्र असून क्षुल्लक पांचाल याणीं मारला हें मी जाणलें. संग्राम करीत असतां जय पराजय आहेत; परंतु धर्मध्वज जो युधिष्ठिर याणें हें फार निंद्य कर्म केलें, जो मरण पावतो तो संग्रामामध्यें स्तुत्यच होतो माझा पिता स्वर्गलोकास गेला यांत संशय नाहीं पिता जर हातीं शस्त्र धरून मरता तर मला इतकें दुःख न होतें व मी शोकहीन करितों; परंतु द्रोणाचार्य धर्मप्रसक्त असून

सर्व सैनिक पहात असतां धृष्टद्युम्नानें त्यास मारलें हें कर्म माझ्या मर्मी ला-गल्या सारखें झालें. पिता पुत्राची येवढ्या करितां इच्छा करितो कीं, आप-ल्यास पुत्रानें तारावें. मी जिवंत असतां माझ्या पित्याचे केश धृष्टद्युम्नानें धरले ही गोष्ट अयुक्त झाली कारण आमच्या सारिखे पुत्र जिवंत असतां पि-त्यास असें दुःख नसावें. असो दुष्ट त्यानें माझी अवज्ञा करून पित्यास मा-रिलें त्याचें फल तो आतां पावेल. धर्मराज प्रभृति पांडवांनीं मिथ्या भा-षण करून शास्त्रमार्ग सोडला यास्तव धर्मराजाचें रुधिर आज भूमि प्रा-शन करील. आज मी अशी शपथ करतों कीं, आजपर्यंत यज्ञ, याग, वापी, कूप, तडागादि बंधन जीं केलीं तीं, धृष्टद्युम्नास न मारीन तर सर्व व्यर्थ हो-तील; सर्वोपायें करून पांचालांच्या वधाविषयीं यत्न करितों हा पाप कर्म करणारा धृष्टद्युम्न यास संग्रामामध्यें मी मारणार सौम्य अथवा क्रूर कोण त्याही कर्मै करून पांचालांचा वध करीन तेव्हां शांति पावेन. मनुष्य पुत्रा-ची इच्छा करतात कीं, इहलोकीं अथवा परलोकीं भयापासून आपलें त्राण व्हावें तें पित्याचें भय मी निवारण करीन अपुत्रा सारखी माझ्या पि-त्याची अवस्था झाली. अरे मी पर्वता सारखा पुत्र आणि शिष्य जिवंत असतां पित्याची ही अवस्था व्हावी कीं काय? तस्मात् माझीं दिव्य अस्त्रें व बाहू यांस धिःकार असो, माझ्या सारखा पुत्र असून द्रोणाची शेंडी शत्रूनें धरावी कीं काय? माझा पिता जरी परलोकीं गेला तरी आज मी पितृऋणापासून मुक्त होतों, कृष्णासह वर्तमान् पांडव माझा पराक्रम पाहोत. सैन्यामध्यें देवानीं उत्पन्न केलेल्या अस्त्रांचा मी प्रयोग करणार, आज माझ्या धनुष्या पासून सुटलेले बाण स्ववीर्य दाखवीत पांडवांचें मर्द-न करतील. जें अस्त्र अर्जुन, जनार्दन, भीमसेन, नकुळ सहदेव, धर्मराज, दु-ष्टात्मा धृष्टद्युम्न, शिखंडि, सात्यकि, कोणीही जाणत नाहींत हें माझ्या पि-त्यानें ब्रह्मस्वरूप नारायणा कारणें नमस्कार करून विधिपूर्वक उपहार समर्पण केला तो भगवंतानें स्वतः ग्रहण करून वरदान दिलें त्या काळीं माझ्या पित्यानें परम नारायणास्त्र मागितलें असतां भगवान् यानीं तें अ-स्त्र माझ्या पित्यास देऊन सांगितलें कीं: हें अस्त्र तूं सहसा सोडूं नको

शत्रूंचा वध केल्यावांचून हें माघारें फिरावयाचें नाहीं व कशानें शांत होणा-
र हेंही कोणास माहित होणार नाहीं हें अवध्यास ही मारील यास्तव याचा
प्रयोग करूं नको.जे संग्रामांत शस्त्रें सोडित असतील त्यांचा निश्चयें करू-
न वध होणार या अस्त्राची शांति शत्रु शरण येऊन मी तुझा आहें असें
बोलून शस्त्र ठेवील तर होईल असें नारायणास्त्र देऊन भगवान् स्वर्गा-
स गेले.तें हे नारायणास्त्र पित्यापासून मिळालेलें येणें करून सर्व पांचा-
ल,पांडव,मत्स्य,केकेय यासर्वांस पळवीन जशी जशी मी इच्छा करीन
तसतसे बाण शत्रूंचाठायीं पडतील पांचालांमध्यें नीच जो धृष्टद्युम्न
तो माझ्यापासून आज जिवंत रहाणार नाहीं. असें द्रोणपुत्रानें वाक्य ऐ-
कून सर्व सैनिक पळत होते ते माघारे फिरून शंख नाद करूं लागले. दुंदु-
भिप्रभृति वाद्यांच्या नादानीं व रथचक्रांच्या घडघडाट शब्दानीं आका-
श व भूमि नादित झाली, इकडे तो नाद ऐकून सर्व पांडव एकाठिकाणीं ज-
मून उभे राहिले. अ. वि. या अ. आ.

१९६. अध्याय एकशें शाणव - संजय म्हणतो हे राजा, अश्वत्था-
म्यानें नारायणास्त्राचा प्रयोग केला असतां पाठीमागून महान् भयंकर
वारा सुटला, भूमीकंप होऊं लागला, समुद्र खवळला, नद्या उलट्या वा-
हूं लागल्या, पर्वताचीं शिखरें गळून पडलीं, पांडवांच्या सैन्यास मृगअ-
पसव्य प्रदक्षिणा करूं लागले, सर्व दिशा अंधारून गेल्या, सूर्याचें तेज
अंध झालें असे एका एकीं उत्पात झाले असतां सर्व राजे भयाभीत झाले.
असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, अश्वत्था-
म्यास पितृवध सहन न होतां शोकें करून संतप्त होऊन त्यानें सर्व कौरवां-
चें सैन्य माघारें फिरविलें असतां धृष्टद्युम्नाचे रक्षणाविषयीं पांडवानीं
काय मसलत केली ? हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे रा-
जा, धर्मराज अर्जुनास बोलला हे अर्जुना, जसें पूर्वीं इंद्रानें वृत्रासुरास
मारिलें तसें धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्यास मारल्यावर सर्व कौरवांचें सैन्य दीन
होऊन जयाची आशा न धरितां केवळ जीवित च रक्षावें अशी बुद्धि धरू-
न कोणी पळूं लागले, कोणी रथ उधळून वेगानें जाऊं लागले अशी कौरव

सैन्याची दाणादाण झाली असतां पुनः कोणाच्या कारणानें सैन्य माघारें फिरलें हें तुला ठाऊक असल्यास सांग. अश्वांचा हेषित शब्द, गजांचा बृंहित नाद व रथचक्रांचा घडघडाट मिश्रित होऊन हा महान् नाद श्रवणांत येतो येणेंकरून इंद्रासहवर्तमान् तीन लोकांस भग्नता प्राप्त होईल असें मला वाटतें. हे धनंजया, द्रोणाचार्य मरण पावला ह्मणून इंद्र तर युद्धास येत नाहींना? गुरु मेलेला ऐकून आह्मीं आनंदांत निमग्न होतों; परंतु हा नादश्रवणांत आल्या पासून आह्मांस फार भय उत्पन्न झालें भग्न झालेल्या कौरवांस कोणता मित्र अभय देऊन युद्धास सिद्ध झाला हें मला सांग. असें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन बोलला हेराजा, तुझा गुरु हत झाला असतां महान् बाहू मत्त गजा सारखा गमन करणारा, कौरवांस अभय देणारा, ज्याच्या जन्मकाळीं द्रोणांनीं हजारों गायी ब्राह्मणास दिल्या, ज्यानें उत्पन्न होतांच उच्चैश्रवा अश्वासारखा शब्द केला तेणेंकरून भूमिकंपित झाली, तो नाद ऐकून आकाशवाणी झाली कीं, हा अश्वत्थामा या नामें विख्यात होईल तो हा अश्वत्थामा संग्रामामध्यें गर्जना करितो ज्यास धृष्टद्युम्नानें क्रूर कर्मेंकरून अनाथासारखा मारला त्याचा हा नाथ उभा आहे, माझ्या गुरूस धृष्टद्युम्नानें मारिलें त्याचा पुत्र अश्वत्थामा कधीं ही त्याची उपेक्षा करणार नाहीं. हे धर्मराजा, तूं धर्मज्ञ असून राज्य प्राप्ति करितां व्यर्थ गुरूस मारिलेंस हा मोठा अधर्म केलास जशी वालीच्या वधाविषयीं रामाची अपकीर्ति झाली तशी द्रोणवधानें तुझी अपकीर्ति चिरकाल राहील, सर्व धर्म संपन्न माझा शिष्य जो धर्मराज तो कधीं मिथ्या भाषण करणार नाहीं असा तुझ्यावर विश्वास ठेऊन आचार्य तुजला विचारण्यास आला असतां तूं असत्य भाषण केलेंस कुंजर हीं अक्षरें अस्पष्ट बोलून अश्वत्थामा मरण पावला हें स्पष्ट बोललास नंतर तुझ्या वाक्यावर तो शस्त्र ठेऊन पुत्रशोकानें विन्मुख झाला त्यास अधर्मानें धृष्टद्युम्नानें मारिलें आतां सामर्थ्य असेल तर धृष्टद्युम्नाचें रक्षण कर. आज ज्याचा पिता धृष्टद्युम्नानें मारला तो आज आपल्याशीं युद्ध करूं लागला असतां आपण धृष्टद्यु-

म्नाच्या संरक्षणास समर्थ होणार नाहीं. अरे मी आरोळ्या मारून सांगत असतां आपला धर्म सोडून शिष्यानें गुरूस मारिलें जेव्हां त्याणें आमचें वाक्य ऐकिलें नाहीं त्याकाळींच यास विकार प्राप्त झाला आणि हा अधर्म मोठा घडला.जो प्रीतीकरून आह्मांस पित्यासमान धर्मानें पहात असे त्यास थोडक्याच काळाचें सुख देणारें राज्य या करितां मारविलें. धृतराष्ट्रानें पुत्रांसहवर्तमान सर्व पृथ्वी भीष्म व द्रोण यांच्या स्वाधीन केली तथापि द्रोणाचार्य आह्मांस पुत्रासमान् पहात असे मला तर विशेषें करून पुत्रा पेक्षां अधिक पाही आचार्य तुझ्या व माझ्या मुखाकडे पाहून उगाच राहिला असतां यास धृष्टद्युम्नानें मारिला नाहीं तर युद्ध करित असतां मारण्याचें सामर्थ्य इंद्रासही नव्हतें आचार्य निरंतर आह्मांवर उपकार करणारा त्याचा द्रोह अल्प राज्य प्राप्ती करितां केला हर हर आह्मीं हें मोठें दारुण कर्म केलें. माझा गुरु द्रोण असें जाणत होता कीं: माझ्या प्रेमानें पुत्र, बंधु, पितर, स्त्रिया, जीवित्व यांचाही पार्थ त्याग करील; परंतु मी राज्य लोभी होऊन धृष्टद्युम्न मारीत असतां उपेक्षा केली त्या पापाच्या योगानें आतां मी अधोमुख नरकांत पडेन तस्मात् आतां मरण आलें तरी बरें जिवंत असून सुख नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

१९७. अध्याय एकशें सत्याण्णव:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, असें अर्जुनाचें वाक्य ऐकून भीमसेन क्रोधानें बोलला हे अर्जुना, जसा अरण्य गत मुनि धर्मयुक्त भाषण करतो तसें तुला भाषण योग्य नाहीं तूं क्षत्रिय आहेस क्षत्रियकुलांत झालेल्या पुरुषानें साधु, स्त्रिया इत्यादिकांचें अरि वधानें रक्षण केलें असतां धर्म, यश, श्री, पृथ्वी यांस पावून क्षत्रिय होतो तो तूं क्षत्रिय, गुणानीं संपन्न असून अविद्वानासारखें बोलतोस हें तुला शोभत नाहीं, अर्जुना, तुझा इंद्रा सारखा पराक्रम जसा महोदधि आपली मर्यादा टाकित नाहीं, तसा तूं आपली मर्यादा सोडित नाहींस तेरावर्षांचा अधर्म पाठीमागें टाकून धर्माच्या गोष्टि सांगतोस तुझें मन धर्मा विषयीं दैवयोगें करून प्रवृत्त झालें. अरे तूं धर्म प्रवृत्त तुझें राज्य अधर्मानें ग्रहण केलें, द्रौपदीस शत्रूनीं धरून सभेमध्ये आ-

णिली, वृक्षवल्कलें देऊन वनांत घालिवलें, तेरावर्षेंपर्यंत शत्रूनीं आपणांस अपूज्यमान् केलेले असतांही क्रोधाचीं स्थानें ही वेळपर्यंत मी सहन केलीं आतां तूं धर्मवाक्य बोलतोस तें ऐकिलें सर्व आमच्या राज्याचें हरण करणारा क्षुल्लक यास मीच मारीन, आह्मी युद्धास आलों तेव्हां तूंच सांगितलेंस आणि आतां यथा शक्तीनें युद्ध करीत असतां तूंच आमची निंदा करतोस त्यापेक्षां आह्मीं तुझें ऐकत नाहीं आह्मी भयपीडित झालों असतां छिद्रावर जसें क्षारोदक शिंपडतात तसें तूं आह्मांस बोलतोस तुझ्या वाग्बाणानीं आमचीं हृदयें विदीर्ण झालीं तूं धार्मिक असून तूं हा बहुत अधर्म जाणत नाहींस आमची प्रशंसा न करितां अश्वत्थाम्याची प्रशंसा करतोस हें काय? हे अर्जुना, क्रोधानें मी पृथ्वी विदारण करीन महान् जड गदा घेऊन पर्वतासारख्या राजांचें चूर्ण करून टाकीन, कौरवांचा पराभव करीन असा मी बंधु तुला असून द्रोणपुत्राचें भय कां दाखवितोस? त्याणें किती जरी भय दाखविलें तथापि मी भिणार नाहीं तुला पाहिजे तर बंधुसहवर्तमान् उभा रहा मी हस्तामध्यें गदा घेऊन एकटाच यास जिंकितों असें ऐकतांच अर्जुन क्रुद्ध झालेला पाहून धृष्टद्युम्न बोलला हे अर्जुना, विचारवान् पुरुषास ब्राह्मणाचीं कर्मे विदित आहेत याजन, अध्यापन, दान, यजन, प्रतिग्रह, अध्ययन या सहा कर्मांतून द्रोणाचें कर्म कोणतें हें जाणून मी त्यास मारिलें द्रोणास मी मारलें ह्मणून अश्वत्थाम्यानें भयंकर नाद करून गर्जना केली ह्मणून त्याचें काय आश्चर्य वाटतें? आह्मी जर आमचे प्राणास समर्थ नसलों तर तो आह्मांस मारील तूं धार्मिक असून गुरु घाति असें बोललास तर त्याच्या वधा करितांच अग्नी पासून मी द्रुपदकुलीं उत्पन्न झालों जो आमच्याशीं युद्ध करील तो कार्य कर्ता अथवा अकार्य कर्ता असो आह्मीं ओळखत नाहीं त्याचा वधमात्र करूं, जो क्रोध पावून अनस्त्रवेत्ते यांस ब्रह्मास्त्रें करून मारतो तोसर्वोपायानें वधास कसा योग्य नाहीं? विरुद्ध कर्मानें आचरण करणारा तो धर्मवेत्ते पुरुषांस विषासारखा दिसतो हें तूं जाणत असतां अर्जुना कां माझी निंदा करतोस? प्रळय काळींच्या अग्नीसारखा भयंकर जो द्रोणाचार्य याचें शिर मी कृंतन केलें अ-

सनां माझी प्रशंसा कां करीत नाहींस ज्यानें माझे बांधव मारिले त्याच्या मी मस्तकाचा छेद केला; परंतु माझा क्रोध अर्जून शांत झाला नाहीं असें तूं जयद्रथास कपटानें मारिलेंस तसें मी आचार्यांस मारिलें नसतां तूं जें मला बोलतोस हें मर्मी लागल्यासारखें होतें आपला प्रत्यक्ष आजा भीष्म यास मारून धर्म झाला आणि मी शत्रूस मारिलें हा अधर्म केला असें मानितोस कीं काय मी सर्व क्षमा करतों माझें व आचार्यांचें परंपरागत वैर आहे हें सर्व लोक जाणतात तुम्ही मात्र जाणत नाहीं शिष्यद्रोही पापी गुरु होता तो मारिला तूं आतां संग्राम कर तुझा आतां विजय होईल. अ. वि. या अ. आ.

१९८. अध्याय एकशें अठ्ठ्याण्णव. - धृतराष्ट्र म्हणतो हे संजया, ज्यानें सांग वेद यथान्यायें करून अध्ययन केलें, त्या साक्षात् धनुर्वेद प्रतिष्ठित त्या द्रोणास नीचात्मा जो धृष्टद्युम्न यानें मारिलें त्याजवर जे क्रोध करीत नाहींत त्यांस धिःकार असो. हे संजया, धृष्टद्युम्नाचें भाषण ऐकून पांडव व सर्व सैनिक यानीं काय भाषण केलें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, धृष्टद्युम्नाचें भाषण ऐकून सर्व सैनिक उगीच उभे राहिले अर्जुनानें धृष्टद्युम्नाकडे कटाक्षानें पाहून धिक् धिक् असें भाषण केलें. धर्मराज, भीमसेन, नकुळ सहदेव, श्रीकृष्ण हे खिन्न झाले. नंतर सात्यकि बोलला अरे हा पापी पुरुष, अकल्याण भाषण करणारा, नराधम, याचा वध करण्यास येथें कोणी नाहीं कीं काय? ब्राह्मण जसे चांडाळास पापकर्मे करून निंदितात तसे सर्व पांडव धृष्टद्युम्नाची निंदा करीत. हे दुष्टा, असें पाप करून या सभेंत तूं कसा बसलास? अरे धृष्टद्युम्ना, तुझ्या मस्तकाचे व जिव्हेचे शंभर तुकडे कसे होत नाहींत, गुरु अकार्य करीत नसतां हे क्षुल्लका त्यास मारिलेंस त्या पापाच्या योगानें तुझें नरकांत पतन कसें होत नाहीं. तूं आपले पुढील व मागील सात पुरुष रौरवांत घातलेस. हे कुलघातका, भीष्माविषयीं तूं जें अर्जुनास बोललास त्या काळींच अर्जुनानें तुझा वध करावयाचा होता, भीष्मवध तरी तुझा बंधु जो शिखंडि यानें न केला पांचालपुत्रा, वांचून पृथ्वीवर पाप कर्म करणारे दुसरे कोणी नाहींत, आज बोललास तें बोललास पुनः माझ्या समक्ष असें बोलशील तर वज्रा-

णिली, वृक्षवल्कलें देऊन वनांत घालिवलें, तेराव्येपर्यंत शत्रूनीं आपणांस अपूज्यमान् केलेले असतांही क्रोधाचीं स्थानें ही वेळपर्यंत मी सहन केलीं आतां तूं धर्मवाक्य बोलतोस तें ऐकिलें सर्व आमच्या राज्याचें हरण करणारा क्षुल्लक यास मीच मारीन, आह्मीं युद्धास आलों तेव्हां तूंच सांगितलेंस आणि आतां यथा शक्तीनें युद्ध करीत असतां तूंच आमची निंदा करतोस त्यापेक्षां आह्मीं तुझें ऐकत नाहीं आह्मीं भयपीडित झालों असतां छिद्रावर जसें क्षारोदक शिंपडतात तसें तूं आह्मांस बोलतोस तुझ्या वाग्बाणानीं आमचीं त्दयें विदीर्ण झालीं तूं धार्मिक असून तूं हा बहुत अधर्म जाणत नाहींस आमची प्रशंसा न करितां अश्वत्थाम्याची प्रशंसा करतोस हें काय? हे अर्जुना, क्रोधानें मी पृथ्वी विदारण करीन महान् जड गदा घेऊन पर्वतासारख्या राजाचें चूर्ण करून टाकीन, कौरवांचा पराभव करीन असा मी बंधु तुला असून द्रोणपुत्राचें भय कां दाखवितोस? त्याणें किती जरी भय दाखविलें तथापि मी भिणार नाहीं तुला पाहिजे तर बंधुंसहवर्तमान् उभा रहा मी हस्तामध्यें गदा घेऊन एकटाच यास जिंकितों असें ऐकतांच अर्जुन क्रुद्ध झालेला पाहून धृष्टद्युम्न बोलला हे अर्जुना, विचारवान् पुरुषास ब्राह्मणाचीं कर्में विदित आहेत याजन, अध्यापन, दान, यजन, प्रतिग्रह, अध्ययन या सहा कर्मांतून द्रोणाचें कर्म कोणतें हें जाणून मी त्यास मारिलें. द्रोणास मी मारलें ह्मणून अश्वत्थाम्यानें भयंकर नाद करून गर्जना केली ह्मणून याचें काय आश्चर्य वाटतें? आह्मीं जर आमचे त्राणास समर्थ नसलों तर तो आह्मांस मारील तूं धार्मिक असून गुरु घाति असें बोललास तर त्याच्या वधा करितांच अग्नी पासून मी द्रुपदकुलीं उत्पन्न झालों जो आमच्याशीं युद्ध करील तो कार्य कर्ता अथवा अकार्य कर्ता असो आह्मीं ओळखत नाहीं त्याचा वधमात्र करूं, जो क्रोध पावून अनस्त्रवेत्ते यांस ब्रह्मास्त्रें करून मारतो तो सर्वोपायानें वधास कसा योग्य नाहीं? विरुद्ध कर्माचें आचरण करणारा तो धर्मवेत्ते पुरुषांस विषासारखा दिसतो हें तूं जाणत असतां अर्जुना कां माझी निंदा करतोस? प्रळयकाळींच्या अग्नी सारखा भयंकर जो द्रोणाचार्य याचें शिर मी कृंतन केलें अ-

सनां माझी प्रशंसा कां करीत नाहींस ज्यानें माझे बांधव मारिले त्याच्या मी मस्तकाचा छेद केला; परंतु माझा क्रोध अजून शांत झाला नाहीं जसें तूं जयद्रथास कपटानें मारिलेंस तसें मी आचार्यास मारिलें नसतां तूं जें मला बोलतोस हें मर्मी लागल्या सारखें होतें आपला प्रत्यक्ष आजा भीष्म यास मारून धर्म झाला आणि मी शत्रूस मारिलें हा अधर्म केला असें मानितोस कीं काय मी सर्व क्षमा करतों माझें व आचार्यांचें परंपरागत वैर आहे हें सर्व लोक जाणतात तुह्मी मात्र जाणत नाहीं शिष्यद्रोही पापी गुरु होता तो मारिला तूं आतां संग्राम कर तुझा आतां विजय होईल. अ. वि. या अ. आ.

१९८. अध्याय एकशें अठ्याण्णव:- धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, जानें सांग वेद यथान्यायें करून अध्ययन केलें, ज्याचाठायीं साक्षात् धनुर्वेद प्रतिष्ठित त्या द्रोणास नीचात्मा जो धृष्टद्युम्न याणें मारिलें त्याजवर जे क्रोध करीत नाहींत त्यांस धिःकार असो. हे संजया, धृष्टद्युम्नाचें भाषण ऐकून पांडव व सर्व सैनिक यानीं काय भाषण केलें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, धृष्टद्युम्नाचें भाषण ऐकून सर्व सैनिक उगेच उभे राहिले अर्जुनानें धृष्टद्युम्नाकडे कटाक्षानें पाहून धिक् धिक् असें भाषण केलें. धर्मराज, भीमसेन, नकुळ सहदेव, श्रीकृष्णादि लज्जित झाले. नंतर सात्यकि बोलला अरे हा पापी पुरुष, अकल्याण भाषण करणारा, नराधम, याचा वध करण्यास येथें कोणीं नाहीं कीं काय? ब्राह्मण जसे चांडालास पापकर्में करून निंदितात तसे सर्व पांडव धृष्टद्युम्नाची निंदा करीत. हे दुष्टा, असें पाप करून या सभेंत तूं कसा बसलास? अरे धृष्टद्युम्ना, तुझ्या मस्तकाचे व जिव्हेचे शंभर तुकडे कसे होत नाहींत, गुरु अकार्य करीत नसतां हे क्षुल्लका त्यास मारिलेंस त्या पापाच्या योगानें तुझें नरकांत पतन कसें होत नाहीं, तूं आपले पुढील व मागील सप्त पुरुष रौरवांत घातलेस, हे कुलघातका. भीष्माविषयीं तूं जें अर्जुनास बोललास त्या कालींच अर्जुनानें तुझा वध करावयाचा होता, भीष्मवध तरी तुझा बंधु जो शिखंडि याणें च केला पांचालपुत्रां वाचून पृथ्वीवर पाप कर्म करणारे दुसरे कोणी नाहींत, आज बोललास तें बोललास पुनः माझ्या समक्ष असें बोलशील तर वज्रा-

सारख्या दृढ गदेनें तुझें डोकें फोडून टाकीन तूं ब्रह्महत्या करणारा तुझें मुख जे पहातात ते सूर्य दर्शनानें दोष मुक्त होतात हे दुष्टा, उभा रहा उभा रहा आणि माझ्या गदेचा प्रहार सहन कर तुझे गदापात मी अनेक सहन करीन. असें ऐकून धृष्टद्युम्न बोलला हे सात्यके, जो दुष्ट पुरुष असतो तो साधु पुरुषाचा असाच तिरस्कार करतो पातकी जन क्षमा पावण्यास योग्य नाहीं. क्षमावानानें पापात्मा जिंकिला आहे तूं क्षुल्लक, नीचात्मा नखापासून शिखापर्यंत पापानें भरलेला असून मला बोलण्याची कशी इच्छा धरतोस. हे सात्यकि, अर्जुनानें भूरिश्रव्याचा भुज तोडून तुझें संरक्षण केलें तरी तूं भूरिश्रव्यास मारिलेंस याहून पाप कर्म तें कोणतें, आचार्य संग्राममध्यें यथा शक्तीनें युद्ध करीत असतां मी त्यास मारिलें तेव्हां हे दुष्टा, हें पाप कर्म झालें काय? भूरिश्रव्यानें ज्या काळीं तुला दडपिलें होतें त्यावेळेस तूं शूर आणि बलाढ्य होतास तर त्यास कां मारिलें नाहींस जेथें जेथें पांडवांच्या सेनेचा द्रोण पराभव करी तेथें तेथें मी जाऊन त्याजपासून सर्वांचें रक्षण करीं असें असतां तूं चांडाला सारिखें कर्म करून मलाच बोलतोस. हे यादवकुलाधमा, असें पुनः माझ्या पुढें बोलूं नको उगाच रहा नाहीं तर आजच यमलोकांस पाठवीन. हे मूर्खा, केवळ धर्मानेंच युद्ध होत नाहीं, आतां कौरवांच्या अधर्मानें वर्तन सांगतों ऐक. पूर्वी कौरवांनीं धर्मराजास अधर्मानें द्यूतांत फसविलें, तशीच द्रौपदी क्लेशित केली, पांडवांस द्रौपदी सहवर्तमान वनांत घालविलें. अरे मूर्खा, राज्यही अधर्मेकरून हरण केलें, युद्धा करितां शल्य पांडवांकडे येत असतां शत्रूनें अधर्मानें आपले कडे नेला, इकडेही अधर्मानें भीष्म मारिला, तूंही अधर्मानेंच भूरिश्रवा मारिलास, धर्म व अधर्म जाणण्यास दुर्घट आहे यास्तव तुला सांगतों कीं, व्यर्थ मरूं नको युद्ध कर. अशीं धृष्टद्युम्नाचीं क्रूर भाषणें ऐकून सात्यकि क्रोधानें हातामध्यें महान् गदा घेऊन श्वासोच्छ्वास टाकीत धृष्टद्युम्नावर धांवला हें पहातांच कृष्णानें त्यांचें निवारण करण्यास भीमसेनास सांगितलें असतां भीमसेनानें आपले रथावरून उडी टाकून सहावे पावलावर सात्यकीस धरिलें तथापि सात्यकि पुनः त्याचे हातांतून सुटून वाऱ्या सारखा जाऊं लागला, पुनः भीमसे-

नानें मोठ्या वेगानें जाऊन सहावे पावलावर त्यास धरिलें असतां पुनःसात्यकि भीमसेनास ओढीत चालला हें पाहून सहदेवानें मधुर वाणीनें सात्यकीस शांत केलें असतां धृष्टद्युम्न बोलला हे भीमा. युद्धानें मदोन्मत्त झालेला जो सात्यकि यास सोड त्यास माझ्यावर येऊंदे जों पर्यंत माझ्या भल्लबाणें करून याचा वेग शांत झाला नाहीं तोंपर्यंत याची युद्धश्रद्धा व जीवित्व राहील जें कार्य करावयाचें तेंच हें कार्य आज उपस्थित झालें आहे आतां अर्जुन कौरवांचें निवारण करो मी बाणें करून याचें डोकें फोडतों असें ऐकून सात्यकीस भीमसेनानें आपल्या बाहूंनं धरल्यामुळें त्याचा सुटण्याचा इलाज चालेना ह्मणून तो उगीच उभा राहिला. नंतर धर्मराज व श्रीकृष्ण याणीं उभयतांचें निवारण करून पुनः सर्व योद्धे युद्धास गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९९. अध्याय एकशें नव्याण्णव--: संजय ह्मणतो हे राजा, नंतर द्रोणपुत्र अश्वत्थामा संग्रामामध्यें शत्रूंचा वध करण्यास सिद्ध होऊन महान् गर्जना करीत दुर्योधनास प्रतिज्ञा ऐकवूं लागला हे राजा, आचार्य हाच युद्धाचा अंत झाला असो आतां धर्मकवच्याचा आश्रय केलेला जो धर्मराज याच्या सैन्याचा समग्र लोक महान असतां नाश करितो व मूर्ख जो धृष्टद्युम्न यास पांचालां सहवर्तमान जिंकितो तूं आतां आपली सेना माघारी फिरीव असें ऐकून दुर्योधनानें सर्व सेना माघारींफिरवली आणि सैन्यामध्यें नानाप्रकारच्या वाद्यांचे गजर केले. नंतर दोन सागराचा जसा संगम होतो तसा कौरव पांडव यांच्या सैन्याचा संगम होऊन युद्धास आरंभ झाला. नंतर अश्वत्थाम्यानें पांचाल व पांडव यांच्या सैन्याच्या नाशाचे उद्देशानें नारायणास्त्राचा प्रयोग केला असतां त्याज पासून हजारों बाण उत्पन्न होऊन पांडव सैन्याचा नाश करीत तें दिशा व आकाश यांस वेष्टूं लागले दोन घटिकेंत सूर्याच्या किरणा प्रमाणें त्या अस्त्राचें तेज प्रगट झालें. नंतर अन्यही कित्येक अस्त्रें उत्पन्न होऊन सर्व सेना व्याकुळ झाली. जसजसे पांडवांचे योद्धे युद्ध करीत तसतसें तें अस्त्र वाढत चाललें नारायणास्त्राच्या योगानें हजारों योद्धे व क्ष-

मान् होऊन संग्रामामध्यें अग्नीनें हुत झाल्या साररवी त्यांची अवस्था झाली, त्या अस्त्राच्या योगें सर्व सैन्य पळूं लागलें हें पाहून धर्मराज बोलला हे अर्जुना, मी धृष्टद्युम्नास सांगतों कीं, पांचालां सहवर्तमान् तूं पलायन कर. सात्यके, तूंही आपले अंधक वृष्णी यां सहवर्तमान घरीं जा. वासुदेव सर्व लोकांचें कल्याण करतो तो आमचें त्राण करील. सर्व सैनिकांस सांगतों कीं संग्राम करूंनये आचार्य उत्तम स्वभावाचा असतांही त्यास मी मारविला तस्मात् आज आपल्या बंधूं सहवर्तमान् मी अग्नीमध्यें प्रवेश करतों अर्जुना मजविषयीं तुझी कामना पूर्ण होवो ज्या द्रोणानें बालक जो अभिमन्यु त्यास मारविलें तसेंच ज्यानें द्रौपदी सभेंत आणून दासी व्हावें असें ठरविलें असतां त्यांचें निवारण केलें नाहीं, ब्रह्मास्त्रवेत्त्या द्रोणानीं माझ्या जयाची इच्छा करणारे जे योद्धे त्यांस मारिले आम्हीं राज्यापासून भ्रष्ट होऊन वनांस जात असतां विदुरादिकानीं निषेध केला तथापि आमच्या पाठीमागून दुर्योधनानें पाठविलेल्या सैन्यास द्रोणानें अनुमोदन दिल्हें निषेध केलाच नाहीं असा आमचेठायीं प्रीति करणार जो आचार्य तो मरण पावला तस्मात् मीही मरण पावतों असें धर्मराज भाषण करीत असतां श्रीकृष्ण सर्व सैनिकांस बोलले हे योद्दे हो, अरे आतां लौकर शस्त्रें टाकून आपआपल्या वाहना वरून रवालीं उतरा हाच उपाय या अस्त्राच्या शांत्यर्थ आहे असें केलें असतां अश्वत्थामा तुम्हांस मारणार नाहीं जसे जसे योद्धे या अस्त्राचें निवारण करण्यास प्रवृत्त होतील तस तसें कौरवांस अधिक बल प्राप्त होईल. पूर्वीं परशुरामानें याच अस्त्रें करून सर्व पृथ्वी निःक्षत्रिय केली. नंतर तेंच हें अस्त्र परशुरामापासून आचार्यांस प्राप्त झालें हें महान् अस्त्र. दुसरे कोण त्याही उपायानें शांत व्हावयाचें नाहीं. असें ऐकून सर्वांनीं आप आपलीं अस्त्रें ठेवून वाहना रवालीं उतरण्याचा विचार केला हें पाहून भीमसेन बोलला हे योद्धे हो, कोणीही संग्रामामध्यें शस्त्रें टाकूं नका. मी द्रोणपुत्राचें निवारण करतों अथवाही सुवर्णभूषित गदा घेऊन अश्वत्थाम्याच्या अस्त्राचें निवारणार्थ काळासाररवा सैन्यांत संचार करतों, जर नारायणास्त्रास प्रतियोद्धा को-

णी नाहीं असें तुमचें ह्मणणें आहे तर पहा आतां कौरव पहात असतां युद्ध करतों असें भाषण करून अर्जुनास बोलला हे पार्था, तूं जर गांडीव ठेवशील तर तुला चंद्रा सारखा कलंक लागेल. असें ऐकून अर्जुन बोलला हे भीमसेना, नारायणास्त्राच्या शांत्यर्थ मला गांडीव ठेवणें पडलें तरी ठेवीन. गाय, ब्राह्मण यांच्या संरक्षणार्थ चंद्रा सारखा मला कलंक लागला तरी चिंता नाहीं. असें ऐकून भीमसेनानें महान् गर्जना करीत बाण वृष्टीनें अश्वत्थाम्यास आच्छादन केलें. नंतर भीमसेनाचें कर्म पाहून द्रोणपुत्रानें प्रदीमाग्र, विषवमन करणाऱ्या बाणांची त्याजवर दृष्टि केली तेणें करून भीमसेन अगदी अदृश्य होऊन गेला. द्रोणपुत्राचें अस्त्र भीमसेनावर दृष्टिंगत झालेलें पाहून सर्व पांडवांचे योद्धे भयानें आपलीं अस्त्रें खालीं ठेवून वाहना पासून खालीं उतरले असतां तें अस्त्र त्यांस कांहीं बाधा न करितां भीमसेनाच्याच मस्तकावर प्रदीप्त झालें. अ. वि. या. अ. आ.

२००. अध्याय दोनशें :- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, भीमसेन अस्त्राच्या तेजानें व्याप्त झाला हें पाहून त्यानें निवारणार्थ अर्जुनानें वारुणास्त्राचा प्रयोग केला त्याकाळीं अर्जुनाच्या हस्तकौशल्यानें सुटलेलें वारुणास्त्र भीमसेनावर पडतांच तें तेज व अश्वत्थाम्याच्या अस्त्राचें तेज एकत्र होऊन भीमसेन, अश्व, सारथि, ध्वज यांसहवर्तमान् व्याप्त होऊन दिसेनासा झाला हें पाहून पांडवांचे योद्धे भयाधीन झाले आणि धर्मराज प्रभृति महारथी अस्त्रें टाकून विन्मुख झाले. कृष्णार्जुनही रथाखालीं उड्या टाकून भीमाजवळ न्यस्त शस्त्र धांवले ह्मणून तें अस्त्र तत्काल शांत झालें वारुणास्त्राच्या योगें व कृष्णार्जुनाच्या वीर्येंकरून अस्त्र शांत झालें असतां दोघांनीं जाऊन भीमास रथाखालीं ओढून त्याचीं सर्व आयुधें आकर्षण केलीं. तथापि भीमसेन गर्जना करून पुनः युद्धाची इच्छा करूं लागला असतां तें अस्त्र ही वाढूं लागलें त्याकाळीं श्रीकृष्ण बोलले हे भीमा, आह्मीं तुझें निवारण करीत असतां तूं आयुधां पासून माघारा फिरत नाहींस हें काय? जर तुला हें कौरव सैन्य युद्धानें जिंकाव-

याचें आहे तर जिंक आह्मीं युद्ध करून त्यांचा पराजय करूं आतां आह्मीं रथाखालीं उतरलों सर्वांनी ही शस्त्रें ठेविलीं तस्मात् तूं ही रथाखालीं लौकर उतर असें बोलून कृष्णानीं त्यास रथाखालीं उतरविलें. नंतर भीमसेनानें रथाखालीं उतरून शस्त्रें ठेविलीं असतां तत्काल तें नारायणास्त्र शांत झालें दैवयोगानें दुःसह तेज शांत झालें असतां दिशा स्वच्छ झाल्या, वायु शीतळ सुटला, वाहनें हर्षित झालीं, भीमसेन अस्त्र शांत झाल्यानंतर शोभायमान् दिसूं लागला. नंतर पांडवांचें सैन्य तुझ्या पुत्रांस मारण्याच्या इच्छेनें उभें राहिलें. हें पाहून दुर्योधन बोलला हे अश्वत्थामा, पुनः या अस्त्राचा प्रयोग कर कारण पांडवपांचाल पुनः युद्धाच्या इच्छेनें उभे राहिले आहेत, असें ऐकून अश्वत्थामा भाषण करतो हे राजा, दोन वेळ हें अस्त्र सोडावयाचें नाहीं जो या अस्त्राचा दोन वेळ प्रयोग करील त्यास हें मारील या अस्त्राचा घात वासुदेवानें केला. नाहींपेक्षां शत्रूंचा वधच झाला असता. असें ऐकून दुर्योधन बोलला हे आचार्यपुत्रा, हें अस्त्र दोनवेळ सोडावयाचें नाहीं तर दुसऱ्या अस्त्रें करून तरी गुरुघातकी यांचा वध करावा. तुझ्या जवळ त्र्यंबका सारखीं दिव्य अस्त्रें आहेत, तुमच्या पुढें इंद्रही उभा रहावयास समर्थ नाहीं मग इतरांची कथा काय? असें संजयानें भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, द्रोणाचार्य कपटानें मारल्यानंतर दुर्योधनानें अश्वत्थाम्यास पूर्वी उपदेश केला असतां त्यानें काय केलें? व नारायणास्त्र शांत झालें असतां पुनः पांडव युद्धास उभे राहिल्या नंतर काय झालें? तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय सांगतो हे राजा, सिंहाच्या पुच्छाचें चिन्ह ज्याच्या ध्वजस्तंभीं असा जो अश्वत्थामा यानें धृष्टद्युम्नास वीस बाण करून वेध केला तेव्हां धृष्टद्युम्नानें त्रेसष्ट बाणें करून अश्वत्थाम्यास वेध केला आणि वीस बाणानीं सारथि विद्ध करून चार बाणानीं चारी अश्व मारिले. नंतर अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नास बाणवृष्टीनें आच्छादन केलें दोन बाणानीं ध्वज व धनुष्य तोडलें आणि दुसऱ्या कित्येक बाणानीं अश्व व सारथि मारून त्याचे अनुचर पांचाल यांस पळविलें. हें पाहून सात्यकीनें आपला रथ अश्वत्थाम्या जवळ आ-

णिला आणि आठ बाणें करून अश्वत्थाम्यास पीडित केलें पुनः वीस बाणांनीं त्यास वेध करून चार बाणांनीं चारी अश्व व एका बाणानें सारथि वेधिला तेव्हां अश्वत्थामा बोलला हे सात्यके, हा गुरुघाती धृष्टद्युम्न याचें कर्म मी जाणतों. यास मी ग्रस्त केलें असतां तूं याचें रक्षण करण्यास समर्थ नाहींस, हे सात्यके, मी सत्याची व तपाची शपथ करतों कीं, सर्व पांचाळांस मारल्या वांचून मी कधीं शांति पावणार नाहीं. असें भाषण करून त्यानें सूर्यकिरणा सारखा तीक्ष्ण बाण टाकिला असतां तो बाण सात्यकीच्या कवचा सुद्धां देहास फोडून भूमींत गेला त्याकाळीं सात्यकि विद्ध होऊन ध्वजस्तंभीं मूर्च्छित पडला. हें पहातांच सारथ्यानें सात्यकीचा रथ द्रोणपुत्रापासून दूर नेला. नंतर द्रोणपुत्रानें दुसरा बाण घेऊन धृष्टद्युम्नाच्या भिवयांत मारिला तेणें करून तो ध्वजस्तंभीं मूर्च्छित पडला हें पहातांच धर्मराजानें अर्जुन, भीमसेन, वृद्धक्षत्र, युवराज व मालव या पांच योद्ध्यांस द्रोणपुत्राशीं युद्ध करण्या करितां पाठविलें असतां त्या पांच योद्ध्यांनीं हाहाःकार शब्द करीत धनुष्य बाण घेऊन त्याजपासून पंचवीस पावलावर उभे राहून पांच पांच बाणांनीं त्यास वेध केला तेव्हां अश्वत्थाम्यानें तीक्ष्ण विषतुल्य पंचवीस बाणांनीं पांच ही योद्ध्यांचे पंचवीस बाण छेदिले आणि पौरवावर सात, मालवावर तीन, अर्जुनावर एक, भीमसेनावर सहा बाण टाकिले. पुनः अर्जुन प्रमुख्यांचे महारथ्यांनीं एकदांच पृथक् पृथक् बाणवृष्टि करून अश्वत्थाम्यास अगदीं व्यास करून टाकिलें असें युद्ध होत असतां अश्वत्थाम्यानें मालवाचे दोन्हीं भुज आणि शिर एकदांच तीन बाणें करून छेदन केलें. तसेंच पौरव राजास रथशक्तीनें ताडण करून त्याच्या रथाचे तिळा प्रमाणें तुकडे केले आणि भल्लबाणानीं त्याचे बाहू तोडून देहापासून शिर भिन्न केलें. तसेंच नीलकमळा सारखा जो चेदिराजा यास अश्वसारथ्यासहवर्तमान मृत्युलोकीं पाठविलें. मालव पौरव व यांस आपले समक्ष मारिले हें पाहून भीमसेनानें तीक्ष्ण बाणानीं अश्वत्थाम्यास आच्छादन केलें, ती बाणवृष्टि अश्वत्थाम्यानें दूर करून तीक्ष्णबाणानीं भीमास वेध केला असें उभयतांचें कांहीं वे-

ळ युद्ध होत असतां भीमसेनानें सुवर्णभूषित यमदंडासारख्या दहा बाणांनीं अश्वत्थाम्यास वेध केला असतां ते बाण त्याचा गळ्याच्या मूळप्रदेशीं स्कंधाचा भेद करून पृथ्वींत शिरले. तेणें करून अश्वत्थामा अति विव्हल होऊन ध्वजस्तंभाचा आश्रय करून स्तब्ध बसला नंतर दोनघटिकेनीं सावध होऊन अश्वत्थाम्यानें भीमावर शंभर बाण टाकिले भीमसेनानें ही अश्वत्थाम्यावर उग्रबाणांची वृष्टि केली असें दोघांचें युद्ध होत असतां भीमाचा अद्भुत पराक्रम सर्वांनीं पाहिला तो असा कीं, अश्वत्थाम्यास मारण्याच्या इच्छेनें पर्जन्यकालींच्या मेघासारखी त्यानें बाणवृष्टि केली असतां त्याचें धनुष्य इंद्रधनुष्यच काय! याप्रमाणें शोभूं लागलें. अश्वत्थाम्यानें भीमवधाकरितां परमतीक्ष्णबाण त्याजवर टाकिलेतों इतक्यांत ते आकाशांतच असतां भीमसेनानें त्यांचे तीन तीन तुकडे करून टाकिले. असा भीमसेनानें अश्वत्थाम्यापेक्षां अधिक पराक्रम करून हे अश्वत्थाम्या उभा रहा असें भाषण केलें. नंतर अश्वत्थाम्यानें अस्त्रगायेनें भीमसेनास वेधकरून त्याचें धनुष्य तोडिलें, त्याकाळीं भीमसेनछिन्नधन्वा झाला असतां त्यानें भयंकर शक्ति घेऊन मोठ्या वेगानें अश्वत्थाम्यावर टाकिली अश्वत्थाम्यानें ती शक्ति येत असतां आपलें हस्तलाघवदाखवीत कांहीं बाणांनीं छेदन केली इतक्या अवकाशांत भीमसेनानें दृढ धनुष्य घेऊन विशिखबाणानें अश्वत्थाम्यास वेध केला. नंतर अश्वत्थाम्यानें भीमसेनाच्या सारथ्याचे ललाटभागीं वेध केला असतां सारथि विव्हल होऊन मूर्छित झाला तेव्हां अश्वपलायन करून दूर गेले. हें पाहून अश्वत्थाम्यानें शंखनाद केला असतां सर्व पांचाल व भीमसेन धृष्टद्युम्नासटाकून पळाले. नंतर अश्वत्थाम्यानें त्यांच्या मागून बाणवृष्टि करून सर्व पांडवांचें सैन्य भयाभीत केलें. अ. वि. या अ. आ.

२०१. अध्याय दोनशें एक - संजयह्मणतो हे राजा, सैन्य भग्नझालेलें पाहून अर्जुन जयाच्या इच्छेनें अश्वत्थाम्याचें निवारण करण्यास सिद्ध झाला असतां त्यानें सैन्य द्रोणपुत्राच्या अग्रभागीं उभें राहिनासें झालें. मोठ्या यत्नानें श्रीकृष्ण व अर्जुन हे सैनिकहो उभे रहा. असें भाषण

करीत असतां कोणीही उभे राहिना तेव्हां एकटाच अर्जुन कांहीं सोमकाचे वीर व कांहीं मत्स्याचे वीर यांसहवर्तमान् मोठ्या त्वरेनें अश्वत्थाम्या जवळ येऊन बोलला हे अश्वत्थामा, जी तुझी शक्ति, जें ज्ञान, जें वीर्य, आणि दुर्योधनाचाठायीं प्रीति, आमचाठायीं द्वेष असेल तें सर्व माझ्या ठिकाणीं दाखवावेंस. जो द्रोणाचार्यांचा हंता धृष्टद्युम्न व केशवासहवर्तमान् मी उन्मत्त झालेला जो तूं त्या तुझ्या दर्पाचें हरण करतों. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, आचार्य पुत्र सन्मानास योग्य, बलवान्, निरंतर अर्जुनावर प्रीति करणारा त्यास असें भाषण अर्जुनानें पूर्वीं कधीं केलें नवतें आतां आपल्या सख्यास असें भाषण केलें याचें कारण मला सांग. असें ऐकून संजय सांगतो हे राजा, युवराज, वृद्धक्षत्र व मालव हे तिघे मरण पावले. धृष्टद्युम्न, सात्यकि व भीमसेन यांचा पराजय झाला व धर्मराजानेंही मर्मभेद करून नानाप्रकारचीं भाषणें केलीं इत्यादि कारणावरून अर्जुनास बहुत क्रोध आला त्या योगानें द्रोणपुत्रास अयोग्य व अप्रिय मर्मघाती भाषणें त्यानें केलीं. असा क्रोध पूर्वीं अर्जुनास कधीं आला नवता असें दुःख कधीही त्यास झालें नव्हतें त्या भाषणानीं अश्वत्थाम्यासही कृष्णार्जुनाविषयीं क्रोध आला आणि रणांगणीं सावध होऊन नेत्रांसही उदकस्पर्श करून देवांसही दुर्धर असें आग्नेय अस्त्र त्यानें अर्जुनावर टाकिलें तेव्हां आकाशामध्यें बाणांचा वर्षाव होऊन अग्नीसारिखें तेज अर्जुनावर पडूं लागलें त्या क्रूर अस्त्राच्या योगानें दिशा धुंद झाल्या सैन्यामध्यें राक्षस व पिशाच येऊन भयंकर शब्द करूं लागले, वायु घोर सुटला. सूर्याचें तेज शीतळ झालें, कावळे नानाप्रकारचे शब्द करूं लागले, मेघानीं रक्ताची वृष्टि केली, पशु पक्षी, ऋषी मुनि हे शांत असतां संतप्त झाले, ज्वर भरल्या सारखी त्रैलोक्याची अवस्था झाली, भूमींत निजलेले नाग अस्त्रतेजानें संतप्त होऊन श्वासोच्छ्वास टाकीत बाहेर येऊं लागले, जःळांतील प्राणी जळूं लागले, दिशाविदिशा, आकाश, भूमि समग्र स्थलापासून वायुवेगासारखे, अश्वत्थाम्याचे बाण येऊन वणव्यांत दग्ध झालेल्या वृक्षा सारखे शत्रूस दग्ध करून भूमीवर पडूं लागले. वृक्ष व शिखरें कां-

वाग्नीनें जशीं दग्ध होतात तशीं अश्वां सहित रथाचीं दंदेचीं हंदें दग्ध होऊ-
न पडलीं. अशी पांडवांची सेना दग्ध होतेहें पाहून तुझे योद्धे नाना प्रकार-
च्या वाद्यांचे गजर करूं लागले. हे राजा, जसें द्रोण पुत्रानें आतां अस्त्र सो-
डिलें तसें पूर्वीं कधीं पाहिलें नवतें व ऐकिलें नवतें. नंतर अर्जुनानें सर्वास्त्रा-
चें घात करणारें ब्रह्मदेवानीं निर्माण केलेलें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला तेणें-
करून दोन घटिकेनीं तें तम नाश पावलें. शांत वायु सुटला, दिशा स्वच्छ झा-
ल्या. त्या अस्त्रानें एक अक्षौहिणी पांडवांची सेना दग्ध होऊन सर्वांस बा-
की सेनेसहवर्तमान कृष्णार्जुन दिसूं लागले असतां पांडवांचे योद्धे हर्षित
होऊन शंख व दुंदुभीचे नाद करूं लागले. दोन्हीही सैन्यांत कृष्णार्जुन मर
ण पावले असा निश्चय झाला होता; परंतु त्यांस कांहीं दुःख न होतां बाहेर
येऊन त्याणीं शंख वाजविले तो नाद ऐकतांच पांडव हर्षित झाले. हें पाहून तु-
झे योद्धे दुःखसागरांत निमग्न झाले. कृष्णार्जुन मुक्त झाले हें पाहून अश्वत्था-
मा फारच दुःखित झाला आणि दोन घटिका हें आश्चर्य काय म्हणून चिंतन
करीत शोकांत निमग्न होऊन श्वासोच्छ्वास टाकीत रथाखालीं उतरून धि-
क् धिक् हें संपूर्ण मिथ्या आहे असें म्हणून पळत असतां इतक्यांत आर्द्र मे-
घा प्रमाणें कांति ज्याची वेदाचें स्थान साक्षात् धर्ममूर्तीच काय अशा व्या-
सास अग्रभागीं पहातांच त्यांस नमस्कार करून बोलला हे महाराज, तुम्हां-
स मी असें विचारतों कीं, ही माया आहे किंवा काय? याविषयीं माझा सं-
शय दूर करावा हें माझें अस्त्र सर्वघाती असून यापासून कृष्णार्जुन कसे
मुक्त झाले असें ऐकून व्यास बोलले हे अश्वत्थामा, जो नारायण नामक
पूर्वजांचाही पूर्वज तो विश्वकर्ता कार्यार्थ धर्माचा पुत्र झाला त्याणींच हिमा-
चल पर्वताचा आश्रय करून तीव्र तप केलें ऊर्ध्व बाहू करून साठ सहस्त्र व-
र्षे पर्यंत वायुभक्षण करीत तप केलें त्या तपोतेजानें स्वर्ग व पृथ्वी यांचे आ-
र्त पूर्ण झालें त्या सत्यतपेंकरून जेव्हां ते ब्रह्मासारखे निर्दोष झाले तेव्हां
जगतास कारण अणूहून अणु, महताहून महान्, सर्व नियंता, ज्ञानकर्मे-
द्रियांस चालन करणारा, स्थावरजंगमाचें उत्पत्तिस्थान, रुद्राक्षमाला धा-
रण करणारा इत्यादि विशेषणें करून युक्त असा जो शिव यास पाहून वासु-

देवास हर्ष झाला आणि पार्वतीसहवर्तमान् वर देणारा जो प्रभु यास नाराय-णानीं अभिवादन केलें व नानाप्रकारें स्तवन करून भाषण केलें हे वरेण्या-तुजपासून उत्पन्न झालेले भूतश्रेष्ठ आज भुवनाचें रक्षण करण्यास स-मर्थ आहेत. सुर, असुर, नाग, राक्षस, पिशाच इत्यादि सर्व जगत् तुझ्या पासून उत्पन्न झालें असें मी जाणतों. ज्योति, शब्द, आकाश, वायु, स्प-र्श, रस, उदक, गंध, भूमि, काल, ब्रह्मा, वेद, ब्राह्मण, स्थावर, जंगम, तुज पासून उत्पन्न झालें तस्मात् मी भक्त माझें संरक्षण कर. तूं मला जाणतोस यास्तव हिंसा करूं नको. व्यास ह्मणतात हे अश्वत्थामा, या प्रकारें नारायणाचा स्तव ऐकून भगवान् शिवानीं वर दिला हे नारायणा, माझ्या प्रसादानें मनुष्य, देव, गंधर्व, राक्षस, उरग, सर्प यामध्यें तूं अप्र-मेय बलाढ्य होशील. देव, असुर, नाग कोणी तुझें तेज सहन करणार ना-हींत. पिशाच, गंधर्व, यक्ष, राक्षस, सुपर्ण, नाग, विश्वेदेव, नानायोनि सं-भवदेव हेही तुला संग्रामामध्यें जिंकणार नाहींत. माझ्या प्रसादानें श-स्त्र, वज्र, अग्नि, वायु, आर्द्र, शुष्क, रस, स्थावर, इत्यादिकां पासून कधी-ही तुला पीडा होणार नाहीं कदाचित् तुझा व माझा संग्राम झाला असतां मलाही तूं जिंकशील. या प्रकारें पूर्वी नारायणास वर प्राप्त झाले तोच हा कृष्ण मायेनें जगत मोहन करीत संचार करतो त्याचाच तपापासून महा-मुनि नर झाला तोच अर्जुन यादेवाशीं तुल्य असें जाण हे नरनारायण यु-गायुगाचाठायीं उत्पन्न होतात. तूंही शंकराची प्रीति व्हावी ह्मणून निय-में करून देहास शुष्क केलेस. महा पुरुष भगवान् यास जप, होम, उपहार इत्यादिकें करून पूज्यमान् केलें असतां त्यानें तुला वर दिला. जन्म, कर्म, तप येणें करून तुझें व त्यांचें बहुत सान्निध्य झालें. तूं व नरनारायण या-णीं शिवाच्या लिंगानें पूजन केलें तो केशव रुद्र संभव असें जाणून जो लिंगाचे ठायीं पूजन करतो त्याचे ठायीं आत्मयोग, शास्त्रयोग निरंतर रहा-तात तो हा सर्व कर्ता यज्ञरूप श्रीकृष्णाच पुजावा कारण सर्व भूतभव अ-सें तें स्वयंभू लिंग, यांस जाणून जो निरंतर पूजन करतो त्यांजवर वृषभ-ध्वज प्रीति करतो. हे राजा, असें वेदव्यासाचें वाक्य ऐकून अश्वत्थाम्या-

नें रुद्रास बहु मानानें नमस्कार केला नसाच श्रीकृष्णास नमस्कार करून तो सैन्यांत माघारा आला आणि त्यानें युद्धाचा अवहार केला. नंतर पांडवानींही अवहार केला. पांच दिवस युद्ध करून चमूचा नाश करणारा, वेदवेदांग पारग द्रोणाचार्य ब्रह्मलोकीं गेले असतां तुझे पुत्र व योद्धे दीन झाले आणि पांडवांस महान् हर्ष झाला. अ. वि. या अ. आ.

२०२. अध्याय दोनशें दोन :- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, धृष्टद्युम्नानें अतिरथी द्रोणाचार्य मारला असतां माझे व पांडवांचे योद्धे यानीं काय केलें तें मला सांग. असें ऐकून संजय सांगतो हे राजा, अतिरथी द्रोणाचार्य मारिला असतां समग्र कौरव भग्न झाले. अर्जुनास आपला जय झाला म्हणून बहुत आश्चर्य झालें आणि अकस्मात् वेदव्यास आपले अग्रभागीं आलेले पाहून त्यांस साष्टांग नमस्कार करून तो बोलला हे महाराज, संग्रामामध्यें मी बाणेंकरून शत्रूंस मारित असतां पुढें अग्नी सारखा तेजस्वी, प्रज्वलित शूलधारण केलेला माझ्या अग्रभागीं एक पुरुष दिसतो आणि ज्याज्या दिशेस मी जातों त्यात्या दिशेस त्याणें जाऊन माझे शत्रु विदीर्ण केले असतां लोक म्हणतात कीं, हे अर्जुनानेंच मारिले. जो पायानीं भूमीस कधीच स्पर्श करीत नाहीं आणि हस्तांतून शूलही कधी सोडित नाहीं यास्तव हे भगवान् हा तेजस्वी शूलपाणी कोण? हें मला सांगा. असें ऐकून वेदव्यास सांगतात हे अर्जुना, प्रजापतीचा प्रथम तेजोमूर्ति सर्वलोकेश्वर नियंता जो शंकर तोच तूं पाहिलास तुझ्यावर प्रसाद करण्या करितां संग्रामामध्यें तुझ्या अग्रभागीं तोच चालत होता. हे अर्जुना, वरें समग्रांचे अंगावर रोमांच उभे रहातील अशा घोर संग्रामांत महाधनुर्धारी द्रोण, कर्ण, कृपाचार्य ज्या सेनेचे सेनापति त्या भयंकर सेनेच्या अग्रभागीं महेश्वर देव यावांचून कोणी पुढें उभे रहाण्यास समर्थ नाहीं त्या सारखा तीन लोकांत तेजस्वी दुसरा कोणी नाहीं त्याच्या गंधानें कित्येक शत्रु मूर्च्छित होऊन मरण पावले, कित्येक कंपित होऊन अधोभागीं पडले असा जो महादेव यास नमस्कार करीत स्वर्गीं देव वास करितात व दुसरें मनुष्य उमापतीस शरण जाऊन याला

कीं सुख भोगून परम गति पावतात ह्मणून हे कौंतेया, शांत जो शिव यांस नमस्कार कर संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, नंतर व्यासानीं रुद्र, शितिकंठ कनिष्ठ, सुवर्चा, कपर्दी, कराल, हर्यक्ष, वरद, याम्य, अव्यक्तकेश इत्यादि शिवांची शतनामें अर्जुनास सांगून भाषण केलें. हे अर्जुना, आतां त्या महादेवाचीं महान् महान् दिव्य कर्मे तुला सांगतों. यथाबुद्धि व यथा सुखें करून तो कंपित झाला असतां सुरासुर गंधर्व राक्षस हे लोकांमध्यें सुख पावत नाहीत. दक्षप्रजापतीनें यथाविधि सामोग्री सिध्द करून यज्ञास आरंभ केला असतां शिवानें क्रुध्द होऊन यज्ञास आरंभ केला. आणि सघोष बाण सोडून गर्जना केली तेणेंकरून देवादिकांस दुःख झालें. दक्ष यज्ञ भ्रष्ट झाला सर्व लोक धनुष्याच्या प्रत्यंच्येच्या नादानें सर्व लोक घाबरले. सुरासुर त्या बाणांच्या स्वाधीन होऊन पडले. उदकें क्षोभ पावलीं. पृथ्वी कंपायमान झाली. पर्वत शिखरें गळूं लागलीं, सर्व लोक अंधःकारेंकरून व्याप्त झाले. सूर्यासह वर्तमान सर्व तेजें नष्ट झालीं. पुनः शंकर हास्य करून यज्ञामध्यें पूषावर धांवला. आणि पुरोडाश भक्षण करते समयीं त्यांचे दांत पाडले. हें पाहातांच देव कंपित होऊन पळत असतां तीक्ष्ण बाण त्यांजवर शिवानें सोडले. तें पाहून सर्व देवांनीं महेश्वरास नमस्कार करून यज्ञावशिष्ट भाग कल्पिला, आणि भयानें सर्व शरण गेले. पुनः शिवानीं दक्षाचा यज्ञ सिध्दीस नेला. त्या दिवसापासून सर्व देव सुखी होऊन शिवाचें पूजन करूं लागले. पूर्वी असुरांचीं पुरें आकाशामध्यें लोखंड, रौप्य व सुवर्णाचीं होतीं. त्यांत सुवर्णाचें पुर कमलाक्षाचें, रजत पुर तारकाक्षाचें, लोखंडाचें पुर विद्युन्मालीचें होतें. त्या त्रिपुरांचा भेद करण्यास इंद्रही समर्थ न होतां कोणे एके कालीं सर्व देव रुद्रास शरण गेले, आणि बोलले कीं, हे महेश्वरा, हे त्रिपुरवासी असुर ब्रह्मदेव वरांनीं गर्वित होऊन आह्मांस पीडा करितात. यास्तव हे देवेशा, तुजवांचून दुसरा कोणी आमचें रक्षणास समर्थ नाहीं. देवांचे शत्रु जे दैत्य त्यांचा हे महादेवा, लोकर वध कर. न करशील तर हे समग्र प्राणीमात्रांचा नाश करतील. असें ऐकतांच शिवानीं त्यांचे हित करितां तथास्तु ह्मणून वधाची तयारी केली. गंधमादन व विंध्य हे दोन पर्वत ध्वज करून सागरांत पृथ्वीचा रथ केला. नागेंद्र शेषाचा अक्ष केला. चंद्रसूर्याचीं दोन चाकें केलीं

एकपत्र नाग व पुष्पदंत दसक याच्यायोगानें मलयाचलाचा स्तंभ केला. चार वेदांस अश्व करून सर्पांच्या लगामा केल्या. उपवेदांस उपअश्व केले. गायत्रीस रश्मी व ओंकारास चाबूक केला. ब्रह्मदेव यास सारथी केला. मंदराचलाचें गांडीव करून वासुकीची त्यास प्रत्यंचा केली. विष्णूस बाण करून भालस्थानीं अग्नीची योजना केली. वैवस्वत यम बाणाच्या पृष्ठभागीं स्थापला. याप्रकारें सिध्दता करून त्रिपुराच्या वधार्थ शिव उद्युक्त झाला असतां सुरासुर गंधर्व यांनीं त्याचा बहुत स्तव केला. नंतर शिव स्वस्तिकाख्य स्थानीं सहस्त्र वर्षेंपर्यंत बसले आणि अंतरिक्षपुरें ज्याकाळीं दृष्टीस पडलीं त्याकाळीं त्रिपर्वयुक्त त्रिशारण्य अशा बाणानें त्याचा एकाएकीं भेद केला. तो बाण पाहाण्यास पार्वती तेथें आली असतां भगवान महेश्वर याचा शिखाचें एक बालक होऊन पार्वतीच्या मांडीवर बसले. त्याकाळीं तें शिवाचें स्वरूप जाणण्याकरितां पार्वती देवांस ह्मणूं लागली कीं, हे काय जाणावें. इंद्रानें तें स्वरूप पाहून त्यास सहन न होतां वज्र घेऊन मारण्यास हात उगारला. त्याकाळीं प्रभूनीं क्रुध्द होऊन वज्रासहवर्तमान इंद्राचे हस्त स्तंभन केले. तेव्हां सर्व देव मोठ्या त्वरेनें ब्रह्मदेवास शरण गेले, आणि नमस्कार करून बोलले कीं, कोणीएक पंच शिखाचें महद्भुत पार्वतीच्या अंकावर बालरूप धारण केलेलें आह्मीं पाहिलें. परंतु तो कोण हें आह्मीं जाणलें नाहीं. यास्तव हे प्रभु आमचा ज्यानें पराभव केला व इंद्राचा हस्त ज्यानें स्तंभित केला, तो कोण? हें आह्मीं जाणावयाची इच्छा करतों असें ऐकून ब्रह्मदेव ध्यान करून बोलले कीं, तो चराचर जगताचा प्रभु हर त्याहून परतर दुसरें कांहीं नाहीं. ज्यानें पार्वतीकरितां बालरूप धारण केलें तोच उमेसहवर्तमान तुह्मीं पाहिलात. तुह्मीं आतां मजसहवर्तमान त्यास शरण जा. नंतर ब्रह्मदेव दुसऱ्या स्वरूपानें शिवास पाहून नमस्कार करून बोलले कीं, तू यज्ञ तू भुवनांची गति, तूच परायण, तू भव, तूच देव, तू सर्व स्थावरजंगमजगत व्यापक आहेस. हे भगवन् तू क्रोधानें इंद्रास पीडित केलें. त्याजवर आतां प्रसाद कर. व्यास ह्मणतात हे अर्जुना, असें ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून वृषभध्वज संतुष्ट झाला. तेव्हां त्याच्या कृपेनें इंद्राचा हस्त मुक्त झाला. सर्व देवांमध्यें श्रेष्ठ, दक्ष यज्ञाचा नाश करणार, तोच रुद्र, तोच अग्नि, सर्ववेत्ता, इंद्र, वायु,

अश्विनी, देव, चंद्रमा, तोच त्याच्या घोरा आणि शिवा अशा दोन तनु त्यांतून घोरा तनूचे अंश अग्नि विष्णु व भास्कर, शिवा तनूचे अंश चंद्र उदक तेज हें स्वरूप उपनिषदासह वर्तमान वेद पुराणें व अध्यात्म यांविषयीं जें परम गुह्य तें सर्व महादेव आहे. त्यामहादेवाचे गुण सहस्त्र वर्षे अतिक्रमण केलीं तरीं मी सांगण्यास समर्थ नाहीं. सर्व ग्रहांनीं गृहीत व सर्व पापांनीं मुक्त जे कोणी शरणागत आले असतां त्यांस तो मुक्त करतो. आयुष्य आरोग्य व ऐश्वर्य त्यांस देतो, पुनः हरण करतो. इंद्रादिदेवाचे ठायीं त्याचेंच ऐश्वर्य आहे. मनुष्याच्या शुभाशुभाविषयीं लोकांमध्यें तोच प्रवृत्त. कामाच्या ऐश्वर्येंकरून तोच ईश्वर वर्णिला जातो. भूतांमध्यें महेश्वर, थोरांमध्यें ईश्वर होय. तो बहुत प्रकारचीं बहुत रूपें धरून या विश्वास व्यापितो. त्या देवाचें मुख समुद्रामध्यें राहून वडवानलनामक अग्निद्वारा जलरूपी हवी भक्षण करतें. हा देव स्मशानामध्यें राहातो ह्मणून समग्र जन त्यास वीरस्थान ह्मणून समग्र त्याची पूजा करतात. त्याचीं प्रदीप्त रूपें नानाप्रकारचीं ह्मणून लोकांमध्यें त्याचीं अनेक नांवें ठेवितात. यथार्थ नामामध्यें ज्याचीं बहुत महत्त्वें वर्णिलीं जातात. वेदांमध्यें ज्याचें शतरुद्रीय वर्णिलें आहे रुद्रांमध्यें ज्याचें नावाचें उपस्थान आहे. कामाचा प्रभु देव, दिव्य जे मानुष तो विभु तो प्रभु महत् विश्वास व्यापितो. ब्राह्मण मुनि ज्यास श्रेष्ठरूप असें मानितात. हा सर्व देवांमध्यें प्रथम मुख्य याजपासून वायु उत्पन्न होऊन सर्व प्रकारचें पशूंचें पालन करतो. आणि त्यांसह वर्तमान क्रीडा करतो. त्यांचा हा अधिपति ह्मणून ज्यास पशुपति ह्मणतात. नित्य ब्रह्मचर्यव्रतेंकरून त्याचें लिंग स्थित आहे. त्या लिंगाचें सर्व लोक पूजन करतात; ह्मणून यास महेश्वर ह्मणतात. ऋषि, देव, गंधर्व, अप्सरागण ज्याच्या लिंगाचें पूजन करतात. त्या लिंगाचें पूजन केलें असतां महेश्वर आनंद पावून लोकांस सुखदायक होतो. ज्याचें रूप भूत भव्य भविष्य स्थित स्थावरजंगम हें आहे ह्मणून ज्यास बहुरूपी ह्मणतात. सर्वदा नेत्र असून एक नेत्र ज्याचा जाज्वल्यमान होतो. व क्रोधेंकरून शंकर सर्व लोकांत प्रविष्ट होतो, तेणेंकरून ज्यास शर्व असें ह्मणतात. धूम्ररूप ह्मणून धूर्जटि ज्यास ह्मणतात. ज्यापासून विश्वेदेव ऋषि उत्पन्न झाले ह्मणून विश्वरूप असें त्यास ह्मणतात. स्वर्ग उदक पृथ्वी त्या तीन

देवता भुवनेश्वराचें पूजन करतात, ह्मणून त्र्यंबक या नामें तो विख्यात झाला निरंतर सर्व कर्मांविषयीं सर्वांचे तो वर्धन करतो, व मनुष्यांचें तो कल्याण इच्छितो ह्मणून त्यास शिव असें ह्मणतात. सूर्य चंद्रांचे किरण प्रकाशित करणारे केश तीन नेत्रांच्या ज्याच्या ठायीं आहेत ह्मणून व्योमकेश त्यास ह्मणतात. कपिल ह्मणजे श्रेष्ठ व धर्म ह्मणजे वृष या दोहों पदांपासून लोकांत वृषाकपि असें ह्मणतात. ब्रह्मा, इंद्र, वरुण, यम, कुबेर यांचा तो निग्रह करून ऐश्वर्य करतो ह्मणून त्यास हर ह्मणतात. देवी पार्वतीनें ज्याचे दोन नेत्र झांकले असतां ललाटाचें ठायीं तिसरा नेत्र उत्पन्न झाला ह्मणून त्यास त्र्यक्ष ह्मणतात. शरीराच्या ठायीं विषमस्थ राहून प्राण्यांस सम पाहातो, ह्मणून कोणी महात्म्याचें लिंग पूजन केलें असतां त्यास बहुत संपत्ति देतो. ज्याच्या ऊरूखालीं अर्ध शरीर आग्नेय शिवातनु ह्मणतात. तशीच ऊरूपासून वर देवांपेक्षांही प्रदीप्त तेजानें धारण करणारी शिवा तनू ह्मणून आहे व मनुष्याहून देदीप्यमान तेजानें धारण करणारी घोरा तनु आहे. जी शिवा तनु ह्मणून आहे ती ब्रह्मचर्य धारण करिते. आणि घोरमूर्ति तनु तिच्यायोगें ईश्वर सर्वांचें हरण करतो. जो प्रजापति उग्र होऊन सर्वांचें निर्दहन करतो. व मांस शोणित मज्जा यांचें भक्षण करतो ह्मणून त्यास रुद्र ह्मणतात. हे अर्जुना तोच शिव तुझ्या अग्रभागीं संग्रामांमध्यें शत्रूस मारीत जातो. जयद्रथाच्या वधाची तूं प्रतिज्ञा केली असतां पिनाकधारी महादेव तुझे अग्रभागीं चालत होता. ज्यानें तुला दिव्य अस्त्रें दिल्हीं असतां त्या अस्त्रें करून तूं दानवांचा पराभव केलास. हे अर्जुना, तुला हे महादेवाचें शतरुद्रीय धर्मयुक्त पुण्यकारक सांगितलें. सर्वार्थांनें साधन करणारें पुण्यकारक सर्व पापाचें शमन करणारें व सर्व दुःख व भयाचें हरण करणारें असें चतुर्विध हें स्तोत्र जो निरंतर श्रवण करतो तो संग्रामामध्यें शत्रूस जिंकून रुद्रलोकाचे ठायीं विख्याती पावतो. श्रम दिव्यसंग्राम संबंधी चरित्र शतरुद्रीय याचें सर्वदां जो पठण किंवा श्रवण करतो तो विश्वेश्वराच्या प्रसादेंकरून श्रेष्ठ काम पावतो. त्र्यंबकेश्वर प्रसन्न झाला असतां त्यास कमी काय? तस्मात् हे अर्जुना, जा युध्द कर तुझा जय होईल. असें संग्रामामध्यें बोलून पराशर पुत्र व्यास ज्या मार्गानें आले त्याच मार्गे गेले. अ. वि. या भ. आ. द्रोणपर्व समाप्त.


मारुति.
अर्जुन
कृष्ण
कर्ण.

# श्री.

# कर्णपर्व.

१ अध्याय पहिला- वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, द्रोणाचार्य मरण पावल्या नंतर दुर्योधन प्रभृती राजे अत्यंत उद्विग्न मन होऊन द्रोण पुत्र अश्वत्थाम्या कडे गेले आणि त्यास बोलले कीं, हे आचार्य पुत्रा, तूं आतां आमचें रक्षण कर, असें भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें एक मुहूर्त पर्यंत शास्त्र संमत अशा कारणानीं त्यांचें सांत्वन केल्यावर ते संपूर्ण निशारंभीं आप आपले शिबिरांत जाऊन आपलें अतःपर कसें होईल? अशी चिंता करीत दुःखशोकांत निमग्न झाले. विशेषें करून सुतपुत्र दुःशासन व शकुनी हे त्रिवर्ग दुर्योधनाच्या शिबिरांत राहून पांडवांस आपण जीं दुःखें दिल्हीं त्यांचें चिंतन करीत एकमेकांत असें बोलू लागले कीं, कपटानें द्यूता मध्यें आपण पांडवांस जिंकिलें व द्रौपदीस सभेंत आणिली, येणें करून पांडवांस फार दुःख झालें असेल व अशा कर्मा मुळें आम्हास असा शोक झाला. अशा गोष्टी सांगत ती रात्र शंभर वर्षा सारिखी त्यांस झाली. दुसरे दिवशीं प्रातःकालीं दुर्योधनादिकानीं, आपलीं अवश्य नित्य कर्मे करून एकमेकांस अश्वासन दिल्हें, आणि सैन्यास युध्धार्थ सिध्ध होण्याची आज्ञा देऊन शिबिरांतून-बाहेर निघाले, ते समयीं कर्णास सेनापती केला. तसेच पांडव ही दुसरे दिवशीं-प्रातःकालीं पूर्वाण्हीक क्रिया करून युध्धाच्या निश्चयानें शिबिरांतून रणभूमीचे ठायीं सत्वर आले असतां उभयतांच्या युध्धास आरंभ झाला. परस्पर जयाचीइच्छा करीत असतां उभयतांचें दोन दिवस युध्ध झालें. त्या युध्धांत कर्णानें शत्रूचा बहुत क्षय केला, हें पाहून फाल्गुनानें कर्णास युद्धीं न पाडला. हे वर्तमान संजयास समजतांच त्यानें हस्तना पुरीं जाऊन झालेला वृत्तांत धृतराष्ट्रास सांगितला. असें वैशंपायनाचें भाषण ऐकून जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायन ऋषे, भीष्म द्रोण व कर्ण संग्रामांत मरण पावल्यावर धृतराष्ट्रानें आपले प्राण कसे धारण केले हें परमाश्चर्य होय! हे मुने आतां झालेला वृत्तांत संपूर्ण विस्तारें करून मला सांग.- असा विषय या अध्यायांत आहे.

२ अध्याय दुसरा- वैशंपायन सांगतात, हे जनमेजय राजा, कर्ण मरण-पावल्यावर त्याच रात्रीस संजय दीन वदन होऊन वातज अश्वानीं युक्त केले-

त्या रथांत बसून हस्तना पुरीं आल्या नंतर धृतराष्ट्रराजास अंजलि पुट जोडून श्वासोच्छ्वास टाकीत असें बोलला कीं, हे क्षितिपते, तूं सुखी आहेसना, हे राजा, विदुर, गांगेय, द्रोणाचार्य व श्रीकृष्ण याणीं तुला बहुत प्रकारें हित बोध केला असतां तो तूं ग्रहण केला नाहींस, त्याचें आज तुला स्मरण होऊन तूं व्यथित झाला नाहींसना, असें संजयानें भाषण ऐकून धृतराष्ट्र दीर्घ श्वासोच्छ्वास टाकीत बोलतो हे संजया, भीष्म आणि द्रोणाचार्य हे जा दिवशीं मरण पावले त्यादिवसा पासून माझें मन बहुत व्यथित आहे. पाहा बरें, जा भीष्मानें प्रति दिवशीं संग्रामा मध्यें दहासहस्र रथी मारावे, त्याभीष्मास अर्जुन साहाय्य जो शिखंडी, याणें मारिलें. तसेंच साक्षात परशुरामानें बाल्या वस्थे मध्यें धनुर्वेदाचा उपदेश करून महास्त्रें जा द्रोणास समर्पण केलीं, जो स्वतः महारथी पांडवाचा हितेच्छु, जाचा प्रसादें करून पांडवांस महारथी अशी योग्यता आली, त्या द्रोणास युध्धामध्यें धृष्टद्युम्नानें मारिलें असतां माझें मन कसें व्यथित होणार नाहीं. असो, आपले प्रारब्धानें जें घडलें त्याचा शोक करून काय उपयोग ! हे संजया, तो द्रोण मरण पावला असतां माझे पुत्रानीं पुढें काय केलें, हें मला सांग. असाविषय या अध्यायांत आहे.

३ अध्याय तिसरा – संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, द्रोणाचार्य मरण पावल्या वर महारथी तुझे पुत्र युध्धापासून पराङ्मुख होऊन शस्त्र धारण केलेले स्वस्थ उभे राहिले. तसेंच संपूर्ण राजे शोकार्त होऊन एकमेकांकडे पाहात कांहीं न बोलतां स्वस्थ उभे राहिले. द्रोणाचार्य मरण पावला हें पाहून संपूर्ण योध्यांच्या हस्तांतील शोणितानी भरलेलीं शस्त्रें गळून पडलीं, नंतर तुझा पुत्र दुर्योधन, समग्र क्षत्रियांस बोलला कीं, हे क्षत्रिय हो, तुमच्या बाहुबलाच्या आश्रयानें मी पांडवांशीं युध्धास प्रवृत्त झालों. ते तुम्हीं, द्रोणाचार्य मरण पावला म्हणून खिन्न झालांत, आतांमी काय करावें तुम्ही खिन्न होऊनका युध्धकरा, जय किंवा पराजया विषयीं शंका धरूनका, युध्धांतच मृत्यु किंवा जीव धारण होईल त्याचा स्विकार करा, युध्धांत दिव्यास्त्रें घेऊन संचार करणारा व धनंजयास त्रास देणारा असाजो कर्ण तो कोठें आहे तो पहा. जसा एखादा क्षुद्र मृग, सिंहास पाहून तत्काळ पळतो तसा अर्जुन कर्णास पाहून पळेल. दिव्यास्त्रें जाणणारा व मायावी जो घटोत्कच यास अमोघ शक्ती करून जा कालीं कर्णानें युध्धांत मारिला, त्या कालीं

घटोत्कचानें भयंकर नाद केले, असाजो कर्ण त्यानें बाहुवीर्य, आज संग्रामामध्यें तुम्ही पहा. तसेंच द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें बाहुबल पांडुपुत्र पाहोत. तुम्हीं प्रत्येक प्रत्येक राजे पांडुपुत्रांस मारण्यास समर्थ आहांत मग तुम्ही संपूर्ण एकत्र झाला असतां सैन्यासह वर्तमान पंडुपुत्रांस मारण्यास तुम्हास काय अशक्य आहे बरें. असें दुर्योधनानें भाषण करून नंतर कर्णास सेनापत्याचा अभिषेक केला असतां त्याकाळीं कर्ण सिंहासाररवी गर्जना करीत युध्ध करूं लागला. कर्णानें श्रृंजय, पांचाल, कैकेय व विदेह यांचें बहुत कदन केलें, पांचाल व पांडव कर्णाच्या बाणानीं बहुत पीडित होऊन शोकनिमग्न झाले. असें कर्ण युध्ध करीत असतां अर्जुनानें कौरवांकडील सहस्रशः योद्धे मारून शेवटीं कर्णास मारिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

४ अध्याय चवथा– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, हा सर्व वृत्तांत- धृतराष्ट्र राजानें ऐकून माझा पुत्र दुर्योधन आतां मरण पावेल, असा निश्चय- करून तो दुःखानें एकाएकीं पृथ्वीवर पडला असतां समग्र भारतांच्या स्त्रिया अंतःपुरांत रडूं लागल्या. हें पाहून गांधारी ही राजाच्या सन्निध येऊन शोक करीत निचेतन पडली, हें पाहून संजयानें त्यांचें दुःख निवारण होण्याकरितां वारंवार त्यांस समाधानाच्या गोष्टी सांगितल्या. हें विदुरास कळतांच तोही धृतराष्ट्राचें शांतवन करण्यास येऊन त्यानें त्याचे नेत्रांस जलस्पर्श केला. तेणें करून राजा सावध होतांच संपूर्ण स्त्रियाही सावध झाल्या. नंतर राजानें आपल्या पुत्राची आणि शकुनीची बहुत निंदा करून स्तब्ध बसला असतां संजयास बोलतो, हे सुता, जें तूं पूर्वी वर्तमान सांगितलेंस तें मी ऐकिलें परंतु माझा पुत्र- दुर्योधन यानें पुढें काय केलें तें मला सांग. असें भाषण ऐकून संजय बोलतो, हे धृतराष्ट्र राजा, संग्रामामध्यें पुत्र व भ्राते यांसह वर्तमान सुतपुत्रास पांडवांनीं मारलें. भीमसेनानें युध्धांत दुःशासनाचें कंठसंबधि रुधिर प्राशन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

५ अध्याय पांचवा– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो, हे संजया, आतां कौरव पांडवां कडील कोण कोण योध्ये मरण पावले व कोण कोण शेष राहिले तें मला सांग. असा प्रश्न ऐकून सं

जय बोलतो, हे धृतराष्ट्र राजा, महान प्रतापी भीष्म दाहा दिवसामध्यें अर्बुद-संख्याक पांडवांचे रथी मारून शेवटीं आपण मरण पावला. द्रोणाचार्यानें पांचालाचे बहुत रथी मारून शेवटीं आपण मरण पावला. अवशेष राहिलेल्या सैन्या पैकीं अर्धे सैन्य कर्णानें मारून तो मरण पावला. आतां पांडवांकडील वीरांनीं तुझ्या कडील कोण कोणते योद्धे मारले ते सांगतों. कर्ण, जयद्रथ, भगदत्त, श्रुतायु, अंबष्ट सुदक्षिण, वृषसेन, शिबि, संसप्तकसहस्त्रावधी योद्धे, शाल, वृषक, अचल, कर्णाचे भ्राते, केकय, मालव, द्रविड योध्दे, ललित्थ, क्षुद्रक, उशीनर, मावेल्लक, तुंडिकेर, सावित्रीपुत्र, पूर्व, दक्षिण, उत्तर, पश्चिम, या दिशांचे राजे व साति दोन हजार राजे, शूरसेन, अभीषाह, विंदानुविंद हे सर्व योद्धे अर्जुनानें मारले. तसेच विकर्ण, दुःशासन, चित्रसेन, बाल्हिक, दुर्मुख, दुःसह, वृषवर्मा, शाल्वराजा, क्षेमधूर्ति, दुर्मर्षण, दुर्विषह, दुर्जय, कलिंग, ओघवान्, बृहंत हे भीमसनानें मारले. व दुर्योधनाचा पुत्र, कोसलांचा अधिपती मद्रराजाचापुत्रशूर, जयत्सेन, हे अभिमन्यूनें मारले. भूरिश्रवा, जयसंध हे सात्यकीनें मारले, शल्याचापुत्र रुक्मरथ सहदेवानें मारला. भगदत्ताचापुत्र कृतप्रज्ञ नकुलानें मारला. अलंबुष राक्षस घटोत्कचानें मारला. याशिवाय सहस्त्रावधि योद्धे युध्धांत मरण पावले. हे राजा, हें जाहलेलें वृत्त तुला सांगितलें. अशा कर्णार्जुनाच्या संग्रामांत सहस्त्रावधी राजांचा क्षय झाला. इंद्रानें जसा वृत्रासुरास, रामचंद्रानें जसा रावणास, कृष्णानें जसें नरकासुर व मुर नामक दैत्यांस मारिलें तसें पार्थानें अमात्य व बांधवांसह वर्तमान कर्णास द्वैरथ युध्धामध्यें मारिलें. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, तुझ्या बंधूनें तुला पूर्वी बहुत प्रकारें बोध केला असतां, तो तूं न ऐकिल्या मुळें तुला व तुझ्या पुत्रांना हें मोठेंच दुःख झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

६ अध्याय साहावा. धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, पांडवांनीं माझे सैनिक मारलेले तूं सांगितलेस, परंतु आमचे कडील योध्यांनीं पांडवांकडील किती योद्धे मारिले तें मला सांग. असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा, अमात्या सहित कुंतिराजे, नारायणगण, बलभद्र, मागधराजा, हे भीष्मानें मारले. सत्यजित, पांचालांतील मोठ मोठे योध्दे, विराट, द्रुपदपु-

त्रा सहित, मणिमान्, दंडधार, अंशुमान, रोचमान, नरव्याघ्र, पुरुजित, कुंति भोज, मित्रवर्मा, क्षत्रधर्मा, सुचित्र, चित्रवर्मा, सुकेतु, सत्यधृति, मदिराश्व, सूर्यदत्त, वसुदान हे द्रोणाचार्यानें मारले. सेनाबिंदुराजाचा पुत्र, बाल्हिकानें मारला, तसाच अभिमन्यु दुःशासन पुत्रानें मारला. या शिवाय शंख, उत्तर, इत्यादि अनेक महारथी द्रोणाचार्यानें मारले. आतां जें तूं विचारशील तें तुला सांग तों. असा विषय या अध्यायांत आहे.

७ अध्याय सातवा- धृतराष्ट्र प्रश्न करितो हे संजया, कर्णमरण पावल्यावर अवशेषसैन्य किती उरलें हें मला सांग. असें ऐकून संजय बोलतो हे राजा, तुझा करितां लढण्याच्या इच्छेनें अश्वत्थामा, कृतवर्मा व शल्य हे सैन्यामध्यें स्थित आहेत. अजानेय योध्यांसह वर्तमान गांधारराजा, महाबाहू चित्रविचित्रअस्त्रांनीं युद्ध करणारा, भारसाधन करणारें धनुष्य धारण करून शारद्वत कृपाचार्य, महारथी कैकेय राजपुत्र, सूर्यासारख्या तेजस्वी रथामध्यें पुरुमित्र, तसा सुवर्णमय चित्र विचित्र कवच धारण केलेला तुझा पुत्र दुर्योधन, सुषेण, सत्यसेन, चित्रसेन, जरासंधाचा ज्येष्ठपुत्र श्रुतवर्मा, जयशल, सत्यव्रत, दुःशल, कैतवाचा अधिपती वीर, श्रुतायु, धृतायुध, चित्रांगद व चित्रसेन, सत्यप्रतिज्ञा कर्णपुत्र व इतर कर्णाचे दोन पुत्र इत्यादि योद्धे तुझा करितां युध्ध करण्याच्या इच्छेनें सिध्ध आहेत. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो, हे संजया, आमच्या कडील व शत्रु कडील योद्धे किती जिवंत आहेत. हें तूं मला सांगितलेंस येणें करून उभय सैन्यांचा सारासार पाहतां माझा सैनिकांस आतां जय मिळणार नाहीं. असा मी निश्चय करितों, असें म्हणून धृतराष्ट्र शोकानें व्याकुल होऊन मूर्छित होण्याचे संधिस संजयास असें बोलला कीं, हे संजया, तूं एक मुहूर्त पर्यंत उभाराहा, माझें मन व्याकूल होऊन मोह पावतें असें म्हणून धृतराष्ट्रास मूर्च्छा आली. असा विषय या अध्यायांत आहे.

८ अध्याय आठवा- जनमेजय प्रश्न करतात हे वैशंपायन ऋषे, कर्ण संग्रामामध्यें मरण पावला व आपले पुत्र पडले हें ऐकून धृतराष्ट्र संजयास काय बोलला तें मला सांग. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात. हे रा-

जा, कर्ण मरण पावला हें वर्तमान ऐकून धृतराष्ट्रास असें वाटलें कीं, ही गोष्ट परम आश्चर्य कारक व अद्भुत आहे. मेरूचें चलन, भार्गव रामाचे चित्तास मोह, यांचा जसा असंभव तसा युध्धामध्यें कर्णाचा वध होणें असंभव आहे. असा पूर्ण बुध्धीनें निश्चय करून वारंवार श्वासोच्छ्वास टाकीत संजयास विलापयुक्त बोलतो, हे सूता, अधिरथी वीर, सिंह व गजासारखा पराक्रमी, वृषभासारखे जाने स्कंद, इंद्र वज्रासारखा, शत्रूंची हिंसा करणारा, ज्याच्या दृष्टीनें-रथ, अश्व व हत्ती अग्रभागीं उभे राहत नाहींत, शत्रुजयाच्या इच्छेनें जा महाबाहु कर्णाचा दुर्योधनानें आश्रय करून पांडवांशी महत् वैर केलें, असा रथी श्रेष्ठ कर्ण, अर्जुनानें युध्धामध्यें कसा मारला? हे संजया, गर्वानें, कर्ण आपल्या बाहु बलानें, अच्युत, धनंजन व वृष्णी सहवर्तमान अन्य वीरांची गणना करीत नसे. श्रीकृष्ण व अर्जुन या उभयतांस तो मंद बुध्धी निरंतर भाषण करी कीं, मी एक रथांत आरोहण करून युध्धामध्यें तुम्हां उभयतांस पृथ्वीवर पाडीन, जा कर्णानें स्वपराक्रमानें कैकेया सह वर्तमान कांबोज व अवंत्य, गांधार, मद्रक, मत्स्य, त्रिगर्त, तंगण, शक, पांचाल, विदेह इत्यादि-योध्यांचे गण, शूर समुदायांनीं जिंकून आपल्यास करभार देतील असे वश केले. देवामध्यें इंद्र जसा श्रेष्ठ तसा नरामध्यें कर्ण श्रेष्ठ होय, दुर्योधनाच्या वृध्धी करितां त्यानें सागरांत पृथ्वी जिंकिली, जरासंध राजा ही कर्णाच्या बलें करून बलवान् जाहला होता, यादव व कौरवां वांचून पृथ्वी वरील समग्र क्षत्रिय कुलास जाणें पराजित केलें तो कर्ण सव्य साचीनें द्वैरथ युध्धामध्यें मारला म्हणून तूं सांगितलेंस तेणें करून मी शोकार्णवामध्यें निमग्न झालों! हे संजया, मी अशीं दुःखें श्रवण केलीं असतां ही माझा प्राण जात नाहीं याजवरून असें वाटते कीं, माझें हृदय वज्रापेक्षांही कठिण-आहे. हे संजया, अशीं दुःखें सहन करण्यास आतां मी समर्थ होत नाहीं. असा विषय या आध्यायांत आहे.

९ अध्याय नववा:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, श्री, कुल, यश, तप व अध्ययन इत्यादिकानें तुला आज संत, नहुष पुत्र ययातिसारखा मानतात, यास्तव मनाचा दृढ निश्चय करून विषाद करूं नको.

असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, दैवच श्रेष्ठ आहे. पौरुषास धिःकार असो. असेंमी मानितों! शालवृक्षतुल्य कर्ण युधिष्ठिराचें सैन्य मारून युध्ध करीत असतां वायूनें रुग्ण झालेला वृक्ष पृथ्वीवर जसा पडतो तसा तो मरण पावून कसा पृथ्वीवर पडला! फाल्गुनाचा विजय आणि कर्णाचा मृत्यु ऐकून वज्रसारमय दुर्भेद्य माझें हृदय असल्यामुळें तें विदीर्ण होत नाहीं, देवानी मला दीर्घ आयुष्य दिल्ह्यामुळें कर्ण मरण पावल्याचें वृत्त श्रवण करून परम दुःखानें जीवन पावतों. हे संजया, भीष्म द्रोण व सूतपुत्र कर्ण हे संग्रामांत मरण पावल्यावर अवशेष राहिलेला कोणीं मला दिसत नाहीं. अधिरथी कर्ण बाणानीं पीडित होऊन रथापासून पडला, आतां त्या वांचून मला जिवंत राहून काय अर्थ आहे! आतां पंगूस जसें चालणें अशक्य, दरिद्र्यास इच्छिलें प्राप्त होणें अशक्य, तसें दुर्योधनाचे इच्छित मनोरथ पूर्ण होण्यास अशक्य. हे संजया, दैव बलवत्तर आहे. माझा पुत्र दुःशासन दीनात्मा व कृपणा सारिखा होऊन पलायन करीत असतां मरण पावला काय? दुःशासनानें रणामध्यें दीनासारखें तर आचरण केलें नाहींना, व इतर क्षुल्लक क्षत्रियांसारखा तो मरण पावला नाहींना, धर्मराज निरंतर आम्हांस असा बोध करीत असे कीं, युध्ध करूं नका, सामोपचारें करून आम्हांस अवश्य जें द्यावयाचें तें द्या, परंतु रोगग्रस्त पुरुष जसा पथ्यरूप औषधाचें ग्रहण करीत नाहीं तसें मूर्ख दुर्योधनानें तेंही भाषण ऐकिलें नाहीं, युध्धावसानीं भीष्मानें शरशय्येच्या ठाईं पडल्यावर अर्जुनाजवळ जलाची यांच्या केली असतां अर्जुनानें महीतल भेद करून भीष्माचे मुखांत जलधारा सोडली. हें अर्जुनाचें कर्म पाहतांच भीष्म संतुष्ट होऊन बोलला कीं, हे कौरव हो युध्ध करूं नका, कोणच्याही प्रकारें पांडवांचें शमन करा, हाच आतां उत्तम मार्ग होय. हें भीष्माचें भाषण पुत्रानें ऐकिलें नाहीं. म्हणून माझे पुत्र शोक करतात. भीष्मादिक मोठे दीर्घदर्शी त्यांचें भाषण कधींही मिथ्या व्हावयाचें नाहीं. हे संजया, आतांमी अमात्यहीन व हतपुत्र जाहालों, जसे क्रीडा करणारे बालक हर्षानें कोणीं एक पक्षी धरून त्याचे दोन्ही पक्ष तोडून त्यास सोडल्या-

नंतर छिन्न पक्ष झाल्या मुळें त्याच्यानें जसें जाववत नाहीं, तसामी बाल, अर्थ, ज्ञाती व बंधु इत्यादि कानीं क्षीण झालों, आतां मी शत्रूंस वश झालों, दीन पणानें कोणच्या दिशेस जाऊं असा विलाप करीत पुनः धृतराष्ट्र संजयास प्रश्न करितो हे संजया, ज्या कर्णानें दुर्योधनाच्या वृध्धी करितां कैकया सह वर्तमान कांबोज, अंबष्ठ व विदेह प्रभृती राजे युधांत जिंकिले त्या कर्णास बाहुशालि व शूर जे पांडव याणीं समरा मध्यें कसा मारला बरें! कर्णास ज्या काळीं अर्जुनानें मारला त्याकाळीं कर्णाच्या आसमंतात् भागीं कोण कोण उभे होते ते मला सांग. कर्णतर पांडुवांशी येका कीं युध्धास जाऊन मरण पावला नाहीं ना. सर्व शास्त्रज्ञी पुरुषा मध्यें श्रेष्ठ भीष्म, युध्ध करीत असतां शिखंडीनें सायकें करून त्यास पाडिलें. महा धनुर्धारी द्रोणाचार्य सर्व आयुधांचा त्याग करून बसला असतां धृष्टद्युम्नानें बहुत बाणानीं त्यास व्याप्त करून, खड्गें करून त्यास मारला. भीष्म व द्रोण या उभतांस कपटानें मारलें. हे संजया, कर्ण संग्रामा मध्यें बहुत दिव्य अस्त्रें सोडीत असतां व तो इंद्रा सारखा पराक्रमी असतां त्यास मृत्यूनें कसा स्पर्श केला. इंद्रानें कर्णाचीं कवच कुंडलें घेऊन विद्युत्प्रभे सारखी शत्रूचीं हिंसा करणारी अशी शक्ती, त्यास दिल्ही, तो कर्ण मरण पावून शयन करतो! ज्याणें भीष्म द्रोण प्रभृति योध्यांचा निरंतर अवमान करीत असावा. जामदग्न्य रामा पासून घोर ब्रम्हास्त्र विद्या ज्यास मिळाली होती. भीमसेनास दाहासहस्त्र नागानें बल असतांही कर्णानें त्यास विरथी करून हांस्य केलें, धर्मसंरक्षणार्थ त्याचा वध केला नाहीं. माया जालें करून शत्रूंस भय उत्पन्न करणारा. व पांडवांचा हितेच्छु जो घटोत्कच, त्यास ज्या कर्णानें इंद्र दत्त वासविशक्तीनें मारला, त्या कर्णास अर्जुनानें कसा मारला असेल! त्याचें युध्धा मध्यें धनुष्य छिन्न जाहलें असेल, रथ पृथ्वींत गेला असेल, आणि अस्त्रें नष्ट जाहलीं असतील म्हणून मरण पावला असेल, असें तूं मला सांगतोस त्याज वरून त्याच्या नाशा विषयीं दुसरें कारण मला कांहीं मला दिसत नाहीं. कर्णानें पूर्वी अशी प्रतिज्ञा केली होती कीं, मी ज्या काळीं रणामध्यें फाल्गुनाचा वध करीन त्या काळीं पादप्रक्षालन करीन नाहीं तर करणार नाहीं. ही कर्णाची घोर प्रतिज्ञा ऐकून धर्मराजानें त्रयोदश वर्षे निद्रात्यक्त केली-

होती. कर्णाच्या वीर्याश्रयें करून माझ्या पुत्रानें पांडुपुत्रांची भार्या, बलात्कारानें ज्या कालीं सभेंत आणिली, त्या कालीं संपूर्ण पांडव पहात असतां कर्ण पांचालीस असें बोलला कीं, हे पांचाली, तूं आमची दासी जाहलीस, तुझे हे पांच पती केवळ षंढतिलासारखे जाहले, त्यांचा त्याग करून दुसरा पती कर. असें गर्व करून पांडवांस भाषण करणारा जो कर्ण, त्यास सव्यसाचीनें युध्धामध्यें मारला हें मोठें आश्चर्य होय. पाहा बरें! देवांसह वर्तमान इंद्रही कर्णाचा वध करण्यास अशक्य होता असें मी मानित होतों. हे संजया, दुःशासनाच्या साहाय्यें करून मंदबुध्धी दुर्योधनानें श्रीकृष्णाचें प्रत्याख्यान केलेलें कर्णास रुचलें होतें, तो वृषभस्कंध कर्ण व दुःशासन मरण पावला. हें पाहून दुर्योधन शोक करीत असेल असें मला वाटतें. हे संजया, द्वैरथ युध्धामध्यें अर्जुनानें कर्णास मारला व पांडव जय पावले, हें ऐकून दुर्योधनानें काय भाषण केलें? हे संजया, सुहृदगणानीं ज्याचें बहुत निवारण केलें असतांही ज्या दुर्योधनानें पांडवांशीं मोठें वैर उत्पन्न केलें तो दुर्योधन, शकुनि, कृतवर्मा, अश्वत्थामा, कृपाचार्य हे, कर्ण प्रभृती योद्धे मरण पावल्यावर काय बोलले? कर्ण ज्या कालीं मरण पावला त्या कालीं सैन्याच्या मुखस्थानीं कोण उभे होते, मद्रराज शल्यास, वैकर्तनाच्या सारथ्या विषयीं कोणी नियुक्त केला, महारथी व शूर पांडव बाण वर्षाव करीत कसे आले, सर्व बाणामध्यें श्रेष्ठ व दिव्य असा एक सर्पमुख बाण कर्णाजवळ होता तो त्याचा कसा व्यर्थ जाहला तें मला सांग. कर्ण मरण पावल्यावर हतोत्साह जाहलेल्या माझ्या सैन्यांत अवशेष राहिलेला कोणी मी पह्यात नाहीं. हे संजया, महाधनुर्धारी शांतनव भीष्म व द्रोणाचार्य मज करितां संग्रामामध्यें मरण पावले हें ऐकून आतां माझ्या जीविताचें काय फळ आहे! ज्याचें बाहुबल दाहा सहस्र गजां समान तो कर्ण, पांडवांनीं मारला, हें वारंवार ऐकून मलातें सहन होत नाहीं.— हे संजया, द्रोणाचार्य मरण पावल्या नंतर नरवीर कौरव यांचें शत्रूंशीं संग्रामामध्यें जें वृत्त जाहलें तें मला सांग. असा विषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दाहावा— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, महान् धनुष्य धारण करणारा द्रोणाचार्य, मरण पावला व अश्वत्थाम्याचा संकल्प

नष्ट जह्याला असतां, सकल कौरवांचा सेनासमूह पळाला नंतर पार्थ आपल्या सैन्याचा व्यूह करून भ्रात्यां सहवर्तमान युद्धार्थी उभा राहिला होता, हें तुझ्या पुत्रानें पाहून पलायन करणारें जें सैन्य, याचें आपल्या पौरुषानें निवारण केलें व त्यांस स्वस्थ करून बहुत काल पर्यंत पांडवांशीं युध्द केलें. प्राप्त जय प्रहर्षीत जाहलेले पांडव युध्दाविषयीं अधीक यत्न करीत असतां, संध्याकाल होतांच दुर्योधनानें सैन्य परावृत्त केलें. असें पाहून सर्व योद्धे युध्दाचा अवहार करून आप आपले शिबिरीं गेले आणि उत्तमोत्तम सुखकारक, अमोलिक पर्यंकाचे ठायीं अमरा सारखे स्थित होऊन एकमेक परस्पर युद्धा विषयीं विचार करूंलागले. त्या कालीं दुर्योधनानें त्या महारथ्यांस परम सुंदर असें भाषण केलें कीं, हे बुध्धिश्रेष्ठ हो, आपल्यास हा काल प्राप्त जाहला, आतां पुढें काय करावें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून ते श्रेष्ठासनावर बसलेले युद्धेच्छु संपूर्ण क्षत्रिय, नानाप्रकारचीं चेष्टा युक्त भाषणें करीत असतां प्राण त्याग करण्याचीं त्या योध्यांचीं इंगितें व बालार्कसम तेजस्वी दुर्योधनाचें मुख पाहून अश्वत्थामा बोलला कीं, हे योद्धे हो, स्वामिभक्ती, देशकालादिसंपत्ती, बल आणि नीति हे चार उपाय अर्थ प्राप्त होण्याविषयीं पंडितानीं सांगितले आहेत खरे; परंतु हे केवळ दैवाश्रित आहेत यास्तव आपण जयाविषयीं निराश न होतां उपायें करून दैवासही अनकूल करून घेऊं. हे दुर्योधना, सर्वगुणानीं युक्त व मनुष्यां मध्यें श्रेष्ठ, अशा कर्णास सेनापती करून आपण रिपूचें कदन करूं. कर्ण महाबलि, शूर, अस्त्रविद्येमध्यें निपुण, युध्दाविषयीं सदां इच्छा करणारा आणि यमा सारखा शत्रूंस केवळ असाह्य असल्यामुळें रणामध्यें रिपूचा पराभव करण्यास समर्थ आहे. असें आचार्यपुत्राचें भाषण ऐकून दुर्योधनास कर्णाविषयीं मोठी आशा उत्पन्न जाहली. त्या कालीं दुर्योधन असें बोलला कीं, भीष्मद्रोण जरी मरण पावले तथापि कर्ण निश्चयें करून पांडवांचा पराजय करील अशी आशा धारण करून राधेयास बोलला कीं, हे कर्णा, तुझें वीर्य व माझे ठायीं तुझें सौहृद किती आहे तें मी जाणतों. आतां तुला कांहीं एक हितकारक भाषण कर्तव्य आहे तें करतों; तुला जसें रुचेल तसें तूं कर. तूं मोठा बुध्धि

मान असून माझी परमगती आहेस; भीष्म,द्रोण हे माझे सेनापती मरण पावले, आतां तूं माझा सेनापती हो. त्यांजपेक्षांही तूं बलवत्तर आहेस. भीष्म व द्रोण हे वृद्ध व धनुर्धारी होते खरे; परंतु त्यांची धनंजयावर प्रीती असे, तुझ्या वचनावर मी त्यांचा सत्कार करीत होतो. हे कर्णा, पितामह भीष्मानें आपण पांडवांचे पितामह आहोंत असें जाणून दाहा दिवस पर्यंत त्यांचें कृत्रिमानें संरक्षण केलें, यांत संशय नाहीं. पुढें भीष्म न्यस्त शस्त्र जाहल्यावर फाल्गुनानें शिखंडीस पुढें करून युद्धा मध्यें भीष्माचा प्राण घेतला. नंतर तुझ्याच भाषणा वरून द्रोणाचार्यास सेनापती केल्या वर त्याणेंही, पांडव हे आपले शिष्य आहेत, असें जाणून कपटें करून पांच दिवस पर्यंत पांडवांचें रक्षण केलें, असें वाटतें. शेवटीं तोही वृद्ध, धृष्टद्युम्नाचे हातून मरण पावला. असो, जी गोष्ट जाहली ती पुनः माघारी येत नाहीं. हे कर्णा, या दोघां पेक्षांही तूं मोठा पराक्रमी आहेस, तुझ्या सारखा योद्धा मी दुसरा कोणी पाहिला नाहीं; पूर्वीं मध्यें व शेवटीं आमचें हित तूं केलेंस, आतां संपूर्ण राज्याची धुरी, धारण करून ही सेना नेण्यास तूं समर्थ आहेस, आतां आपणच आपल्यास सेनापत्याभिषेक करून घे आणि महेंद्रानें दानवांस जसें पळविलें, तसें तूं शत्रुगणास जिंक, तूं युद्धार्थ उभा असतां, मंद बुद्धी पांडव अमात्यासहित, पांचाल, कैकेयां सहवर्तमान पळतील. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, भीष्म,द्रोण मरण पावल्यावर कर्ण पांडवांचा पराजय करील अशी आशा उत्पन्न होऊन तुझा पुत्र पुन्हा सूतपुत्रास असें बोलला कीं, हे कर्णा, तूं युद्धांत स्थित असतां, पार्थ तुझाशीं काय युध्ध करणार? असें दुर्योधनाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो, हे दुर्योधना, तुझा व शकुनीच्या सन्निध पूर्वींमी भाषण केलें आहे कीं, जनार्दनासह, पुत्रांसह वर्तमान संपूर्ण पांडवांस जिंकीन आणि तुझा सेनेचा अधिपती होईन, या विषयीं संशय नको. असें कर्णाचें भाषण ऐकतांच दुर्योधनानें एका एकीं, संपूर्ण राजांसह वर्तमान उठून कर्णास यथाशास्त्रोक्त कर्मानें सेनापत्याच्या अभिषेकास प्रारंभ केला. दुर्योधन प्रमुख जयेच्छु राजे यानीं, कांहीं सुवर्णमय कुंभ, कांहीं खड्गाची पात्रें व गव्याचीं शृंगें, मंत्रपूत जलानें पूर्ण करून त्यांतम

णि मुक्तामय, पुण्य गंध औषधी घातल्या, आणि त्या जलानें कर्णास क्षौम वस्त्रानें वेष्टित केलेल्या औदुंबर आसनाचे गायीं बसवून अभीषेक केला. नंतर सकल ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र याणीं कर्णाची स्तुती केली, त्या कालीं कर्णानें श्रेष्ठ ब्राम्हणांस वस्त्रें, द्रव्य, सुवर्ण व गोधनें देऊन त्यांचें पूजन केलें. स्तुति पाठकानीं कर्णाची अशी स्तुती केली कीं, हे कर्णा, तूं गोविंदा सहवर्तमान रणामध्यें पांडवांस जिंकशील. ब्राम्हणानीं कर्णाची अशी स्तुती केली कीं, हे कर्णा, सूर्य आपल्या किरणें करून उग्रतमाचा जसा नाश करतो तसा तूं पांडवां सहवर्तमान् पांचालांचा नाश करशील. असा कर्णास सेनापत्याचा अभिषेक जाहल्यावर कांती करून देदीप्यमान दुसरा सूर्यच काय, असा तो सैन्यांमध्यें शोभूं लागला. त्या कालीं कालप्रेरित तुझा पुत्र दुर्योधन यानें आपण कृत कृत्य झालों असें मानिलें. कर्णास सेनापतित्व प्राप्त जाहल्यावर त्यानें सूर्योदय कालीं सर्वांस युध्धाच्या सिध्धते विषयीं आज्ञा दिली. असा विषय या अध्यायांत आहे.

११ अध्याय अकरावा — धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, कर्णास सेनापत्य प्राप्त जाहल्यावर दुर्योधनानें बंधु सारखें प्रेमळ भाषण केलें असतां, महा बुद्धिमान् कर्णानें सैन्यास युध्धाच्या सिध्धतेची आज्ञा देऊन पुढें काय केलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो, हे राजा, कर्णाच्या अनुमतें तुझा पुत्रानीं आपले सैन्यांत आनंद दायक वाद्यें वाजवून, संपूर्ण सेनेस युध्धार्थ सिध्ध होण्या विषयीं आज्ञा दिली असतां त्या अपरात्रीस कौरव सैन्यामध्यें अरे सज्जव्हा, असा मोठा शब्द उत्पन्न झाला. गज, रथ, वाजी व पदाती हे सिध्ध होत असतां अन्य वीर त्वरेनें एकमेकांस हांका मारीत असतां त्या शब्दानें आकाश व्याप्त जाहलें. नंतर श्वेत पताकानीं सुशोभित, बगळ्याच्या वर्णा सारख्या वाजिनींयुक्त, हेमपृष्ठ धनुष्य, शतशः भाते, किंकिणी युक्त शक्ती, शूल, तोमर इत्यादि आयुधें व बहुत दुसरीं धनुष्यें, ज्यांत ठेविलेलीं अशा सूर्यासारख्या कांतिमान् रथांमध्यें कर्ण आरूढ होऊन संग्रामामध्यें आला. शंखाचे नाद, धनुष्याचा टणत्कार करीत महाधनुर्धारी, उदयास पावलेल्या सूर्यासारख्या कर्णास पाहतांच कौरवांक

डील योध्यानीं भीष्म द्रोण व इतर मोठमोठ्या योध्यांच्या मरण संबंधिं-दुःखाचा त्याग केला. नंतर पुनः कर्णानें शंखाचा नाद करून संपूर्ण कौरवांचें सैन्य व योद्धे एकत्र जमवून पांडवांचा पराजय करण्या करितां मकर व्यूहाची योजना केली. पांडवांच्या पराजयाच्या इच्छेनें त्या व्यूहाचे मुखावर सूतपुत्र कर्ण स्वतः उभा राहिला, दोन नेत्रस्थानीं शकुनी व उलुक यांची योजना केली, शीर प्रदेशावर द्रोणपुत्राची स्थापना केली, ग्रीवाप्रदेशावर इतर तुझे पुत्र उभे केले, दुर्योधन आपण स्वतः सैन्या सह वर्तमान मध्यस्थानीं उभा राहिला, वाम पादावर नारायण गण व गोपाल, योध्यां सह वर्तमान कृतवर्मा, दक्षिण पादावर त्रिगर्त व दाक्षिणात्या सह वर्तमान कृपाचार्य, वाम पाद सन्निध महान् सैन्या सह वर्तमान् शाल्य, दक्षिण पादासन्निध सहस्र रथ, तीनशें गजांसह वर्तमान् सत्य सगर सुषेण, पुच्छ प्रदेशावर महावीर्यवान् चित्र व चित्रसेन हे उभय तां भ्राते, मोठ्या सेने सह वर्तमान उभे राहिले. या प्रमाणें सर्व ठिकाणीं योद्धे उभे राहिले. असा व्यूह करून सूतपुत्र कर्ण युध्धास निघाला असतां धर्मराज पार्थाकडे पाहून बोलतो हे अर्जुना, महान् वीरानीं संरक्षित असा धृतराष्ट्र सेनेचा विलक्षण व्यूह कर्णानें केलेला पाहा. हे महाबाहो, या धृतराष्ट्र सैन्यातील वीर, नष्ट होऊन अवशेष दुर्बल योद्धे राहिले आहेत, यास्तव हें सैन्य तृणा सारिखें दिसतें. यांत सूतपुत्र मात्र एक धनुर्धारी योद्धा दिसतो; देव, असूर, गंधर्व, किंन्नर व तीन लोकांतील चराचर प्राण्यानीं जिंकण्यास अशक्य जो कर्ण त्याचा वध करून विजयी हो, म्हणजे बारा वर्षांचें माझा हृदयांतील शाल्य काढल्या प्रमाणें होईल. याचें उत्पाटण जेणें करून होईल अशा व्यूहाची रचना तुला वाटेल तशी कर, असें भ्रात्याचें भाषण ऐकून श्वेत वाहनानें अर्धचंद्राकार व्यूह करून त्याचे वामपार्श्वीं भीमसेन, दक्षिणभागीं महान् धनुर्धारी धृष्टद्युम्न यांची योजना केली, मध्यभागीं धर्मराज व अर्जुन उभे राहिले, नकुल, सहदेव धर्मराजाच्या पृष्ठभागीं उभे केले, पांचाल, युधामन्यु व उत्तमोजा हे उभयतां अर्जुनाचे चक्ररक्षक जाहले असतां अर्जुनानें त्यांचें पालन केल्यामुळें त्यानीं अर्जुनास सोडलें नाहीं

अवशेष राहिलेल्या क्षत्रियांची त्यांच्या इच्छेप्रमाणें यथाविभाग योजना-केली. असा पांडवांनीं अर्धचंद्राकार व्यूह केल्यावर उभयतां युद्धा ससिद्ध झाले. हे धृतराष्ट्र राजा, सूतपुत्रानें उत्पन्न केलेल्या व्यूहास बंधुसहवर्तमान-दुर्योधनानें पाहून निश्चय केला कीं, आज संपूर्ण पांडव मरण पावले, इकडे-अर्जुनाची व्यूहरचना पाहून युधिष्ठिरानें असा निश्चय केला कीं, कर्णासह वर्तमान धृतराष्ट्रपुत्र मरण पावले. उभय सैन्यांत शंख, भेरी, आनक, दुंदुभी इत्यादि वाद्यांचा गजर होऊं लागला, जयशालि योध्यांचा सिंहनाद जाहला, वाजींचे हेषित शब्द, गजांचा बृंहणशब्द व रथनेमीचे भयंकर शब्द होऊं लागले. कर्णास सेनामुखाचें ठायीं उभा राहिलेला पाहून कोणीही कौरवांचा योध्धा द्रोण मरण जन्य दुःख मानें नासा जाहला. उभय सैन्यातील योद्धे हर्षित होऊन आपल्या पराक्रमानें परस्परांस मारण्याच्या इच्छेनें उभे असतां तेथें कर्ण व अर्जुन सिद्ध होऊन अत्यंत आवेशानें एकमेकांस पाहून सैन्यांत भ्रमण करूं लागले. नंतर उभयतांच्या सेना, नृत्य केल्या सारख्या एकमेकांत प्रविष्ट झाल्या, त्यामध्यें पक्ष, प्रपक्ष स्थानीं उभे राहिलेले योद्धे युद्धाच्या इच्छेनें पुढें आले. नंतर नर, वारण, वाजी व रथ यांचें परस्पर युध्ध प्रवृत्त जाहलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारावा— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, प्रहृष्ट जाहलेले नर, अश्व, गज ज्यांमध्यें अशा उभयतांच्या महान् सेना, परस्पर मिश्रित होऊन देवासुर सेने सारख्या शोभूं लागल्या. नंतर उभय सैन्यातील नर, रथी, अश्वारोह, गजारोह यां सहवर्तमान उग्र पराक्रमी, पदाती, देहरूप, पापपुरुष व प्राण यांचे नाशक तीव्र प्रहार करूं लागले. त्याकाळीं नरश्रेष्ठ वीरांनीं पूर्ण चंद्रार्क पद्मासारख्या कांतीनीं व गंधानीं युक्त अशा-छिन्न शिरानीं संपूर्ण मही, आस्तीर्ण केली. अर्धचंद्राकार भल्ल व क्षुरप्र बाण, असी, पट्टीश व कुऱ्हाड यानीं युध्ध करणाऱ्या वीरांचीं शिरें छिन्न केलीं, कोणी आयुधें व बाहुभूषणें यानीं युक्त अशा दीर्घ व पुष्ट स्वबाहूनीं इतर वीरांचे दीर्घबाहु छेदून पाडले, व क्षीण पुण्य जाहलेले स्वर्गीचे प्राणी विमाना पासून जसे पृथ्वीवर पतन पावतात तसे शत्रूनीं मारलेले योद्धे, गज,

रथ व अश्वयांपासून पृथ्वीवर पडले. हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें महान् संग्राम प्रवृत्त होऊन परस्पर सैन्य वध्य जाहलें असतां वृकोदर प्रभृती पांडव, धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदेय, प्रभद्रक, सात्यकी, चेकितान हे योद्धे द्राविड सैन्यासह वर्तमान कौरवांवर धाऊन आले. मोठ्या उरस्थलाचे, गंधानीं आपलीं आंगें चर्चित केलेलीं, असी व पाश हस्तांत धारण केलेले, असे केरलासह वर्तमान पांड्य व चोल देशींचे राजे एकमेकांचा त्याग न करतां मोठ्या व्यूहरचनेनें कौरवांवर आले. महा पराक्रमी, प्रियभाषण करणारे असे कांहीं पदाती व अश्व स्वार धनुष्य बाण घेऊन कौरवांवर संग्रामामध्यें आले. तसेच शूर चेदी, पांचाल, केकेय, कारुष, कोशल, कांच व मागध हेही कौरवांवर धांऊन आले, त्या कालीं त्यांच्या सैन्यांतील रथी, श्रेष्ठ गज व उग्र पदाती, नाना प्रकारच्या वाद्यांच्या गजरानीं हर्षित होऊन नृत्य व हांस्य करूं लागले. अशा त्या मोठ्या सैन्यामध्यें वृकोदर महागजावर बसून बहुत गजारोहांसह वर्तमान कौरव सैन्यावर धांऊन आला. या प्रकारें हस्ताचे ठायीं तोमर व चाप धारण केलेला व किरीटानें अलंकृत जाहलेला भीमसेन, आपल्या तेजानें रिपूंचा दाह करूं लागला, त्या कालीं कौरवांकडील क्षेमधूर्ति नामक योध्यानें भीमसेनास युद्धा करितां आव्हान केलें असतां भीमसेन, क्षेमधूर्तीच्या सन्निध आला. त्यासमयीं उभयतांचे गजतुमुल युद्ध करीत असतां उभयतानीं सूर्य किरणा सारख्या तोमरांचे प्रहार करून नंतर सन्नीध येऊन दृष्टी केली. पुन्हा परस्परांचे नागमागें हटल्यावर ते मंडलाकार संचार करीत धनुष्य घेऊन एकमेकांवर बाण वर्षाव करूं लागले. क्षेमधूर्तीनें भीमसेनाचे उरस्थलावर तोमराचा प्रहार केला असतां त्या प्रहारानें भीमसेन अतिविद्ध होतांच पुन्हा क्षेमधूर्तीनें साहा तोमरानीं भीमसेनास वेध करून तो मोठ्यानें गर्जना करूं लागला. नंतर भीमसेनानें सूर्यासारखा तेजस्वी, शीघ्रगामी, लोहमय तोमर, क्षेमधूर्तीवर टाकिला असतां क्षेमधूर्तीनें तो तोमर दाहा बाणानीं तोडून साठ बाणानीं भीमसेनास वेध केला. त्या कालीं भीमसेनानें अनतपर्व व क्षुरप्र बाणाच्या योगें क्षेमधूर्तीचें धनुष्य तोडून समग्र गजास बहुत पीडित केलें असतां क्षेमधूर्तीनें भीमसेनाच्या गजास सर्व मर्म संधी

च्या गर्यी ताडण करतांच तो गज पृथ्वीवर पडला. त्या पूर्वीच भीमसेन-उड्डाण करून पृथ्वीवर उभा राहिला, आणि गदेनें क्षेमधूर्तीच्या गजाचें-त्यानें मर्दन करून क्षेमधूर्तीस मारिला असतां तो सरवड्गत प्राण होऊन-आपले गजाचे सन्निध भागीं पृथ्वीवर पडला, हें पाहतांच राजा, तुझी सेना व्यथित होऊन पडली. असा विषय या अध्यायांत आहे.

१३ अध्याय तेरावा— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, महाधनुर्धारी वरशूर कर्ण यानें पांडवांचें सैन्य मारिलें, तसेंच पांडवांनीं ही तुझ्या पुत्राचें सैन्यास मारिलें. त्या कालीं राजा, कर्णाच्या बाणानीं ताडित जाहलेले गज, कांहीं नाना प्रकारचे शब्द करूं लागले. कांहीं विद्ध जाहले, कांहीं दाही दिशेस पळाले. असें सुतपुत्रानें पांडवांचें सैन्य वध्यमान केलें असतां नकुल त्वरेनें सूतपुत्रावर धांवला, भीमसेन द्रोणपुत्रावर धांवला, कैकेय देशाच्या विंदानुविंदाचें सात्यकीनें निवारण केलें. श्रुतकर्मा, चित्रसेन राजाशीं, प्रतिविंध्य, चित्रराजाशीं व दुर्योधन धर्मराजाशीं युद्ध करूं लागला. अर्जुन परम क्रोधानें संसप्तकावर धांवला. हे राजा, त्या वीरक्षयामध्यें धृष्टद्युम्न कृपाचार्याशीं, शिखंडी कृतवर्म्याशीं, श्रुतकीर्ति शल्याशीं व सहदेव दुःशासनाशीं युद्ध करूं लागला. असें द्वंद्वयुद्ध होत असतां कैकेय देशचे राजे विंदानुविंद याणीं त्या युध्य प्रसंगीं सात्यकीवर देदीप्यमान बाणांचा वर्षाव करून आच्छादित केलें. नंतर सात्यकीनें ही कैकेयास बाणानीं आच्छादित करून उभयतांचीं चित्रविचित्र धनुष्यें छिन्न केलीं. नंतर परस्परांनीं एकमेकांचीं धनुष्यें तोडलीं असतां सात्यकीनें दुसरें धनुष्य घेऊन क्षुरप्र व सुतीक्ष्ण बाणानें अनुविंदाचें शीर तोडून पृथ्वीवर-पाडलें. हें पाहतांच महारथी विंद याणें धनुष्य सज्ज करून सात्यकीच्या बाहू व उरावर हजारों बाणांचा प्रहार करून त्याचें सर्वांग विद्ध केलें. पुन्हा सात्यकीनें हांस्य करीत पंचवीस बाणें करून कैकेयास वेध केला, या प्रकारें परस्परांचें तुमुल युद्ध होत असतां एकमेकांनीं एकमेकांचीं धनुष्यें तोडलीं, सारथी वर घांचे अश्वही मारिले. नंतर उभयतां खड्ग युद्ध करण्या करितां शतचंद्र विन्हीतचर्म व खड्ग धारण करून एकमेकांवर धांवले असतां ते खड्ग घेतलेले उभयतां योद्धे देवासुर युध्यामध्यें जंभ व शक्र जसे शोभले त्याप्रमाणें शोभा

यमान दिसूं लागले. उभयतांही परस्परांच्या वधाच्या इच्छेनें मंडलाकार भ्रमण करून एकमेकांचे अंगावर धाऊन जात असतां सात्यकीनें कैकयाच्या चर्माचे दोन तुकडे केले. कैकयानें सात्यकीच्या चर्माचा भेद करून तो मंडलाकार भ्रमण करूं लागला. त्या कालीं विंद महारंगामध्यें खड्ग धारण करून नाना प्रकारचीं मंडलें करीत असतां सात्यकीनें वांकड्या हस्तें करून त्याचें छेदन करतांच विंद पृथ्वीवर पडला. नंतर शूर व रथिश्रेष्ठ सात्यकी त्वरेनें युधामन्युच्या रथांत बसला, इतक्यांत विधिवत् सिद्ध केलेला दुसरा रथ अग्रभागीं येतांच त्यामध्यें बसून कैकयाचें महान् सैन्य तीक्ष्ण बाणें करून नाशीत करूं लागला असतां त्या कालीं कैकयाचें सैन्य सात्यकीच्या बाणांनीं वध्यमान होऊन एकाएकीं पळालें. असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चवदावा— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, श्रुतकर्म्यानें चित्रसेन राजास युद्धांत बाणानीं ताडण केला असतां चित्रसेन राजानें नऊ बाणांनीं श्रुतकर्म्यास ताडण करून पांच बाणांनीं सारथ्यास वेध केला. श्रुतकर्म्यानें चित्रसेनाचें धनुष्य द्विधा छेदन करून त्या छिन्नधन्व्यासतीनशें पत्री बाणानीं आच्छादित करून वेध केला. नंतर दुसऱ्या एक तीक्ष्ण पाजिवलेल्या भल्लाकार बाणानें मुगुटासहवर्तमान त्याचें शीर तोडलें. आपला राजा मरण पावला हें पाहून चित्रसेनाचे सैनिक पळून गेले, प्रतिविंध्यानें तीक्ष्ण पांच बाणांनीं चित्राचें धनुष्य तोडून त्यास वेध केला असतां चित्रानें सुवर्णघंटायुक्त व दुरासद अशी एक अग्नीज्वाळेसारखी शक्ती, तुझा पौत्र जो प्रतिविंध्य याजवर टाकिली, ती प्रतिविंध्यानें पाहून हांस्य करीत तिचीं दोन शकलें केलीं. हें पाहून चित्रानें हेमजालानीं विभूषित अशी एक चित्रविचित्र गदा प्रतिविंध्यावर टाकिली असतां ती गदा प्रतिविंध्याच्या रथाचे अश्व व सारथी मारून रथाचें चूर्ण करून पृथ्वीवर पडली, इतक्या अवकाशांत प्रतिविंध्यानें रथाखालीं उतरून सुवर्णदंडाची शक्ती चित्रावर टाकिली. तीच शक्ती चित्रानें आपले हातांत घेऊन प्रतिविंध्यावर टाकिली असतां ती त्याच्या दक्षिण भुजाचा भेद करून भूमीवर पडली. नंतर प्रतिविंध्यानें क्रुध्ध होऊन चित्राचा वध करण्याच्या इच्छेनें हेमविभू

षित तोमर त्याच्या उरावर टाकिला असतां तो त्याच्या हृदयाचा व कवचाचा भेद करून पृथ्वींत गेला, त्या तोमराच्या प्रहारानें चित्रराजा जर्ज्जरित होऊन पृथ्वीवर पडला, असें रणामध्यें पांडवांनीं तुझें सैन्य वध्य केलें असतां तेंचोंहीकडे पळालें. त्याकालीं एकाकी द्रोणपुत्र मात्र भीमसेनावर धांऊन गेला असतां त्या उभयतांचा समागम देवासुर युद्धामध्यें वृत्रासुर, इंद्र यांच्या समागमासारखा जाहला. असा विषय या अध्यायांत आहे.

१५ अध्याय पंधरा— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, भीमसेन आणि द्रोणपुत्र यांचें युद्ध होत असतां द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें परम त्वरेनें- अस्त्र लाघव दाखवीत एकपत्री बाणानें भीमसेनास वेध केला. नंतर भीमसेनानें सहस्र बाणानीं द्रोणपुत्र आच्छादित करून एकाएकीं सिंहासारिखा नाद केला. पुन्हा द्रोणपुत्रानें भीमसेनास शंभर बाणें करून ताडण केलें असतां भीमसेनानें शंभर बाणें करून द्रोणपुत्रास ताडण केलें. असे ते महारथी व बलोत्कट वीरश्रेष्ठ, रथामध्यें बसून एकमेकांवर घोर बाण वर्षाव करीत सैन्यामध्यें परम शोभायमान दिसूं लागले. शर, ज्यांच्या दंष्ट्रा व धनुष्य ज्यांचें मुख असे ते नरोत्तम एकमेकांचे अस्त्रांचा प्रतिघात करणारे, निर्भयपणें बाणसमुदायानीं एकमेकांच्या अस्त्रांचा प्रतिघात करीत रणामध्यें संचार करूं लागले. मेघजालें करून सूर्यचंद्र जसे आकाशांत अदृश्य होतात तसे उभयतां परस्परांच्या बाणजालें करून अदृश्य जाहले, हे राजा, एक मुहूर्त अतिक्रांत जाहल्यावर त्या घोर संग्रामामध्यें द्रोणपुत्र व भीमसेन शोभायमान दिसूं लागले. या प्रकारें ते उभयतां पुरुषसिंह एकमेकांच्या वधाच्या इच्छेनें नाना प्रकारचीं युद्ध मंडलें एकमेकांस प्रदर्शन करीत एकमेकांस विरथी करण्या करितां यत्न करूं लागले. द्रोणपुत्रानें महास्त्रें घेऊन भीमास मारण्याचा उपक्रम केला असतां भीमानें ही आपल्या पराक्रमें करून द्रोणपुत्राच्या अस्त्राचें निवारण करून त्यास आपल्या अस्त्रांनीं ताडित केला. हें युद्ध पाहून सिद्ध बोलले कीं, हें युद्ध सर्वापेक्षां महत होत आहे; पूर्वीचीं युद्धें या युद्धाच्या सोळांव्या कळेचीही योग्यता पावणार नाहींत,असें युद्ध पूर्वी कधीं जाहलें नाहीं व पुढें कधीं होणार नाहीं; कायहो हें आश्चर्य!! हे उभयतांही ब्राम्हण, क्षत्रि

य, ज्ञानानें, शौर्यानें व पराक्रमानें संपन्न आहेत, कायहो याभीमाची कृ-तास्त्रता हा केवळ वीर्याचा सारभूत आहे हें दोन रुद्रच काय! अथवा घोररूपी पुरुष व्याघ्र आहेत, अशा सिद्धांच्या वाणी वारंवार ऐकण्यांत आल्या. देव, सिद्ध व महर्षी यांस विस्मय होऊन ते असें बोलूं लागले कीं, हे द्रोणपुत्रा शाबास, हे भीमसेना शाबास तुम्हीं फारचांगलें युद्ध केलेंत तुमचें कल्याण असो, पुन्हा ते परस्पर अपराधी एकमेकांस क्रोधानें नेत्र वटारून पाहूंलागले. एक-मेकांनीं एकमेकांच्या ध्वजांस, सारथ्यांस व अश्वांस वेध करून परस्परांस वेध केला असतां शराच्या वेगें करून उभयतांही रथामध्यें मूर्छीत पडले. हें पाहून त्यांच्या सारथ्यानीं त्यांस एकीकडे नेलें. असा विषय या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळा— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, संसप्तकां सहवर्तमान अर्जुनाचें कसें युद्ध जाहलें, अश्वत्थाम्या सहवर्तमान अर्जुनाचें कसें युद्ध जाहलें व इतर भूपालांसहवर्तमान पांडवांचें युद्ध कसें झालें तें मला सांग असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, संसप्तका मध्यें अर्जुनानें प्रवेश करून भल्ल बाणानीं हजारों योध्यांचीं शिरें तोडून पृथ्वीवर पाडिलीं. तसेंच सहस्त्रावधी रथ, अश्वां सहवर्तमान अश्वारोह व गज अर्जुनानें असंख्याक बाणांनीं यमगृहीं नेले. कांहीं योध्यांनीं आवेशानें शब्द करीत अर्जुनास बाणानीं ताडण केलें. त्याकाळीं अर्जुना सहवर्तमान त्यांचें लोमहर्षण युद्ध हाऊं लागलें, त्रैलोक्य विजया कर्ता पूर्वीं जसें इंद्राचें आणि दैत्यांचें युद्ध जाहलें तसें अर्जुनाचें व संसप्तकांचें युद्ध होत असतां अर्जुनानें आपल्या अस्त्रांनीं त्यांच्या अस्त्राचें निवारण करून त्यांचे प्राण हरण केले. कितीएक योध्यांनीं अर्जुनाच्या बाणघातानें प्राणत्याग केले, कितेक योध्यांच्या रथाचे त्रिवेणु चक्रें, अक्ष व सारथी नष्ट जाहले, कितेक योध्यांचीं आयुधें व तुणीरें नष्ट जाहलीं. या प्रकारें हे ष्टयांस भय उत्पन्न करणारें सहस्त्र महारथ्यांसारखें कर्म अर्जुनानें केलें. देवांनीं आकाशांत दुंदुभी वाजवून केशवार्जुनाच्या शिरावर पुष्प वृष्टी केली. इतक्यांत आकाशांत अशी वाणी जाहली कीं, चंद्र, अग्नी, अनिल व सूर्य यांची कांती, दीप्ती, बल व द्युती केशवार्जुन निरंतर धारं

ण करतात, ब्रम्ह व ईशान हे जसे त्रैलोक्यास अजय्य आहेत तसे हे रणा मध्यें स र्वांस अजय्य आहेत. अशी आश्चर्य कारक आकाश वाणी ऐकून अश्वत्थामा केशवार्जुनावर धांऊन गेला. आणि अर्जुनास बोलला कीं, हे वीरा, मी अति थी आलों आहें यास्तव सर्वात्मेव करून मला युध्यातिथ्य द्यावें. असें आचार्य-पुत्रानें आव्हान केलें असतां अर्जुन अश्वत्थाम्याच्या भाषणाचा परम स त्कार करून श्रीकृष्णास बोलतो हे जनार्दना, संसप्तकांचा वध कर्णें आप-ल्यास अवश्य आहे. बरें इकडे द्रोण पुत्र युद्धा स आव्हान करतो तेव्हां या दोन कार्यांतून प्रथम कार्य कोणतें करावें तें सांग. असें अर्जुनाचें भाषण ऐ कून श्रीकृष्ण बोलतो हे अर्जुना, जर तुझी इच्छा असेल तर पूर्वी अश्वत्था-म्याचें आतिथ्य कर, असें भाषण करून नंतर श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ अश्वत्थाम्या जवळ नेला आणि अश्वत्थाम्यास आव्हान करून बोलला कीं, हे अश्वत्थामन्, ब्राम्हणांचे वाद विवाद सूक्ष्म व अदृश्य आहेत, आ-णि क्षत्रियांचे जय पराजय रूप विवाद स्पष्ट आहेत यास्तव जी तूं पार्था जवळ भिक्षा मागितलीस ती तुला प्राप्त व्हावी अशी जर तुझी इच्छा आ हे तर आज स्थीर होऊन त्याशीं युद्ध कर. असें भाषण ऐकतांच द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें साठ बाणांनीं श्रीकृष्णास, आणि तीन नाराच बाणांनीं अ र्जुनास वेध केला. त्या बाण प्रहारें करून अर्जुनानेंही क्रुद्ध होऊन तीन बा णांनीं द्रोणीचें धनुष्य छेदिलें असतां पुन्हा द्रोणीनें दुसरें धनुष्य घेऊन-तीनशें बाणांनीं केशवास व सहस्त्र बाणांनीं अर्जुनास वेध करून सहस्त्र प्रयुक्त अर्बुद बाणांची अर्जुना वर वृष्टी करून अर्जुनास स्तंभित केला. अ श्वत्थामा ब्रम्हवादी म्हणजे योग बालाचा वेत्ता असल्या मुळें त्याचा भाता, बा हू, ऊर, वदन, कर, कर्ण, नेत्र, शीर इतर अंगें, शरिराचे लोम, चर्म, ध्वज, धनु-ष्य व धनुष्याची मत्यंचा यां पासून बाण निघून त्या महान् शरजालानीं-केशवार्जुनास व्याप्त केलें. नंतर अश्वत्थामा हर्षित होऊन त्यानें मेघासा रखी गर्जना केली, ती ऐकून अर्जुन माधवास बोलतो हे माधवा, माझावि षयीं हें गुरुपुत्रानें दौरात्म्य पाहा, हा आम्हांस बाणगृहामध्यें प्रवेश करू न आम्हीं वध पावलों असें मानितो. परंतु कांहीं चिंता नाहीं याचा संकल्प

आजमी शिक्षेनें व बलानें नष्ट करतों, असें अर्जुनानें भाषण करून अश्वत्थाम्याच्या शराचे तीन तीन तुकडे केले. नंतर पुन्हा संसप्तकगण, अश्व, सूत, रथ, हत्ती, ध्वज, पत्ती गणासह वर्तमान युद्धास आले असतां अर्जुनानें उग्र बाणांनीं त्यांस वेध केला. अर्जुनाच्या गांडीव धनुष्या पासून मुक्त जाहलेल्या बाणानीं एक कोशाच्या आसमंताद्भागीं जे गज व योद्धे उभे होते त्यांचा त्याणीं नाश केला. तसेच अलंकारानीं सुशोभित केलेले अश्वांसह वर्तमान् अश्वारोह व पत्ती यांस धनंजयानें नष्ट केलें असतां आचार्य पुत्र क्रुद्ध होऊन अर्जुनाशीं युद्धाच्या इच्छेनें अश्व व सारथ्यांस शीघ्र बाणानीं वेध करून तो अर्जुनास पाहाण्यास समर्थ जाला नाहीं. नंतर आचार्य पुत्रानें क्रुद्ध होऊन गृहीं आलेल्या अतिथीचें जसें पूजन करतात, तसें अर्जुनाचें अस्त्रें करून पूजन केलें. नंतर जसा दाता अपांक्तेय अतिथीचा त्याग करून पांक्तेय अतिथीचें गृहण करतो, तसा अर्जुन संसप्तकांचा त्याग करून आपल्या गृहीं अतिथी रूप प्राप्त जाहलेल्या अश्वत्थाम्याकडे पुन्हा युद्धास गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७ अध्याय सत्रा – संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, शुक्र आणि अंगिरस यांचें नक्षत्रास लक्षित करून जसें आकाशांत युद्ध झालें, तसें अश्वत्थाम्याचें व अर्जुनाचें युद्ध होत असतां आपल्या प्रदीप्त झालेल्या शररूप रश्मीकरून एकमेकांस संतप्त करीत वक्र व अतिचर जाहलेल्या ग्रहासाररवे लोकांस त्रास देऊं लागले. नंतर अर्जुनानें अश्वत्थाम्याच्या भिवयांच्या मध्यभागीं नाराच बाणानें वेध केला असतां अश्वत्थाम्यानें कृष्णार्जुनास शरजालें करून पीडित केलें, तेसमयीं ते उभयतां द्रोण पुत्राच्या शरजालें करून युगांत कालीं सूर्यासाररवे दिसूं लागले. नंतर अर्जुनानें द्रोणपुत्राच्या बाणाचें निवारण करून पुन्हा त्यास द्विगुणित बाण वृष्टीनीं, अश्वसुत ध्वजासह वर्तमान व्याप्त करून तो पुन्हा संसप्तकां कडे युद्धास गेला. त्या युद्धांत अर्जुनानें पराङ्मुख न होतां आपल्या अग्रभागीं उभ्या राहिलेल्या योध्यांचे धनुष्य, बाण, बाणाचे भाते, धनुष्याच्या दोऱ्या ग्रहण केलेले हस्त, हस्तांतील शस्त्रें, रथाचीं छत्रें व केतु, रथाचे अश्व व रथ इत्यादि भग्न करून य

किले , तशींच वस्त्रें, माल्यें व भूषणें नष्ट करून टाकिलीं, योध्यांचीं चर्में, मनोरम कवचें व उत्तमोत्तम रमणीय शिरें बाणांनीं छेदून पृथ्वीवर पाडलीं, तसेच युद्धा विषयीं सिद्ध केलेले रथ, अश्व व गज पार्थानें आपल्या बाणें करून ताडित केले असतां ते आपल्या स्वामीसह पृथ्वीवर पडले. तसेच कलिंग, अंग, वंग, निषाध देशींचे राजे, गजासुर दैत्या सारख्या भयंकर गजावर बसून अर्जुनास मारण्याच्या इच्छेनें त्याच्या अग्रभागीं धांवून आले असतां अर्जुनानें त्या सर्व गजांस मारून त्यांज वरील योध्यांचीं वर्में छिन्न केलीं आणि असि-चर्म युक्त त्यांच्या करांचें छेदन करून प्राण घेतले असतां त्या योध्यांनीं धारण केलेल्या ध्वज, पताका, वज्र हत गिरिशृंगा सारख्या पडल्या.- या प्रकारें तें गजसैन्य भग्न जाहल्यावर अर्जुनानें सूर्य सदृश देदीप्यमान नऊ बाणांनीं गुरुपुत्रास आच्छादित केला असतां द्रोण पुत्रानें अर्जुनाच्या बाणांचें निवारण करून कृष्णार्जुनास बाणांनीं आच्छादित केला असतां अर्जुनानें पुन्हा द्रोणपुत्रास व इतर योध्यांस बाणांनीं पीडित करून सर्वांस सुपुंख बाणें करून विद्ध केलें. अर्जुन रथ स्थित असतां बाणाचें ग्रहण, संधान व मोचन केव्हां करतो हें कोणाच्या दृशीस न पडतां रथ, नाग, तुरंग व पदाती हें मृत होऊन पृथ्वीवर पडत ते मात्र सर्वांचे अवलोकनांत येई. या प्रकारें अर्जुन युद्ध मध्यें सैन्याचा क्षय करीत असतां द्रोणपुत्रानें अर्जुनावर मोठ्या त्वरेनें दहा बाण टाकिले तेव्हां त्यांतील पांच बाणांनीं अर्जुन व पांच बाणांनीं श्रीकृष्ण व्यथित जाहले. ते उभयतां मनुष्यश्रेष्ठ, इंद्र कुबेरा सारखे बलवान असतांही त्यांच्या शरिरातून रक्ताचे प्रवाह वाहूं लागले. त्याकालीं श्रीकृष्ण अर्जुनास बोलला कीं, हे अर्जुना गुरुपुत्रावर कां दया करतोस, हा आपला घात करील यास्तव यास जिंक. असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनानें गांडीव निर्मुक्त बाणांनीं द्रोणपुत्राच्या चंदन चर्चित भुज, वक्षस्थल, शीर व ऊरू यांचा वेध करून रथाच्या, अश्वांच्या रश्मी तोडल्या आणि अश्वांस ताडित केलें असतां त्या अश्वांनीं अश्वत्थाम्याचा रथ रणापासून दूर ओढून नेला. त्याकालीं द्रौणी पार्थ शरानीं बहुत पीडित जाहल्या मुळें पुन्हा पार्थाशीं युद्ध करण्याची मती न धरतां आतां कृष्णार्जुनाचा नियमें करून जय जाहला, ॰

सा विचार करून तो क्षीणोत्साह व क्षीण बाणास्त्र योग झालेला अश्वत्थामा मोठ्या वेगानें हयाचें नियमन करून रथाश्व नरानीं पूर्ण जाहलेल्या कर्ण सैन्यामध्यें गेला. नंतर केशवार्जुन वातानें कंपित जाहलेल्या पताकायुक्त व जलौघा सारख्या नाद करणाऱ्या रथांत बसून संसप्तकांचे अग्रभागीं युद्धास आले. असा विषय या अध्यायांत आहे.

१८ अध्याय अठरा – संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, दंडधार नामक राजानें रथ नाग युक्त पांडव सैन्यास उत्तरेच्या बाजूनें वध्यमान केलें असतां पांडव सैन्यांत एका एकीं शब्द उत्पन्न जाहला. तो ऐकून कृष्णा, अर्जुनाचा रथ पुढें नेत होता तो माघारा फिरवून अर्जुनास बोलला कीं, हे अर्जुना, हा मोठ्या बलाढ्य गजासह वर्तमान मागध देशाचा राजा आला आहे, हा युध्यामध्यें शिक्षेनें व बलानें भगदत्ता पेक्षां किमपीही न्यून नाहीं; यास्तव याचा पूर्वी वध करून नंतर संसप्तकांचा वध करण्यास सिद्ध हो, असें अर्जुनाशीं भाषण करून श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ मागध देशांचा राजा जो दंडधार याचे अग्रभागीं नेला. दंडधार राजा युध्यामध्यें असह्य असून हत्तिच्या युद्धांत मोठा श्रेष्ठ होता तो शत्रुनाश करणाऱ्या महामेघासारखा ज्याचा शब्द, गजासुरा सारखा भयंकर अशा गजावर आरूढ होऊन पांडवांचे सहस्रावधि रथाश्व मातंगांस शरानीं मारीत आहे व त्याचा गज आपल्या पाद घातानें अश्व, सारथी व पदाती यांचें कालचक्रासारखें मर्दन करून नाश करीत आहे, हें पाहून अर्जुन मागधाच्या गजावर धाऊन गेला. त्याकालीं दंडधारानें बारा श्रेष्ठ बाणानीं अर्जुनास ताडण करून सोळा बाणांनीं जनार्दनास ताडीत केला आणि तीन तीन बाणांनीं रथाच्या अश्वांस वेध करून वारंवार हास्य करीत नाद करूं लागला. नंतर अर्जुनानें दंडधाराचे शर व गुणासह वर्तमान कार्मुक कृंतन करून अलंकृत केलेला ध्वज भल्लाकार बाणांनीं तोडला. नंतर मुख्य मुख्य अश्वनियंत्यांचा वध केला असतां दंडधार राजा कोपित होऊन त्यानें श्रीकृष्णास व अर्जुनास तोमरें करून ताडण केलें. त्याकालीं अर्जुनानें दंडधाराचे, गजशुंडा सारखे दोन बाहू व पूर्णेंदु सारखें शीर तीन क्षुरप्र बाणानीं तोडून.

शृंभर तेजस्वी बाणांनीं त्याचे गजास ताडित केला असतां तो कांचन शिरस्त्र धारण केलेला गज रात्रीचे ठायीं दावाग्नीनें प्रज्वलित झालेल्या द्रुम व औषधियुक्त पर्वता सारखा प्रकाशित दिसूं लागला आणि पार्थ बाणांनीं पीडित झाल्या मुळें मेघा सारखा शब्द करीत व स्खलन युक्त भ्रमण करीत वज्र हत गिरि शृंगा सारखा भग्न होऊन आपल्या महता सह वर्तमान पृथ्वीवर पडला. तेव्हां दंड धाराचा दंड धार नामक दुसरा भ्राता होता तो आपला भ्राता मरण पावलेला पाहून कृष्णास व धनंजयास मारावें या हेतूनें त्यांजवर धांऊन आला आणि तीन तोमरांनीं जनार्दनास व निशित बाणांनीं अर्जुनास वेध करून मोठा नाद करूं लागला, त्या कालीं अर्जुनानें त्याचे बाहु क्षुरप्र बाणानें तोडले. नंतर शीर तोडून पृथ्वी वर पाडलें. नंतर त्याच्या श्वेताभ्रा सारख्या श्रुभ्र गजास सूर्य किरणा सारख्या श्रेष्ठ शरानीं भेद करून पृथ्वीवर पाडला असतां याच उभयतां गजा सारखे बहुत दुसरे गज अर्जुनास मारण्यास आले तेव्हां सव्य साचीनें त्यांचा वध करून टाकिला. त्या कालीं ह्या सर्व श्रेष्ठ गजांचा वध झाला व पूर्वींचे दोन श्रेष्ठ गज नष्ट झाले हें पाहून रिपूचें सैन्य पळून गेलें, गज, रथ, अश्व व पदाती यांचे समुदाय पलायन करीत असतां एक मेकां वर त्यांचा परस्पर आघात झाल्या मुळें कितेक नष्ट झाले, कितेक बहुभाषी वीर पळतां पळतां अडखळून पृथ्वीवर पडले. त्या कालीं देवगण जसे पुरंदरास वेष्टन करून प्रार्थना करतात तसे अर्जुनाचे सैनिक त्यास वेष्टन करून भाषण करूं लागले कीं, हे अर्जुना, जसे लोक मरणास भीतात तसे आम्हीं ज्या शत्रूंचें भय बाळगीत होतों त्या शत्रूंस तूं आज आमच्या भाग्यानें नष्ट केलास. या प्रकारें सुहृदांच्या वाणी ऐकून अर्जुनानें यथानुरूप त्यांची पूजा व सत्कार करून तो पुन्हा संसप्तकाकडे गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१९ अध्याय एकूणीस— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, अंगारक गृह जसा वक्रगती व अति वक्रगती होतो, तसा अर्जुन पुन्हा संसप्तक गणांत जाऊन बहुतांचा नाश करीत असतां पार्थ बाणानीं हत झालेले अश्व, रथ, कुंजर इकडे तिकडे फिरूं लागले. कांहीं नाश पावले, तसेच कांहीं

श्रेष्ठ श्रेष्ठ योध्यांचे सारथी, ध्वज, धनुष्यें, बाहू व शिरें हीं भल्लाकार व क्षुरप्र बाणानीं छेदन करून टाकिलीं, शत्रुकडील सहस्त्रावधी योद्धे अर्जुनावर एकाएकीं येऊन पडले. त्याकालीं त्यांचें व अर्जुनाचें लोमहर्षण युद्ध होऊं लागलें असतां अर्जुनानें सर्पासारख्या भयंकर तीन बाणानीं उग्रायुधाच्या पुत्राचें शीर तोडून पृथ्वीवर पाडतांच सर्व योद्धे क्रुद्ध होऊन अर्जुनावर शस्त्रास्त्रांची वृष्टी करूं लागले, तेव्हां अर्जुनानें आपल्या अस्त्रांनीं त्यांचीं अस्त्रें निवारण करून शरानीं बहुत योध्यांचा वध केला. कोणाच्या रथाचे अश्व व पार्ष्णी सारथी मारिले, कोणाच्या रथाचे त्रिवेणु तोडले, शत्रूंचे महामौल्यवान त्या युद्धप्रसंगीं कितेक अश्वारोहांसहवर्तमान अश्व अर्जुनानें ताडित केल्यामुळे पृथ्वीवर पडले, कोणाच्या गती स्खलित झाल्या, कोणी पडले, कोणी शब्द करूं लागले. त्याकालीं कौरवांकडील नानादेशींचे कितेक योध्यांचे गण परम क्रुद्ध होऊन रथाश्व गजांवर आरूढ होऊन व कितेक पदाती अर्जुनाचा वध करण्याच्या इच्छेनें बहुत आयुधांचा प्रक्षेप करीत त्याजवर धांऊन गेले; तेव्हां कौरव शररूप वृष्टीस, अर्जुनरूप वायूनें उडविलें. त्याकालीं पार्थास वासुदेव बोलतो हे पार्था, तूं उगीच कां क्रीडा करतोस; या संसप्तक गणाचा लौकर नाश करून कर्ण वधाविषयीं त्वरा कर. असें कृष्णाचें भाषण ऐकतांच अर्जुनानें अवशिष्ट राहिलेल्या संसप्तकांचा वध केला. ह्या अर्जुनाच्या कृत्याचें गोविंदास मोठें आश्चर्य वाटून त्याणें अर्जुनाच्या रथाचे अश्व, शत्रु सैन्यांत प्रविष्ट केल्यावर पुन्हा मोठा जनक्षयकारक संग्राम होऊं लागला. त्याकालाचे ठायीं संग्राम भूमीकडे पाहून गोविंद सव्यसाचीस भाषण करतो हे पार्था, दुर्योधनाकरितां या पृथ्वीचे ठायीं महाभयंकर भारताचा क्षय करणारा संग्राम कसा प्रवृत्त जाहला आहे तो पाहा. योध्यांचीं रुक्मपृष्ठ धनुष्यें, अलंकार, भाते सुवर्णमय पुंखयुक्त बाण, लोखंडाचे भाले, मोठमोठीं मुसलें पृथ्वीवर पडून पृथ्वी कशी आकीर्ण झाली ती पाहा; नानाप्रकारचीं शस्त्रें धारण करून जयेच्छु, गतप्राण होऊन पृथ्वीवर पडलेले योद्धे वेगवान् प्राण्यासारखे दिसतात. भग्न झालेले सुवर्ण किंकिणीयुक्त उत्तम सुशोभित रथ, शोणितानें परिप्लुत झाले त्या

अश्वांच्या लगामा, योध्यांचे भाते, सुवर्ण विकृत केलेलीं अश्वारोहांचीं ध्वजादें पृथ्वीवर पडलेलीं कशीं दिसतात ती पहा. हे अर्जुना, युद्धामध्यें असें कर्म करणें हें तुलाच योग्य आहे, हें कृत्य तूं जसें या भूलोकीं केलेंस तसें कृत्य स्वर्गलोकीं देवराज करण्यास समर्थ आहे. अशी श्री कृष्ण, अर्जुनास युद्धभूमी दाखवून पुढें जात असतां एका एकीं, दुर्योधनाच्या सैन्यांत-शंख दुंदुभीचा निर्घोष, भेरी, पणवाचा स्वन, रथाश्व गज व शस्त्रांचा नाद ऐकून कृष्ण आपल्या वायुसमान अश्वांच्या सैन्यांत गेल्यावर नंतर योध्यांत परमश्रेष्ठ जो पांड्य राजा याणें कौरवांचें सैन्य नाशित केलेलें पाहून बहुत विस्मय पावला. पांड्य राजानें कौरवां कडील गज, वाजी व मनुष्यें यांचा निशित बाणानीं भेद करून त्यांस पृथ्वीवर पाडलें; तसाच मोठमोठ्या शत्रुवीरांचा नानाप्रकारच्या बाणांनीं वध केला. असा विषय या-अध्यायांत आहे.

२० अध्याय वीसः— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, पांड्यराजा मोठा प्रवीर आहे म्हणून तूं पूर्वीं सांगितलेंस, परंतु त्याचें कर्म संग्रामाचे ठायीं कसें आहे तें सांगितलें नाहींस, असा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे राजा, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, द्रोण पुत्र अश्वत्थामा, कर्ण, अर्जुन व श्रीकृष्ण हे धनुर्धारी पुरुषा मध्यें श्रेष्ठ, रथी, व विद्या पारंगद झालेले आहेत. हें तुला माहीत आहे परंतु हा पांड्य राजा सर्व महारथ्यांस आपल्या वीर्यें करून धिःकार करतो, कोणीही राजा आपल्यासमान आहे असें तो मानीत नाहीं. द्रोण, भीष्माची तुल्यता त्यास सहन होत नसे, वासुदेवार्जुना पेक्षां आपण न्यून आहोंत असें तो इच्छीत नाहीं. असा तो पांड्यराजा सर्व धनुर्धाऱ्यांत श्रेष्ठ, यमासारखा क्रुद्ध होऊन कर्णसैन्याचा वध करूं लागला. त्याकालीं रथाश्व गजानीं व्याप्त असें जें कर्णसैन्य तें पांड्य राजानें आपल्या बाणें करून ताडित केल्यामुळें भयाभीत होऊन कुलाल चक्रासारखें भ्रमण करूं लागलें. पुलिंद, खस, बाल्हीक, निषाध, अंधक, कुंतल, दाक्षिणात्य, भोज व शबर या योध्यांस बाणांनीं-कवच व शस्त्र हीन करून गतप्राण केलें. पांड्य राजाच तुरंग सैन्याचा

नाश करतो हें पाहून द्रोणपुत्र पांड्यराजाच्या समीप भागीं येऊन त्यास असें बोलला कीं, हे पांड्यराजा, सर्व योध्यांस तूं श्रुत आहेस, तुझें शरीर वज्रासारखें दृढ असून तूं बलानें व पौरुषानें प्रख्यात आहेस; परंतु या युद्धांत तुजवर बाण वर्षाव करणारा माझ्या खेरीज दुसरा प्रतिवीर कोणी मला दिसत नाहीं, अरे, सिंह जसा अरण्यामध्यें मृगाचें हनन करतो तसा तूं एकटा रथ, द्वीप, पत्ती व अश्व यांचें निर्भयपणें मर्दन करतोस तर तूं तीक्ष्णशर घेऊन माझ्या एकट्याशीं युद्ध कर. असें द्रोणपुत्रानें भाषण केलें असतां पांड्यराजानें तथास्तु, असें म्हणून मजवर प्रहार कर असें भाषण करतांच द्रौणीनें राजास ताडित केला. त्या कालीं पांड्यराजानें द्रोणपुत्रास वेध करून बाणांनीं त्याच्या इतर दुसऱ्या आपल्यावर आलेल्या बाणांचा व धनुष्य प्रत्यंचेचा छेद केला असतां द्रोणपुत्रानें प्रत्यंचेनें सिद्ध केलेलें दुसरें धनुष्य घेऊन व आपल्या रथाचे अश्व नष्ट झाले होते त्यास दुसरे अश्व भृत्यानि युक्त केलेले पाहून पांड्यराजावर सहस्रावधी शरांची वृष्टी केली असतां त्या शरांनीं आकाश व दिशा व्याप्त झाल्या. ते महात्म्या द्रोणपुत्राचे बाण अक्षय जरी होते तथापी पांड्य राजानें मोठ्या यत्नानें छिन्न करून त्याचे उभय तों चक्ररक्षक निशित बाणांनीं छिन्न करून आपलें धनुष्य मंडलाकार फिरऊं लागला. त्या कालीं पांड्यराजाचें हस्तलाघव पाहून आचार्य पुत्र पांड्यराजाच्या सेनेवर बाण वर्षाव करीत असतां ती बाण वृष्टी पाहून पांड्य राजानें वायव्य अस्त्रें करून तिचा नाश केला. त्या कालीं अश्वत्थाम्यानें पांड्य राजाचा केतु छिन्न करून रथाचे चारी अश्व मारिले आणि एक बाणानें सारथी मारून त्यानें धनुष्य छिन्न केलें. पांड्य राजा आपल्यास अहितकारी जरी होता तथापि संग्राम इच्छेनें अश्वत्थाम्यानें त्याचा प्राण घेतला नाहीं. इतक्या अंतरामध्यें पांडवांच्या गजसैन्यामध्यें कर्णानें प्रवेश करून हजारों गजांचें विदारण केलें; तसेंच कांहीं सन्नतपर्व बाणें करून कितेक रथ्यांस विरथी करून कितेक गजाश्वांस ताडित केले. महारथी अश्वत्थाम्यानें पांड्य राजास विरथी केला असतां युद्धाच्या इच्छेनें त्यास मारलें नाहीं; इतक्यांत कोणी एक बलिष्ठ गज आप-

त्यावरील स्वामी नष्ट झाला असतां तो अश्वत्थाम्याच्या बाणांनीं ताडित झाल्यामुळें पळत पळत पांड्यराजाच्या सन्निध आला तेव्हां पांड्यराजा त्या गजावर बसून त्यास ताडण करीत अश्वत्थाम्यावर धांऊन गेला आणि अरे द्रोणपुत्रा, मरण पावलास मरण पावलास, असा शब्द करून अश्वत्थाम्याच्या शिरोभूषणावर त्या तोमराचा प्रहार करतांच अश्वत्थाम्याचा मुकुट चूर्ण होऊन धरणीतलावर पडतांच मोठा नाद जाहला. त्याकाळीं अश्वत्थाम्यानें चवदा बाण घेऊन त्यांतील पांच बाणांनीं पांड्यराजाच्या गजाचे चार पाद व शुंडादंड छिन्न केले. तीन बाणांनीं पांड्यराजाचे दोन बाहु व शीर छेदन करून सहा बाणांनीं पांड्यराजाचे अनुचर रथी होते ते मारिले. पांड्यराजास गुरुपुत्रानें मारला हें पाहून दुर्योधनानें त्याची पूजा केली. असा विषय या अध्यायांत आहे.

२१ अध्याय एकवीसः — धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, पांड्यराजा युध्यामध्यें मरण पावला व कर्णानें पांडवांचें सैन्य युद्धामध्यें पळविलें तेव्हां अर्जुनानें काय केलें तें मला सांग. असा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, पांड्यराजा मरण पावल्यावर श्रीकृष्ण अर्जुनास बोलला कीं, हे अर्जुना, धर्मराज कोठें दृष्टीस पडत नाहीं, इतर पांडव पलायन करीत असतां पुन्हा त्यांणीं माघारें फिरून शत्रूंचें बल भग्न करून टाकिलें. अश्वत्थाम्याच्या संकल्पास्तव कर्णानें सृंजयाचे वीर बहुत मारिले तसेच रथाश्व गजांचें बहुत कदन केलें. असें वासुदेवाचें भाषण ऐकतांच अर्जुन कृष्णास बोलला कीं, हे हृषिकेशा, माझ्या अश्वांस लवकर प्रेरणा कर. असें अर्जुनाचें भाषण ऐकतांच हृषीकेशानें अश्वांस प्रेरणा करून अर्जुनाचा रथ तेथून अन्यत्र स्थलीं नेला, भीमसेनप्रमुख पार्थिव सुतपुत्रप्रभृती कौरव पुन्हा एकत्र जाहले. नंतर धनुष्य बाण, परिघ, मोठमोठे अंकुश इत्यादि शस्त्रें घेऊन एकमेकांचा प्राण घेण्याच्या इच्छेनें एकमेकांवर टाकूं लागले, रथनेमी घोषानें पृथ्वी नादित झाली. त्याकाळीं उभयतांचे सैनिक, तालशब्द व शूरांच्या गर्जना ऐकून अत्यंत त्रस्त झाले, कोणी पडले, कोणी गर्जना करूं लागले. कर्णानें त्या नाद करणाऱ्या-

व शस्त्र वर्षाव करणाऱ्या शत्रूंचा बाणें करून बहुत नाश केला. पांचालाचे पांचवीर व सत्रा रथी, अश्व, सारथी ध्वजासह वर्तमान कर्णानें यमगृहीं नेले असतां पांडवां कडील कांहीं महावीर्यवान् व शीघ्रास्त्र जाणणाऱ्या योध्यांनीं कर्णास वेष्टन करतांच कर्ण शत्रुसैन्यावर बाण वर्षाव करीत त्यानें गोचर झालेल्या पांडव, सृंजय व पांचाल योध्यांचें बलात्कारें करून मर्दन केलें. त्याकालीं पांचालराज द्रौपदेय, नकुल, सहदेव व युयुधान् प्रभृती योद्धे कर्णावर धाऊन गेले असतां कुरु, पांचाल व पांडव एकमेक प्रियप्राणाचा त्याग करून एकमेकांस मारूं लागले, कोणी कालदंडा सारखीं वर आयुधें करून मोठे नाद करूं लागले, कोणी योद्धे एकमेकांस आव्हान करूं लागले, कोणी योद्धे एकमेकांच्या गात्रांस ताडण करून शीरो भागस्थ मांस पिंडाचा भेद झाल्या मुळें रुधिर वमन करीत पृथ्वी वर पडले, कोणी परश्यानें व असिनें एकमेकांचा छेद करूं लागले, रथ्यांनीं रथी, गजांनीं गज, पायदळांनीं पायदळ व अश्वारोहानीं अश्वारोह मारिले असतां हजारों पृथ्वीवर पडले, कितेक नष्ट झालेल्या गजाश्व-मनुष्यांचीं वदनें मर्दित झालेल्या पद्मासारिखीं दिसूं लागलीं, कितेक योध्यांचीं मुखें क्षारानें भिजलेल्या वस्त्रा सारखीं दिसूं लागलीं. असा-विषय या अध्यायांत आहे.

२२ अध्याय बावीसः– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, तुझा पुत्रानें हत्तींस धृष्टद्युम्नावर जाण्याविषयीं प्रेरणा केली असतां ते हस्ती धृष्टद्युम्नाचा वध करण्याच्या इच्छेनें आपल्या हस्तीं सहवर्तमान त्यावर धाऊन गेले. गजयुद्धामध्यें श्रेष्ठ प्राच्य व दाक्षणात्य, तसेंच गजयुद्धामध्यें कुशल अंग, वंग, पुंड्र, मागध, ताम्रलिप्तक, मेकल, कोशल, मद्र, दशार्ण व निषध हे योद्धे कलिंग योध्यांसह वर्तमान धृष्टद्युम्नावर बाणांची वृष्टी करूं लागले. हें पाहून धृष्टद्युम्नानें त्या पर्वतप्राय गजांवर नाराच बाणांची वृष्टी करून एकएकास दहा, सहा व आठ अशा बाणांनीं वेध केला. हें पाहून पांडव, पांचाल व सृंजय, तीक्ष्ण आयुधें घेऊन मोठ्यानें गर्जना करीत गजवृंदावर बाण वर्षाव करून हर्षानें नृत्य करूं लागले, नकुल, सहदेव, द्रौ-

पदेय, प्रभद्रक, सात्यकी, शिखंडी व चेकितान या योध्यांनीं चोंहीं कडून बा णांची वृष्टी केली असतां ते कौरवांकडील म्लेंच्छ योध्यांनीं प्रेरित केलेले गज पांडव सैन्यांतील कितेक नराश्व रथ्यांस शुंडांत धरून आपटूं लागले. कांहीं कंपित झालेले गज आपल्या पाद घातानें कितेक नराश्व रथांचें मर्दन करूं लागले, इतक्यांत अंगराजाचा गज आपले सन्मुख आला हें पाहून सात्यकीनें नाराच बाणानीं मर्म भेद करून पृथ्वीवर पाडला. नंतर अंगराजा गजा पासून खालीं उतरत असतां सात्यकीनें नाराच बाणें करून त्याचें वक्षस्थल भिन्न करतांच तो भूमीवर पडला. पौंड्र राजाचा नाग आपल्यावर धांऊन आलेला पाहून सहदेवानें त्यास नष्ट केला. नंतर पुन्हा सहदेव अंगराजावर धांऊन गेला असतां नकुलानें त्याचें निवारण करून आपण अंगराजास यमदंड सदृश तीन बाणानीं पीडित करून शंभर बाणें करून त्याने गजांस पीडित केला असतां अंगराजानें तोमरांचा नकुलावर प्रक्षेप करून आठशें बाण टाकिले. नकुलानें तीन तीन बाणांनीं अंगराजाचे प्रत्येक बाण छिन्न करून अर्धचंद्राकार बाणानें त्याचें शीर छिन्न केलें असतां तो अंगराज गजासह वर्तमान पृथ्वीवर पडला, तेव्हां अंगराजा कडील गजारोह परम क्रुद्ध होऊन नकुलावर धांऊन गेले, तसेच मेकल, उत्कल, कलिंग, निषध, ताम्र, लिप्तक हे योद्धे नकुलावर शर व तोमरयांचा वर्षाव करूं लागले असतां, पांडु, पांचाल, व सोमक हे मोठ्यात्वरेनें कौरव सैन्यावर धांऊन गेले तेव्हां त्यांचें व कौरवां कडील गजसैन्यांचें मोठें युद्ध होऊं लागलें. कौरवां कडील गजांचीं गंडस्थळें व वर्मसंधी भिन्न-झाल्या. याप्रकारें रथिश्रेष्ठ पांडवांनीं तुझ्या कडील गज नष्ट करून भिन्नतट झाहलेल्या नदी सारख्या तुझ्यासेनेस ताडित केल्यावर ती पुन्हा कर्णास क्षोभ उत्पन्न करण्या करितां पांडवांवर धांऊन गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

२३ अध्याय तेवीस:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, सहदेव क्रुद्ध होऊन तुझ्या सैन्यास दहन करतो हें पाहून दुःशासन आपल्या भ्रात्या-सन्निध आला. नंतर तुझ्या पुत्रानें सहदेवाच्या वक्षस्थलाचा भेद केला अस

तां सहदेवानें नाराच सत्तर बाणें करून तुझ्या पुत्रांस ताडित करून तीन बाणानीं सारथ्यास वेध केला. नंतर दुःशासनानें सहदेवाचें धनुष्य तोडून त्र्याहत्तर बाणें करून त्याच्या बाहु व उरस्थलीं प्रहार केला. त्याकालीं सहदेवानें क्रोधित होऊन एक खड्ग तुझ्या पुत्राच्या रथावर टाकिला असतां, त्या खड्गानें तुझ्यापुत्राचें बाण व प्रत्यंचे सह धनुष्य छिन्न होऊन तो पृथ्वीवर पडला. त्या दुःशासनानें पांडुसुतास कांहीं बाणांनीं वेधकरून त्याच्या सारथ्यास नऊबाणानीं ताडित केला असतां सहदेवानें एकघोरशर तुझ्या पुत्रावर टाकिला; तेव्हां तो बाण तुझ्या पुत्राचेंकवच भिन्न करून पृथ्वींतगेला. त्या कालीं सहदेवाच्या निशित बाणानीं वध्यमान् होऊन त्रस्त झालेल्या दुःशासनाच्या सारथ्यानें महा बलवान् तुझापुत्र दुःशासन मूर्छित झालेला पाहून रणा पासून त्याचा रथ माघारा नेला. नंतर पांडु पुत्र सहदेव असमंताद्भागीं दुर्योधनाचे सैन्यास पाहून त्याचें मर्दन करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

२४ अध्याय चौवीसः– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, नकुल कौरवसैन्य पळवीत असतां कर्णानें त्याचें निवारण केलें. त्याकालीं नकुल कर्णास हांस्य करून बोलला हे कर्णा, फारदिवसानीं दैवें करून आजमी तुझ्या दृष्टीस पडलों, यास्तव या रणामध्यें तूं मला आपल्या दृष्टीनें पहा. तूं या सर्व अनर्थाचें व कलहाचें कारण आहेस, तुझ्याच दोषानें हे सर्व कौरवक्षीण दशेस आले आहेत यास्तव आजमी तुला युद्धामध्यें निर्भयपणें मारून कृतकृत्य होतों. असें नकुलाचें भाषण ऐकून कर्ण असें बोलला कीं, हे नकुला, माझ्यावर तूं प्रहार कर, तुझें पौरुष आजमी पहातों. असें भाषण करून सूतपुत्रानें त्र्याहत्तरशिलिमुख बाणानीं पांडुपुत्रास वेधकेला असतां नकुलानें अशी विषसदृश ऐशीं बाणानीं सुतपुत्रास वेध केला. त्याकालीं नकुल बाणेंकरून कर्ण पीडित झालेला पाहून देवताही विस्मय पावल्या. कर्णानें दुसरें धनुष्य घेऊन नकुलास पांच बाणानीं स्कंध प्रदेशीं ताडित केला असतां नकुलानें सातबाणांनीं कर्णास वेध करून पुन्हा त्याच्या धनुष्याची कोटि छिन्न केली. नंतर कर्णानें दुसरें अतिशय वेगयुक्त धनुष्य घेऊन नकु

त्याच्या आसमंताद्भागीं सर्वदिशा बाणांनीं आच्छादित करून टाकिल्या. तेव्हां नकुलानें आपल्या शरानीं ते सर्व शरजाल मोठ्या त्वरेनें छिन्न करून टाकिले. त्या बाणजालानीं आकाश व दिवाकर आच्छादित झाल्यामुळें अंतरिक्ष गमन करणारे प्राणी भूमी वर येण्यास अशक्य जाहले. हे धृतराष्ट्र राजा, कर्णाच्या बाणांनीं वध्यमान झालेले सोमक अत्यंत पीडित व व्यथित जाहले. तशीच नकुल बाणानीं तुझी सेना ताडित झाल्यामुळें दशदिशांस विशीर्ण होऊन गेली. या प्रकारें ते उभयतां एकमेकांची सेना दिव्यशरांनीं ताडित करीत असतां युद्ध पाहणारे इकडे तिकडे फिरूं लागले. कर्ण नकुल एकमेकांस शरवृष्टीनीं ताडित करून अस्त्रें प्रदर्शन करीत परस्परांच्या वधेच्छेनें एकमेकांस आच्छादन करूं लागले. नंतर कर्ण आपलें शरीर मोठें भयंकर करून पांडवांस शरवृष्टीनें आसमंताद्भागीं आच्छादित करीत असतां नकुल, बाणांनीं आच्छादित जाहला तथापि व्यथेस पावला नाहीं. हें पाहून पुन्हा त्या अधिरथ्यानें हास्य करून सहस्रशः शरसमुदाय नकुलावर टाकिले तेव्हां त्या शरांची अभ्रछाये सारखी चोहीं कडे एक छाया होऊन गेली. नंतर महात्म्या कर्णानें नकुलाचें धनुष्य तोडून सारथ्यास रथनिडा पासून खालीं पाडला व चार निशित बाणांनीं रथाचे अश्व मारून यमगृहीं पाठविले. तेव्हां नकुल रथाखालीं उतरून एक परिघ हस्तांत घेऊन उभा राहतांच तो महाघोर परिघ सुतपुत्रानें छिन्न करून त्यास बहुत पीडित केलें. तेव्हां तो व्याकुल होऊन मोठ्या त्वरेनें पळूं लागला. त्या कालीं राधेयानें त्याच्या पाठीमागें जाऊन आपलें सज्ज केलेलें धनुष्य त्याचे गळ्यांत घातलें असतां नकुल, शक्रचापानें सुशोभित मेघा सारिखा शोभूं लागला. नंतर कर्ण बोलतो हे नकुला, तुझें भाषण सर्व व्यर्थ झालें, तूं जें पूर्वी बोललास तें आतां कर बरें; अरे, पांडव, कौरव मोठे बलिष्ठ आहेत त्यांशीं तूं युद्ध करूं नको, आपल्यास मान जो असेल त्याशीं युद्ध कर. असें भाषण करून नकुल वध करण्यास जरी योग्य होता तथापि कुंतीचे भाषणाचें स्मरण करून त्याचा वध केला नाहीं. तेव्हां नकुल युधिष्ठिराच्या रथासन्निध जाऊन कुंभस्थ सर्पासारखा श्वासोश्वास टाकीत दुःख संतप्त होऊन

रथारूढ झाला. कर्ण, नकुलाचा पराजय करून मोठ्या त्वरेनें पांचालांकडे येतांच कौरवांचा सेनापती पांचालांकडे जातो हें पाहून पांडव सैन्यामध्यें मोठा आक्रोश झाला. त्यांणें कितेकांच्या रथांचीं चक्रें भग्न केलीं, कितेकांच्या ध्वजपताका नष्ट केल्या, कितेकांच्या रथांचे अश्व मारिले, अशा प्रकारें पांचालांच्या सैन्याचा नाना प्रकारें विध्वंस केला. मध्यान्ह कालीं सूर्य जसा भूतांचा दाह करतो तसा सूतपुत्र कर्णानें पांचालसैन्याचा दाह केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५ अध्याय पंचवीस:– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, तुझ्यापुत्राचें सैन्य युयुत्सु पळवीत असतां शकुनीचा पुत्र उलूक, पुढें येऊन अरे उभारहा, उभारहा असें भाषण करूं लागला. त्या कालीं युयुत्सूनें वज्रासारख्या तीक्ष्णधार बाणानें उलूकास ताडित केला असतां उलूकानें तुझापुत्र जो युयुत्सु यानें धनुष्य क्षुरप्र बाणानें तोडून त्याच्या सारथ्याचें शीर छिन्न केलें व रथाचे चारी अश्व मारून सात बाणानीं त्यास ताडित केला असतां युयुत्सु दुसरे रथांत बसला. उलूकानें युयुत्सूचा पराजय केल्यानंतर त्यानें पांचाल वसृंजय यांस निशित बाणांनीं ताडण केलें. हे धृतराष्ट्र राजा, तुझा पुत्र श्रुतकर्मा यानें शतानिकासह वर्तमान अर्धनिमिष युद्ध करून त्याच्या रथाचे अश्व व सूत मारला असतां शतानिकानें तुझापुत्रावर गदा टाकतांच ती गदा तुझा पुत्राच्या रथाश्व सारथ्यानें भस्म करून पृथ्वीचें विदारण करीत पडली. कुरूची कीर्ती वर्धन करणारे ते उभयतां, विरथी जाहलेले वीर एकमेकांकडे पहात युद्धापासून परावृत्त जाहले. त्यांतून तुझापुत्र सभ्रांत होऊन विवींशच्या रथांत बसला आणि शतानिक प्रतिविंध्याच्या रथांत बसला. सुतसोम आणि शकुनी या उभयतांचें युद्ध होत असतां शकुनीनें निशित बाणें करून सुतसोमास जरी ताडित केला तथापि सुतसोमानें हा आपल्या पित्याचा अत्यंत वैरी आहे असें जाणून सहस्रावधि शरानीं त्यास आच्छादन केलें, हें पाहून शकुनीनें शरसमुदायें करून सुतसोमाच्या बाणांचें मथन करून टाकिलें. त्या कालीं सुतसोमानें त्याच्या बाणांचा तत्काल मोठ्या वेगानें नाश करून टाकिला. नंतर शकुनीनें सुतसोमावर कितेक शर टाकिले असतां सुतसोमानें सहापदें एकाएकीं उडी मारून सौबलाचें धनुष्य तोडून पृथ्वीवर पाडिलें आणि तो श्रुतकीर्तीच्या

रथामध्यें आऊन बसला. नंतर शकुनी दुसरें दुर्जय धनुष्य घेऊन पांडवसैन्यां
त आला आणि त्यांज कडील बहुत शत्रुगणांचा नाश करूं लागला, हें पाहून
पांडवां कडील सैनिक पलायन करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६ अध्याय सविस:– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, धृष्ट-
द्युम्न व कृपाचार्य या उभयतांचें युद्ध होत असतां कृपाचार्यानें धृष्टद्युम्नाचें-
निवारण केलें, तेव्हां तो एक पाऊलही पुढें जाण्यास समर्थ जाहला नाहीं. र
थी व अश्वारोह असें बोलले कीं, द्रोणाचार्य मरण पावल्यामुळें हा कृपाचार्य
अत्यंत क्रुद्ध जाहला आहे. या पासून धृष्टद्युम्नाचें जर रक्षण झालें तर ही सक
ल पांडवांची सेना भयापासून मुक्त होईल. हा ब्राम्हण श्रेष्ठ ह्या योध्यांचा वध
न करो; अशीं नाना प्रकारें योध्यांनीं भाषणें केलीं. संजय बोलतो हे धृतराष्ट्र
राजा, कृपाचार्यानें धृष्टद्युम्नास सर्व मर्मांच्या ठायीं पीडित केलें असतां धृ
ष्टद्युम्न गौतम बाणांनीं ताडित झाल्यामुळें मोठ्या मोहानें व्याकुल होऊन पु
ढें काय करावें हें त्यास सुचेनासें जाहलें. त्याकाळीं त्याचा सारथी बोलला हे धृ
ष्टद्युम्ना, तूं स्वस्थ आहेस ना. दैव योगानें तुझे मर्मभेदी बाण ब्राम्हणावर जा-
ऊन पडल्यामुळें त्या द्विजश्रेष्ठानें तुझा मर्म भेदाच्या उद्देशानें हे बाण तुझाव
र टाकिले. अस्तु. तुझा रथ आतां मी मोठ्या त्वरेनें माघारा फिरवितों. असें सा
रथ्याचें भाषण ऐकून धृष्टद्युम्न बोलला हे तात, माझें मन मोहित झालें.
संपूर्ण गात्रांस घर्म सुटला, यास्तव आतां ब्राम्हणाशीं युद्ध पुरे करून जिकडे
अर्जुन अथवा भीमसेन असेल तिकडे मंद मंद चल. असें भाषण ऐकून सार
थ्यानें भीमसेन तुझा सैन्या सह वर्तमान जेथें युद्ध करीत होता तेथें धृष्टद्युम्ना
चा रथ नेला. त्याकालीं पलाईत जाहलेल्या धृष्टद्युम्नाचा रथ पाहून गौतम
शतशः बाणांची वृष्टी करूं लागला, शिखंडी व हार्दिक्य यांचें युद्ध होत अस
तां शिखंडीचें हार्दिक्य निवारण करूं लागला. त्याकालीं शिखंडीनें हार्दि
क्याच्या स्कंध प्रदेशीं ताडण केलें, कृतवर्म्यानें साठ बाणांनीं त्यास भेद क
रून एक बाणानें त्याचें धनुष्य छिन्न करतांच द्रुपदात्मजानें दुसरें धनुष्य
घेऊन हार्दिक्यावर नव्वद बाण टाकिले असतां ते सर्व बाण हार्दिक्याच्या
कवचास स्पर्श करून पृथ्वीवर पडले. हें पाहून शिखंडीनें क्षुरप्र बाणानें-

त्यानें धनुष्य छिन्न केलें.ते उभयतां रथी एकमेकांचा वधकरण्याविषयीं युद्धा मध्यें आपले रथ मंडलाकार फिरऊंलागले असतां कृतवर्म्यानें जिवाचा नाश करणारा एकमहा घोर बाण शिखंडीवर टाकिला असतां त्या बाणाच्या योगें शिखंडी ताडित होऊन ध्वजयष्टीचा आश्रय करून राहिला. त्या कालीं शिखंडीच्या सारथ्यानें आपला स्वामी संतप्त होऊन श्वासोच्छ्वास टाकितो असें पाहून त्याचा रथ रणापासून दूर नेला. शिखंडी पराजित जाहलेला पाहून पांडवांची सेना पळाली. असा विषय या अध्यायांत आहे.

२७ अध्याय सत्तावीसः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, तुझें सैन्य अर्जुनानें नष्ट केलें असतां शाल्व, संसप्तक, शिबि व महाधनुर्धारी पुत्रासह वर्तमान त्रिगर्तराज, आदिकरून अर्जुनावर धांऊन गेले. हे वीर रणांत अर्जुनावर बाण समुदायाची वृष्टी करूंलागले. त्याकालीं अर्जुनानें ह्या योध्यांस ताडित केलें सत्यसेनानें तीन, मित्रदेवानें त्रेसष्ट बाणांनीं अर्जुनास विद्ध केला असतां अर्जुनानें त्या प्रत्येकांसशरें करून ताडित केलें, सौश्रुतीचें शीर देहापासून खालीं पाडलें, इतर जे जे महारथी युद्धास आलेले त्यांचें पांच पांच बाणें करून निवारण केलें. सत्यसेन राजानें कृष्णावर एक तोमर टाकून मोठ्यानें नाद केला. त्या काळीं तो तोमर माधवाच्या सव्यभुजास वेध करून पृथ्वीवर पडला, त्या तोमराच्या आघातानें माधवाच्या हातांतील प्रतोद पडला हें पाहून अर्जुन बोलला हे महाबाहो, माझे अश्व लवकर सत्यसेनाच्या अग्रभागीं ने म्हणजे त्यास मी यमलोकीं नेतों. असें अर्जुनाचें भाषण एकतांच कृष्णानें रथ सत्यसेनाच्या अग्रभागीं नेला तेव्हां अर्जुनानें त्याचें भल्लाकार बाणानें शीर तोडून पाडलें व त्याचा सारथी ही मारला. पुन्हा अर्जुनानें क्रुद्ध होऊन संसप्तक गणांस शतशः बाणांनीं ताडित केलें असतां सहस्रावधी संसप्तकांचे गण रणभूमीवर पडले. नंतर रजतपुंख व क्षुरप्र बाणानें मित्रसेनाचें शीर तोडून पाडलें आणि क्रुद्ध होऊन सुशर्म्यास स्कंध प्रदेशीं ताडित केला असतां सकल संशप्तकाचे गण अर्जुनावर शस्त्रास्त्रांची वृष्टी करून दाही दिशेस नाद करूंलागले, त्यांचे बाणानीं पीडित झाल्यामुळें त्यानें ऐंद्रास्त्राचा प्रयोग केला, त्या अस्त्रापासून सहस्रावधि बाण उत्पन्न होऊ

न कितेक योध्यांचे छिन्न झालेले ध्वज, कार्मुक, पताकायुक्त रथ, गदा, तोमर व पट्टीश आदिकरून यांचे शब्दश्रवणांत येऊंलागले. कुंडलांनीं व उत्तम अक्षांनीं युक्त, पूर्णचंद्रासारखीं छिन्न झालेलीं योध्यांचीं शिरें, अंबरांतील तारा समुदायासारखीं रणभूमीवर दिसूं लागलीं व आभरणांनीं युक्त योध्यांचीं व गजादिकांचीं मृतशरीरें युद्धभूमीवर दिसूं लागलीं. यामुळें अर्जुनाच्या रथचक्रांस संचार करण्याविषयीं मार्ग नाहींसा झाला, चोंहीं कडे रक्ताचा चिखल झाल्यामुळें अर्जुनाचीं रथचक्रें त्यांत बुडालीं असतां अर्जुनाच्या अश्वांनीं मोठ्या श्रमांनीं तीं चक्रें ओढून नेलीं. या प्रकारें अर्जुनानें तें सैन्य वध्यमान केलें असतां त्या युद्धप्रसंगीं अर्जुनापुढें कोणीही उभा राहिला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

२८ अध्याय अठ्ठावीसः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, युधिष्ठीर व दुर्योधन या उभयतांचें युद्ध होत असतां युधिष्ठिरानें बहुत शर दुर्योधनावर टाकिले ते सहन करून दुर्योधन त्याचे अग्रभागीं एकाएकीं आला असतां धर्मराजानें मोठ्या त्वरेनें त्यास वेध करून अरे उभा रहा, अरे उभा रहा असें भाषण केलें. त्याकालीं दुर्योधनानें नऊ निशित बाणांनीं धर्मराजास वेध केला असतां युधिष्ठिरानें, तेरा बाण दुर्योधनावर टाकण्याकरितां घेऊन त्यांतील चार बाणांनीं रथाचे चारी अश्व मारिले, पांचवे बाणानें सारथ्याचें शीर तोडलें, सहावे बाणानें ध्वज तोडला, सातव्या बाणानें धनुष्य; आठव्यानें खड्ग तोडून पृथ्वीवर पाडला आणि पांच बाणें करून दुर्योधनास बहुत पीडित केला. त्याकालीं हताश्वरथ झालेला दुर्योधन भूमीवर उभा राहिला. हें पाहून कर्ण, द्रोणपुत्र व कृपाचार्य हे त्याचे संरक्षणास्तव सन्निध आले. इकडे सर्व पांडुपुत्रही युधिष्ठिराच्या रक्षणास्तव त्याच्या सन्निध आले असतां कौरवांच्या योध्यांचें व पांडवांचें मोठें युद्ध झालें. रथी रथ्यांशीं व हयारोह हयारोहांशीं द्वंद्वयुद्ध करूं लागले. रथस्थ योद्धे, गजस्थ योध्यांसह वर्तमान युद्ध करून त्यानीं निशित व सन्नत पर्व बाणांनीं त्यांस यमलोकीं नेलें, गजांवर जाऊन त्यांचें ठिकठिकाणीं विदारण करूं लागले, अश्वारोह, अश्वारोह्यांसह वर्तमान युद्ध करीत असतां आपल्या तलहस्तांचे चों

हींकडे शब्द करूं लागले, युद्धामध्यें पलायन करणाऱ्या गजांच्या पार्श्व व पृष्ठभागीं अश्वारोहांनीं बहुत ताडित केलें. कितीएक योध्यांनीं खड्गें करून पडलेल्या वीरांचीं शिरें कृंतन करून टाकिलीं, कितेक जिवंत राहिलेल्या योध्यांच्या देहामध्यें कितीएक वीरांनीं शस्त्रें घातलीं, कितेक योध्यांचें मुष्टियुद्ध होऊं लागलें. या प्रकारें सकल योद्धे एकत्र होऊन युद्ध करीत असतां सहस्रावधि मृत झालेलीं धडें उठून उभीं राहिलीं. असें उभय सैन्यांचें शस्त्र संकुल व दारुण युद्ध होत असतां वृद्धीस पावलेल्या गंगेसारखा शब्द होऊन सकल जगत् त्या नादानें पूर्ण जाहलें. हे राजा, त्याकालीं स्वकीय कोण व परकीय कोण याचें ज्ञान त्या शरांनीं विद्ध जाहलेल्या योध्यांस नराहून आपला जय करण्याकरतां युद्ध करावें इतकेंच जाणत होते. ते योद्धे त्या युद्धप्रसंगीं आपल्या स्वकीय व परकीयांसही मारीत, या प्रकारें उभय सैन्यांत वीरांची अशी अवस्था जाहली. कर्णानें बहुत पांचालांचा व धनंजयानें बहुत त्रिगर्तांचा वध केला, भीमसेनानें कौरवांचा व गजसमुदायांचा नाश करून टाकला. हे धृतराष्ट्र राजा, असा अपराण्ह कालीं सूर्य गेला असतां कुरुपांडवांचें सैन्याचा क्षय होऊन गेला. असा विषय या अध्यायीं०आ

२९ अध्याय एकुणतीसः— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, तुझ्यामुखापासून अतितीव्र अशीं दुःखें ऐकिलीं! बरें जसें जाहलेलें युद्ध तूं मला सांगतोस तसेंच जर युद्ध होत असेल तर माझे पुत्र जिवंत राहणार नाहींत असें मला वाटतें. अपराण्ह कालीं हर्ष रोमांच उभे करणारें असें वीरांचें कसें युध्द जाहलें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, कौरव व पांडव यांचें सैन्य एकत्र होऊन युद्ध करीत असतां तुझा पुत्र दुसरे रथांत बसून आपले सारथ्यास असें बोलला कीं, हे सूता, धर्मराज जेथें उभा आहे तेथें त्वकर मला घेऊन चल, असें दुर्योधनाचें भाषण ऐकून सूतानें दुर्योधनाचा रथ युधिष्ठिराचे सन्मुख नेण्याकरितां अश्वांस प्रेरणा केली. इकडे युधिष्ठिर राजा आपल्या सारथ्यास बोलला कीं, हे सारथ्या, जिकडे सुयोधन आहे तिकडे आपले अश्वांस प्रेरणा कर, नंतर ते उभयतां अन्योन्यावर बाण वर्षाव करूं लागले. त्याकालीं दुर्योधनानें भल्लाकार बाणें करून धर्मराजाचें ध

नुष्य छिन्न केलें असतां धर्मराजास तो दुर्योधनाचा अवमान सहन न होतां. त्यानें दुसरें धनुष्य घेऊन दुर्योधनाचें धनुष्य व रथाचा ध्वज छिन्न करून टाकिला. असें अनेक प्रकारें उभयतांचें युद्ध होत असतां दुर्योधन, कलहाचीस मासी व्हावी या हेतूनें धर्मराजावर धांऊन गेला. हें पाहून धर्मराजानें वेगवान् व ज्वलित उल्केसारखी एक शक्ती तुझ्या पुत्रावर टाकिली असतां, त्या शक्तीच्या योगें तुझा पुत्र पृथ्वीवर पडला. त्याकालीं भीमसेन आपल्या प्रतिज्ञेचें स्मरण करून धर्मराजास बोलला हे राजा, तूं याचा वध करण्यास योग्य नाहींस. असें भीमसेनाचें भाषण ऐकतांच धर्मराज माघारा फिरला. दुर्योधन दुःख सागरांत निमग्न झालेला पाहून कृतवर्मा त्याच्या सन्निध आला असतां भीमसेन मोठी गदा घेऊन कृतवर्म्यावर धांऊन गेला. हे राजा, असें तुझाकडील व पांडवाकडील योध्यांचें परस्पर युद्ध जाहलें. असा विषय या अध्यायांत आहे.

३० अध्याय तीस :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, पुन्हा तुझ्या पुत्रांनीं कर्णास पुढें करून पांडवांशीं संग्राम केला. त्याकालीं गज, नर, रथ, अश्व व शंखयांच्या शब्दांनीं हर्षित झालेले उभय सैन्यांतील गज, रथ एकमेकांच्या सन्मुख होऊन एकमेकांस मारूं लागले. या युद्धांत मृत झालेल्या पुरुषांनीं व उत्तम प्रकारचीं मुगुट व कुंडलें धारण केलेलीं अशा वीरांच्या शिरांनीं पृथ्वी अस्त्रित होऊन बहुत शोभली. प्रजांच्या क्षयकालीं यमराष्ट्र जसें सुशोभित दिसतें तसें नष्ट झालेले रथ, नर, अश्व यांनीं युक्त उभयतांचें सैन्य दिसूं लागलें. कर्णानें सात्यकीस बाणांनीं ताडित केला असतां सात्यकीनें कर्णास नानाप्रकारच्या शरांनीं ताडित केला. त्याकालीं तुझे सुहृज्जन, रथ, अश्व व पदाती बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें वृषसेनाच्या सन्निध गेले तेव्हां द्रुपदपुत्र प्रमुख पांडवांकडील वीरांनीं कौरवांचें सैन्य त्वरित पळवून दिल्हें. नंतर पुरुषश्रेष्ठ केशवार्जुन यथाविधी आन्हिक क्रिया व शिवाचें पूजन करून अरिवधाच्या निश्चयानें रथांत बसून संग्राम भूमीचे ठायीं आले. तो रथ कौरव सैन्यांत येतांच सकल सैनिक दुःखानें रथ पहात असतां अर्जुनानें गांडिव धनुष्याचें विस्फारण करू

न कितीएक योध्यांचे रथ बाणांनीं नष्ट करून टाकिले. कितीएक गज, अश्वारोह, अश्व व पदाती पार्थ बाणांनीं यमगृहीं गेले तेव्हां अर्जुनास पाहून दुर्योधन एकाकी त्याचे अग्रभागीं आला आणि त्याजवर अजिम्हक्रबाण टाकीत असतां अर्जुनानें सात बाणांनीं दुर्योधनाचें धनुष्य छिन्नकरून सारथी व रथाचे चारि अश्व मारिले, आठवे बाणानें त्याचें छत्रछिन्न केलें. नंतर प्राणाचा घात करणारा असा एक नवा शर घेऊन दुर्योधनावर टाकिला असतां द्रोणपुत्रानें त्याचे सात तुकडे केले. नंतर अर्जुनानें कांहीं बाणांनीं द्रोणपुत्र, कृपाचार्य, कृतवर्मा, दुःशासन यांचीं धनुष्यें छिन्नकरून तो कर्णाकडे गेला असतां कर्णही सात्यकीस सोडून अर्जुनाकडे आला. नंतर कांहीं बाणांनीं प्रथम त्यास वेध करून सत्तर बाणांनीं कृष्णास वेधलें; पुन्हा तीन बाणांनीं अर्जुनास वेध केला. नंतर सात्यकीनें कर्णास तीक्ष्ण नब्द शरांनीं ताडित करून पुन्हा उग्र नऊ शरांनीं ताडित केला, पुन्हा शंभर शर त्याजवर टाकिले इतक्यांत युधामन्यु, शिखंडी, द्रौपदेय, युयुत्सु, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न इत्यादिकांचें सैन्य, बलवान् चेकितान व धर्मराज इत्यादि पांडवांकडील वीर, रथाश्व, गज व मोठ्या भयंकर पदात्यां सहवर्तमान कर्णास वेष्टून त्याच्या वधाविषयीं यत्न करूं लागले. कर्णानें पांडवांकडील योध्यांची शस्त्रवृष्टी आपल्या अस्त्रवीर्यानें नष्ट करून शत्रुकडील अश्वारोह पदात्यांचे कितीएक समुदाय मोठ्या क्रोधानें नष्ट करून टाकले तेव्हां पांडवांचें सैन्य शस्त्ररहित झाल्यामुळें युद्धापासून पराङ्मुख जाहलें. अर्जुन कर्णास्त्रानें ताडित झाल्यामुळें त्यानें दिशा, आकाश व भूमी शरें करून व्याप्त केली त्याकालीं कितीएक कौरवांचे योद्धे असें बोलूं लागले कीं, हीमुसलाचीच वृष्टी होत्ये की काय! कोणी म्हणूं लागले कीं, बाणनव्हेत परिघच आहेत, याप्रकारें अर्जुनानें अश्व, पदाती व हत्ती यांनीं युक्त, कौरवांचें सैन्य वध्यमान केलेलें आपले नेत्रमिटून इकडे तिकडे भ्रमण करीत नाद करूं लागलें. हे धृतराष्ट्र राजा, याप्रकारें तुझ्याकडील योध्यांचें व पांडवांचें युद्ध होत असतां सूर्य अस्ताचलास गेला त्याकालीं अंधकार पडल्यामुळें शुभाशुभ विचार कांहींच राहिला नाहीं. कौरवांकडील यो

द्रे रात्रीं युद्धविषयीं अस्त झाल्यामुळें पळून गेले. हें पाहून पांडव वाद्यां-
च्या गजर व सिंह नाद करीत आपल्या शिबिरांत जाऊन केशवार्जुनाची
स्तुती करूंलागले. नंतर सकल योध्यांनीं व नरेश्वरांनीं पांडवांस आशी
र्वाद युक्त भाषणें केल्यावर पांडवही हर्षित होऊन त्या रात्रीं आपल्या-
शिबिरा मध्यें राहिले. त्यारात्रीस यक्ष, राक्षस, पिशाच्च व श्वापदें यां-
चे समुदाय रणभूमीवर आल्यामुळें रणभूमी रुद्राच्या क्रीडास्थानासा
रखी मोठी भयंकर दिसूंलागली. असा विषय या अध्यायांत आहे.

३१ अध्याय एकतीस :— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, स्वच्छं
दें करून पार्थानें आमच्या कडील बहुत योध्यांचा क्षय केला, त्या पार्था
चा यमही पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं. एकाकीं पार्थानें स्वभ
द्रेचें हरण केलें, अग्नीस तृप्त केलें, त्याच एका पार्थानें आमच्या कडीलस
र्व राजे युद्धामध्यें जिंकिले, असेते अनिंद्य पांडव पुढें काय करूं लागले
व दुर्योधनानेंही पुढें काय केलें तें मलासांग. असा प्रश्न ऐकून संजय बो-
लतो हे राजा, त्या युद्ध प्रसंगीं पांडवांनीं ताडित केलेले असे कौरवां कडी
ल योद्धे शिबिरा मध्यें आल्यावर पुन्हा युद्धा विषयीं विचार करीत असतां.
कर्ण तुझ्या पुत्राकडे पाहून सर्पासारखा श्वासोच्छ्वास टाकीत त्या सर्व रा-
जांस बोलला कीं, हे वीरहो, अर्जुन युध्धाविषयीं मोठा दक्ष जरी आहे त
थापि श्री कृष्ण यथाकाळीं जें त्यास सूचविणें तें सूचवीत असतो. अ-
स्तु. जें जाहलें तें झालें उद्यां तुझा संकल्प मी सिद्धीस नेईन. असें कर्णाचें
भाषण ऐकतांच दुर्योधनानें तथास्तु असें म्हणून सर्व राजांस आप-
आपल्या शिबिरीं जाण्यास आज्ञा दिली. दुसरे दिवशीं तेसर्व राजे ह-
र्षित होऊन युद्धास निघाले असतां त्यांनीं बृहस्पतीस मान्य असा दुर्ज-
य व्यूह धर्मराजानें रचिलेला पाहिला. त्या प्राण संकट कालीं, बंधू
चें जसें स्मरण होतें तसें दुर्योधनाचें मन कर्णा कडे गेलें. असें संजयाचें
भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, मंद बुद्धी दुर्योधनानें पु
ढें काय केलें, सैन्य परावृत्त केलें असतां दुसऱ्या दिवशीं युद्धास आरं
भ जाहल्यावर कर्णानें कसें युद्ध केलें? सर्व पांडवांनीं सूतपुत्राशीं कसें-

युद्ध केलें! पांडव पराक्रमी असतां हा मंद बुद्धी दुर्योधन कर्णाच्याआश्र- यें करून संग्रामा मध्यें सोमकां सह वर्तमान् त्यांस जिंकण्याची इच्छाक रतो. हे संजया, दुर्योधना करितां कितीमी तीव्र दुःखें सहन करावीं, तीं- केवळ माझ्या हृदयांमध्यें शल्या सारखीं राहनात. कर्णतर दुर्योधनास निरंतर अनुसरूनच आहे असें असतां युद्धामध्यें माझेच पुत्रपराजीत- होऊन नष्ट होतात हें काय! असा धृतराष्ट्राचा प्रश्न ऐकून संजय भाषण- करतो हे राजा, तुम्हीं पूर्वीं धर्मिष्ट आचरणें कोणतीं केलींत याचातर वि चार करा. हे राजा, पांडवां सह वर्तमान युद्ध न करण्या विषयीं तुला मी ब हुत वेळां सांगितलें असेल; परंतु तें माझें वचन तूं ऐकिलें नाहींस. तुम्हीं पांडवां करितां मोठीं घोर पापें आचरण केलींत त्या पापाचा हा परिणाम आला आहे तो अतिक्रांत करण्या विषयीं या कालीं अशक्य असल्या मुळें शोक करूंनकोस. आतां या घोर कृत्याचा परिणाम कसा काय झाला तो सां गतों. हे धृतराष्ट्र राजा, ती रात्र गेल्यावर प्रातः कालीं कर्ण दुर्योधना कडेजा ऊन बोलला कीं, हे राजा, अर्जुनां सह वर्तमान् आजमी युद्ध करूनत्या चा वध करतों अथवा तो तरी आज माझा वधकरील. अर्जुनाचा वध कर ण्यास मला थोडीशी न्यूनता आहे ती सांगतों, मी अर्जुनाशीं युद्धास उ- भा राहिलों असतां इंद्र शक्तीनें हीन आहें, असें जाणून पार्थ माझाशीं युद्धास येईल; व आमच्या उभयतांच्या दिव्य अस्त्रांचें वीर्य ही समान च आहे. परकार्याचा नाश, बाण त्याग, शरीर बला विषयीं व अस्त्र शिक्षा या विषयीं अर्जुन माझा समान नाहीं हें पहा; माझें विजय नामक धनु ष्य सर्व आयुधांमध्यें श्रेष्ठ आहे, याच्यायोगें इंद्रानें दैत्यांसह वर्तमान ज सें युद्ध केलें तसें त्या धनुष्या सहवर्तमान आजमी अर्जुनाशीं युद्ध करतों. हे परशुरामानें दिलेलें धनुष्य गांडिव धनुष्या पेक्षांही श्रेष्ठ आहे, याच धनुष्याच्या योगें भार्गव रामानें एकवीस वेळ पृथ्वी जिंकिली. याधनुष्या च्या योगें आजमी बांधवांसहित अर्जुनास मारून बांधवां सह वर्तमान् तुला हर्षित करतों, आणि सर्व पृथ्वी वरील शत्रु नष्ट करून पर्वत, वनें, द्वीपें व सागरा सह वर्तमान् सकल पृथ्वीचें राज्य पुत्र, पौत्र पर्यंत तुला

न मिळेल, परंतु मला फाल्गुना पेक्षां जी एक न्युनता आहे ती अशी कीं,-अर्जुनास गोविंद जसा सारथी आहे तसा मला कोणी सारथी नाहीं आ-तां ज्या योगानें पार्थवीर अधिक आहे ते सांगतों. सर्व लोकांनीं नमस्कार करण्यास योग्य असा श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथाचा सारथी आहे, अ-ग्नीनें दिलेला कांचन भूषित असा त्याचा दिव्य अभेद्य रथ आहे. मनोज व अश्व अर्जुनाच्या रथास आहेत. इतक्या साहित्यानें जरी मी हीन आहें. तथापि पांडवांशीं युद्ध करण्याची इच्छा करतों खरा परंतु हा शल्य, सारथ्य कर्माविषयीं श्रीकृष्णासमान असल्यामुळें तो माझ्या रथाचें सारथ्य करील असें कर आणि बाणांनीं परिपूर्ण केलेले बहुत गाडे, तसे उत्तम अश्व जोडलेले रथ, माझ्या पृष्ठभागीं निरंतर ठेव इतकी सामोग्री तूं सिद्ध-केली असतां रणामध्यें मी पार्था पेक्षां अधिक होईन. कृष्णापेक्षां शल्य सारथ्य कर्मा मध्यें अधिक आहे व बलानें मीही अर्जुनापेक्षां अधिक आहें, बाहुवीर्या विषयीं मद्रराजा समान कोणी नाहीं. शल्य माझा सारथी झाला असतां इंद्रासह वर्तमान देवही माझा पराजय करण्यास समर्थ होणार नाहींत हे दुर्योधनराजा, तूं शल्य माझा सारथी होण्याविषयीं यत्न कर. असें कर्णानें भाषण केलें असतां तुझा पुत्र दुर्योधन हर्षानें राधेयास बोलला हे कर्णा, तूं जें मला सांगितलेंस तें मी करतों. असें दुर्योधन कर्णासह वर्तमान भाषण करून नंतर शल्याच्या सन्निध गेला आणि मद्रराजास पू-र्वोक्त प्रकारें भाषण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३२ अध्याय बत्तीस:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, तुझा पुत्र दुर्योधन मद्रराजाकडे जाऊन असें बोलला कीं, हे शल्या, कर्णानें जें भाषण केलें तें ऐकिलेंच आहेस तो तुझ्या साहय्याची इच्छा करितो यास्तव हे मद्रेश्वरा, शत्रुपक्षाचा क्षय होण्या करितां तूं कर्णाचें सारथ्य कर, येणें करून कर्ण माझ्या द्वेष्ट्यांचा नाश करील. हे महाभागा, तूं युद्धा विषयीं वासुदेवा सारखा आहेस यास्तव श्रीकृष्ण जसा सर्व अपत्ती पासून पांडवांचें पालन करतो तसा तूं आज राधेयाचें परिपालन कर. भीष्मानें व द्रोणानें आपले भाग न मारितां इतर शत्रु मारिले हे कृपरानें-

युद्धामध्यें उत्तम कर्म नकरतां मरण पाऊन स्वर्गलोकीं गेले. तसेच आम
च्या कडील बहुत योद्धे यथाशक्ती पराक्रम करीत असतां शत्रूंनीं मारल्या
मुळें स्वर्गलोकीं गेले. आतां आमचें सैन्य अल्पराहिलें आहे. सांप्रत पांडव
बलवान सत्य पराक्रमी आहेत ते आतां जेणें करून माझ्या अवशिष्ट सैन्या
चा नाश करणार नाहीत असें कर. हे शल्या, कर्ण अर्जुनाशीं युद्ध करण्या
ची इच्छा करीत आहे तो त्याची इच्छा तूं पूर्ण कर, कृष्णासह वर्तमान पार्थ
प्रति दिवशीं कौरवांची सेना पळवितो हें तूं पाहतच आहेस, हा पार्थ तु-
झा व कर्णाचा अवशिष्ट भाग उरला आहे यास्तव त्या भागाचा कर्णासहव
र्तमान तूं एकत्र होऊन नाश करावास. सर्व रथ्यां मध्यें कर्णश्रेष्ठ व सर्व सा
रथ्यांमध्यें तूं श्रेष्ठ, सर्व अवस्थेच्या ठायीं श्रीकृष्ण जसें पांडवांचें रक्षण
करतो तसें तूं रणामध्यें कर्णाचें रक्षण कर, तूं कर्णाचा सारथी झालास
असतां कर्ण शत्रूंनीं जिंकण्यास असमर्थ होईल. या माझ्या भाषणा वर-
तूं शंका धरूंनको, असें दुर्योधनानें भाषण ऐकून शल्य क्रोधानें बोलला
हे गांधारी पुत्रा, तूं माझा अवमान करतोस काय व माझ्या बलाविषयीं तु-
ला शंका आहे. दुर्योधना तूं निःशंक होऊन कर्णाचें सारथ्य करण्याविष-
यीं मला बोध करतोस कीं काय! हे दुर्योधना, युद्धामध्यें मी राधेयाची
आपल्या तुल्यत्वा विषयीं गणनाही करीत नाहीं. हे कुरुनंदना, मी एकटा
च पांडवांशीं युद्ध करतों. संग्रामामध्यें मी रिपूचें हनन करीत असतां मा
झें शौर्य पहा, तूं आमचा अवमान केलास तो हृदयांत ठेऊन आमच्या सा
रखा पुरुष अभिमानास्तव युद्धाचा त्याग करून जाईल अशी तूं माझ्या वर-
शंका धरूंनको, हें चित्रविचित्र माझें धनुष्य अशी विष सर्पासारखें श
र व सर्व साहित्यानीं युक्त आणि वेगवान् अश्वांनीं जोडलेला माझा रथ प
हा. मी आपल्या तेजें करून पृथ्वीचें विदारण करीन, सर्व पर्वत विशीर्ण-
करून टाकीन व समुद्र शुष्क करीन असा मी बलाढ्य व शत्रुनिग्रहाविष
यीं समर्थ असतां निचाचें सारथ्य कर्म करण्याविषयीं मला सांगतोस?
जो श्रेष्ठ पुरुष परम प्रीतीनें आपल्यास वश झाला असून त्यास नीच
कार्या विषयीं योजिला असतां मोठें पाप आहे. पूर्वी ब्रम्हदेवानें आप-

त्या मुखा पासून ब्राम्हण, बाहु पासून क्षत्रिय, ऊरू पासून वैश्य व पा दा पासून शूद्र यांस उत्पन्न केलें अशी श्रुती आहे. या चारी वर्णांत अन्यो न्य संयोगा पासून प्रतिलोमज ( नीच जातीचा पुरुष व उत्तम जातीची - स्त्री यां पासून जें संतान झालें तें ) व अनुलोमज ( उत्तम जातीचा पुरुष व नी च जातीची स्त्री यापासून जें झालेलें संतान तें ) असे वर्ण विशेष बहुत उत्पन्न झाले. प्रजेचें संरक्षण करणें, द्रव्याचा संग्रह करणें व दान करणें हा धर्म क्षत्रियांचा होय, याजन, अध्यापन व शुद्ध प्रति ग्रह करणें, हे धर्म ब्रा म्हणाचे होत. कृषि कर्म, पशूंचें पालन, धर्मे करून दान हें वैश्यांचें कर्म हो य. ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य यांची परिचर्या ( सेवा ) करणें हा शूद्राचा ध र्म होय. हे दुर्योधन राजा, क्षत्रियांनीं सूत जाती यांची सेवा करावी हें कोठें ही मी ऐकिलें नाहीं तशांतून मी राजर्षी कुला मध्यें उत्पन्न झालेला म हारथिलें करून माझी ख्याती असतां तो मी सारथी होऊन संग्रामा मध्यें सूत पुत्राचें सारथ्य करण्यास उत्सुक होत नाहीं. आतां मी आपले घरीं जा- तों असें शल्य क्रोधानें भाषण करून आपले गृहीं जाण्यास निघाला अ सतां तुझा पुत्र मोठ्या नम्रतेनें बोलला कीं, हे शल्या, वास्तवीक माझा- जो अभिप्राय आहे तो तुला सांगतों. कर्ण तुजपेक्षां अधिक आहे याचि षयीं माझी शंका नाहीं. सर्व शत्रूंस तूं युद्धामध्यें शल्यभूत आहेस म्ह- णून या पृथ्वी तला वर तुला शल्य असें म्हणतात यास्तव हे राजा, जें तूं पूर्वी भाषण केलेंस तें मज करितां आपलें खरें कर. तुझा पेक्षां राधेय वी र्यवान् नाहीं व मीही तुझा पेक्षां वीर्यवान् नाहीं. तूं हय विद्ये मध्यें मोठा- निपुण आहेस म्हणून या युद्ध प्रसंगीं कर्णाचें सारथ्य कर्म करण्या विष यीं मी तुला प्रेरणा करतों. हे शल्या, धनंजया पेक्षां कर्ण युद्धा मध्यें गुणा नें अधीक आहे व वासुदेवा पेक्षां तूं अधीक आहेस असें लोक जाण तात. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे गांधारे, सर्व सै न्यामध्यें देवकी पुत्रा पेक्षां मी अधीक आहें असें जें तूं भाषण केलेंस ते णें करून मी संतुष्ट झालों. महा यशस्वी राधेय अर्जुना सह वर्तमान युद्ध करीत असतां मी त्याचें सारथ्य करावें असें तूं म्हणतोस; परंतु माझी

अशी एक प्रतिज्ञा आहे कीं, मी कर्णाचा सारथी झालों असतां कर्णास पा हिजे तें बोलेन, कर्णानें क्षमा केली पाहिजे. असें शल्याचें भाषण ऐकून- कर्णासह वर्तमान तुझ्या पुत्रानें शल्यास असें भाषण केलें कीं, जें तूं बोल लास तें आम्हांस मान्य आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३३ अध्याय तेहतीस:— दुर्योधन पुन्हा भाषण करतो हे भद्रेश्वरा, पूर्वी देव आणि असुर यांच्या युद्ध प्रसंगीं जें वर्तमान झालें तें व माझ्या पित्या समक्ष मार्कंडेय ऋषीनें मला जें सांगितलें तें संपूर्ण तुला सांगतों. तारकासुर ज्यामध्यें पराभवास कारण असा देव आणि असुर यांचा प्रथम संग्राम एकमेकांच्या जया करतां होत असतां देवांनीं दैत्यांस जिंकिल्यावर ताराक्ष, कमलाक्ष व विद्युन्माली या तारकासुराच्या तीन पुत्रांनीं मोठ्या नियमानें उग्रतप केलें. त्या योगें ब्रम्हदेव त्यात्रिवर्गास वर देण्यास सिद्ध झाला ते त्रिवर्ग एकत्र होऊन ब्रम्हदेवास बोलले कीं, हे पितामह आम्हीं सर्व भूतांचे ठायीं निरंतर अवध्य असावें. असें त्यांचें भाषण ऐकून ब्रम्हदेव बोलला हे असुर हो, सर्वभूतांचे ठायीं अमरत्व तुम्हांस मिळणार नाहीं याशिवाय दुसरा वर मागा. असें ब्रम्हदेवानें भाषण केल्यावर ते पुन्हा ब्रम्हदेवास बोलले कीं, हे पितामह, तूं आम्हांस असा वर दे कीं आम्हीं त्रिवर्ग तीन पुरांत रहात असतां या लोकांत यथेच्छ संचार करून सहस्र वर्षे अतिक्रांत झाल्यावर आम्हीं एकत्र होऊं व हीं- तीन पुरें ही एकत्र व्हावींत. नंतर जो कोणी देवश्रेष्ठ एक बाणानें या तीन पुरांचा नाश करील तो आमचा मृत्यु होईल. असें दैत्यांचें भाषण ऐकतांच ब्रम्हदेव तथास्तु असें म्हणून स्वर्गी गेला नंतर ब्रम्हदेवापासून लब्ध वर झालेले ते त्रिवर्ग असुर दैत्य दानवांनीं पूजित जो मयासुर नामक विश्वकर्मा, त्याजकडे जाऊन त्यानीं तीन पुरें निर्माण करण्यास त्यास आज्ञा दिली. महा बुद्धी विश्वकर्म्यानें स्वतपाच्या योगें कांचन, रौप्य, व लोह यांचीं तीन पुरें निर्माण केलीं असतां त्या त्रिवर्ग दानवांनीं कांचनपूर स्वर्गांत, रजतपूर अंतरिक्षांत, व लोहपूर भूमीवर ठेविलें. तीन पुरांची लांबी व रुंदी शत योजनें समानच होती. कांचन पुरांत ताराक्ष, रौ

ष्य पुरांत कमलाक्ष व लोहपुरांत विद्युन्माली रहात असे. हे तीन दैत्य मो
ठ्या आपल्या तेजानें तीन लोक व्याप्त करून असें बोलूं लागले कीं, प्रजाप
ती कोण कोठें आहे. यातीन दैत्यांस दुसरे अयुत, अर्बुद, कोटिशः दैत्य ये
ऊन मिळाले. तारकाक्षाचा हरि नामक महा बलिष्ठ, महावीर असा एक पु
त्र होता त्याणें तपानें पितामहास संतुष्ट करून असा वर मागीतला कीं,-
आमच्या पुरांत एक वापी (विहीर) असावी त्या वापींत शस्त्रांनीं हत झा
लेले पुरुष टाकिले असतां ते बलाढ्य व्हावेत. याप्रकारें त्याणें ब्रम्हदेवा-
जवळ वर मागितला तो त्यास मिळाल्यावर त्याणें एक वापी उत्पन्न केली.
त्या वापींत ज्या रूपानें व ज्या वेषानें मृत झालेला दैत्य टाकिला असतां तोत
सा जिवंत होई. ते दैत्य पुन्हा पुन्हा उत्पन्न होऊन सर्व लोकांस त्रास देऊं-
लागले. ते सर्व दैत्य लोभ व मोहें करून अत्यंत उन्मत्त व निर्लज्ज होऊ
न देवगणांस पळवूं लागले. या प्रकारें सकल लोक पीडित झाले अस-
तां मरुद्गणां सह वर्तमान इंद्र त्या पुरस्थ दैत्यांशीं युद्ध करूं लागला. त्या
अभेद्य पुराचा इंद्र वज्रें करून भेद करण्यास प्रवृत्त झाला असतां ब्रम्ह
देवाच्या वरदानाच्या योगें तीं पुरें भिन्न झालीं नाहींत. त्या कालीं इंद्र भ
याभीत होऊन देवांसह वर्तमान ब्रम्हदेवासंन्निध गेला. नंतर सकल-
देव ब्रम्हदेवास बोलले हे ब्रम्हदेवा, या दुष्टांच्या वधाचा उपाय आम्हां
सं सांगावा. असें देवांचें भाषण ऐकून ब्रम्हदेव त्यांस बोलला कीं, हे-
देव हो, जो तुम्हांस दुःख देतो तो माझाही अपराध करतो. एक बाणानें ही
तीन पुरें भिन्न करणारा स्थाणु वांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं यास्तव
हे देव हो, तुम्हीं शिवाकडे जाऊन या दानवांशीं युद्ध करण्यास त्याची प्रा
र्थना करा, तो या असुराचा वध करील. असें ब्रम्हदेवांचें भाषण ऐकून श
क्र प्रभृती देव ब्रम्हदेवास अग्रभागीं करून शिवाकडे गेले आणि आप
लीं शिरें त्यांनीं पृथ्वीवर नम्र केलीं. त्या कालीं शंकरानें त्या सर्वांस आशीर्वा
द देऊन उठविल्यावर विस्मय पूर्वक असें भाषण केलें कीं, तुमचें काय
वृत्त आहे तें सांगा. असें ऐकून ते बोलले कीं, हे प्रभो, तुला तीन नेत्र आहे
त, तुझें तेज अमित आहे यास्तव तुला नमस्कार असो. अशी अनेक प्र-

कारें स्तुती करून बोलेले हे देवा, मन, वाणी व कर्म ईहीं करून आम्हीं तुला शरण आलों यास्तव आतां आमचें रक्षण कर. असें देव व ऋषीचें भाषण ऐकतांच शिव बोलले तुम्हांस जें दुःख झालें त्याच्या नाशार्थ मी काय करूं तें मला सांगा. असा विषय या अध्यायांत आहे.

३४ अध्याय चवतीस :— दुर्योधन भाषण करतो हे शल्या, पितृ, देव व ऋषी समुदायांस शंकरानें अभय दिल्यावर ब्रम्हदेव बोलला कीं, हे शंकरा, तुझ्याच रूपेनें प्राजापत्य पदास मी अधिष्ठित होऊन त्या दानवांस वर दिला. त्यांनी पुढें आपल्या मर्यादा अतिक्रांत केल्या यास्तव त्यांचा संहार करण्यास तुझ्यावांचून दुसरा कोणी योग्य दिसत नाहीं, यास्तव तूं त्या दानवांचा पराभव कर. असें ब्रम्हदेवाचें भाषण ऐकून शिव बोलतो, हे देवहो, तुमच्या सर्व शत्रूंचा वध करावा अशी माझी इच्छा आहे, परंतु ते रूरहे- हे बलिष्ठ असल्यामुळें मी एकटा त्यांचा वध करण्यास समर्थ नाहीं, यास्तव तुम्हीं सर्वत्र एकत्र व्हा आणि मी आपलें अर्धतेज तुम्हांस देतों तें घेऊन त्या शत्रूंचा पराभव करा. असें शंकराचें भाषण ऐकून देव बोलतात हे शिवा, आमच्या पेक्षां त्यांस युद्धामध्यें द्विगुणित बल आहे असें आमच्या दृष्टीस पडतें, तेव्हां आम्हीं त्यांचा वध करण्यास कसे समर्थ होऊं. असें सकलदेवाचें भाषण ऐकून शिव बोलतात हे देवहो, तुमचे अपराधीजे कोणी पापी आहेत ते सर्वथा वध करण्यास योग्य आहेत यास्तव माझें अर्धतेज घेऊन तुम्हीं त्यांचा वध करा. असें शिवानें भाषण ऐकून देव भाषण करतात हे महेश्वरा, तुझें अर्धतेज धारण करण्यास आम्हीं समर्थ नाहीं यास्तव आम्हींच आपलें अर्धे बल तुला देतों. असें देवाचें भाषण ऐकून भगवान् शिव बोलतात जर माझें तेज तुम्हांस धारण करण्यास शक्ती नसेल तर मीच तुमचें तेज घेऊन त्यांचा वध करतों. दुर्योधन भाषण करतो हे शल्या, शंकराचें भाषण ऐकून सर्व देवांनीं तथास्तु असें म्हणतांच शंकरानें सर्व देवांचें तेज घेऊन सर्वां पेक्षां बलवान् जाहला. त्या कालापासून शंकराची महादेव अशी सर्वत्र ख्याती झाली. नंतर महादेव सर्व देवांस बोलला कीं, हे देवहो, युद्धामध्यें रिपूंचा वध करण्यास मला धनुष्य

बाण व रथ पाहिजे यास्तव त्याची लवकर सिद्धता करा म्हणजे त्यांस मी पृथ्वीतलावर पाडितों. असें महादेवाचें भाषण ऐकून देव बोलतात. हे महादेवा, आम्हीं आपलीं तेजें एकत्र करून तुला उत्तम प्रकारचा रथ सिद्ध करून देतों. असें देवांनीं शंकरास भाषण करून नंतर ज्या प्रकारें विश्वकर्म्यास रथ सिद्ध करण्यास सांगितला तसा त्याणें निर्माण केला. त्याचा प्रकार सांगतो. विष्णु, सोम व अग्नी या तीन देवतात्म बाणांची कल्पना करून, अग्नी हा बाणाचें कांड, सोम हा बाणाचें शल्य, व विष्णु बाणाचा अग्रभाग झाला. पर्वत, वनें व द्वीपें यांस धारण करणारी जी पृथ्वी इचा रथ केला, मंदराचल पर्वत रथाचा अक्ष केला, महानदी भागीरथीची त्या रथाच्या अक्षाचे आधार भूत काष्ठ स्थानीं योजना केली. दिशा व प्रदिशा यांची रथाचे अवंतर साहित्य स्थानीं योजना केली, सर्व नक्षत्र समुदाय त्या रथाची युगाक्ष संधान त्रिवेणुमय काष्ठ केलें, कृतयुग रथाचें युग केलें, भुजंगश्रेष्ठ वासुकी हें रथाच्या पृष्ठ भागींचें काष्ठ, हिमवान आणि विंध्यपर्वत हीं चक्रें, सकल दानवालय जो समुद्र हा रथाची बंधन, सप्तऋषींचें मंडळ हें परिष्कर, गंगा, सरस्वती व यमुना या तीन नद्यांसह वर्तमान् आकाश ह्या धुरी, सर्व नद्या व जलें हीं इतर बंधनें, अहोरात्र कला, काष्ठा व ऋतु हीं अधोभागींचें काष्ठ, दीप्तिमान ग्रह व तारे ही रथगुप्ती, धर्म, अर्थ व काम हे रथाच्या शंख्या, पुष्प फल युक्त ओषधी व लता ह्या घंटा, सूर्य व चंद्र हीं चक्रें, पूर्वांग स्थानीं रात्र व उत्तरांग स्थानीं दिवस, धृतराष्ट्र प्रमुख दशनागपती ईर्षा, श्वासोश्वास टाकणारे इतर मोठमोठे सर्प होते तीं योक्रें, स्वर्ग हें युग, संवर्तक काळींचे मेघ हे युगचर्म, कालपृष्ठ, नहुष, कर्कोटक, धनंजय व इतर ही बहुत नाग हे अश्वाचे केश बांधणारे, दिशा प्रदिशा ह्या अश्वाच्या रश्मी, ग्रह, नक्षत्र व तारा इत्यादिकांनीं चित्रविचित्र झालेलें आकाश, हे रथाचे बाह्यावर्ण, इंद्र, वरुण, यम व कुबेर हे चार रथाचे अश्व, सिनीवाली, अनुमती, कुहू, राका, हीं योक्रें सिनीवाल्याद्यधिष्ठित, पितर हे अश्वाच्या लगामाचें कीलक, धर्म, सत्य, तप व अर्थ हे अश्व कंठाचे रश्मी, मन हें या रथाची आधार भूमी, सरस्वतीचीं हा रथाचा मार्ग केला. हा रथ मनानें कल्पित, शब्दमात्र शरीरी-

होता. या रथाच्या नानावर्णाच्या चित्रविचित्र पताका वायूनें कंपित होत होत्या, विद्युल्लता व इंद्रधनुष्यानें तो रथ युक्त असल्यामुळें मोठा देदीप्यमान दिसत होता, प्रतोद स्थानीं वषट्कार, शीर्षबंधन स्थानीं गायत्री, यज्ञाविषयीं जो संवत्सर कथित केला आहे तो धनुष्य, सावित्री ही धनुष्याची प्रत्यंचा, दिव्य कालचक्र हें कवच व मेरु ही ध्वजयष्टी या प्रमाणें योजना केली. नंतर रथसिद्ध झालेला पाहून सकल देवता विस्मयातें पावल्या. सर्व लोकांचीं तेजें एकत्र स्थित झालेलीं पाहून सकल देवानीं शंकरास सांगितलें. दुर्योधन भाषण करतो हे शल्या, नंतर त्या महारथामध्यें शंकरानीं आपलीं मुख्य मुख्य आयुधें ठेविलीं आणि ध्वजयष्टी नम्र करून त्याजवर आपले वृषभाची स्थापना केली. ब्रम्हदंड, कालदंड, रुद्रदंड व ज्वर हे रथाचे पार्श्व गोपक, अथर्वांगी रस हे उभयतां शिवाच्या रथाचे चक्ररक्षक, ऋग्वेद व सामवेद हे रथाचे अग्ररक्षक, इतिहास, धनुर्वेद व पुराणें हे रथाचे पृष्ठरक्षक झाले. दिव्य वाणी व विद्या ह्या रथाच्या पार्श्वचर भागीं स्थित झाल्या, सर्व स्तोत्रें, वषट्कार व ॐकार हे रथाचे अग्रभागीं राहून अति शोभा उत्पन्न करूं लागले, षड्ऋत्वात्मक संवत्सराचें चित्रविचित्र धनुष्य करून परमेश्वर शिवानें आपली छाया म्हणजे पूर्वी सांगीतलेली शब्द ब्रम्हरूप सावित्री आत्मसमान आहे असें जाणून तिची प्रत्यंचा केली. यास्थलीं कालहाच भगवान् रुद्र, संवत्सर त्याचें धनुष्य व भयंकर अशी कालरात्री त्या धनुष्याची अजरामर प्रत्यंचा असल्यामुळें तिलास्पर्शकरण्यास कोणीही समर्थ झाले नाहींत. दुर्योधन बोलतो हे शल्या, भगवान् शिवाचा विष्णु आत्मा असून तोच बाणमय झाल्यामुळें त्या भयंकर धनुष्यास व विष्णुस्वरूपी बाणास स्पर्श करण्याविषयीं कोणी समर्थ झाले नाहींत. भृगु व अंगिरा यां पासून उत्पन्न झालेल्या असह्य क्रोधाग्नीची त्या बाणावर योजना केली. त्या कालीं तो नीललोहित शिव दश सहस्त्र आदित्याच्या तेजासारिखा देदीप्यमान दिसूं लागला. धर्मधर्माश्रित जिवाचा हा शिव निरंतर त्राण करता व हनन करता होय. त्याकालीं शिवाच्या सर्वांगाचे ठायीं जंगमात्मक सकल जगत शोभूं लागलें; कवच व धनुष्यबाण घेऊन त्या रथांत शिव आरूढ होतांच सुगंध. वायू सु

टला, सकल देवता त्रस्त झाल्या, मेदिनी कांपूं लागली, नंतर शिव हास्य करून सकल देवांस बोलला कीं, माझा सारथी कोण होणार. त्याकाळीं देव बोलले कीं, जाला तुम्हीं सारथी कराल तो होईल, असें देवांचें भाषण ऐकून शिव बोलला माझ्या पेक्षां जो कोणी श्रेष्ठ असेल त्याचा विचार करून लवकर सारथी करा. असें शिवाचें भाषण ऐकून सकल देव ब्रम्हदेवाकडे गेले आणि त्यास असें बोलले कीं, हे ब्रम्हदेवा, तूं सांगिन त्या प्रमाणें दैत्यांच्या वधाविषयीं शिवास प्रसन्न केला, रथही सिद्ध केला, चित्रविचित्र आयुधेंही सिद्ध केलीं, परंतु त्यारथावर बसण्या करितां सारथी कोण करावा या विषयीं आम्हांस कांहीं सूचत नाहीं. तूं सर्व गुणांनीं देवा पेक्षां अधीक आहेस यास्तव रथावर सारथ्य स्थानीं आरूढ होऊन अश्वांस प्रेरणा कर. त्याकालीं पितामह, देवांस बोलला हे देवहो, तुम्हीं जें भाषण केलें तें मिथ्या होणार नाहीं, शिव युद्ध करीत असतां मी त्याच्या रथाचे अश्व धारण करतों, असें म्हणून ब्रम्हदेव रथाचे ठायीं आरूढ झाला आणि शिवास बोलला कीं, आपण रथामध्यें बसावें. त्याकाळीं शिव बाण हस्तामध्यें घेऊन रथांत बसला. हें पाहून ऋषी, गंधर्व, देव समुदाय व अप्सरा यांनीं त्याचें स्तवन केलें. नंतर शिव, इंद्र प्रभृती देवांस बोलला कीं, हे देव हो, तुम्हीं कांहीं शोक करूं नका, या बाणें करून तुमचे सकल शत्रू मरण पावले असें जाणा. असें महादेवाचें भाषण ऐकून सकल देव बोलतात हे शिवा, आमचे सकल शत्रु आज निश्चयें करून मेले असें आम्हीस मजतों, तूं जें भाषण केलेंस तें कधींही मिथ्या होणार नाहीं, असें भाषण करून सकल देव संतुष्ट झाले. नंतर शिव सकल देवांनीं वेष्टित होऊन युद्धास निघाला. तेव्हां सकल जगत व देवता संतुष्ट झाल्या, सकल ऋषी नानाप्रकारच्या स्तोत्रांनीं स्तवन करीत असतां शिवाचें तेज दृष्टीस पाऊं लागलें, सहस्त्रावधी गंधर्वांनीं शिवाच्या प्रयाण कालीं नाना प्रकारच्या वाद्यांचा गजर केला. त्याकालीं शिव ब्रम्हदेवास बोलला हे ब्रम्हदेवा, जिकडे दैत्य आहेत तिकडे आपले अश्वांस प्रेरणा कर. मी आज शत्रूंचा वध करीत असतां माझें बाहुबल तूं पहाशील. अ-

सें शिवाचें भाषण ऐकून ब्रम्हदेवानें वायूसमान वेगवान् अश्वांस त्रिपुराकडे जाण्यास प्रेरणा केली. तेव्हां ते अश्व आकाशासच स्पर्श करतात काय! अशा वेगानें चालले. शिवाच्या नंदीनें मोठा भयंकर शब्द करून सकल दिशा पूर्ण केल्या. तो भयंकर वृषभाचा शब्द ऐकून बहुत दैत्य नाश पावले. कांहीं दैत्य शिवाशीं युद्ध करण्यास सन्मुख आले तेव्हां त्यांस पाहून शिवास मोठा क्रोध आला. त्याकालीं शिवानीं हस्तामध्यें बाण घेतांच सकल त्रैलोक्यांतील भूतें त्रस्त झालीं, भूमी कंपायमान होऊं लागली, घोर उत्पात होऊं लागले, सोम, अग्नी, विष्णु, ब्रम्हदेव व रुद्र यांस मोठा क्षोभ उत्पन्न होतांच शिवाचा रथ पृथ्वीमध्यें जाऊं लागला. त्याकालीं नारायणानें शरभागांपासून आपला अंश काढून वृषभाचें रूप धरिलें आणि रथास वर उचलून धरला. त्याकालीं शिव मोठ्या संभ्रमानें भयंकर नाद करून वृषभाचे मस्तकावर व अश्वांचे पृष्ठावर बसून दानवांचीं पुरें पाहूं लागला. त्याकालीं शिवाच्या भारानें अश्वांचे स्तन नष्ट झाले व वृषभाचे खुर द्विधा झाले तेव्हांपासून त्यात्या जातीचे तसेच आहेत. नंतर शिवानें आपलें धनुष्य सिद्ध करून बाणाचें संधान केलें आणि त्या बाणावर पाशुपत अस्त्राचें अभिमंत्रण करून त्रिपुरासुरावर सोडण्याचा विचार केला इतक्यांत दैत्यांच्या तिन्ही पुरांचें एक पुर झालें, हें पाहून देवगण, सिद्ध व ऋषी मोठा हर्ष पावले. नंतर शिवानें तें दिव्य धनुष्य आकर्षण करून तीन देवतात्मक बाण त्या धनुष्यास लाऊन त्रिपुरासुरावर सोडितांच त्या बाणानें तिन्ही पुरें पडलीं आणि एकाएकीं सर्वांचा आर्तघोष झाला. त्या बाणानें सकल असुरांस दग्ध करून पश्चिम समुद्रांत नेऊन टाकिलें. असा शिवानें त्रैलोक्याच्या हिता करतां क्रोधानें त्रिपुरासुराचा व दानवांचा दाह करून टाकिल्यावर शिवाच्या क्रोधापासून अग्नी उत्पन्न झाला, तो अग्नी सर्व लोकांचें भस्म करील असें जाणून शिवानें हांहा म्हणून त्याचें निवारण केलें. नंतर देवांनीं व ऋषींनीं शिवाची स्तुती केली असतां शिवानें त्यांस आपल्या स्थलीं जाण्या विषयीं आज्ञा दिल्ही. नंतर प्रजापती प्रभृती देव आपआपल्या भुवनीं गेले. दुर्योधन बोलतो हे शल्या, ब्रम्हदेवानें ज

सें शिवानें सारथ्य कर्म केलें तसें तूंही कर्णाच्या अश्वांच्या रश्मी धरून-
त्याचें सारथ्य कर. तूं कृष्ण, कर्ण व अर्जुन यां पेक्षां ही श्रेष्ठ आहेस याचि-
षयीं मला कांहीं संशय नाहीं. हा राधेय युद्धा विषयीं रुद्रा सारिखा आहे.
व सारथ्या विषयीं तूं ब्रम्हदेवासारिखा आहेस, या उभयतांनीं जसे असुर
समुदाय जिंकिले तसे तुम्हीं उभयतां माझ्या शत्रूंस जिंका. हे शल्या, जेणें-
करून राधेय, कृष्णार्जुनाचा लवकर वध करील असा कांहीं यत्न कर. पूर्वीं-
माझ्या पित्याच्या गृहीं कोणी एक धर्म वेत्ता ब्राम्हण आला होता त्याणें माझ्या
पित्यास एक गोष्ट सांगीतली आहे ती तुला मी सांगतों. भार्गवाच्या कुलांत
जमदग्नी नामक कोणी पुरुष झाला, त्यास पुढें राम म्हणून महायशस्वी अ
सा पुत्र झाला त्याणें आपल्यास अस्त्रें मिळण्याकरितां इंद्रियांचा निग्रह क
रून मोठ्या तीव्र तपानें महादेवास संतुष्ट केला. तेव्हां महादेव बोलले कीं,
हे जामदग्निरामा, तुझ्या तपानें मी संतुष्ट झालों, तुझें कल्याण असो, तुझें ई-
प्सित मी जाणलें, तूं आपला आत्मा पवित्र कर म्हणजे तुला जें कांहीं इष्ट-
आहे तें सर्व मी देईन. असें शिवाचें भाषण ऐकून जामदग्निराम बोलला कीं,
हे देवा, ज्या कालीं अस्त्रें धारण करण्यास मी पात्र झालों असें तुला वाटेल-
त्या कालीं तूं मला अस्त्रें दे, तेव्हां मी घेईन. असें परशुरामानें भाषण करू
न तपास आरंभ केला. इंद्रिय निग्रह करून बहुत वर्षें पर्यंत शिवाची आरा
धना केली असतां शिव प्रसन्न होऊन स्वसन्निध पार्वती होती तिला बोल
ला कीं, हा जामदग्न्य फार चांगला आहे. याची भक्ती माझे ठायीं बहुत दृढ-
आहे, याचें व्रत ही मोठें नैष्ठिक आहे. या प्रकारें शिवानें देवीच्या व देव -
पितरांच्या समक्ष मोठ्या प्रीतीनें भार्गव रामाच्या गुणांची प्रशंसा के-
ली. इतक्यांत दैत्यांनीं पीडित केलेले देव महादेवाकडे येऊन बोलले हे दे
वा, आमच्या शत्रूंचा पराभव कर. त्या कालीं शिवानें देवांचें भाषण ऐक
तांच त्यांच्या रिपू क्षय करण्या विषयीं प्रतिज्ञा करून भार्गव रामास भाष
ण केलें कीं, हे भार्गवरामा, देवांच्या शत्रूंचा तूं पराभव कर. यांत लोकांचें
हित होऊन माझी प्रीती होईल. असें शिवाचें भाषण ऐकून भार्गवराम-
हात जोडून बोलला कीं, हे शंकरा, मजपाशीं अस्त्र नाहीं त्या पेक्षां युद्ध-

दुर्मद दानवांचा वध करण्यास माझी शक्ती नाहीं. असें भार्गव रामाचें भाषण ऐकून महेश्वर बोलतो हे रामा, सत्वर माझ्या आज्ञेनें तूं जा, तूं शत्रूंचें हनन करण्या विषयीं समर्थ होशील. असें रामानें शिवाचें भाषण ऐकून तो सत्वर दानवांशीं युद्धास गेला आणि त्यांस बोलला हे दानव हो, तुम्हीं मद दर्प व बल इत्यादिकें करून युक्त झाले आहांत यास्तव आतां माझ्याशीं युद्ध करा. तुमचा पराभव करण्या करतां शिवानें मला पाठविला आहे, असें भाषण करून व त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचा वध केला. नंतर भार्गव रामाच्या शरिरास दैत्यांच्या बाणांनीं व्रणें पडलीं होतीं तीं शिवानें पाहतांच त्याच्या शरिरास स्पर्श करून तत्काळ त्यानें शरीर निरव्रण करून टाकिलें आणि भार्गव रामावर संतुष्ट होऊन व त्याचें तें अघटित कर्म पाहून त्यास नाना प्रकारचे वर दिल्हे. पुढें प्रीतीनें असें भाषण केलें कीं, हे भार्गव रामा, तुझ्या शरिरास शस्त्रांच्या आघातानें बहुत पीडा झाली. तुझें हें अमानुष कर्म पाहून मी फार संतुष्ट झालों यास्तव हीं माझीं दिव्य अस्त्रें तुला जीं पाहिजेत तींतीं देतों. अशीं शिवानें रामास समस्त दिव्य अस्त्रें देऊन नाना प्रकारचे बहुत वर दिले असतां रामानें ते घेऊन नंतर शिवास नमस्कार करून त्याच्या आज्ञेनें पुन्हा तो आपल्या स्थानीं गेला. ही कथा एक्या ऋषीनें पूर्वी माझ्या पित्याजवळ सांगितली होती ती मी ऐकिली, त्या भार्गव रामानें दिव्य धनुर्वेदाचा कर्णास मोठ्या प्रीतीनें उपदेश केला. तस्मात् हे शल्या, कर्णास कांहीं जर दोष असता तर जामदग्न्य रामानें यास अस्त्र विद्या दिली नसती, तस्मात् कर्ण कांहीं दोषी नाहीं. कदाचित् तूं म्हणशील कीं हा सुत कुळांत उत्पन्न झाला तर तेंही मानूं नको, हा क्षत्रिय कुळांत कोणी एक देव पुत्रच उत्पन्न झाला असें मी समजतों; हा सर्वांपेक्षां कुळानें श्रेष्ठ आहे. हे शल्या तूं यास सूत कुळोद्भव असें कधींही समजूं नको. सकुंडल, सकवच, दीर्घ बाहू, महारथी, सूर्या सारखा तेजस्वी पुत्र सूत कुळांत कधींही उत्पन्न होईल काय; पहा याचे नागराज शुंडे सारखे पुष्ट बाहू कसे दिसतात. याचें विशाल वक्षस्थल सर्व शत्रूंचें नाशन करणारें कसें दिसतें तें पहा. अरे हा कोणी प्राकृत पुरुष उत्पन्न झालेला नव्हे, हा महा

त्या रामाचा शिष्य प्रतापी आहे. असा विषय या अध्यायांत आहे.

३५ अध्याय पस्तिस :— दुर्योधन भाषण करतो हे शल्या, रुद्र-रथारूढ असतां ब्रम्हदेवानें जसें त्याचें सारथ्य कर्म केलें तसें तूं कर्णाचें सारथ्य कर्म कर. रथ्यापेक्षां त्याचा सारथी अधीक असावा, या हेतुस्तव युद्धामध्यें तूं कर्णाच्या रथाचें अश्वधारण कर. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून शल्य बोलतो- हें दुर्योधनराजा कृष्णार्जुनाचें सर्व अतिमानुष आख्यान मला बहुत करून विदित आहे. रुद्राचा सारथी पितामह होता हें जाणून कृष्णाही पार्थाचा-सारथी झाला, कोणत्याही प्रकारें सूतपुत्रानें पार्थाचा वध केला हें कृष्णानें जर पाहिलें तर शंख, चक्र, गदा धारण करणारा श्रीकृष्ण स्वतः आपण युद्ध करून तुझें सैन्य दग्ध करून टाकील. त्याकाळीं त्याच्या अग्रभागीं उभें राहण्यास तुझा सैन्यांत कोणीही समर्थ होणार नाहीं. असें भाषण ऐकून दुर्योधन बोलला हे शल्या, कर्णास तूं सामान्य मानू नको, कर्णाच्या धनुष्याच्या प्रत्यंचेच्या भयंकर शब्द ऐकून पांडवांचें सैन्य सर्व दिशेस पलायन करतें. हे महाबाहो, शतशः माया प्रगट करणारा जो घटोत्कच यास रात्रीं युद्धांत कर्णानें मारिला हें तूं प्रत्यक्षच पाहिलें आहेस. त्या कालीं अर्जुन कर्णाच्या सन्मुख युद्धार्थ उभा राहिला नाहीं, त्या कर्णास पांडव युद्धामध्यें कसे जिंकतील! कर्ण क्रुद्ध झाला असतां वज्रधारी पुरंदराचाही तोसमरामध्यें वध करील. हे शल्या, बाहुवीर्येंकरून तुझा समान या पृथ्वीमध्यें कोणी नाहीं, सर्वशत्रूंस पराक्रमाविषयीं तूं शल्यभूत आहेस म्हणून तुला शल्य असें म्हणतात; बरें वासुदेव तरी तुमच्या सैन्याचें कां-निवारण करील; पूर्वीं वासुदेवानें मी युद्ध करणार नाहीं अशी प्रतिज्ञा केली आहे यास्तव तो कशा करितां युद्ध करील. तो युद्ध करील तर मिथ्या प्रतिज्ञा होईल. तदनंतर वासुदेवा सारखी प्रतिज्ञा केली नाहींस ते व्हां तुला पांडव सैन्यासह वर्तमान युद्ध करण्यास काय प्रतिबंध आहे. हे शल्या तूं आहेस म्हणून मी राजाच्या ऋणापासून युद्धामध्यें मुक्त होण्याची इच्छा करतों. असें दुर्योधन राजाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हें गांधारे, ज्यापेक्षां सैन्याच्या अग्रभागीं तूं मला असें भाषण केलेंस कीं देवकीपुत्रा

पेक्षां तूं श्रेष्ठ आहेस त्याजपेक्षां मी तुजवर संतुष्ट झालों. मी कर्णाचें सारथ्य-करितों; परंतु हे वीर, कर्णाच्या सन्निध मी बसलों असतां पाहिजे तसें त्यासमी भाषण करीन अशी माझी प्रतिज्ञा आहे. असें भाषण ऐकून दुर्योधन बोलला हे कर्णा, महेंद्रानें जसें दानवांस जिंकिलें तसें तूं पार्थास आजरणामध्यें जिंक. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून कर्ण हर्षानें बोलला हे दुर्योधन राजा, मद्र राजानें अत्यंत हर्षित होऊन तुझाशीं हें भाषण केलें असें मला वाटत नाहीं यास्तव पुन्हा तूं मधुर वाणीनें त्याच्याशीं भाषण कर. असें कर्णाचें भाषण-ऐकून दुर्योधन मद्रराजास बोलला हे शल्या, आज कर्ण सर्व पांडवांचा वध करून रणभूमीचे ठायीं फाल्गुनास मारण्याची त्याची इच्छा आहे या-स्तव त्याच्या अश्वांच्या रश्मी धर. असें भाषण ऐकून शल्य बोलला हे दु-र्योधन राजा, जर तुझा मनांत मी सारथ्य करावें असें आहे तर मी तुझें सर्व-प्रिय करण्यास सिद्ध आहे; परंतु कर्णास मी कांहीं प्रियाप्रिय भाषण करीन त्या सर्व भाषणाची तूं व कर्णानें क्षमा करावी. असें शल्याचें भाषण ऐकून क-र्ण बोलला हे मद्रराज, शिवाचा हितकर्ता जसा ब्रह्मदेव व पार्थाचा हितकरता जसा केशव आहे तसा तूं माझा हिताविषयीं युक्त हो. असें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे कर्णा, आत्मनिंदा, आत्मस्तुती व परनिंदा, परस्तुती-हीं चार कृत्यें श्रेष्ठ जनानीं करूं नयेत; तथापि तुला माझा प्रत्यय येण्या करि-तां प्रस्तुत मी आपला स्तव करतों तो ऐक. युद्धांत सावधपणा, अश्वप्रेरणे-विषयीं पुढें दोष जे मिळणार त्याचें दर्शन व त्या दोषांच्या परिहाराविषयीं मी केवळ शक्राच्या मातली सारथ्या सारिखा योग्य आहे. यास्तव हे सूतजा कर्णा, पार्थाशीं तूं युद्ध करील असतां तुझा रथाचे अश्व मी वहन करीन याविषयीं कांहीं चिंता करूं नको. असा विषय या अध्यायांत आहे.

३६ अध्याय छत्तीस:— दुर्योधन भाषण करतो हे कर्णा, हा मद्रराज तुझें सारथ्य करील, तूं कांहीं चिंता करूं नको. तूं रथास्थित असतां व मद्रराज सारथ्य स्थानीं असतां युद्धामध्यें तूं पार्थाचा पराभव करशील. संजय भा-षण करतो हे धृतराष्ट्र राजा, असें दुर्योधन कर्णास भाषण करून पुन्हा प्रा-तःकालीं शल्यास असें बोलला हे शल्या, संग्रामामध्यें कर्णाच्या रथाच्या

श्रेष्ठ हयांस तूं प्रेरणा कर, तूं राधेयाचें रक्षण केलें असतां तो धनंजयाचा पराभव करील. असें दुर्योधनानें भाषण केलें असतां शल्य तथास्तु असें म्हणून रथा सन्निध आला, हें पाहून कर्णानें शल्यास भाषण केलें कीं, हे शल्या, माझा रथ सर्व साहित्यें करून सिद्ध कर. तेव्हां शल्यानें उत्तर केलें कीं, हे कर्णा, गंधर्वनगरा साररवा तुझा कल्याण कारक रथ सर्व साहित्यानीं सिद्ध आहे. असें शल्यानें भाषण केल्यावर कर्णानें रथाचें यथाविधी पूजन करून व त्यास प्रदक्षिणा करून सूर्याचें उपस्थान केलें आणि आपल्या समीपस्थ शल्यास भाषण केलें कीं, हे शल्या, तूं रथावर आरूढ हो. असें भाषण ऐकून रथावर शल्य, सिंहा साररवा आरूढ होतांच कर्णही रथारूढ झाला, तेव्हां ते उभयतां, आदित्य व अग्नी साररवे शोभूं लागले. कर्ण युद्धा करतां रथारूढ झाला हें पाहून दुर्योधन बोलला हे राधेया, पूर्वी माझें मनोगत असें होतें कीं, भीष्म, द्रोण हे अर्जुन व भीमसेनाचा निश्चयें करून वध करतील; परंतु हे कर्णा, त्यानीं युद्धामध्यें जें कर्म केलें नाहीं तें कर्म आज तूं कर, धर्मराजास तूं युद्धामध्यें धर, अथवा अर्जुन, भीमसेन व माद्रीसुत यांचाही वध कर; आतां तूं युद्धास लवकर जा. असें दुर्योधनाचें भाषण ऐकतांच सहस्रावधी वाद्यांचें व अयुतशः भेरींचे शब्द स्वर्गस्थ मेघा साररवे होऊं लागले. दुर्योधनाचें भाषण ऐकून राधेय शल्यास बोलला हे शल्या, भीमसेन, धनंजय, उभयतां माद्रीपुत्र व धर्मराज यांचा मी वध करीपर्यंत अश्वांस प्रेरणा कर. मी सहस्रावधी कंकपत्री बाण सोडीत असतां माझें बाहुवीर्य अर्जुन पाहो; असें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे कर्णा, ज्या कालीं संग्रामामध्यें अशनी शब्दासाररवा गांडीवाचा निर्घोष ऐकशील, भीमसेन कुंजरांच्या समुदायांचे दंत विशीर्ण करून त्यांचा वध करीत असतां तूं पाहशील, तसेंच संग्रामांत धर्मपुत्र युधिष्ठीर व नकुल सहदेवानीं आपल्या पृषत्क बाणेंकरून आकाश अभ्रछाये साररवें केलें लें ज्या कालीं पहाशील, त्या कालीं तूं असें भाषण करणार नाहींस. असें मद्रराजानें भाषण केलें असतां त्या भाषणाचा अनादर करून कर्ण शल्यास असें बोलला कीं, हे शल्या, आतां पुढें काय होईल तें तूं पहाशील. असा विषय या अध्यायांत आहे.

३७ अध्याय सदतीसः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रा, महाधनुर्धरी कर्ण युद्धार्थ निघाला हें पाहून सकल कौरव हर्षशब्द करूं लागले. त्याकालीं पृथ्वी चंचल झाली, मृगपक्ष्यांचे समुदाय मोठें भय सूचवीत तुझ्यासैन्याच्या अपसव्य मार्गी जाऊं लागले, कर्णाच्या रथाचे अश्व भूमीवर पडले. असे नानाप्रकारचे उत्पात कौरवांच्या विनाशार्थ होत असतांही कौरवांकडील योद्धे त्या उत्पातांची गणना न करतां आज पांडव पराजित झाले असें मानू लागले. त्याकालीं कर्ण शल्यास बोलला हे शल्या, मी धनुष्य धारण करून रथारूढ झालों असतां इंद्रापासून ही भय पावणार नाहीं. मृत्यूसारखा उग्ररूप धारण करणारा अर्जुन युद्धामध्यें आला असतां माझ्यावेरीज त्यांचे बाण सहन करणारा दुसरा कोणी नाहीं. द्रोणाचार्य, हुताशन आणि आदित्यासारखा तेजस्वी, पराक्रमानें विष्णुपुरंदरासारखा, नीतीनें बृहस्पती व शुक्राचार्यासारखा असतां त्याचीं अस्त्रें, बल व पराक्रम इत्यादि त्याचें संरक्षण करण्यास समर्थ झालीं नाहींत. हे शल्या, धृतराष्ट्राच्या सर्व स्त्रिया व कुमार आक्रोश, रुदन करीत आहेत, धृतराष्ट्रपुत्राचें पौरुष नष्ट झालें. आतां अवशिष्ट कृत्य मलाच कर्तव्य आहे यास्तव माझा रथ घेऊन सत्वर शत्रुसैन्यांत चल. आतां पांचाल व सृंजयांकडे सत्वर चल म्हणजे युद्धामध्यें मी त्यांचा वध करीन अथवा ज्या मार्गानें द्रोणाचार्य गेला त्या मार्गानें यमलोकीं जाईन. हे शल्या, व्याघ्रचर्मानें वेष्टित केलेला ज्याचा अक्ष शब्द करीत नाहीं असा रथ परशुरामानें मला दिला आहे हा पहा. या रथामध्यें आज मी आरूढ होऊन यम, वरुण, कुबेर व इंद्र हे दिक्‌पाल आपल्या गणासह वर्तमान येकत्र होऊन अर्जुनाचें रक्षणार्थ जरी आले तथापि त्यांसह वर्तमानही मी अर्जुनास जिंकीन. असें कर्णाचें भाषण ऐकून शल्यानें उत्तर दिल्हें कीं,— हे कर्णा, आपल्या सामर्थ्यापेक्षां तूं अधीक भाषण करतोस. इंद्रानें रक्षित जसे देव तसे कृष्णानें यादव संरक्षित असतां त्यांमध्यें प्रवेश करून कृष्णाची कनिष्ठ भगिनी सुभद्रा अर्जुनावांचून हरण करण्यास दुसरा कोणास मर्थ आहे बरें! शंकरास युद्धाविषयीं अर्जुनावांचून कोण पुरुष आव्हान करील. अशीं अनेक प्रकारचीं रिपूचीं स्तवयुक्त व कठोर भाषणें शल्य करीत-

असतां कर्ण अत्यंत रोषित होऊन शल्यास बोलला कीं. हे शल्या, कांउगीच वल्गना करतोस, मी युद्धास उद्युक्त झाल्यावर माझा अर्जुनानें जर पराभव केला तर तुझें हें श्लाघ्ययुक्त भाषण सत्य होईल. असें भाषण ऐकून शल्यानें पुढें उत्तर दिलें नाहीं. नंतर कर्णानें शल्यास आपला रथ युद्धार्थ सत्वर पुढें नेण्यास सांगितला तेव्हां शल्यानें रथास प्रेरणा केल्यानंतर तो रथ शत्रूंचा नाश करीत पांडवसैन्याकडे गेला आणि पांडवांची सेना पाहून कर्ण मोठ्या त्वरेनें धनंजय कोठें आहे असा प्रश्न करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३८ अध्याय अडतीस:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कर्ण तुझा पुत्रास हर्ष उत्पन्न करीत पांडवसैन्यांत जात असतां मार्गांत प्रत्येक योध्यांस पाहून असें भाषण करी कीं, जो आज मला अर्जुन दाखवील त्यास मी इच्छिलें धन देईन कदाचित् तें धन त्यास अल्प असें वाटल्यास रत्नांनीं भरलेला गाडा त्यास देईन. तो ही त्यास न्यून वाटल्यास जें जें तो मागेल तें तें त्यास मी देईन. अशा बहुत प्रकारच्या वल्गना करून कर्णानें आपल्या शंखाचा नाद केला. नंतर दुंदुभींचे घोष, मृदंगाचे नाद सैन्यामध्यें होऊं लागले. नंतर राधेयास शल्य हांस्य करून भाषण करूं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

३९ अध्याय एकुणचाळीस:— शल्य भाषण करतो हे कर्णा, अर्जुन दाखविणाऱ्या पुरुषास सुवर्ण, गज इत्यादिक दानें कशा करितां करतोस. धनंजयास तूं पहाशील. अरे कर्णा, तुजपाशीं बहुत द्रव्य आहे म्हणून मूर्खासारखा तूं वृथा जर व्यय करशील तर अपात्रीं दान केल्याचे दोष तूं कसे जाणत नाहींस. तूं हुताशनांत उडी घालण्यास जात असतां तुझें जे निवारण करीत नाहींत ते तुझे सुहृद नव्हेत. अरे कर्णा, तूं कार्य व अकार्य यांचा विचार कांहींच जाणत नाहींस, जिवंत राहण्याची इच्छा करणारा पुरूष अति अबद्ध व करण्यास अयोग्य असें कोण भाषण करील बरें! आतां जर धनंजयाशीं युद्ध करून तुला श्रेय प्राप्त होण्याची इच्छा असेल तर सर्व योद्धे बराबर घेऊन युद्ध कर. एकाकी तूं धनंजयाशीं युद्ध करूं नको. हें

मोझें भाषण धृतराष्ट्रपुत्राच्या हिताविषयीं आहे. असें शल्याचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे शल्या, मी आपल्या स्वबाहुवीर्याच्या आश्रयानें रणामध्यें अर्जुनाशीं युद्ध करण्याची इच्छा करतों. तूं तर मला हितशत्रु होऊन भय दाखवितोस. असें कर्णानें भाषण केल्यावर शल्य त्यास बहुत कोपयेण्यासारखें असें बोलला कीं, हे कर्णा, ज्याकाळीं अर्जुनाचे बाण तुझावर येऊन पडतील त्याकाळीं अर्जुनाशीं युद्ध समागम केल्याचा अनुताप तुला होईल. मातेच्या अंकावर शयन केलेला बालक आकाशस्थ चंद्रमा आपले मातेजवळ मागतो तसा तूं अर्जुनाचा पराजय करण्याची इच्छा करितोस. पार्थाशीं जी तुझी युद्ध करण्याची इच्छा ती केवळ मूर्खपणाची होय. विष व अमृत हे पदार्थ आप आपल्या कर्मानें जसे प्रख्यात आहेत तसा हे कर्णा, तूं आणि पार्थ उभयतां आप आपल्या कर्मानीं प्रख्यात आहांत. असा विषय या अध्यायांत आहे.

४० अध्याय चाळीसा:— कर्णभाषण करतो हे शल्या, गुणवानाचे गूण गुणी पुरुष जाणतो, अगुणी पुरुष जाणत नाहीं. यास्तव तूं गुणहीन असल्यामुळें गुण किंवा अगुण तुझे काय ध्यानांत येईल. तूं सहृद रूपी माझा शत्रु होऊन कृष्णार्जुना कडून मला भय दाखवितोस कीं काय? ते उभयतां आज माझा वध करतील किंवा मी त्यांचा वध करीन. अरे मी कृष्णार्जुनास भीत नाहीं माझें बल मला विदित आहे. सहस्रावधी वासुदेव येवोत अथवा शतावधी अर्जुन येवोत आज मी एकटा त्यांचा वध करीन. हे शल्या, बैस, तूं माझाशीं द्वेष करणारा मद्रक देशींचा खचीत आहेस, कारण मद्रदेशींराहणारे, मित्रद्रोही आहेत. मद्रक देशांत क्षुद्र भाषण करणारे नराधम राहतात म्हणून मद्रदेशीं गमन करण्याचा निषेध आहे मद्रदेश फार दुष्ट आहे. आपले मित्र, पाहुणे यांसह वर्तमान तेथील स्त्रिया ज्ञात असतांही अज्ञाना सारख्या मैथुन इच्छेनें रत होतात. हे मद्रेशा, माझा अनुभवसिद्ध एक गोष्ट आहे ती सांगतों. अथर्वण वेदांत वृश्चिक नाशाविषयीं एक मंत्र आहे त्यांत असें लिहिलें आहे कीं, हे वृश्चिका, मद्रदेशांत जसें गमन नाहीं. गमन केलें असतां जसा तो पुरुष नष्ट होतो तसें तुझें विष नष्ट असो. हे-

मद्रेश्वरा, या प्रकारें वृश्चिकानें दंशित केलेल्या पुरुषाचें विष नष्ट होण्याविषयीं प्राज्ञजन या मंत्राची योजना करतात हें सत्य आहे, असें मला वाटतें. याप्रकारें तुझ्या देशाचे सांगितलेले दोष ऐकून स्वस्थ बैस. तुझ्या देशांतील स्त्रिया उष्ट्रवगर्दभासारख्या उभ्यानीं मूत्रोत्सर्जन करतात, त्या धर्मभ्रष्टस्त्रियांपैकीं एकीचा तूं पुत्र असल्यामुळें धर्म सांगण्यास योग्य आहेस कीं काय! हे मद्रराजा, जर तूं पुन्हा असें भाषण करशील तर या माझ्या वज्रसदृश गदेनें तुझा शिरःपात करीन. हे कुदेशांत उत्पन्न झालेल्या शल्या, मी हें आतां शेवटलें भाषण करतों; कृष्णार्जुन कर्णाचा वध करतील किंवा कर्ण कृष्णार्जुनाचा वध करील, आतां माझा रथ पुढें घेऊन चल. असा विषय या अध्यायांत आहे.

४१ अध्याय एकेचाळीस :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, असें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलला हे कर्णा, जसा एखादा पुरुष मद्यप्राशनें करून उन्मत्त दिसतो तसा तूं मला दिसतोस; आतां तुला स्थितीवर आणितों. हे कर्णा, तुला काकाची दृष्टांतरूप कथा सांगतों हे महाबाहो, मी अनपराधी असतां तूं माझा वध करण्यास काय इच्छितोस! तूं माझा वध करण्याविषयीं तुझा मी कांहीं अपराध केलेला मला स्मरत नाहीं. तुझ्याहिताविषयीं मी तुझ्या रथावर बसलों त्यापेक्षां तुझें हिताहित व सम, विषम जें असेल तें मला अवश्य सांगितलें पाहिजे. हे कर्णा, तुला दृष्टांतपूर्वक कथा सांगतों. समुद्रतिरीं धनधान्यानीं समृध्ध असा कोणी एक वैश्य, धार्मीक राजाच्या राष्ट्रामध्यें राहात होता, त्याच्या सर्व कुमारानीं मिळून एक काकपक्षी बाळगला होता, त्या पक्ष्यास ते निरंतर आपलें उश्चिष्ट राहिलेलें अन्न भक्षणास देत. तो काक आपल्या सदृश इतर पक्ष्यांस पाहून त्यांच्याशीं स्पर्धा करी. कोणे एके दिवशीं समुद्रतीरीं मानस सरोवरीं राहणारे हंस आले होते, त्यांस पाहून वैश्यकुमार आपल्या कावळ्यास बोलले कीं, हे पक्ष्या सर्व पक्ष्यांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस असें आम्हांस वाटतें. अशी स्तुती केली असतां काक हंसाजवळ जाऊन असें बोलला कीं, तुमच्यांत श्रेष्ठ कोण आहे तो सांगा. नंतर त्या हंसांतून एका हंसास काक बोलला कीं, हे पक्ष्या तूं आणि मी बराबर उड्डाण करूं. असें बहुभाषि काकाचें भाषण ऐकून सर्व हंस एकत्र होऊन त्या काकास—

बोलतात अरे, आम्हीं मानस सरोवराचे ठायीं राहणारे, बहुत दूर गमन करणारे असल्या मुळें सर्वपक्ष्यांमध्यें आम्हीं पूज्य आहोंत; असें असतां हे दुर्मते, तूं काक होऊन आम्हां हंसांबरा बर उडण्या विषयीं कसें आव्हान करतोस; तूं आम्हां सह वर्तमान कसें गमन करशील तें सांग. असें हंसाचें भाषण ऐकून तो मूढ काक असें बोलला कीं, मला गमनाविषयीं शतगती ज्ञात आहेत. तीहीं करून मी निःसंशय तुम्हां बरावर उड्डाण करीन. एक एका गतीनें शंभर योजनें जाण्याचें मला सामर्थ्य आहे, ती संख्याक गती तुम्हांस संक्षेपानें सांगतों. उड्डिण-म्हणजे ऊर्ध्वगती, अवडीन म्हणजे अधोगती, मडीन म्हणजे सर्वत्र गती आदिकरून गमना गमनाच्या मुख्य सवीस गती आहेत, त्यांच्या अंतर्भेदें करून एकशें एक गती आहेत, त्या गतींतून कोणच्या गतीनें मी जाऊं तें सांगा. असें काकाचें-भाषण ऐकून त्या हंसातील एक हंस हांस्य करून बोलला हे काका, तूं शतगतीनें गमन करणारा आहेस; आम्हीं हे सर्व पक्षी जी गती जाणतों त्यागतीनें मी गमन करीन, दुसरी गती मला ठाऊक नाहीं. असें हंसाचें भाषण ऐकून काक-बोलतो हे हंसा, जी तूं एक गती जाणतोस ती गती मला उड्डाण करून दाखीव-बरें. असें त्या काकाचें भाषण ऐकून इतर काक हांस्य करून बोलले कीं, काय हो हा हंस आपल्या एकागतीनें आमच्या शतगती कशा जिंकील? असें काकाचें भाषण झाल्यावर एक गती जाणणारा हंस व शतगती जाणणारा कांक हे उभयतां स्पर्धेनें उड्डाण करून गेले. त्या काळीं काकानें सर्वांस विस्मय होण्या करतां आपल्या उड्डाण प्रतिक्रिया नाना प्रकारच्या प्रदर्शीत केल्या-असतां त्या चित्र विचित्र काकाच्या क्रिया पाहून सकल काक महान् स्वन करूंलागले. हंस काकाची थट्टा करून अप्रिय भाषण करूं लागले. काका बरोबर उड्डाण करणारा हंस एकाच मृदुगतीनें जात असल्या मुळें तो काका पेक्षां कांहीं गतीनें मंद झालेला पाहतांच इतर काक बोलले कीं, हा उड्डाण करणारा हंस ग-तीनें हीन आहे यांत संशय नाहीं. असें त्या काकाचें भाषण उड्डाण करणाऱ्या-हंसानें ऐकून तो समुद्राकडे पश्चिम दिशेस ऊर्ध्व भागीं मोठ्या वेगानें चालला तेव्हां काकही हंसा बराबर जाऊं लागल्यामुळें भयाभीत झाला. चोहीं कडे द्रुम व द्वीप कोठेंच न दिसल्यां मुळें मी आतां श्रमित होऊन समुद्रांत तर पडणार नाहीं

ना; असें त्यास भासूं लागलें. त्यासमयीं हंस त्यास सोडून दूर न जातां त्यास प हात जवळच होता. काकास वाटलें कीं, हा हंस माझा त्याग करून दूर जाईल. तो न जावा म्हणून तो हंसासन्निधगेला असतां हंस आपलें सत्पुरुष व्रतस्मरून काकास अपत्ती पासून तारावा या हेतूनें त्यास बोलला कीं, हे काक, बहुत प्रका रच्या गमन गती मला विदित आहेत म्हणून तूं वारंवार भाषण करीत होतास; तेव्हां प्रस्तुत जीही तुझी गती आहे इचें नाव काय? हें मला समजलें पाहिजे. त्याकाळीं काक हंसास असें बोलला कीं, हे हंसा, समुद्राचें परतीर मला दि-सत नाहीं मी उडतां उडतां श्रमी होऊन अशी अवस्था मला प्राप्त झाली. हे हं-सा, आतां मी तुला शरण आलों, मला तीरास नेऊन पोंहोंचीव. असें म्हणून का क आपल्या तोंडानें व पक्षानें समुद्राच्या उदकास स्पर्श करून केवळ म्रियमाण व दीनमन झाला. हें पाहून हंस बोलतो हे काका, तूं पूर्वी असें भाषण केलें होतें स कीं मला शत प्रकारच्या गमन गती विदीत आहेत त्याचें आतां स्मरण कर. हे काका, तें तुझें भाषण केवळ श्लाघ्य युक्त आहे. तूं शंभर गतीचा ज्ञाता अ-सल्यामुळें माझापेक्षां अधीक आहेस; तेव्हां तूं परिश्रांत होऊन कसा समुद्रां त पडतोस!! असें हंसाचें भाषण ऐकून काक बोलला हे हंसा, मी उच्छिष्ट भक्षणानें उन्मत्त होऊन आपल्यास गरुडा सारखा मानीत होतों. इतर काकपक्षी यां च्या मी बहुत अवमान केला तें असो. आतां समुद्राच्या परतीरें नेऊन माझे प्रा ण वांचीव. तेव्हां हंसानें त्याची ती कठिण अवस्था पाहून त्यास आपले पृष्ठावर ठेविला, आणि पूर्वीच्या द्वीपामध्यें काकास त्याणें सोडून वारंवार त्यास अश्वासन दिलें. नंतर तो हंस मना सारख्या वेगानें आपल्या इच्छित देशीं गेला. शल्य भा षण करतो हे कर्णा, असा हंसानें पराजित केलेला व उच्छिष्ट भोजनानें पुष्ट झालेला काक आपल्या बळवीर्य मदाचा त्याग करून जसा शांतीतें पावला त सा तूंही कौरवांच्या उच्छिष्ट भक्षणानें पुष्ट झाल्यामुळें सर्वांचा अवमान कर-तोस यांत संशय नाहीं. पूर्वी द्रोण, कृपाचार्य, भीष्म व इतर कौरवां सहवर्तमान तूं विराट नगरीं गेला होतास; तेव्हां पार्थ एकाकीं असतां तूं त्याचा कां वध केला नाहींस. सकल कौरव पहात असतां तुझा भ्रात्यास ज्याकाळीं अर्जुनानें मारि लें त्याकालीं तूं प्रथम पलायन केलेंस; धृतराष्ट्राचे सभेमध्यें पार्थाचें व श्री

कृष्णाचें सामर्थ्य परशुरामानें तुम्हांस सांगीतलें होतें, तसेंच भीष्म व द्रोण हे स
कल राजे सन्निध असतां तुम्हांस असें भाषण करीत होते कीं, कृष्णार्जुन अव
ध्य आहेत. तीं त्यांचीं भाषणें तूं ऐकिलींच आहेस; हे कर्णा, तुझ्यापेक्षां पार्थ स
र्व गुणानें अधीक आहे. कुंतीपुत्र व वसुदेवपुत्र एकरथामध्यें आरूढ झालेले-
तूं आतां लौकरच पहाशील; ज्याकालीं पार्थ शतशः बाणानीं तुझा दर्प नष्ट क
रील त्याकालीं तुझें व पार्थाचें अंतर किती हें पहाशील. अरे कर्णा, देव, असु
र, मनुष्य यांमध्यें जे नर नारायण मख्यात झाले आहेत त्यांचा तूं मूर्खपणा
नें अवमान करूंनकोस. असा विषय या अध्यायांत आहे.

४२ अध्याय बेचाळीस:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, श-
ल्याचें अप्रिय भाषण ऐकून कर्ण बोलतो हे शल्या, कृष्णार्जुनाबरोबर मी
निरभयपणें युद्ध करीन; परंतु ब्राम्हणश्रेष्ठ जो परशुराम याजपासून मलाजो
शाप झाला आहे त्यापासून मला बहुत संताप होतो. पूर्वी मी दिव्यास्त्रें मिळ
ण्याच्या इच्छेनें ब्राम्हण वेषानें परशुराम गृहीं राहिलों होतों. त्याकालीं अर्जु
नाचे हितास्तव इंद्रानें कीटकाचें रूप धरून माझ्या मांडीचा भेद केला. त्या
कालीं माझागुरु परशुराम माझे मांडीवर आपलें शीर ठेऊन निजला हो-
ता. कीटकानें माझ्या मांडीचा भेद केला असतां एकाएकीं रक्ताचा प्रवाह नि
घाला तथापि गुरुनिद्राभंग भयानें मी किमपीही चंचल झालों नाहीं. पुढें मा
झ्या गुरूनें जागृत होऊन मजकडे पाहिलें तों मी बहुत धैर्यानें स्थित आहें. अ
सें पाहून तो मला बोलला, अरे तूं ब्राम्हण नव्हेस, कोण आहेस तें सत्य सांग.
त्याकालीं मी आपलें सर्व वृत्त सांगून सूत आहें असें सांगितलें. तेव्हां त्या महा
त्म्यानें मला असा शाप दिला कीं, अरे तूं आपलें सूतत्व आच्छादित करून
माझ्यापासून अस्त्र घेतलेंस त्यापेक्षां तुझ्या प्रतिज्ञाकालीं त्या अस्त्राची तु-
ला स्फूर्ति होणार नाहीं. अरे, अब्राम्हणापाशीं ब्रम्हास्त्र रहात नाहीं तस्मात्
हें अस्त्र तुझें आजच विस्मृत झालें असें समज. हे शल्या, प्रस्तुत या घोर;
तुमुल व भयंकर संग्रामाचे ठायीं भारत कुलाचा मोठा समय उत्पन्न झाला
आहे हा सर्व क्षत्रियांचा केवळ नाश करताच आहे असें मी समजतों. त्यायु
द्धांत धनंजयास मी यमगृहीं नेईन. युध्धामध्यें पार्थासारखा धनुष्यधा

रण करणारा मला कोणी दिसत नाहीं. ज्या पार्थानें युद्धामध्यें सुरासुरांस जिंकिलें त्या पार्थासहवर्तमान आज मी घोर युद्ध केलेलें तूं पहाशील. जो दिव्या स्त्रवेत्ता, श्वेत हयजाचे रथास व जो मोठा बलाढ्य त्या अतीरथी अर्जुनाचें शीर मी पृषत्क व निशित बाणानीं तोडून पृथ्वी वर पाडीन. अरे मी, तुझ्याशीं सरळ रीतीनें असतां तूं माझ्याशीं कुटिलमती धरतोस; त्यापेक्षां तूं कुटिल मती आहेस. अरे, दुसऱ्या बराबर सात पावलें गेलें असतांही तो मित्र होतो, प्रस्तुत काल कसा दारुण आला आहे तो पहा. राजा दुर्योधन युद्धास उद्युक्त झाला आहे त्याची अर्थसिद्धी होण्या करितां मी इच्छा करितों. तुझीही इच्छा तशीच आहे तेव्हां तूं आमच्या पक्षाचा असून शत्रूंशीं स्नेह कसा दाखवितोस; अरे, मी तरी दुर्योधनाचें हित, तुझें प्रिय व माझें यश यासाठींच युद्ध करतों. हे शल्या, या सर्व कारणावरून मी कृष्णार्जुनाशीं मोठ्या यत्नानें युद्ध करणार तें कर्म आज तूं माझें पहा. हीं माझीं दिव्य अमानुष अस्त्रें घेऊन मी अर्जुनावर धांऊन जातों; परंतु युद्धामध्यें माझें रथचक्र विषम कालीं जर न पतन पावेल तर ह्या गोष्टी घडतील. मला ब्राम्हणाचा शाप होण्याचें कारण तुला सांगतों. कोणे एके कालीं मी गुरुगृहीं अस्त्रविद्या ग्रहण करीत होतों ती माझी विद्या पूर्ण झाली किंवा नाहीं याची परिक्षा पाहण्या करतां कोणें एके दिवशीं अरण्यांत फिरतां फिरतां अज्ञानानें कोणी एक ब्राम्हणाची होम धेनु वत्सासहवर्तमान अरण्यांत फिरत होती; तिचा वत्स माझ्या बाणानें नष्ट झाला. नंतर हें कृत्य ब्राम्हणास कळतांच त्याणें मला असा शाप दिला कीं हे दुष्टा, तूं संग्रामांत युद्ध करीत असतां तुझ्या रथाचें चक्र गर्तेमध्यें पडेल. हे शल्या, असें जें ब्राम्हणानें भाषण केलें तेणें करून मी भयाभीत होऊन ब्राम्हणास असें भाषण केलें कीं, हे ब्राम्हणा, तुला मी सहस्र गायी व सहाशें बैल देतों, माझ्या अपराधाची क्षमा कर. परंतु तो त्याची इच्छा न धरितां मला असें बोलला कीं, हे सूता, जें मी भाषण केलें तें अन्यथा होणार नाहीं तूं माझा अवमान करून कोस; पूर्वीं जी तूं हिंसा केलीस त्याचें प्रायश्चित्त तुला घडलें यास्तव शापाचा अनुभव तुला येईल. कर्ण बोलतो हे शल्या, तूं जरी माझी निंदा केलीस तथापि स्नेहद भावें करून हें झालेलें वृत्त तुला सांगितलें. तूं माझी निंदा करणारा आहेस, हें मी जाणतों आतां

हें माझें भाषण ऐकून स्वस्थ बैस आणि पुढें जें मी भाषण करतों तें ऐक. असा विषय या अध्यायांत आहे.

४३ अध्याय त्रेचाळीसः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, पुनः कर्ण मद्रराजास बोलतो हे शल्या, मला प्रत्यय येण्याकरितां ज्या तूं जल्पना केल्यास त्याभाषणानें मी युद्धांत भीणार नाहीं. तुझें विप्रिय भाषण मी ऐकेन अशी दुर्योधनापाशीं प्रतिज्ञा केली आहे ती परिपालन करण्यास्तव मस्त माझ्या पासून जिवंत राहिलास; असा विषय या अध्यायांत आहे.

४४ अध्याय चवेचाळीसः— शल्य भाषण करतो हे कर्णा, शत्रुविषयीं जीं तूं मलाप्रयुक्त भाषणें केलीस तीं पुरे. अरे कर्णा, सहस्त्र कर्णासमान जो मी या माझ्यानें समरांगणीं कौरवांचे शत्रूंचा पराभव करवेल असा माझा पक्का निश्चय आहे. संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें भाषण करणाऱ्या मद्रराजास पुनः कर्ण पूर्वी पेक्षां द्विगुणित कठोर बोलला कीं, हे शल्या, पूर्वी धृतराष्ट्राचे गृहीं ब्राम्हणानीं देशाच्या नानाप्रकारच्या कथा व राजांचीं पूर्वचरित्रें सांगितलीं, त्यांतून एक तुला सांगतों. कोणीएक द्विजश्रेष्ठ वृद्ध ब्राम्हण धृतराष्ट्रराजाच्या गृहीं पुरातन कथा सांगतां सांगतां बाहिक देश व मद्र देश यांची निंदा करून असें बोलला कीं, हिमाचल पर्वत, गंगा, सरस्वती, यमुना व कुरुक्षेत्र याणी बहिष्कृत व सिंधु ज्यांत सहावी अशा पांच नद्या यांच्या मध्यभागीं राहिलेले जे देश त्यांस वाहिक देश असें म्हणतात. ते देश धर्म बाह्य असल्यामुळे त्यांचें वर्जन करावें. वाहिक देशांतील राजाचें गृहद्वार ओळखण्याचें स्वरूप असें आहे कीं, त्याच्या द्वाराच्या एका बाजूस गोवध करण्याचें स्थान व एका बाजूस सुरापात्रें ठेवण्याचें स्थान असतें. ह्या वाहिक देशांत कांहीं कार्या करितां गुप्तरूपानें मी राहिलों होतों म्हणून या देशाचें वर्तमान गुप्त रूपानें मी ऐकिलेंच होतें. नंतर ब्राम्हणानें धृतराष्ट्राचे गृहीं सांगितल्या पासून मला स्पष्टच समजलें. शाकल नामक नगर, अपगा नामक नदी व जर्तिक नामक वाहिकदेशांतील लोकांचें हृत्त फार निंद्य आहे. तेथील लोक भाजलेले सातु भक्षण करतात, गौडी नामक सुरा माशन करतात, लशुनासह वर्तमान गोमांस भक्ष

णा करतात. त्या देशांतील स्त्रिया भिंतीच्या सन्निध नग्न होऊन माल्यें व अनुलें पनें धारण करून गायन व नृत्य करतात, मैथुनाविषयीं स्वपुरुष किंवा परपुरुषाचा विचार न करितां यथेष्ट आचरण करतात. या प्रकारें व्रात्य व दुष्टजन ज्या देशांत रहातात अशा लोकांचा तूं राजा असल्यामुळें पापपुण्याचा षट्भाग हरण करता तूं आहेस; त्या देशांतील स्त्रिया वृषभाचे मांस, पलांडु व येडक मांस भक्षण करून व गोडीसुरा प्राशन करून इतर मोठमोठ्या गौर वर्णाच्या स्त्रियां सह वर्तमान असें गायन करतात कीं डुकर, कोंबडे, गाय, गर्दभ, उंट आणि एडक यांचें जें मांस भक्षण करीत नाहींत त्यांचें जन्म निरर्थक आहे. याप्रकारें शाकल पुरनिवासी लोक मद्य प्राशन करून भाषण करतात, अशा त्या लोकांस धर्म कोठून असणार. हे शल्या, आणखीं तेथील एक वृत्त मी ऐकिलें आहे तें सांगतों. शतद्रु विपाशा, ऐरावती, चंद्रभागा व वितस्ता या पांच नद्या व सहावा सिंधु नद, हिमालयाच्या बहिर भागीं ज्या देशांत वाहतात व पेरूंचीं वनें ज्यामध्यें आहेत त्या देशास अरट्ट नामक देश असें म्हणतात. ते देश धर्मभ्रष्ट असल्यामुळें त्यांत जाऊं नये, त्या देशांतील लोक संस्कारहीन, दासी पासून उत्पन्न झालेले व यागादिक्रिया न करणारे, वाहिक ज्यांस म्हणतात त्या मनुष्यानीं दिलेलें अन्न देव, पितर व ब्राम्हण ग्रहण करीत नाहींत. असे ते वाहिक लोक धर्मापासून भ्रष्ट आहेत असें ऐकतों, वाहिक देशाचे लोक अविचारी व संकरजातीचे आहेत त्यांस कोणाचें अन्न अभक्ष्य आहे असें नाहीं. यास्तव वाहीकांशीं सूज्ञ मनुष्यानें संसर्ग करूं नये. हे शल्या, आणखीं एक वृत्तांत तुला सांगतों ऐक. धृतराष्ट्र सभेंत कोणी एक अल्प ब्राम्हण मला असें बोलला कीं, युगधर देशामध्यें उष्ट्रादिकाचें क्षीर प्राशन करतात त्या देशांत भक्ष्याभक्ष्याचा विचार नसल्यामुळें तेथें कोणी गेला असतां अभक्ष्य भक्षणाचा प्रसंग प्राप्त होईल यास्तव तेथें जाऊं नये. असा विषय या अध्यायांत आहे.

.४५ अध्याय पंचेचाळीस:- कर्ण भाषण करतो हे शल्या, पुनः मी तुला कांहीं एक भाषण करतों तें ऐक. पूर्वी कोणी एक अतिथी ब्राम्हण माझा

गृहीं आला होता, तो आमचा आचार पाहून संतुष्ट झाला आणि त्यानें असें भाष
ण केलेंकीं, मी पूर्वी हिमाचल पर्वताच्या शृंगावर एक स्थानें बहुत दिवस
वास केला, नाना प्रकारच्या धर्मांनि युक्त असे बहुत देश पाहिले, पुढें हिंड-
तां हिंडतां तो ब्राम्हण वाहिक देशांत गेला होता तेथील वृत्त त्याणें असेंसां
गितलेंकीं, वाहिक देशांत एकच कुलांत एक प्रथम ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य
व शूद्र यांचें कर्म करून नंतर नापित होतो तोच पुनः ब्राम्हण होतो. हे शल्या,
असा त्या ब्राम्हणानें सर्व पृथ्वी फिरतां फिरतां वाहिक देशांतील धर्मसांक
र्य व धर्म विपर्यय सांगितला तो मी ऐकिला. पुनः दुसऱ्या एका ब्राम्हणा
नें तुमच्या वाहिक देशातील लोकांचें एक कुत्सित कर्म सांगीतलें तें अ
सेंकीं, कोणी एक ब्राम्हणाची कन्या पतिव्रता होती. तिचा चोरानीं अपका
र करून अधर्मानें तिजसह वर्तमान विवाह केला. त्याकालीं ब्राम्हण क
न्या चोरास शापयुक्त असें बोलली कीं हे दुष्टहो, जा पेक्षां तुम्हीं माझाशीं-
अधर्मानें विवाह केलात त्या पेक्षां तुमच्या कुलांतील सर्व स्त्रिया व्यभिचा
रिणी होतील. घोर पापा पासून जर तुम्हीं मला मुक्त करीत नाहीं तर तुम
च्या देशामध्यें पितृधन पुत्रास न प्राप्त होतां भगिनी पुत्र त्या द्रव्याचे माल
क होतील. हे शल्या, पांचाल, कुरु, नैमिष, कलिंग तसेंच मागध व चेदी या
देशांतील सकल लोक शाश्वत धर्म जाणतात; परंतु वाहिक देशांतील लो
क धर्म कांहीं जाणत नाहींत. या प्रकारें तो विद्वान् ब्राम्हण धर्म कथा सांगू
न स्वस्थ जडासारखा बसला. हे शल्या, अशा अधर्मिष्ट लोकांचा तूं राजा
आहेस; तूं तर आपल्या देशांतील लोकांचें उत्तम रक्षण करीत नसल्यामु-
ळें त्या पापाचा मात्र तूं ग्रहण करता आहेस; हे शल्या आणखी एक तुझ्या दे-
शांतील वृत्त असें आहे कीं, कल्माषपाद राजा राक्षस होऊन सरोवरांत होता.
त्याणें बुडते समयीं असें भाषण केलें कीं, क्षत्रियास मल भैक्ष्य, ब्राम्हणा
चा मल अव्रत, पृथ्वीचा मल वाहिक देश आणि सर्व स्त्रियांचा मल मद्रदे-
शच्या स्त्रिया होत. कोणी एक राजानें त्या निशाचरास जला पासून काढि
लें असतां पुनः त्याणें राजासमक्ष असें भाषण केलें कीं, हे राजा मनुष्या
चा मल म्लेंछ, म्लेंछाचा मल तेली, त्याचाच मल षंढ, षंढाचा मल राजपु

रोहित व राजपुरोहिताचा मल मद्रदेश होय. हे शल्या जर तूं अशा आपल्या पा पिदेशाचा त्याग न करशील तर सर्वांचा तूं मल होशील. हे शल्या, पांचालदेशीं चे लोक वेद जाणतात, कुरुदेशाचे लोक धर्मयुक्त कर्में करतात, मत्स्य देशींचे सत्य जाणतात, शूरसेन देशाचे लोक यज्ञ करतात, प्राच्यदेशाचे लोक दास्य कर्में करतात, दाक्षिणात्य धर्मसंग्रह करणारे आहेत, वाहिक देशांतील लोक चौर्य कर्म करतात, सुराष्ट्र देशांतील लोक संकर जातीय आहेत, आरट्ट व पांचनद देशांतील लोक कृतघ्न, परवित्ताचा अपहार करणारे, गोवध करणारे, गुप्तरूपानें चौर्य कर्म व परदारा हरण करणारे, व दुसऱ्याच्या वस्त्राचा उपभोग करणारे आहेत, यास्तव त्यांस धिःक्कार असो. हे शल्या, हे धर्म ज्या देशांत आहेत त्या देशांत अ धर्म असेल यांत आश्चर्य काय! प्राची दिशेस सर्व देव, दक्षिणेस पितर राहतात, वरुण प्रतिची दिशेचें पालन करतो, सोम उत्तर दिशेचें रक्षण करतो, पिशाच्च हिमाचल पर्वतावर राहतात, गुह्यक गंधमादन पर्वताचा आश्रय करतात, वाहिक देशांत राक्षसा शिवाय कोणी रहात नाहींत. यास्तव सर्व भूतांचा पालन करणारा विष्णु, तोच या राक्षसांचा पालन करता होय. इतर कोणी या देशाचा मुख्यत्वें करून पालन करणारा व आश्रय करणारा दिसत नाहीं. हे शल्या, मी तुझें हित सांगत असतां तूं माझी निंदा करतोस; हें माझें भाषण ऐकून तूं उत्तर देण्यास समर्थ नाहींस; तुझा वधाचे पूर्वी मी केशवार्जुनाचा वध करीन. याप्रकारें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलतो अरे कर्णा, आतुराचा परित्याग व स्वदारसुतांचा विक्रय जा अंगदेशांत करतात त्या अंग देशाचा तूं अधिपती आहेस; ज्या कालीं भीष्मानें रथ्यांची व अतिरथ्यांची संख्या केली त्या कालीं त्याणें तुला काय भाषण केलें होतें त्या भाषणाचें स्मरण करून आपले दोष काय आहेत याचा पूर्णपणें विचार कर म्हणजे तुझा क्रोधाची शांती होईल. अरे कर्णा, सर्व देशांत ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र राहातात, सर्व देशामध्यें पतिव्रता स्त्रिया आहेत, सर्व देशामध्यें स्त्रिया पुरुषास हव वर्तमान उपहास पूर्वक रममाण होतात व एकमेकांची निरभत्सना करून मैथुना विषयीं रत होतात. हे सूत पुत्रा, एक देश कदाचित् दोषी असल्या करून सर्व देश म्हणजे पापी होतात असें नाहीं. प्रत्येक प्राण्याचे स्वभाव भिन्न भिन्न असल्या

मुळें ते आप आपल्या स्वभावा प्रमाणें वर्ततात. संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें शल्य आणि कर्ण यांचा संवाद होत असतां दुर्योधनराजानें स्नेह भावें करून कर्णाचें आणि अंजलिपुट जोडून शल्याचें निवारण केलें असतां कर्ण व शल्य या उभतानीं पुनः कांहीं परस्पर भाषण केलें नाहीं. नंतर कर्ण हांस्य करून शल्यास असें बोलला कीं, हे मद्रराजा, माझ्यारथास प्रेरणा करून लवकर चल. हा काल पर्यंत जें मी निंदायुक्त भाषण केलें तें केवळ तुझ्या स्नेहभावानें केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

**४६ अध्याय शेचाळीस:**— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, धृष्टद्युम्नानें संरक्षित केलेला असा पांडवसैन्याचा अप्रतिम व्यूह पाहून कर्ण सिंहासारखा नाद करीत युद्धार्थ निघाला आणि आपल्या सैन्याचा प्रतिव्यूह करून पांडव सैन्याचा नाश करूं लागला. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, भीमसेनानें संरक्षित केलेले धृष्टद्युम्नप्रमुख सकल योद्धे व पांडव हे अमरानीं जिंकण्यास अशक्य असतां त्यांशीं कर्णानें कसें युद्ध केलें; आमच्या व्यूहाच्या पक्ष, प्रपक्ष भागीं कोण कोण योद्धे उभे होते पांडुसुतानीं आमच्या योध्यांशीं कसें युद्ध केलें, ज्याकाळीं कर्ण युधिष्ठिरा कडे गेला त्याकाळीं अर्जुन कोठें होता. असें ऐकून संजय भाषण करतो हे राजा, कर्णानें आपल्या सैन्याचा कसा व्यूह केला व अर्जुन समराचे गायीं कसा आला व उभय सैन्याचा संग्राम कसा झाला तो सांगतों. दक्षिणपक्षीं कृपाचार्य, सकलमागध व कृतवर्मा हि उभे होते, शकुनी व महारथी उलूक हे अश्वारोहां सहवर्तमान कृपादि योध्यांच्या संरक्षणार्थ उभे होते, गांधार व पार्वतीय योध्यांसहवर्तमान् चोविस हजार रथ बराबर घेऊन संशप्तकगण व्यूहाच्या वामभागीं रक्षणाकरीत होते. तुझ्यासुता सहवर्तमान् कांबोज देशचे राजे व यवनासहवर्तमान् शकयोद्धे, रथ व अश्व स्वारांस घेऊन संशप्तकांच्या संरक्षणार्थ उभेराहिले. चित्रविचित्र कवच घालून कर्ण सैन्याच्या रक्षणार्थ मध्यभागीं युद्धास सिद्ध होऊन उभाराहिला, त्याचे रक्षणार्थ तुझे पुत्र उभे होते. दुःशासन सैन्यासह वर्तमान व्यूहाच्या पृष्ठभागीं उभा राहिला, दुर्योधनराजा दुःशासनाच्या पृष्ठभागीं उभा होता, त्याचे मागें अश्वत्थामा, कुरूंचे अवशिष्ट राहिलेले महा

रथी वीर व म्लेंछ वीरानीं संरक्षित मत्त झालेले गज उभे होते. त्या गजांच्या पादसंरक्षणार्थ सहस्रावधी शूर उभे होते, याप्रकारें देवासुरांच्या सैन्याप्रमाणें कौरवांचा सेनाव्यूह शोभूं लागला. नंतर सेनामुखाचे ठायीं उभा राहिले त्या कर्णास पाहून युधिष्ठिर धनंजयास भाषण करतो हें धनंजया, हा कर्णाचा व्यूह कसा शोभतो तो पहा. शत्रूचें सैन्य आपला पराजय जेणें करून करणार नाहीं अशी कांहीं युक्ती कर याप्रकारें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे धर्मराजा जेणें करून या व्यूहाचा नाश होईल असेंच करीन. असें अर्जुनाचें भाषण ऐकून युधिष्ठिर बोलतो हे अर्जुना, तूं च राधेयाशीं युद्ध कर, भीमसेन सुयोधनाशीं, नकुल वृषसेनाशीं, सहदेव सौबलाशीं, शतानिक दुःशासनाशीं, सात्यकी कृतवर्म्याशीं व पांड्य द्रोणपुत्राशीं युद्ध करोत; मी कृपाचार्याशीं युद्ध करतों, शिखंडीस बराबर घेऊन सकल द्रौपदीचे पुत्र बाकी राहिले त्या धृतराष्ट्र पुत्राशीं युद्ध करोत; या सर्व आमच्या योध्यानीं त्यात्या योध्याचें हनन करावें. असें धर्मराजानें भाषण केलें असतां अर्जुनानें सकल योध्यांस पूर्वोक्त प्रमाणें युद्धार्थ जाण्याची आज्ञा देऊन आपण सेनामुखावर गेला. त्या एकट्या ईश्वरानें आपला आत्मा चार प्रकारचा करून चार अश्वरूपानें जो रथ वहन केला त्या रथामध्यें केशवार्जुन आरूढ होऊन युद्धार्थ निघाले. हें पाहून शल्य कर्णास असें बोलला कीं, हे कर्णा, अर्जुन कोठें आहे म्हणून तूं विचारीत होतास तो अर्जुन प्रस्तुत शत्रूंचें मर्दन करीत आहे, त्याच्या रथाचा मेघासारखा शब्द होत आहे तो ऐक. निश्चयें करून ते महात्मे वासुदेव व धनंजय आले आहेत, त्यांच्या रथापासून उत्पन्न झालेली धूळ आकाशास व्याप्त करून राहिली आहे ती पहा. मोठमोठीं बलिष्ठ शार्दूलादि श्वापदें सूर्याकडे पाहातात हें शूरास केवळ मृत्यसूचक आहे. तुझा रथाचे अश्व महाशरीरी, महाजवयुक्त व सुंदर असतांही कंपित झालेले दिसतात. या सर्व निमित्तावरून असें वाटतें कीं, सहस्रावधी पार्थिव युद्धामध्यें मृत होऊन भूमीवर शयन करतील. हे कर्णा, हा कुंतीपुत्र अर्जुन शत्रूंस धरण्यास येत आहे व त्याच्या ध्वजाग्राचे ठायीं हे श्त्रूंस भय उत्पन्न करणारा वानर कसा दिसतो तो पहा हा देवकीसुत वासुदेव अर्जुनाच्या रथाचे श्वेत अश्व वाहत इकडे येत आहे त्या

स पहा. हे वीर पांडव तुमच्या सैन्यावर धांऊन येऊन तुमच्या कडील क्षत्रियां-
स मारतात. हे कर्णा, जा अर्जुनास तूं कोठें आहे म्हणून पुसत होतास तो अर्जु
न कृष्णासहवर्तमान तूं पहाशील. हे कर्णा सारथी ज्याचा श्रीकृष्ण व गांडीव ना
मक ज्याचें धनुष्य अशा अर्जुनाचा आज जर तूं वध करशील तर तूं आमचा रा
जा होशील. या प्रकारें शल्याचें भाषण ऐकून कर्ण क्रोधानें शल्यास बोल-
तो हे शल्या, क्रुद्ध झालेल्या संशप्तकगणानीं पार्थास चोंहीं कडून पळविला-
आहे तो पहा. असें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलतो अरे कर्णा, जलानें व
रुणाचा कोण नाश करील असें पार्थाचें रूप आज मी मानितों. युद्धामध्यें देवां-
सहवर्तमान् इंद्रही अर्जुनाचा पराभव करण्यास समर्थ नाहीं. जो आपल्या बा
हुबलानें भूमीस उचलील अथवा क्रोधानें या प्रजा दग्ध करील तो युद्धामध्यें
अर्जुनाचा पराभव करील. तसाच महाबाहु भीमसेन पूर्वी कौरवांनीं केलेल्या
कर्माचें स्मरण करीत युद्धास उभा आहे. शत्रूंनीं पराजय करण्यास अशक्य
असे युधिष्ठीर, नकुल आणि सहदेव हे युद्धार्थ सिद्ध झाले आहेत. तसेंच द्रौ
पदीचे पांच पुत्र, धृष्टद्युम्न प्रभृती द्रुपद पुत्र हे युद्धास उभे राहिले आहेत, दु
सरा इंद्रच काय असा सात्वत श्रेष्ठ सात्यकी युद्धास येत आहे. या प्रकारें पुरु-
षश्रेष्ठ कर्ण शल्याचा संवाद होत असतां कौरव व पांडवांच्या सेना, एकत्र-
मिळाल्या. असा विषय या अध्यायांत आहे.

४७ अध्याय सत्तेचाळीसः— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, व्यू
ह रचित केलेल्या उभयतांच्या सेना एकमेकांत मिश्रित झाल्या असतां पार्थ संश
प्तकांकडे कसा गेला व कर्ण पांडवांकडे कसा गेला हे मला सांग. असा प्रश्न ऐ
कून संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, शत्रूंचें सैन्य युद्धास उभें आहें असें
जाणून अर्जुनानें आपल्या कडील पदाती, अश्वारोह, गज व रथ इत्यादि सै-
न्याचा धृष्टद्युम्नास प्रमुख करून व्यूह केला असतां तो व्यूह फार शोभूं लागला
त्या व्यूहांत द्रौपदीचे पांच पुत्र धृष्टद्युम्नाचे संरक्षण करीत असतां. धृष्टद्युम्न
तारागणानीं वेष्टित चंद्रा सारखा दिसूं लागला. असें उभयतांचें सैन्य युद्धा
स सिद्ध झाल्यावर अर्जुन संशप्तकांवर धाऊन गेला, त्याकालीं संशप्तकग
ण अर्जुनावर धांवले. या संग्रामांत रथ, अश्व, धनुष्यें, रथांचीं चक्रें, योध्या

चे आयुधा सह वर्तमान् बाहु व शिरें अर्जुनानें छेदून टाकिलीं, असा संग्राम होत असतां संशप्तकांचे गण मोठ्यानें शब्द करूं लागले. नंतर पार्थानें उत्तर, दक्षिण व पश्चात् भागानें त्यांचा वध केला, इकडे पांचाल, चेदी व सृंजयानीं दुर्योधनाच्या योध्यांशीं मोठा दारुण संग्राम केला. कृपाचार्य, कृतवर्मा व शकुनी यांणी कोशल, काश्य, मत्स्य, कारुष, कैकय व शूरसेन या वीरांसहवर्तमान मोठा दारुण संग्राम केला. पांचाल, चेदींचे वीर व सात्यकी यांसहवर्तमान पांडव कर्णाशीं युद्ध करीत असतां दुर्योधन आपले भ्राते व कांहीं महारथी कुरुवीरांसह वर्तमान कर्णाचें रक्षण करूं लागला. कर्णानें निशित बाणानीं पांडवांचे मोठ मोठे श्रेष्ठ रथी मर्दित करून युधिष्ठिरास पीडित केलें. या प्रकारें कौरव सृंजयांचा संग्राम, देवासुर संग्रामासारखा झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

४८ अध्याय अठ्ठेचाळीस:- धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, कर्ण, पांडव सैन्याचा क्षय करीत असतां युधिष्ठिराच्या सन्निध आला. तेव्हां पांडवांच्या कोणाच्या योध्यानीं त्याचें निवारण केलें, पुढें कर्णानें पांडवांच्या योध्याचें निवारण करून युधिष्ठिरास कसा पीडित केला तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, धृष्टद्युम्नासह वर्तमान् पांडव युद्धास उभे राहिलेले पाहून कर्ण पांचालां कडे मोठ्या त्वरेनें धांऊन गेला असतां पांचाल मोठ्या त्वरेनें कर्णावर धाऊन गेले. त्याकालीं उभय सैन्यांत सहस्त्रावधी शंखांचे व भेरींचे भयंकर नाद होऊं लागले, परस्पर योद्धे एकमेकांवर नाना प्रकारची बाण वृष्टी करूं लागले, कर्णानें पांडवांकडील प्रभद्रकांचे सत्याहत्तर वीर मारून सुपुंख व निशित पंचवीस शरानीं पंचवीस पांचालांचा वध केला. नंतर परकाया विदारण करणाऱ्या सुवर्ण पुंख नाराच बाणानीं सहस्त्रावधी चेदिवीरांचा वध केला. असें कर्ण अतिमानुष कर्म करीत असतां पांचालानीं कर्णास वेष्टिलें, तेव्हां कर्णानें भानुदेव, चित्रसेन, सेनाबिंदु, तपन व शूरसेन नामक पांचालांचा पांच बाणानीं वध केला. तेव्हां पांचाल सैन्यांत मोठा हाहाःकार होऊं लागला. पुन्हा पांचालांच्या दहा रथ्यानीं कर्णास वेष्टिलें असतां पुनः कर्णानें सुपत्री शरानीं त्यांचा वध केला.

कर्णाचे स्रुषेण व सत्यसेन नामक दोन पुत्र चक्ररक्षक होते, त्यांणीं आपल्याप्राणाचें भय टाकून मोठें युद्ध केलें. कर्णाचा वृषसेन नामक ज्येष्ठपुत्र त्याचा पृष्ठरक्षक होता, त्याणें पृष्ठभागीं कर्णाचें रक्षण केलें. धृष्टद्युम्न, सात्यकी, द्रौपदेय, वृकोदर, जनमेजय, शिखंडी, प्रभद्रकांचे वीर, चेदी, कैकय, पांचाल योद्धे व नकुल सहदेव हे कर्णाचा वध करण्यास्तव त्याजवर धांऊन नाना प्रकारच्या शस्त्रांची-वृष्टी करूंलागले असतां कर्णाचे पुत्र व तुझा कडील कांहीं योद्धे यानीं पांडवांकडील वीरांचें निवारण केलें. स्रुषेणानें भीमसेनाचें धनुष्य छिन्न करून सात नाराच बाणानीं त्याचे हृदयास वेध करून मोठा नाद केला असतां वृकोदरानें-दुसरें धनुष्य घेऊन स्रुषेणाचें धनुष्य तोडलें आणि दहा बाणें करून त्यास वेध-केला. नंतर त्र्याहत्तर शरानीं कर्णास वेध केला, नंतर कर्णाच्या भानुसेन नामक पुत्रास दहा बाणांनीं ताडित करून खालीं पाडला. याप्रकारें भीमसेन कर्णपुत्राचा वध करून पुन्हा कौरवांकडील योध्यांस बाणानीं पीडित करूं लागला-कृपाचार्य व कृतवर्मा याचीं त्यानें धनुष्यें तोडलीं. तीन बाणानीं दुःशासनास व-सहा बाणानीं शकुनीस व तीन बाणानीं उलुकास वेध करून बहुत रथ्यांस विरथी करून टाकिलें. त्याकाळीं कर्णानें भाषण केलें कीं; अरे भीमसेना, स्रुषेणा मेलास असें बोलत होतास काय? असें म्हणून त्याचें धनुष्य तोडलें. आणि तीन बाणानीं त्यास ताडित केला असतां भीमसेनानें दुसरें धनुष्य घेऊन एक बाण स्रुषेणावर टाकतांच तो बाण कर्णानें छिन्न केला. नंतर कर्णानें त्र्याहत्तर बाणानीं भीमसेनास ताडित केला. स्रुषेणानें उत्तम धनुष्य घेऊन पांच बाणानीं नकुलास बाहु व उराचे ठायीं ताडित केला असतां नकुलानें वीस बाणानीं स्रुषेणास ताडित करून तीन भल्लाकार बाणानीं त्याचें धनुष्य छिन्न केलें तेव्हां स्रुषेणानें दुसरें धनुष्य घेऊन नकुलास साठ बाणानीं व सहदेवास सत्तर बाणानीं वेध केला. सात्यकीनें तीन बाणानीं वृषसेनाचा-सारथी मारून भल्लाकार बाणानें त्याचें धनुष्य छेदून सात बाणानीं रथाचे अश्व मारिले व तीन बाणानीं त्याचे हृदयावर ताडण केलें असतां वृषसेन एक मुहूर्त पर्यंत रथामध्यें मूर्च्छित होऊन पडला. दुःशासनानें वृषसेन विरथी झाला हें पाहून त्यास रथांत बसवून रणभूमी-पासून दूर नेला. नंत

र वृषसेन दुसरे रथांत बसून द्रौपदेय, सात्यकी, नकुल, शतानीक, शि-
खंडी व धर्मराज यांस अनेक बाणानीं प्रहार करून पुन्हा कर्णाच्या पृष्ठ
भाग संरक्षण करण्यास गेला. धृष्टद्युम्न आदिकरून पांडवांकडील वीरा-
नीं कर्णास ताडित केला, कर्णानें सहस्र विशिख बाणानीं त्या सर्व योध्यां
स ताडण केलें. हे धृतराष्ट्र राजा, त्या कालीं कर्ण भात्यातून बाण केव्हां काढी,
धनुष्यांस केव्हां लावी व धनुष्यापासून केव्हां सोडी हें आमचे पहाण्यांत आ
लें नाहीं. पांडवांकडील योद्धे, अश्व, सारथी व रथ यां सह वर्तमान कर्णाचे बाणा
नीं आच्छादित झाल्यामुळें पृथक् पृथक् झाले. पुन्हा कर्णानें शर वृष्टीनीं त्या-
योध्यांचें मंथन करून गजसैन्यांत प्रवेश केला आणि चेदि योध्यांचे तीनशें-
रथ निशित बाणानीं मारून युधिष्ठिरास पीडित केलें. त्याकालीं इतर पांडव;
शिखंडी व सात्यकी कर्णापासून युधिष्ठिराचें रक्षण करूं लागले. तसेंच कौर-
वांचे योद्धे कर्णाचें रक्षण करूं लागले. त्या कालीं उभयतांच्या सैन्यांत वाद्यां
चा घोष होऊं लागला. पुन्हा युधिष्ठीर प्रमुख पांडव व सूतपुत्र प्रमुख कौरव-
एकमेकांशीं युद्ध करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

४९ अध्याय एकुणपन्नासः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा,
कर्ण, सहस्रावधी रथ, अश्व, गज व पदाती बराबर घेऊन पांडव सैन्याचें विदा
रण करीत युधिष्ठिरावर धांऊन गेला. तेव्हां पांडवांकडील योध्यानीं सहस्रा
वधि उग्र आयुधें कर्णावर टाकिलीं. कर्णानें तीं सर्व आयुधें मोठ्या त्वरेनें छि
न्न करून कितीएक योध्यांचीं शिरें, बाहु व ऊरू छिन्न केले इतक्यांत सा-
त्यकीनें द्रविड व निषादाचे पदाती कर्णाचा वध करण्यास पाठविले अस-
तां कर्णानें त्यांचे बाहु व शिरें छिन्न करतांच ते पृथ्वीवर पडले. नंतर कर्ण पु
न्हा युधिष्ठिरावर गेला तेव्हां युधिष्टिर बोलला कीं, हे कर्णा, संग्रामामध्यें-
तूं व्यर्थ फाल्गुनाशीं स्पर्धा करतोस; तसाच धृतराष्ट्र पुत्राच्या मतास अनुसरू
न आम्हांस दुःख देतोस तर आज मी तुझी युद्धश्रद्धा नष्ट करतों. असें धर्मराजानें
भाषण करून सुवर्णपुंख व निशित बाणांनीं कर्णास व कर्णानें वत्सदंत दहा-
बाणानीं युधिष्ठिरास ताडित केलें. नंतर धर्मराजानें कालदंडासारखा असा ए
क तीक्ष्ण बाण धनुष्यास लावून तो सूतपुत्राच्या हिंसे कर्ता त्याजवर टाकिला.

असतां कर्ण रथांत पडला. नंतर कर्ण लवकरच सावध होऊन धर्मराजावर निशित बाणांची वृष्टी करूं लागला. चंद्रदेव व दंडधार हे दोन पांचाल धर्मराजाचे चक्ररक्षक होते, त्यांचा त्यानें वध केला. युधिष्ठिरानें निशित बाणें करून पुन्हा कर्णास ताडित करून सुषेण, सत्यसेन, शल्य, सूतपुत्र व त्याचे रक्षक यांस ताडित केलें. त्या काळीं कर्णानें भल्ल बाणानें धर्मराजास वेध करून मोठा शब्द केला, नंतर सात्यकी, चेकितान, नकुल, सहदेव, भीमसेन प्रभृती पांडवांकडील वीर क्रुद्ध होऊन कर्णास बाणानीं पीडित करूं लागले. तसाच, पांचालांतील जनमेजयानें कर्णास कांहीं बाणानीं वेध केला, तेव्हां कर्णानें पांडवां कडील योध्यांवर ब्रम्हास्त्राचा प्रयोग करतांच त्या पासून मोठा अग्नी उत्पन्न होऊन पांडव सैन्य दग्ध करूं लागला असतां धर्मराजानें महास्त्राचा कर्णावर प्रयोग केला. त्याकालीं कर्णानें धर्मराजाचें धनुष्य छिन्न करून कवच छिन्न केलें, तेव्हां धर्मराजानें एक लोहमयशक्ति कर्णावर टाकिली, ती आकाशांत असतां कर्णानें सात बाणानीं छिन्न करतांच पृथ्वीवर पडली. नंतर-कर्णानें एक बाणानें धर्मराजाचा ध्वज छिन्न करून व तीन भल्ल बाणानीं-धर्मराजास ताडित करून त्याच्या रथाचे तिल प्राय तुकडे केले, नंतर धर्मराज दुसरे रथामध्यें बसून युद्धापासून पराङ्मुख झाला असतां कर्ण धर्मराजाच्या सन्निध गेला आणि त्यानें बलात्कारानें त्यास ग्रहण करण्याची-इच्छा केली असतां त्यास कुंतीच्या वाक्याचें स्मरण झालें, कर्ण धर्मराजास धरतो हें पाहून शल्य बोलला हे कर्णा, तूं धर्मराजास धरूं नको, तो तुझा वध केल्या वांचून भस्म करून टाकील. असें शल्याचें भाषण ऐकून कर्ण धर्मराजास बोलला कीं, हे पांडवा, तूं क्षत्रिय कुलांत कशास उत्पन्न झालास; मी क्षात्र धर्मामध्यें व्यवस्थित आहें असें म्हणवितोस, तूं क्षत्रिय धर्मामध्यें कुशल नाहींस असें मला वाटतें, तूं केवळ स्वाध्याय व यज्ञकर्मा विषयीं ब्राम्ह बलानें युक्त आहेस; यास्तव हे कौंतेया, तूं युद्ध करूं नकोस. असें कर्णानें धर्मराजास भाषण करून त्यास सोडून दिल्हा, धर्मराज रणाचा-त्याग करून माघारा गेला असतां त्याचे पाठी मागून चेदी व इतर पांडव पांचाल, सात्यकी, द्रौपदेय, व माद्रीपुत्र रणा पासून गेले. हें पाहून कर्ण

कौरवां सह वर्तमान हर्षित होऊन पाठिमागें गेला. त्याकाळीं कौरवसैन्याम-ध्यें भेरी, शंख, मृदंगाचे नाद होऊं लागले, युधिष्ठिर आपले योध्यांस बोलला कीं अरे युद्ध करा, उगीच कां उभे राहिलां. अशी आज्ञा होतांच भीमसेन प्रमुख पांडवांकडील महारथी कौरवांवर धांवले असतां परस्पर उभयतांचें तुमुल युद्ध होऊं लागलें. त्या युद्धांत सहस्रावधि वीरांचे समुदाय व गजारोह, अश्वारोह मृत होऊन पृथ्वीवर पडले, युद्धांत मृत झालेल्या सहस्रावधि वीरांस अप्सरांनीं विमाना मध्यें घालून गीत वाद्यांचा गजर करीत स्वर्गी नेलें. हें पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें, सर्वयोद्धे स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें हर्षांतःकरणे करून एकमेकांस मारूं लागले. रक्ताची मोठीनदी उत्पन्न झाली, या प्रकारें उभयतांची सेना नष्टझाली असतां भीमसेन व सात्यकी प्रमुख पांडवांकडील वीर पुन्हा कौरवसैन्यावर धांऊन जातांच कौरवांचें सैन्य त्या विरांचा वेग सहन करण्यास अशक्य झाल्यामुळें रथ, गज, अश्व व पदाती इत्यादि चतुरंग कौरवसैन्य पराङ्मुख झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

५० अध्याय पन्नासः—संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, दुर्योधनाचें सैन्य पळत असतां पांडव त्याच्या पाठीस लागले. हें पाहून दुर्योधन आपले सैन्याचें निवारण करण्यास आक्रोश करीत जरी उद्युक्त झाला तथापि त्याचे योद्धे व सैनिक माघारे फिरले नाहींत, त्याकाळीं पक्ष प्रपक्ष स्थानीं उभे राहिलेले शकुनी व दुसरे इतर योद्धे भीमसेनावर धाऊन गेले. दुर्योधनाकडील योद्धे पळतात हें पाहून कर्ण शल्यास बोलला हे मद्रराज, माझ्या रथाचे अश्व भीमसेनाच्या रथाकडे ने. असें एकून शल्यानें कर्णाच्या रथाच्या अश्वांस प्रेरणा करतांच तो रथ भीमसेनाच्या रथासंन्निध गेला. हें पाहून भीमसेन कर्णाचा विनाश करण्याविषयीं मती धरून सात्यकी व धृष्टद्युम्नयांस बोलला कीं, हे वीर हो तुम्हीं धर्मराजाचें रक्षण करा मी आज घोर संग्राम करून कर्णाचा वध करीन अथवा कर्ण तरी माझा वध करील हें मी सत्य भाषण करतों. असें भीमसेन भाषण करून कर्णावर धांऊन सिंहनादानें त्यानें दाहीं दिशा नादित केल्या, तेव्हां शल्य सूतपुत्रास बोलला हे कर्णा, हा क्रुद्ध झालेला पांडुनंदन येत आहे तो पहा; यास बहुत क्रोध

आला आहे तो क्रोध तुझे ठायीं तो निश्चयें करून मुक्त करणार असें वाटतें. असें शल्य कर्णाशीं भाषण करीत आहे तों वृकोदर कर्णाच्या सन्निध आला हें पाहून राधेय हास्यपूर्वक शल्यास बोलला हे मद्रेश्वरा, भीमसेनाविषयीं तूं जें भाषण केलेंस तें सर्व सत्य आहे हा भीमसेन युद्धभूमीचे ठायीं मजसहवर्तमान युद्ध करण्यास आला आहे, मी अशी प्रतिज्ञा केली कीं, युद्धामध्यें अर्जुनाचा वध करीन अथवा तो तरी माझा वध करील. ही माझी प्रतिज्ञा, आज भीमसेनासमागमे कदाचित् सिद्ध होईल असें वाटतें, कारण आज मी भीमसेनाचा जरी वध केला तरी अर्जुन माझ्याशीं संग्रामास येईल. नंतर माझा मनोरथ पूर्ण होईल. असें राधेयाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे कर्णा, बरें आहे भीमसेनावर लौकर चल तूं भीमसेनाचा पराभव केल्यानंतर अर्जुन तुझाशीं युद्धास येईल मग तुझी इच्छा पूर्ण होईल. असें भाषण केलें असतां कर्ण शल्यास बोलतो हे शल्या, मी अर्जुनाचा वध करीन अथवा अर्जुन माझा वध करील, तूं माझा रथ वृकोदराकडे घेऊन चल. असें कर्णाचें भाषण ऐकून कौरव सैन्याचें भीमसेन जेथें विद्रावण करीत होता तेथें शल्यानें कर्णाचा रथ नेला. तेव्हां उभयतांचें युद्ध होऊं लागलें. त्या कालीं कर्णाचा व भीमसेनाचा समागम झालेला पाहून सैन्यांमध्यें वाद्यांचे नाद होऊं लागले, भीमसेनानें दुर्योधनाचें सैन्य पळविलें. असा भीमसेन व कर्ण यांचा मोठा संग्राम एक मूहूर्त पर्यंत झाला तेव्हां भीमसेन कर्णावर धांवला तेव्हां कर्णानें भीमसेनाच्या स्तनांतरीं नाराच बाणांनीं ताडन करून त्यावर बाणांची वृष्टी केली. असें युद्ध होत असतां भीमसेनानें क्रोधानें आरक्त नेत्र करून मोठ्या त्वरेनें एक बाण त्याणें कर्णावर टाकिला.- त्या वेळीं कर्ण ताडित होऊन रथोपस्थांत मूर्च्छित पडला, तेव्हां शल्यानें त्याचा रथ युद्धापासून माघारा नेला. नंतर भीमसेनानें कौरव सैन्यांचें मर्दन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

५१ अध्याय एकावन्न :— धृतराष्ट्र बोलतो हे संजया, भीमसेनानें कर्णास रथोपस्थांत (रथांत बसण्याचें जें उच्चासन त्याच्या आसपास बसण्याची जी सरवळ जागा) पाडला हें त्याणें मोठें दुष्कर कर्म केलें. दुर्योधन म्हणत असे कीं, सृंजया सहवर्तमान पांडवांचा हंता एक कर्ण आहे. पांडवां-

स मारण्याची योग्यता दुसरे कोणास ही नाहीं. असो राधेय पराजित झाला अ
सतां पुढें दुर्योधनानें काय केलें हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण क
रतो हे राजा, युद्धांत राधेय विमुख झाला हें पाहून दुर्योधन आपल्या सहोदरां
स बोलला हे सहोदर हो तुम्हीं सत्वर जाऊन भीमसेनापासून राधेयाचें रक्ष
ण करा. अशी आज्ञा होतांच श्रुतर्वा, दुर्धर, क्राथ, विवित्सु, विकट, सम, निषं
गी, कवची, पाशी, नंद, उपनंदक, दुष्प्रधर्ष, सुबाहु, वातवेग, सुवर्चा, धनुर्ग्रा
ह, दुर्मद, जलसंध, शल आणि सह हे वीर्यवान् व महाबली तुझे पुत्र इतर र
थ्यांसह वर्तमान भीमासन्मुख येऊन त्याजवर एकाएकीं बाण समुदायाची वृ
ष्टी करूं लागले. तेव्हां भीमसेनानें तुझाकडील पन्नास रथ्यांचा प्राण घेत
ला व भल्ल बाणानें विवित्सूचें शीर तोडिलें, हें पाहून तुझे इतर पुत्र क्रोधा
नें चोहीं कडून भीमसेनावर धांवले. नंतर भीमसेनानें दोन भल्लाकार बा
णानें विकट व सह यांचे प्राण हरण करतांच ते पृथ्वीवर पडले, पुढें क्राथ,
नंद व उपनंदक यांस ही भीमानें यमलोकीं नेलें असतां इतर तुझे पुत्र विव्ह
ळ होऊन पळाले. नंतर सूतपुत्र शल्यास बोलला हे शल्या, माझा रथाचे अ
श्व पुनः भीमसेनाकडे फिरीव. असें भाषण ऐकून शल्यानें तत्काळ कर्णा
चा रथ भीमसेनाकडे नेला, ते उभयतां एकत्र होतांच उभयतांच्या तुमल
व घोर युद्धास आरंभ झाला, तें युद्ध पहावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली.
भीमसेनानें तुझे पुत्र पहात असतां कर्णास बाणें करून आच्छादित केलें.
कर्णानें क्रुद्ध होऊन भीमसेनास नऊ बाणें करून विध्द केलें. असें त्यांचें युद्ध
नानाप्रकारें वाली सुग्रिवासारखें होत असतां पुन्हा कर्णानें तीन बाणानीं भी
मास वेध केला. नंतर भीमसेनानें कर्णाचें शीर विदारण करणारा असा एक
विशिख बाण कर्णावर टाकिला, तो बाण कर्णाच्या तनुगात्राचा आणि शिरा-
चा भेद करून पृथ्वींत गेला. त्या बाणाच्या प्रहारानें कर्ण कंपित होऊन त्यानें पु-
न्हा पंचवीस नाराच बाण भीमावर टाकिले, एक बाणानें ध्वज तोडला, एक
भल्लाकार बाणानें त्याचे सारथ्यास मारला व एक शीघ्रगामी बाणानें कार्मु
क छेदून टाकिलें. नंतर कांहीं कष्ट न लागतां एक मुहूर्तांत त्यास विरथी केला
असतां महाबाहु भीमसेन हास्य करीत गदा घेऊन रथाखालीं उतरला व

मो ज्या वेगानें तुझ्या सैन्यांत शिरून त्यानें तुझें सैन्य उद्विग्न केलें. तसेंच सात शें गज मारिले व कांहीं गज त्रस्त होऊन पळूं लागले तेव्हां त्यांच्या माहुतानीं त्या सर्व गजांस थांबविलें असतां भीमसेनानें गजारोहासहवर्तमान त्या सातशें गजांचा प्राण घेतला, तसेंच शंभर रथी व शतशः पदाती मारून कौरव सैन्यांस मोठें दुःख दिलें. नंतर शकुनीच्या अतिबलवान् बावन गजांचा प्राण घेतला. हे राजा, भीमसेनानें कोपित होऊन तुझ्या कडील सैन्य बहुत संतप्त केलें असतां कौरवांचें सैन्य युद्धाचा त्याग करून दाही दिशेस पळालें. पुनः कौरवां कडील पांचशें रथी युद्धास येऊन भीमसेनावर चोहीं कडून बाण वर्षाव करूं लागले तेव्हां भीमसेनानें त्या सर्व रथ्यांचा वध केला. पुन्हा शकुनीनें शक्ती, काठी, पाश घेतलेले तीन हजार अश्वारोह पाठविले असतां भीमसेनानें त्यांस मारिलें. असे भीमसेनानें तीन हजार शकुनीनें पाठविलेले अश्वारोह मारल्या नंतर तो दुसरे रथांत बसून कर्णावर धांऊन गेला. इकडे कर्ण धर्मराजाच्या पाठीमागें जाऊन त्याजवर कंकपत्र अजिम्हग बाणाची वृष्टी करूं लागला हें पाहून भीमसेनानें पृथ्वी व आकाश, बाणांनीं व्याप्त केली. पुनः कर्ण धर्मराजावर जात होता तिकडून माघारा फिरून त्यानें भीमास निशित बाणानीं आच्छादन केलें, हें पाहून सात्यकीनें शरानीं कर्णास आच्छादित केलें. त्या कालीं उभयतांचें युद्ध होऊं लागलें, कर्ण व सात्यकी एकमेकांवर दीप्त शरांची वृष्टी करून परम शोभायमान दिसूं लागले. हे राजा, मध्यान्ह कालीं संतप्त झालेल्या सूर्याची प्रभा कर्ण पांडवांच्या बाणसमुदायानीं नष्ट झाली, सौबल, कृतवर्मा, अश्वत्थामा, कर्ण व कृपाचार्य इतके तुझ्या कडील योद्धे एकत्र होऊन पांडवांवर एकाएकीं धांवले असतां इतर कौरवां कडील योद्धे युद्धापासून निवृत्त झाले होते ते पुन्हा युद्धास सिद्ध झाले, उभयतांच्या सेना एकत्र होऊन घोर युद्ध होऊं लागलें. हे राजा, असें भयंकर युद्ध मागें कधीं कोणाचें झालेलें ऐकिलें नाहीं व पाहिलेंही नाहीं व पुढेंही होणार नाहीं असें वाटतें; उभयतां कडील योद्धे एकमेकांचीं मर्मे काढून परस्पर निर्भर्त्सना करूं लागले. त्या योध्यांचें कर्म पाहून अतःपर हे जिवंत राहत नाहींत अशी माझी निश्चितमती झाली, त्यांचीं शरीरें केवळ क्रोधानें देदीप्यमान झालेलीं पा

हून मला तत्काल भयउत्पन्न झालें, कौरव पांडवां कडील महारथी तीक्ष्ण बा णों करून एकमेकांस मारूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

५२ अध्याय बावन्नः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, उभय सैन्यांतील योद्धे एकमेकांचा पराभव करावा या बुद्धीनें युद्धामध्यें एकमेकां स ताडण करूं लागले. गजारोहाशीं गजारोह, अश्वारोहाशीं अश्वारोह, रथ्यां शीं रथी, पायदळाशीं पायदळ असें मोठें युद्ध करूं लागले, त्या युद्धांत कितीए क गजानीं पळतां पळतां बहुत सैनिकांचें मर्दन केलें, कितीएक शूर युद्ध करतां करतां मधेंच आक्रोश करूं लागले, पशूंनें हनन स्थान रक्तानें भरलेलें जसें दि सतें तशी रणभूमी दिसूं लागली. योध्यांचे अंगुली सहित हस्त चलन, वलन करीत त्या रणभूमी मध्यें पडलेले पन्नगा सारखे दिसूं लागले, स्वकीय किंवा परकीय विचार युद्धामध्यें अगदींच राहिलानाहीं, रथ, चक्र व अश्वांच्या पाद संमर्दनानीं पृथ्वी पासून रजउत्पन्न होऊन आकाश व पाताल यामध्यें अं तर नाहीसें झालें. रक्ताच्या भयानक नद्या एकाएकीं उत्पन्न झाल्या, त्यानद्या मध्यें योध्यांचीं शिरें हे पाषाण, केश हे शेंवाळ, धनुष्य, शर व गदा ह्या लहान नौका त्यानदी मध्यें शोभूं लागल्या. हजारों राक्षस व्याघ्रासारखे भयंकर नाद करीत येऊन त्यास्थळीं राहिले, कबंधें उठून नृत्य करूं लागलीं, पिशाचांचे- समुदाय शोणित व मांस भक्षण करून नृत्य करूं लागले. गृध्र, काक, बक. इत्यादि पक्षी निर्भय पणें त्यानदी तीरीं राहून मांसभक्षणानें तुष्ट झाले. शू रानीं भयाचा त्याग करून रणभूमींत मोठें तुमुल युद्ध केलें. त्याकाळीं उभयसै न्यांतील योद्धे परस्परांच्या नामगोत्रांचा व पितृनामांचा घोष करीत युद्धक रूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

५३ अध्याय त्रेपन्नः— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, असें भ यंकर युद्ध होत असतां तेथें अर्जुनाच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार ऐकूं आला. त्या युद्धांत अर्जुनानें संशप्तकगण, कोशलसैन्य व नारायणबल यांचें ब हुत कदन केलें असतां संशप्तकानीं रणामध्यें पार्थाचे शिरावर बाण वर्षाव के ला. पार्थानें सैन्यांत फिरतां फिरतां रथिश्रेष्ठांस कंकपत्री शिलाशित बा णांनीं मारून सुशर्म्यावर बाणवृष्टी केली. सुशर्म्यानें व संशप्तकांनीं पार्था

वर बाणाची वृष्टी केली. नंतर सुशर्म्यानें दहा शीघ्र गमन करणाऱ्या बाणानीं पार्थास वेधून व तीन बाणानीं जनार्दनाच्या दक्षिण भुजांस वेध केला, नंतर एक भल्ल बाणानें केतूस ताडण केलें. त्याकाळीं ध्वजस्थित वानरानें मोठी भयंकर गर्जना केली त्या नादानें तुझी सेना त्रस्त होऊन निचेष्ट पृथ्वीवर पडली. नंतर त्या योध्यानीं सावध होऊन अर्जुनाचे रथास वेष्टिलें, कोणी तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झाले असतांही अर्जुनाच्या रथास धरून आक्रोश करूं लागले, कोणी अर्जुनाच्या अश्वांस, कोणी रथचक्रास, कोणी रथाच्या ईषेस क्रोधानें धरूं लागले, कांहीं योद्धे कृष्णास व कांहीं योद्धे अर्जुनास धरूं लागले. त्याकाळीं केशवानें रणांगणीं आपले बाहु कंपित करून त्या सर्वांस पाडलें, अर्जुनानें क्रुद्ध होऊन संशप्तकांच्या योध्यांस बाणांनीं भूमीवर पाडून केशवास भाषण केलें हे कृष्णा, संशप्तकानीं स्व बाहुबलानें आपला रथ रोधिला आहे तो पहा. हजारों संशप्तकगण वध्यमान केले असतां पुन्हा तेदारुण कर्म करतात याचें सहन करणारा मीच आहें; दुसरा योद्धा या पृथ्वीवर नसेल. असें अर्जुनानें भाषण करून देवदत्त शंखाचा नाद केला. कृष्णानेंही आपल्या पांचजन्य शंखाचा नाद केला. त्या शंखाच्या शब्दानीं संशप्तकांची सेना कंपित झाली. तेव्हां अर्जुनानें नागास्त्र टाकून समग्र संशप्तकांचे पाद बंधन करून त्यांस निःशक्त केलें. नंतर अर्जुनानें त्या योध्यांचा वध केला, आपली सेना पीडित झालेली सुशर्म्यानें पाहून त्वरेनें सौपर्ण नामक अस्त्राची योजना करतांच रणभूमीमध्यें एकाएकीं हजारों गरुड उत्पन्न होऊन त्यानीं सर्व भुजंगांस भक्षण केलें. कांहीं भुजंग गरुडास पाहून पळाले, सुशर्म्याचें सैन्य पादबंधनापासून मुक्त झाल्यावर फाल्गुनाच्या रथावर धांऊन बाणांचा वर्षाव करूं लागलें, नानाप्रकारच्या शस्त्रास्त्र वृष्टी करून संशप्तकांच्या योध्यानीं अर्जुनास आच्छादित केला असतां अर्जुनानें त्या शस्त्रवृष्टीचा नाश करून बहुत योध्यांचा वध केला. त्याकाळीं सुशर्म्यानें एक बाणानें अर्जुनाचें हृदय वेधून तीन बाणें करून पुन्हा त्यास ताडित केला तेणें करून अर्जुन रथोपस्थांत निचेष्ट बसला. हें पाहतांच पांडवांकडील योध्यानीं पार्थ मरण पावला असा एकाएकीं आक्रोश शब्द केला. कांहीं काला

ते पार्थ सावध झाल्यावर परमत्वरेनें संशप्तकाचें सैन्य पाहून ऐंद्रास्त्राची योजना करतांच सुशर्म्याचे अश्व, गज व रथ सहस्त्रावधी मरण पावले. संपूर्ण सैन्य निचेष्ट झालें असतां अर्जुनानें दहासहस्त्र वीर मारून चौदाहजार योध्यांचा प्राण घेतला, तसेंच दहाहजार रथी मारून तीनहजार गजांचा प्राण घेतला. पुन्हा संशप्तकानीं रणामध्यें आपला जय किंवा पराजय होऊन मृत्यु येवो, असा निश्चय करून युद्धास आरंभ केला असतां अर्जुनासहवर्तमान तुझाकडील योध्यांचें मोठें भयंकर युद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

५४ अध्याय चौपन्न :– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, कृतवर्मा, कृपाचार्य, द्रोणपुत्र अश्वत्थामा, सूतपुत्र उलुक, शकुनी व बंधुसहवर्तमान दुर्योधन, यानें आपली सेना पीडित झालेली पाहून ते पांडवांवर धांऊन गेले. त्याकाळीं उभयतांचें युद्ध एक मुहूर्त पर्यंत फार मोठें झालें. कृपाचार्यानें बाणवर्षावानें सृंजयास आच्छादित केलें हें पाहून शिखंडीनें कृपाचार्यावर बाणवर्षाव केला. अस्त्रवेत्या कृपाचार्यानें शिखंडीच्या बाणवर्षावाचें निवारण करून क्रोधानें दहा बाणें करून त्यास वेध केला, शिखंडीनें कोपित होऊन सात कंकपत्र अजिम्हक बाणांनीं कृपाचार्यास वेध केला असतां आचार्यानें खड्ग, चर्म घेऊन शिखंडीचा सूत मारून रथाचे चारी अश्व मारिले. त्याकालीं शिखंडी रथाखालीं उतरून हातांत खड्गचर्म घेऊन ब्राम्हणावर धांवला, त्यासमयीं कृपाचार्यानें सन्नतपर्व बाणें करून शिखंडीस आच्छादित करतांच शिखंडी रणांत निश्चेष्ट उभा राहिला. हें कृत्य समुद्रांत पाषाण तरल्या सारखें झालें, शिखंडीस कृपाचार्यानें आच्छादित केलेला पाहून धृष्टद्युम्न, कृपाचार्यावर धांवला. त्याकालीं कृतवर्म्यानें धृष्टद्युम्नावर धांवून जाऊन त्यास रोधिला, इतक्यांत सैन्य व पुत्र यांसहवर्तमान धर्मराज कृपाचार्यावर धांऊन गेला. हें पाहून द्रोणपुत्र धर्मराजाचें निवारण करण्यास आला. नकुल, सहदेव धर्मराजाचे रक्षणार्थ त्याचे सन्निध जात असतां दुर्योधनानें उभयतांचें निवारण केलें, भीमसेन, करूष नामक योद्धे व सृंजयासहवर्तमान कैकय हे युद्धास आले असतां कर्णानें त्यांचें निवारण केलें. शिखंडी व कृपाचार्य यांचें युद्ध होत असतां कृपाचार्यानें शिखंडीस दग्ध करण्याच्या इच्छेनें त्याजवर बहुत बाणांचा वर्षाव

केला असतां शिखंडीनें खड्ग घेऊन त्या बाणांचें छेदन करतांच कृपाचार्या-
नें शिखंडीच्या शतचंद्र चिन्हित चर्माचें त्वरेनें बाणें करून छेदन केलें अ-
सतां सर्वजन आक्रोश करूं लागले. त्याकाळीं चित्रकेतूचा पुत्र जो सुकेतु-
यानें ब्राम्हणावर बहुत बाणांची वृष्टी करून त्याचा रथ अदृश्य केला, कृ
पाचार्य, शिखंडीशीं युद्ध करूं लागला असतां शिखंडीनें पलायन केलें.
सुकेतूनें नऊ बाणांनीं गौतमास ताडित करून पुन्हा सत्तर बाण मारिले. पु
न्हा तीन बाणांनीं शरासह वर्तमान धनुष्य छिन्न केलें व एक बाणें करून सा
रथी ताडित केला तेणें करून गौतमानें दुसरें धनुष्य घेऊन सुकेतूस तीस
बाणांनीं समग्र मर्म संधीच्या ठाईं ताडित केलें तेणें करून सुकेतु बहुत -
व्याकुल झाला आणि रथांत निश्चेष्ट पडला असतां गौतमानें त्याचें शीर क्षु
रप्र बाणांनीं तोडून पृथ्वीवर पाडलें. आपला स्वामी मरण पावलेला पाहून
राजाचे सैनिक त्रस्त होऊन दाही दिशेस पळाले. धृष्टद्युम्न व कृपाचार्य या
उभयतांचें युद्ध मोठें तुमुल होत असतां कृतवर्मा धृष्टद्युम्नास असें बोलला कीं
हे राजा उभा रहा उभा रहा. नंतर एक आमिषा करितां श्येनपक्षी क्रुद्ध होऊन प
रस्पर जसें युद्ध करतात तसें या उभतांचें युद्ध बहुत निकर होऊं लागलें, धृ-
ष्टद्युम्नानें नऊ बाणांनीं हार्दिक्याचें ऊरस्थल ताडित करून त्यास बहुत पीडि
त केला. कृतवर्म्यानें बाणजालें करून रथासह वर्तमान धृष्टद्युम्नास आच्छा
दित केला, पुन्हा धृष्टद्युम्नानें क्रोधित होऊन कृतवर्म्यावर दारुण बाणांची
वृष्टी केली ती कृतवर्म्यानें अनेक सहस्र बाणांनीं नाशित केली. हें पाहून धृ
ष्टद्युम्नानें शीतधार भल्ल बाणानें त्याच्या सारथ्यास यमलोकीं पाठविलें. त्या
कालीं कृतवर्म्याचा सारथी रथाखालीं पडला असतां धृष्टद्युम्नानें शीघ्र बा-
णांनीं महारथी शत्रूस जिंकून रणामध्यें कौरवांचें निवारण केलें. त्याकालीं
तुझाकडील योद्धे सिंहासारखे नाद करीत धृष्टद्युम्नावर धांवले असतां -
तुझा योध्यांचें व धृष्टद्युम्नाचें युद्ध प्रवृत्त झालें. असा विषय या अध्यायांत
आहे.

५५ अध्याय पंचावन्न:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा,
सात्यकी व द्रौपदेय यांणीं युद्धामध्यें युधिष्ठिराचें रक्षण केलें हें अश्व-

श्याम्यास समजतांच त्याणें धर्मराजावर स्वर्णपुंख शिलाशीत बाणांची वृष्टी करून आकाश व पृथ्वी दिव्यास्त्र मंत्रित बाणांनीं व्याप्त केली. नंतर त्या कालीं अश्वत्थाम्याच्या बाणांनीं युद्धभूमी पूरित झाली असतां योध्यांस कांहीं सुचेना, द्रोणपुत्रानें पांडवांचें सैन्य फार नष्ट केलें असतां द्रौपदेय, सात्यकी, धर्मराज व पांचाल याणीं मनाचा दृढनिश्चय करून ते द्रोणपुत्राशीं युद्ध करूं लागले. त्या कालीं सात्यकीनें सत्तावीस शीलिमुख बाणांनीं द्रोणपुत्रास ताडित करून पुन्हा स्वर्णभूषित सात बाण मारिले, युधिष्ठिरानें ऱ्याहत्तर, प्रतिविंध्यानें सात, श्रुतकर्म्यानें तीन, श्रुतकीर्तीनें सात, सुतसोमानें नऊं, शतानिकानें सात बाणें करून द्रोणपुत्रास ताडित केला. दुसऱ्याही योध्यानीं अश्वत्थाम्यावर बहुत बाण टाकिले तेणें करून अश्वत्थाम्यानें सात्यकीस पंचवीस, श्रुतकीर्तीस नऊं, श्रुतसोमास पांच, श्रुतकर्म्यास आठ, प्रतिविंध्यास तीन, शतानिकास नऊं, धर्मराजास पांच, इतर योध्यांस दोन दोन बाणांनीं ताडीत करून निशित बाणांनीं श्रुतकीर्तीचें धनुष्य तोडलें. त्या कालीं श्रुतकीर्तीनें दुसरें धनुष्य घेऊन प्रथम तीन बाणांनीं द्रोणपुत्रास वेध करून नंतर इतर बहुत तीक्ष्ण पाजिवलेल्या शरांनीं ताडित केला असतां द्रोणपुत्रानें शरजालें करून पांडवांचें सैन्य आच्छादित करून तीन बाणांनीं धर्मराजाचें धनुष्य तोडतांच धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन सत्तर बाणांनीं द्रोणीचे बाहु व ऊरस्थल ताडित केलें. सात्यकीनें अर्धचंद्राकार तीक्ष्ण बाणानें द्रोणपुत्राचें धनुष्य तोडून मोठ्यानें गर्जना केली. नंतर द्रोणपुत्रानें शक्तीनें सात्यकीचा सारथी मारून पृथ्वीवर पाडला आणि दुसरें धनुष्य घेऊन त्यास बाण समुदायानीं आच्छादित करून रथाचें चूर्ण केलें. तेव्हां सात्यकीचे अश्व रणामध्यें चोंहीं कडे पळून गेले. हें पाहतांच युधिष्ठिरादि योद्धे द्रोणीवर बाण वर्षाव करूं लागले. त्या कालीं द्रोणपुत्रानें पांडवांचा नाश केला त्या समयीं युधिष्ठीर व सात्यकी हे उभयतां द्रोणपुत्रास भाषण करूं लागले कीं, हे ब्राम्हणपुत्रा, तुला कांहीं प्रीती व कृतज्ञता ही नाहीं, तूं आज आमच्या घाताची इच्छा करितोस कीं काय? ब्राम्हणानीं तप, दान, अध्ययन करावें, धनुष्य धरणें हें क्षत्रियाचें धर्म होय. तूं ब्राम्हण असून क्षत्रिय कर्म करतोस तर तूं

ब्राम्हणाधम आहेस; बरें काय चिंता आहे, तूं पहात असतां आज आम्ही कौरवां स जिंकिनो. असें उभयतांचें भाषण ऐकून द्रोणपुत्रानें कांहीं उत्तर न देतां शर-वर्षावानें पांडवांस आच्छादित केलें तेव्हां धर्मराज बहुत पीडित होऊन पळतां च अश्वत्थामा पुन्हा जवळ आला. त्याकाळीं धर्मराज अश्वत्थाम्यास सोडून दुसरे स्थलीं गेला नंतर तुझें सैन्य क्रूर कर्म करण्या विषयीं प्रवृत्त झालें. असा वि षय या अध्यायांत आहे.

५६ अध्याय छप्पन्नः– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, भीम-सेन व धृष्टद्युम्न हे उभयतां चेदी व कैकयां सहवर्तमान कर्णाशीं युद्ध करीत-असतां कर्णानें त्यांस बाणांनीं रुद्ध करून चेदी, कारुष व सृंजय प्रभृती यो ध्यांचें कदन केलें तेव्हां भीमसेन कर्णाचा युद्धामध्यें त्याग करून कौरव सैन्यां त गेला आणि त्यानें कौरवांचें सैन्य दग्ध केलें, इकडे सूतपुत्रानेंही पांचाल, के-केय व सृंजयांच्या सैन्यांचें कदन केलें. अर्जुनानें संशप्तकगणांचा बहुत घात केला. अशा त्या तीन वीरांनीं सैन्यांत प्रवेश केला असतां राजा तुझ्या दुष्टमसलती मुळें बहुत क्षत्रिय नाश पावले; दुर्योधनानें नकुलास नऊ बाणांनीं ताडित क रून रथाचे चारी अश्वांस वध केला. नंतर क्षुरप्र बाणांनीं सहदेवाचा कां-चन ध्वज तोडला, नकुलानें क्रुद्ध होऊन तुझ्या पुत्रास सात व सहदेवानें पांच बाण मारले असतां तुझ्या पुत्रानें उभयतांच्या उरस्थलांस पांच पांच बाणें क रून प्रहार केला. नंतर दोन भल्ल बाणें करून दोघांचीं धनुष्यें तोडून पुन्हा उभयतांस तीन तीन बाण मारले. नंतर दोघांनीं इंद्रधनुष्यासारखीं दुसरीं ध नुष्यें घेऊन तुझ्या पुत्रावर बाण वर्षाव केला, तेणें करून तुझा पुत्र उभयतांचें नि-वारण करण्यास सिद्ध होऊन युद्ध करूं लागला. त्याकाळीं धृष्टद्युम्न जेथें दुर्योध न युद्ध करीत होता तेथें येऊन त्याचें निवारण करूं लागला. त्यासंधीस माद्रीपु त्र दुर्योधनास सोडून अन्यत्र स्थलीं गेला. त्याकाळीं तुझ्या पुत्रानें पंचवीस बाण धृष्टद्युम्नास मारून पांसष्ट बाणांनीं त्याचें धनुष्य तोडलें असतां धृष्टद्युम्न दु सरें धनुष्य घेऊन तुझ्या पुत्राच्या अग्रभागीं उभा राहिला नंतर त्याणें सर्पासारखे क्रूर पंधरा बाण घेऊन तुझ्या पुत्रावर टाकितांच दुर्योधनाचें सुवर्ण विकृत कवच छिन्न झालें. त्याकाळीं तुझ्या पुत्रानें भल्ल बाणानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य तोडून-

भृकुटीमध्यावर दहासायकांचा प्रहार केला तेव्हां धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन सोळा भल्ल बाणांनीं दुर्योधनाच्या रथाचे अश्व मारून पांच बाणांनीं सारथी मारला, दहा भल्ल बाणांनीं सर्वसामुग्री सहित छत्र, शक्ती, खड्ग, गदा व ध्वज यांचा नाश केला. हें पहातांच सर्व राजे व दुर्योधनाचे भाते त्याच्या रक्षणा करितां जवळ आले. त्याकालीं धृष्टद्युम्न पहात असतां दंडधार राजानें दुर्योधनास आपले रथामध्यें बसऊन निरभयपणें दूर नेला. इतक्यांत कर्ण सात्यकीस युद्धांत पराजित करून धृष्टद्युम्नाकडे आला हें पाहून सात्यकीनें कर्णावर बाण प्रहार केला. त्याकालीं कर्ण आणि धृष्टद्युम्न यांचें युद्ध होत असतां तुम्हांकडील व पांडवांकडील कोणीही योध्दा युद्धपराङ्मुख झाला नाहीं. उभयतांचे सैन्यांत गजाश्व पदात्यांचा बहुत नाश झाला. तसेच व्याघ्रकेतु, सुशर्मा, चित्र, उग्रायुध, जय, शुक्ल, रोचमान, सिंहसेन व दुर्जय ह्या योध्यांवर बाण वर्षाव केला. पुन्हा या योध्यानीं रथमार्गानें कर्णास वेष्टून त्याजवर बाणांची वृष्टी केली. तेव्हां कर्णानें तीक्ष्ण आठ बाणांनें आठयोध्यांचा प्राण घेतला आणि सहस्त्रावधि योद्धे आले होते त्यांचाही प्राण घेतला. नंतर युद्धविशारद जिष्णु, देवापि, भद्र, दंड, चित्र, चित्रायुध, हरी, सिंहकेतु, रोचमान, शलभ व महारथ इत्यादि चेदि देशांतील योध्यांचा प्राण घेतला. नंतर गजसमुदायांत जाऊन असंख्यात गजांस मारीत असतां कांहीं गज कर्णास भीऊनच पळाले, कांहीं गज ताडित केलेले पृथ्वीवर पडले. कर्णानें रणामध्यें गजाश्व रथाचे ठाईं जसें घोर कर्म केलें तसें भीष्म, द्रोण व तुझाकडील इतर वीरानीं केलें नाहीं. नंतर चेदी, कैकय, पांचाल प्रभृती योध्यास कर्णानें आपलें नाव सांगून त्यांचा प्राण घेतला. हें पाहून माझी मती अशी झाली कीं पांचालांतील कोणी योद्धा कर्णापुढें जिवंत रहात नाहीं, असा परकाष्ठेचा कर्णानें अनर्थ केला, हें पाहून धर्मराज व धृष्टद्युम्न याणीं बरोबर कांहीं सैन्य घेऊन कर्णास वेष्टिलें. धृष्टद्युम्न, द्रौपदेय, शिखंडी, सहदेव, नकुल, नकुलाचा पुत्र जनमेजय, शिनीचा नातु सात्यकी व बहुत प्रभद्रकांचे वीर कर्णावर आले असतां उभयतांचें घोर युद्ध झालें. वाल्हिक, कैकय, मत्स्य, मद्रक व सैंधव इत्यादि बहुत योध्यांचा एकटा कर्ण पराभव करीत असतां भीमसे

नानें कौरवसैन्यांत शिरून गजाश्व पदात्यांचा संहार केला. भीमसेनाच्या भयानें कौरवांचें सैन्य स्तंभित झालें. तुझासैन्याचीप्रभानष्ट झाली. कृतपुत्रानें पांडवांचें व भीमसेनानें कौरवांचें सैन्य मारिलें. इकडे अर्जुन संशप्तकगणाचें मर्दन करून श्रीकृष्णास बोलतो हे कृष्णा, संशप्तकांचे गण माझ्या बाणानीं भग्न होऊन पळायन करतात, महारणामध्यें सृंजयाचें महत् सैन्य भग्न होत आहे. राजसैन्यामध्यें संचार करणारा जो कर्ण तो जिकडे असेल तिकडे माझा रथ ने, माझाशिवाय कर्णाचा पराभव करण्यास इतर योद्धा कोणीही समर्थ नाहीं. असें अर्जुनाचें भाषण ऐकून वासुदेव बोलतो हे अर्जुना, पूर्वी कौरवांचा पराभव करून नंतर कर्णाशीं युद्ध कर. असें म्हणून कृष्णानीं अर्जुनाचा रथ सैन्यांत नेला. त्याकाळीं उभयतां कृष्णार्जुन रथसैन्यांत जाऊन अर्जुनानें रथसैन्याचें व अश्वसैन्याचें मर्दन केलें. नंतर तुझा पुत्र दुर्योधन यानें पुन्हा संशप्तकगणांस अर्जुनाशीं युद्ध करण्यास प्रेरणा केली. त्याकाळीं सहस्र रथ, तीनशें गज, चौदासहस्र अश्व आणि दोन लक्ष पदाती व धनुर्धारी यां सह वर्तमान संशप्तक अर्जुनाशीं युद्ध करण्यास येऊन त्यानीं शरवर्षावानीं त्यास आच्छादित केलें. त्याकाळीं अर्जुन बाणांनीं जरी व्याप्त झाला होता तथापि त्याणें बाणांचा नाश करून विद्युल्लते साररव्या तेजस्वी सुवर्णभूषित बाणांनीं संशप्तकांस आच्छादित करीत आकाशही आच्छादित केलें. त्याकाळीं पांडवांच्या बाणांनीं पृथ्वी व पर्वत विदीर्ण होतात काय अथवा समुद्र शुष्क होतात काय अशी समग्र संशप्तक चिंता करूं लागले, संशप्तकांचे दहा हजार रथी अर्जुनानें मारून त्यांचा बहुत विध्वंस केला. नंतर अर्जुनानें कांबोजाचे सैन्यांत जाऊन त्याच्या सैन्याचें बहुत कदन केलें, गजाश्व रथ समुदायांस अर्जुन मारतो हें पाहून सुदक्षणाचा कनिष्ठभ्राता अर्जुनावर बाणवृष्टी करीत असतां अर्जुनानें सुदक्षणाच्या कनिष्ठभ्रात्याचे अर्धचंद्राकार दोन बाणांनीं दोन बाहू तोडून पृथ्वीवर पाडले. त्याकाळीं त्याचे अंगांतून रक्ताचे स्राव चालले होते. हें पार्थाचें अद्भुत कर्म पाहून संशप्तकाचे सैनिक पुन्हा अर्जुनाशीं निकट युद्ध करूं लागले, त्यांत एक बाणानें मारलेले कितीएक अश्व, कांबोज, यवन व शक हे रक्तानीं व्याप्त झाले. सव्यसाची, सं

शसक गणांचा व त्यांच्या पक्षपात्यांचा नाश करीत असतां द्रोणपुत्र आपल्याचा पास कंपित करीत अर्जुनावर बाण वर्षाव करूं लागला. त्या बाणवृष्टीनें पांडवां-ची सेना पळाली, रथस्थ कृष्णास अश्वत्थाम्यानें पाहून पुन्हा उग्र बाणवृष्टी केली. त्या वृष्टीनें कृष्ण व धनंजय आच्छादित झाले. नंतर अश्वत्थाम्यानें ती-क्ष्ण शतशः बाणांनीं माधवास व पांडवांस निश्चेष्ट केलें, त्याकाळीं सर्व स्थावर जंगमामध्यें हाहाःकार शब्द झाला. हे धृतराष्ट्रराजा, कृष्णार्जुनास आच्छादित करणाऱ्या अश्वत्थाम्याचा पराक्रम जसा पाहिला तसा पूर्वीं कधीं पाहिला नाहीं. त्याकाळीं अर्जुन द्रोणपुत्राचें कर्म पाहून त्यानें असें मानिलें कीं, आपला पराक्रम आज नष्ट झाला. त्याकाळीं अर्जुनाचें शरीर पाहण्यास अयोग्य झालें, याप्रमाणें द्रौणी आणि अर्जुनाचें युद्ध होत असतां त्या युद्धांत अश्वत्थाम्याची दृष्टी व अर्जुनाची हीनता पाहून श्रीकृष्ण अर्जुनाकडे पाहून त्यास बोलतो हे अर्जुना, द्रोणपुत्र तुझ्यापेक्षां रणामध्यें पराक्रमें करून अधीक झाला, हें मोठें आश्चर्य आज मी पाहिलें. पूर्वीसारखें तुझ्या बाहूंस बल आहेना? तुझें गांडीव धनुष्य हातांतच आहेना, तूं रथावर तरी बसला आहेसना, हा गुरुपुत्र असें जाणून याची क्षमा करतोस काय, हा क्षमेचा काल नव्हे. असें कृष्णाचें भाषण ऐकतांच अर्जुनानें चौदा भल्लबाणांनीं अश्वत्थाम्याचें धनुष्य तोडून ध्वज, छत्र, पताका, रथ, शक्ती व गदा यांचें छेदन केलें. नंतर वत्सदंत बाणांनीं ताडण केलें असतां अश्वत्थाम्यास मूर्च्छा येऊन ध्वजयष्टीवर पडतांच त्याचे सारथ्यानें त्यास एकीकडे नेला, त्यासंधीस अर्जुनानें तुझ्याकडील हजारों योध्यांचा नाश केला. हे-धृतराष्ट्रराजा, हा तुझ्या वीरांचा घोर क्षय तुझ्या दुष्टविचारामुळें झाला. संशसकाचे सैन्यास अर्जुन, कौरवांचे सैन्यास भीमसेन व पांचाल सैन्यास कर्ण मारीत असतां असमंतात्भागीं हजारों धडें उठलीं. युधिष्ठिर महाराजें अतिशय पीडित झाला असतां संग्रामाचा त्याग करून एक कोश दूर-जाऊन उभा राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

. ५७ अध्याय सत्तावन्न:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, नंतर दुर्योधन कर्णाच्या अग्रभागीं येऊन शल्य व इतर राजांस असें बोल

लाकीं अहो, आजहें स्वइच्छेनें स्वर्गदार उघडलें आहे. क्षत्रियांस असें युद्ध प्राप्त झालें असतां ते सुखी होतात, तुम्हीं युद्धामध्यें पांडवांस मारून ह्या संमृद्ध पृथ्वीचा उपभोग करा अथवा पांडवांनीं तुम्हांस मारलें असतां वीरलोकीं जा. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून संपूर्ण क्षत्रिय नानाप्रकारचे शब्द करीत वाद्यांचा गजर करूं लागले, तेव्हां द्रोणपुत्र योध्यांस असें बोलला कीं, अहो, तुम्हीं सर्व योद्धे पहात असतां माझा पिता द्रोणाचार्य यास धृष्टद्युम्नानें मारला तेणें करून मला ही बहुत क्रोध आला आहे, यास्तव तुमच्या समक्ष मी जी प्रतिज्ञा करतों ती ऐका. आजया युद्धामध्यें धृष्टद्युम्नास मारल्या वांचून मी कवच काढणार नाहीं हो माझी प्रतिज्ञा अनृत झाली असतां मी स्वर्गलोकीं जाणार नाहीं. भीमसेन व अन्य कोणी योद्धा धृष्टद्युम्नाचें रक्षण करण्यास आला असतां बाणानें त्याचा नाश करीन. असें अश्वत्थाम्यानें भाषण ऐकतांच संपूर्ण भारती सेना हर्षित होऊन एकाएकीं पांडवांवर धांवली. पांडवही कौरवांवर धांवले असतां मोठा भयंकर संग्राम एकाएकीं होऊं लागला. हा संग्राम पाहण्या करितां आकाशांतील देवता व अप्सरा आल्या, आकाशांतून रणभूमीवर पुष्पें व सुवर्ण पुंख बाणांची शकलें पडलीं. योध्यांच्या धनुष्यांचे व रथनेमीचे शब्द व वाद्यांचे गजर एकत्र होऊन संपूर्ण रणभूमी व्याप्त झाली. असा विषय या अध्यायांत आ.

५८ अध्याय अनुवाद :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, असा परस्पर संग्राम होत असतां अर्जुन, कर्ण व भीमसेन हे परस्पर महान् संग्राम करूं लागले. इतक्यांत अर्जुन द्रोणपुत्राचा पराजय करून व इतर मोठमोठ्या महारथ्यांस जिंकून वासुदेवास बोलला हे वासुदेवा, ही पांडवी सेना भयाभीत होऊन पलायन करते हीं पहा. हा कर्ण तर कालांतका सारखा क्रुद्ध होऊन संग्रामामध्यें आपल्या योध्यांस त्रास देत आहे. इकडे धर्मराज कोठें दिसत नाहीं यास्तव जिकडे धर्मराज असेल तिकडे माझा रथ नें, युद्धामध्यें मी कनिष्ठ बंधु सहवर्तमान् धर्मराजास कुशल पाहून पुन्हा शत्रूशीं युद्ध करण्यास माघारा येईन. असें अर्जुनाचें भाषण ऐकतांच युधिष्ठीर व संजयाचे महारथी हे जिकडे तुझा वीरांशीं युद्ध करीत होते तिकडे श्री. कृष्णानें अर्जुनाचा रथ फिरविला. याप्रकारें संग्रामामध्यें जनक्षय होत असतां

श्रीकृष्ण सव्यसाचीस बोलतो हे पार्था, हा पहा भोग संग्राम चालला आहे, या संग्रामांत भारताचा फार क्षय झाला. दुर्योधनाकरितां असंख्यात राजे मरण पावले. हस्तिदंताच्या मुष्टीनीं सुशोभित हजारों खड्गें, कनकाच्या चित्रविचित्र दंडानीं युक्त असे छिन्न झालेले परशु, अश्व व गजांचीं शरीरें छिन्न होऊन तीं रुधिरानें भरलेलीं पृथ्वीवर पडलीं असतां ह्या मृत झालेल्या मनुष्य गजांच्या शरिरानीं रणभूमी वेष्टित झालेली पहा. सुवर्णाच्या किंकिणी युक्त व परम सुशोभित असे बहुत प्रकारचे भग्न झालेले रथ व नाना प्रकारच्या बाणांनीं ताडित झाल्यामुळें अस्ताव्यस्त होऊन मरण पावलेले अश्व, पर्वत प्राय पडलेले गज, गजांच्या झुला, अंकुश, मृगाच्या चर्मांचीं खोगरें हीं पहा. राजांचे चूडामणी, चित्रविचित्र सुवर्ण माला, सुंदर कुंडलें धारण केलेल्या वीरांच्या अलंकृत मुखानीं आच्छादित झालेली रणभूमी पहा. याप्रकारें श्रीकृष्ण अर्जुनाशीं बोलत जेथें धर्मराज होता तेथें गेला. त्याकालीं श्रीकृष्ण अर्जुनास युद्धभूमी दाखवून त्यास असें बोलला कीं, हे पांडवा, धर्मराजास व अन्य वीरांस पहा. तसाच हा कर्ण, मी मरेन, द्रोणपुत्र अश्वत्थामा यांस पहा. असें वासुदेवानें मार्गांत किरीटीस सांगितलें त्याकालीं पुन्हा उभय सैन्याचा महाघोर संग्राम होऊं लागला. हे राजा, तुझा दुष्ट विचारानें हा कौरव पांडवांच्या वीरांचा क्षय झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

५९ अध्याय एकूणसाठ:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कुरु, सृंजय, युधिष्ठिर प्रमुख पांडव व सूतपुत्र प्रमुख आम्ही, निर्भय पणें युद्धास आलों; त्याकालीं कर्णाचा व पांडवांचा यमराष्ट्राची वृद्धि करणारा असा लोमहर्षण संग्राम होऊं लागला. कांहीं अवशिष्ट राहिलेले संशप्तक युद्धास आले असतां समग्र राजांसह वर्तमान् धृष्टद्युम्न व हे पांडव कर्णावर धांवले, तेव्हां कर्णानें त्या वीरांस रणामध्यें रोधिलें. ते वीर कर्णापुढें येऊन आपल्या शक्त्यनुसार युद्ध करीत असतां भग्न होऊन गेले. हे राजा, कर्ण आणि धृष्टद्युम्न यांचा संग्राम प्रवृत्त झाला असतां धृष्टद्युम्नानें राधेयास नतपर्व बाणानें ताडन करून अरे उभा रहा, उभा रहा, अ

सें भाषण केलें. कर्णानें आपलें विजय धनुष्य कंपित करून धृष्टद्युम्ना-चें धनुष्य छेदून आशीविषोपम नऊ बाणांनीं त्यास ताडण केलें असतां-त्या बाणानें धृष्टद्युम्नाचें कवच भिन्न झालें. धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन सत्तर बाणांनीं कर्णास ताडित केला, पुनः कर्णानें भूषित शर घेऊन धृष्ट-द्युम्नावर टाकिला असतां सात्यकीनें हस्तलाघवें करून तो तत्काळ छिन्न केला. हें कर्णानें पाहतांच सात्यकीवर बाण वर्षाव करून सात नाराच बाणानें त्यास ताडित केला, सात्यकीनें बाणें करून कर्णास ताडित केला इतक्यांत द्रोणपुत्र तेथें येऊन धृष्टद्युम्नास क्रोधानें असें बोलला कीं, हे ब्रम्हघ्ना, उभारहा उभाराहा? आज तूं मजपासून जिवंत राहणार नाहींस; असें म्हणून त्याजवर तीक्ष्ण बाणांची वृष्टी करून त्यानें त्यास आच्छादित केलें.त्या काळीं धृष्टद्युम्न द्रोणाचार्यासारखा पराक्रम करतो असें पाहून अश्वत्थामा धृष्टद्युम्नावर धांवला असतां धृष्टद्युम्न ही त्याजवर धांवला. त्याकाळीं धृष्टद्युम्नास अश्वत्थामा असें बोलला कीं, हे पांचालाधमा, आज तुलामी यमलोकीं पाठवितों, अर्जुनानें जर तुझें नरक्षण केलें व तूं रणांतून पलायन करून न गेलास तर तुझें कुशल होणार नाहीं. असें द्रोणपुत्राचें भाषण ऐकून धृष्टद्युम्न बोलतो हे द्रोणपुत्रा, रणामध्यें तुझा पिता युद्ध करीत असतां ज्या खड्गानें मी त्याचा वध केला तोच माझा खड्ग आज तुझा वाक्याचें उत्तर देईल. मी ब्राम्हण असून तुला मारणार नाहीं कीं काय? असें धृष्टद्युम्नानें भाषण करून निशित बाणांनीं द्रोणपुत्रास वेध केला, तेणें करून अश्वत्थाम्यानें धृष्टद्युम्नाच्या आसमंतात् भागीं बाणांनीं दिशा आच्छादित करून आकाश व पृथ्वी ही बाणांनीं आच्छादित केली, धृष्टद्युम्नानें कर्ण पाहत असतां द्रोणपुत्रास बाणांनीं आच्छादित केला. त्याकाळीं कर्णानें इतर पांचाल, पांडव, द्रौपदेय, युधामन्यु व सात्यकी इत्यादिकांचें युद्धांत निवारण केलें. असें युद्ध होत असतां द्रोणपुत्र, गरुड जसा सर्पावर धांव घालतो तसा धृष्टद्युम्नावर त्वरेनें धांवला हें कृष्णानें पाहून तो अर्जुनास बोलला कीं, हे पार्था, हा अश्वत्थामा धृष्टद्युम्नास मारण्याविषयीं यत्न करतो; यास्तव धृष्टद्युम्नास तूं मुक्त कर. असें कृष्णानें अर्जुनास-

भाषण करून त्याचा रथ द्रौणीच्या सन्निध नेला. धनंजय व कृष्ण आपलेस न्निध आले हें पाहून अश्वत्थामा धृष्टद्युम्नाचा वध करण्या विषयीं फारच यत्न करूं लागला, तेव्हां पार्थानें द्रौणीच्या शरांचा नाश करून आशीविष बाणां नीं द्रोणपुत्रास व्याकुल केला. तेव्हां तो धृष्टद्युम्नास सोडून आपले रथांत जा ऊन बसला आणि त्यानें बाणांनीं पार्थास वेध केला. इतक्यांत सहदेवानें धृ ष्टद्युम्नास आपले रथांत बसवून रणभूमीपासून दूर नेला. अर्जुनानें क्रोधि त होऊन कालदंड व मृत्यु सारखा बाण घेऊन द्रोणपुत्राच्या स्कंधप्रदेशीं — त्याचा प्रहार केला असतां द्रोणपुत्र विव्हल होऊन रथोपस्थांत निश्चेष्ट प डला. हें पाहून कर्ण धनुष्याचा टणत्कार करीत अर्जुनाशीं युद्ध करण्याच्या इ च्छेनें आला. अश्वत्थाम्याच्या सारथ्यानें आपला स्वामी रथोपस्थांत नि- श्चेष्ट पडला असें जाणून परम त्वरेनें त्याचा रथ रणभूमी पासून दूर नेला. हे राजा, हें मोठें अद्भुत युद्ध झालें. नंतर पार्थ श्रीकृष्णास बोलतो हे देवा, आ तां आपला रथ लवकर संशप्तकां कडे फिरीव. असें पार्थाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण रथासहित संशप्तकां कडे गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

६० अध्याय साठ:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, पुन्हा श्रीकृष्ण पार्थास भाषण करतो हे पार्था, हा तुझा भ्राता युधिष्ठिर पहा. धृ तराष्ट्र पुत्रानीं त्यास मारण्याच्या इच्छेनें वेष्टित केला आहे, त्याचें निवारण क रण्याकरितां पांचाल पाठीमागून जातात. भीमसेन व सात्यकी या उभतां यो ध्यानीं धर्मराज जरी संरक्षित आहे तथापि कौरवां कडील योद्धे बहुत यास्तव त्याच्यानें सैन्याचें निवारण करवत नाहीं. दुर्योधन क्रुद्ध होऊन अंतकासारखा- बाण वर्षाव करून आपल्या सन्निध कोणींही शत्रूस येऊं देत नाहीं. धर्मराज युद्धाविषयीं निपुण व बलवान् असतां कर्णानें त्यास युद्ध विमुख केला असें वा टतें. कर्णानें नंतर फारच त्याजवर बाणवर्षाव आरंभिला त्याजवरून आज धर्म राज जिवंत राहात नाहीं असें मला खचित दिसतें. युधिष्ठिराच्या रथाचा केतुही कोठें दिसत नाहीं याजवरून असें वाटतें कीं, कर्णानें बाणें करून तो छिन्न के- ला. कर्णबाणांनीं पीडित झालेले तुझ्या सैन्यांतील गज व रथी विदीर्ण होऊन- नानाप्रकारचे शब्द करीत पळतात, तसेच रथाचे वृंद आसमंतात् भागीं क

र्णानें ताडित केलेअसतां पळतात, राधेय भीमसेनावर जाऊन शरांचा वर्षाव करतो हें पहा. हे महाबाहो, कर्ण महत् धनुष्यास कंपित करून आसीविषा- साररवे बाण सोडीत चालला आहे. हे अर्जुना, हा राधेय तुझ्या वानर ध्वजास पाहू न रणामध्यें तुझाशीं युद्ध करण्या करितां माघारा फिरला. दुर्योधन रथसैन्या सहवर्तमान कर्णाचे रक्षणार्थ जों पर्यंत आला नाहीं तों पर्यंत या दुष्टाच्या व- धाचा लवकर प्रयत्न कर. यश, राज्य व सुरव यांची इच्छा करणारे जे तुम्हीं या उभयतांतून एकाचा पराभव होईलच. तूं आपल्यास कृतात्मा व धर्मराजावि षयीं कर्णास अपराधी जाणून काय कर्तव्य तें कर. हे मुरव्य पांचशें रथी, पांच सहस्र गज, दहासहस्र अश्व व दहासहस्र पदाती बराबर घेऊन परस्परांचें- रक्षण करीत तुझाकडे सच येत आहेत, आतां तूं कर्णापुरें होऊन आत्मरूप प्रगट कर, धर्मराज कुशल आहे त्याविषयीं चिंता करूं नको, हें तझें प्रिय तुला सां गीतलें. सात्यकी व पांचालां सहवर्तमान भीमसेनानें धृतराष्ट्र सैन्यास फार दुःरव दिलें. कोणाचे अंगास व्रण केले, कोणास युद्धविमुरव केलें असतां ते वि पत्तिग्रस्त होत्साते रुधिर वमन करीत पळतात. गज व अश्व ईहीं करून रणभू मी संकीर्ण होऊन गेली आहे, भीमाच्या बलाश्रयानें हे वेगवान पांचाल ह र्षित होऊन नाद करीत शत्रूंस भय उत्पन्न करतात हें पहा. पांचाल व मागध याणीं कौरवांचें बहुत सैन्य क्षयास नेलें असतां कृपाचार्य व कर्ण यानीं पांचा लांचें निवारण करण्याविषयीं बहुत यत्न केले. भीमसेनाच्या नाराच बाणांनीं- धृतराष्ट्रा कडील योद्धे भिन्न झाल्यामुळें रवालीं पडतात हें पहा. तुझा श्रेष्ठ भ्रा त्यानें एकुण पन्नास गज मारून त्यांच्या वैजयंती माला व ध्वज तीक्ष्ण बाणां नीं छिन्न करून टाकिले. इतर बहुत गज दहा दहा बाणांनीं मारिले, भीमसेना नें क्रुद्ध होऊन कौरवांच्या तीन अक्षौहिणी सैन्याचें निवारण केलें. संजय भा षण करतो हे धृतराष्ट्र राजा, अशीं अनेक प्रकारचीं भीमसेनाचीं दुष्कर कर्में कृ ष्णाच्या मुरवापासून ऐकून अर्जुनानें अवशिष्ट राहिलेल्या संशप्तक गणां- चा वध करण्यास आरंभ केला. त्याकाळीं संशप्तकगण अर्जुन बाणांनीं ता डित होऊन कांहीं मरण पावले, कांहीं भयाभीत होऊन दाही दिशांस पळाले. हे राजा, असें पार्थ व भीमसेन या उभयतांनीं मोठें भयंकर कर्म करून धृतरा

ष्टांच्या चतुर्विध सैन्याचा नाश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

६१ अध्याय एकसष्ट :— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, भीमसेन व युधिष्ठीर माघारे फिरले तेव्हां पांडव सृंजयानीं व माझ्या वीरांनीं वध्यमान केलेलें सैन्य धांवत असतां माझ्याकडील योध्यानीं काय केलें? असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, भीमसेनानें आपल्या सैन्याचें मर्दन केलें हें कर्णानें पाहून तो भीमसेनावर धांवला. हें पाहून पांडवांकडील योध्यानीं आपले धनुष्याचे टणत्कार केले आणि बाणांचा प्रक्षेप करण्यास आरंभ केला. भीमसेन, शिनीचा नातु, शिखंडी, जनमेजय, धृष्टद्युम्न व प्रभद्रक हे सिद्ध होऊन कर्णाचे अग्रभागीं आले, तसेच तुझाकडील योद्धे पांडवां सन्मुख आले, त्या उभयतांचा समागम होऊन तें सैन्य एकत्र झाल्यामुळें मोठा चमत्कार झाला. योद्धे एकमेकांस पाहून युद्धाची इच्छा करूं लागले, शिखंडी व कर्ण, धृष्टद्युम्न व दुःशासन, नकुल व वृषसेन, चित्रसेन व युधिष्ठीर, सहदेव व उलूक, सात्यकी व शकुनी, द्रौपदीचे पुत्र व इतर कौरव यांचें परस्पर युद्ध झालें. अर्जुन व अश्वत्थामा, युधामन्यु व गौतम, कृतवर्मा व उत्तमौजा यांचें परस्पर युद्ध होऊं लागलें. एकट्या भीमसेनानें सर्व कौरवांचें व तुझ्या पुत्रांचें निवारण केलें. शिखंडी कर्णाचें पत्री बाणांनें निवारण करीत असतां कर्णानें तीन बाणें करून शिखंडीचा भ्रूमध्य ताडित केला असतां शिखंडीनें नवद बाणें करून कर्णास ताडित केला. कर्णानें तीन बाणांनीं शिखंडीचा सारथी व कांहीं बाणांनीं रथाचे अश्व मारून ध्वजही तोडला, तेव्हां शिखंडीनें रथाखालीं उतरून कर्णावर शक्ति टाकिली, ती कर्णानें तीन बाणांनीं तोडून पुन्हा शिखंडीस नऊ बाणांनीं ताडित केला. त्याकाळीं कर्णाचा बाणवेग शिखंडीस सहन होईना म्हणून तो युद्धपराङ्मुख झाला, तेव्हां कर्णानें पांडवांचें सैन्य बहुत नष्ट केलें. हे महाराज, धृष्टद्युम्न व दुःशासन यांचें युद्ध होत असतां धृष्टद्युम्नानें एक क्षुरप्र तीक्ष्ण बाणानें तुझ्या पुत्राचें धनुष्य तोडलें, इतक्यांत दुःशासनानें दुसरें धनुष्य घेऊन धृष्टद्युम्नास बाणवर्षावानें वेष्टिला. हा तुझ्या पुत्राचा पराक्रम पाहून रणांतील योद्धे, सिद्ध व अप्सरा, यांस आश्चर्य वाटलें. त्याकाळीं तुझ्या व पांडव सैन्याचा मोठा भयंकर संग्राम झाला.

नकुल व वृषसेन यांचें युद्ध होत असतां एकमेकांनीं सहस्रावधि बाण टाकून एकमेकांस आच्छादित केलें. पुन्हा नकुल कौरवांच्या सन्मुख येऊन युद्ध करूं-लागला असतां कर्णपुत्र वृषसेन नकुलास सोडून कर्णाच्या चक्रांचें रक्षण क-रूं लागला. उलुक सहदेवा सहवर्तमान रणामध्यें युद्ध करीत असतां सह-देवानें उलुकाच्या रथाचे चारी अश्व मारून सारथी यमलोकीं पाठविला ते-व्हां उलुक रथाखालीं उतरून त्रिगर्त सैन्यांत गेला. सात्यकीनें शकुनीस ती-क्ष्ण बाणांनीं वेध करून तीन बाणांनीं सारथ्यास वेध केला आणि बहुत बा-णांनीं रथाचे चारी अश्व मारून यमलोकीं पाठविले. त्याकाळीं शकुनी आ-पले रथाखालीं उतरून उलूकाचे रथांत बसला तेव्हां उलूकानें त्यास युद्ध विशारद जो सात्यकी याज पासून दूर नेला. हे राजा, त्याकाळीं सात्यकीनें तुझें सैन्य विदीर्ण करून दाही दिशेस पळविलें असतां ते गतप्राण झाल्या सारखें ठिकठिकाणीं पडलें, इकडे भीमसेनानें एक मुहूर्तांत तुझ्या पुत्राच्या रथाचे अश्व व सारथी मारून ध्वज तोडला. नंतर दुर्योधन भीमसेनापासू-न दूर गेला असतां तुझा कडील सैनिक भीमसेनास मारण्याच्या इच्छेनें - त्याच्या जवळ जाऊन मोठा नाद करूं लागले. युधामन्यूनें कृपाचार्याशीं यु-द्ध करून त्याचें धनुष्य तोडलें असतां कृपाचार्यानें दुसरें धनुष्य घेऊन त्या-चा ध्वज व छत्र तोडून सारथी पाडतांच तो युद्धा पासून पराङ्मुख झाला. उ-त्तमोजा हार्दिक्याशीं युद्ध करीत असतां त्यानें हार्दिक्यास व्यास केला. हें उभ-यतांचें युद्ध मोठें भयंकर झालें. कृतवर्म्यानें उत्तमोजाचे हृदयावर बाणांचा प्रहा-र करून त्यास रथोपस्थांत पाडतांच त्याचे सारथ्यानें त्याचा रथ रणापासून माघारा नेला. दुःशासन व सौबल प्रभृती कौरवांकडील योध्यांनीं गजसैन्या सहवर्तमान त्यास वेष्टून क्षुद्रक बाणांनीं ताडण केलें. त्याकाळीं भीमसेन शतशः बाणांनीं दु-र्योधनास पराङ्मुख करून गज सैन्यावर धांवला. गजांनीं गजांस ताडण केलें, कां-हीं गज भिन्न हृदय होऊन पृथ्वीवर पडले. भीमसेनाच्या बाणांनीं ताडित झाल्यामु-ळें कांहीं गज रुधिर वमन करीत पळाले. त्याकाळीं भीमसेनानें धनुष्याचा टण-त्कार केला तेव्हां त्याचे बाहु आम्हीं पाहिले, त्याच्या गर्जनेचा शब्द ऐकून. कांहीं गज पळाले. अंतकाळीं रुद्र जसा क्रुद्ध होऊन भुतांचा संहार करतो तसा एक त्या

भीमसेनानें संपूर्ण गजांचा संहार केला. हें त्याचें मोठें अद्भुत कृत्य होय. असावि षय या अध्यायांत आहे.

६२ अध्याय बासष्ट:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, अर्जुन श्वेताश्व युक्तरथामध्यें बसून नारायणासहवर्तमान तुझ्यासैन्या सन्मुख येऊन त्यानें अश्वसैन्यांस क्षोभित केलें. दुर्योधनानें धर्मराजावर इतर क्षुरप्र बाणांचा प्रहार केला तेव्हां धर्मराजानें तीस बाणांनीं तुझ्यापुत्रास वेध केला. हें पाहून तरतुझे यौद्धे युधिष्ठिरास धरण्याच्या इच्छेनें एकाएकीं धांवले. तेव्हां नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न हे धर्मराजाचे रक्षणार्थ आले, भीमसेन ही धर्मराजाचे रक्षणार्थ आला. हें पाहतांच कर्णानें त्यांजवर बाणवर्षाव करून त्यांचें निवारण केलें, इतक्यांत सहदेवानें दुर्योधनास वीसबाणांनीं ताडित केला. हें राधेयास समजतांच त्याणें अस्त्रांचा प्रयोग केला तेणें करून पांडवांचें व धृष्टद्युम्नाचें सैन्य पळालें. नंतर कर्णानें सर्व दिशामोहित करून धर्मास पीडित केला तेव्हां धर्मराजानें पन्नास बाणानीं कर्णास ताडण केलें. याप्रकारें युधिष्ठीर व कर्ण यांचें युद्ध मोठें भयंकर झालें. कर्णानें तीन भल्ल बाणानीं युधिष्ठिराचे वक्षस्थळीं वेध करतांच धर्मराज अत्यंत दुःखित होऊन आपले सारथ्यास - बोलला कीं, हे सूता, हयांस लवकर प्रेरणा कर. त्याकाळीं संपूर्ण धार्तराष्ट्र, धर्मराजा सन्मुख जाऊन बोलले कीं, यांस धरा सोडूं नका. त्याकाळीं केकयाचे सत्राशें वीर पांचाला सहवर्तमान पुढें येऊन धार्तराष्ट्रांचें निवारण करूं लागले, तेव्हां उभयतांचें मोठें तुमुल युद्ध होऊन बहुत लोकांचा क्षयझाला. इतक्यांत दुर्योधन- व भीमसेन एकत्र होऊन युद्ध करूं लागले. असाविषय या अध्यायांत आहे.

६३ अध्याय त्रेसष्ट:—संजय भाषण करतो हे राजा, कर्णानें केकयांच्या महारथ्यांस वेष्टित केलें असतां ते राधेयाचें निवारण करण्यास प्रसक्त झाले तेव्हां राधेयानें केकयांचे पांचशें महारथी मारले. त्याकाळीं दुःखित झालेले केकय भीमसेनाकडे गेले, त्यासमयीं कर्ण एकाकी असतां पांडवांचें बहुतसैन्य मारून युधिष्ठिराकडे जाऊन नकुल सहदेव हे युधिष्ठिराचे संरक्षणार्थ जरी होते तथापि दुर्योधनाच्या हिता कर्ता त्याणें धर्मराजास वेध केला. त्याकाळीं धर्मराजानें तीन बाणांनीं राधेयाच्या स्तनांतरीं वेध केला. कर्णानें तीन

बाणें करून युधिष्ठिराचा सारथी व चार बाणें करून रथाचे चारी अश्व मारिले असतां धर्मराजाचे चक्ररक्षक माद्रीपुत्र कर्णावर धांऊन अरे, राजास मारूंनको, असें बोलून ते राधेयावर शरवर्षाव करूं लागले राधेयानें त्या बाणांचा भल्लबाणांनीं नाश करून धर्मराजाचे कृष्णपुच्छ श्वेत हय मारून एक भल्लबाणानें त्याचें शिरस्त्राण तोडलें आणि महाधनुर्धरी नकुलाच्या रथाचे अश्व मारून धनुष्य व भाते तोडले. हें पाहतांच मातुल मद्रराजास दया येऊन तो कर्णास बोलतो हे कर्णा, तुझाशीं स्पर्धा करणारा जो फाल्गुन त्यासह वर्तमान तूं युद्ध कर. तूं अत्यंत रोषित होऊन धर्मराजाशीं कशा करतां युद्ध करतोस? त्यांचीं शस्त्रास्त्रें क्षीण झालीं, कवचें, बाण, सारथी व रथाचे अश्वही नष्ट झाले, आतां ते केवळ पराजिता सारखे होऊन उगीच स्तब्ध बसले आहेत अशांशीं तूं युद्धार्थ जर जाशील तर तुझी उपहास्यता होईल. असा शल्यानें कर्णास जरी उपदेश केला तथापि त्यानें युधिष्ठिरास व माद्रीपुत्रांस ताडण करून त्यांस विन्मुख केलें तेव्हां शल्य भाषण करतो हे कर्णा, धृतराष्ट्र पुत्रानें ज्याकरतां तुझा सन्मान केला त्या पार्थाचा वध कर. युधिरास मारून तुला काय फळ आहे. भीमसेनानें तर दुर्योधनास ग्रस्त केला आहे आपण सर्व पाहत असतां दुर्योधन राजा भीमसेनाचे हातून जेणें करून मुक्त होईल असें कर. असें ऐकून कर्ण दुर्योधनाचे संरक्षणास धांवला, इकडे युधिष्ठीर व नकुल सहदेवाच्या रथांत बसून सेनामुख जाऊन,- रथाखालीं उतरले. नंतर धर्मराज शयनावर निजून माद्रीपुत्रांस बोलला कीं, तुम्हीं सत्वर भीमसेनाकडे जा. असें धर्मराजाचें भाषण ऐकतांच नकुल व सहदेव भीमसेनाजवळ गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

६४ अध्याय चौसष्ट :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, ज्यास्थलीं पार्थ उभा होता त्यास्थलीं द्रौणी मोठ्या रथसैन्यासह वर्तमान एकाएकीं येऊन पार्थाशीं युद्ध करूं लागला. तेव्हां अर्जुनानें द्रोणपुत्रास रोधिलें असतां द्रोणपुत्रानें वासुदेव अर्जुनास बाणांनीं आच्छादित केलें. त्याकाळीं अर्जुनानें हास्य करून द्रौणीवर दिव्यास्त्र टाकिलें असतां त्याचेंही द्रौणीनें निवारण केलें द्रोणपुत्रानें वासुदेवाच्या दक्षिण भुजेवर तीन बाणांचा प्रहार केला. हें अर्जुनानें पाहतांच द्रोणपुत्राच्या रथाचे अश्व मारून एकाएकीं रणभूमीवर रक्ता

रे ओघ व नाना प्रकारचे जामध्यें भोंवरे, सर्व लोकांस वहन करणारी व परलोकास वहन करणारी अशी परम भयंकर रक्तनदी उत्पन्न केली. अश्वत्थाम्यानें तें कर्म पाहून तो अर्जुनावर धांवला. तेव्हां अश्वत्थाम्याचें व अर्जुनाचें अमर्याद युद्ध प्रवृत्त झालें. पार्थ धनुष्या पासून सुटलेल्या बाणांनीं कितेक रथी मरण पावून पृथ्वीवर पडले, कितेक अश्वांच्या लगामा सुटल्या असतां ते धाऊं लागले. असें युद्ध होत असतां अश्वत्थाम्यानें आपलें नांव त्यास प्रकाशित करून व एकाएकीं शंभर बाणांनीं कृष्णास वेध करून तीन बाणांनीं अर्जुनास वेध केला. अर्जुनानें द्रोणपुत्राच्या मर्मसंधी छिन्न करून अश्वांस व सारथ्यांस बाणांनीं व्याप्त करून धनुष्याची दोरी तोडली. पुन्हा अश्वत्थाम्यास सर्व मर्मी भेद करून एक भल्ल बाणानें त्याच्या सारथ्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें असतां अश्वत्थामा पळाला. त्या कालीं तुझ्या सैन्यांत एकाएकीं मोठा घोर शब्द झाला. पांडवांचा जय झाला असतां ते बाणवृष्टी करीत तुझ्या सैन्यावर आले हें पाहून शकुनी, सौबल, कर्ण व इतर बहुत राजांनीं त्या सेनेस धैर्य देऊन तिचें निवारण करीत असतां ती उभी राहिली नाहीं. हें पाहून दुर्योधन कर्णास बोलला हे कर्णा, पांचालांनीं आपली सेना बहुत पीडित केली. तूं असतां आपले सैनिकांनीं त्रस्त होऊन पलायन करावें काय? याचा पक्का मनामध्यें विचार करून अतःपर जें कर्तव्य असेल तें कर. असें ऐकून कर्ण भाषण करतो हे मद्रराजा, आज पांडवांसहवर्तमान पांचालांचें हनन करतों आतां माझे अश्वांस प्रेरणा कर. असें बोलून सूतपुत्रानें विजय नामक पुरातन उत्तम धनुष्य घेऊन भार्गवास्त्राची योजना करतांच सहस्र अयुत, अर्बुद, कोटिशः बाण उत्पन्न होऊन त्यांनीं पांडवसेना आच्छादित झाली. त्या कालीं त्या सेनेंत हाहाःकार झाला, पर्वतासहवर्तमान पृथ्वी कंपायमान झाल्यामुळें समग्र प्राणी त्रस्त झाले; कितीएक योद्धे एकाएकीं त्या रणभूमीमध्यें व्याघ्रासारखे आक्रोश करून धाऊं लागले. असा भार्गवास्त्रापासून आक्रांत झालेला पाहून अर्जुन कृष्णास बोलतो हे श्रीकृष्णा, हा भार्गवास्त्राचा पराक्रम पहा. या अस्त्राचा पराभव करण्यास कोणचेंही अस्त्र समर्थ नाहीं. हे हृषीकेशा, पुरुष जिवंत आहेत तर त्यास रणामध्यें जयपराजय प्राप्त होतील, मृत पुरुषांचा भंगच होणार त्यास जय कोठून. असें भाषण ऐकून श्रीकृष्ण बो

लतात हे धनंजया, हा काल कसा कठिण आला आहे तो पहा. धर्मराजाचें धैर्य अगदीं नष्ट झाल्यामुळें तो कोठें दिसत नाहीं यास्तव त्याचा पूर्वी शोधकरून त्यास मार. असें कृष्णानें भाषण करतांच अर्जुन युधिष्ठिराकडे जाण्यास निघाला असतां चारी दिशेस पाहूं लागला; परंतु युधिष्ठीर कोठें न दिसल्यामुळें अर्जुन चिंताग्रस्त होऊन पुढें संपूर्ण सैन्य पाहत चालला तेव्हां मार्गामध्यें द्रोणपुत्र पुन्हा अर्जुनाशीं युद्ध करण्यास येतांच अर्जुनानें त्याचा पराभव केला. असा विषय या अध्यायांत आहे.

६५ अध्याय पांसष्ट:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्राजा, द्रोणपुत्राचा पराजय करून अर्जुन आपले शूरसैनिकांस बाणदृष्टीनें हर्षित करीत अनेक रथ्यांस पहात पुढें जात असतां धर्मराज दृष्टीस न पडल्यामुळें मोठ्या संकटांत पडला इतक्यांत भीमसेन अग्रभागीं दृष्टीस पडतांच त्यास भाषण करतो हे भीमा, धर्मराज कोठें आहे? असें ऐकून भीमसेन बोलतो हे अर्जुना, धर्मराज कर्णाच्या बाणांनीं संतप्त अंग होऊन येथून गेला, तो जिवंत आहे किंवा नाहीं याविषयीं संशय आहे. असें ऐकून अर्जुन बोलतो हे भीमसेना, तूंच आतां धर्मराजाकडे जाऊन त्याचा समाचार कसा आहे तो मला सांग. मीतर शत्रुगणांचा निरोध करून येथेंच उभा राहतों. असें ऐकून भीमसेन बोलतो हे अर्जुना, तूंच धर्मराजाकडे जा; जर मी जाईन तर हे योद्धे म्हणतील कीं, हा भीऊन पळाला. असें ऐकून अर्जुन बोलतो हे भीमा, संशप्तक माझ्या अग्रभागीं उभे आहेत त्यांचें हनन केल्यावांचून मला ही जाणें योग्य नाहीं तेव्हां कसें करावें! असें ऐकून भीमसेन बोलतो हे अर्जुना, तूं धर्मराजाकडे जा, मी आपल्या स्ववीर्येंकरून संशप्तकाशीं युद्ध करतों. असें ऐकून धनंजय धर्मराजास पाहण्याच्या इच्छेनें नारायणास भाषण करतो हे हृषिकेशा, आपले अश्वांस सत्वर प्रेरणा कर. असें अर्जुनाचें भाषण ऐकून श्रीकृष्णानें भीमसेनास असें भाषण केलें कीं, तुला हें कर्म करण्यास कांहीं अशक्य नाहीं, पार्थाच्या रिपुगणांचा तूं नाश कर. असें सांगून रथ धर्मराजाचा शिबिरासन्निध नेला. आणि तेथें उभयतां खालीं उतरून जेथें धर्मराज होता तिकडे गेले. नंतर राजास एकाकी निजलेला पाहून उभयतांनीं राजाचे चरणांस वंदन केलें. धर्मरा-

जानें उभयतांस पाहून हे कर्णाचा वध करून मला सांगण्या करतां आले आ-
हेत असें मनांत समजून तो उभयतांस बोलला कीं, तुमचीं शरीरें बाणांनीं वि-
द्ध होऊन रुधिरानें भरलीं आहेत, सेनेचे अग्रणी तुम्हीं येथें अकस्मात आलां
त यावरून असें वाटतें कीं, अर्जुनानें कर्णास युद्धामध्यें मारला. नंतर धर्मराजा
नें मधुरभाषणानें अर्जुनाचें अभिनंदन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६६ अध्याय सहासष्ट:– युधिष्ठिर भाषण करतो हे केशवार्जुन हो, आ
ज तुमचें दर्शन मला फार प्रियकारक झालें, तुमचे अंगांस क्षत पडलेलें नसून-
निर्भयपणें तुम्हीं कर्णास कसा मारलात? कर्ण दुर्योधनाचा हितेच्छु, इंद्रादि दे
वही ज्यास युद्धांत जिंकण्यास अशक्य, तेजानें अग्नीसारखा, बलानें वायुसार
खा, गंभीर्यानें पाताळासारखा असा असतां त्यास तुम्हीं कसा मारलात? क
र्णानें प्रथम माझ्या रथाचा केतु छेदन करून पार्ष्णिसारथी मारिले. नंतर र
थाचे अश्व मारून सात्यकीसमक्ष मला विरथी केला. धृष्टद्युम्न, नकुल,
सहदेव, वीर शिखंडी, द्रौपदेय व पांचाल यांस जिंकून त्या महा रणामध्यें-
मलाही धरण्याविषयीं यत्न करीत असतां माझा तिरस्कार करून बहुत दु-
ष्टभाषण केलें. भीमसेनाच्या सामर्थ्यानें मी जिवंत मात्र राहिलों. हे धनंज
या, फार काय सांगावें त्याचा पराक्रम माझ्यानें सहन होईना, तेरावर्षें पर्यंत-
त्याच्या भयानें रात्रीं मला कधीं निद्रा लागली नाहीं जागृत व स्वप्नावस्थेम
ध्यें संपूर्ण जगत् कर्णमय जिकडे तिकडे पहात होतों. आतां जिवंत राहून
कांहीं कर्तव्य नाहीं मग राज्याशीं काय कर्तव्य आहे? भीष्म, कृपाचार्य व क-
र्ण यांजपासून असें दुःख कधीं प्राप्त झालें नव्हतें तें आज सूतपुत्रापासून
प्राप्त झालें यास्तव अर्जुना, असा पराक्रमी कर्ण असतां त्याचा तूं कसा वध के-
लास; हें मी तुला विचारतों साकल्यें करून तूं मला सांग. कर्ण मरण पावला-
हा केवळ दुर्योधनाचा बाहुच भग्न झाला असें वाटतें. कर्ण निरंतर राजसभेंत
मशीं श्लाघा करी कीं मी अर्जुनाचा हंता आहें, कर्णानें अशी प्रतिज्ञा केली हो
ती कीं, जेव्हां मी फाल्गुनाचा वध करीन तेव्हांच मी आपले पाद धुवीन नाहींत
र धुणार नाहीं. दुष्टबुद्धि कर्ण सभेमध्यें द्रौपदीस बोलला कीं, तूं आपल्या
पंच पतींचा त्याग करून कौरवांचा अंगीकार कर, दुर्बल व हीनसत्व, पती तु

लायोग्यनाहींत त्या दुष्ट कर्णास तूं मारलास काय! हे फाल्गुना, माझ्या हृदयामध्यें कर्णाच्या कपटवायूनें प्रेरित केलेला अग्नी प्रज्वलित झाला आहे तो कर्णवध मी केला हें सांगून शांत कर. इंद्रानें वृत्रासुराचा वध केल्यानंतर देव जसे त्याचें स्तवन करूं लागले तसें मी तुझें ध्यान करतों. असा विषय या अध्यायांत आहे.

६७ अध्याय सदुसष्ट:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन युधिष्ठिरास बोलतो हे राजा, संशप्तकगणांसहवर्तमान मी युद्ध करीत होतों त्यांत अश्वत्थामा सेनाग्रणी होता त्याणें माझ्या रथावर आशिविष सर्पासारख्या बाणांची वृष्टी करून माझा रथ आच्छादित केला असतां मी त्याचा नाश करून पांचशें रथ्यांचा विनाश केला. त्याकालीं आचार्य पुत्रानें विषाग्निसारख्या बाणांनीं मला व कृष्णास बहुत क्लेशित केलें. एक्या शकटास आठ वृषभ युक्त केलेले अशा एकशें आठ शकटांवर असंख्यात बाण ठेऊन ते शकट बाणांनीं पूर्ण केलेले अश्वत्थामा रथामध्यें बरोबर घेऊन आला होता, ते संपूर्ण बाण त्याणें माझ्यावर टाकिले तेव्हां ते बाण मी आपल्या बाणांनी नाशित केले. नंतर अश्वत्थाम्यानें पांच निशित बाणांनीं मला वेध करून पांच बाणांनीं वासुदेवास वेध केला तेव्हां एका निमिषांत मी वज्रासारखे तीस बाण अश्वत्थाम्यावर टाकिले तेणें करून त्याच्या मर्मसंधी छिन्नभिन्न होऊन संपूर्ण गात्रां पासून रुधिराचे स्राव चालूं लागतांच अश्वत्थामा जरजरीभूत झाल्यामुळें कर्णाचे रथसैन्यांत गेला. तेव्हां कर्ण पांचशें रथ्यांसहवर्तमान माझ्याशीं युद्ध करण्यास आला असतां त्या रथ्यांचें कदन करून तुझा दर्शनाकरतां मी येथें परम त्वरेनें आलों. नंतर संपूर्ण पांचाल कर्णास क्रुद्ध झालेला पाहून त्याशीं युद्ध करूं लागले. त्याकालीं पांचालांच्या बराबर प्रभद्रकाचे सातशें रथी मृत्युमुखांत शिरल्यासारखे युद्धांत आले असतां कर्णानें प्रभद्रकाचे सातशें रथी यमलोकीं नेले. कर्णानें जों पर्यंत आम्हांस पाहिलें नाहीं तों पर्यंत तो उदारमनानें युद्ध करीत होता पूर्वी अश्वत्थाम्यानें तुला क्षतयुक्त केलेलें पाहून कर्णानें तुला पीडित केलें हें आम्हीं ऐकतांच येथें आलों आतां त्याचे हातू-

न दुरजाणयाचा हा समय आहे. युद्धांत मी पूर्वी कर्णाची विचित्र अस्त्रवि- द्या पाहिली आहे संजयांमध्यें तर कर्णापुढें कोणी जाऊन युद्ध करील असा योद्धा दिसत नाहीं. सात्यकी व धृष्टद्युम्न हे माझे चक्ररक्षक व युधामन्यु आ णि उत्तमोजा हे पृष्ठ रक्षक झाले असतां मी शत्रुसैन्यामध्यें कर्णाशीं युद्ध करी न हें तूं पाहण्यासचल. हे राजसिंहा, आजमी अशी प्रतिज्ञा करतोंकीं बांधवांस ह्वर्तमान कर्णाचा वध न करीन तर पापी लोकांस जी गती होते ती मला प्राप्त होवो. आतांमी तुझी अज्ञा घेऊन रणांत जातों आपला जय होण्याविषयीं तूं मला आशीर्वाद दे, भीमसेनास तर धृतराष्ट्र पुत्रानीं ग्रस्त केलें आहे, मी आ तां हें राजसिंहाचें सैन्य मारून सूत पुत्राचा वध करतों. असा विषय या अध्यायांत आहे.

६८ अध्याय अडुसष्ट:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, उदा र वीर्य जो कर्ण याचें वृत्त अर्जुन मुखापासून ऐकून युधिष्ठीर बोलतो हे धनं जया, कर्णानें तुझी सेना तुच्छ करून पळविली ही गोष्ट चांगली झाली नाहीं. तुला कर्णास मारण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें तूं त्यास भीऊन भीमास सोडून येथें आलास; त्याजपेक्षां सूत पुत्रास मारण्यास तूं समर्थ नाहींस असें वाटतें द्वैत वनांत तूं बोलला होतास कीं मी एकरथांत बसून कर्णाचा वध करीन तें तुझें भाषण व्यर्थ झालें. हे पार्था, पूर्वी द्वैतवनामध्यें तूं आम्हांस सांगतास कीं कर्णाशीं युद्ध करण्यास समर्थ नाहीं तर आम्हीं तशीच एखादे कृत्याची योज ना केली असती, आम्हांस आतां शत्रूंच्या मध्यभागीं आणून स्थंडिलांत टा कल्या सारखें कशा करतां आमचें चूर्ण करतोस! हे अर्जुना, आम्हांस अ- सा भरवसा होता कीं, तुझायोगानें आमचें कल्याण होईल, परंतु हें सर्व वि फल झालें. अमिषानें आच्छादित जसें मत्स्यघाती शस्त्र असतें तसें आम्हीं राज्यार्थी असतां तूं आम्हांस राज्यनाशाचें फळ दाखवितोस; हे धनंजया, तेरा वर्षे पर्यंत आम्हीं तुझा आशेनें जीव घेऊन राहिलों. पृथ्वींत धान्य पेरणा र पुरुष धान्य पेरून पर्जन्य वृष्टीची आशा करीत असतां ती न झाल्यामुळें जसा तो खिन्न होतो तसें तूं आम्हांस घोर नरकांत पाडलेंस. जा दिवशीं तूं पृ थे पासून उत्पन्न झालास त्या दिवसा पासून सातवे दिवशीं अशी आकाश

वाणी झाली कीं, हा तुझा पुत्र वासवा सारखा पराक्रमी आहे, हा संपूर्ण शत्रूंस जिंकील, खांडव वनांत संपूर्ण भुतांस व देवसंघास पराजित करील, हा राज्याच्या मध्यभागीं मद्र, कलिंग व कैकयांस मारील व कुरूंचा वध करणारा होईल, या सारखा धनुर्धर पुढें होणार नाहीं व यास जिंकणारें कोणी भूत होणार नाहीं, यास संपूर्ण विद्या प्राप्त होऊन संपूर्ण भुतांस हा आपल्या पराक्रमें करून वश करील, हा तुझा पुत्र शशांका सारखा कांतिमान, वायू सारखा वेगवान, मेरू सारखा धैर्यवान्, पृथ्वी सारखा क्षमावान्, सूर्या सारखा तेजस्वी, धनदा सारिखा लक्ष्मीवान, इंद्रा सारखा शौर्यवान् व विष्णु सारखा बलवान असा होईल, हा आपला जय व द्वेष्ट्यांचा क्षय करील, हा अपरिमित तेजस्वी, आपल्या कुलाचा तंतुभुत आहे. अशी अंतरिक्षा पासून वाणी शतशृंग पर्वताच्या शिखरीं झालेली मी व इतर तपस्यांनीं ऐकिली ती सत्य झाली नाहीं म्हणून मला असें वाटतें कीं, देवही अनृतभाषण करतात, दुसऱ्याही मोठमोठ्या तपस्वी ऋषीनीं तुझा विषयीं स्तुतिपूर्वक उत्तम वाणीनें जें भाषण केलें त्या भाषणा वर मी विश्वास ठेऊन हा अर्जुन कर्णास भीणार नाहीं असें जाणून मी दुर्योधनास शरण गेलों नाहीं, परंतु तें मला कांहींच खरें दिसून येत नाहीं. त्वष्ट्यानें अश्व व कपिध्वजा सहवर्तमान उत्पन्न केलेला रथ तुला प्राप्त झाला आहे, तसेंच हेमबद्ध खड्ग व ताल मात्र गांडीव धनुष्य मिळालें आहे तो रथ केशवानें उद्यमान असतां कर्णा पासून तूं भय पाऊन कसा पळून आलास? अतःपर तूं आपलें धनुष्य केशवास देऊन तूं त्याचा सारथी हो म्हणजे कृष्ण कर्णाचा वध करील जर तुझ्यानें राधेयाचा वध करवत नसेल तर तुझापेक्षां अस्त्रविद्येमध्यें जो कोणी श्रेष्ठ नरेंद्र असेल त्यास तरी तूं आपलें गांडीव धनुष्य अर्पण कर. पुत्रदारा व राज्यसुख यांज पासून भ्रष्ट होऊन पापि लोकानीं सेवित केलेल्या अगाध नरकामध्यें आम्हांस पतित झालेले जन न पाहोत. हे अर्जुना तुझा वेळेस पृथा गर्भिणी असतां पांचवें मासीं तिच्या गर्भाचा स्त्राव कां झाला नव्हता? हे दुरात्म्या अर्जुना; संग्रामाचा तूं त्याग करून येथें आलास यांत तुला श्रेय नाहीं याजपेक्षां तूं पृथेच्या गर्भात उत्पन्न झाला नसतास तर बरें होतें, तस्मात् तु

ज्यागांडीव धनुष्यास, बाहुवीर्यास, असंख्यात बाणांस केशरीचा पुत्र जो वा नर त्यासहवर्तमान ध्वजास व अग्निदत्त तुझ्यारथास धिक्कार असो. असा विषय या अध्यायांत आहे.

६९ अध्याय एकुणसत्तर:– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, असें युधिष्ठिराचें निंदास्पद भाषण ऐकून श्वेतवाहनानें बहुत क्रुद्ध होऊन युधिष्ठिराचा वध करण्याच्या इच्छेनें हस्तामध्यें खड्ग घेतलें. त्याकाळीं केशवानें अर्जुनाचें मनोगत जाणून तो अर्जुनास भाषण करतो हे धनंजया, हा खड्ग तूं कशा करतां घेतलास; सांप्रत योद्धातर कोणी दिसत नाहीं. धार्तराष्ट्राच्या योध्यांस तर बुद्धिमान भीमसेनानें ग्रस्त केलें आहे, तूं ज्याच्या दर्शनाच्या इच्छेनें येथें आलास, तो राजश्रेष्ठ धर्मराजा कुशल आहे त्यास पाहून तुला हा हर्षाचा काल आला असतां मोहानें तूं हें काय कर्म करतोस? हे कौंतेया, तुला वध करण्यास युधिष्ठीर केवळ अयोग्य असतां तूं त्याजवर कशा करतां प्रहार करण्याची इच्छा करतोस; तुझ्याचित्तास विभ्रम झाला काय, हा महा खड्ग परमत्वरेनें घेतलास यास्तव मी तुला विचारतों कीं, तुझ्यामनांत काय आहे तें सांग. असें कृष्णानें भाषण केलें असतां धनंजय युधिष्ठिरास पहात सर्पासारखे श्वास टाकून भाषण करतो हे कृष्णा, हें गांडीव धनुष्य तूं दुसऱ्यास दे असें जो मला बोलेल त्याचा शिरछेद करीन असें माझें गुप्त व्रत आहे तुझ्यासमक्ष धर्मराजानें मला हें भाषण केलें यास्तव त्याचा शिरछेद करण्या करतां हा खड्ग मी घेतला, याची क्षमा न करतां आतां वध करून मी आपली प्रतिज्ञा सत्य करीन. हे जनार्दना, तूं या जगतांचे संपूर्ण गतागत जाणतोस; हा काल वधाचा आहे किंवा नाहीं हें तूं च सांग म्हणजे तसें मी करीन. असें अर्जुनाचें भाषण ऐकून श्री कृष्ण बोलतात हे अर्जुना, तुला धिःकार असो असें बोलून पुन्हा भाषण करतात हे पार्था, वृद्धाची सेवा करावी ती तूं केली नाहींस, असें मला आतां समजलें. तूं धर्मराजाचें दर्शन करण्यास आलास त्याचें हें फळ कीं काय? तूं धर्माचे विभाग जाणत नाहींस यावरून तूं अपजितच दिसतोस, धर्मास अनुसरून जे पुरुष आपल्या पौरुषाचा विस्तार करून दाखवितात ते श्रेष्ठ होत. त्या-

चा निश्चय तुला कळला नाहीं अरे, शास्त्रावांचून कार्याकार्य कळत नाहीं तूं शास्त्रतर पाहिलें नाहींस; असें मला वाटतें. अधर्मास धर्म मानून हें तूं वधरूप घोरकर्म करण्यास प्रसक्त झालास, अरे, कदाचित् अनृत भाषण करावें परंतु कोणाच्याही प्राण्याचा वध करूं नये हें मत सर्वांमध्यें श्रेष्ठ असें मला वाटतें, तुझा श्रेष्ठ भ्राता धर्मराज धर्मवेत्ता असून त्याचा वध करण्यास प्राकृतपुरुषा सारखा तूं कसा उद्युक्त झालास अयुध्यमानाचा किंवा त्रस्त झाल्यामुळें युद्ध न करतां पराङ्मुख होऊन पळाल्याचा, शरणांगत आलेल्याचा अथवा प्रमत्त व मत्त झालेला असून ज्याणें हात जोडले त्याचा वध केला असतां तो सज्जनांमध्यें पूज्य व्हावयाचा नाहीं. धर्मराज तर तुझा गुरु असून तुजपासून हें कृत्य घडलें याजवरून असें वाटतें कीं, बालभावें करून तूं पूर्वीं अशी प्रतिज्ञा केल्यामुळें मूर्खत्वानें अधर्मरूप कर्म करण्याची इच्छा करतोस; धर्माची गती फार सूक्ष्म आहे ती तूं जाणून गुरूस मारण्याच्या इच्छेनें कसा धांवतोस? याविषयीं तुला हें धर्माचें रहस्य सांगतों. भीष्म, विदुर, युधिष्ठिर व यशस्विनी कौंती यांणीं जें तुला सांगावयाचें तें सांगतों.- जो सत्याचा वक्ता तो साधु, सत्यासारखें अन्य दुसरें कांहीं नाहीं, सत्य जाणणें हें दुर्लभ आहे सत्य असून असत्या सारखें क्वचित स्थलीं मानिलें आहे, क्वचित स्थलीं असत्य असून सत्या सारखें मानिलें आहे. विवाहकाल, रतिप्रयोग, प्राणसंरक्षण, सर्वस्व अपहार व ब्राम्हण अशा पांच ठिकाणीं असत्य भाषण केलें असतांही सत्यच जाणावें. त्यामध्यें दोष नाहीं आपल्या सर्वस्वाचा अपहार होत आहे तर अनृत भाषण करावें केलें असतां अनृत ही सत्य होतें, कोठें सत्य अनृत होतें. धर्मवेत्ते सत्यासत्य याचा विचार बहुत करतात. एखादा मूर्ख असून दारुण कर्म करण्यास प्रसक्त झाला असतां त्याजपासून पुण्य होतें व विचारवान पुरुष चांगलें कर्म करण्यास प्रसक्त झाला असतां त्याचा परिणाम पापदायक होतो असें ही पाहण्यांत आलें आहे. बलाकनामक व्याध अंधवधानें महत्पुण्य पावला व कौशिक ब्राम्हण नदी तिरीं महत्पाप पावला. असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे भगवन्, बलाक व्याधाचा व कौशिक ब्रा

म्हणाचा पुण्यपापाचा वृत्तांत मला सांग. असें अर्जुनानें भाषण ऐकून कृ
ष्ण बोलतात हे अर्जुना, पूर्वी बलाक नामक कोणी व्याध होता तो आ
पले वृद्ध मातापितर व पुत्र यांच्या प्राण रक्षणा करतां मृगाची हिंसा क
रीत असून आपले स्वधर्माचें रक्षण उत्तम प्रकारें करी. अनृत भाषण त्या
स ठाऊक नवतें. कोणे एके दिवशीं तो व्याध मृगये करितां वनांत गेला.
असतां त्यास मृग सांपडला नाहीं, फिरतां फिरतां एक अंध श्वापद उद
क प्राशन करीत असतां व्याधानें तें अपूर्व विजातीय श्वापद पाहून मा
रिलें. इतक्यांत आकाशापासून पुष्पाची वृष्टी होऊं लागली आणि अ
प्सरांच्या गीत वाद्यानीं नादित असें एक विमान मृगास व व्याधास स्व
र्गीं नेण्यास आलें. बलाकानें मारलेलें अंध श्वापद सर्व भूतांचा नाश
करण्या करितां उत्पन्न झालें होतें, त्या भूतानें तपें करून वरप्राप्ती के
ली होती. हा सर्व भूतांचा नाश करील म्हणून ब्रम्हदेवानें यास अंध के
ला होता; व्याधानें त्यास मारलें म्हणून व्याधास नेण्याकरतां स्वर्गी
हून विमान आलें. असा हा धर्म जाणण्यास परम अशक्य आहे. हे
अर्जुना, कोणी एक कौशिक नामक ब्राम्हण तपस्वी व बहुश्रुत असे तो एक ग्रा
मानें सन्निध नदीच्या संगमीं राही. त्यानें आपली अशी प्रख्याती केली होती.
कीं मी सत्यवादी आहें हें माझें परम विख्यात व्रत आहे. कोणे एके दिवशीं चो
रांच्या भयानें कांहीं जनांचा समुदाय कौशिक राहत होता त्या अरण्यांत आ
ला तो त्याणें पाहिला होता. पाठीमागून चोर त्यांचा शोध करीत करीत कौ
शीक जेथें राहत होता तेथें येऊन त्यास असें बोलले कीं या मार्गानें कोणी
जन गेले किंवा नाहींत तूं सत्यवक्ता आहेस यास्तव खरें सांग. त्या कालीं कौ
शिकानें असें सत्य भाषण केलें कीं, बहुत वृक्ष, लता व गुल्म ईहीं करून व्या
प्त जें वन यांतच ते आहेत. असें त्याणें चोरांस सांगतांच त्याणीं त्यांचा शो
ध करून प्राण घेतला. या अधर्मानें तो कौशिक ब्राम्हण नरकांत पडला. सू
क्ष्म धर्माचें ज्ञान त्यास कांहीं नवतें. सत्यसंरक्षण व्हावें अशा बुद्धीनें त्यांस
सांगण्यास कौशिक प्रवृत्त झाला असतां हिंसारूप अधर्म त्याजपासून
घडला. अल्प अध्यायनीं पुरुषास धर्माच्या विभागा विषयीं ज्ञान नसून-

तो इतिहास न पुसल्यामुळें जसा महत् संकटीं पडतो तसें हें तुला प्राप्त झालें. धर्म व अधर्म यांची गती फार सूक्ष्म आहे, धर्मज्ञान फार कठिण तें तर्कानेंच जाणिलें पाहिजे. बहुत लोक असें समजतात कीं, श्रुतींत सांगितलेला हाच धर्म, त्याजवर कोणी असूया करूं नये; परंतु तुला एक सांगतों प्राण्याची हिंसा न करणें हा संपूर्ण धर्मांमध्यें श्रेष्ठ धर्म होय, धर्मप्रवचनामध्यें अहिंसारूप धर्माची मोठी प्रशंसा केली आहे धर्मच प्रजेचें पालन करतो-म्हणून त्याचें नांव धर्म असें पडलें. जे न्याय दाखवून अधर्म करण्याची इच्छा करतात त्यांच्याशीं संभाषण करूं नये. धर्माधर्म विचार फार कठीण आहे या उभयतांचें सांकर्य झालें असतां धर्माचें निर्वचन करण्यास मोठें कौशल्य पाहिजे. प्राणाचा नाश, विवाद, सर्वज्ञातीचा वध अथवा उपहास कालीं अनृत भाषणाचा दोष नाहीं; अशास्थलीं सत्य संरक्षण करून दुसऱ्या महत्तर दोषांचा संग्रह करूं नये जे अधर्मानें राजे सत्य संरक्षण करून पाहिजे तें कर्म करतात त्यांच्याशीं संबंध ठेवूं नये व भाषण करूं नये, अशा पुरुषांस धन दान केलें असतां दाता नरकांत पडतो. हे अर्जुना, अशा तुला धर्माच्या व अधर्माच्या सूक्ष्म गती सांगितल्या त्यांचा विचार करून युधिष्ठिराचा वध करणें असल्यास कर. असें कृष्णानें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे कृष्णा, तुझें भाषण मी ऐकिलें जेणें करून आतां माझें हित होईल तें सांग. तूं आम्हांस मातापितरस्थानीं असून तूंच आमची गती व आश्रय आहेस; तीन लोकांत धर्म व अधर्म यां विषयीं तुला कांहीं अज्ञात नाहीं, तूं धर्मरूप ज्ञान संपूर्ण मला सांगिलेंस याजवरून धर्मराज अवध्य आहे असें जाणलें; परंतु माझा संकल्प असा आहे कीं, तूं आपलें गांडीव धनुष्य दुसऱ्यास दे असें जो मला बोलेल त्यास मी मारीन. हें माझें व्रत तूं जाणतच आहेस. भीमसेनाचीही अशीच प्रतिज्ञा आहे कीं, जो मला बहुभक्षक म्हणेल त्याचा मी वध करीन. धर्मराजानें तर तुझ्यासमक्ष मला असें वारंवार भाषण केलें कीं, तूं आपलें गांडीव धनुष्य दुसऱ्यास दे, तेव्हां आतां हे श्री कृष्णा, जर प्रतिज्ञा सिद्ध होण्याकरितां धर्मराजाचा वध केला तर मीही त्याच्या पाठीमागें अल्पकाल जीवलोकाचे ठाईं राहणार नाहीं; यास्तव हे कृष्णा, माझ्या व्रताचा भंग न होतां धर्म

राजाचा वधन व्हावा अशी युक्ती सांगून या संकटा पासून मुक्त करणारा तूं आहेस; असें अर्जुनानें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, धर्मराजतर बहुत श्रांत व कर्णाच्या तीक्ष्ण बाण संधानीं पीडित झाल्या मुळें तो दुःख सागरांत निमग्न झाला म्हणून त्याणें रोषानें तुला असेंहें अयोग्य भाषण केलें. जरत्यास कोप आला नसतां तरतो कर्ण वधाविषयीं तुला उत्तेजन देता, धर्मराज निश्चय पूर्वक असें जाणतो कीं, कर्ण, अर्जुना वांचून इतरास जिंकण्यास अशक्य आहे. या रणांगणी असह्य व वारंवार उद्योग शालि कर्ण पण स्थानीं योजून हें द्यूत प्रवृत्त झालें आहे, कर्ण मरण पावलातर संपूर्ण कौरव पराजितच झाले असें धर्मराज निरंतर मानीत आहे यास्तव तो तुजपासून वध पावण्यास योग्य नाहीं. धर्मराज जिवंत असून मेल्या सारखा होण्यास एक योग्य हेतु तुला सांगतों. तूं, भीमसेन, नकुल, सहदेव व वृद्ध श्रेष्ठ पुरुषांनीं धर्मराज सन्मानीत आहे तोच त्याचा तुम्हीं कांहीं अपमान करा म्हणजे मृता सारिखा होईल. हे कौंतेया, आतां धर्मराजा विषयीं तूं कांहीं निंदायुक्त भाषण कर म्हणजे तो शस्त्रा वांचून मेल्या सारिखा होईल, अशी श्रुतीमध्यें उत्तम अथर्व वेदाची श्रुती आहे. नंतर तूं त्याच्या पादास वंदन करून व त्याचें समाधान करून मीजें कांहीं वैषम्य भाषण केलें त्याची क्षमा असावी, असें त्यास भाषण केलें असतां धर्मराज धर्मास पांहून तुझावर कधीं कोप करणार नाहीं तो मोठा प्राज्ञ आहे, येणें करून तूं अनृत भाषणाच्या पापा पासून व भ्रातृवधा पासून मुक्त होऊन हर्षानें सूतपुत्र कर्णाचा वध कर. असा विषय या अध्यायांत आहे.

७० अध्याय सत्तर :– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, असें जनार्दनानें भाषण केलें असतां पार्थ हास्य करून धर्मराजास भाषण करतो हे राजा, पुरे पुरे, तूं उगीच भाषण करूंन कोस, तूं रणापासून एक कोशलांब मात्र राहिलास आणि अशीं आम्हांस भाषणें करतोस यांचा उपसंहार कर, माझी तूं निंदा केलीस अशी निंदा करण्यास कदाचित् भीमसेन योग्य आहे. कारण भीमसेनानें असंख्यात शत्रु युद्धामध्यें मारले, मोठमोठ्या रथ्यांचा क्षय केला, हजारों महान् गज यमलोकीं नेले, दहा सहस्र-

कांबोज मारून बहुत पार्वतीय योध्यांचा क्षयकेला. भीमसेनानें जसें दुष्क र कर्मकेलें तसें कर्मतूं कधींच केलें नाहींस; अंतक व वैश्रवण यांचीच त्यासम हा बलाविषयीं उपमा योग्य आहे, तुझें तर आज पर्यंत आमच्या कडील योध्यानीं संरक्षण केलें. महारथी विरांचें, श्रेष्ठ गजाश्वांचें व पदात्यांचें भीमसेनानें मथन करून धृतराष्ट्र पुत्रास मारण्या विषयीं तो त्यांच्या सैन्यांत गेला आहे. एकाकीं भीमसेनानें कलिंग, अंग, वंग, निषाध व मागध देशींचे राजे मोठे बलाढ्य व नील वर्ण, मेघोपम असतां ही त्यांचा क्षय केला. भीमसेनानें एकशें आठ गज मारिले. ब्राम्हणानें वाक्‌बळ आणि क्षत्रियानें बाहुबल शास्त्रांत वर्णन केलें आहे. तूंतर आपल्या वाक्‌बलानें मला पाहिजे तसें बोलतोस तर हें बोलणें तुला योग्य नाहीं, आम्हांस तुझा पासून काय सुख आहे? तूं द्रौपदीच्या मंचकावर बसून आम्हांसारख्या वीरांचा अवमान करतोस; हें तुला योग्य नाहीं. तुझा करतांच आज पर्यंत मी असंख्या रथ्यांचा क्षय केला, शिखंडी व द्रौपदेयांचें मी युद्धामध्यें रक्षण केलें नसतें तर – शिखंडी, भीष्माचा वध करण्यास योग्य होता काय! हे राजा, अशा तुझा कृत्यांवरून सामराज्य जरी तुला मिळालें तथापि आम्हांस संतोष नाहीं, तुला अक्षक्रीडा करण्यानें व्यसन आहे हें केवळ आमच्या अहिताचें कारण आहे. स्वतः आपण नीचानीं सेवन केलेल्या द्यूत कर्माचें सेवन करून आतां या प्रसंगीं आम्हां सह वर्तमान शत्रूंस जिंकण्याची इच्छा करतोस; अक्षक्रीडेचा बहुत दोष आहे म्हणून सहदेव तुला सांगत असतां तें नऐकून-त्यास प्रसक्त झालास, तूं अक्षक्रीडेंत निरंतर निमग्न झाल्यामुळें तुझा पासून सुखतर आम्हांस अगदीं नाहीं. तूं स्वतः अशा व्यसनांत पडून आम्हांस तीव्र-व रूक्षवाणी ऐकवितोस; आम्हीं तर शत्रुसेना मारली असतां ती छिन्न भिन्न गात्र होऊन गर्जना करीत भूमीवर पडली आहे. तूंतर असें क्रूर कर्म केलें सकीं, तेणें करून कौरवांचा वध झाला. असें अर्जुनानें धर्मराजास भाषण केलें असतां युधिष्ठीर खिन्न झाला. अर्जुनासही आपल्या भाषणाचा पश्चात्ताप होऊन श्वासोच्छ्वास टाकीत पुन्हा कोशांतून खड्ग बाहेर काढतो हें पाहून कृष्ण बोलला हे अर्जुना, हा आकाश वर्ण खड्ग कोशरहित कां केलास? याचें मला उत्तर

दे म्हणजे तुझ्या अर्थसिद्धी विषयीं तसें भाषण करीन. असें पुरुषोत्तमाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे जनार्दना, या शरिरानें धर्मराजाचें बहुत अहित केलें यास्तव बलात्कारानें मी आपलें शरीर धर्मराजा पुढें तोडून टाकितों. असें अर्जुनाचें भाषण ऐकून पुन्हा श्रीकृष्ण बोलतात हे अर्जुना, पुर्वी तूं युधिष्ठिरास असें निंदेचें भाषण बोलून आतां आपलें शीर कां तोडतोस? हा मार्ग सज्जनानीं सेवन केलेला नाहीं. हे पार्था, सूक्ष्म धर्म अज्ञानीं जनांस अती दुर्ज्ञेय आहे मी तुला आतां सांगतों. तूं आपल्या हातानें आपल्यास मारतास तर-आत्महत्येनें व बंधुवधाच्या दोषानें घोर नरकांत जातास; आतां तूं आपले गुण आपल्या मुखानें वर्णन कर. म्हणजे हतात्म झाल्या सारखा होऊन पूर्व दोषा पासून मुक्त होशील. असें कृष्णाचें भाषण ऐकतांच अर्जुनानें त्याचे भाषणास मान देऊन नंतर आपलें धनुष्य कांहीं नम्र करून तो युधिष्ठिरास बोलतो हे राजा, माझा सारिखा धनुर्धर पिनाकी शिव आहे. दुसरा क्षत्रियांत कोणी नाहीं म्हणून मी संपूर्ण जनांस मान्य आहें. संपूर्ण दिशांचे राजे व दिशा जिंकून तुझा स्वाधीन केल्या, आमच्या पराक्रमानें दिव्यसभा तुला प्राप्त होऊन राजसूय यज्ञही दक्षिणा युक्त असा समाप्त झाला. मी हस्तांत पृषत्क बाण व सज्ज केलेलें धनुष्य घेऊन रथारूढ झालों असतां मला जिंकण्यास कोणी समर्थ झाले नाहींत. देवसेने सारखी ही भारती सेना मरण पावून शयन करीत आहे, बहुधा अर्धसेना शेष असेल, जे शस्त्रास्त्र वेत्ते मोठमोठे योद्धे होते त्यांचा मीच क्षय केला. असें राजास भाषण करून पुन्हा कृष्णास बोलतो हे कृष्णा, आज कर्णास मारण्या करितां जयशालि व भयंकर रथामध्यें आरूढ होऊन आपण जाऊं आणि बाणांनीं त्यास रणामध्यें मारूं. म्हणजे राजा सुखी होईल. असें भाषण करून पुन्हा अर्जुन धर्मराजास बोलतो हे राजा, आज मी कर्णास मारला असतां सूतमाता अपुत्रा होणार अथवा कर्णानें मला मारला असतां कुंती अपुत्रा होणार यास्तव मी आज असें भाषण करतों कीं, रणामध्यें कर्णास मारल्यावांचून कवच काढणार नाहीं. असें धर्मराजास भाषण करून पुनः बोलतो हे राजा, संपूर्ण माझा भाषणाची क्षमा कर मी तुजला नमस्कार करतों, माझावर तूं प्रसाद

करावास; असें धर्मराजास प्रसन्न करून बोलतो हे राजा, या क्रूरत्यास वि लंबनको आतांमी भीमसेनास रणांतून मुक्त करण्या करितां व सूत पुत्रा स मारण्या करितां जातों. असें बोलून धर्मराजाचे चरण धरून किरीटी- तेजानें जाज्वल्य मान होऊन उभा राहिला तेव्हां अर्जुनाच्या कठोर भाषणा नीं धर्मराज पीडित झाला होता तो शयना पासून उठून अर्जुनास बोलतो हे पार्था, तुमचें आज पर्यंतमी कांहींच चांगलें केलें नाहीं मजकरितां तुम्हांस दुःख मात्र सोसावें लागतें तस्मात् आज कुलांतक, पापरूपी, पापव्यसना- मध्यें निमग्न झालेला जोमी या माझें अधम पुरुषाचें ह्या खड्गानें शीर तोडून टा क, तुला कठोर भाषणानें बोलणारा जोमी या मलातूं रूक्ष भाषणानें का य बोलतोस; आजमी वनांत जातों. नंतर मजविरहित तुम्ही सुखाचा उप भोग करा, भीमसेन तुला राजा योग्य आहे माझ्या क्लीबाची तुला गरज का य! असें भाषण करून धर्मराज शयना पासून उठून वनांत जाण्याकरि- तां निघाला तेव्हां श्रीकृष्ण नम्रतेनें राजास भाषण करतात हे धर्मराजा, तुला गांडीव धन्व्याची गांडीवा विषयीं विख्यात प्रतिज्ञा विदितच आहे. जो अर्जुनास असें म्हणेल कीं तूं आपलें गांडीव धनुष्य दुसऱ्यास दे त्या चा तत्काल तो वध करील, अशी त्याची प्रतिज्ञा असतां तूं आज त्यास- असें भाषण केलेंस यास्तव अर्जुनानें आपली प्रतिज्ञा रक्षण होण्या करतां माझ्या आज्ञेनें हा तुझा अपमान केला. यास्तव हे राजा, याची तूं- क्षमा कर, आतां आम्ही उभयतां तुला शरण आलों. पापी राधेयाचें र क्त आज पृथ्वी प्राशन करील, सूतपुत्र मेला असें प्रतिज्ञा पूर्वक सत्य सत्य तुला सांगतों. असें कृष्णाचें भाषण ऐकून धर्मराज मोठ्या संभ्र मानें कृष्णास उठऊन नंतर अंजली पुट जोडून त्यास भाषण करतो हे- गोविंदा, हें जें तूं भाषण केलेंस हें यथार्थ आहे हा सर्व अतिक्रम माझा च आहे. तूं आज आमचें समाधान करून दुःखा पासून मुक्त केलेंस; आ तां तुझ्या योगानें आम्ही सनाथ झालों. असा विषय या अध्यायांत आ

७१ अध्याय एकाहत्तरः– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कोणी पुरुष किंचित पापकर्म करून जसा खिन्न होतो तसें अर्जुनानें ध

र्मराजास अमर्याद भाषण करून तो खिन्न झाला. तेव्हां धर्मराजाचें प्रीतियुक्त भाषण ऐकून कृष्ण हांस्य करीत पार्थास बोलतो हे अर्जुना, तीक्ष्णधार खड्गानें तूं धर्मराजाचें शीर जरतोडतास तर आतां तुझी काय अवस्था झाली असती! तूं मोहानें धर्मास भीऊन ज्येष्ठभ्रात्याचा वध करतास तर घोर नरकांत मात्र पडतास. हे कुरुश्रेष्ठा, आतां धर्मवानामध्यें श्रेष्ठ जो धर्मराज त्यास भक्तीनें प्रसन्न करून घे. असें माझें मत आहे आणि त्वरेनें सूतपुत्रास मारून धर्मराजास आनंदितकर. असें कृष्णानें भाषण ऐकून अर्जुन धर्मराजाचे चरण धरून बोलतो हे राजा, माझावर प्रसन्न हो आणि अपराधाची क्षमाकर, असें भाषण करून अर्जुन रुदन करूंलागला तेव्हां युधिष्ठिरानें अर्जुनास उठून आलिंगन देत आपणही रडूं लागला. बहुतकाल पर्यंत उभयतां भ्राते रुदन करीत असतां एकमेकांस प्रेमें करून आलिंगन देत, शेवटीं धर्मराजानें अर्जुनाच्या मूर्ध्याचें अवघ्राण करून परम प्रीतीनें विस्मययुक्त असें भाषण केलें कीं, हे अर्जुना, कर्णानें माझें कवच, ध्वज, धनुष्य, शक्ती, रथाचे हय व बाण आपले बाणांनीं रणामध्यें छिन्नकेले. हें त्याचें दुष्कर कर्म पाहून मलातर बहुतच दुःखझालें आणिमी निश्चय केला कीं, आज आपलें जीवित्व ठेऊंनये यास्तव त्या दुष्टाचा आज तूं वध न करशील तर मी आपले प्राण ठेवणार नाहीं. असें युधिष्ठिराचें दीनभाषण ऐकून अर्जुन बोलतो हे धर्मराजा, मी आजसत्यानें अशि शपथ करतों कीं, तुझ्या प्रसादानें भीमसेन व नकुलसहदेव यां सहवर्तमान आजरणामध्यें कर्णाचा वध करून त्यास पृथ्वीवर पाडतों अथवा कर्णानें मला मारिलें असतां मी पृथ्वीवर पडेन, हें मी आयुध घेऊन शपथ पूर्वक सांगतों. असें धर्मराजास भाषण करून नंतरमाधवासबोलतो हे कृष्णा, आजरणा मध्यें मी निःसंशय कर्णास मारीन, तुझ्या बुद्धीनें आजत्या दुरात्म्याचा वध होईल, तुसें कल्याण असो. असें अर्जुनानें भाषण केलें असतां केशव बोलतो हे भरतश्रेष्ठा, महाबलवान कर्णास मारण्यास तूं समर्थ आहेस; मी निरंतर मनामध्यें अशी चिंता करतों कीं, तूं रणामध्यें कर्णाचा वध कसा करशील. असें पार्थास बोलून नंतर माधव धर्मराजास बोलतो हे राजा, अर्जुनाचें समाधान करू-

न दुरात्म्या कर्णाच्या वधाविषयीं तूं त्यांस आज्ञा देण्यास योग्य आहेस; हे पांडुनंदना, कर्ण बाणांनीं पीडित झालास हें आम्हीं ऐकून तुझें कुशल जाणण्या करतां उभयतां येथें आलों. हे राजा, आजतूं महत्भाग्यानें, कर्णाच्या हाताने मरण न पाऊन हस्तगतही झाला नाहींस; तर अर्जुनाचें समाधान करून याज पासून जयाची इच्छा कर. असें कृष्णाचें भाषण ऐकून युधिष्ठीर बोलतो- हे बिभत्सो, ये आणि मला आलिंगन दे, तूं जें बोलतांस तें हितकारकच आहे, तुझ्या भाषणाची मी क्षमा केली. माझा निश्चय आहे कीं, तूं कर्णाचा वध करशील, मी जें तुला कठोर भाषण केलें त्याचा कोप मानूं नको. असें भाषण ऐकून पुन्हा अर्जुनानें त्याचे चरणावर मस्तक ठेविलें. धर्मराज अर्जुनास उठऊन व त्याचे मूर्ध्याचें अवघ्राण करून त्यास बोलला कीं, तूं माझा बहुत सत्कार केलास; आतां तुझा सर्वत्र विजय होऊन महात्म्यही वाढेल. असें धर्मराजाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे राजा, आज कर्णास यमाकडे पोंचवितों त्या दुष्टानें बाणें करून तुला बहुत दुःखित केलें. हे राजा, आज कर्णासि मारल्या वांचून माघारा जाणार नाहीं हें मी तुझ्या पायांची शपथ करून बोलतों. असें किरीटीचें भाषण ऐकून युधिष्ठीर बोलतो हे धनंजया, तुला यश मास होऊन तुझें जीवन अक्षय असो, तुझें ईप्सित लवकर सिद्ध होऊन तूं जयशालि होशील, तुझा पराक्रमानें अरींचा क्षय असो, मी जशी तुझा हिताची इच्छा करतों तशी देव तुझी वृद्धी करोत, इंद्रानें आत्म वृद्धी करतां जसा वृत्रासुरास मारला तसा तूं आज सत्वर संग्रामामध्यें जाऊन कर्णास मार. असा विषय या अध्यायांत आ०

७२ अध्याय बाहत्तर:- संजय भाषण करतो हे राजा, धर्मराजाचें शांतवन केल्यावरून पार्थ कर्णवधाविषयीं उद्युक्त होऊन गोविंदास बोलतो कीं, माझ्या रथास अश्व जोडून लवकर सिद्ध कर. आयुधें व शस्त्रें सिद्ध कर, अश्वारोहांनीं शिक्षित केलेले अश्व रथास उपयुक्त करण्या करतां लवकर आणवावे. दुसरीं रथाचीं साहित्यें असतील तीं मोठ्या त्वरेनें सिद्ध करून सूतपुत्र वधा करतां लवकर चल. असें अर्जुनाचें भाषण ऐकून कृष्ण दारुकास बोलतो हे दारुका, धनुर्धार्‍यांमध्यें श्रेष्ठ अर्जुनानें रथसिद्ध करण्या विषयीं आज्ञा केली, त्याप्रमाणें व्याघ्रचर्मानें आच्छादित व शत्रूंस तापदायक असा रथ

सिद्ध कर. असें कृष्णानें भाषण ऐकून दारुकानें तत्कालरथसिद्ध करून अर्जुना च्या अग्रभागीं आणिला. हें पाहून अर्जुन धर्मराजाची आज्ञा घेऊन रथामध्यें आरूढ झाला असतां महाबुद्धिमान युधिष्ठिरानें अर्जुनास आशीर्वाद दिल्यानं तर अर्जुन कर्णवधार्थ गेला. हें पाहून संपूर्ण भूतमात्रांनीं असानिश्चय केलाकीं, आज अर्जुनानें कर्णाचा वध केला, अर्जुन निघाला त्याकालीं दिशास्वच्छ झाल्या, चाष, शतपुत्र व क्रौंच इत्यादि पक्षी अर्जुनाच्या सव्य मार्गानें गेले, कांहीं पुरुष वाची पुरुष्यांनीं आपले भाषेमध्यें अर्जुनास शुभकारक आशीर्वाद दिल्हे. अशी निमित्तें अर्जुनाच्या जयाविषयीं बहुत झालीं. कर्णाचा वध करण्याविषयीं अर्जुन जात असतां सैनिकजन अरीचा नाश कसा होईल ये विषयीं चिंताग्रस्त झाले. तेव्हां मधुसूदन अर्जुनास चिंताग्रस्त पाहून भाषण करतो हे- अर्जुना, आजपर्यंत जेजे योद्धे तूं रणामध्यें जिंकिलेस त्यांसजिंकण्यासतूं च योग्य, तुझ्यावेरीज दुसरा योद्धा या लोकीं कोण समर्थ आहे. द्रोण, भीष्म, भगदत्त, अवंती देशचे विंदानुविंद आदिकरून योध्यांच्या अग्रभागीं जाऊन माघारा कुशल येणारा तुझ्यावांचून कोणीनाहीं, तुझीं अस्त्रें दिव्य आहेत, तुझें हस्तलाघव बल अधीक आहे. तुझी नम्रता, अस्त्राचा वेध व लक्ष्याच्या ठायीं पात वयोग आहेत येणें करून चराचर जगतासहवर्तमान देव गंधर्वांचाही तूं वध करशील. तुलाजेंहितकारक असेल तें मला बोललें पाहिजे, हे महाबाहो, रणशोभि कर्णाचा तूं अवमान करूंनकोस, कर्णही बलवान, कृतास्त्रविद्य, चित्रविचित्र युद्ध करणारा आहे. फारतर मीकाय भाषण करूं; परंतु कर्णही तुझ्यासारिखाच योद्धा आहे, किंबहुना- तुझ्याहून अधीक आहे यास्तव मोठ्या यत्नानें त्याचा तूं वध कर. तो युद्धांत शत्रूस दुर्जय, अभिमानी मित्रास अभयकारी. निरंतर कुलाचा द्वेष्टा धृतराष्ट्र पुत्राचा हितेच्छु असा आहे. इंद्रादि देवानींही राधेय युद्धामध्यें अवध्य आहे, परंतु तूं त्याचा वध करशील, अशी माझी निश्चित बुद्धि आहे यास्तव तूं आज त्यास मार. ज्या कर्णाच्या वीर्याश्रयें करून धृतराष्ट्रपुत्र तुझ्या वीर्याचा अपमान करतो त्या कर्णाचा तूं वध कर आणि धर्मराजाची प्रीती संपादन कर. असा विषय या अध्यायांत आहे.

७३ संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, पुन्हा श्रीकृष्ण भाषण करतात हे अर्जुना, गजाश्वनर यांच्या घोर नाशास आरंभ होऊन आजचा सत्रावा दिवस आहे. युद्धाच्या आरंभीं तुमची व शत्रूंची सेना बहुत होती ती परस्पर युद्ध करतां करतां क्षयास जाऊन अवशिष्ट कांहीं राहिली आहे. पांचाल, मत्स्य, कारुष व चेदी यांचें आजपर्यंत तूं रक्षण करून शत्रुगण क्षयास नेला स; महारथी पांडवांस तूं रक्षण केल्यामुळें ते कौरवांस जिंकण्यास समर्थ झाले. भगदत्त नामक राजाचा वध करण्यास तुझ्यारवेरीज दुसरा कोण या सैन्यांत समर्थ होता? त्यानें बलतर केवळ इंद्रासाररवें होतें. तूं रक्षण केलेल्या धृष्टद्युम्न व शिखंडीनें शक्रासाररवे पराक्रमी जे भीष्मद्रोण यांस पाडलें, हें तरी तुझ्या साहय्यानें झालें, नाहींतर ह्या भीष्मद्रोणाचा वध करण्यास कोण समर्थ होता? उग्रकर्मे, तुषार, यवन, खश, म्लेंच्छ, पार्वतीय व सागरानुपवासी, दंडपाणी आदिकरून योद्धे दुर्योधनाच्या हिताकरतां कौरवां सहवर्तमान आले असतां त्यांस रणामध्यें जिंकण्यास तुझ्या वांचून कोणी समर्थ नवता. मागध देशाचा राजा जयत्सेन मोठा बलिष्ठ असतांही अभिमन्यूनें त्याचा प्राण घेतला यास आजच सात दिवस झाले, त्या राजाचे महाभयंकर असे दहा सहस्र गज होते ते भीमसेनानें गदेंकरून नष्ट केले. तसेंच शाना वधी गजाश्व रथ्यांचा भीमसेनानें गदेनें नाश केला. असा संग्राम होत असतां कौरवांकडील अश्व, रथ, मातंग यमलोकीं गेले. तसेच सेनामुरवाचे ठायीं पांडवांनीं मारलेले वीर यमलोकीं गेले. भीष्माच्या चापापासून सुटलेल्या बाणांनीं आकाश व्याप्त झालें, भीष्मानें एक एका मुष्टीनें प्रासझालेले महाबलवान् लक्षसंरव्याक गज व नर मारले, युद्धाच्या दुष्टनवगती टाकून दहाव्या गतीनें ते वीर शत्रूंच्या गजवाजीरथ्यांस मारीत असतां भीष्मानें दहाव्या गतीनें तेथें जाऊन त्यांजवर बाणवृष्टी केली, दहा दिवस तुझ्या सैन्यास मारणाऱ्या भीष्मानें कितीएक रथोपस्थ शून्य केले व गजवाजी मारले. भीष्मानें युद्धामध्यें आपलें रूप रुद्र व उपेंद्रा साररवें दारवऊन पांडव सैन्यास व्यापून त्याचा नाश केला. रणामध्यें भीष्म फिरत असतां संजयाचे कोट्याक्रधी पदाती व अन्य राजे हस्तांत शस्त्रें घेऊन त्या जयशालि भीष्मास रणामध्यें पाहण्यास समर्थ झाले नाहींत, त्या भीष्मास तूं रक्षण के

लेल्या शिखंडीनें सन्नतपर्व बाणें करून मारला. तोहा पितामह अद्यापशर शय्येवर शयन करून आहे. उग्रद्रोणाचार्यानें पांचदिवस शत्रूचें मर्दन करून व अभेद्य व्यूहकरून महारथ्यांस पाडिलें, तसेंच रणामध्यें आपल्या पराक्रमानें जयद्रथाचें रक्षण करून अंतका साररख्या उग्ररूपानें रात्रीं युद्धाचे ठायीं तुमचेंसैन्यदग्ध केलें तेव्हां धृष्टद्युम्नानें त्यास मारलें. सूतपुत्र प्रमुखरथ्यांचें निवारणतूंनकरतास तर आजद्रोण मरण नपावता, हे अर्जुना, तूंजयद्रथाच्या सैन्याचें निवारण करून अन्यशूरांस मारून अस्त्रतेज बलानेंजयद्रथाचा वधकेलास; हें तुझें कर्म पाहून संपूर्णराजे आश्चर्य करतात, परंतु हे पार्था, तूं महारथी आहेस म्हणून तुझाया कर्माचें आश्चर्यनाहीं. ज्याकालीं भीष्मद्रोण मरणपावले त्याकाला पासून ही धार्तराष्ट्राची घोरसेनासर्वनष्ट झाली, असें मी मानितों. अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्ण, मद्रराज आणि कृपाचार्य हे पांच महारथी अवशिष्ट राहिले आहेत; तर हे नरव्याघ्रा, तूं आजत्यांस मारून आकाश, जल, पाताल, पर्वत, महावनें, द्वीपें व पुरें यांसहवर्तमान हतशत्रु झालेली पृथ्वी धर्मराजास अर्पण कर. हे अर्जुना, मनुष्यांमध्यें श्रेष्ठजो द्रोणाचार्य यास गुरू असें समजून अश्वत्थाम्याचे ठायीं तुझी कृपा आहेतशीच आचार्यत्वें करून वरलेल्या कृपाचार्याचे ठायीं तूं दया करतोस; मातृबांधव सन्निध आले असतां त्यांस व कृतवर्म्यास व मद्राधीप शल्यास मातृबंधु असें समजून त्यांजवर दया करून त्यांस जरन मारशील तर पांडवांविषयीं पापमती धरणारा जो कर्ण यास आज संग्रामामध्यें कसामारशील! हें तुलायोग्यदिसत नाहीं. तूं कर्णाचा वध करीत असतां तुला कांहीं दोषलागणार नाहीं, सपुत्राजी तुझीमाता इचादाह करण्यास दुर्योधन प्रवृत्त झाला व तुम्हांशीं त्याणीं द्यूत केलें या सर्वांस मूळ दुष्टात्मा कर्ण आहे, आपलें रक्षण निरंतर कर्णापासून आहे. असें सुयोधनानें मानून मलाही बंधन करण्याचा त्याणें विचार केला होता, तुझें बल किती आहे हें दुर्योधनास ज्ञात असतां कर्णाच्या आश्रयानें तुम्हांशीं त्याणें कलह केला. कर्ण निरंतर असें भाषण करतो कीं, संग्रामामध्यें पांडव व वासुदेव आले असतां मी त्यांस जिंकीन, अशा वल्गनेनें कर्ण, अत्यंत दुर्मती जो दुर्योधन यास उत्तेजन देऊन गर्जना करतो या

स्तव आज तूं त्यास रणामध्येंमार. द्रोण, अश्वत्थामा व कृपाचार्य यामनुष्यश्रेष्ठवीरांस आकर्षण करणारामहारथी आश्वांस स्वारहीन व पदात्यांस आयुध व जीवितहीन करणारा व बाणेंकरून सेनेस दहन करीत येणारा अभिमन्यु यास षड्रथ्यांनीं दुर्योधनाच्या आज्ञे वरून मारला तें त्याचें कर्म माझा गात्रांस दहन करतें, दुष्टात्म्या कर्णानें तुम्हांशीं द्रोह केला, परंतु तो रणामध्यें अभिमन्यूच्या पुढें उभा राहण्यास असमर्थ होऊन बाणांनीं पीडित झाल्यामुळें विमुख झाला. त्याकाळीं त्या प्रसंगा सारखें द्रोणाचार्याचें क्रूरभाषण ऐकून त्यानें अभीमन्यूचें धनुष्य छिन्न केलें. नंतर अभिमन्यूस कपटबुद्धी पांचमहारथ्यांनीं कर्णासहवर्तमान मारला. त्याकाळीं दुरात्म्या कर्णानें व दुर्योधनानेंहांस्य केलें, या दुष्ट कर्णानें सभेमध्यें कौरव व पांडवांच्यासमक्ष द्रौपदीस घातुका सारखें असें कठोर भाषण केलें कीं, हे कृष्णे, तुझे पती पांडव नष्टहोऊन शाश्वत नरकांत गेले आतां तूं दुसराप पती कर आणि दुर्योधनाच्या गृहांतजा. हे भारता, असाजो पापी व दुर्मती. कर्ण याणें तूं ऐकत असतां जें पापरूप भाषण केलें त्यापापी कर्णाच्या भाषणास आजतुझे बाणशांत करोत; तुझाभुजनिर्मुक्त महाबाण कर्णाच्या वर्माचा भेदकरून त्यास यमगृहीं पाठवोत, तूं भल्ल बाणें करून उन्मथित केलेला ध्वज कंपित होत भूमीवर पडो, तूं शतावधी बाणांनीं छिन्न केलेला शल्य भयाभीत होऊन पळो, तूं कर्णास मारलेला पाहून तुझा अरि दुर्योधन आपले जीविता विषयीं निराशा होवो, पांचाल, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, शिखंडी, धृष्टद्युम्नाचे पुत्र, नकुलपुत्र शतानीक, नकुल, सहदेव दुर्मुख, जनमेजय, सुधर्मा व सात्यकी, हे कर्णा वश झाले असें जाण. हे परंतपा, रणामध्यें आज कर्णानें तुझा बांधव, पांचाल यांस ताडित केलें असतां त्यांचाहा घोर नाद ऐकू येतो, पांचालजरी भ्याले तथापि अद्याप युद्धपराङ्मुख झाले नाहींत; ज्याभीष्मानें बाणांच्या ओघानें पांडवांच्या सैन्यास पीडितकेलें तथापि ते पांचाल पराङ्मुख झाले नाहींत, ते महारथी कर्णास भीऊन युद्धपराङ्मुख कधींही होणार नाहींत. पांचाल वेगानें कर्णावर येत असतां कर्णानें त्यांचे प्राण घेतले. यास्तव हे अर्जुना, नौका ही न कर्णा-

र्णवामध्यें महाधनुर्धारी पांचाल बुडतात त्यांस तूं नौका होऊन तार, ऋषिश्रेष्ठ भार्गवरामापासून कर्णानें जें घोर अस्त्र संपादन केलें, तें हें अस्त्र महासेनेस वेष्टन करतें. हे भारता, अविचारी पुरुषांस रणामध्यें कर्णाचें अस्त्र दुर्निवार्य आहे यास्तव सर्व दिशांचे ठायीं पांचाल पलायन करतात, भीमसेन आसमंताद्भागीं सृंजयानीं वेष्टीत असतां कर्णाशीं युद्ध करतो, परंतु तो तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झाला आहे. युधिष्ठीरसेनेमध्यें तुझ्याहून अन्य योद्धा कर्णापुढें जाऊन माघारा येईल असा मी कोणी पाहत नाहीं यास्तव हे पार्था, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तूं कर्णास तीक्ष्ण बाणांनीं मारून कीर्ती मिळव. असा विषय या अध्यायां० आ०

७४ अध्याय चवऱ्याहत्तर:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन हर्षितांतःकर्णानें गांडीव धनुष्याच्या प्रत्यंचेसह स्पर्श करून व कर्णवधाच्या निश्चयानें गांडीव धनुष्याचा टणत्कार करून केशवास बोलतो हे गोविंदा, तूं आमचा नाथ आहेस यामुळें आमचा जयच आहे. हे जनार्दना, ही पांचालांची सेना पळते ती व रणामध्यें निर्भयपणें संचार करणारा कर्ण व कर्णानें सोडलेलें भार्गवास्त्र जाज्वल्यमान झालेलें मी पाहतों. हे कृष्णा, आज माझे गांडीव निर्मुक्त बाण कर्णास मृत्युगृहीं नेतील, दुर्योधन राज्यास अयोग्य असून मी राज्यावर अभिषेक केला असा धृतराष्ट्र आपल्या बुद्धीचा अवमान करील, आज कर्ण मरण पावला असतां दुर्योधन राज्यसुख, श्री, नगर व जीवित यांपासून निराश होईल, हें मी तुला सत्य सांगतों. हे कृष्णा, आज हा सौबल माझ्या बाणांस सोंगटीं, गांडीव धनुष्यास फांसे व रथास पट असें जाणो, आज मी कर्णास तीक्ष्ण बाणांनीं मारून कुंतीपुत्र धर्मराजाचा प्रजागर दूर करीन. हे केशवा, आज असा एक अप्रतिम व अनिवार्य शरांचा प्रयोग करतों कीं, त्या शरांच्या योगें कर्ण जीविता पासून भ्रष्टच होईल, दुरात्म्या कर्णाचें असें व्रत आहे कीं, अर्जुनाचा वध केल्यावांचून पादप्रक्षालन करणार नाहीं, तें पाप्याचें व्रत आज मी मिथ्या करून सन्नत पर्व बाणांनीं-त्याचें शरीर रथापासून खालीं पाडतों. सभेमध्यें पांडवांची निंदा करून पांचालीस जें राधेयानें क्रूरभाषण केलें त्या भाषणानें आज तो पश्चात्ताप पावेल, सुहृज्जनासह वर्तमान कर्णास रणामध्यें मारलां असतां आज दुर्यो-

धन.राजा शोक करो, हे केशवा, आज माझ्या बाणांनीं छिन्न झालेल्या क-र्णाच्या गात्रांस मांस भक्षण करणारे चक्रवाकादि पक्षी आकर्षण करतील. आज मी रणामध्यें राधापुत्राची गात्रें छिन्न केली असतां ती अस्ता व्यस्त होऊन पडतील. हे कृष्णा, युद्धामध्यें दीन झालेल्या कर्णसेवकास अग्नी सारख्या जाज्वल्यमान व सर्पविषोपम बाणांनीं मारीन. आज सर्व अभिमन्यूच्या शत्रूंचीं शिरें व गात्रें तीक्ष्ण बाणांनीं मथन करीन व तेरा वर्षें पर्यंत कौरवांच्या कोपाचें जें आम्हीं दुःख सहन केलें त्या दुःखाचा आज गांडीव धनुष्या पासून स्फुरलेल्या बाणांनीं त्याग करीन आणि धनुर्धारी वीरांच्या ऋणापासून मुक्त होईन. मी महारथी पुत्रांसह वर्तमान कर्णास मारून भीमसेन, नकुल, सहदेव, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी व पांचाल यांस प्रीती देईन आणि त्यांचा आज रणामध्यें अनृणी होईन, मी कर्णाचा वध केल्या नंतर तुझ्या अग्रभागीं येऊन आत्मस्तवन करीन कीं, लोकामध्यें धनुर्वेदाविषयीं व पराक्रमाविषयीं माझ्यासारखा कोणी नाहीं, हें माझें सबाण दिव्य धनुष्य सज्ज आहे, माझे चरण केवळ सध्वज, सरथच आहेत असा जो मी वीर याचा कोणी पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं, असें अर्जुनानें केशवास भाषण करून रणामध्यें भीमसेनास मुक्त करण्याच्या इच्छेनें व कर्णाच्या देहापासून त्याचें शीर हरण करण्याच्या इच्छेनें प्रयाण केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७५ अध्याय पंचाहत्तरः— धृतराष्ट्र प्रश्न करतो हे संजया, पांडव सृंजयांचा व माझ्या वीरांचा महाभयंकर समागम झाला असतां कर्णाशीं युद्ध करण्या करतां धनंजय आल्या नंतर उभयतांचें कसें युद्ध झालें तें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, महान् महान् ध्वजयुक्त रथ ज्या सैन्यामध्यें तीं उभयतांचीं संमृद्ध सैन्यें एकत्र मिळालीं असतां तीं गर्जना करूं लागलीं. त्याकालीं प्रजांचें संहार करणारें युद्ध झालें, एका रथ्यास अनेक रथ्यांनीं मृत्यु लोकीं नेलें, एका गजानें बहुत रथ्यांस व अश्वांस मृत्यूच्या स्वाधीन केलें. अर्जुनानें सस्त, सहय ध्वज सर्व शत्रूंच्या सैनिकांस बाण ओघानें मृत्यूच्या स्वाधीन करून स्वारां सह वर्तमान हयांस व पदाती.

संघांस मृत्यूच्या स्वाधीन केलें, कृपाचार्य व शिखंडी हे रणामध्यें एकत्र झाले. सात्यकी, दुर्योधनाशीं, श्रुत अश्वत्थाम्याशीं, युधामन्यु चित्रसेनाशीं युद्ध करूं लागले. कर्ण पुत्र सुषेणावर उत्तमौजा व सहदेव गांधार राजावर धांवला, नकुलपुत्र शतानिकानें कर्णपुत्र वृषसेनास व वृषसेनानें द्रौपदीपुत्र शतानिकास अनेक बाणांनीं व्याप्त केलें, माद्रीपुत्र नकुलानें कृतवर्म्यास, धृष्टद्युम्नानें कर्णास, दुःशासनानें भीमसेनास ताडण केलें. त्या रणांत उत्तमौजानें कर्णपुत्र सुषेणाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. हें पहा तांच कर्णानें तीक्ष्ण उत्तम धारेच्या बाणांनीं उत्तमौजाच्या रथाचे अश्वांस व बाजू संरक्षण करणाऱ्या वीरांस मारून त्याणें शिखंडीच्या रथामध्यें आरोहण केलें. त्यासमयीं शिखंडीनें आपण रथस्थ असतां कृपाचार्य विरथी झालेला पाहून बाणवृष्टी केली नाहीं, द्रोणीनें शिखंडीचें निवारण करून कृपाचार्याचें उद्धरण केलें, भीमसेनानें तीक्ष्ण पृषत्क बाणांनीं तुझ्या पुत्राच्या सैन्यास बहुत पीडित केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

७६ अध्याय शाहत्तरः- संजय भाषण करतो हे राजा, शत्रूशीं भयंकर संग्राम झाला असतां भीमसेन त्या महारणामध्यें आपले सारथ्यास भाषण करतो हे सारथे, धृतराष्ट्र पुत्राच्या सैन्यामध्यें मला घेऊन चल म्हणजे मी धार्तराष्ट्रांस यमलोकीं नेतों, अशी आज्ञा होतांच सारथी तिकडे गेला. नंतर कौरवांकडील वीरानीं गजाश्व पदाती सहवर्तमान भीमसेनावर जाऊन त्याच्या उदार वेगवाहनास बाणें करून आसमंताद्भागीं ताडण करून त्याजवर बाण टाकिले असतां भीमसेनानें आपल्या सुवर्णमय बाणांनीं त्या आलेल्या बाणांचें छेदन करतांच ते सुवर्णपुंखाचे बाण छिन्न होऊन पडले. हे राजा, त्याकालीं मुख्य मुख्य राजे भीम बाणांनीं वध्यमान व भिन्न होऊन भीमसेनावर आले. त्यासमयीं प्रलयकालीं सर्वभुतांचा नाश करणारा कालदंड घेऊन प्रजेस दहन करून नाश करीत जसा येतो तसा भीमसेनानें मोठा वेग प्रगट केला. तेव्हां अंतकालचा, मुखपसरलेला, प्रजासंहार करणारा कालयेत असतां त्याच्या वेगास सहन करण्यास प्रजा जशा समर्थ होत नाहींत तसे तुझे वीर रणामध्यें त्या भीमसेनाच्या अती वेगाचें सहन करण्यास समर्थ न होऊ

न दाही दिशेस पळाले. पुनः भीमसेन आपल्या सारथ्यास बोलतो कीं, हे सारथे, स्वकीय व परकीय रथध्वजहे आसमंताद्भागीं येणारे दिसतात, यांस तूं ओळखून मला सांग. मी तर युद्धामध्यें निमग्न आहें. कदाचित् मी आपल्या सैन्यास पृषत्क बाणांनीं ताडन करीन अशाविचारानें हे विशोका, तूं शत्रूचीं ध्वजाग्रें व रथ पाहून तेथें मला ने म्हणजे मी त्यांस दुःखित करीन. हे सूता, किरीटी ज्या पेक्षां अद्याप येत नाहीं त्या पेक्षां मी बहुत दुःखांत निमग्न आहें; धर्मराज शत्रुगणांच्या मध्यभागीं मला टाकून गेला, तो जिवंत आहे किंवा नाहीं हें मला कांहींच कळत नाहीं; यास्तव मला बहुतच दुःख झालें आहे. आतां मी तेजःपुंज शत्रुसैन्याचा नाश करतों आतां आपल्या रथावर तुणीरें व कोणच्या जातीचे, कोणच्या प्रमाणाचे किती सायक अवशिष्ट आहेत तें मला सांग. असें ऐकून विशोक बोलतो हे भीमा, मार्गण संज्ञक बाण सहा अयुत आहेत, क्षुर व भल्ल बाण अयुत आहेत, नाराच बाण दोन सहस्त्र व प्रदर संज्ञक बाण तीन सहस्त्र आहेत, याशिवाय आपल्या पाशीं जीं आयुधें अवशिष्ट राहिलीं आहेत त्यांस सहा बैलांचा एक शकट नेईल. हें जाणून तूं सहस्त्रशः बाण सोड याशिवाय गदा, खड्ग, तुझें बाहुबल, प्रास, मुद्गर, शक्ती व तोमर हीं आहेत. हे भीमा, आयुधांचा क्षय झाला म्हणून तूं कांहीं भीऊं नकोस; असें विशोकाचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे सूता, आज लहाना पासून मोठ्या पर्यंत असें कळेल कीं, एकटा भीमसेन रणामध्यें बुडाला किंवा एकट्यानेंच सर्व कौरव रणामध्यें जिंकिले. रणामध्यें सर्व कौरव पडून कुमारापासून सर्वलोक माझें कीर्तन करोत; मी एकटा त्यास वांस पाडीन किंवा ते सर्व भीमसेनाचें छेदन करोत. हे सर्व नरेंद्र पलायन करतात, याज वरून असें वाटतें कीं, निश्चयें करून सव्यसाची या सैन्यास शीघ्र बाणांनीं आच्छादन करीत आहे, सर्व कौरव मोहित होऊन दावाग्नीस भ्यालेल्या गजांसारखे पळतात व महान् महान् गज हा हा कार करीत शब्द करतात. असें भीमसेनाचें भाषण ऐकून विशोक बोलतो हे भीमसेना, अर्जुन क्रुद्ध होऊन वारंवार घोर गांडीवाचा टणत्कार करतो हें तूं ऐकत नाहींस काय? आज तुझे हे दोन कर्ण बधिर झाले नाहींत ना? विद्युल्लते सारखी गांडी

व धनुष्याची प्रत्यंचा दिसते धनंजयाच्या ध्वजाग्रीं हा कपि आरोहण करून चोंहीकडे पहात रणामध्यें शत्रुसंघास त्रास देतो. या कपीस पाहून तूं भय पावशील, हा धनंजयाचा चित्रविचित्र किरीट बहुत शोभायमान दिसतो त्या किरीटावर हा दिवाकरासारखा मणी अत्यंत सुशोभित दिसत आहे, परसैन्यामध्यें जाणाऱ्या अश्वरश्मी धारण केलेल्या जनार्दनाच्या पार्श्वभागीं पांडुराभ्र प्रकाशमान, उत्तम घोषाचा भयंकर देवदत्त शंख व यादवांनीं निरंतर पूजित केशवाचें यशोवर्धक चक्र तूं पहा, किरीटीनें क्षुरप्रबाणें करून छिन्न केलेल्या महागजांच्या शुंडा पडतात, वज्रानें छिन्न केलेल्या पर्वतासारखे बाणांनीं छिन्न होऊन हे स्वारां सहवर्तमान अश्व पडतात हे पहा. हे कौंतेया, हा महायोग्य चंद्रवर्ण कृष्णाचा पांचजन्य शंख व उराचे ठायीं जाज्वल्यमान् कौस्तुभ मणी व वैजयंतीमाळा कशी शोभते ती पहा. रणामध्यें किरीटीनें अश्व व सारथ्या सहवर्तमान मारलेले हे चारशें रथी व महाबाणांनीं मारलेले सातशें दंती व अनेक बाणानीं मारलेले पदाती वसारि पहा, तुझे शत्रु मरण पावले, तुझा बलास व आयुष्यास चिरकाल वृद्धी असो. असें सूताचें भाषण ऐकून भीमसेन बोलतो हे विशोका, अर्जुन आला म्हणून ज्यापेक्षां तूं मला प्रियाख्यान सांगीतलेंस त्यापेक्षां मी प्रसन्न होऊन ग्रामामध्यें उत्तम असे चौदा ग्राम, शंभर दास, वीस रथ तुला देतों. असा विषय या अध्यायांत आहे.

७७ अध्याय सत्याहत्तर:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, संग्रामामध्यें रथनिर्घोष व सिंहनाद ऐकून अर्जुन गोविंदास बोलतो हे गोविंदा, माझा अश्वांस प्रेरणा कर. असें अर्जुनाचें भाषण ऐकून गोविंद बोलतो हे अर्जुना, जेथें भीमसेन उभा आहे तेथें मी त्वरेनें जातों. असें बोलून गोविंद विजया सहवर्तमान जात असतां उग्रमन्यु वज्रहस्त विजयास पाहून रथाश्व मातंग व पत्ती सहवर्तमान त्याजवर आले. तेव्हां त्यांचें व पार्थाचें मोठें युद्ध झालें. त्या वीरानीं टाकलेलीं उंच नीच शस्त्रें एकट्या अर्जुनानें क्षुरप्र, अर्धचंद्र व तीक्ष्ण भल्ल बाणांनीं छिन्न करून त्यांचीं शिरें, बाहु, छत्रें, वालव्यजनें, केतु, अश्व, रथ, पत्तीगण व द्वीप यांचें छेदन केलें असतां ते पृथ्वीवर पडले. नंतर अर्जुन कर्णास मारण्याच्या इच्छेनें सैन्यांत गेला. त्याकाळीं त्या

स पाहून तुझे रथ व पती सहवर्तमान गजाश्व सादींचे बहुत वीर त्याजवर-
धांऊन बाणवृष्टि करीत असतां अर्जुनानें त्या सैन्यास उडविलें. त्या धनुष्यधा
रण करणाऱ्या योध्यांनीं अर्जुनास वेष्टून तीक्ष्ण बाणांनीं वेध केला. नंतर अ-
र्जुनानें सहस्त्रावधी रथाश्व, गज विशिख बाणांनीं यमलोकीं पाठविले व
कित्येक पार्थ बाणांनीं वध्यमान झालेले महारथी भयाभीत होऊन ठिक
ठिकाणीं लपून राहिले, त्यांतून चारशें महारथ्यांचे वीर प्रयत्नानें अर्जुना
वर येत असतां अर्जुनानें तीक्ष्ण बाणें करून त्यांस यमलोकीं पाठविलें, संग्रा
मा मध्यें अर्जुनानें नानाचिन्हांच्या तीक्ष्ण बाणांनीं वध्यमान केलेले वीर त्या
स टाकून दाही दिशेस पळाले. हे राजा, असा अर्जुन तुझ्या सैन्यास तीक्ष्ण
बाणांनीं वेध करून व त्यास पळवून सूतसैन्याच्या सन्मुख गेला. पार्थ ये
तो असें ऐकून भीमसेन आपल्या प्राणाकडे न पाहतां तुझ्या सैन्याचें मर्दन-
करूं लागला असतां पीडित झालेली सेना सागरामध्यें भिन्न झालेल्या नौ
केसारखी भिन्न झाली. त्याकाळीं राजा दुर्योधन आपल्या सेनेंतील योध्यां-
स असें बोलला कीं, अरे, भीमास मारा तो मेला म्हणजे अवशेष पांडवांचें
सैन्य मरण पावलें असें मी मानितों. अशी तुझ्या पुत्राची आज्ञा होतांच त्या यो
ध्यानीं बाण वृष्टीनें भीमसेनास आसमंताद्भागीं आच्छादित केला. तेव्हां तो
नक्षत्र वेष्टित चंद्रमासारखा शोभूं लागला. त्याकाळीं भीमसेनानें अर्जुना
सारखें निर्विशेष युद्ध केलें असतां ते सर्व शूर पार्थीव क्रोधानें वृकोदरास
मारण्याच्या इच्छेनें त्याजवर बाण वृष्टी करूं लागले. त्याकाळीं भीमसेन स
न्नत पर्व तीक्ष्ण बाणांनीं महासेनेस विदारण करून रणांतून बाहेर आ-
ला आणि त्यानें दहा सहस्त्र गज, दोन लक्ष दोनशें नर, पांच सहस्त्र अश्व, व
एकशत रथी यांस मारून योध्यांस पितृलोकीं वहन करणारी, भीरूंस भ-
य वृद्धी करणारी अशी नदी उत्पन्न केली, जिकडे जिकडे भीमसेनानें प्रवेश
केला तिकडे तिकडे लक्षावधी योद्धे पाडले. हे महाराज, असें भीमसेनानें र
णामध्यें कर्म केलेलें पाहून दुर्योधन शकुनीस बोलला हे मातुला, संग्रामा-
मध्यें भीमसेनच मोठा बलवान आहे, यास तूं जिंकिलें असतां सर्व पांडवां-
चें सैन्य जिंकिलें असें मी मानितों. असें दुर्योधनानें भाषण ऐकून शकुनीनें

बंधुसहित रणामध्यें जाऊन भीमसेनाचें निवारण केलें. भीमसेनानेंही तीक्ष्ण बाणें करून त्याचें निवारण केलें. असें उभयतांचें नाना प्रकारें युद्ध होत असतां भीमसेनानें रणामध्यें सुवर्ण दंड युक्त लोहमय शक्ती शकुनीवर टाकिली असतां ती शकुनीवर येतांच शकुनीनें तीच कनक भूषित शक्ती भीमसेनावर फेंकली; तेव्हां ती भीमाच्या सव्य भुजास भेदून पृथ्वीवर पडली. भीमसेनानें दुसरें धनुष्य सज्ज करून आपल्या देहाकडे न पाहतां एक मुहूर्तांत शकुनीच्या सैन्यास बाणांनीं आच्छादित करून त्याच्या रथाचे चारी अश्व व सारथी मारून भल्ल बाणानें ध्वजाचें च्छेदन केलें असतां शकुनीनें भीमसेनास आसमंताद्भागीं ताडण केलें. भीमसेनानें शकुनीस बाणांनीं ताडण करून त्याचें धनुष्य च्छिन्न करून तीक्ष्ण बाणांनीं पुन्हा वेध केला. शकुनी किंचित् प्राणशेष असतां भूमीवर पडला तेव्हां त्यास तुझा पुत्र दुर्योधन यानें भीमसेन पहात असतां रथामध्यें बसवून रणांतून नेला. तेव्हां धृतराष्ट्रपुत्रांस भय झाल्यामुळें ते पळाले. तुझा पुत्र दुर्योधन महाभययुक्त होऊन मातुल जिवंत राहण्याच्या इच्छेनें पळाला. हें पाहून सर्व सेनेतील वीर आसमंताद्भागीं द्वैरथ युद्धाचा त्याग करून कर्णाच्या आसमंताद्भागीं उभे राहिले. नंतर भीमसेन शतशः बाण त्याजवर टाकीत त्याच्यामागें गेला. हे पुरुषव्याघ्रा, कालपर्यंत यानें नौकाश्रयें करून जसे जन स्वस्थ होतात तसे तुझे वीर कर्णाश्रयानें स्वस्थ होऊन आनंदानें मृत्यूचें भय न बाळगतां युद्धास समाजानें आले. असा विषय या अध्यायांत आहे.

७७ अध्याय अठ्याहत्तर :— धृतराष्ट्र भाषण करतो हे संजया, युद्धामध्यें भीमसेनानें आमचें सैन्य भग्न केल्यावर दुर्योधन काय बोलला? शकुनी, कर्ण, कृपाचार्य, कृतवर्मा, द्रोणपुत्र, दुःशासन व आमच्या कडील योद्धे यानीं काय केलें? एकट्या भीमसेनानें आमचे योद्धे बहुत मारिले हा त्याचा पराक्रम अद्भुत आहे असें मी मानितों. राधेयानें योध्यांमध्यें जशी प्रतिज्ञा केली त्याप्रमाणें आचरण केलें, सर्व कुरूंचें कल्याण करणारा व आमचा सर्व जीवित आशा कायतो कर्ण आहे यास्तव कौंतेयानें आमचें सैन्य-भग्न केलेलें पाहून कर्णानें काय केलें? तसेंच माझे पुत्र व मोठमोठे क्षत्रिय-

यानीं काय केलें हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करतो हे राजा, सूतपुत्रानें अपराण्ह कालीं भीमसेनाचे समक्ष सोमकांचा वध केला. भीमसेनानें दुर्योधनाच्या सैन्याचा बहुत नाश केला. त्याकाली कर्ण शल्यास असें बोललाकीं, हे शल्या, भीमसेनानें आमचे सैन्याचा नाश केला यास्तव माझा रथ आतां पांचालाकडे ने असें कर्णानें भाषण ऐकून शल्यानें रथ पांडव सैन्याकडे नेला तेव्हां कर्णानें चेदी, पांचाल व महाबलि करुष यांचें मर्दन करून पांडवांच्या महासैन्यांत प्रवेश केला. युद्धाविषयीं ज्याज्या स्थळीं कर्णास जाण्याची इच्छा होई त्यात्या स्थलीं मोठ्या धैर्यानें शल्य रथ नेई. कर्णाच्या रथाचा नाद ऐकून पांडव व पांचाल मोठे त्रस्त झाले. कर्णानें शतशः तीक्ष्ण बाणांनीं पांडवांचें सहस्त्रावधि सैन्य नष्ट करून टाकिलें असतां तें कर्णाचें कर्म पाहून शिखंडी, धृष्टद्युम्न, भीम, नकुल, सहदेव, द्रौपदेय व सात्यकी या पांडवांकडील महारथ्यांनीं कर्णास आसमंताद्भागीं वेढून त्याजवर शरांची वृष्टी केली. सात्यकीनें वीस, शिखंडीनें पंचवीस, धृष्टद्युम्नानें सात, द्रौपदेयानीं चौसष्ट, सहदेवानें सात व नकुलानें शंभर याप्रमाणें बाणांनीं कर्णास ताडीत केलें. भीमसेनानेंही नब्बद बाणांनीं कर्णास ताडण केलें तव्हां कर्णानें धनुष्याचा शब्द करून निशित बाणानीं त्या योध्यांस अत्यंत पीडित करून प्रत्येक प्रत्येक योध्यावर पांचपांच बाण टाकिले, सात्यकीचें धनुष्य व ध्वज तोडून नऊ बाणांनीं त्यास स्तनांतरीं ताडित केला. नंतर क्रुद्ध होऊन तीस शरानीं भीमास ताडित केलें, एक भल्लाकार बाणानें सहदेवाचा ध्वज तोडून तीन बाणांनीं सारथी मारला. तसेंच द्रौपदेयांस विरथी केलें. असें कर्णानें एक निमिष मात्रांत अद्भुत कृत्य केलें. कर्ण पांडवांकडील योध्यांस आपल्या बाणांनीं विमुख करून पांचाल व चेदी यांचें हनन करूं लागला तेव्हां ते वध्यमान झालेले चेदी व मत्स्य वीर यांणीं कर्णावर धांऊन येऊन शरांची वृष्टी करतांच सूतपुत्रानें निशित बाणांनीं त्यांचा वध केला. पांडवांकडील योद्धे कर्णाशीं युद्ध करीत असतां कर्णानें आपल्या हस्तलाघवें करून त्यांचें निवारण केलें; हें कर्णानें अद्भुत कर्म पाहून सर्व देवांनीं त्याची स्तुति केली. कर्ण बाणानीं पांडव वध्यमान होऊन इतस्ततः पळूं लागले, कर्णानें पांडवांकडील कित्ती एक योध्यांचीं शिरें

कुंडला सहवर्तमान कर्ण व बाहु आपल्या हस्त कौशल्यानें छिन्न करून टा किले.तसेंच खड्ग, ध्वज व शक्ति छिन्न केल्या. हय, गज, नाना प्रकारचे रथ; पताका छिन्न करून टाकिल्यानंतर पांडवांकडील योद्धे कर्णावर युद्धाविष यीं वारंवार येत असतां कर्णानें पुनःपुनः त्यांचा पराभव केला. दुर्योधनास मोठा हर्ष होऊन तो नाना प्रकारच्या वाद्यांचा गजर करूं लागला. त्याच प्रसं गीं कर्णानें पांचालांचे वीस रथी व चेदींचे शंभर वीर मारले, गजांचे स्कंध नि र्मनुष्य करून टाकिले, हे राजा, याप्रकारें शूर कर्ण शत्रुकडील सैन्याचा नाश करून रणभूमीवर उभा राहिला. पांचाल यांद्धे कर्णानें जरी वारंवार वध्य केले तथापि ते कर्णाशीं युद्ध करीत; हा एक पांचालांचा अद्भुत परा क्रम पाहिला. दुर्योधन, दुःशासन, कृपाचार्य, अश्वत्थामा, कृतवर्मा व म हाबलि शकुनी इत्यादि योध्यानीं पांडवांचीसेना बहुत नष्ट केली. तसेंच पांडव, धृष्टद्युम्न, शिखंडी व द्रौपदेय यानीं कौरव सैन्यांचा नाश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

७९ अध्याय एकुण ऐशीं :— संजय भाषण करतो हे राजा, चतु र्विध सैन्य मारून महारण्या विषयीं सूतपुत्र क्रुद्ध झालेला पाहून अर्जुना नें शत्रुसैन्यामध्यें रक्ताची महानदी उत्पन्न केली आणि वासुदेवास भाष ण केलें कीं, हे कृष्णा, हा सूतपुत्राचा ध्वज दृष्टीस पडतो, भीमादिक यो द्धे या महारथ्यासहवर्तमान युद्ध करतात, हे पांचाल कर्णापासून त्रस्त झा ल्यामुळें पळतात हे पहा. कृपाचार्य, कृतवर्मा व द्रौणी हे महारथी सूत पुत्रानें रक्षिलेले दुर्योधनाचें रक्षण करून सोमकाशीं युद्ध करतात हे आपल्यास अवध्य आहेत. हे कृष्णा, जेथें कर्णाचा रथ आहे तेथें माझार थ न्यावास अशी आज इच्छा आहे, कर्णाचा वध केल्यावांचून आजमी मा घारा फिरणार नाहीं आपण जर तेथें गेलों तर आपल्यासमक्ष राधेय आ ज सकल पार्थांचा व सृंजयांचा निःपात करून टाकील.असें भाषण ऐक नांच कृष्णानें पार्थाचा रथ त्वरेनें कर्णाकडे चालविला तेव्हां मद्रराज क र्णासि बोलतो हे कर्णा, अर्जुन कोठें आहे म्हणून तूं प्रश्न करीत होतास तो हा कृष्णाजाचा सारथी व श्वेताश्वांनीं युक्त केलेल्या रथांत आरूढ होऊ

न. शत्रूंचें मर्दन करीत येत आहे तो पहा. आजजर तूं त्याचा वध करशील तर तुझें कल्याण आहे. अर्जुन मोठ्या त्वरेनें इकडे येत आहे त्या पेक्षां तुझ्याशीं संग्राम करण्याची त्याची इच्छा आहे असें मला वाटतें. तूं धर्म राजास विरथी केलास, शिखंडी, सात्यकी, धृष्टद्युम्न, द्रौपदेय, युधामन्यु, उत्तमौजा, नकुल, सहदेव व भीमसेन या सर्वांस पीडित केलेंस; यामुळें अर्जुनास मोठा क्रोध येऊन एकाकींच तो तुझ्याकडे मोठ्या त्वरेनें येत आहे. हे कर्णा, तूंही अर्जुनास जाऊन अडीव. असें शल्याचें भाषण ऐकुन कर्ण बोलतो हे शल्या, तूं आतां आपल्या पूर्व प्रकृतीवर आलास असें वाटतें; धनंजया पासून तूं कांहीं भय पाऊंनकोस, आज माझें बाहु बल व अस्त्र शिक्षा कशी आहे तीपहा. आजमी एकाकी पांडव सैन्याचा व कृष्णार्जुनाचा वधकेल्या वांचून माघारा येत नाहीं. कृष्णार्जुनाचा वध करून आजमी कृतार्थ होईन अथवा कृष्णार्जुनानीं माझा वध केला असतां मला कृतार्थता आहेच. असें कर्णाचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे कर्णा, मोठ मोठे रथी असें भाषण करतात कीं, हापार्थ युद्धामध्यें एकाकी असतांही अजय्य आहे, मस्तकतो कृष्णानें संरक्षीत असल्यामुळें त्याचा अजयकरण्यास कोण समर्थ होईल बरे? असें शल्याचें भाषण ऐकून पुन्हा कर्ण बोलतो हे शल्या, त्या पार्था सारखा महारथी पूर्वी कधिंकोणी झाला नाहीं असें मी ऐकतों त्यापार्थाशीं आजमी युद्ध करतों. पार्थ श्वेताश्व युक्त रथाचे ठायीं आरूढ होऊन रणांत संचार करतो तो आज मला मोठें दुःख उत्पन्न करील. माझी समाप्ती झाली म्हणजे सर्व वीर आज संपले असें मी मानितों. या अर्जुना समान दुसरा योद्धा कोणी नाहीं, कृष्णाच्या साहय्यें करून खांडवप्रस्थीं अर्जुनानें अग्नीस तृप्त केला असतां अग्नीनें कृष्णास चक्र व सव्यसाचीस गांडीव धनुष्य दिलें, तसाच श्वेताश्वांनीं युक्त केलेला, घोर भयंकर शब्द करणारा असा रथ, अक्षय्य भाते व इतर दिव्यशस्त्रें अर्जुनास दिल्हीं. अर्जुनानें इंद्रलोकीं जाऊन कालकेयनामक सर्व दैत्यांचा वध केला, त्या कालीं अर्जुनास देवदत्तनामक शंख मिळाला, त्या पार्था पेक्षां वीर्यानें कोणी अधीक नाहीं. अर्जुनानें आपल्या अस्त्रांच्या योगें युद्धामध्यें महादेवास संतुष्ट केलें असतां महादेवानें

त्रैलोक्य संहार करणारें असें पाशुपत नामक घोरास्त्र दिल्हें, इंद्रादिक-लोकपालानीं अर्जुनास अप्रमेय महास्त्रें दिलीं, त्या महास्त्रांच्या योगें अर्जुनानें कालकेयनामक दैत्यांचा वध केला. विराटनगरीं एकट्या अर्जुनानें आम्हां सर्ववीरांस युद्धामध्यें जिंकून आमचीं गोधनें घेऊन त्या महारथ्यांचीं वस्त्रें घेतलीं. असा तो अर्जुन वीर्य गुणानें संपन्न असून श्रीकृष्ण त्यास साहाय्य आहे, अशा अर्जुनास मी युद्धांत आव्हान करतों हें माझें मोठें साहस होय. अनंत वीर्य नारायणानें अर्जुन संरक्षीत आहे, ज्यास अयुतवर्षें आयुष्य आहे त्यास ही विष्णु व जिष्णु यांचे गुण वर्णन करण्यास सामर्थ्य नाहीं, अर्जुन आपल्या वीर्यानें युक्त असून केशवानें जरी संरक्षित आहे तथापि तुझ्यासमक्ष आज मी त्याचा वध करतों; लवकर माझा रथाच्या अश्वांस प्रेरणा कर. असें कर्ण शल्यास भाषण करून दुर्योधन, कृपाचार्य, कृतवर्मा, बंधुसह वर्तमान शकुनी, द्रोणपुत्र, आपला कनिष्ठ बंधु, पदात्यांचे समुदाय, गजारोह व अश्वारोह या सर्वांस असें बोलला कीं, सर्वांनीं मिळून आज केशवार्जुनाचा युद्धामध्यें प्रतिरोध करावा. असें कर्णाचें भाषण ऐकतांच सर्वांनीं तथास्तु असें म्हणून मोठ्या त्वरेनें अर्जुनाच्या सन्निध जाऊन त्याजवर बाणांची वृष्टी केली; तेव्हां अर्जुन त्या सर्व योध्यांस त्रस्त करून बाण वर्षाव करूं लागला. त्याकालीं मेघ जसे पर्वतावर वृष्टी करतात तशी कृपाचार्य, कृतवर्मा व महारथी द्रोणसुत यांणीं अर्जुनावर बाण वृष्टी केली असतां त्या सर्व बाणांचा अर्जुनानें नाश करून सर्वयोध्यांचे वक्षस्थलास तीन तीन शरानीं ताडीत केलें. नंतर द्रोणपुत्रानें दहा उग्र बाणांनीं धनंजयास ताडित करून तीन बाणांनीं अच्युतास ताडित केला, चार बाणांनीं चारी अश्वांस व नाराच बाणानें ध्वजस्थ कपीस ताडित केलें असतां अर्जुनानें तीन बाणांनीं अश्वत्थाम्याचा सारथी व चार बाणांनीं रथाचे अश्व मारून पुन्हा तीन बाणांनीं ध्वज तोडून पृथ्वीवर पाडला त्याकालीं अश्वत्थाम्यानें दुसरें धनुष्य घेऊन व त्यास उत्तम प्रकारचा गुण लावून कांहीं बाणांनीं कृष्णार्जुनास पीडित केलें. कृपाचार्य, कृतवर्मा आणि दुर्योधन यांणींही जलदासारखी अर्जुनावर बाण वृष्टी केली. त्या

कालीं पार्थानें कृपाचार्यांचें शरयुक्त धनुष्य तोडून रथाचे अश्व मारून ध्वजतोडून सारथी मारिला. नंतर दुर्योधनाच्या रथाचा ध्वज व धनुष्य तोडून कृपाचार्यांच्या रथाचे अश्व मारून रथाचा ध्वज तोडला, तसेंच इतर बहुत रथी व गजांचे समुदाय अर्जुनानें नष्ट करून टाकिले असतां कौरव सैन्य चोहींकडे पसरलें. नंतर सर्वशत्रूंस अपसव्य करून अर्जुनाचा रथ श्री कृष्ण घेऊन चालला तेव्हां दुसऱ्या योध्यांनीं धनंजयास पाहतांच ते आपले रथ सिद्ध करून ध्वज उभारून त्याजवर धांऊन गेले. त्या कालीं शिखंडी, सात्यकी व नकुल सहदेव यांणीं त्या योध्यांचें निवारण करून मोठा भयंकर नाद केला. पदाती, नाग, अश्व व रथ यांच्या मोठ्या गर्जना होऊन ते एकमेकांस मारूं लागले. तेव्हां सूर्याची प्रभाही त्या अंधःकारानें व्याप्त होऊन गेली. असा विषय या अध्यायांत आहे.

८० अध्याय ऐशीं :– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, भीमसेन कुरुवीराशीं युद्ध करीत असतां तो केवळ सैन्यामध्यें निमग्न झालेला अर्जुनानें पाहून आपल्या बाणांनीं सूतपुत्राच्या सैन्याचें मर्दन करून शत्रुवीरांस यमलोकीं पाठविलें. शर जालें करून आकाश अर्जुनानें आवृत्त करून टाकल्यामुळें एकमेकाचें सैन्य एकमेकांस दिसेनासें झालें, त्याकालीं पांडवांकडील कांहीं वीरांनीं कौरवांचें सैन्य मारलें. तशींच कितीएक अश्वांचीं व गजांचीं अंगें पार्थ बाणांनीं छिन्नभिन्न झाल्यामुळें ते पृथ्वीवर पडले. सुवर्ण कवचें व कनकभूषणें धारण केलेले असे योद्धे नागजांवर बसले होते, असे चारशें गज माहुतांनीं आपल्या पादांगुष्ठें करून अर्जुनावर जाण्यास प्रेरित केल्यामुळें ते गज क्रुद्ध होऊन अर्जुनावर जात असतां अर्जुनानें बाणांनीं त्यांस मारून पृथ्वीवर पाडलें. नंतर अर्जुन गांडीव धनुष्याचा टणत्कार करीत बाण प्रक्षेपानि कौरवांचें सैन्य ताडित करीत असतां तें सैन्य विदीर्ण होऊन गेलें हे राजा, कौरवांचें महासैन्य अर्जुनाच्या बाणांनीं कांहीं पीडित झालें, कांहीं चिरडून गेलें, कांहीं दाही दिशेस पळूं लागलें अशी अर्जुनानें कौरव सैन्याची अवस्था केली असतां कौरवांचें सैन्य भीमसेनास पाहून यु

द्रूपासून पराङ्मुख झालें. हें अर्जुनानें पाहून तो भीमसेनाच्या सन्निध येऊन एक मुहूर्त पर्यंत उभा राहिला आणि त्या सहवर्तमान कांहीं विचार कर्तव्य तो करून बाणांनीं न विद्ध झालेल्या अशा मनुष्यां सहवर्तमान युधिष्ठिर कुशल आहे असें त्यास सांगून व त्याची आज्ञा घेऊन रथघोषानें पृथ्वी व आकाश नादित करीत पुढें चालला तेव्हां दुःशासनाचे कनिष्ठ बंधू दहा यानीं अर्जुनास वेढून पीडित केला. त्याकाळीं कृष्णानें त्या शूरांस अपसव्य मंडल करून अर्जुनाचा रथ जरी पुढें नेला तथापि हे अर्जुना पासून यमलोकास जाणार असा निश्चय केला. अर्जुन पराङ्मुख झाला असें पाहून ते शूर अर्जुनावर धांऊन आले तेव्हां अर्जुनानें नाराच व अर्धचंद्राकार बाणांनीं त्यांच्या रथाचे अश्व मारून व ध्वज, धनुष्य व बाण तोडून दुसऱ्या दहा बाणांनीं त्यांचीं शिरें तोडलीं, या प्रकारें अर्जुन दहा कौरव मारून पुढें गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्यायशीं :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कपिध्वज अर्जुन वेगयुक्त अश्वानीं जोडलेल्या रथामध्यें बसून येतो. असें पाहून कौरवां कडील संशप्तक योद्धे परलोका विषयींच्या घोर शपथा करून नरश्रेष्ठ अर्जुनावर धांऊन येऊन रणामध्यें त्यास व्याप्त करूं लागले. त्याकाळीं कृष्णानें अर्जुनाच्या रथाच्या अश्वांस कर्णरथाकडे जाण्यास प्रेरणा केली, इतक्यांत संशप्त कांच्या नव्वद योध्यानीं अर्जुनावर बाणांची वृष्टी केली असतां अर्जुनानें त्या नव्वद योध्यांचा सूतरथध्वजांसहवर्तमान निशित बाणांनीं वध केला. नंतर इतर कौरवां कडील वीरानीं रथ, अश्व, गज इत्यादिकांसहवर्तमान निर्भयपणें पुन्हा अर्जुनावर धांऊन जाऊन त्यास रुद्ध करून शक्ती, यष्टी, तोमर, प्रास, गदा, खड्ग व शर इत्यादि आयुधांच्या वृष्टीनें त्यास आच्छादित केला असतां अर्जुनानें शत्रूंची शस्त्र वृष्टी अंतरिक्षांत असतांच नष्ट करून टाकिली. नंतर दुर्योधनानें तेराशें म्लेंच्छाधिष्ठीत गजांस अर्जुनावर जाण्यास प्रेरणा केली असतां त्याणीं अर्जुनाच्या पार्श्व भागीं जाऊन रथस्थ अर्जुनास नाराच बाण व तोमर, प्रास इत्यादि आयुधानें पीडित केलें. अर्जुनानें त्या शस्त्र वृष्टीचा अर्धचंद्राकार व भल्ल बाणांनीं नाश करू-

न पताकाध्वज व गजारोहां सहवर्तमान त्या सर्व गजांचा वध केला. नंतर अर्जुन गांडीव धनुष्याचा टणत्कार करूंलागला, तसेंच मनुष्य व गजवाजी ही मोठ्यानें शब्द करूं लागले. कांहीं ताडित झालेले गज, अश्व पळूं लागले. पुढें तीन अंगानीं अवशिष्ट राहिलेल्या कौरवांकडील योध्यांनीं अर्जुनास वेष्टित केलें हें पाहून भीमसेन कौरवांकडील कांहीं रथ्यांचा वध करून अर्जुनाजवळ आला आणि त्यानें अर्जुनानें वध्य करून अवशिष्ट राहिलेल्या अश्वांचा आपल्या गदेनें नाश केला. याप्रकारें दहाहजार अश्व व बहुत पदाती मारून भीमसेन सैन्यांत धांवला आणि क्रोधानें एकक्षणांत त्यानें त्या गजसैन्याचा नाश केला. याप्रकारें महाबलि भीमसेन गजसैन्याचा नाश करून पुन्हा रथारूढ होऊन अर्जुनाच्या मागें गेला. याप्रकारें अर्जुन व भीमसेन यांनीं कौरवसैन्य शस्त्रांनीं ताडित करून युद्धपराङ्मुख केलें असतां त्या सैन्याचा उत्साह भग्न होऊन तें निराश्रितासारखें मध्यें लोंबूं लागलें. त्या कालीं अर्जुनाचा पराक्रम पाहून कौरवांकडील योध्यांची कर्णाच्या जीवितविषयीं आशा नष्ट झाली, भीमसेनप्रमुख योध्यांस मोठा हर्ष उत्पन्न झाला. हे धृतराष्ट्र राजा, तुझे पुत्र पार्थबाणांनीं पीडित झाल्यामुळें युद्धाचा त्याग करून कर्णाच्या रथाजवळ आले तेव्हां कर्णानें त्यांस आश्रय देऊन भाषण केलें कीं, तुम्हीं भीऊं नका, माझ्या आश्रयानेंच रहा. असें भाषण केल्यानंतर तो आपल्या धनुष्याचा टणत्कार करून शत्रुवधाच्या इच्छेनें उभा राहिला आणि पलायन केलेल्या कौरवांस पाहून पार्थवधाविषयीं चिंता करीत श्वासोच्छ्वास टाकून पार्थासमक्ष पांचालांवर धांऊन जाऊन त्यांजवर बाणांचा वर्षाव करूं लागला. त्याकालीं कर्णाच्या बाणांनीं कितीएक पांचाल मरण पावले. याप्रकारें कर्णानें आपल्या मित्राकरितां बहुत पांचालांचा वध केला असतां पांचाल सैन्यामध्यें एकाएकीं मोठा नाद होऊं लागला. असा विषय या अध्यायांत आहे.

८२ अध्याय ब्यायशी :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कौरवांकडील योद्धे पळतात हें कर्णानें पाहून श्वेतहयानीं युक्त केलेला आपला रथ पांचालसैन्याकडे नेऊन त्यांचा नाश केला. जनमेजयाचा सार

थी अंजलिक बाणांनीं रथाखालीं पाडून रथाचे अश्व मारिले. शतानिक व श्रुतसोम यांजवर भल्ल बाणांची वृष्टी करून त्यांचीं धनुष्यें तोडलीं. धृष्टद्युम्नास सहा बाणांनीं ताडण करून त्याच्या रथाचे अश्व मारिले, सात्यकीच्या रथाचे अश्व मारून विशोक नामक कैकयाचा वध केला, विशोक नामक आपला पुत्र मरण पावला म्हणून उग्रकर्मा जो कैकेय सेनापती याणें प्रसेन नामक कर्णपुत्रास कांहीं बाणांनीं ताडण केलें. त्याकालीं कर्णानें हास्य करून कैकयाचे बाहु व शीर तीन अर्धचंद्राकार बाणांनीं छिन्न केले. नंतर हताश्व झालेल्या सात्यकीस प्रसेन नामक कर्णपुत्रानें पृषत्क व निशित बाणांनीं त्यास आच्छादित केला असतां सात्यकीनें कर्णपुत्रास कांहीं बाणांनीं पृथ्वीवर पाडला. हें पाहून कर्ण सात्यकीच्या वधेच्छेनें असें बोलला कीं, हे शैनेया, आतां तूं मरण पावलास असें कर्णानें भाषण करून प्राण नाशक व सहन करण्यास अशक्य असा एक बाण टाकिला असतां शिखंडीनें तीन बाणांनीं त्याचा छेद करून कर्णास व्यथित केला. कर्णानें शिखंडीचा ध्वज व कार्मुक क्षुरप्र बाणांनीं छेदून व सहा बाणांनीं त्यास वेध करून धृष्टद्युम्नाच्या पुत्राचें शीर छिन्न केलें. हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनास बोलला हे अर्जुना, आज कर्ण संपूर्ण पांचालांचा वध करतो यास्तव तूं लवकर तिकडे जाऊन त्याचा वध कर. असें ऐकतांच अर्जुन किंचित् हास्य करून पांचालांचें त्राण होण्याकरितां आपलें धनुष्य मंडलाकार फिरवीत सैन्यांत गेला तेव्हां भीमसेन त्याचे रक्षणार्थ त्याचे पृष्ठभागीं येऊन ते उभयतां वीर कर्णावर त्वरेनें धांऊन गेले इतक्यांत सूतपुत्रानें सोमकांचें मर्दन केलें. नंतर उत्तमौजा, जनमेजय, युधामन्यु व शिखंडी आणि धृष्टद्युम्न या पांच पांचालांनीं एकत्र होऊन कर्णास पृषत्क बाणांनीं बहुत पीडित केला. कर्णानें त्या पांचालांचीं धनुष्यें तोडून पांच पृषत्क बाणांनीं त्यांस ताडित करून, शिखंडी, युधामन्यु, उत्तमौजा, सोमकपुत्र, पार्षतपुत्र यांस बाणांनीं ताडण केलें असतां ते पांच महारथी निरुद्योगी होऊन स्तब्ध उभे राहिले तेव्हां त्यांस द्रौपदेयांनीं दुसऱ्या सिद्ध केलेल्या रथांत बसवून दूर नेलें. नंतर सात्यकीनें आपल्या निशित बाणांनीं कर्णबाणांचा नाश-

करून व त्यास ताडित करून अठरा बाणांनीं दुर्योधनास ताडित केला. कृपाचार्य, कृतवर्मा, दुर्योधन व कर्ण हे चार योद्धे सात्यकीशीं युद्ध करूं लागले असतां इतर पांचालानीं रथारूढ होऊन सात्यकीचें रक्षण केलें. त्या युद्धांत बहुत रथाश्व गजांचा नाश जाला. या प्रकारें युद्ध होत असतां तुझापुत्र भीमसेनावर बाणवृष्टी करूं लागला. तेव्हां उभयतां एकमेकांस पाजीवलेल्या बाणांनीं ताडन करूं लागले. वृकोदरानें तुझ्यापुत्रानें क्षुरप्र बाणांनीं धनुष्य व ध्वज छिन्न करून त्याचे ललाट भागीं पत्रिबाणाचा प्रहार करून त्याच्यासारथ्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें असतां तुझ्यापुत्रानें दुसरें धनुष्य घेऊन एक बाण भीमसेनावर टाकतांच त्या बाणानें वृकोदरानें कवच भिन्न होऊन तो रथामध्यें बाहु प्रसृत करून मूर्छित पडला. कांहीं कालानें भीमसेन सावध झाल्यानंतर भयंकर नाद करूं लागला. असा विषय या अध्यायांत आ॰

८३ अध्याय त्र्यायशीं:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कौरव पांडवांचें तुमुल युद्ध चाललें असतां दुःशासनानें मोठें दुष्कर कर्म केलें. एका बाणानें भीमाचें धनुष्य छेदून साठ बाणांनीं सारथ्यास वेध केला. भीमसेनानें दुःशासनावर एक उग्र व महाभयंकर शक्ती टाकिली असतां ती दुःशासनानें दहा पृषत्क बाणांनीं छिन्न केली. पुन्हा दुःशासनानें भीमसेनास बाणांनीं बहुत विद्ध केला आणि मृत्यु सारखी भयंकर एक शक्ती भीमसेनावर टाकिली असतां भीमसेनानें ती शक्ती आपल्या गदेच्यायोगें छिन्न करून नंतर दुःशासनाच्या मूर्ध्यावर गदेचा प्रहार केला. त्या वेगयुक्त गदेच्या योगें दुःशासन कंपित होऊन रथापासून रथाखालीं पडला. तसेच त्या गदेच्या आघातानें त्याच्या रथाचा सारथी व अश्व मरण पावले. याप्रकारें तुमुल संग्राम झाला असतां भीमसेन आपल्या रथावरून खालीं उतरून वेगानें दुःशासनावर जाऊन त्यानें द्रौपदीचें वस्त्राहरणादि जीं जीं पूर्वी कर्में केलीं त्यांचें स्मरण करून कृपाचार्य, द्रोणपुत्र व कृतवर्मा यांस असें बोललाकीं, हे समस्त योद्धे हो, या पापी दुःशासनाचा आज मी वध करतों तुमच्यांत सामर्थ्य असल्यास याचें रक्षण करा. असें भीमसेन भाषण करून दुःशासनावर धांऊन गेला आणि त्यानें सुयोधन व कर्ण यांचे समक्ष दुः

शासनाच्या कंठावर पादक्षेप करून भाषण केलें हे दुःशासना, कर्ण, दु र्योधन यां सहवर्तमान हर्षित होऊन गौः असें भाषण करणारा तूंच ना, आणि राजसूय यज्ञांत अवभृत स्नानानें पवित्र झालेले द्रौपदीचे - केश कोणत्या हातानें ओढलेस? असें मी तुला विचारितों या करितां म ला सांग. असें भीमाचें घोर वचन ऐकून दुःशासन भीमास पाहून सं तप्त झाला. नंतर कौरव, सोमक ऐकत असतां क्रोधानें डोळे फिरवून भा षण करतो हे भीमा, पीनस्तनाचें मर्दन करणारा, सहस्त्र गोप्रदानें क रणारा, क्षत्रियांचा प्राण घेणारा, गजशुंडाकार अशा या हस्तानें या- ज्ञसेनीचे केश कुरुश्रेष्ठ व तुम्ही पहात असतां ओढिले. या प्रमाणें बो लणाऱ्या दुःशासनाकडे पाहून भीमानें आपल्या हस्तानें त्याचें वक्ष- स्थल पीडित करून दोन्ही हातानें त्यास उचलून उच्चस्वरानें गर्जना क- रून भाषण केलें कीं, ज्यास सामर्थ्य असेल त्यानें याचें रक्षण करण्या स यावें. त्याचे हस्त मी आज छेदून टाकितों असें म्हणून दुःशासनाचा हस्त उपटिला आणि तीक्ष्णधार युक्त खड्गानें त्याचें वक्षस्थल विदारण- करून त्याचें ऊष्ण रक्त प्राशन केलें आणि आपली प्रतिज्ञा सत्य केली. भीमसेनाचें भयंकर कर्म पाहून जे भय पावले नाहींत त्यांच्या हातांतील शस्त्रें गळालीं, कोणी भीमसेनाच्या भयानें डोळे मिटून आक्रोश करूं ला गले, कोणी दुःशासनाचें रुधिर प्राशन करणाऱ्या भीमसेनास पाहून- अरे हा मनुष्य नव्हे असें म्हणून चित्रसेनासह वर्तमान भयानें पळूं लाग- ले. त्याकालीं चित्रसेन पळतो हें पाहून युधामन्यु कांहीं सैन्य बरोबर घेऊ न त्याजवर धांवला आणि निर्भयपणें त्यानें सात पृषत्क बाणांनीं त्यास ताडण केलें. त्याकाळीं चित्रसेनानें तीन बाणांनीं त्यास ताडित करून - सहा बाणांनीं त्याचे सारथ्यास ताडित केलें. नंतर युधामन्यूनें चित्रसेना चें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. हें पाहून कर्णानें पांडव सैन्याचें विद्राव- ण केलें. भीमसेनानें दुःशासनाचें रुधिर आपले अंजलीत घेऊन सक ल लोकांस ऐकण्या जोगें दुःशासनास असें भाषण केलें कीं, हे पुरुषा- धमा, तुझे कंठसंबंधि रुधिर मी प्राशन करतों तूं आतां सावध होऊन पु

न्हा. गौगौं असें म्हण बरें; जानी पूर्वी आम्हांस गौगौं असें म्हणून आम्हां पुढें नृत्य केलें त्यांजपुढें मी आतां गौगौं असें म्हणून नृत्य करतों, कालकूट विषाचें मला भोजन, द्यूताचे ठायीं राज्यहरण, वनांचे ठायीं वास; द्रौपदीचे केश ग्रहण, विराट भवनी आम्हांस पृथक् पृथक् क्लेश हीं जी सर्व दुःखें शकुनी, दुर्योधन आणि कर्ण यांच्या विचारानें आम्हांस प्राप्त झालीं. या सर्वांस तूंच कारण आहेस; पुत्रांसह वर्तमान धृतराष्ट्राच्या दौरात्म्य भावानें आजपर्यंत आम्ही दुःखाचे अनुभव घेतले, सुखाचा लेशही आम्हांस आजपर्यंत अगदीं नाहीं. या प्रकारें भाषण करून भीमसेनानें आपला जय झाला असें जाणून मोठ्या क्रोधानें शीघ्र कृष्णार्जुनाच्या सन्नीध येऊन असें भाषण केलें कीं, दुःशासनाविषयीं मीजी प्रतिज्ञा केली होती ती आज मी सत्य केली. दुःशासनास जसा मारला तसाच या रणभूमीचे ठायीं इतर बांधवांसह वर्तमान आज दुर्योधनास सकल कौरवांचें समक्ष मारून त्या दुरात्म्याचें शीर पायानें मर्दन करून शांति प्रत पावेन. असें भीमसेनानें भाषण करून मोठा शब्द केला. असा विषय या अध्यायांत आहे.

८४ अध्याय चवऱ्यायशीं:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, दुःशासन मरण पावला हें पाहून निषंगी, कवची, पाशी, दंडधार, धनुर्ग्रह, अलोलुप, सह, षंद, वातवेग व सुवर्चस हे महारथी संग्रामध्यें पलायन करणारे तुझे दहा पुत्र बंधुमरणानें दुःखित होऊन शरानीं भीमास आच्छादित करीत त्याचें निवारण करूं लागले. त्याकाळीं भीमसेनानें तुझ्या दहा पुत्रांस दहा वेगवान् भल्ल बाणांनीं यमगृहीं नेलें. तो भीमाचा अंतकासारखा पराक्रम पाहून कर्णास ही महत्भय उत्पन्न झालें तेव्हां शल्य कर्णाच्या आकारावरून त्यास बोलला कीं, हे राधेया, कांहीं दुःख मानूंनको, दुःख मानणें हें तुला योग्य नाहीं. हे पहा तुमच्या कडील राजे भीमसेन भयानें पीडित होऊन पळतात, दुर्योधनास भ्रातृमरण संबंधि बहुत दुःख झालें आहे त्यामुळें त्यास कांहींच समजत नाहीं. कृपाचार्य प्रभृती योद्दे व हतशेष राहिलेले दुर्योधनाचे भ्राते दु-

र्योधनास वेष्टून त्याचे आसमंताद्भागीं उभे राहिले आहेत. धनंजय प्रमुख पांडव तुझ्याकडे लक्ष लावून तुझ्यासन्मुखच युद्धार्थ येत आहेत यास्तव हे पुरुषशार्दूला, धनंजयाशीं युद्धार्थ जा. कारण धृतराष्ट्रपुत्रानें सर्व युद्धाचा भार तुझ्यावर ठेविला आहे. असें शल्याचें भाषण ऐकून कर्णाने आतां आपल्यास युद्ध करणें अवश्य आहे, असा सुस्थिर भाव धरिला. नंतर भीमसेन कौरवांशीं युद्ध करीत सेना मुखाचे ठायीं उभा आहे असें पाहून कर्णपुत्र वृषसेन मोठ्या वेगानें त्याजवर धांऊन गेला. हें नकुलानें पाहून पृषत्क बाणांनीं कर्णपुत्रास मोठ्या रोषानें ताडित करून त्याचें धनुष्य भल्ल बाणांनें तोडलें. कर्णपुत्रानें नकुलाच्या रथाचे हेममाला धारण केलेले शुभ्र अश्व नष्ट करून टाकिले. त्याकाळीं नकुलानें यानापासून खालीं उतरून खड्गानें रथ गजाश्वांचा नाश केला, दोनसहस्र योद्धे युद्धामध्यें पाडले. असें उभयतांचें युद्ध होत असतां कर्णपुत्रानें पृषत्क बाणें करून नकुलाच्या स्तनांतरीं ताडित केलें असतां नकुल, शरानीं संतप्त झाल्यामुळें मोठ्या त्वरेनें भीमसेनाच्या रथांत बसला. हें पाहून वृषसेनानें त्या पांडवावर शरांची वृष्टी करून उभयतांस ही व्यथित केलें. त्याकाळीं भीमसेन व नकुल अर्जुनास बोलतात हे अर्जुना, तूं कर्णपुत्रावर लवकर धांऊन जा. असें भाषण ऐकून किरीटीनें तत्काल आपला रथ वृषसेनाच्या रथासन्निध नेण्याविषयीं कृष्णास प्रेरणा केली. असा विषय या अध्यायांत आहे.

८५ अध्याय पंचायशीं:—संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, नकुलाचे बाण व धनुष्य व रथ नष्ट होऊन तो कर्णपुत्राच्या अस्त्रानें भग्न झाला हें पांच द्रुपद पुत्र, सहावा सात्यकी व पांच द्रौपदेय यानीं पाहून मोठ्या त्वरेनें नकुलाकडे येतां येतां मार्गांत कौरवांकडील बहुत गजाश्वनरांचा नाश केला. कौरवांकडील कृपाचार्य, कृतवर्मा, द्रोणपुत्र, दुर्योधन, शकुनीपुत्र, वृक, क्राथ व देवावृध इतके योद्धे, शंखांचे शब्द, रथघोष व धनुष्यांचे टणत्कार करीत पांडवांकडील वीरांवर मोठ्या त्वरेनें आले. हे कौरवांकडील वीर व पांडवांकडील अकरा वीर एकत्र होऊन एकमेकांस शरवर्षावानीं पीडित करूं लागले. नंतर कुलिंद योद्धे गजांसह वर्तमान आले. कुलिंदपुत्रा

नें दहा बाणें करून सारथी व अश्वांसह वर्तमान कृपाचार्यास पीडित केला असतां कृपाचार्यानें कांहीं बाणांनीं त्यास ताडित करून पृथ्वीवर पाडला. कुलिंद पुत्र मरण पावल्यावर त्याचा कनिष्ठबंधु हस्तामध्यें तोमर घेऊन मोठा नाद करीत असतां गांधार पतीनें त्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. नंतर कौरवांकडील वीर पांडवांकडील वीरांवर धांऊन आले असतां पुन्हा उभय-तांचें दारुण युद्ध होऊं लागलें. त्यांत कितीएक योद्धे व गजाश्व पृथ्वीवर पडले. नंतर शतानिकानें कांहीं गज रथ व पदाती समुदाय कौरव सैन्यावर युद्धार्थ पाठविले असतां कृतवर्म्याच्या शरानीं ते नष्ट होऊन पृथ्वीवर पडले. कुलिंद राजाच्या कनिष्ठ पुत्रानें दुर्योधनास कांहीं बाणांनीं स्तनांतशीं ताडित केला असतां दुर्योधनानें निशित बाणें करून कुलिंद राजपुत्राच्या गजास व त्यास ताडित केलें. नंतर कुलिंद पुत्रानें शरें करून क्राथास पृथ्वीवर पाडला. वृकानें गिरिराज वासी गजारूढ झालेल्या कुलिंद राजास बारा बाणांनीं ताडित केला असतां राजाच्या गजानें आपल्या चार पायांनीं रथाश्वां सह वर्तमान वृकास मर्दित करून टाकिला. नंतर बभ्रुसुतानें बाणें करून कुलिंद राजाच्या गजास ताडित केलें. नंतर सहदेव पुत्रानें देवावृध पुत्रास मारलें. शकुनीनें कुलिंद पुत्राचें शीर तोडून टाकिलें. कुलिंद पुत्रानें बहुत निशित बाणें करून नकुल पुत्रास ताडित केलें असतां नकुलात्मजानें कुलिंदाचें पद्माकार शीर क्षुरप्र बाणानें तोडून पाडलें, कर्णसुतानें शतानिक, अर्जुन, भीमसेन यांस तीन तीन शरानीं ताडण करून नकुलास सात शरानीं व जनार्दनास बारा शरानीं ताडित केलें. हें पाहून अर्जुन कर्णपुत्रावर धांऊन गेला असतां कर्ण पुत्रानें एक निशित बाणें करून पार्थास ताडित केलें तेव्हां अर्जुनानें वृषसेनाच्या वधाचा निश्चय करून मोठ्या कोपानें कर्णसुतावर विशिख बाण टाकिले आणि कर्ण, दुर्योधन व द्रोणपुत्र यांस असें भाषण केलें कीं,- हे योद्धे हो, तुम्हीं सर्व पाहत असतां निशित बाणें करून कर्णपुत्रास यमलोकीं नेतों. असें बोलून पुन्हा कर्णास भाषण केलें कीं, हे कर्णा, सर्व जन असें म्हणतात कीं, तुम्हीं बहुतानीं मिळून मी नसतां माझ्या पुत्रा मवि

रथी झाल्यावर मारलात आतां मी एकटा तुमच्या समक्ष रथारूढ तुझ्या पुत्रा स मारतों, तुम्हांस सामर्थ्य असल्यास याचें रक्षण करा. हे मूढा कर्णा, आज या तुझ्या पुत्राचा वध करून तुझाही पुढें रणभूमींमध्यें वध करीन व दुर्योधना चा हनन कर्ता भीमसेन आहे असें जाण. असें अर्जुनानें भाषण करून नंतर कर्णपुत्र वृषसेनावर बहुत बाण टाकिले, दहा पृषत्क बाणांनीं त्याचीं मर्मे ताडित करून चार क्षुरप्र निशित बाणांनीं धनुष्य, दोन भुज व शीर तोडलें असतां कर्णपुत्र शीर हीन होऊन रथापासून पृथ्वीवर पडला. हें पाहून कर्ण कृष्णार्जुनावर धांऊन गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

८६ अध्याय शायशीं :- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कर्ण धांऊन येतो हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनास हास्य करून भाषण करतो हे अर्जुना, शल्य ज्याचा सारथी असा कर्ण श्वेत अश्व जोडलेल्या रथामध्यें बसून येत आहे तो पहा. यास्तव वर्तमान युद्ध करण्यास स्थीर हो, तुझ्यावांचून कर्णाचा शर सहन करण्यास कोण समर्थ आहे? देव, असुर, गंधर्व किंबहुना चराचरासहवर्तमान तीन लोकांचा युद्धामध्यें जय करण्यास तूं समर्थ आहेस असें मला खचित विदित आहे. तुझें कल्याण असो, युद्धांत तुला जय-प्राप्त होईल. असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन बोलतो हे मधुसूदना, सर्व लोकांचा तूं गुरु आहेस; यास्तव तूं संतुष्ट झालास म्हणजे झालें आतां आपल्या अश्वांस कर्ण रथाकडे जाण्यास प्रेरणा कर, आज कर्णाचा वध केल्यावांचून हा अर्जुन माघारा फिरणार नाहीं. असें अर्जुनानें भाषण ऐकून श्रीकृष्णानें - अर्जुनास संग्रामामध्यें तुझा जय असो. असें भाषण करून तत्काळ त्याच्या-अश्वांस प्रेरणा करतांच त्या मनासारख्या वेगवान् अश्वांनीं अर्जुनाचा रथ एक क्षणांत कर्णरथाच्या अग्रभागीं नेला. असा विषय या अध्यायांत आहे.

८७ अध्याय सत्यायशीं :- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, वृषसेन नामक आपला पुत्र मरण पावला हें पाहून कर्ण रथासहवर्तमान मोठ्या वेगानें अर्जुनाच्या सन्निध गेला आणि त्यास युद्धाविषयीं आव्हान करून उभयतां चंद्र सूर्यासारखे शोभले. त्याकाळीं कित्येक कौरव व पांडवां नैयोद्धे स्वकीयांस हर्ष होण्याकरितां वाद्यांचे गजर व शूरवांचे नाद करूं लागले. क-

र्णार्जुन एकत्र झालेले पाहून यांत कोणाचा जय होईल याविषयीं सर्व प्राणीमात्रांस संशय उत्पन्न झाला. त्या प्रसंगीं सकल धृतराष्ट्रपुत्र आपल्या सैन्यास हवर्तमान कर्णास वेष्टून उभे होते, तसेच धृष्टद्युम्न प्रमुख पांडवांकडील योद्धे माहात्म्या अर्जुनास वेष्टून उभे होते. हे राजा, तुझे योद्धे, कर्णाचाच जय होईल व पांडवांकडील योद्धे अर्जुनाचाच जय होईल अशी प्रतिज्ञा करीत. नंतर हे उभयतां योद्धे एकमेकांस आकर्षण करण्याची इच्छा करूं लागले. देव, दानव, गंधर्व पिशाच, उरग, राक्षस हे कर्णार्जुनाच्या युद्धप्रसंगीं जय पराजयाविषयीं वाद करूं लागले. मुनी, चारण, सिद्ध, गरुड व इतर पक्षी, रत्नें, निधि, उपवेद, उपनिषद, रहस्य व संग्रह यां सहवर्तमान चार वेद व पांचवा इतिहास, वासुकी, चित्रसेन, तक्षक, मणिक, इतर कद्रुपासून उत्पन्न झालेले काद्रवेय नामक सर्प व विषवत् दुसरे नाग हे सर्व अर्जुनाचे पक्षपाती झाले. ऐरावत, सौरभेय व वैशालेय प्रभृति क्षुद्रसर्प कर्णाचे पक्षपाती झाले. वसु, मरुत, साध्य, रुद्र, विश्वेदेव, अश्विनी कुमार, अग्नी, इंद्र, सोम, वायु व दशदिशा हे अर्जुनाचे पक्षपाती झाले. द्वादशादित्य, वैश्य, शूद्र, सूत व संकर जातीय हे सर्व कर्णाचे पक्षपाती झाले. ब्राम्हण, क्षत्रिय, यज्ञ व दक्षणा, देव, ब्रम्हर्षी व राजऋषींचे गण अर्जुनाचे पक्षपाती झाले. ब्रम्हऋषी व दक्षादि प्रजापती सहवर्तमान देव व शिव विमानामध्यें बसून कर्णार्जुनाचा समागम पाहण्याकरव त्यास्थलीं आले. शक्र असें भाषण करी कीं माझा पुत्र अर्जुन कर्णाचा वध करून जय पावो. सूर्य असें भाषण करी कीं, माझा पुत्र अर्जुनाचा वध करून जय पावो. याप्रकारें ते उभयतां देवश्रेष्ठ पक्षपाती होऊन विवाद करूं लागले, जिकडे पार्थ तिकडे देव उभे होते, जिकडे कर्ण तिकडे असुर उभे होते. याप्रकारें कर्णार्जुनाचे देवासुर पक्षपाती झालेले पाहून सर्व देव ब्रम्हदेवास असें बोलले कीं, हे ब्रम्हदेवा, कर्णार्जुनाची युद्धामध्यें साम्यता दिसते, आम्हांस वाटतें कीं, या उभयतांस विजय समान होईल. असें भाषण ऐकून इंद्र ब्रम्हदेवास नमस्कार करून भाषण करतो हे ब्रम्हदेवा, पूर्वी कृष्णार्जुनाचा निश्चयें करून विजय होईल. असें महादेवानीं कथन केलें होतें. याप्रमाणें त्याचा विजय व्हावा याविषयीं हे भगवन् मी आपली प्रार्थना करतों मजवर प्रसन्न असावें. असें इंद्राचें भाष

ण ऐकून ब्रम्हदेव व सांब बोलले कीं, हे त्रिदशेश्वरा, अरे, माहात्म्या अर्जुनाचाच निश्चयें करून विजय होईल. अरे अर्जुनानें खांडव वनीं अग्नीस-संतुष्ट केलें व स्वर्गी प्राप्त होऊन तुझें साहाय्य केलें. कर्णतर दानव पक्षपाती असल्यामुळें त्याचा पराजय होईल, कर्णाचा पराजय झाला असतां देवांचें कार्य निश्चयें करून झालें असें समजावें. फाल्गुन निरंतर सत्यधर्मा मध्यें रत असल्यामुळें त्याचाच विजय होईल. साक्षात् जगताचा प्रभु विष्णु ज्याचा सारथी आहे व तो स्वतः बलवान्, शूर, कृतास्त्र, मननशील, सर्व धनुर्वेदाचा ज्ञाता व सर्वगुणानीं संपन्न आहे. हे कृष्णार्जुन क्रुद्ध झाले असतां लोकाची स्थिति राहणार नाहीं. सर्वभूतें व देवगण यांच्या प्रभावानेंच वर्तातात आतां कर्ण युद्धांत मरण पाऊन उत्तम लोकीं जाईल. या प्रकारें ब्रम्हदेव व शिव यांचें भाषण इंद्रानें ऐकतांच सर्व देवांस असें सांगितलें कीं, ब्रम्हदेव व ईशान यांणी जगताच्या हितकारक जें भाषण केलें तसें च होणार, तुम्हीं विगतज्वर होऊन स्वस्थ बसा. असें इंद्राचें भाषण ऐकून सर्व देव कर्णार्जुनाचें युद्ध पाहण्यास उभे राहिले. इतर वीरानीं शंखाचे पृथक् पृथक् नाद केले. नंतर वासुदेवार्जुन व कर्णशल्य यांचे युद्धास आरंभ झाला. कर्णध्वजावर आशीविषसर्पासारखी दृढ नाग कक्षा बहुत शोभली, पार्थाच्या ध्वजावर राहणारा मारुती अंतकासारखें आपलें मुख विदारण करून युद्धाच्या इच्छेनें कर्णध्वजावर उडून जाऊन कर्णाच्या ध्वजस्थ नागकक्षेचें विदारण करूं लागला. जसें कर्णार्जुनाचें युद्ध होत होतें तसें उभयतांच्या ध्वजाचें युद्ध होऊं लागलें. कृष्णानें नयन बाणें करून-शल्यास ताडित केला, तसाच शल्यानेंही नेत्रकटाक्षें करून कृष्णास-ताडित केला असतां उभयतांचें नयनयुद्ध होऊं लागलें त्याकाळीं वासुदेवानें नयन कटाक्ष सायकानें शल्यास जिंकिलें. कुंतीपुत्र धनंजयानें कर्णास नेत्रकटाक्ष बाणानें जिंकिल्यावर सूतपुत्र शल्यास बोलला. हे शल्या, जर पार्थानें आज रणामध्यें कदाचित माझा वध केला तर पुढें तूं संग्रामामध्यें काय करशील? असें सूतपुत्राचें भाषण ऐकून शल्य बोलतो हे कर्णा, अर्जुनानें तुझा आज युद्धप्रसंगीं वध केला तर मी एकटा

कृष्णार्जुनाचा वध करीन. तसाच अर्जुनानें श्रीकृष्णास प्रश्न केला असतां कृष्णानें हांस्य करून पार्थास असें उत्तर दिल्हें कीं हे पार्था, सूर्य आपले स्थांनापासून कदाचित पडेल; परंतु कर्ण तुझा वध करण्यास समर्थ होणार नाहीं. कदाचित झाल्यास मी आपल्या बाहुबलें करून कर्णाचा व शल्याचा वध करीन. असें कृष्णाचें भाषण ऐकतांच अर्जुन हांस्य करून कृष्णास असें बोललाकीं, हे कृष्णा, कर्ण माझ्या बाणांनीं छिन्न झालेला पहाशील. हे माधवा आज कर्णाच्या भार्येस वैधव्य आलें असें समज. या कर्णाच्या पूर्वकृत्याचें स्मरण करून माझा मन्यु शांत होत नाहीं. द्रौपदीस सभेमध्यें आणली असतां या मूढानें तिची व आमची थट्टा केली यास्तव हे गोविंदा, आज दैवानें कर्णाचा वध करून त्यास पाडला असतां तूं अभिमन्यूच्या मातेचें, तुझी पितृभगिनी जी कुंती तिचें व रुदन करणाऱ्या द्रौपदीचें शांतवन करशील. तसेंच अमृत कारक वाणीनें धर्मराजाचेंही आज तूं शांतवन करशील. असा विषय या अध्यायांत आहे.

८८ अध्याय अठ्यायशीं :– संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कर्णार्जुनाचें युद्ध पाहण्या करितां देव, नाग, असुर, सिद्ध, यक्ष, गंधर्व, राक्षस, अप्सरा, राजऋषि, ब्रम्हर्षि व सुपर्ण इत्यादि आले होते तेणें करून आकाश फारच शोभायमान दिसूं लागलें इकडे कौरव पांडवसैन्यातील योद्धे हर्षित होऊन वाद्यांचे गजर व शंखांचे नाद करूं लागले. मनुष्य, अश्व, गज व रथ इत्यादिकें करून रणभूमी व्याप्त होऊन गेली. शर, असी इत्यादि शस्त्रांनें प्रहार योद्धे एकमेकांस करूं लागले असतां कितीएक योद्धे मरण पावल्या मुळें त्यांच्या रक्तानीं रणभूमी लोहित वर्ण शोभायमान दिसूं लागली. कर्ण व धनंजय याणीं एकमेकांवर सोडलेल्या बाणांनीं ते आच्छादित होऊन एकमेकांवर बाण सोडून आच्छादित करूं लागले कौरवां कडील व पांडवां कडील योद्धे युद्ध करतां करतां मरण पावूं असा निश्चय करून कर्णार्जुनास वेष्टून उभे राहिले. उभयतां कर्णार्जुनांनीं एकमेकांचे नराश्वमातंग बहुत मारले त्याकालीं उभयतांचे सैन्यांतील नर व रथी त्रस्त होऊन पळूं लागले. त्याकालीं दुर्योधन, कृतवर्मा, सौबल व

कृपाचार्य इनके योद्धे द्रोणपुत्रा सहवर्तमान कृष्णार्जुनावर धांऊन जाऊन त्यांस बाणांनीं पीडित करूं लागले असतां अर्जुनानें त्या योध्यांचीं धनुष्यें, बाण व त्यांचे ध्वज व अश्व, रथ च सारथी छिन्नभिन्न करून आसमंताद्भागीं जे शूर उभे होते त्यांचें कदन करून बाराबाणांनीं कृतपुत्रास ताडण करतांच कौरवांकडील शंभर रथ, शंभर गज, शक, तुषार नामक यवन व कांबोज नामक योद्धे अश्वस्वांरा सहवर्तमान अर्जुनास मारण्या करतां त्याजवर धांऊन आले असतां त्यांचे आयुधा सहवर्तमान हस्त पार्थानें क्षुरप्र बाणें करून तोडले व त्या योध्यांचे अश्व, गज, रथ छिन्नभिन्न करून कितेक शत्रूंचे समुदाय क्षीण करून पृथ्वीवर पाडले. त्याकाळीं द्रोणसुत अश्वत्थामा आपले हातावर हात चोळून दुर्योधनास बोलला कीं, हे दुर्योधना, आतां तरी शम पाव. पांडवांशीं विरोध पुरे कर, या कलहारा धिःकार असो. अरे द्रोणाचार्य महास्त्र वेत्ता असतांही मरण पावला, तसेंच भीष्म प्रमुख महारथी मरण पावले, मी व माझा मातुल कृपाचार्य हे आम्ही अवध्य आहोंत; यास्तव तुला सांगतों कीं, पांडवांसह वर्तमान वहून राज्याचा उपभोग कर. हें माझें भाषण तूं न ऐकशील तर पुढें अशीनें वध्यमान होऊन पश्चात्ताप पावशील. जें कृत्य इंद्र, यम, ब्रम्हदेव व कुबेर याणी केलें नाहीं तें कृत्य एकट्या किरीटीनें केलें तें तुम्हीं सर्वांनीं पाहिलेंच आहे. बरें आतां याहून ही त्याणें अधिक कृत्य न करावें यास्तव मी केलेल्या भाषणाचा अंगीकार कर, अर्जुन तुझी निरंतर प्रतिष्ठा ठेवील. हे दुर्योधन राजा, तुझ्याविषयीं मला बहुत अभिमान आहे यास्तव जर तूं अर्जुनाशीं नम्र होशील नरमी कर्णास युद्धापासून निवृत्त करीन; पांडव तर तुझे बंधु आहेत. त्यांच्याशीं तूं साम केला असतां तुझे नेसहज मित्र होतील. असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून दुर्योधन श्वासोच्छ्वास टाकीत बोलतो हे-अश्वत्थाम्या, मी तुला विज्ञापूर्वक कांहीं एक भाषण करतां तें तूं ऐक. दुर्मती वृकोदरानें दुःशासनाचा बलात्कारानें वध करून जें भाषण केलें तें माझ्या हृदयांत राहिलें आहे, तें भाषण भीमसेनानें तुझासम

क्षत केलें आहे तेव्हां मी पांडवांशीं कसा बरें शम करूं. अर्जुन कर्णाचा परा क्रम संग्रामामध्यें सहन करण्यास समर्थ नाहीं, युद्ध करतां करतां फाल्गुन बहुत श्रमी झाल्यामुळें कर्णास त्याचा वध करणें कांहीं कठिण नाहीं. असें दुर्योधनानें द्रोणपुत्र अश्वत्थाम्यास भाषण करून नंतर आप ल्याकडील सैनिकांस अशी आज्ञा केली कीं हे वीरहो, हस्तानें ठायीं-बाण घेऊन उगीच उभेरा हिलांत, माझें हित व्हावें अशी जर तुमची इच्छा आहे तर युद्ध करा. असा विषय या अध्यायांत आहे.

८९ अध्याय एकुणनव्वद:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, कर्णार्जुन एकमेकांवर धांऊन मोठें निकट युद्ध करूं लागले. त्याकाळीं वाद्यांचा गजर होऊं लागला. तुझ्या पुत्राच्या दुष्टविचारानें हें युद्ध उत्पन्न झालें. उभयतांच्या सारथ्यांचीं व अश्वांचीं अंगें दुःसह बाणांनीं विद्ध होऊन त्यांच्या अंगापासून रक्ताचे प्रवाह निघूं लागले. उभयतांही एकमेकांस प्रहार करूं लागले. अर्जुन कर्ण वधाच्या इच्छेनें त्याजवर धांऊन गेला. कर्णानें प्रथम दहा बाणांनीं पार्थास वेध केला असतां अर्जुनानें हास्य करून तीनाग्र दहा बाणांनीं कर्णाच्या कक्षांतरीं भेद केला. याप्रकारचें उभयतांचें कांहीं वेळ-बाण युद्ध होत असतां अर्जुनानें अग्न्यस्त्र सोडलें तेव्हां कर्णानें-त्या अस्त्राच्या नाशनार्थ वारुणास्त्राचा प्रयोग केला. नंतर अर्जुनानें पर्जन्यास्त्र सोडलें असतां कर्णानें वायव्यास्त्र टाकून पार्थाच्या अस्त्राचा नाश केला. नंतर अर्जुनानें इंद्रास प्रियकारक व वज्रसदृश प्रतापी असें अस्त्र गांडीव धनुष्यास लावून व क्षुरप्रांजलिक इत्यादि सहस्रावधी बाण कर्णावर टाकिले असतां कर्णशल्याचीं व त्याच्या रथाश्वांचीं गात्रें छिन्न झालीं. अर्जुनानें कौरवांकडील बहुत गजाश्व, रथ व पदात्यांचा वध केला. तेव्हां कर्णानें सिलासिन व रुक्मपुंख बाणानीं श्रेष्ठ श्रेष्ठ पांचालांचा मोठ्या त्वरेनें वध केला. कर्णानें पार्थाच्या अस्त्रांचा नाश केला व पांचालांचा वध केला. हें त्याचें दुष्कर कर्म पाहून भीमसेन अर्जुनास असें बोलला कीं, हे अर्जुना, अरे या दुष्ट क-

र्णानें पूर्वी द्रौपदीस जें दुःख दिल्हें याचें स्मरण कर. याणेंच पूर्वी आ म्हांस तुम्ही पंढतिल आहांत; असें भाषण केलें त्याचें स्मरण करून आज याचा वध कर. मीही गदेनें त्याचें मंथन करतों. असें भीमसेनानें भाषण केल्यावर कर्णानें पांचालांचा बहुत वध केला. हें पाहून श्रीकृष्ण अर्जुनास बोलतो हे अर्जुना, कर्णानें आपल्या सैन्याचें आज बहुत मर्दन केलें व अस्त्रानें तुझ्या अस्त्रांचा नाश केला यास्तव धैर्यानें तूं आज कर्णाचा वध कर. असें ऐकून अर्जुनानें आपल्या अवतारचें स्मरण करून ब्रम्हास्त्र प्रगट करतांच कर्णानें जलधारे सारखा बाण वर्षाव करून तें ब्रम्हास्त्र नष्ट करून टाकिलें. हें पाहून भीमसेन अर्जुनास बोलला कीं, हे अर्जुना, तुला ब्रम्हास्त्र वेत्ता कोणी म्हणत नाहीं व तुला ब्रम्हास्त्र विदित नाहीं यास्तव तूं आतां कर्णावर दुसऱ्या अस्त्रांची योजना कर. असें ऐकून अर्जुनानें सूर्यकिरण सदृश देदीप्यमान असंख्यात बाण कर्णावर टाकिले असतां त्या बाणांनीं दिशाप्रदिशा आच्छादित होऊन गेल्या व कर्णरथही एकक्षणांत आच्छादित झाला. तसेंच शतावधि शस्त्रें कर्णावर टाकिल्यामुळें त्या शस्त्रांच्या आघातानीं बहुत योद्धे मरण पावले. याप्रकारें अर्जुनानें दुर्योधनाचें सैन्य व मुख्य मुख्य योद्धे विध्वंशित करून टाकिले. कर्णानेंही त्या युद्धप्रसंगीं अर्जुनावर मेघधारे सारखी बाणवृष्टी केली असतां ते बाण मोठ्या गर्जना करीत अर्जुनावर येऊन पडले. नंतर अर्जुनानें अष्टादश शरानीं कर्णास ताडित केला. एकशरानें कर्णाचा ध्वज तोडून चारशरानीं शल्यास व तीनशरानीं पुन्हा कर्णास ताडित केला. कौरवांकडील आयुधासह वर्तमान सहस्रावधि अश्व व आठ हजार पदाती वीर नष्ट करून टाकिले. कर्णानें पांडव सैन्यावर बहुत बाणांची वृष्टी करून पांचालाचे बहुत समुदाय मारले. या प्रकारें ते महाबलि कर्णार्जुन एकमेकांच्या सैन्याचा नाश करूं लागले. इतक्यांत विशल्य झालेला धर्मराज सुवर्ण कवच धारण करून आला असतां समग्र योद्धे हर्षित झाले. नंतर पार्थानें-

हांस्य करीत दहापृषत्क बाणें करून शल्यास व त्याचे तनुत्राणांस भेद केला, कर्णास द्वादश बाणांनीं वेध केला. कर्णानें अर्जुनास तीन बाणांनीं वेध करून पांच बाणांनीं श्रीकृष्णास वेध केला. ते कर्णाचे पांच बाण कृष्णाच्या कवचाचा भेद करून मोठ्या वेगानें पृथ्वींत प्रविष्ट होऊन व पाताल गंगेंत स्नान करून पुन्हा कर्णापासून विमुख गेले असतां अर्जुनानें पांच भल्लाकार बाणांनीं तक्षकपुत्र पक्षी पांच बाणांचे तीन तीन तुकडे केले. कर्णबाणांनीं कृष्णाचें अंग भिन्न झालेलें पाहून अर्जुनानें शत्रूंच्या शरीराचें दहन करणारे असे बाण चापास लावून सोडले, त्या बाणांनीं दिशा, रवीची प्रभा व कर्णाचा रथ अदृश्य झाला. आणि कर्णाच्या संरक्षणार्थ आलेले चक्ररक्षक, पादरक्षक, अग्ररक्षक व पृष्ठरक्षक असे सारभूत दोन हजार रथारूढ योद्धे होते ते एकक्षणांत रथाश्व सारथ्यांसह क्षयास नेले. हें अर्जुनाचें कृत्य दुर्योधनाच्या अवशिष्ट राहिलेल्या भ्रात्यानीं व सैनिकानीं पाहतांच ते पळून गेले. त्याकाळीं सर्व दिशाविदिशा, कौरव सैन्य पळून गेल्यामुळें शून्य झाल्या; परंतु कर्ण किमपि व्यथित न होतां हर्षानें अर्जुनावर धांऊन गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

९० अध्याय नव्वद :- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, सकल कौरवांचें सैन्य पळून बाणाच्या टप्पावर उभें राहिलें. आणि कर्णवधार्थ अर्जुनानें विद्युल्लता सदृश सोडलेलें अस्त्र पाहूं लागले. अर्जुनानें क्रोधें करून सोडलेलें अस्त्र पाहतांच कर्णानें त्याचे निवारणार्थ मोठे भयंकर शरजाळ टाकिले तथापि तें अस्त्र सकल कौरवांस दग्ध करीत चाललें. नंतर कर्णानें आपले दृढधनुष्याचा टणत्कार करून अर्जुनावर बाणांची वृष्टी करीत करीत परशुरामानें अथर्वण वेदोक्त अरिनाशक असें जें अस्त्र सांगितलें होतें, तें टाकून अर्जुनास्त्राचें निवारण केलें. या प्रकारें कर्णार्जुनाचा मोठा तुमुल संग्राम झाला. रथ, अश्व, गज इत्यादिकांच्या पाद संमर्दानीं रणभूमी विदारीत होऊन गेली. अर्जुन व कर्ण यांचा घोर युद्ध प्रसंग होत आहे तों खांडववन दाह प्रसंगीं अर्जुनानें अश्वसेन नामक नागाच्या मातेचा वध केला होता यास्तव त्यानीं रागानें अर्जुनाच्या की

शी होऊन मोठ्या कोपानें पातालांत वास केलाहोता तोनाग हा कर्णार्जुनाचा युद्ध प्रसंग पाहून पातालांतून उर्ध्वभागीं आला आणि त्यास मातृवधा चें स्मरण होतांच दुरात्म्या पार्थानें वैर निर्यातन करण्याचा हाच काल आ हे, असा मनामध्यें निश्चय करून तो शररूपानें कर्णाच्या भात्यांत गेला.- ते उभयतां प्राणाची इच्छा न धरतां युद्ध करीत असल्यामुळें उभयतांस हीमो ठा श्रम झालेला पाहून स्वर्गस्थ अप्सरांनीं उभयतां वर चंदनाचें जल सिंचि त केलें. इंद्र व सूर्य याणीं आपल्या करकमलें करून उभयतांचे मुखावरून हस्त फिरविले. पार्थाच्या शरानीं कर्ण अतिशय ताडीत झाल्यामुळें संत- स होऊन सर्पमुख महा देदीप्यमान पार्थाच्या वधाकर्तां बहुत दिवस रक्षि त केलेला असा बाण धनुष्यास लाऊन धनुष्याची प्रत्यंचा पार्था समोर - आकर्षण केली. त्याकालीं अश्वसेन नामक नाग पार्थाचें शीर नष्ट कर- ण्याच्या इच्छेनें त्या बाणांत गुप्तरूपानें प्रविष्ट झाला होता; हा बाण कर्णा नें धनुष्यास लाविला. हें पाहून शक्रादिक लोकपाल हाहा कार करूं लाग ले, अश्वसेन नाग योग बलानें कर्णाचे शरांत प्रविष्ट झालाहोता हें कर्णा स किमपीही विदित नवतें. इंद्रानें तो सर्परूपी बाण पाहतांच माझा पुत्र आज मरणार असा निश्चय करून तो ब्रम्हदेवास बोलला. हे देवा, कर्णा च्या बाणांत हा सर्प प्रविष्ट झाला म्हणून माझा पुत्र गलित शरीर होऊन- नष्ट झाला. असें ऐकून ब्रम्हदेव इंद्रास बोलतात तूं व्यथा पाऊं नकोस, का रण अर्जुनाची जयश्री नष्ट व्हावयाची नाहीं. मद्रराजानें तो उग्रबाण पाहू न भाषण केलें कीं; हे कर्णा, हा बाण तूं अर्जुनाच्या ग्रीवा प्रदेशीं बरोबर ध रला नाहींस यास्तव पुन्हा लक्ष्य नीट धरून संधान कर. असें शल्यानें भा षण ऐकून कर्ण बोलला हे शल्या, मी एकवेळ संधान करून जो बाण लावि ला तो पुन्हा माघारा फिरविणार नाहीं. असें म्हणून तो बाण सोडून अर्जुना स उच्चस्वरानें असें बोलला कीं; अरे फाल्गुना, तूं आतां मरण पावलास; मा धवानें तो बाण पाहतांच मोठ्या त्वरेनें आपल्या पायानीं रथास दाबून- कांहीं. रथ पृथ्वीमध्यें निविष्ट केला व अश्वांचे जानु पृथ्वीवर टेंकविले. हें माधवाचें कृत्य पाहून अंतरिक्षामध्यें आनंद घोष होऊं लागला. दिव्यपुष्पां

ची दृष्टी श्रीकृष्णावर झाली. याप्रकारें श्रीकृष्णानें मोठ्या प्रयत्नें करून- अर्जुनाचा रथ पृथ्वींत निमग्न केल्यावर कर्णानें प्रक्षीस केलेला बाण अर्जुनाच्या किरीटावर पडतांच तो किरीट मस्तका पासून पृथ्वीवर पडला. हा किरीट ब्रम्हदेवानें तपें करून इंद्रा करितां निर्माण केला. ज्याकाळीं अर्जुनानें दानवांचा वध करण्याची इच्छा केली त्याकाळीं इंद्रानें हा किरीट अर्जुनास दिल्हा. नंतर पार्थानें आपले शिरास श्वेत वस्त्र वेष्टन केलें. नंतर तो सर्परूपी बाण माघारा जाऊन कर्णाच्या भात्यांत प्रवेश करीत असतां कर्णास बोलला हे कर्णा, अर्जुनाच्या शिराचें अपहार करण्या करितां तूं मला सोडलेंस खरें परंतु त्याच्या शिराचें तूं नीट लक्ष्य धरिलें नव्हतेंस; यास्तव पुन्हा नीट लक्ष्य धरून मला सोड म्हणजे तुझाव माझा शत्रु जो अर्जुन याचा तत्काल नाश करीन. असें त्याचें भाषण ऐकून सूतपुत्र बोलतो अरे, तूं कोण आहेस; असें कर्णाचें भाषण ऐकून सर्परूपी बाण बोलतो हे कर्णा, मी नाग आहें. पार्थानें माझ्या मातेचा वध केल्या मुळें तो माझा महान् वैरी आहे, या पार्थाच्या संरक्षणा करतां साक्षात इंद्र जरी आला तथापि त्यास मी यमगृहीं नेईन. असें सर्पाचें भाषण ऐकून कर्ण बोलतो हे नागा, रण प्रसंगीं दुसऱ्याच्या बलाच्या आश्रयें करून मी जयाची इच्छा करीत नाहीं व एकदां जो शर धनुष्यास लाविला तोही मी पुन्हा धनुष्यास लावीत नाहीं. शतशः अर्जुन जरी युद्धार्थ प्राप्त झाले तथापि मी त्याचा वध करण्यास समर्थ आहें, तूं स्वस्थ होऊन माघारा जा. असें कर्णानें भाषण केलें असतां तो नागराज मोठ्या रोषानें त्याच्या वाक्याचा उपहास करून तेथून माघारा फिरला, आणि पार्थाच्या वधेच्छेनें स्वरूप धरून पार्थावर चालिला. हें पाहून कृष्ण भाषण करतो हे पार्था, हा तुझा वैरी सर्प येतो याचा वध कर, असें भाषण ऐकून पार्थ बोलतो हे कृष्णा, हा कोण माझा वैरी नाग स्वतः- आपण गरुड मुखांत शिरण्यास येतो, असें भाषण ऐकून श्रीकृष्ण बोलतो हे अर्जुना, खांडववन दाह प्रसंगीं तूं अग्नीस तृप्त करीत असतां या सर्पाची माता, त्या अग्नींत दग्ध झाली. त्याकाळीं हा पुत्र तिणें आपले मुखांत रक्षण केला होता तो आकाश मार्गें बाहेर जिवंत निघून त्याची माता अ

ग्नींत दग्ध झाली, त्या वैरानें स्मरण करून हा तुझा वधार्थ येतो. असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुनानें सहा निशित बाणांनीं नागास वेध केला असतां तो छिन्नगात्र होऊन पृथ्वीवर पडला. नंतर श्रीकृष्णानें आपल्या भुजेनें पृथ्वींत निमग्न झालेला रथ पुन्हा पृथ्वीपासून उपटून वर काढिला. नंतर धनंजय इकडे तिकडे पाहूं लागला, इतक्यांत कर्णानें शिळाशीत व मोराच्या पिसाऱ्यानीं युक्त केलेल्या पृषत्क दहा बाणें करून अर्जुनास वेध केला. अर्जुनानें यमदंडा सारखे नव्वद बाण कर्णावर टाकिले असतां त्या बाणांनीं कर्णाचें उत्तम मण्यानीं व सुवर्णानीं अलंकृत केलें वरांगभूषण नष्ट होऊन पृथ्वीवर पडलें, तशींच कुंडलें हीं छिन्न होऊन पृथ्वीवर पडलीं. हें कर्णाचें सुवर्णमय वरांगभूषण महान् महान् श्रेष्ठ शिल्पिजनानीं बहुत यत्नानें केलें होतें, याचें मोल्य ही बहुत होतें. पुनः- शीताग्र बाणांनीं अर्जुनानें कर्णास ताडीत केलें असतां कर्ण त्या बाणाच्या आघातानें अत्यंत ताडित झाल्यामुळें शक्रचाप सदृश आपल्या चापाचा व बाणांचा त्याग करून रथाखालीं पडूं लागला, त्याची मुष्टी विशीर्ण झाली. याप्रकारें कर्ण अत्यंत व्यसन ग्रस्त झालेला अर्जुनानें पाहून तो आर्यपुरुष व्रतस्थीत असल्यामुळें कर्णाचा वध करण्याची त्याणें इच्छा केली नाहीं हें जाणून कृष्ण बोलतो हे अर्जुना, अरे पूर्वी हा कर्ण तुझें अहित करणारा असल्यामुळें याचें मर्दन करण्याविषयीं त्वरा कर. असें कृष्णानें भाषण केलें असतां पार्थानें सर्पविषा सारखा विषयुक्त अग्नीसारखा जाज्वल्यमान असा एक बाण कर्णावर टाकण्याची मती- धरिली. त्याकालीं कर्णाचा वध काल समीप आला हें सांगण्या करतां काल अदृश्य रूपानें कर्णास असें बोलला कीं; हे कर्णा, तुझा वध काल सन्नीध आला म्हणून विप्रकोपास्तव ही पृथ्वी तुझा रथाच्या चक्राचा- ग्रास करीत आहे. असें कालानें भाषण केल्यावर भार्गव रामानें ज्या अस्त्रांचा कर्णास उपदेश केला होता त्याची कर्णास तत्काल विस्मृती झाली. आणि रथाचें वामचक्र तत्काल पृथ्वीनें ग्रस्त केलें. हें कर्णानें पाहतांच ब्राम्हणशापाचें त्यास स्मरण होऊन तो घाबरा झाला. नंतर ध

र्माची निंदा करीत असें बोलला कीं, हे धर्मवेत्ते जन निरंतर असें भाषण करतात कीं, धर्मानें चालणारे मनुष्यानें धर्म रक्षण करतो, मी तर शास्त्रांत सांगितल्या प्रमाणें यथाशक्ती, यथा बलें करून धर्मामध्यें रत्त असतां तो माझानाश करतो काय! धर्म निरंतर रक्षण करीत नाहीं असें मला वाटतें. असें कर्ण भाषण करीत असतां कर्णाच्या रथाचे अश्व व सारथी स्खलित झाल्यामुळें तो अर्जुनाच्या मर्मभेदी बाणांनीं चंचल होऊन पुढें युद्ध करण्यास असमर्थ झाल्यामुळें वारंवार धर्माची निंदा करीतल्यानें भयंकरशरानीं श्री कृष्णाच्या हातावर प्रहार करून सात बाणांनीं पार्थास वेध केला. नंतर पार्थानें सरळ जाणारे इंद्राशनी सारखे घोर, अग्नी सारखे जाज्वल्यमान सत्राबाण कर्णावर टाकिले असतां ते कर्णास भेद करून पृथ्वीवर पडले. नंतर कर्णानें अर्जुनावर ब्रम्हास्त्राचा प्रयोग केला, हें पाहून अर्जुनानें गांडीव धनुष्य प्रत्यंचा व बाण यांवर ऐंद्रास्त्र मंत्रानें अभिमंत्रण करून कर्णावर बाणांचा वर्षाव केला असतां ते तेजोमय पार्थनिर्मुक्त बाण कर्णाच्या रथसन्निध जातांच कर्णानें ते सर्व बाण व्यर्थ करून टाकिले. पुनः कर्णानें पाजिवलेल्या तीक्ष्ण बाणें करून अर्जुनाच्या गांडीव धनुष्याची प्रत्यंचा तोडून टाकिली. नंतर अर्जुनानें दुसरी प्रत्यंचा लवितांच तीही कर्णानें तोडून टाकिली. याप्रकारें कर्णानें गांडीव धनुष्याच्या शंभर प्रत्यंचा तोडल्या. याशिवाय अर्जुनानें जींजीं अस्त्रें कर्णावर टाकिलीं, तींतीं कर्णानें आपल्या अस्त्रांच्या योगें नाशित करून, अर्जुनापेक्षां आपलें स्ववीर्य त्याणें अधिक प्रदर्शित केलें. पार्थ कर्णास्त्रानें पीडित झालेला पाहून श्रीकृष्ण भाषण करतो अरे पार्था, पुन्हा अस्त्रांची लवकर प्रेरणा कर, असें ऐकून अर्जुनानें सर्पविषोपम अशा एक बाणावर रौद्रास्त्राचा प्रयोग करून कर्णावर टाकण्या विचार केला. त्याकाळीं कर्णाच्या रथाचें चक्र पृथ्वीनें ग्रस्त केलें असतां कर्ण परम त्वरेनें रथाखालीं उतरून तें चक्र आपल्या भुजानीं पृथ्वींतून उपटूं लागला असतां पर्वत, वनें, यां सहवर्तमान सप्तद्वीपा पृथ्वी चक्रा बराबर चार अंगुळें उध्दत झाली; परंतु चक्र निघालें नाहीं. नंतर राधेय चक्रग्रस्त झालेसें पाहून नेत्रांतून अश्रु टाकी

त क्रोधानें अर्जुनास बोलला कीं, हे पार्था, माझें चक्र पृथ्वीनें ग्रस्त केलें आहे, त्याचें मी उत्पाटण करीपर्यंत एकमुहूर्त अवकाश धर. अरे युद्धधर्माविषयीं तूं मोठा अभिज्ञ आहेस; तूं दिव्यास्त्रवेत्ता आहेस, व युद्धामध्यें केवळ कार्तवीर्यासारखाच आहेस. यास्तव हे अर्जुना, ह्या ग्रस्त झाले ल्या चक्रास जों काळपर्यंत मी उध्दृत करीत आहें तों काळपर्यंत तूं माझ्याशीं युद्ध करूं नको, मी भूमीवर उभा आणि तूं रथस्थीत असल्यामुळें मला मारण्यास तूं योग्य नाहींस; तुला व कृष्णाला मी भीतों असें नाहीं, यास्तव एकमुहूर्त क्षमा कर. असा विषय या अध्यायांत आहे.

९१ अध्याय एक्याण्णव :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, श्रीकृष्ण रथारूढ असतां कर्णास असें बोलला कीं, हे राधेया, दैवें करून आतां तुला धर्माचें स्मरण झालें. नीच पुरुष व्यसनग्रस्त झाले म्हणजे फारकरून दैवाची निंदा करतात, परंतु आपल्या केलेल्या दुष्कृतांची निंदा करीत नाहींत. हे राधेया, द्रौपदी एकवस्त्रा असतां तूं, दुर्योधन, दुःशासन व शकुनी या चौघानीं तिला सभेंत आणिली, युधिष्टिर राजास अक्षविद्या ज्ञात नसतां शकुनीनें त्यास सभेंत जिंकिलें, पांडवांचीं त्रयोदश वर्षें वनवासांत अतिक्रांत झाल्यावर त्यांस तुम्हीं राज्य कां दिलें नाहीं? द्रौपदी रजस्वला असतां दुःशासनानें तिला धरून सभेंत आणिली, तूं सभेंत असें बोललास कीं, हे गजगामिनी द्रौपदी, तुझे पति पांडव अक्षय्य नरकीं गेले - आतां दुसरा पती कर, याशिवाय पांडवांस अनेक प्रकारचीं दुःखें तुम्हीं दिलींत. त्याकाळीं तुमचा धर्म कोठें गेला होता? आज तूं युद्धधर्म जरी धरिलास तथापि जिवंत सुटणार नाहींस, पूर्वी पुष्करानें अक्षक्रीडेमध्यें नलराजास जिंकिलें असतांही पुन्हा नलराजा आपले स्ववीर्यानें जसा राज्यारूढ झाला तसे सर्व पांडव स्ववीर्यें करूनच आपलें राज्य घेतील, धृतराष्ट्रपुत्र पुष्करासारखे पांडवांचे हातून नष्ट होतील. असें वासुदेवानें भाषण केलेलें ऐकून कर्णानें कांहींच उत्तर दिल्हें नाहीं. नंतर तो क्रोधानें ओष्ट स्फुरण करीत धनुष्य घेऊन पा-

र्थाशीं युद्ध करूं लागला. त्याकालीं वासुदेव भाषण करतो अरे अ-
र्जुना, दिव्यास्त्र प्रयोगानें लवकर कर्णाचा भेद करून त्यास खालीं पा
ड. असें भाषण ऐकतांच अर्जुनास मोठा क्रोध एकाएकीं उत्पन्न हो-
उन सर्व इंद्रियां पासून ज्वाला निघूं लागल्या हा एक अद्भुत चमत्कार स
र्वांनीं पाहिला. त्याकालीं तें स्वरूप पाहतांच कर्ण त्याजवर ब्रम्हास्त्रा
चा प्रयोग करून आपलें चक्र पृथ्वींत गुंतलें होतें तें बाहेर काढण्या
विषयीं यत्न करूं लागला. पार्थानें कर्णानें सोडलेल्या ब्रम्हास्त्रानें
आपल्या अस्त्रानें निवारण करून आपलें अस्त्र आवरून घेतलें. आ
णि कर्णावर बहुत बाणांची वृष्टी केली. नंतर अर्जुनानें कर्णवधाच्या
इच्छेनें परम सुंदर अग्न्यस्त्र टाकिलें असतां कर्णानें वारुणास्त्रें करू
न अग्न्यस्त्राची शांति केली. पुन: कर्णानें महाघोर अग्नीसारखा जा
ज्वल्यमान असा एक बाण घेऊन अर्जुनाचा वध करण्याच्या इच्छेनें-
आपल्या पूजित धनुष्याच्या ठायीं संयुक्त केला. त्याकालीं पर्वत, व-
नेंयांसह वर्तमान पृथ्वी कंपायमान झाली. पांडवांस ही मोठा विषाद उ
त्पन्न होऊन ते दीनमनस्क झाले, कर्णभुजापासून मुक्त झालेला बाण-
सर्प जसा वारुळांत जातो तसा तो अर्जुनाच्या वक्षस्थलांत प्रविष्ट-
झाला असतां अर्जुन त्या बाण आघातानें कापूं लागला. आणि त्या-
च्या हातांतील गांडीव धनुष्य खालीं पडलें, इतक्या अवकाशांत क-
र्ण रथाखालीं उतरून आपल्या रथाचें चक्र हस्तानें उपटूं लागला-
तथापि तें रथचक्र दैवें करून उपटलें नाहीं इतक्यांत अर्जुन सावध
होऊन यमदंडासारखा प्रांजलिक संज्ञक बाण घेत आहे तों वासुदेव
बोलला कीं, हे पार्था, जों कालपर्यंत कर्ण रथारूढ झाला नाहीं त्याच्या
पूर्वींच शरें करून त्याचें मस्तक छेद. असें भाषण ऐकतांच अर्जुनानें
एक क्षुरप्र नामक बाणानें कर्णाच्या ध्वजाच्या हस्ती कक्षेस ताडित के
लें. नंतर सुवर्णयुक्त मण्यानीं युक्त केलेला कर्णाच्या रथाचा हस्ति क-
क्षायुक्त केतु होता तो क्षुरप्र बाणानें तोडून खालीं पाडला. ती केतु ज्या
कालीं रथाखालीं पडला त्याकालीं सकल कौरवांचीं हृदयें नष्ट होऊ-

नगेली. कर्णाचा ध्वज पडलेला पाहून कौरव सैन्यांतील जयशब्द नष्ट झाला नंतर अर्जुनानें कर्णाच्या वधार्थ सहस्र सूर्या सारखा तेजस्वी मर्मांचा भेद करणारा, तीन अरत्निमात्र लांब असा एक अंजलिक नामक बाण भात्यांतून काढून हस्तांत घेतला. आणि तो बाण अर्जुनानें धनुष्यास लावून त्याजवर माहात्म्याचा प्रयोग करून धनुष्यास असें भाषण केलें कीं, माहात्म्यानें मंत्रित, शरीर, बल व प्राण यांचें हनन करणारा हा माझा बाण शत्रूच्या वधार्थ मी योजितों, जर मी तप केलें असेल अथवा गुरूचा संतोष केला असेल किंवा सुहृदांच्या इष्ट वाणी ऐकिल्या असतील तर यास त्यानें माझा अरी जो कर्ण याचा हा बाण वध करो. असें भाषण करून तो घोर बाण धनंजयानें मोठ्या हर्षानें कर्णवधार्थ सोडतांच त्या बाणानें दिशा व आकाश प्रज्वलित होऊन कर्णाचें शीर अपराण्हकालीं छिन्न केलें नंतर कर्णाचा देहही पडला, देहापासून अतीजाज्वल्यमान तेज निघून तें आकाशस्थ सूर्याप्रत प्रविष्ट झालें. फाल्गुनानें कर्णाचा वध केलेला पाहतांच पांडवांनी शंखाचे नाद केले. कर्ण पतन पावलेला पाहतांच शल्य छिन्नध्वज झालेल्या रथासहवर्तमान गेला. कर्ण मृत झालेला पाहून कौरवांचें सैनिक अर्जुनाच्या जाज्वल्यमान ध्वजास पाहात भयानें पळूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

९२ अध्याय ब्याण्णवावा :— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, अर्जुनानें कर्णाचा वध केल्यामुळें कौरवां कडील सकल सैन्य त्रस्त झालें व बाणांनीं मर्दित झालेलें पाहून शल्य आपला रथ परीच्छदानें आच्छादित करून गेला. रथ, गज व अश्वयुक्त आपलें सकल सैन्य नष्ट झालेलें व सूतपुत्राचा अर्जुनानें वध केलेला पाहून दुर्योधन राजा दीन व अत्यंत दुखित होऊन श्वासोच्छ्वास टाकूं लागला. भीमसेनानें त्याकालीं मोठा भयंकर शब्द करून पृथ्वी व आकाश नादित केलें, तसेंच आपल्या बाहूंचें अस्फोटण करीत सकल धृतराष्ट्र पुत्रांस त्रासित केलें, सोमकानीं व सृंजयानीं कर्ण मरण पावला म्हणून हर्षानें शंखनाद केले. कर्ण मृत झाल्यावर शल्यास बहुत दुःख होऊन तो मूर्च्छित झाला आणि ध्व

ज हीन झालेल्या कर्णाच्या रथांत आरूढ होऊन दुर्योधनाच्या समीप भा-
गीं आल्यानंतर नेत्रांतून अश्रुपात करीत बोलला हे दुर्योधनराजा, शत्रूं-
च्या सैनिकानीं तुझे नराश्व, रथ वगैरे सारखे महान गजयुक्त सैन्य भग्न क
रून टाकिलें. जसें कर्णार्जुनाचें आजयुद्ध झालें तसें भारत युद्धास आरंभझा
ल्यापासून पूर्वी कधीं झालें नाहीं, कर्णानें कृष्णार्जुनास व पांडवांचे योध्यां
स त्रस्तकरून टाकिलें होतें परंतु काय करावें दैव पार्थास वश होऊन पांडवां
चें रक्षण करतें व आमचा नाश करतें, तुझा अर्थसिद्धिकरितां मोठ मोठे वीर
आले होते परंतु त्यांचाही नाश शत्रूनीं केला. तुझाकडील योद्धे वीर्यानें, शौ-
र्यानें, तेजानें व बलानें कुबेर, यम व इंद्रांसारखे होते, तसेच सकल गुणानीं
हीं ते परिपूर्ण होते, त्यांचा वध करण्यास अशक्य असतांही पांडवानीं त्यांचा
वध केला यास्तव हे दुर्योधनराजा, शोक करूंनको, मस्तक आपलें दैव तसेंच
आहे, काळ सदां सर्वकाल एक सारखाच असतो असें नाहीं. असें शल्यानें -
भाषण केलेलें ऐकून दुर्योधन आजपर्यंत जीं काय वाईट कर्में केली त्यांचा मनां
त विचार करून वारंवार आर्ता सारखा श्वासोच्छ्वास टाकूं लागला. असाविष-
य या अध्यायांत आहे.

९३ अध्याय ऱ्याण्णावा:- धृतराष्ट्र राजा प्रश्न करतो हे संजया, -
कर्णार्जुनाच्या भयंकर युद्ध प्रसंगीं कर्ण बाणांनीं ताडित झालेल्या सैन्याची
पुढें काय अवस्था झाली हें मलासांगा. असाप्रश्न ऐकून संजय भाषण कर
तो हे राजा, कर्ण मरण पावल्यावर पार्थानें मोठा नाद केला, त्याकाली तुझा
पुत्रास मोठें भय उत्पन्न झाल्यामुळें आपलें सैन्य एकत्र करून महान परा
क्रम करण्याविषयीं त्याची बुद्धी झाली. कर्णमरण पावल्यावर तुझे पुत्र त्रस्त
होऊन अनाथ असल्यामुळें कोणीतरी आपल्यास नाथ (स्वामी) असावा-
अशी इच्छा करूंलागले. कितीएक तुझांकडील योध्याचीं शस्त्रें व कवचेंभि
न्न झाल्यामुळें ते मूर्छित होऊन भयानें एकमेकांकडे पाहात पळाले. किती
एक तुम्हांकडील योद्धे हा बिभत्स व वृकोदर आम्हांस मारण्यास येतात अ
सें म्हणत मोठ्या त्वरेनें म्लानहोऊन पळाले. या प्रकारें कौरवांकडील स
हस्त्रावधि योध्यांची अवस्था झालेली पाहून दुर्योधन आपल्या सारथ्यास

असें बोलला कीं, हे सूता, मी धनुष्यबाण घेऊन अर्जुनापुढें युद्धार्थ उभा राहि लों असतां तो माझें अतिक्रमण करून जाण्यास समर्थ नाहीं यास्तव मा. झ्या रथाच्या अश्वांस अर्जुनाकडे जाण्यास लवकर प्रेरणा कर, आजमी- पार्थाचा निःसंशय वध करतों. असें दुर्योधनानें शौर्ययुक्त भाषण सारथ्या नें ऐकून हेमालंकारानीं आच्छादित केलेल्या दुर्योधनाच्या अश्वांस तत्का लशत्रुसैन्याकडे जाण्यास प्रेरणा केली. त्याकालीं दुर्योधनाकडील रथ- नागाश्व हीनझाले, पंचवीस सहस्र पदाती युद्धार्थ उभे राहिले होते ते पाह तांच भीमसेन व धृष्टद्युम्न हे उभयतां चतुरंग सैन्य बराबर घेऊन त्याज वर गेले आणि त्यास वेष्टन करून त्याजवर बाण प्रहार करूं लागले अ सतां भीमसेन मोठ्या त्वरेनें हस्तामध्येंगदा घेऊन रथावरून उतरून- त्यांच्याशीं युद्ध करीत असतां सर्वसैन्याचा वध करून नंतर धृष्टद्युम्नास पुढें करून त्या सैन्यांत स्तब्ध उभा राहिला. धनंजयानेंही बहुत रथ्यांस पी डित केलें, दुर्योधनाच्या बलाचें मर्दन करणारे माद्रीपुत्र व सात्यकी हे मो- ठ्या हर्षानें शकुनीवर धाऊन जाऊन त्याशीं युद्ध करीत त्यानीं बहुत निशि त बाणांनीं त्याच्या अश्वस्वारांचा वध केला, तें युद्धतर फारच मोठें झालें धनंजयही बहुत रथ्यांवर चालून जाऊन आपले धनुष्याचा टणत्कार क रूं लागला असतां कौरवां कडील योद्धे भयाभीत होऊन पळाले. पांचालां च्या महारथी जो धृष्टद्युम्न याणें कौरवांकडील पंचवीस हजार पदाती यम लोकीं पाठविले आणि तो भीमसेनास पुढें करून आपण युद्धपरावृत्त झा ला. यशस्वी नकुल सहदेव, सात्यकी सहवर्तमान शीघ्रास्त्रवेत्या गांधार राजावर धांऊन जाऊन त्यास अदृश्य करूं लागले. पांडवांकडील चेकितान, शिखंडी व द्रौपदेय हे योद्धे कौरव सैन्याचा वध करून शंखांचे नाद करीत पलायन करणाऱ्या कौरव सैन्याच्या मागें लागले. कौरवांकडील कांहीं- अवशिष्ट राहिलेल्या सैन्यावर अर्जुन शरांची वृष्टी करूं लागला असतां- त्या बाण समुदायानीं दोहीं कडे अंधःकार झाल्यामुळें कौरवांकडील योद्धे पळाले. याप्रकारें कौरव सैन्य भग्न होऊन गेलें आणि पांडवांकडील सैनि क युद्धार्थ सन्मुख उभे आहेत हें पाहून दुर्योधन पाडवांस युद्धार्थ आव्हा

न करूं लागला. त्याकाळीं सकल पांडव एकत्र होऊन व नानाप्रकारचीं श-स्त्रें घेऊन गर्जना करीत क्रोधानें दुर्योधनावर धांऊन जाऊन त्याची वारं वार निर्भर्त्सना करूं लागले. दुर्योधनही मोठ्या सावधपणानें पांडवांव-र धांऊन जाऊन निशित बाणांनीं त्यांस ताडण करूं लागला. पुढें दु-र्योधनानें आपलें सैन्य दुःखित झालेलें पाहून आपल्या बुद्धीचा निश्च-य करून सर्व योध्यांस हर्ष होणारें भाषण केलें कीं, हे योद्धे हो, प्रस्तुत पां डवांचें सैन्य अल्प राहिलें आहे, कृष्णार्जुनही बाणांनीं अत्यंत व्यथित झा ले आहेत यास्तव आज मी सर्वांचा वध करीन, आज आपलाच विजय-आहे असें निश्चयें करून तुम्हीं जाणा. तुम्हीं पलायन करून जरी गेलांत त्थापि पांडव निश्चयें करून तुमचा वध करतील यास्तव तुम्हीं युद्धास सन्मुख होऊन तरी मृत्यूस वश व्हा, म्हणजे तुमचें कल्याण तरी होईल. असें दुर्योधन आपले योध्यांस भाषण करीत असतां त्या योध्यानीं दुर्योधनाचें वाक्य ऐकून चोहींकडे पलायन केलें. असा विषय या अध्यायांत आहे.

९४ अध्याय चवऱ्याण्णवावा:— संजय भाषण करतो हे धृत राष्ट्र राजा, पलायन केलेल्या सैन्यास तुझ्या पुत्रानें माघारें फिरविलें हें पाहू-न शल्य दुर्योधनास भाषण करतो हे राजा, ही हजारों मरण पावलेल्या वीरानीं पूर्ण झालेली रणभूमी, तसेंच कितीएक अश्व, मनुष्यें व शरानीं वारंवार भिन्न झालेले पर्वत मायगज पडले आहेत हे पहा. कितीएक नष्टचेतन झालेले योद्धे पृ थ्वीवर पडून वारंवार श्वासोच्छ्वास टाकितात यामुळें रणभूमींतून अग्नीच्या ज्वालाच निघतात काय! अशी दिसते कर्णार्जुनाचे बाहुमुक्त शर उभयतांच्या सैन्यांतील गजाश्वमनुष्यांच्या देहाचें विदारण करून व त्यांचे प्राण हरण क-रून पृथ्वींत जात आहेत या प्रकारें कर्णार्जुनाच्या बाणांनीं असंख्यात म-नुष्य अश्व व गज रथ, शस्त्रें पृथ्वीवर पडल्यामुळें तिजवर फिरण्यास मा र्ग नाहींसा झाला आहे. कितीएक योध्यांचीं वस्त्रें, भूषणें, किरीट, माला, प-वाळ व मोती एकठिकाणीं ग्रथित केलेले हार, बाहुभूषणें पृथ्वीवर छिन्न-विछिन्न होऊन पडलीं आहेत. दुर्योधना, हे सर्व योद्धे युद्धास जातील तर जा वोत तूं आतां युद्धापासून निवृत्त होऊन आपल्या शिबिरांत जा. असें श-

ल्य दुर्योधनास भाषण करून विराम पावला. दुर्योधन तर शोकानें व्याप्त झा-
ल्यामुळें हा कर्णा, हा कर्णा असा आर्त शब्द करीत नेत्रांतून अश्रुपात करून नि
चेष्ट पडला असतां द्रोणपुत्र प्रभृति मोठ मोठे योद्धे त्यास वारंवार अश्वास
न देण्याकरितां येऊन अर्जुनाच्या यशस्वी ध्वजास वारंवार पाहूंलागले. अ-
र्जुनाच्या सुवर्णपुंख व शिळेवर पाजिवलेल्या बाणांनीं व्याप्त झालेला क-
र्ण पृथ्वीवर मृत होऊन जरी पडला तथापि सूर्यासारखा तेजस्वी दिसत होता,
रुधिरानें भरलेल्या कर्ण देहास पाहून भक्तावर दया करणारा असा जो सूर्य
तो आपल्या किरणानीं आपल्या भक्तास स्पर्श करून समुद्रांत स्नान क-
रण्या करतांच जातो काय! अशी मोठ मोठे ऋषिश्रेष्ठ उत्प्रेक्षा करीत आपल्या
गृहींगेले. सूर्यासारखी ज्याची कांती अशा कर्णास पाहून सकल लोक हा जि
वंतच आहे असें म्हणत, ज्या कर्णानें सर्व पांचाल, पांडव, पांडवांचें सर्वसैन्य व
सर्व जगत् शर वर्षावानें सहस्रांशु सूर्यासारखें संतप्त केलें तो कर्ण आपल्या-
वाहन, पुत्र यां सहवर्तमान युद्धांत मृत झाला. ज्या कर्णानें याचकांस देतों असें
भाषण केलें असतां पुन्हा त्यानें नाहीं असें म्हटलें नाहीं व जो निरंतर स-
त्पुरुषाच्या सहवासानें रहात असे तो कर्ण द्वैरथ युद्धामध्यें मृत झाला. म
हात्म्या कर्णानें आपलें सर्ववित्त ब्राम्हणांस अर्पण केलें होतें, कदाचित् ब्रा-
म्हणांस जीवदान करण्याचा प्रसंग आल्यास तो उद्युक्त होत असे, हा कर्ण
स्त्रियांस निरंतर प्रीय व मोठा दाता होता, पार्थ अस्त्रानें मृत होऊन उत्तमग-
तीस गेला. हे धृतराष्ट्र राजा, या कर्णाच्या आश्रयानें तुझा पुत्र दुर्योधन पां
डवांशीं वैर करी, तोच कर्ण आज तुझा पुत्राची जयाशा व त्याचें यश घेऊन स्व
र्गास गेला. कर्ण मरण पावल्यावर संपूर्ण नद्यांचे प्रवाह बंद झाले, सूर्य अ-
स्तास गेला, सोमाचा पुत्र जो बुध त्याची सूर्या सारखी कांती होऊन तिर्यक
गती झाली. कर्ण मरण पावला त्याकाळीं आकाश धांवतेच काय! असें दि
सूं लागलें, पृथ्वीतून शब्द होऊं लागले, घोर वायु सुटले, समुद्र क्षुब्ध हो-
ऊन गर्जना करूं लागले, अरण्यासहवर्तमान् सकलपर्वत कंपित झाले, स-
र्वप्राणी मोठे व्यथित झाले, आकाशापासून तेजयुक्त उल्कापात होऊं लाग
ल्यामुळें त्याचें तें तेज पाहून रात्रींसंचार करणारे जीव हर्षित झाले. ज्या का

ळीं चंद्रासारखें तेजस्वी कर्णाचें मुख अर्जुनानें बाणानें छिन्न करून पृथ्वीवर पाडलें, त्याकाळीं एकाएकीं अंतरिक्षांत देवानीं हाहाःकारशब्द केला. जानें आपल्या धनुष्य प्रत्यंचेच्याशब्दानें व बाणाच्याशब्दानें सकलरिपूंची सेनातेजहीन करून सकल कौरवांस आपल्याबाणांनीं व्याप्त केलें अशाअर्जुनाचें व कृष्णाचें सकल लोकानीं त्याकाळीं स्तवन केलें. कर्णमरणपावलाम्हणून सकलभूतानीं यथायोग्यस्तुति व सत्कार केलेले कृष्णार्जुन आपल्यासुहृद् गणांसहवर्तमान मोठे आनंद पावले. असाविषय या अध्यायांत आहे.

९५. अध्याय पंचाणवावा:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, कर्णमरण पावलेला पाहून सकल कौरव भयानें पीडित होऊन सकलदिशा पहात आसमंतात् भागीं इकडे तिकडे पळाले. अवशिष्ट राहिलेल्या नारायण गणांसहवर्तमान कृतवर्मा, सहस्रावधि गांधार योध्यांसह वर्तमान महामेघासारखें गजसैन्य बरोबर घेऊन कृपाचार्य, अश्वत्थामा हे सर्व आपलें शिबिराकडे पळून गेले, तसेच दुर्योधन व शल्य हेही आपले शिबिरांतगेले. कितीएक कौरवांचे योद्धे अर्जुनाची प्रशंसा करीत व कितीएककर्णाची प्रशंसा करीत भयाभीत होऊन दाही दिशेस पळाले. हे राजा, तुझाकडील सहस्रावधि योद्धे होते परंतु त्यांतून एकही पुरुष युद्धाविषयीं मन धारण करण्यास समर्थ झालानाहीं. हे महाराज, कर्ण मरण पावलेला पाहून तुझाकडील सर्व योद्धे राज्य, दारा, धन व आपलें जीवित याविषयीं निराशहोऊन गेले. हें पाहून दुर्योधन त्या योध्यांची शांति करण्याविषयीं यत्नकरूं लागला असतां ते योद्धे दुर्योधनाची आज्ञा शिर सावंद्य करून युद्ध करण्या विषयीं उद्युक्त झाले. असाविषय या अध्यायांत आहे.

९६. अध्याय शाण्णवावा:— संजय भाषण करतो हे धृतराष्ट्रराजा, कर्णमरण पावल्यावर शत्रूचें सर्वसैन्य पळून गेलें असतां श्रीकृष्ण अर्जुनास आलिंगन देऊन असें बोलला कीं, हे धनंजया, तूं कर्णाचा वधकेलास, आतां वृत्रवधाच्या गोष्टीसारख्या ह्या घोर कर्ण वधाच्या गोष्टीसर्व लोक एकमेकांस सांगतील, आतां तुझा हा पराक्रम व लोकामध्यें प्रसि

द्ध झालेलें यश आपण धर्मराजास जाऊन सांगूं. असें पार्थास बोलून त्यांचा रथ माघारा फिरवून श्रीकृष्ण सर्व सैनिकांस असें बोलला कीं, कर्ण मरण पावला हें वर्तमान सांगण्या करितां आम्हीं धर्मराजाकडे जातों या स्तव आम्हीं पुन्हा माघारी येई पर्यंत तुम्हीं पराङ्मुख न होतां एकत्र जमून सिद्ध असावें. असें कृष्णाचें भाषण ऐकून त्या शूरानीं कृष्णास जाण्यास अनुमोदन देतांच श्रीकृष्ण अर्जुनास घेऊन धर्मराजाकडे गेला. आणि उभयतांनीं राजाजवळ जाऊन दोन्ही पाय घट्ट धरले. त्याकालीं धर्मराजानें उभयतांची हर्षयुक्त चर्या पाहून आपण ही हर्षानें नेत्रांतून बाष्पोदक टाकीत राधेय मरण पावला असें खचीत जाणून तो अरिदमन महाबाहू धर्मराज शय्येवर उठून बसला. आणि वासुदेव अर्जुनास मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊं लागला. त्याकालीं वासुदेव धर्मराजास कर्ण मरण पावल्याचा वृत्तांत सांगून असें बोलला कीं, हे राजा, गांडीवधन्वा अर्जुन, वृकोदर, भीमसेन, तूं व माद्रीपुत्र नकुल सहदेव हे दैवाच्या योगानें कुशल आहेत आतां लोमहर्षण करणारा व वीरांचा क्षय करणारा असा जो उभयतांचा संग्राम त्यापासून तूं मुक्त झालास; यास्तव इतउत्तर जीं कार्यें तुला कर्तव्य असतील तीं लवकर कर. हे पुरुषव्याघ्र धर्मराजा, शरानीं पूर्णांग झालेला असा जो सूतपुत्र तो आज पृथ्वीवर शयन करीत आहे त्यास जाऊन पहा. आज तुझे सर्व शत्रु मरण पावले आतां या शत्रुरहित पृथ्वीचें पालन कर आणि आम्हां सह वर्तमान यथेच्छ बहुत भोग्य वस्तूंचा उपभोग कर. असें केशवाचें भाषण ऐकून धर्मराज श्रीकृष्णास बोलला कीं, हे देवकीनंदना, हें सर्व कृत्य दैवानें घडलें म्हणून जें तूं मला भाषण केलेंस; हें तुला उक्त नव्हे, तूं आमचा हितकर्ता असतां हें कृत्य घडण्यास काय आश्चर्य आहे? तूं पार्थाचा सारथी असल्यामुळें पार्थ कर्णाचा वध करण्यास समर्थ झाला यांत आश्चर्य काय! तुम्हीं नरनारायणाचे अवतार, मोठे धर्मात्मे, अनादि ऋषिश्रेष्ठ आहांत म्हणून नारदानें मला सांगितलें होतें. महाबुद्धिवान् द्वैपायनव्यासही तुमच्याविषयीं असेंच मला सांगत होते, जेव्हां तूं पार्थाचा सारथी झालास तेव्हां

व भीष्म, द्रोण, कर्ण, कृपाचार्य व त्याचे साहाय्य करणारे इतर क्षत्रिय-पार्थानें मारले. तुझ्याच बुध्धीनें कर्ण पार्थानें मारला. असें भाषण करून धर्मराज रथामध्यें बसून व समागमें आपलें सैन्य घेऊन कर्णास पाहण्याच्या इच्छेनें रणभूमिमध्यें जेथें कर्ण पडला होता तेथें आला आणि कृष्णाव अर्जुन याउभयतां सहवर्तमान कांहीं प्रियभाषणें बोलून पुरुषश्रेष्ठ कर्णास पाहूं लागला. नंतर धर्मराजास त्याच्या मरणाचा खरा प्रत्यय आल्यावरून पुनः पुन्हा त्याजकडे कृष्णाव अर्जुनाची प्रशंसा करून बोलला कीं, हे गोविंदा, आज मी भ्रात्यांसहवर्तमान पृथ्वीचा राजा झालों, आज राधेय मरण पावला हें ऐकून दुर्योधन आपले जीवित्वाविषयीं निराश होईल. दैवें करून आज तूं आमच्या शत्रुचा नाश केलास; आतां अर्जुन दैवें करून विजयी असो. तेरा वर्षें आम्हीं जागरणें करून मोठ्या दुःखानें काढिलीं आतां तुझ्या प्रसादानें आजरात्रीं सुखानें निद्रा घेऊं. याप्रकारें धर्मराजानें जनार्दनाची व अर्जुनाची मोठी स्तुती केली. नंतर पार्थ सायकानीं मरण पावलेला कर्ण धर्मराजानें पाहून आज मी पुन्हाच जन्मलों असें मानिलें, शत्रुपराजय करणारे, युद्धविशारद व शत्रुवर प्रहार करण्याविषयीं मोठे दक्ष असे नकुल, सहदेव, भीमसेन, वृष्णी, सात्यकी, धृष्टद्युम्न, शिखंडी, पांचाल व सृंजय कृतनंदन कर्णास मेलेला पाहून धर्मराजाची पूजा करून कृष्णार्जुनाची स्तुति करीत मोठ्या हर्षानें आपल्या शिबिराप्रत गेले. हे धृतराष्ट्र राजा, शरीरावर रोमांच उत्पन्न करणारा असाह्य वीरांचा क्षय तुझ्या दुष्टविचारामुळें झाला. आतां कां व्यर्थ शोक करतोस? वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अंबिकासुत धृतराष्ट्र कर्णमरण पावल्याची अप्रीय वार्ता ऐकून छिन्नमूल झालेल्या वृक्षासारखा एकाएकी पडून निचेष्ट झाला, तशीच राजाची स्त्री दीर्घदर्शनी-गांधारी तीही तें वृत्त ऐकून बहुत शोक करूं लागली. त्याकाळीं विदुर व संजय, धृतराष्ट्र गांधारीचें समाधान करूंलागले. इतर कौरवांच्या स्त्रियानीं गांधारीस पृथ्वीपासून उठऊन समाधान केलें. धृतराष्ट्र राजानें-हें सर्व आपले दैवानें भवितव्य होतें तें जाहलें असें मानून तो चिंताग्रो

क व मोहानें पीडित होऊन विदुरानें जरी त्यास अश्वासन दिल्हें तथापि तो निःचेष्ट होऊन स्वस्थ बसला. हे माहात्म्या कर्णार्जुनाचें महायुद्ध झालेलें जो पठण करील किंवा श्रवण करील त्यास यज्ञाचें फल प्राप्त होईल, यज्ञ हाच सनातन विष्णु भगवान् आहे असें अग्नि, वायु, चंद्र व सूर्य म्हणतात यास्तव निर्मत्सर्य होऊन जो हा कर्णार्जुनाच्या युद्धाचें वृत्त ऐकेल तो सर्व लोकांमध्यें सुखी होईल. आणि विष्णु, ब्रम्हदेव व शिव त्या पुरुषश्रेष्ठावर नेहमी संतुष्ट असतील, ही संहिता ब्राम्हणांनीं श्रवण व पठण केली असतां त्यांस वेदपठणाचें पुण्य लागेल. क्षत्रियानीं श्रवण व पठण केली असतां रणांत त्यांस बल प्राप्त होऊन त्यांचा विजय होईल, वैश्यानीं श्रवण व पठण केली असतां तें द्रव्यानें श्रेष्ठ होतील, शूद्रानें श्रवण केली असतां त्यास आरोग्य प्राप्त होईल. या ग्रंथांत सनातन विष्णूचें कीर्तन केलें आहे यास्तव जो या ग्रंथाचें श्रवण व पठण करील तो मनोरथ पूर्ण होऊन सुखी होईल असें व्यासाचें वाक्य आहे. जो सवत्स कापिला धेनु एक वर्ष पर्यंत निरंतर ब्राम्हणांप्रत दान करतो त्यास जें पुण्य प्राप्त होतें तेंच पुण्य कर्णपर्व ऐकिल्यानें प्राप्त होतें. असा विषय या अध्यायांत आहे. इति कर्णपर्व समाप्त.



# श्री.

# शल्यपर्व.

श्रीगणेशायनमः अध्याय १ला:– जनमेजय प्रश्न करितात हे वैशंपायन ऋषे. संग्रामामध्यें अर्जुनानें कर्णास मारल्यावर बाकी राहिलेल्या कौरवानीं पुढें काय केलें? व दुर्योधनाचें सर्व सैन्य पांडवानीं विदीर्ण करून टाकिलें हें त्यानें पाहून पुढें तो काय करूं लागला? हें ऐकण्याची इच्छा आहे. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, कर्ण मरण पावल्यावर दुर्योधनराजा हे कर्णा, हे कर्णा, असा शोक करीत बाकीच्या राजांसह वर्तमान आपले शिबिरांत आला. नंतर सर्व राजानीं दुर्योधनाचें सांत्वन केलें असतांही दुर्योधन शांति पावला नाहीं. भवितव्य होणार तें चुकत नाहीं, असा त्यानें निश्चय करून व शल्यास सेनापति करून बाकी राहिलेल्या राजांसहवर्तमान संग्रामभूमीचे ठायीं आला. त्या कालीं देवासुरांच्या संग्रामा सारखें कौरवांचें व पांडवांचें सैन्याचें युद्ध झालें. हे राजा, त्या संग्रामामध्यें शल्यानें पांडवसैन्याचें मोठें कदन केलें. नंतर मध्यान्ह समयीं धर्मराजानें शल्याचा वध केला. हें दुर्योधनानें पाहतांच रणापासून माघारा फिरून रिपुभयास्तव ऱ्हदामध्यें प्रवेश केला. नंतर त्याच दिवशीं भीमसेनानें त्यास मारिलें नंतर कौरवांकडील तीन रथी राहिले होते, त्याणीं मोठ्या पराक्रमानें रात्रीं पांचालसैन्याचा नाश केला. दुसरे दिवशीं प्रातःकालीं संजय शिबिरांतून धृतराष्ट्रा जवळ आला. आणि मोठ्या दुःखानें बोलूं लागला कीं, हे राजा दुर्योधन मरण पावल्यामुळें आह्मीं सर्व नष्ट झालों. तुझे पुत्र व योद्धे शक्रासारखे बलिष्ठ असतांही पांडवांनीं त्यांचा वध केला. संजय परम क्लेशित होऊन ज्या कालीं हस्तनापुरांत आला. त्या कालीं संपूर्ण लोकांनीं त्यास क्लेशित झालेला पाहून ते एकाएकीं उद्विग्न झाले आणि हे राजा, हे राजा, असें ह्मणून रोदन करूं लागले. सकल नगरांतील स्त्री पुरुषानीं दुर्योधन मृत्यु पावला हें ऐकतांच मोठा आर्त नाद करून इकडे तिकडे धांवूं लागले. इतक्यांत संजय धृतराष्ट्राच्या

अंतःपुरांत गेला. प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र राजा सकल स्नुषा, गांधारी, विदुर इतर सुहृद् व ज्ञाति यांणीं वेष्टित होऊन कर्णाच्या मरणाचें चिंतन करीत बसला आहे अशा वेळीं संजय रोदन करीत असें बोलला कीं, हे भरतश्रेष्ठा मी संजयास नमस्कार करितों. व सकल नर, गज, रथी, अश्व, पदाति हे सर्व युद्धामध्यें मरण पावले. हे राजा, पांच पांडव, वासुदेव व सात्यकी हे पांडवांकडील व कृपाचार्य कृतवर्मा व अश्वत्थामा हे तुमच्या कडील. अवशिष्ट राहिले. हे धृतराष्ट्रा, तुह्मांकडील अकरा अक्षौहिणी सैन्य मरण पाऊन हे तीन अवशिष्ट राहिले. हें सर्व दुर्योधनकृत वैराचें फल होय. असें संजयाचें कठोर भाषण धृतराष्ट्र, विदुर, गांधारी व सकल धृतराष्ट्राच्या स्नुषा यानीं ऐकतांच तीं सर्व एका एकीं पृथ्वीवर पडलीं त्या कालीं पटावर काढलेलीं चित्रें जशीं दिसतात तसें हें सर्व राजमंडळ निःसंज्ञ होऊन पृथ्वीवर पडलेलें दिसूं लागलें. कांहीं कालानें धृतराष्ट्र राजा सावध होऊन दुःखानें सर्व दिशा पहात विदुराकडे पाहून भाषण करितो. हे विदुरा, आतां मी अनाथ झालों. सर्व माझे पुत्र नष्ट झाल्यामुळें तूंच माझी गति आहेस. असें भाषण करून धृतराष्ट्र राजा पुनः पृथ्वीवर पडला. राजाचे जे इतर बांधव होते त्यांणीं त्यास शीत जलाचें सिंचन करून व्यजनानें वारा घातल्यामुळें कांहीं कालानें तो सावध झाला आणि कुंभांत घातलेल्या सर्पासारखा श्वासोच्छ्वास टाकून स्तब्ध व चिंताग्रस्त बसला, हें संजयानें पाहून तोही चिंताग्रस्त झाला. तशाच सकल धृतराष्ट्राच्या स्नुषा व गांधारी चिंताग्रस्त होऊन स्तब्ध बसल्या. कांहीं कालानें धृतराष्ट्र राजा सावध होऊन विदुरास बोलतो हे विदुरा, या माझ्या सर्व स्नुषानीं व गांधारीनें आणि सर्व सुहृज्जनानीं या स्थलापासून दूर जावें; कारण त्यांस पाहून माझें मन अत्यंत भ्रमतें. असें ऐकून विदुरानें त्या सर्वांस दूर नेल्या नंतर धृतराष्ट्र राजा अंजलिपुट जोडून संजयाकडे वारंवार पाहूं लागला. त्या कालीं संजय आणि विदुर यांणीं राजास आश्वासन दिलें. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय २रा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराजाच्या

स्नुषा व गांधारी प्रभृति स्त्रिया अंतःपुरांतून बाहेर गेल्यावर धृतराष्ट्र रा-
जा बहुत दुःखित होऊन हातानीं हाताचें वारंवार मर्दन करून बोलला
कीं, हे सूता रणामध्यें पांडव अर्जुन सुखरूप आहेत हें ऐकून मला मोठें दुः
ख होतें. माझे पुत्र मरण पावले हें ऐकून माझ्या हृदयाचे सहस्त्रशः
तुकडे कां होत नाहींत? तस्मात् माझें हृदय लोखंडाचें आहे. मी अंध-
असल्यामुळें त्या पुत्रांचें रूप जरी माझ्या दृष्टिगोचर नव्हतें तथापि त्यां
जवर माझी बहुत प्रीति होती. माझे पुत्र यौवनावस्थेंत आलेले ऐकून-
मला हर्ष होत असे, ते पुत्र मरण पावल्याचें मी ऐकतों तेणें करून माझी
शांति किमपिही होत नाहीं. असें संजयास बोलून पुनः धृतराष्ट्र राजा दुः
खानें बोलूं लागला. कीं, हे पुत्रा, तुझ्या वांचून सांप्रत मी अनाथ झालों
अरे ती पूर्वीची कृपा व प्रीति माझ्यावर तुझी होती ती आज कोठें गेली?
तूं अपराजित असतां पार्थानीं रणामध्यें तुला कसें मारिलें? हे तात असें भा-
षण आतां मला कोण करील? भगदत्त, कृपाचार्य, शकुनि, पितामह भी-
ष्म हे व इतर बहुत क्षत्रिय मजकरितां रणामध्यें मेले. हे पुत्रा, या स
मग्र राजांमध्यें भ्रात्यांसहवर्तमान तूं असें भाषण करीत होतास कीं,
पांडव, पांचाल, चेदी, द्रौपदेय, सात्यकी, कुंतिभोज, घटोत्कच इतक्यां-
चें निवारण करण्यास समर्थ आहें. आणखी असें ह्मणत होतास कीं,
आमच्याशीं वैर केलेले पांडव समरामध्यें धांवून आले असतां मी ए
कटाच त्यांचा वध करीन. आह्मांकडील वीर पांडवांकडील सकळ यो
द्ध्यांशीं युद्ध करून त्यांस मारतील. एकटा कर्ण सकळ पांडवांचा व
ध करील. नंतर अवशिष्ट जे राहतील ते व वासुदेव माझ्या आज्ञेंत रा
हतील, हें जें तूं बोलला होतास तें कांहींच घडलें नाहीं. हे सूता, अ-
सें भाषण दुर्योधन माझ्याशीं करीत असे. ती त्याची भाषणशक्ति पा
हून पांडव युद्धांत मृत्यु पावले असेंच मी मानीत होतों. ते माझे पुत्र
सर्व राजांमध्यें पांडवानीं मारिले. मृगेंद्र जसा जंबुका पासून मृत्यु पा
वतो तसा हा भीष्म शिखंडीपासून व सर्व शस्त्रास्त्रपारद द्रोणाचार्य
भूरिश्रवा, सोमदत्त, महाराज, बाल्हीक, हे त्या युद्धांत मरण पावले. ते-

ह्मां दैवापेक्षां दुसरें काय राहिलें? या प्रमाणेंच सर्व मरण पावले. तस्मात् दैवावांचून दुसरें कांहीं नाहीं. मला असें वाटतें कीं, मनुष्य, दैव बरोबर घेऊनच उत्पन्न होतो. जो भाग्यशाली असतो त्यांचेंच कल्याण होतें. मी पुत्रहीन व भाग्यहीन होऊन आज शत्रुस कसा वश होऊं. आतां वनांत वास करण्या पेक्षां दुसरें कांहीं चांगलें नाहीं. असा विचार करून वनांत गेल्या दुर्योधनादिक माझे स्वकीय होते ते मरण पावले. आतां भीमसेनाचें कठोर भाषण ऐकून त्यांचे स्वाधीन कसा राहूं? त्यानेंच माझे शंभर पुत्र मारिले. त्यामुळें दुःखशोकानें मी संतप्त झालों. असा धृतराष्ट्र हतबांधव व हतपुत्र झाल्यामुळें शोकानें व चिंतेनें संतप्त होऊन उष्ण दीर्घ श्वासोच्छ्वास टाकून पुनः संजयास प्रश्न करितो. हे सूता भीष्म, द्रोण व सूतपुत्र हे मरण पावल्यावर माझ्या पुत्रानें दुसरा कोण सेनापति केला? माझ्या पुत्रानें जे जे सेनापति केले ते ते पांडवांनीं मारिले. पहा बरें तुम्ही सर्व पहात असतां अर्जुनानें भीष्म, द्रोणाचार्य, सूतपुत्र कर्ण व इतरही बहुत राजांचा वध केला. माहात्म्या विदुरानें मला असें सांगितलें होतें कीं, दुर्योधनाच्या अपराधानें सकलतुझी प्रजा नष्ट होईल. तें त्याचें भाषण आज माझे अनुभवास आलें. परंतु दैवानें माझें चित्त नष्ट झाल्यामुळें त्याचें भाषण पूर्वी मी ऐकिलें नाहीं, ही माझ्यापासून मोठी अनीति झाली. तस्मात् हे संजया मी जी अनीति केली तिचें सकल फल मला कसें प्राप्त झालें, तें सांग? कर्ण युद्धांत मरण पावल्यावर सेनापति कोण होता. अर्जुन व वासुदेव यांजवर आपल्याकडील कोणचा रथी धांऊन गेला? हें भारताचें महासमय जाहल्याचें वृत्त मला यथातथ्य सांग. जसा माझा पुत्र युद्धांत मरण पावला. तसेच पांडवांकडील सैन्यासहवर्तमान पांचालांचे योद्धे मरण पावल्यानंतर धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदीचे पांच पुत्र, पांच पांडव, श्रीकृष्ण व सात्यकि हे पांडवाकडील योद्धे व कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा हे आमचेकडील योद्धे अवशिष्ट राहिले होते. या वीरांचा परस्पर युद्धप्रसंग कसा झाला. हे संजया तूं मोठा कुशल आहेस यास्तव हें संपूर्ण वृत्त तुझ्यापासून ऐकण्यास इच्छितों. असा विषय या अध्यायांत वर्णन केला आहे. इति द्वितीयोध्यायः

अध्याय ३ रा- संजय भाषण करितो, हे धृतराष्ट्र, कौरव व पांडव यांचें परस्पर युद्ध होत असतां बहुत जनांचा क्षय कसा जाहला तें वृत्त सांगतों. ऐक. अर्जुनानें सूतपुत्राचा वध केल्यावर तुह्मांकडील सकल सैन्य चोहींकडे पळून गेलें. त्या काळीं सकल वीरांचा क्षय झाला व कर्ण मरण पावला हें पाहून अर्जुन सिंहनाद करूं लागला असतां तो नाद ऐकून तुझ्या पुत्रांस बहुत भय उत्पन्न झालें. कर्ण मरण पावल्यामुळें तुमच्याकडील योद्ध्यांची बुद्धि पराक्रमा विषयीं नष्ट होऊन जशी एकाद्या वणिक जनाची नौका अगाध जलामध्यें भग्न झाली असतां आंतील लोक आपण परतीरास कसे जाऊं? या विषयीं विवंचना करितात, तसे तुझे पुत्र अतःपर काय करावें अशी विवंचना करूं लागले. युद्धामध्यें या सर्वांस अर्जुनानें पराजित करून निर्वीर्य केल्यामुळें सायंकाळीं रणापासून माघारे गेले. ते भयंकरून पळत असतां आह्मांस मारण्या करितां अर्जुन अथवा भीमसेन येतो कीं काय असें समजून एकमेकांस पहात म्लान होऊन पडले. तुझ्याकडील योद्धे अत्यंत भयाभीत होऊन चोहींकडे पार्थच आहे काय, असें मानूं लागले. कांहीं योद्धे भीमसेनास भिऊन चारी दिशांस पलायन करीत असतां दुर्योधन हाहाकार करून आपले सारथ्यास असें बोलला कीं, अरे सूता, धनुष्यबाण धारण करून मी उभा राहिलों असतां पार्थ माझें अतिक्रमण करून जावयाचा नाहीं. मी सैन्याच्या पश्चमभागीं आहें यास्तव माझ्या अश्वास प्रेरणा करून युद्धाकरितां पुढें ने ह्मणजे कौंतेय मला पाहून पुढें जाणार नाहीं. आज गोविंदासहवर्तमान अर्जुन, वृकोदर आणि अवशिष्ट राहिलेले शत्रु यांस मारून कर्णाचा अनृणी होईन. असें शौर्ययुक्त दुर्योधनाचें भाषण ऐकून सूतानें हेमाभरणानें भूषित केलेल्या दुर्योधनाच्या रथाच्या अश्वांस प्रेरणा केली. त्या काळीं गजाश्वरथांनीं हीन असे पंचवीस हजार पदाति दुर्योधनाच्या रथाच्या मागून परम त्वरेनें युद्धार्थ निघालेले पाहून धृष्टद्युम्न व भीमसेन चतुरंग सैन्य बरोबर घेऊन त्या पदात्यांवर धांवले. आणि बाणांचे प्रक्षेप करूं लागले असतां ते पदाति सैन्य भीमसेन व धृष्टद्युम्नाचीं नांवें घेऊन मोठ्या निकरानें युद्ध करूं लागले. त्या काळीं

भीमसेन क्रोधानें गदा घेऊन रथाखालीं उतरला. आणि रथारूढानें रथहीनाशीं युद्ध करूं नये. असा धर्म जाणून आपल्या भुजवीर्यानें त्याशीं युद्ध करितां करितां जसा दंडपाणि अंतक सर्वांचा नाश करितो तसा सुवर्णानें मढविलेल्या गदेच्या योगें सर्व पदाति सैन्याचा वध करूं लागला. ते सकल पदाति मरण पावले हें पाहून भीमसेन आपल्या हस्तांत खड्ग व गदा धारण करून श्येनपक्ष्या सारखा युद्धभूमीवर संचार करीत करीत धृष्टद्युम्नास पुढें करून उभा राहिला. महावीर्यवान धनंजय, दुर्योधनाकडील योद्धे, उभयतां माद्रिपुत्र शकुनीसहवर्तमान युद्ध करूं लागले. कांहीं रथी सात्यकीशीं युद्ध करीत असतां सात्यकीनें त्या योद्ध्यांच्या रथाचे अश्व मारून त्यांजवर निशित बाणाची वृष्टि केली. ते योद्धे जेथें जेथें जात तेथें तेथें सात्यकी जाऊन युद्ध करूं लागला. तीन लोकांत विख्यात असें जें गांडीव धनुष्य त्याचा टणत्कार करीत करीत धनंजय, रथसैन्यांत फिरवीत असतां कृष्ण ज्याचा सारथी व श्वेत अश्व ज्याचे रथास जोडलेले, अशा अर्जुनास पाहून तुझ्याकडील योद्धे भयानें पळून गेले. नंतर रथ व अश्वहीन अर्जुनानें निवारीत असे पंचवीस हजार पदाति पार्थावर बाणांचा वर्षाव करूं लागले असतां महारथी पार्थानें त्या सर्वांचें निवारण करून भीमसेन पुरस्कृत होत्साता पांचाल सैन्यामध्यें गेला. त्या कालीं धृष्टद्युम्न पारव्या वर्णाश्व जोडलेल्या रथांत बसून आला असतां त्यास पाहून तुझ्याकडील योद्धे पळून गेले. इकडे महायशस्वी माद्रिपुत्र सात्यकीसहवर्तमान गांधारराज जो शकुनि यासह युद्ध करण्यास्तव प्राप्त झाले. चेकितान व शिखंडि व द्रौपदीच्या पांच पुत्रानीं तुझ्यांकडील योद्धे मारून शंखाचे नाद केले. तुझ्यांकडील योद्धे युद्धपराङ्मुख होऊन पलायन करूं लागलेले पांडवांकडील योध्यानीं पाहतांच युद्धांत पराजित झालेल्या वृषभा सारखे त्यांजवर धांवून युद्ध करूं लागले. उभयतांचें युद्ध होत असतां राजा, तुझ्याकडील सेनेचा कांहीं अवशिष्ट भाग, राहिलेला अर्जुनानें पाहतांच तो बाणाची वृष्टि करूं लागला. त्या कालीं तें सैन्य भयानें पळून गेलें. इकडे

पांडवांचें सैन्यही पलायन करूं लागलें. त्या कालीं कुरुराज दुर्योधन उभयतांचें सैन्य पलायन करूं लागलेलें पाहून पांडवांस युद्धा करितां आव्हान करूं लागला. त्या कालीं सकल पांडव एकत्र होऊन दुर्योधनाची वारंवार निर्भर्त्सना करीत त्यांजवर शस्त्रांची दृष्टि करूं लागले. त्या शस्त्राच्या योगें दुर्योधन कांहीं भ्रांत न होतां पांडवांवर बाणवर्षाव करूं लागला. हे धृतराष्ट्र राजा, त्या कालीं तुझ्या पुत्राचें पौरुष असें मी अद्भुत पाहिलें कीं, सकल पांडव तुझ्या एकट्या पुत्रावर अस्त्रप्रयोग करीत असतां तुझा पुत्र अस्त्राविषयीं संभ्रांत झाला नाहीं. त्या समयीं दुर्योधनाचें सैन्य पांडवांच्या भयानें पळूं लागलें. हें दुर्योधनास समजतांच तो सैन्याचे सन्निध येऊन त्यांस हर्ष उत्पन्न होण्या जोगें भाषण करूं लागला कीं, हे सैनिकहो, तुह्मीं पळूं नका. या पृथ्वीवर अथवा पर्वताचे ठायीं पांडवांच्या आगमना वांचून तुह्मांस राहण्यास स्थल असें कोठें मी पहात नाहीं. यास्तव पलायन कां करितां. जर तुह्मीं एकत्र राहून निश्चय कराल तर आपला खचित जय होईल. तुह्मीं पलायन केलें असतां पांडव निःसंशय तुमचें हनन करतील. तरी संग्रामामध्यें क्षत्रियांस मरण सुखकारक आहे. शास्त्रधर्मांत असें सांगितलें आहे कीं, युद्धामध्यें जो मरण पावतो त्यास परलोकीं बहुत सुख होतें यास्तव हें माझें वाक्य ऐका. क्रोधित झालेला जो भीमसेन यास वश होऊं नका. आपल्या पितामहानीं जो धर्म आचरला तो टाकूं नका. क्षत्रियांस युद्धांत पलायन करण्या पेक्षां दुसरें पापिष्ठ कर्म, आणि युद्धांत मरण या सारखा श्रेयस्कर पंथ दुसरा कोणचाही नाहीं. युद्धांत मरण ह्मणजे स्वर्गाचें द्वार आहे, असें ह्मणतात. बहुत दिवसानीं फार कष्टानें प्राप्त होणारे जे लोक ते युद्धांतमरणान्यास तत्काल प्राप्त होतात. या प्रकारें दुर्योधनानें भाषण केलें असतां तें भाषण सकल क्षत्रियानीं मान्य करून पलायन न करितां पुनः युद्ध करूं लागले. सर्व क्षत्रियानीं आपल्या चित्ताची ऐक्यता करून पराजयाची शंका न धरितां पांडवांशीं मोठें दारुण युद्ध करूं लागले. हे धृतराष्ट्र राजा, पूर्वीं जसें देवासुरांचें युद्ध झालें तसें तुझ्याकडील योद्ध्यांचें व पांडवांचें युद्ध होत असतां युधिष्ठिर प्रभृति पांडवांवर तुझा पुत्र दुर्यो

भन मोठ्या आवेशानें धांऊन गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ४ था– संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, योध्यांचे रथ व रथनीड ( बसण्याचें स्थान ) पतन पावले. युद्धामध्यें रथ भग्न झाले. पदातींनीं युद्ध करितां करितां ताडित होऊन पलायन केलें. सहस्त्रावधि- राजे मरण पावले हें तुझ्या पुत्रानें पाहतांच तो अंतःकरणांत दुःखित हो- ऊन युद्धापासून विमुख झाला. व सर्व सैन्य उद्विग्न होऊन विलाप करूं लागलें. इतक्यांत वयशील समन्वित कृपाचार्य कृपायुक्त होऊन दुर्योध नाचे सन्निध क्रोधानें असें भाषण करितो कीं, हे दुर्योधना, या काळीं मी तुला उपदेश करितों, तो जर तुला रुचेल तर तसें कर. हे राजेंद्रा, क्षत्रि- यांस युद्धा वांचून दुसरा धर्मरूप श्रेयस्कर पंथ नाहीं. जे क्षत्रिय आहेत त्याणीं पुत्र,भ्राते,पिता,स्वकीय,मातुल,संबंधि,बांधव यांस ह्वर्तमान युद्ध करून त्यांचा युद्धांत वध करावा. वध केला असतां तो क्षत्रियांचा धर्म होय. युद्धांत पलायन केलें असतां अधर्म होतो यास्तव ही क्षत्रियांची घोर जीविका प्रस्तुत आली आहे. या प्रसंगीं तुला कांहीं एक हितकार क वाक्य सांगतों. भीष्म,द्रोण,कर्ण,जयद्रथ,सकल तुझे भ्राते व तुझा पुत्र लक्ष्मण हे सर्व मरण पावले. आतां आपल्यास आश्रय करण्या जो गा कोण राहिला आहे. ज्यांच्यावर भरंवसा ठेऊन आपण राज्य करण्या ची मति धारण केली होती ते शूर आपल्या शरीराचा त्याग करून ब्र- ह्मवेत्याच्या गतीस गेले. याजमुळें आपण गुणवान महारथ्या वांचूनही न होऊन कृपण झालों. आपले सकल रथी युद्धांत पडले. सकल पांडव तर जीवंत असून कृष्ण ज्याचा पुरस्कर्ता असा अपराजित व देवानीं- ही दुरासद असा अर्जुन इंद्रधनुष्या सारखी ज्याची कांति व इंद्र ध्वजा सारखा उंच अशा वानरचिन्हित ध्वजाचा आश्रय करून तुझी सेना भ ग्न करीत आहे. भीमाच्या सिंहनादानें व पांचजन्य शंखाच्या शब्दानें व गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें आमचीं मनें विदीर्ण झालीं. हे दुर्योध न राजा, शैशिर ऋतू मध्यें अरण्यसंबंधि अग्नि, सकल तृणाचा जसा दा ह करून टाकितो तसें तुझें सर्व सैन्य अस्त्रवेत्या अर्जुनानें दग्ध करून

टाकिलें. कुंजर जसा कमलसमुदायामध्यें शिरतो तसा अर्जुन तुमचे सैन्यां त शिरून त्याणें त्रास दिला आहे. सर्व धनुर्धऱ्यांत श्रेष्ठ असे उभयतां कृष्ण या सैन्यामध्यें कसे शोभतात ते पहा. आज युद्धास आरंभ होऊन सत्रा दिवस जाहले. आणि सर्व राजे व सैन्य नष्ट जाहलें. या प्रसंगीं तुझा तो सूतपुत्र कर्ण, द्रोणाचार्य, कृतवर्मा, सकल भ्रात्यांसह वर्तमान तुझा दुःशासन, हे सर्व कोठें आहेत? बाणाच्या टप्यावर आलेल्या जयद्रथास पाहून त्याचा, तसेच संबंधी, भ्राते, साहाय, मातुल या सर्वांचा वध करून आपल्या पराक्रमानें रणमूर्ध्यावर अर्जुन कसा उभा आहे तो पहा. हे राजा, जयद्रथाचाही त्याणें वध केला. आतां आपण कोणाचा आश्रय करावा. अर्जुनाचा विजय करील असा या लोकीं कोण पुरुष आहे? माहात्म्या त्या अर्जुनाचीं नाना प्रकारचीं दिव्य अस्त्रें व गांडीवाचा निर्घोष हे आमच्या धैर्याचें हरण करतात. तुमच्या सेनेचा अधिपति नष्ट झाल्यामुळें अर्जुन यथेच्छ आंत संचार करीत अग्नी जसा तृणास दग्ध करितो, तसा दग्ध करीत आहे. सात्यकी व भीमसेन हे उभयतां आपल्या वेगानें गिरीचें विदारण करून टाकतील व सागरास शुष्क करतील. हे राजा सभेमध्यें भीमानें जें प्रतिज्ञा भाषण केलें त्या प्रमाणेंच त्याणें केलें व पुढेंही तसेंच करणार. तुमच्यामध्यें कर्ण प्रमुख होता व गांडीव धन्व्या अर्जुनानें दुरासद सेना रक्षित असतांही तुह्मीं युद्धास प्रवृत्त होऊन निष्कारण जीं अन्यायकर्में आचरलीं त, त्याचें फल तुह्मांस प्राप्त झालें. हे राजा, तूं आपल्या, करितां हा सर्व राजांचा समुदाय आणून नष्ट केलास. यास्तव हे दुर्योधन राजा, सर्वांस आश्रयीभूत असा हा तूं आपल्या आत्म्या या कालीं संरक्षण कर. ज्याचें बल क्षीण झालें त्याणें शत्रूशीं संधी करावा. समबली असेल त्याणें भेद करावा. जो बलानें अधिक असेल त्याणें शत्रूशीं विग्रह करावा. अशी बृहस्पतीची नीति आहे. आपण तर पांडवांपेक्षां बलानें व शस्त्रानें हीन असत्यामुळें पांडवांशीं आतां संधि करावा. यांतच क्षेम आहे असें मला वाटतें. जो आपलें श्रेय जाणत नाहीं, कल्याण होत असतां त्याचा अवमान करितो, तो पुरुष राज्यापासून भ्रष्ट होऊन त्याचें पुढें कधींही कल्याण

होत नाहीं. तूं धर्मराजास प्रणिपात करून आपल्या राज्याचा लाभ करून घे,यां तच तुझें कल्याण आहे. मूढतेनें पराभव मात्र पावशील. युधिष्ठिर राजा कृपा शील आहे तो धृतराष्ट्राच्या भाषणावरून व कृष्णाच्या वचना वरून तुला राज्या धिकारी करील. युधिष्ठिर,अर्जुन व भीमसेन यांजप्रत श्रीकृष्ण जसजसें सां गतो,त्या त्या प्रमाणें ते निःसंशय करतात. धृतराष्ट्राच्या भाषणाचें श्रीकृष्ण कधीं उल्लंघन करणार नाहीं व श्रीकृष्णाच्या भाषणाचें उल्लंघन पांडव कधीं ही करणार नाहींत असें मला वाटतें. हे राजा,पार्थाशीं तुझा द्वेष नसावा यां त तुझें कल्याण आहे. कार्पण्यास्तव किंवा प्राणसंरक्षण करण्यास्तव हें मी तुझ्याशीं भाषण करितों असें नाहीं. तुला जें पथ्य आहे तेंच सांगतों. हें न ऐकशील तर तूं आपल्या मरणकालीं या वाक्याचें स्मरण करशील. अशीं कृपाचार्यानें दुर्योधनास बहुत प्रकारचीं विलापयुक्त भाषणें करून दीर्घ, उष्ण श्वासोच्छ्वास टाकून बहुत शोक करूं लागला; परंतु किमपिही मोह पावला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ५वा– संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, तपस्वी कृपा- चार्यानें भाषण करितांच दुर्योधन श्वासोच्छ्वास टाकीत स्तब्ध बसला. नंतर एक मुहूर्त पर्यंत त्याचें चिंतन करून कृपाचार्यास असें बोलूं लागला कीं,हे आचार्य, सुहृदानीं जें सांगावयाचें तें तूं मला सांगितलेंस. मीही तुझें भाष ण ऐकिलें. हा कालपर्यंत तूं प्राणाची आशा सोडून पांडवांशीं मोठें युद्ध- केलेंस तें सर्व लोकांनीं पाहिलें. या कालीं तूं स्नेहानें मला बोध करून अ शीं भाषणें ऐकवितोस परंतु तीं मला संतोषदायक होत नाहींत. धर्मरा- जास आह्मीं राज्यापासून भ्रष्ट केलें व असद्यूतांत आह्मीं त्याचा परा जय केला. तो आज माझ्या भाषणावर श्रद्धा कशी ठेवील? ज्या कालीं पां डवानीं आपल्या हिता करितां कृष्णास दौत्य कर्माविषयीं आमच्याकडे पाठविलें त्या कालीं आह्मीं कृष्णाशीं किती बरें वंचना केली! तें आमच्यापा सून मोठें अयोग्य कर्म जाहलें. तें कृष्ण सहन करणार नाहीं. या प्रकारें आ ह्मीं पांडवांस बहुत प्रकारचे त्रास दिले. जेव्हां आह्मीं द्रौपदीस दुःख दिलें तेव्हां पासून ती आमच्या विनाशासाठीं व भर्त्याच्या अर्थसिद्धीसाठीं मोठें

उग्रतप करीत भूमीवर शयन केलें, तद्वीच अभिमन्यूचा नाश झाल्यामुळें वासुदेवाची भगिनी सुभद्रा दासी प्रमाणें द्रौपदीची सेवा करीत आहे अशीं कर्में होत असतां आतां पांडवांशीं मी कसा संधि करावा? पृथ्वीचें राज्य मी आजपर्यंत केलें तो आज मी पांडवांस शरण जाऊन राज्य भोगूं कीं काय? व त्या धर्मराजाच्या पाठीमागें दासा सारखें कसें जावें? हे ब्राह्मणा, तुझ्या भाषणाची मी असूया करून हें मी तुझ्याशीं भाषण करितों असें नाहीं. स्नेहानें हें सर्व भाषण मी केलें. संधि करण्याचा हा काल मला बरा वाटत नाहीं. तर युद्ध करणें ही नीति या कालीं मला उत्तम दिसते. जे जे माझे मनोरथ होते ते ते तृप्त करून घेतले. पुत्र धर्मानें माता पितरांचा अनृणी झालों, आतां मला कांहीं एक करण्याची इच्छा नाहीं. क्षत्रियास आपले गृहीं मरण येणें हें निंद्य आहे. शय्येचे ठायीं क्षत्रियांस मरण अधर्मकारक आहे. जो क्षत्रिय अरण्यांत मरण पावतो अथवा संग्रामामध्यें आपल्या तनूचा त्याग करितो तो पूजित होऊन यज्ञानीं प्राप्त होणाऱ्या लोकास जातो. कृपण होऊन विलाप करणारा आर्त झालेला व जरेनें ग्रस्त झालेला जो मरण पावतो तो आपल्या ज्ञातींत श्रेष्ठता पावत नाहीं. नाना प्रकारच्या भोगांचा त्याग करून जो युद्धांत मरण पावतो तो परमगतीस जातो, यास्तव हे आचार्य, या कालीं युद्ध करून शक्राचा सालोकता प्राप्त होण्याची मी इच्छा करितों. वृद्ध पितामह, धीमान् द्रोणाचार्य, कर्ण, जयद्रथ, दुःशासन हे सकल महान् शूर योद्धे माझ्या अर्थसिद्धी करितां रणभूमीवर पडले. हे उत्तमार्थवेत्ते शूर, प्राणांचा त्याग करून ज्या इंद्रलोकीं गेले असतील तेथें मला गेलें पाहिजे. यास्तव हे ब्राह्मणा, राज्याविषयीं अतःपर माझें मन होत नाहीं. मी आपले सखे, भ्राते, पितामह, यांचा नाश करून राज्यलोभानें मी जर जीवंत राहिलों तर लोकांमध्यें माझी निंदा होईल. बंधुहीन अशा मला आतां राज्य काय कर्तव्य आहे. जगताचा आजपर्यंत जसा मी भुक्तमध्यें राय केला तसाच पुढें करणार त्यांत जें होईल तें हो वो. असें दुर्योधनाचें भाषण सकल नृपांनीं ऐकतांच, साधु साधु असें एकाग्रकीं भाषण करून युद्धाविषयीं निश्चित झाले. नंतर अश्वाचें स-

माधान करून युद्धाचें अभिनंन करीत दोन योजनांस कांहीं कमी, इतकें हिम प्रस्थ ह्मणून स्थल होतें तेथें जाऊन अरुणा आणि सरस्वति यांचे तीरीं- जाऊन स्नानपान केलें नंतर कांहीं काल तेथें परस्पर युद्धाचा निश्चय करून कालगतीनें तेथून माघारे फिरले. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ६ वा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा युद्धाविषयीं आनंद पावणारे शल्य, चित्रसेन, शकुनी, अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा, सुषेण अरिष्टसेन, धृतसेन, जयसेन, प्रभृति योद्धे या सर्वांनीं हैमवतप्रस्थीं रात्रीचेठा थीं वास केला. कर्ण मरण पावल्यामुळें त्यांच्या चित्ताची शांति न होऊन तेस कल राजे, शल्यसन्निध बसला असतां दुर्योधनास सत्कार करून पुनः युद्धा च्या इच्छेनें त्यास बोललेकीं हे राजा, कोणत्या सेनापतीच्या योगें आह्मीं युद्ध करावें? असें त्या वीरांचें भाषण ऐकून दुर्योधन रथारूढ झाला. आणि सर्व युद्धाचा ज्ञाता, युद्धामध्यें केवळ अंतकासारखा, गरुडा सारखा बलिष्ठ, बुद्धीनें शक्रा सारखा, चंद्रासारखी आल्हाद कारक ज्याची कांति, सर्व गुण संपन्न, असा आपल्या गुरूचा पुत्र जो अश्वत्थामा याचे जवळ येऊन त्यास बोलतो कीं, हे गुरुपुत्रा, आह्मीं ज्यास पुढें करून युद्धांत पांडवांस जिंकूं असा सेनापति कोण करावा? तूं आमची परम गति आहेस, तुझ्या आज्ञेनें- आह्मीं सेनापति करणार असें दुर्योधनाचें भाषण ऐकून द्रोणपुत्र बोलतो हे राजा, हा शल्य सर्व गुणानीं युक्त असल्यामुळें तुमचा सेनापति होण्यास योग्य आहे. हा कृतज्ञ शल्य आपल्या भाचाचा त्याग करून आपल्याकडे आला. हा महाबाहू दुसरा कार्तिकस्वामीच आहे. त्याला सेनापति केला असतां, आपण विजयी होऊं? असें द्रोणपुत्राचें भाषण ऐकून सकल क्षत्रियानीं शल्याच्या सभोंवते उभे राहून जय शब्द करीत युद्धा विषयीं मति धारण केली. नंतर दुर्योधन रथांतून भूमीवर उतरला आणि रथस्थित शल्यास प्रांजलिपुट जोडून भाषण करितो कीं, हे मित्र वत्सला, तूं रणाविषयीं केवळ भीष्म व द्रोणासमानच आहेस. प्रस्तुत मित्र किंवा अमित्र यांच्या परीक्षेचा काल आला आहे. बुधजन याच कालीं मित्राची किंवा अमित्राची परिक्षा करितात. तूं शूर आमचा हितकर्ता आहेस.

यास्तव तूं आमचा सेनापति हो. तूं सेनापति होऊन रणामध्यें आलास अ-सतां पांचालासह वर्तमान पांडवांचें अंतःकर्ण अगदीं मंद होऊन युद्धा विषयीं ते यत्न करणार नाहींत असें वाटतें. असें दुर्योधनाचें वाक्य ऐकू-न शल्य भाषण करितो. हे कुरु राजा, तूं मला असें मानितोस त्या पेक्षां तूं म्हटल्या प्रमाणें तुझ्या सेनेचा अधिपति होतों. माझे प्राण, राज्य व धन हे सर्व तुझें प्रिय करण्या करितां आहेत असें जाण. असें शल्याचें भाष-ण ऐकून दुर्योधन बोलतो हे मातुला, तुला आह्मीं सेनापत्या विषयीं वरतों महेंद्रानें दानवांस जसें जिंकीलें तसें तूं शत्रूस जिंक. असा विषय यांत आ०

अध्याय ७वा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, दुर्योधनाचें भाषण ऐकून शल्य बोलला कीं, हे दुर्योधना, मी जें आतां भाषण करि-तों हें ऐक. कृष्णार्जुन यांस तूं बलि असें मानितोस परंतु माझ्या बाहुवी-र्यासमान यांचें बल कधींही सम होणार नाहीं. सुर, असुर, सकल पृथ्वी वरील मानव योद्धे माझ्याशीं रणामध्यें युद्धास आले असतां क्रोधें करू-न मी त्यांच्याशीं युद्ध करीन. मग पांडवाशीं युद्ध करीन यांत आश्चर्य काय! पार्थ व सोमक हे बराबर जरी युद्धास आले तथापि युद्धामध्यें मी त्यांचा पराभव करीन. तुझा मी आतां सेनानायक होतों यांत संशय नाहीं. शत्रु ज्या व्यूहाचा भेद करण्यास समर्थ होणार नाहींत असा व्यूह करीन. हे दुर्योधनराजा, हें माझें भाषण निःसंशय सत्य जाण. असें मद्र राजानें भाषण केल्यावर सकल कौरव सैन्याच्या मध्यभागीं दुर्योधनानें यथाशास्त्र विधीनें शल्यास सेनापत्याचा अभिषेक परम हर्षानें केला. त्या कालीं कौरव सैन्यांतील योद्ध्यांनीं हर्षानें सिंहनाद व वाद्यांचा गजर केला. नंतर बोलावलेले सकल मद्रक प्रभृति योद्धे संतुष्ट होऊन युद्धा मध्यें शोभणारा शल्यराज याची स्तुति करून बोलले कीं हे राजा, या आ-लेल्या शत्रूंचा पराभव करून चिरंजीव हो. सुरासुर मानव हे जरी यु-द्धास आले तथापि तूं त्यांस जिंकण्यास समर्थ आहेस. मग मृत्यलोकीं उत्पन्न झालेले जे सोमकादिक यांचा तूं पराभव करशील यांत आश्चर्य काय! असा शल्याचा सकल योद्ध्यानीं स्तव केला असतां तो महाबलि

वीर परम हर्ष पाऊन दुर्योधनास बोलतो कीं, हे दुर्योधन राजा आज पांचालां सहवर्तमान पांडवांचा मी रणामध्यें वध करितों अथवा रणामध्यें मृत्यु पावून स्वर्गी जातों. पंडुराजाचे सकल पुत्र, वासुदेव आदिकरून सकल वीर माझा पराक्रम पाहोत. युद्धामध्यें आज पांडवाचें सैन्य पलायन करील असें करितों; हे राजा, तुझें प्रिय होण्या करितां द्रोण, भीष्म व सूतपुत्र यांजपेक्षांही अधिक पराक्रम करणामध्यें युद्ध करीत संचार करीन, हें माझें भाषण सत्य जाण. या प्रकारें शल्यास अभिषेक केला असतां सकल सैनिक कर्ण मरणाच्या दुःखाचा त्याग करून हर्ष पावले. आणि मद्रराजापासून आज पांडव मरण पावले असें मानून परम हर्षानें त्या रात्रीं सुखानें त्यानीं निद्रा केली. मद्रराजास सेनापत्याचा अभिषेक ज्या काळीं जाहला त्या काळीं कौरवसैन्यांत मोठा शब्द जाहला. तो शब्द युधिष्ठिरानें ऐकून सकल क्षत्रियांसमक्ष तो बोलतो कीं, हे माधवा, दुर्योधनानें मद्रराजास सैन्याचा अधिपति केला. तेव्हां तुला आमचें क्षेमदायक जें कर्तव्य असेल तें कर. असें धर्मराजाचें भाषण ऐकून वासुदेव बोलतो हे धर्मराजा, या मद्रराजास यथातथ्यें करून मी जाणतों. हा महावीर्यवान व तेजस्वी आहे. भीष्म, द्रोण व कर्ण हे जसे युद्धामध्यें हस्तलाघवानें कुशल होते तसा हा मद्रराज हस्तलाघवामध्यें व चित्रविचित्र युद्धामध्यें मोठा कुशल आहे. किंबहुना मला असें वाटतें कीं या सारखा युद्ध करणारा दुसरा कोणी मला दिसत नाहीं. शिखंडी, अर्जुन, भीम, सात्यकी व धृष्टद्युम्न या योद्ध्यां पेक्षांही हा शल्य बलानें अधिक आहे. हे धर्मराजा, तुझ्या वांचून या मद्रराजाशीं प्रतियुद्ध करणारा दुसरा कोणी समर्थ नाहीं. हा मद्रराज तुझ्या सैन्यास क्षोभ देत असतां तूं याचा वध कर. यास्तव हे महाबाहो धर्मराजा, इंद्रानें जसा शंबरासुराचा वध केला तसा तूं आज या मद्रराजाचा रणामध्यें वध कर. हा मद्रराज नष्ट जाहला असतां धृतराष्ट्र पुत्राचें सर्व सैन्य नष्ट झाल्या सारखेंच आहे. हा तुझा मातुल आहे असें जाणून याजवर तूं दया करूं नको. कर्णरूप पाताळापासून उत्पन्न झालेल्या भीष्मद्रोणरूप समुद्रास तरून शल्यरूप गोष्पदा मध्यें आपल्या सैन्यासहवर्तमान बुडूं नको. तुझें तप, वीर्य व क्षात्रबल जें असेल तें आज महा

रथी मद्रराजास दाखीव. असें श्रीकृष्णानें धर्मराजास भाषण केल्यावर पांडवांनीं श्रीकृष्णाचा परम सत्कार केला. नंतर श्रीकृष्ण सायंकाळीं आपले शिबिरांत गेला. तो गेल्यावर धर्मराज आपले भ्राते, पांचाल व सोमकास आप आपल्या शिबिरास जाण्याची आज्ञा देऊन त्या रात्रीं आपण विशल्य झालेल्या कुंजरा सारखा स्वस्थ निजला. पांडवांकडील सकल योद्धे पांचाल व पांडव कर्णाच्या मरणानें संतुष्ट होऊन त्या रात्रीं सुखें करून निजले. सकल पांडवांचें सैन्य कर्ण मरणानें संतुष्ट होऊन त्या रात्रीं स्वस्थ बसलें. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ८ वा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, ती रात्र गेल्यावर दुसरे दिवशीं दुर्योधनानें आपल्या सैन्यास युद्धार्थ सिद्ध होण्या विषयीं आज्ञा दिली, तेव्हां सर्व सेना सिद्ध झाली. रथी आपले रथ जोडून युद्धभूमीवर आलेल्याप्रमाणेंच सर्व सेना सिद्ध झाली. सर्व योद्धे मृत्यूचें भय टाकून रणभूमीवर आले. हे राजा, शल्यास सेनापति केल्यावर सर्व महारथी आप आपल्या नियमित स्थलीं यथाविभागें उभे राहिले. नंतर तुझ्या पुत्रास बराबर घेऊन कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा, शल्य, सौबल व अवशिष्ट राहिलेले पार्थिव रणभूमीवर येऊन एकमेकांत युद्धा विषयीं असा नेम करूं लागले कीं, अतःपर पांडवांसहवर्तमान एकस्थानें युद्ध करूनये. जो पांडवांशीं एकाकीं युद्ध करील अथवा युद्ध करीत असतां पळेल तो पंचमहापातकें व उपपातकें यानीं युक्त होईल. एकमेकानीं एकमेकाचें संरक्षण करून युद्ध करावें असा तुझ्याकडील महारथ्यानीं युद्धाचा निश्चय केला आणि शल्यास पुढें करून सत्वर युद्धार्थ निघाले. तसेंच पांडवही आपल्या सैन्याची व्यूह रचना करून युद्धा करितां कौरवांचे सन्मुख आले. त्या वेळीं तें सैन्य सागरा सारखें दिसूं लागलें. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो- हे संजया, भीष्म, द्रोण व कर्ण युद्धामध्यें पडले, हें तूं मला पूर्वीं सांगितलेंस तें मी ऐकिलें. धर्मराजानें शल्यास; भीमसेनानें माझ्या पुत्रास कसें मारिलें ? हें मला सांग. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, त्या संग्रामामध्यें मनुष्यांचा व गजाश्वांचा क

सा क्षय जाहला तो ऐक. हे राजा, भीष्म, द्रोण व सूतपुत्र हे जरी युद्धांत मरण पावले तथापि रणामध्यें शल्य पांडवांस जिंकील अशी आशा तुझ्या पुत्रानें धरून आज मी अनाथ असतां सनाथ झालों असें मानिलें. हे राजा, कर्ण मरण पावल्यावर पांडव सिंहनाद करूं लागले. त्या काळीं तुझ्या पुत्रास व सैनिकांस मोठें भय उत्पन्न झालें. तेव्हां शल्यानें त्यांस अश्वासन देऊन, व्यूह रचून पार्थाशीं युद्ध करण्या करितां आला. आणि तुझ्या पुत्रास अभय देत व्यूहाचा अग्रभागीं उभा राहिला. मद्रक वीर व कर्णपुत्र यांस घेऊन कृतवर्मा व्यूहाच्या सव्यभागीं, कृपाचार्य दक्षिणभागीं, कांबोजास हवर्तमान अश्वत्थामा पृष्ठभागीं, आणि दुर्योधन मध्यभागीं, या प्रमाणें उभे राहिले. कांहीं सैन्य बराबर घेऊन शकुनी व महारथी कौंतेय याणीं सर्व सैन्य बराबर घेऊन ते दोघेही आले. पांडवांकडील धृष्टद्युम्न, शिखंडी व सात्यकी हे तीन योद्धे सेनेचे तीन विभाग करून शल्यावर युद्धार्थ गेले. तसाच युधिष्ठिर राजा कांहीं सैन्य बराबर घेऊन शल्यास मारावें या इच्छेनें त्याच्या सन्मुख आला. अर्जुन व कृतवर्मा व संसप्तगण यांशीं युद्धार्थ परम वेगानें प्राप्त झाला. भीमसेन कृपाचार्याशीं, उभयतां माद्रिपुत्र, शकुनी व उलूक यांचे सन्मुख येऊन युद्धार्थ उभे राहिले. तसेच कौरवांकडील बहुत योद्धे त्यांच्याशीं युद्धाकरितां आले. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, भीष्म, द्रोण व कर्ण हे मरण पावल्यावर आमच्याकडील व पांडवांकडील अवशिष्ट सैन्य किती राहिलें आहे तें सांग! असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा सांगतों ऐक. अक्रा हजार रथ, दहा हजार सातशें गज, दोन लक्ष अश्वस्वार, व तीन कोट पदाति इतकें कौरवांकडील, व सहा हजार रथी, सहा हजार गज, दहा हजार अश्व व एक कोट पायदळ इतकें सैन्य पांडवांचें राहिलें. हे राजा कौरवांकडील सैन्य मद्रराजाच्या आज्ञेवरून जयाच्या इच्छेनें पांडवांसहवर्तमान निकट युद्ध करण्या करितां आले. तसेच युद्धांत शोभा पावणारे असे जे महाशूर पांडव व सकल नरांमध्यें श्रेष्ठ असे पांचाळ कौरवांसन्मुख येऊन उभे राहिले आणि जयाची इच्छा धरून सम

रंगणीं आले. आणि परस्पर योद्धे दिवसाच्या पूर्वभागीं मोठें युद्ध करूं लागले, तेव्हां तुझे व शत्रूंचे योद्धे एकमेकांस प्रहार करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ९वा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, कौरवांचें सृंजयांसहवर्तमान देवासुरां सारखें घोर युद्ध प्रवृत्त जाहलें. नर, रथ, गज यांचे समुदाय, सहस्त्रावधि अश्वारोह एकमेकांवर धांवले. गजांच्या योगानें कांहीं रथ, अश्व व रथी पडले. त्या युद्धांत अस्त्रविद्येंत शिक्षित झालेल्या रथ्यांनीं बाणें करून असंख्यात अश्वसमुदाय व पदाति परलोकीं नेले. एकस्या योद्ध्यावर बहुत योद्धे येऊन त्यास यमलोकीं न्यावें. केश नरवानीं क्षतयुक्त नारी जशी शोभते तशी अश्वांच्या खुरानीं विदारित झालेली पृथ्वी सुशोभित दिसूं लागली. खड्गाच्या कांतीनें व कवचाच्या प्रभेनें चारी दिशा व्याप्त झाल्यामुळें कांहीं कोणास सुचेनासें झालें. नागराजाच्या शुंडाकृति सारखे योद्ध्यांचे छिन्न झालेले बाहू पृथ्वीवर उडूं लागले. जसें पुष्पानीं संकीर्ण झालेलें वन शोभतें तसें शतावधी धडानीं व छत्र चामरानीं युक्त असें सेना वन शोभूं लागलें. तसेंच शर तोमरानीं पीडित झालेले सहस्त्रावधि गज पृथ्वीवर पडले. महात्म्या पांडवानीं छिन्न केलेले गजसमुदाय, सर्व दिशांस पळूं लागले. स्वारांसहवर्तमान पतित झालेल्या अश्वांच्या राशी, रणभूमीवर पर्वतप्राय दिसूं लागल्या. असें परस्परांचें युद्ध होत असतां परलोकीं जाणारी अशी रक्ताची नदी उत्पन्न झाली. त्या नदींत योद्ध्यांचे रथ हे आवर्त, ध्वज हे वृक्ष, अस्थी हीच वाळु, योद्ध्यांचे भुज हे नक्र, योद्ध्यांचीं धनुष्यें हा जीचा प्रवाह, गज हे जी मध्यें पर्वत, अश्व हे पाषाण, मेद व मज्जा हा ज्यांतील चिखल, छत्रें हीं, त्या नदींतील हंस, गदा त्या जी मध्यें नौका अशी भयंकर नदी शूरांस मोठा हर्ष करणारी, व भीरूंस भय देणारी उत्पन्न झाली. ही भैरव नदी पितृलोकास जात असतां परिघासारखे ज्यांचे बाहू असे मोठ मोठे शूर आपल्या वाहनरूप नौकानीं ती नदी तरले. हे राजा, असें निर्मर्याद व घोर देवासुरांच्या युद्धा सारखें युद्ध प्रवृत्त झालें असतां चतुरंग सेन्याचा क्षय झाला. राजे व राजबंधु त्या रणभूमीवर भ

थें करून आक्रोश करीत असतां अर्जुन व भीमसेन शत्रूस मोह उत्पन्न करून त्यांच्या सेनेचा वध करूं लागले. त्या कालीं भीमार्जुनानीं वध्य झालेली तुमची सेना, मदनानें व्याप्त झालेल्या स्त्री सारखी मोह पावली. तेव्हां भीमसेन व धनंजय व पांडवांकडील इतर योद्धे सिंहासारखे नाद करूं लागले, तो ऐकून धृष्टद्युम्न व शिखंडी धर्मराजास पुढें करून शल्यावर धांवले. ते योद्धे यथाविभागें युद्ध करीत असतां मोठें आश्चर्यकारक व घोररूप कर्म त्यांचे दिसण्यांत येऊं लागलें. कृतास्त्र व युद्धदुर्मद उभयतां माद्रिपुत्रानीं कौरव सैन्यावर बाणांचा वर्षाव केला. तेव्हां त्यानीं सर्व सेनेचा वध केल्यामुळें ती दाही दिशांस पळूं लागली. पांडवानीं तुमच्याकडील जयाची इच्छा करणारे योद्धे भग्न केले आणि सहस्रावधि योद्धे आपल्या प्रियपुत्रादिकांचा त्याग करून पळूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय १० वा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, कौरवांचें सैन्य भग्न झालेलें पाहून मद्रराज आपले सारथ्यास भाषण करितो कीं, हे सूता माझा रथ युधिष्ठिर राजा उभा आहे तेथें ने. मग माझें बल तूं पाहसील. माझ्या अग्रभागीं पांडव युद्धास उभे राहण्यास समर्थ नाहींत असें मद्रराजाचें भाषण ऐकून जेथें युधिष्ठिर राजा होता तेथें मद्रराजाचा रथ सारथ्यानें नेतांच पांडवांचें सैन्य एका एकीं मद्रराजा जवळ आलें तें पाहून मद्रराजही त्या सैन्यासहवर्तमान युद्ध करण्या विषयीं सिद्ध होऊन अग्रभागीं उभा राहिला असतां कौरवांकडील पलायन करणारे योद्धे मृत्यूचें भय टाकून पुनः युद्धार्थ माघारे फिरले. आणि आपआपले सेनेचे विभाग करून मद्रराजा सन्निध आले, व पुनः उभयतांचा महाभयंकर रक्ताचा प्रवाह उत्पन्न करणारा असा संग्राम प्रवृत्त झाला. ते परस्परांवर बाणांची वृष्टि करीत असतां उभयतांचेंही अंतर किमपि कळेनासें झालें. परस्पर वधाच्या इच्छेनें एकमेकांचें छिद्र शोधूं लागले. चित्रसेनानें निशित बाणें करून नकुलाचें धनुष्य मुष्टिप्रदेशीं भग्न केलें. नंतर रुक्मपुंख शिळेवर घांसलेल्या तीन तीन बाणांनीं त्याच्या ललाटप्रदेशीं प्रहार करून त्याच्या रथाचे अश्व मारिले. तसेच ध्वज व सारथी भूमीवर पाडला.

नकुल, धनुष्य व रथ यानीं हीन झाला तरी त्यानें हस्तामध्यें खड्ग व चर्म घेऊन चित्रसेनाचें सुशोभित शीर तोडून पाडलें. तें पाहून पांडवांकडील महारथी साधु साधु असा शब्द करून सिंहनाद करूं लागले. आपला भ्राता नष्ट झाहला हें सुषेण व सत्यसेन या उभयतां कर्णपुत्रानीं पाहून ते नकुलावर परम त्वरेनें धाऊन गेले. ते मेघासारखी बाणवृष्टि करीत असतां नकुल त्यांच्या बाणानीं अगदीं विध्द होऊन जरी गेला तथापि परम हर्षानें दुसरें धनुष्य घेऊन व दुसरे रथांत बसून त्या दोघांचींही धनुष्यें तोडून टाकलीं. नंतर सत्यसेन दुसरे रथांत बसून व दुसरें धनुष्य धारण करून सुषेणासहवर्तमान माद्रिपुत्रावर धांऊन गेला. तेव्हां माद्रिपुत्रानें दोन दोन बाणें करून त्यास प्रहार केला. तेणें करून सुषेणानें हास्य करून क्षुरप्र बाणानें नकुलाचें धनुष्य छेदन केलें. नागकन्येसारखी महाविषाची अशी एक शक्ति नकुलानें सत्यसेनावर टाकतांच तो मरण पावला. हें सुषेणानें पाहून क्रोधानें पंडुनंदनावर बाणवर्षाव करून बाणानीं सारथ्यास वेध केला. हें पाहून नकुलानें एक बाण कर्णपुत्रावर टाकिला. त्या योगें सुषेणाचें शीर तुटून खालीं पडलें. त्या कालीं सर्व सैनिकांस मोठें आश्चर्य वाटलें. हे राजा, हें पाहून तुझ्याकडील सेनेनें पलायन केलें. मद्रराजानें पलायन केलेल्या तुझ्या सेनेस माघारें आणून यथाविभागें तिची स्थापना केली. आणि आपण निर्भयपणें रणभूमीवर उभा राहून सिंहनाद व धनुष्याचे टणत्कार करूं लागला. तुझ्या व शत्रूच्या योद्ध्यानीं मृत्यूचें भय टाकून पूर्वीं जसें देवासुरांचें युद्ध झालें तसें निर्भयपणें युद्ध करीत असतां यमराष्ट्राची वृद्धि होत चालली. अर्जुनानें संशप्तकगणाचा पराभव केला. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय ११ वा:— संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा, कौरव पांडवांचें सैन्य एकमेकांचा वध करीत असतां योद्धे भयाभीत होऊन पळूं लागले. उभयसैन्यांतील गज गमन करीत असतां मोठ शब्द करूं लागले. तसेच मोठमोठे बहुत अश्व व पदाति गर्जना करूं लागले. या प्रमाणें सर्व प्राण्यांचा क्षय करणारा दारुण संग्राम प्रवृत्त झाला असतां नानाप्रका

रच्या शस्त्रसमुदानीं रथांचा व गजांचा बहुत नाश झाला. येथें परस्पर एकमेकांचा प्राण घेण्याचे इच्छेनें यमराष्ट्राची वृद्धि करणारा असा संग्राम होत असतां पांडवानीं तीक्ष्ण बाणानीं तुझें सैन्य ताडित केलें. तसेंच तुझ्या योध्यानीं पांडवांचें सैन्य ताडित केलें. चिखलांत रुपलेल्या दुर्बल गायीसा रखी तुमची सेना पाहून तिचा उद्धार करण्या करितां शल्य पांडव सैन्या वर धांऊन गेला. हें पांडवानीं पाहून ते मद्रराजासन्निध आले व त्याजवर-बाणांची वृष्टि करूं लागले. मद्रराजानेंही तीक्ष्ण शतावधी बाणें करून ध र्मराज पहात असतां त्याच्या सेनेस परमपीडित केलें. हे राजा, या प्रकारें उभयतांचा घोर संग्राम चालला असतां अनेक प्रकारचीं दुश्चिन्हें होऊं ला गलीं. रविमंडलास ताडन करून उल्का आकाशापासून पतन पावल्या. शु क्र व मंगल हे दोन ग्रह बुधाशीं समन्वित असे पंडु पुत्राच्या पृष्ठभागीं येऊन क्षत्रियांच्या सन्मुख उभे राहिले. हे राजा असे घोर उत्पात होत असतांही ते क्षत्रियांचें युद्ध भयंकर होऊं लागलें. शल्य तर पांडवसैन्या वर बाणवृष्टि करूं लागला. युधिष्ठिर व भीमसेन यांजवर रुक्मपुंख शि लाशित बाणांची वृष्टि करून द्रौपदेय, उभयतां माद्रिपुत्र धृष्टद्युम्न, सा त्यकि व शिखंडि या प्रत्येक योध्यास दहा दहा बाणानीं ताडन करून प र्जन्यकालीं इंद्र जसा वृष्टि करितो तसा पुनः सर्वांवर बाणवर्षाव करूं ला गला. प्रभद्रक व सहस्रावधि सोमकांचे वीर शल्याच्या बाणानीं पडले. मद्रराजानें सर्व शत्रूंस त्या रणामध्यें आच्छादन केलें. या प्रकारें महा बलिमद्रराजा पांडवसेनेचा वध करीत असतां ती सेना युधिष्ठिराकडे धां वून गेली. हें शल्यानें पाहतांच पांडव सैन्याचें मर्दन करून युधिष्ठिरा स बाणवर्षावानें पीडित केला. त्या कालीं युधिष्ठिर अतिक्रुद्ध होऊन कांहीं पायदळ व अश्व बराबर घेऊन शल्याचें निवारण करीत होता तों शल्यानें आशीविषोपम घोर बाण धर्मराजावर टाकतांच तो बाण महात्म्या युधिष्ठिराचा भेद करून त्यानें पृथ्वींत प्रवेश केला. हें वृत्त वृकोदरानें पाहून त्यानें सात व सहदेवानें पांच बाणानीं मद्रराजास, नकुल व द्रौपदेय यानीं बहुत बाणानीं शल्यास ताडित केलें. मेघ

जसे महीवर जलवर्षाव करितात तसा पांडवांच्या बाणांचा वर्षाव होऊनशल्य पर म व्यथित झाला. हें कृतवर्मा व कृपाचार्यानें पाहून ते दोघे पांडवांवर धांऊन गेले. महावीर्यवान उलूक व शकुनी, अश्वत्थामा व तुझे पुत्र शल्याचे रक्षणार्थ गेले. कृतवर्म्यानें शिलीमुख तीन बाणानीं भीमसेनास ताडित करून त्याचें निवारणही केलें. तसाच धृष्टद्युम्नावर बाणांचा वर्षाव करून त्यास ताडित केलें. शकुनीनें द्रौपदीच्या पुत्रांवर बाण वर्षाव केला. अश्वत्थामा, नकुल सहदेवा वर धांऊन गेला. दुर्योधनानें केशवार्जुनावर बाणवर्षाव केला. हे राजा, तुझ्याकडील शंभर योद्धे शत्रूच्या शंभर योद्ध्यांशीं द्वंद्वयुद्ध करीत असतां तीं युद्धें मोठीं घोर व चित्रविचित्र होऊं लागलीं. कृतवर्म्यानें भीमसेनाचे अश्व मारिले, तेव्हां भीमसेन क्रुद्ध होऊन यमासारखा युद्ध करूं लागला. मद्रराजानें सहदेवाच्या रथाचे अश्व मारिले. तेव्हां त्यानें शल्यपुत्राचा वध केला. कृपाचार्यानें धृष्टद्युम्नाशीं युद्ध केलें. अश्वत्थाम्यानें द्रौपदेय प्रभृति वीरांस दहा दहा बाणानीं वेध करून भीमसेनाच्या रथाचे अश्व मारिले. त्या काळीं भीमसेनानेंही त्याचे अश्व मारिले, तेव्हां कृतवर्म्यानें पलायन केलें. शल्यानें अति क्रुद्ध होऊन सोमक व पांडवांस ताडित करून पुनः तीन बाणानीं युधिष्ठिरास बहुत पीडित केलें असतां भीमसेन परम क्रोधानें आपल्या दंतानीं ओंष्ठांचें चर्वण करून शल्याचें विनाशार्थ कालदंडासारखी, रिपुसैन्यास भीति देणारी अशी गदा घेऊन शल्यावर धांवला. तेव्हां शल्य परम क्रुद्ध होऊन भीमसेनाच्या वक्षस्थळीं तोमराचा प्रहार करून वक्षस्थलाचा भेद केला असतां तोमराच्या योगें वृकोदर मोहित न होतां उरापासून तो तोमर काढून त्याच तोमरानें शल्याच्या सारथ्याचा उरस्थलीं भेद करतांच तो भूमीवर पडला. त्या काळीं हें कर्म भीमसेनानें केलेलें पाहून तो विस्मित होत्साता युद्धापासून माघारा फिरला. भीमसेन गदा घेऊन आपल्यास कोणी शत्रु आहे किंवा नाहीं. असें त्या युद्धांत पहात आहे तों आकाशापासून पुष्पवृष्टि झाली. असा विषय याअध्यायांत आहे.

अध्याय १२ वा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रराजा, सारथी पडला हें शल्यानें पाहून तो गदा घेऊन भीमसेनाच्या अग्रभागीं उभा राहिला. इत-

त्यांत भीमसेन गदा घेऊन शल्यावर धांऊन गेला. त्या काळीं सैन्यामध्यें शंखाचे नाद व हर्षाचे वृद्धि करणारे असे शूरांचे सिंहनाद होऊं लागले. त्या उभयतां महाराजा सारख्या उभे राहिलेल्या योद्ध्यांस पाहून तुझ्याकडील व पांडवांकडील योद्धे साधु साधु असा शब्द करूं लागले. भीमसेनाच्या गदेचा आघात सहन करणारा शल्यावांचून किंवा परशुरामा वांचून अथवा बलरामावांचून कोणी समर्थ नाहीं. तसाच मद्राधिप जो शल्य याच्या गदेचा आघात वृकोदरा वांचून दुसरा कोणी सहन करण्यास समर्थ नाहीं. मद्रराजानें आपल्या गदेच्या योगें भीमाची गदा ताडित केली असतां भीमाचा रथ दग्ध होऊन अग्नीच्या ज्वाला उत्पन्न जाहल्या. भीमसेनानें आपल्या गदेच्या योगें शल्याची गदा ताडित केली असतां अंगारवृष्टि होऊं लागली. हें पाहून सर्व आश्चर्य पावले. नंतर ते आठ पावलें दूर जाऊन मंडळें करीत करीत आपल्या क्रिया दाखवीत एकमेकांपुढें उभे राहून घोर गदेचे प्रहार करूं लागले. उभयतांच्याही सैन्यांतील वीर उभयतांचें युद्ध पाहून एकाएकीं हाहाःकार करूं लागले. त्या काळीं कृपाचार्यानें शल्यास रथामध्यें घालून परम त्वरेनें युद्धभूमी पासून दूर नेला. नंतर एक निमेषानें शल्य विह्वळ जाहला होता तो पुनः उठला. हें भीमसेनानें पाहून पुनः त्यास युद्धार्थ आव्हान केलें. त्या काळीं दुर्योधन व तुझ्याकडील सकल शूर नाना प्रकारचीं शस्त्रें घेऊन वाद्यांचे घोष करीत पांडवांचे सैन्यावर धांवले. हें पांडवानीं पाहतांच तेही त्यांच्यावर धांऊन गेले. तेव्हां कृपाचार्य, कृतवर्मा व शकुनि हे मद्रराजास पुढें करून युधिष्ठिरासहवर्तमान युद्ध करूं लागले. या प्रमाणेंच एकमेकांशीं एकमेक युद्ध करूं लागले. हे राजा, श्रेष्ठ वीरांचा क्षय करणारा तो घोर संग्राम प्रवृत्त झाला असतां मोठा वारा सुटून पृथ्वीपासून घोर रज उत्पन्न झाल्यामुळें कोण योद्धा कोठें आहे हें समजेनासें झालें. त्या काळीं परस्पर योद्धे एकमेकांचें नामसंकीर्तन करून निर्भयपणें युद्ध करूं लागले. पुढें युद्ध करितां करितां रक्ताची नदी उत्पन्न होऊन पृथ्वीपासून उडालेले रज शांत झाले. दिशाही निर्मल जाहल्या. हे राजा या प्रकारें कौरव पांडवांचा, भीरूंस भयवृद्धि करणारा असा घोर संग्राम जरी चालला होता तथापि उभय सैनिक पराङ्मुख झा-

ले नाहींत. स्वर्ग व ब्रह्मलोक प्राप्तीच्या इच्छेनें त्या योद्ध्यांनीं घोर युद्ध केलें. तस्मा भिकार्या विषयीं निश्चित मति होऊन स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें युद्ध करीत असतां नानाप्रकारचीं शस्त्रें एकमेकांवर सोडून परस्पर गर्जना करीत करीत अरे मारा, अरे वध करा, अरे धरा, अरे प्रहार करा, अशा त्यांच्या भयंकर वाणी ऐकण्यांत येऊं लागल्या. त्या कालीं धर्मराजास मारण्याची इच्छा करणारा जो शल्य त्याणें निशित बाणें करून त्यास वेध केला असतां धर्मराजानें हास्य करीत चौदा बाण शल्याचा मर्मभेद करण्याच्या उद्देशानें त्याजवर टाकिले. पांडवांकडील पं चवीस चेदिवीरांस मारलें. नंतर सात्यकीस पंचवीस भीमसेनास सहार व मा द्रिपुत्रास निशित शंभर बाणांनीं ताडन केलें या प्रकारें शल्य संग्रामामध्यें युद्ध करीत संचार करीत असतां धर्मराजानें आशीविषोपम व भल्ल बाणा नीं शल्याचें ध्वजाग्र छिन्न करून पृथ्वीवर पडतांच तें नष्ट झालेल्या गिरिशृंगा सारखें पृथ्वीवर दिसूं लागलें. असा विषय या अध्यायांत आहे.

अध्याय १४ वा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, मद्रराजानें धर्मराजास युद्धामध्यें पीडित केलेल्या पाहून सात्यकी, भीमसेन व माद्रिपु त्र यानीं शल्यास पीडित केलें. एकट्या शल्यास बहुत महारथ्यांनीं पीडित के लेलें पाहून पांडव सैन्यामध्यें साधु साधु असा शब्द झाला. त्या कालीं महा रथ्यांनीं पीडित केलेला रणशूर शल्य भयंकर व भारसाधन धनुष्य आकर्ष करून सात्यकीस, भीमसेनास, नकुलास, सहदेवास या सर्वांस त्यानें वेध केला. तेव्हां कौरवांकडील सैनिकांनीं जयाचा शब्द केला. तो विजयकारक शत्रूचा ना द सात्यकीस सहन न झाल्यामुळें त्यानेंही शल्यास वेध केला. पांडवांकडील भीमसेन, प्रमुख चार वीरांनीं शल्यास जरी वेष्टित केला होता तथापि तो महा प्रतापि शल्य सर्वांशीं युद्ध करूं लागला. त्या युद्धप्रसंगीं धर्मराजानें क्षुरप्र बाणानीं मद्रराजाचे चक्ररक्षक मारिले. हें मद्रराजानें पाहून पांडवसैनिकां- वर बाणवृष्टि करून त्यांस आच्छादित केलें. शल्य बाणांनीं आपली सेना व्यास झाली. हें धर्मराजानें पाहून तो चिंताग्रस्त होत्साता असें बोलूं लागला कीं श्रीकृष्णाचें भाषण निश्चयें करून कसें सत्य होईल. नंतर सकल पांडवांनीं र थ, गज, अश्व घेऊन पुनः मद्रराजावर धांऊन त्यास पीडित केलें. शल्याच्या

शरांनीं पांडवांकडील योद्धे व धर्मराज आच्छादित होऊन अतिपीडित झाल्यामु ळें शल्याकडील योद्धे सिंहनाद करूं लागले. त्या कालीं पांडवांकडील सकल यो द्धे शल्याशीं युद्ध करण्यास समर्थ झाले नाहींत. परंतु धर्मराज व भीमसेन प्र भृति योद्धे त्या युद्धप्रसंगीं शल्याचा परित्याग न करितां तसेंच युद्ध करीत होते. असा विषय त्या अध्यायांत आहे.

अध्याय १४ वा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, द्रोणपुत्र व अ र्जुन या उभयतांचें युद्ध होत असतां द्रोणपुत्रानें व महारथी त्रिगर्तांच्या शूरां नींही अर्जुनास ताडित केलें असतां अर्जुनानें शिलीमुख बाणांनीं द्रोणपु त्रास वेधून व इतर सर्व महारथ्यांस ताडित करून पुनः त्या सर्व योध्यांवर शरांची वृष्टि केली. तेणें करून तुझ्याकडील योद्धे विद्ध झाले असतांही यु द्धांत अर्जुनाचा त्याग न करितां त्याच्या रथोपस्थास बाणांनीं परिपूर्ण केलें. तसेंच सुवर्ण विभूषित बाणांच्या योगें कृष्णास व अर्जुनास सर्व योद्ध्यांचे समस्त शरांनीं विद्ध करून अर्जुनाच्या रथाचा कुबर, रथाचीं चक्रें इत्यादि सर्व व्याप्त केलें. हे धृतराष्ट्र राजा, असें युद्ध पूर्वी मी कधींही पाहिलें नाहीं, व ऐकिलेंही नाहीं. तुझ्याकडील योद्ध्यांनीं अर्जुनाचा रथ बाणांनीं व्याप्त केलेला त्या युद्धभूमीवर उल्का शतांनीं संप्रदीप्त विमाना सारखा शोभला. नं तर अर्जुन सन्नत बाणानें पर्वतावर मेघ जसे वृष्टि करितात तशी कौरव सैन्यावर वृष्टि करीत असतां कौरवांकडील योद्धे शरांनीं पीडित झालेले चों होकडे पार्थभूत सैन्य आहे असें मानूं लागले. त्या कालीं त्या युद्धांत योध्यां च्या रथाचीं चक्रें व युगें इत्यादिकांनीं व सहस्रावधि योद्ध्यांच्या छिन्न झाले ल्या भुजांच्या समुदायांनीं पृथ्वी व्याप्त झाल्यामुळें पार्थाच्या रथाचा मार्ग बंद झाला. हे भरतश्रेष्ठा, रुद्राचें जसें स्मशान तशी ती रणभूमी मोठी भयंकर दि सूं लागली. त्या कालीं भीरूंस भय उत्पन्न होऊन शूरांस हर्ष झाला. जसा भगवान अग्नि चराचर जगतास दग्ध करून विधूम दिसतो, तसा तो महाब लि पार्थ रणामध्यें दिसूं लागला. तो पांडवांचा पराक्रम द्रोण पुत्रानें पाहून तो अर्जुनाचें निवारण करण्यास आला असतां ते उभयतां पुरुष एकमेकां वर दारुण बाणवर्षाव करूं लागले. हे धृतराष्ट्र राजा, असें त्या दोघांचें युद्ध

होत असतां अश्वत्थाम्यानें अर्जुनास बाणानीं वेध करून वासुदेवासही वेध केला असतां अर्जुनानें गांडीव धनुष्याचा टणत्कार केला आणि गुरुपुत्राचा एक मुहूर्त पर्यंत सत्कार करून नंतर त्याच्या रथाचे अश्व व सारथी मारून पुनः त्यास वेध केला. त्या काळीं द्रोणपुत्र हताश्व झालेल्या रथामध्यें उभा राहून आश्चर्य करीत परीघा सारखें एक मुसळ घेऊन अर्जुनावर टाकतांच अर्जुनानें त्याचीं सात शकलें केलीं. अश्वत्थाम्यानें गजेंद्र शिखरा सारखा एक परिघ अर्जुनावर टाकला असतां तो अर्जुनानें छिन्न केला. पूर्वी शतक्रतु इंद्रानें दैत्यसेनेशीं जसें युद्ध केलें तसें एकट्या अर्जुनाचें बहुत शत्रुंसहवर्तमान युद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

१५. अध्याय पंधरावा:-संजय भाषण करितो, हे धृतराष्ट्रा, दुर्योधन आणि धृष्टद्युम्न या उभयतांचें युद्ध होत असतां उभयतांनीं एकमेकांवर शरांचा व शक्तीचा प्रहार केला. दुर्योधन राजानें धृष्टद्युम्नास वेध केला असतां धृष्टद्युम्नानें दुर्योधनास पीडित केलें. त्या काळीं दुर्योधन पीडित झालेला त्याचे बंधूनीं पाहून बहुत सेनेसहवर्तमान धृष्टद्युम्नास वेष्टित केलें असतां त्यानें त्या सर्व सैन्याचा नाश केला. महा धनुर्धारी कृतवर्मा आणि कृपाचार्य हे उभयतां मभद्र काशांयुक्त असतां शिखंडीनें त्या सहवर्तमान युद्ध केलें. तें युद्ध प्राणाचा नाश करणारें असें झालें. शल्यानें, सात्यकी व पांडव यांशीं युद्ध करून त्यांजला बहुत पीडित केलें. त्या काळीं माद्रिपुत्रानीं धैर्य करून शल्याशीं मोठें युद्ध केलें. तथापि सकल महारथी पांडव शल्याच्या बाणानीं बहुत विद्ध झाल्यामुळें कोणी त्याचें त्राण करण्यास समर्थ झाले नाहींत. शल्यानें धर्मराजास पीडित केलेला पाहून नकुलानें आपल्या मातुलावर धांऊन त्यास बाणानीं आच्छादन केला. नंतर पुनः आश्चर्ययुक्त होऊन शल्याच्या स्तनांतरीं, बाणानीं वेध केला. त्या काळीं नकुलाच्या बाणानीं पीडित झालेला शल्य, नतपर्वबाणें करून नकुलास पीडित करीत असतां युधिष्ठिर, भीमसेन, सात्यकी व सहदेव हे सर्व योद्धे मद्रराजावर धांऊन गेले. एकटा मद्रराज सकल

पांडवांशीं युद्ध करीत असतां सात्यकी दुसरे रथांत बसून, मद्रराजानें पांडवांस पीडित केलेलें पाहून मोठ्या वेगानें मद्रराजावर धांऊन गेला अ सतां मत्तगजा सारखा धांऊन आलेल्या सात्यकीस पाहून शल्यही सात्यकीवर धांऊन गेला. नंतर त्या दोघांचें मोठें अद्भुत युद्ध झालें. त्या कालीं सात्यकी, शल्य बाणानीं पीडित झालेला पांडवानीं पाहून मातुलवधाच्या इच्छेनें सर्व पांडव रथारूढ होऊन परम त्वरेनें त्याजवर धांऊन जातांच त्याचा मोठा संग्राम झाला. व त्याचें अद्भुत कृत्य सर्वांनीं पाहिलें. मद्रराजाच्या भुजां पासून सुटलेल्या बाणानीं सकल पृथ्वी व्याप्त होऊन, त्या पृथ्वीवर एकटा शल्याचा रथ असून क्षयकालीं शक्राच्या रथा सारखा संचार करीत होता तो आह्मीं पाहिला. असा विषय ह्या अध्यायांत आहे.

१६ अध्याय सोळावा- संजय बोलतो हे धृतराष्ट्र राजा, युद्धामध्यें तुझ्याकडील सर्व योद्धे मद्रराजास पुढें करून कृष्ण व अर्जुनासमस्त महारणप्रसंगीं परम त्वरेनें धांऊन गेले असतां धनंजयानें परम क्रुद्ध होऊन आपल्या सैन्यासहवर्तमान कृपाचार्य व कृतवर्मा यांजवर बाणांचा वर्षाव केला. सैन्यासहवर्तमान शकुनीचें सहदेवानें, नकुलानें मद्रराजा, द्रौपदीचे पुत्रानीं बहुत राजांस, पांचाल शिखंडीनें द्रोणपुत्रास, भीमसेनानें दुर्योधन राजाचें; या प्रमाणें परस्परांचें परस्परानीं निवारण केलें. हे राजा, या प्रकारें संग्रामामध्यें पलायन न करणाऱ्या अशा तुझ्याकडील व शत्रूकडील योद्ध्यांचें युद्ध होत असतां शल्याचें कर्म आह्मीं मोठें अद्भुत पाहिलें. एकटा शल्य पांडवांशीं युद्ध करून युधिष्ठिरासमीप आला. त्या कालीं चंद्राच्या सन्निध जसा शनैश्चर ग्रह दिसतो, तसा मद्रराज त्या रणप्रसंगीं युधिष्ठिराच्या समीपभागीं दिसला. शल्य आशीविषोपम बाणानीं धर्मराजास अतिशय पीडित करून नंतर भीमसेनावर जाऊन शरवर्षाव करूं लागला असतां शल्याचें हस्तलाघव व कृतास्त्रता तुझ्या व शत्रूकडील योद्ध्यानीं पाहून त्याणीं त्याची स्तुति केली. शल्याच्या बाणानीं युधिष्ठिर पीडित होऊन आक्रोश करीत असतां पांडवानीं शल्यास पाहून रणा-

चा त्याग करून ते दूर गेले. त्या कालीं मद्रराजानें आपले सेनेचा वध केला, हें युधिष्ठिरानें पाहून शल्याच्या कर्माचें सहन न करितां मोठ्या पौरुषानें म द्रराजास पीडित करून नंतर भ्राते व श्रीकृष्ण यांस आह्वान करून आप ल्या बुद्धिनिश्चयानें असें भाषण केलें कीं, आज माझा जय होवो किंवा वध होवो; भीष्म, द्रोण, कर्ण, व दुसरे बहुत राजे कौरवांकरितां आलेले सर्व म रण पावले. तुह्मीं यथाविभागशः यथोत्साहानें आपला पराक्रम जो क र्तव्य तो केला. आतां हा महारथी शल्य माझ्या एकट्याचा भाग उरला आहे. यास्तव त्यास जिंकण्याची आज मी इच्छा करितों. जें माझ्या मनांत आलें होतें तें आज मी तुह्मांस स्पष्ट बोलून दाखविलें. हे माद्रिपुत्र स मरामध्यें इंद्रानेंही जिंकण्यास अशक्य ते आज माझे चक्ररक्षक होऊ न आपल्या क्षात्रधर्माप्रमाणें व सत्यतेनें आपल्या मातुलाशीं मजकरितां युद्ध करोत. आतां मी व्यर्थ प्रलाप करीत नाहीं. शल्य माझा वध करील किंवा मी शल्याचा वध करीन. हे वीर हो, ही माझी सत्यवाणी तुह्मीं ऐका. हे पार्थिवहो, आज मी क्षात्रधर्में करून मातुलाशीं युद्ध करितों. या सत्य प्र तिज्ञेंत आज माझा विजय होईल, किंवा शल्याचा विजय होईल. परंतु म जपेक्षां सर्व साहित्यानें व शस्त्रानें शल्य अधिक आहे, यास्तव हे क्षत्रिय हो, माझ्या रथसंरक्षणाची शास्त्रोक्त योजना सांगतों ती करा. सात्यकीनें दक्षिणचक्राचें, धृष्टद्युम्नानें उत्तरचक्राचें, धनंजयानें माझ्या पृष्ठभागाचें व भीमसेनानें अग्रभागीं, या प्रमाणें सर्वांनीं रक्षण करावें. असें झालें अस तां शल्यापेक्षां मी युद्धामध्यें अधिक होईन. असें धर्मराजाचें भाषण ऐ कून सर्व राजानीं त्याचें प्रिय होण्या करितां तशी योजना केल्या नंतर पु नः पांडव सैन्यामध्यें मोठा हर्ष झाला. व धर्मराजाची ती प्रतिज्ञा ऐकून नंतर सैन्यामध्यें शंख, भेरी व नानाप्रकारच्या वाद्यांचे गजर होऊं लागले. पांचाल योद्धे सिंहा सारखी गर्जना करीत परम वेगानें शल्यावर धांऊन गेले. त्या कालीं योद्ध्यांच्या हर्षनादानें, गजांच्या घंटाशब्दानें, शंखाच्या ध्व नीनें व मोठ मोठ्या वाद्यांच्या गजरानें सकल पृथ्वी नादित होऊन गेली. व पांडवांकडील योद्ध्यांस तुझा पुत्र दुर्योधन व मद्रराज या उभयतांनीं ग्रहण

केलें. इंद्र जसा पर्वतावर जलवर्षाव करितो तसा समरश्लाघी शल्य, धर्मराजा वर बाणवर्षाव करूं लागला. तसाच राजा दुर्योधनही आपलें उत्तम प्रकारचें धनुष्य घेऊन तोही धर्मराजावर बाणवर्षाव करूं लागला असतां एकमेकांचें छिद्र उभयतांसही दृष्टीस पडेनासें जाहलें. इतक्यांत भीमसेनही तुझे पुत्राशीं युद्धार्थ आला. पांचाल, सात्यकी व इतर पांडव, शकुनीसह वर्तमान युद्ध करूं लागले असतां तें युद्ध मोठें भयंकर झालें. हे राजा, तुझ्या दुष्ट विचारानेंच हें कौरव पांडवांचें युद्ध उपस्थित झालें. दुर्योधनानें शोभायमान असा भीमसेनाचा ध्वज छिन्न करितांच तो पृथ्वीवर पडला असतां पुनः दुर्योधनानें भीमसेनाचें धनुष्य छिन्न करितांच महातेजस्वी भीमसेनानें छिन्नधन्वा झाल्यामुळें रथशक्ति धारण करून तुझ्या पुत्राच्या उरस्थलीं टाकून भेद केला असतां तो रथोपस्थांत मूर्च्छित पडला. हें वृकोदरानें पाहून त्याच्या सारथ्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें असतां त्या कालीं त्याच्या रथाचे अश्व, सारथी नष्ट झाल्यामुळें रथास घेऊन रणापासून पळून गेले. हें द्रोणपुत्र, कृपाचार्य व कृतवर्मा याणीं पाहून तेही दुर्योधनाचे संरक्षणा करितां त्याच्या मागें गेले. त्या समयीं तुमच्या कडील सकल सैनिक त्रस्त झाले असतां अर्जुन आपल्या धनुष्याचें विस्फोटण करून त्या सेन्यास शरानें ताडन करूं लागला. युधिष्ठिरासही शल्यकर्माचें सहन न होतां तोही आपल्या अश्वांस आपणच प्रेरणा करून शल्यावर धांऊन गेला. त्या कालीं कुंतिपुत्राचें चरित्र आम्हीं अद्भुत पाहिलें. जो युधिष्ठिर राजा पूर्वी मृदु व दांत होता. त्याणें युद्ध प्रसंगीं बाणें करून शतशः योद्ध्यांच्या वध केला. शत्रूंची सेना ज्या ज्या दिशेस जाई त्या त्या दिशेस धर्मराज जाऊन त्याचा नाश करिता झाला. बाणवर्षावें करून सकल रणभूमि शून्याकार करीत मद्रराजाप्रत उभा रहा उभा रहा असें भाषण करून त्याजवर धांऊन गेला. नंतर धर्मराज व शल्य याणीं एकमेकांवर शरवर्षाव केला. तेव्हां दोघांच्याही शरीरांतून रक्ताचे प्रवाह निघाले असतां पुष्पित झालेल्या पळसा सारखे शोभूं लागले. हें उभयतांचें कृत्य सर्व सैनिकानीं पाहून एकमेकांचा पराजय कसा करतील. असा त्यांस संशय उत्पन्न हो-

ऊन असें बोलतले कीं, आज पार्थ, शल्याचा वध करून सकल पृथ्वीचा उपभोग करील. अथवा शल्य पार्थाचा वध करून दुर्योधनास पृथ्वी देईल असें वाटतें. असे ते परस्पर बोलत असतां कोणचाही निश्चय झालानाहीं. धर्मराज युद्ध करीत असतां त्यास शुभ चिन्हें होऊं लागलीं. शल्यानें युधिष्ठिरावर बाण टाकून त्याचें धनुष्य छिन्न केलें असतां धर्मराजानें दुसरें धनुष्य घेऊन शल्यास ताडित केलें. आणि त्याचा ध्वजही तोडला. त्या कालीं कौरवांचें सैन्य भग्न होऊन दुर्योधनाच्या सन्निध आलें. द्रोणपुत्र अश्वत्थाम्यानें शल्यास आपले रथांत घेऊन तो पळाला. या कृत्यास एक मुहूर्त झाल्यावर युधिष्ठिर रणामध्यें गर्जना करीत असतां मद्राधिप शल्य दुसऱ्या रथांत बसून युधिष्ठिराजवळ आला. असा विषय या अध्यायांत आहे.

१७.अध्याय सत्रावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा शल्यानें धनुष्य घेऊन युधिष्ठिर व इतर राजे यांजवर पर्जन्य वृष्टी प्रमाणें बाणवृष्टि केली. नंतर सात्यकी, भीमसेन, सहदेव, धर्मराज आणि दुसऱ्याही धनुर्धारी योद्ध्यांस अश्व, रथ व कुंजर यांसहवर्तमान ताडित केलें. असा शल्य यमासारखा क्रुद्ध होऊन पांडवसैन्याचा नाश करीत असतां पांडव, पांचाल व सोमक यानीं रणभूमीमध्यें त्यास वेष्टिलें. हें कृत्य भीमसेन व सात्यकी व पुरुषवीर माद्रिपुत्र याणीं पाहून तेही शूर, धर्मराजाजवळ येऊन शल्याचें निवारण करून उग्र ज्यांचा वेग अशा बाणानीं शल्यावर प्रहार केला. धर्मराज बलात्कारानें त्याजवर धांऊन गेला आणि त्याच्या नाशा विषयीं श्रीकृष्णानें जें भाषण केलें होतें त्याचें चिंतन करून रथस्थ होत्साता हा आपलाच अवशिष्टभाग उरला आहे असें मनांत स्मरण करून शल्यास मारण्याच्या इच्छेनें हेमदंडयुक्त, कनकप्रकाशतुल्य अशी शक्ती घेऊन आपले नेत्र एकाएकीं प्रदीप्त करून मद्रराजाकडे पाहिलें असतां तो त्याच्या दृष्टिपातानें भस्म झाला नाहीं, हें मला अद्भुत वाटतें. ती धर्मराजाची शक्ती एकाएकीं शल्यावर आलेली, सकल कौरव पहात उभे राहिले. तेव्हां धर्मराजानें ब्रह्मद्वेष्ट्यांचा अंत करणारी व अमोघ अशा शक्तीस शल्यराजाच्या वधाकरितां सोडून हे पाप्या तूं हत झालास अशी गर्जना करीत धर्मराजा नृत्यच करितो.कीं.काय!

असा दिसूं लागला. तेव्हां अग्नी जसा घृताच्या धारेस ग्रहण करितो तसा शल्य राजा त्या शक्तीच्या ग्रहणा करितां गर्जना करूं लागला. तेव्हां त्या शक्तीनें श ल्यराजाच्या मर्मांचें विदारण केलें असतां नासिकादि अवयवापासून रक्तस्राव होऊन सर्व शरीर रक्तानें भरलें. तेव्हां शल्यराजा छिन्नकवच होऊन रथापासून भूमीवर अस्ताव्यस्त पडला. तथापि शल्यराजाची शोभा नष्ट झाली नाहीं. त्या काळीं धर्मराजानें इंद्रधनुष्याप्रमाणें धनुष्य घेऊन त्याजवर बाणांची योजना केली. आणि त्या बाणानीं बहुत वीरांचें मर्दन केलें. तेव्हां शल्यराजा पडला असतां त्याचा कनिष्ठ बंधु धर्मराजावर नाराच बाणानी वेंध करीत असतां धर्मराजानें सहा बाणांनीं त्याचें धनुष्य व ध्वज इत्यादिकांचा छेद करून भल्लबाणानें कुंडलासहित त्याचें शिर रथांतून पाडलें. तें पाहून कौरववीर हाहाःकार करीत पळूं लागले. हें पाहून दुर्योधन मोठ्या वेगानें एकटाच सर्व पार्थांचें निवारण करण्यास प्रवृत्त झाला. सकल पांडव रथारूढ व धृष्टद्युम्न व आनर्त इतक्या योद्ध्यांवर दुर्योधन शीत बाणाची वृष्टि करीत असतां त्याणें त्यांची मृत्युसारखी गणना केली नाहीं. यादव कृतवर्मा दुसरे रथांत बसून पुनः युद्धार्थ आला असतां युधिष्ठिरानें परम त्वरेनें त्याच्या रथाचे अश्व मारून नंतर गौतमास वेध केला. कृपाचार्य विरथी झालेल्या अश्वत्थाम्यानें पाहून उत्तम रथामध्यें त्यास घालून रणभूमीपासून माघारा नेला. नंतर कृपाचार्यानें युधिष्ठिरास वेध करून त्याच्या रथाच्या अश्वांस वेध केला या प्रकारें तुझ्या दुष्ट विचारानें हें वीरांचें युद्ध तुझ्या पुत्रांशीं उत्पन्न झालें. धर्मराजानें, महारथी शल्य संग्रामामध्यें पाडल्यावर त्यास पाहून सकल पांडव एकत्र मिळून परम हर्षानें शंखाचे नाद करून पूर्वी वृत्रासुर वधकालीं देवानीं जशी इंद्राची स्तुति केली तशी युधिष्ठिराची स्तुति करून नानाप्रकारच्या वाद्यांच्या नादानीं पृथ्वी नादित केली. असा विषय या अध्यायांत आहे.

१८. अध्याय अठरावा:- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा. शल्य मरण पावल्यावर त्याचे कांहीं पदाति व सातशें रथारूढ झालेले वीर, युद्धाचा त्याग करून माघारें फिरण्यास उद्युक्त झाले असतां छत्रचामरयुक्त असा दुर्योधन राजा पर्वतासारख्या गजावर आरूढ होऊन शल्य सैन्यास भाषण

करितां. कीं, हे वीरहो तुह्मीं जाऊं नका. असें वारंवार दुर्योधनानें त्या सैन्याचें निवारण केलें असतां ते वीर पुनः युधिष्ठिराशीं युद्ध करण्या करितां पांडव सैन्यांत येऊन धनुष्याचा मोठा टणत्कार करीत युद्ध करूं लागले. त्याकाळीं त्या युद्धांत शल्याचें प्रिय करणारे जे महारथी याणीं युधिष्ठिरास पीडित केलें. हें ऐकून अर्जुन भीमसेन, माद्रिपुत्र, सात्यकी, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, शिखंडी व सोमकासह पांचाल, हे ही युधिष्ठिराच्या संरक्षणार्थ आले आणि युधिष्ठिरास वेष्टुन मत्स्य जसे सागरास क्षुब्ध करितात तसे त्यानीं मद्रराजाच्या सैन्यास क्षुब्ध केलें. त्या काळीं पूर्वेच्या वायूनें गंगा जशी क्षुब्ध होते तशी पुनः पांडवांची सेना क्षोभ पावून मद्रराजाच्या सैन्याशीं युद्ध करीत असतां मद्रराजाचे सैनिक मोठा आक्रोश करून बोलूं लागले कीं, अरे; युधिष्ठिर, तसेंच त्याचे भ्राते, पांचाल शिखंडी, धृष्टद्युम्न, सात्यकी व द्रौपदेय हे कोठें आहेत? असें ते बोलत असतां द्रौपदेय व इतर रथ्यानीं मद्रराजाच्या सैन्यावर प्रहार करितांच ते रथी पांडवांच्या बाणानीं ताडित झाल्यामुळें कोणी रथांतून पतन पावले. कोणाचे मोठमोठे ध्वज छिन्न झाले. त्या काळीं दुर्योधन सांत्वनपूर्वक त्या वीरांस युद्धापासून परावृत्त होण्या विषयीं आज्ञा देत असतां ही त्याची आज्ञा न मानून पुनः ते सहस्त्रावधि वीर पांडवांवर धांवले. हें शकुनीनें पाहून तो दुर्योधनास बोलला कीं, हे महाराज, आह्मीं पहात असतां शल्याचें सैन्य पांडवानीं नष्ट केलें. तूं या युद्धामध्यें उभा असतां हें युक्त नव्हे. पूर्वीं तूं असा निश्चय केला होतास कीं या सैन्यासह वर्तमान आह्मीं पांडवांशीं युद्ध करूं. असें असतां या सैन्यास पांडव पीडित करितात हें तूं कसें सहन करितोस? असें शकुनीचें भाषण ऐकून दुर्योधन बोलतो. हे शकुनि, पूर्वीं मी याचें निवारण केलें तथापि माझी आज्ञा ते मान्य न करितां आपणच एकत्र होऊन पांडवांशीं युद्ध करितात. त्यास मी काय करावें. असें दुर्योधनाचें भाषण ऐकून शकुनि बोलतो हे दुर्योधना, आपल्या स्वामीची आज्ञा ते मान्य करीत नाहींत तर न करोत. आपण त्यांजवर क्रोध न करितां त्यांची उपेक्षा करण्याचा हा काल नव्हे. यास्तव आपण अश्व, गज यांसह जाऊन त्यांचें रक्षण करूं. असा विचार

करून ते सैनिक रक्षणार्थ गेले. असा विचार झाल्यावर दुर्योधनराजा मोठ्या सैन्यासहवर्तमान सिंहनादानें पृथ्वी कंपित करीत मद्रराजाचे सैन्याकडे चालला. त्या काळीं कौरवसैन्यांत अरे मारा, अरे वेध करा, अरे धरा, अरे प्रहार करा, अरे छेदन करा, असा मोठा तुमुल शब्द होऊं लागला. इकडे पांडवानीं मद्रराजाचे पदाति आपल्यावर आलेले पाहतांच त्यांस मध्यगुल्मामध्यें आणून एक क्षणांत हस्तयुद्धांत त्या सर्व वीरांचा नाश केला. नंतर कौरवांकडील सैनिकानीं मद्रराजाचें सैन्य मृत झालेलें पाहून एका एकीं किलकिला शब्द केला.

संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, या प्रकारें मद्रराजाचे शूर नष्ट झालेले पांडवानीं पाहून जयलोभानें वारंवार कौरवसैन्यावर प्रहार केला. त्या काळीं दुर्योधनाकडील सैनिकानीं मद्रराज व त्याचें सैन्यही नष्ट झालेलें पाहून व पांडवानीं आपल्यास त्रास दिला असें जाणून ते दाही दिशांस पलायन करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

१९. अध्याय एकुणिसावा.- संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, शल्य मरण पावल्यावर तुझ्याकडील योद्धे व तुझे पुत्र युद्धापासून विमुख झाले. ते त्रस्त झाल्यामुळें अनाथ असतां सनाथ होण्याची इच्छा करूं लागले. हे राजा, भीष्म, द्रोण व कर्ण हे योद्धे मरण पावल्यावर तुझ्याकडील योद्ध्यांस जें दुःख झालें तें केवळ आमच्या शोकास कारण जाहलें. शल्य मरण पावल्यावर तुझ्याकडील योद्धे पलायन करून गेले. ते पळत असतां पांचाल पांडवाशीं असें बोलूं लागले कीं, युधिष्ठिर राजा आज आपल्या शत्रूस मारून निर्वेध झाला. व दुर्योधन राज्यश्रीनें आज हीन झाला. धृतराष्ट्र राजा, आज आपला पुत्र दुर्योधन नष्ट झालेला ऐकून पृथ्वीवर पडेल. युधिष्ठिर राजा सर्व धनुर्धार्‍यांमध्यें श्रेष्ठ आहे असें समजून तो पापी आपली निंदा करून घेईल. विदुर त्याच्या हिताचीं जीं वाक्यें बोलत होता त्या वाक्यांची आज त्याला सत्यता वाटेल. पांडव दासासारखे होऊन वनांत फिरत असतां त्यांस जें दुःख होत होतें त्या दुःखाचें आज धृतराष्ट्र स्मरण करील. श्रीकृष्णाच्या माहात्म्याचें ज्ञान त्यास आज पूर्ण होईल. तसेंच अर्जुनाच्या घोर ध-

धुष्याचें व अस्त्राचें ज्ञान आज त्यांचे अनुभवास येईल. धनंजय, सात्यकी, भीमसेन, धृष्टद्युम्न, द्रौपदीचे पांच पुत्र, माद्रिपुत्र, शिखंडी व सकल जगताचा नाथ श्रीकृष्ण ज्यांकडे आहे त्या पांडवांचा जय कां होणार नाहीं? भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, व दुसरेही सहस्रावधि राजे यांस धर्मराज व अर्जुना वांचून रणामध्यें जिंकण्यास कोण समर्थ होईल? धर्म व यश यांचा केवळ निधि असा श्रीकृष्ण ज्या पांडवांचा नाथ आहे त्यांस कमी काय? या प्रकारें पांचाल व सृंजय भाषण करीत पलायन करणाऱ्या कौरव सैन्याच्या पाठीमागून धांवले. पांडव तिकडे जात असतां त्यांच्या गमनानें पृथ्वी पासून धूळ उत्पन्न झाली. हे योद्ध्यांचे सिंहा सारखे घोर नाद होतात ते ऐक. हे सूता, यास्तव तुला सांगतों कीं माझे अश्वांस प्रेरणा करून आपल्या सैन्याचा पृष्ठभाग रक्षण करण्या करितां लोकर मला घेऊन चल. मी तेथें गेलों असतां अर्जुन माझ्याशीं युद्ध करूं लागल्या नंतर माझें सैन्य पळत आहे, तें माघारें फिरेल. असें दुर्योधनाचें शौर्ययुक्त भाषण ऐकून सारथ्यानें हेमविभूषित रथाचे अश्वांस प्रेरणा करितांच ते अश्व पुढें जातांच नानादेशांत उत्पन्न झालेले, नाना प्रकारच्या देशांत वास करणारे रथ, गज व अश्वहीन असे एकवीस हजार योद्धे दुर्योधनाच्या यशाची प्रार्थना करीत तयार होऊन पांडवांचे सैन्यावर जाऊन पडले असतां त्या कालीं उभय सैन्याचा घोर संग्राम झाला. भीमसेन व धृष्टद्युम्न हे उभयतां कांहीं चतुरंग सैन्य बराबर घेऊन त्या नाना देशीय प्राप्त आलेल्या पदात्यांचें निवारण करीत असतां त्यांतील अवशिष्ट कांहीं पदाति हर्षानें सिंहासारखा नाद करीत वीर लोक प्राप्त होण्याच्या इच्छेनें भीमसेनावर आले. हें कृत्य पांडवांकडील योद्ध्यानीं पाहून ते कौरवांकडील योद्ध्यांचें निवारण करण्यास आले. त्या कालीं भीमसेनानें आपले योद्धे आले असें जाणून तो रथाखालीं उतरला आणि गदा घेऊन त्यानें एकवीस सहस्र कौरव पदात्यांचा वध केला. ते नाना ज्योतिष, नानाप्रकारचे देशांपासून आलेले, नाना प्रकारचीं शस्त्रें धारण करणारे योद्धे मरण पावल्यावर पताका, ध्वज से

पन्न असें दुर्योधनाचें कांहीं अवशिष्ट सैन्य होतें, तें हा घोर, रौद्र भयानक सं ग्राम पाहून युद्धापासून पराङ्मुख झालें. नंतर युधिष्ठिर प्रमुख पांडवांक डील महारथी दुर्योधनावर धांवून गेले असतां दुर्योधनाकडील योद्धे त्याचा त्या ग करून युद्धापासून पराङ्मुख झाल्यामुळें दुर्योधन एकटा जरी होता त थापि समुद्र जसा मर्यादा उल्लंघन करीत नाहीं तसे पांडवांकडील महारथी दु र्योधनाचें उल्लंघन करण्यास समर्थ झाले नाहींत. कृष्णार्जुनही युद्ध करितां करितां त्रस्त झाले आहेत. या कालीं आपण एकत्र मिळून जर युद्ध करूं तर आपला निश्चयें करून विजय होईल. तुह्मीं पलायन जरी केलें तथा पि पांडव तुमचा वध करतीलच. त्यापेक्षां युद्धांत मरण पावाल तर तुमचें कल्याण होईल. जे युद्धांत मरण पावतात ते तत्काल स्वर्गलोकाचाच उप भोग करितात, यांत संशय नाहीं. असें दुर्योधनाचें वाक्य ऐकून सकल यो ध्यानीं त्याच्या भाषणाचा सत्कार करून ते पुनः पांडवांवर धांऊन गेले अ सतां पार्थही त्या योद्ध्यांशीं युद्ध करूं लागले. वीर्यवान अर्जुन उभयतां माद्रिपुत्र व सात्यकी हे ही हर्षित होऊन मोठ्या वेगानें कौरवसैन्यावर धां ऊन गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

२०. अध्याय विसावा:— संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, कौ रवांकडील योद्धे युद्धा पासून परावृत्त झाले असतां म्लेंच्छगणांचा अधि पति शाल्व, मोठ्या गजावर बसून पांडव सैन्यावर धांऊन गेला. हा गज मो ठ्या श्रेष्ठ कुलांत उत्पन्न झाला असून दुर्योधन या गजाची पूजा करीत अ से. शाल्वराजा पांडव सैन्यावर धांऊन गेला आणि त्यानें बाणाची वृष्टि करू न बहुत योद्धे यमलोकीं नेले. पूर्वी इंद्रानें ऐरावताच्या योगें जशी दैत्यां ची सेना नष्ट केली तशी शाल्वराजानें या गजाच्या योगें पांडवांची सेना नष्ट केली असतां सकल पांडव, सोमक व सृंजय हे सकल योद्धे, सहस्त्रा वधि योध्यांमध्यें इंद्रा सारखा एकाकीं गजावर आरूढ होऊन सैन्यामध्यें संचार करणाऱ्या शाल्वराजास पाहून त्याच्या आसमंतात् उभे राहिले. त्या गजाच्या समीपभागीं सैन्य उभें राहण्यास समर्थ झालें नाहीं. पांडवांची से ना भग्न होऊन एकाएकीं चारी दिशांस पळून गेलेली कौरवांकडील योद्ध्यां

नां पाहतांच शाल्वराजाची स्तुति करून चंद्रा सारख्या स्वच्छ अशा आपल्या शंखांचे नाद केले असतां तो हर्षयुक्त शंखाचा नाद पांडव व सृंजयांचा सेनापति जो धृष्टद्युम्न याणें ऐकून तो शाल्वराजाच्या गजावर धांऊन गेला.धृष्टद्युम्न आपल्यावर धांऊन आले त्या शाल्वानें पाहतांच त्याचा वध करण्याकरितां आपले गजास पांचालावर जाण्यास त्वरेनें प्रेरणा केली. त्या कालीं पांचालराजानें अग्नीसारख्या बाणानीं गजाचे गंडस्थलास वेध केला असतां तो पळून गेला. हें शाल्वानें पाहतांच अंकुशानीं पुनः त्याचा निग्रह करून पुनः पांचाल राजाच्या रथावर जाण्यास प्रेरणा केली. शाल्व राजाचा गज एका एकीं आपले रथावर येतो हें पांचाल राजानें पाहून हस्तांत गदा घेतली. व उभा असतां शाल्वाच्या गजानें धृष्टद्युम्नाचा हेमविभूषित रथ,अश्व व सारथ्यासहवर्तमान आपल्या शुंडा दंडांत घेऊन उचलला आणि पृथ्वीवर आपटुन नष्ट केला. हें शाल्व राजाच्या गजाचें भयंकर कृत्य भीमसेन, शिखंडी, सात्यकी, याणीं पाहून ते धृष्टद्युम्नाच्या सन्निध धांऊन आले आणि गजावर शरवर्षाव करून आसमंतात्त्यांनीं त्यास वेष्टिलें.त्या वृष्टीनें गज व्याकुल होऊन इकडे तिकडे फिरूं लागला. हें शाल्वानें पाहून तो त्या योद्ध्यांवर बाणवृष्टि करूं लागला.पुनः तेंच शाल्वाचें कृत्य पाहूनतेहाहाःकार शब्दाचा नाद करीत त्याच्या गजास रोध करून उभे राहिले. नंतर महाशूर पांचालराज धृष्टद्युम्न मोठ्या संभ्रमानें मोठी गदा घेऊन परम त्वरेनें,पर्वत सदृश मेघा सारख्या मदस्रावी शाल्वराजाच्यागजावर धांऊन जाऊन त्या गदेचा त्याजवर प्रहार करितांच गदाप्रहारानें त्याचें मस्तक भिन्न होऊन मुखापासून रुधिर वमन करीत पृथ्वीवर पडला. हें कृत्य कौरवांकडील योद्ध्यानीं पाहतांच ते मोठा हाहाःकार शब्द करूं लागले. इतक्यांत सात्यकीनें बाणें करून शाल्वराजाचें शीर तोडलें. तव्हां तो भिन्न मस्तक झालेला शाल्वराजाचा देह सात्यकीच्या बाणानें पृथ्वीवर पडला असा विषय या अध्यायांत आहे.

२१. अध्याय एकविसावा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा,शाल्वराजा मरण पावल्यावर तुझें सैन्य भग्न झालें.हें कृतवर्म्यानें पा

हून पलायन करणाऱ्या सैन्यास उभें केलें. त्या काळीं कौरवांकडील सैनिकानीं त्यास पाहून पांडव सैन्यावर बाणांचा वर्षाव केला. नंतर पांडवांनींही त्यांजवर बाणवर्षाव केला. परस्पर योद्धे युद्ध करीत असतां त्याच्या सिंहनादानें आकाश व्याप्त झालें. सात्यकी कौरव सैन्यावर शर वृष्टि करितो, हें कृतवर्म्यानें पाहून तो परम वेगानें सात्यकीवर धांऊन आला असतां उभयतां रथी एकमेकांवर धांऊन शस्त्रांचे प्रहार करूं लागले. तें उभयतांचें युद्ध पाहून पांचालासहवर्तमान पांडव व इतर योद्धे सात्यकी जवळ आले. उभयतां महारथी एकमेकांस नाराच व वत्सदंतबाणानीं ताडन करीत असतां प्रहृष्ट झालेल्या कुंजरासारखे दिसूं लागले. कृतवर्मा आणि सात्यकी यानीं परस्पर एकमेकांस नानाप्रकारचे युद्धमार्ग दाखवून प्रहारही केले. त्या काली कृतवर्म्यानें कांहीं निशित बाणें करून सात्यकीस वेध करून चार बाणानीं रथाचे अश्वांस ताडित केलें असतां तोपीडित होऊन त्यानें कृतवर्म्यास वेध केला. कृतवर्म्यानें ते बाण सहन करून सात्यकीस तीन बाणानीं वेध करून एका बाणानें त्याचें धनुष्य तोडलें. तुझ्या पुत्रास तर मोठा विषाद उत्पन्न झाला. कृपाचार्य हा, कृतवर्मा हताश्व व हतसारथी झालेला पाहून त्याच्या जवळ आला आणि त्यास आपले रथामध्यें बसवून युद्धापासून दूर नेलें. हें तुझ्या सैनिकानीं पाहतांच ते युद्धापासून पराङ्मुख झाले असतांही रणभूमीमध्यें अतिशय रज उधळल्यामुळें, शत्रूंच्या पाहण्यांत आले नाहींत. आपलें सैन्य भग्न होऊन आपल्यापासून पळून गेलें. हें दुर्योधनानें पाहून त्याच्या जवळ जाऊन त्याचें निवारण केलें. व पांडव, धृष्टद्युम्न, शिखंडी, द्रौपदेय, पांचाल कैकय व सोमक यांजवर शर वृष्टि करून आपण एकाकी युद्धांमध्यें अग्नीसारखा उभा राहिला. त्या कालीं जसें मनुष्य मृत्युसन्मुख होत नाहीं, तसे पांडवांकडील योद्धे मृत्यूच्या भयानें दुर्योधनाशीं युद्ध करण्यास त्याचे अग्रभागीं आले नाहींत. इतक्यांत कृतवर्मा दुसरे रथांत आरूढ होऊन युद्ध करण्याच्या इच्छेनें रणभूमीमध्यें आला. असा विषय या अध्यायांत आहे..

२२. अध्याय बाविसावा.- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा, तुझा पुत्र दुर्योधन रथामध्यें आरूढ असतां रुद्रासारखा योद्ध्यांस भयंकर दिसूं लागला. त्याच्या बाणें करून पृथ्वी आच्छादित होऊन गेली. पर्जन्याच्या धारा पर्वतावर जशा पडतात तसा दुर्योधनानें शत्रूंवर बाणांचा वर्षाव केला. पांडवांकडील रथी, अश्व, गज, किंवा कोणी पुरुष दुर्योधनाच्या बाणानीं विद्ध झाल्यावांचून राहिला नाहीं. हे राजा, फार तर काय सांगूं; परंतु दुर्योधनानें सोडलेल्या बाणानीं सर्व पृथ्वी व्याप्त पाहिली. तुमच्याकडील व शत्रूकडील सहस्रावधी योद्धे त्या युद्धप्रसंगीं होते, परंतु त्यांमध्यें एक दुर्योधनच पराक्रमी पाहिला. तुझा पुत्र एकटा असतांही सकल पांडव त्याजवर जावयास समर्थ झाले नाहींत. नंतर तुझ्या पुत्रानें युधिष्ठिर, भीमसेन, सहदेव, नकुल, धृष्टद्युम्न, द्रौपदेय, सात्यकी इत्यादिकांस बाणानीं ताडन केलें. व एका भल्लाकार बाणानें सहदेवाचें धनुष्य तोडून टाकलें. तेव्हां त्यानें तें टाकून दुसरें धनुष्य घेतलें. आणि सात्यकी, नकुल, द्रौपदेय, धर्मराजा, भीमसेन या सर्वांनीं दुर्योधनास बाणानीं ताडित केलें. आणि त्याच्या आसमंतात् बाणवर्षाव केला असतांही दुर्योधन चंचल न होतां उभें राहून आपलें हस्तलाघव दाखवीत होता तें सकल योद्धे पहात होते. त्या कालीं कौरव पांडवसैन्याचें अंतर किमपि न राहतां मोठें तुमुल युद्ध झालें. पांडवांकडील योद्धे कौरवांवर धांऊन आले असतां द्रोणपुत्र, भीमसेनाचें निवारण करून बाणवृष्टि करीत असतां दिशा प्रदिशांचें ज्ञान योध्यांस होईनासें झालें. ते उभयतां युद्ध करीत असतां त्यांच्या त्या धनुष्यांच्या टणत्कारें करून सकल जगतास त्रास झाला. शकुनीनें युधिष्ठिरास रणामध्यें ताडन करून व त्याचे चारी अश्व मारून महानादानें सर्व सैन्यास कंपित करितांच सहदेवानें धर्मराजास आपले रथामध्यें बसवून रणभूमीपासून दूर नेल्या नंतर पुनः धर्मराज दुसरे रथांत बसून शकुनीस त्यानें ताडन केलें; तें उभयतांचें चित्रविचित्र घोररूप युद्ध, पाहण्यास प्रीतिदायक असें झालें. उलूकानें नकुलाकडे धांवून शरवर्षाव केला असतां नकुलानेंही शरवर्षाव करून उलूकास वेष्टित केलें. कृतवर्मा, सात्यकीशीं युद्ध करीत असतां इंद्र

जसा बलिनामा दैत्याच्या युद्धप्रसंगीं शोभला तसा शोभला. दुर्योधनानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य छेदून त्यास विद्ध केला असतां तो दुसरें धनुष्य घेऊन सकल धनुर्धारी पहात असतां दुर्योधनाशीं युद्ध करूं लागला. तें उभयतांचें युद्ध मत्त झालेल्या गजासारखें झालें. कृपाचार्यानें क्रुद्ध होऊन द्रौपदेयांस बहुत बाणानीं विद्ध केलें असतां देहाचें आणि इंद्रियाचें जसें युद्ध होतें त सें कृपाचार्याचें आणि द्रौपदेयांचें युद्ध झालें. कृपाचार्यानेंही बाणें करून द्रौपदेयांस आच्छादित केलें. या प्रसंगीं नरानीं नरांशीं, गजानीं गजांशीं, हयांनीं हयांशीं व रथ्यानीं रथ्याशीं घोररूप द्वंद्व युद्ध केलें. त्या प्रसंगीं रजा नें पृथ्वी आच्छादित झाली. एकामुहुर्तानें वीरांच्या शोणितोदकें करून रण भूमी सिंचित झाली असतां सकल रज शमले. त्या कालीं योद्ध्यांचें द्वंद्व युद्ध होत होतें तें दृष्टीस पडूं लागलें. एकमेकांवर जे बाण पडत त्यांचा मोठा तुमु- ल शब्द, वेणूचें वन दग्ध होत असतां जसा होतो तसा झाला. असा विष य या अध्यायांत आहे.

२३ अध्याय तेविसावा-संजय भाषण करितो हे धृतराष्ट्रा,कौरव पांडवांचें युद्ध चाललें असतां पांडवानीं तुझ्या पुत्राचें सैन्य भग्न करून टाकिलें. तेव्हां दुर्योधनानें सातशें रथी युधिष्ठिराशीं युद्धास पाठविले असतां ते कौंतेया वर बाणवृष्टि करूं लागले. तें शिखंडी प्रमुख योध्यांनीं पाहून ते युधिष्ठि राच्या जवळ येऊन उभे राहिले. नंतर पांडव व कौरव या उभयतांचा मोठा यमराष्ट्राची वृद्धि करणारा,असा भयंकर संग्राम प्रवृत्त होऊन रक्ताच्या न द्या उत्पन्न झाल्या. ते सातशें रथी पांडवानीं मारिल्या नंतर पुनः पांचालास ह वर्तमान पांडव,कौरवांशीं युद्ध करूं लागले. तें युद्ध मोठें तुमुल झालें. असें पूर्वी कधींही झालें नाहीं व ऐकिलेंही नाहीं. गजांच्या नेत्रांतून अ- श्रूंच्या धारा चालून ते थरथर कांपूं लागले. असे घोर व दारुण उत्पात हो त असतां त्यांचा अनादर करून हें कुरुक्षेत्र रमणीय व पुण्यकारक आ हे. येथें मृत्यु आला असतां स्वर्गप्राप्त होईल. असा विचार करून ते स कल क्षत्रिय अव्यग्र मनानें युद्ध करूं लागले. त्या कालीं गांधार राजाचा पुत्र शकुनि, सकल योद्ध्यांस बोलला कीं, हे योद्धे हो, जों पर्यंत तुह्मीं अ-

ग्रभागीं युद्ध करीत आहां तों पर्यंत मी पृष्ठभागून पांडवांस मारतों. असें श कुनि भाषण करीत आहे तों मद्रराजाचे योद्धे किलकिला शब्द करीत युद्धा र्थ आले. पांडवांकडील योद्धे कौरवांकडील योद्ध्यांवर लक्ष्य ठेऊन आपले धनुष्याचे टणत्कार करीत मद्रराजाच्या सैन्यावर वर्षाव करून त्याचा त्यानीं नाश केला. हें दुर्योधनाकडील योध्यानीं पाहतांच ते युद्धपराङ्मुख झाले. त्या काळीं गांधारराज शकुनि पुनः योद्ध्यांस बोलतो कीं, हे धर्मज्ञ योद्धेहो, पुनः माघारें फिरून युद्ध करा. युद्धावांचून उगीच कां व्यर्थ मरण पावतां? तेव्हां त्यांनीं पांडवांशीं मोठें युद्ध केलें. त्या काळीं वायूनें अभ्रें जशीं उडून जातात त्या प्रमाणें पांडवांची सेना पळून गेलेली युधिष्ठिरानें पाहतांच तो सहदेवास बोलतो कीं, हे सहदेवा, या शकुनीनें आपल्या सैन्याच्या जघ न भागास मोठी पीडा दिली आहे. हा आपल्या सैन्याचें कसें कदन करि तो तें पहा. यास्तव तूं व द्रौपदेय यानीं या दुर्मति शकुनीचें निवारण करा वें. मी या रथस्थ योद्ध्यांचा नाश करितों. तेव्हां पांडवांकडील अश्वारोह श कुनि सैन्यांत प्रविष्ट होऊन गजांच्या मध्यभागीं स्थित जो शकुनि याजव र शरांची वृष्टि करूं लागले. नंतर शकुनीचेही योद्धे पांडवांच्या अश्वारो हाशीं युद्ध करीत असतां तें युद्ध मोठें भयंकर होऊं लागलें. या युद्धांत रथस्थ योद्ध्यांच्या धनुष्य प्रत्यंचेच्या शब्दाचा उपरम होऊन ते रथी केव ळ रथांत पहात स्तब्ध बसले. आकाशांत जसे शलभ दिसतात तसे रु धिरानें भरलेले मृत योद्धे पृथ्वीवर दिसूं लागले. कांहीं योद्धे भूमीवर पडून त्यांचे परस्परांचे केश एकमेकांत संलग्न झाल्यामुळें त्यांस चल न वलन करण्यास सामर्थ्य राहिलें नाहीं. मल्ल जसे एकमेकांस आकर्ष ण करितात, तसे अश्व पृष्ठांवर आरूढ झालेले अश्वारोह एकमेकांस आकर्षण करीत होते. कांहीं गजारोहानीं अश्वारोह मारून पृथ्वीवर पा डले. असें एक मुहूर्त युद्ध झाल्या नंतर सहासहस्र अश्वारोहांसह व- र्तमान शकुनी रणभूमीपासून माघारा फिरला. पांडवांचे राहिलेले सहा सहस्र अश्वारोह बोलले कीं, आह्मास रथ्यांसहवर्तमान युद्ध करण्याची श क्ति राहिली नाहीं. यास्तव रथ्यांनीं रथ्यांशीं व कुंजरांनीं कुंजरांशीं युद्ध-

करावें. द्रौपदेय युद्धाचा त्याग करून जेथें धृष्टद्युम्न उभा होता तेथें आले. पृथ्वीवरील रज, मेघा सारखे चोंहींकडून व्यास झाले असतां सहदेव रणाचा त्याग करून एका एकीं धर्मराजा जवळ आला. असें सकल पांडवांचें सैन्य युद्धा पासून परावृत्त झालें असतां पुनः शकुनि धृष्टद्युम्नाच्या पार्श्वभागीं उभ्या राहिलेल्या सैन्यासह वर्तमान युद्ध करूं लागला. त्या कालीं उभयतांकडील योध्यांचें तुमुल युद्ध होऊं लागलें. आमिषा करितां पक्षीजसे परस्पर युद्ध करितात तसे भ्राते, पुत्र, पिता, एकमेकांस तीक्ष्ण शस्त्रानीं ताडन करूं लागले. कोणी म्हणतो मी पूर्वी मारीन. कोणी म्हणतो मीं पूर्वी मारीन. असें भाषण करीत सहस्त्रावधी योद्धे एकमेकांचा वध करूं लागले. कोणी अत्यंत श्रमी झालेले, कोणी तृषित झालेले, कोणी शरानीं व अस्त्रानीं विद्ध झालेले कौरवांकडील योद्धे पृथ्वीवर पडले होते. कोणी योद्धे रुधिराच्या उन्मत्त गंधानें त्रस्त होऊन निचेष्ट पडले. त्या कालीं वृक, गृध्र, शृंगाल यांच्या समुदायास मोठा आनंद झाला. हे राजा तुझा पुत्र पहात असतां या योध्यांचा घोर क्षय झाला. भीरूंस भय उत्पन्न करणाऱ्या अशा रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. योध्यांच्या शरीरास शस्त्रानें व्रण पडून त्यांतून रुधिराचे प्रवाह वाहूं लागले. रुधिराचा दुर्गंधि सुटून कित्येकांस मूर्छा आली. या प्रकारें परस्पर योध्यांचें युद्ध होत असतां परस्परांशीं परस्पर युद्ध करूं लागले. त्या कालीं मोठा युद्धप्रसंग होऊन पुण्यक्षयानें विमाना पासून भ्रष्ट झालेल्या सिद्ध पुरुषा सारखे कितीएक योद्धे आप आपल्या वाहना पासून पृथ्वीवर पतन पावले. पिता, पुत्र, भ्राते व स्नेही याणीं परस्परांस मारून मोठें रण उत्पन्न केलें. असें प्रास, खड्ग, बाण इत्यादि शस्त्रानीं युक्त परस्परांचें अमर्याद युद्ध झालें. असा विषय या अध्यायांत आहे.

२४. अध्याय चोविसावा. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र, पांडवानीं कौरवांचें सैन्य ताडित केलें असतां त्या सैन्यांत मोठा शब्द झाला. तो शांत झाल्यावर शकुनि राहिलेले सातशें घोडे स्वार घेऊन आपले सैन्यांत आला. आणि अरे, युद्ध करा, युद्ध करा, असें बोलून त्यांस विचारतो

कीं, दुर्योधन कोठें आहे? हें ऐकून ते योद्धे बोलले कीं, युद्धार्थ सिद्ध झालेले रथी जेथें उभे आहेत तेथें दुर्योधन आहे तेथें तुह्मी गेलां असतां दुर्योधन दृष्टीस पडेल, असें ऐकून तो तेथें येऊन बोलला कीं, हे दुर्योधन राजा, मी तुला सांगतो कीं, रथसमुदायाचा तूं पराभव कर. अश्वस्वारांस मी जिंकिलेच आहेत. या रथ्यांचा पराभव केल्या वांचून युधिष्ठिराचा पराभव होणें अशक्य आहे, असें ऐकून तुझ्याकडील योद्धे पांडव सेन्यावर धांऊन गेले. त्या कालीं धनुष्यबाण धारण केलेले कौरवांकडील योद्धे मोठ्या वेगानें आपल्या समीप आले. हें अर्जुनानें पाहून तो कृष्णास बोलला कीं, हे देवकीपुत्रा, आपल्या अश्वांस लौकर प्रेरणा करून कौरवसेन्यांत प्रवेश केला असतां शत्रूंच्या सेन्याचा आज निशित बाणें करून नाश करितों. युद्धास आरंभ होऊन आजचा अठरावा दिवस आहे. या कौरवांची सेना पूर्वी असंख्याक होती; परंतु ती सर्व क्षयास गेली. अवशिष्ट राहिलेली आज मी युद्धांत क्षयास नेलेली तूं पाहशील. हे माधवा, भीष्म मरण पावल्यावर पुढें आपलें कल्याण होईल किंवा नाहीं. या विषयीं धृतराष्ट्र पुत्रानें विचार कसा केला नाहीं? बरें, भीष्म युद्धांत नष्ट झाला तरी या मूर्खांनीं पुनः युद्धास आरंभ केला त्याजपेक्षां हे धृतराष्ट्राचे पुत्र सर्वथा बालिश आहेत. तसेंच, द्रोण, राधेय, विकर्ण हेही मरण पावले असतां या कौरवांनीं वैराची शांति केली नाहीं. ज्या दुर्योधनानें पांडवांशीं शम होण्या विषयीं तुझें वाक्य ऐकिलें नाहीं तो दुसऱ्याचें ऐकेल काय? ज्या दुर्योधनास शांतनव द्रोण व विदुर यांणीं कौरवांचा व आमचा शम असावा म्हणून बहुत हितावह भाषण केलें असतां त्या भाषणाचें प्रत्याख्यान केलें त्या दुर्योधनास दुसरें औषध काय करील? हे अच्युता, या दुर्योधनाच्या पहिल्या पासून चेष्टा व नीति आह्मांस राज्य न देण्याच्याच आहेत. महात्म्या विदुरानें पूर्वी असें सांगितलें कीं, दुर्योधन जीवंत आहे तों पर्यंत पांडवांस राज्यविभाग देणार नाहीं. युद्धा वांचून तो आपल्यास जिंकिला जाणार नाहीं; असें दूरदर्शी विदुरानें जें भाषण केलें तें आज माझ्या अनुभवास आलें. हा दुर्योधन ज्या कालीं उत्पन्न झाला

त्या काळीं सिद्ध पुरुषानीं बहुशः असें भाषण केलें होतें कीं, या दुर्योधना-मुळें सर्व क्षत्रियकुलें लयास पावतील. शिबिरें शून्य करून आज आमच्याशीं युद्धाची इच्छा करीत आहे. यास्तव हे माधवा, विदुराच्या वाक्यावरून व दुर्योधनाच्या वर्तणुकीवरून आज मी असें समजतों कीं, त्याचा अंतकाल आला आहे. यास्तव हे वीर श्रीकृष्णा, आपल्या रथाचे अश्व दुर्योधनाच्या सैन्याकडे ने. ह्मणजे त्याचा वध करून धर्मराजाचें क्षेम करितों. हें ऐकून श्रीकृष्णानें अश्वांच्या रश्मि घेऊन निर्भयपणें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. श्रीकृष्णानें ज्या काळीं पांडुरवर्ण अश्वांस प्रेरणा केली त्या काळीं ते अश्व अर्जुनातें वहन करीत सर्व दिशांस गमन करितात असें सर्व लोकांस दिसूं लागलें. त्या अर्जुनाच्या शराच्या योगें सकल लोक आच्छादित होऊन गेले. कांहीं बाण, मनुष्य, गज, अश्व यांचा नाश करून पतंगासारखे घोष करीत गेले. पार्थनामचिन्हित बाणानीं सर्व जगत् परिपूर्ण होऊन गेलें. अग्नी जसा वनामध्यें प्रविष्ट झाला असतां द्रुम व शुष्क लतादिकांस जाळून टाकतो तसें प्रतापी अर्जुनानें तुझ्या पुत्राचे सैनिक शराग्नीनें दग्ध करून टाकिले. व दुसरा एक बाण कौरवांचे सैन्यावर टाकिला असतां तो एक बाण अनेक रूपाकृति होऊन वज्रपाणी इंद्र जसा दैत्यांचा नाश करितो. तसा अर्जुनाच्या बाणानें कौरवांकडील सर्वांचा नाश केला. असा विषय या अध्यायांत आहे.

२५. अध्याय पंचविसावा:- संजय ह्मणतात हे राजा, युद्धाविषयीं तुझ्याकडील शूरांचे संकल्प अर्जुनानें व्यर्थ करून टाकिले. तुझ्या सैन्यावर वर्षाव करून किरीटीनें तें सैन्य वध्यमान केलें असतां तुझ्या पुत्रांसमक्ष तें पळून गेलें. कोणी योद्ध्यांचे बांधव नष्ट झाल्यामुळें ते आपल्या पित्यास व पुत्रांस ग्रहण करून मोठा आक्रोश करूं लागले. पार्थबाणानीं पीडित झालेल्या योद्ध्यांस इतर योद्ध्यानीं आपले रथांत बसवून एक मुहूर्त पर्यंत त्यास आश्वासन दिलें असतां ते विश्रांत व तृप्त होऊन पुनः युद्धार्थ प्रवृत्त झाले. कितीएक योद्धे रथ सज्ज करून पांडवांशीं युद्धार्थ प्रवृत्त झाले. कोणी योद्धे किंकिणीजालानीं आच्छन्न झाल्यामुळें परम शोभायमान दिसूं लागले. धृष्टद्युम्न, पांचाल, शिखंडि, व नकुलाचा पुत्र शतानिक हे योद्धे

कौरवांकडील योद्ध्यांशीं युद्ध करूं लागले असतां पांचाल, धृष्टद्युम्न आप त्या सैन्यासहवर्तमान तुझ्या पुत्राच्या सैन्यावर धांऊन आले. त्या काळीं धृष्टद्युम्नास तुझ्या पुत्रानीं पाहून बाणांची त्याजवर वृष्टि करून त्याच्या रथाचे अश्व मारिले. तेव्हां पांडवांच्या योद्ध्यानीं दुर्योधनाच्या रथाचे चारी अश्व मारून एक बाणानें त्याच्या सारथ्याचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. अशी कौरवांची सेना भग्न झाली असतां त्यांतील तीन सहस्र गजारोहानीं पांच पांडवांवर येऊन बाणानीं त्यास व्याप्त केलें असतां ते मेघानीं व्याप्त झालेल्या ग्रहा सारखे शोभूं लागले. त्या काळीं कृष्ण ज्याचा सारथी व श्वेत अश्व ज्याचे रथास जोडलेले अशा रथांत आरूढ झालेल्या अर्जुनानें त्या पर्वतोपम गजांवर बाणांची वृष्टि करून एक एक बाणानें महान महान् गजांचा नाश करून किती एक पृथ्वीवर पाडले. हें भीमसेनानें पाहतांच मोठी गदा घेऊन तो रथा खालीं उतरला असतां कौरवांकडील सैनिकानीं अंतका सारखा त्यास पाहून ते सर्व पळून गेले. तो गजसमुदाय नष्ट झालेला पाहून तुझ्याकडील सैनिक तर फारच त्रस्त झाले. अश्वत्थामा कृपाचार्य व कृतवर्मा हे त्रिवर्ग, दुर्योधन रथसमुदायांत कोठें दिसतनाहीं असें पाहून दुर्योधन मरण पावला असा निश्चय करून ते विवर्णवदन झाले. व इतर क्षत्रियांस प्रश्न करूं लागले कीं, दुर्योधन कोठें गेला असेल बरें? त्या काळीं त्या योद्ध्यांत कोणी असें ह्मणूं लागले कीं, दुर्योधनाचा सारथी नष्ट झाल्यामुळें तो शकुनीच्या सन्निध उभा आहे. कोणी असें भाषण करूं लागले कीं दुर्योधन असो किंवा नसो आपला जीव आहे तों पर्यंत युद्ध करूं आपण सर्व एकत्र झालों असतां आपल्यास दुर्योधन राजा कशास पाहिजे? आणि ते पुनः परस्पर भाषण करूं लागले कीं, पहा हे पांडव गज सैन्याचें मर्दन करून आपले सन्निध आले. आतां आपण सर्व मिळून त्यांच्या सैन्याचा भेद करूं. असें ऐकून अश्वत्थामा धृष्टद्युम्नाच्या सैन्याचा भेद करून कृपाचार्य व कृतवर्मा यांसहवर्तमान तो शकुनी जवळ आला. हें धृष्टद्युम्न प्रमुख पांडवानीं पाहून त्यांचा वध करण्याच्या इच्छेनें ते ही त्यांच्या जवळ आले. त्या काळीं मी बलानें व शक्तीनें जरी हीन होतों तथापि चार योद्धे व

रोबर घेऊन जेथें कृपाचार्य होता तेथें युद्धार्थ आलों. पुढें धृष्टद्युम्नानें आ ह्मांस जिंकिल्यामुळें आह्मीं पांच योद्धे रण टाकून पळालों. पुढें चारशें रथा रूढ योद्ध्यांसहवर्तमान सात्यकीस पाहिल्यावर धृष्टद्युम्नापासून जरी पळ न गेलों होतों तथापि सात्यकीशीं एक मुहूर्त अतिदारुण युद्ध केलें शेवटीं सात्यकीनें माझ्या भृत्यांचा वध करून मला जीवंत धरिला. त्यास एक मुहू र्त गेल्यावर भीमसेनानें आपल्या गदें करून व अर्जुनानें आपल्या बाणें करून, पर्वतप्राय पसरलेलें कौरवांचें गजसैन्य नष्ट करून टाकिलें. तेव्हां- भीमसेनानें आपले रथ जाण्या करितां मार्गांत पतन पावलेले गज एकीक डे ओढून टाकिले. नंतर अश्वत्थामा कृपाचार्य व कृतवर्मा हे योद्धे पांचाल भयानें पराङ्मुख झालेल्या दुर्योधनाचा, रथसमुदायामध्यें शोध करूं ला गले. असा विषय या अध्यायांत आहे.

२६. अध्याय सव्विसावा- संजय भाषण करितो. हे धृतराष्ट्र, भी मसेन कौरवांच्या गजसैन्याचा वध करून तेथें यथेच्छ संचार करूं लाग ला. त्या कालीं दुर्मर्षण, श्रुतांत, जैत्र, भूरिबल, रवि, जयत्सेन, सुजात, दुर्वि षह, दुर्विमोचन, दुःप्रधर्षण व श्रुतर्वा इतके अवशिष्ट राहिलेले तुझे पुत्र, दुर्योधन कोठें दिसत नाहीं. असें जाणून एकत्र होऊन भीमसेनावरचा लून, सर्व दिशांस रोध करूं लागले. त्या कालीं पुनः भीमसेनानें रथारूढ होऊन मर्मभेदक अशा निशित बाणांचा वर्षाव केला असतां ते तुझे- पुत्र पुनः विशकलित झाले. पुनः भीमसेनानें क्रूरप्र बाणानीं दुर्मर्षणाचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. त्याच प्रमाणें या सर्वांचीं शिरें तोडून पृथ्वीव र पाडलीं. या प्रकारें आपले भ्राते एकट्या भीमसेनानें युद्धामध्यें मारिले. त्या कालीं इंद्रानें जसा पूर्वी असुरांचा वध केला तसा भीमसेनानें त्या पां चशें रथ्यांचा, सातशें गजयोद्ध्यांचा, सात हजार पदात्यांचा, आठशें अश्व स्वारांचा वध केला असतां भीमससेन त्या सैन्यामध्यें अतिशय सुशोभि त दिसून धृतराष्ट्र पुत्रांच्या वधानें आज मी कृतार्थ झालों. व आज माझें जन्म सफल झालें असें त्यानें मानिलें. तेव्हां तुझे सैनिक भीमसेनास पा हण्यास. समर्थ झाले नाहींत. भीमसेनानें तुझ्या पुत्रांचा व सैन्याचा वध

करून गजांस त्रास उत्पन्न होण्या सारखा आपल्या बाहूंचा शब्द केला असतां तो ऐकून तुझ्याकडील अवशिष्ट राहिलेली सेना दीन झाली. असा विषय या अध्यायांत आहे.

२७. अध्याय सत्ताविसावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, दुर्योधन व सुदर्शन हे तुझे राहिलेले दोन पुत्र अश्वसमुदायामध्यें उभे असतां श्रीकृष्ण दुर्योधनास पाहून धनंजयास बोलतो कीं, हे अर्जुना, तूं बहुत शत्रु मारिलेस. सात्यकीनें संजयास धरून नेलें. इतर योद्ध्यांसहवर्तमान नकुल सहदेव युद्ध करून श्रांत झाले आहेत. आतां दुर्योधनास अनुसरून वर्तणारे कृपाचार्य व कृतवर्मा आणि अश्वत्थामा हे तिन्ही महारथि अवशिष्ट राहिले आहेत. आपल्याकडील धृष्टद्युम्न प्रभद्रकास बराबर घेऊन दुर्योधनाचें सर्व सैन्य मारून कसा शोभतो आहे. आतां दुर्योधन आपल्या सेनेचा व्यूह करून अश्वांच्या समुदायामध्यें उभा राहून आपल्यास वारंवार पहात आहे. याचा तूं आज तीक्ष्ण बाणानीं वध केलास ह्मणजे कृतकार्य झालास. तूं गजसैन्याचा नाश करून येथें प्राप्त झालास. हें कौरवांकडील सैनिकानीं पाहून ते जों काल पर्यंत पलायन करीत नाहींत तों काल पर्यंत सुयोधनाचा लोकर पराजय कर. धृष्टद्युम्नास आपल्या जवळ येण्या विषयीं कोणास तरी आव्हान करण्याकरितां पाठीव. तो श्रांतवाहन जरी जाहला असला तथापि या पापी दुर्योधनास सोडणार नाहीं. तुमचें सर्व सैन्य संग्रामा मध्यें मारून हा धृतराष्ट्रपुत्र सुयोधन आज मी पंडुसुत जिंकिले असें मानून तो मोठी मोठी धारण करून बसला आहे. तुमचें संपूर्ण सैन्य नष्ट झालें. असें पाहून व पांडवानीं मला बहुत पीडित केलें असें जाणून दुर्योधन आज निश्चयें करून तुम्हाशीं संग्राम करील. असें ऐकून अर्जुन बोलतो. हे माधवा, सर्व धृतराष्ट्राचे पुत्र भीमसेनानें मारिले. आतां अवशिष्ट दोन आहेत. तेही आज बहुत करून नाहिंसे होतील. भीष्म, द्रोण, कर्ण, मद्रराज शल्य, व जयद्रथ हे तर मरण पावले. आतां शकुनीचे पांचशें अश्वस्वार मात्र आहेत. तसेच दोनशें रथ शंभर गज तीन हजार पदाति इतकें सैन्य, अश्वत्थामा, कृपाचार्य, त्रिगर्ताधिपति सुशर्मा, उलूक शकुनि, कृतवर्मा हे इतके

कौरवांकडील राहिले आहेत. यांचाही कालें करून वध होईल. सर्व सैन्य मरण पावून हा दुर्योधन राहिला आहे. हा आज यमगृहीं जाईल. शत्रूकडील जो कोणी योद्धा रणाचा त्याग न करितां माझ्या सन्मुख युद्धार्थ उभा राहिलेला माझ्या हातून मुक्त होणार नाहीं. ज्या दुराचारी सौबलानें सभेमध्यें द्यूतसमयीं आमचीं रत्नें हरण केलीं त्या दुष्टाचा आज वध करून तीं सर्व रत्नें माघारीं आणूं. युद्धामध्यें पांडवानीं आपल्या पतींचा व पुत्रांचा वध केला हें हस्तनापुरस्थ स्त्रिया आज जाणतील. आजच युद्धरूप कर्म समाप्त होईल. हे कृष्णा संग्रामा पासून आज जर दुर्योधन पलायन करणार नाहीं तर तो आज श्रीचा व प्राणाचा त्याग करील. हें ऐकून श्रीकृष्णानें त्याच्या रथाच्या अश्वांस तत्काल प्रेरणा करून अर्जुन, भीमसेन व सहदेव हे तीन योद्धे सिंहनाद करीत दुर्योधनाच्या सैन्यामध्यें त्याचा वध करण्याच्या इच्छेनें गेले. ते योद्धे धनुष्यबाण घेऊन आलेले शकुनीनें पाहून तो त्यांजवर धांऊन गेला. तुझा पुत्र सुदर्शन भीमसेनाशीं, सुशर्मा व शकुनि हे अर्जुनासह वर्तमान, दुर्योधन सहदेवाशीं याप्रमाणें युद्ध करीत असतां दुर्योधनानें सहदेवाच्या शिरावर आघात करितांच सहदेव प्रासानें ताडित झाल्यामुळें मूर्छित पडला. आणि त्याचे शरीरांतून रक्ताच्या धारा निघून तो क्रुद्ध झालेल्या विषयुक्त सर्पासारखा श्वासोश्वास टाकूं लागला. नंतर कांहीं कालानें सावध होऊन दुर्योधनावर तीक्ष्ण बाणाची दृष्टि करूं लागला. धनंजयानें अश्वारोहाचीं शिरें कृंतन करून पृथ्वीवर पाडलीं. अर्जुनानें क्षुरप्र बाणें करून त्रिगर्ताच्या सत्यकर्मानामक योद्ध्याच्या रथाची ईशा छिन्न करून शिळेवर घांसलेल्या क्षुरप्रबाणानें तप्त कुंडलानें विभूषित असें त्याचें शीर सर्व योद्ध्यांसमक्ष खालीं पाडलें. व सुशर्म्यास वेध केला. नंतर दुसरें ही सुवर्ण विभूषित रथांत आरूढ होऊन प्राप्त झालेल्या त्रिगर्तास बाणानीं विद्ध करून मोठ्या क्रोधानें त्यांचें शीर तोडून पृथ्वीवर पाडलें. नंतर हांस्य करीत यमदंडोपम शर सुशर्म्यावर टाकिला असतां तो गतप्राण होऊन पृथ्वीवर पडला. त्या कालीं सुशर्मा मृत झाला हें तुझ्याकडील योद्ध्यानीं पाहून त्यास मोठें दुःख झालें. पांडवांस मोठा हर्ष झाला. नंतर अर्जुनानें सर्व कौरवांचे

पदाति नष्ट केले. पुढें राहिलेल्या सैन्यांत भीमसेनानें परम कोपानें प्रवेश करून तुझा पुत्र जो सुदर्शन याचें शीर पाडतांच तुमचे कांहीं पदाति भीमसेनास वेष्टन करून त्यांजवर बाणवृष्टि करूं लागले असतां भीमसेनानें त्या सर्वांचा नाश करून टाकिला. हें भीमसेनाचें कर्म सेनाध्यक्षांनीं पाहतांच ते भीमसेनावर बाण वर्षाव करूं लागले. भीमसेनही त्यांजवर बाणवर्षाव करूं लागला. या प्रकारें परस्पर ते एकमेकांवर बाणांचा वर्षाव करीत असतां पांडवांचे व कौरवांचे बहुत योद्धे व्याकुल होऊन परस्पर ताडित होऊन पृथ्वीवर पडले. हे धृतराष्ट्र राजा, त्या कालीं उभयतांचे सैनिक स्वबांधवांविषयीं शोक करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

२९. अध्याय अठ्ठाविसावा.- संजय भाषण करतो हे धृतराष्ट्र राजा, गज, वाजी व नर यांचा क्षय करणारा संग्राम झाला असतां शकुनि सहदेवावर धांऊन गेला. तेव्हां सहदेवानें शीघ्रगामि पतंगासारखे शरांचे वर्षाव केले. उलूकानें भीमास विद्ध करून सहदेवावर बाणांची वृष्टि केली. त्या कालीं ते शूर एकमेकांवर बाण टाकीत असतां पृथ्वी व्याप्त झाली. नंतर भीमसेन, सहदेव कौरवांकडील सैन्याचें कदन करूं लागले असतां उभयतांच्या शतशः बाणांनीं कौरवांचें सैन्य ताडित झालें. मृत झालेले योद्धे आपले नेत्र प्रसृत करून व दंतानीं ओष्ठपुट चर्वित करून एकमेकांवर धांऊं लागले. त्या योद्ध्यांचीं शिरें पृथ्वीवर पडल्यानें तीं आच्छादित होऊन गेलीं. हे धृतराष्ट्र राजा, तुमच्याकडील सैन्य पांडवांनीं यमलोकीं नेल्यामुळें बाकी थोडें राहिलें. त्या युद्धसमयीं कौरवेयानें सहदेवाच्या शिरावर शस्त्राचा प्रहार केला असतां तो रथोपस्थांत पडला. हें भीमसेनानें पाहून त्याचें निवारण केलें. तें सैन्य भग्न झालेलें दुर्योधनानें पाहून तो बोलला कीं, हे अधर्मज्ञ योद्धे हो, माघारे फिरून युद्ध करा. युद्धानें या लोकीं कीर्ति मिळवून परलोकाची प्राप्ती करून घ्या. असें दुर्योधनाचें भाषण शकुनीच्या पदात्यांनीं ऐकतांच ते पांडवसैन्यावर माघारे फिरले. तेव्हां पांडवही तत्काल माघारे फिरून विजयाच्या उद्देशानें त्यांजवर धांऊन गेले. सहदेवानें शकुनीस वेध करून त्यास पीडित केलें. त्या कालीं शकुनीनें धनुष्य घेऊन नकुलास वेध करून भीमसेनासही

वेध केला. भीमसेनानेंही शकुनीस वेध केला व तीन तीन बाणें करून पार्श्वस्थ अनुचरांस वेध करितांच त्यानीं शरवृष्टि करून सहदेवास आच्छादन केलें. त्याका ळीं सहदेवानें उलूकाचें शीर तोडून भूमीवर पाडलें तेव्हां त्यानें मोठा शब्द केला. पुत्र मरण पावला हें शकुनीनें पाहतांच तो श्वासोच्छ्वास टाकीत विदुराच्या वाक्या चें स्मरण करून एक मुहूर्त पर्यंत चिंताग्रस्त बसला. आणि सहदेवासन्निध ये ऊन त्यास वेध केला. त्या काळीं सहदेवानें शकुनीच्या शराचा नाश करून त्याचें धनुष्य छिन्न केलें असतां शकुनीनें महान् खड्ग धारण करून सहदेवावर टाकि ला. त्याचे सहदेवानें तुकडे केले. हें शकुनीनें पाहतांच मोठी एक गदा घेऊन स हदेवावर टाकिली. तीही व्यर्थ होऊन पृथ्वीवर पडली. नंतर शकुनीनें क्रुद्ध होऊ न कालरात्री सारखी शक्ती सहदेवावर टाकिली असतां सहदेवानें कनक वि- भूषित शरानीं त्या शक्तीचे तीन तुकडे करून टाकिले. हें तुझ्याकडील सैनिका नीं पाहतांच ते सौबलासह वर्तमान पळून गेले असतां सहदेवानें त्याजवर सहस्रावधि बाणांची वृष्टि केली. नंतर शकुनी आपल्यावर पुनः आलेला स हदेवानें पाहून हा आपला अवशिष्ट अंश राहिला आहे असें जाणून तो बोलला कीं, हे शकुनि क्षत्रधर्मामध्यें स्थिर होऊन युद्ध कर. हे मूढा, सभेमध्यें अक्षक्री डा करिते समयीं पण लाऊन हर्ष पावलास तो तूंच ना? त्या कर्माचें फल आतां काय होईल तें पहा. अरे ज्या धृतराष्ट्रपुत्रानीं पूर्वीं आमचा उपहास केला ते तर मरण पावले. त्यांतील एक दुर्योधनमात्र जीवंत राहिला आहे त्याचा तूं मातुल आहेस यास्तव यष्टीनें ताडित केलेलें जसें वृक्षाचें फळ पृथ्वीवर पतन पावतें तसें तुझें शिर खालीं पडेल. असें सहदेवानें भाषण करून त्याजवर धांऊन त्या च्या रथाचे अश्व मारिले. व धनुष्य तोडून सिंहासारखा नाद केला. सुबलपुत्र अतिक्रुद्ध होऊन प्रासनामक शस्त्रानें सहदेवाचा प्राण घेण्यास्तव परम त्वरेनें त्याजवर धांऊन जातांच सहदेवानें त्याचे भुज छेदून मोठा नाद केला. आणि भल्लाकार बाणानें शकुनीचें शिर तोडलें असतां त्याचें शिर तत्काल पृथ्वीव र पतन पावलें. हें तुझ्याकडील सैनिकानीं पाहतांच ते पळून गेले. शकुनि रथापासून पतन पावलेला पांडवानीं पाहतांच परम हर्षानें शंखनाद क रीत श्रीकृष्णास व आपले सैन्यास हर्षित केलें. शकुनि पडल्यावर पांडवांचे

सैनिक अति हर्षित होऊन सहदेवाचा सत्कार करून बोलले कीं, हे वीरा तूं दुष्टात्म्या शकुनीचा दैवें करून तत्काल वध केलास ही फारच चांगली गोष्ट झाली. असा विषय या अध्यायांत आहे.

२९. अध्याय एकुणतिसावा:- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, शकुनि मरण पावल्यावर त्याचे बरोबरचे पांडव सैन्यावर धांऊन जातांचस हदेवाचा जय होण्याकरितां अर्जुनानें त्यांजवर बाण वर्षाव केला. भीमसेनानें ही त्याच प्रमाणें केलें. अर्जुनानें त्या पदात्यांचे संकल्प नष्ट केले, तेव्हां ते आयुधें घेऊन पलायन करीत असतां त्यांचीं बाहु व शिरें भल्लाकार बाणांनीं छेदन करितांच ते गतजीव होऊन भूमीवर पतन पावले. या प्रकारें सकल वीर अर्जुनानें मारून टाकिले असतां दुर्योधन राजानें आपल्या सैन्याचा क्षय झालेला पाहून शेष राहिलेले कांहीं रथ, गज, स्वार व पदाति यास र्वांस एकत्र करून तो बोलला कीं, हे सैनिक हो, तुह्मीं सर्व एकत्र मिळून पांडवांवर व त्यांचे सुहृदांवर व सैन्यासहवर्तमान धृष्टद्युम्नावर लौकर जाऊन त्यांचा वध करून माघारे फिरा. अशी आज्ञा होतांच ते योद्धे पांडवांवर धांऊन गेले. हें पांडवानीं पाहून त्यांजवर बाणाची वृष्टि केली असतां ते योद्धे एका मुहूर्ता नंतर इकडे तिकडे धांऊं लागले. आणि पांडव सैन्यांतून कांहीं योद्ध्यानीं पुढें निघून एका मुहुर्तांत त्या आलेल्या कौरव सैन्याचा निःपात केला. हे राजा, तुझ्या पुत्राचें अकरा अक्षौहिणी सैन्य होतें तें पांडवानीं व सृंजयानीं मारून टाकिलें असतां त्यांतून एकटा तुझा पुत्र दुर्योधन मात्र माझ्या दृष्टीस पडला. पांडव मात्र परम हर्षित होऊन बाण सोडीत होते. त्या बाणांचा शब्द दुर्योधनानें ऐकून त्यास मोठा मोह झाला; आणि तो सैन्यानीं व वाहनानीं हीन झाल्यामुळें त्यानें रणापासून पलायन करण्याचा निश्चय केला. असें संजयाचें भाषण श्रवण करून धृतराष्ट्र प्रश्न करितो. हे संजया, कौरवांचें सैन्य नष्ट झालें व आमच्याकडील योद्ध्यांचीं शिबिरें नष्ट झालीं असतां पांडवांचें अवशिष्ट सैन्य किती राहिलें होतें? व दुर्योधनाचें सकल सैन्य नष्ट झाल्यावर त्यानें पुढें काय केलें? असें ऐकून तो बोलतो हे राजा, दोन हजार सातशें गज, पांच हजार अश्व, दहा हजार पायदळ इतक्या पांडवांच्या राहिलेल्या सैन्यास घे-

ऊन धृष्टद्युम्न रणामध्यें उभा होता. पृथ्वीपति दुर्योधन आपल्या सर्व सैन्या चा क्षय झाल्यामुळें पदाति झाला. आणि गदा घेऊन ऱ्हदांत प्रवेश करण्याच्या इच्छेनें पूर्वेस मुख करून जात असतां तो फार दूर न जातां मार्गांत विदुराच्या वाक्याचें स्मरण करून क्षत्रियांचें अंत करणारें असें भयंकर कर्म पुढें होणार हें पूर्वीं महाप्राज्ञ विदुरानें कथन केलेंच होतें. त्या वाक्याचें मनामध्यें चिंतन करीत स्वसैन्याचा क्षय झाल्यामुळें दुःखानें संतप्त ऱ्हदय होऊन ऱ्हदांत प्रवेश करण्या करितां निघाला. इकडे धृष्टद्युम्न प्रभृति पांडवांकडील योद्धे राहि लेल्या तुझ्या सैन्यावर धांऊन गेले. अर्जुनानें त्या सेन्याचा संकल्प व्यर्थ क रून अमात्य व बंधूंसहवर्तमान त्यांचा वध केल्या नंतर तो रणभूमीचे ठायीं अत्यंत सुशोभित दिसूं लागला. हे राजा, शकुनि आपल्या पुत्र व सेन्य यांस हवर्तमान मरण पावल्यावर तुझें सेन्य छिन्न झालेल्या महावनासारखें दि सूं लागलें. दुर्योधनाकडे सहस्रावधि रथी होते, परंतु द्रोणपुत्र, कृतवर्मा, कृ पाचार्य व तुझा पुत्र दुर्योधन या चौघां खेरीज कोणी जीवंत माझ्या दृष्टी स पडले नाहींत. सात्यकीनें मला ग्रहण केलेला धृष्टद्युम्नानें पाहून तो त्या स बोलतो. हे सात्यकी तूं यास कशाकरितां धरिलेंस? असें धृष्टद्युम्नाचें भा षण सात्यकीनें श्रवण केल्यावर तो खड्ग उचलून मला मारण्यास प्रवृत्त झा ला असतां तितक्यांत कृष्णद्वैपायन व्यास तेथें येऊन सात्यकीस बोलले कीं, अरे, या संजयास जीवंत सोडा. याचा वध करूं नका. असें ऐकून हे संजया, तुला मी सोडला. आतां तूं सुखानें जा. असें ऐकून मी सायंकाळीं नगराकडे जाण्यास निघालों असतां तेथून एक कोश येतांच हस्तामध्यें गदा धारण के लेल्या अशा दुर्योधनास पाहिलें. तेव्हां माझे नेत्र अश्रूंनीं पूर्ण झाले. मी दीन असल्यानें दुर्योधन मजकडे पाहून एक मुहूर्तपर्यंत माझ्याशीं बोलण्यास स मर्थ झाला नाहीं. नंतर सात्यकीनें मला धरलें असतां व्यासप्रसादानें मी जीवंत झालों. हें वर्तमान मी सांगितल्यावर तो एक मुहूर्त चिंताग्रस्त झाला. पुढें आपल्या भ्रात्यांचें व सैन्याचें वर्तमान मला विचारूं लागला. त्या कालीं मीं प्रत्यक्ष दर्शी असल्यामुळें झालेलें वर्तमान त्यास निवेदन केलें कीं, तुझे स कल भ्राते व सैन्य नष्ट झालें. तुझ्याकडील महापराक्रमी तीन महारथी अ

व शिष्ट राहिले आहेत. हें वर्तमान सात्यकीनें मला मुक्त केल्यावर व्यासानींम ला सांगितलेलें तुला सांगितलें असें ऐकतांच तो मजकडे पाहून हस्तानें मला स्पर्श करून बोलला कीं, हे संजया, तुझ्याशिवाय या संग्रामामध्यें आपल्या कडील जीवंत राहिलेला कोणी माझ्या पाहण्यांत येत नाहीं. पांडव मात्र स साह्य माझ्या दृष्टीस पडतात. असें बोलल्यावर पुनः बोलला कीं, हे संजया, धृतराष्ट्र राजास सांग कीं, दुर्योधन, सुहृद, भ्राते, व सैन्य यांणीं हीन झाल्या मुळें तो ऱ्हदांत प्रवेश करीत आहे. पांडवानीं राज्य हरण केलें; तस्मात् मा झ्या सारखा कसा जीवंत राहील असें बोलून त्यानें ऱ्हदामध्यें प्रवेश केला आणि मी तेथून निघालों. येतां येतां कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा हे तीन महा रथी शरानीं व्याप्त झालेले एकस्थलावर उभे राहिले होते. त्यास मी पाहून तिकडे जाण्याची इच्छा करीत होतों. तों त्रिवर्गानीं मला पाहतांच मजजवळ येऊन ते बोलले कीं, हे संजया तूं आपल्या दैवानें आज वांचलास. आपला रा जा दुर्योधन कोठें आहे? असें ऐकून मी दुर्योधनाचें संपूर्ण भाषण व त्याणें ऱ्हदांत प्रवेश केला हें वर्तमान त्यांस सांगितलें. तें अश्वत्थाम्यानें ऐकून व ऱ्हद विपुल जलानें पूर्ण आहे असें पाहून बोलला कीं, काय हो! या दुर्योध न राजाच्या कृत्यास धिक्कार असो. अरे आम्ही त्रिवर्ग रथी शत्रूशीं अद्याप युद्ध करण्यास पर्याप्त आहोंत. या प्रकारें त्या त्रिवर्गानीं विलाप केल्यावर रणामध्यें पांडवांस पाहून ते त्यांजवर धांऊन गेले. आम्ही रणभूमीवर जा तांच सूर्यास्त समयीं तुझ्या पुत्रांचा क्षय झाल्यामुळें तुमच्याकडील सैनि क अतित्रस्त होऊन आक्रोश करीत होते. नंतर राजस्त्रियांचें संरक्षणार्थ जे वृद्ध वृद्ध पुरुष होते ते राजस्त्रियांस घेऊन हस्तनापुरीं येण्यास निघाले असतां मार्गामध्यें मोठ्यानीं त्या आक्रोश करूं लागल्या. तेव्हां दुर्योधनाचे अमात्य तेथें येऊन त्या स्त्रियांस नगरांत घेऊन गेले. ज्या स्त्रियांनीं पूर्वी आपल्या गृहांतही सूर्यास पाहिलें नाहीं त्या सकुमार स्त्रिया. हस्तनापुरां त प्रवेश काली सर्वांच्या पाहण्यांत आल्या. भीमसेनाच्या भयानें सर्व लो क नगरांत पळून आले. तेव्हां युयुत्सु अशी चिंता करूं लागला कीं माझा भ्राता अकरा अक्षौहिणींचा स्वामी असतां पांडवानीं त्यास युद्धांत जिंकिलें

व त्याचे सर्व भ्राते, भीष्म, द्रोण प्रभृति मोठे मोठे योद्धे व सर्व कौरवयाचा ही त्याणीं वध केला. कांहीं एक भाग्य योगानें मी मात्र मुक्त झालों. हे दुर्योधनाचे राहिलेले सचिव राजस्त्रियांस घेऊन नगरांत जात आहेत त्यां जबराबरच आपण जावें. असा विचार करून तो विचार युधिष्ठिरास व भीमसेनास सांगितला असतां युधिष्ठिरानें प्रीतीनें जाण्या विषयीं आज्ञा दिली. नंतर युयुत्सु राजस्त्रिया बरोबर घेऊन नगरांत गेला. शोकानें नष्टचित्त झालेला विदुर धृतराष्ट्रा पासून निघून जात असतां तो युयुत्सूचे दृष्टीस पडतांच त्याचे नेत्र जलानें पूर्ण झाले. आणि तो विदुराचे अग्रभागीं जाऊन उभा राहिला असतां विदुर त्यास बोलला कीं हे पुत्रा, या कुरुवंशक्षय प्रसंगीं तूं आपल्या दैवानें वांचलास, धर्मराजास सोडून एकाकी येथें आलास याचें कारण काय? असें विदुराचें भाषण ऐकून युयुत्सु बोलतो आपल्या ज्ञाति व सुनबांधवांस हे वर्तमान शकुनि मरण पावला. दुर्योधन राजाचा सर्व परिवार नष्ट झाल्या मुळें त्यानें भयानें पलायन केलें. दुर्योधन पळाला हें पाहून सर्व लोक भयानें हस्तनापुरीं आले. हें पाहून मी कौरवांकडील पलायन करणाऱ्या लोकांच्या संरक्षणार्थ आलों. असें युयुत्सूचें वाक्य ऐकून विदुर बोलला कीं, हे पुत्रा, सर्व भरतांच्या क्षयाचा कालच आला आहे. आतां तूं दैवानें नष्ट झालेला जो धृतराष्ट्र यास सर्व दुःखा पासून मुक्त कर. आज तूं येथें राहून उदयीक युधिष्ठिराकडे जा. असें बोलून विदुर राजगृहीं जाण्यास निघाला. युयुत्सु एकरात्र स्वगृहीं राहिला. युयुत्सूच्या स्वजनानीं जरी त्यास आनंद होण्याविषयीं यत्न केला तथापि भारतांनीं एकमेकांचा परस्पर तीव्रक्षय केल्याचें चिंतन करीत असल्यामुळें त्यास कोणत्याही प्रकारें हर्ष झाला नाहीं. असा विषय या अध्यायांत आहे. इति महाभारतांतर्गत शल्यपर्व समाप्तम्. श्रीसांब.



३०. अध्याय तिसावा:—धृतराष्ट्र ह्मणतो हे संजया, पांडवांनीं माझ्या पुत्रांचें सर्व सैन्य मारिल्यावर अवशिष्ट राहिलेले कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा व मंदबुद्धि दुर्योधन यानीं काय केलें तें मला सांग. असें ऐकून संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा, मरण पावलेल्या शूरांच्या स्त्रियांचें रुदन व जय पावलेल्या पांडवानीं केलेला सिंहनाद ऐकून दुर्योधन द्वैपायन डोहांत गेला. नंतर पांडवानीं तुझ्या पुत्रास जिंकण्याची इच्छा धरून त्याचा बहुत शोध केला; परंतु शोध लागला नाहीं, म्हणून आपल्या शिबिरांत जाऊन त्यानीं त्याच्या शोधार्थ रणांत कांहीं लोक पाठविले. पांडव रणांतून गेल्यावर अश्वत्थामा, कृपाचार्य इत्यादिक त्या डोहांत जाऊन दुर्योधनास बोलतात कीं, ऊठ आतां आमच्या साह्यानें धर्माशीं युद्ध कर. जर तूं धर्मास जिंकिलेंस तर सर्व पृथ्वीचे राज्याचा उपभोग घे, हत झालास तर स्वर्गीं जा. असें ऐकून दुर्योधन ह्मणतो हे कृपाचार्य, हे कृतवर्मा, तुह्मीं युद्धांत फार श्रम पावलां आहांत व मलाही फार श्रम झाले आहेत व पांडवांचें बल फार आहे ह्मणून त्यांशीं युद्ध करणें मला रुचत नाहीं; परंतु आपण त्यांशीं निःसंशय उद्यां युद्ध करूं. असें ऐकून अश्वत्थामा ह्मणतो हे दुर्योधना, मी तुला सत्य शपथ वाहून सांगतों कीं, उद्यां पांडवांचा रणांत वध करीन. त्या प्रमाणें पांचालांचाही नाश करीन. जर न केला तर युद्धामध्यें निष्कवच होईन. हें भाषण कित्येक पारधी त्या डोहावर जलपानार्थ आले होते त्यानीं ऐकून त्यांस स्मरण झालें कीं, जो दुर्योधनाचा शोध लावील त्यास बहुत द्रव्य देईन असा धर्मानें निश्चय केला आहे तेव्हां तेथून निघून हें वर्तमान त्यानीं भीमास कळविलें. नंतर भीमानें धर्मराजास सांगितलें तेव्हां धर्मराज आनंदित होऊन बोलला हे भीमा, गदा घेऊन तूं कृष्णास पुढारी करून तेथें जा. त्या प्रमाणें सैन्यासह भीमसेन निघाला. त्यामध्यें अर्जुन, नकुल, सहदेव, धर्म, धृष्टद्युम्न असे बहुत योद्धे होते. सैन्याचे मेघगर्जने प्रमाणें शब्द ऐकून दुर्योधन भयानें डोहांत पुष्कळ खोल जाऊन बसला. तेव्हां कृपप्रभृति सर्व शोकाक्रांत झाले आणि एका वटवृक्षाखालीं

दुर्योधन सांपडेल कीं काय? अशी चिंता करीत बसले.असा विषय या अध्यायांत आहे.

३१. अध्याय एकतीस:- संजय सांगतो हे धृतराष्ट्र राजा, पांडव जेथें दुर्योधन होता त्या डोहाजवळ आल्यावर धर्मराज कृष्णास भाषण करितो कीं हे कृष्णा, पहा या दुर्योधनाची काय माया आहे!! हा अगदीं निर्भय होऊन जलांत शयन करीत आहे. हा जरी उदकांत राहिला आहे तथापि यास आह्मीं मारूं, हें लोक पाहतील. असें ऐकून कृष्ण ह्मणतो हे धर्मा, हा मायावी आहे ह्मणून यास मायेनें मारावें. पहा वामनानें मोठ्या युक्तीनें बलीचें राज्य हरण केलें. हिरण्यकशिपूला विष्णूनें नृसिंह अवतार घेऊन मोठ्या युक्तीनें मारला. त्याच प्रमाणें विष्णूनें रामअवतार धारण करून सर्व दैत्यांस ह युक्तीनें रावणाचा नाश केला. यास्तव यास युक्तीनेंच मारावें.असें ऐकून धर्मराज दुर्योधनास ह्मणतो कीं, अरे सर्व क्षत्रिय व कुल यांचा नाश करून आपण वांचावें अशा आशेनें जलांत गेलास काय? अरे, तो तुझा मान, गर्व हे कोठें गेले? ऊठ लवकर आणि निर्भय होऊन आमच्याशीं युद्ध कर. असें धर्माचें भाषण ऐकून दुर्योधनानें जलांतूनच उत्तर दिलें कीं, हे धर्मा, तूं मला उगीच दोष देऊन कोणीभयानें येथें राहिलो आहें असें तूं समजूं नको, मला श्रम जाहला आहे यामुळें विसावा घेण्यास येथें राहिलों. व तुह्मींही विसावा घ्या म्हणजे मी सर्वांशीं युद्ध करितों. असें ऐकून धर्म बोलतो हे दुर्योधना, आह्मीं तुझा बहुत शोध केला पण तूं कोठेंही सांपडला नाहींस असो. आतां आह्मांशीं युध कर व आह्मांस जिंकून सर्व राज्याचा उपभोग घे. जर हत जाहलास तर वीरलोकीं जाशील. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे धर्मा, मला राज्याची इच्छा नाहीं. तूंच सकल राजानीं हीन झालेल्या पृथ्वीचा उपभोग घे. ज्यां करितां मीं राज्याची इच्छा केली ते मरून गेले आतां तुला जिंकून वनांत जाण्याची इच्छा करितों. असें दुर्योधनाचें दीन वाक्य ऐकून धर्मराज ह्मणतो हे दुर्योधना, ही तूं दिलेली पृथ्वी मला नको. तुला जिंकून मी या पृथ्वीचा उपभोग घेईन? अरे मी धर्मास सुईच्या अग्रा इतकी देखील पृथ्वी देणार नाहीं, असें बोलणारा तूं सगळी पृथ्वी मला कशी देतोस! तूं आमच्या वधार्थ काय काय उपा

य केलेस? आह्मांवर विषप्रयोग तर केलास. कपटानें राज्य हरण केलेंस, सभे मध्यें द्रौपदीस निंद्य भाषणें करून शेवटीं तिची निर्भर्त्सना केलीस अशीं तूं नाना प्रकारचीं पातकें केलीं आहेस म्हणून तूं शासनास योग्य आहेस. अरे माझ्याशीं युद्ध कर ह्मणजे तुझें कल्याण होईल. असा विषय या अध्यायांत आहे.

३२. अध्याय बत्तीसः— धृतराष्ट्र बोलतो हे संजया, धर्मानें माझ्या पुत्रास अशा वाक्बाणानें ताडण केल्यावर त्यानें धर्मास काय उत्तर दिलें? असें ऐकून संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, धर्मराजाचीं कटुभाषणें ऐकून तुझा पुत्र क्रोधानें बोलला हे धर्मा, तुजपाशीं सैन्य, रथ, वाहनें इत्यादि सर्व आहे; परंतु मजपाशीं रथ नाहीं सैन्य नाहीं मी एकटा आहें ह्मणून तुह्मां इतक्यांबरोबर माझें एकट्याचें काय चालणार? हे धर्मा, तुह्मांस युद्ध करावयाचें असल्यास एकेकट्यानें यावें. कारण एका बरोबर बहुतानीं युद्ध करावें, हा अन्याय आहे. माझी दशा काय झाली आहे ती पहा. मी कवचादिकानीं हीन जरी आहें तथापि क्रुद्ध होऊन तुह्मां सर्वांचा नाश करीन आणि माझे करितां ज्याणीं युद्धांत देखील आपले प्राण दिले अशा बाल्हिकप्रभृतिवीरांच्या ऋणापासून मुक्त होईन. असें बोलून तो स्वस्थ बसला तेव्हां धर्मराज बोलला हे दुर्योधना, तूं दैववान आहेस ह्मणूनच क्षात्रधर्म जाणतोस. अरे जर तूं एकटा आह्मांसवीशीं युद्ध करण्याची इच्छा करीत असलास तर आह्मांतून तुजबरोबर एकटा युद्ध करील. बाकीचे आह्मी तुझा पराक्रम पहात उभे राहूं. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे धर्मा, गदायुद्धांत मी इतका प्रवीण आहें कीं साक्षात् इंद्र जरी समोर आला तथापि त्यास देखील जिंकीन. मग तुमची कथा काय? असें ऐकून धर्मराज बोलतो, हे दुर्योधना, ऊठ, ऊठ, चल ये. कर माझ्याशीं युद्ध. आह्मी तुझ्यासमोर एकेक येतों. असें ऐकून दुर्योधन श्वासोच्छ्वास टाकीत गदा घेऊन बाहेर आला. तेव्हां पांचाल व पांडव यानीं एकमेकांच्या हातावर हात दिला. तेव्हां पांडवानीं आपला उपहास केला हें जाणून दुर्योधन पांडवांवर गेला. आणि त्यांस ह्मणाला हे पांडव हो, या उपहासाचें फल भोगाल. आतां माझ्याशीं युद्ध करण्यास एकेकट्या

असें ऐकून धर्म भाषण करितो- हे दुर्योधना, माझा बाल अभिमन्यु यास तुह्मीं सर्वांनीं कसारे मारिलात? त्या वेळेस हें तुझें ब्रह्मज्ञान कोठें गेलें होतें? असो. काय तुला कवच पाहिजे? हें घे कवच- असें ह्मणतांच दुर्योधन कवच घेऊन बोलला हे पांडव हो, गदायुद्धांत न्यायानें माझी बरोबरी करणारा कोणी नाहीं. या गदेच्या योगानें तुह्मां सर्वांस यमसदनीं पाठवीन- असें गर्वाचें भाषण आपणास योग्य नाहीं; परंतु आतां जें बोललों तें खरें करीन अथवा या वेळेवर माझें भाषण सत्य किंवा मिथ्या कसें घडेल तें घडो; परंतु आज कोण मज बरोबर युद्ध करणार त्यानें गदा घ्यावी- असा विषय या अध्यायांत आहे.

३३. अध्याय तेहतीस – संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र राजा, असा दुर्योधन गर्जना करीत असतां कृष्ण धर्मावर क्रुद्ध होऊन भाषण करतात हे धर्मा, अरे हें साहस काय केलेंस? जर करितां तो तुजशीं, नकुलाशीं, सहदेवाशीं अथवा अर्जुनाशीं युद्ध करतों असें ह्मणेल तर तुमचें त्या पुढें काय चालणार? मला वाटतें यानें गदा घेतल्यावर देवही यास जिंकण्यास समर्थ नाहींत मग तुमची कथा काय? अरे कुंतीच्या संततीनें जन्मभर वनवास भोगावाना? अथवा भिक्षा मागावी- ह्मणूनच तूं असें बोललास- असें ऐकून भीम ह्मणतो हे कृष्णा, खेद करूं नकोस या दुर्योधनास मारून आज मी वैराचा शेवट करतों. आतां धर्मराज खचित विजयी होईल. या दुर्योधनास युद्धांत गदेनें पाडण्याची मला फार होस आहे. फार काय पण जरी तीन लोक माझ्याशीं शस्त्रास्त्रें घेऊन युद्धास आले तरी त्या सर्वांस मी यमसदनीं पाठवीन- मग याची कथा काय? असें ऐकून कृष्णानें त्याची पूजा करून भाषण केलें. हे भीमा, तुझ्या आश्रयानें धर्मास हे दिवस दृष्टीस पडले. तूं युद्धांत हजारों राजे व नव्याण्णव धृतराष्ट्राचे पुत्र मारिलेस आतां दुर्योधनासही मारून ही पृथ्वी धर्मराजाच्या स्वाधीन कर- तूं दुर्योधनाचे मांडीचा भेद करून आपले प्रतिज्ञेचें पालन करशील यांत संशय नाहीं. त्याशीं जपून युद्ध कर; कारण तो अत्यंत पराक्रमी आहे. असें ऐकून भीम बोलतो हे धर्मा, तुझ्या हृदयास शल्याप्रमाणें टोंचणारा जो दुर्योधन त्याचा वध मी आतां करून कीर्तीरूप माला तुला अर्पण करतों. आपला पुत्र मेला असें ऐकून धृतराष्ट्रास केलेल्या कर्मा

चा पश्चात्ताप होईल. असें बोलून भीम हातांत गदा घेऊन उठला. हें पाहून दुर्यो धनही निर्भय होऊन उठला तेव्हां भीम म्हणतो हे दुर्योधना, तूं व धृतराष्ट्रानें काय काय कर्मे केलीं त्यांची आठवण कर. तूं द्रौपदीचा सभेमध्यें छल केलास, कपटानें आमचें राज्य हरण केलेंस. या तुझ्या निमित्तानें भीष्म, द्रोण, तुझे बंधु इत्यादि सर्व रणांत पडले आहेत. आतां तूं एकटा सर्व कुलाचा नाशक राहिला आहेस त्या तुला आज मी मारितों, यांत संशय नाहीं. आज तुझ्या त्या गर्वाचा व राज्याच्या आशेचा भंग झाला असें समज. असें ऐकून दुर्योधन ह्मणतो हे भीमा, वल्गना पुरे कर. काय तुझ्यांत बल आहे तें मला दाखीव. असें ऐकून संजयासहित पांडव दुर्योधनाचे वचनाचा सत्कार करून त्यास हर्षित करीत असतां हत्ती व घोडे गर्जना करूं लागले. व तशींच पांडवांचीं शस्त्रें प्रदीप्त झालीं. असा विषय या अध्यायांत आहे.

३४. अध्याय चवतीस:- संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र, दुर्योधनाचें व भीमसेनाचें युद्ध चाललें आहे हें ऐकून बलराम तेथें आला. तेव्हां दुर्योधन व भीम यानीं त्याचें पूजन करून युद्ध पाहण्यास सांगितलें. नंतर सात्यकी व कृष्ण यानीं बलरामाची पूजा केली. बलरामानें त्या सर्वांस कुशल प्रश्न केला. असा विषय या अध्यायांत आहे.

३५. अध्याय पस्तीस:- जनमेजय ह्मणतो हे वैशंपायन ऋषे, कौरव व पांडव यांचें युद्ध उपस्थित झालें असतां मी कोणास साहाय्य करणार नाहीं असें कृष्णाशीं बोलून बलराम यात्रेस गेला. त्यानें पुनः येऊन युद्ध कसें पाहिलें हें वर्तमान मला सांगा. असें ऐकून वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, उपप्लव्य नगरांत पांडव असतां त्यानीं सर्व प्राण्यांचे हितार्थ कृष्णास हस्तिनापुरीं धृतराष्ट्राजवळ पाठविला. नंतर कृष्णानीं हितकारक भाषण केलें असतां तें धृतराष्ट्रानें ऐकिलें नाहीं ह्मणून पुनः कृष्ण उपप्लव्य नगरीं आले. नंतर संधि न झाल्यामुळें कृष्ण पांडवांस बोलले हे पांडव हो, कौरव माझें ऐकत नाहींत; यास्तव पुष्य नक्षत्रावर माझ्या बरोबर युद्धास चला. तेव्हां बलराम ह्मणतो हे कृष्णा, कौरवांसही साहाय्य कर. तें त्याचें वचन कृष्णानीं न ऐकिल्यामुळें बलराम रागानें तीर्थयात्रेस गेला. तेव्हां कृतवर्मा अनुराधा नक्ष

त्यावर यादवांस घेऊन दुर्योधनाकडे गेला. बलराम गेल्यावर कृष्ण पांडवांस घेऊन युद्धार्थ कौरवांकडे गेला. तेव्हां बलराम मार्गांत आपल्या दासांस बोलला कीं द्वारकेंत जाऊन तीर्थयात्रेचें सर्व साहित्य व ऋत्विज इत्यादिकांस घेऊन या. असें ह्मणून सरस्वती तीरीं बलराम गेले. तेव्हां बलरामाच्या आज्ञेनें त्याचे दास जागोजाग ब्राह्मणांस इच्छाभोजनादिक देऊं लागले. त्या वेळेस तो मार्ग स्वर्गासारखा सर्व मनुष्यांस सुखावह जाहला आणि बलरामानें सरस्वती तीर्थी ब्राह्मणांस बहुत वित्त दिलें. असें ऐकून जनमेजय बोलतात हे वैशंपायन ऋषे, सरस्वतीच्या तीर्थाची उत्पत्ति व फल मला सांगा. असें ऐकून वैशंपायन बोलतात हे जनमेजया, क्षयरोगानें कृश जाहलेला चंद्र जेथें क्षयापासून मुक्त जाहला त्या प्रभासक्षेत्रीं ऋत्विज व ब्राह्मण यांसहित बलराम गेले. असें ऐकून जनमेजय बोलतो हे ऋषे, चंद्रास क्षय कसा प्राप्त जाहला? तो प्रभासक्षेत्रीं स्नान करून कसा मुक्त जाहला? असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, दक्षप्रजापतीनीं आपल्या नक्षत्रनामक सत्तावीस कन्या चंद्रास दिल्या तेव्हां चंद्र रोहिणीची रूपसंपत्ति विशेष पाहून तिच्यावरच प्रीति करूं लागला. तेव्हां बाकीच्या स्त्रियानीं दक्षास जाऊन सांगितलें कीं, चंद्र आमचें सेवन न करितां रोहिणीचेंच निरंतर सेवन करतो. यास्तव आह्मीं तुजजवळच तप करीत राहतों. असें ऐकून दक्ष चंद्रास बोलला तूं सर्व स्त्रियांशीं समान वर्तन करावेंस आणि त्या कन्यांस बोलला तुह्मीं चंद्राजवळ जावें आतां तो तुह्मांसीं समान वागेल. असें ऐकतांच त्या चंद्राकडे गेल्या. तेव्हां चंद्र पहिल्या प्रमाणेंच वर्तन करतो असें पाहून त्यानीं पुनः दक्षाकडे जाऊन सांगितलें कीं, चंद्र तुमचें वचन न मानून आह्मांशीं स्नेह इच्छित नाहीं. असें ऐकतांच दक्षानें क्रुद्ध होऊन चंद्रास शाप दिला कीं, तूं क्षयरोगानें दिवसानुदिवस क्षीण होशील. असें ऐकतांच चंद्र क्षीण होत चालला. तेव्हां त्यानें क्षय मुक्त व्हावें या विषयीं बहुत यत्न केला तथापि तो मुक्त जाहला नाहीं, तेव्हां संपूर्ण औषधी व प्राणी यांचा क्षय होत चालला. हें पाहून देव चंद्राकडे येऊन ह्मणाले कीं तुझें रूप प्रकाशित कां होत नाहीं व तुला कोणापासून भय झालें तें सांग. असें ऐकून चंद्रानें आपला सर्व वृत्तांत सांगितला तो ऐकून देव

दक्षास ह्मणाले हा चंद्र क्षीण जाहल्या या मुळें सर्व औषधी व प्रजा क्षीण झाल्या यास्तव चंद्रावर प्रसाद करण्यास तूं योग्य आहेस. असें ऐकतांच दक्षप्रजापति बोलला हें माझें वचन फिरविण्यास कोणी समर्थ नाहीं; परंतु कांहीं कारणानें माझें वचन निवृत्त होईल. तें असें कीं, या चंद्रानें सर्व स्त्रियांशीं समान वर्तन करावें व सरस्वतीच्या तीर्थी स्नान करावें ह्मणजे हा एक पक्षांत क्षय च एक पक्षांत वृद्धि पावेल. त्यानें पश्चिम समुद्रीं सरस्वती व समुद्र यांच्या संगमीं स्नान करून देवाचें आराधन करावें, ह्मणजे हा कांति पावेल. असें ऐकतांच चंद्रानें सरस्वती तीरीं प्रभास क्षेत्रीं अमावास्येस स्नान केलें तेव्हां तो उत्तम तेज पावला. त्या समयीं दक्ष चंद्रास ह्मणाला. हे चंद्रा, आजपासून स्त्रिया व ब्राह्मण यांचा अवमान करूं नकोस. आतां आपल्या स्थानीं जा. असें ऐकतांच चंद्र आपलेस्थानीं गेला. त्या प्रभास क्षेत्रीं बलरामानीं जाऊन स्नान व दान इत्यादिक केलीं. तेथून चमसोद्भेद तीर्थी जाऊन स्नानादिक करून एक रात्र वास केला. नंतर तेथून ते उदपान तीर्थी गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

३६. अध्याय छत्तीस- वैशंपायन ह्मणतात हे जनमेजया, मागें सांगितलेलें उदपान तीर्थ (कूप) त्रितनामकऋषीचें होतें तेथें बलरामानें ब्राह्मणांस बहुत धन दान केलें. त्या तीर्थी त्रितानें सोम पान केलें. तेव्हां त्याचे दोन बंधु त्यास कूपांत टाकून गृहीं गेले तेव्हां त्रितानें त्यांस शाप दिला. असें ऐकून जनमेजय ह्मणतो हे वैशंपायन ऋषे, तो कूप कसा होता व त्यांत त्रितास त्याच्या बंधूनीं कसा टाकिला? व त्रितानें सोमपान कसें केलें हें मला सांगा असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पूर्व युगीं एकत, द्वित आणि त्रित असे तीन बंधु होते त्यानीं तपानें ब्रह्मलोक जिंकिला. त्यांच्या तपानें पिता गौतम संतोष पावून आपणास योग्य अशा स्थानीं गेला. तेव्हां तो ज्यांच्या घरीं यजनादिक कर्में करवी ते राजे त्याच्या पुत्रांचें पूजन करूं लागले त्यांत त्रित हा पित्यासमान अध्ययनादिक कर्मानें श्रेष्ठ होता. त्यास एकत, द्वित या उभयतानीं घेऊन यजमानाच्या घरीं जावें आणि यज्ञ करवून प्रतिपत्रूस दक्षिणार्थ गाई प्राप्त कराव्या असें मनांत आणून ते प्राची दिशेस गेले. तेव्हां त्रित हर्षानें पुढें जाऊन गाई मिळवूं लागला ते समयीं एकत, द्वित त्या उभयतानीं पापबुद्धीनें भाषण केलें. कीं,

आपणा वांचून त्या वृतास. त्या गाई कशा मिळाल्या आणि हा त्रित यज्ञवदें द यांत कुशल असल्या मुळें दुसऱ्या असंख्यात गायी मिळवील तर आपण त्या आतां गाई घेऊन जाऊं. आपल्या वांचून त्रितही यथेच्छ जावो. असे ते रात्रीं चालले असतां पुढें एक लांडगा आला. तेथें सरस्वतीच्या तीरीं एक कूप होता. त्रित मार्गांत उभा राहिलेल्या वृकास पाहून त्याच्या भयानें आजुबाजूस होत असतां त्या कूपांत पडला. त्या कालीं ते उभयतां बंधु त्यास टाकून गेले ते त्रित ह्मणूं लागला कीं, येथें राहून मी सोमपान कसें करावें? असें चिंतन करून त्यानें दैवानें एक लोंबणारी वेल पाहिली. तेव्हां बुद्धीनें युक्त अशा त्या कूपांत उदक अग्नि यांचें चिंतन केलें आणि आपल्यास होता अशी कल्पना करून व त्या वेलीस सोम वल्ली कल्पून मनानें ऋग्वेदादिकांचें चिंतन केलें आणि तेथील पाषाणांस शर्करा मानून उदकास आज्य ह्मणून देवास भाग देऊन सोमाभिषव करून तो मोठा शब्द करूं लागला. त्या शब्दानें स्वर्ग व्याप्त जाहलें. नंतर बृहस्पति तो शब्द ऐकून सर्व देवांस बोलला कीं, त्रिताचा यज्ञ जेथें होत आहे तेथें सर्व चला नाहीं तर तो क्रुद्ध होऊन दुसरे देव उत्पन्न करील. असें ऐकतांच देव त्या कूपाजवळ गेले, आणि यज्ञदीक्षा घेतलेल्या त्रितास पाहून बोलले कीं, आह्मीं यज्ञभागाच्या इच्छेनें आलों. असें ऐकून तो ह्मणतो हे देवहो, या कूपांत निमग्न झाल्यामुळें नष्टबुद्धि अशा मजकडे पहा. असें बोलून त्यानें मंत्रपूर्वक यज्ञभाग देवांस दिले त्या कालीं त्रितास देवानीं इच्छित वर दिले. तेव्हां तो त्रित देवांस ह्मणतो कीं तुह्मीं माझें संरक्षण करा. आणि या कूपांत जो स्नान करील त्यास सोमपान करणाराची गति मिळावी. असें बोलत असतां त्या कूपांतून सरस्वती नदी निघाली. तिच्या योगें तो बाहेर पडून त्यानें देवांचें पूजन केलें. तेव्हां देव त्यास तो वर देऊन स्वर्गीं गेले व त्रित ही आपल्या गृहास गेला. नंतर उभयतां बंधूंस पाहून क्रोधानें त्यांस शाप देऊन ह्मणतो पशूंच्या लोभानें तुह्मीं मला सोडून पळालांत यास्तव तुह्मीं वृका सारखे भयंकर प्राणी व्हाल. आणि तुह्मांपासून गोल, अंगुल, रिक्ष, वानर हे उत्पन्न होतील. असें बोलतांच ते तसे झाले. त्या त्रिताच्या कूपांतील उदकास स्पर्श करून बलराम अनेक ब्राह्मणांस दानें देऊन त्या

कृपाची प्रशंसा करीत कुरुक्षेत्रीं गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

३७. अध्याय सदतिसः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विनशन तीर्थी जाऊन बलरामानीं आचमन करून ते सभूमिक तीर्थास गेले. जेथें प्रतिमाशीं गंधर्व अप्सरा येऊन क्रीडा करीत असत व देव, पितर आनंद पावत त्या सुभूमिका तीर्थी बलरामानीं स्नान दान इत्यादिक केलें नंतर जेथें विश्वावसु प्रमुख गंधर्व गायन करितात व वाद्यें वाजतात. अशा गंधर्व तीर्थांत जाऊन बलरामानीं ब्राह्मणांस अनेक दानानीं तृप्त केलें. नंतर ते गर्गस्रोतनामक तीर्थी जाऊन शंखतीर्थी गेले. नंतर दक्षिणेच्या बाजूनें सरस्वती तीरीं वासुकीचे स्थानास गेले तेथें पूर्वी देवानीं वासुकीस अभिषेक केला त्या तीर्थी ब्राह्मणांस बलरामानीं अनेक दानें करून संतुष्ट केलें. नंतर प्राची दिशेस जाऊन सहस्रावधि तीर्थें पहात नैमिषारण्यांतील ऋषींस पाहण्यास बलराम जात असतां पूर्वेकडे फिरलेल्या सरस्वती नदीस पाहून आश्चर्य पावला. असें ऐकून जनमेजय ह्मणतो हे वैशंपायन ऋषे, सरस्वती पूर्वाभिमुख कां झाली? व बलरामास कोणत्या कारणानें आश्चर्य वाटलें? तें मला सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पूर्वी कृतयुगीं द्वादश वार्षिक सत्र प्रवृत्त असतां तेथें बहुत ऋषि येऊन त्यानीं समंत पंचकापर्यंत सरस्वती नदीचें तीर व्यापिलें आणि ते वालखिल्यादिक ऋषि तेथें अग्निहोत्रादिक अनेक कर्में करूं लागले. तेव्हां तो ऋषींचा बहुत समुदाय सरस्वती जलाच्या लाभाविषयीं निराश झालेला पाहून सरस्वती नदी अनेक तीर्थें उत्पन्न करीत तेथें आली. तीं अनेक तीर्थें पाहून बलराम विस्मय पावला. तेथेंही बलरामानीं अन्नदानानें ब्राह्मणांस संतुष्ट केलें. नंतर मंकणक ऋषि जेथें सिद्धि पावला त्या सप्तसारस्वत तीर्थी बलराम आले. अशी कथा या अध्यायांत वर्णिली आहे.

३८. अध्याय अडतीसः— जनमेजय प्रश्न करितो हे वैशंपायन ऋषे, सप्तसारस्वत हें नाम कशानें प्राप्त झालें व मंकणक ऋषि कोणत्या नियमानें सिद्ध झाला व तो कोणाच्या वंशांत उत्पन्न होऊन त्यानें कोणतें अध्ययन केलें तें मला सांगा? असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, बलाढ्य ऋषीनीं सरस्वती नदीस जेथें आव्हान केलें तेथें ती सात रूपानें गेली. ज्यांच्या योगें संपूर्ण

जग व्याप्त झालें त्या रूपांचीं नांवें सुप्रभा, कांचनाक्षी, विशाला, मनोरमा, ओ
घवती, सुरेणु, विमलोदका अशीं आहेत. ब्रह्मदेवाचा यज्ञ प्रवृत्त जाहला
असतां त्या यज्ञसंपत्तीनें देवता संतुष्ट होऊन आश्चर्य पावल्या. तेव्हां ऋषी
बोलले हा यज्ञ मोठा गुणवान नाहीं. कारण यांत सरस्वती नदी दिसत ना
हीं. असें ऐकून ब्रह्मदेवानें सरस्वतीस बोलाविलें तेव्हां त्या पुष्कर तीर्थीं स
रस्वती ब्रह्मदेवाच्या संतोषार्थ आली. तिचें नाव सुप्रभा असें आहे. तिला
पाहून ऋषींनीं संतुष्ट होऊन त्या यज्ञाची स्तुति केली. नैमिषारण्यांत ऋषि
वेदाध्ययन करीत असतां त्यांनीं सरस्वतीचें स्मरण करतांच ती तेथें आली. ती
स कांचनाक्षी असें ह्मणतात. गयनामक देशांत गय राजा यज्ञ करीत असतां
त्यानें सरस्वतीस बोलाविलें. तेव्हां ती त्याच्या यज्ञांत आली. तीस ऋषींनीं
विशाला असें नांव ठेविलें. उत्तर कोसल देशांत उद्दालक ऋषि यज्ञ करीत अस
तां त्यानें सरस्वतीचें ध्यान करितांच ती त्या देशीं आल्यावर ऋषींनीं तिचें पूज
न करून मनोरमा असें नाव ठेविलें. कुरुक्षेत्रीं कुरुराजा यज्ञ करीत असतां
वसिष्ठानें आव्हान केलें तेव्हां सरस्वति तेथें आली. तिचें नांव ओघवती असें
पडलें. गंगाद्वारीं दक्षप्रजापति यज्ञ करीत असतां त्यानें आव्हान केल्यामुळें
सरस्वती तेथें आली. तेव्हां ती सुरेणुनाम पावली. हिमालय पर्वतीं ब्रह्मदेवा-
नें आपल्या यज्ञांत तीस बोलाविलें तेव्हां तेथें येऊन विमलोदा नाम पावली.
त्या सर्व नद्या सप्त सारस्वत तीर्थांत मिळाल्यामुळें त्या तीर्थाचें नांव सप्तसारस्व
त जाहलें. आतां मंकणक ऋषीचें ही चरित्र श्रवण कर. कोणी एके कालीं स
रस्वती नदींत दिव्यस्त्री वस्त्ररहित स्नान करीत असतां तिला पाहून मंकण-
काचें वीर्य उदकांत स्खलन होतांच तें त्यानें कलशांत धरिलें. तेव्हां त्याचे सात
भाग होतांच त्यापासून वायुवेग, वायुबल, वायुहा, वायुमंडल, वायुज्वाल,
वायुरेता, वायुचक्र या नांवांचे मरुद्गणांचे उत्पादक सप्त ऋषि उत्पन्न झाले.
आणखी या ऋषीचें आश्चर्यकारक एक कर्म ऐक. पूर्वी मंकणक ऋषीच्या
हस्तास कुशाग्रानें क्षत पडतांच त्यापासून शाकरसाचा स्राव होऊं लागला.
तो पाहून ऋषि हर्षानें नृत्य करीत असतां त्याच्या तेजानें स्थावर जंगमात्म
क जग नृत्य करूं लागलें तेव्हां ब्रह्मादिक देव व ऋषि यांणीं श्रीशंकराची प्रा

र्थना केली कीं, हे देवा, हा ऋषी जेणें करून नृत्य न करील असें करा. असें ऐकून महादेव,देवांच्या हितार्थ त्या ऋषीस बोलतात हे ब्राह्मणा, तूं हर्षानें नृत्य करितोस याचें कारण काय? असें ऐकतांच मंकणक ह्मणतो हे महादेवा, माझ्या हस्तापासून शाकरस स्रवतो यास्तव मी नृत्य करितों. असें ऐकतांच महादेवानीं आपल्या अंगुष्ठास अंगुलीनें ताडन करून भस्म उत्पन्न केलें. तें पाहतांच तो ऋषि लज्जित होऊन महादेवास ह्मणतो कीं, या जगास गतिप्रद तुह्मावांचून कोणी नाहीं व तुमच्या प्रसादानें सर्व देव आनंद पावतात यास्तव माझें तप तुमच्या प्रसादानें नष्ट न व्हावें. असें स्तवन ऐकून महादेव ह्मणतात माझ्या प्रसादानें तुझें तप सहस्रपट वाढेल व या सप्तसारस्वत तीर्थीं तुजसहित मी राहीन आणि जो मनुष्य या ठिकाणीं माझें पूजन करील त्यास या लोकीं व परलोकीं कोणतेंही दुर्लभ न होतां तो सारस्वत लोकास जाईल. हा मंकणक सुकन्येचे ठायीं वायूपासून उत्पन्न जाहला. अशी कथा या अध्यायांत आहे.

३९. अध्याय एकुणचाळीसः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सप्तसारस्वत तीर्थीं बलराम राहून तेथील ऋषींची पूजा करून त्यानें मंकणकावर उत्तम प्रीति केली आणि त्यादिवशीं ब्राह्मणांस दान देऊन उपोषण केलें. नंतर ऋषींनीं पूजित असा बलराम प्रातःकालीं उठून ऋषींच्या आज्ञेनें औशनस तीर्थीं गेला. पूर्वीं रामचंद्रानीं टाकलेल्या राक्षसाच्या मस्तकानें ज्याची जंघा सलग्न झाली तो महामुनि या तीर्थीं त्या शिरापासून मुक्त झाला. ह्मणून त्या तीर्थास कपालमोचन ह्मणतात. त्या स्थलीं शुक्रानें पूर्वीं तप केलें ह्मणून त्यास औशनस ह्मणतात. तेथें शुक्राचार्यापासून संपूर्णनीति प्रगट झाल्या. त्या तीर्थीं बलरामानीं ब्राह्मणांस यथाविधि द्रव्यदान केलें. असें ऐकून जनमेजय प्रश्न करितो हे ऋषे, महामुनि कसा मुक्त झाला व कोणत्या कारणानें राक्षसाचें शीर सलग्न जाहलें? असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पूर्वीं दंडकारण्यांत राक्षसांचें मर्दन करीत रामचंद्र राहात असतां त्यानीं जनस्थानांत एका राक्षसाचें शिर छिन्न केलें. तें उडून अरण्यांत महोदर नामक महामुनीच्या जंघेच्या ठायीं सलग्न झालें.

तेव्हां तो मुनी वनांत संचार करीत असतां त्या शिराच्या योगें अस्थिभेद झाल्या मुळें त्यास तीर्थी जाण्यास शक्ति राहिली नाहीं आणि दुर्गंधि असून रक्त स्त्राव होत असल्या मुळें वेदनेनें पीडित होऊन तो पृथ्वींतील सर्व तीर्थी गेला आणि तेथील ऋषींस तें दुःख निवेदन करून त्यानें स्नान केलें तथापि त्या शिरा पासून मुक्त झाला नाहीं नंतर तेथून औशनस तीर्थी जाऊन त्यांत स्नान करितां च तें शिर जंघेपासून सुटून पाण्यांत पडलें. त्या योगें तो मुक्त होऊन सुख पावला आणि तो मस्तक ही जलांत अदृश्य झाला. तें वर्तमान त्या ऋषीनें सर्व ऋषींस सांगितलें. तेव्हां त्यानीं त्या तीर्थाचें नांव कपालमोचन असें ठेविलें. नंतर तो ऋषि त्या तीर्थांतील उदकप्राशन करून सुख पावला. त्या तीर्थी बलरामानीं ब्राह्मणांस बहुत द्रव्य देऊन नंतर रुषंगुच्या आश्रमीं गमन केलें. त्या आश्रमांत आर्ष्टिषेणानें घोर तप केलें व विश्वामित्र ब्राह्मण्य पावला. तेथें रुषंगु ऋषि देहत्याग करावा असें मनांत आणून आपल्या सर्व पुत्रांस म्हणाला कीं, मला पृथूदकीं न्या. असें ऐकतांच त्या मुलानीं पित्यास तेथें नेलें तेव्हां तो ऋषि त्या तीर्थाचे गुण जाणून आपल्या पुत्रांस म्हणाला कीं सरस्वतीच्या उत्तर तीरीं पृथूदकांत जो आपल्या तनूचा त्याग करील तो अक्षय्य-स्वर्गास पावेल. असें बोलून रुषंगूनें आपल्या तनूचा त्याग केला व ब्रह्मदेवानीं त्या तीर्थी सृष्टि उत्पन्न केली आणि सिंधुद्वीप, देवापि हे राजे ब्राह्मण्य पावले. त्या तीर्थी बलरामानीं ब्राह्मणांस बहुत द्रव्य दिलें. अशी कथा या अध्यायांत वर्णिली आहे.

४०. अध्याय चाळीसः— जनमेजय बोलतो हे ऋषे, आर्ष्टिषेणानें विपुल तप कसें केलें व सिंधुद्वीप, देवापि, विश्वामित्र हे ब्राह्मण्य कसे पावले हें मला सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पूर्वी कृतयुगांत आर्ष्टिषेण गुरुगृहीं नित्य अध्ययन करीत रहात असतां त्याची विद्या समाप्त न गेल्यामुळें तो खिन्न होऊन तप करूं लागला. त्या योगें तो वेदादिक प्राप्त होऊन सिद्ध जाहला. नंतर त्या तीर्थास त्यानें तीन वर दिले. ते असे कीं या तीर्थी आजपासून जो नर स्नान करील त्यास वाजीमेधाचें फल प्राप्त होईल. तसेंच येथें राहणारास सर्पभय होणार नाहीं. अल्पकालांत बहुतफ

ल प्राप्त होईल. असें बोलून आर्ष्टिषेण स्वर्गी गेला. तसेच सिंधुद्वीप, देवापि हे ब्राह्मण्य पावले. पृथ्वीवर गाधिनामक राजा होता त्यास विश्वामित्रनामें पुत्र झाला. तेव्हां त्यास गाधीनें राज्याभिषेक करून देहत्यागा विषयीं मनांत आणिलें. तेव्हां सकल प्रजा नम्र होऊन ह्मणाल्या कीं, अहो महाराज आपण देहत्याग न करितां आमचें रक्षण करावें. असें ऐकतांच गाधी ह्मणाला हा माझा पुत्र सर्व जगाचें रक्षण करील. असें सांगून गाधिराजा विश्वामित्राची राज्यावर स्थापना करून स्वर्गी गेला. तेव्हां विश्वामित्र पृथ्वीचें रक्षण करीत असतां त्या विषयीं असमर्थ जाहला. नंतर त्यानें प्रजेस राक्षसां पासून मोठें भय उत्पन्न झालेलें ऐकतांच तो नगरांतून चतुरंगबला सहित निघून दूर जात असतां वसिष्ठाश्रमीं आला तेव्हां त्याच्या सैनिकानीं बहुत अन्याय केले त्या समयीं वसिष्ठ आश्रमीं येऊन पाहतो तों सर्व वन भग्न झालें. असें पाहून त्यानें आपल्या गाईस आज्ञा केली कीं हे धेनु, तूं घोर शबर उत्पन्न कर. असें ऐकून तिनें तसें करतांच त्या शबरानीं विश्वामित्राचें सैन्य पळवून लाविलें. तें ऐकून विश्वामित्र अनेक प्रकारचे नियम करून पृथूदक तीर्थी तप करूं लागला. तेव्हां देवानीं त्या तपास वारंवार विघ्नें केलीं असतांही त्याची बुद्धि नियमभ्रष्ट झाली नाहीं. असें पाहून ब्रह्मदेव वर देण्या करितां तेथें आले. तेव्हां विश्वामित्रानें वर मागितला कीं मी ब्राह्मण असावें. असें ऐकतांच ब्रह्मदेव तथास्तु असें बोलले. या प्रमाणें विश्वामित्र त्या तीर्थी ब्राह्मणत्व पावून सकल पृथ्वीवर संचार करूं लागला. त्या तीर्थी बलराम विपुल द्रव्य, गायी, शय्या, वस्त्रालंकार, अन्न इत्यादिक ब्राह्मणांस देऊन संतुष्ट झाला नंतर बक दाल्भ्य यांच्या आश्रमीं गेला. अशी कथा या अध्यायांत आहे.

४१. अध्याय एकेचाळीस — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पूर्वी नैमिषारण्याचे ठायीं यज्ञ होत असतां सर्व ऋषि पशु मागण्या करितां पांचाल राजांकडे गेले. तेव्हां त्यानें बलानें युक्त असे एकवीस पशु दिले. तेव्हां बक दाल्भ्य सर्व ऋषींस बोलला कीं, मला हे पशु नकोत. मी एकाद्या राजाकडे जाऊन पशूंची भिक्षा मागेन. असें ह्मणून तो धृतराष्ट्राकडे गेला आणि पशु मा

गूं लागला. तेव्हां मृत जाहलेल्या गायींस पाहून धृतराष्ट्र क्रोधानें ह्मणाला. हे ब्राह्मणा, जर तुला इच्छा असेल तर हे पशु घे. असें ऐकून त्या ब्राह्मणानें दोन घटिका विचार करून नंतर मृत पशूंचें मांस काढिलें आणि धृतराष्ट्राच्या नाशा करितां सरस्वतीच्या तीर्थी अग्नि प्रदीप्त करून त्यांत मांसाचा होम केला. तेव्हां त्या धृतराष्ट्राचें राज्य क्षीण होऊं लागलें. तें पाहून तो राजा, ब्राह्मणांसहित त्या संकटा पासून मुक्त होण्या विषयीं यत्न करूं लागला; परंतु मुक्त न होतां त्यानें ज्योतिषास प्रश्न केला कीं, हें माझें राष्ट्र क्षीण कां होतें, तेव्हां ज्योतिष्यानें सांगितलें कीं बकदाल्भ्य ऋषीशीं तूं वंचना केलीस या मुळें तो मृत पशूंच्या मांसानीं होम करीत असल्यामुळें तुझ्या राष्ट्राचा क्षय होतआहे यास्तव सरस्वती तीरीं जाऊन बकदाल्भ्यास प्रसन्न कर. असें ऐकतांच त्या राजानें तेथें जाऊन त्या ऋषीची नमस्कारपूर्वक प्रार्थना केली कीं, तुह्मां वांचून मला कोणी गति नाहीं. यास्तव माझ्या अपराधाची क्षमा करून प्रसाद करावा. असें बोलून शोकानें विलाप करीत असतां त्याजवर ऋषीनें कृपा केली. ती अशी कीं, त्याच्या राज्याच्या रक्षणार्थ पुनः होम करून तें राष्ट्र संकट मुक्त केलें आणि आपण नैमिषारण्यांत गेला. तेव्हां धृतराष्ट्र राजा आनंदानें आपल्या नगरांत गेला. त्या तीर्थी बृहस्पति देवांचें कल्याण व असुरांचा नाश होण्या करितां मांसानें इष्टि करूं लागला. तेव्हां असुरांस देवांनीं भग्न केलें त्या तीर्थी बलरामानें हत्ति, घोडे, रत्नें इत्यादिक ब्राह्मणांस देऊन तो यायात तीर्थी गेला. तेथें ययाति राजा यज्ञ करीत असतां त्यानें औदार्य व भक्ति यांच्या योगानें ब्राह्मण जें जें इच्छितील तें तें त्यांस दिलें. ज्या ज्या स्थानीं ऋषि राहिले होते त्या स्थानीं सरस्वतीनें गृहें, शय्या, षड्रस भोजन इत्यादिक त्यांस दिलीं. तेव्हां ऋषींनीं हें राजानेंच दिलें असें मानून त्या ययाति राजास उत्तम वर दिले व तेथें त्या राजाची यज्ञसंपत्ति पाहून देव गंधर्व विस्मय पावले. त्या तीर्था पासून बलराम भीमवेगा अशा वसिष्ठापवाहनामक तीर्थी गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

४२. अध्याय बेचाळिसा- जनमेजय प्रश्न करतो हे वैशंपायन ऋषे, वसिष्ठापवाहतीर्थ भीमवेग कसें जाहलें? सरस्वती नदीनें त्या वसिष्ठ ऋषीस-

कां वाहविलें? वसिष्ठाचें व विश्वामित्राचें वैर कोणत्या कारणानें जाहलें हें मला सांगा. असा प्रश्न ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, वसिष्ठाचें व विश्वामित्राचें वैर तपामुळें जाहलें. वसिष्ठाचा आश्रम स्थाणुतीर्थी पूर्वेकडे होता; व त्याच्या पार्श्वभागीं विश्वामित्राचाही आश्रम होता. तेथें भगवान् स्थाणूनें (शिवानें) सरस्वतीचें पूजन करून त्या तीर्थाचें स्थापन केलें त्या तीर्थास स्थाणुतीर्थ असें ह्मणतात. त्या तीर्थी देवांनीं स्कंदास सेनापत्याचा अभिषेक केला. तेथें विश्वामित्रानें उग्र तप करून वसिष्ठास चंचल केलें. तेव्हां ते उभयतां तपामुळें स्पर्धा करूं लागले. त्यांत वसिष्ठाचें तेज पाहून विश्वामित्रास अधिक संताप जाहला. तेव्हां विश्वामित्रास असें वाटलें कीं ही सरस्वती त्वरित वेगानें वसिष्ठास माझ्या जवळ आणील तर मी त्यास मारीन असा निश्चय करून विश्वामित्रानें तिचें स्मरण करितांच सरस्वती व्याकुल होऊन विश्वामित्रा जवळ हात जोडून उभी राहिली आणि त्यास बोलली कीं, मी काय करूं? नंतर विश्वामित्र क्रोधानें ह्मणाला कीं, वसिष्ठास मजजवळ लौकर आण ह्मणजे आज मी त्यास मारतों. असें ऐकून ती नदी खिन्न होऊन कांपूं लागली. तें पाहून विश्वामित्र ह्मणतो, विचार न करितां तूं वसिष्ठास मजजवळ आण. तेव्हां वसिष्ठाचा प्रभाव जाणणाऱ्या त्या नदीनें विश्वामित्राचें कृत्य वसिष्ठास सांगितलें आणि ती उभयतांच्या शापास भिऊन चिंतन करीत कृश जाहली. तेव्हां वसिष्ठ ह्मणाले हे सरस्वती, मला विश्वामित्राजवळ नेऊन तूं आपलें रक्षण कर, नाहीं तर विश्वामित्र तुला शाप देईल. असें ऐकून सरस्वतीनें मनांत विचार केला कीं, वसिष्ठ मजवर दया करतो त्या पेक्षां त्याचें हित करावें. आपल्या तीरीं विश्वामित्र होम व जप करीत आहे असें पाहून याचे संधीस वसिष्ठास न्यावें असें मनांत आणून ती वसिष्ठास वेगानें नेत असतां वसिष्ठानें तिचें स्तवन केलें. तेव्हां तिनें वसिष्ठास विश्वामित्राच्या आश्रमीं नेऊन सांगितलें कीं, हा वसिष्ठ आणिला आहे. तेव्हां विश्वामित्र कोपानें वसिष्ठास मारण्या करितां आयुध पाहूं लागला. इतक्यांत सरस्वतीनें वसिष्ठास पूर्वदिशेकडे वाहून नेलें तें पाहून विश्वामित्र संताप पावून सरस्वतीस ह्मणतो तूं माझी वंचना करून गेलीस त्या पेक्षां तुझा प्रवाह रक्ताचा होईल

ईल. असा विश्वामित्रानें सरस्वतीस शाप देतांच तिचें उदक संवत्सर पर्यंत रक्त मिश्र झालें. तें पाहून ऋषि, देव, गंधर्व बहुत दुःख पावले. अशा कारणानें त्या तीर्थास वसिष्ठापवाह हें नाम प्राप्त झालें. पुनः ती नदी आपल्या मार्गानें आली. अशी कथा या अध्यायांत आहे.

४३. अध्याय त्रेचाळीसः— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, विश्वामित्रानें सरस्वती नदीस शाप दिल्यामुळें त्या तीर्थी रक्तप्रवाह होत असतां तेथें राक्षस येऊन रक्त प्राशन करीत सुखानें राहिले. नंतर तीर्थ यात्रे करितां ऋषि येऊन त्या तीर्थांत स्नान करीत असतां रक्तानें युक्त तिचें उदक राक्षस प्राशन करीत आहेत असें पाहून सरस्वतीस बोलतात हे कल्याणी, तुझा न्हद रक्तानें व्याप्त कां झाला? तें सांग ह्मणजे तुझें उदक शुद्ध करण्याचा विचार करूं. असें ऐकून तिनें झालेलें वृत्त त्यांस सांगितलें. तेव्हां त्या ऋषीनीं तपाचे योगें शंकराचें आराधन करून सरस्वतीस शाप मुक्त करतांच ती पहिल्या प्रमाणें शोभूं लागली. तेव्हां राक्षस क्षुधेनें पीडित होऊन ऋषींस ह्मणतात आह्मीं शाश्वत धर्मापासून हीन झाल्यामुळें नित्य क्षुधेनें पीडित जाहलों आणि जे ब्राह्मण आचार्य, ऋत्विज, गुरु, वृद्ध जन यांचा अवमान करतात ते प्राणी राक्षस होतात. यास्तव तुह्मीं आह्मांस तारा कारण तुह्मीं सर्व लोकांस तारण्या विषयीं समर्थ आहांत. असें ऐकून ऋषीनीं सरस्वतीचें स्तवन करून राक्षसांच्या कल्याणार्थ भाषण केलें कीं, उच्छिष्ट असून कीटक, केश, रोदन अश्रू यानीं युक्त जें अन्न तें राक्षसांस मिळो तस्मात् सर्व कालीं विद्वानानें राक्षसान्न वर्ज्य करावें. केशादिकानीं युक्त अन्न जो भक्षण करितो तो राक्षसान्न खातो असें बोलून त्या ऋषीनीं राक्षसांस मुक्त करण्या करितां सरस्वतीस प्रेरणा केली तेव्हां सरस्वतीनें आपली तनू अरुणा नदीस मिळविली तेथें राक्षस स्नान करून स्वर्गास गेले. नंतर इंद्र तेथें स्नान करून ब्रह्महत्ये पासून मुक्त जाहला असें ऐकून जनमेजय बोलतो हे वैशंपायन ऋषे, इंद्रास ब्रह्महत्या कशी घडली व तो त्या तीर्थी स्नान करून कसा मुक्त जाहला? असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, कोणे एके समयीं नमूची इंद्रास भिऊन सूर्य किरणांत शिरला तेव्हां इंद्र त्याशीं सख्य करून आपला संकेत सांगूं लागला.

हे नमूचे, मी शपथ पुरस्कर तुला सांगतों कीं, आर्द्र व शुष्क यानीं रात्रीं किंवा दिवसास मी तुला मारणार नाहीं. नंतर इंद्रानें धुकें आलेलें पाहून पाण्याच्या फेंसानें त्याचें मस्तक छेदिलें तेव्हां तें मस्तक इंद्राच्या पाठीस लागून ह्मणालें. हे इंद्रा, तूं मित्रहत्या करणारा पापी आहेस तेव्हां इंद्रानें तें वर्तमान ब्रह्मदेवास सांगतांच ब्रह्मदेव बोलले हे इंद्रा, ही अरुणानदी पुण्यजल आहे यास्तव इचा व सरस्वती नदीचा हा पुण्यकारक संगम आहे यांत तूं स्नान करून अनेक दानें कर. ह्मणजे त्या पातका पासून मुक्त होशील. असें ऐकतांच त्या संगमीं इंद्रानें स्नान केलें तेव्हां ब्रह्महत्ये पासून मुक्त होऊन तो स्वर्गी गेला आणि तें नमूचीचें मस्तक तेथेंच अक्षयलोकास गेलें. त्या तीर्थी बलरामानें स्नान करून ब्राह्मणांस अनेक दानें देऊन सोमतीर्थी गमन केलें. पूर्वी तेथें चंद्र, राजसूय यज्ञ करीत असतां अत्रिऋषीनें होत्र कर्म केलें. नंतर त्या यज्ञाच्या अंतीं देवदैत्यांचें तारकामयनामक युद्ध झालें. त्या युध्दांत देवानीं स्कंदास आपलें सैन्याधिपत्य दिलें तेव्हां तो तारकासुरास मारून तेथें निरंतर राहिला. अशी कथा या अध्यायांत सांगितली आहे.

४४. अध्याय चवेचाळीसः— जनमेजय ह्मणतो हे वैशंपायन ऋषे, तु ह्मीं सरस्वतीचा प्रभाव सांगितला. आतां कार्तिक स्वामीस देवानीं सेनापत्याचा अभिषेक कसा केला व त्यानें दैत्यांचें मर्दन कसें केलें हें मला सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे राजा, पूर्वी महेश्वराचें वीर्य अग्नींत पडलें त्यास दग्ध करण्या विषयीं व धारण करण्या विषयीं अग्नि समर्थ झाला नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें अग्नीनें गंगेकडे जाऊन तिचे ठायीं त्या दिव्य वीर्याचें स्थापन केलें. त्याचें सहन न करितां गंगेनें तें हिमालयावर शरस्तंबीं टाकून दिलें तेव्हां त्या वीर्याच्या योगें अग्नीचा गर्भ त्या पर्वतावर वाढूं लागला. त्यास पाहून हा आमचा गर्भ असें कृत्तिका ह्मणूं लागल्या. तेव्हां त्यांचा अभिप्राय जाणून गर्भानें सहा मुखानीं त्यांचें दुग्ध प्राशन केलें. तेव्हां त्याचा प्रभाव पाहून कृत्तिका परम विस्मय पावल्या. त्या गर्भाच्या योगें पर्वतासह पृथ्वी बहुत शोभूं लागली. तेव्हां गंधर्व, ऋषि, देवकन्या त्याचें स्तवन करूं लागल्या. बृहस्पतीनें त्याचे जातकर्मादि सर्व संस्कार केल्यावर साक्षात् सरस्वती त्याचें सेवन

करूं लागली, या मुळें सकळ विद्या त्यास प्राप्त जाहल्या. नंतर त्या पुत्रानें भूतादिगण व पार्वती यांसहित शंकरास पाहिलें. व सर्व देवांसहित ब्रह्मदेव विष्णु, इंद्र व नारदादिक ऋषि त्यास पाहण्या करितां आले. तेव्हां तो बालक शंकराजवळ येत असतां शिव, पार्वति, गंगा, अग्नि हीं सर्व प्रत्येकीं ह्मणालीं कीं, हा बालक मजकडेच येईल. असा त्या चौघांचा अभिप्राय जाणून तो चार स्वरूपानीं चौघांकडे आला. तेव्हां देव, दानव, राक्षस यानीं मोठा हाकार केला. ते समयीं रुद्र, पार्वती, अग्नि, गंगा, हीं सर्व त्याचें प्रिय व्हावें या इच्छेनें ब्रह्मदेवास ह्मणालींकीं आमच्या संतोषार्थ यास योग्य अधिकार द्यावा. असें ऐकून ब्रह्मदेवानें यास काय द्यावें असें चिंतन करून त्यास सर्व देवांचें सेनापत्य दिलें. तेव्हां ब्रह्मादिक देव त्यास अभिषेक करण्या करितां सरस्वती नदीच्या तीरीं समंत पंचकीं येऊन बसले. अशी कथा या अध्यायांत आहे.

४५. अध्याय पंचेचाळीस:—वैशंपायन सांगतात हे जनमेजया, बृहस्पतीनें अभिषेकाचें सर्व साहित्य यथाशास्त्र मिळवून अग्नींत होम केला. तेव्हां हिमालयानें त्या स्कंदास उत्तम आसन दिलें नंतर, विष्णु इंद्रप्रभृति सर्व देव, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, पन्नग, वैखानस प्रभृति ऋषि, ऋतु ग्रह, ज्योति, नद्या, वेद, समुद्र, सर्व तीर्थें, अदिति प्रभृति देवमाता, हिमालयादिक पर्वत, मासादिकांच्या अभिमानिनी देवता, वासुकी, गरुड, वृक्ष, धर्म इत्यादिक सर्व साहित्य घेऊन त्याच्या अभिषेकार्थ आले. तेव्हां ब्रह्मदेवानें स्कंदास प्रीतीनें अभिषेक करून पार्षदगण दिले. तसेच शिवानींही कांहीं त्यास पार्षद दिले. तेव्हां त्यानें चौदा लक्ष दैत्यांचा देवासुरांच्या युद्धांत नाश केला. ते समयीं देवादिकानीं आपापले सेवक त्यास दिले. या प्रमाणें अनेक आयुधानीं संपन्न, विचित्राभरणानीं युक्त, शंकुकर्ण, निकुंभ, पद्म, कुमुद, इत्यादिक अनेक पार्षदगण कार्तिकस्वामी जवळ येऊन त्याचें सेवन करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

४६. अध्याय शेचाळीस— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कुमाराचें सेवन करणाऱ्या मातृगणांचीं नांवें प्रभावति, विशालाक्षी, जयावति, सुप्र

मा,उल्काथिनी,एकचंद्रा,मेघकर्णा इत्यादिक होत. त्या स्कंदास इंद्रानें अनेक घंटानीं युक्त मोठा जिचा शब्द,सूर्यासमान कांती अशी एक शक्ति दिली. शंकरानेंही अजेय धनंजय नामक शक्ति स्वगणांसहित दिली. विष्णूनें वैजयंती माला,उमेनें निर्मल वस्त्रें,गंगेनें दिव्यकमंडलु,बृहस्पतीनें दंड,गरुडानें मयुर,अरुणानें कोंबडा,वरुणानें नाग,ब्रह्मदेवानें कृष्णाजिन व समरंगणीं जय या प्रमाणें प्रत्येकानें दिलें. नंतर दैत्यांच्या नाशार्थ देवांस आव्हान करीत स्कंद निघाला तेव्हां शंख भेरी इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं. व इंद्रासहित सर्व देव कुमाराचें स्तवन करूं लागले. गंधर्व अप्सरा गीत नृत्य करूं लागल्या. तेव्हां कार्तिक स्वामीनें देवांस असा वर दिला कीं,तुमच्या सर्व शत्रूंचा मी नाश करीन. असें ऐकतांच सर्व देवानीं हर्षानें मोठा नाद केला. ते समयीं स्कंदाच्या अग्रभागीं उद्योग,जय,धर्म,सिद्धि,लक्ष्मी,धृति,स्मृति,त्या निघाल्या. तेव्हां स्कंदानें दिव्य शक्ति,गदा इत्यादिक आयुधें घेऊन सिंहनाद केला. त्या कालीं स्कंदास पाहून सकल दैत्यदानव भयानें उद्विग्न होऊन दशदिशेंस पळाले. तें पाहून देव त्यांच्या पाठीस लागले तेव्हां स्कंदानें शक्ति फिरवून पृथिवीवर टाकतांच कोट्यावधि शक्ति उत्पन्न जाहल्या. तेव्हां स्कंद संतुष्ट होऊन त्यानें सहस्रावधि दैत्यानीं युक्त अशा तारकासुरास मारिलें. तसेंच आठ पद्म दैत्यानीं वेष्टित महिषासुर व एक कोटी दैत्यानीं युक्त त्रिपादनामक दैत्य, दाहा निखर्वानीं युक्त ह्रदोदरनामक दैत्य यांस स्कंदानें मारिलें. तेव्हां कुमाराचे अनुचर सिंहनादानें दशदिशा पूर्ण करीत नृत्य व हास्य करूं लागले. शक्तिरूप अस्त्राच्या ज्वालेनें त्रैलोक्य त्रासलें व स्कंदाच्या नादानीं सहस्रावधि दैत्य भूमीवर पडले. नंतर बाणासुरानें क्रौंच पर्वताचा आश्रय करून देवांस बहुत पीडिलें. तेव्हां स्कंदानें अग्निदत्त शक्तीच्या योगें क्रौंच पर्वताचा भेद करून सहस्रावधि दैत्यांचा नाश केला असतां देवांसहित तो स्कंद अत्यंत हर्ष पावला. त्या कालीं दुंदुभी,शंख इत्यादिकांचे नाद जाहले. देवस्त्रियानीं पुष्पांचा वर्षाव केला,पुण्यकारक दिव्य गंधयुक्त वायु वाहूं लागला. गंधर्वऋषि यानीं त्यांचें स्तवन केलें. तेव्हां किती एक स्कंदास पितामह पुत्र,सनत्कुमार कोणी शंकरपुत्र,अग्निपुत्र,उमापुत्र,कृत्तिकापुत्र,गंगासुत असें बोलूं ला

नित्य तप करूं लागली. तेव्हां महादेव ब्राह्मण रूप धरून अरुंधती जवळ येऊन बोलले कीं, मला भिक्षा दे. तेव्हां ती बोलली हे ब्राह्मणा, अन्न नाहिसें जाहलें यास्तव बोरें भक्षण कर. असें ऐकून महादेव बोलले कीं यांचें तूंच पचन कर. असें ऐकतांच अरुंधतीनें ब्राह्मण संतोषार्थ प्रदीप्त अग्नींत पचनास आरंभ केला असतां मनोरम दिव्य कथा श्रवण केल्या. तेव्हां बारा वर्षांचें अवर्षण दूर जाहलें इतक्यांत ऋषि फळें घेऊन आले. तेव्हां महादेव संतुष्ट होऊन अरुंधतीस ह्मणतात कीं, पूर्वी प्रमाणें तूं त्या ऋषींच्या अनुरोधानें वाग. तुझ्या तपानें मी संतुष्ट जाहलों. असें बोलून महादेव आपलें स्वरूप ऋषींस दाखवून ह्मणतात कीं, तुह्मीं हिमालयीं जें तप केलें तें, उपवास करून बदर पचन करील जें या अरुंधतीनें बारा वर्षे तप केलें त्या सारखें नव्हे असें बोलून अरुंधतीस ह्मणतात हे कल्याणी, आतां तूं इच्छित वर माग. तेव्हां सप्त ऋषींच्या सभेंत अरुंधती बोलली हे महादेवा, जर तूं मजवर प्रीति करीत आहेस तर हें तीर्थ सिद्ध, देवऋषि यांस प्रिय होऊन बदरपाचननाम पावो. तसेंच या तीर्थी त्रिरात्र वास करून एक उपोषण केलें असतां बारा वर्षे उपोषण केल्याचें फल प्राप्त होवो. असें ऐकून शंकर सप्तऋषींस्तवन करीत असतां अरुंधतीस तथास्तु असें ह्मणून स्वर्गलोकीं गेले. अरुंधतीस पाहून ऋषि आश्चर्य पावले. या प्रमाणें अरुंधतीस त्या तीर्थी सिद्धि प्राप्त जाहली. नंतर इंद्र श्रुतावतीस बोलला कीं, तूं माझ्या करितां अग्नीच्या ठायीं देह ही समर्पण केलास त्या पेक्षां मी असा वर देतों कीं त्या तीर्थी एक रात्र स्नान करून रहात असतां जो देहत्याग करील तो उत्तम लोकास जाईल. असें इंद्र श्रुतावतीशीं बोलून गेला असतां तिजवर सुगंधि पुष्पांचा वर्षाव झाला. व तेथें देव दुंदुभि वाजवूं लागले. पुण्यकारक सुगंध वायु सुटला. तेव्हां श्रुतावति देहत्याग करून इंद्रलोकीं गेली आणि इंद्राची भार्या होऊन त्याशीं रममाण होऊं लागली. असें ऐकून जनमेजय राजा विचारितो हे ऋषे, त्या श्रुतावतीची माता कोण? व ती कोठें वाढली? हें ऐकून वैशंपायन ह्मणतात हे राजन्, कोणे एके समयीं दिव्य नेत्र घृताचीनामक अप्सरेस पाहून भरद्वाज ऋषीचें वीर्य पतन झालें. तें त्यानें हातांत घेतलें असतां पर्णावर पडलें त्या पासून एक कन्या उत्पन्न झाली. तेव्हां

अरे या मनुष्यपणास धिःक्कार असो. याचा परिणाम असा कीं, अकरा असौहिणी सेनेचा पति माझा पुत्र गदा घेऊन पायानें रण करण्यास अनाथासारखा गेला हें त्यास मोठें दुःख झालें असें बोलून धृतराष्ट्र स्तब्ध बसला. तेव्हां संजय ह्मणतो हे राजा, दुर्योधनानें भीमास युद्धार्थ बोलाविलें असतां अनेक उत्पात होऊं लागले. ते असे कीं, पर्व नसतां सूर्यास ग्रहण, भूकंप, मृगादिकांचे अशुभ शब्द अशीं दुश्चिन्हें होऊं लागलीं. तेव्हां भीम म्हणतो हे धर्मराजा, आज गदेनें कुरुकुलाधम पापी दुर्योधनास मारून तुझ्यागळ्यांत कीर्तिरूप माला घालतों. या मूर्खापासून आजपर्यंत आह्मांस जें दुःख जाहलें त्याचा शेवट करतों. आज दुर्योधन शकुनीच्या नाशानें वागल्याचें फळ पावेल. असें बोलून भीमसेन उभा राहिला असतां तुझा पुत्र दुर्योधन बोलला हे वृकोदरा, किती जल्पना करितोस? तूं आज मजशीं युद्ध कर म्हणजे तुझी युद्धश्रद्धा नष्ट करितों. असें बोलून तो उभा राहिला असतां भीम दुर्योधनावर वेगानें धांवला तेव्हां जयेच्छु पांडवांनीं शस्त्रें प्रदीप्त झालीं. व गजाश्वादिक गर्जना करूं लागले. असा विषय यांत आहे.

५७. अध्याय सत्तावन — संजय म्हणतो हे धृतराष्ट्रा, भीमसेन आपल्यावर धांवून आला हें पाहून दुर्योधन वेगानें त्याजवर धांवला तेव्हां उभयतां एकमेकांवर गदेचे प्रहार करूं लागले. ते समयीं उभयतांचें सर्वांग रक्तानें भरल्यामुळें पुष्पित पलाश वृक्षासारखें शोभूं लागलें. तेव्हां दोघांचें समान वीर्य पाहून सर्वांस जया विषयीं संशय आला. त्या काळीं दुर्योधनानें भीमसेनाच्या व भीमसेनानें दुर्योधनाच्या गदेवर प्रहार करून उभयतांनीं अनेक गदायुद्धाचे मार्ग दाखविले. तेव्हां दुर्योधन दक्षिण मंडळ फिरूं लागला असतां भीमसव्य मंडळ फिरूं लागला. तेव्हां दुर्योधनानें भीमाच्या एका बाजूस गदेचा प्रहार केला असतां त्या प्रहारास न मानतां भीमसेनानें आपली गदा वेगानें फिरवून दुर्योधनावर मारली. तेव्हां दुर्योधनानें आपली गदा वेगानें फिरवितांच त्या गदेचा वेग पाहून पांडवांस भय प्राप्त जाहलें. नंतर सिंह जसा वनगजावर धांवतो तसा भीमानें तुझ्या पुत्रावर धांवून गदेचा प्रहार केला. त्या काळीं दुर्योधन भूमीवर गुडघे टेंकून मूर्च्छित झाला. तें पाहून सृंजयांनीं मोठा सिंहनाद के

ला. तो ऐकतांच दुर्योधन क्रोधानें श्वास टाकीत नेत्रानें भीमास दग्ध करतो काय असा दिसूं लागला. तेव्हां भीमानें तुझ्या पुत्रावर गदेचा प्रहार करितांच दुर्योधन भूमीवर पडला. तेव्हां पुनः क्रोधानें भीमाचें कर्म सहन न करितांत्या स युद्धांत भूमीवर पाडून दुर्योधनानें सिंहनाद केला आणि गदेनें आपल्याश रीराचें रक्षण केलें. तेव्हां अंतरिक्षांत देवानीं मोठा नाद करून दुर्योधनावर पु ष्पांचा वर्षाव केला. नंतर भीमसेन दोन घटिकानीं शुद्धीवर येऊन त्यानें रक्ता नें भरलेल्या आपल्या मुखाचें परिमार्जन करून धैर्यानें नेत्र फिरवीत पुनः तो उभा राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

५८. अध्याय अठ्ठावन्नः— संजय म्हणतो हे धृतराष्ट्रा, उभयतांचें युद्ध पाहून अर्जुनानें बोलतो हे कृष्णा, या दोघां वीरांत श्रेष्ठ कोण आहे? व कोणांत कोणता गुण अधिक आहे तो सांग? असें ऐकतांच कृष्ण सांगतात हे अर्जुना, त्या दोघांस उपदेश समानच असतां भीम बलाढ्य आहे. दुर्योधन भीमा पेक्षां यत्नवान् असून कुशल आहे. भीमसेन धर्मानें जर युद्ध करील तर दुर्यो धनास कधीं जिंकणार नाहीं. अन्यायानें युद्ध करील तर त्यास मारीलच. देवां नीं असुरांचा पराजय कपटानेंच केला. इंद्रानें विरोचनास तसाच जिंकिला. तस्मात् भीमानें कपट युद्धाचा आश्रय करून द्यूतकालीं गदेनें दुर्योधनाच्या ऊरूचा भेद करीन अशी जी प्रतिज्ञा केली तीचें तो पालन करो. जर भीमब लाचा आश्रय करून न्यायानें वागेल तर धर्मराज पुनः संकटांत पडेल. धर्म राजाच्या अपराधानें आपणास पुनः भय प्राप्त झाहलें असें समज. तुह्मींपू र्वी महत् कर्म करीत भीष्मादिकांस मारून जय प्राप्त केलात आणि वैरही दूर केलें. तो पुनः विजय संशयित होईल. धर्मराजाची ही मोठी अबुद्धि आहे ती अशी कीं, आम्हांतून एकास जिंकिलें असतां तूंच राज्य कर असें त्यानें दुर्योध नास सांगितलें आहे यास्तव अन्यायानें भीम दुर्योधनास न मारील तर दुर्योधन च राज्य करील. संजय म्हणतो हे धृतराष्ट्र, असें कृष्णाचें भाषण ऐकून अर्जुना नें भीमसेन पहात असतां सव्य ऊरूचें ताडन केलें. तेव्हां तो खूण जाणून भीम गदेच्या योगें अनेक मंडलें प्रदर्शित करून दुर्योधनास मोहित करीत संचा र करूं लागला. तसाच तुझा पुत्र ही गदायुद्धांत कुशल असल्यामुळें भीम

सेनास मारण्याच्या इच्छेनें वेगानें संचार करूं लागला. या प्रमाणें उभयतां एक मेकांवर गदेचा प्रहार करीत असतां त्यांचीं अंगें रक्तानें भरून जर्जर झालीं. नंतर तुझ्या पुत्रानें भीमसेनावर गदेचा प्रहार केला त्या योगें भीमाचे अंगांतू न रक्ताचा स्राव झाल्यामुळें तो बहुत पीडित झाला. तथापि भीमानें पीडा सहन केल्यामुळें दुर्योधनानें जाणलें नाहीं. नंतर दोन घटिकाविश्रांति घेऊन भीम वेगानें दुर्योधनावर गेला. त्या कालीं दुर्योधन भीमाचा छल करावा म्हणू न उड्डाण करण्याची इच्छा करूं लागला. तें दुर्योधनाचें इच्छित भीमसेनानें जाणून दुर्योधनाच्या ऊरूचा गदेनें भेद केला. तेव्हां तुझा पुत्र ऊरुभेद झाल्या मुळें पृथ्वीवर पडला. तेव्हां पृथ्वीकंप व रक्ताचा पर्जन्य तसाच अंतरिक्षांत यक्ष, राक्षस, पिशाच यांचा मोठा नाद जाहला. आणि स्त्रिया, पुरुषा सारख्या व पुरुष स्त्रियां सारखे झाले असा तुझा पुत्र दुर्योधन पडला असतां पांडव अद्भुत उत्पात पाहून उद्विग्न जाहले. नंतर देव गंधर्व आप आपल्या मार्गानें गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

५९. अध्याय एकुणसाठ — संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र, भीमसेनानें दुर्योधनास पाडलें हें पाहून पांडव संतुष्ट जाहले. तेव्हां भीमसेन दुर्योधनास मारून बोलतो, हे दुर्बुद्धे पूर्वीं सभेमध्यें हास्य करीत एक वस्त्रा द्रौपदी असतां आह्मांस गोंगों: असें बोललास त्या उपहासाचें फल आज तुला मास होवो. असें बोलून भीमानें वामपादानें दुर्योधनाच्या कीरिटास पाहून त्याच्या शिरास पुनः लत्ताप्रहार केला. आणि पुनः क्रोधानें भाषण केलें कीं जे मूर्ख पूर्वीं आमच्या पुढें गोंगों: असें ह्मणून नाचले त्यां पुढें आह्मीं आज बाहुबलाच्या आश्रयानें पीडा देऊन नृत्य करितों. यांत आह्मीं कांहीं कपट केलें अथवा अग्नि लाविला अथवा वंचना केली असें नाहीं. असें बोलून पुनः हास्य करीत भीमसेन बोलला कीं, ज्यानीं द्रौपदी रजस्वला असतांनीस सभेंत आणून आह्मांस षंढतिल असें भाषण केलें. ते धृतराष्ट्राचे पुत्र याज्ञसेनीच्या तपोबलानें आह्मीं मारिले. ते आह्मीं स्वर्गास जाऊं अथवा नरकांत पडूं. असें बोलून पुनः वामपादाचा प्रहार दुर्योधनाच्या शिरावर करून भीम वल्गना करीत नृत्य करीत असतां धर्मराज बोलला. हे भीमा, शत्रूभ

थवा अधर्म कर्मानें तूं आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेऊन वैराचा शेवट केलास. आतां विराम पाव. अकरा अक्षौहिणी सेनेचा अधिपति असून कुरुकुलाचा राजा, आपला संबंधि व हतबंधु अशा दुर्योधनास लत्ताप्रहार करून तूं उपहास करूं नकोस. हे भीमा, हा आपला बंधु असून यास पिंड न मिळेल असें केलेंस हें तूं उचित केलें नाहींस. पूर्वी भीमसेन धार्मिक आहे असें बोलत होते तो तूं या राजावर पादप्रहार करितोस हें काय? असें बोलून धर्म राज अश्रुकंठ होऊन दीन झाला आणि दुर्योधनाजवळ येऊन बोलला हे तात, तूं आतां क्रोध करूं नकोस. सांप्रत प्रारब्ध योगानें आह्मांस तुझ्या पूर्वकर्मानें तुला मारण्याचा प्रसंग घडला. हें संकट तूं आपल्याच अपराधानें पावलास. तुझ्याच अपराधानें तुझे बंधु आह्मीं रणांगणीं पाडिले. यास्तव तुला मृत्यु श्लाघ्यच आहे. तस्मात् शोक करूं नकोस. सांप्रत सर्वावस्थेंत आह्मींच शोक करण्यास योग्य झालों. आतां बंधूंनीं हीन असे आह्मीं भ्रातृपुत्रांच्या शोकानें विव्हल होऊन दीनपणानें कसें वागावें आणि शोकयुक्त झालेल्या विधवा स्त्रियांस कसें पहावें. तूं मात्र एकटा स्वर्गी जाशील. आह्मीं नरकांत पडून दारुण दुःख पावूं. स्नुषा विधवा झाल्यामुळें आमची बहुत निंदा करतील. असें धर्मराजानें भाषण करून श्वासोच्छ्वास टाकीत बहुत वेळ विलाप केला. अशी-कथा या अध्यायीं झाली.

६०. अध्याय साठावा- धृतराष्ट्र बोलतो हे संजया; भीमानें दुर्योधनास अधर्मानें मारलेलें पाहून बलराम काय बोलला तें मला सांग? असें ऐकून संजय बोलतो हे धृतराष्ट्रा, भीमानें तुझ्या पुत्राच्या शिरावर ताडन केलें असतां बलराम ऊर्ध्व बाहू करून राजमंडळामध्यें आर्तस्वरानें बोलला हे भीमा, तुला धिःकार असो. असें बोलून पुनः बलराम बोलला. धर्मानें गदायुद्ध चाललें असतां नाभीच्या अधोभागीं प्रहार करण्याविषयीं शास्त्रांत सांगितलें नसून या मूढ भीमानें स्वच्छंदानें नाभीच्या अधोभागीं प्रहार केला असें बोलून बलराम आरक्त नेत्र झाला. आणि नांगर घेऊन भीमावर धांऊन गेला असतां कृष्णानें मोठ्या यत्नानें त्यास धरिलें. तेव्हां ते उभयतां चंद्रसूर्यासारखे दिसूं लागलें. तेव्हां कृष्ण क्रुद्ध झालेल्या बलरामाचें सांत्वन करीत बोलूं लागले कीं, पां

इव हे आमचे सहज मित्र असून पितृभगिनीचे पुत्र आहेत. त्यांस शत्रूनीं वंचित केलें तेव्हां भीमानें प्रतिज्ञा केली कीं, दुर्योधनाच्या ऊरूचा भेद गदेनें करीन त्या प्रतिज्ञेचें पालन त्यानें केलें हा धर्मच समजतों. आणि दुर्योधनास मैत्रेय ऋषीनीं पूर्वी असा शाप दिला होता कीं, हा भीम गदेनें तुझ्या ऊरूचा भेद निःसंशय करील त्या प्रमाणें हें कर्म घडलें. हे बलरामा, आपण क्रोध करूं नका. पांडवांचा व आपला स्नेह संबंध असल्यामुळें त्यांची वृद्धी झाली असतां आपलीच वृद्धि आहे यास्तव तूं क्रोध करूं नकोस. असें ऐकून बलराम बोललेहे कृष्णा, या भीमानें अर्थलोभास्तव धर्मास बाध आणिला हें खचित आहे. आतां तूं यथेष्ट बोलतोस हा धर्म नव्हे. असें ऐकून कृष्ण म्हणतात हे बलरामा तुम्हांस राग नसून धर्मावर तुमची प्रीति अशी लोकांत ख्याति आहे. यास्तव शांत व्हा. अहो हें कलियुग आहे. आणि पांडवांची प्रतिज्ञा असल्यामुळें हा भीमसेन वैराचा शेवट पावो. संजय म्हणतात हे धृतराष्ट्रा, केशवापासून धर्मछल ऐकून बलराम संतुष्ट न होतां सभांत बोलला कीं, अधर्मानें दुर्योधनास मारिल्यामुळें त्या लोकांत भीम कपटानें युद्ध करतो अशी ख्याती होईल. तसाच दुर्योधन सरळ युद्ध करीत असतां मृत झाला तो उत्तम गतीस जाईल. असें बोलून बलराम द्वारकेस निघून गेला. तेव्हां धर्मराज दीन होऊन अधोभागीं मुख करून बसला असें पाहून कृष्ण बोलला हे धर्मराजा, भीमानें दुर्योधनाचें शीर पायानें मर्दन केलें असतां तूं अधर्म झाला असें कां मानितोस? असें ऐकून धर्मराज बोलला हे कृष्णा, वृकोदरानें क्रोध करून दुर्योधनाच्या मस्तकावर पादप्रहार केला हें मला प्रिय नाहीं. व कुलक्षय झाल्यामुळें मी हर्ष पावत नाहीं. आतां धृतराष्ट्राच्या पुत्रानीं आम्हांस वंचना करून वनास पाठविलें तें दुःख भीमास फारच जाहलें. असें चिंतन करून मी उपेक्षा केली. संजय म्हणतो हे धृतराष्ट्रा, असें धर्मराजाचें भाषण ऐकून कृष्ण खिन्न होऊन बोलतात असो तर. असें म्हणून भीमाचें प्रिय व हित करण्याच्या इच्छेनें भीमानें केलेल्या कर्मास कृष्णानें अनुमोदन दिलें. तेव्हां भीमसेन धर्मराजाच्या अग्रभागीं हात जोडून उभा राहिला. आणि नमस्कार करून बोलला हे महाराजा, आज सर्व पृथ्वी निष्कंटक झाली. इचें स्वधर्मानें

तूं पालन कर. असें ऐकून धर्मराज बोलतो हे भीमा, आज दुर्योधन नष्ट जा ह्ल्यामुळें वैराचा शेवट जाहला. कृष्णाच्या मतानें ही पृथ्वी आपण जिंकिली. तूं पारब्धाच्या योगें आज शत्रू रणांगणीं पाडिलास. अशी कथा या अध्यायीं आहे.

६१. अध्याय एकसष्ट :—धृतराष्ट्र बोलतो हे संजया, भीमानें दुर्योधनास मारलेलें पाहून पांडव व सृंजय याणीं काय केलें तें सांगा? असें ऐकून संजय सांगतो हे राजा, भीमानें दुर्योधनास मारल्यावर हर्ष पावलेल्या कृष्णासहित पांडव, सृंजय, पांचाल यानीं आपलीं उत्तरीय वस्त्रें उडवीत सिंहनाद केला तेव्हां पांचाल, सृंजय यांचा हर्ष पृथ्वीस सहन झाला नाहीं. तेव्हां कोणीं धनुष्याचे टणत्कार केले. व कोणी दुंदुभी वाजवूं लागले. कोणी हसून भीमसेनास बोलले आज रणांत तूं मोठें दुष्कर कर्म केलेंस व धर्मराजाचा अपराध ज्यानीं केला त्यांच्या मस्तकावर तूं दैवानें पाय दिलास. असें भीमास बोलत असतां कृष्ण सर्वांस ह्मणतात. आपल्या पित्याचा अंश पांडवानीं मागितला असून या दुर्योधनानें तो अंश न देतां पांडवांस कठोर भाषणें केलीं. यास्तव हा दुर्योधन अमात्यादिकांसहित हत झाला. असें ऐकून दुर्योधन कठोर वाणीनें कृष्णास ताडन करीत बोलतो हे कृष्णा, तूं भीमास ऊरूचा भेद कर असें स्मरण करून अधर्मानें मला गदायुद्धांत मारविलेंस तसेंच भीष्मप्रभृति वीरांसही कपटानेंच मारविलेंस याची तुला लाज कशी नाहीं. जर तुह्मीं धर्मानें युद्ध करतां तर तुह्मांस जय कधींच प्राप्त न होता. आह्मीं स्वधर्मानें वागलों. यामुळें तुह्मीं आमचा घात केलात. असें ऐकून कृष्ण ह्मणतात हे गांधारी पुत्रा, तूं पापमार्गानें वागल्यामुळें मृत जाहलास तुझ्याच दुष्कर्मानें भीष्म द्रोण पडले आणि कर्ण तुला अनुकूळ असल्यामुळें युद्धांत पडला. याज्ञसेनी रजस्वला असतां तीस सभेंत तूं आणिलेंस व अभिमन्यूस अधर्मानें बहुतांच्या हातून मारविलेंस इत्यादि अनेक दुष्कर्मे केल्यामुळें तूं रणांत हत झालास व मैत्रेय प्रभृतीनीं तुझ्या हिताचें भाषण केलें असतांही तूं ऐकिलें नाहींस त्या कर्माचें हें फल भोग. असें ऐकून दुर्योधन बोलतो हे कृष्णा मी यथाविधि दान करीत पृथ्वीचें पालन करून सर्व शत्रूंच्या शिरांवर वागलों. व क्षत्रियांस इष्ट जें मरण तें मला प्राप्त झालें यांत माझें काय अनिष्ट झालें. मी तर इष्टमित्रांसहित स्वर्गास जाणार. तुह्मीं मात्र

हतसंकल्प होऊन शोक करीत रहा. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्र, असें दुर्योधन बोलत असतां त्याजवर दिव्यपुष्पांची वृष्टि झाली व गंधर्वांनीं अनेक प्रकारचीं वाद्यें वाजविलीं. अप्सरा नृत्य करूं लागल्या. सिद्धानीं साधु साधु अशी प्रशंसा केली. अशीं अद्भुत कर्में पाहून कृष्णप्रमुख सर्व पांडवादिक दुर्योधनाचा सत्कार पाहून लज्जित झाले आणि अधर्मानें भीष्मादिक मरण पावले असें ऐकून पांडव शोक करीत दीन मनस्क झाले. तेव्हां कृष्ण बोलतात हे पांडव हो, सरळ युद्धानें तुह्मीं भीष्मादिकांस मारण्या विषयीं समर्थ नव्हतां ह्मणून मी तुमचें हित करण्याच्या इच्छेनें अनेक कपटांची योजना केलीन व्हती. नर तुह्मांस जय कधीं मिळाला नसता व ते कपटी असल्यामुळें त्यांचा कपटानें वध करणें युक्तच आहे. आणि हा मार्ग असुर घाता विषयीं देवानींही स्वीकारिलेला आहे यास्तव त्याच मार्गानें सर्वांनीं वागणें युक्त आहे. आतां आपण कृतकृत्य झालों. व सायंकाल झाला यास्तव सैन्यासह वर्तमान सर्व विश्रांति पाऊं असें कृष्णाचें वचन ऐकून पांडवांसहित पांचाल हर्ष पावले. आणि त्यानीं सिंहनाद केला. तेव्हां कृष्णानीं पांचजन्य शंखाचा नाद केला. तसेंच इतरांनींही आपापल्या शंखाचे नाद केले. असा विषय या अध्यायांत आहे.

६२. अध्याय बासष्ट:- संजय बोलतो हे धृतराष्ट्र, नंतर ते सर्व राजे व पांडव शंखनाद करीत हर्षानें आपापल्या शिबिरांत जात असतां आह्मींही शिबिरांत जाण्यास निघालों. तेव्हां पांडव उत्साह रहित अशा दुर्योधनाच्या शिबिरांत गेले. तेव्हां कृष्ण बोलतात हे अर्जुना, गांडीव धनुष्य व भाते खालीं ठेव. ह्मणजे मी रथांतून उतरतों. नंतर तूं उतर यांत तुझें श्रेय आहे. असें ऐकतांच अर्जुनानें त्या प्रमाणें केलें. नंतर कृष्ण अश्वांचे रश्मि सोडून अर्जुनाच्या रथापासून खालीं उतरले तेव्हां कपि अंतर्धान पावला. नंतर द्रोणादिकांच्या अस्त्रानीं अर्जुनाचा रथ दग्ध झाला. तेव्हां पांडवानीं भस्म झालेल्या त्या रथास पाहून कृष्णास नमस्कार करीत हात जोडून भाषण केलें. हे गोविंदा हा रथ अग्नीनें दग्ध केला हें आश्चर्य आहे. यास्तव त्याचें कारण सांगा. असें ऐकून कृष्ण ह्मणता हे पांडव हो हा रथ पूर्वींच अस्त्रानीं दग्ध झाला परंतु मी त्याजवर होतों त्यामुळें समरंगणीं तो पडला नाहीं आतां मीं उतरल्यामुळें ब्रह्मास्त्राचे तेजानें हा

पृथ्वीवर भस्म होऊन पडला. असें बोलून धर्मराजास कृष्णानीं आलिंगन करून भाषण केलें कीं, तुह्मीं सर्व या संग्रामांतून दैवानें मुक्त जाहलां. आतां जीं कर्तव्य कार्यें तीं करून उपप्लव्य नगरास जा. हे धर्मा, पूर्वीं मधुपर्क पूजा करून मला तूं बोललास कीं, कृष्णा माझा भ्राता व तुझा सखा हा अर्जुन सर्व संकटांपासून रक्षावा. त्या प्रमाणें त्या अर्जुनाचें बंधूंसहित रक्षण केलें. असें ऐकून धर्मराज हर्षानें बोलला हे कृष्णा, द्रोणादिकानीं मुक्त केलेल्या ब्रह्मास्त्राचें तुज वांचून कोण सहन करील? तुझ्याच प्रसादानें अर्जुन युद्धांत पराजित झाला नाहीं व उपप्लव्य नगरीं व्यास बोलले कीं, जिकडे धर्म तिकडे कृष्ण आणि जिकडे कृष्ण तिकडे जय. तेंच खरें झालें. संजय ह्मणतो हे धृतराष्ट्रा, असें बोलून पांडवानीं तुझ्या शिबिरांत प्रवेश करून मणि, मौक्तिकें, भूषणें, दास, दासी, असंख्यात द्रव्य घेऊन हर्षानें मोठा नाद केला. आणि वाहनें मुक्त करून शिबिरांत सर्व पांडव बसले तेव्हां कृष्ण बोलतात आज आपण मंगलार्थ शिबिराच्या बाहेरच राहावें. असें ऐकून कृष्णासहित सात्यकी, पांडव शिबिराबाहेर येऊन ओघवती नदीच्या तीरीं त्या रात्रीं राहिले. तेव्हां धर्मराज बोलला हे माधवा, तूं त्वरेनें गांधारी जवळ जाऊन अनेक युक्तीनें तिचें समाधान कर; व वेदव्यासही तेथें येतील असें ऐकतांच कृष्ण गांधारी समीप आले. असा विषय या अध्यायांत आहे.

६३. अध्याय त्रेसष्ट:— जनमेजय प्रश्न कर्तो, हे वैशंपायन ऋषे, पूर्वीं कृष्ण कौरवांकडे शाम करण्या करितां गेले असतां शम न होतां युद्धच झालें. असें असतां गांधारीच्या समाधाना करितां धर्मराजानें कृष्णास पुनः पाठविलें. याचें कारण काय तें सांगा. असें ऐकून वैशंपायन सांगतात हे जनमेजया, भीमसेनानें गदायुद्धांत दुर्योधनास अन्यायानें मारिलें असें पाहून धर्मराजास मोठें भय प्राप्त झालें. तें असें कीं, घोर तपानें युक्त गांधारीस जर दुर्योधनास भीमसेनानें कपटें करून मारिलें असें जर समजलें तर ती आह्मांस क्रोधाग्नीनें भस्म करील. असें चिंतन करून धर्मराज बोलतात हे कृष्णा, तुझ्या प्रसादानें निष्कंटक राज्य आम्हांस प्राप्त झालें; परंतु कृष्णा, सांप्रत जय प्राप्त असूनही मनास मोठा संशय प्राप्त झाला आहे. यास्तव गांधा-

रीच्या क्रोधाचें तूं जाऊन शमन करशील तर आमचें कल्याण होईल. असें ऐकून कृष्ण रथांत बसून हस्तनापुरास गेले आणि त्यांनीं रथाचा मोठा नाद केला. नंतर धृतराष्ट्राच्या घरीं जाऊन त्यास व पूर्वीं तेथें आलेल्या व्यासास व गांधारीस नमस्कार केला. आणि धृतराष्ट्राच्या हस्तास स्पर्श करून श्रीकृष्ण रोदन करूं लागले तेव्हां एक मुहूर्ता नंतर श्रीकृष्णानीं उदकानें नेत्रक्षालन करून यथाविधि आचमन केलें.

नंतर धृतराष्ट्रास कृष्ण बोलतात हे राजा, तुला कालाचें वृत्त विदित च आहे. जर तुझ्या चित्तानुरोधें करून वर्तणाऱ्या पांडवांशीं पूर्व संकेता प्रमाणें तूं वर्तन करतास तर हें क्षत्रिय कुल नाश पावलें नसतें. या वंशाचा नाश न व्हावा ह्मणून स्वतः मी व जामदग्न्य प्रभृतीनीं येऊन शम करण्या विषयीं सांगितलें तथापि तूं ऐकिलें नाहींस. यास कालच कारण आहे तर घडलेल्या कृत्या विषयीं पांडवांवर दोष दृष्टि करण्याचें कारण नाहीं. आतां तूं व गांधारी उभयतां शोक न करितां पांडवांचें कल्याण करण्या विषयीं दृष्टि ठेवा. तुला माझा नमस्कार असो. धर्मराज तुझें व गांधारीचें चिंतन करून बहुत खिन्न आहे. असे धृतराष्ट्राशीं बोलून कृष्ण गांधारीस बोलतात हे गांधारी, तुझ्या सारखी उत्तम स्त्री या लोकांत कोणी नाहीं व तूं सभेंत माझ्या सन्निध उभयपक्षाच्या हिताचें भाषण केलेंस. परंतु तुझ्या मुलानीं ऐकिलें नाहीं तेव्हां दुर्योधनास तूंच कठोर भाषण केलेंस कीं, हे मूढा जिकडे धर्म तिकडे जय आहे. त्या प्रमाणेंच गोष्ट घडून आली. हें जाणून पांडवांच्या नाशा विषयीं बुद्धि करूं नकोस. हे महाभागे, तूं तपोबल व क्रोध येणें करून सकल पृथ्वीसही दग्ध करण्यास समर्थ आहेस यास्तव मी तुझी प्रार्थना करितों. असें ऐकून गांधारी बोलल्ये हे केशवा, तूं बोलतोस हें सत्यच आहे. मी चिंतेनें दग्ध झाल्यें ह्मणून माझी बुद्धि चळली आहे. ती आतां तुझें वाक्य ऐकून स्थिर झाली. आतां धृतराष्ट्रास पांडवांसहित तूंच गति आहेस असें बोलून पुत्र शोकानें गांधारी रुदन करूं लागली तेव्हां कृष्णानीं त्या उभयतांचें अनेक वाक्यानीं समाधान करून त्यांस नमस्कार केला. इतक्यांत अश्वत्थाम्याचा अभिप्राय जाणून कृष्ण त्वरेनें उठले. आणि धृतराष्ट्रास बोलले हे राजा, अश्वत्थाम्याच्या मनांत असें आ

लें आहे कीं, रात्रीं पांडवांचा वध करावा. यास्तव मी त्वरित जातों. तुह्मीं उभ
यतां शोक करूं नका. असें ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे कृष्णा त्वरित जाऊन पांड
वांचें रक्षण कर. तुझी आमची पुनः गांठ पडेल. असें ऐकून कृष्ण त्वरेनें पांड-
वांच्या शिबिरांत आले आणि त्यानीं झालेलें वर्तमान पांडवांस सांगितलें. व्या
सही धृतराष्ट्रचें समाधान करून गेले. असा विषय या अध्यायांत आहे.

६४. अध्याय चौसष्ट:— धृतराष्ट्र बोलतो हे संजया, वीर मानी माझा पु
त्र ऊरुभग्न झाल्यावर काय बोलला तें सांग. असें ऐकून संजय बोलतो हे
राजा, तुझा पुत्र ऊरुभग्न होऊन धुळींत लोळत असतां चहूंकडे पाहून धर्म
राजाची निंदा करीत मला बोलला. हे संजया, अकरा अक्षौहिणी सेनेचा
अधिपति असून मी या दशेस पावलों. पापी भीमसेन अधर्मानें जय मिळ
वून हर्ष पावला. आणि त्यानें पायानें माझ्या शिराचें मर्दन केलें ही वार्ता मा
झ्या मातापितरांस कळीव. पांडव अधर्मास प्रवृत्त झाले यास्तव त्यांचा वि
श्वास तुह्मीं धरूं नका. आतां भीष्मादिक वीर व माझे भ्रातृपुत्रादिक ज्या
मार्गास गेले त्या मार्गास मी जातों. हे संजया माझे पितर व आमच्या कुळां
तील सर्व स्त्रिया शोक करतील. मी तर उत्तम लोकास जाईन. असा दुर्योध
न प्रलाप करून बोलला. हे संजया मला कपटानें भीमानें मारिलें. हें वर्त-
मान जे कोणी माझ्या सेनेंतील वीर जीवंत असतील त्यांस सांग. येथें को
णी चार्वाक अथवा कोणी सन्याशी असेल तो हें वर्तमान सांगेल. असा त्या
चा प्रलाप ऐकून पृथ्वी चंचलित झाली. तेव्हां जासुदानीं तें दुर्योधनाचें भाष
ण अश्वत्थाम्यास सांगितलें. असा विषय या अध्यायांत आहे.

६५. अध्याय पांसष्ट:— संजय म्हणतो हे धृतराष्ट्रा, जासुदापासून दु
र्योधन हत झाला हें वर्तमान ऐकतांच अश्वत्थामा, कृप, कृतवर्मा हे तिघे त्वरि
त गतीनें दुर्योधनाजवळ आले तेव्हां दुर्योधन भूमीवर पडला हें पाहून ते मू
र्छा पावले. नंतर सावध होऊन दुर्योधनासमीप बसले. तेव्हां अश्वत्थामा रु
दन करून श्वासोच्छ्वास टाकीत दुर्योधनास बोलतो हे राजा, तूं पूर्वीं पृथ्वीपति
असून आज या निर्जन वनांत धुळींत एकटाच कसा लोळतोस? दुःशासन
कर्ण इत्यादिकांस मी कोठेंही पहात नाहीं हें काय? तुझें तें निर्मल छत्र व

व्यजन आणि ती सेना कोठें गेली याजवरून मला असें वाटतें कीं, सर्व मनुष्यांत ऐश्वर्य चिरकाल राहात नाहीं. असें ऐकून दुर्योधन बोलला हे वीरहो, सर्व भूतांचा जो काल नाश करितो तो आज तुमच्या समक्ष मजवर आला त्या योगें पापी पांडवानीं छलें करून मला मारिलें. या रणापासून तुह्मीमात्र वांचलांत हें मी दैवानें पाहतों. आतां तुह्मी या माझ्या मरणानें संताप पावूं नका. जर वेद प्रमाण आहे तर मी अक्षय लोक जिंकिले. कृष्णाच्या प्रभावास मानून मी क्षत्रिय धर्मापासून भ्रष्ट झालों नाहीं यास्तव तुम्हीं शोक करूं नका. आतां विजय होण्या विषयीं तुह्मीं यत्न केलात परंतु दैव दुरतिक्रम असल्यामुळें तो प्राप्त झाला नाहीं असें बोलून राजा अत्यंत विव्हल होऊन स्तब्ध राहिला त्यास पाहून अश्वत्थामा संतापानें हाताचर हात चोळून सद्गदित वाणीनें दुर्योधनास बोलला हे राजा, आज तुला कपटानें भीमसेनानें मारिलें या योगें मी जसा संताप पावलों तसा क्षुद्र पांडवानीं नृशंस कर्मानें माझा पिता मारिला त्या योगें संताप पावलों नाहीं. आतां माझी प्रतिज्ञा ऐक. मी दानव धर्म केला असल्यास त्या योगें कृष्ण पहात असतां सर्व पांचालांस मारितों. या विषयीं तूं मला आज्ञा दे. असें ऐकून दुर्योधन अश्वत्थाम्यास संतोषदायक वाक्य कृपाचार्यासीं बोलला. हे आचार्य, त्वरित जलपूर्ण कलश आण म्हणजे मी या ब्राह्मणास सेनापत्या विषयीं अभिषेक करितों कारण ब्राह्मणानें राजाज्ञेनें युद्ध करावें. असें धर्मवेत्ते सांगतात या प्रमाणें दुर्योधनाचें वचन ऐकून कृपाचार्यानें अश्वत्थाम्यास सेनापत्या विषयीं अभिषेक केला. नंतर अश्वत्थामा दुर्योधनास आलिंगन करून सिंहनादानें सर्व दिशा नादित करीत गेला. दुर्योधनासही सर्व भूतांस भयावह अशी रात्र प्राप्त झाली. तेव्हां अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा हे समरभूमींतून निघून शोक करीत चिंता करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे. श्रीराम.

इति शल्यपर्वांतर्गत गदापर्व समाप्तम्. श्रीकृष्णार्पणमस्तु.

# श्री·

# अथ सौप्तिकपर्व प्रारंभः

श्रीगणेशायनमः॥ अध्याय पहिला.॥ संजय बोलतो हे धृतराष्ट्रराजा, दुर्योधनानें अश्वत्थाम्यास सेनापति केल्यावर अश्वत्थामा, कृपाचार्य, व कृतवर्मा हे वीर एकत्र झाले व दक्षिणेस मुखें करून पलायन करीत शिबिराजवळच्या एका प्रदेशांत आले आणि भयभीत झाल्यामुळें आपलीं वाहनें टाकून सेनेच्या आसमंतात्‌भागीं राहिले. ते शत्रूंच्या शस्त्रांनीं विद्ध झाल्यामुळें श्वासोच्छ्वास टाकीत पांडवांचें चिंतन करीत आहेत तों पांडवांचा घोर नाद ऐकतांच भयानें पुनः आपलीं वाहनें जोडून पलायन करूं लागले. असें संजयाचें वाक्य ऐकून धृतराष्ट्र बोलतो· हे संजया, माझ्या पुत्रास दहासहस्र गजांचें बल असून तो सर्व प्राणिमात्रांस अवध्य व वज्रासारखा दृढशरीरी व तरुण असतां भीमसेनानें युद्धामध्यें त्यास कसा मारला? पांडवांनीं एकत्र होऊन माझे शत पुत्र मारिले. आतां आम्ही उभयतां मृतपुत्र झालेले वृद्ध राहिलों· यास्तव पांडवांचे देशामध्यें राहण्यास मी उत्साह पावत नाहीं· मी स्वतः पूर्वीं राजा असून दुर्योधन राजाचा पिता होतों· आज मी पांडवांच्या आज्ञेनें दासासारखा वर्तूं कीं काय? हे संजया, एकट्या भीमसेनानें माझे शंभर पुत्र मारिले. त्या भीमसेनाचीं भाषणें श्रवण करण्यास मी कसा शक्य होऊं? विदुराचें भाषण माझ्या पुत्रानें श्रवण न करितां भीमसेनाची प्रतिज्ञा सत्य केली· हे संजया, बरें अधर्मानें माझा दुर्योधन पुत्र भीमसेनानें मारल्यावर कृतवर्मा, कृपाचार्य व द्रोणी हे काय करिते झाले असा त्याचा प्रश्न ऐकून संजय बोलतो· हे धृतराष्ट्रराजा, पुढें असें वर्तमान झालें कीं, कृतवर्मा, कृपाचार्य व द्रोणी हे तुझ्याकडील तीन योद्धे पलायन करून फार दूर गेले नाहींत तों त्यांणीं नाना प्रकारच्या द्रुमांनीं व लतांनीं युक्त असें एक वन पाहिलें. नंतर त्यांत जाऊन आपले अश्वांस पाणी पाजून एक मुहूर्त पर्यंत ते विश्रांत झाले तों इतक्यांत सूर्यास्तसमय झाला· तें वन नाना प्रकारच्या मृगगणांनीं सेविन, नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं वेष्टित, ना-

नाप्रकारच्या वृक्षलतानीं आच्छादित अशा घोर वनामध्यें ते गेले. नंतर आसमं तात्भागीं अवलोकन करीत असतां सहस्त्रावधि शाखानीं युक्त सर्व वृक्षांत श्रेष्ठ असा एक वटवृक्ष पाहतांच त्या खालीं आले. नंतर रथाखालीं उतरून अश्व सोडले. नंतर जलस्पर्श करून यथाविधि संध्याकर्म करण्यास आरंभ-केला, तों इतक्यांत सूर्य अस्तास जाऊन रात्र झाली. त्या काळीं ग्रहनक्षत्र, तारानीं व्याप्त झालेलें आकाश चोहींकडून वस्त्रासारखें सुशोभित दिसूं लागलें. त्या वनांत रात्रीं संचार करणारे जे जीव ते शब्द करूं लागले. व दिवसास संचार करणारे जे ते निद्रिस्त झाले. राक्षसांस भयंकर रात्र प्राप्त झाल्यामुळें आनंद झाला. त्या रात्रीच्या आरंभीं दुःख आणि शोक याणीं व्याप्त झालेले कृपाचार्य कृतवर्मा. अश्वत्थामा हे त्या वटवृक्षा खालीं कौरव व पांडवांचा क्षय झाल्याचा वृत्तांत सांगत असतां निद्रेनें व्याप्त झाल्यामुळें तसेच धरणीवर बसले. शत्रूंच्या शरानीं बहुत विद्ध झाल्यामुळें त्यास अतिशय श्रम झाला. कृपाचार्य व कृतवर्मा या उभयतां महा रथ्यांस अत्यंत श्रम झाल्यामुळें ते धरणीवर निद्रिस्त झाले. अश्वत्थामा तर अतिशय क्रोधयुक्त होऊन सर्पासारखा श्वासोच्छ्वास टाकीत होता व त्यास निद्रा न आल्यामुळें रात्रीचे ठायीं त्यानें घोर अरण्यांत चोहींकडे अवलोकन केलें. तों सहस्त्रावधि काक वृक्षांवर निजले आहेत अशा वटवृक्षाकडे पाहिलें. तेथें काकपक्षी विश्वासयुक्त निद्रिस्त असतां भयंकर ज्याचें स्वरूप असा एक उलूक तेथें एकाएकीं पाहिला. त्या उलूकानें बारीक शब्द-करून व वटवृक्षाच्या शाखे मध्यें गुप्त राहिल्यासारखें करून जे जे आपल्या सन्निध वायस होते, त्यांस भक्षण करूं लागला. कितीएकांचे पक्ष व शिरें व पाय त्याणें तोडून खालीं पाडले. एका क्षणांत त्या पक्ष्यानें जितके काक दृष्टिगोचर झाले त्यांस मारून खालीं पाडलें तेणें करून वटवृक्षांचा खालचा प्रदेश व्याप्त झाला. हें पाहून उलूकास मोठा आनंद झाला. उलूकाचें कृत्य द्रोणपुत्रानें पाहून आपणाही असाच शत्रूंचा सूड उगवावा, असा संकल्प करून मनामध्यें ह्मणों लागला कीं, या पक्ष्यानें शत्रूंचा असाच सूड उगविण्या विषयीं मला उपदेश केला, यांत संशय नाहीं. प्रस्तुत शत्रूंचा क्षय करण्या विषयीं काल प्राप्त झाला आहे; परंतु पांडव बलाढ्य असल्या मुळें

त्यांचा क्षय करण्यास मी समर्थ नाहीं ते बलवान् आहेत, त्यांस युद्धा मध्यें जय प्राप्त झाला ह्मणोन ते उत्साहयुक्त झाले आहेत. त्यांचा वध करण्या विषयीं मी दुर्योधनाजवळ प्रतिज्ञा केली होती. त्यायानें जर मी युद्ध करीन तर ते माझा प्राण घेतील. आज कपटानें मी वागलों तर त्याचा क्षय होऊन माझी अर्थसिद्धि होईल. क्षात्रधर्मानें वागणाऱ्या मनुष्यानें लोकनिंदित जें कर्म आहे तेंही करावें. पहा बरें दुष्ट व अकृतात्म्या पांडवानीं शत्रूच्या वधाविषयीं कुत्सित कर्म केलीं या विषयीं न्याय पाहणाऱ्या पुरुषानीं नियम करून ठेविले आहेत कीं, शत्रु परिश्रांत असले, विदीर्ण झाले असले, भोजन करीत असले, कोठें प्रस्थान करीत असले, प्रवेश करीत असले किंवा निद्रेनें व्याप्त झाले असतील तर त्यांजवर प्रहार करावा ज्याच्या सैन्यांत नायक नसेल, अथवा ज्या शत्रूच्या सेनेंत कोणी योद्धा नसेल. किंवा सैन्य द्विधा जरी झालें असेल तथापि त्या शत्रूच्या सैन्यावर प्रहार करावा. असा अश्वत्थाम्यानें निश्चय करून आपले शत्रु पांडव पांचालासहवर्तमान निद्रिस्त आहेत त्यांजवर रात्रीं प्रहार करावा. अशी क्रूर मति धारण करून महाप्रतापी अश्वत्थाम्यानें निश्चय करून आपला मातुल कृपाचार्य व कृतवर्मा यांस हा निश्चय सांगण्या करितां जागृत केलें. नंतर ते लज्जेनें जागृत होऊन त्या विषयीं योग्य उत्तर दिलें नाहीं. नंतर एक मुहूर्त पर्यंत अश्वत्थाम्यानें विचार करून डोळ्यांतून अश्रुपात करीत भाषण करितो कीं, ज्या दुर्योधन राजा करितां आपण पांडवाशीं वैर केलें, तो एक वीर महाबली एकादश अक्षौहिणी सेनेचा पति अशा दुर्योधनास भीमसेनानें मारिलें नंतर या क्षुद्र व घाती वृकोदरानें त्याचें शीर पायानें मर्दन केलें हें कृत्य पाहून सकल पांचाल्यानीं मोठा नाद व हास्य करून आनंदानें शतशः शंखांचे व दुंदुभीचे नाद केले. तो नाद वायूच्या साह्यानें दाही दिशांस व्याप्त झाला. अश्वांचे व गजांचे शब्द व शूरांचे सिंहनाद चोंहीकडे श्रवणांत येऊं लागले. व भंगावर रोमांच उत्पन्न करणारा असा रथांचा शब्दही श्रवणांत आला. या प्रकारें पांडवानीं युद्धामध्यें धार्तराष्ट्रांचें कदन केलें असतां आह्मी त्या संग्रामांतून त्रिवर्ग उरले आहोंत. शतगजांचें बळ ज्यांस ते शूर पांडवानीं मारिले त्या पक्षां काळाचा मोठा विपर्यास झाला असें मी मानितों. व मी जें ह्मणतों हें उपयुक्त

आहे. तुह्मी जेणें करून या कार्या विषयीं आह्मांस जें श्रेयस्कर असेल तें सांगावें. असा विषय या अध्यायांत आहे.

२. अध्याय दुसरा- कृपाचार्य सांगतात हे द्रोणपुत्रा, तूं भाषण केलेंस तें मी श्रवण केलें आतां तूं माझें भाषण श्रवण कर. दैव व उद्योग यांत लोक बांधले गेले आहेत. दैव व प्रयत्न या खेरीज कांहीं नाहीं. दैवानें व प्रयत्नानें कार्याची सिद्धि होत नाहीं. त्या पेक्षां दैव आणि प्रयत्न हे कार्याच्या सिद्धीस कारण आहेत. अधम, उत्तम, व मध्यम हे लोक या दोहोंत बांधले गेले आहेत यत्न करीत असतांही अर्थसिद्धि होत नाहीं असें पाहिलें. पहा बरें पर्वताव र पर्जन्य पडला तो निष्फल होतो. कारण तेथें नांगरणें व पेरणें इत्यादि क्रिया झाली नसल्ये. तसेंच एकादें उत्तम प्रकारचें शेत नांगरून तयार केल्या नंतर दैवानें त्याजवर पर्जन्य जर पडला तर त्या पासून जसें चांगलें फळ प्राप्त होतें त सें दैव व प्रयत्न या दोघांची अनुकूलता असली तर मनुष्याची अर्थसिद्धि उत्त म होत्ये. दैव आणि उद्योग यामध्यें दैवाचा निश्चय करून उद्योगास प्रवर्तता वें. हे द्विजश्रेष्ठा, प्रयत्नानें व दैवानें लोक कार्य करण्यास प्रवृत्त होतात व कार्या पासून निवृत्तही होतात असा लोकांमध्यें अनुभव आहेच. एकादा प्रयत्न आरंभ केला तर त्यास दैवाची अनुकूलता असली तरच तो सिद्धीस जाऊन फ ळही त्यास तसेंच प्राप्त होतें. मनुष्यानें दैव अनकूळ नसतां जर कांहीं प्रयत्न केला तर तो फलद्रूप होत नाहीं. जे आळशी व अविचारी लोक आहेत ते उद्योगाची निंदा करितात; परंतु हें त्याचें मत प्राज्ञजनास आवडत नाहीं. उद्योग न केला तर त्याजपासून मनुष्यास दुःख होत असतें. कांहीं उद्योग केल्या वांचून एकादे पुरुषाचें यदृच्छेनें कार्य होतें. तेव्हां उभयतानीं उद्योग व दैवाची निंदा करूं नये. जो कार्या विषयीं दक्ष असून उद्योगेच्छु असतो तो पृथ्वीवर बहु त दिवस वांचतो. फारकरून या जीवलोकीं जे दक्ष असून उद्योगीअसतात ते असेच असतात. कदाचित् एकादा हुषार मनुष्य उद्योग करीत असतां त्या स उद्योगाचें फळ जरी प्राप्त होत नाहीं तथापि लोक त्याची निंदा करीत नाहींत. कोणी मनुष्य उद्योग व दैव यांचा अनादर करीत तो आपल्या आत्म्याचा घा त करितो असें बुद्धिमान् पुरुष ह्मणतात. यास्तव त्यास उत्तमफलाची इच्छा

आहे. त्याणें देवतेचें आराधन करून प्रयत्नास प्रवृत्त व्हावें. ज्यास कोणी ईशनाहीं जो लोकांचा अवमान करणारा असून रागानें किंवा भयानें अथवा लोभानें अर्थसंपादनाची इच्छा करील तर तो तत्काल ऐश्वर्यापासून भ्रष्ट होईल. हा पहा दुर्बुद्धि दुर्योधन कार्यास असमर्थ असतां त्याणें मूर्खत्वानें कार्यासआरंभ केल्यामुळें तो नष्ट झाला. त्याणें आपल्यास हित सांगणाऱ्याचा अनादर करून दुष्टाच्या सात्यानें पांडवांशीं वैर केलें व त्याचें शील दुष्ट असल्यामुळें पूर्वी धैर्य धारण करण्यास समर्थ झाला नाहीं. जो विपत्तीनें ग्रस्त असतां आपले मित्राच्या वचना प्रमाणें वर्तला त्या दुर्योधनाचें अनुवर्तन करितों यामुळें आह्मांसही हा दारुण अन्याय घडला. पहा वरें त्याच्याच योगानें आज मी मोठ्या दुःखांत पडलों आहें. जो मनुष्य मोहानें ग्रस्त झाल्यामुळें आपलें हित जाणत नाहीं त्या मनुष्यानें आपल्या सुहृज्जनाचा विचार घ्यावा. ह्मणजे त्याचें कल्याण होईल. यास्तव वृद्ध व विद्वान लोक हेच कार्याचें मूळ आहेत. हे ब्राह्मणपुत्रा, आपणास धृतराष्ट्र, गांधारी व विदुर हे वृद्ध आहेत. त्यांजकडे आपण जाऊन त्यांस योजिल्या कृत्याचा प्रश्न करूं. त्या विषयीं त्याणीं जर आज्ञा दिली तर आपलें कल्याण आहे. कार्यास आरंभ केला नाहीं तर फलप्राप्ती कधीं होणार नाहीं हें खचित आहे. उद्योग करून कार्यसिद्धी न होईल तर आपण दैवहीन आहोंत असा निश्चय करावा. असा विषय या अध्या० आहे.

३. अध्याय तिसरा. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, असें कृपाचार्याचें उत्तम भाषण ऐकून दुःखशोकानें युक्त झालेला अश्वत्थामा क्रूर मतीनें कृपाचार्य व कृतवर्मा या उभयतांस बोलतो. अहो, पुरुषा पुरुषाच्या ठायीं ज्या ज्या मति आहेत त्या त्या मतीनें ते ते पुरुष संतुष्ट असतात. सर्व लोक आपल्यास मीच बुद्धिमान आहें असें मानितात. सर्वांस आत्मा मान्यच आहे. ते ते आपआपली प्रशंसा करितात. सर्वांस आपली बुद्धि फार चांगली आहे असें वाटून ते आपल्या बुद्धीची स्तुति करितात. आणि लोकांच्या बुद्धीची निंदा करितात. कांहीं एक कारणानें एकादें वेळेस दोघांच्या बुद्धी एका कार्या विषयीं एकत्र झाल्या तर ते एकमेक परस्परांची स्तुति करितात. व सर्व मनुष्यांचीं चित्तें निरनिराळीं असल्यामुळें तसतशा बुद्धि होतात. एकादा वैद्य व्याधीची परीक्षा

करून तिच्या नाशा विषयीं औषधाची योजना करितो तसे सर्व जसा प्रसंग ये ईल तशी बुद्धीची योजना करितात. मनुष्यास अवस्थाभेदानें बुद्धीस यौवन दशा आली ह्मणजे निरनिराळे विषय आवडतात. जी बुद्धि सुचली आहे ती मी तुह्मांस सांगतों. ही माझ्या शोकाचा नाश करील असें वाटतें. प्रथम तिनें पूर्वी प्रजा उत्पन्न करून त्या प्रजे मध्यें प्रत्येक वर्णास निरनिराळ्या गुणाचीं कर्मे लाऊन दिलीं आहेत. ब्राह्मणास वेदाध्ययन, क्षत्रियांस उत्तम बल, वैश्यां स दक्षता व शूद्रांस सर्व वर्णांस अनकूल असणें असें सांगितलें आहे. ज्याब्राह्मणास लोभ आहे व जो इंद्रियांचें दमन करीत नाहीं तो, व ज्या क्षत्रियास वीर्य नाहीं तो, व जो वैश्य दक्षता बाळगीत नाहीं तो, जोशूद्र तिन्ही वर्णांस प्रतिकूल, हे सर्व अधम होत असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. मी पूजित ब्रह्मकुलामध्यें उत्पन्न झालों असून अभाग्यामुळें क्षात्रधर्माचा अवलंब केला आहे; आतां जर ब्राह्मण धर्माचा अवलंब करून त्या प्रमाणें वागेन तर या काळीं हें करणें मला योग्य नाहीं. मी दिव्य धनुष्यें व अस्त्रें युद्धामध्यें धारण केलीं आतां माझा पिता मरण पावला हें पाहून सभेंत मी काय बोलूं? यास्तव क्षात्र धर्माचा अवलंब करून दुर्योधनाच्या अथवा माझ्या पित्याच्या पदवीस जातों. आज पांचालास युद्धामध्यें जय प्राप्त झाला ह्मणून हर्षित झाले आहेत. व युद्धामध्यें तें श्रांत झाल्यामुळें मोठ्या हर्षानें स्वस्थ निद्रा घेत आहेत. इंद्रानें जसें पूर्वी दानवांचें कदन केलें तसें आज मी रात्रीं त्यांच्या शिबिरांत जाऊन धृष्टद्युम्नादि पांचालांचें कदन करीन. दीप्ताग्नि जसा तृणास जाळून शांत होतो तसा आज मी सर्व पांचालांचें कदन करून शांति पावेन. पिनाकपाणी रुद्र क्रुद्ध होऊन जसा सर्व प्राण्यांचा नाश करितो तसा आज मी पांचालांचा व पांडुपुत्रांचा युद्धांत नाश करून पृथ्वीस शरीरयुक्त करीन. आणि पित्याच्या ऋणापासून मुक्त होईन. दुर्योधन, कर्ण, भीष्म व जयद्रथ हे ज्या मार्गास गेले त्या दुर्गम मार्गास पांचालास पाठवीन. सिंह जसा बलात्कारानें पशूंचें मर्दन करितो तसें आज रात्रीं मी मोठ्या त्वरेनें धृष्टद्युम्नाचें शिराचें मथन करीन. हे कृपाचार्य, पांचाल व पांडव हे आजरात्रीं निद्रिस्त असतां खड्गानें त्यांची शिरें तोडीन. व सेना मारून कृतकृत्य व सुखी

होईल. असा विषय या अध्यायांत वर्णिला आहे.

४. अध्याय चवथा:- कृपाचार्य बोलतात हे द्रोणपुत्रा, दैववशात तुला जें हें कर्म करण्याची बुद्धि झाली त्या पासून तुझें निवारण करण्यास वज्रपाणी इंद्रही स्वतः समर्थ नाहीं. मला असें वाटतें कीं, तूं आज मुक्त कवच हो. रथाचा ध्वज उतरून रात्रीं स्वस्थ विश्रांति घे. उद्यां प्रातःकालीं आह्मीं उभयतां तुजसमागमें येऊन मी व कृतवर्मा असे उभयतां तुजला साह्यानें उदयीक शत्रूस मारशील. हे रथिश्रेष्ठा पदात्यां सहवर्तमान युद्धार्थ जाऊन उद्यां महान् पराक्रम कर. परंतु आजचे रात्रीस तूं विश्रांति पाऊन स्वस्थ हो ह्मणजे शत्रूस सहज मारशील. तूं श्रेष्ठ रथांत बसून महान् शस्त्रें घेऊन युद्धास प्रवृत्त झालास ह्मणजे इंद्राच्यानेंही तुझा पराभव होणार नाहीं. मग कृतवर्मा व मी असे तुला साह्य असतां कोणाचा योद्धा तुझा पराभव करील? यास्तव तूं व आह्मीं आजचे रात्रीस निद्रेनें विश्रांति पाऊन प्रातःकाळीं शत्रूस मारूं. तुजपाशीं जशीं दिव्य अस्त्रें आहेत तशींच मजपाशीं आहेत, सात्वत कुलोद्भव, कृतवर्मा मोठा धनुर्धारी व युद्धवेत्ता आहे हें सर्व आपण एकत्र मिळून उद्यां शत्रूंचा युद्धांत नाश करून संतुष्ट होऊं. इंद्रानें युद्धांत दानवांचें कदन करून जसा विहार केला, तसा तूं विहार करशील. हे तात, अश्वत्थामा मी व कृतवर्मा असे उदयीक पांडवांचा नाश करूं. अथवा आह्मी तरी स्वर्गास जाऊं. हे महाबाहो, सर्व प्रकारें आह्मीं उदयीक प्रातःकालीं तुला साह्य होऊं. असें कृपाचार्यांचें भाषण ऐकून अश्वत्थामा क्रोधानें आरक्त लोचन होऊन बोलतो हे आचार्य, रोग्यास, क्रोधीपुरुषास, द्रव्याची चिंता करणार्‍यास व कामी पुरुषास निद्रा कोठून येणार? हे चार योग आज मला एकत्यासच प्राप्त झाले आहेत. हा रात्रीचा चतुर्थ भाग माझा व्यर्थ जातो असें वाटतें. पित्याच्या वधाचें स्मरण होऊन जें दुःख मला होतें तें मी कोणास सांगूं? माझें हृदय रात्रंदिवस या दुःखानें दग्ध झालेलें शांत होत नाहीं. ज्या दुष्टानें माझा पिता मारिला त्यास मी प्रत्यक्ष जीवंत अवलोकन करितों तेणें करून माझीं सर्व गात्रें कृंतन केल्या सारखीं होतात. पांचाल्यांनीं द्रोणाचार्यांस मारिलें अशी वाणी श्रवण करून माझ्या सारखा पुत्र एकू-

मुहूर्त पर्यंत तरी या लोकीं कसा जीवंत राहिला? धृष्टद्युम्नास मारल्या वांचून मी जीवंत राहण्यास उत्साह पावत नाहीं. ज्या पेक्षां पांचालानीं माझ्या पित्या चा वध केला त्या पेक्षां ते पांचाल व त्यास जे कोणी साह्य असतील त्यांचा मी वध करीन. भग्नोरु झालेल्या दुर्योधनाचा विलाप श्रवण करून एकाद्या निर्दय पुरुषाचें हृदयही दग्ध होईल!! मग माझें होईल याचें आश्चर्य काय!!! दुर्योधन माझा अत्यंत मित्र असून मी जीवंत असतानां त्यास शत्रूनीं जिंकिलें. उदकाच्या वेगानें जसा समुद्र वाढतो तसा माझा शोक वृद्धिंगत होत आहे. या सर्व कृत्याचें चिंतन केलें असतां मला निद्रा व सुख कोठून होईल. कृष्णा व अर्जुन याणीं ज्याचें रक्षण केलें आहे त्याचा पराभव करण्यास मला कठिण वाटतें. कदाचित् महेंद्रही त्यांचा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं, असें मी मानितों. परंतु काय करूं, मला जो कोप झाला आहे त्याचें सांतवन करण्यास मी समर्थ नाहीं. व माझ्या कोपाची शांति करणारा या लोकीं मला कोणी दिसत नाहीं. यास्तव ही जी मी बुद्धि निश्चित केली आहे ही मला चांगली वाटते. माझ्या मित्राचा पराभव व पांडवांचा जय झाला ही वार्ता दूतानीं मला सांगतांच माझें हृदय फारच दग्ध होऊन गेलें आहे. आज मी निद्रिस्त झालेल्या शत्रूचें जेव्हां कदन करीन तेव्हां मी श्रमरहित व विगतज्वर होऊन सुखानें निद्रा घेईन. असा विषय यांत आहे.

५. अध्याय पांचवा- कृपाचार्य बोलतात हे द्रोणपुत्रा, ज्या पुरुषाची बुद्धि चांगली नाहीं व ज्याणें इंद्रियें जिंकिली नाहींत तो पुरुष धर्मार्थ श्रवणेच्छु जरी आहे तथापि धर्मार्थाचीं सकल तत्वें जाणावयास तो समर्थ होत नाहीं. तसाच प्रज्ञावान पुरुष असून जो विनययुक्त नाहीं तोही धर्मार्थाचा निश्चय जाणत नाहीं. जिव्हा जशी व्यंजनादि पदार्थ भक्षण करितांच त्याचा रस जाणते तसा प्राज्ञ मनुष्यास एकमुहूर्त पर्यंत जरी पंडितांचा सहवास झाला तथापि तो धर्मार्थाचीं सकल तत्वें जाणण्यास शक्य होतो. प्रज्ञावान्, जितेंद्रिय, ज्यास धर्म श्रवणाची इच्छा तोच पुरुष सकल धर्मार्थाचीं तत्वें जाणण्यास शक्य होतो. जो अनीतिमान्, दुरात्मा, अमर्याद शील व पापी पुरुष आहे त्यास कल्याणकारक मार्गाचा जरी उपदेश केला तरी तो पापकृत्येंच करितो. सुहृज्जन आहेत ते

असत्य भाषण करणाऱ्या मनुष्याचाच निषेध करितात. दरिद्री पुरुषास कि
ती जरी उपदेश केला तथापि तो ऐकत नाहीं. विक्षिप्त चित्त जाहला असेल
त्या पुरुषास बरीं वाईट वाक्यें सांगून सुहृज्जनानीं मार्गावर आणावा हा
त्यांचा धर्म आहे. जो मार्गावर येण्यास योग्य नाहीं तो नेहेमी तसाच दुःखी
असतो. तसाच जो आपला सुहृज्जन असून प्राज्ञ आहे आणि पापकर्म
करण्यास जर तो प्रवृत्त होईल तर यथाशक्ति प्रज्ञावान् पुरुष वारंवार त्या
चा निषेध करितात. यास्तव हे द्रोणपुत्रा, हें माझें वचन श्रवण करून तूं आ
पल्या आत्म्याचें नियमन करून कल्याणा विषयीं मन धारण करणार ना-
हींस तर पुढें पश्चात्ताप पावशील. निद्रिस्ताचा वध धर्मप्रमाणें लोकांत पूज्य
नाहीं. तशींच ज्याणीं शस्त्रें ठेविलीं, ज्याणीं रथाचे अश्व सोडले, मी तुझा
आहें असें ज्याणीं भाषण केलें, जे शरण आले, ज्यांचे केश सुटले, ज्यांचीं
वाहनें नष्ट जाहलीं आहेत त्यांचा वध करणें हा अधर्म होय. सर्व पांचाल त-
र कवचें काढून विश्वासानें मेतासारखे निचेतन निजले आहेत. यास्तव जो
दुष्ट व कुटिल पुरुष अशा अवस्थेंत त्यांचा वध करील तो अगाध नरकांत
पडेल. तूं या लोकीं सकल अस्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा प्रसिद्ध आहेस; यास्त
व तुला या लोकीं पातकाचा लेश न लागो. उद्यीक सूर्योदय झाला म्हणजे
सकल शत्रूंचा तूं पराजय कर. हें असंभावित कर्म तुझे ठायीं फारच निंदि-
त दिसतें. शुक्लपदार्थांत जसा आरक्त पदार्थ ठेवावा तशी तुझे ठायीं ही म
ति उत्पन्न झाली असेल असें मला वाटतें. असें कृपाचार्यांचें भाषण श्रव-
ण करून अश्वत्थामा भाषण करितो. हे मातुला, तूं हें यथार्थ भाषण केलें
स; परंतु पांडवानीं आपला धर्मरूप सेतु पूर्वीं शतधा प्रकारें मोडून टाक-
ला आहे. पहावें सकल राजांच्या व तुमच्या समक्ष माझ्या पित्यानें शस्त्रें
ठेविलीं असतां धृष्टद्युम्नानें त्याचा वध केला. कर्णाच्या रथाचें चक्र पृथ्वी
नें ग्रस्त केल्यामुळें तो व्यसनग्रस्त झाला असतां अर्जुनानें त्याचा वध के-
ला. तसाच शांतनव भीष्म शस्त्रें ठेऊन निरायुध झाला असतां शिखंडी-
स पुढें करून अर्जुनानें त्यास मारिलें. महाधनुर्धारी भूरिश्रवा यास रणा
मध्यें सात्यकीनें मारिलें. भीमसेन व दुर्योधन या उभयतांचा युद्धप्रसंग

सकल भूमिपालां समक्ष होत असतां भीमसेनानें दुर्योधनाच्या नाभीच्या अधोभागीं अधर्मानें प्रहार करून त्यास खालीं पाडलें. दुर्योधनाच्या मांड्या भग्न झाल्यावर त्याणें जो विलाप केला तो श्रवण करून माझीं मर्में कृंतन झाल्यासारखीं होतात. अशा प्रकारें पांचाल अधार्मिक, पापी व मर्यादा सोडणारे असतां त्यांची तूं कां निंदा करीत नाहींस? ज्याणीं माझ्या पित्याचा घात केला त्या पांचालास निद्रावस्थेमध्यें मारल्यामुळें त्या पापानें मला कीट व पतंग योनि प्राप्त होणाऱ्या असल्या तर होवोत जें कार्य करण्याचें मीं मनामध्यें आणिलें आहे, त्या कार्याविषयीं आतां त्वरा करितों. ही जी मला पांचाल वधाची इच्छा झाली आहे तिचें दूरिकरण करणारा पुरुष पूर्वीं कोणी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें द्रोणपुत्रानें भाषण करून नये. कांतिरथास अश्व जोडून तो शत्रूंकडे जाण्यास निघाला त्याकालीं महात्मे कृतवर्मा व कृपाचार्य त्यांजप्रत भाषण करितात हे द्रोणपुत्रा, रथ कशाकरितां सिद्ध केलास? व काय कार्याची मनामध्यें इच्छा केली आहेस? अरे तुझीं आह्मीं मिळून येथें प्राप्त झालों आहोंत यास्तव सर्वांस सुख दुःखें एकसारखींच आहेत. तुलाच दुःख आहे आणि आह्मांस नाहीं. अशी तूं शंका आणूं नको. असें उभयतांनें भाषण श्रवण करितांच अश्वत्थाम्यानें क्रुद्ध होऊन आपल्या पित्याच्या वधाचें स्मरण करून त्यांजप्रत आपलें जें इच्छित कार्य तें यथातथ्य सांगितलें. हे वीर हो माझ्या पित्यानें निशित बाणाचीं शतसहस्र योद्धे मारिले. पुढें त्याणें शस्त्रास्त्रें ठेविल्यावर धृष्टद्युम्नानें त्यास मारिलें ह्मणून मी असा निश्चय केला आहे कीं धृष्टद्युम्न शस्त्ररहित असतां त्याचा वध करावा. पांचाल राजाचा पुत्र धृष्टद्युम्न ह्या पशूसारखा शस्त्राविरहित वध केला असतां तो शस्त्रजित लोकास जाणार नाहीं. तुह्मीं उभयतां कवच, खड्ग, धनुष्यबाण धारण करून माझ्या बरोबर या असें भाषण करून अश्वत्थामा रथारूढ होऊन शत्रू सन्मुख चालला. कृतवर्मा व कृपाचार्य हे उभयतां महारथी त्याचे पाठीमागून चालले यज्ञामध्यें आह्वान केलेले अग्नि जसे सुशोभित दिसतात, तसे ते सुशोभित त्रिवर्गनिद्रिस्त झालेल्या शत्रूंच्या शिबिराकडे गेले. आणि द्रोणी शत्रूंच्या शिबिरद्वारीं

जाऊन उभा राहिला. असा विषय या अध्यायांत आहे.

६. अध्याय सहावा:- धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, द्रोणपुत्र शिबिराच्या द्वारप्रदेशीं आला हें पाहून कृपाचार्य व कृतवर्मा त्यांनीं काय केलें तें मला निवेदन कर. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा महारथी द्रोणपुत्र, कृतवर्मा व कृपाचार्य या उभयतांस विचारून तो शिबिरद्वारीं गेला तों तेथें एक महाशरीरी चंद्रसूर्यासारखा कांतिमान् व्याघ्रचर्म परिधान केलेला व सर्पाचीं बाहुभूषणें धारण केलेला असा एक महान् पुरुष उभा होता तो पाहिला. तें स्वरूप पाहण्यास व सांगण्यास अशक्य होतें. त्याच्या तेजाच्या किरणांपासून शंखचक्रगदा धारण केलेल्या कृष्णाच्या मूर्ति सहस्त्रावधि उत्पन्न झाल्या होत्या. असा तो भयंकर पुरुष पाहून द्रोणपुत्र त्याजवर दिव्यास्त्रांची वृष्टि करूं लागला असतां तो पुरुष द्रोणीनें टाकलेल्या अस्त्रांस भक्षण करूं लागला. हें द्रोणीनें पाहून पुनः अग्निशिखे सारखें दीप्त असें एक रथचक्र त्या पुरुषावर टाकिलें असतां तें रथचक्र त्या पुरुषास ताडन करून विदीर्ण होऊन गेलें, तें रथचक्र खालीं पडून क्षीण झालें, हें पाहून खड्ग कोशापासून काढून त्या पुरुषावर टाकतांच तो त्या पुरुषाच्या शरीरांत प्रविष्ट झाला. नंतर अश्वत्थाम्यानें एक जाज्वल्यमान् गदा त्या पुरुषावर टाकतांच त्याणें ती ग्रस्त केली. हें त्याचें कृत्य पाहून द्रोणपुत्र निरायुध झाल्यामुळें संतप्त होऊन कृपाचार्यांच्या भाषणाचें स्मरण करून विचार करितो कीं, सुहृदाचें हितकारक वाक्य जो श्रवण करीत नाहीं तो माझ्या सारखा शोकानें व विपत्तीनें ग्रस्त होतो. जो मूर्ख पुरुष शास्त्रदृष्ट्या पुरुषाचा अतिक्रमण करून हिंसा करितो तो कुमार्गामध्यें भ्रष्ट होतो. गोब्राह्मण, नृप, स्त्री, सखा, माता, गुरु, हीनप्राण झालेला, जड, अंध, निद्रिस्त, भिऊन उठलेला, मत्त, उन्मत्त, प्रमत्त, इतक्यांवर शास्त्रपात करूं नये. असा गुरूनें उपदेश केला असतां तो शास्त्रसिद्ध सनातन मार्ग अतिक्रमण करून कुमार्गास मी उद्यत झालों. म्हणून हा घोर आपत्ति मला आली. घोर दैवकृत्य आपण उत्पन्न करून पुढें तें सोडून दिलें तर त्यास हीच मोठी घोर आपत्ति असें म्हणतात. तस्मात् दैवापेक्षां मनुष्यकर्तृत्व मोठा आहे असें

मला वाटत नाहीं. मनुष्य प्रयत्न करीत असतां तो दैवानें न सिद्ध होईल तर तो धर्मापासून च्युत होऊन विपत्तीतें प्राप्त होतो. दुसऱ्याचा घात करणें हें मौर्ख्य आहे असें ह्मणतात. एकादें कर्म आरंभ करून भयानें जसें तें टाकावें तसेंअ विचारामुळें मला भय उत्पन्न झालें. द्रोणपुत्र युद्धापासून कधीं परावृत्त होत नाहीं. त्या माझ्या प्रतिज्ञेस हा देवदंडासारखा एक दंडच मला उत्पन्न झाला. या काळींही मला अधर्माविषयीं पापमति झाली ह्मणून तिचा नाश होण्याकरितां हेंच घोर फळ आहे. दैवाखेरीज दुसरें असें कृत्य होण्यास कारण कांहीं दिसत नाहीं. यास्तव आज मी व्यापक महादेवास शरण जातों, ह्मणजे तो या घोर दंडाचा नाश करील. हा महादेव आपल्या विक्रमें व तपें करून सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहे. यास्तव त्यास मी शरण जातों. असा विषय या अध्यायांत आहे.

७. अध्याय सातवा— या प्रकारें द्रोणपुत्र शिवाची स्तुति करून भाषण करितो. उग्रस्थाणु शिव रुद्र, ब्रह्मचारी अशा नांवाचा जो शिव याजप्रत मी आपल्या शरीराचा बली देऊन याग करितों. त्रिपुरासुराचा घात करणारा नीलकंठ विभूषित असा जो शिव याजप्रत उत्तम रीतीनें शरण जाऊन ही जी घोर आपत्ति प्राप्त झाली आहे इजपासून तरून जातों. सर्व प्राणिमात्रांस उपहारभूत असें हें जें माझें शुद्ध शरीर या शरीराचा शुद्ध परमेश्वराप्रत बलि अर्पण करितों. या प्रकारें अश्वत्थाम्याचा निश्चय जाणून ईश्वरानें त्याच्या अग्रभागीं कांचनमयी वेदी उत्पन्न केली. आणि त्या वेदीमध्यें अग्नी उत्पन्न झाला. त्यानें आपल्या ज्वालें करून दिशाविदिशा व आकाश प्रज्वलित केलें. नंतर एकाएकीं त्या अग्नीपासून जाज्वल्यमान नयनयुक्त पाद, भुज व शिरयुक्त रत्नाचीं विचित्र बाहुभूषणें धारण केलेले तसेच हात उचललेले गज व पर्वत सदृश असे महान गण उत्पन्न झाले. ज्यांस अष्टगुण ऐश्वर्याची प्राप्ती होती. ज्यांच्या कृत्यानीं शिव निरंतर विस्मय पावतो. मन वाणी व कर्म यानीं ते नेहेमी शिवाची आराधना करितात त्यांचें शिव स्वपुत्राप्रमाणें पालन करितात. कितीएक गण नाना प्रकारचीं वाद्यें वाजवून हास्य करीत सिंहासारखे नाद व गजासार-

ख्या गर्जना करून सकलजगत नादित करीत अश्वत्थाम्याच्या अग्रभागीं घेऊन आपलें तेज चोंहीकडे पसरून महादेवाची स्तुति करूं लागले. आणि अश्वत्थाम्याचें माहात्म्य वाढविण्याचे इच्छेनें व त्याचें तेज जाणण्याच्या इच्छेनें व सौप्तिक कर्म अवलोकन करण्याचे हेतूनें मोठमोठे भयंकर पट्टिशादि आयुधें धरून आसमंतात्भागीं उभे राहिले. त्यांस पाहून महाबलि अश्वत्थामा हस्तामध्यें धनुष्यबाण व अंगुलित्राणें धारण करून आपण स्वतः शरीराचा बलि देण्यास सिद्ध झाला. त्या यज्ञांत धनुष्य त्या समिधा, निशितशर हीं पवित्रकें कल्पिलीं. आणि सोमदेवता मंत्राचें पठन करून भयंकर परिणाम करणाऱ्या रुद्राची स्तुति करीत हस्तजोडून असें बोलूं लागला कीं, हे भगवान् मी अंगिरस कुलामध्यें उत्पन्न झालों. त्या तनूचें अग्नीमध्यें हवन करितों. हे शंकरा, उत्तम समाधीच्या योगें व आपले भक्तीनें त्या आपत्कालीं तुला बलिदान करण्यास आलों आहें, यास्तव तूं हा ग्रहण कर. हीं सकलभूतें तुझेठायीं वास करितात. व तूं सकलभूतांचे ठायीं वास करितोस. सकल प्रधानगुणाचें एकत्व तुझे ठायीं असतें. हे विभो, सर्व भूतांचा आश्रय तूं आहेस यास्तव हविरूपद्रव्य मी तुझ्या अग्रभागीं आलों आहें यानें तूं ग्रहण कर. असें अश्वत्थाम्यानें भाषण करून दीप्तपावक वेदीच्याठायीं उभे राहून अग्नींत प्रवेश करूं लागला असतां त्या निश्चेष्ट ऊर्ध्वबाहूच्या रूपानें स्थित झालेल्या अश्वत्थाम्यास पाहून साक्षात् भगवान् महादेव भाषण करितात; हे अश्वत्थामा, अरे सत्यता, शुद्धता, आर्जव इत्यादिकें करून अक्लेश कर्म्या पार्थानें मी आराधित आहें. यास्तव पार्थापेक्षां मला दुसरा कोणी इष्ट नाहीं. अर्जुनाचा मान राखावा म्हणून मीच पांचालाचें रक्षण केलें. प्रस्तुत हे पांचाल कालानें पराभव पावले आहेत, यास्तव आज ते जीवंत रहात नाहींत. असें बोलून शिवानें अश्वत्थाम्यास एक खड्ग दिलें. नंतर शिवानीं त्याच्या तनूंत प्रवेश केला. नंतर अश्वत्थामा भगवत्तेजानें युक्त होऊन त्यानें युद्धाविषयीं मोठी मति धारण केली. नंतर शत्रुशिबिरांत प्रवेश करीत असतां त्याच्या आसमंताद्भागीं भूतादि रक्षोगण अदृश्यरूपानें धांवले. हा वि॰

८. अध्याय आठवाः धृतराष्ट्र भाषण करितो हे संजया, महारथी द्रोणपुत्र, पांचालाच्या शिबिरांत गेल्यावर कृपाचार्य व कृतवर्मा हे भयार्त होऊन माघारें फिरले किंवा नाहींत? या उभयतांस पांचालाच्या क्षुद्र रक्षकांनीं पाहून त्यांचें निवारण केलें किंवा कसें? हें कर्म करणें असत्य आहे असें जाणून हे उभयतां महारथी माघारें फिरले नाहींत काय? अथवा सोमक व पांडव यांच्या शिबिरांत जाऊन शत्रूशीं युद्ध करीत असतां दुर्योधनाच्या पदवीस गेले कीं काय! हें सर्व मला निवेदन कर. असा प्रश्न ऐकून संजय भाषण करितो हे राजा, अश्वत्थाम्यानें ज्या काळीं शिबिरांत प्रवेश केला त्या काळीं शारद्वत कृपाचार्य व कृतवर्मा हे उभयतां महारथी शिबिराच्या द्वारीं उभे होते हें अश्वत्थाम्यानें पाहून हर्षित होऊन तो मंद मंद असें बोलूं लागला कीं, हे वीर हो तुम्ही उभयतां युद्धाविषयीं एकत्र झाला तर सर्व क्षत्रियांचा वध करण्याविषयीं समर्थ आहांत. मग त्या निजलेल्या अवशिष्ट योध्यांच्या नाशाविषयीं तुम्हांस काय अशक्य आहे? परंतु मीच शिबिरांत जाऊन काळासारखा आंत संचार करितों. जो शत्रु तुमचे हस्तगत होईल तो जीवंत सुटणार नाहीं, असें करा. असें भाषण करून द्रोणपुत्र पांडवांच्या शिबिरांत गेला तो अन्यमार्गानें गयाभीत न होतां धृष्टद्युम्नाचे स्थानाजवळ गेला. ते पांचाल तर रणामध्यें मोठें कृत्य करून थकून निजले होते. द्रोणपुत्रानें धृष्टद्युम्नाच्या स्थानास जाऊन शयनावर निजलेला त्यास पाहिला. तो मोठमोठ्या अमोलिक वस्त्रानीं आच्छादित व नाना प्रकारच्या पुष्पानीं, धूपानीं व सुवासिक द्रव्यानीं सुगंधित केलेल्या शय्येवर भयरहित व विश्वासानें निजलेल्या द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नास अश्वत्थाम्यानें जागृत करितांच रणशूर धृष्टद्युम्न जागृत झाला. आणि हा द्रोणपुत्र आहे असें जाणून शयनापासून उठला. तों इतक्यांत अश्वत्थाम्यानें त्याचे केश धरून पृथ्वीवर आपटला. त्या काळीं धृष्टद्युम्न निद्रावश असल्यामुळें कांहीं चेष्टा करण्यास समर्थ झाला नाहीं. नंतर अश्वत्थाम्यानें आपल्या पायानीं त्याचा कंठ व ऊर दडपला असतां तो मोठा शब्द करूं लागला तथापि अश्वत्थामा त्यास मारूं लागला. त्या काळीं धृष्टद्युम्न आपल्या नखानीं अश्वत्था

त्यास पीडित करीत बोलूं लागला कीं, हे आचार्यपुत्रा, शस्त्रानें माझा लवकर घात कर, ह्मणजे मी पुण्यलोकास जाईन. असें बोलून विराम पावला असतां द्रोणपुत्र असें बोलला कीं, हे कुलाधमा, आचार्यांचा घात करणाऱ्या पुरुषास उत्तमलोक कोठून मिळेल? शस्त्रानें तुझा वध करणें हें योग्य नाहीं असें भाषण करून क्रुद्ध झालेला अश्वत्थाम्यानें आपले पायाच्या घोट्यानीं त्याचीं मर्मे छिन्न भिन्न केलीं. नंतर द्रोणपुत्रानें मोठ्या क्रूर कर्मानें त्यास मारून तो आपले रथामध्यें बसला. आणि तो रथानें दिशा नादित करीत चालला असतां हाच घात करणारा पुरुष असें जाणून सकल रक्षण करणारे लोक व स्त्रिया धृष्टद्युम्नाच्या शिबिरांत आल्या. आणि मृत झालेल्या राजास पाहून फार शोक करूं लागल्या. तसेंच इतर क्षत्रियही धृष्टद्युम्न मेलेला पाहून आक्रोश करूं लागले. त्यांच्या त्या आक्रोश शब्दानें इतर समीप राहणारे क्षत्रियही मोठ्या त्वरेनें सज्ज होऊन हें काय कृत्य झालें असें बोलूं लागले. तशाच क्षत्रियांच्या स्त्रिया अश्वत्थाम्यास पाहून त्रासानें बोलूं लागल्या कीं, अहो लवकर धांवून पळा. हा कोण राक्षस आहे किंवा मनुष्य आहे हें समजत नाहीं. पांचाल राजाला वध करून रथावर कसा उभा राहिला आहे. कित्येक योद्धे अश्वत्थाम्यानें निवारण करण्यास उद्युक्त झाले असतां त्यांचा त्यानें रुद्रास्त्रानें वध केला आणि उत्तमौज्या आपले शयनीं निजला असतां त्यासही पायानें मारिलें. तेव्हां तो मोठा शब्द करूं लागला असतां तो शब्द युधामन्यूनें ऐकून तेथें आला आणि हा कोणी राक्षस आहे असें जाणून गदेनें त्याचे उरावर ताडण करितांच अश्वत्थाम्यानें युधामन्यूसही पृथ्वीवर पाडिलें आणि पशु सारखा त्याचा वध केला. पुढें जे जे क्षत्रिय निद्रिस्त झाले होते त्यांच्या शिबिरांत जाऊन खड्गानें सर्व क्षत्रियांचा पृथक् पृथक् वध केला. नंतर जे श्रांत होऊन शस्त्रें ठेवलेले होते त्यांचाही खड्गानें त्यानें वध केला. तेणें करून तो अंतका सारखा दिसूं लागला. अश्वत्थाम्यानें बहुत योद्धे मारिले तेणें करून तो रक्तानें भरलेला असतां पिशाच्चा सारखा दिसूं लागला. जे पांचाल व पांडवांकडील जागृत योद्धे होते तेही त्याच्या शब्दानें मोहित होऊन एकमेकांकडे भयानें पाहून चकित झाले.

असा घोररूपी अश्वत्थामा शिबिरांत संचार करीत करीत त्या द्रौपदीच्या पु त्रांस व अवशिष्ट राहिलेल्या सोमकास पाहिलें. त्या काळीं धृष्टद्युम्न मृत झाला हें ऐकून द्रौपदेय व सोमक अश्वत्थाम्याच्या नादानें त्रस्त झालेले हस्तामध्यें धनुष्यबाण घेऊन त्याजवर शरवृष्टि करूं लागले. तेव्हां प्रभद्र कही जागृत होऊन ते व शिखंडी द्रोणपुत्रावर शिलीमुख बाणांची वृष्टि क रून त्यास दुःखित केलें. भारद्वाजपुत्रानें तें पाहून मोठा नाद केला आणि पित्याच्या वधाचें स्मरण करून या महारथ्यांचा वध करावा, म्हणून रथा खालीं उतरून धांवला. नंतर अश्वत्थाम्यानें सुवर्णानें मढिवलेला दिव्य खड्ग व ढाल घेऊन द्रौपदीच्या पुत्रांस मारिलें. आणि भीष्म हनन कर्ता जो शिखंडी याजवर धांवून त्यास ताडित केलें. एक शिली मुख बाण त्याच्या भृकुटीच्या मध्यभागीं मारून खड्गानें त्याचे दोन तुकडे केले. नंतर प्रभद्र क गणांचाही वध केला. पुढें विराटराजाचें अवशिष्ट जें सैन्य होतें त्याचा वध केला. असा द्रुपदाच्या पुत्रांचा, पौत्रांचा व त्याच्या सुल्हृदाचा शोध करू न कदन केलें. दुसरेही आपले हृष्ट जेथें होते तेथें जाऊन त्यांचा त्यानें ख- ड्गानें वध केला. स्वरूपाशस्त्र जाहलेले महारथी निद्रिस्त असतां त्यांजला घेऊन चाललेली अशी काली नांवाची ही स्त्रीच आली आहे असें सर्व योद्धे द्रोणपुत्रास पाहूं लागले. जेव्हां कौरव पांडवांचें युद्धास आरंभ झा ला त्या दिवसा पासून अश्वत्थाम्यास कन्यारूप स्त्रीसारखे पहात अस त. हे सकल योद्धे दैवानेंच पूर्वी मारले होते. त्यास द्रोणीनें मारलें. हा अश्वत्थामा सकल योद्ध्यांस जेव्हां त्रास देऊन नानाप्रकारचे भयंकर श ब्द करूं लागला तेव्हां योद्ध्यास त्या पूर्व काळच्या रूपाचें स्मरण होऊन शि बिरामध्यें निद्रिस्त झालेले सहस्रावधि पांडवांकडील योद्धे भयभीत झाले असतां अश्वत्थामा त्यांचे सन्निध जाऊन कितीएक योद्ध्यांचे पाद जघनभाग व पार्श्वभाग तोडूं लागला. अश्वत्थामा क्रुद्ध होऊन सर्वांचे प्राण हरण करीत असतां कितीएक चूर्णित झालेल्या व महान् नाद केले- ल्या योद्ध्यानीं व उन्मथित झालेल्या गजाश्वानीं पृथ्वी एक क्षणांत पूर्ण होऊन गेली. कितीएक प्राणी अश्वत्थाम्यास पाहून हा कोण हें काय आहे

असें बोलले. तेव्हां प्रहार करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ जो द्रोणपुत्र याणें शस्त्रास्त्रें ठेविले-
ल्या योद्ध्यांस व युद्धार्थ सिद्ध झालेल्या सृंजयास यमलोकीं पाठविलें. कितीए
क शिबिरांतील लोक निद्रिस्त असतां भयानें उठूं लागले आणि निद्रेनें ते अति
व्याप्त असल्यामुळें नष्ट संज्ञा होऊन जेथील तेथें तसेच पडून राहिले. कितीए
क आपल्या मांड्यांस विळखा घालून भूल आल्या सारखे पडले आणि नाना
प्रकारचे आर्त शब्द करीत एकमेकांचे जवळ बसले. नंतर द्रोण पुत्रानें रथाम
ध्यें बसून धनुष्यबाणानें कितीएक योद्ध्यांस यमलोकीं पाठविलें. जसा एका
दा महान् गज डोहांत यथेच्छ संचार करितो तसा अश्वत्थामा शिबिरांत य
थेच्छ संचार करीत सर्वांस त्रास देऊं लागला. किती एकांचे केश सुटले. किती
एक श्रांत झालेले योद्धे भयानें चोहींकडे फिरूं लागले. कितीएक भयानें मल
मूत्राचा विसर्ग करूं लागले. तसेच अश्व व गज आपलीं बंधनें तोडून चोहीं
कडे फिरूं लागले. ते सकल अश्व गज चोहींकडे धांवाधांव करीत असतां-
अश्वत्थाम्यानें त्या गजाश्वांचें चूर्ण करून टाकिलें. तेणें करून रात्रीं वामक
रणाऱ्या राक्षसांस आनंद झाला. ते नानाप्रकारचे भयंकर शब्द करीत अ
सतां त्यानें पृथ्वी व आकाश भरून गेलें. कितीएक गज तो भयंकर शब्द ऐ
कून आपल्या बंधनापासून सुटले. व त्या गजांच्या पायांपासून धूळ उधळू
न चोहींकडे पसरली असतां त्या रात्रीस दुष्पट अंधःकार झाला त्यामुळें सक
ल लोक स्तब्ध झाले. कोणास कांहीं दिसेनासें झालें. व आपल्यांत एकमेकां
स एकमेक मारूं लागले. कितीएक आपल्या बंधुवर्गास टाकून आपल्या गो
त्राचा व नांवाचा उच्चार करून एकमेकांस हांका मारीत कितीएक हाहाःका
र शब्द करीत पृथ्वीवर पडले. तें द्रोणपुत्रानें पाहून त्याचें निवारण केलें. कि
ती एक युद्धांत वध्यमान झालेले योद्धे आपले शिबिरांत भयानें पीडित हो
ऊन पडले असतां द्वारप्रदेशीं कृतवर्मा व कृपाचार्य हे उभयतां त्या योद्ध्यां
चा वध करिते झाले. त्या योद्ध्यांचीं शस्त्रें गलित झालीं होतीं. केश मुक्त
झाले होते. व ते अंजलिपुट जोडून भयानें कंपित होते. तथापि उभयतांनीं
त्या सर्वांचा वध केला. नंतर अश्वत्थामा आपले हातांत खड्ग घेऊन चोहीं-
कडे फिरूं लागला. आणि जे कोणी पळत होते त्या सर्वांचा खड्गें करून वध

केला. अश्वत्थाम्यानें कितीएक योद्ध्यांचे भूषणासह वर्तमान बाहु,शिरें,हस्तिशुं-
डा सारखे ऊरु,हस्त,व पाद तोडून पृथ्वीवर पाडले होते. या प्रकारें अश्वत्थामा
योद्ध्यांचा नाश करीत बहुतकाळपर्यंत संचार करीत असतां ती रात्र भयंकर दि-
सूं लागली. प्राण नष्ट झालेले सहस्त्रावधि पुरुष व गजाश्व पृथ्वीवर पडल्या-
मुळें ती भयंकर दिसत होती. त्या काळीं यक्ष,राक्षस आले त्यामुळें पृथ्वी व्या-
स होऊन गेली होती. कितीएक योद्धे असें ह्मणत होते कीं, निद्रिस्तास मारणें
हें क्रूरकर्म जे राक्षस करितात तेंच कर्म आज धृतराष्ट्राकडील योद्ध्यानीं के-
लें. पांडव सन्निध नवते. या कारणानें हें घोर कदन झालें. सर्व भूतांवर दया
करणारा असा जनार्दन ज्याचा रक्षण करता तो अर्जुन असुर,गंधर्व, यक्ष
राक्षसानीं जिंकण्यास अशक्य आहे व तो निद्रिस्त,मत्त,प्रमत्त,त्यक्तशस्त्र,
ज्याणें हस्त जोडले, युद्धापासून जो पळाला अथवा ज्याचे केश मुक्त झाले
त्याचा तो वध करीत नाहीं, तें आज क्रूरकर्म राक्षसानीं केलें. या प्रकारें
बहुत लोक वारंवार विलाप करीत निजले. जसा पशुपति क्रुद्ध झाला ह्मण-
जे सर्व जीवांचा नाश करितो तसे द्रोणपुत्रानें सहस्त्रावधि प्राणि निरुत्सा-
ह करून पृथ्वीवर पाडले. हे राजा धृतराष्ट्रा, या प्रकारें रात्रीच्या अर्धभागा-
मध्यें द्रोणपुत्रानें पांडवांचें सैन्य यमलोकीं नेलें. अशा भयंकर रात्रीच्या ठा-
यीं बहुत राक्षस व पिशाच्च मरण पावलेल्या नराचीं मांसें खाऊं लागले व
रक्तपान करूं लागले. किती एक पिशाच्च भयंकर दाढा पसरलेले पिंगट-
वर्णाचे होते. किती एकांचे पर्वतां सारखे दांत होते. असे ते विलक्षण,क्रूर,
निर्दय पाहण्यास फार अशक्य असे होते. किती एक राक्षस शोणित प्रा-
शन करून गायन व नृत्य करूं लागले. किती एक पिशाच्च असें ह्मणत कीं
हें रक्त व मांस फार पवित्र व चांगलें आहे. कितीएक राक्षसांचीं मुखें नाना
प्रकारचीं होतीं व तीं मेद,मज्जा,अस्थि व मांस यांचें भक्षण करून इक-
डे तिकडे धांवत होते. असे ते अर्बुद संख्याक राक्षस होते. या प्रकारें सक-
ल भूतें त्या रणभूमीवर येऊन तीं मोठीं भयंकर दिसूं लागलीं असतां प्रातः
कालीं द्रोणपुत्र शिबिरापासून जाऊं लागला. त्या काळीं त्याच्या हस्तांती-
ल रक्तानें भरलेला खड्ग फारच शोभूं लागला. द्रोणपुत्रानें प्रतिज्ञा केल्या

प्रमाणें आपलें कर्म समाप्त करून विगतज्वर होऊन शिबिरांत गेला तेव्हां सकललोक निद्रिस्त असल्यामुळें तो सर्व लोकांस मारून बाहेर निघाला. पुढें कृपाचार्य व कृतवर्मा हे भेटल्या नंतर त्यानें झालेलें वर्तमान त्यांस सांगितलें. तसेंच त्या उभयतांनीं केलेलें कर्म अश्वत्थाम्यास सांगितलें. या प्रकारें प्रसुप्त व प्रमत्त सोमकांचा वध झाल्यामुळें ती रात्र फार भयंकर दिसूं लागली. पहा बरें ज्यांणीं आमच्याकडील योद्ध्यांचा क्षय केला तेही शेवटीं मरण पावले. तस्मात् काळाचा विपर्यास फार दुरतिक्रम आहे. असें संजयाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र बोलतो हे संजया, माझ्या पुत्रांचा विजय होण्याविषयीं द्रोणपुत्र इच्छित असतां असें कर्म त्या महारथ्यानें पूर्वीं कां केलें नव्हतें? याच वेळेस असें क्षुद्र कर्म करण्याचें कारण काय? हें तूं सांगण्यास योग्य आहेस. असा प्रश्न ऐकून संजय बोलतो हे राजा, पूर्वीं पांडवांच्या भयामुळें असें कर्म करण्यास द्रोणपुत्र शक्य नव्हता. प्रस्तुत पांडव श्रीकृष्ण व सात्यकी हे जवळ नव्हते म्हणून त्यानें असें कर्म केलें. नंतर ते त्रिवर्ग महारथी एकत्र जमून असें बोलूं लागले कीं, अरे त्या गोष्टी दैवानें घडल्या. असो. अश्वत्थाम्यानें हर्षित होऊन उभयतांस आलिंगन देत असें भाषण केलें कीं, सकल पांचाल द्रौपदेय, सोमक व अवशिष्ट राहिलेल्या मत्स्यांचा मी वध केला; आतां आपण कृतकृत्य जाहलों. आतां लौकरच जाऊन दुर्योधनराजा जर जिवंत असेल तर त्यास हें समग्र वर्तमान सांगूं. असा विषय या अध्यायां०आ०

९. अध्याय नववा- संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, अश्वत्थामा कृपाचार्य व कृतवर्मा हे त्रिवर्ग सर्व पांचालांचा व द्रौपदेय यांचा वध करून जेथें दुर्योधन पडला होता तेथें गेले. आणि यत्किंचित् प्राण राहिलेल्या दुर्योधनास पाहून ते त्रिवर्ग रथाखालीं उतरले. व तो रुधिर वमन करीत आहे आणि भयंकर श्वापदें व कोल्हे हे त्याचें मांस भक्षण करण्या करितां आसमंतात्भागीं उभे आहेत, हें त्यांनीं पाहतांच त्या सर्व श्वापदांचें निवारण केलें. ते दुर्योधनाजवळ उभे राहिले असतां तीन अग्नींनी वेदी जशी सुशोभित दिसते तसा दुर्योधन शोभूं लागला. दुर्योधनाचें दुःख त्या त्रिवर्गांनीं पाहतांच त्यांस तें सहन न होऊन रोदन करूं लागले. नंतर त्या दुर्योधनाच्या मुखापासून नि-

घालेलें रुधिर आपल्या हातानें पुसून दीनपणानें त्याचें सांतवन करूं लाग-
ले. प्रथम कृपाचार्य भाषण करितो कीं, कायहो, दैवास कांहीं भार नाहीं. पहाब-
रें हा एकादश अक्षौहिणींचा पति दुर्योधन रणामध्यें हत होऊन रुधिर वमन
करीत पडला आहे. पहा स्कवर्णा सारखी त्याची कांति दिसते तशीच सुवर्णा-
नीं भूषित केलेली त्याची गदा विष्णूच्या गदे सारखीच त्याच्या समीप पडली
आहे. ही गदा शूर जो दुर्योधन यास सोडून कधींही राहिली नाहीं. प्रस्तुत हा
यशस्वी शूर स्वर्गास जात असतांही यास सोडीत नाहीं. रम्यक्रीडा मंदिरा
चे ठायीं शयनावर पतीच्या सन्निध जशी प्रीतिमति भार्या जवळ असत्येतशी
ही जांबुनदानें परिष्कृत केलेली गदा आपल्या शयन केलेल्या वीरासन्निधआ
हे. पूर्वी या राजाच्या गृहीं अर्थाकरितां द्विज येऊन उपासना करीत होते त्याच्या
दुर्योधनाचें मांस खाण्या करितां प्रस्तुत श्वापदें इच्छा करितात. संजय भाषण
करितो हे राजा, या प्रकारें कृपाचार्यानें शोकयुक्त भाषण केल्यावर रणभूमी
वर पडलेल्या कुरुश्रेष्ठास पाहून अश्वत्थामा भाषण करितो कीं, हे राजा सर्व
लोक तुला धनुर्धाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असें ह्मणतात. युद्धा विषयीं तूं केवळ कु
बेरा सारखा आहेस. संकर्षणाचा तूं शिष्य असतां भीमसेनानें तुझें मरण
छिद्र कसें पाहिलें? भीमसेनानें तुला मारलेला पाहून आह्मांस फारच आश्च
र्य वाटतें? पापी मंद व क्षुद्र भीमसेनानें तुझा निश्चयें करून कपटानेंच वध
केला. तस्मात् दुरत्यय काल आला आहे. या कालाचें उल्लंघन करण्यास को
णी समर्थ नाहीं. भीमसेनाचें व तुझें धर्मयुद्ध होत असतां पायानें तुझ्या शि
राचें मर्दन केलें. कृष्णानें व युधिष्ठिरानें भीमसेनाची उपेक्षा केली तस्मात्त्या
उभयतांस धिःकार असो. हीं भूतें जों काळपर्यंत पृथ्वीवर आहेत तों काळ-
पर्यंत सर्व योद्धे वृकोदराची युद्धा विषयीं निंदा करितील. यदुनंदन बलराम
निरंतर तुला असें ह्मणत असे कीं, दुर्योधनासारखा गदायुद्धामध्यें वीर्यवान्
कोणी नाहीं. सभेमध्यें तो निरंतर तुझी स्तुति करून असें ह्मणत असे कीं,
जो कौरव गदायुद्धामध्यें निपुण आहे तो माझा शिष्य होय. हे वीरा, अस्तु.
महर्षींनीं क्षत्रियांस जी प्रशस्त गति सांगितली आहे त्या गतीस तूं गेलास.
हे दुर्योधना, तुझ्या विषयीं आह्मीं आतां शोक करीत नाहीं. आतां धृतराष्ट्र

व गांधारी शोकयुक्त होऊन पृथ्वीवर भिक्षुका सारखे फिरतील. अरे, कृष्णार्जुन धर्मज्ञ असतां भीमसेनानें तुझा वध केला हें पाहून त्याणीं कशी उपेक्षा केली बरें! हे गांधारीपुत्रा, शत्रूच्या सन्निध जाऊन धर्मानें युद्ध करितां करितां तूं रणभूमीवर पडलास ह्मणून तूं मोठा पुण्यवान आहेस असें आह्मीं समजतों. प्रजेचें हित व रक्षण करणारा असा तूं असतां तुला पुरस्कृत्य करून आह्मीं स्वर्गास जात नाहीं. तूंच एकाकी जातोस तस्मात् आह्मां त्रिवर्गास धिःकार असो. हे नरव्याघ्रा, तुझ्याच वीर्यानें आह्मां त्रिवर्गाचीं गृहें व भृत्य रत्नानीं परिपूर्ण झालीं असतां आह्मीं या वेळेस स्वर्गास येत नाहीं, त्या पेक्षां आह्मांस धिःकार असो. हे कुरुश्रेष्ठा, तुझ्या वांचून हीन झालेल्या आह्मांस शांति व सुख कोठून असणार! हे महाराज, तुझ्या पूर्वीं जे रथी स्वर्गास गेले आहेत त्यांस तूं तेथें भेट. आणि तुझ्यापेक्षां जे ज्येष्ठ व श्रेष्ठ असतील त्यांचा माझ्या वचना वरून सत्कार कर. सर्व योद्ध्यांचा ध्वजच अशा द्रोणाचार्यांची पूजा करून मी धृष्टद्युम्नास मारिलें हें वर्तमान त्यांस सांग. आणि बाल्हिक राजास व सोमदत्त व भूरिश्रवा या उपायनांस आलिंगन दे. आणखी जे कोणी पार्थिवश्रेष्ठ स्वर्गलोकीं गेले आहेत त्यांस कुशल प्रश्न कर. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें मांड्या भग्न झालेल्या दुर्योधनास अश्वत्थाम्यानें प्रथम भाषण करून पुनः बोलला कीं, हे दुर्योधना, तुला सुख होण्या सारखें मी वर्तमान सांगतों तें ऐक. पांच पांडव, वासुदेव व सात्यकी असे सात, व मी, कृपाचार्य व कृतवर्मा असे तुझ्याकडील तीन योद्धे अवशिष्ट राहिलों आहोंत. आतां पांडवांनीं जसें कृत्य केलें तसेंच कृत्य मी करून पांडवांस हतपुत्र केलें. त्यांचे योद्धे निजले असतां त्यांच्या शिबिरांत जाऊन नरवाहनासहवर्तमान त्यांचा नाश केला. पापकर्म्या धृष्टद्युम्नाच्या शिबिरांत जाऊन त्यांस पशू सारखें रात्रीं मारिलें. असें भाषण ऐकून दुर्योधन सावध झाला. आणि अश्वत्थाम्यास बोलला कीं, हे ब्राह्मणपुत्रा, कृपाचार्य व कृतवर्मा यांसहवर्तमान जसें तूं आज कर्म केलेंस. तसें कर्म पूर्वीं गांगेय भीष्मानें कर्णानें व तुझ्या पित्यानेंही केलें नाहीं. क्षुद्र जो पांडवांचा सेनापति धृष्टद्युम्न शिखंडीसहवर्तमान आज तूं मारलास तेणें करून आज मी आप-

त्यास इंद्रासमान मानतों. अस्तु तुमचें कल्याण असो. आतां स्वर्गी तुमची आमची भेट होईल, असें बोलून दुर्योधनानें आपल्या सुहृत् संबंधीं जनाचें दुःख न मानितां प्राणाचा त्याग केला. संजय भाषण करितो हे धृतराष्ट्र राजा, या प्रकारें तुझा पुत्र दुर्योधन मरण पावल्या नंतर त्या वीरानीं त्यास आलिंगन देऊन पुनः पुनः त्याजकडे पहात आपले रथांत बसून नगरांत गेले. हे राजा, तुझ्या दुष्ट मसलतीमुळें कुरुपांडवांचा क्षय जाहला. तुझा पुत्र दुर्योधन स्वर्गास गेल्या नंतर शोकानें मीही बहुत दुःखित झालों आहें. आतां व्यासानें जें मला दिव्य दर्शित्व दिलें होतें तें आज नष्ट झालें. नंतर धृतराष्ट्र राजानें जेव्हां आपल्या पुत्रांचें मरण ऐकिलें तेव्हां तो चिंताग्रस्त झाला. असा विष०

## अथ ऐषीकपर्व प्रारंभः

१० अध्याय दहावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, ती रात्र गेल्यावर धृष्टद्युम्नाचा सारथी निद्रावस्थेंत झालेलें कर्म धर्मराजास सांगूं लागला. हे धर्मराजा, द्रौपदीचे पांच पुत्र द्रुपदपुत्रासहवर्तमान निद्रिस्त असतां त्यास क्रूरकर्म कर्ता कृतवर्मा, कृपाचार्य व पातकी अश्वत्थामा त्यानीं मारिले. अवशिष्ट राहिलेले गजाश्वप्रभृति तुमचें सैन्य तेंही प्रासशक्ति परिघवध शस्त्रानीं नष्ट केलें. परशूनें छिन्न केलेल्या महान् वृक्षांचा पृथ्वीवर पडते वेळेस जसा शब्द होतो तसा तुझ्या सैन्यांत एका एकीं शब्द झाला. हे धर्मात्म्या, कृतवर्मा कांहीं व्यग्र झाल्यामुळें तुमच्या समग्र सेन्यापेकीं मी मात्र राहिलों आहें. असें सारथ्याचें अशुभ वाक्य ऐकून धर्मराजा तत्काल पृथ्वीवर पडला. हें सात्यकी भीमसेन अर्जुन व माद्रिपुत्र याणीं पाहून धर्मराजास सावध केलें. तेव्हां तो आर्त वाणीनें असें बोलूं लागला कीं, पहा दैवाची गति विपरीत आहे. ज्याणें सर्व शत्रु जिंकिले तोही शेवटीं शत्रूचे हातून जिंकिला गेला तस्मात् दिव्यचक्षु पुरुषासही पुढें होणारे गतीचें ज्ञान होणें परम कठिण आहे. पहा आह्मीं संपूर्ण शत्रु आपले भ्राते, मित्र, पितर, पुत्र, सुहृद्गण बंधु अमात्य व पौत्र इत्यादि सर्वांस जिंकिलें असतां आह्मींही शेवटीं शत्रूपासून जिंकिले गेलों तस्मात् प्रारब्धवशें करून अर्थ अनर्था सारखा, ज-

प पराजया सारखा होतो तस्मात् जो दुर्मती पूर्वी शत्रूस जिंकून हर्ष पावतो तो पुढें विपत्ति पावतो तस्मात् आपण शत्रूस जरी जिंकिलें तथापि मी विजय पावलों असें मानूं नये. पहा बरें ज्याचा नाश केला असतां आह्मांस पाप होईल असें मानीत होतों परंतु शेवटीं त्याणीं आमचाच नाश केला. कर्ण नालिक जातीचे बाण त्या ज्याच्या दाढा, खड्ग ज्याची जिव्हा, धनुष्याच्या प्रत्यंचेचा रणत्कार, संग्रामामध्यें पलायन न करणारा अशा कर्णरूपी नरसिंहापासून जे राजपुत्र तरले ते असावधपणें मरण पावले. रथरूपी डोहामध्यें शरवर्षाव याच लहरी आणि वाहनें व अश्व या रत्नांनीं भरलेला, शक्तिऋष्टि हेच कोणी मत्स्य, ध्वज गज याच सुसरी, धनुष्य हेच भोंवरे व बाण हेच फेंस संग्रामरूपी चंद्राच्या उदयानें प्राप्त झालेली वेगमर्यादा ज्यास अशा द्रोणरूप समुद्रास लहान व मोठ्या शस्त्ररूप नौकेनें जे तरून गेले ते आज अकस्मात् आह्मी जवळ नसल्यामुळें मरण पावले. तस्मात आपल्या संकटकालीं स्वकीय जनांच्या सन्निध न असणें हाच या जीवलोकांत वधच आहे. असावध राहणाऱ्या मनुष्याचा अर्थ नष्ट होऊन अनर्थास पात्र होतो. उंच केलेलीं जीं उत्तम ध्वजाचीं अग्रें हाच कोणी अग्नि, आणि शर हेच ज्याच्या ज्वाला, कोप हाच वायु, मोठमोठ्या धनुष्यांच्या प्रत्यंचे पासून निघालेला जो शब्द तोच ज्या भीष्माग्नीचा घोर शब्द, नानाप्रकारचीं जीं शस्त्रें तीं ज्या अग्नीचीं होमद्रव्यें आलेली जी मोठी सेना, व भीष्म हेच कोणी एक अग्नि अशा घोर अग्नीसही राजपुत्रांनीं सहन केलें ते राजपुत्र शेवटीं आमच्या प्रमादानें मरण पावले तस्मात् प्रमत्त झालेल्या पुरुषास विद्या, तप, श्री, आणि विपुल यश हीं कधीं प्राप्त होत नाहींत. पहा बरें ज्या राजपुत्रांनीं सर्व आपले शत्रु मारून इंद्राच्या सुखास योग्य झाले ते राजपुत्र आमच्या प्रमादामुळें मरण पावले. समुद्रीं पावलेले वणिक जन जसे मोठे समुद्र तरून शेवटीं लहान नदींत बुडतात तेशी त्या राजपुत्रांची अवस्था झाली. अस्तु. आमच्या प्रमादानें जरी हे राजपुत्र मरण पावले तथापि हे निःसंशय स्वर्गासच गेले, असें खचित आहे. परंतु ही जी पतिव्रता द्रौपदी तिजविषयीं मला बहुत शोक होतो. ही तर आज भयाभीत होऊन शोकार्णवामध्यें बुडून जाईल. भ्राते पुत्र व वृद्ध पांचालराज यास

यांचें मरण ऐकून शोकानें कृशांग झालेली द्रौपदी आजच मूर्च्छित होऊन पृथ्वीवर पडेल. ही द्रौपदी सुखास योग्य असून त्या दुःखाचें कसें सहन करील! या प्रमाणें धर्मराज आर्त होऊन विलाप करीत नकुलास बोलतो. हे नकुला, तूं द्रौपदीकडे जा आणि त्या मंदभाग्य राजपुत्रीस मातृपक्षसहित इकडे घेऊन ये. असें वाक्य ऐकतांच नकुल तत्काल रथामध्यें बसून पांचाल राजाच्या स्त्रियांसह द्रौपदी जेथें बसली होती तेथें गेला. इकडे शोकानें पीडित झालेला धर्मराजा आपल्या सुहृत् गणांसहवर्तमान रोदन करीत मृतझालेले पुत्र जेथें होते तेथें गेला. तेथें रुधिरानें आर्द्र झालेले व शस्त्रानें ज्यांचीं अंगें व शिरें छिन्न होऊन पृथ्वीवर पडलेले इष्ट व सुहृद व पुत्र इत्यादिकांस पाहून मोठ्यानें आक्रोश करीत पृथ्वीवर पडला. असा विषय यांत आहे.

११ अध्याय अकरावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पुत्र व पौत्र व आपले सुहृत् हे युद्धांत मरण पावलेले धर्मराजानें पाहून तो अतिशय शोक करूं लागला. तेव्हां सुहृत्जन वारंवार त्याचें सांत्वन करीत आहेत तों सूर्या सारख्या तेजस्वी रथांत बसलेला नकुल द्रौपदीस घेऊन तेथें आला. नंतर द्रौपदीनें आपल्या सर्व पुत्रांचे दुःखकारक वर्तमान ऐकून ती अतिशय दुःखित झाली. आणि वाऱ्यानें कंपित झालेली कदली जशी पृथ्वीवर पडते तशी शोकार्त झालेली राजपुत्री धर्मराजाजवळ पडली. त्या कालीं तिचें पूर्वीचें प्रफुल्लित झालेलें मुख ग्रस्त चंद्रा सारखें एकाएकीं कलंकयुक्त दिसूं लागलें. द्रौपदी पृथ्वीवर पडत असतां भीमसेनानें आपल्या बाहूंनीं आलिंगन करून तिचें समाधान केलें. तथापि ती राजपुत्री रोदन करीत धर्मराजास बोलली. हे राजा, क्षात्रधर्मानें आपले पुत्र यमास अर्पण करून सकल पृथ्वीच्या राज्याचा तूं आज उपभोग करशील ना? आतां तूं आपल्या प्रारब्धानें कुशल होऊन पृथ्वीचें राज्य करीत असतां तूं मत्त मातंगासमान गमन करणाऱ्या सुभद्रा पुत्राचें स्मरण करीत नाहींसना? अश्वत्थामा याणें निद्रिस्तांचा वध केला हें ऐकून मी दग्ध झाल्यें आहें यास्तव तुह्मीं त्याचें जीवित्व हरण करणार नाहीं तर मी प्राणाचा त्याग करीन, असें समजा. असें बोलून जवळ बसली असतां धर्मराजा तीस ह्मणतो. हे द्रौपदी, तुझे पुत्र व भ्राते धर्मेंकरून

मरण पावले तस्मात् त्यां विषयीं शोक करणें उचित नाहीं. असें धर्मराजाचें भाषण ऐकून द्रौपदी भाषण करिते. हे धर्मराजा, अश्वत्थाम्याच्या उत्पन्नकालींच एक मणी त्याच्या शिरांत आहे तो मला द्या म्हणजे मी वांचेन असें द्रौपदी धर्मराजास बोलून नंतर भीमसेनाच्या सन्निध येऊन त्यास भाषण करित्ये हे भीमसेना तूं तरी आज आपल्या क्षात्रधर्माचें स्मरण करून माझें त्राण कर. इंद्रानें शंबरासुरास जसें जिंकिलें तसें अश्वत्थाम्यास जिंक. वारणावत नगरा मध्यें पांडवांस महान् दुःख झालें असतां तूंच त्यांचें रक्षण केलेंस. हिडिंबासुर पांडवांस मारण्यास आला त्या कालीं तूंच पांडवांचें रक्षण केलेंस. तसेंच विराट नगरीं कीचकानें मला दुःखित केलें. त्या कालीं इंद्रानें पौलोमीस जसें दुःखांतून काढिलें तसें तूं मला दुःखापासून मुक्त केलेंस. हें भीमसेनानें ऐकून तत्काल सुवर्णमयरथांत बसला आणि बाणासहित धनुष्य घेतलें. व नकुलास सारथी करून द्रोणपुत्राचे वधार्थ चालिला. चालतां चालतां आपल्या चापाचा टणत्कार करीत वायूसारख्या वेगवान अश्वांस प्रेरणा करूं लागला. त्या कालीं ते वायू सारख्या वेगानें निघाले. असा विषय या अध्यायांत आहे.

१२. अध्याय बारावा- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, भीमसेन अश्वत्थाम्याच्या वधाकरितां गेला तेव्हां यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण युधिष्ठिरास बोलतो कीं, हे धर्मराजा, हा भीमसेन पुत्रशोकानें अतिदुःखित झालेला अश्वत्थाम्याचा वध करण्याचे इच्छेनें धांवत आहे. हा भीमसेन सर्व भ्रात्यांमध्यें तुला अतिप्रिय आहे खरा. परंतु मोठ्या संकटांत पडला आहे हें तूं कसें जाणत नाहींस? अरे राजा द्रोणाचार्यांनें आपल्ये पुत्रास पृथ्वीचा दाह करणारें जें ब्रह्मशीरनामक अस्त्र तें सांगितलें आहे तेंच अस्त्र त्याणें अर्जुनासही कथन केलें आहे. हें अश्वत्थाम्यास समजतांच तो असंतुष्ट होऊन कोणे एके दिवशीं आपल्या पित्यास अर्जुनास ब्रह्मशिरास्त्र न देण्या विषयीं सांगूं लागला. तेव्हां पुत्राचें अतिशय चापल्य जाणून सर्वधर्मवेत्ता द्रोणाचार्य आपल्या पुत्रास भाषण करितो. कीं, हे पुत्रा, जें मी तुला ब्रह्मशिरास्त्र दिलें आहे तें अस्त्र तूं मोठ्या आपत्कालींही रणामध्यें कोणावर टाकूं नको. विशेषें करून मनुष्यावर तर कधीं टाकूं नको. असें भाषण करून नंतर पुनः तो आपले पुत्रास शापा सारखें

असें भाषण करितो कीं, हे पुत्रा, तूं इतउत्तर सन्मार्गाचें ठायीं क... ...नार नाहींस असें मला खचित् वाटतें. असें पित्याचें वाक्य ऐकतांच तो शोक करीत पृथ्वीवर संचार करूं लागला. हे धर्मराजा, तूं वनामध्यें असतां कोणे एके दिवशीं अश्वत्थामा फिरतां फिरतां द्वारकेंत आला तेव्हां यादवानीं त्याचा परम सत्कार केला. तो द्वारकेंत असतां एके दिवशीं मला पाहून हास्य करीत असें बोलला कीं, हे कृष्णा, पिता द्रोणाचार्य तप करीत असतां एके दिवशीं अगस्त्यऋषींनीं, सर्व देवानीं पूजित असें ब्रह्मशिरनामक अस्त्र त्यास दिलें, तें मी तुला देतों. तुझें चक्ररूप अस्त्र मला दे. त्या कालीं मीही हात जोडून मोठ्या प्रीतीनें त्यास बोललों कीं, हे द्रोणपुत्रा, तूं मजपाशीं चक्र अस्त्र मागतोस खरें परंतु याचें धारण करण्यास तूं समर्थ होशील तर हें धनुष्य ही शक्ति, हें चक्र व ही गदा आहे, यांतून जें इच्छित असेल तें मी देतों. परंतु इतक्या अस्त्रांतून तुला धारण करण्या विषयीं व प्रयोग करण्या विषयीं जें शक्य वाटेल तें तूं घे. आतां जें अस्त्र तूं मला देण्यास इच्छितोस तें तूं मला जरी न दिलेंस तरी चिंता नाहीं. असें माझें भाषण ऐकून तो माझ्याशीं स्पर्धा करीत माझे चक्राची तो यांच्या करूं लागला. त्या कालीं मी बोललों कीं, हें माझें चक्र घे असें ह्मणून त्याच्या पुढें ठेविलें. नंतर त्यास जितकें सामर्थ्य होतें तितक्या सामर्थ्यानें तो उचलण्यास प्रयत्न करूं लागला. तथापि तें चक्र जागेवरून हाललें नाहीं. नंतर आपला सर्व यत्न व्यर्थ गेला असें पाहून तेथून माघारा फिरला. असें पाहून अश्वत्थाम्यास मी असें बोललों कीं, अरे द्रोणपुत्रा, देवमनुष्यांस मान्य श्वेताश्वज्यास ह्मणतात असा गांडीवधन्वा ज्याणें शितिकंठ उमापतीस युद्धांत संतुष्ट केलें त्या अर्जुनापेक्षां या पृथ्वीवर दुसरा कोणी मला प्रिय नाहीं. त्याणें माझी स्त्री अथवा पुत्र मागितले असतांही मी त्यास देणार, असें असून त्याणें हें माझें चक्र कधींही मागितलें नाहीं. हिमाचलाच्या पार्श्वभागीं बारा वर्षें पर्यंत ब्रह्मचर्य आचरण केलें तेंच व्रत रुक्मिणीही करीत असतां तिला सनत्कुमारा सारखा प्रद्युम्न जो पुत्र झाला त्यानेंही व अतिबलवान जो राम याणें व महारथी महान् महान् वृष्णी अंधक जे द्वारकेंत राहणारे आहेत त्याणीं हीं हें अस्त्र कधीं मजपाशीं मागितलें नाहीं. हे रथिश्रेष्ठा, हें अस्त्र घेऊन तूं

कोणाशीं युद्ध करणार तें सांग. असें मी द्रोणपुत्राशीं भाषण करितांच तो बोल लाकीं, हे कृष्णा कांहीं चिंता नाहीं. तुजसहवर्तमान मी युद्ध करीन. आणि देव दानवांनीं पूजिलें हें तुझें चक्र घेऊन युद्धामध्यें अजय होईन. असो. मी आतां जातों. मला कल्याणयुक्त आशीरवाद दे. हें चक्र तूं घेतलें आहेस म्हणून या पृथ्वीवर तूं श्रेष्ठ झाला आहेस असें मला भाषण करून रथास योग्य असें अश्वधन व नाना प्रकारचीं रत्नें घेऊन द्रोणपुत्र मोठ्या त्वरेनें तेथून गेला. तें अस्त्र त्याजपाशीं आहे यास्तव वृकोदराच्या साह्यार्थ अर्जुनास पाठीव. असा विषय या अध्यायांत आहे.

१३. अध्याय तेरावा :- वैशंपायन सांगतात हे जनमेजया. असें श्रीकृष्णानें भाषण करून रथामध्यें जाऊन बसला. कांबोज देशोद्भव अश्व यांणीं युक्त केलेला सूर्यासमान तेजस्वी जो रथ त्याच्या दक्षिणभागीं शैब्य व उत्तरभागीं सुग्रीव या नामाचे अश्व जोडले त्याच्या पाठीमागें मेघपुष्प व बलाहक या नांमाचे अश्व जोडले. व विश्वकर्म्यानें केलेली ध्वजाची सुवर्णमय यष्टि ध्वजावर शोभूं लागली. त्या यष्टीस गरुडानें पाहूनही आश्रय केला. अशा रथांत कृष्ण बसला असतां त्याच्या दोन बाजूंस अर्जून व युधिष्ठिर हे बसले. इंद्र रथामध्यें बसला असतां त्याच्या दोन बाजूंस अश्विनीकुमार बसलेले जसे शोभतात. तसे अर्जुन व धर्मराज शोभूं लागले. नंतर कृष्णानें अश्वांस प्रतोदानें प्रेरणा करितांच ते अश्व रथास घेऊन एका एकीं उड्डाण करूं लागले. तेव्हां पक्षी गमन करीत असतां जसा शब्द होतो तसा रथाचा शब्द होऊं लागला. एक क्षणामध्यें त्या महात्म्यांनीं भीमसेनास जाऊन गांठलें. भीमसेन मोठा क्रुद्ध झाला आहे असें पाहून त्याचें निवारण करण्यास हे त्रिवर्ग समर्थ झाले नाहींत. नंतर तो व हे त्रिवर्ग मिळून भागीरथीच्या तीरीं जेथें अश्वत्थामा होता तेथें आले. त्याच स्थलीं कृष्णद्वैपायन व्यास ऋषींसहवर्तमान बसले आहेत. आणि क्रूरकर्मा घृतानें भरलेलीं वस्त्रें धारण केलेला व धुळीनें व्याप्त झालेला असा अश्वत्थामा त्यांच्याजवळ बसला आहे, असें पाहतांच भीमसेन धनुष्यबाण घेऊन त्याजवर धांऊन गेला. आणि अरे अश्वत्थाम्या, उभा रहा उभा रहा असें भाषण करूं लागला. तेव्हां तो चिंतन करील आचार्या

नें आपल्यास दिलेल्या अस्त्राचा आतां प्रयोग करावा. असा निश्चय करून स-व्यं हस्तामध्यें एक काडी घेतली. आणि पांडव महारथी यास पाहून त्यांचा नाश होवो असें बोलला. आणि त्या काडीवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. तेव्हां त्या पासून अग्नि उत्पन्न झाला. आणि काळांतक यम तिन्ही लोकांचा जसा नाश करितो तसा उत्पन्न झालेला अग्नि तिन्हीं लोकांचा दाह करूं लागला. असा विषय या अध्यायीं आहे.

१४. अध्याय चवदावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अश्वत्थाम्याचा अभिप्राय जाणून श्रीकृष्णानें पूर्वीच अर्जुनास भाषण केलें होतें कीं, हे अर्जुना, द्रोणाचार्यानें ज्या दिव्यास्त्राचा तुला उपदेश केला आहे तें अस्त्र तुझ्या हृदयांत आहे. त्या अस्त्राचा या काळीं भ्रात्यांच्या व आपल्या त्राणा क-रितां प्रयोग करून अश्वत्थाम्याच्या अस्त्राचें निवारण कर. असें केशवाचें भाषण ऐकून अर्जुन धनुष्य बाण घेऊन रथाखालीं उतरला. आणि पूर्वी आचार्यपुत्र आपण व भ्राते या सर्वांचें स्वस्ति असो असें ह्मणून नंतर देवतांस व आपले गुरूस नमस्कार केला. व शिवाचें ध्यान करून या अस्त्रानें अश्वत्थाम्याचें अस्त्र शांत होवो. असें ह्मणून अस्त्राचा प्रयोग केला. तेव्हां तें प्रज्वलित होऊन युगांतकाळींच्या अग्नीसमान जाज्वल्यमान झालें. तसेंच द्रोण पुत्रानेंही टाकलेलें अस्त्र प्रज्वलित झालें. परस्पर उभयतां अस्त्राचें संघर्षण होऊन सहस्रशः उल्कापात होऊं लागले. सर्वत्रांस मोठें भय उत्पन्न झालें. उभयतांच्या अस्त्रांपासून जो शब्द झाला तेणें करून आकाश नादित होऊन गेलें. व पृथ्वी कांपूं लागली. अशीं तीं अस्त्रें नारद व व्यास यांणीं पाहून धनंजय व अश्वत्थामा याचें शांतवन करण्यास उभे राहिले. ते मुनि प्रज्वलित झालेल्या अस्त्राच्या मध्यें उभे राहून सर्व लोकांच्या हितास्तव अस्त्रांचें शांतवन होण्या करितां द्रोणपुत्र व अर्जुन यांस असें भाषण करूं लागले कीं, हे वीर हो, या अस्त्रांचा प्रयोग मनुष्यामध्यें पूर्वी कोणीं कधींही केला नाहीं. तुह्मीं हें साहसकर्म करून लोकांचा कसा नाश करितां? असा वि- षयतआहे.

१५. अध्याय पंधरावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, अग्नीसम तेजस्वी व्यास आणि नारद हे उभयतांच्या अस्त्रामध्यें आड येतांच धनं-

जयानें मोठ्या त्वरें करून आपल्या दिव्य अस्त्राचा दिव्य अस्त्रानें उपसंहार केला. व त्या ऋषींस हात जोडून भाषण करतो हे ऋषे, अश्वत्थाम्यानें अस्त्र सोडिलें ह्मणून त्याचे शमनार्थ मी अस्त्र सोडिलें तेव्हां अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें आह्मीं दग्ध होऊं यास उपाय काय करावा? तस्मात् आमचें व या सर्व लोकांचें आपण रक्षण केलें पाहिजे. आह्मीं आपल्यावर सर्व भार ठेऊन अस्त्राचा उपसंहार केला आहे, याचा उपसंहार देवही करण्यास असमर्थ मग मनुष्यास शक्ति कोठून? याचा उपसंहार करण्याची शक्ति अर्जुनाचीच. इंद्राची सुद्धा नाहीं. हें अस्त्र ब्रह्मतेजापासून झालें आहे. याचा उपसंहार ब्रह्मचर्यव्रत ज्याचें असेल तोच करील. या अश्वत्थाम्यानें याचा प्रयोग केला आहे. आतां काय होईल तें पहावें. बहुत दिवस ब्रह्मचर्य व्रत धारण केलें नसून या अस्त्राचा उपसंहार करण्यास इच्छील तर तें त्याचे मूर्ध्नीचे ठायीं पडून त्याचा समूळ नाश करील. या प्रसंगीं मोठ्या दुःखांत जरी अर्जुन होता तथापि आपल्या अस्त्राचा उपसंहार केल्यावर पुनः अस्त्र टाकिलें नाहीं. अर्जुन ब्रह्मचारी सत्यव्रती व्रतनिष्ठ जरी होता तथापि नारद व व्यास यांचे भाषणाच्या सत्कारा करितां पुनः अस्त्र सोडिलें नाहीं. अश्वत्थाम्यानें ते उभयतां ऋषी आपल्या पुढें उभे राहिले आहेत असें पाहिलें तरी अस्त्र मागें घेतलें नाहीं. तर तो व्यासास भाषण करितो कीं, महाराज, भीमसेन मला मारण्यास आला ह्मणून मी आपल्या मृत्यूच्या निवारणार्थ हें अस्त्र पांडवांवर टाकिलें, तें अस्त्र टाकण्याचें कारण दुसरें असें आहे कीं, त्या दुष्ट भीमानें अधर्म करून दुर्योधनाचा वध केला. यास्तव याचें कर्म सहन न झाल्यामुळें मी हें अस्त्र सोडिलें. आणि या अस्त्रापासून अपांडवी पृथ्वी व्हावी अशा संकल्पानें हें सोडलें आहे. तर तें आपलें कार्य केल्यावांचून निवृत्त व्हावयाचें नाहीं. आतां पंडुसुत या अस्त्रानें आपल्या जीविता पासून भ्रष्ट होतील. हे भगवन् व्यासा, हें पापकर्म मी केलें खरें. याचा उपसंहार पंडुसुतांचा जीव घेतल्यावांचून होणार नाहीं. असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून व्यास भाषण करितात. हें तान ब्रह्मशिरास्त्र पार्थास विदित आहे त्याणें तुझे नाशाकरितां तें अस्त्र सोडलें नाहीं. तूं टाकिलेंस ह्मणून त्याच्या शांतिक-

रितां अर्जुनानें प्रयोग केला. आतां त्याणें आपले अस्त्रांचा उपसंहार केला.तु झ्याच पित्या पासून या अस्त्राचा उपदेश अर्जुनास झाला आहे,तो अर्जुन आ पल्या क्षात्रधर्मापासून कधींही कंपित व्हावयाचा नाहीं, असा सर्वास्त्रवेत्ता पा र्थ असतां सबांधव त्याच्या वधाची कां इच्छा करितोस? अरे बाबा, दुसरें एक घोर कृत्य या पासून असें उत्पन्न होईल कीं, या ब्रह्मास्त्राचा दुसऱ्या ब्रह्मास्त्रा नें नाश केला असतां त्या देशांत बारा वर्षे पर्यंत अवर्षण होऊन राष्ट्रनाश- होईल. अर्जुनानें प्रजेचें अहित होईल असें जाणूनच तुझ्या अस्त्राचा प्रति घात न करितां उपसंहार केला यास्तव हे ब्रह्मन्, पांडवांचे व सर्व राष्ट्राचे रक्षणा करितां आपल्या अस्त्राचा उपसंहार कर. अधर्मे करून त्यांचा पराजय होण्या ची कां इच्छा करितोस! आतां तुझ्या मस्तकामध्यें जो मणी आहे तो पांडवांस दे ह्मणजे ते तुझा प्राण घेणार नाहींत. असें व्यासांचें भाषण ऐकून द्रोणपुत्र भाषण करितो, हे ब्रह्मन् पांडवानीं जीं रत्नें व कौरवानीं जें धन मिळविलें असेल तें त्या माझ्या मण्याची साम्यता करण्यास योग्य नाहीं. या मण्याचे योगानें माझा कोणी वध करूं शकत नाहीं. व कोणापासूनही मला भय नाहीं. अशा योग्यतेचा हा मणि मी पांडवांस कसा देऊं? आतां तुह्मीं मला सांगता तर हा मणि व हा मी दोघे सिद्ध आहोंत; परंतु जर हें अस्त्र पांडवां वर न पडावें असें तुह्मीं ह्मणत असाल तर हें माझें अस्त्र व्यर्थ न होणारें अ सल्यामुळें पांडवांच्या स्त्रियांच्या गर्भस्थानीं तरी पडेल? हे महामुने हें अ स्त्र मी गर्भाचे ठायीं टाकितो. या अस्त्राच्या उपसंहारा विषयीं तुमचें भाष ण ऐकत नाहीं, असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून व्यास भाषण करितो. हे अनघा, जर या प्रमाणें तुझी इच्छा असेल तर पांडवस्त्रीचे ठायीं या अ स्त्राचा प्रयोग करून उपरम पाव. असें भाषण ऐकून अश्वत्थाम्यानें गर्भा चे ठायीं अस्त्राचा प्रयोग केला. असा विषय यांत आहे.

१६. अध्याय सोळावा:- वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, अ श्वत्थाम्यानें पांडवस्त्रीचे गर्भाचे ठायीं आपलें अस्त्र टाकिलें हें कृष्णानें जा णून अति हर्षित झाला व अश्वत्थाम्यास असें भाषण करूं लागला कीं, हे ब्राह्मणा, विराट राजाची जी कन्या ती अर्जुनाची स्नुषा ती पूर्वी आपले

एहीं उपप्लव्यग्रामीं असतां कोणी एक ब्रह्मनिष्ठ तिजला असें बोलला होता-कीं, सर्व कुरुवंश क्षीण झाला ह्मणजे तुला पुत्र होईल. हें त्या सत्यव्रती साधूंचें भाषण खरें होवो. आणि परीक्षिति या नामें करून वंशावृद्धी करणाराअसा पुत्र हिला होईल. असें गोविंदाचें भाषण ऐकून अश्वत्थामा मोठ्या रोषानें असें प्रत्युत्तर देतो कीं, हे केशवा, तूं हें पक्षपातानेंच भाषण केलेंस. माझें वाक्य अन्यथा न व्हावें ह्मणूनच तूं बोललास ज्या विराट दुहितेचें रक्षण करण्यास तूं इच्छितोस तिच्या गर्भाचे ठायीं हें माझें अस्त्र पडेल यांत संशय नाहीं. असें अश्वत्थाम्याचें भाषण ऐकून भगवान् भाषण करितात. हे ब्रह्मन् तो गर्भ जरी मेला तथापि तो पुनः जीवंत होऊन दीर्घायु होईल. तुला मात्र सर्व श्रेष्ठजन अधम ह्मणतील. आणि ज्या पेक्षां तूं हें बालघात कर्म केलेंस त्याचें फळ तुला असें प्राप्त होईल कीं, तीन सहस्र वर्षे या पृथ्वीवर भ्रमण करशील. तूं कोठें राहशील हें कोणाचे समजण्यांत येणार नाहीं. तुझ्या अंगास शोणिताची दुर्गंधि येऊन भयंकर वनाचा आश्रय करून राहशील. आणि उत्तरेचा गर्भ नर परीक्षित या नामें करून विख्यात होईल. तो आपल्या वयामध्यें आला ह्मणजे वेदोक्त व्रताचा आश्रय करून शारद्वत कृपाचार्यापासून सर्व अस्त्रें त्यास मिळतील. आणि तो क्षात्रधर्मामध्यें निरंतर स्थित असेल. धर्मात्मा होत्साता साठ वर्षे पर्यंत पृथ्वीचें शासन करील. या पुढें तो महाबाहु कुरु राजा होईल. हे दुर्मते तूं कपटानें त्याचा नाश करण्यास उद्योग केलास खरा परंतु तो तुझ्या शस्त्रसंबंधी अग्नीनें दग्ध जरी झाला तथापि मी त्यास जीवंत करीन- हे नराधमा, असें माझ्या सत्याचें आणि तपाचें वीर्य तूं पाहशील. असें भाषण केल्यावर व्यास भाषण करितो हे अश्वत्थाम्या ज्या पेक्षां तूं आह्मांसर्वांचा अनादर करून हें पापकर्म केलेंस. तस्मात् देवकीपुत्रानें जें भाषण केलें तें निःसंशयें करून सत्य होईल असें व्यासाचें भाषण ऐकून अश्वत्थामा भाषण करितो हे ब्रह्मन् तुमच्या बरोबरच मी या लोकीं वास करीन. भगवान् पुरुषोत्तमाचें भाषण सत्य असो. महात्म्या पांडवांस द्रोणपुत्रानें मणी दिल्या नंतर द्रोणपुत्र विमनस्क होऊन त्यांचे समक्ष वनामध्यें गेला. इकडे पांडवानीं गोविंद व

व्यास व नारद यांस पुढें करून द्रोणपुत्राचा मणि घेतला. व द्रौपदीकडे येण्या स निघाले. ते पुरुषव्याघ्र वायुवेग अश्वानीं युक्त केलेल्या रथामध्यें बसून शिबिरामध्यें आले. व रथाखालीं उतरून शोकयुक्त द्रौपदीजवळ केशवा-सह वर्तमान मोठ्या त्वरेनें आले. त्या काळीं धर्मराजाच्या आज्ञेनें महाब-ली भीमसेन तो मणी देऊन असें भाषण करूं लागला कीं, हे भद्रे अश्वत्था म्याचा हा मणि आणिला आहे. लौकर उठून पहा. शोकाचा त्याग कर. आ णि आपला क्षात्रधर्म स्मर. ज्या काळीं श्रीकृष्ण कौरवांकडे सख्य करण्यास गेला, त्या काळीं तूं असें बोलली होतीस कीं, हे गोविंदा, तूं कौरवांकडे जा ऊन जर शमाचा उपाय करशील तर मी असें समजेन कीं, मला पुत्र, पति व भ्राते कोणी नाहींत त्या केलेल्या तीव्र भाषणाचें आज तूं स्मरण कर. वैर संबंधीं ज्या मी प्रतिज्ञा केल्या होत्या त्या सत्य करून मी अनृणी झालों. आपले गुरु द्रोणाचार्य यांचें गौरव करण्यास्तव त्याचे पुत्रास जिंकून सोडून दिलें. त्याचें सर्व यश हरण करून शरीरमात्र अवशिष्ट राहिलें आहे. मण्यापासून त्या चा वियोग करून सर्व आयुधांपासूनही त्यास भ्रष्ट केलें आहे. असें भीम सेनाचें भाषण ऐकून द्रौपदी भाषण करिती. हे भीमा तुमचा जो गुरुपुत्र तो माझाही गुरु आहे. मीही अनृणी झाल्यें. आतां तो अश्वत्थाम्याचा मणि आणलेला धर्मराजानें आपल्या शिरावर बांधावा. त्या काळीं द्रौपदीच्या वा क्यास्तव तो मणि गुरूच्छिष्ट असल्यामुळें राजानें आपल्या शिरावर धारण केला. त्याच्या योगें धर्मराजा चंद्रयुक्त पर्वतासारखा शोभूं लागला. नंतर शोकानें आर्त झालेली कृष्णा उठून बसल्यावर धर्मराजा कृष्णास भाषण क रितो. असा विषय या अध्यायांत आहे.

१७. अध्याय सत्रावा.- वैशंपायन सांगतात हे जनमेजया, कौरवांच्या रथ्यांनीं पांडवांचे सैनिक मारले हें पाहून युधिष्ठिर शोक करीत कृष्णास असें भाषण करितो कीं, हे कृष्णा, अश्वत्थाम्यानें माझे पुत्र मारिले तसेंच शत्रूशीं युद्ध करणारे असे द्रुपदाचे पुत्रही त्याणेंच मारिले. पहा बरें धृष्टद्यु म्नाचे सन्मुख द्रोणाचार्यही युद्धास येत नसे, त्यास द्रोणपुत्रानें मारलें तर विजय प्राप्त होण्यास असें मोठें तप त्याणें काय केलें असावें असा धर्मराजा

चा प्रश्न ऐकून भगवान् भाषण करितात हे युधिष्ठिरा, ईश्वराचा ईश्वर म-हादेव ज्यास ह्मणतात त्याची आराधना पूर्वी अश्वत्थाम्यानें करून तो त्यास शरण गेला ह्मणून सर्व योद्ध्यांचा वध करण्याचें बल त्यास आलें. ह्मणून त्यानें हा सर्वांचा वध केला. महादेव प्रसन्न झाला असतां तो अमरत्व व इंद्राचाही नाश करण्याचें सामर्थ्य देतो. हे राजा त्या महादेवाचें तत्व समग्र मी जाणतों, त्याचीं प्राचीन नाना प्रकारचीं कर्मे मला विदित आहेत. भूतांचा आदि मध्य व अंत हाच होय. याच्याच कर्मानें हें चराचर जगत चलन वलन करण्यास शक्य होतें. पूर्वी ब्रह्मदेव ज्या कालीं सृष्टि उत्पन्न करण्यास प्रसन्न झाला त्या कालीं प्रथम महादेवास पाहून त्यास असें भाषण करूं लागला कीं, हे महाराज, मला शीघ्र सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाली आहे. असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून महादेव सृष्टींत दोष फार आहेत असें जाणून बहुत कालपर्यंत तप करण्या करितां आपण जलामध्यें निमग्न होऊन बसला. नंतर पितामहानें बहुत कालपर्यंत महादेवाची मार्गप्रतीक्षा करून शेवटीं सृष्टि उत्पन्न करणारा असा एक पुरुष आपले मनानें उत्पन्न केला असतां तो ब्रह्मदेवास असें भाषण करितो कीं, महादेव तर जलामध्यें निद्रिस्त आहेत तेव्हां माझे पेक्षां कोणी अग्रज नसेल तर मी प्रजा उत्पन्न करितों. त्या कालीं ब्रह्मदेव आपल्या पुत्रास भाषण करितो कीं, तुझ्यापेक्षां दुसरा अग्रज कोणी नाहीं. तूच आहेस. एक शिव होता तो जलामध्यें निमग्न आहे यास्तव तूंच आतां वेंकृत सृष्टि उत्पन्न कर. असें ब्रह्मदेवानें सांगतांच त्याणें प्रथम दक्षादिक सात प्रजापति उत्पन्न केले. नंतर त्या सप्त प्रजापतींनीं पुढें चार प्रकारची सृष्टि उत्पन्न केली. पुढें त्या उत्पन्न केलेल्या प्रजा क्षुधेनें त्रस्त होऊन आपला उत्पन्न करणारा जो प्रजापति याचें भक्षण करावें ह्मणोन एकाएकीं त्याजवर धांऊन गेल्या. तेव्हां तो प्रजापति त्रस्त होऊन पितामहाकडे गेला आणि त्यास असें भाषण करूं लागला कीं, हे भगवन्, या प्रजांपासून मी बहुत त्रासलों. यांच्या भक्षणाची काय सोय करूं? त्या कालीं ब्रह्मदेवानें सर्व औषधि व स्थावर जंगमभूतें व दुर्बल आणि बलवान् असे सर्व प्राणी हे सर्व प्रजेस भक्षणा करितां अन्न करून दिले. हें अन्न त्यांस मिळतांच कितीएक

दिवसांनीं त्या प्रजा आपआपल्या योनीमध्यें एकमेकांवर प्रीति करीत वृद्धि पावत चालल्या. नंतर लोकगुरु महादेव जलांतून निघाल्यावर त्याणें वृद्धी पावले त्या प्रजांस पाहून क्रुद्ध झाला. व आपलें लिंग पृथ्वीवर टाकलें. हें ब्रह्मदेवानें पाहून त्याचें शमन करीत बोलतो. हे महादेवा हें काय केलें? तेव्हां तो ब्रह्मदेवास बोलतो कीं, या प्रजा दुसऱ्यापासून उत्पन्न झाल्या. माझ्या लिंगाचें तरी काय फळ आहे? असें ह्मणून तो रोषानें मुंजवान् पर्वतावर तपास गेला. असा विषय या अध्यायांत आहे.

१८. अध्याय अठरावा:- भगवान् बोलतात हे धर्मराजा. कृतयुग अतिक्रांत झाल्यावर सकल देव याग करण्या विषयीं इच्छा धरून आरंभ करूं लागले. य ज्ञामध्यें रुद्रदेवतेचें वास्तविक स्वरूप न जाणतां तिला देवानीं भाग दिला नाहीं. यामुळें देवतेस कोप येऊन तिनें धनुष्य उत्पन्न केलें. लोकयज्ञ, क्रिया यज्ञ, गृहयज्ञ व भूतयज्ञ अशा चार यज्ञानीं ही सकळ प्रजा चालत आहे यास्तव लोकयज्ञ आणि गृहयज्ञ या मुख्य दोन यज्ञाचें धनुष्य महादेवानें उत्पन्न करून, वषट्कार त्या धनुष्याची दोरी कल्पिली. आणि जीं यज्ञांगें होतीं त्या धनुष्याच्या दृढते करितां बंधनें कल्पिलीं. तें धनुष्य घेऊन महादेवानें बाणें करून यज्ञपुरुषास प्रहार केला. तेव्हां तो मृगरूप धरून अग्नीसह आकाशांत गेला. हें पाहून सकल लोक मूर्च्छित झाले. हें शंकरानें पाहून, हास्य करीत आपल्या धनुष्य कोटीनें सर्व देवांचा निरोध केला असतां देवांनीं स्तुति केली. तेणें करून महादेवाच्या धनुष्याची प्रत्यंचा तुटून गेली. तें पाहून सकल देव त्याचें स्तवन करण्यास संनिध आले. त्या काळीं रुद्र यज्ञासहवर्तमान देवांवर प्रसन्न होऊन आपला कोप एक ह्रदामध्यें टाकून पुनः यज्ञ करविला. नंतर सकल देवतांनीं आपआपले हविर्भाग घेतले. हे धर्मराजा, तो रुद्र अश्वत्थाम्यानें प्रसन्न करून घेतला ह्मणून तुझें सैन्य मारण्यास समर्थ झाला. असा विषय या अध्यायांत आहे.

समाप्त.

श्री

# स्त्रीपर्व.

१.अध्याय पहिला– जनमेजय राजा प्रश्न करितो हे मुनें व्यास गेल्या वरं-
धृतराष्ट्र राजानें पुढें काय केलें तसाच धर्मपुत्र युधिष्ठिर व कृपाचार्य या त्रिवर्गा-
नीं काय केलें १ अश्वत्थाम्यानें
धृतराष्ट्रास सांगितल्यावर पुढें काय झालें तें मला सांगा असा प्रश्न ऐकून वैशं-
पायन सांगतात हे राजा, दुर्योधन मरण पावला व सर्व सैन्य नष्ट झालें असतां संजय धृतराष्ट्राकडे जावून बोलतो. हे राजा, नानादेशापासून आलेले स-
र्व राजे तुझ्यापुत्रासह वर्तमान स्वर्गास गेले दुर्योधनानें वैरें करून सकल पृथ्वी
शून्य केली. यास्तव हे राजा, पुत्रपौत्रादिकांचीं मेतकार्यें तूं कर असें संजयाचें करुणवा-
क्य ऐकून वायूनें ताडीत वृक्ष जसा पडतो तसा पुत्रादि वधानें पीडित धृतरा-
ष्ट्र राजा भूमिवर पडला नंतर तो बोलतो हे संजया माझ्या पुत्र व सकल
स्वजनांचा नाश झाल्यामुळें मी या पृथ्वीवर बहुत दुःखीझालों आतां
बांध्वादिकानीं हीन झालेल्या माझ्याजीवनाचा उपयोग नाहीं, पहिल्या प्र-
माणें माझें तेज राहिलें नाहीं कारण मी मित्रजनांचें सांगणें ऐकिलें
नाहीं व परशुराम, नारद, व्यास व कृष्ण यानीं सभेंत जें कल्याण का-
रक भाषण केलें तें मीं न ऐकिल्यामुळें अत्यंत संताप पावलों आणि भीष्मा
नेंही धर्मयुक्तभाषण मी ऐकिलें नाहीं, कारण दुर्योधनाच्या गर्जनें मु-
ळें तें मला रूचलें नाहीं सांप्रत दुःशासन, कर्ण, द्रोण इत्यादिकांचा नाश
ऐकून माझें अंतःकरण विदीर्ण होतें. हे संजया पूर्वीं कोणतें ही दुष्कर्म
केलेलें मला स्मरत नाहीं ज्याचें फळ मी मूर्खपणानें भोगतों व ज्या योगा
नें वृद्धावस्थेंत माझ्यासर्व बंधूंचा क्षयझाला अशा दुःखांत ब्रम्हदेवानें
मला योजिलें. याभूमीवर माझ्याहून दुसरा असा दुःखी कोणी नाहीं, त
स्मात् आजच मी प्राण त्याग करितों हें पांडव पाहोत. या प्रमाणें धृतरा
ष्ट्र राजा बहुत शोक करीत असतां संजय त्याचा शोक निवारण करीत
बोलूं लागला. हे राजा तूं वेद व शास्त्रें वृद्धांपासून बहुत ऐकिलीस म्ह
णून तूं शोकाचा त्याग कर पूर्वीं सृंजय राजा पुत्रशोकार्त झाला असतां
जें ऋषीनीं भाषण केलें तें मनांत आण. तुझ्या पुत्रानें तारुण्यपणाच्या

गर्वाचा आश्रय केला असतां तूं मित्रजनांचें भाषण ऐकिलें नाहींस •
लोभानें सार्थही संपादन केला नाहींस केवळ आपल्या बुध्धीनेंच •
गलास. तुझ्या दुष्टपुत्र दुर्योधनानें धर्माचा सत्कार न करितां जें भाष
केलें त्याच्या नाशानें तूं वागलास म्हणून पश्चात्ताप पावलास आ
शोक करणें योग्य नव्हे जसा कोणी मनुष्य स्वतः अग्नि उत्पन्न करून •
त्यानें वेष्टन करितो तसें तूं आपल्या पुत्राचे नाशानें हा पार्थरूप अ
ग्नी प्रदीप्त करून त्यांत लोभरूप घृताचें शिंचन केलेंस. या प्रमाणें तो
अग्नि प्रदीप्त होऊन त्यांत तुझे पुत्र पतंगा सारिखे दग्ध झाले तर
तो शोकानें नेत्रांतून अश्रु टाकितोस या कर्माची पंडित प्रशंसा करीत न
त या करितां तूं धैर्य धरून प्राणाचा त्याग करूं नकोस असें संजयानें
राष्ट्राचें समाधान केलें तेव्हां विदुर बुध्धि पूर्वक त्याशीं भाषण करितो अ
विषय या अध्यायांत आहे.

• २ अध्याय दुसरा–वैशंपायन सांगतात हे जनमेजया नंतर विदुर धृतराष्ट्रा
वळ येऊन त्यास बोध करतो हे धृतराष्ट्रा उठ उठ शोक करूं नको सर्व प्राणिम
त्राची परमगती म्हणून ती हीच आहे. हीं भूतें पूर्वी अदृश्य असतात मध्येंच
सूं लागतात शेवटीं दिसेनाशीं होतात मेल्या बरोबर शोक करून कोणी मर
नाहीं व शोक केला तरी मनुष्यास मृत्यु येतो असें नाहीं असा लोकांचा स्वभाव
आहे तेव्हां शोक कां करतोस कितीएक युध्ध न करितां मृत्यु पावतात किती
क युध्ध करीत असतां मरत नाहींत तेव्हां मरणाचा कांहीं एक स्वाभाविक
कालच येतो. नानाप्रकारच्या प्राण्यास काल आकर्षण करतो कालास को
णी प्रीय नाहीं द्वेष्यही नाहीं जसा वायु तृणास येकत्र करतो तशींच सर्व भूतें
ल ग्रस्त आहेत, बहुत प्राणी गमन करीत असतां एकासच काल आकर्षण क
रतो तेव्हां त्या विषयीं शोक करणें हें काय; जे युध्धामध्यें मृत्यु पावले त्यांवि
षयीं तूं शोक करूं नकोस कारण युध्धांत मृत्यु पावलेले स्वर्गास जातात
तुझे पुत्र तर वेदवेत्ते व उत्तम आचरण करणारे व्रती असे आहेत हे शूर
त्यांत क्षीण होऊन स्वर्गास गेले त्या विषयीं शोक करणें हें काय शरीररूप
ग्नींत शराच्या आहुती देणारे जे शूर ते उत्तम जाणावे हे राजा स्वर्गास जा

विषयीं क्षत्रियास हा मोठा मार्ग सांगितला आहे. क्षत्रियास युध्यावांचून दुसरें कांहीं सांगितलें नाहीं महात्म्येशूर युध्यांत शोभणारे असे क्षत्रिय परम गतीस गेले; त्याविषयीं तूं शोक करूंनकोस. आणि हे पुरुष श्रेष्ठा तूं बुध्दि बलानें मनाचें समाधान कर व तूं शोकानें देहाचा त्याग करण्यास योग्य नाहींस. तसेंच या संसारांत आलेल्या प्राण्यानीं सहस्त्रावधी मातापितर व स्त्री पुत्रादिकांचा अनुभव घेतला आहे. त्यांत ते कोणाचे व आपण त्यांचें कोण आहोंत. मूढपुरुषास प्रतिदिशीं शोकाचीं स्थानें व भयाचीं स्थानें सहस्त्रावधि येतात तीं पंडितास येत नाहींत. हे कुरुश्रेष्ठा, काळासप्रिय; द्वेष्यवमध्यस्थ कोणींच नाहींत तो सर्वांचेंच आकर्षण करितो म्हणून तारुण्यरूपं जीवित् द्रव्यसंचय, आरोग्य प्रियांचा सहवास हीं सर्वनाशवंत जाणून पंडितानें त्यांजवर लोभ धरूंनयें. आणि सर्व देशास होणारें दुःख मनांत आणून एकानें शोक करणें योग्य नाहीं अंगीं सामर्थ्य असल्यास देश दुःखनिवारण करण्याचा उपाय करावा. ज्यासज्ञान आहे त्यानें बुध्दीच्या योगें मनांतील दुःख व ओषधानें शरीरांतील दुःख निवारण करावें हाच ज्ञानाचा उपयोग होय. वहा प्राणी पूर्वजन्मीं ज्या ज्या अवस्थेंत शुभा शुभ कर्में करितो त्यात्या अवस्थेंत या जन्मीं त्याचेंफळ भोगतो शुभ कर्मानें सौख्य व अशुभ कर्मानें दुःख अशीं प्राप्त होतात. कोणतेंही कर्म केल्यावांचून त्याचेंफळ होत नाहीं. आणि तुझ्यासारखे बुध्दिमान पुरूष, ज्या कर्माच्या योगें समूळ नाश होईल. अशा कर्माविषयीं प्रवृत्त होत नाहींत असा विषय या अध्यायांत आहे.

३ अध्याय तिसरा— असें विदुरानें भाषण ऐकून धृतराष्ट्रराजा त्यास बोलतो हे विदुरा तुझ्या मधुरभाषणानीं. माझा शोक नाहींसा झाला. तुझ्या वाक्यें तलेंकरून ऐकण्याची इच्छा करितों अनिष्टाचा योग व इष्टाचें वियोग झाला असतां पंडित जन, मानसदुःखाचा परीत्याग कसा करितात? असें भाषण ऐकून विदुर बोलतो हे राजा ज्या ज्या विषयांच्या योगें मनांस सुखदुःखें होतात त्यात्या विषयापासून मनाचें नियमन करीत ज्ञानी पुरूष शांति पावून त्या सुखदुःखापासून मुक्त होतात. कारण हें

सर्व अशाश्वत आहे असें चिंतन केलें असतां या प्रपंचांत कांहींच अर्थ-नाहीं. ज्यापेक्षां ज्ञानी मूढ, धनवंत, निरधन हे सर्वही मृत्यु पावतात त्यापेक्षां इतरजन या देहांत विशेष काय पहात असतील तें असो जसा पुरुष जीर्ण वस्त्राचा परित्याग करून नविन वस्त्रांवर प्रीती ठेवितो तसा प्राणिमात्रांस देह प्रिय आहे. आणि गर्भांत असतां जन्मल्यावर एक दिवसाच्या अंतरानें व पंधरा दिवसानीं अथवा कांहीं वर्षानीं, तारुण्य व वार्धक्य अवस्थेंतही असतां मृत्यु पावतो असाह्या लोकांचा भाव असतां तूं कां पश्चात्ताप पावतोस; हे राजा, जे अल्पबुद्धी जन आहेत तेच या संसारांत कर्मभोगानें बद्ध होऊन क्लेश पावतात जे सूज्ञ जन आहेत ते या संसारांत हिताची इच्छा करून प्राणिमात्राचा समागम कसा आहे हें जाणून उत्तमगतीस जातात. असा विषय या अध्यायांत आहे.

४. अध्याय चौथा— धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा संसार कसा प्राप्त होतो हें समजण्याविषयीं तुझ्यापासून इच्छितो. असें ऐकून विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा स्त्रीपुरुषांच्या रक्तवीर्याच्या संयोगास आरंभ करून गर्भवृध्धीरूप क्रियासर्व दृष्टीस पडल्से, ती अशी कीं. स्त्रीच्या उदरांत एकरात्र वीर्यानें मिश्रित रक्त राहिलें असतां त्यास कलील संज्ञा मिळते त्या कलीलांत जीव पूर्व दिवसापेक्षां वृद्धि पावून राहतो नंतर पांच महिने झाल्यावर त्यास कांहीं चैतन्याचा आविर्भाव होतो पुढें तो दश मासांत सर्वांग परिपूर्ण होतो व रक्तमांसानें लेपीत-अशा अपवित्र स्थानांत राहतो नंतर वायुवेगानें वर पाय व खालीं मस्तक असा योनीद्वारांत येवून बहुत क्लेश पावतो. तेव्हां पूर्वकर्मांच्या योगें त्यासंकटांतून मुक्त होऊन तेथें बहुत उपद्रव भोगतो आणि कुत्रे जसे मांसावर धांवतात तसे ग्रह याच्या पाठीमागें लागतात् व व्याधिही त्यास जडतात. नंतर-तारुण्य दशेंत इंद्रियानीं बद्ध होऊन अनेक व्यसनास लागतो व चांगलें वाईट कर्मही जाणत नाहीं पुढें वृध्ध अवस्था आली म्हणजे यमदूत त्यास नेतात. त्यांतून एखादा जो धर्मपरी पालन करीत राहतो तो उत्तम गतीस जातो हें जो जाणतो तो दुसऱ्यासही संकटांतून सोडवितो. असा विषय या-अध्यायांत आहे.

५ अध्याय पांचवा- धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा जर हा धर्म, बुद्धीनें समजेल तर तो सर्व बुद्धिमार्ग मला सांग. विदुर बोलतो हे राजा स्वयंभूस नमस्कार करून हें संसाररूप वनातें ऋषी जसें सांगतात तसें मी तुला सांगतो तें असें कीं, कोणी प्राणी अरण्यांत रहात असतां मांसभक्षक सिंहव्याघ्रादिकांनीं युक्त अशा वनांस पाहून त्रासयुक्त होत्साता अंतःकरणास उद्वेग पावतो. व त्या वनांत चोहोंकडे धांवत सकल दिशा पाहून कोणीकडे गेलें असतां मी वांचेन असें म्हणतो आणि तेथें भयानें पीडित होऊन दूर न जातां तेथेंच सिंहादिकांपासून सुटला जात नाहीं कदाचित् सुटला तर घोर अरण्यांत जाऊन जाळ्यांत सांपडतो तें अरण्य असें कीं, स्त्रीनें आपल्या बाहूनीं व्यापलेलें व व्यालसर्पांनीं आणि आकाशाला स्पर्श करणान्या वृक्षांनीं युक्त असें होतें. त्यांत तृणानीं आच्छादित अशा वेलानीं युक्त एक कूप होता त्यांतील उदकांत पडून तो प्राणी वर पाय खालीं डोकें असा होऊन वेलास चिकटून लोंबतो नंतर तेथें ही पुन्हा उपद्रवातें पावतो आणि त्या कूपांत मोठा बलाढ्य अशा नागास पाहतो व तेथून कांहीं निघण्याची युक्ती जों करावी तों त्या कूपाच्या तोंडाशीं मोठ्या गजास पाहतो तो असा कीं साहा मुखें, आणि कृष्ण व शुक्ल असून द्वादश पादानीं क्रमानें संचार करणारा असून वल्ली वृक्षानीं युक्त असे, व त्या कूपाच्या बाजूस [illegible] शाखेचा आश्रय करून नाना प्रकारचे भय प्रद मधुकर पूर्वींच घर करून असत आणि वारंवार मधूच्या धाराही स्रवत असत तेथें त्यास कष्ट मयीं त्या मधुधारेचें सर्वदा प्राशन करीत असून त्याची आशा दूर होत नाहीं व जीविता विषयीं वैराग्य ही त्यास होत नाहीं व तेथील वृक्षास कृष्ण व शुक्ल मूषक ही तोडीत असतात. या प्रमाणें त्या संसार समुद्रांत पडलेला प्राणी जीविताविषयीं वैराग्य पावत नाहीं असा विषय या अध्यायांत आहे.

६ अध्याय साहावा- धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा त्या प्राण्याला महत दुःख असून संकटानें राहत असतां त्यास इच्छा व प्रीति कशी होते, व तो देश कोठें आहे व जेथें हा प्राणी मोठ्या धर्मसंकटांत राहतो, तो त्या महाभयापासून कसा मुक्त होईल हें सर्व मला

तूं सांग. कारण मला त्याच्या उध्धारा विषयीं मोठी इच्छा झाली-आहे. विदुर बोलतो हे राजा मोक्षमार्ग जाणणारानीं हा दृष्टांत सांगितला आहे त्यायोगें परलोकीं मानव उत्तम कल्याण पावतो. जें तुला घोर-अरण्य सांगितलें तो महासंसार होय. तसेंच जें दुसरें कठीण वन सांगितलें तें संसार वन होय जे तुला व्याल सर्प सांगितले ते व्याधि जाणावे जी अत्यंत भयंकर स्त्री सांगितली ती जरा होय. हे राजा जो कूप सांगितला तो-त्या प्राण्यांचा देह होय. त्या कुपांत जो महान वर्णिला तो सर्वांचा संहार कर्ता काळ. त्या कूपांत जी वल्ली ती या प्राण्यांची जीवित आशा होय. आणि जो साहा तोंडांचा गज सांगितला तो साहा ऋतूंनीं युक्त संवत्सर जाणावा जे त्या गजाचे द्वादश पाद सांगितले ते मास होत, जे मुषक रक्षाला तोडतात ते रात्री आणि दिवस समजावे जें शुक्ल आणि कृष्णरूप सांगितलें तें त्या मासांचे शुक्ल आणि कृष्ण पक्ष होत. जे तेथें मधुकर, ते मनुष्याचे मनोरथ व ज्या मधुच्या धारा सांगितल्या ते कामरस जाणावेत तेथें मानव आसक्त होतात. या प्रमाणें बुध या संसार चक्राचें परिवर्तन जाणून ते वैराग्यानें संसार चक्राच्या पाशाचें छेदन करितात. असा विषय या अध्यायांत आहे.

७ अध्याय सातवा- धृतराष्ट्र बोलतो हे विदुरा तूं तत्वदर्शी असल्यामुळें हें मला आख्यान सांगितलेंस. तुझें अमृततुल्य भाषण ऐकून मला वारंवार हर्ष होतो असें ऐकून विदुर बोलतो हे राजा मी या मार्गाचा विस्तार पुन्हा सांगतों ऐक. ज्याच्या ऐकण्यानें कुशल पुरुष संसारांतून मुक्त होतात. जसा हा दीर्घमार्गाच्या आश्रयानें कोठें कोठें श्रमानें वास करितो असा या संसारांत गर्भवासांत राहतो आणि जे पंडित आहेत ते तेथून मुक्त होतात म्हणून शास्त्र वेत्ते जन या संसारास मार्ग वन आहे असें म्हणतात म्हणून पंडितानें या चराचराच्या समागमांत लुब्ध होऊं नये. जे मनुष्यास शारीरमानसिक व्याधि सांगितले त्यासच बुध, सर्प असें म्हणतात. कदाचीत त्या व्याधीपासून मुक्त झाला असतां जरा त्यास गांठते. संवत्सरादीकरूप व आयुष्य यास हरण करतात हे कालाचें सहाय कर्ते आहेत. प्रा

इत्यादिक कारणानीं तूं प्राण धारण कर. असा तूं वागलासतर तुझी लो कांत कीर्ती होईल. असें व्यासाचें वचन ऐकून धृतराष्ट्र राजा एक मुहूर्त पर्यंत ध्यान करीत बोलूं लागला. हे व्यासमी शोकजालांत गुंतल्यामु ळें वारंवार मोह पावून मी आपल्या स्वरूपातें जाणत नाहीं आतां तुमचें वचन ऐकून शोक न करितां प्राण धारणाविषयीं यत्न करितों असें धृतरा ष्ट्राचें भाषण ऐकून व्यास तेथेंच गुप्त झाले. असा विषय या अध्या यांत आहे.

९ अध्याय नववा— जनमेजय बोलतो. व्यास गेले असतां धृतराष्ट्र राजानें पुढें काय केलें तें सांगण्यास आपण योग्य आहांत तसेंच धर्मरा जा, कृप प्रभृती त्रिवर्गानीं काय केलें ? व अश्वत्थाम्याचें कर्म व परस्पराचा शाप ऐकिला तेव्हां संजय काय बोलला तें सांग. दुर्योधन व त्याचें सैन्यह त झालें असतां गत बुध्धि झालेला संजय धृतराष्ट्राजवळ येऊन बोलूं लागला कीं, हे राजा नाना देशांतून अनेक राजे येऊन तुझ्या पुत्रासह वर्तमा न पितृलोकास गेले बहुतानीं सांगितलें असतांही तुझ्या पुत्रानें वैराचा शेवट करण्या करितां सर्व पृथ्वीचा घात केला म्हणून तूं पुत्र पौत्रादिक जे जे मृत्यु पावले त्यांचीं प्रेत कार्यें क्रमानें करीव. असें संजयाचें वाक्य ऐ कून गतप्राण झालेला धृतराष्ट्र राजा निचेष्टित होऊन भूमीवर पडला त्या जवळ विदुर येऊन बोलतो हे भरतश्रेष्ठा ऊठ निजलास काय शोक क रूनको सर्व प्राणिमात्राची हीच गती आहे व शोक करणारा पुरुष मेल्याब रोबर जात नाहीं अशा स्वभावाचे सर्व लोक असतां किमर्थ तूं शोक क रतोस आणि युध्ध न करणारा ही मृत्यु पावतो व करणारा जिवंत राहतो काल आला असतां त्याचें निवर्तन कोणाच्यानेंही करवत नाहीं. व युद्धां त शरीर त्याग करणारे शूर जसे स्वर्गास जातात तसें यज्ञादिकानीं कोणी च जात नाहीं त्यांतून ह्या युध्धांत जे मेले ते सर्व वेदवेत्ते. शूर उत्तम व्रतचरणी. असे असून युद्धांत मृत्यु पावले त्याविषयीं शोक करणें हें काय ? हे रा जा क्षत्रियास युध्धापेक्षां स्वर्ग प्राप्त श्रेष्ठ मार्ग दुसरा कोणताच नाहीं. तु झे पुत्र तर क्षत्रिय असून महात्मे शूर समरांगणीं शोभणारे असल्या-

मुळें उत्तम गतीतें पावले ते व्हां त्यांच्याविषयीं शोक करणें व्यर्थ आहे व हे पुरुषश्रेष्ठा बुध्दीनें आपल्या मनाचें समाधान करून शोक न करितां सांप्रत अवश्य कर्तव्य और्ध्वदेहिक दानादिक कार्य करण्यास योग्य आहां. असा विषय या अध्यायांत आहे.

१० अध्याय दाहावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया असें विदुराचें वाक्य ऐकून धृतराष्ट्र बोलतो माझें यान सिध्द करा हे विदुरा तूं गांधारीकडे जाऊन सकल भरतांच्या स्त्रिया, कुंती व तिच्यासंबंधी अन्य स्त्रिया या सर्वांस घेऊन यावें असें बोलून आपण दुःखानें यानारूढ झाला तशीच पुत्रशोकानें दुःखीत झालेली गांधारी, भर्त्याच्या वचनास्तव इतर भरतांच्या स्त्रियांस व कुंतीस बरोबर घेऊन निघाली. त्या सर्व स्त्रिया एकत्र झाल्यावर एकमेकांस मिठ्या मारून अत्यंत आक्रोश करूं लागल्या. त्यांचें विदुर शांतवन करीत त्यांस रथामध्यें बसवून आपण निघाला त्याकाळीं सर्व कौरवांच्या गृहामध्यें येकायेकीं मोठा आक्रोश होऊं लागला. ज्या स्त्रिया पूर्वी देवगणांनींही पाहिल्या नवत्या त्या मृत भर्तृका झाल्यामुळें सर्वांनीं पाहिल्या. केश मोकळे केले त्या. भूषणें टाकून एक वस्त्र धारण केलें त्या स्त्रिया गृहें पासून नाथ नष्ट झाल्यामुळें गजस्त्रिया जशा बाहेर निघतात तशा त्या स्त्रिया निघाल्या. अपर शिशु जसे आंगणामध्यें इकडे तिकडे धांवतात तशा कौरव स्त्रिया इकडे तिकडे धावूं लागल्या पुत्र, भ्राते, पितर यांचें स्मरण करून आक्रोश करूं लागल्या. सखीच्या पुढें येण्यास ज्या पूर्वी लज्जापावत होत्या त्या एक वस्त्र धारण केलेल्या आपल्या सासूसासऱ्यांच्या पुढें आल्या जांस कधींही शोक माहीत नाहीं त्या अतिशय शोकविव्हलित झाल्या अशा पुष्कळ कौरव स्त्रियांस बरोबर घेऊन धृतराष्ट्र युध्दभूमीकडे जाण्यास निघाला. त्याच्या पाठीमागून इतर जनही निघाले त्या स्त्रियांच्या आक्रोशानें सर्व जनांस दुःख झालें, कौरवांच्या क्षयकालीं सकल पौरलोक मोठाच आक्रोश करूं लागले. असा विषय या अध्यायांत आहे.

११ अध्याय अकरावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया धृतरा-

हस्तिनापुरापासून एक कोशावर गेला तों मार्गांत कृपाचार्य, अश्वत्थामा व कृतवर्मा यांणीं धृतराष्ट्रास पाहिलें नंतर हे धृतराष्ट्रास भाषण करतात. तुझा पुत्र आपल्या सेवकजनांसह वर्तमान शक्रलोकीं गेला. त्याच्यासेंन्यातून आम्हीं राहिलों पुत्रशोकानें कर्षित झालेल्या गांधारीस पाहून कृपाचार्य भाषण करितो हे राज्ञी, तुझ्या पुत्रानीं शत्रूंचा नाश करून वीर कर्मानें ते मरण पावले या मुळें निर्मल अशा लोकास गेले, ते अमरासारिखे तेजस्वी देहानीं ते स्वस्थ विचार करतील. जो युद्ध करीत असतां पराङ्मुख होत नाहीं व अंजलि शत्रूंस न जोडता शस्त्रानें मरण पावतो तो उत्तम गतीस जातो तेव्हां तूं शोक करूं नको. तुझ्या पुत्रांचे शत्रु जे पांडव ते संमृध्धीनपावण्यासारिखीं आम्ही कर्मे केलीं तीं सांगतों ऐक. भीमसेनानें अधर्म करून तुझा पुत्रांस मारलें हें ऐकून आम्हीं रात्रौ शत्रूंच्या शिबिरांत गेलों व धृष्टद्युम्न प्रभृती पांचालाचा व द्रौपदीचे पुत्राचाही घात केला. यामुळें आम्हांस मोठें भय उत्पन्न होऊन पळून आलों. त्याशूर पांडवांस हें वर्तमान कळतांच धांवून येतील. त्यांचा पराभव करण्याची आमची शक्ती नाहीं. पुत्रमरण पावले हें ऐकून पांडव आमचा शोध करीत येतील. तेव्हां आम्ही जाऊं. हे राज्ञि, तूं शोक न करावास आपल्या दैवाचा व क्षात्रधर्माचा शेवट झाला. त्याचप्रमाणें धृतराष्ट्र राजास सांगून ते राजाकडे पाहात निघाले ते गंगेच्या काठानें अश्वांस प्रेरणा करीत चालले. पुढें ते एक मेकांस विचारून तीन मार्गानें ते त्रिवर्ग गेले. त्यांतून कृपाचार्य हस्तिनापुरास कृतवर्मा आपल्या नगरांस, द्रोणपुत्र अश्वत्थामा व्यासांच्या आश्रमाप्रत गेले. पांडवांचा अपराध केल्यामुळें भयानें ते आप आपल्या स्थानीं जात असतां महारथी पांडुपुत्रानीं द्रोणपुत्रास गांठून त्यासह वर्तमान युद्ध केलें व पराभवही केला. असा विषय या अध्यायांत आहे.

१२ अध्याय बारावा — वैशंपायन सांगतात हे जनमेजया, सर्वसैन्य मेल्यावर धृतराष्ट्र हस्तनापुराहून निघाला हें कार्धिष्ठिरानें ऐकून आपले बंधु कृष्ण, सात्यकी व युयुत्सू इतक्यांस घेऊन धृतराष्ट्रानें सांतवन करण्यास गेला. युधिष्ठिराच्या येण्यानं शोकानें कर्षित झालेली पांचाली

इतर स्त्रियांसह वर्तमान तेथें आली कुररी सारख्या आक्रोश करणाऱ्या स्त्रि यांचे समुदाय गंगेच्या तीरीं युधिष्ठिरानें पाहिले त्यासहस्त्रावधि स्त्रिया ऊर्ध्वबाहू करून रुदन करीत प्रियाप्रियवाक्यानीं धर्माची निंदा करून बोलल्या कीं धर्मराज धर्मज्ञ म्हणवितो ती त्याची अघातुक बुध्धी आज कोठें गेली ? याणें आपले पितर, भ्राते, पुत्र, गुरू, मित्र यांचा वध करविला. हे धर्मा, द्रोणपितामह भीष्म व जयद्रथ यांचा घाताविषयीं आपलें मन कसें निष्ठुर केलेंस ! ! आतां तुला राज्य करून काय उपयोग आहे ? अरे अभिमन्यु व द्रौपदीचे पांच पुत्र हे ही मृत झाले आतां तूं पुढें काय करणार ? असा तो स्त्रियांचा शब्द ऐकून युधिष्ठिर धृतराष्ट्रास वंदन करून आम्ही पांडव आपले दर्शनार्थ आलों आहोंत असें सांगितलें. त्याकाळीं पुत्रमरणानें पीडित झालेल्या धृतराष्ट्रानें धर्मराजास आलिंगन देऊन त्याचें शांतवन केलें. दुष्टात्मा धृतराष्ट्र कोपित होऊन भीमास आलिंगन देऊन त्याचा दाह करण्याची इच्छा धरली असतां त्याचा तो मनांतील संकल्प जाणोन भीम धृतराष्ट्रास आलिंगन देण्यांस पुढें गेला. तेव्हां कृष्णानें त्यास मागें करून लोहमय केलेला भीमाचा पुतळा धृतराष्ट्रास भेटविला. महा बुध्धिमान सर्व इंगीत जाणणारा श्रीकृष्ण, यानें पूर्वीच धृतराष्ट्राची बुध्धी जाणून सिध्धता केली होती पुढें धृतराष्ट्रानें हा भीमच आहे असें जाणून लोहमय पुतळ्यास आलिंगन देतांच लोहमय पुतळा दहासहस्त्र गजांचें बल ज्यास त्याचे आलिंगनानें भग्न होऊन गेला नंतर धृतराष्ट्राचें उरस्थल विदीर्ण झालें व मुखांतून रुधिराचा स्त्राव होत पृथ्वी वर पडला आणि दुरून पुष्पित झालेल्या पारिजातक वृक्षासारखा दिसूं लागला. इतक्यांत संजयानें धृतराष्ट्रास धरून महाराज हें काय, असें म्हणून त्याचें शांतवन केलें. नंतर राजा शांत झाल्यावर हा भीमा हा भीमा असा अक्रोश करूं लागला. असतां वासुदेवानें धृतराष्ट्र निष्क्रोध झालेला पाहून बोलला कीं हे धृतराष्ट्रा, भीम मरण पावला असें समजून शोक करूं नको भीमासारखी लोहमय त्याची प्रतिमा करून तुला भेटविली ती ही प्रतिमा तुझ्या आलिंगनानें भग्न झाली. तुला अतिक्रोध आला आहे असें समजून भीमास मृत्यु दंष्ट्रांतून बाहेर काढिला. हे धृतराष्ट्र राजा,

यमापासून कोणचाही प्राणी जिवंत सुटण्यास जसा योग्य होत नाहीं तसा तु झ्या बाहूमध्यें सापडलेला मनुष्य कसा जिवंत राहील ? तुझ्या पुत्रानें ती लोहम यप्रतिमा करून ठेविली होती तीच आज तुला आलिंगनार्थ पुढें केली. तूं पुत्र शोकानें संतप्त झालास म्हणून धर्मापासून तुझें मन भ्रष्ट होऊन भीमास म रण्याची तुला बुध्धि झाली. वृकोदराच्या वधानें तुझें काय कल्याण व्हावया चें आहे ? वृकोदरानें तुझे पुत्र मारिले नसते तरी तें कोणच्याही निमित्तानें म रणार होते आम्हीं पूर्वीं शम करीत होतों त्याचा तुम्हीं अंगीकार केला नाहीं तें सर्व आतां मनामध्यें आणून शोक करूं नको. असा विषय या अध्यायां त आहे.

१३ अध्याय तेरावा— वैशंपायन सांगतात हे जनमेजयराजा, धृत- राष्ट्र व वासुदेव, यांचा संवाद चालला आहे तों धृतराष्ट्रानें शौचार्थ सामग्री- आणलेल्या परिचारकास पाहून शौचविधि केल्या वर करून शौच झालेल्या धृतराष्ट्रास पुनः श्रीकृष्ण भाषण करतो. हे राजा, तूं सकल वेदांचें व शास्त्रां चें अध्ययन केलेंस, सकल पुराणें व राजधर्म ऐकिलेस, असा तूं महाविद्वा न् असतां कोणावर हा कोप करितोस. मी, भीष्म, द्रोण, विदुर, संजय या णीं पूर्वीं तुला बोध केला; परंतु आमच्या वाक्याप्रमाणें आचरण केलें नाहीं स. बलानें व शौर्यानें पांडव अधीक आहेत असें जाणत असतां आपल्या पु त्राचे मतास अनुसरलास. हे राजा, जो स्थीर बुध्धी होऊन आपले दोष जाण- तो व देशकाल समजतो त्या राजाचें नेहमी कल्याण असतें. जा राजास हिता- हीत सांगत असतां ऐकत नाहीं तो आपत्तिग्रस्त होऊन शोक पावतो. हे धृत राष्ट्रराजा, तूं असा विचार कर कीं स्वतः तूं मूर्ख होऊन दुर्योधनास वश झाल स. ह्या तुझ्या आत्मअपराधास्तव भीमाचा घात करण्याची कां इच्छा करि तोस, आतां आपला कोप टाक आणि दुष्कृताचें स्मरण कर जा दुष्टानें पांचा लीस सभेंत आणिली तें वैर उगविण्या करितां भीमसेनानें तुझ्या दुष्टपु त्राचा वध केला. या मध्यें त्या दुरात्म्यानें पांडवांची अमर्यादा किती के ली ? अनपराधि पांडवांचा तुम्हीं त्याग केलात त्या आत्मदोषाकडे लक्ष्य दे वा या प्रकारें कृष्णानें भाषण केलें असतां धृतराष्ट्र बोलतो हे कृष्णा, तूं म्हणतोस

हें सर्व सत्य आहे. परंतु पुत्रस्नेहामुळें आतां मला आपल्या स्वस्थितीपासून च्युत केलें. हे कृष्णा, दैवयोगानेंच तो भीमसेन माझ्या बाहूमध्यें आला नाहीं ही चांगली गोष्ट झाली. असो. आतां माझा क्रोध गेला तर मध्यम पांडुपुत्र भीमसेन मला भेटण्यास आणि त्यास मी पाहण्याची इच्छा करितों. सकल पार्थिव मेले व सकल माझे पुत्र नष्ट झाले त्यापेक्षां अवशिष्ट राहिलेले पांडुपुत्र त्यांच्या कल्याणाची मी इच्छा करितों असें बोलून नंतर भीमसेन, धनंजय व माद्रिसुत नकुल, सहदेव यांच्या गात्रांस स्पर्श करून रुदन करीत तुमचें कल्याण असो असें बोलला. असा विषय या अध्यायांत आहे.

१४ अध्याय चवदावा— वैशंपायन सांगतात हे जनमेजया, धृतराष्ट्राच्या आज्ञेनें केशवासहवर्तमान सकल पांडव गांधारीचे दर्शनास गेले तों पुत्रशोकानें आर्त झालेली अजातशत्रु युधिष्ठिरास पाहून यांस कांहीं शाप द्यावा अशी मनांत योजना करीत आहे तो तीचा पापिष्ठ अभिप्राय सत्यवतीसुतानें पूर्वींच जाणून गंगेंतील शुध्धोदकानें उपस्पर्शन करून मोठ्या वेगानें आला. आणि दिव्यचक्षूनें गांधारीचे अभिप्राय जाणून तो महातपस्वी पांडवहीतवादी आपले स्नुषेस भाषण करितो हे कल्याणी, हा शापाचा काल नव्हे तर शमाचा आहे. आपल्या वाणीचा निग्रह कर आणि बोललों त्यानें स्मरण ठेव. युध्धामध्यें अठरा दिवस पर्यंत जयइच्छिणाऱ्या तुझ्या पुत्रानें अशी प्रार्थना केली होती कीं हे माते आमचें कल्याण व्हावें असें चिंतीत बैस त्याकाळीं तूं आपले पुत्रांस असंभाषण केलेंस कीं जेथें धर्म तिकडेच जय ती तुझी वाणी व्यर्थ झाली नाहीं तिचें स्मरण कर आणि संतोष पाव. राजाचें युद्ध होत असतां जयाचा संशय होता परंतु शेवटीं जिकडे धर्म तिकडेच जय झाला. हे गांधारी, पूर्वी तूं क्षमाशील असतां आज पांडवांची क्षमा कशी करीत नाहींस हे गांधारी आपल्या वाणीचें व धर्माचें स्मरण करून आतां कोप टाक. असें व्यासाचें भाषण ऐकून गांधारी भाषण करिते. हे भगवन् मी पांडवांची असूया करून त्यांच्या नाशाची इच्छा करीत नाहीं. परंतु पुत्रशोकानें व्याकुल झाल्यामुळें मला व्यथा होते पांडवांचें कुंतीप्रमाणेंच मी व धृतराष्ट्रानें ही रक्षण करावें. दुर्योधन, शकुनी, कर्ण

णिमात्रा.. ........., बुध्दीच सारथि, इंद्रियच अश्व, मन ह्याच कादण्या अशाअश्वांच्या वेगाबरोबर जो धांवतो तोच संसाररचक्रांत फिरतो. त्यांत फिरणा रांस बहुत दुःख होतें म्हणून बुधानें त्याच्या शांत्यर्थ यत्न करावा. कधींही उपेक्षा करूं नये. हे राजा जो संसारांत आशाबद्ध होतो तो तुझ्यासारखें राज्यनाशादिक दुःख पावतो तर सकल दुःखांस विनाशक असें ज्ञानरूप औषध साधूपासून प्राप्त करून घ्यावें म्हणजे त्या दुःखापासून प्राणी मुक्त होतो ज्यानें मनोरूप रथाचें नियमन केलें तो मृत्युभयाचा त्याग करून ब्रम्हलोकास जातो जो सर्वप्राणिमात्रास अभय देतो तो उत्तम विष्णुपदास जातो सर्वप्राणीमात्रास आत्म्या पेक्षां प्रिय कोणीच नाहींतसेंच त्यास मरणासारखें अनिष्ट दुसरें कांहींच नाहीं म्हणून ज्ञात्यानें सर्वांवर दया करणें योग्य आहे असें जे जाणत नाहींत तेच वारंवार या संसारांत भ्रमण पावतात. जे सूक्ष्मदृष्टि आहेत ते शाश्वत ब्रम्हपदास जातात असा विषय या अध्यायांत आहे. —

८ अध्याय आठवा— वैशंपायन सांगतात हे जनमेजया विदुराचें भाषण ऐकून पुत्रशोकानें संतप्त झालेला धृतराष्ट्र राजा मूर्छित असा भूमीवर पडला. नंतर तो निःसंज्ञ झालेला बांधव, व्यास, विदुर, संजय इत्यादिकांनीं सुखकारक शीतोदकानें व ताडपत्रीविंझण्यानें त्यास वारा घालून सावध केला तेव्हां कांहीं वेळानें शुध्धिवर येऊन पुत्रशोकानें पीडित असा धृतराष्ट्र बहुत कालपर्यंत विलाप करीत बसला. तो असा कीं, ज्याच्या योगानें वारंवार दुःखें होतात त्या मनुष्यजन्मास धिःकार असो. ज्या दुःखाच्या योगानें शरीरास संताप होऊन बुध्दीही नष्ट होते व मरण आलें तरी चिंता नाहीं असें पुरुष म्हणतो. तें दुःख मालब्धानें मला प्राप्त झालें त्याचा अंत प्राण गेल्या वांचून होणार नाहीं असें वाटतें तर आज मी तसेंच करितों असें माहात्म्या ब्रम्हवेत्यांत श्रेष्ठ अशा पित्यास बोलून धृतराष्ट्र राजा मूढपणानें अतिशय शोक पावला. तेव्हां त्याचें भाषण ऐकून कृष्णद्वैपायन, पुत्रशोकानें संतप्त झालेल्या पुत्रास बोलतात. हे धृतराष्ट्रा, मी तुला जें सांगतों तें ऐक. हे प्रभो तूं बुध्धिमान व बहुश्रुत असल्या मुळें कोणतेंही जाणण्याचें राहिला नाहींस हा सर्व जीवलोक,

शाश्वत नसतां तूं कां शोक करितोस? आणि ............ करितां कालानें हा वैराचा उद्भव केला तेव्हां उत्तम गतीला गेलेल्या शूरां करितां कां शोक करितोस? हे महाबाहो विदुरानें शमाकरितां बहुत यत्न केला परंतु दैवानें पडणाऱ्या गोष्टींचें नियमन कोणाच्यानें करवत नाहीं असें मला वाटतें आणि देवांचेंजें कर्तव्य तें मी प्रत्यक्ष ऐकिलें तें तुला स्थैर्य होण्या करितां सांगतों. पूर्वी इंद्र सभेस गेलों तेव्हां तेथें मिळालेले देव व नारदादिक ऋषीही पाहिले तेव्हां पृथ्वी देवास बोलली कीं, ब्रम्हदेवाच्यासदनीं जी प्रतिज्ञा केली ती त्वरित करा. असें तिचें भाषण ऐकून विष्णु हांस्य करीत देव सभेंत पृथ्वीशीं बोलतात धृतराष्ट्र राजाचा ज्येष्ठपुत्र दुर्योधन तुझें कार्य करील त्याच्या करितां कुरुक्षेत्रीं सर्वराजे मिळून दृढशस्त्रानीं परस्परांचा घात करतील नंतर तुझा भार उतरेल. आतां तूं आपल्या स्थानांस त्वरित जाऊन लोकांचें धारण कर असें बोलले. हे राजा लोकसंहाराच्या कारणानें गांधारीच्या उदरीं कलीचा अंश हा दुर्योधन तुझ्या पासून झाला. तो स्वभावतः असहनशील चंचल, क्रोधी असा होता. दैवयोगानें त्याला बंधुही तसलेच मिळाले आणि शकुनी मामा, कर्ण परम सखा असे मिळाले जसा राजा असतो तसा त्याला लोक मिळतो. दुष्ट दुर्योधनाच्या योगानें तुझे सकल पुत्र नाश पावले ही गोष्ट नारद जाणतात तुझ्याच अपराधानें पुत्र नष्ट झाले म्हणून तुला शोकाचें कारण नाहीं हे धृतराष्ट्रा पांडवांकडे स्वल्पही अपराध नाहीं तुझ्याच पुत्रांनीं पृथ्वीचा घात केला. हें वर्तमान धर्मराजाच्या राजसूय सभेंत नारदानीं सांगितलेंच होतें. तें ऐकून पांडवांस बहुत शोक झाला. हें गुह्य तुला सांगितलें म्हणून तुझ्याशोकाचा नाश कसा होईल? धर्मराजानें कौरवांशीं कलह न होण्या करितां बहुत यत्न केले, परंतु दैवबल बत्तर असल्यामुळें त्यांचें कांहींच चाललें नाहीं आतां वारंवार तूं शोकानें संतप्त होतोस असें धर्मराजास समजलें असतां तो प्राण्याचाही त्याग करील. तो पशुपक्ष्यादिकांचे ठायीं ही निरंतर दया करणारा असतां तुझ्यावर कशी दया करणार नाहीं? आतां माझी आज्ञा व दैवही निवृत्त होत नाहीं व पांडवांवर दया-

व दुःशासन यांच्या अपराधानें हा कुरूंचा क्षय झाला यांत पांडवांचा अपराध नाहीं कौरवानीच एकमेकाचा आदर करून युद्ध करीत असतां ज्यांच्या सहील मेलें यांत मला वाईट वाटत नाहीं. परंतु वासुदेव पाहत असतां भीमानें दुर्योधनास गदायुध्धास बोलावून दोघाचें गदायुध्ध होत असतां त्यांत दुर्योधन बलवान आहे असें म्हणून भीमानें नाभीच्या अधोभागीं गदेचा प्रहार केला म्हणून मला क्रोध आला आहे. धर्मवेत्त्या पुरुषानीं क्षत्रियांस जे धर्म सांगितले आहेत ते आपण करितां रक्षावे काय? असा विषय या अध्यायांत आहे.

१५ अध्याय पंधरावा— वैशंपायन सांगतात हे जनमेजय राजा, गांधारीचें भाषण ऐकून भीमसेन नम्रपणें गांधारीशीं बोलतो. हे गांधारी मी आपण करितां जें कर्म केलें तो धर्म असो किंवा अधर्म असो त्यास क्षमा तूं कर तुझ्या पुत्रांस धर्मानें कोणीही मारण्यास शक्य नवता यास्तव अधर्माचें आचरण केलें कारण पूर्वी तुझ्या पुत्रानें युधिष्ठीर राजास अधर्मानें जिंकिलें होतें व त्यानें आमचा छल केला यास्तव मी सर्व तुझे पुत्र मारून दुर्योधन राहिला असतां तर आम्हांस प्राप्त होणारे राज्य आनें घेतलें असतें यास्तव त्यास मी अधर्मानें मारला. द्रौपदी रजस्वला असतां तुझ्या पुत्रानें तिला बोलला तें कृत्य सर्व तूं जाणतेस तर, दुर्योधनास मारल्या वांचून पृथ्वीचा उपभोग आम्हांस घेण्यास अशक्य होता म्हणून त्यास मारला. दुसरें पुत्रानें कृत्य केलेलें सांगतो. सभेमध्यें पांचालीस नेली, त्या कालीं तुझ्या पुत्रानें आपली उजवी मांडी उघडी करून दाखविली, परंतु धर्मराजाच्या आज्ञेनें त्या समयीं आम्ही उगीच बसलों त्या दुरात्म्याचा वध केला नाहीं. वना मध्यें आम्हांस नाना प्रकारचीं दुःखें दिलीं यास्तव हें अधर्म कृत्य मी केलें आतां दुर्योधनास मारून वैराचा शेवट केला. युधिष्ठिरास राज्य प्राप्त झाल्यानें आमचा सकल क्रोध शांत झाला. असें भीमानें भाषण ऐकून गांधारी भाषण करित्ये हे भीमा, माझ्या पुत्राची तूं प्रशंसा करितोस तर अशाचा तूं वध करण्यास योग्य नवतास वृषसेनानें जे व्हां नकुलाचे अश्व मारिले तेव्हां दुःशासनाचें रक्त तूं प्राशन केलेंस हें क्रूर कर्म केलेंस कारण

नीं रक्तपान करणें निंदित आहे. असें गांधारीचें भाषण ऐकून भीमसे
षण करितो. हे गांधारी, तूं म्हणतेस हें खरें अन्याचेंही रक्तपान करूं नये
आपले रक्तपान करणें निषिध्ध आहे. आपला भ्राता आपल्या आ
माणेंच आहे दोघांत कांहीं अंतर नाहीं असें समजून ओष्ट व दंत यां
धोभागीं रुधिर गेलें नाहीं हें सर्व वैवस्वत यमास विदित आहे, माझे ह
मात्र रुधिरानें भरलेले होते. ज्या कालीं वृषसेनानें नकुलाचे अश्व
ले त्या कालीं तुझे पुत्रास मोठा हर्ष झाला हें पाहून मला मोठा त्रास झा
होता, घूतामध्यें द्रौपदीचे केश धरण्याच्या वेळीं क्रोधानें जें मी भाष
लें होतें तें माझे हृदयांत तसेंच राहिलें होतें जर ती प्रतिज्ञा मी पूर्ण के
नसती तर जन्मपर्यंत मी आपल्या क्षात्रधर्मापासून भ्रष्ट झालों असते
स्तव हें मीं केलें!!! हे गांधारी आमचा अपमान करणाऱ्या आपल्या पुत्र
निरोध न करितां आमच्यावर दोष कां ठेवतेस. असें वाक्य ऐकून गांध
भाषण करित्ये हे भीमा, आम्ही वृध्ध आमचे शत पुत्र होते त्यांतून एक
कां शेष ठेविला नाहीस? आम्ही राज्यापासून भ्रष्ट झालों आमच्यासं
र्थ एक तरी पुत्र शेष ठेवावयाचा होता. जशी अंधळ्याची टेकण्याची
ठी असते तसा एक पुत्र आम्हां उभयतांस यष्टीरूप राहता. जर तूं एक पु
ठेविला असतास तर मला दुःख न होतें आणि तुला धर्मिष्ट असेंही म्हट
असतें. असें भीमास भाषण करून क्रोधानें पुनः असें भाषण करित्ये कीं
युधिष्ठिर राजा कोठें आहे हें गांधारीचें भाषण ऐकतांच धर्मराज थर
कांपत गांधारीचे पुढें येऊन मधुरभाषणें करून बोलला हे देवी, तु
पुत्राच्या नाश करणारा युधिष्ठिर तो मी सर्व पृथ्वीच्या नाशास कारण
च यास्तव शाप देण्यास पात्र आहे इच्छा असेल तो शाप द्यावा स क
हृद मी मूढानें नष्ट केले. यास्तव मला वांचून तरी काय उपयोग? भी
न धर्मराजाच्या शेजारी जरी होता तरी भीमास गांधारी भाषण न कां
य. धां श्वासोच्छ्वास टाकीत स्तब्ध बसली. हें पाहून धर्मराज तिचे पायां पडा
आनां म. गेला तेव्हां गांधारीनें पटांतरें करून धर्मराजाच्या हस्ताच्या अंगुली
च त्या अंगुली पूर्वीं सुंदर असतांही तत्काल कृष्णवर्ण झाल्या हें

लें, तों गांधारी चा
भेटण्या विषयीं अज्ञा
नें व्याप्त झाल्यामुळें ने
बहुत कालानें पांडव जाऊन
वेष्टून दुःखीत झालेल्या पुत्राच्या अ
स कोठें क्षतें आहेत कीं काय, असें हस्तस्पर्शान
वरून हस्त फिरवीत दुःखानें शोक करूं लागली. इकड
नें शोक करीत पृथ्वीवर पडली हें कुंतीनें पाहिलें त्याक
भाषण करिते. हे आर्ये अभिमन्यु प्रभृती पौत्रांसह तु
आतां तुझे पुत्र मात्र दृष्टीस पडतात माझे पुत्र तर दृष्टीस
तां अपुत्रा जी मी इला राज्य करून काय कर्तव्य असें म्ह
पृथ्वीवर पडली असतां कुंतीनें तिला उठऊन तिचें शांत
व पांडवांस घेऊन गांधारी कडे आली आणि आर्तस्वरा
गांधारीनें स्नुषे सह वर्तमान कुंतीस आलेली पाहून ती
करून को माझा दुःखाकडे पाहा लोकविनाशकच हा का
वश्य होणार तें झालें. विदुराच्या म्हणण्या प्रमाणें सर्व घ
श्री कृष्णा यानें ही असेंच सांगितलें होतें. त्याप्रमाणें घडलें
वलेल्या क्षत्रियां विषयीं शोक कशाकरितां करावा. जशी मी
दुःखी आहेस कोणी कोणाचें समाधान करावें. परंतु आपलें हें
कुल माझ्याच अपराधानें नष्ट झालें. असा विषय या अध्यायांत ...

१६ अध्याय सोळावा– वैशंपायन सांगतात हे जनमेजया, पतिव्र
गांधारी इनें कुंतीस भाषण केल्यावर व्यास प्रसादानें तिला दिव्य ज्ञानच
आले व कुरूचें मरण ज्या स्थानीं झालें त्या स्थानांस पाहून विलाप करूं ल
ली. तें स्थल जरी दूर होतें तरी गांधारीस जवळच आहे असें दिसलें. ती युध्द
मी अस्थी व केश यानीं व्याप्त होऊन रक्ताचे प्रवाह तीजवर चालले आहे
अश्व व योध्दे यानीं शिरापासून भिन्न झालेलीं सहस्रावधि

